# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.




## ( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यांनीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग नववा.



## ई—अंशुमान

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः

१९२४

मुद्रक—डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फें श्रीधर व्यंकटेश केतकर,
८४१ सदाशिव पेठ, पुणें.

——:*S*:——




## अंतरंगपरिचय.

### ई—ईक्षणयंत्र

**हिंदुस्थान, इतिहास**— वैदिक, ईशोपनिषद्. रजपूत इतिहास.—ईश्वरसिंग. इंग्रजी अमदानी—ईस्टइंडिया कंपनी. जाती—ईदिग. **प्रादेशिक इतिहास व भूगोल**-मुंबई इलाखा.-ईदर. बंगाल इलाखा.-ईश्वरीपुर.

आशिया—ईस्ट इंडीज. चरित्र—ईस्टविक. **यूरोप**-ईजियन समुद्र, ईटन, ईव्हशाम. चरित्र-ईसॉप. इतिहास-ईजियन संस्कृति. **आफ्रिका**-ईजिप्त. **अमेरिका**-ईस्टरबेट.

**वाङ्मय**—संस्कृत.- ईशोपनिषद्, ईश्वरकृष्ण ग्रीक-ईसॉप. **पदार्थविज्ञान**-ईथर. ईक्षणयंत्र. **कृषि वनस्पति**-ईडनिंबू. **धार्मिक**—ईस्टर. ईजियन संस्कृति. **लिपि**—ई.

### उ-उळवी

**हिंदुस्थान इतिहास**—वैदिक,—उद्गाता, उपनयन, उपनिषदें, उपवेद, उपांशु, उमा, उशना, उषा. पौराणिक—उग्रसेन, उतथ्य, उत्तंक, उत्तर, उत्तरा, उत्तानपाद, उदयन, उद्गाता, उद्दालक, उद्धव, उपप्लव, उपमन्यु, उपरिचर, उमा, उर्वशी, उलूक, उलूपी, उशना, उशीनर, उषा. मुसुलमानी.—उच्च, उदयभानु, उदेपुरी बेगम, उर्दुबेगी. रजपूत—उदयसिंह, उपेंद्रपरमार. मराठे.-उदाजी चव्हाण, उदाजी पवार, उद्गीरची लढाई, उद्धव योगदेव, उपरि, उमाबाई दाभाडे, उष्टारखाना. इंग्रजी अमदानी-उमरखान, उमाजी नाईक, उमीचंद,. **इतिहाससाहित्य**-उकाँग. **जातीतिहास**—उचले, उडिया सांक्षिया, उदासी, उप्पर, उरालि, उल्लतन, उस्तरण.

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—मुंबई इलाखा.-कर्नाटक—उकुंद, उन्कल, उळवी. गुजराथ—उखामंडळ उचाड, उंज, उदेपूर, उन-देलवाडा, उप्लेटा, उमरेठ, उमेटा. महाराष्ट्र—उंदीरखेड, उंदेरी, उनबदेव, उंब्रज, उरण, उरुळी. मध्य हिंदुस्थान—उच्छर, उज्जनी, उज्जयन्ताद्रि, उदयपूर उदेपूर, उन, उनी, उपरवार, उमरी, उमेरिया. पंजाब—उच्च, उना. वऱ्हाड मध्यप्रांत—उदेपूर, उपकाचा, उप्रई. उमरखेड, उमरावती, उमरेड. संयुक्तप्रांत—उझानी, उंत्रौल, उन्नाव, उस्का. हैद्राबाद—उद्गीर, उस्माननगर, उस्मानाबाद. मद्रास—उटकमंड, उंडवले, उडुपी, उत्तनगरै, उत्तमपालेयम्, उत्तरमेरूर, उत्तर सरकार, उदमलपेट, उदयगिरी, उपेनंगडी, उप्पाक, उरवकोंड, उरी, उल्लाळ. वायव्य सरहद्द—उंड. राजपुताना—उदेपूर, उनियार. ब्रह्मदेश—उंडविन. ओरिसा—उडू. बंगाल—उत्तरपाडा, उद्धवनाला, उल्बारिया. **आसाम**—उदलगुरि, उदेपूर म्हैसूर—उमत्तूर. प्राचीन हिंदुस्थान—उद्र, उत्तरापथ, उद्दंडपूर, उषकूर. **आशिया-प्राचीन भूगोल**—उर, उरल, उर्मिया. **ऐतिहासिक**,—उमरबिन खत्तब, उस्मान. **यूरोप**—उपसाला, उरल, उल्म. **अमेरिका**—उत्तर अमेरिका. **ध्रुव प्रदेश**—उत्तर ध्रुवप्रदेश.

**वाङ्मयेतिहास**—उखाणे, संस्कृत उत्पल, उद्दंड, उदयनाचार्य उम्वेक, उमापति. जैन—उदयप्रभसूरि, मराठी—उद्धव. उद्धवगोसावी, उद्धवचिद्धन, उद्बोधनाथ, फारसी—उन्सरी उमरखय्याम, उर्फी. बौद्ध-उपशून्य, तामीळ उमापतिशिवाचार्य, उरगप्पा, उद्दंडनाथ.

कायदा-उपनिधि, उपरि. **अर्थशास्त्र**—उत्पादन, उमेदवारी. **वनस्पति**—उटकटारी, उंबर. **पदार्थविज्ञानशास्त्र** उपनेत्र, उष्णता, उष्णताजन्य विद्युत्, उष्णतामापन, उष्णतारसायनशास्त्र, उष्णतावहन, उष्णमानमापकयंत्र. **प्राणी**—उंट, उंदीर, उरोगामी, उवा. **समाजशास्त्र**—उचले व भामटे. **वैद्यक**-उचकी, उदर, उद्वेगरोग, उन्माद, उपनेत्र. **धार्मिक**-उदासी, उपकेशगच्छ, उपनयन, उलेमा. **भाषा**-उडिया. ज्योतिष—उलघबेग मिरझा, उल्का. **लिपी**—उ.

### ऊ-ऊंस

**हिंदुस्थान**— कृषिशास्त्र—ऊंस. **पदार्थविज्ञान**—ऊर्ध्वपातनक्रिया. वैद्यक—ऊरुस्तम्भ. **रसायनशास्त्र**—ऊदाइन ऊदाम्ल, ऊदिदिन, ऊदिन ऊदिलअल्कहल, ऊदिलप्रायोज्जिद, ऊदिलमानन. **लिपी**-ऊ.,

### ऋ—ऋक्षरजा

**हिंदुस्थान. इतिहास**-वैदिक.-ऋग्वेद, ऋभु, ऋषि, पौराणिक-ऋचीक, ऋतुपर्ण, ऋषभ, ऋषिपंचमी, ऋष्यशृंग, ऋक्षरजा. जैन—ऋषभ. राष्ट्र-ऋषिक

**प्रादेशिक इतिहास व भूगोल**—वऱ्हाड.—ऋणमोचन. राजपुताना.-ऋषभ. **प्राचीनजग**-ऋषिक, ऋष्यमूक, ऋष्यवान. **ज्योतिष**-ऋतु. **समाजशास्त्र**-ऋषिपंचमी **अर्थनिश्चय**-ऋषिऋण, ऋषियज्ञ, ऋषिवरण. **लिपि**-ऋ.

### ए-एस्किमो

**हिंदुस्थान—इतिहास**—वैदिक—एकत. पौराणिक-एकत, एकलव्य, एकादशरुद्र. इंग्रजी अमदानी-एडेनजार्ज, एलेनबरो, एल्जिन, एलफिन्स्टन. जाती-एंब्रान, एरवल्लर, एरीलिगास.

प्रादेशिक इतिहास व भूगोल—मुंबई-महाराष्ट्रः—एकरुक, एदलाबाद. एरंडोल.कर्नाटक—एदलाबाद. मध्यप्रांत—एरन, एलिचपूर. मद्रास—एडम्मल्ली, एन्नोर, एरनाड, एरोड, एर्नाकुलम. ब्रह्मदेश—एनमे. पंजाब—एमिनाबाद. राजपुताना—एरिनपुर. हैद्राबाद—एलगंडल. वायव्य-सरहद्द—एडवर्डसाबाद. प्राचीन हिंदुस्थान—एकचक्र. आशिया—एओलिस, एकबटाना, एकर, एक्रान, एडन, एडन कालवा, एन्डर, एडेसा, एडोम, एफेसस, एमेअस, एरिथ्रा, एलाम, एलिआ कॅपिटोलिना, एल्युथेरापोलीस. चरित्र—एसरहडन. यूरोप—एकिल, एक्झीटर, एक्स—ला चापेल, एगिनकुर, एटना, एट्रुरिया, एडिंबरो, एपडॉरस. एमडेन, एमीन्स, एलाय. चरित्र—एंपीडोक्लिस,

वाङ्मय—मराठी—एकनाथ. वनस्पती—एवनो, एरंडी. पदार्थविज्ञान—चरित्र—एपिनस. कला—एनॅमल. धार्मिक—एकदंतभट्ट, एकलिंगजी, एकादशी, एरिडु, एलाम. यंत्रशास्त्र—एंजिन. रसायन—एचर्ड, एनॅमल, एवल. तत्त्वज्ञान—एकतवस्वाद, एपिक्टेटस, एपिक्यूरस, एंपीडॉक्लिस, एरियन. लिपि—ए.

### ऐ–ऐहोळ

हिंदुस्थान, इतिहास, वैदिक—ऐतरेय आरण्यक, ऐतरेय उपनिषद, ऐतरेय ब्राह्मण. पौराणिक—ऐरावत. इतिहाससाहित्य—ऐनीअकबरी.

प्रादेशिक इतिहास व भूगोल—मुंबई इलाखा—कर्नाटकः—ऐनापूर, ऐरणी, ऐहोळ. आशिया—जाती—ऐनू, ऐमक. वाङ्मय, फारसी—ऐयुद्दिन. धार्मिक—ऐयनर. वनस्पति—ऐन; तत्त्वज्ञान—ऐहिकवाद. लिपि—ऐ

### ओ—ओळंबा

हिंदुस्थान—जाती—ओडन, ओझा, ओतारी, ओध, ओरकझई,ओरावन, ओसवाळ.

प्रादेशिक इतिहास व भूगोल— मुंबई इलाखा, महाराष्ट्रः—चरित्रेंः—ओक वामन दाजी. गांवें—ओझर, ओतुर, गुजराथः—ओलवाड. संयुक्त प्रांत—ओनला, ओरई. मध्य हिंदुस्थान.—ओरछा. ब्रह्मदेश.—ओकद्विन, ओकपो. मद्रास—ओन्गोले. बिहार ओरिसा—ओरिसा, ओरिसाकालवे, ओरिसांतील मांडलिक संस्थानें. हैद्राबाद—ओवसा. अमेरिका—ओकलंड, ओक्लाहामा, ओटावा, ओहिओ.जात—ओजिब्वा.यूरोप—ओकहॅम,ओडर, ओडेसा, ओनेगा, ओपोर्टो, ओल्डहॅम, ओल्डेनबर्ग. चरित्रें—ओकोनेल, ओट्टो, ओडोनेल, ओव्रायन. आशिया—ओमान, ओरेक, ओशीमा, ओसाका. जात—ओस्टियाक चरित्रें —ओकुमा, ओकु, ओयामा.

प्राचीनजग—ओफीर. वाङ्मय—इंग्रजी.—ओग्विह्ड, ओस्कार. पदार्थविज्ञान—ओहममापक, चरित्रें.—ओहम. रसायन—ओषण. समाजशास्त्र—चरित्रें— ओवेन रॉबर्ट. भूस्तरशास्त्र—चरित्रें.—ओल्डहॅम थॉमस. स्थापत्यशास्त्र—ओळंबा. प्राणिशास्त्र—ओरँग ऊटँग. चरित्रें—ओमेरॅाड, एलिअनॉर, ओवेन सर रिचर्ड. धार्मिक—ओम्. वैद्यक—ओवा. सृष्टिशास्त्र—चरित्रें—ओकेन लॉरेन्झ. वनस्पति—ओक, ओट, ओवा. अर्थनिश्चय—ओ, ओम्. लिपि—ओ.

### औ—औसलें

हिंदुस्थान, इतिहास—पौराणिक—और्व, औशनस. मुसुलमानी—औरंगझेब. मराठे— औंध. दक्षिण हिंदुस्थानांतील इतिहास—औक जमीनदार. इंग्रजी अमदानी.—औट्रम.जाती.—औदीच्य ब्राह्मण, औंधेलिया.

प्रादेशिक इतिहास व भूगोल—मुंबई. औंध, औंधपट्टा. बंगाल—औनियाति. हैदराबाद संस्थान.—औरंगाबाद. संयुक्त प्रांत.—औरंगाबाद सय्यद शहर. प्राचीन हिंदुस्थान.—औद्देहिक. वाङ्मय.—औसले. उद्योग व व्यापार—औद्योगिक परिषद. कृषिशास्त्र—औतें. अर्थनिश्चय—औ. लिपि—औ.

### अं—अंशुमान

हिंदुस्थान, इतिहास—पौराणिक.—अंगद, अंजना, अंधक, अंबरीष, अंबा. अंबालिका, अंबिका,अंशुमान. मराठे इतिहास.—अंताजी बर्वे, अंताजी माणकेश्वर, अंताजी रघुनाथ, अंबरखाना, अंबाजी इंगळे, अंबाजी पुरंधरे जात.—अंतराल, अंध, अंबत्तन, अंवलक्कारन, अंवलवासी.

प्रादेशिक इतिहास व भूगोल—मुंबई,—कर्नाटकः—अंकलगी, अंकोला. गुजराथः—अंकलेश्वर,अंकेवालिया, अंथड, अंजार, अंतालिआ, अंबाभवानी. अंवाली. महाराष्ट्रः—अंकाई टंकाई, अंजनगांव, अंजनवेल, अंजनेरी, अंतुर्ली, अंबरनाथ, अंबोली.वऱ्हाड मध्य प्रांत.—अंकिसा,अंजनगांव बारी,अंजनगांव सुर्जी, अंजी,अंतगड, अंदोरी, अंधरगांव, अंधारीनदी. अंबागड, अंबागड चौकी, अंबिकापूर, अंभोरा, मद्रास.—अंगडिपूरम, अंबलपुलई, अंबासमुद्र, अंबूर. हैद्राबाद.—अंडोल, अंमोला, अंतूर, अंबर, अंबरपेठ, अंबा. म्हैसूर. अंगाडि, अंबाजी दुर्ग. त्रावणकोर.—अंजेंगो,

प्राचीन हिंदुस्थान—अंग, अंगदिया, अंतर्वेदी, अंबष्ठ. संयुक्त प्रांत.—अंतधुरा, अंबहटा. राजपुताना—अंबेर, बिहार ओरिसा.—अंगुळ. पंजाब.—अंबाला. पोर्तुगीज वसाहत.—अंजिदिव. हिंदुस्थाना समीप चा प्रदेश.— अंदमान आणि निकोबार बेटें. अंदमान बेट. वायव्य सरहद्द.—अंब, अंबेला.

यूरोप—अँकोना, अंजू, अँटवर्प, अँटिओक, अँटियम, अँटिव्हरी, अँडोरा. चरित्रें—अँटीगोनस गोनाटस, अँटीगोनस सायक्लाप्स, अँटीपेटर, अँटोनिनस पायस, अँटोनीयस, मार्कस अँड्रासी ज्यूलियस अमेरिका—अॅशिवला, अँटिग्वा अँटिलीस, अँडीज चरित्र.—अँथनी सुसान ब्रौनेल.

आफ्रिका—अँकोबार, अँगोला, अँटनान रिव्हो. आशिया —अंकोर, अंगोरा, अंबर, अंगोयना प्राचीन जग—अँटिलिया. वाङ्मय—संस्कृत अंबिकादत्त व्यास. नाटय.—अंक. बौद्ध.—अंगुत्तरनिकाय. मराठी—अंगापूरकर, अंतोबा गोसावी. तामीळ.—अंदाळ.अरबी.—अंतर इब्न शद्दाद गणित—अंक, अंकगणित. ज्योतिष—अंकचक्र, अँड्रोमेडा. वैद्यक—अंडाशयछेदनक्रिया, अंतर्गळ, अंत्रपुच्छदाह, अंत्रावरणदाह, अंधत्व मंडनशास्त्र—अंगठी, अंगरखा. धार्मिक व सामाजिक—अंगडशाहा, अंगारा, अंचलगच्छ, अँड्रोमेडा, अंदाळ, अंधत्व. प्राणी—अंडें, अंबरउदी. कृषि वनस्पती—अंगुरशेफ, अंजीर अंबाडी. अंबुशी, अंबेहाळद, रसायनशास्त्र—अंज, अंबराम्ल. चित्रकला—चरित्रें.—अँजेलिको, अँड्रिया डेलसार्टो. पदार्थविज्ञान—अँड्रयूज थॉमस. तत्त्वज्ञान —अतर्ज्ञान. अर्थनिश्चय—अंगदशिष्टाई. लिपि—अं.

ई, अक्षरविकास 'इ' पहा वरचा रफार ( ̊ ) हैहयवंशी जाजल्लदेवाच्या वेळच्या ( इ. स. १११४ ) एका लेखांत आढळतो.

ईजिप्त—हा देश आफ्रिकेच्या ईशान्यकोपऱ्यांत वसला आहे. याची माहिती ( १ ) प्राचीन ईजिप्त, ( २ ) आधुनिक ईजिप्त व ( ३ ) ईजिप्तचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास या अनुक्रमानें पुढें दिली आहे.

प्राचीन ईजिप्त

याविषयीं पुराणवस्तुसंशोधन चांगलें होत आहे. आणि सध्यां एकसारखे नवे शोध होत आहेत. येथील अति प्राचीन संस्कृति व शासनपद्धति यावद्दल मनावर परिणाम होतो व त्याबद्दल शिलालेख सांपडले आहेत. येथील ग्रीक संस्कृतीचा इतिहास, रोमनसाम्राज्य, ख्रिस्ती संप्रदायाचा उदय, इस्लामचा विजय व अलीकडील स्वातंत्र्यार्थ प्रयत्न ह्या गोष्टी देखील ईजिप्तच्या इतिहासांत फार महत्त्वाच्या आहेत.

सतराव्या शतकाच्या आरंभापासून प्राचीन ईजिप्तच्या कलाकौशल्याचे नमुने आणण्यास सुरवात झाली. नेपोलियनच्या स्वारीबरोबर एक शास्त्रीय मंडळ असून त्यांनीं बरेच शोध केले व अवशेष जमविले. त्यांचे सर्व अवशेष ( प्रसिद्ध रॉझेटा दगड धरून ) १८०१ मध्यें ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आले. पुढें महंमद अल्लीनें यूरोपियन लोकांनां ईजिप्तमध्यें संशोधनाची मुभा दिल्यानें बरेच अवशेष जमविण्यांत आले. १८२१ त शांपोलिअनचा चित्रलिपि वाचण्याचा प्रयत्न चांगलाच सफल झाल्यापासून संशोधन विशेष जारीनें सुरू झालें. १८२७ त शापोलिअन व रॉझेलिनी यांनीं कांहीं मंडळी बरोबर घेऊन बराच शोध लाविला व. लेखांच्या नकला केल्या. सर्वांत महत्त्वाचे प्रयत्न लेपसियसचे असून तो प्रशियन सरकारतर्फे १८४२—४५ त गेला. मॅरिएटची नेमणूक (१८५८) ईजिप्तच्या पुराणवस्तुसंशोधनखात्याचा चालक म्हणून झाल्यापासून बरीच सुधारणा झाली. यानें बुलाक बेटावर एक घर घेऊन त्यांत आपले शोध ठेविले. येथून ते गिझा येथील राजवाड्यांत ठेवण्यांत आले व तेथून १९०२ मध्यें ते कायरोंत कस्र—एन—निलमध्यें नेले. ईजिप्तमध्यें पुराणवस्तुसंशोधनखात्याखेरीज ह्मणजे आर्किलिऑजिकल सर्व्हेखेरीज दुसऱ्या अनेक संस्था आहेत. इंग्लंड, जर्मनी व फ्रान्स या देशांतील कांहीं सरकारी व कांहीं विश्वविद्यालयांतर्फे संशोधनाचें काम होतें. १८८३ त टॅनिस येथील फ्लिंडर्स पेट्रीच्या संशोधनापासून शास्त्रीय युगास सुरवात झाली. पूर्वी एखादा लेख, पुतळा अथवा नेण्यासारख्या वस्तूबद्दल शोधक धडपडत असत. परंतु सांप्रत कलाकौशल्य, भाषा, चालीरीती, इतिहास, दंतकथा यांपैकीं कोणतीहि माहिती मिळविण्याची खटपट असते.

प्राचीन जागा वगैरेः—प्राचीन अवशेषांचे लेख व इतर असे दोन भाग करतां येतात. पहिल्यांत शिलालेख व पापिरस वरील लेख येतात; दुसऱ्यांत प्राचीन शहरांच्या जागा, देवळें, तट, घरें, खाणी. रस्ते, कालवे, पुतळे, स्तंभ, शस्त्रें, अवजारें, यांचा समावेश होतो. सर्द हवेमुळें नदीमुखप्रदेशामधील पापिरसवरील लेख खराब झाले. खालच्या ईजिप्तमधील शहरें मातीच्या विटांचीं बांधलेलीं होतीं. त्यामुळें लेख दगडावर कोरीत. यामुळें बरेच लेख सांपडले आहेत. मधला व वरचा ईजिप्त हे भाग इतके भरभराटीस आले नव्हते, यामुळें येथें कमी लेख सांपडले. कायरोपासून प्राचीन शहरें व स्थळें येणेंप्रमाणेंः—उत्तरेस अबूरोआशपासून दक्षिणेस लिष्टपर्यंत पसरलेलें पिरामिडचें स्थळ असून त्याच्या मध्यभागीं मेम्फिस आहे. यानंतर दहशूर, मेडूम, हलाहून, हवार, येथील पिरामिड होत. फायुमच्या दक्षिणेस वाळवंटाच्या कांठावर डेशाश, मीर, अस्युत व बेणीहसन येथील कबरी, स्पेओस आर्टेमिडॉसचें मंदिर, एल अमर्नाचा स्तंभ व कबर, वगैरे आहेत. अस्युतच्या पुढें ड्रोंका व रीफा या कबरी, अबिडॉस व डेंडेरा हीं मंदिरें आहेत. यापुढें नदीच्या दोन्ही तीरांवर थीबीजचे अवशेष आहेत व एस्नाचें मंदिर, एलकाबचे अवशेष, एडफू मंदिर व पहिल्या धबधब्यावरील कोरीव लेख हे आहेत.

न्युबियांत ईजिप्तपेक्षां जास्त अवशेष व स्मारकें आहेत. येथें डेबोड, केर्टासी, कॅलाबशा, वेत एलवाली, डेन्डर, गर्फ हुसेन, डक्का, महरका, ईस सेबुआ, अमाड, डेर, इब्रिम वगैरे मंदिरें, एलेसिया गुहा, ॲनिबा कबर, अबु सिंबेलच्या डोंगरांतील मंदिरें, जेबेल अॅड्डा, वादीहल्फा, सेम्ना, अमार, वसोलेब हीं मंदिरें आहेत. आणखी जेबेल बर्कलचे पिरामिड, नॅपटा मेरोचे बेगरविया येथील पिरॅमिड, मेसॉवराट व नागा येथील मंदिरें हीं आहेत.

मोठ्या व लहान ओलवणांत आणि अमॉन ओलवणांत मंदिरें आहेत. त्याप्रमाणें सिनाई द्वीपकल्पांत वाडीमघारा व सेराबितएल खादिम येथें अवशेष आहेत.

ब्रिटिश म्युझियम लीडेन, बर्लिन, लूव्हर टयुरीन येथील प्राचीन ईजिप्तसंबंधीं संग्रह प्रसिद्ध आहेत. कायरो येथील संग्रह जगांत सर्वांत मोठा आहे. अमेरिकेंतील विश्वविद्यालयांचे संग्रह असून इतरहि शहरांत बरेच संग्रह आहेत.

इतिहास-साधनें.—ख्रिस्ती संप्रदायाचा उदय होण्यापूर्वींचा इतिहास समजण्यास येथील लेख फारच चांगले आहेत. साधारणतः लेख व त्यांत वर्णिलेलीं कथानकें हीं

समकालीन आहेत. बऱ्याच लेखांचा नाश झाला आहे. सर्व लेख मिळाले नाहींत. बरेच शिलालेख आहेत; पण त्यांवरून हजारों वर्षांच्या इतिहासाची व्यवस्था लावणें सोपें काम नाहीं. चालीरीति वगैरेबद्दल लेख नाहींत; परंतु त्याऐवजीं कबरीवर कोरलेलीं चित्रें मात्र आहेत.

वरील लेखांत चित्रलिपीच्या वाङ्मयानें बरीच भर टाकली आहे.१८ व १९ या घराण्यांशीं समकालीन असणाऱ्या तेल-एल-अमर्ना येथील शिलालेख महत्त्वाचे होत. हिटाईटांची राजधानी बोघाझकुइ येथें सांपडलेले १९ व्या घराण्यांतील दुसरा रामेसीससंबंधीं लेखहि उल्लेखार्ह आहेत.असुरियन राजे एसरहद्दन व असुरबानिपाल यांच्या ईजिप्तवरील स्वाऱ्यांची हकीकत व त्यासंबंधीं हे लेख आहेत. हिब्रू वाङ्मयांत थोडीच पण महत्त्वाची माहिती आहे. अरेमाइक भाषेंतील पापिरस-वरील यहुद्यांनीं लिहिलेले लेख ( ख्रि. पू. ५ वें शतक ) सायने व मेंफिस येथें सांपडले. ग्रीक भाषेंतीलहि कांहीं साधनें आहेत. यांत तद्देशीय इतिहास-कार मॅनेथो, हिरोडोटस, डायोडोरस, स्ट्रेबो, टॉलेमी, व प्लुटार्क यांचे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. अलेक्झांडरची स्वारी, टॉलेमी व रोमन यांची माहिती ग्रीक साधनांवरूनच मिळते. लॅटिन भाषेंतील लेख तितके महत्त्वाचे नाहींत पण अरबी लेखांत बरीच दुर्मिळ माहिती असते.

प्राचीन काळची ईजिप्तची स्थिति.—याचें देश्य नांव ‘ केमी ’ म्हणजे ‘ काळा देश ’ हें होय. काव्यांत आजूबाजूच्या वाळवंटास ‘ टोश्री ’ म्हणजे ‘ तांबडा देश ’ असें म्हटलेलें आढळतें. असुरियन भाषेंत याला मुश्री अथवा मिश्री म्हणत व मिसर हें अरबी नांव होतें.

पहिल्या धबधब्यापासून समुद्रापर्यंतच्या नाईल खोऱ्याला ईजिप्त म्हणत. खालच्या न्युबियांत प्रागैतिहासिक काळांत शुद्ध ईजिप्शियन होते. कधीं कधीं ईजिप्तमध्यें लहान लहान निरनिराळीं राज्यें होतीं; कधीं कधीं यांत न्युबिया, लिबियन वाळवंट, ओलवण, अरबी वाळवंट, सिनाई, भूमध्यसमुद्राचा किनारा यांचा समावेश होत असे.

भौगोलिक दृष्ट्या ईजिप्तमध्यें फार फरक पडला नाहीं. नाईल नदीथडीवरचा प्रदेश वसला होता. प्राचीन ग्रंथकार म्हणतात कीं, नाईल नदीला पांच मुखें ( कृत्रिम दोन धरून सात ) होतीं. मळईच्या जमिनींत फारसे फेरफार दिसत नाहींत. पूर्वी जमिनीच्या लहान तुकड्यांत लागवड करीत. हळूहळू कालवे तयार होऊन शेतेंच्या शेतें लागवडीस येऊं लागलीं. वाळवंटांत जंगलीं जनावरें व झाडें बरींच होतीं, परंतु त्यांचा हळूहळू नाश झाला. पापिरस झाडाची लागवड आठव्या शतकापासून बंद झाली. नाईल नदीमुळें बसणारा गाळ सकस असून त्याच्या कच्च्या विटा होत. मोठ्या इमा-रतींसाठीं दगडाचा उपयोग करीत. यांत चुनखडीचा दगड फार उत्तम समजत. हा दुरा व मसारा खाणींतून फार निघत असे. ईजिप्तमध्यें धातूचा पुरवठा नव्हता. न्युबियांत सोनें सांपडे. लोखंड सर्व देशभर सांपडत असून अस्वान येथील खाणींतून काढीत. औद्योगिक वगैरे कामासाठीं येथें चांगलें लांकूड नसे. उत्कृष्ट कामासाठीं लेबॅननमधून देव-दाराचें लांकूड आणवीत. नाईल नदींतून बोटींनें व्यवहार चालत असे. व न्युबियांत पायमार्ग होता. न्युबियांत स्वारी केली तर तेथून गुलाम व गुरेंढोरें मिळत. गरीब व जंगली न्युबियन हे शरीरानें धष्टपुष्ट व धीराचे असून ते सैन्यांत व पोलिस शिपाई म्हणून नोकरी करीत असत. ओलवण, अरबी वाळवंटांतून तांबड्या समुद्रापर्यंत, सोमाली किनाऱ्यावरील प्रदेश, सिनाई व भूमध्यसमुद्र याच्याशीं व्यवहार चालत असे.

दक्षिणेस निग्रो ( नेह्सी ) लोक असून हे रानटी होते. प्युग्रोनी व लिबीया येथील लोक वर्णानें फिकट व निग्रोंपेक्षां थोडे जास्त सुधारलेले असत. सीरियन व केफ्टीऊ ( क्रीटन ) हे लोक मात्र ईजिप्शियनांप्रमाणें सुधारलेले असावे.

ईजिप्शियन स्वतःला ‘ रोमी ’ म्हणजे ‘ जन अथवा लोक ’ म्हणवीत. वाळवंटांतील लोकांना इतर नावें असत. यांच्यासह एकंदर मानव जातीला ‘ नऊ तिरंदाज ’ म्हणत. इथिओपिआ, असुरिया व इराण यांच्या अमलाखालीं आल्या-मुळें हे लोक स्वतःला 'रोमन-केमी' म्हणजे 'ईजिप्तचे लोक' म्हणवीत. ईजिप्तचे लोक मूळ कोठून आले हें सांगतां येत नाहीं. यांची भाषा सेमिटिक तऱ्हेची होती. यांचा धर्म आशियांतील उच्च भावना व आफ्रिकेंतील कांहीं अनागर समजुती यांचें मिश्रण मिळून झालेला होता. ममीजवरून ईजिप्शियन लोकांचा बांधा बारीक व केंस काळे असून ते कॉकेशियन पद्धतीचे होते असें दिसतें. डॉ.एलिएट स्मिथच्या मतें वरच्या ईजिप्तमधील लोक उत्तरआफ्रिका, भूमध्यप्रदेश व अरबस्तान यांतील मिश्रणानें बनलेले असून पुढें त्यांच्या बांध्यांत सुधारणा झाली.

ईजिप्शियन लोक मूळचे क्रूर अथवा भयंकर नव्हते. ते आळशी व निष्काळजी असून धिम्मेपणानें काम करणारे शेतकरी होते. देशाच्या समृद्धीमुळें लोकांत विशेष प्रकारची बुद्धिमत्ता उत्पन्न झाली. याचमुळें आसपासच्या रानटी लोकां-वर ते स्वाऱ्या करीत. अखेरीस असुरिया व इराणच्या सत्तेचें जूं यांच्या माथीं बसलें व विद्येंत ग्रीकांनीं आघाडी मारली. पुष्कळशा उपदेशकांच्या नीतिकल्पना उच्च दर्जाच्या होत्या. मृत्यूनंतरच्या जीवाची स्थिति याबद्दल यांची कल्पना व धर्मशीलपणा यामुळें यांचें वजन तत्कालीन राष्ट्रांत फार वाढलें.

विभागः— ईजिप्तचे दोन विभाग असून मेनीसच्या अगोदर त्यांत दोन राज्यें असत, खालच्या ईजिप्तला उत्तरे-कडचा प्रदेश ‘ टोमेह ’ म्हणत, बाकीच्या ईजिप्तमधील नाईल खोऱ्याला ‘ दक्षिण ’ अथवा शेमा म्हणत. सूर्याचें गृह म्हणून दक्षिणेला उत्तरेपेक्षां मान असे. नंतर दोन्ही प्रदेशाला टोरेस ( दक्षिण प्रदेश ) व टोमेह ( उत्तर प्रदेश )

म्हणत. शासनांत कधीं कधीं हा भेद अवश्य पाळीत नसत. परंतु पारमार्थिक बाबतींत मात्र हा भेद अवश्य पाळीत असत. रोमन काळीं 'मध्य ईजिप्त' म्हणून एक भाग पाडीत. याचे सात 'नोम्स' (प्रांत) असत. हेप्टानोमिसच्या दक्षिणेकडील भागाला थिबेज म्हणत. थिबीजवर ईथिओपियाच्या राज्याचा साधारण अंमल असे. प्रांत व विभाग हे मुख्यतः भूगोलदृष्ट्या असावेत. कदाचित् धार्मिक, नीतिविषयक व इतर ऐतिहासिक कारणांवरून सुद्धां बनले असावेत. ह्या प्रांतांचीं नांवें व संख्या याविषयीं चांगली माहिती नाहीं. मंदिरांवर कोरलेल्या यादींत या प्रांतांची संख्या ४२ असून त्यांपैकीं २२ वरच्या ईजिप्तमध्यें, व २० खालच्या ईजिप्तमध्यें आहेत. या प्रांतांच्या सरहद्दी ठरलेल्या नसत. यांत एक मुख्य शहर असून तेथें गव्हर्नर अथवा प्रांताधिकारी रहात असे. व तें धार्मिक दृष्टीनें मुख्य ठिकाण असे. नवीन साम्राज्यांत या प्रांतविभागाकडे दुर्लक्ष झालें.

राजा व शासनः—येथें राजसत्ताकपद्धति असून तींत राजा मुख्य असे. त्याला देवाप्रमाणें पूज्य मानीत. तो मानव व देव यांत मध्यस्थ असे. राजाचा मुकुट व पोषाख निराळ्या तऱ्हेचा असे. व त्याच्या कपाळावर नागाचें चिन्ह असे. स्त्रियांनां गादीवर हक्क सांगतां येत असे. परंतु क्लिओपाट्राच्या अगोदर स्त्रीया दिसत नाहींत. त्यापूर्वी हाट्शेपसुत हीच कायती १८ व्या घराण्यांतील राणी प्रसिद्ध आहे. परंतु तिच्याच घराण्यांतील राजांनीं तिच्या राज्याकडे दुर्लक्ष केलें आहे. स्त्रियांच्या तर्फे हक्क सांगतां येत असे म्हणून पुष्कळशा उपटसुंभ्या राजांनीं राजघराण्यांतील मुलींशीं लग्न करण्याचा प्रयत्न केला व आपल्या वंशजनांनां कायदेशीर वारस केलें. आपल्या गादीचा वारस राजा हयात असतांनाच ठरवीत असे.

मोठाले जमीनदार व लहान राजे मुख्य राजाला करभार देत असत त्याचा दरबार मुख्य राजाप्रमाणें असे. साम्राज्यांत मुख्य सत्ता राजाच्या हातांत असे. राजघराण्यांतील पुरुषास मोठ्या जागा मिळत. सर्वत्र नोकरशाहीचें जाळें पसरलेलें असून त्यावर दिवाण अथवा 'वजीर' मुख्य असे.(कधीं कधीं दोन वजीर असत).आपल्या स्वतःचें वजन राखण्यासाठीं तो लोकांत मिसळत नसे व त्याला निःपक्षपाती राहण्याचा हुकूम असे. ईजिप्त ही फारोची जहागीर असून वजीर हा त्याचा कारभारी असें म्हटलें असतां जास्त शोभेल.

सैन्य, व शस्त्रास्त्रें, वगैरेः—प्रत्येक तरुणास राजाच्या सैन्यांत लढावयास जावें लागे. शारीरिक मेहनत व शिस्त यांचें त्यांनां शिक्षण मिळे. धनुष्यबाण, भाला, खंजीर व ढाल, या आयुधांप्रमाणें सैन्याचे विभाग पाडीत. अधिकाऱ्याजवळ युद्धपरशु व गदा असे. नवीन साम्राज्याच्या वेळीं सैन्य विशेष तरबेज असून त्याला वेढा व व्यूहरचना यांचें शिक्षण देत असत. त्यावेळींहि सैन्याच्या निरनिराळ्या विभागास निरनिराळीं निशाणें असत. घोडदळाबद्दल विशेष माहिती नाहीं.

कबरी व इतरठिकाणीं कोरलेलीं चित्रें यांवरून प्राग्ऐतिहासिक कालापासून पुढें कोणतीं शस्त्रें प्रचारांत होतीं हें दिसतें. दगडाचीं गदेचीं टोकें, गारेचीं भाल्याचीं टोकें, ब्राँझचे पातळ खंजीर, बाणाचीं दगडी टोकें, वगैरे प्रचारांत होतीं. लांकडी गदेला परकीय शस्त्र समजत. दुसऱ्या रामेसीसच्या वेळच्या भाडोत्री शिपायांच्या हातांत प्रथम शेरडाना (सार्डीनियन) शिपायांच्या हातांत आली. ख्रि. पू. ८ व्या शतकांत प्रथम गोफणीचा उपयोग सुरू झाला. हिक्सॉस राजांच्या काळीं घोड्याचा रथ प्रथम आला असावा. ढाल बैलाच्या कातड्याची केलेली असे. ब्राँझच्या कड्यांचीं चिलखतें करीत.ईजिप्शियन शिपायांचीं तागाचीं उरस्त्राणें प्रसिद्ध असून त्याचा उपयोग इराणी सैन्यांत करीत. २० व्या घराण्यापासूनचीं अस्सल चित्रें नसल्यानें ख्रि. पू. हजार वर्षांच्या प्रथमार्धांत काय प्रगति झाली तें कळत नाहीं.

उपासक.—उपासक साधारणतः वंशपरंपरागत असत. प्रत्येक देवळांत मुख्य उपदेशकाच्या हाताखालीं चार तऱ्हेचे उपाध्ये असून (पुढें टॉलेमी युअर्जेटेसनें पांच केले) ते आळीपाळीनें काम करीत. देवळांच्या आवारांत यांनां जागा असून देवळाच्या उत्पन्नापैकीं कांहीं भाग मिळे. पुढें हे उपासक केस काढीत आणि स्वच्छता व जपजाप्य यांच्या पावित्र्यांकडे जास्त लक्ष देत. यांच्यांत कांहीं विद्वान असत पण बरेच निरक्षरहि असत.

व्यापार व पैसाः—प्राचीन काळीं पदार्थांनीं देवघेव चालत असून नंतर धातूच्या आंगठ्या, सोनें, रुपें व ब्राँझ यांचा विनिमयसाधन म्हणून उपयोग होऊं लागला. सोनें, रुपें वगैरे धातू मंदिरांत ठेवीत. प्राचीन नाणीं ग्रीक (विशेषतः आथेन्स येथील) असून, टॉलेमीच्या अंमलांत नाण्यांचा खरा उपयोग सुरू झाला.

येथें धान्याची पैदास पुष्कळ होत असे. पण इतर बाबतींत ईजिप्त दुसऱ्या देशावर अवलंबून असे. कांहीं माल खंडणी म्हणून, कांहीं व्यापारांत कांहीं बदल म्हणून ईजिप्तमध्यें येत असे. अंतर्गत व बहिर्गत व्यापार बहुतेक परकीयांच्या हातीं असावा. ३० व्या घराण्याच्या वेळीं व्यापार फिनिशियन लोकांच्या ताब्यांत होता. अर्टाक्सर्क्सिसच्या वेळीं यहुदी लोक अस्वान येथें पैशाची देवघेव करीत असत.

पारधः—धनुष्यबाण, पारधी कुत्रे व जाळें यांच्या साहाय्यानें पारध करीत. सिंह, चित्ता व कोल्हा यांचें मांस खात नसत. बाकीचीं जनावरें व पक्षी मारून खात. मासे मारण्याचा धंदा येथें चांगला चालत असे. मासे सुकवून त्यांनां खारवीत असत.

शेतकी व बागाईतः—शेतकी हा येथील मुख्य धंदा असे. नदीचा चढ उतार, सुपीक जमीन, कालवे व उष्णता यांचा शेतकऱ्यांस चांगला फायदा होई. पोहरा व 'शाडूफ'

यांचा पाणी काढण्याकडे उपयोग करीत. रहाटांची माहिती टॉलेमीच्या वेळेपासून दिसते. साधारणतः एकामागून एक अशीं पिकें काढीत. गहूं व जंव हीं मुख्य पिकें असत. त्यापूर्वी 'बोटी' नांवाचें धान्य मुख्य असे व त्याच्या अगोदर हलका गहूं व जंव मुख्यतः पेरीत. क्लोव्हर, वाटाणा, कडधान्य, कांदा, एरंड व ताग हीं पिकवीत. खजूर, डाळिंब, अंजीर हीं मुख्य फळझाडें होत. द्राक्षवेल पूर्वी फार असे. पापिरस झाड रानटी स्थितींत असून शिवाय कांहीं ठिकाणीं त्याची लागवड करीत. त्याच्यापासून प्रसिद्ध कागद काढीत. त्याच्या होड्या तयार करीत व दोरीहि करीत असत. येथें निळीं व पांढरीं कमळें असत.

ग्राम्य पशू व पक्षीः—शेतकऱ्यांजवळ पुष्कळ प्राणी असत. कांहीं घरगुती कामासाठीं व कांहीं मंदिरांनां वाहिलेले पवित्र प्राणी असत. शेळ्या, विशेष प्रकारच्या मेंढ्या, बैल व जंगली जनावरें असून डुकरें फारच कमी प्रमाणांत असावींत. पुढें डुकराला अपवित्र मानण्यांत येऊं लागलें. हंस, बदक, पारवा, बगळा व इतर भक्ष्य पक्षी बाळगीत. मधाचीं पोळीं देखील असत.

जमीनी मक्तयानें वाहण्यास देत असत. जनावरें देखील अशींच मक्तयानें देत, अथवा शेतकऱ्याच्या मालकीचीं असत. घोडे रथासाठीं प्रथम हिक्सॉस राजांच्या वेळीं आणले असावेत. उंट २६ व्या घराण्याच्या अगोदर असावेत असें वाटतें. विशेष नवलाची गोष्ट म्हणजे जनावरावर बसलेली मनुष्यांचीं चित्रें फार क्वचितच असून नवीन राज्याच्या अगोदरचीं तर मुळींच नाहींत. कुत्रा, मांजर व माकड हीं जनावरें बाळगीत. देवळांत, सर्वतऱ्हेचे प्राणी—मोठ्या पासून लहानापर्यंत ठेवीत.

कायदाः—ईजिप्शियन लोकांचे संकलित कायदे असल्याचें माहित नाहीं. परंपरेनें चालत आलेल्या चालीरीती व कायदे यांचा उल्लेख शिलालेखांत असून त्यांनाच पुढें पवित्र ग्रंथांत संकलित केलें असावें. विशेष मुद्यावर वेळोवेळीं फर्मान काढीत असत. टॉलेमीच्या वेळीं देशी कायदा देश्य लोकांच्या फिर्यादींत लावीत. रोमन लोकांच्या अमलांत देशी कायदा प्रचलित होता. प्राचीन कालीं अर्ज राजाकडे अथवा जमीनदाराकडे पाठवीत. कोर्ट म्हणजे अधिकारी वर्ग असून नवीन राज्यांत मात्र अधिकारी अथवा शिष्ट जन असत. राजाकडे अपील करण्यास सर्वकाळीं मुभा होती. पुरावा व फिर्याद लेखी ठेवीत. फौजदारी गुन्ह्यांत कबूली जबाब मिळण्यासाठीं अगर पुरावा गोळा करण्यासाठीं शारीरिक पीडा देत. नवीन राज्यांत मृत्यु, दंड, अवयव तोडणें ह्या शिक्षा असत. प्राचीन राज्यांत अवयवच्छेदनाची शिक्षा असेच. तत्कालीन करार, मृत्युपत्र वगैरे पापिरस वरील लेख सांपडले आहेत.

सव्विसाव्या घराण्याच्या अगोदरचे लग्नसंबंधींचे करार सांपडत नाहींत. स्त्रियांकडे वारसा जात असून मातेच्या बाजूनें हक्क सांगणें महत्त्वाचें असे. फारोच्यावेळीं बंधु व बारस भगिनी यांच्या विवाहाचीं उदाहरणें आहेत. टॉलेमीच्या वेळीं ही चालच पडली होती. एतद्देशीयांत लग्नबंधनानें मुलास सर्व मिळकत मिळे. फारकत झाल्यास हुंडा परत मिळत नसे. मुलगी व जांवई यांचें भांडण झाल्यास मुलीचा बाप मुलीस रोमनकाळांत देशी कायद्यान्वयें घेऊन जात असे.

गुलामगिरी प्राचीन काळापासून चालत असून युद्धांतील कैदी राजा विजयी योध्यास गुलाम म्हणून देई. २५ व्या घराण्यापासून गुलाम विकीत असत. डरायसच्या वेळीं कंचुकी असत. सुंता करण्याची पद्धत होती असें ममीजवरून स्पष्ट होतें. हेड्रीयनच्या हुकुमानंतर फक्त उपाध्यायच सुंता करीत.

विज्ञान, गणित, ज्योतिष, वैद्यक व वाङ्मयः—ईजिप्शियन लोक धार्मिक चर्चेत पटाईत असत; परंतु त्यांचें शास्त्रीय ज्ञान म्हणजे कांहीं ठराविक कृती होत. उपपत्तीचें ज्ञान त्यांच्यांत बेताचें असे. कांहीं हुषार लोकांनीं लावलेले शोध लोक विसरले अथवा ठराविक कृती म्हणून त्यांच्यांत राहिले. या कृती लोक दुसऱ्यांस कळूं देत नसत. यांच्यापैकीं ईजिप्शियनांत इमहोटप, तिसऱ्या घराण्यांतील झोसरचा शिल्पशास्त्रज्ञ. आणि तिसऱ्या अमेनोफिसचा लेखक, अमेनोफिस ( हापचा पुत्र ) या दोघांस देव मानीत. चवथ्या घराण्याच्या हर्डोफलाहि जवळ जवळ असाच मान मिळे. ज्या लोकांनीं मोठाले पिरामिड उभारून आपल्या राजांचें नांव अजरामर केले अशा लोकांस शास्त्रीय ज्ञान असलेंच पाहिजे.

यांची अंक मोजण्याची पद्धति दशात्मक असून लक्षापर्यंत प्रत्येक दहाच्या भागास वेगळी खूण असे. $\frac{२}{३}$ खेरीज सारे अपूर्णांक ज्याचा अंश एक अशा रीतीनें मांडीत. $\frac{१}{१३}$ मांडावयाचे असल्यास $\frac{५}{१३}+\frac{२}{१३}+\frac{२}{१३}+\frac{२}{१३}+\frac{१}{१३}=\frac{१}{२}\ \frac{१}{८}+\frac{१}{२६}+\frac{१}{५२}+\frac{१}{१०४}$ असे अथवा दुसऱ्या प्रकारानें मांडीत. असा परिच्छेद तोंडींच करीत. याचीं कोष्टकें तयार असत. दुप्पट व दहापट करणें, ५ नें गुणणें व भागणें व पाऊणपट करणें ह्या कृती शिकवीत असून तविरूनच सर्व गुणाकार, भागाकार करीत. यांचें गणिताचें ज्ञान 'मधल्या राज्या' पासून मिळतें. हिकसॉस राजांच्या वेळचें ( १६०० ख्रि. पू. ) एक पुस्तक ब्रिटिश म्युझीयममध्यें असून त्याला ऱ्हींड मॅथेमॅटिकल पापिरस म्हणतात. यांत अंकगणित, भूमिति ( म्हणजे क्षेत्रफळ, पिरामिडचें प्रमाण व घनमापन ) आणि किरकोळ उदाहरणें दिलीं आहेत.

ब्रिटिश म्युझियममधील रोमन काळांतील पापायरसवरच्या लेखावरून कुंडली करण्याच्या पद्धतीचा शोध ईजिप्शियनांनीं लाविला असावा असें वाटतें परंतु याला जास्त आधार मिळत नांहीं. ज्योतिषाला फार मान असून कांहीं महत्वाच्या तारखा व दिवस ठरवीत व रात्रीच्या घटका मोजीत. नाईल नदीच्या पुराच्या वेळीं उगवणाऱ्या "सोथीस" वरून वर्षांतला मह-

त्याचा दिवस काढण्यांत येई. देवळांत वेळ मोजण्याचें यंत्र असे. कोणतीहि वेळ ताऱ्याकडे पाहून सांगत असत. याबद्दल कोष्टकें तयार केलेलीं असत.

शस्त्रविद्या दंतविद्या याबद्दल पद्धतशीर माहिती देतां येत नाहीं. पण हीं शास्त्रें बरींच वृद्धिंगत झालीं होतीं. कांहीं ठिकाणीं औषधांचे कागद सांपडले आहेत. शारीरशास्त्रासंबंधीं ( विशेषतः रुधिराभिसरण व श्वसन ) यांनां फार थोडी माहिती होती. औषधाबरोबर मंत्र म्हणण्याची चाल होती. रोग व औषधें यांचीं नांवें अद्याप बरोबर मिळालीं नाहींत.

प्राचीन ईजिप्तसंबंधीं बरेच कागदपत्र सांपडले आहेत. यांपैकीं बऱ्याच लेखांचा उल्लेख आला आहे. भिंतीवर काढलेल्या चित्रांचें वर्णन म्हणून कांहीं शिलालेख आहेत. त्याचप्रमाणें शब्द, पदव्या व शहरें प्रांत, सण, व देवता वगैरे यांच्या यादी दिल्या आहेत. मोठाले ग्रंथ मधल्या राज्यापूर्वीचे असावेत. या राज्याच्या वेळीं उपदेशपर व म्हणींचा संग्रह केलेले ग्रंथ प्रचलित होते. याच वेळच्या अथवा नंतरच्या कांहीं गोष्टी प्रसिद्ध आहेत. पैकीं कांहीं चांगल्या व उपदेशपर असून कांहीं काल्पनिक व अद्भुत रहस्यमय आहेत. यांत सीरियांत पळून गेलेला सिनुहि उनामुनची हकीकत व दोन बंधु या गोष्टी विशेष प्रसिद्ध होत्या. त्या फार मजेदार व काव्यमय असत. कांहीं पद्यांत असत; परंतु वाङ्मयाच्या दृष्टीनें त्या महत्त्वाच्या नाहींत. या सर्व ईजिप्शियन लेखांस केवळ मानवेतिहासशास्त्रदृष्ट्या महत्त्व असून वाङ्मयदृष्टीनें त्यांत विशेष कांहीं नाहीं. त्यांत कृत्रिमता जास्त दृष्टीस पडते. जुन्या व नव्या ईजिप्शियन भाषेंत कांहीं ईशस्तुतिपर पद्यें आहेत.

परमार्थसाधनः—ईजिप्तमधील पारमार्थिक संप्रदायासंबंधानें बरीच माहिती मिळविण्याचीं साधनें असतांना देखील त्यां विषयीं आपणांस फार ज्ञान नाहीं. या विशिष्ट उपासनांची वाढ कशी झाली ह्याचें प्रथम संशोधन झालें पाहिजे. परंतु ही वाढ कशी झाली याची माहिती मिळत नाहीं. यामुळें गृहीतपक्ष व अनुभव यानेंच सर्व माहिती जुळवावी लागते. उपासनाविषयक पुस्तकें एकपक्षीय आहेत व त्यांत बऱ्याच चुका असाव्यात. पिरामिडच्या आंतलि भिंतीवर कोरलेले लेख मुख्य साधनें होत. हे लेख सॅकारा येथील ५व ६ या घराण्यांच्या पिरामिडांत असून बरेच जुने असावेत.

पहिलें साधनः—यांतील विषय मृतसंस्काराचा असून मृत राजा पृथ्वीवरून स्वर्गास कसा जातो, तेथें तारा कसा बनतो, त्याला लागणारीं पेयें व अन्न, इत्यादि आहेत. यांत दिलेले मंत्र प्रथम संस्काराच्या वेळीं फक्त म्हणत असत पण पुढें ते लिहून मृताबरोबर पुरीत. तसेंच त्यांचा उपयोग फक्त मृत राजाच्या वेळीं करीत पण बाराव्या घराण्यापासून इतर लोक देखील त्यांचा उपयोग करूं लागले.

दुसरें साधन.—यांत "मृतासंबंधीं ग्रंथ" ह्या निरनिराळ्या काळांतील एकाच तऱ्हेचा संग्रह आहे. सैत काळांत ह्याची एक खास आवृत्ति काढण्यांत आली असून त्यांत १६५ भाग होते. ह्या पुस्तकाचा उपयोग मृताच्या संस्काराच्या वेळीं करीत. यांत मृतानें कोणतें रूप धारण करावें, कोणत्या देवळ्यांनीं जावें व पाताळांत जातांना भेटणारे राक्षस वगैरे दिले आहेत.

तिसरें साधनः—यांत भिब्रीस येथील राजांच्या थडग्यांवरील लेख ( १८ ते २० घराणें ) यांत कांहीं पारमार्थिक ग्रंथ आहेत. 'आमडुआंत' अथवा 'पाताळांत काय आहे' ह्या ग्रंथांत रात्रीच्या बारा तासांचा सूर्याचा प्रवास दिला आहे; याखेरीज 'देवडचें पुस्तक' 'सूर्यस्तवन' हीं पुस्तकें असून दुसऱ्या एका ग्रंथांत मानवजातीचा नाश व गाईच्या रूपानें स्वर्गाची उत्पत्ति कशी झाली याचें विवेचन आहे.

चवथें साधनः— हीं नंतरचीं पुस्तकें होत. यांत "अपोफिसचा पाडाव" आइसिस व मेफथिसचा शोक व "श्वसनग्रंथ" हीं महत्वाचीं पुस्तकें आहेत.

पांचवें साधनः—संस्कार विधि. यांत मंदिरांतील समारंभाच्या वेळेचे मृतसंस्कार, वगैरेंचा समावेश करतां येईल.

सहावें साधनः—जादूसंबंधीं आधार. पापिरस हॅरिस नांवाचें पुस्तक महत्त्वाचें असून तें कॅबास यांनीं प्रसिद्ध केलें. जादूसंबंधीं पुस्तकांत रोग, सर्पदंश व वृश्चिकदंश यांवर मंत्र असून दुसऱ्या पुस्तकांत बालकांच्या संरक्षणासाठीं मातेनें म्हणावयाचा मंत्र व शुभाशुभ दिवस आहेत.

सातवें साधनः—हें किरकोळ असून महत्वाचें आहे. यांत थडग्यावरील लेख, पापिरस हॅरिस ग्रंथांतील देणगीचे लेख, ईशस्तुतिपर कवनें व टॉलेमीच्या देवळांतील लेख यांचा समावेश होतो.

आठवें साधनः—प्लुटार्कचा इसीस व ऑसिरिस या संबंधीं ग्रंथ महत्त्वाचा असून डिओडोरसची माहिती उपयोगी आहे. डिओडोरसची माहिती मात्र दुय्यम प्रकारची समजतात.

दैवतें:—घराण्यांची सत्ता स्थापन होण्यापूर्वी येथें छोट्या छोट्या स्वतंत्र जाती असून त्यांच्यात नेहमीं युद्धें होत असत. यांतूनच पुढें मोठें राज्य बनलें व फारो मुख्य राजा झाला. यावेळेपासून राष्ट्रीय भावनांचा उदय झाला. निरनिराळ्या राष्ट्रजातींच्या पारमार्थिक व सृष्टिविषयक कल्पना एकत्र करून राष्ट्रीय संप्रदायाची उत्पत्ति झाली. याच सुमारास पिरामिडमधलि लेख कोरण्यांत आले. या संप्रदायांत अनेक देवता व पौराणिक कल्पनांची मिसळ झाली. यांची पायरी पायरीनें झालेली वाढ लेखनसाधनांच्या अभावामुळें कशी झाली हें सांगतां येत नाहीं.

राजसत्ता सुरू होण्यापूर्वी दोन तऱ्हेचीं दैवतें होतीं. एक कुलविशिष्ट अथवा स्थानविशिष्ट दैवतें व दुसरीं निसर्गदैवतें. प्रथम प्रत्येक व्यक्तीचा देव निराळा असून तो एखाद्या प्राण्याचें रूप घेतो अथवा एखाद्या दगडांत अथवा झाडांत रहातो अशी समजूत होती. शांततेच्या वेळीं देवाची मंदिरांत स्थापना करीत, व युद्धाच्या वेळीं निशाण म्हणून समरांगणावर त्याला नेत. पुढें ह्या जाती एकाच भागांत राहूं लागल्यामुळें त्यांच्या देवाला स्थानमाहात्म्य प्राप्त झालें. यामुळें प्रांताला देवावरून नांव देत असत. उदा० 'अनुबिसश्वान देवाचा प्रांत'. शहरें व खेडीं वाढूं लागल्याबरोबरच हीं जाति दैवतें स्थानिक नबलीं. यामुळें ईजिप्तमध्यें एकाच देवाची पूजा पुष्कळ ठिकाणीं होऊं लागली. याचा परिणाम असा होत असे कीं, एकाच देवाचीं दोन रूपांतरें होत. कोणत्या देवाचा उल्लेख केला याविषयीं घोंटाळा होऊं नये म्हणून त्याच्या पुढें तो कोणत्या ठिकाणचा आहे याचा उल्लेख करीत. नवीन ठिकाणीं एखाद्या देवाचें माहात्म्य वाढविण्याची पद्धत नेहमीं प्रचारांत असे. कांहीं ठिकाणीं रे ( सूर्यदेव ) सारख्या निसर्गदेवतांनां सुद्धां स्थानमाहात्म्य प्राप्त झालें होतें.

एखाद्या जातीची कुळदेवता व संरक्षक या दृष्टीनें पाहिलें तर या देवांत मूळचा कांहींच फरक नसे. फक्त त्यांच्या आकारांत अथवा रूपांत फरक असे. देवाला प्राण्यांचें रूप कोणत्या तऱ्हेवर लोक देत हें सांगतां येत नाहीं. कांहीं ठिकाणीं एखादा प्राणिवर्ग पवित्र मानण्यांत येई. यांत मांजर, सुसर, पाल, वगैरे प्राणी असत. कांहीं स्थानिक देवतांनां सर्पाचें रूप दिलेलें आढळतें. व पुढें पुढें चित्रलिपींत सर्प हा देवीबद्दल काढीत असत. सिंहीण व गाय यांना देखील स्त्रीदेवता मानीत. मूळ प्राण्याचें रूप असलेला देव व प्राण्याचें रूप दिलेली निसर्गदेवता यांत बराच फरक असून त्यांनां हें रूप केवळ काल्पनिक देत असत. पुढें पुढें जसजशी सुधारणा झाली व राष्ट्रधर्मीय कल्पनांचा उद्भव झाला तसतसा देवांच्या कल्पनेंत बदल होत गेला. देवींना मानवरूपें देण्यांत आलीं परंतु त्यांचीं डोकीं अथवा आयुधें अथवा चिन्हें मात्र कायम ठेवीत. हळूहळू देवांना मानवी आकाराबरोबर मानवी गुणधर्म मिळाले. खालीं दिलेल्या प्रसिद्ध दंतकथेंत मूळ गोष्ट कशी होती व पुढें तिच्यांत कसा फरक झाला हें दिसून येईल.

ऑसिरिस हा फार चांगला व शहाणा राजा असून त्यानें ईजिप्शियन लोकांच्या उपयोगी अशा बऱ्याच गोष्टी केल्या. परंतु त्याचा दुष्ट भाऊ सेथ यानें त्याला विश्वासघातानें मेजवानीस बोलावून पेटींत कोंडून मारलें व ती पेटी नाईल नदींत टाकली. आसिरिसची पतिव्रता स्त्री इसीस इनें महत्प्रयासानें आपल्या पतीच्या शवाचा शोध लाविला. परंतु इसीस आपला मुलगा होरस याला भेटण्याला गेली असतां सेथनें तें शव ताब्यांत घेतलें व त्याचे चवदा तुकडे सर्व ईजिप्तभर पाठवून दिले. इसीसनें पुन्हां ते तुकडे मिळवून सांपडतील तेथें पुरले. दुसऱ्या हकीकतीवरून इसीसनें ते तुकडे जमवून मंत्रविधीनें आसिरिसला जिवंत केलें, व तो पाताळांत मृतांचा राजा झाला. होरस मोठा झाल्यावर त्यानें मृत पित्याचा सूड उगविला व आपल्या चुलत्याचा सर्व प्रदेश जिंकला. दुसऱ्या हकीकतीवरून या दोघांतील भांडण थॉथ यानें मिटविलें आणि दोघांत ईजिप्त वांटून दिला. होरसला उत्तर भाग मिळाला व सेथनें दक्षिणेकडे राज्य केलें. होरस व सेथ हे दोन बंधू असून त्यांच्यात युद्ध झालें अशीहि एक जुनी दंतकथा होती. ज्यांचीं कुलदैवतें ससाणा—होरस व सेथ होतीं अशा दोन जातींत युद्ध होऊन होरसची उपासक जात विजयी झाली असावी अशीहि एक कल्पना आहे. होरस जातींत राजघराण्याचा उदय झाला असून फारो हे नेहमीं होरस नांव लावीत असत.

ऑसिरिस हा बुसीरिस येथील देव असून इसीस ही जवळच्याच बुटो गांवची देवता होती. वर दिलेली दंतकथा प्रचारांत येऊन तिचें रूपांतर दैवकथेंत झालें. आसिरिस इसिस, सेथ, होरस व नेफथिस हीं पृथ्वीदेव केब व अकाशदेवता नुत यांचीं मुलें असल्याची दुसरी एक प्राचीन कथा आहे. नंतर वरील दोन्ही हकीकती एकत्र करून दोन होरस समजण्यांत आले.

नि स र्ग दे व ता.— यांत 'रे' नांवाची सूर्यदेवता मुख्य होती. याच्या संबंधीं सर्वांत जुनी कल्पना म्हणजे 'मन्झेट' ( उषेचें जहाज ) या गलबतांत रे देव आकाशभर फिरतो; संध्याकाळीं तो मेसेकटेट (संध्येचें जहाज ) नांवाच्या दुसऱ्या गलबतांत बसून रात्रींत पश्चिमेकडून पूर्वेला येतो ही होय. नंतर राला बरींच रूपें देण्यांत आलीं. कांहीं लोकांच्या मतें रेचें सकाळचें रूप बालकाचें असून दुपारीं तो पूर्ण वाढीच्या मनुष्याचें रूप धारण करी व संध्याकाळीं तो वृद्ध मनुष्याप्रमाणें रूप घेई. जेव्हां आकाश म्हणजे गाय समजण्यांत आली त्यावेळीं रे ह्याला वांसराची कल्पना देण्यांत आली. चंद्र हा देव असून तो एका होडींत बसून आकाशांत फिरतो. ग्रह व तारे हे देखील देव असून सीरियस तारा फार महत्त्वाचा असे. आकाश ही नुत देवता असून केब ( पृथ्वी ) हा तिचा पति असे. कांहीं लोकांच्या मतें नुत "नावांचा" दैविक महासागर असून त्यामधून होड्यांतून सर्व ग्रहतारे पार जातात. यानंतर आकाशाला गाईची उपमा देऊन तिचे चार पाय जमिनीवर पक्के ठेविलेले आहेत अथवा तिच्या मोठ्या चेहऱ्याचे चंद्र व सूर्य हे डोळे आहेत. पृथ्वी सपाट असून तिच्यावर भव्य खांब असून त्यावर आकाश स्थिर आहे अशीहि ह्यावा पृथ्वीची कल्पना पसरली. जमिनी खालीं अन्धकारमय व गुप्त प्रदेश असून त्यावर राक्षस पहारा करतात. ह्यास द्वात (पाताळ) नांव असून यांतून रात्रीं सूर्य प्रवास करतो. यांतच मृतांची वस्ती असून तेथें आसिरिस राज्य करतो. नाईल देव असून त्याला 'हापि' म्हणत व

त्याला स्त्रियासारखे स्तन आहेत असें मानीत. शिवाय कांहीं निसर्ग देवतांच्या उपासनेचा प्रचार स्थापन झाला होता.

रात्र, दिवस, वर्ष, ऋतु, चव, ज्ञान, आनंद, नशीब, यांच्या देवता, तसेंच सत्य व खरें यांची देवता मात( रेची मुलगी )हीं दैवतें असून आणखी दुसरीं पुष्कळ दैवतें असत.

परकीय देशाशीं संबंध आल्यामुळें सीरियांतील बाल, अनात, व रेशेफ, दक्षिणेकडील कुरूप व खुजा देव "बेस" आणि बिब्लस येथील "अस्टार्टी" या देवता ईजिप्तमधील देवायतनांत आल्या. थिबीजमधला पहिला अमेनोफिस व त्याची राणी नेफेरटारी इमुथेस व अमेनोफिस नांवाचे प्रसिद्ध पुरुष, यांची देवांत गणना करीत. भव्य वस्तू व ज्यांच्या योगानें पूज्यबुद्धि मनांत उत्पन्न होईल अशा गोष्टी व वस्तू यांची पूजा हे लोक करीत असत.

पौराणिक कल्पनांचा बहुधा उपाध्ये वर्गाकडून प्रादुर्भाव होत असून हेलिओपोलीस येथील कथा, संप्रदाय व देवता यांविषयीं कल्पनांनां व्यवस्थित स्वरूप देण्यांत आलें. सूर्य देव रे हा सर्व देव व मानव यांचा पिता असून महासागरांतील एका कमलांतून बालक रूपानें त्याचा जन्म झाला. एका सरोवरांत असणाऱ्या टेंकडीवर एका अंड्यांतून त्याचा जन्म झाला अशी दुसरीहि एक कथा आहे. रे पासून शो व तेफनुत यांचा जन्म झाला. त्यांच्या पासून केब व नुत आणि त्यांच्यापासून आसिरिस, सेथ, इसिस व नेफतिस यांचा जन्म झाला. या नऊ देवांनां मोठे ईनियड म्हणत असून होरस वगैरे दुसऱ्या नऊ देवानां लहान ईनियड म्हणतात. स्थानपरत्वें वरील ईनियड मधील आपापल्या देवांनां महत्त्व देण्यांत आलें. पिरामिड मधील लेखांत आसिरिसचें महत्त्व रे च्या बरोबरीचें होतें. मृतसंस्कारविधिमुळें आसिरिसचें महत्त्व जास्त राहिलें असावें. आसिरिस चांगला देव असून सेथ याला दुष्ट देव समजत असत. आसिरिस ह्याला पृथ्वी, नाईल, चंद्र वनस्पति व सूर्य यांची देवता समजत.

इजिप्शियन लोकांचा धर्मभोळेपणा, फारच असल्यानें त्यांच्या देवांसंबंधीं मतांत कधींच फरक झाला नाहीं. नवीन देवता, ग्रंथकार वगैरे गोष्टींनीं सुद्धां त्यांच्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. थिबीज मधला अॅमॉन याला १२ व १८ तें २१ या घराण्यांनीं बरेंच महत्त्व दिलें परंतु पुढें त्याच्या पूजकांनीं त्याचेंच रे या सूर्यदेवतेशीं ऐक्य केलें. त्याचप्रमाणें अखेनटान( ४ था अमेनोफिस )यानें दैवत संप्रदायांत क्रांति करण्याचा प्रयत्न केला पण तो सपशेल फसला. यावरून ह्या लोकांवर प्राचीन कल्पनांचा किती पगडा बसला होता हें दिसून येतें.

स्थूलदृष्टीनें पाहिलें तर ईजिप्तच्या धार्मिक मूळ कल्पनांत फरक पडला नाहीं. त्यांच्या अर्थांत मात्र बराच फरक पडला. सांप्रदायिक पुस्तकांची दुर्बोध भाषा नंतरच्या उपाध्यायास समजत नसे, व यामुळें ग्रंथांवर टीका वगैरे लिहिण्यास बरीच जागा होती. यामुळें सुगमता येण्याऐवजीं मूळ कथेंत दुर्बोधता जास्त येऊन दोन कथा अथवा गोष्टी यांचें मिश्रण होत असे दोन देवांचें बहुधा एकीकरण होऊन अॅमॉनचीं अॅमॉनरे, ख्नुम–रे. अशीं नांवें तयार होत. विशेषतः 'रे' देवाशीं अशा तऱ्हेचें मिश्रण जास्त होत असे.

या लोकांच्या कल्पनेंत सर्व देवांवर एक जगन्नियंता असून तो मुख्य आहे व बाकीचे देव म्हणजे त्याचीं रूपें होत अशी कल्पना होती. एकच देवाची पूजा करण्याकडे यांची प्रवृत्ति मधून मधून होत असे.

फारो चवथा अमेनोफिस यानें राजकीय व धार्मिक आकांक्षा धरून आपली राजधानी थिबीज मधून हालवून उत्तरेस दोनशें मैलांवर खिटेटॅान ( आधुनिक –एल–अमर्ना ) येथें नेली. त्यानें थिबीजमधील अॅमॉन –रे व इतर सर्व देवांचें स्तोम: माजविलें. स्वतः अखेनटॉन ( अटॉनचें तेज ) असें नांव धारण केलें. परंतु ६० वर्षांनंतर अशी स्थिति झाली कीं, तें शहर उजाड पडलें व अटॉन देवाचें नांव सुद्धां कोणी घेईनासें झालें.

यानंतर बरीच धर्मशास्त्रें उदयास आलीं. त्यांनीं आपापल्यापरी येथील 'सर्व देवायतनांचा' खुलासा करण्याचा प्रयत्न केला. रे हा पहिला ईजिप्तचा राजा समजून त्याच्यानंतर मोठ्या लहान ईनियडमधील देव राजे झाले.त्यांच्यामागून 'होरस' उपासक गादीवर बसले. यामुळें फारो हे दैविक असून त्यांनां 'रे' चे वंशज समजत. यानंतरच्या वाङ्मयांत पौराणिक व इतर कथा बऱ्याच असून नवीन राज्याच्या अखेरीस लाक्षणिक व नैतिक अर्थ करण्याच्या पद्धतीला उत्तेजन मिळालें. ऑसिरिसची दंतकथा म्हणजे चांगलें व वाईट यांचें युद्ध असे. रेचा अपोफिस नांवाच्या सर्पावरील विजय हा उजेड व काळोख यांच्या युद्धाचा दर्शक होय. 'प्ताह' हा सर्व जीवांचा उत्पादक असून त्यापासून होरस म्हणजे हृदय अथवा मन आणि थॉथ म्हणजे 'जिव्हा' यांची उत्पत्ति झाली. अशा अन्वर्थक दृष्टांतावरून ग्रीकांनीं प्राचीन ईजिप्तच्या लोकांसंबंधीं लिहून ठेविलें असावें.

ईजिप्शियन संप्रदायाच्या अखेरच्या स्थितींत रानटी प्रकार विशेष लोकप्रिय झाले. साधारण प्रकारच्या लोकांनीं मूळ देवाची पूजा करण्यास सुरुवात केली. यामुळें धर्मवेड्या लोकांत भांडणें होऊन रक्तपात झाला. ईजिप्तमधील कांहीं पंथ व त्यांतल्यात्यांत सेरॅपिस व इसिस यांची पूजा यूरोपांत देखील होऊं लागली. रोमनकाळांत थिओडोसिअसच्या हुकुमानें अलेक्झांड्रिया येथील सेरॅप्युम जमीनदोस्त केल्यानें मात्र प्राचीन ईजिप्तच्या धर्माला चांगलाच तडाखा बसला.

दैवतसंप्रदायः—प्रत्येक गांवांत तेथील देवाचें मंदिर असून तें बहुधा दगडी बांधलेलें असे. प्रत्येकांत देवाची मूर्ति असे. प्रथम एकाच देवाच्या नांवानें मंदिर असून

नंतर देवपत्नी व तिसरी देवता म्हणजे दुसरी पत्नी - अथवा मूल, यांचें महत्त्व देवाबरोबर गणण्यांत येऊं लागलें. देवाला अन्न, पेय, वस्त्र वगैरे सर्व वस्तू देण्यांत येत असत. रोज सकाळीं पुजारी मंत्र म्हणून देवद्वार उघडीत असे व यानंतर पूजा व नमस्कार वगैरे झाल्यानंतर 'मात' अथवा सत्यदेवीची मूर्ति देवाला वहात असत. यानंतर देवाला नैवेद्य वगैरे अर्पण करीत व दुसऱ्या दिवशीं असाच विधि होत असे. शुद्धि, धूप व उटणें ह्यांचा समावेश नेहमीं पूजेंत असे; बैल व हंस यांना देवाला बळी देत असत.

लवकरच नित्य पूजा व कांहीं सण सर्व देशभर एकाच दिवशीं व एकाच पद्धतीनें करीत. यांत ऋतूंचा आरंभ, वर्षारंभ व सीरियस ( सोथिस )चा उदय महत्त्वाचे असून ॲबिडॉस येथील ऑसिरिसच्या सणाच्या वेळीं त्याच देवासंबंधीं नाटक दाखवीत. साधारणतः उत्सवांत देवाची मिरवणूक काढीत असत.

येथील मंदिरें एकाच पद्धतीवर बांधलेलीं असत. प्रथम उंच व मोठ्या भिंती असत. त्यावर लढायांचीं चित्रें काढलेलीं असत. याच्या आंत रिकामी जागा असून त्यांत लोकांना साधारणतः सणाच्या दिवशीं येण्यास परवानगी असे. यानंतर एक दिवाणखाना असून त्यांत मिरवणूक वगैरे काढीत. यानंतर एका काळोखी खोलींत देवाची मूर्ति असे. त्यांत फक्त पुजाऱ्यांना येण्यास परवानगी असे. यापूर्वीचीं देवळें म्हणजे निव्वळ झोंपडीवजा असत.

जसजशी फारोची सत्ता वाढली तसतशी उपासना ही राज्यकारभाराचा एक भाग झाली. मंदिरें बांधल्याबद्दल प्रसिद्ध राजांना सुद्धां अभिमान वाटत असे. देवाबद्दल राष्ट्रीय भावना उत्पन्न झाल्यावर युद्धांना धार्मिक स्वरूप आलें. व युद्धांतील लुटीचा बराच भाग मंदिरांना देत असत. दीर्घायुष्य व भरभराट यासाठीं राजे देवांना बरीच संपत्ति अर्पण करीत. पुढें अशी समजूत झाली कीं, देवळें हीं फारोची देणगी असून ती तो आपला बाप 'देव' याला अर्पण करतो. म्हणून पुष्कळदां भिंतीवर धार्मिक विधि राजा करीत असल्याचें दाखविलें आहे. पुजाऱ्यांची सत्ता बरीच असून देवालयाच्या मालमत्तेचा उपभोग तेच घेत. तिसऱ्या रामेसीसच्या कारकीर्दींत ॲमॉन देवाच्या खास तैनातींत ऐंशी हजार लोक असून ४ लक्ष गुरेंढोरें असत. कांहीं पिढ्यांनंतर ॲमॉनच्या मुख्य पुजाऱ्यांनीं फारोची सत्ता गुंडाळून ठेवून स्वतःचें घराणें स्थापन केलें.

पुजाऱ्यांची वेगळी अशी जात केव्हांच झाली नाहीं. पूर्वी जमीनदार हेच मुख्य पुजारी असून त्यांच्या हाताखालीं धंदेवाईक व इतर अशा दोन तऱ्हेचे पुजारी असत. धंदेवाईकांत 'खेरहेब' नांवाच्या विद्वानांकडे विधि वगैरेचें काम असे. सामान्य पुजारी चार प्रकारचे असून ते देवळाचें काम आळीपाळीनें वांटून घेत असत. सर्व पुजाऱ्यांना स्वच्छ पोषाख व खाणें पिणें यांत नियमन ठेवावें लागे. पुजाऱ्याखेरीज इतर कामगार, देवडीवाले, नोकर व गुलाम देवळांत असत. नवीन राज्यांत पुजारी लेखक असत पण केव्हांकेव्हां ॲमान देवाचा पुजारी दक्षिण ईजिप्तचा वजीर असे. स्त्रियांना पुजारी होतां येत असे. कांहीं श्रीमंत स्त्रिया देवळांत देवापुढें गायन करीत. थिबीज येथील 'ॲमान देवाची पूजा करणारी' व 'देवाची पत्नी' या नांवाच्या दोन स्त्री पुजारी असत. सैतकाळांत खुद्द राजा आपली सत्ता चांगली बसविण्यासाठीं या जागा बहुधा आपल्या मुलींना मिळवून देत असे.

मृत व त्यांची पूजाः—देवांची पूजा सरकार व पुजारी यांच्या हातांत गेली, यामुळें लोकांचा धर्ममताचा ओघ दुसरीकडे वळून त्यांनीं मृतांच्या संस्काराकडे विशेष लक्ष पुरविलें. अगदीं प्राचीन कबरींत शवाबरोबर मेंढीचें कातडें व इतर पदार्थ मृताच्या उपयोगासाठीं म्हणून ठेविलेले सांपडतात. सुधारणेच्या ओघाबरोबर प्रेताबरोबर पुरण्यांत येणाऱ्या सामानांत फरक होऊन त्यांत उत्तम वस्तूंचा समावेश करण्यांत आला. ईजिप्शियनांची अशी कल्पना होती कीं, कबर म्हणजे मृताचें राहण्याचें स्थान असून त्यांत त्यांच्यासाठीं जिवंत माणसाप्रमाणें सोय करीत असत. या कबरी विशेषेंकरून पश्चिमवाळवंटांत, जेथें सूर्य मावळतांना दिसे तेथें असत. कबरींत प्रेतांना त्रास होऊं नये म्हणून काळजी घेत. असाच प्रकार पिरामिडांत असून मार्गांत उंच भाग केलेले असत. मृतांच्या पूजेसाठीं वेगळ्या खोल्या असून भिंतीवर चित्रें काढलेलीं असत. प्रेत खराब होऊं नये म्हणून बरीच काळजी घेतलेली दिसते. मध्यकालीन राजांच्या अगोदर श्रीमंत लोकांच्या प्रेतांना मसाला लावण्याची पद्धत सुरू झाली. प्रथम आंतडीं काढून ठेवीत, नंतर प्रेताला सज्जीखार व एक तऱ्हेचें डामर लावीत, अशा ममींना आडवे निजवून मग कबरींत पुरीत. पुढें या बाबतींत बरीच सुधारणा होऊन श्रीमंत लोकांच्या प्रेतांना बऱ्याच तिरड्या लागत. प्रेतांत मसाला भरतांना बरेच विधी करीत व मंत्र म्हणत. प्रेताबरोबर बरेंच सामान असून पुढें नोकरांचें काम करीत असलेले पुतळे असत. मध्यकालीन राज्यांत नोकरांऐवजीं ममीसारखे पुतळे करून ठेवीत. याखेरीज महत्त्वाचा पदार्थ म्हणजे ग्रंथ होत. पिरामिडमध्यें हे ग्रंथ भिंतीवर लिहिलेले सांपडतात. कधीं कधीं प्रेताच्या दगडी पेट्यांच्या आंतल्या बाजूस हे लेख असत. पुढें पापिरस कागदावर ग्रंथ लिहिलेले सांपडत. प्रेत शृंगारलेल्या होड्यांत घालून नाईल नदीच्या पश्चिम तीरावर नेत. तेथून कबरींत नेऊन पुरीत. पुरतांना बरेच विधी करावे लागत.

वरील संस्कारविधि कितीहि चांगला केला व कबरी मधील तयारी कितीहि चांगली असली तरी मृताची दुसऱ्या जगांतील स्थिति केवळ त्याच्या नातलगांवर अवलंबून असे. त्याच्या घराण्यांतील लोकांच्या पूजेवर त्याला अवलंबून रहावें लागे. मेल्यानंतर ज्या शरीराच्या भागाला

# ईजिप्तमधील देवता

रे, सूर्यदेवता.





थोथ, चंद्रदेवता.



अनुबिस.



अमुन.



सबकरे.



अथोर.



खोन्स.



## कांहीं इजिप्शी वर्ण.

(१) इ किंवा आइ. (२) व (३) ब (४) प (५) म (६) न

(७) र. (८) ह. (९) स (१०) श. (११) प. (१२) क. (१३) ग.

(१४) इ

## शब्द-चिन्हें.

(१) कोंपर आणि मनगट यांमधील भाग. (२) तोंड. (३) पोट व स्तनाग्रें (४) तलाव

(५) उतरंड किंवा वीटकाम. (६) पंजा. (७) नाग.

## विशिष्ट क्रिया किंवा वस्तू दर्शविणारीं चिन्हें.

(१) गति. (२) बलयुक्त क्रिया. (३) दैवीपणा. (४) मनुष्य किंवा मनुष्यनाम.

(५) इमारती. (६) वस्तीचीं ठिकाणें. (७) परदेश. (८) खाणें, बोलणें, यासारख्या तोंडाच्या सर्व क्रिया स्तब्धता व मूक.

(९) प्राण्यांचें कातडें. (१०) वनस्पती व तंतू. (११) २ मांस.

### बांधकामाचीं हत्यारें.






### सूतकामाचीं हत्यारें.











अन्न, पाणी व भावना असत त्याला ईजिप्शियन लोक 'का' म्हणत. 'का' चा मनुष्याबरोबर जन्म होत असे व तो दिसण्यांत त्याच मनुष्यासारखा असे. 'का' व आत्मा यांत फरक असून आत्मा अथवा 'बै' मनुष्य मेल्यानंतर त्याच्या कबरेभोंवतीं पक्षी अथवा इतर रूपानें घिरट्या घालीत असे. मृतसंस्कार चांगले झाले असतां जीवाला वाटेल तें रूप घेतां येतें अशी समज होती. देवांना देखील 'का' व 'बै' हीं रूपें असत. 'का'लाच फक्त पूजा अर्पण करीत. मृताच्या मुलांनां ही करणें पूजा अवश्य असे व ते ती करीत. सणाच्या दिवशीं कांहीं पदार्थ कबरींत आणीत आणि शुद्धी व प्रेताचें तोंड उघडणें हा विधि करीत. पुढील पिढ्या हा विधि करतील किंवा नाहीं याची खात्री नसल्यामुळें कांहीं विशिष्ट प्रकारचे लोक द्रव्य घेऊन हा विधि करीत. त्यांना 'कांचे दास' असें म्हणत. किंवा जवळच्या देवळांतील पुजारी कांहीं पैसा घेऊन देवाच्या नैवेद्यांतील कांहीं भाग मृतांसाठीं राखून ठेवीत. इतकी तयारी असतांना सुद्धां कबर खराब होईल व पूजा बंद पडेल या भीतीनें प्रार्थना व धमक्यांचा उपयोग करीत. कबरींत सहज जाणाऱ्या मनुष्याला प्रार्थना करावी लागे व कबर उध्वस्त करणाऱ्यावर ईश्वराचा कोप होईल अशी समजूत असे. मेल्यानंतर मनुष्य कबरींत राहतो या कल्पनेखेरीज तो आकाशांत ताऱ्याच्या रूपानें राहतो अशी दुसरी एक कल्पना होती. असा मान फक्त थोड्यांनाच मिळे. पूर्वीं फक्त सरदार घराण्यांतील लोकांना हा मान असून पुढें नीतिमत्तेनें चालणाऱ्या प्रत्येक मनुष्याला हा मान मिळे. आकाशांत तो मनुष्य कधीं कधीं सूर्य देवाच्या जहाजांत बसून फिरे तर कधीं कधीं तो देव व तारे यांनां मारून खात असे. दुसऱ्या कल्पनेप्रमाणें आकाशांत ईजिप्तसारखाच दुसरा एक देश असून त्यांत कायदे असत. या देशांत धनधान्य, फळें यांची समृद्धि असून त्यांत मृत मनुष्य रहात असे. याला 'सोखेट हरु' (लव्हाळ्याचें रान) म्हणत. प्राचीन ग्रंथांत वरील कल्पना व ऑसिरीस दंतकथा यांचें मिश्रण केलेलें आढळतें. प्रत्येक मनुष्य मेल्यानंतर ऑसिरीसच्या पदावर जाऊन पोहोंचतो व शेवटीं मृत्यु व पापरूपी सेथ यांचा पराजय करतो. पुढें पुढें प्रत्येक मनुष्याला 'ऑसिरीस–अमुक–अमुक' म्हणून नांव मिळे. अशी गोष्ट सांगतात कीं सेथनें आसिरीस विरुद्ध खोटी फिर्याद आणली होती व त्याचा निवाडा हेलिओपोलीस येथील न्यायगृहांत होऊन आसिरीस हा प्रसिद्ध वक्ता थॉथ याच्या मदतीनें निर्दोषी ठरला. यावरून प्रत्येक मनुष्याचा निवाडा होऊन मग त्याला स्वर्गांत स्थान मिळेल ही कल्पना दृढ झाली. यावरून एका स्थळीं एका चित्रांत सिंहारूढ ऑसिरीस व बेचाळीस पंच दाखविले असून समोर तराजू आहे. यांत प्रत्येक मृताचें हृदय तोलून सत्याबरोबर त्याची नोंद थॉथ ठेवतो. याखेरीज मी अमुक अमुक पापें केलीं नाहींत याविषयीं एक यादीच्या यादीच दिलेली सांपडते. यावरून आपण चांगल्या रीतीनें व सन्मार्गानें वागलों नाहीं तर परलोकीं आपणाला सुख प्राप्त होणार नाहीं अशी कल्पना दृढ झाल्याचें स्पष्ट दिसून येतें. ऑसिरीसला जेथें पुरलें असेल तेथेंच आपल्याला पुरावें अशी प्रत्येक ईजिप्शियनाची इच्छा असे. परंतु सर्वांनाच तें शक्य नसल्यानें ते तेथें 'कबरीवरचा' दगड तरी उभारीत, बाराव्या घराण्यापासून अबिडॉसमध्यें ऑसिरीसला पुरलें ही कल्पना दृढ झाली.

मंत्र, जादू वगैरेः—देवळांत अथवा मृताबद्दल होणाऱ्या समारंभांत मंत्र म्हणत असून त्यांचा अर्थ समजण्यास कठिण असे. मंत्राबरोबर कांहीं हातवारे व कृती असत. 'हिक' अथवा मंत्रविद्या धर्मोपदेशक व कांहीं विद्वान माणसें यांनां अवगत असे. या लोकांच्या मतें देवांनां मनुष्यापेक्षां मंत्रविद्या जास्त अवगत आहे व त्यामुळें ते श्रेष्ठ आहेत. एखाद्या मनुष्याचा मेणाचा पुतळा करून त्याला इजा करणें वगैरे गोष्टी कायद्यानें गर्ह्य समजल्या जात. बाकीच्या बाबतींत मंत्रविद्येला कांहींच अडथळा होत नसे.

मंत्राचा उपयोग विशेषतः रोग निवारण्याकडे करीत. भूत पिशाचाची बाधा मनुष्यांनां होऊन त्यापासून रोग उत्पन्न होतात व त्यांचें निवारण जादूटोण्यानें करतां येते अशी या लोकांची समजूत होती. यामुळें रोग व त्यांची चिकित्सा करण्यांत येऊन त्यामुळें औषधी व झाडपाला यांचा खरा उपयोग समजून आला. पुढें पुढें तर सर्पदंश, वृश्चिकदंश वगैरे बाबतींत मात्र मंत्राचा उपयोग करीत. मंत्र फारसे गूढ नसून त्यांत परकीय शब्द व नांवें बरीच येत. मंत्रांत पौराणिक कथा अथवा होरसच्या गोष्टी असून केवळ शब्दानें कार्य होतें असा समज असावा. त्याचप्रमाणें देवानें मांत्रिकाला साहाय्य दिलें नाहीं तर तो त्याला उपाशी वगैरे ठेवण्याची धमकी देत असे. मंत्राबरोबर गांठी अथवा ताईत वगैरे असत. पुष्कळदां मंत्र पापीरस अथवा चिंधीवर लिहून तो तुकडा गळ्यांत बांधीत. मणी, ताईत वगैरे मंत्रून रोगनिवारणार्थ देत असत. धार्मिक कृत्यांत मंत्र होते. उपासना व मंत्र यांत खडाष्टक आहे असें म्हणतां येत नाहीं 'उशेब्ती आंकडे' व 'मृताचा ग्रंथ' हीं मांत्रिक पुस्तकें समजत.

लेखा व गमन—सतराव्या शतकापर्यंत ईजिप्शियन चित्रलिपि वाचण्याच्या प्रयत्नांत फारसें यश आलें नाहीं. १७९९ त नेपोलियननें ईजिप्तवर केलेल्या स्वारीबरोबर फ्रेंच इंजिनीयर होते; त्यांनीं 'रोझेटा' शीलालेख शोधून काढल्यापासून चित्रलिपी वाचण्याच्या प्रयत्नांत यश येऊं लागलें. या दगडावर चित्रलिपी, लौकिक भाषा व ग्रीक या तीन भाषांत लेख होते. चित्रलिपी वाचण्यांत टॉमस यंग याला थोडेंबहुत यश आलें. या बाबतींत सर्वांत जास्त श्रम शाम्पोलियन याचे होत. त्यानें वयाच्या ११ व्या वर्षापासून ईजिप्तसंबंधीं अभ्यासास सुरवात केली. नंतर यानें ईजिप्त

२

देशांत सफर केली. १८३२ त हा वारला. याचे ईजिप्शियन भाषेसंबंधीं विशेष प्रयत्न असून त्याला पूर्वीच्या विद्वानांकडून फक्त लेख वगैरेचीच मदत झाली. या नंतर जर्मनींत लेपसिअस व इंग्लंडमध्यें सॅम्युएल बर्च यांनीं या ज्ञानांत बरीच भर टाकली. ब्रग्श, दरूज, मॅस्पेरो, रेव्हिलो, झोगा, स्टर्न या विद्वान गृहस्थांनीं भाषाशास्त्रच परिणतेस नेलें. विशेषतः जर्मनीनें या बाबतींत बरीच भर टाकली व अॅडोल्फ एरमन व त्याचे शिष्य यांनीं ईजिप्शियन भाषेच्या व्याकरणांत चांगलीच प्रगति केली.

भा षे चा इ ति हा स.—हा बराच दूरवर पसरला आहे. त्याची सुरवात पहिल्या घराण्याच्या शीलालेखा ( साधारणतः ख्रि. पू. ३३०० वर्षे; ) पासून होऊन अगदीं अलीकडचे कॉप्टिक लेख सुमारें इ. स. च्या १४ व्या शतकांतले आहेत. या भाषेचीं रूपांतरें पुढीलप्रमाणें होतात.

प्राचीन ईजिप्शियन भाषाः—ही प्राचीन राज्यांतील भाषा होती. या भाषेंत पहिल्या घराण्याच्या वेळचे लेख असून ५ व ६ या घराण्यांच्या वेळचे लेख पिरॅमिडावर कोरलेले आहेत.

मध्यकालीन व नंतरची भाषा.—या दोन्हीं भाषा अनुक्रमें मध्यकालीन व नवीन राज्यांतील प्रचारांतील होत. पहिली भाषा १३ व्या घराण्यापासून मध्यकालीन राज्याचा नाश होईपर्यंतच्या कालांतील लेखांत सांपडते. दुसरी भाषा १८ ते २१ या घराण्यांच्या कारकीर्दीतील लेखांत वापरली आहे.

डेमॉटिकः—ही भाषा 'सैत' घराण्याच्या वेळीं साधारण लोक बोलत असून ती ' डेमॅटिक ' लिपींत लिहिलेली आहे. थोडा बहुत फेरफार झालेल्या पद्धतीनें ही भाषा इ. स. चौथ्या शतकांत सुद्धां होती.

कॉप्टिक.—ही इ. स. च्या तिसऱ्या शतकापासुन १० व्या शतकापर्यंत ईजिप्त मधील ख्रिस्ती लोकांची भाषा होती.

कालमापनः— प्राचीन ईजिप्शियन ३० दिवसांचा महिना याप्रमाणें वर्षाचे बारा महिने धरीत आणि पांच दिवस अधिक म्हणून एकंदर वर्षाचे ३६५ दिवस धरीत. वर्षाचे तीन ऋतु असून त्यांचीं नांवें अनुक्रमें:—' जलप्रलय ' अथवा 'हिरवट '; ' बी पेरण्याचा हंगाम ' अथवा हिंवाळा ' कापणीचा हंगाम ' अथवा ' उन्हाळा '; बाकीचे पांच दिवस वर्षारंभीं अथवा अखेरीस मोजीत असत. महिन्यांना त्यांतील प्रसिद्ध सणावरून नांवें दिलीं होतीं. तीं येणें प्रमाणें:—थॉथ, पओफी, अथीर, चोईआक, टोबी, मेचीर फामेनोथ, फार्मुथी, पेकॉन्स, पेनी, एपिफी, मेसूर. या लोकांची शेती नाईल नदीच्या पुरावर अवलंबून असे. ' जलप्रलयाच्या ' पहिल्या महिन्याचा पहिला दिवस म्हणजे वर्षारंभ होय. येथील ज्योतिषी सोथिस ताऱ्याच्या उदयावरून वर्षारंभ धरीत असत. अधिक असलेल्या पांच दिवसांस अशुभ मानीत असत. ३६५ दिवसांच्या वर्षाबरोबर ३६० दिवसांचें वर्ष धरीत असावे असा तर्क आहे. देवळांत चांद्रमास धरीत असत. तिसऱ्या टॉलेमी युअर्जीटिझनें दर चार वर्षाला एक दिवस जास्त धरण्याबद्दल प्रयत्न केला पण तो सिद्धीस गेला नाहीं. ऑगस्टसचा प्रयत्न सिद्धीस जाऊन त्यानें ज्युलियन वर्षपद्धति सुद्धां अंमलांत आणली. साधारणपणें असें अनुमान आहे कीं, प्राचीन ईजिप्त मध्यें सोथीक अथवा दुसरा कोणताहि शक चालू नसावा. राज्यारोहणापासून वर्षे मोजण्याची पद्धति चालू होती. प्राचीन शिलालेखांत प्रसिद्ध गोष्टींवरून वर्षे मोजीत. राज्यारोहण वर्षपद्धति कोणत्या तत्वावर होती हें सांगतां येत नाहीं.

मॅसिडोनियन वर्षगणना: टॉलेमीच्या वेळच्या कागद पत्रांत सांपडतें. ऑगस्टसनें ' अलेक्झांड्रीयन शक ' चालू केला.

प्रा ची न ई जि प्शि य न वा ङ्म य.—प्राचीन ईजिप्तचे वाङ्मयात्मक अवशेष आपणास दोन मार्गांनीं उपलब्ध झाले आहेत. यांपैकीं एका प्रकारामध्यें भिंती व प्राचीन स्मारकें यांवरील शिलालेखांचा अंतर्भाव होतो आणि दुसऱ्या प्रकारामध्यें पापीरसवर लिहिलेल्या ग्रंथांचा समावेश होतो; तथापि स्मारकांवरील शिलालेखांचा अंतर्भाव या देशाच्या वाङ्मयामध्यें करणें जरा कठिणच आहे. कारण या शिलालेखांमध्यें वाङ्मयक्षेत्रांत समाविष्ट न करतां येण्यासारख्या राजकीय व धार्मिक घडामोडींच्या हकीकती आहेत. तथापि या शिलालेखांमध्यें कांहीं थोडे वाङ्मयाचे उत्कृष्ट नमुनेहि आढळून येतात.

या शिलालेखांतील एक महत्त्वाचें उदाहरण म्हटलें म्हणजे विख्यात असा जो रामेसीस बादशहा यानें हिटाइट लोकांशीं केलेलें युद्ध वगैरेसारखे पराक्रम वर्णन करणारी कविता होय. याखेरीज शुद्ध ऐतिहासिक स्वरूपाचे अनेक राजवंशावळी असलेले स्मारकावरील शिलालेख उपलब्ध आहेतच; परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या राजवंशावळींचा कोणताहि एक शिलालेख पूर्ण स्वरूपांत उपलब्ध नाहीं. तसेंच ट्यूरिन पापीरस या नांवाच्या अत्यंत महत्त्वाच्या ऐतिहासिक लेखाबद्दलहि असेंच म्हणतां येईल.

ईजिप्तचे वाङ्मयावशेष ज्यांवर कोरण्यांत आले आहेत, त्या पापीरसच्या गुंडाळ्या म्हणजे त्या कालांतील उत्तमोत्तम वाङ्मय ग्रंथ होत. कारण घडी घातलेल्या पानांचीं पुस्तकें हीं अगदीं अलीकडचीं आहेत. या प्राचीन कालांत पापीरसच्या पुस्तकांचाच कायतो उपयोग करण्यांत येत असे. हा पापीरसचा कागद पापीरस झाडाच्या बाह्य त्वचांचे तुकडे एकमेकांस चिकटवून तयार करण्यांत येत असे. हे कागद ८-१४ इंच रुंद असून लांबी मात्र लागेल तितके फूट ठेवण्यांत येत असे. या लेखांपैकीं कांहीं लेख ख्रिस्ती शकापूर्वी तिसऱ्या दशसहस्रकांतील आहेत. या लेखांमध्यें निरनिराळ्या प्रकारचें वाङ्मय दिसून येतें. यांपैकीं

काहीं लेखांमध्यें नीतिपर उपदेश व उत्तम रीतीनें आयुष्य घालविण्याचे नियम दिले असून काहीं लेखांमध्यें वैद्यकशास्त्र व गणित याजबद्दलहि माहिती आहे.

याशिवाय दुसरा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ म्हटला म्हणजे मृतांचें पुस्तक या नांवाचा असून ईजिप्शियन लोक या ग्रंथास बायबलप्रमाणें पूज्य मानीत. शुद्ध वाङ्मयाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे अवशेष म्हणले म्हणजे या लेखामध्यें सांपडणाऱ्या अनेक संपूर्ण अगर त्रुटित स्वरूपाच्या अद्भुत कथा व कविता या होत. या वाङ्मयाची भाषा व लेखनपद्धति इतकी जुनी आहे कीं, या लेखांचा कितीहि व्यासंग केला तरी संशोधकांनां या वाङ्मयांतील मार्मिक स्थळें दाखवितां येणार नाहींत. तथापि काहीं कविता व कथा यांची रचना, विचारपद्धति आणि कल्पकता इत्यादि गोष्टी अर्वाचीन साहित्यशास्त्राच्या कसालाहि उतरण्यायोग्य आहेत. जसजसा या प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास जास्त होऊं लागला तसतसें असें आढळून येऊं लागलें कीं, ईजिप्तच्या या लौकिक वाङ्मयामध्यें प्रवास आणि धाडसें यासंबंधीं कथांचा भरणा जास्त आहे. बराच कालपर्यंत समुद्रपर्यटनाविषयीं एक कथा देखील उपलब्ध झाली नसल्यामुळें अर्वाचीन संशोधकांनीं प्राचीन ईजिप्तच्या दर्यावर्दीपणाच्या अज्ञानासंबंधीं ठाम उपपत्ति निश्चित केली होती.

परंतु १८८० सालीं सेंटपीटर्सबर्ग या रशियन शहरांतील इंपीरियल हार्मिटेज म्यूझियम या नांवाच्या पदार्थसंग्रहालयामध्यें एक प्राचीन ईजिप्शियन कथेचें संशोधन करण्यांत आलें. ही कथा वाचतांच सिन्दबाद नांवाच्या खलाशाच्या गोष्टीची आठवण होते. ही कथा म्हणजे साध्या दैवतविषयक कल्पनेला अद्भुत गोष्टीचें चढविण्यांत आलेलें रूपक होय. या कथेचा नायक एक हतभागी खलाशी असून त्यानें आपल्या समुद्रपर्यटनांतील हकीकती अद्भुत तऱ्हेनें मांडल्या आहेत. या कथेंतील चमत्कृतिपूर्ण बेट म्हणजे मृतजीवांचें निवासस्थान असून या बेटाचा संरक्षक एक सर्प आहे. या कथेवरून ईजिप्शियन लोकांस दर्यावर्दीपणा व समुद्रपर्यटण यासंबंधीं पुष्कळ ज्ञान होतें असें दिसून येईल.

**इजिप्तमधील प्राचीन शिल्पकला.**—प्राचीन इजिप्शियन संस्कृतीचे बरेचसे अवशेष म्हणजे प्राचीन कालांतील कलाविषयक स्मारकें होत. जेव्हां जेव्हां आपण प्राचीन ईजिप्तविषयीं बोलत असतों तेव्हां इजिप्तमधील पिरामिड नांवाचे मनोरे, देवालयें व मोठमोठीं शिल्पें यांजविषयीं बोलत असतों. ज्यावेळीं एखादा मनुष्य ब्रिटिश म्यूझियम किंवा लूव्हर् येथील पदार्थसंग्रहालय यासारख्या संस्थांच्या दालनांतून फिरत असतो त्यावेळीं शिल्पकला ही प्राचीन इजिप्त राष्ट्राचें जीवन असावें कीं काय असें त्यास वाटेल. इजिप्तमधील प्राचीन कलाविषयक स्मारकांची संख्या जरी दिसण्यांत पुष्कळ असली तरी ही संख्या कित्येक शतकांचे थोडथोडे अवशेष सांठवूनच तयार झाली असली पाहिजे. तथापि इजिप्शियन लोक हे पृथ्वीवरील सर्व लोकांमध्यें पहिल्या प्रतीचे शिल्पकलाप्रवीण होते ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. इजिप्शियन शिल्पप्रतिमांची ग्रीक लोकांच्या सर्वोत्कृष्ट शिल्पाबरोबर तुलना करणें केव्हांहि सयुक्तिक होणार नाहीं. परंतु दगडावर शिल्पकाम करण्याची शक्यता प्रथम इजिप्शियन लोकांनीं सिद्ध केली असा जेव्हां विचार येतो तेव्हां इजिप्शियन शिल्पाची खरी योग्यता कळून येते. या सर्व विवेचनावरून अखिल जगाच्या कलाविकासामध्यें पहिलें स्थान प्राचीन इजिप्तकडेच येतें हें दिसून येईल. निरनिराळ्या प्रकारचें सामानसुमान, चंबूच्या आकारांचीं भांडीं वगैरेसारख्या चैनीच्या वस्तू तयार करितांना जरी रुचिवैचित्र्यास पुष्कळ वाव असेल तरी मनुष्यप्रतिमेच्या रचनेमध्यें फेरबदल करण्याची थोडी देखील इजिप्शियन लोकांस परवानगी नसून धार्मिक बाबतींतील सर्व वस्तूंचे सांचे प्रथमपासून अगदीं ठराविक असत. देवता, प्रतिमा वगैरे तयार करण्याचे धर्मोपदेशकांनीं जे नियम किंवा नमुने प्रथम घालून दिले त्याबरहुकूम शिल्पशास्त्रज्ञांनां काम करावें लागे.

इजिप्शियन रिलीफ म्हणजे उठावदार प्रतिमाशिल्पाची उत्पत्ति त्यापूर्वी प्रचलित असलेल्या चित्रकलेपासून झाली असावी. प्रथम देवतांच्या प्रतिमा व दुसरीं धार्मिक चिन्हें यांची सपाट भागावर रूपरेषा आखून नंतर त्यामध्यें रंग भरीत असत. परंतु कालांतरानें याच आकृती एका बारीक हत्यारानें दगडावर काढण्यांत येऊं लागल्या व या निरनिराळ्या प्रतिमांमधील अंतर कोरून काढण्यांत येऊं लागलें, आणि अशा रीतीनें पूर्वीचा सपाट पृष्ठभाग नाहींसा होऊन त्याला शिल्पाचा आकार आला. या प्राचीन इजिप्शियन प्रतिमाशिल्पामध्यें यथातथ्य भावाविष्करण करून दाखविण्याचें कौशल्य साधलेलें दिसत नसून फक्त काहीं सर्वसामान्य कल्पनाबरहुकूम नाक, कान, डोळे, हातपाय इत्यादि भिन्न भिन्न अवयव त्या त्या विशिष्ट ठिकाणीं बसवून दिल्यासारखे दिसतात. पोषाख दाखविण्याची पद्धतीहि अशाच प्रकारची होती. प्रथम आकृति काढण्यांत येऊन मागाहून जसे पाहिजे असतील त्याप्रमाणें निरनिराळे पोषाख त्या आकृतीवर दाखविण्यांत आले आहेत.

मनुष्याकृतीची उंची वगैरेचीं प्रमाणें निश्चित ठरलेलीं नसत. विशेषतः जमिनीपासून गुडघ्यांची उंची ही वारंवार बदलत असे. थडग्यांवरील चित्रकामामध्यें खासगी आयुष्यक्रम, व्यापारधंदे आणि इतर चालीरीती इत्यादि गोष्टी दाखविल्या आहेत; त्यामध्यें रुचिभेदास पुष्कळ परवानगी देण्यांत आलेली दिसते. प्राणिशिल्पामध्यें जरी ठराविक सांचे दिसून येत नाहींत तरी एकदां खुरटलेली शिल्पकला या कामींहि अपूर्ण स्थितींत दिसून येते. तथापि एवढें म्हटलें पाहिजे कीं प्राण्यांच्या आकृती आणि स्वभाव हे

विशेष स्वतंत्र कल्पकतेनें बसविलेले दिसतात. सविसाव्या राजघराण्याच्या आरोहणानंतर ऱ्हास पावत चाललेल्या कलांचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न करण्यांत आला यावेळीं इजिप्तच्या अनेक भागांत मोठमोठ्या सार्वजनिक इमारती, उत्तम शिल्पकामानें सुशोभित केलेल्या बांधण्यांत आल्या आणि राजवाडे व मेंफिस इत्यादि ठिकाणचीं देवालयें यांना उत्तमोत्तम कलाकुसरीच्या शिल्पानें सुशोभित करण्यांत आलें. अशा रीतीनें कलाविकासास पुष्कळच मदत झाली. इजिप्शियन कलाकुशल लोकांचें खरें कौशल्य फक्त चित्रांच्या स्पष्ट आणि उठावदार रूपरेषा काढण्यामध्यें दिसून येतें. रंगकामांत त्यांचें अज्ञान कींव करण्यासारखें होतें. त्यांचें रंगकाम निसर्गाबरहुकूम नसून त्यांत फक्त कांहीं रंगांचें सुंदर मिश्रण असे व अशा प्रकारच्या रंगकामाची खुमारी त्यांची त्यांनांच प्रतीत होई.

इजिप्शियन वास्तुशिल्पविषयीं विचार केला असतां त्यांत ताडवृक्ष व दुसऱ्या अनेक तद्देशीय वृक्ष, वनस्पती इत्यादि विविध निसर्गोत्पन्न वस्तूंचें अनुकरण पुष्कळच केलेलें दिसतें. इजिप्शियन गोलस्तंभाची कल्पना इजिप्त-मधील अति प्राचीन इमारतींच्या लांकडी खांबांवरून घेतलेली दिसत नाहीं. वास्तुशिल्पाचा पुष्कळसा विकास होईतोंपर्यंत इजिप्शियन गृहांच्या अंतररचनेंत गोल खांबांचा उपयोग करण्यांत आला नव्हता. इजिप्तमधील अगदीं मूळचीं लहान देवालयें व घरें फक्त चारी बाजूस चार भिंती घालून बांधलेलीं असत. व इमारतीच्या दगडी खांबाची कल्पना देवालयांतील दगडी तुळयांपासून निघालेली दिसते. गोलस्तंभ किंवा छतपट्टी यांची शोभा वाढविण्याकरितां विकास पावलेलें कमळ, ताडवृक्ष, पुष्कळशा जलवेली व एखाद्या देवतेचें शीर्ष इत्यादिकांच्या शिल्पांचा उपयोग करण्यांत येई. गोल स्तंभावरील मथळ्याकरितां इजिप्शियन लोकांच्या अत्यंत आवडीचें कमळ किंवा दुसरीं कित्येक फुलें त्याचप्रमाणें छतपट्टीकरितां कित्येक प्राणी व त्यांचीं मुंडकीं यांच्या आकृतींचा उपयोग करण्यांत येत असे. परंतु अशा प्रकारचे निसर्गबरहुकूम गोष्टींचें अनुकरण वास्तुशिल्पामध्यें चांगलें दिसत नाहीं ही गोष्ट ग्रीक लोकांप्रमाणें इजिप्शियन लोकांस कळलेली दिसत नाहीं.

इजिप्तमधील देवळांच्या छतास निळा रंग देण्यांत येत असून त्यामध्यें नक्षत्रतारका दाखविल्या जात; आणि ज्या भागांतून राजा आणि इतर धार्मिक मिरवणुकी जात असत त्या भागांवर बुबडें व इतर धार्मिक चिन्हें दाखविलीं जात असत. वास्तुशिल्पाच्या अलंकरणामध्यें जास्त उठाव दिसण्याकरितां मुलामा देण्याची कृतीहि अंमलांत होती. इजिप्शियन लोकांचा मुख्य गुण म्हणजे रंगाचा उपयोग करण्याची पद्धति होय. त्यांचीं भूषणें, घरगुती सामान व जंबूच्या आकृतींचीं भांडीं इत्यादिकांचे घाट सुबक आहेत. इजिप्शियन लोकांच्या वास्तुशिल्पामधील एक मुख्य विशेष म्हणजे गोलस्तंभ व दुसऱ्या कांहीं क्षुल्लक गोष्टी यांमध्यें केव्हांहि रचनेंत सारखेपणा न दिसण्याबद्दल घेतलेली खबरदारी ही होय. या गोष्टीचा क्वचित स्थलीं त्यांनीं अतिरेकहि केला आहे. इजिप्तमध्यें विटांच्या कमानींचा उपयोग वास्तुशिल्पामध्यें ख्रि. पू. १६ व्या शतकांत केलेला दिसून येतो. इजिप्शियन शिल्प ही एक उत्तरकालीन जगास बराच कालपर्यंत चमत्कृतिजनक गोष्ट होऊन बसली होती. कारण या शिल्पावर बारीक बारीक प्राण्यांच्या, देवतांच्या व अशाच दुसऱ्या चिन्हांच्या आकृती दाट ओळीमध्यें इतक्या कोरलेल्या दिसत कीं, त्यामुळें कोणाचीहि जिज्ञासा जागृत होणें शक्य होतें. परंतु पुढील संशोधनावरून असें दिसून आलें कीं या आकृतींचें महत्त्व शिल्पाच्या दृष्टीनें विशेष नसून वाङ्मयदृष्ट्या व त्यापेक्षांहि प्राचीन इतिहासदृष्ट्या जास्त आहे, किंवा एकाच शब्दांत सांगावयाचें म्हणजे या आकृती प्राचीन इजिप्शियन लोकांची एक विचित्र लेखनपद्धति होय. बुद्धपूर्व जग उत्तरभाग पृ. ४ ते ७ पहा.

ई जि प्त म धी ल अ र्वा ची न सं शो ध न.—१९१० ते १९२० च्या दरम्यान ईजिप्तमधील पुराणवस्तुसंशोधनाच्या बाबतींत महायुद्ध सुरू झाल्यामुळें विशेष प्रगति झाली नाहीं. तथापि जेवढी झाली ती देखील कमी आहे असें नाहीं. १९१० नंतर व महायुद्ध सुरू होण्याच्या अगोदर प्रो. फ्लिंडर्स पेट्री यानें तारखान येथें व प्रो. जंकर यानें टुरा येथें जें संशोधन केलें त्यामुळें ईजिप्तच्या प्राचीनतम इतिहासासंबंधीं थोडी फार खात्रीलायक माहिती उपलब्ध झाली आहे. हीं दोन्हीं शहरें मध्यईजिप्तमध्यें आहेत. तीं शहरें खणल्यामुळें 'स्कार्पियन किंग' च्या अमदानींत वरच्या ईजिप्तच्या ( अपर इजिप्त ) राजांनीं कायरोच्या उत्तरेला 'डेल्टा' पर्यंत आपला अंमल बसविला होता असें सिद्ध झालें आहे. गर्झेह येथें बेनराईट यानें इतिहासपूर्व काळांतील एका लोखंडी हारामधील, मणी शोधून काढले. हे मणी निदान ख्रि. पू. ४००० वर्षांच्या वेळचे असावेत असें खात्रीलायक अनुमान काढण्यास जागा आहे. त्यावरून लोहयुगाला सुरवात होण्यापूर्वीच ईजिप्तमधील लोक मधून मधून लोखंडाचा उपयोग करीत होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. रँडाल मॅक इव्हर यानें ख्रि. पू. २००० वर्षांपूर्वीच्या एका थडग्यांतील लोखंडी भाल्याचें टोंक शोधून काढलें आहे त्यावरून देखील वरील अनुमानाला बळकटी येते.

न्युबिया येथील संशोधनावरून देखील प्राचीन ईजिप्तमधल्या मानवजातीसंबंधानें बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. या न्यूबियाच्या संशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, आर्मेनाईड वंशाच्या लोकांनीं ईजिप्तमध्यें येऊन लोअर ईजिप्त व अपर ईजिप्त येथें आपलीं राज्यें स्थापण्यापूर्वी न्यूबियामध्यें नवपाषाणयुगीन संस्कृति अस्तित्वांत होती व ती वरील राज्यें स्थापण्याच्या पूर्वीच्या ईजिप्तच्या संस्कृतीसारखी होती. राज्यस्थापनेच्या काळापूर्वीच्या ईजिप्तमध्यें ज्या

तन्हेचीं व तांबडीं काळीं भांडीं तयार होत असत त्यापेक्षांहि अधिक सुबक अशीं भांडीं न्यूबियन वसाहतवाल्यांनीं ईजिप्त मध्यें आणलीं होतीं असें दिसून आलें आहे. ईलियट स्मिथनें संशोधनांतीं असें सिद्ध केलें आहे कीं, ईजिप्तमध्यें, दोन मानववंशांचे लोक रहात असावेत हे दोन वंश म्हणजे, एक नायलोटिक व दुसरा आर्मेनियाड वंश. या आर्मेनियाड वंशाच्या लोकांनांच ईजिप्तला रानटी स्थितींतून वर काढून सुधारणेच्या मार्गावर नेण्याचें श्रेय आहे. आर्मेनियाड वंशाचे लोक मूळ कोठून आले हें मात्र नक्की सांगतां येत नाहीं. कारण आर्मेनियाड मनुष्याची जी कवटी उपलब्ध झाली आहे ती कवटीहि सेमेटिक वंशाच्या माणसासारखी दिसते, पण तोंड मात्र मध्ययूरोपांतील लोकांच्या सारखें आढळतें.

प्राचीन ईजिप्त व बाबिलोनिया, यांच्या मध्यें तांबड्या समुद्राच्या मार्गानें अगर वालुकामय प्रदेशांतून दळण वळण चालू होतें किंवा नाहीं हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. नाईल नदीच्या तीरावर नग हमडीच्या समोर, वडी-एल-अरक म्हणून एक गांव आहे. त्या ठिकाणीं, राज्यस्थापनेच्या पूर्वीच्या ईजिप्तच्या काळचा हिपापोटेमस प्राण्याच्या दातांच्या मुठीचा एक दगडी चाकू सांपडला असून, त्या मुठीवर प्राचीन ईजिप्त मधील लोक व इतर जाती यांच्यामध्यें, युद्ध चाललें आहे असें चित्र कोरलें आहे. या चित्रामध्यें जहाजाचें चित्रहि काढलें आहे; व शिवाय बाबिलोनियांतील देवतांच्या सारखी भासणारी एक देवता काढली आहे. या चित्रावरून बाबिलोनिया व ईजिप्त यांमध्यें पूर्वापार दळणवळण होतें असें अनुमान काढण्यास पुष्कळच जागा आहे. शिल्पशास्त्राचा पुरावा पडताळून पाहिल्यास वरील अनुमानाला पुष्टीच मिळते. उदाहरणार्थ क्विबेलनें शोधून काढलेलें हीरॅकान पोलीस येथील पहिला पेपी व त्याचा मुलगा यांचे पितळी पुतळे व १९१८-१९ सालीं हालनें उरजवळ टेल एल ओबिड येथें शोधून काढलेले तांब्याचे सिंह यांचा बारकाईनें विचार केला तर दोन्हीमध्यें शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें बरेंच साम्य आढळून येतें. या दोन्ही चित्रांतील डोळे ठराविक तन्हेनें व ईजिप्शियन वळणावर बनवलेले दिसतात. त्यावरून या दोन्ही राष्ट्रांत दळणवळण प्राचीन काळापासून होतें असें दिसतें.

इमारतीला मोठमोठ्या दगडांचा उपयोग करण्याची चाल ईजिप्तनेंच प्रथम प्रचारांत आणली व तिचें अनुकरण, ब्रिटन ते चीन पर्यंतच्या सर्व देशांत झालें असें स्मिथ सारख्या संशोधकांनीं प्रतिपादन केलें आहे. या सिद्धांताचा खरेपणा अद्यापि सिद्ध झाला नाहीं. तरी पण त्यांत बरेचसें तथ्य आहे यांत शंका नाहीं. बाबिलोनियामध्यें ईजिप्तच्या धर्तीवर दगडांनीं बांधलेली अशी एक एरिड शहराची भिंत एवढीच आहे.

'ईजिप्त एक्स्प्लोरेशन सोसायटी' नें टेल एल अमर्ना येथें खणण्यास सुरवात केली आहे व नवीन नवीन शोध लागत चालले आहेत. महायुद्ध सुरू होण्यापूर्वी जर्मनांनीं अखेनेटॉन राजाच्या काळच्या शिल्पकलेचे निरनिराळे नमुने शोधून काढले होते, त्याच्याच पुढें ईजिप्तच्या वरील संस्थेनें शोध लावण्यास सुरवात केली आहे. प्रसिद्ध संशोधक प्रो. पीट यानें असें सिद्ध केलें आहे कीं, अखेनेटॉन राजानें ईजिप्तमध्यें सूर्य देवतेचीच उपासना सरसहा अमलांत आणण्याचा प्रयत्न केला, ही जी जुनी समजूत होती ती खरी नसून सूर्यदेवतेव्यतिरिक्त इतर देवतांचीहि पूजा त्या वेळीं केली जात असे. प्रो. नेव्हिली यानें महायुद्धापूर्वी ॲबिडास येथील असुरियनांची इमारत खणण्याचा प्रयत्न केला होता; पण युद्ध सुरू झाल्यामुळें तें काम तसेंच पडून राहिलें असून अद्यापिहि सुरू झालें नाहीं; पण ही इमारत खणून काढल्यास बरेच नवीन शोध लागतील, अशी तज्ज्ञांची अपेक्षा आहे. मध्य ईजिप्तमध्येंहि प्रो. पेट्री यानें संशोधन करण्यास सुरुवात केली असून तेथेंहि बरेच शोध लागतील असा अजमास आहे. गिझा येथील मनोरा खणून काढून न्यूबिया येथील संशोधनावरून व नंपाट येथील मनोऱ्यांचा अभ्यास करून डॉ. रीनर यानेंहि बरेच शोध लावले आहेत. न्यूबिया येथें ग्रिफिथ यानें निरनिराळीं भांडीं शोधून काढलीं आहेत, त्यांवरून ईजिप्तच्या शिल्पकलेवर टॉलेमिक व रोमन संस्कृतीची छाप पडलेली दिसून येते. पेन्सिलव्हिनिया विश्वविद्यालयातर्फे पाठविलेल्या संशोधक मंडळानें व व्हिएन्ना येथील संस्थेनें पाठविलेल्या प्रो. जेकर यानें तिसऱ्या ते सातव्या घराण्याच्या काळचीं मस्तबा येथील थडगीं खणून काढून पॅलेर्मो दगडाचे निरनिराळे नमुने शोधून काढले आहेत. प्रो. पेट्री यानें लहून येथील बाराव्या घराण्याच्या वेळचीं रत्नें शोधून काढलीं आहेत. याशिवाय आणखी अनेक प्रकारचे शोध निरनिराळ्या राष्ट्रांच्या संशोधक मंडळानीं लावण्यास सुरवात केली आहे. सिनाई येथील सर्व शिलालेख छापून प्रसिद्ध करण्याचें महत्त्वाचें कार्य डॉ. गार्डीनर व पीट यांनीं चालविलें आहे व सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे लंडन येथील 'बर्लिंग्टन फाइन आर्ट्स क्लब'नें ईजिप्तमधील 'ईजिप्शियन कलेच्या नमुन्यांचें प्रदर्शन' निरनिराळ्या ठिकाणीं भरविण्याचें काम अंगावर घेतलें आहे ही होय.

ईजिप्तमधील पुराण वस्तूंचे संशोधक लॉर्ड कार्नार्व्हन यांनीं मि. हॉवर्ड कार्टर यांच्या मदतीनें ईजिप्त देशांत नाइल नदीच्या प्रदेशांत लुक्झार नजीक एक मोठा शोध लावला. ईजिप्त देशांत इ. स. पूर्व १३००च्या पूर्वी होऊन गेलेल्या फारो वंशांतल्या राजांची प्रेतें पुरण्याच्या जागेचा लॉर्ड कार्नार्व्हन यांनीं शोध लावून त्या वंशांतील तुतनखामे राजाचें थडगें त्यांनीं नुकतेंच उकरून काढलें. या थडग्यांत सांपडलेल्या वस्तू आश्चर्यचकित करणाऱ्या आहेत. मुख्य थडगें ज्यांत आहे तें दालन अद्यापि उकरावयाचें आहे. पण या मुख्य दालनाच्या पश्चिमेचें जें दालन उकरलें आहे त्यांत तीन पलंग

आहेत. या पलंगांनां सोन्याचा मुलामा दिलेला असून त्यांचे खूर सुबक नक्षीदार आहेत. एकेकावर तीन माणसें निजूं शकतील इतके ते रुंद असून वजनानें हलके आहेत. याच दालनांत एक सिंहासन असून तें फारच कलाकुसरीचें व शोभिवंत आहे, त्यावरून त्यावेळीं ईजिप्शियन कलाकौशल्य पूर्णत्वास पोंचल्याचें दिसून येतें. याच दालनाच्या एका कोपऱ्यांत चार सोनेरी रथ असून ते उकलून ठेवले आहेत. या रथांवरहि जागजागीं सोन्याचें व जडावाचें काम आहे. पण त्यांतला जेवढा भाग काढून नेतां येईल तेवढा चोरांनीं काढून नेलेला दिसतो. तथापि जेवढा भाग अवशिष्ट आहे तेवढ्यावरून देखील या कामांतील कलाकौशल्य व्यक्त होतें.

तुतनखामच्या थडग्याचें मुख्य मध्यवर्ती दालन अद्यापि उकरून काढावयाचें आहे. तेथें काय काय अमोलिक चिजा सांपडतात तें पाहण्याची संशोधकांस उत्कंठा लागून राहिली आहे. ईजिप्त देशांत असा कायदा आहे कीं, अशा जुन्या पुराण्या वस्तू कोणी शोधून काढल्या तर त्या वस्तूंचा चतुर्थांश भाग संशोधकांनां बक्षीस देण्यांत येतो. परंतु प्राचीन राजांचीं थडगीं व त्यांतील या अमोलिक वस्तू सांपडल्यापासून ईजिप्शिअन अधिकाऱ्यांनीं पूर्वीचा कायदा बदलून सरकारच्या परवानगीशिवाय कोणाहि संशोधकानें या प्राचीन वस्तूंस हात लावूं नये असा हुकूम केला आहे. कारण ईजिप्तच्या प्राचीन कलाकौशल्याचे नमुने देशांतून नाहींसे होऊं नयेत अशी ईजिप्शियन लोकांचीहि इच्छा आहे. या योगानें लॉर्ड कार्नार्व्हन प्रभृति संशोधकांचें जें नुकसान होईल तें इतर रीतीनें भरून देण्याचा ईजिप्शियन सरकारचा विचार आहे. तुतनखामेनच्या थडग्यांत आणखी कोणत्या अपूर्व चिजा सांठविल्या आहेत, तें यथाकाल जगाच्या निदर्शनास येईलच; परंतु इ. स. पू. १३०० च्या पूर्वी सोन्याचांदीचें, जडावाचें व विशेषतः मुलाम्याचें काम इतकें सुबक होत होतें, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली आहे. त्याचप्रमाणें सोनेरी रथ प्रत्यक्ष सांपडल्यानें महाभारतादि पौराणिक ग्रंथांत वर्णिलेले सोन्याचे रथ केवळ कविकल्पना नव्हत, हेंहि कबूल करणें प्राप्त आहे. त्याचप्रमाणें सोनेरी पलंगाची जी रुंदी दिली आहे तिच्यावरून त्या वेळचीं माणसें शरीरानें कशीं धिप्पाड असावींत याचेंहि अनुमान करतां येतें. ( केसरी ता. २३ जानेवारी १९२३ ).

[ संदर्भ ग्रंथ—स्मिथ—ग्यूनिफार्म टॅब्लेट्स फ्रॉम कॅपॅडोशियन टॅब्लेट्स इन दि ब्रिटिश म्यूझियम १९२१; न्यूबेरी ॲन्ड हाल कॅटलॉग ऑफ ॲन एक्झिबिशन ऑफ एनशंट ईजिप्शियन आर्ट लंडन बर्लिंगटन फाईन आर्ट्स क्लब १९२१; इन्स्क्रिप्शन्स ऑफ सिनाइ (१९१७);

**ईजिप्तमधील प्राचीन युद्धकला.**—ईजिप्तचा इतिहास पाहिला तर ईजिप्शियन लोक हे स्वभावतः युद्धप्रिय नव्हते असें म्हटलें पाहिजे. तथापि या राष्ट्राच्या इतिहासामध्यें इतर अनेक राष्ट्रांच्या इतिहासाप्रमाणें युद्धविषयक घडामोडींनीं अगदीं आरंभापासून तों अखेरपर्यंत बराच काल आक्रमण केला, आणि नव्या राजसत्तेच्या आमदानींत एक असा काल येऊन गेला कीं, त्या वेळीं ईजिप्त हें एक बलाढ्य जेत्या लोकांचें राष्ट्र बनलें. या काळांतील महत्त्वाचा राजा दुसरा रामेसीस याला आपण स्वतः केलेल्या लढाया वगैरेंचा इतिहास चिरस्थाईक शिलालेखांमध्यें कोरून ठेवण्याचा नाद असल्यामुळें या कालामध्यें लोकांचीं शस्त्रास्त्रें व सर्वसामान्य युद्धपद्धती कशा प्रकारच्या होत्या हें कळण्यास सांप्रत आपणांजवळ पुष्कळ पुरावा उपलब्ध आहे. ईजिप्शियन सैन्यामध्यें मुख्यत्वेंकरून धनुर्ष्यें व जंबिये या हत्यारांनीं युक्त असे लोक मुख्यभागीं असून रथी वीरांचीं लहान लहान पथकें मिळून सैन्याचा एक महत्त्वाचा भाग तयार करण्यांत येत असे, आणि त्याचें आधिपत्य राजाकडे असे. मात्र त्यावेळीं युद्धविषयक साहित्यामध्यें घोडेस्वारांचा उपयोग करण्यांत येत नसे. शत्रूंच्या नगरासभोंवतीं वेढा घालतांना उंच चढण्याचे जिने व किल्ला फोडण्याचीं यंत्रें यांचा उपयोग करण्यांत येत असे. अर्वाचीन पद्धतीप्रमाणें सैनिकांस तुतारीच्या आवाजावर कवाईत करण्यास शिकविली जात असे, असें प्राचीन शिलालेखांवरून दिसून येतें.

त्यावेळीं सर्व दर्जाच्या लोकांस सैनिक किंवा धर्मोपाध्याय होणें यांपैकीं कोणता तरी एक धंदा स्वीकारावा लागत असे. भारमाराचा समावेश सैन्यांतच करण्यांत येत असे. शूर सैनिकांचा वर्ग आणि धर्मोपदेशकांचा वर्ग या दोघांमध्यें अधिकाराची अदलाबदल सारखी चालू असे. राजाच्या मुलांनां व इतर राजकुटुंबीय पुरुषांनां तिरंदाज, रथी व पायदळ यांच्या लहान मोठ्या पथकांचें आधिपत्य देण्यांत येत असे एकंदर राज्यांत धर्मोपदेशक वर्गाच्या खालोखाल सैनिक वर्गास मान, सत्ता व मालमत्ता उपभोगितां येत असे. प्रत्येक सैनिकास तो कामावर असो अगर नसो सुमारें आठ एकरच्या वर जमीन देण्यांत येत असे, व कर्जाबद्दल कोणासहि तुरुंगांत टाकण्यांत येत नसे. शिपाईगिरीचें शिक्षण देण्याकरितां इजिप्तमध्यें एक शाळेसारखी शिक्षणसंस्था आस्तित्वांत असल्याचें दिसून येतें. व या संस्थेमध्यें तरुण सैनिकांस सर्व प्रकारचें शिक्षण देण्यांत येत असे. प्रत्येक मनुष्यास जरूरीच्या संरक्षक व मारक हत्यारांचा पुरवठा करणें भाग पडत असे व जरूर पडेल तेव्हां युद्धास तयार असण्याची त्यास ताकीद असे. सैन्यांतील महत्त्वाचें स्थान तिरंदाज लोकांस असून या लोकांच्या कौशल्यामुळेंच ईजिप्शियन राष्ट्रास जय मिळत गेला. याखेरीज निरनिराळीं आयुधें धारण करणाऱ्या सैनिकांच्या निरनिराळ्या तुकड्या असत.

ईजिप्शियन लोकांच्या मारक शस्त्रांमध्यें धनुष्य, खंजीर, दोन प्रकारचे जंबिये, गोफण, आंखूड अशी सरळ तलवार,

खंजीर, सुरी, एक प्रकारची कोयत्यासारखी तलवार, कुन्हाड गदा व एक प्रकारची वांकडी काठी यांचा समावेश असे. त्याचप्रमाणें त्यांच्या संरक्षक आयुधांमध्यें एक धातूचें शिरस्त्राण किंवा एक प्रकारचा जिरेटोप, धातूच्या पत्र्याचें बनविलेलें उरस्त्राण किंवा चिलखत आणि एक मोठी ढाल इतक्यांचा समावेश होत असे. सैनिकांचें मुख्य संरक्षक आयुध म्हणजे ढाल हीच असून तिची उंची त्याच्या उंचीच्या निम्म्यानें आणि रुंदी त्याच्या स्वतःच्या दुप्पट असे. ही ढाल बहुतेक बैलाच्या कातड्यानें मढविलेली असून त्या कातड्याचे केंस बाहेरच्या बाजूस करण्यांत येत असत, आणि त्याजवर धातूचे खिळे किंवा टांचण्या लावण्यांत येत असून ढालेची कडहि धातूच्या पत्र्यानें भक्कम करण्यांत येत असे, व आंतील भाग लांकडाचा केलेला असे.

इजिप्शियन लोकांचें धनुष्य एका वाटोळ्या लांकडाच्या पांच साडेपांच फूट लांबीच्या कांबीचें असून दोन्ही टोंकास तें निमुळतें होत गेलेलें असे. बाणांची लांबी वीसपासून चौतीस इंच असून ते लांकडाचे किंवा वेताचे व टोंकाला धातूचा तीक्ष्ण फाळ बसविलेले व मागे तीन पंख असलेले तयार करीत. अशा रीतीनें बहुतेक शस्त्रांमध्यें लांकडें व धातू यांचा उपयोग करण्यांत येत असे. बहुतेक सर्व सैनिकांजवळ हींच हत्यारें कमीजास्त प्रमाणांत असत. परंतु यांपैकीं कांहीं सैनिकांजवळ गोफणी व धनुर्बाण असल्यामुळें त्यांजवळ ढाली नसत. इजिप्शियन सैन्यांत रथी लोकांचीं पथकें संख्येनें जास्त व महत्त्वाचीं असत. प्रत्येक रथामध्यें एक सारथी व एक योद्धा किंवा क्वचित दोन योद्धे बसत असत. कधीं कधीं स्वतः रथी हाच युद्धाचें आणि सारथ्याचें काम करीत असे. रथ हांकतांना सारथी ग्रीक लोकांप्रमाणें चावकांचा उपयोग करीत असत. हा चाबूक म्हणजे एक गुळगुळीत वाटोळी लांकडी मूठ आणि तिला एकेरी अगर दुहेरी वादी किंवा दोरी लावलेली असे. सैन्यामध्यें राजे व दुसरे महत्त्वाचे अधिकारी यांच्या रथाबरोबर अपघात टाळण्याकरितां दुसरा एक रथ असे. जर एखाद्या वेळीं प्रतिस्पर्धी युद्धांत पराजित होऊन शरण आला तर त्याला जिंकणारा योद्धा आपल्याबरोबर रथांत घालून नेत असे. आणि इतर सामान्य कैदी युद्धांतील कैदी या नात्यानें राजास नजर करण्यांत येत. यानंतर विजयी राजापुढें शत्रूंच्या मृत सैनिकांच्या हातांची गणती करण्यांत येई. आणि या गणतीचा विजयस्मारकांत मोठ्या डौलानें उल्लेख करण्यांत येत असे.

ईजिप्तमधील रथांनां बैठक नसून त्यांच्या तळाच्या भागास चामड्याच्या वादीनें अगर दोऱ्यांनीं विणलेली एक लांकडी चौकट घातलेली असे. ती अशाकरितां कीं, रथाची गति आंतील योद्धयास त्याच्या खालीं असलेल्या लवचिक जाळीमुळें अडचणीची होऊं नये. आणि याचकरितां रथाचीं चाकें शक्य तितकीं मागील बाजूस लावण्यांत येऊन आंतील मनुष्याचें वजन बरेचसें पुढें जुंपलेल्या घोड्यावर येईल, अशी व्यवस्था करण्यांत येत असे. हा रथ लांकडाचा करण्यांत येत असे हें प्राचीन शिल्पावरून स्पष्ट झालें आहे. व इजिप्शियन लोकांनीं तीन हजार वर्षांपूर्वी अशा प्रकारच्या सोइस्कर रथांची कल्पना व्यवहारांत आणिली. हीच कल्पना पाश्चत्य राष्ट्रांत १९ व्या शतकांत प्रचलित झाली. यावरून "सूर्यप्रकाशाखालीं नवी अशी कोणतीच गोष्ट घडून येत नाहीं" या सालोमनच्या म्हणीची यथार्थता प्रत्ययास येते.

ज्यावेळीं परकीय देशावर स्वारी करण्याचा राजाचा बेत ठरे त्यावेळीं प्रत्येक प्रांतातून ठरलेली सैनिकांची संख्या मिळवून देण्यांत येत असे. अशा रीतीनें सर्व सेना एकत्र जमल्यावर राजा किंवा त्याच्या आज्ञेवरून एखादा शूर सेनापती ससैन्य स्वारीला निघे. प्रथम शत्रूवर मोकळ्या मैदानांत हल्ला करण्यांत येत असे आणि नंतर तुतारीच्या आवाजानें युद्धाची खूण करितांच तिरंदाज लोक शत्रूवर बाणांचा हल्ला सुरू करीत. व याच वेळीं पुष्कळशीं रथी सैन्यांचीं पथकें व भाले, गदा, ढाली वगैरे शस्त्रांनीं सज्ज झालेलें पायदळ हेंहि लगट करून शत्रुसैन्याच्या मध्यावर व दोन्ही बाजूस चाल करीत.

इजिप्शियन लोकांची युद्ध करण्याची पद्धति रानटी राष्ट्रास शोभण्यासारखी नव्हती, आणि त्यांनीं वारंवार पकडलेल्या कैद्यांवरून स्पष्ट दिसून येतें कीं, जे लोक इजिप्शियन लोकांस शरण येत त्यांस अभय मिळत असे. तिसरा रामेसिस याच्या कारकीर्दींत झालेल्या आरमारी युद्धांत बरेचसे इजिप्शियन सैनिक जहाजांमध्यें व किनाऱ्यावर शत्रुपक्षाकडील समुद्रांत बुडणाऱ्या सैनिकांस जलसमाधींतून वांचवीत असल्याचें दाखविलें आहे. अर्थात् ही भूतदयेची गोष्ट शिल्पस्वरूपांत चिरस्मरणीय करून ठेवण्यामध्यें इजिप्तमधील शिल्पज्ञ लोकांस फार धन्यता वाटली असावी.

ज्याप्रमाणें युद्धांत जिवंत सांपडलेल्या व मारल्या गेलेल्या शत्रुसैन्याची मोजदाद राजापुढें होत असे त्याचप्रमाणें युद्धांत मिळालेलीं शस्त्रें, घोडे, रथ इत्यादि लूट एका मोकळ्या जागीं जमविण्यांत येऊन त्याच्या सभोंवतालीं तात्पुरती भिंत घालण्यांत येत असे, व या भिंतीस एकच दरवाजा असून त्या दरवाजाच्या आंत व बाहेर नागव्या तलवारींचा कडक पहारा ठेवण्यांत येत असे. इजिप्शियन लोकांमध्यें किल्ले बांधण्याची पद्धति प्रथम प्रथम बरीच प्रचलित होती. या किल्ल्यांचा आकार चौकोनी असून तट ओबडधोबड विटांचे, सुमारें १५ फूट जाडीचे व ५० फूट उंचीचे असे बांधण्यांत येत असत, व याच्या चारी बाजूस चौकोनी बुरूज करण्यांत येत असत. परंतु पुढें पुढें अशा तऱ्हेचे किल्ले किंवा तटबंदी शहरें बांधण्याची पद्धति कमी कमी होत जाऊन त्याऐवजीं मोठमोठीं तटबंदी देवालयें बांधण्यांत आलीं.

सैन्याचे तळ चौरस अगर दीर्घ चौरस आकाराचे असून त्यांच्या एका बाजूस एक मुख्य दरवाजा असे. आणि या तळाच्या मधोमध मुख्य सेनापती व इतर प्रमुख अधिकारी यांचे तंबू असत. या तळामध्यें रथ ठेवण्याकरितां आणि घोडे व इतर युद्धोपयोगी जनावरें चारण्याकरितां निरनिराळ्या जागा राखून ठेवण्यांत येत असत. मुख्य सेनापतीच्या तंबूशेजारीं देवतांचीं यज्ञकुंडें, निशाणें, खजिना इत्यादि महत्वाचा भाग ठेवण्यांत येई. तटबंदी शहरावर हल्ला करितांना इजिप्शियन लोक तिरंदाजांनीं शत्रुपक्षावर बाणाचा वर्षाव चालविला असतांना त्याच्या आच्छादनाखालीं ते पुढें चाल करीत; आणि लागलीच तटानां चढण्याचे जिने लावीत किंवा नेहमींचा वेढा देऊन बसण्याचा धोपटमार्ग पत्करीत. त्याचप्रमाणें बाहेरील वेढ्यानें शत्रूचा किल्ला अगर तटबंदी शहर जर ताब्यांत घेणें शक्य न झालें तर ते किल्ल्याच्या खालून पुष्कळ भाग पोखरून त्या भुयारांतून शत्रूंवर मारा करीत आणि ही भुयारें खणण्याची कला त्यांना फार पूर्वीपासून माहीत होती.

आ धु नि क ई जि प्त

म र्या दा व क्षे त्र फ ळ.— ईजिप्तच्या देशाच्या उत्तरेस भूमध्य समुद्र, असून दक्षिणेस ॲंग्लो ईजिप्शियन सुदान, आग्नेयेस पॅलेस्टाईन, पूर्वेस तांबडा समुद्र, पश्चिमेस ट्रिपोली व सहारा. ट्रिपोली व ईजिप्तमधील सरहद्द सोलमच्या आखातापासून निघून दक्षिणेस व नंतर पूर्वेस वळून सिवा ओलवणाला वळसा घालून त्याच्या दक्षिणेकडून पूर्वेस वदीहल्फा जवळून जाते. ही दक्षिण सरहद्द ग्रेटब्रिटन व ईजिप्त यांच्या मतानें २२° उत्तर अक्षांश ठरली आहे. ईशान्य सरहद्द म्हणजे आकाबाच्या आखातावरील टाबापासून भूमध्य समुद्रावरील राफापर्यंतची सरळ रेषा होय. यामुळें भौगोलिक दृष्ट्या आशियांत असलेल्या सिनाई द्विपकल्पाचा ईजिप्तमध्यें समावेश केला आहे. या देशाचें एकंदर क्षेत्रफळ ३६३१८१ चौ. मैल असून त्यांपैकीं $\frac{१५}{१६}$ जमीन वाळवंटानें व्यापिली आहे. कालवे रस्ते खजूरांचे मळे यांनीं १९०० चौ. मै. जागा व्यापिली असून नाईल नदी, सरोवरें व दलदलीचा प्रदेश यांनीं २८५० चौ. मैल जागा अडविली आहे. कायरोच्या थोड्या दक्षिणेस ३०° उत्तर अक्षांशावरून सरळ रेघ काढली तर ईजिप्तचे खालचा व वरचा असे दोन नैसर्गिक भाग पडतात. अरब या भागांनां अनुक्रमें ईररिफ ( सुपीक) व ईससैय्यर ( सुखी अथवा नशिबवान) म्हणतात. खालचा, मधला व वरचा असे तीन सुद्धां भाग करतात. यांत मधला म्हणजे कायरो व अस्यूत यां मधील भाग होत.

नाईल नदी व वाळवंट हे ईजिप्तचे विशेष भाग होत. नाईल नदी नसती तर ईजिप्त हें वाळवंटच बनलें असतें. परंतु नाईल नदीमुळें मुखाजवळचा प्रदेश व वरच्या ईजिप्त मधला भाग एवढा प्रदेश सुपीक बनला असून हाच खरा ईजिप्त होय. 'काळा प्रदेश' हें प्राचीन नांव व अरबांचा मिसर देश हीं दोन्हीं नावें एकाच प्रदेशाला आहेत. वरच्या ईजिप्तमध्यें नाईल नदीचें खोरें अरुंद असून दोन्ही बाजूस वाळवंट आहे. यांत मोठाले पर्वत मुळींच नाहींत, नाईल नदीचें खोरें अत्यंत सुपीक असून प्राचीन शहरांचीं टेंकाडें मधून मधून दृष्टीस पडतात.

कि ना रा.— भूमध्यसमुद्रावरील किनाऱ्याची लांबी ६०० मैलांवर असून तांबड्या समुद्रावरील किनारा १२०० मैल आहे. भूमध्य किनारा सोलमच्या आखातापासून पूर्वेस राफापर्यंत आहे. नाईल नदीच्या मुखापर्यंत हा किनारा खडकाळ असून त्यांत बंदरें नाहींत. हे खडक म्हणजे लिबीयन वाळवंटाच्या डोंगर पठाराचीं टोकें आहेत. मुखाजवळचा किनारा रेताड टेकड्यांचा असून दोन उपसागर होतात. त्यांपैकीं अबुहीरचा उपसागर इतिहासप्रसिद्ध आहे. या पलीकडचा किनारा ओसाड व खडकाळ आहे. हा पुढें उंच होत जातो व याचें रूपांतर सिनाई द्वीपकल्पाच्या पठारांत होतें. तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर पर्वत फार असून कांहीं शिखरांची उंची ६००फुटांपेक्षां जास्त आहे. जेबेक, घरीब, दुखान, इसश्यिप, फतिरा, अबुतियुर, झबरा व हमदा हीं मुख्य शिखरें होत. इजिप्त व सुदन यांच्या सरहद्दी मिळतात तेथील किनाऱ्यावर रासएल्बा आहे.

ना ई ल न दी चें खो रें.— खास ईजिप्तमध्यें शिरल्यावर दुसऱ्या धबधब्याच्या अमल उत्तरेस नाईल नदीची रुंदी २ मैलांपेक्षां जास्त नसते. कॅलाबशा येथें नदी १७० यार्ड रुंद व १०० फूट खोल असून येथें व असुअब येथें ग्रॅनाईट खडकांतून नाईल वहाते. लागवडींत असलेल्या जमिनीची रुंदी सुमारें १० मैल असून त्यांपैकीं बराच भाग नदीच्या डाव्या तीरावर आहे.

फा यु म.— हा सुपीक प्रांत नाईल नदीच्या पश्चिमेस असून या दोन्हींत सहा मैलांचें वाळवंट आहे. या प्रांतांत नाईलचा कालवा बहरयुसुफ यामधून पाणी पुरविलें जातें.

मु खा ज व ळ चा प्र दे श.— हा भाग म्हणजे कायरो शहरापासून समुद्र किनाऱ्यापर्यंत त्रिकोणाकृति भाग होय. याची दक्षिणोत्तर लांबी १०० मैल असून पोर्ट सैय्यदपासून अलेक्झांड्रियापर्यंत पूर्व पश्चिम रुंदी १५५ मैल आहे. या भागांत डॅमिएटा व रोझेटा हे नाईल नदीचे फांटे इतर कालवे यांतून पाणी मिळतें. मुखाजवळच्या प्रदेशांतून नदींतून आलेला गाळ बसतो व किनाऱ्यावर वाळूच्या टेंकड्या आहेत. दक्षिणेकडील जमीन अधिक सुपीक होत जात असून तो भाग ईजिप्त मध्यें सर्वांत सुपीक आहे.

स रो व रें.— नाईल नदीच्या मुखाजवळच्या प्रदेशांत खालिल सरोवरें आहेत. ती अनुक्रमें पश्चिमेकडून, मॅरिओटीस (मॅरिअट) एडकू, बुरलुस व मेन्झाला हीं होत. हीं सर्व भूमध्य समुद्रापासून १० मैलांच्या आंत आहेत. मॅरिओटिस हें सरोवर

अलेक्झांड्रियाच्या दक्षिणेस असून प्राचीन काळीं यांत होड्या चालत व बाजूच्या प्रदेशांतील द्राक्षांपासून प्रसिद्ध मॅरिओटिक मद्य निघत असें. याच्या ईशान्येस अबुकीर सरोवर होतें. बुरलुस सरोवराची सर्वांत जास्त रुंदी १६ मैल आहे. या सरोवरास बरेच कालवे येऊन मिळतात. कलिंगडें बुरलुसचीं फार प्रसिद्ध असून तीं आंतून पिवळीं असतात. मेंझाला हें सर्वांत मोठें सरोवर असून त्याचें क्षेत्रफळ ७८० चौ. मैल आहे. हें सरोवर व भूमध्यसमुद्र यांत फार थोडें अंतर आहे. हें सरोवर ४० मैल लांब व १५ मै. रुंद आहे. हें इतर सरोवरापेक्षां खोल असून याचें पाणी खारट आहे. यामध्यें बरींच बेटें असून टेनीस ( प्राचीन टेनेसुस ) बेटावर रोमनकाळांतील कांहीं अवशेष आहेत. या बेटांवर व किनाऱ्यावर बरेच कोळी राहतात. याच्या पूर्वेस सुएझचा कालवा आहे. याच्या पूर्वेस सेरबोनीक नांवाचें (सध्यां कोरडें) सरोवर होतें. सुएझच्या संयोगी-भूमींत तिमसा, ग्रेट व लिटल बिटर हीं सरोवरें आहेत. कायरोच्या पश्चिम-वायव्येस ७० ते ९० मैलांवर एका वाळवंटीच्या खोऱ्यांत सुमारें सात क्षार सरोवरांची रांग आहे. फेयुम प्रांतांत बिर्कतएल केढन नांवाचें सरोवर आहे. हें प्राचीन मॉएरीस सरोवराचा भाग आहे. फारोंच्या काळच्या पाटबंधाऱ्यांच्या शिल्पाच्या दृष्टीनें हें फार महत्वाचें सरोवर आहे. केरून सरोवराच्या उत्तरेस लिबीयन वाळवंट असून जवळ बऱ्याच प्राचीन शहरांचे अवशेष आहेत. कस्र-करून नांवाचें मंदिर रोमन काळापासून प्रसिद्ध आहे. फेयुमच्या नैर्ऋत्येस वाडीरयन नांवाचें सरोवर आहे.

वा लु का म य डों ग र प ठा रः— ईजिप्तच्या दक्षिण सरहद्दीपासून उत्तरेस नाईल नदमुिखाजवळच्या प्रदेशांपर्यंत नदीच्या दोन्ही बाजूंस वालुकामय डोंगर पठार आहेत. नाईल व तांबडा समुद्र यामधील भाग ९० पासून ३५० मैल रुंद आहे. याचा उत्तरेकडील भाग अरबी वाळवंट म्हणून प्रसिद्ध आहे. पश्चिमेकडचा प्रदेश हजारों मैलपर्यंत पसरत गेला असून तो सहारा वाळवंटाचा भाग आहे. कायरोच्या पश्चिमेस कांहीं अंतरावर या वाळवंटाच्या पूर्वेकडील टोंकावर गिझे अथवा गिझा पिरामिड आहेत. असुरिअनच्या उत्तरेस या वाळवंटाला लिबीयन वाळवंट म्हणतात. उत्तरेकडील पठार फार उंच नाहीं. परंतु कायरोच्या दक्षिणेस त्याची उंची समुद्रापासून हजार दीडहजार फूट होत जाते. हवेच्या योगानें या वाळवंटांत नेहमीं फरक पडतात. खडक दिवसा गरम होऊन रात्रीं थंड होतात व वाऱ्यानें वाळूचे बारीक थर उडून जातात; यामुळें वरील फरक होतात. नाईल नदीच्या पश्चिमेस वाळूच्या टेंकड्या दृष्टीस पडतात.

ओ ल व णः— पश्चिम वाळवंटांत सिवा, बहारिया, फराफ्रा, डाखला व खर्गा हीं मोठाली पांच ओलवणें आहेत. यांना पाण्याचा बराच पुरवठा असल्यानें तीं फार सुपीक आहेत खि. पू. १६०० त हीं ओलवणें इजिप्शियनांना माहित असून यांत त्यांच्या वसाहती होत्या. इराणी वसाहतीमुळें खर्गाची फार भरभराट झाली खर्गा अथवा प्राचीन हेबी शहराजवळ पहिल्या डरायसनें बांधलेल्या अमॉनेमंदिराचे व टॉलेमी, व सीझर यांच्या वेळचे अवशेष आहेत. या ओलावणाशिवाय दोन खोरीं आहेत. त्यापैकीं ' क्षार सरोवरें ' असलेल्या पहिल्या खोऱ्यांत चार मठ व निट्री येथील मठवासी लोकांच्या वसाहतीचे अवशेष आहेत. वाडीक्षार खोऱ्यांच्या दक्षिणेस त्याला समांतर असलेली बहरबेलामा अथवा ' जलहीन नदी ' नांवाचें खोरें आहे.

सि ना ई द्वि प क ल्पः—हें द्वीपकल्प त्रिकोणाकृति आहे. याचा उत्तरभाग म्हणजे तिद वाळवंट होय. येथें पाऊस थोडा व उष्णमान जास्त यामुळें वनस्पती फार कमी आहेत.

भू स्त र व र्ण नः—भूपृष्ठदृष्ट्या ज्याप्रमाणें नाईल खोऱ्याचें महत्त्व आहे तसेंच भूस्तरदृष्टयाहि आहे. प्राचीन खडक स्फटिकमय थरांचे बनलेले असून त्यांत ग्रॅनाईट, पॉरफिरी वगैरे बरेच आढळतात. थीबी व खार्टुम मधील नाईल नदीचें पश्चिमतीर न्युबीयन सँडस्टोनचें बनलेलें आहे. व हा थर लिबियन वाळवंटापर्यंत आहे. याच्या काळाबद्दल बराच वाद आहे. नाईल नदीचा गाळ खोऱ्यांत बसतो यामुळें मुखाजवळ फारशी भरती होत नाहीं. मेंफीस येथें गाळाची जाडी ५० फुटांपेक्षां जास्त आहे. बरींच वाळवंटें वालुकामय आहेत. कांहींत मात्र खडकाळ पठारें असून वाळू थोडी असते. त्यांतच वाऱ्यानें वाळूच्या टेंकड्या नवीन तयार होतात व जुन्या नाहींशा होतात.

ख नि ज प दा र्थः-ईजिप्तमध्यें खनिज पदार्थ विपुल सांपडतात. प्राचीन काळीं तांबड्या समुद्राच्या टेंकड्यांतून सोनें व जवाहीर सांपडत असे. मुसुलमानी अंमलांत खाणी खोदणें बंद झालें परंतु २० व्या शतकांतील या धंद्याला पुन्हां उर्जितावस्था आली. मॅरीओटीस सरोवरांपासून निघणारें मीठ सर्व देशाला पुरतें. वाडीक्षारसरोवरांतून पुष्कळ सज्जीखार निघतो. पश्चिम ओलवणांत तुरटी (ॲलम) वाळवंटाच्या कांहींभागांत नत्रायितें ( नायट्रेट ) व स्फुरितें ( फॉस्फेट ) सिनाईमधील खाणींत वैडूर्य, जेबेल झुबरा येथें पांच, जेबेल झैत ( सुवेझ आखाताच्या पश्चिम किनाऱ्यावर ) येथें पेट्रोलियम, सिनाई व तांबड्या समुद्रांतील टेंकड्यांत लाल ( हेमटाइट ) सांपडतात. खाणीजवळ व तेथें जाणाऱ्या मार्गावर लहान देवळें व मंदिरें आहेत. उमरूस व उमगॅरेट येथें १९०५ पासून सोनें काढण्यास सुरवात झाली. सुएज आखाताच्या दोन्ही तीरांवर पेट्रोलियमच्या खाणी आहेत अशी तज्ज्ञांनां खात्री वाटत होती. त्याप्रमाणें त्यांनीं शोध लावून १९१२ सालापासून त्या खाणींमधून कच्चें तेल ( क्रूड-ऑईल ) काढण्यास सुरवात झाली या खाणींना "जेम्स" खाणी असें नांव आहे १९१४ सालीं हुरघडा येथें एक

नवीन तेलाची खाणी सांपडली. १९१३ मध्यें पेट्रोलियम तेल १०४००० टन निघत असे ते १९१८ मध्यें २८१८०० टन निघू लागलें त्याच्या खालोखाल फॉस्फेटची निपज होते १९१९ सालीं फॉस्फेटची निपज ७८५०० मेट्रिक टन होती मँगनीजची निपज १९१९ मध्यें २७४९८ टन होती.

हवामानः—वरच्या ईजिप्तचा कांहीं भाग उष्ण कटिबंधांत असून बाकी बहुतेक भाग कर्क वृत्ताच्या उत्तरेस आहे. भूमध्य समुद्रावरील थोडा भाग खेरीज करून बाकी सर्व प्रदेशांत पाऊस फार कमी पडतो अगर अगदीं पडत नाहीं म्हटलें तरी चालेल. या भागांत दिवसा उष्णतामान जास्त असून रात्रीं जमीन एकदम थंड होते. अलेक्झांड्रिया व पोर्ट सैय्यद येथील सरासरी उष्णतामान ५७° ( जानेवारींत ) ते ८१° ( जुलैंत ) च्या दरम्यान असतें. कायरो वाळवंटांजवळ असल्यानें तेथें तें ५३° ते ६४° असते. जानेवारी कडक थंडीचा महिना असून त्यावेळीं नाईल खोरें व उघडें वाळवंट यांत उष्णतामान ३२° ( फा ) अथवा कमी सुद्धां असतें. अलेक्झांड्रिया येथें व भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर हिवाळ्यांत फक्त सुमारें ८ इंच पाऊस पडतो. याच्या दक्षिण भागांत पाऊस कमी होत जाऊन ३१° उत्तर अक्षांशाच्या दक्षिणेस फारच थोडा पाऊस पडतो कायरो येथील आंकड्यांवरून असें दिसतें कीं, पाऊस फार अनियमित पडतो. मात्र वादळें नेहमीं होतात. दरवर्षी सरासरी १·५० इंचापेक्षां जास्त पाऊस पडत नाहीं. उघड्या वाळवंटांत भयंकर वादळें होतात. वातावरणाचा सरासरी दाब २९° ८४′ ते २९° ९०′ इंचाच्या मध्यें असतो. ईजिप्त मध्यें उत्तरेकडचा वारा नेहमीं वाहत असतो. खमसिन अथवा वाळू उडविणारे वसंत ऋतुंतील उष्ण वारे दक्षिणेकडून येतात. दुसरी आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे झोंबा अथवा वाळुकामय वादळ ही होय. यावेळीं वाळूचा एक उंच स्तम्भ दिसतो. मृगजळाचा चमत्कार वाळवंटांत व भूमध्यसमुद्राजवळच्या ओसाड भागांत फार वेळां दृष्टीस पडून मनुष्याची अनेक वेळां फसवणूक करतो.

वनस्पतिः—ईजिप्तमध्यें जंगलें नाहींतच. वनस्पतीनां योग्य असणाऱ्या सर्व जमीनी लागवडीखालीं आहेत. यामुळें इतर वनस्पतींच्या जाती कमी आहेत. खजूर हें महत्त्वाचें झाड असून तें सर्वत्र दृष्टीस पडतें. द्राक्षांचे मळेहि ईजिप्तमध्यें आहेत. संत्रे, लिंबू, डाळिंब व मलबेरी हीं झाडें बरींच आहेत. संत, चिंच सायकामोअर हीं झाडें आहेत. लेबेक हें परकीय देशाहून येथें आणलेलें झाड आहे. फळांपैकीं खजूर मुख्य असून त्याच्या तीस जाती आहेत.फेयूमचीं द्राक्षें प्रसिद्ध आहेत. याखेरीज अंजीर, डाळिंब, बदाम, पीच, संत्रे, लिंबु, केळें, मलबेरी, हिंदी अंजीर ऑलिव्ह व कमल यांची फळें प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें गुलाब, जाई वगैरे फुलें असून कांहीं जंगली फुलें प्रसिद्ध आहेत. नदीमुखाजवळच्या प्रदेशांत पांढरीं व निळीं कमळें आढळतात.

प्राणीः—ईजिप्तमध्यें पाळींव जनावरें मुख्य आहेत. त्यांत गाढव व उंट हीं महत्त्वाचीं आहेत. म्हशी व मेंढ्याहि पुष्कळ आढळतात. घोडे वेगवेगळया जातीचे आहेत. जंगली जनावरांत मुख्य तरस, कोल्हा, रानडुकर, व रानमांजर हीं आहेत. येथें पुष्कळ तऱ्हेचे विषारी सर्प आहेत व विंचवाच्या दंशानेंहि मनुष्यास मृत्यू आल्याचीं उदाहरणें आढळतात. नाईलमध्यें निरनिराळया जातीचे मासे आहेत. ईजिप्तमध्यें ३०० जातीचे पक्षी आहेत. यांपैकीं कांहीं या देशांतील असून कांहीं फक्त हिंवाळ्यांत येतात व कांहीं इतर ठिकाणीं जात असतांना थांबतात. गरूड, गिधाडें, ससाणा, कोळी वगैरे मोठाले पक्षी आहेत. सुंदर पिसारा असलेले कांहीं पक्षी वसंत ऋतूंत ईजिप्तमध्यें येतात.

आरोग्य स्थळेंः—हिंवाळ्यांत बरेच यूरोपियन प्रवासी ईजिप्तमध्यें हवा खाण्यासाठीं व चैनीसाठीं येणास खालच्या ईजिप्तपक्षां वरचें ईजिप्त सोयीचें आहे. जवळच खनिज झरे असलेले हेलवान, वरच्या ईजिप्तमधील लुक्सार व असुआन हीं ठिकाणें आरोग्यस्थळें म्हणून प्रसिद्ध आहेत. येथील घाणेरड्या वस्तीमुळें रोगांच्या सांथी येतात, परंतु १८८२ त ब्रिटिशांच्या अंमलापासून रोगराई बरीच कमी आहे. १८४४ पर्यंत प्लेग होता व मधून मधून महामारी उद्भवत असे. देवी, त्वग्रोग वगैरे आढळतात. एतद्देशीय लोकांनां इस्पितळांत रहाणें पसंत नसून ते आपल्याच पद्धतीनें रोगावर उपचार करतात.

मुख्य शहरें—कायरो (राजधानी)–ह्याची स्थापना अरबांनीं नाईल नदीच्या पूर्वकिनाऱ्यावर केली याची लोकसंख्या ( १९१७ ) ७९०९३९ असून हें आफ्रिकेंतील सर्वांत मोठें शहर आहे. याच्या खालोखाल अलेक्झांड्रीया असून तें मुख्य शहर आहे. याची लोकसंख्या १९१७ सालीं, ४४४६१७ असून हें भूमध्यसमुद्रावर आहे. पोर्टसैय्यद हे दुसऱ्या प्रतीचें बंदर सुवेझ कालव्याच्या उत्तर प्रवेशद्वारावर असून याची लोकसंख्या १९१७ सालीं ९१०९० होती. पोर्टसैय्यद व अलेक्झांड्रिया यांच्यामध्यें रोझेटा व डॅमियटा हीं दोन शहरें आहेत. मध्ययुगांत ह्यांची फार भरभराट असे. कालव्याच्या दाक्षिण प्रवेशद्वाराजवळ असलेलें सुवेझ, तांबड्या समुद्रावरील कोसेर, मसी मट्टुह, एलआरिश, हीं दुसरीं बंदरें होत. मुखाजवळच्या प्रदेशांत बरींच शहरें आहेत. त्यांपैकीं टान्टा डमानहूर मन्सुरा, झगाझिग, बिलबीस, इस्मालिया हीं शहरें कापसाच्या व्यापाराबद्दल प्रसिद्ध आहेत.

खालच्या ईजिप्तमधील इतर शहरें येणेंप्रमाणें.–मेहाडेटईल कुब्रा, येथें कापसाचे कारखाने आहेत. सलिह्या, महारिया, शिफ्टा, समानुद, फुआ, शिबीन ईलकाम, मिनफ व दहा ते वीस हजारपर्यंत लोकसंख्या असलेलीं बरींच शहरें आहेत.

वरच्या ईजिप्तमध्यें मुख्य शहरें नाइल नदीच्या अरुंद खोऱ्यांत सांपडतात. ओलवणांतील शहरें महत्त्वाचीं नाहींत. फेयुम प्रांताची राजधानी मेदिनेतईल होय. फेयुमची लोक-

संख्या ३७,३२० आहे.नाइल नदीवरील मुख्य शहरें कायरोपासून अनुक्रमें येणेंप्रमाणें—बेनिसुएफ ( २३,३५७ ), हें एका सुदिरिआची राजधानी असून लोंकरीचें कापड येथें तयार होतें. मिनिआ येथें साखरेचा कारखाना असून कापसाच्या गिरण्या आहेत. अस्यूत ( ३९,४४२ ) हें वरच्या ईजिप्तमधील व्यापाराचें केन्द्र आहे. सुहाग यापासून ३–४ मैलांवर प्राचीन व प्रसिद्ध असे ईलअबिआद व ईल-अहमार नांवाचे दोन मठ आहेत. याच्या जवळ अॅखमिम अथवा एखमिम नांवाच्या गांवीं रेशमी व सुती कापड होतें. गिर्गा हें मातीच्या भांड्याबद्दल प्रसिद्ध आहे. केना येथें मातीच्या झिरपणाऱ्या वाढ्या होतात. लुक्सॉर थीबीसच्या जागेवर वसलें आहे. ईस्न ( १९१०३ ) हें मातीच्या भांड्यांबद्दल प्रसिद्ध आहे. ईडफू ( १९,२६२ ) येथील प्राचीन देवालय प्रसिद्ध आहे. असुआन पहिल्या धबधब्याच्या पायथ्याशीं आहे. कोरोस्कोपर्यंत पूर्वी उंटावरून व्यापार बराच चालत असे.

प्राचीन शहरें व स्मारकें—ईजिप्तचीं बरींच आधुनिक शहरें प्राचीन शहरांच्या जागीं वसलीं आहेत, व त्यांतील बहुधा फारो, ग्रीक अथवा रोमन यांच्या वेळचीं आहेत. फारोची राजधानी मेम्फिस हें नाईल नदीच्या पश्चिम तिरावर असून कायरोपासून १४ मैलांवर होतें. कायरोच्या उत्तरईशान्येस पांच मैलांवर हेलिओपोलीस होतें वाळवंटाच्या टोंकावर असलेलें गिझा अथवा गिझ येथील पिरामिड कायरोच्या पश्चिमेस आठ मैलांवर आहेत. येथील पिरामिड सर्वांत मोठे असून त्यांत प्रसिद्ध मेंफिस जवळ बांधलेला प्रसिद्ध स्फिन्क्स ( स्त्रीमुखी सिंह ) आहे. असुआन शहराजवळ सायरीनी शहर होतें. समोर नाईल नदीवरील एका बेटांत एलिफन्टाइन शहर व जवळच दुसऱ्या बेटावर फिलीचें मंदीर होतें. केनाच्या उत्तरेस कांहीं मैलांवर डेंडेरा असून तेथें प्रसिद्ध मंदीर आहे. अबिडासचे अवशेष बेलिआना गांवाच्या नैर्ऋत्येस चार मैलांवर आहेत. अबुसिंबेलची पडकीं मंदिरें नाईल नदीच्या पश्चिमतीरावर आहेत. तांबड्या समुद्रावर कोसेरच्या दक्षिणेस मायासहॅार्मास व बेरेनिस येथील अवशेष आहेत. सेस, इसियुम, टॅनिस, बुबॅस्टिस, ओनिऑन, सेबेनिल पायथॉम, पिल्युशियम व ग्रीक शहरें नॅक्रेटीस व डॅफनी ह्यांचे अवशेष नदीमुखाजवळच्या प्रदेशांत आहेत. याशिवाय कॉप्टिक शहरें, मठ व मंदिरें यांचे अवशेष आहेत. इस्लामीसाधूंच्या कबरी बऱ्याच असून त्या डोंगरावर सांपडतात.

व्यापाराचे रस्ते व दळणवळणाचीं साधनें:—भौगोलिक दृष्ट्या जगांतील अतिमहत्त्वाच्या व्यापारी मार्गावर ईजिप्त वसलें आहे. यूरोपमधून पूर्वेकडे जाणाऱ्या रस्त्यावर ईजिप्त हें एखाद्या तटबंदी किल्ल्याप्रमाणें आहे. ही स्थिति प्राचीन काळीं होती व सुवेझकालवा झाल्यानें तीच कायम आहे. सुवेझ कालव्याची लांबी ८७ मैल असून ६६ मैल कालवा व २१ मैल तळीं आहेत. याची खोली बरीच असून त्यांतून जहाजें जातात. या कालव्याचा कारभार एका कंपनीच्या हातीं असून तिची मुख्यकचेरी पारिस येथें आहे व या कालव्याचें उत्पन्न ईजिप्शियन खजिन्यांत जात नाहीं. अलेक्झांड्रियाहून यूरोपीय बंदरांत जहाजें जातात. सुवेझ व पोर्टसुदान यांमध्यें बोटीनें दळणवळण चालतें महायुद्धामध्यें व त्यानंतर जपान, नार्वे आणि युनायटेडस्टेट्स या राष्ट्रांचीं, जलमार्गानें, व्यापाराची ने आण व्यवस्थित तऱ्हेनें चालली आहे.

अंतर्गत दळणावळणाचीं साधनें म्हणजे रेल्वे व नदी होत. वरच्या ईजिप्तमध्यें दोन्ही उपयोगांत असून मुखाजवळच्या प्रदेशांत फक्त रेल्वेचा उपयोग करतात. रेल्वे दोन प्रकारच्या आहेत. ( १ ) सरकारच्या मालकीची व सरकारनें चालविलेली. ( २ ) खाजगी मालकीच्या व खाजगी रीतीनें चालविलेल्या शेतकी रेल्वे. रेल्वे प्रथम १८५२ मध्यें तयार झाली. पहिल्या अब्बासनें अलेक्झांड्रिया व कायरो यांत रेल्वेचा फांटा तयार करण्यास हुकूम सोडला. पोर्टसैय्यद व अलेक्झांड्रियाहून निघणारे फांटे कायरो येथें मिळतात. तेथून लुक्झॉरपर्यंत मोठी लाईन आहे, व तेथून रोलालपर्यंत लहान लाईन आहे. एकंदर अलेक्झांड्रियापासून ६८५ मैलांची रेल्वे तयार आहे. या खेरीज नाईल नदींतून आगबोटी चालतात. अँग्लो ईजिप्शियन सुदनमध्येंहि रेल्वे आहे.

कायरो व अलेक्झांड्रिया या शहरांपासून सुवेझ व इतर शहरांपर्यंत फांटे आहेत. सुवेझचा कालवा होण्यापूर्वी सुवेझपर्यंत रेल्वेनें प्रवास करीत व येथून आगबोटीनें हिंदुस्थानांत जात. नदीमुखाजवळच्या प्रदेशांत सातशें मैलांची लहान रेल्वे असून ती खेडीं, शहरें व बंदरें यांना जोडते. १९१५–१६ मध्यें सलहिया ते कांतारापर्यंत रेल्वे बांधण्यांत आली. तेथून सिनाई द्वीपकल्पामधून यरुशेलम आणि हलफापर्यंत तिचा विस्तार वाढला. महायुद्धामध्यें रेल्वेखात्याचें फार नुकसान झालें. ह्यामुळें जुन्या रेल्वे रस्त्यांची व्हावी तशी डागडुजी झाली नाहीं. नवीन रेल्वे लाइन मोठ्या प्रमाणावर बांधतां आली नाहीं. यामुळें जलमार्गानेंच व्यापार अधिक सुरू झाला.

नाईल नदींतून सर्व ईजिप्तभर बोटी चालतात व माल नेण्याचे दरहि कमीच असतात. नाईलनदीपासून पूर्वेस व पश्चिमेस व्यापारी रस्ते आहेत. खालच्या ईजिप्तमध्यें गाड्यांना योग्य असे रस्ते आहेत, परंतु गाढव, खेंचर व उंट यांवरून बहुधा व्यापार चाले व त्यासारखे रस्ते आहेत.

पोस्ट व तार.—ईजिप्तमधील पोस्टखात्याची रचना व व्यवस्था फार चांगली आहे. ईजिप्त हें पोस्टल युनियनचें सभासद आहे. मुख्यशहरांतून तारा असून तारखातें सरकारच्या ताब्यांत आहे. याची व्यवस्था रेल्वेखात्यामार्फत चालते. बाह्यदेशांशीं तारायंत्रें व जलतारायंत्राच्या योगानें ईजिप्त जोडलें गेलें आहे. मोठाल्या शहरांत टेलेफोनचा ( ध्वनिवाहक

यंत्राचा ) उपयोग करतात. कायरो व अलेक्झांड्रियांमध्यें ध्वनिवाहक यंत्र आहे. बिनतारी संदेशगृहें, कायरो, अस्यूत येथें ठेवलीं आहेत. १९१९ मध्यें दळणवळणखातें असें स्वतंत्र खातें निर्माण करण्यांत येऊन त्या खात्यानें रेल्वे, तारायंत्रें, पोस्टखातें बंदराची व दीपगृहांची व्यवस्था व विमानें यांच्यावर देखरेख करावी असें ठरलें.

इजिप्तमध्यें प्रमाणकाल ( स्टँडर्ड टाइम ) अलेक्झांड्रियाच्या रेखांशावरून ( ३०° पूर्व, ) काढतात. ही वेळ ग्रीनीच पुढें दोन तास आहे.

शे त की व धा रा प द्ध ति.—ईजिप्तमध्यें मुख्य धंदा शेतीचा आहे. नाईल नदीमुळें बसणारा गाळ व पाट यांवर शेती अवलंबून असते. नाईल नदीच्या पाण्याचा पाट काढून अलीकडे बराच उपयोग करतात. १९१७ साली ३८३९४७२ एकर जमिनींत धान्याचें व १६७७ हजार 'फेडन' जमिनींत कापसाचें पीक होतें.

नदीजवळच्या जमिनींत थोडी रेती सांपडते. भूमध्यसमुद्राजवळची जमीन क्षारामुळें खराब होते. म्हणून त्यांत पिकें चांगलीं येत नाहींत. लागवडींतील जमिनीपैकीं तीनचतुर्थांश जमीन तात्विकदृष्ट्या तहह्यात वहिवाटीला असते. सर्व जमिनीची मालकी सरकारकडे आहे म्हणून जमिनीवर सारा असतो. सारा देणाऱ्या जमिनींना खरजी म्हणतात. उशुरी जमिनी पूर्वीं इनाम म्हणून दिल्या होत्या व त्यांना सध्यां थोडासा धारा द्यावा लागतो. सर्व कुळांना नाईल नदीचा बांध अथवा तीर संरक्षण करावा लागतो व तो खराब झाल्यास त्याची दुरुस्ती करावी लागते. वर्षभर पाटाचें पाणी घेणाऱ्यास जास्त कर द्यावा लागतो. जमीन मोजण्याचें प्रमाण फेडन म्हणजे १.०३ एकर आहे. दोनलक्ष चाळीसहजार फेडन सरकारी जमीन असून सुमारें सहा लक्ष फेडन जमीन परकीयांच्या ताब्यांत आहे. देश्य लहान शेतकरी कायम ठेवावयाचे व त्यांनी शेती मोठाल्या यूरोपियन भांडवलवाल्याकडे जाईल अशी कोणतीहि गोष्ट करावयाची नाहीं असें सरकारचें धोरण आहे.

नदीमुखाजवळचा प्रदेश, मध्यईजिप्त व वरच्या ईजिप्तचा कांहीं भाग यांस पाटाचें भरपूर पाणी मिळतें. अशी एकंदर चाळीस लक्ष एकर जमीन असून त्यांत दोन व कधीं कधीं तीन पिकें काढतात. ज्या ठिकाणीं वर्षभर पाणी मिळत नाहीं तेथें जमिनीचे चौकोनी तुकडे पाडून त्यांत नदीला पूर आला म्हणजे पाणी भरून ठेवून नंतर त्याचा उपयोग करतात. या पद्धतीनें साडेसतरा लक्ष एकर जमीनीची लागवड होते. नाईल नदीकांठच्या उंच प्रदेशांत कालवे नेण्याची सोय नसल्यामुळें पंप, रहाट ( सकिआस )वगैरेनीं जमिनीला पाणी देतात. फेला ( शेतकरी ) शेताचे चौकोनी तुकडे पाडून त्यांना पाण्याचे पाट काढून पाणी देतो.

येथें तीन ऋतु असतात. उन्हाळा ( सेफी ) १ एप्रिल पासून ३१ जुलैपर्यंत यांत वर्षभर पाणी मिळणाऱ्या जमिनींतच फक्त पीक होतें. (२)पूर (निली)१ आगष्ट ते ३०नोव्हेंबर (३) हिंवाळा ( शेतवी ) १ डिसेंबर ते ३१ मार्च. कापूस, साखर, तांदूळ व कांहीं अंशीं ज्वारी, बाजरी वगैरे आणि भाजीपाला हीं उन्हाळ्यांतलि पिकें होत. गहूं, जंव, ताग, व भाजी वगैरे हिंवाळ्यांत होतात. मका, ज्वारी, बाजरी वगैरे व निलि तांदूळ हीं निलि पिकें होत मोठ्या शेतांत कायती लोखंडी नांगर, व इतर यंत्रें उपयोगांत आणतात. परंतु लहान शेतकरी आपलीं जुन्या तऱ्हेचीं अवजारें उपयोगांत आणतो.

पि कें.—जगांतील कापूस उत्पन्न होणाऱ्या देशांत ईजिप्तचा तिसरा नंबर लागतो. येथें एकरी कापसाचें उत्पन्न जास्त येतें. परंतु लागवडीला फारच थोडी जमीन असल्यामुळें येथें संयुक्त संस्थानाच्या एकदशांश व हिंदुस्थानच्या निम्मा कापूस होतो. एकंदर सोळा लक्ष एकर जमीन कापसाच्या लागवडीखालीं असून त्यापैकीं पांच सहा लक्ष जमीन खालच्या ईजिप्तमध्यें आहे. व येथें उत्तम प्रतीचा कापूस होतो. १९१० मध्यें ३,५८,४०,००० पौंड, कापूस पिकला. कापसाचा अतिशय खप होऊं लागल्यामुळें शेतकऱ्यांचें लक्ष्य तिकडेच वेधूं लागलें व धान्य पेरण्याकडे त्यांची कमी प्रवृत्ति होऊं लागली. या प्रवृत्तीला आळा घालण्याकरितां कापूस पेरण्याची मर्यादा सरकारला घालावी लागली.

पा ळी व प शुः—अरबी अथवा पूर्वेकडील वाळवंटांत बेदुईन लोक उंट, घोडे, मेंढ्या व बकरीं पाळतात. नाईल नदीच्या खोऱ्यांत उंट, गाढव, खेंचर, बैल, म्हैस, मेंढी व बकऱ्या पाळतात. घोडे फार थोड्या प्रमाणांत सांपडतात. गुरें लहान, गुटगुटीत, शांत असून त्यांना लहान शिंगें असतात. मेंढ्या व शेळ्या येथें फार आहेत.

मा से मा र णें:—मेन्झुला सरोवरावर मुख्य मच्छी मारण्याची ठिकाणें आहेत. नाईल नदींत देखील मासे सांपडतात. दरवर्षी दोन लक्ष पौंड किंमतीचा व्यापार चालतो.

का ल वे:—येथें कालवे फार महत्वाचे आहेत व त्यांतून लहान होड्या चालतात. मुखाजवळच्या प्रदेशांत लहान लहान बरेच कालवे आहेत. त्यांना रय्या बेहेरा, रय्या मेनुफिया, रय्या टयुफिकी वगैरे कडून पाण्याचा पुरवठा होतो. रय्या बेहेराला प्रथम खटाटबा नांव आहे व पुढें रोझेटा हें नांव मिळालें. महमुदीया कालव्यांतून अलेक्झांड्रियाला गोड्या पाण्याचा पुरवठा होतो. यांच्या खेरीज आल मोईझचा कालवा, अबुल मुबेजाक कालवा ( शर्कावीया ), इस्मालिया अथवा गोडे पाण्याचा कालवा आणि वरच्या ईजिप्तमधील इब्राहिमीया व बहरयुसुफ हे दोन असे कालवे आहेत. १९१२ सालीं अॅसुआन येथें मोठें धरण बांधण्यांत आलें. तसेच मोठमोठे कालवे बांधण्याच्या योजना करण्यांत आल्या पण महायुद्धामुळें आर्थिक पेंच उत्पन्न झाल्यामुळें या योजना पूर्णपणें तडीस गेल्या नाहींत. ईजिप्तमध्यें नं

अद्यापि पडीक जमीन आहे ती पेरण्यायोग्य व्हावी या हेतूनें, व महापुरापासून लोकांचें संरक्षण व्हावें या हेतूनें, गेबेल औलिया व नगहमदी येथें अशीं दोन मोठीं धरणें बांधावयाचें १९२० सालीं मुकर झालें आहे.

कारखाने व उद्योगधंदे.—हा देश मुख्यतः शेतीचा आहे तरी येथें बरेच उद्योगधंदे आहेत सुताच्या गिरण्या बऱ्याच असून त्यांत चिटें छापतात व तेलहि काढतात. वरचा ईजिप्त व मुख्य प्रदेश यांत साखरेचे कारखाने आहेत. तांदुळाच्या गिरण्या व पिठाच्या गिरण्या साबू व कमावलेलीं कातडीं करणें, दारू गाळणें वगैरे धंदे चालतात. अलेक्झांड्रिया व कायरो येथें तंबाखूच्या सिगारेट करतात. देश्य लोक रेशीम, लोंकर, ताग व कापूस यांचें कापड विणतात. येथें साधीं मातीचीं भांडीं तयार होतात. लांकूड व धातू यांवर कोरीव व नक्षीचें काम होतें. कायरो व फेयुममध्यें गुलाबी अत्तर व इतर सुगंधी पदार्थ तयार होतात. बोटी बांधण्याचा धंदाहि महत्त्वाचा आहे.

व्यापार.—ब्रिटिशसत्ते ( १८८२ ) पासून ईजिप्तचा व्यापार वाढला. कापूस, सरकी, साखर कडधान्य सिगारेटस्, कांदे, तांदूळ व गोंद यांची मुख्य निर्गत होते व यांच्या खालोखाल कातडीं, अंडीं धान्यें, खजूर वगैरे येतात मुख्य आयात सुती व इतर कापड, कोळसा, लोखंड, पोलाद, इमारतीचें लांकूड, तंबाखू, यंत्रें, मद्य, पेट्रोलियम, फळें, कॉफी यांची होते.

१९११–२० या सालांत सरासरी १०१८८०००० पौंडाची आयात व ५११५६००० पौंडाची निर्गत म्हणजे एकंदर १५३०३६०० पौंडांचा व्यापार झाला.

बहिर्गत व्यापारांपैकीं शेंकडा ९० व्यापार अलेक्झांड्रिया बंदरांतून चालतो. पोर्ट सैय्यदचें महत्व अलीकडे वाढलें असून उतारू व टपाल याच बंदरांत येतात. पूर्वेकडील देशांशीं होणारा व्यापार बहुतकरून सुवेझच्या कालव्यातून चालतो. यांतून ब्रिटिश जहाजें फार जातात त्यांच्या खालोखाल जर्मन जहाजांचा नंबर असून पुढें अनुक्रमें फ्रेंच, डच, आस्ट्रियन वगैरे येतात.

चलनपद्धति.—इ. स. १८८५ पासून येथील चलनपद्धति सुधारली सुवर्णपरिमाणपद्धति प्रचलित असून सोन्याचा पौंड हें प्रमाण नाणें आहे याची किंमत इंग्लिश १ पौं. ६ पेन्स बरोबर आहे. हा पौंड १०० पिआस्टरच्या बरोबर असून २०:१०;५;२ पिआस्टरचीं रुप्याचीं नाणीं, व १, ½ ¼ ⅛ पिआस्टरचीं निकेलचीं नाणीं आहेत. सध्यां इंग्लिश साव्हरीन, फ्रेंच २० फ्रान्कचें नाणें व तुर्की मेजिदी हीं परकीय नाणीं ईजिप्तमध्यें चालतात. नॅशनल बँकेच्या १००;५०;१;०५;१ पौंडांच्या नोटा असून त्यांची गणना कायदेशीर चलनांत होत नाहीं सरकार करासाठीं मात्र नोटा घेतें. वास्तविक पाहतां ईजिप्शियन पौंड चालू नव्हता बहुतेक सर्व नाणीं प्रचारांतून नाहींशीं झालीं होती. तरी सुद्धां ही पद्धति चांगली चालली होती.

वजनें व मापें:—सरकारी कामांत दशमानात्मक (मेट्रिक) परिमाणें उपयोगांत आणतात. साधारण लोक मात्र त्यांचा उपयोग करीत नाहींत. फितर म्हणजे टिच, शिबर ( वीत ) हीं मापें असून फेदन हें जमिनीचें परिमाण आहे. अर्देब म्हणजे ५ बुशेल, ओकिए ( १·३२ औं. ); ओके ( २·७५ पौंड ) कांतार ( ९९·०४ पौंड ) अशीं वजनें आहेत.

राज्यघटना व शासनपद्धति.—ईजिप्त हें तुर्की साम्राज्याचें मांडलिक असून येथील राजास खेदीव म्हणतात. या घराण्यांत वडील मुलगा गादीवर बसे. मध्यवर्तिसत्ता मंत्रिमंडळाच्या ताब्यांत असे. यांची नेमणूक सुलतान करी व यांच्यांपैकीं एक मुख्य प्रधान नेमला जात असे. कौन्सिलांत ब्रिटिश जमाबंदी मसलतगार असून त्याच्या सल्ल्याशिवाय कोणतीहि जमाबंदी सुधारणा अथवा कायदा करीत नसत. अंतर्गत व्यवस्था, जमाबंदी, लोकोपयोगी कामें, न्याय, युद्ध, परराष्ट्रीय व शिक्षण या प्रत्येक खात्यावर एक मंत्री असे. कोणताहि मसुदा प्रथम मंत्रिमंडळाला सादर करून नंतर त्यावर खेदिवची सही लागे. ब्रिटिश मंत्र्याच्या सल्लयाशिवाय १८८२ पासून कोणतीहि महत्त्वाची गोष्ट घडली नाहीं. येथील कायदे बऱ्याच अंशीं परकीयांस लागू नसत.

येथील कायदेमंडळांत नेमलेले व निवडलेले सभासद असून त्यांनीं फक्त सल्ला द्यावयाची असे. अर्थात ही सल्ला सरकार मान्य करीत असे. सर्व साधारण सभेंत कायदे मंडळ व मंत्रिमंडळ यांचा समावेश होत असून त्यांत कांहीं लोकनियुक्त सभासद असत. ही सभा कायदे करीत नसे; परंतु हिच्या संमतीशिवाय कोणताहि नवीन कर बसविण्यांत येत नसे.दोन वर्षांतून एकदां तरी ही सभा भरलीच पाहिजे असा नियम होता.

मोठाल्या शहरांवर गव्हर्नर असून बाकीच्या भागांचें मुदिरीया अथवा प्रांत बनविले आहेत. गव्हर्नर—मुदीर ( प्रांताधिकारी ) हे अंतर्गत मंत्र्यास जबाबदार असतात. प्रत्येक प्रांतांत जिल्हे असून त्यावर ममूर असतो व प्रत्येक गांवावर अथवा खेड्यावर ओमदा काम पहातो.

१९१३ मध्यें पूर्वीची सर्व साधारणसभा व कायदे मंडळ हीं नाहींशीं होऊन त्या जागीं एकच कायदेमंडळ असावें असें ठरलें. या कायदेमंडळांत (१) निरनिराळया खात्यांचे दिवाण, ( २ ) ६६ लोकनियुक्त प्रतिनिधी व ( ३ ) १७ अल्पसंख्याकांचे सरकारनियुक्त प्रतिनिधी इतके लोक बसावयाचें ठरलें होतें. दर सहा वर्षांनीं कौन्सिलनिवडणुकी व्हावयाचें ठरलें. या नूतन कायदे मंडळाची पहिली सभा १९१३ सालीं झाली. पण पुढें १९१४ सालीं लष्करी कायदा, ईजिप्तमध्यें पुकारण्यांत आल्यामुळें या मंडळाच्या बैठका पुढें झाल्याच नाहींत. डिसेंबर १९१४ मध्यें, ईजिप्त

हें ईंग्रजांचें 'संरक्षित संस्थान' म्हणून ठरलें. व ब्रिटिश कॉन्सलच्या ऐवजीं हायकमिशनर नेमावा असें ठरलें. त्या वेळचा खेदिव अबास हिल्मी याला पदच्युत करण्यांत येऊन खेदिव इस्मायल यास ईजिप्तच्या गादीवर बसविण्यांत आलें. याच्या मरणानंतर अहमद फुमद पाशा याला राज्यपद मिळालें.

न्या य.—येथें चार न्यायपद्धती असून त्यांतल्या दोन फक्त ईजिप्शियन प्रजेस, एक फक्त परकीयांस व एक कांहीं अंशीं परकीयांस व कांहीं अंशीं एतद्देशीयास लागू आहे. येथें १५ परकीय राष्ट्रांचे कॉन्सल आहेत व त्यांस तहनाम्यांप्रमाणें आपापल्या राष्ट्रांतील फौजदारी गुन्हेगारांची अगर आपल्याच राष्ट्रांतील लोकांच्या दिवाणी मुकदम्याची चौकशी करण्यास अधिकार आहे. परकीय व देश्य भिन्नराष्ट्रीय परकीय यांमधील दिवाणी खटले सार्वराष्ट्रीय-अथवा मिश्र न्यायाधीशमंडळापुढें ( टायब्युनल ) चालतात. ह्या संस्था १८७६ त नुबरपाशाच्या सल्ल्यानें स्थापन झाल्या. अरबी, फ्रेंच, इटालियन अथवा इंग्लिश या भाषांतून कोर्टांत काम चालतें. यांत परकीय व ईजिप्शियन न्यायाधीश असतात. परंतु परकीय आधिकांश असतात. हे कोड नेपोलियनमध्यें कांहीं मुसलमानी कायद्याप्रमाणें दुरुस्त्या घालून तयार केलेला कायदा अनुसरतात.

ईजिप्शियनांनां लागू पडणाऱ्या न्यायपद्धतीवर न्यायमंत्र्याची देखरेख असते. मेहेकेमेह व एतद्देशीय न्यायधीशमंडळ ( ट्रायब्युनल) या दोन न्यायपद्धती आहेत. यांपैकीं पहिली म्हणजे काजीचीं कोर्टें असून त्यांत कुराणानुसार कायदे मान्य करतात. यावरील मुख्य काजी कायरो येथें असतो. व त्याच्या मदतीला उलेमा अथवा विद्वज्जन सभा असते.या कोर्टांत लग्न, वडिलोपार्जित मालमत्ता व पालकत्व वगैरे बाबतींत दावे चालतात.इतर दिवाणी व फौजदारी खटल्यांच्या बाबतींत १९०५ सालीं एतद्देशीय न्यायपद्धतींत बरीच सुधारणा करण्यांत आली. लहान मुलांच्या गुन्ह्यासाठीं मुलांचीं कोर्टें आहेत.

पोलिस खातें अंतर्गत मंत्र्याकडे असून त्याला मदतीला ब्रिटिश कामगार असतात. प्रांतिक पोलीस प्रांताधिकाऱ्यांच्या हुकुमाखालीं असतात.

प र मा र्थ सा ध नः—लोक महंमदी धर्माचे आहेत.१९१७ मध्यें११६५८१४८लोक मुसुलमान होते.कॉप्टांची लोकसंख्या ८५४७७८ होती. तसेच ख्रिस्ती लोकवस्ती १५५१६८ होती व यहुदी लोकांची संख्या ५९५८१ होती. याशिवाय इतर धर्माचे लोक २३२४३ होते. मुसलमान लोक सुनी पंथाचे असून बहुतेक शाफी मताचे आहेत.कित्येक हनिफी व मलिकी मताचे आहेत.शेख-ईल-इस्लामची नेमणूक खेदीव करतो. हाच धर्मखात्याचा मुख्य असून कांहीं बाबतींत न्याय देखील देतो. मुख्य काजीची नेमणूक तुर्कस्तानच्या सुलतानाकडून होत असे व काप्टिक पंथाचा मुख्य अलेक्झांड्रिया येथील पॅट्रिआर्क आहे.

शि क्ष ण.—यूरोपीय व देश्य अशा दोन तऱ्हेच्या शिक्षणपद्धती येथें आहेत. या दोन पद्धतीवर कमी अधिक प्रमाणांत शिक्षणखात्याच्या मंत्र्याची देखरेख असते सरकार पाश्चात्य शिक्षणाचा पुरस्कार करितें. त्याचा अवलंब ब्रिटिशांपूर्वी झाला असून प्राथमिक, दुय्यम, धंदे, अध्यापन, शेतकी स्थापत्य, कायदा, वैद्यक वगैरेंच्या सरकारी शाळा आहेत. प्राथमिक शिक्षण अरबी भाषेंतून देतात. सरकारी शाळा खेरीज इतर पंथांच्या लोकांच्या व मिशनरी बऱ्याच शाळा येथें आहेत. १९०८ मध्यें चळवळ होऊन मुसुलमानांनीं खाजगी खर्चानें एक राष्ट्रीय विश्वविद्यालय स्थापन केलें. त्यांत शास्त्रीय, वाङ्मयात्मक व तात्विक विषयांचा अभ्यास होणार असून राजकीय व पारमार्थिक विषय गाळले आहेत.

एतद्देशीय शिक्षणपद्धतीचा कुताब व अझार विश्वविद्यालयांत ( कायरो येथील ) अवलंब केला आहे. कुताब म्हणजे मशिदीला जोडलेली शाळा. यांत पूर्वी मुलांनां कुराण पाठ करण्यास शिकवीत. अलीकडे दुसरेंहि शिक्षण कांहीं ठिकाणीं देतात. यासंबंधीं सरकारनें बरीच सुधारणा केली असून कांहीं शाळा शिक्षणखात्यानें ताब्यांत घेतल्या आहेत. एकंदर १० हजार कुताब असून त्यांत २५० हजार विद्यार्थी आहेत. काप्टांच्या कांहीं प्राथमिक शाळा कांहीं धंदे शाळा, व एक विद्यालय आहे.

कायरो हें मुसुलमानांचें विद्यापीठ आहे. येथील अझार विश्वविद्यालयांत व्याकरण, अलंकार, काव्य, कुराण व त्यावर अवलंबून रहाणारे विषय, बिजगणित, वगैरे विषय शिकवितात. सर्व मुसुलमानी जगांतून विद्यार्थी येथें येतात. विद्यार्थ्यांना फी व प्रोफेसरांनां पगार नसतो. प्रोफेसर शिकवण्या अथवा ग्रंथांच्या हस्तलिखीत प्रती करून पोट भरतात. येथील शिक्षणपद्धतींत सुधारणा करण्यासाठीं १९०७ मध्यें कायदा करण्यांत आला परंतु लोकांनीं बराच विरोध केल्यामुळें तो तात्पुरता अमलांत आणला नाहीं.

१९१७ सालीं पांच वर्षांवर वय असलेल्या मुसुलमान मुलांत शेंकडा ८ मुलांनां व शेकडा १ मुलीला लिहितां वाचतां येत असे. व परकीयांत शेंकडा ७५ मुलांनां लिहिणें वाचणें येत असे.

ही स्थिति सुधारण्याकरितां प्रांतिक कायदेमंडळानें बरीच खटपट चालविली आहे. शिक्षणमंत्रि, अडलीपाशा यानें १९१६ सालीं, प्राथमिक शाळांमध्यें बरीच सुधारणा घडून आणली.१९२० सालीं, वरिष्ठ कायदेमंडळानें सहा व प्रांतिक कायदेमंडळानें अठरा अशा शाळा स्थापन केल्या. याच सालीं मुलींच्या शाळांची संख्या ५४ होती. दुय्यम व उच्च शिक्षणाच्या बाबतींत १९१० ते १९२०या काळांत म्हणण्यासारखी वाढ झाली नाहीं.१९२२ मध्यें शास्त्रीयविषयांच्या निरनिराळ्या शाखांचें अध्ययन

करण्यास ईजिप्त सरकारनें १० इजिप्शियन विद्यार्थ्यांना शिष्य वृत्त्या देऊन अमेरिकेला पाठविलें आहे.

वा ङ्म य व नि य त का लि कें.—ब्रिटिश अमलापासून आरबी भाषा व वाङ्मय यांचें पुनरुज्जीवन झालें असून प्राचीन मुसुलमानांचा इतिहास, पुराणवस्तुसंशोधन व पारमार्थिक ज्ञान यांवर बराच प्रकाश पडला आहे. आरबी भाषेंत मासिकें व वर्तमानपत्रें निघतात. 'आलीलया' हें मुख्य वर्तमानपत्र आहे. अशीच आलओम्मा, आलमोयद, आलजेरिदा हींहि आहेत. याखेरीज कांहीं इंग्रजी व फ्रेंच वर्तमानपत्रें प्रसिद्ध होतात.

लो क.—१९१७ मध्यें येथील लोकसंख्या अरब अथवा बेदुईन धरून एकंदर १,२७,५०,९१८ होती. म्हणजे १९०७ च्या लोकसंख्येच्या मानानें, शेंकडा १२.९ या प्रमाणांत लोकसंख्येची वाढ झाली. वाळवंटाचा प्रदेश सोडला तर ईजिप्तची लोकसंख्या फार दाट आहे. गेल्या पांच सहा वर्षांत ईजिप्तची लोकसंख्या भराभर वाढत चाललेली आहे. त्या प्रमाणांत मृत्यूसंख्येचेंहि प्रमाण वाढत चाललें आहे. वाढत्या लोकसंख्येची योग्य तऱ्हेनें कशी व्यवस्था लावतां येईल या संबंधीं ईजिप्त सरकारपुढें मोठा प्रश्न येऊन पडला आहे.

येथील लोकांचे साधारणतः खालीलप्रमाणें विभाग पाडतात. ( १ ) फेलाहिन अथवा शेतकरी व शहरांतील एतद्देशीय. ( २ ) बेदुईन अथवा वाळवंटांतील भटकणारे अरब. ( ३ ) नुबा, व नुबीयन अथवा बर्बेरिन, म्ह० असुआन व डोंगोल मधील नाइल खोऱ्यांत राहणारे. ( ४ ) परकीय.

पहिल्या विभागांत मुसुलमान कॉप्टिक यांचा समावेश होतो. बेदुईनमध्यें दोन प्रकार आहेत. पहिला अरबी भाषा बोलणारा. दुसरा कोसेर आणि स्वाकिन मध्यें रहाणाऱ्या म्हणजे हॅडेन्डोआ, बिशारिन, व अबाबदी जाती. ह्यांची भाषा वेगळी असून ते बहुधा प्राचीन ब्लेमीस चे वंशज असावे. नुबा लोक अरब व निग्रो यांच्या मिश्रणापासून झाले असून शेतकी करतात. परकीय लोक दीड लक्षाच्यावर म्हणजे लोकसंख्येच्या शेंकडा दीडपट आहेत. यांत ग्रीक, इटालियन ब्रिटिश व फ्रेंच यांचा समावेश होतो. तुर्क फार थोडे आहेत परंतु ते मोठ्या हुद्यावर आहेत.

लोकसंख्येच्या मानानें शेंकडा २०लोक शहरांत राहतात. ९७ हजार शुद्ध भटके लोक सोडले तर सुमारें पांच लक्ष बेदुईन सुपीक भागाजवळील वाळवंटांत राहतात. एकंदर लोकसंख्येंत पुरुषांपेक्षां स्त्रियां ४६ हजारांनीं जास्त आहेत.

ईजिप्शियन लोकांचें वर्णन, पोशाख, व सामाजिक स्थिति.—यूरोपियनांशीं संबंध आल्यानें ईजिप्शियनांची राहणी बदलली आहे. जेथें पाश्चात्य संस्कृतीचा मुळींच संबंध नाहीं अशा लोकांचें वर्णन खालीं दिलें आहे. ह्या लोकांची साधारण उंची चांगली असून यांचे अवयव रेखीव असतात व शरीर सुदृढ असतें. यांचा वर्ण साधारण गोरा असून चेहरा लांबट गोल असतो. डोळे काळे व पाणीदार असतात. पुरुषांनां लहान दाढी व मिशा असतात व डोक्यावर फक्त 'शुशेह' म्हणजे एक बट असते. स्त्रिया डोळ्यांत काजळ अथवा 'कोहल' घालतात. स्त्रिया सुंदर असून त्यांचें सौंदर्य १५–१६ व्या वर्षापर्यंत बहारीचें असतें. यांची वाढ लवकर होते, त्याचप्रमाणें ऱ्हासहि लवकर होतो. स्त्रियांवर ४० व्या वर्षी म्हातारपणाची कळा दिसूं लागते. ह्या शरीरावर गोंदवितात आणि हातापायाला मेंदीचा रंग देतात.

बरेच लोक यूरोपीय पोशाख करूं लागले आहेत. मूळ ईजिप्शियन लोक तुमान, ( पोकळ बाह्याची ) पैरण, घोट्यापर्यंत पोहचणारा अंगरखा अथवा कफ्तान; व वरून झगा घेतात. कफ्तानवर कंबरपट्टा लावतात. डोक्याला तांबड्या कापडाची 'फेझ' टोपी अथवा 'टरबुश' असतो. युरोपियन पोशाख घालणारे लोक 'टरबुश' वापरतात. निरनिराळ्या धंद्याच्या व पारमार्थिक मताच्या लोकांच्या डोक्याचें शिरस्त्राणाचा आकार व रंग मात्र वेगळे असतात. स्त्रिया तुमानी अंगरखा व जाकीट वापरतात. सर्व स्त्रियांनां बुरखा असतो. या डोक्यावर लहान टरबुश घालतात. व कानाभोंवतीं रुमाल बांधतात. बाहेर जातांनां स्त्रिया अंगावर झगा घेतात. बायका नेहमीं जोडे ( स्लीपर्स ) वापरतात.

लहान मुलांनां वडील मनुष्यांचा मान ठेवण्यास शिकवितात. ५ व्या ६ व्या वर्षी त्यांची सुंता करतात व एखाद्या लग्नाबरोबर त्यांची मिरवणूक काढतात. मुलांनां बहुतेक शाळेंत पाठवून स्वभाषेचें म्हणजे अरबीचें शिक्षण अवश्य देतात. १९ व्या शतकाअखेरपासून मुलींनां देखील शिक्षण देण्याची सोय केली आहे.

तारुण्यांत आलेल्या पुरुषानें लग्न न करणें म्हणजे ईजिप्तमध्यें बदलौकिक समजतात. यामुळें फार थोडे लोक अविवाहित सांपडतात. ह्यांचीं लग्नें साधारण दहाव्या वर्षी होतात. १६ वर्षांच्या अविवाहित मुली फार थोड्या सांपडतात. नवरा मुलगा नवरी लग्नाच्या वेळींच फक्त पहातो; पूर्वी पहात नाहीं. नवऱ्यास हुंडा मिळतो व फिकी दोन साक्षीदारासमोर लग्न लावितो. शेवटच्या दिवशीं नवरीला मोठ्या समारंभानें नवऱ्याच्या घरीं नेतात. लग्नाच्या चार बायका करण्यास धर्माची सवड असतांनां सुद्धां ईजिप्शियन एक लग्न करतात. परंतु त्यांच्या रखेल्या असतात.या ठेवलेल्या स्त्रियांवर लग्नाच्या स्त्रीचा अधिकार असतो व ती यांनां साधारण कडकपणानेंच वागविते यांच्यात घटस्फोट होतो पण तो केल्यास हुंडा परत देतात.

मृतांचे संस्कार बरेच आहेत. मेल्यावर प्रेताचें तोंड मक्केकडे वळवितात. स्त्रिया व भाडोत्री लोक शोक करितात. फिकी कुराण वाचतात. त्याच दिवशीं अगर दुसऱ्या दिवशीं प्रेतास स्नान घालून चांगल्या रीतीनें तें ताटीवर बांधतात. स्मशानांत नेण्याच्या अगोदर प्रेत

एखाद्या मशिदींत नेऊ तेथें इमाम प्रेतविधि करतो. व नंतर प्रेत पुरतात. त्यादिवशीं रात्रीं फिकी कुराण वाचतो. स्त्रियांनां फक्त मुतकांत काळे कपडे घालावे लागतात व त्या हातांनां, भिंतीला वगैरे काळा रंग लावितात. केव्हां तरी एकदां खातमेह अथवा कुराणाचें पारायण मृताच्या घरीं करतात.

स्त्रियांनां वेगळे जानानखाने ( पडदापद्धति ) येथें आहेत. पण ती पद्धत कडक नाहीं. स्त्रियांचा दर्जा पुरुषांपेक्षां कमी समजतात. फक्त आईला कायतो विशेष मान असतो. जनानखान्याबाहेर स्त्रियांचे जोडे असेल तर पुरुषाला आंत जाण्याला मज्जाव असतो. या रीतीनें एखाद्या मनुष्यास पुष्कळ काळपर्यंत आंत जातां येत नाहीं. वरच्या व मधल्या वर्गांतील स्त्रिया स्नानागार, भेटी व शिवणकाम वगैरे गोष्टींत वेळ घालवितात. स्त्री व पुरुष या दोघांतहि अनीति फार दृष्टोत्पत्तीस येते.

हे सूर्योदयानंतर फराळ, मध्यान्हकाळीं जेवण, सूर्यास्तानंतर मुख्य जेवण करतात. मिठाई, फळें वगैरे हे लोक फार खातात.तसेंच हे लोक काफी फार घेतात. सर्व दर्जांचे लोक तंबाखू फार ओढतात. श्रीमंत स्त्रियांनां सुद्धां ही संवय असते. कायद्याविरुद्ध असलेली हशिश ओढण्याची संवय बऱ्याच लोकांत आहे. स्त्रिया गाढवावर बसून जातात. गरीबांच्या स्त्रियांस जनाना नसतो परंतु त्या बुरखा घेतात. घरगुती कामाकरितां नीग्रो गुलाम स्त्रिया असतात.

यांच्या पद्धती व रीती फार चांगल्या आहेत. परकीयांशीं हे लवकर बोलतात. यांची भाषा फार मिठी असते. हे महंमद व कुराण यांनां फार पवित्र समजतात. यांचा देवावर फार भरंवसा आहे. मातृपितृभक्ति, वडिलांचा सन्मान, परोपकार भूतदया, आनंदी स्वभाव वगैरे गुण आहेत. स्वधर्मीयांखेरीज इतरांवर यांचा भरंवसा नसतो. लहानसहान चोऱ्या मात्र येथें फार होतात.

हमामखाना ( स्नानागार ) ही पुरुष व स्त्रिया दोघांच्याहि आवडीची जागा आहे. महंमदाची आज्ञा नसतांना सुद्धां हे लोक गायनाचे व वादनाचे शोकी आहेत. गायनकुशल स्त्रियांना 'अवालिम' म्हणतात. गवाझी अथवा नायकिणीचें काम करणाऱ्या दुसऱ्या स्त्रिया असतात व यांची जातहि वेगळी असते. सध्यां कायरोंत असणाऱ्या नायकिणी अवालिम अथवा गवाझी नसून हलक्या दर्जाच्या स्त्रिया आहेत. रिफाफिया, दरवेशी अथवा गारोडी यांचे सापाचे खेळ येथें फार होतात. याचप्रमाणें, इतर खेळ, डोंबारी वगैरेंचे खेळ आढळतात.

सा र्व ज नि क स णः–मुसुलमानी वर्षारंभाचे (मोहरमचे) पहिले दहा दिवस फार गडबडीचे असतात. दहाव्यां दिवशीं महंमदाचा नातू व अलीचा मुलगा हसन याच्या कत्तलीसंबंधीं वार्षिक समारंभ होतात. यानंतर यात्रेकरूंच्या परत येण्याचा समारंभ होतो. तिसऱ्या महिन्याच्या सुरवातीस 'महंमदा' ची जयंति होते यानंतर अनुक्रमें मौलिदएल हुसनेन, आलसाली अयुब, इमामशफी हे उत्सव असतात. यानंतर रमजान, अलइदअसशाघीर; किंवा, अल ईद अल कबीर वगैरे सण येतात.

नाईल नदीला पूर येतो त्यावेळींसुद्धां कांहीं मोठे समारंभ करतात. यापैकीं कांहीं प्राचीन काळापासून चालत असावे असें वाटतें. याला सुरवात लेलेतएन नुक्ता म्हणजे १७ जूनच्या रात्रीं होते. यानंतर कांहीं दिवसांनीं नाईल नदीचा पूर कायरो येथें दिसतो दवंडीवाला पूर आल्याची वातमी दूर पोहोंचवितो. नदीचें पाणी २०–२१ फूट चढल्यावर त्यास वेफाएन नील म्हणतात. याच्या दुसऱ्या दिवशीं कायरोयेथील कालवा ज्यानें बंद करतात तो बांध फोडण्याचा समारंभ होत असे. हा कालवा बुजविल्यानें आतां समारंभांत फरक पडला आहे. या बांधासमोर एक स्तंभ असून त्याला 'नाईलची पत्नी' म्हणत. एक अरब इतिहासकार असें म्हणतो कीं, मुसुलमानांपुर्वी येथें एक कुमारी बळी देत असत. पण मुसुलमानी अंमलापासून एक होडी सुशोभित करीत व दारूकाम उडवीत. गव्हर्नर व काजी हे बांध फोडण्याची आज्ञा देत. पुढें दुसरे समारंभ होत.

ईजिप्तमध्यें प्रत्येक शहरांत, गावात व डोंगरावर साधूंच्या कबरी दृष्टीस पडतात. येथील मुख्य साधु म्हणजे शाफी मताचा संस्थापक इमाम अशाफी, सय्यद अहमद अलबैदावी, सय्यद इब्राहिम एद–देसुकी हे होत. बैदावी १३ व्या शतकात होऊन गेला व त्याला टान्टा शहरांत पुरलें. त्याच्या कबरेच्या दर्शनास बरेच यात्रेकरू येतात. तसेंच देशुक येथें एद-देशुकीच्या कबरीपुढें बरेच लोक जमतात. याखेरीज महंमदाच्या वंशांतील म्हणजे अलीची मुलगी सय्यीदा झिनेब, हुसेनची मुलगी सय्यीदा सिकैना,व हसनची नात नेफिसा याच्या कबरी असल्याचें सांगतात व त्याविषयीं फार पूज्यबुद्धि आहे. कायरो येथील हसनीन ( अथवा दोन हसन ) मशीद फार प्रसिद्ध आहे. व त्यांत हुसेनचें शिर आहे असें म्हणतात.

ईजिप्तमधील दरवेशांचे मुख्य पंथ येणेंप्रमाणें:—( १ ) रिफाईआ व त्याचे उपपंथ इलवानिया व सादिया, ( २ ) कादिरिया ( काहिरीया ) अथवा ओरडणारे दरवेशी,( ३ ) सय्यय अहमद अलबैदावीचे अनुयायी, अहमदीया; व उपपंथ बेयुमिया, शिनाविया, शरविया, व इतर ( ४ ) सय्यद इब्राहिम एद–देसुकीचे अनुयायी अथवा बरामिया. या सर्वांवर खलिफ अबूबकर यांच्या वंशांतील पुरुष मुख्य असतो व त्याला शेख-एल-बेकरी म्हणतात. सादिया हे साप पकडण्यांत, त्यांना जिवंत खाण्यांत आणि इलवानीया प्राणी, कांच वगैरे खाण्यांत प्रसिद्ध आहेत. जादूटोण्यावर या लोकांचा भरंवसा आहे. म्हणून दारावर कुराणांतील वचनें लिहिलेलीं सांपडतात. प्रत्येकाजवळ एखादा भारलेला ताईत असतो.

ज मा खर्च.—१९०७ सालीं १,६३,६८,००० पौंड (ईजिप्शियन) वसूल झाला व १,४२,८०,००० पौंड खर्च झाला. १९०५ सालीं ३१ डिसेंबरला एकंदर ९,६४,८४,००० पौंड कर्ज होतें. पुढें सन १९११ सालामध्यें १,६७,९३,००० पौंड वसूल आला व १,४८,७२,००० पौंड खर्च झाला. महायुद्धामुळें वसूल कमी येण्यास लागून खर्च मात्र वाढूं लागला. १९१४।१५, मध्यें १४,६८,००० पौंड तूट आली. १९१९।१९२० मध्यें मात्र वसुलाचें उत्पन्न वाढून तें ३,३६,७७,००० पौंड इतकें झालें व खर्च २,८९,९१,००० पौंड झाला. १९२० सालीं शिल्लक फंड १,५५,७६,००० पौंड होता. १९२१–१९२२च्या अंदाज पत्रकांत वसुलाचें उत्पन्न ३,६७,०१,००० पौंड धरलें असून खर्च ३,८६,८२,००० धरला होता. १९१९च्या अखेरीस राष्ट्रीय कर्ज ९,३२,९९,००० इतकें होतें.

सै न्य.—बहुतेक इतिहासलेखकांचा असा समज आहे कीं, फारोच्या वेळीं त्याच्या पदरीं परकीय सैन्य असे. त्यानंतर कँबिसेस ते शिकंदरपर्यंत टॉलेमीपासून अँटनीपर्यंत, आगस्टसपासून ७ व्या शतकापर्यंत, अरबी काळांत, सलादीनच्या घराण्यापासुन १३ व्या शतकाच्या मध्यापर्यंत ईजिप्तमध्यें भाडोत्री शिपाई होते. यानंतर मॅमेल्युक ( गुलाम ) यांनां काळ्या समुद्राच्या कांठच्या प्रदेशांतून आणून लष्करी शिक्षण दिलें; परंतु पुढें यांनीं राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. १५१७ त तुर्कांची सत्ता सुरू झाली. पुढें अठराव्या शतकाच्या अखेरीस फ्रेंच व त्यांच्यानंतर ब्रिटिश व तुर्क असा अम्मल झाला. पुढें १८२१ त मेहेमेतअल्ली नांवाच्या कॅव्हाला येथील तंबाखूवाल्यानें कांहीं सैन्यानिशीं येऊन सुभेदारी पटकावली व हळू हळू सर्व देश ताब्यांत घेतला. यानेंच येथील फेलाहिनांनां ( अडीच लाख ) सक्तीची नौकरी करण्यास लाविलें. याच्या लष्करांत एका डोळ्याचे व हाताचीं बोटें नसलेले लोक असत. कारण बऱ्याच लोकांनीं लष्करी नौकरीच्या त्रासांतून सुटण्यासाठीं डोळे, हात, पाय यांनां इजा करून घेतली होती; परंतु याच लोकांनीं पहिल्या व दुसऱ्या सीरियन युद्धांत विजय संपादिले. कोनिया येथील युद्धांत तुर्कांची दाणादाण उडविणारा ईजिप्शियन योद्धा इब्राहिमपाशा याचें असें मत असे कीं, ईजिप्शियन लोकांनां सैन्यांतील सार्जंटपेक्षां वरिष्ठ जागा देऊं नये. त्याच्या वेळीं तुर्क व सिरकाशियन हेच वरिष्ठ अधिकारावर असत. यानंतर अबासच्या कारकीर्दींत ईजिप्शियन सैन्याचा पराजय झाला. सैय्यदच्या अमलांत फक्त तीन हजार सैन्य असे. इस्मायलनें ईजिप्शियन सैन्य वाढविलें; परंतु शेतकऱ्यांवर कराचें ओझें लादल्यानें त्याची गादी डळमळूं लागली. अखेरीस अरबीचें बंड झालें व ब्रिटिशांनीं ईजिप्तमध्यें पाय शिरकावून इस्मायलच्या अठरा हजार सैन्यास रजा दिली.

इ. स. १८८३ त मेजर जनरल सर ईव्हेलीन वुड याला दोन लक्ष पौंड खर्चाची मंजुरी मिळाली व त्यानें ईजिप्तच्या संरक्षणासाठीं सहा हजार फेलाहिन सैन्य तयार करावें, असें ठरलें. त्याच्या मदतीस२६अधिकारी असून त्यांत कर्नल ग्रेनफेल व लेफ्टेनंट किचनेर हे होते व ते पुढें सरदार झाले. सरदारांनीं अधिकारी वर्ग जुन्या सैन्यांतून व अरबीच्या सैन्यांतून निवडले; परंतु शिपाई मात्र शेतकऱ्यांपैकीं होते. जुनी सक्तीची पद्धति तत्त्वतः रद्द करण्यांत आली. एकंदर विचार करून २० पौंड देणाराला नौकरी माफ असें सरदारांनीं ठरविलें. १९०८ सालीं याचें उत्पन्न अडीच लाख पौंडांपेक्षां जास्त झालें. हा पैसा शिपायांच्या उपयोगास लावतात. वर्षाचा पगार ३ पौं. १४ शि. असतो. ईजिप्शियन शिपाई फार मेहनती असतो. अधिकाऱ्यास अवश्य गुण त्याच्या अंगांत नाहींत; परंतु परकीय अधिकाऱ्याच्या हाताखालीं तो चांगलें काम करतो. इ. स. १८८३ च्या महामारीच्या सांथींत ब्रिटिश अधिकाऱ्यांचें औदार्य व परोपकार याचा परिणाम चांगला झाला व फेलाहिन शिपायांत बरीच सुधारणा झाली. स्वाकीन येथील युद्ध व खार्टूम येथील वेढा उठविण्यास पाठविलेलें सैन्य यांत ईजिप्शियन सैन्यानें फार चांगलें काम केलें. इतकेंच नव्हे तर या शिपायांचा प्रामाणिकपणा व शिस्त फार अवर्णनीय होती व अद्यापिहि आहे. आमडूरमन येथील विजयास बऱ्याच अंशीं फेलाहिन शिपायी कारण झाले.

फेलाहिन याला स्वभावतः युद्ध व लष्करी बाणा आवडत नाहीं. त्याची अंगकाठी सुदृढ असून तो काम करणारा असतो. समरांगणावर तो स्थिर असतो. त्याच्यांत सुधारणा होण्यासारखी असते. दरवेश्याबरोबर झालेल्या युद्धांत त्यानें चांगली कामगिरी बजावली. सुशिक्षित ईजिप्शियन अधिकारी निश्चयी व करारी असतो व वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या देखरेखीखालीं चांगलें काम करतो. काळ्या शिपायांत सुद्धां चांगले गुण आहेत. मेहमेतअल्लीच्या सैन्यांत कांहीं शिपायी होते. सुदानिज शिपायी नेम मारण्यांत कुशल असतात. यांनां कवाईत आवडत नाहीं. १९०८ सालीं ईजिप्शियन सैन्य अठरा हजार होतें. सैन्याबरोबर व देशांत औषधपाण्याची सोय आहे. १८८७ त लष्करी शाळेची पुनर्घटना केली. जनरल सर ईव्हेलीनवुड नंतर कर्नल सर फ्रांसिस ग्रेनफेल व त्याच्यानंतर कर्नल किचनेर हे ईजिप्तचे सरदार बनले. मेजर जनरल सर एफ. आर. विंगेट हा चवथा सरदार झाला.

वरील विवेचनाखेरीज विज्ञानेतिहास या भागांत ईजिप्तसंबंधीं बरेंच विवेचन निरनिराळ्या शास्त्रांचा इतिहास देताना आलें आहे त्याची येथें पुनरावृत्ति केली नाहीं, तथापि उल्लेख करावयाचा म्हणजे मिसरदेशीय लिपि ( पृ. ३८ ); लेखनसाहित्य ( पृ. ७३ ); ईजिप्शियन हिंदी अंकांची तुलना ( पृ. ८२–८३ ); मिसरदेशीय कालगणना ( पृ. १०१ ); इतिहाससंशोधन ( पृ. १२७ ); प्राचीन मिसरदेशांतील शास्त्रीय ज्ञान ( पृ. २२७ ); ज्योतिष ज्ञान ( पृ. ३२२ ); औषधिविज्ञान ( पृ. ३८९ ) इत्यादि विष-

यांचा ऊहापोह तेथें केला आहे. प्राचीन इतिहास बुद्धपूर्वजग उत्तरभाग प्रकरण २ मध्यें दिला आहे.

इ ति हा स.

प्रा ची न.—ईजिप्तचा प्राचीन इतिहास म्हणजे खिस्तपूर्व ३४० पर्यंतचा तिसऱ्या विभागांत दिला आहे (उत्तर भाग, प्रकरण दुसरें) या सुमारास ईजिप्तवर इराणची सत्ता पुन्हां प्रस्थापित झाली होती. पण लवकरच म्हणजे खि. पू. ३३२ मध्यें अलेक्झांडर दि ग्रेटनें ईजिप्तवर स्वारी केली, आणि इराणच्या गव्हर्नराजवळ पुरेसें सैन्य नसल्यामुळें सर्व ईजिप्त देश अलेक्झांडरनें लवकरच हस्तगत केला.नवीन अलेक्झांड्रिया नांवाचें शहर वसवून तेथें राजधानी करण्याचें ठरविलें. ईजिप्तमध्यें मिळालेला खजिना त्याला फार उपयोगी पडला. त्यानें मिसरी लोकांच्या धर्माबद्दल आदर दाखवून लोकांची सहानुभूति मिळविली, व ग्रीकांचा अम्मल तेथें बसवून तो दुसरे देश जिंकण्यास गेला.

ईजिप्तचा खजीना व खंडणी अलेक्झांडरच्या फार उपयोगी पडली. त्यानें ईजिप्शियन धर्माबद्दल सहानुभूति प्रदर्शित केली व लोकांचें प्रेम संपादन केलें. राज्यकारभारावर दोन कामगार नेमिले. अलेक्झांड्रिया शहर राजधानी झालें. त्याच प्रमाणें कर, सैन्य व आरमार या सर्वांवर ग्रीकांची देखरेख होती. खिस्त पूर्व ३३१ त त्यानें सैन्यानिशी फिनीशियांत स्वारी केली. एलिफन्टाईन येथें ख्नुम देवालयाच्या दरवाज्यावर अलेक्झांडरचें नांव कोरलें आहे.

टॉलेमी राजांचा काळ.—( खि. पू. ३२३–खि. पू.३० ) इसवी सनापूर्वी ३२३ त अलेक्झांडरच्या साम्राज्याचे तुकडे पडल्यावर लॅगसचा मुलगा टॉलेमी याच्या वाट्यास ईजिप्त आला. यानें टॉलेमी घराण्याची स्थापना केली. युद्धाचा खर्च वगैरे करण्यासाठीं या राजांनीं जबरदस्त कर बसविले होते. याच्या अमदानींत सर्व अधिकारी ग्रीक होते. एकंदर राज्यकारभार इतक्या सुरळीत रीतीनें चालत असे कीं, शेतकरी वर्ग फार संतोषित दिसत असे. ग्रीक लोक सर्वत्र वसाहती करून राहिले होते. विवाहसंबंध होऊन ग्रीक व ईजिप्शियन लोक एकत्र झाले होते. पहिल्या टॉलेमीनें मेंफाईट सेरॅपिसचा पंथ चालू केला होता. टॉलेमीच्या कारकीर्दींत न्यूबिया व वरचा ईजिप्त यांमधील मंदिरें बांधलीं गेलीं. थीबीजमध्यें दोन देशी राजे झाले. परंतु धार्मिक बाबीखेरीज इतर बाबतींत थिबीजचें महत्त्व कमी झालें. पहिल्या टॉलेमीच्या अंमलांत ईजिप्तची लोकसंख्या सत्तर लक्ष होती असें डिओडोरस म्हणतो. आपसांतील लढाया व बंडें यामुळें वरच्या व खालच्या ईजिप्तचें बरेंच नुकसान झालें. टॉलेमीच्या अंमलांतील देवळें व पापीरस कागदावरील लेख येथें सांपडत नाहींत.

रोमन सत्तेचा काळ.—खि. पू. ३० मध्यें आगस्टसनें ईजिप्तवर आपला अंमल बसविला. त्यानें हा देश आपल्या खासगी मालकीचा समजून त्यांत सीनेटला कांहींच ढवळाढवळ करूं दिली नाहीं. टॉलेमीची राज्यपद्धति साधारणपणें कायम ठेवून मोठ्या हुद्द्यांच्या जागा त्यानें रोमन लोकास दिल्या. कोणत्याहि सीनेटरला बादशहाच्या हुकुमाशिवाय ईजिप्तमध्यें जाण्याची परवानगी नसे. ईजिप्तमधून रोमला धान्याचा पुरवठा होई. यामुळें एखाद्या बंडखोर सेनापतीनें ईजिप्तमधून धान्य जाण्याचें बंद केलें असतें तर रोमची उपासमार झाली असती. सर्वांत मोठी 'प्रिफेक्ट' ची जागा रोमन सरदारांनां देण्यांत येई. बादशहाचा प्रतिनिधि या नात्यानें 'प्रिफेक्ट' हा राजाप्रमाणें असे. पहिला प्रिफेक्ट कॉर्नेलियस गॅलस यानें वरच्या ईजिप्तवर रोमन अंमल चांगला बसविला. तिसऱ्या प्रिफेक्टनें इथिओपिअन लोकांचा पराभव करून त्यांना हांकून दिलें व त्यांची राजधानी नॅपाटा सर केली. यानंतर ग्रीक व यहुदी यांचीं भांडणें व द्वेष यामुळें बराच त्रास झाला. क्लॉडीयसनें हिंदुस्थानचा ईजिप्तशीं व्यापार वाढविला. निरोच्या कारकीर्दीपासून भरभराट झाली व ती शंभर वर्षे कायम होती. ट्राजन बादशहाच्या अंमलांत यहुदी लोकांचें बंड, ग्रीकांची कत्तल, यहुद्यांची अलेक्झांड्रियांतील कत्तल, वगैरे गोष्टी घडल्या. हेड्रीयन दोनदां ईजिप्तमध्यें आला होता(इ. स. १३४ व १३७) त्यानें आर्टिनो स्थापन केलें.त्याच्या वेळेपासून ग्रीकोरोमन पद्धतीच्या इमारती सर्व देशभर होऊं लागल्या. मार्कस आरेलियसच्या ब्युकोलिक अथवा देशी शिपायांचें बंड झालें व तें महत्प्रयासानें मोडण्यांत आलें. या युद्धानें शेतीचा नाश झाला व जबर कर बसले. आफ्रिकेचाहि प्रांत ईजिप्तप्रमाणें धान्याचा पुरवठा करण्यांत महत्त्वाचा गणीत असत. रोमन सैन्याचा अधिपति अव्हिडीयस कॅसीयस यानें राजा म्हणून आपली द्वाही फिरविली, परंतु मार्कस आरेलियस येतो आहे असें पाहून त्याच्याच पक्षांतील लोकांनीं त्याला ठार केलें. अॅन्टोनाईन घराण्याचा ऱ्हास झाल्यावर पिसेनियस नायगर, ईजिप्शियन सैन्याचा सेनापति यानें सम्राट म्हणून द्वाही फिरविली (१९३). परंतु सेव्हरस यानें त्याचा पराभव केला. याच्या कारकीर्दींत खिस्ती लोकांचा फार छळ झाला. ईजिप्तमध्यें खिस्ती धर्म केव्हां आला,हें नक्की सांगतां येत नाहीं. प्रथम या संप्रदायाचे अनुयायी अलेक्झांड्रिया येथील यहुदी लोकांत होते. नंतर ग्रीक लोकांनीं हा संप्रदाय घेतला व त्यानंतर सर्व देशभर हा धर्म पसरला. व अलेक्झांड्रियन व ईजिप्शियन असे दोन पंथ उदयास आले. दोन्हीचा एकमेकांवर बराच परिणाम झाला.

कॅराकालानें सर्व ईजिप्शियन लोकांना रोमचें नागरिकत्व दिलें. परंतु त्यानें जबरदस्त कर वसूल केला. इ. स. २५० मध्यें डेसियसच्या अंमलांत खिस्ती लोकांना बराच त्रास झाला. गॅलीएनसच्या अंमलांत प्रिफेक्ट ईमिलीआनस यानें अलेक्झांडर अथवा अलेक्झांड्रिनस नांव धारण करून साम्राज्य पद धारण केलें. परंतु त्याचा गॅलिएनसनें पराभव केला.

त्यानें ब्लेमीस जातीचा हल्ला परतवून लाविला. पाल्मीराची राणी झेनोबिया ईनें दुसऱ्या स्वारींत ईजिप्त ताब्यांत आणलें. ऑरेलियननें ईजिप्त पुन्हां जिंकून घेतलें (२७२) व पाल्मीरा जिंकून आपल्या राज्यास जोडला. ईजिप्तचा गव्हर्नर प्रोबस याला टॅसिटसच्या नंतर बादशहा निवडण्यांत आलें. यानें ब्लेमीस लोकांना हांकून दिलें. इ. स. २९६ त झालेलें बंड डायोक्लेशियननें मोडलें. व सर्वत्र नवीन व्यवस्था चालू केली. इ. स. ३०३ चा ख्रिस्त्याविरुद्ध हुकूम ईजिप्तमध्यें अमलांत आणिला. याच्या व गॅलेरियसच्या अमलांत ख्रिस्ती लोकांचा बराच छळ करण्यांत आला. स्पेनचा दुसरा फिलीप यानें ३११त सहिष्णुता दाखविण्याचा दुसरा हुकूम सोडला.

कॉन्स्टन्टाईननें ३१३ त मिलन येथील राजाज्ञेनें ख्रिस्ती संप्रदाय मान्य केला व पुढें सर्व सत्ता हातांत आल्यावर त्यानें आपल्या प्रजेस ख्रिस्ती संप्रदायाचा अंगीकार करण्याचा आग्रह केला (३२४). या वेळेला ईजिप्तमधील ख्रिस्ती लोकांत दोन तट पडले ते म्हणजे ऑर्थाडॉक्स व एरिआनिझम हे होत. ३८९त ख्रिस्ती लोकांनीं अलेक्झांड्रिया येथील सेरॅपिसचें मंदिर उध्वस्त केलें. व त्याचें चर्च बनविलें. अलेक्झांड्रीयाचा पॅट्रिआर्च सायरिल यानें तेथून यहुद्यांना हांकून दिलें (४१५). पुढें आपसांत तट पडून यादवी माजली व ईजिप्त साम्राज्यापासून वेगळा बनला. धर्ममत व राजकीय मत यांत कांहींच फरक दिसत नसे. राजसत्ता दिवसेंदिवस कमी झाली.

पांचव्या शतकाच्या मध्यांत ब्लेमीस व नोबेटी या जातींनीं ईजिप्तवर हल्ले केले. पुढें अशी स्थिति असतांना खुस्रुनें (६१६) ईजिप्त सर केला. इराणी अंमल १० वर्षे होता. हेरॅक्लियसनें पुन्हां ईजिप्त जिंकून रोमन साम्राज्यास जोडलें. पुढें अरबांनीं देश जिंकिला. या वेळेपासून खरें इजिप्शियन राष्ट्र नाहींसें झालें. ईजिप्तवर रोमन लोकांची लष्करी सत्ता होती. शिवाय रोमन लोकांनीं ग्रीकांचा पक्ष घेतला. धार्मिक भांडणांत देशी लोकांचा राज्यकर्त्यांवरील विश्वास उडाला व लष्करी अंमलानें देशावर सत्ता राहिली. राजधानीच्या पलीकडे राज्यकर्त्यांचा अंमल नसे. लोकांत क्षात्रतेज राहिलें नव्हतें. यामुळें मुसुलमानांची सत्ता लवकर स्थापन झाली.

मुसुलमानी सत्तेचा कालः–इ.स. ६३९ च्या अखेरीस दुसरा खलीफ उमर (पहिला) यानें अमरच्या हाताखालीं चार हजार सैन्य पाठविलें. अमरनें पेल्युशियम घेऊन व नाईल ओलांडून, फेयूममध्यें प्रवेश केला.६४०मध्यें दुसरें बारा हजार सैन्य अमरच्या मदतीस आलें. अमरनें रोमन सैन्याचा हेलिओपोलीस येथें पराभव केला. यानंतर बाबिलोनला वेढा दिला व तें शहर ६४१ मध्यें सर झालें. अलेक्झांड्रिया शहर ८ नोव्हेंबर ६४१ च्या तहानें खालीं करून देण्याचें ठरविलें. मध्यंतरीं अमरनें कायरोच्या जवळ फोस्टाट शहर वसविलें व किनाऱ्यावरील शहरें ताब्यांत आणलीं.

अलेक्झांड्रियाचा पॅट्रिआर्क व ईजिप्तचा गव्हर्नर सायरस याच्या विश्वासघातामुळें ईजिप्तवर अरब लोकांचा अंमल लवकर बसला असावा. रोमन सेनापति देखील कुचकामाचे होते. कित्येक म्हणतात कीं, सायरसनें गुप्तपणानें इस्लामी धर्माचा स्वीकार केला होता. अरबांनीं कॉप्ट व रोमन लोकांनां सारख्याच निर्दयपणानें वागविलें. ६४५ त मॅन्युएलनें अलेक्झांड्रिया सर करून बायझन्टाईन साम्राज्यास जोडलें परंतु लवकरच अमरनें बायझन्टाईन सैन्यास हांकून दिलें. ईजिप्त घेण्याचे या पुढील प्रयत्न निष्फळ झाले.

ईजिप्त तरवारीच्या जोरावर घेतलें, अथवा स्वाधीन झालें याविषयीं अरब लोकांचा बराच वाद आहे. अलेक्झांड्रियावरून ईजिप्त स्वाधीन झालें असावें असें वाटतें. जिझीया कर व सैन्याला रसद देण्याच्या अटींवर ख्रिस्ती लोकांनां लष्करी नौकरी माफ व धार्मिक व खासगी बाबतींत स्वातंत्र्य असे.

६३९ पासून९६८ पर्यंत ईजिप्त हा पूर्वेकडील खलीफाच्या ताब्यांतील प्रांत होता. ८६८ पासून ९०५ पर्यंत अब्बासी खलीफांच्या अंमलांत येथील तुलुनिद सुभेदारांनीं यानें स्वतंत्र घराणें स्थापन केलें. ९३५ पासून ९६९ पर्यंत इक्षीदी घराण्याचा स्वतंत्र अंमल होता. ९६९ त जौहार यानें ईजिप्त जिंकला व त्यावर फातिमिद खलीफ मोईझ याचा अंमल सुरू झाला. त्यानें माहदियाहून राजधानी बदलून कायरो येथें आणली. हें घराणें ११७१ पर्यंत असून पुढें सलादिननें ईजिप्तवर अब्बासी घराण्याचा अंमल बसविला. परंतु खुद्द सलादीननें अयुबाईट अथवा अयुबीद हें अर्धवट स्वतंत्र घराणें स्थापन केलें. अयुबाईटघराण्यानंतर मामेलुकांचा अंमल बसला. यांत बाह्री (१२५२–१३८२) व बुर्जी (१३८२–१५१७) हीं दोन घराणीं होतीं. हे राजे नांवास मात्र अब्बासि खलिफांची सत्ता मान्य करीत व खलीफ हे मामेलुक सुलतानांच्या हातांतील बाहुली असून कायरो येथें रहात असत. १५१७ त ईजिप्त तुर्क साम्राज्यांत सामील झाला व त्यावर कान्स्टँटिनोपलहून पाशांची नेमणूक होत असे. १७०७ पासून पुन्हां मामेलुकांची नेमणूक होऊं लागली व त्यांना शेख अल बलद हा किताब होता. फ्रेंच सत्ता नाहींशी झाल्यावर पाशांचा अंमल पुन्हां बसला. मेहमेट अलीनें (हा१८०५ त पाशा नेमला) १८४१ त तुर्की सरकारपासून आपल्या घराण्यांत ईजिप्तची सत्ता असावी हें कबूल करून घेतलें. त्याच्या वंशांतील इस्मायल पाशाला खेदीव हा किताब मिळाला व तो अद्याप चालू आहे.

पूर्वेकडील खलीफाच्या तर्फेनें आलेल्या गव्हर्नराची कारकीर्द.—ईजिप्त जिंकणारा अमर याला प्रथम गव्हर्नर नेमिलें. याचा अमल खालच्या ईजिप्त वर होता. वरच्या ईजिप्तवर अबदल्ला बिन सादची नेमणूक केली. तिसऱ्या खलीफानें अमरला परत बोलाविलें व खालच्या ईजिप्तवर अबदल्लाला नेमिलें. ऑथमन उस्मान

गादीवर बसल्यानंतर इतर साम्राज्याबरोबर ईजिप्तमध्यें घोंटाळे झाले. अखेरीस अमरनें अलीच्या अनुयायांपासून ईजिप्त जिंकला व त्यावर मोआवियाचा अंमला चालू केला. उमईद खलीफ यझीद मेल्यानंतर बरेच घोंटाळे झाले व ईजिप्तच्या मुसुलमानांनीं अबदल्ला बिन झोबेरचा पक्ष घेतला. परंतु या पक्षाचा मेरवान बिनहकम ( पहिला मेरवान ) यानें पराभव केला व आपला मुलगा अबदल अझीझ याला गव्हर्नर नेमिलें. ७४५ त ईजिप्त देश दुसरा मेरवान याच्या विरुद्ध होता. याचा सेनापति अल—हौथरा यानें मोठ्या सैन्यानिशीं फोस्टाटमध्यें प्रवेश केला. ७५० मध्यें अबासीच्या मुळें दुसरा मेरवान पळून ईजिप्त मध्यें आला. परंतु त्याचा पराभव होऊन होऊन तो मारला गेला. अबासीद सेनापति सालिह–बिन–अली याला गव्हर्नर नेमिलें.

मुसुलमानांचा ईजिप्तमध्यें पाय शिरकल्यापासून तो उमइद घराण्याचा नाश होईपर्यंत येथें लष्करी सत्ता जाऊन त्या ऐवजीं वसाहतींचें स्वरूप आलें. फारच थोड्या कॉप्ट लोकांनीं इस्लामी धर्म स्वीकारला. पहिल्या शतकापर्यंत जुनी कर घेण्याची पद्धत चालू ठेविली. देशांचे जिल्हे पूर्वीप्रमाणें कायम ठेविले. प्रत्येक जिल्ह्यांतून वेगळी वसूली करण्यांत आली. प्रथम जिझीया व खराज ( जमीनीचा सारा ) यांत फरक नव्हता. मुसुलमान लोकांनां जमिनी घेण्याची परवानगी मिळाल्यानंतर परकीयांवर जिझीया कर बसविण्यांत आला. पुढें कॉप्टीक जमीनदारांनीं इस्लामी धर्माचा स्वीकार केला फडणीस ओबैदल्लाबिन हबाब ( ७२०–७३४ )च्या वेळीं सरकारी रीत्या जमिनीची मोजणी करण्यांत आली व खानेसुमारी झाली. यापूर्वी कॉप्ट लोकांपासून वरिष्ठ जागा काढून त्यांवर अरबांची नेमणूक करित. यामुळें असंतोष माजून ७२५ त कॉप्टांनीं बंड केलें. तें मोडण्यास बरेच आयास पडले. दोन वर्षांनीं उत्तरकडील अरबांनीं बिलबीस येथें वसाहत स्थापिली अरबी भाषेचा प्रचार वाढत जाऊन ७०६ त सरकारी कामांत तिचा उपयोग करूं लागले. ७८० पर्यंत ग्रीक भाषेचा मधून मधून उपयोग करीत. ७३९ व ७५० मध्यें काप्ट लोकांचीं बंडें झालीं. याला विशेषेकरून कराची वाढ हेंच कारण होतें.

आबासी कारकीर्दींत फोस्टाटच्या उत्तरेस नवी राजधानी करण्यांत येऊन तिला अस्कर अथवा ' छावणी ' म्हणत. कर जास्त वाढल्यामुळें लोकांवर जुलुम होऊं लागला. गव्हर्नर सारखे बदलत. गव्हर्नराखेरीज फडणीस, शरीर संरक्षक सैन्याचा अधिपति व न्यायाधिश यांच्या नेमणुका झाल्या. इस्लामी तिसऱ्या शतकांत मेमुननें इजिप्त जहागिर म्हणून आबदल्ला–बिन-ताहीर याला दिला. या वेळेपासून जहागिरीची पद्धत सुरू झाली. अबदल्लानें बगदाद येथें राहण्याचें ठरविलें व ईजिप्तचा कारभार पाहण्यासाठीं आपला प्रतिनिधि पाठविला. हीच पद्धत पुढें चालू झाली. ८२८ त मेमुनचा भाऊ मोतासिम हा जहागिदार होता. या वेळीं कराच्या ओझ्यानें बंड झालें. परंतु तें अर्धवट मोडलें. ८३१ मध्यें अरब व कॉप्ट लोकांनीं बंड केलें. खलीफ मेमून याचा सेनापति अफशिन यानें बंडखोरांचा पराभव केला. कॉप्ट लोक शरण आले. सर्व पुरुषांची कत्तल केली. स्त्रिया व मुलें यांना गुलाम म्हणून विकण्यांत आलें.

या वेळेपासून काप्टराष्ट्र कायमचें चिरडलें गेलें. खलीफ मोतासिमनें स्वतःभोंवतीं परकीय शिपाई जमविले व अरबी शिपायांचा मुशाहिरा बंद केला. यामुळें बंड झालें. पण तें मोडून अरबी सत्ता नष्ट केली. परकीय भाडोत्री शिपायांची सत्ता मात्र सुरू झाली पुढें अशनास नांवाच्या तुर्की सेनापतीला ईजिप्त जहागिर म्हणून दिला. यावेळेपासून फातिमिद घराण्याच्या अंमलापर्यंत तुर्की लोकांचें प्राबल्य वाढलें. ८४४ त अशनास वारल्यावर ईताख नांवाच्या तुर्की सेनापतीला ईजिप्त मिळाला. याच्या नंतर खलीफ मोतावक्कील याचा मुलगा मोतासिर आणि ८५६ त फथेबिन खाकान याना जहागिर म्हणून ईजिप्त मिळाला. फथेनें तुर्की गव्हर्नराची नेमणूक केली. मोठ्या जाग्यावर तुर्की लोक नेमले. अबासीपासून अर्धवट स्वतंत्र घराण्याचा अंमल बसेतोंपर्यंत कांहीं धर्मवेड्या खलिफांच्या अंमलांत इतर मुसुलमानी पंथांच्या लोकांचे बरेच छळ झाले. या खलीफांनीं अलीचें घराणें अथवा अनुयायी यांच्या विरुद्ध बरीच दडपशाही दाखविली.

तुलुनिद घराणेः––इ. स. ८६८ त ईजिप्त बयोकबेग नांवाच्या तुर्की सेनापतीस जहागिर म्हणून मिळालें. यानें आपला सावत्र मुलगा अहमद बिन तुलुन याला प्रतिनिधी नेमलें. तुलुननें खलिफाच्या खजिन्याचें चोरापासून संरक्षण करून नांव मिळविलें होतें. नंतर तो खलीफ मोस्ताइनबरोबर हद्दपारीवर गेला होता. ईजिप्तमध्यें त्याला फडणीस इबन-अल-मोदाबिर हा प्रतिस्पर्धी होता. हा स्वतंत्र असून याच्या जवळ गुलामांचें सैन्य असें. तुलुननें मोदाबिरचे सैन्य कमी करून आपलें सैन्य वाढविलें अलीच्या पक्षाच्या लोकांनीं बंड केलें. तेव्हां तुलुन याला आपलें शौर्य दाखविण्यास चांगलीच संधि मिळाली. ७८० मध्यें याचा सावत्र बाप वारला व ईजिप्त त्याच्या सासऱ्याला मिळालें. यामुळें याची जागा कायम राहिली. सिरीयांत कांहीं गडबड झाल्यामुळें खलिफानें अहमदास सैन्य घेऊन बोलविलें. पुढें परत आल्यावर अहमदानें सैन्य कायम ठेविलें. कायरोच्या आग्नेयीस कताई नांवाचें नवीन शहर स्थापिलें. सासरा मेल्यावर खलिफाचा भाऊ मोवा याला ईजिप्त मिळालें. अहमदानें लाचलुचपत देऊन आपली नेमणूक कायम करून घेतली. ८७५ त यानें बगदादला खंडणी पाठविण्याचें नाकारलें. सैन्य व इमारती यांच्याकडे त्यानें पैसा खर्च करण्यास सुरवात केली. ८७७–७८ त अहमदानें सिरीयांत स्वारी करून मुख्य शहरें ताब्यांत घेतलीं. त्याच्या पश्चात त्याचा मुलगा

अवास यानें बंड केलें.परंतु अहमदच्या सैन्यानें त्याचा पराभव करून त्याला कैद केलें. ८८२ त अहमद व मोवाफाक यांच्यांत बरीच तेढ येऊन मोवाफाक यानें अहमदास कामावरून दूर केल्याचें जाहीर केलें. अहमदानें उलटपक्षी मोवाफाकचा अधिकार नाकबूल केला. ८८३ त सिरियांतील बंड मोडण्यास जात असतां अहमद आजारी पडला व ८८४ त कटाई येथें मरण पावला यानें प्रथम ईजिप्तचा अधिकार सिरियावर बसविला. याच्या वेळेपासून ईजिप्त पूर्वेकडील खलिफाच्या अधिकारापासून स्वतंत्र बनत चाललें. याचा मुलगा खोमारूय हा २० वर्षांचा असतानांच गादीवर बसला. खलिफानें सिरिया घेण्यांचा प्रयत्न केला पण याच्या सेनापतीनें त्याच्या सैन्याचा पराभव केला. ८८६ त मोवाफाकनें खोमारूयला ईजिप्त, सिरिया व सरहद्दीवरील शहरें यांवर ३० वर्षेपर्यंत अधिकार दिला. खोमारूयनें युफ्रेटीस व टैग्रिस पर्यंत आपला अंमल वाढविला. ८९१ मध्यें मोवाफाक मेल्यावर यानें खलिफाशीं संधान बांधून आणखी ३० वर्षांची सनद मिळविली व आपल्या मुलीचें खलिफाशीं फार थाटानें लग्न केलें. यामुळें त्याला पश्चिमेस बार्कापासून पूर्वेस हीटपर्यंतच्या प्रांतावर अधिकार मिळाला.३लक्ष दिनार खंडणी याला द्यावी लागे. ८९६ त राजवाड्यांतील कांहीं कटामुळें हा दमास्कस येथें मरण पावला.

याचा मुलगा अबुल असाफिर जैरा याचा सहा महिन्यांत खून झाला. त्याचा भाऊ हरून हा गादीवर बसला. याच्या राज्यांत बरींच बंडें झालीं. सिरियांत कार्मेथियन लोकांनीं उचल खाल्ली. खलिफानें त्यांची खोड मोडून महंमद बिन सुलेमान याला ईजिप्त जिंकण्यांस पाठविलें. हरून याचा खून होऊन त्याचा चुलता शैबान गादीवर बसला. महंमदानें ९०५ च्या सुरवातीला ईजिप्त घेऊन ईसा-अल-नौशरी याची सुभेदार म्हणून नेमणूक केली. तुलुनिद पक्षाच्या लोकांनीं ईजिप्त घेण्याचे प्रयत्न केले पण तें निष्फळ झाले. यामुळें कटाई येथील टुलुनिदांचा राजवाडा जमीनदोस्त करण्यांत आला. इ. स. ९१४ त फातिमिद खलिफ अल-महादी-ओबैदल्ला यानें ईजिप्त जिंकण्यास सैन्य पाठविलें. अवासि खलिफानेंहि याविरुद्ध बरीच मदत केल्यानें त्याची डाळ शिजली नाहीं. ९२१ पर्यंत फातिमिद सैन्याचा ईजिप्तला शह होता. यावर्षी बगदादहून बरेंच सैन्य आल्यानें त्यांनां हांकून दिलें. यानंतर बरीच अंदाधुंदी माजली व सुभेदारीबद्दल बराच लढा पडला. दमास्कस येथील तुलुनिद प्रिफेक्टचा मुलगा महंमद बिन तुघज यानें सर्वांचा पराभव करून आपली सत्ता स्थापिली.

ईक्षिदी घराणें:—महंमद बिन तुघज हाच या घराण्याचा संस्थापक होय. ईक्षिद ही पदवी त्याला खलिफानें दिली. यानें यापूर्वी ईजिप्तमध्यें नौकरी केली होती. महंमदनें फडनिसाचें काम स्वतः पाहण्यास सुरवात केली. काटकसर व दंड यामुळें त्यानें खजिना भरण्यास सुरवात केली. कांहीं लोकाचा फातिमिदांशीं पत्रव्यवहार चालू असल्यामुळें यानें बरेंच सैन्य जमविलें पण इकडे इब्नराइकनें सीरियांत गडबड केली. महंमदानें त्याला खंडणी देण्याचें कबूल केलें. पुढें राइक याचें बगदाद येथें बरेंच प्रस्थ माजलें. त्यामुळें ईक्षिदनें फातिमिद लोकांशीं संधान बांधून प्रार्थनेंत सुद्धां त्याचें नांव घेण्याचा हुकूम केला. ९४१त राइक मेला व ईक्षिद यांनीं सीरिया जिंकला.खलिफानें त्याला मक्का व मदिना सुद्धां त्या प्रांतांवर अधिकार चालविण्यास परवानगी दिली. ९४४ मध्यें तुझुननें खलिफाला बगदादमधून हांकून दिलें व खलीफत हमदानिदांच्या ताब्यांत गेली. ईक्षिद हा त्याच्या मदतीला गेला. याच वेळेला त्याला ईजिप्तची सुभेदारी वंशपरंपरागत मिळाली. हमदानिद-सैफ-अदाउल्ला याच्याशीं ईक्षिदचें वांकडें आलें. सैफ-अदाउल्लानें ईक्षिदचा सेनापति काफूर याचा पराभव केला; पण ईक्षिदनें त्याचा उलट पुनः पराभव केला. तहांत सैफ—अदाउल्लानें सर्व सीरिया ठेवावा व ईक्षिदनें आपला प्रिफेक्ट दमास्कस येथें ठेवावा असें ठरलें. बुयिद बादशहानें ईक्षिदला सुभेदार कायम केलें. ईक्षिद दमास्कस येथें ९४६ त मरण पावला. याचा मुलगा उन्जुर गादीवर बसला व सर्व कारभार नीग्रो काफूर हा पाहूं लागला. काफूरनें सैफ अदाउल्लाचा पराभव केला. उन्जुरच्या मृत्यूनंतर ( ९६१ ) त्याचा भाऊ अबुल हसनअली हा सुभेदार झाला व काफूर पहिल्याप्रमाणें कारभार पहात असे. हा ९६५ त मेला. काफूरनें त्याचा मुलगा अहमद याला गादीवर बसविण्याचें ढोंग करून स्वतःच्या हातीं सूत्रें घेतलीं. तीन वर्षांनीं काफूर मेला व अहमद अथवा अबूल फवारिस गादीवर बसला. याचा वजीर इब्न फुरात होता. या वेळेला कार्मेथियनांनीं सीरियांत स्वारी केली. गव्हर्नर ईजिप्तमध्यें पळून आला व त्यानें नालायक म्हणून इब्नफुरातला कैद केलें. इब्न फुरातची कारकीर्द ईजिप्तला चांगली झाली नाहीं. या वेळेला फातिमिदांनीं ईजिप्तवर स्वारी करण्याची चांगली तयारी केली. त्यांचा सेनापति जौहार हा एक लक्ष सैन्यानिशीं ९६९ त चाल करून आला. या वेळेला इब्न फुरातच्या हातीं पुनः सूत्रें आलीं. त्यानें जौहारच्या ताब्यांत देश करण्याचें ठरविलें; परंतु सैनिकांनां तें न आवडून त्यांनीं युद्धाची तयारी केली. जौहारनें ईजिप्शियन सैन्याचा पराभव करून मोईझच्या नांवाची द्वाही फिरविली. सीरियाच्या ईक्षिदी गव्हर्नराचा पराभव होऊन तें घराणें नामशेष झालें. अशा रीतीनें ईजिप्त पश्चिमेकडील खलिफांच्या ताब्यांत आला.

फातिमिदांची कारकीर्द:—जौहारनें फोस्टाट घेतल्यावर अल-काहिरा अथवा कायरो शहर बांधण्यास सुरवात केली. त्याचप्रमाणें खलिफासाठीं राजवाडा व एल-अझर नांवानें प्रसिद्ध असलेली मशीद त्यानें बांधली. लवकरच त्याला कार्मेथियनांशीं युद्ध करावें लागलें.कार्मेथियनांचा सेनापति अलहसननें खुद्द कायरोला वेढा दिला; परंतु लांच

देऊन त्याच्या सैन्यांत फूट पाडण्यांत आली व जौहारनें त्याला ईजिप्तबाहेर हांकून दिलें व कांहीं सीरियाचा भाग देखील ताब्यांत आला. मध्यंतरीं मोईझ हा ९७३ त अलेक्झांड्रिया येथें आला व आपल्या शियापंथाचा प्रसार करण्याचें त्यानें ठरविलें. कार्मेथियन शियापंथाचेच असल्यानें त्यांनां आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न त्यानें केला; पण तो सिद्धीस न जातां उलट त्यांनीं राजधानीला वेढा दिला. हा वेढा उठवून त्यांनां ईजिप्त व सीरिया यांमधून हांकून दिलें. मोईझनें बायझन्टाईन सैन्याबरोबर कांहीं युद्धें केलीं. तो मरण्यापूर्वी त्याची सत्ता मक्का, मदिना, सीरिया, ईजिप्त व उत्तर आफ्रिका यांवर चांगली बसली.

यानंतर अझिझबिल्ला हा गादीवर बसला. जेकबबिन किलीस हा त्याचा वजिर होता व त्याच्या सांगण्यावरून इतराजी झालेल्या जौहारला पुनः नौकरीवर घेतलें. तुर्की सेनापति अफ्ताकिन यानें कार्मेथियनांच्या मदतीनें सीरियांत बरीच धामधूम केली. यावर जौहरला पाठविलें. अखेरीस अझीझनें स्वतः सैन्याचें आधिपत्य घेऊन ९७७ त अफ्ताकिन व कार्मेथियन यांचा पराभव केला व अफ्ताकिनला कैद केलें. वजीरानें फातिमिदांचीं मतें एकत्र करून तीं एल–अझर या मशिदींत विद्यार्थ्यांनां शिकविण्याचें अमलांत आणलें. या व मागील राज्यांत इतर इस्लामी पंथाच्या व इतर धर्मांच्या लोकांस चांगल्या रीतीनें वागविलें. अलीपक्षास मानणारा बगदादचा बुयिद बादशहा अदोद–अदाउल्ला यानें फातिमिद हे अलीचे वंशज म्हणून कबूल केलें नाहीं. याच्या नंतर याचा मुलगा अबुअली अलमन्सूर हा अलहकीम बियामर–अल्ला ही पदवी धारण करून अकरा वर्षांचा असतांनाच गादीवर बसला. स्लाव्ह बुरजुवान हा कारभार पहात असे. याचा हकीमच्या चिथावणीनें खून पडला. हकीमला प्रजेवर विलक्षण कायदे करण्याबद्दल फार आनंद होत असे. यानें यरुशलेम (१०१०) येथील 'होली सेपल्करचें' चर्च पाडून टाकलें. सर्व ख्रिस्ती व यहुदी लोकांनां एकदम मुसुलमान बनविण्याचाहि याचा विचार असावा. यानें बगदादच्या पद्धतीवर कायरो येथील राजवाड्यांत मोठें ग्रंथसंग्रहालय स्थापन केलें व त्यांत विद्यार्थ्यांची सोय केली. १०२० मध्यें स्वतः देव म्हणून यानें जाहीर केलें. दराझी नांवाच्या गृहस्थानें ह्या मताचा सर्वत्र प्रचार करण्याचा प्रयत्न केला. याला मुसुलमानांनीं चांगलाच अडथळा केला. १०२१ सालीं हा एकाएकीं नाहींसा झाला होता. यानें राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालविला व बंडें मोडलीं. याचा मुलगा अबुल हसन अली हा अलझाहीर लि–इ–आझ–दिन–अल्ला ही पदवी धारण करून गादीवर बसला. हा १६ वर्षांचा असल्यानें याची आत सित्तअलमुल्क ही कारभार पहात असे. पुढें चार वर्षांनीं ही वारली. यामुळें हा खलीफ पुष्कळ मंत्र्यांच्या ताब्यांत गेला. सीरिया ताब्यांतून गेला व ईजिप्तवर अलिहबिन मिदानें स्वारी केली. यानें अलेप्पो येथें स्वतंत्र घराणें स्थापिलें. अनुष्टाकिननें १०२९ मध्यें पॅलेस्टाईन व सीरिया जिंकून पुन्हां ईजिप्तला जोडला. हा खलीफ आपल्या बापासारखा कांहीं बाबतींत विचित्र असे. याच्या नंतर याचा सात वर्षांचा मुलगा अबु तामीन मा–आद हा अलमोस्तान्सीर पदवी धारण करून बसला. सर्व सत्ता याची निग्रो आई इच्या हातांत असे. याच्या वेळेस मॅग्रिबच्या मांडलीक झैरीद घराण्यांतील चवथा पुरुष मोईझबीन बदीस यानें सुनी पंथ स्वीकारून बगदादच्या खलीफाची सत्ता मान्य केली. येमेन प्रांतानें याच्या उलट फातिमिदांची सत्ता मान्य केली. बासिरसी नांवाच्या तुर्कानें बगदाद घेऊन तेथें फातिमिदांची द्वाही फिरविली (१०५८), परंतु त्याला वेळेवर मदत न मिळाल्यामुळें सेल्जुक तोघ्रलबे यानें बगदाद परत घेतलें. व अबासि खलीफांचा अंमल चालू केला. या नंतर एक वर्षानें मोस्टान्सिरच्या सैन्यांत दुफळी माजून तुर्क व नीग्रो यांत युद्ध सुरू झालें. तुर्की सेनापति नासीर अदाउल्ला–बिन–हमदान यानें बऱ्याच लढाया मारून कायरो घेतलें व खलिफाचा राजवाडा लुटला. हकीमनें केलेल्या ग्रंथालयाला आग लागून बरीच नासाडी झाली. खलीफ व त्याचें कुटुंब यांची बरीच दुर्दशा झाली. इतक्यांत नासीरचा खून पडला. व मोस्तान्सिरनें बद्रअल जमाली नांवाच्या आर्मेनियनास मदतीस बोलाविलें. त्यानें १०७४ त कायरो घेऊन बहुतेक ईजिप्त जिंकून खलीफाची सत्ता बसविली. त्यानें कायरोचा तट चांगलाच मजबूत बांधला. याच सुमारास असॅसिनांचा उदय झाला व त्यांनीं मोस्तान्सिरचा वडील मुलगा निझार याचा पक्ष घेतला. सर्वांत लहान अहमद याच्या पक्षास बद्र घराणें होतें. बद्र १०९४ त मरण पावला. व त्याचा मुलगा अलअफदल शहिन शहा हा पुढें आला. मोस्तान्सिर त्याच वर्षी मेला व त्याचा मुलगा अहमद हा अलमोस्ताली बिल्लाह पदवी धारण करून गादीवर बसला.

मोस्ताली गादीवर बसल्यावर निझारनें अलमोस्तफा लिदिन अल्ला ही पदवी घेतली व बरीच गडबड केली, परंतु त्याला यश मिळालें नाहीं. या खलीफाच्या राज्यारंभीं धर्मयोध्यांची स्वारी झाली. अलअफदालनें फ्रँक लोकांनां यरुशलेम व बाजूचा प्रांत घेण्याला मदत केली व ही चूक दुरुस्त करण्याकरितां त्यानें पॅलेस्टाइनवर स्वारी करण्याचा प्रयत्न केला पण तो फुकट गेला. ७ वर्षें राज्य केल्यावर मोस्ताली मरण पावला व त्याच्या अफदाल या पांच वर्षांच्या मुलास अलअमीर बिहाकमअल्ला ही पदवी देऊन गादीवर बसविलें. अफदालनें सीरिया व पॅलेस्टाईन जिंकण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु उलट पहिल्या बाल्डविननें ईजिप्तवर स्वारी केली. तो टिनिसपर्यंत आला होता. इ. स. ११२१ त अफदालचा खून पडला व याास खलिफाची संमति होती असें दिसतें. महमद बिन फतिक अल–बताहि याला वजीर नेमिलें. यानें अल—मयून ही पदवी

धारण केली. फ्रँक लोकांनीं टायर घेतलें व व्हेनेशियनांनीं ईजिप्तच्या आरमाराचा पराभव केला. खलिफ अमीरनें वजीर व त्याच्या अनुयायांस कैदेंत टाकून नंतर सुळावर चढविलें. खलिफानें खुद्द राज्याचा कारभार पाहाण्यास सुरुवात केली. याच्या कारकीर्दींत बराच जुलूम झाला व ११२९ मध्यें याचा खून पडला. याच्यानंतर याचा चुलत भाऊ अबुलमैमून अबदल मजीद हा अलहफिज लिदीनअल्ला ही पदवी धारण करून गादीवर बसला. वर्षभर वजिरानें याला कैदेंत ठेविलें परंतु त्याचा खून झाल्यावर हा स्वतंत्र झाला. याच्या सैन्यांत अंदाधुंदी माजून आपसांत युद्धें चालू होतीं. याचा मुलगा हसन याचा पक्ष बळावून त्याच्या हातीं खलिफा सांपडला. पुढें हसनवर सैन्याची इतराजी झाली व खलिफानें त्याला विष देऊन मारिलें. (११३५) हफिजनंतर त्याचा मुलगा अबुल मन्सुर इस्मायल हा अल-झाफिर-लियादा अल्ला ही पदवी धारण करून गादीवर बसला. ' उसामाबिनमुन्किध व उमाराह या दोघा ग्रंथकारानीं या वेळचा इतिहास लिहिला आहे. या सुमारास इजिप्तमध्यें जिकडे तिकडे यादवी माजली होती. वजीराच्या जागेबद्दल युद्ध होऊन अमिर इब्नसल्लार हा विजयी झाला होता. याचा सावत्र मुलगा आबास यानें याचा खून करून वजिराची जागा पटकाविली. यानंतर सिरियांतील शेवटचें ठाणें अस्कालान हें फातिमिदांच्या ताब्यांतून नाहींसें झालें. चार वर्षांनंतर अबासनें खलिफ व त्याचे बंधू यांचा खून केला व खलिफाचा लहान मुलगा अबुल कासिम इसा याला गादीवर बसविलें. हा पांच वर्षांचाहि नव्हता व यानें अलफैज बिनसरअल्ला ही पदवी धारण केली. राजस्त्रियांनीं उषमुनेनचा प्रिफेक्ट तलाई बिन-रुझीक याची मदत मागितली आबास सिरीयांत पळून गेला व तेथें तो मारला गेला. बाल खलिफ हा ११६० मध्यें मेला. तलाईनें झाफिरचा ९ वर्षांचा नातू गादीवर बसवून त्याला अल-अदिद-लिदीन-अल्ला ही पदवी दिली. राज्याचीं सर्व सूत्रें यानें आपल्या हातांत घेतलीं. यानें सहा महिन्यांनें कर वसूल करण्याची पद्धत ठेविली त्यामुळें लोकांना फार त्रास झाला. तलाई ११६० मध्यें वारला व त्याचा मुलगा रुझिक हा वजीराच्या जागेवर आला. एक वर्षानंतर वरच्या ईजिप्तचा प्रिफेक्टशावर-बिन मुजिर यानें स्वारी करून रुझिकला पळावयास लाविलें. शावरनें ११६२ त कायरोंत प्रवेश केला. नऊ महिन्यानंतर दिरघाम नांवाच्या सैन्यांतील अधिकाऱ्यापुढें शावरला पळावें लागलें. तो सीरीयांत गेला. व तेथून नुरेद्दिन याच्याकडून त्यानें मदत आणली. सिरियन सरदार असद-अलदीन शिरगुह हा कुर्द सैन्यानिशीं ईजिप्त-मध्यें आला. याच वेळेला फ्रँक लोकांनीं ईजिप्तवर स्वारी केली होती. दिरघामचा पराभव होऊन तो मारला गेला. पुढें सिरियन लोक व शावर यांचें जमेना म्हणून त्यानें फ्रँक लोकांच्या मदतीनें शिरगुहला वेढा दिला. परंतु पुढें वेढा उठवून शिरगुहला परत जाऊं यावें लागलें. ११६० त पुन्हां सिरियन लोकांनीं स्वारी केली. शिरगुह व त्याचा पुतण्या सल्लादिन यांनीं शवार व फ्रँक लोकांचा पराभव केला. परंतु तहान्वयें फ्रँक व सिरियन लोकांनीं ईजिप्त सोडावें असें ठरलें. कायरो येथें सिरियन सैन्य राहिलें. यामुळें राजा अमालरिक यानें पुन्हां स्वारी केली. परंतु खलिफानें शिरगुहला मदतीस बोलाविलें. त्यानें शावरला पकडून फांशी दिलें. खलिफानें शिरगुहला वजीर नेमिलें. दोन महिन्यांनीं शिरगुह वारल्यावर त्याचा पुतण्या सल्लादिन याला वजीर नेमिलें. सल्लादिन हा नुरेद्दीनचा प्रातीनिधि म्हणवीत असे. व नुरेद्दिननेंहि त्याला मदत दिली. नुरेद्दिन हा सुनी असल्यामुळें त्यानें फातिमिद यांची सत्ता नाहींशी करण्याबद्दल सल्लाद्दिनला लिहिलें. मध्यंतरीं खलिफ मरण पावला. या शेवटच्या खलीफाचें वय २१ वर्षांचें होतें.

आयुबितांची कारकीर्द.—नुरेद्दिनच्या सांगण्या-वरून सलाद्दिनानें फातिमिद न्यायाधिशांना काढून सुन्या-धर्मशास्त्राचा अभ्यास वाढविला. नुरेद्दीन ११७४त वारल्या-वर त्यानें सुलतान ही पदवी धारण केली. यावेळेपासून आयुबितांची खरी कारकीर्द चालू झाली. दमास्कस हें राज-धानीचें शहर झालें. यानें इजिप्शियन सैन्यास रजा दिली व कायरो शहराची डागडुजी केली. ११८३ मध्यें सलाद्दि-नची सत्ता ईजिप्त व उत्तर सिरियावर चांगल्या रीतीनें प्रस्थापित झाली. याचा बराच काळ सिरियांत गेला. धर्म-युद्धांत याचें नांव प्रामुख्यानें पुढें येतें. मृत्युसमयीं सलाद्दि-ननें आपलें राज्य आपल्या मुलांत वांटून दिलें. त्यांपैकीं ऑथमन हा मालिक अलअझीझ इमाद अलदिन हा किताब घेऊन ईजिप्तवर राज्य करूं लागला. वरील राज्याची विभा-गणी न आवडून तीन वर्षांनीं अलअझीझनें आपला चुलता मलिक अलअदील याच्या मदतीनें आपला दमास्कस येथील भाऊ अल अफदालवर चढाई केली. त्याला सर्खेद येथें हांकून देऊन अझीझनें दमास्कस घेतलें. अझीझ ११९८ त मरण पावला व त्याचा लहान मुलगा गादीवर बसला. मुलाचा चुलता अल–अफदाल याला राजप्रतीनिधि होण्यास बोलाविलें. त्यानें अल–अदीलपासून दमास्कस घेण्याचा प्रयत्न केला. परंतु पराभव होऊन पुन्हां सार्खेद येथें जावें लागलें. अदील लहान राजाचा पालक बनला. परंतु लवकरच त्याला पदच्युत करून त्यानें मालिक अल–आदिल सैफ अलदिन या नांवानें गादी बळकाविली. याचें नांव अबू-बकर असें होतें.

हा गादीवर बसल्यावर याच्या राज्यांत प्रथम दुष्काळ, रोगराई व धरणीकंप यांनीं बराच त्रास झाला. यानें सल्ला-द्दिनच्या वेळचें साम्राज्य आपल्या ताब्यांत आणून येमेन प्रांतहि आपल्या राज्यास जोडला. आपल्या मुलांना वेगवेगळ्या प्रांताचे सुभेदार म्हणून पाठविलें. ईजिप्त वर त्याचा वडील मुलगा महंमद अथवा मालिक अल कामिल

हा सुभेदार होता हा १२१८ त मरण पावला. त्यावेळीं फ्रँक लोक डॅमिएटाला वेढा देत होते. मध्यें अल कामिलला काढून अलफैज याला सुभेदार करण्याचा कांहीं अमीरांनीं घाट घातला, परंतु अलमुअझ्झम इसा यानें भावास मदत केल्यानें फैजाला मोसलला पळून जावें लागलें. १२१९ त फ्रँक लोकांनीं डॅमिएटा घेतलें. अलकामिलनें जिहाद पुकारली. यामुळें ईजिप्त, सिरिया व मेसापोटेमिया येथील सैन्यें त्याला येऊन मिळालीं. कामिलनें फ्रँक लोकांची आघाडीपिछाडी कापली. अखेरीस १२२१ तील तहान्वयें फ्रँक लोकांनीं ईजिप्त सोडला. कांहीं काळपर्यंत अल-आदिलच्या साम्राज्यांत फाटाफूट होती.परंतु अल्कामिलनें एकत्र सर्व करण्याची हांव धरली. यामुळें सहावें धर्मयुद्ध झालें. मुअझ्झम इसा याच्या मुलाविरुद्ध मदत दिल्यामुळें सिरिया व पॅलेस्टाईन मधील कांहीं शहरें दुसऱ्या फ्रेडरिकला द्यावीं लागलीं. कामिल मरण्यापूर्वी मक्का येथें प्रार्थनेंत त्याचा मक्का, येमेन, झबीद, वरचा व खालचा ईजिप्त, मेसापोटेमिया आणि सिरिया यांचा राजा म्हणून उल्लेख करित. हा१२३८मध्यें मेला व त्याचा मुलगा अबूबकर हा अलिफ-अल-आदिल सैफअलदिन या नांवानें गादीवर बसला. याचा वडील भाऊ मलिक-अल सालिह नझ्म अलदिन अयुब यानें दमास्कस घेऊन ईजिप्तवर स्वारी केली. परंतु हामाथचा राजा इस्मायल यानें दमास्कस घेतलें. यामुळें नझ्म अलदिनच्या सैन्यानें त्याला सोडलें. पुढें केराकच्या राजानें त्याला कांहीं दिवस कैदेंत ठेऊन नंतर सोडलें. १२४० त नवीन सुलतानास पदच्युत करून अमिरांनीं नझ्मअलदिन याला गादीवर बसविलें. सुलतान आपल्या भावाच्या कैदेंत १२४८ त मरण पावला. १२४४ मध्यें यरुशलेम फ्रँक लोकांपासून घेतलें. यानें बरेच गुलाम ( मॅमेल्यूक ) विकत घेऊन त्यांच्या साठीं रोडा बेटावर बराकी बांधल्या. यावरूनच त्यांना बहरी अथवा नाईलचे मॅमेल्यूक म्हणतात. नजमअलदिनचा बराच काल सीरियांत अयुबाईत व धर्मयोध्दे यांच्याबरोबर लढण्यांत गेला. होम्सचा वेढा उठवून १२४९ त त्याला ईजिप्तवर स्वारी करणाऱ्या नवव्या लुईचा प्रतिकार करण्यास जावें लागलें. लुईनें डॅमिएटा घेतलें. मध्यंतरीं सुलतान मरण पावला. परंतु अमीर लाजिन व अक्तवई यांनीं राणी शजरअल–दुर इच्या मदतीनें सुलतान मेल्याची बातमी राज्याचा वारस तुराणशहा येईपर्यंत गुप्त ठेविली. फारिस्कुर येथील युद्धांत ( १२५० ) फ्रेंच राजाचा पराभव होऊन तो कैद झाला. या जयांत सुलतानचें कांहींच श्रेय नव्हतें. परंतु त्याची वर्तणूक अमीर व राणी यांना बरीच बाधक झाल्यामुळें राणीनें त्यावर हल्ला करून त्यास ठार मारविलें.

बहरी मॅमेल्यूकांची कारकीर्द—आयुबाइतानंतर ओटोमनांची कारकीर्द सुरू होईपर्यंत तुर्क घराण्यांनीं राज्य केलें. परंतु तीं मामेल्यूक या नांवानें प्रसिद्ध आहेत. या घराण्यांतील पुरुष मूळचे गुलाम असून पुढें स्वतंत्र झालेले होते. चवथा सुलतान कलाऊन (कलाऊन) याच्या घराण्यानें ११० वर्षें राज्य केलें. परंतु कोणीहि बराच काल टिकणारें घराणें स्थापन केलें नाहीं. सुलतान मेल्यानंतर त्याचा अल्पवयी मुलगा राज्यावर बसे, परंतु लवकरच त्याला पदच्युत करून त्याऐवजी एखादा बलिष्ठ अमीर गादी बळकावीत असे.

सुलतान तुराण शहाच्या मृत्युनंतर त्याची सावत्र आई राणी शजरअलदुर गादीवर बसली. परंतु स्त्रीनें राज्य चालविणें मुसुलमानांना आवडलें नाहीं. यामुळें ऐबेक या सरदाराशीं लग्न लावून त्याला तिनें सुलतान पद दिलें. ऐबेकला सिरीयांतील आयुबाईत मलिक अल नासिर याबरोबर युद्ध करावें लागलें. त्यानें मॅमेल्यूकाचें बंड मोडलें. ऐबकेनें दुसऱ्या राणीशीं लग्न करण्याचें ठरविल्यानें शजरअलदुर इनें त्याचा खून करविला परंतु दरबारी लोकांनीं ऐबेकचा तान्हा मुलगा गादीवर बसविला. याला पदच्युत करून कोटूझनें गादी बळकाविली. या सुमारास (१२६०) प्रसिद्ध मांगोलियन हुलकु ( हुलगु ) यानें अलनासिरचें सिरीयांतील राज्य उध्वस्त करून बगदादच्या खलिफास पळवून दिलें आणि इलखान घराणें स्थापन केलें. कोटूझनें सिरीयांत स्वारी करून मोंगलांच्या सेनापतीचा पराभव केला व ईजिप्तची सत्ता स्थापन केली. लवकरच सरदार बिबर्स यानें कोटूझचा खून केला ( १२६० ) व मलिक-अल काहिर ( नंतर अलझाहिर ) ही पदवी धारण करून तख्त बळकाविलें. हा पूर्वी मलिक–अल–सलिहचा गुलाम होता. हा नवव्या लुईबरोबर झालेल्या युद्धांत व तुराणशहाचा खून करण्याच्या कटांत प्रसिद्धीस आला.यानें झाहिरचा मुलगा अबुलकासिम अहमद याला ३५ वा खलिफ करून अबासिद खलिफाची स्थापना केली. यानें बिबर्सला सुलतान पदवी दिली. बगदाद घेण्यास पाठविलेल्या सैन्याचा पराभव होऊन खलिफ मारला गेला. यामुळें बगदादच्या गादीवर खलिफाची स्थापना करण्याचा इरादा सोडून खलिफानें कायरो येथें रहावें असें ठरविलें. या त्याच्या कृतीनें ईजिप्तचें महत्त्व बरेंच वाढलें. यानें बरींच युद्धें करून मरण्यापूर्वी सिरिया, अरबस्तान, युफ्रेटीस नदीवरील बिरापासून केरकोसियापर्यंतचा प्रदेश यावर अंमल बसविला. यानें चार पद्धतीचे कायदे मान्य करून त्यांचे न्यायाधीश नेमले. हा मेल्यावर ( १२७७ ) याचा मुलगा गादीवर बसला. परंतु लवकरच त्याला राज्य सोडावें लागलें व त्याचा सासरा कलाऊन हा गादीवर बसला. यानें सिरीयांतील बंडाळी मोडली. सिरीयनांनीं मोंगलास मदतीस बोलाविलें. कलाऊनानें दोन्ही सैन्यांचा १२८१ त पराभव करून सिरीयावर आपला अंमल बसविला. इराणवर राज्य करणाऱ्या इल्खान घराण्यांतील तिसरा राजा निकूदर अहमद यानें मुसुलमानी धर्म स्वीकारल्यानें मोंगल व ईजिप्त यांमध्यें सख्य राहिलें.

कलाऊन यानें ईजिप्तचा व्यापार वाढविण्याकडे लक्ष दिलें. ईजिप्त व सीरियांतून हिंदुस्थानांत सुरक्षित माल जाण्यास यानें परवाने दिले. त्याचप्रमाणें फ्रँक लोकांपासून राहिलेली शहरें घेण्याचा यानें सपाटा चालविला. एकरवर हल्ला चढविण्याच्या खटपटींत असतां हा मरण पावला. (१२९०) याच्या अंमलांत प्रथम बुर्जाइन मामेल्युकांचें नांव ऐकूं येतें. कायरोच्या बुरुजाच्या रक्षणार्थ ३७०० मामेल्युक होते. यानें सरकारी नौकऱ्या मुसुलमानांखेरीज इतरांस न देण्याचें ठरविलें. याच्या मागून याचा मुलगा खालिल (मलिक-अल-अफ) हा गादीवर बसविला. यानें एकर व इतर शहरें घेऊन धर्मयोध्यांस सीरियांतून हांकून लाविलें. याचा बैदारा यानें खून केला. परंतु बैदागचा देखील खून होऊन कलाऊनचा लहान मुलगा महंमद मलिक अलनासिर याला गादी मिळाली. हा तीन वेळ गादीवर बसला व दोनदां पदच्युत झाला. हा ९ वर्षांचा असतांना प्रथम १२९३ त गादीवर बसला. राज्यकारभार एका मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें चाले. कितबोगा नांवाच्या मोंगल सरदारानें सर्व सत्ता बळकाविली. यामुळें याला राज्य सोडणें भाग पडलें. १२९६ त कितबोगा पदच्युत होऊन सुलतान बिबर्सचा जांवई हुसाम-अलदिन हा गादीवर बसला. यानें आर्मीनियांत स्वारी केली व ईजिप्त आणि सीरियांतील जमीनीची मोजणी करून पुन्हां विभागणी केली. १२९९ मध्यें याचा खून होऊन अलनासिर याला गादीवर बसविलें. सर्व सत्ता सलार व बिबर्स जहांगिर यांच्या हातांत होती. ७ वा इलखान राजा घझन महमूद यानें सीरियावर स्वारी केली व दमास्कस घेतलें. (१२९९)परंतु १३०३ त सर्व ठिकाणांहून आपलें सैन्य परत नेलें. १३०३ मध्यें मोंगलांनीं पुन्हां स्वारी केली. परंतु त्यांचा मर्जअल सफर येथें १३०३ मध्यें पराभव झाला. आपल्या हातीं सत्ता नाहीं असें पाहून अलनासिर यानें केराक येथें जाऊन राज्य सोडल्याचें जाहीर केलें (१३०९). याच्या नंतर बियर्स जहांगीर गादीवर बसला. ईजिप्तच्या गादीवर बसणारा हाच पहिला सिरकॅसियन होय. याला १३१०त गादी सोडावी लागली व अलनासिर पुन्हां गादीवर बसला. यानें प्रथम बिबर्स व सलार यांचा शिरच्छेद केला. १३२२ मध्यें सुल्तान व इल्खान घराण्यांतील नववा राजा अबुसैद यांच्यांत तह झाला. कांहीं काळपर्यंत याचा अंमल उत्तर आफ्रिका, अरबी इराक, व आशियामायनरवर होता. मेदिनावर सुद्धां यानें आपला अंमल चालू केला. इतर सुलतानांपेक्षां यानें बरेच राजकारणी पत्रव्यवहार केले. यांत बल्गेरिया, हिंदुस्थान, अबिसिनिया, अरेगॉन व फ्रान्स येथील राजे व पोप हे होते. मेंढया पाळणें व शेतकी याकडे यानें बरेंच लक्ष दिलें. १३१५ सालीं यानें ईजिप्तची पहाणी केली. यानें जबर कर कमी केले आणि ख्रिस्त्यांविषयीं बरीच सहानुभूति दाखविली. प्रसिद्ध इतिहासकार व भूगोलज्ञ इस्माईल अबुल फेदा हा अलनासिरच्या वेळीं होता. हा १३४१त मरण पावला. याच्या नंतर बाल राजे गादीवर बसवावयाचे व नंतर त्यांनां काढून दुसरे बसवावयाचे न एखाद्या बलिष्ठ सरदारानें सर्व सत्ता हातीं घ्यावयाची, पुढें त्या सरदाराचा पाडाव करून पुन्हां दुसऱ्यानें बलिष्ठ व्हावयाचें ही स्थिति चालू होती. अलनासिरचा हसन नांवाचा मुलगा गादीवर असतांनां (१३४८—४९) ईजिप्तमध्यें 'काळ्या मृत्यू'ची सांथ येऊन९ लाख लोक मेले. १३७७मध्यें शबानचा खून होऊन अली या आठ वर्षांच्या मुलास गादीवर बसविलें. सर्व सत्ता कर्ताई व आयबेक यांच्या हातीं होती. आयबेकनें मामेलुकांच्या कडील सर्व सत्ता आपल्या हातांत घेतली. पुढें सीरियांत बंड झालें. यामुळें आयबेकला उतरती कळा लागून बरेके व बरकुक यांच्या हातीं सर्व सत्ता आली. हळूहळू बरकुक मुख्य बनला. अली मेल्यावर त्याचा लहान भाऊ हाजी याला गादीवर बसविलें (१३८१). परंतु त्याला पदच्युत करून बरकुकनें सुलतानपद घेतलें. अशा रीतीनें बाहरी घराण्याचा ऱ्हास झाला. कांहीं काळपर्यंत हाजीला पुन्हां सुलतानपद मिळून बरकुकला पळून जावें लागलें. बरकुकनें १३९० मध्यें विजय संपादून हाजीला कैद केलें व कायरो येथें आपल्या नांवाची द्वाही फिरविली

बुर्जी मामेलुकांची कारकीर्दः—बरकुकनें ऑटोमन सुलतान पहिला बायेझीद याच्याशीं राजकारस्थान सुरू केलें. यानें तैमूरकडून आलेला वकील ठार मारला व सीरियांत स्वारी केली. हा १३९९ त मरण पावला. याचा तेरा वर्षांचा मुलगा फरज गादीवर बसला. यावेळीं ऑटोमन सुलताननें ईजिप्तच्या मांडलिकावर स्वारी केली. याच सुमारास तैमूरनें प्रथम सीरियावर स्वारी करून पुष्कळशीं शहरें व दमास्कस घेतलें. १४०२ मध्यें तैमूरनें ऑटोमन सुलतानचा पराभव करून ईजिप्तच्या राजाला शरण येण्यास सांगितलें. फरज हा त्याला शरण गेला पण तैमूर १४०५ मध्यें वारल्यामुळें सीरियावर पुन्हां ईजिप्तचा अंमल बसला. फरजच्या अमिरांनीं बंड करून त्याला पदच्युत केलें व त्याच्या भावाला गादीवर बसविलें. दोन महिन्यांनंतर पुन्हां फरजलाच गादीवर बसविलें. नेवरुझ व शेख महमुदी या दोन अमिरांनीं सीरियांत बराच धुडावा चालविला. अखेरीस १४१२ त दमास्कसच्या वेढ्यांत फरज सांपडून त्यानें तख्त सोडलें. मोस्ताइन हा अबासिद खलिफा गादीवर बसविला. परंतु लवकरच त्याला पदच्युत करून शेख महमुदीनें तख्त बळकाविलें. नुवरुझनें सीरिया प्रांत घेतला पण त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. शेखनें आशियामायनर मधील तुर्कोमन राजांनां मांडलिक बनविलें. शेख १४२१ त मरण पावला. यानंतर कोणीतरी बालराजा गादीवर बसवून अमीरांनीं तख्त बळकवावें अशी स्थिति कांहीं काळ होती. १४२२ मध्यें बर्सबई अमीर हा राजा बनला. यानें अलेक्झांड्रियावर हल्ला करणाऱ्या सायप्रियन जहाजांचा सूड घेतला.सायप्रसच्या राजाला कैद करून

खंडणी घेऊन त्याला सोडलें. यानें व्यापारी व यात्रेकरू यांच्या बद्दल पुष्कळसे पैसे उकळले. नाण्यांच्या बाबतींत सुद्धां यानें घोटाळे करून पैसे काढले आशियामायनरमधील समरांगणावर याचा बराच काळ गेला. याच्या अल्पवयी मुलाला पदच्युत करून जकमाकनें (१४४२–४४) तख्त बळकाविलें. यानें ऱ्होड्स घेण्यासाठीं तीन आरमारें पाठविलीं. याच्या मुलाला पदच्युत करून-इनलअलअलाई हा मालिकअल अश्रफ हा किताब घेऊन सिंहासनारूढ झाला (१४५३). याची व कान्स्टान्टिनोपल सर करणारा आटोमन सुलतान दुसरा महंमद याची मैत्री होती. याच्या अंमलांत मामेल्युकांची सत्ता वाढून त्यांच्या तंत्रानें राज्यकारभार चालत असे. नेहमींप्रमाणें याच्या मुलाला पदच्युत करून अमीर खोषकदम यानें तख्त बळकाविलें (१४६१). याच्या कारकीर्दींत १४६३ पासून करमनच्या गादीच्या वारसाबद्दल ईजिप्तचा सुलतान व आटोमन सुलतान यांत लढा पडला.व त्याचें पर्यवसान म्हणजे पुढें ईजिप्तवर तुर्कांचा अंमल बसला. याच्या मृत्यूनंतर मामेल्युकांनीं दोन सुलतान एका मागून एक गादीवर बसविले. पण त्यांच्या नंतर अताबेग कैतबे अथवा कैतबई हा सुलतान झाला (१४६८). यानें आटोमन सुलतान दुसरा बायेझिद याचा भाऊ जेम याला आपल्या दरबारीं ठेविलें म्हणून, व हिंदुस्थानांतून बायेझिदकडे जाणारी वकीलमंडळी अडकविली म्हणून बायेझिदनें ईजिप्तवर स्वारी केली. ईजिप्शियन सैन्यानें आटोमन सैन्याचा बऱ्याच ठिकाणीं पराभव करून तहाचें बोलणें लाविलें व तहान्वयें आटोमन सैन्यानें ईजिप्त मोकळा केला. याच्या मुलाचा खून करून अताबेग कानसूह यानें अधिकारसूत्रें हातीं घेतलीं (१४९८). लवकरच याला पदच्युत करून तुमानबेनें जानबेयाला गादीवर बसविलें. (१५००). परंतु लवकरच तो स्वतः सिंहासनावर बसला (१५०१). याच्या कारकीर्दींत ईजिप्शियन व पोर्तुगीज यांच्या दर्यावर बऱ्याच चकमकी झाल्या. कारण या वेळीं पोर्तुगीज दर्यावर्दी मक्केचे यात्रेकरू यांना त्रास देत आणि हिंदुस्थान व ईजिप्त मधील व्यापारास अडथळा आणीत. कानसूहनें सफाविद इस्मायलच्या वकीलांस सीरियांतून व्हेनिस येथें जाऊं दिलें. या सबबीवर ओटोमन सुलतान पहिला सेलिम यानें १५१५ त युद्ध जाहीर केलें. मेर्जदकीदच्या युद्धांत कानसूहचा पराभव होऊन तो मारला गेला. यामुळें सीरिया आटोमनांच्या ताब्यांत गेला. सुलतान मेला असें पाहून कायरोचा गव्हर्नर तुमानबे हा सुलतान बनला. १५१७ त कायरो ओटोमनांनीं घेतलें व सेलिम हा ईजिप्तचा सुलतान म्हणून द्वाही फिरविली. तुमानबे हा लवकरच सांपडला व त्याला ठार मारण्यांत आलें.

तुर्कांची कारकीर्दः—सुलतान सेलिम यानें राज्यकारभारांत फारशी ढवळाढवळ केली नाहीं. त्यानें आपला प्रतिनिधि राज्यकारभारावर देखरेख पहाण्यासाठीं नेमला. संजाकावर (जिल्ह्यावर) बहुधा मामेलुक अमीर असत. सुलतान सुलेमाननें मोठा दिवाण व लहान दिवाण अशी दोन सभागृहें पाशाला कारभारांत मदत करण्यासाठीं उत्पन्न केलीं. ईजिप्तचे गव्हर्नर वारंवार बदलत असत. १५२७ त सर्व जमिनीची मोजणी व पहाणी झाली.

राज्यकारभारांत वारंवार ढवळाढवळ होत असल्यामुळें सैन्यांत शिस्त राहिली नाहीं. ११ व्या शतकापासून इस्लामी सैन्यांत नेहमीं बंडें होऊं लागलीं. १६०४ मध्यें गव्हर्नर इब्राहिमपाशा याचा सैन्यानें खून केला. बंडाचें मुख्य कारण म्हणजे सैन्यांतील लोकप्रजेपासून 'तुलबा' नांवाचा कर घेत. त्यामुळें बराच जुलूम होई. हा कर बंद करण्याचा प्रयत्न पाशानें केला. १६०९ मध्यें सैन्य व पाशा यांच्यामध्यें युद्ध सुरू झालें. महंमद पाशानें सैन्याचा पराभव केला. पुढें साम्राज्याच्या राजधानींत धुमाकूळ माजल्यामुळें ईजिप्तच्या गव्हर्नराबद्दल ईजिप्शियन लोकांस विशेष आदर वाटत नसे. १६२३ त तुर्क सरकारनें मुस्तफा पाशास काढून आलिपाशास नेमिलें; परंतु इजिप्शियन लोकांनीं आलिपाशास हांकून देऊन मुस्ताफा पाशाची नेमणूक करून घेतली. १६३१मध्यें सैन्यानें मुस्तफा पाशा याला पदच्युत केलें. व याला तुर्क सरकारनें पुढें संमति दिली. सुलतान हा कधींच गव्हर्नरचा पक्ष घेत नसे आणि नवीन गव्हर्नर हा नेहमीं जुन्यापासून खजिन्याचा पैसा म्हणून जबरदस्त दंड घेत असे. या शतकांत दुष्काळ व रोग यांनीं बराच कहर माजविला.

अठराव्या शतकापासून पाशाचा अंमल कमी होऊन त्या ऐवजीं 'बे' चा अंमल वाढला. शेख अलबलद व अमीर अल–हाज या दोन जागा महत्त्वाच्या असून त्या जागेवर असणाऱ्या मनुष्याच्या हातांत सर्व सत्ता असे. १७०७ मध्यें शेख अलबलद कासिम इयवाझ हा कासिमी व फिककारी या दोन्ही विरुद्ध पक्षांचा मुख्य होता. या पक्षांत भांडण लागून कासिम मारला गेला. त्याच्या नंतर त्याचा मुलगा इस्मायल याला वर्त्रें मिळालीं. १७२४त याचा खून होऊन शिरकासबे यानें गादी मिळविली. नंतर याला हांकून देऊन धुल्फिकारनें गादी बळकाविली. १७३० मध्यें याचा खून झाला व आटोमनबे यानें मोठ्या शहाणपणानें १७४३ पर्यंत कारभार चालविला. इब्राहिम व रिद्वान बे यांनीं हाथमला हांकून दिलें. यानंतर पाशानें यांच्याविरुद्ध कट केला व तो फसला. पुढें इब्राहिमचा खून पडला व रिद्वान मारला गेला. याच्यानंतर अली हा मुख्य बनला. यानें मामेल्युकांनां चांगलेंच वठणीवर आणलें. यामुळें याला पळून जावें लागलें. यानें खलीलबेचा पराभव केला (१७५०). व शेख अलबलद झाला. यानें इब्राहिमच्या मारेकऱ्यांनां फांशीं दिल्यामुळें याला पुन्हां पळून जावें लागलें.पण त्यानें एकरचा गव्हर्नर झाहिरबिन उमरयाच्या मदतीनें तुर्क सरकाराकडून शेख अलबलदची जागा पुन्हां मिळविली.यानें आपल्या मित्रांनां 'बे' च्या रांकेस चढविलें व ईजिप्तमध्यें शांतता स्थापन

केली. १७६९ मध्यें तुर्क सरकारनें रशियन युद्धासाठीं अल्लीपासून बारा हजार सैन्याची मागणी केली. आणि या सैन्यामुळें त्यानें स्वतंत्र होऊं नये म्हणून त्याला फांशी देण्याचा गुप्त हुकूम पाशास सोडला. ही बातमी कळून अल्लीनें एकरच्या झाहीरपाशाच्या मदतीनें स्वातंत्र्य पुकारलें. अल्लीनें आपला अंमल सर्व ठिकाणीं बसवून सहा महिन्यांत अरबस्तानचा बहुतेक भाग आपल्या ताब्यांत घेतला व आपल्या नांवाचीं नाणीं पाडलीं. अल्लीनें १७७१ मध्यें आपला जांवई अबुलधहाब याला सैन्यानिशीं पॅलेस्टाईन व सीरिया जिंकण्यास पाठविलें. त्यानें मुख्य शहरें घेऊन दमास्कस घेतलें. याच सुमारास तुर्क सरकारशीं गुप्त बोलणें होऊन अबुलनें ईजिप्तवर स्वारी केली व कायरोंत प्रवेश केला. अल्ली पळून गेला. त्यानें रशियन लोकांच्या मदतीनें पुन्हां स्वारी केली. प्रथम त्याला यश मिळालें. परंतु नंतर पराभव होऊन तो शत्रूच्या हातीं सांपडला. तो सात दिवसांनीं मरण पावला. यानंतर तुर्कांची सत्ता पुन्हां स्थापन झाली.अबुल-धहाबला पाशा पदवी आणि शेख-अल-बलद पद मिळालें. यानें सीरियावर स्वारी केली. पॅलेस्टाईनमध्यें असतांनाच हा मरण पावला. याच्या मागून इस्माईलबे हा शेख अल-बलद-झाला. परंतु याला हांकून देऊन इब्राहिम व मुराद या दोघांनीं राज्यकारभार पाहण्यास सुरवात केली. १७८६ मध्यें तुर्कांनीं पुन्हां ईजिप्त जिंकलें व इस्माईल हा शेख अलबलद झाला. १७९१ च्या भयंकर प्लेगांत इस्माईल व त्याचें कुटुंब यांचा समूळ नाश झाला. यामुळें इब्राहिम व मुराद यांनां पुन्हां बोलाविलें. याच सुमारास फ्रेंचांनीं स्वारी केली.

फ्रेंचांच्या स्वारीपासून महंमद अल्लीच्या उदयापर्यंतः—ईजिप्तवर स्वारी करण्याचा फ्रेंचांचा मुख्य हेतु, तुर्कसत्ता स्थापन करून, मामेल्युकांचें महत्त्व कमी करण्याचा होता. बोनापार्टनें याच अर्थाचा जाहीरनामा अरबी भाषेंत प्रसिद्ध केला. अंबबाहच्या युद्धांत मुरादबे व इब्राहिमबे यांचा पराभव केल्यावर फ्रेंच व ईजिप्शियन यांचे संबंध चांगले राहिले; परंतु फ्रेंच आरमाराचा नाईलच्या युद्धांत झालेला पराजय व वरच्या ईजिप्तवर पाठविलेल्या फ्रेंच सैन्यास मिळालेलें अपयश यामुळें लोकांचा फ्रेंचावरील विश्वास कमी झाला. १७९८ त कायरो येथें बंड झालें; परंतु बोनापार्टनें तें बंड सेनापति क्लेबरच्या मदतीनें मोडलें. यानंतर तुर्कीप्रमाणें दोन दिवाण उत्पन्न करून नवीन जाहीरनामे लाविले.

तुर्क सरकारनें ३ जानेवारी १७९९ त ईजिप्त तरवारीच्या जोरावर घेण्याचें जाहीर केल्यामुळें बोनापार्टनें सीरियावर स्वारी केली. या स्वारीवरून तो जूनमध्यें परत आला. त्यानें मुरादबे व इब्राहिमबे यांचा पराभव करून अबु कीर येथें ब्रिटिशांच्या सहाय्यानें उतरणाऱ्या तुर्की सैन्याचा पराभव केला. त्यानें क्लेबर याला सर्व अधिकार दिले व तो फ्रान्समध्यें गेला. या वेळेस तुर्कांनीं ईजिप्त घेण्यास दोन सैन्यें पाठविलीं. यांपैकीं पहिल्याचा पराभव करून क्लेबरनें तुर्कांशीं बोलणें लाविलें व फ्रेंच सैन्यानें ईजिप्त सोडण्याचें कबूल केलें. मध्यंतरीं ब्रिटिश सरकारनें फ्रेंच सैन्याला युद्धांतील कैदी म्हणून वागविण्यांत येईल, असा आग्रह धरल्यावरून क्लेबरनें सर्वत्र आपला अम्मल बसविला व संरक्षणाची तयारी केली. त्यानें बुलाक व कायरो तोफा लावून घेतलें. मुरादबेनें क्लेबरशीं बोलणें लावून वरच्या ईजिप्तचा कारभार आपल्या ताब्यांत घेतला. तो लवकरच मेला व त्याच्या नंतर ओस्मानबे अलबर्डिसी हा कारभार पाहूं लागला. १४ जून १८०० मध्यें क्लेबरचा एका धर्मवेड्यानें खून केला.त्यामुळें सेनापति मेनन हा त्याच्या जागीं आला. त्यानें आपण मुसुलमानी धर्माचे आहों, असें जाहीर केलें. कॉप्ट लोकांनां काढून मुख्य जागा मुसुलमानांनां दिल्या; परंतु ईजिप्त फ्रेंच्यांच्या संरक्षणाखालीं असल्याचें जाहीर केलें. १८०१ मार्चमध्यें इंग्लिश सैन्य ॲबरक्रांबीच्या आधिपत्याखालीं अबु कीर येथें दाखल झालें. ब्रिटिश व तुर्की सैन्यानें कायरो व अलेक्झांड्रिया यांनां वेढा दिला. त्यामुळें सेनापति बेलिआर्ड व मेनन यांनीं ईजिप्त सोडण्याचें कबूल केलें. अशा रीतीनें फ्रेंच स्वारीचा शेवट झाला. या स्वारीबरोबर आलेल्या फ्रेंच विद्वानांनीं लिहिलेला ' ईजिप्तचें वर्णन ' हा ग्रंथ मात्र बराच महत्त्वाचा आहे. सुव्यवस्थित राज्यपद्धतीचे फायदे व त्याचप्रमाणें यूरोपांतील विद्या व शास्त्र यांची प्रगति याचा मात्र परिणाम ईजिप्शियन लोकांवर झाला.

फ्रेंच गेल्यावर तुर्कांनीं मामेल्युकांच्या विरुद्ध शस्त्र धरल्यामुळें देशांत बंडाळी माजली. तुर्की ॲडमिरलनें मुख्य बेंनां मेजवानीस बोलावून त्यांच्यावर गोळ्या झाडल्या व कांहींना कैद केलें; परंतु ब्रिटिशांनीं धाक दाखवून त्यांची सुटका केली. त्याचप्रमाणें कायरो येथील बेंची सुद्धां सुटका झाली. महमद खोसरेव्ह हा पहिला गव्हर्नर झाला. यानें मामेल्युकांविरुद्ध सैन्य पाठविलें; परंतु त्या सैन्याचा अल-अल्फी अथवा अल-बर्डिसी यानें पराभव केला. इ. स. १८०३ मध्यें ब्रिटिशांनीं अलेक्झांड्रिया सोडलें व त्यांच्याबरोबर महमदबे अलअल्फी विलायतेस गेला. पगार थकल्यामुळें अल्बानियन पलटणीनें बिथरून पाशाच्या राजवाड्यास वेढा दिला; परंतु महमद खोसरेव्ह पळून गेला. या वेळेपासून अल्बानियन व तुर्क यांत वैमनस्य येऊन अखेरीस अल्बानियन मेहमेतअल्ली याचा उदय झाला.

ताहीरपाशानें सर्व सूत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं. परंतु लवकरच तुर्क सैनिकांनीं त्याचा खून केला. या वेळेपासून तुर्क व अल्बानियन यांत लढा माजून देशावर या दोघांचें राज्य सुरू झालें. अल्बानियनांचा मुख्य मेहमेत अल्ली यानें मामेल्युकांस आपल्या बाजूस वळवून डॅमिएटा येथें खोसरेव्हपाशाचा पराभव करून त्यास कैद केलें.

कांहीं दिवसानंतर अलीपाशा जझैरली हा ' पाशा 'पदाचा अधिकारनामा व फर्मान बरोबर घेऊन अलेक्झांड्रिया येथें उतरला. या वेळेला मामेल्युकांची सत्ता वरचा व खालचा

ईजिप्त आणि राजधानी यांवर होती. अलीपाशानें अल्बानियन लोकांस फोडण्याचा प्रयत्न केला व मामेल्युकांस पेन्शन कबूल केलें. त्यानें कायरोवर चाल केली. अखेरीस तो मामेल्युकांच्या हातीं सांपडला, व एका चकमकींत मारला गेला. यानंतर कांहीं काळपर्यंत शांतता होती.

इ. स. १८०४ मध्यें महंमद बे अलअल्फी इंग्लंडहून परत आला. याचें व अलबर्डिसीचें वैमनस्य असल्यामुळें मामेल्युकांत दोन तट पडले. बर्डिसीनें मेहमेतअलीच्या मदतीनें अलअल्फीच्या पक्षाची दाणादाण उडवून दिली. या मदतीबद्दल कायरोच्या लोकांवर कर लादण्यास परवानगी दिली. परंतु लोकांत बंड होण्याचा संभव दिसल्यावरून मेहमेतअलीनें लोकांची मर्जी संपादन केली आणि इब्राहिमबे व अलबर्डिसी यांनां पळण्यास लाविलें. त्यानें महंमद खोसरेव्ह याला पुन्हां पाशा नेमलें. दीड दिवसान्तर याला पुन्हां पदच्युत केलें. या वेळीं कायरोंत भयंकर अव्यवस्था माजून राहिली होती.

यानंतर अल्बानियन लोकांनीं अहंमद पाशा खोरशिद याला ईजिप्तचा कारभार हातीं घेण्यास बोलाविलें. या वेळेला अलबर्डिसीचें सैन्य राजधानीच्या दक्षिणेस धुमाकूळ करीत होतें. अलअल्फी व ओस्मानबे हसन यांनीं प्रथम पाशाचें स्वामित्व पत्करून नंतर युद्ध जाहीर केलें. मामेल्युकांनां प्रथम यश येत गेलें. परंतु शुब्राच्या युद्धांत त्यांचा पराजय झाला. यामुळें मामेल्युकांत एकी उत्पन्न झाली. मामेल्युक वरच्या ईजिप्तमध्यें गेले. तेथें त्यांच्यावर पाशानें तीन सैन्यें पाठविलीं. यांपैकीं एकावर मेहमेतअलीची नेमणूक होती. बऱ्याच लढाया झाल्या, परंतु अखेरीस कांहींच निष्पन्न झालें नाहीं.

खोरशिदनें अल्बानियन लोकांवर दाब बसविण्यासाठीं सीरियांतून डेलिस अथवा कुर्द सैन्य बोलविलें. या लोकांनीं भयंकर अत्याचार केले. हें सैन्य आल्याबरोबर मेहमेतअली परत आला. कायरोंत बंडाची कल्पना पक्क दशेस येत होती. लोक पाशाच्या जुलमास कंटाळले होते. अखेरीस लोकांनीं कंटाळून मेहमेतअलीस पाशा होण्याची व खोरशिदच्या जाचांतून सोडविण्याची विनंति केली. खोरशिदनें हें ऐकून युद्धाची तयारी केली. मेहमेतअलीनें कायरो येथील लोकांच्या मदतीनें युद्ध सुरू केलें. खोरशिद हा बालेकिल्ला बळकावून बसला. याच सुमारास मेहमेतअलीला पाशा नेमल्याचा व खोरशिद याला अलेक्झांड्रिया येथें जाण्याचा हुकूम घेऊन एक जासूद आला. खोरशिदनें हुकूम पाळण्याचें नाकारलें. मामेल्युक बे यांनीं खोरशिदच्या मदतीस म्हणून कायरोवर चाल केली. मेहमेतअलीनें त्यांनां पिटाळून लावलें. इतक्यांत तुर्की ॲडमिरल कांहीं जहाजानिशीं अबु कीरच्या उपसागरांत आला. त्यानें खोरशिदास बालेकिल्ला सोडण्यास लावून मेहमेतअलीला गव्हर्नरचा अधिकार दिला.

मेहमेतअलीचा अधिकार कायरोच्या बाहेर नव्हता. बेंनां खोरशिदचा शिलेदार व कांहीं अल्बानियन मिळाले. तेव्हां मामेल्युकबेंनां फसवून कायरोंत प्रवेश करण्यास लाविलें. तेथें त्यांची कत्तल करण्यांत आली. जे जिवंत राहिले त्यांनां पकडून हालहाल करून ठार मारण्यांत आलें. सुमारें ८३ शिरें कान्स्टँटिनोपल येथें धाडण्यांत आलीं. अशा रीतीनें मामेल्युकांची पहिली कत्तल झाली. बहुतेक मामेल्युकबे वरच्या ईजिप्तमध्यें गेले.

इंग्लिशांच्या सांगण्यावरून आणि अलअल्फीच्या लुचपतीमुळें तुर्क सरकारनें चोवीस बेंची नेमणूक करून त्यावर अलअल्फीस नेमण्याचें कबूल केलें. याला मेहमेतअली व इतर मामेल्युक यांनीं बराच विरोध केला. कारण अलबर्डिसीचा वैराग्नि अद्यापि शमन झाला नव्हता. व त्याचें वजन देखील वरचें होतें. १८०६ मध्यें तुर्की ॲडमिरल सलिहपाशा हा अलेक्झांड्रिया येथें आला, परंतु मेहमेतअलीनें तुर्की सरकारला नजराणा पाठवून आणि इतर कारस्थानानें आपली नेमणूक कायम केली. व मामेल्युकांनां अधिकार देण्याचा बेत मागें टाकिला. लवकरच अलबर्डिसी व अलअल्फी मरण पावले. यामुळें पाशाचा मार्ग अगदीं निष्कंटक झाला. पाशानें शाहीनबेचा पराभव करून त्याचा तोफखाना व सामान लुटलें.

इ. स. १८०७ मध्यें पांच हजार ब्रिटिश सैन्य अलेक्झांड्रिया येथें आलें. तेथें त्यांनां अल्फीच्या मृत्यूचें वर्तमान कळल्यामुळें त्यांनीं त्याच्या पक्षांतील व इतर लोकांस बोलाविलें. त्यांनीं डॅमिएटा घेण्याचें ठरवून त्यावर चाल केली. व शहर त्यांच्या हातीं आलें. मध्यंतरीं मेहमेतअली वरच्या ईजिप्तमध्यें लढत असून त्यानें अयूस्त येथें बेंचा पराभव केला. ब्रिटिश सैन्य आल्याचें ऐकून त्यानें बेंच्या मागण्या कबूल करून त्यांनां आपल्या बाजूस वळविलें आणि कायरोवर चाल केली. 'रोझेटा' शहर घेण्यासाठीं पुन्हां ब्रिटिशांनीं त्याला वेढा दिला, परंतु आंतील लोकांस कुमक मिळाल्यानें वेढा उठवावा लागला. त्यांत ब्रिटिशांची बरीच हानि झाली. ब्रिटिशांस व पाशास मदत देणाऱ्यांमध्यें दोन पक्ष झाल्यामुळें ब्रिटिश सैन्य निघून गेलें. १८११ पर्यंत बेंनीं कांहीं मागण्या सोडल्या व पाशानें त्यांच्या कांहीं मागण्या कबूल केल्या. शाहीनला फेयुम प्रांत आणि गिझाव व बेनी सुएफ प्रांताचा कांहीं भाग दिला. इतरांनां सैद प्रांताचा भाग दिला. इतकें करूनहि शांतता झाली नव्हती. इ. स. १८११ त अरबस्तानांतील वाहाबी लोकांवर स्वारी करण्याचें ठरून सैन्याचें अधिपत्य पाशाचा आवडता मुलगा टूसून याला देण्याचा समारंभ करण्यांत आला. त्यासाठीं सर्व मामेल्युक बेंनां बोलावून ते बाले किल्ल्यांत आले असतां त्यांची कत्तल करण्यांत आली. या कत्तलीमुळें सर्व ईजिप्तभर मामेल्युकांचीं कत्तल होऊन त्यांचीं डोकीं कान्स्टँटिनोपल येथें पाठविण्यांत आलीं. बेंचीं घरें शिपायांनीं अगदीं उध्वस्त

करून टाकली. कांहीं मामेल्युक न्यूबियांत पळून गेले. तेथेंहि त्यांचा पिच्छा पुरावल्यामुळें उरलेल्या लोकांनीं नवीन डोंगोला शहर स्थापिलें. १८२० मध्यें पाशानें न्युबिया व सेन्नार जिंकल्यामुळें कांहीं इजिप्त मध्यें परत आले आणि सुमारें १०० लोक सेन्नारच्या जवळच्या देशांत गेले.

मेहमेत अल्लीची कारकीर्दः—अशा रीतीनें मेहमेत अल्लीचा अंमल ईजिप्तवर बसला. नंतर त्यानें स्वतःची स्वतंत्र सत्ता बसविण्याकडे लक्ष दिलें. त्यानें सुलतानचें सार्वभौमत्व कबूल करून १८११ मध्यें ८००० सैन्य वाहाबींच्या विरुद्ध पाठविलें. या सैन्यानें मदिना, जेद्दा आणि मक्का हीं शहरें घेत ीं. १८१३ त मेहमेत अल्लीनें स्वतः सैन्याचें आधिपत्य घेतलें. मक्केच्या शरीफला पदच्युत करून त्यानें वाहाबींचा पुढारी दुसरा सौद मेल्यावर अबदुलाशीं तह केला. नेपोलियन एल्बा येथून निसटला हें ऐकून तो ईजिप्तला परत आला. तो अरबस्तानमध्यें असतांना त्याच्या प्रतिनिधीनें खाजगी जमिनी जप्त करून त्या सर्व राष्ट्राच्या मालकीखालीं आणल्या. अशा रीतीनें मेहमेत अल्ली हा सर्व जमीनीचा मालक बनला. १८१५ सालीं 'निझाम जेदीद' म्हणजे यूरोपियन पद्धति सैन्यांत सुरू केल्यामुळें सैन्यांत असंतोष पसरला. तेव्हां ही पद्धत त्यानें बंद केली. १८१६ त त्यानें आपला मुलगा इब्राहिम पाशा याच्या हाताखालीं सैन्य देऊन पुन्हां अरबस्तानांत पाठविलें. त्यानें वाहाबींची राजधानी घेऊन अबदुल्लाला कैद केलें. व त्याला कान्स्टांटिनोपल येथें पाठविलें.

मध्यंतरीं मेहमेतअल्लीनें व्यापार व उद्योगधंदे यांजकडे लक्ष पुरविलें. मुख्य मालाचे कुलहक्क त्यानें स्वतःकडे ठेविले. यामुळें लोकांचें भयंकर नुकसान झालें. अलेक्झांड्रिया येथील ' महमुदीया कालवा ( १८१९—२० ) यानें तयार केला. १८२२ मध्यें यानें डेल्टांत कापसाची लागवड सुरू केली.

तांबड्या समुद्राशीं होणारा व्यापार आणि सेनार मधील सोन्याच्या खाणी हातीं येण्यासाठीं त्यानें १८२० मध्यें पूर्व सुदान जिंकण्याचें ठरविलें. त्याच्या सैन्यानें न्यूबिया, सेन्नार, व कार्डोफन घेऊन १८२२ मध्यें खार्टूमची स्थापना केली. १८२३ मध्यें तर तांबड्या समुद्रावरील स्वाकीन व मसावा या बंदरावर त्याचा ताबा बसला.

इ. स. १८२४मध्यें अहमद नांवाच्या गृहस्थानें स्वतः पैगंबर असल्याचें जाहीर करून बरीच गडबड केली. परंतु त्याचा पराभव होऊन तो नाहींसा झाला. फेलाहिन मूळचे शांत स्वभावाचे व गरीब असून, त्यांच्यापासून कर, वगैरे जबरीनें वसूल करीत. यामुळें त्यांची फारच वाईट स्थिति झाली. इ. स. १८३८ मध्यें तुर्कस्तानशीं ग्रेटब्रिटननें व्यापारी तह केल्यामुळें मेहमेतअल्लीच्या कुलहक्कास धक्का बसला. याच्या अंमलांत सर्वत्र शांतता होती. प्रवाश्यांनां प्रवास करण्यांत धोका राहिला नव्हता. शिक्षण व वैद्यकी यांनां उत्तेजन मिळालें. मेहमेत अल्लीनें यूरोपियन व्यापारास बऱ्याच सवलती दिल्या. यूरोपचा हिंदुस्थानशीं होणारा व्यापार ईजिप्तमार्फत होण्यास मेहमेत अल्लीचे प्रयत्न कारण झाले.

तुर्क सुलतान दुसरा महंमद याच्याकडून आपल्या साम्राज्यास त्रास होईल असें जाणून मेहमेत अल्लीनें पाश्चात्य पद्धतीवर सुधारणा सुरू केल्या. त्यानें यूरोपीय पद्धतीवर सैन्य व आरमार तयार केलें. १८२९ मध्यें त्यानें अलेक्झांड्रिया येथें गोदी व शिलेखाना उघडला. कवायती सैन्यांत त्यानें तुर्क व अल्बानियन यांनां काढून नीग्रो व फेलाहीन यांची भरती केली. ग्रीक लोकांविरुद्ध तुर्क सुलताननें मदत मागितली; या बद्दल मोरिया व सीरिया या प्रांतावर पाशा नेमण्याचें कबूल केलें. इब्रामपाशानें कांहीं जहाजें घेऊन ग्रीकांचा समुद्रावरील तावा नाहींसा केला व मोरियांत जय मिळविले. परंतु यूरोपियन राष्ट्रें मध्यस्थ झाल्यानें ईजिप्शियन सैन्यास सीरियांतून परत यावें लागलें. ग्रीसचें स्वतंत्र राज्य होण्यापूर्वी १८३१ मध्यें पूर्वेकडील प्रश्नाला बराच रंग चढला होता. या वेळीं सुलतानविरुद्ध मेहमेतअल्लीनें बंड केलें. कारण सुलताननें कराराप्रमाणें सीरिया देण्याचें नाकारलें. मेहमेतअल्लीनें एकरचा पाशा अबदुल्ला याला वठणीवर आणण्याचें ढोंग केलें. सुमारें दहा वर्षेपर्यंत ह्या प्रश्नावर सर्व राष्ट्राचे सारखे डोळे लागले होते. सुवेझची संयोगीभूमि व युफ्रेटिसचें खोरें यामुळें ब्रिटनला सुद्धां काळजी वाटत होती. इतक्यांत इब्राहिमनें एकर घेऊन रेषिदपाशाचा कोनिया येथें पराभव केला (१८३२). अखेरीस तो रशियामध्यें पळाला. बरीच भवति न भवति होऊन १८३३ मध्यें कुतयाच्या तहानें सुलताननें मेहमेत अल्लीला सीरिया, दमास्कस, अलेप्पो वगैरेंचा पाशा नेमिलें.

सुदनपासून टॉरस पर्वतापर्यंतच्या भागावर मेहमेत अल्लीचा ताबा असून त्याला फार थोडा कर द्यावा लागे. कुतयाच्या तहानंतर एक वर्षानीं सीरियन, ड्रूजेज व अरब यांनीं बंड केलें. मेहमेतअल्लीनें तें बंड स्वतः मोडलें, आणि सीरियन लोकांवर चांगलीच दहशत बसविली. सुलतान महंमदनेंहि सूड घेण्यास चांगली संधि आहे असें पाहून सैन्य पाठविलें ( १८३९ ). परंतु त्याचा इब्राहिमनें पुन्हां पराभव केला. यापूर्वीच सुलतान महंमद मरण पावला व सर्व तुर्की साम्राज्य उघडें पडलें. परंतु यूरोपियन राष्ट्रांच्या मदतीमुळें मेहमेतास कांहीं करतां आलें नाहीं. त्यानें फार ओढून धरल्यामुळें उलट त्याला विशेष फायदेशीर अटी मिळाल्या नाहींत.

१८४१ च्या नवीन फर्मानाप्रमाणें मेहमेतअल्लीचा ताबा ईजिप्त, सिनाई द्वीपकल्प, सुदान व तांबड्या समुद्राकडील अरबस्तानचा भाग यांवर मुक्रर करण्यांत आला. ईजिप्तचें पाशापद मेहमेत अल्लीच्या घराण्यांत वंशपरंगागत करण्यांत येऊन ईजिप्तच्या सरहद्दीचा नकाशा, मेहमेत

अल्लीचें मांडलिकत्व व त्यावर निर्बंध वगैरे गोष्टी फर्मानमध्यें होत्या. १८४२ मध्यें गुरांवर सांथ आली व नाईल नदीला पूर आला. १८४३ मध्यें टोळधाड आली. यामुळें देशांत लोकांची फारच भयंकर स्थिति झाली. १८४४-४५ मध्यें कांहीं आर्थिक सुधारणा करणें भाग पडल्यामुळें लोकस्थिति चांगली झाली. मेहमेत अल्लीला मुख्य वजिराची पदवी मिळून तो १८४६ त इस्तंबूल येथें गेला. व खोसरेव्ह पाशाशीं पुन्हां त्याचा सलोखा झाला. १८४७ मध्यें त्यानें नाईल नदीची खोली वाढविण्यासाठीं दगडी काम सुरू केलें. या वर्षाच्या अखेरीस वृद्धपणामुळें त्याला कारभार पाहणें अशक्य झाल्यानें १८४८ मध्यें इब्राहिमला तुर्क सरकारनें पाशा नेमिलें. परंतु तो लवकरच मेला. मेहमेत अली१८४९ मध्यें ८० वर्षांचा होऊन मरण पावला. याच्या कारकीर्दीत तुर्की सत्ता कमी झाली; कापसाच्या उद्योगधंद्यास सुरुवात झाली; पाश्चिमात्य शास्त्रांचे फायदे दृष्टोत्पत्तीस आले आणि सुदान जिंकलें.

मेहमेत अल्लीच्या मृत्यूपासुन ब्रिटिश सत्तेपर्यंतः--- इब्राहिमच्या मृत्यूनंतर ( १८४८ ) त्याचा पुतण्या व टुसुनचा मुलगा पहिला अब्बास याला खेदीव नेमलें. यानें व्यापारी कुलहक्क मोडिले आणि अलेक्झांड्रियापासून कायरोपर्यंत रेल्वे बांधण्यास सुरुवात केली. १८५४ मध्यें याचा खून झाला. याच्या मागून याचा चुलता सय्यद पाशा गादीवर बसला. हा शरीरानें व मनानें दुर्बल असल्यानें याचे सर्व बेत सिद्धीस गेले नाहींत. सुदानमध्यें गुलाम पकडण्याची चाल बंद करण्याचा याचा प्रयत्न व्यर्थ गेला. फेलाहिनच्या कल्याणासाठीं यानें १८५८ चा जमीनीचा कायदा पास केला. १८५६ मध्यें यानें लेसेप याला सुवेझ कालवा खणण्यास परवानगी दिली.परंतु ब्रिटिशांच्या विरोधामुळें तुर्क सरकारनें याला दोन वर्षें मंजुरी दिली नाहीं. यानें पौरस्त्य विद्युत् वाहक कंपनी व ईजिप्त बँक या दोन ब्रिटिश कंपन्यांना सवलती दिल्या होत्या. यानें राष्ट्रीय कर्जास सुरुवात केली. हा १८६३ त मरण पावला व याच्यामागून याचा पुतण्या म्हणजे इब्राहिम पाशाचा मुलगा इस्मायल हा गादीवर बसला.

इस्मायल ( १८६३-७९ ) गादीवर बसल्याबरोबर ईजिप्त-मध्यें नवीन कारकीर्द सुरू झाली असें वाटलें. त्याच्या सुधारणा, दांडगा खर्च वगैरे गोष्टीशिवाय यूरोपियन राष्ट्रांनीं ईजिप्तच्या अंतर्गत राज्यव्यवस्थेंत हात घातल्याबद्दल याची कारकीर्द प्रसिद्ध आहे. १८६६ मध्यें यानें कांहीं खंडणी देऊन तुर्की कायद्याप्रमाणें घराण्यांतील वडील मनुष्यास राज्य न मिळतां वडील मुलास राज्य मिळण्याचा कायदा पास करून घेतला. १८६७मध्यें याला वलीच्या ऐवजीं खेदीव ही पदवी मिळाली व १८७३ च्या फर्माननें जवळजवळ हा स्वतंत्र राजा बनला. यानें मेहमेत अल्लीच्या राज्यपद्धतींत सुधारणा केली. लष्करी शाळा सुधारून शिक्षणाला मदत केली. रेल्वे, तारायंत्र, दीपगृहें, सुवेझचें बंदर वगैरे बऱ्याच लोकोपयोगी गोष्टी केल्या. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे १८६९ मध्यें सुवेझ कालवा उघडणें होय. या सर्व गोष्टींना लागणारा पैसा व श्रम जबरदस्तीनें लोकांपासून घेण्यांत आले. त्यामुळें लोकांची दैना जास्तच वाढली.

सुदानमध्यें सत्ता वाढविण्यांत व अबिसीनियाशीं टक्कर देण्यांत बराच पैसा व प्राण खर्ची पडले. १८७५ सालीं फेलांची इतकी वाईट स्थिति झाली कीं, राज्यकारभाराच्या महत्वाच्या बाबींइतकें देखील उत्पन्न होईना. कर्जदारांनां नेहमीं फसविल्यामुळें कर्जहि मिळेना. कर बरेच महिने अगोदर वसूल करण्यांत येत. अखेरीस इस्मायलनें आपले सुवेझ कालव्याचे १,७६,६०२ शेअर ब्रिटिश सरकारास ३९,७६,५८२पौंडांस विकले.यामुळें तात्पुरता फायदा झालाच. परंतु ब्रिटिश सरकाराला देशाच्या आर्थिक स्थितीकडे लक्ष देणें भाग पडलें. केव्ह व इतर कमिशनें बसून १८७७ मध्यें 'केसे दलाडेटे'स्थापन होऊन बऱ्याच उत्पन्नावर आंतर राष्ट्रीय ताबा बसला.इंग्लिश व फ्रेंच रोखे असणाऱ्यांच्या तर्फे १८७६ मध्यें गोशेन व जुबर्ट यांचें मिशन येऊन उत्पन्नावर व खर्चावर अनुक्रमें इंग्लिश व फ्रेंच यांची देखरेख सुरू झाली. लवकरच रेल्वे व अलेक्झांड्रिया बंदर हीं सुद्धां सर्व राष्ट्रांस खुलीं करण्यांत आलीं. १८७८ मध्यें चौकशीसाठीं नवीन कमिशन नेमलें. यामुळें इस्मायलनें घटनात्मक मंत्रि-मंडळ कबूल केलें व त्यावर नुबर पाशा याला अध्यक्ष नेमलें. ७ महिन्यांतच त्यानें मंत्रिमंडळ मोडून आपली जुनी राज्यपद्धति सुरू केली, यामुळें इंग्लंड व फ्रान्स यांनीं चूप न बसतां तुर्कस्तानकडून शह पोहोंचविला. १८७९ त ता. २६ जूनरोजीं इस्मायलला तुर्क सुलतानकडून तार आली. त्यांत त्याला काढून टयूफीकला खेदीव नेमल्याचा हुकूम होता. लगेच टयूफीकच्या नांवाची द्वाहि फिरविण्यांत आली.

कांहीं दिवसपर्यंत कांहींच सुधारणा झाली नाहीं. तरी स्थिति वाईट असल्यामुळें १८७९ मध्यें मेजर बेअरिंग ( लॉर्ड क्रोमर ) व डी ब्लिगनीअरेस यांनां नेमून द्विराज-पद्धति सुरू केली. यानें कांहीं सुधारणा केल्या. परंतु एका विशिष्ट वर्गाच्या आड ही राज्यपद्धति येत असे. हा वर्ग लष्करी होता. या वर्गानें अहंमद अरबी नांवाच्या गृहस्थास पुढें करून, तुर्की व परकीय लोकांस सवलत देण्याविरुद्ध ओरड चालविली. नंतर ख्रिस्त्यांविरुद्ध त्यांनीं चळवळ सुरू केली. राज्यकर्त्यांत विशेष जोम नसल्यामुळें त्यांनीं त्यांच्या अटी कबूल केल्या.यामुळें बंडखोरांनीं आणखी मागण्या केल्या. बंडखोरांच्या भयंकर अत्याचारामुळें ब्रिटिश व फ्रेंच आरमारानें अलेक्झांड्रियावर तोफा डागल्या. कान्स्टंटीनोपल येथें सर्व राष्ट्रांच्या वकीलांची परिषद भरून सुलतानला बंड-खोरांचें पारिपत्य करण्यास सांगितलें. परंतु त्यानें नाखुषी दाखविली.

ब्रिटिश सत्ता.---वरील प्रकार घडल्यानंतर ब्रिटिश सर-कारनें लष्कराचा उपयोग करण्याचें ठरविलें. फ्रान्स व इटली

यांनीं भाग घेण्याचें नाकारल्यावरून ब्रिटिश सैन्यानें टेल-इल केबीरच्या लढाईंत (१८८२) बंडखोरांची दाणादाण उडविली. खेदीव अलेक्झांड्रियाहून कायरो येथें आला व शेरिफ पाशानें राज्यकारभारासाठीं प्रधान मंडळ बनविलें. अरबी व त्याच्या अनुयायांस ब्रिटिशांच्या मध्यस्थीमुळें हद्दपार करण्यांत आलें. लॉर्ड डफरीन कान्स्टांटिनोपल येथील वकील यास ईजिप्तचे हायकमीशनर नेमिलें होतें. यानें इजिप्तचा कारभार कसा करावा याविषयीं साधारण दिशा आंखून दिली होती. भविष्यकालीं स्वराज्याचे कांहीं हक्क द्यावे असें त्याचें मत होतें.

वरील तत्त्वें अमलांत आणण्याचें काम सर ईव्हेलीन बेअरिंग यानें केलें. १८८४ त सर एडवर्ड मॅलेटच्यानंतर याला कान्सलजनरल व डिप्लोमॅटिक एजंट नेमिलें. कान्सल जनरल व डिप्लोमाटिक एजंटचा अधिकार इकडील पोलिटिकल एजंटाप्रमाणें असे. तो सल्ला अगर अर्ज म्हणून पाठवी पण तो सल्ला अगर अर्ज अमान्य करण्याची मात्र खेदीवाची छाती नसे. या वेळेला मागील दोन प्रसंगाप्रमाणें वाईट वेळ होती. परंतु ब्रिटिश सैन्याच्या मदतीनें त्यानें स्थिरस्थावर करून शांतता स्थापिली. १८८३ त द्विराजपद्धति बंद करण्यांत आली. व त्या ऐवजीं एक इंग्लिश फडणिसी सल्लागार म्हणून देण्यांत आला. फ्रान्सनें बंडाच्या वेळीं मदत न दिल्यामुळें या वेळीं त्याला कुरकुर करतां आली नाहीं. 'कायसे डी ला डेटी' संस्था राहिली कायमच व तिनें आर्थिक सुधारणांत बराच विरोध केला.

ब्रिटिश सरकारचा इरादा खेदिवाची सत्ता स्थापन करून त्याचा कारभार सुरळीत ठेऊन नंतर ईजिप्तमधून सैन्य नेण्याचा होता. सुधारणा अंमलांत आणण्याचा देखील विशेष इरादा नव्हता. परंतु लहान सहान सुधारणा अंमलांत आणल्यामुळें त्यांना बऱ्याच गोष्टी कराव्या लागल्या. प्रथम त्यांनां सुदानकडे लक्ष द्यावें लागलें. तेथें महंमद अहमद नांवाच्या एका धर्मवेड्यानें आपण इस्लामचा महादी असल्याचें जाहीर करून बंड केलें. कर्नल हिक्स (हिक्स पाशा) याचा १० हजार सैन्यासह १८८३ त ओबेदच्या जवळ पराभव झाला. खेदीव व मुख्य प्रधान शेरिफपाशा यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष्य करून सर ईव्हेलीन बेअरिंगनें सुदानच्या बाबतींत कांहीं करावयाचें नाहीं असें ठरविलें. शेरिफनें राजीनामा दिला व नुबरनें मोठ्या मिनतवारीनें त्याची जागा घेण्याचें कबूल केलें. खार्टूम व इतर जागा खेरीज बराच भाग महादीनें घेतला होता. सिन्काट व टोकर येथील वेढा उठविण्यास जनरल बेकर जात असतां त्याचा ईलटेब येथें पराभव झाला (१८८४). याच सुमारास जनरल गॉर्डन खार्टूम येथें जाऊन पोहोंचला. सिन्काट व टोकर येथील सैन्याला मदत करण्यासाठीं मेजर जनरल ग्रॅहम याची नेमणूक झाली. याच सुमारास सिन्काट शत्रूच्या हातीं पडलें. लवकरच टोकरचीहि तीच स्थिति झाली नंतर ब्रिटिश सैन्यानें ईलटेब येथें शत्रूचा पराभव करून टोकर घेतलें. नंतर टमाई घेण्यांत आलें. अशा रीतीनें बंडखोरांना दोनदां चांगला हात दाखविल्यावर स्वाकीन येथें थोडें सैन्य राहून बाकीचें निघून गेलें.

ब्रिटिश सैन्य गेल्यामुळें सुदान मधील जातींनीं फार उचल खाल्ली. यामुळें गॉर्डनची स्थिति फार विलक्षण झाली. खार्टूमशीं व्यवहार कठिण झाला. गॉर्डन व परराष्ट्रीय खातें यांचें जमेना. अखेरीस खार्टूम सोडून सैन्य बर्बरमध्यें नेण्याचा अधिकार गॉर्डनला देण्यांत आला. परंतु गॉर्डनची स्थिति चमत्कारिक झाल्यामुळें नाईल नदीच्या मार्गानें लॉर्ड वेलस्लीच्या हाताखालीं सैन्य पाठविण्यांत आलें. या सैन्याच्या एका भागानें अबुक्लिआ विहीरी फार निकराची लढाई करून ताब्यांत घेतल्या. व सैन्य गुबान येथें पोहोंचलें. परंतु २६ जानेवारी १८८५त खार्टूम शत्रूच्या हातीं जाऊन गॉर्डन मारला गेला. यामुळें सैन्यानें परत जाण्याचें ठरविलें. याचा परिणाम म्हणजे खेदीवची सत्ता दिहल्फाच्या उत्तरेस नाइल नदीच्या खोऱ्यापर्यंत राहिली.

इकडे राज्यकारभारांत सुधारणा करण्याचें सर इव्हेलीन बेअरिंग यानें ठरविलें. दोन तीन वर्षेपर्यंत त्याला यश येईल असें वाटेना. कारण देशांत गडबड असून लोकांचा व एतद्देशीय अधिकाऱ्यांचा परकीयांवर विश्वास बसेना. त्याचप्रमाणें ब्रिटिश अधिकारी व सत्ता यांचा एतद्देशीय कामगार द्रोह करूं लागले. जमिनदारांना मनास वाटेल तितकें पाटाचें पाणी मिळत नसे यामुळें ते खुष नसत. फेलहिनांची जरी स्थिति सुधारली होती तरी अरबी व त्याचे अनुयायी यांचा पराभव झाल्यापासून त्यांच्या मनांत वांकडें आलें होतें. कारण आतां ख्रिस्ती सावकारांचा तगादा त्यांच्या मागें लागला. याच सुमारास सरकारचें दिवाळें निघण्याची स्थिति होती. पैसा दुर्मिळ झाला होता व बऱ्याच कामगारांचे पगार थकले होते. यामुळें रोखेवाल्यांना मिळणारा करांमधील पैसा द्यावयाचें ठरविलें. याला सर्व राष्ट्राकडून थप्पड मिळाल्यामुळें तो बेत जागच्या जागींच ठेवावा लागला. यामुळें फायदा न होतां उलट आंतरराष्ट्रीय घोटाळे माजण्याचा संभव दिसूं लागला. याच सुमारास ब्रिटिश सरकारनें १८८५ मार्चचा लंडनचा तह घडवून आणला, यानें मागील अटी सौम्य करून ९० लक्ष पौंडाचें कर्ज ईजिप्तला देवविलें. इतर खर्च व देणें वजा जातां राहिलेलें १० लाख पौंड कालवे करण्यासाठीं उपयोगांत आणलें यामुळें देशाची स्थिति सुधारली. खर्चांत काटकसर व कारभारांत सुधारणा केल्या. सुदानकडे वाहणारा पैशाचा व माणसांचा पूर बंद झाला. नवीन सैन्य तयार करण्यांत आलें. कालवे व फडणिसी खातें यांच्याकडे लक्ष देण्यांत आलें. नुबरपाशा मुख्य प्रधान राहिला. त्यानें

प्रांतिक कारभारांत व एतद्देशीय न्याय कोर्टें यांत ढवळाढवळ करण्याबद्दल पुष्कळ विरोध केला. यामुळें युद्ध, सार्वजनिक खातें, व फडणिसी खातें यांतच सुधारणा करण्याचें ठरलें. हळूहळू एतद्देशीय लोक व यूरोपियन यांत सलोखा होऊन विश्वास उत्पन्न झाला. 'ईजिप्शियनांवर राज्य करावयाचें नसून त्यांना राज्यकारभार शिकण्यास लावावयाचें' हें तत्त्व मान्य करण्यांत आलें. इतकें करून सुद्धां ब्रिटिशांची स्थिति चांगली नव्हती. सुलतान ब्रिटिश ढवळाढवळीला विरोध करण्याचा संभव होता. फ्रान्स त्याला सहाय्य करण्यास तयार होतें. १८८५ त कान्स्टांटिनोपल येथें ब्रिटिश वकील पाठवून सैन्याची रचना, सुदानप्रश्न व राज्यकारभारांत सुधारणा यासाठीं एक तुर्क व एक इंग्लिश कमिशनर नेमावा असें ठरलें. याप्रमाणें मुख्तारपाशा व सर हेनरी ड्रमंड वुल्फ यांची नेमणूक झाली. १८८६ च्यां अखेरीस त्यांची चौकशी संपून त्यांनीं आपल्या सरकारांस रिपोर्ट सादर केले. यानंतर तीन वर्षांत ब्रिटिशांनीं आपलें सैन्य काढून घ्यावें; परंतु अंतर्गत व्यवस्था वगैरेसाठीं मुदत वाढवावी असें ठरलें. प्रथम या तहावर सुलताननें सही केली; परंतु त्याप्रमाणें वागण्याचें नाकबूल केलें. तुर्क कमिशनर कायरोंत १९०८ पर्यंत होता.

१८८६ ते १८८७ त देशाची चांगली भरभराट झाली. यानंतर सर इव्हेलीन बेअरिंगनें प्रांतिक कारभार व न्याय यांमध्यें सुधारणा करण्याचें ठरविलें. नुबरपाशानें १८८८ त राजिनामा दिला. त्याच्यानंतर रिआज पाशा आला. हा १८९१ पर्यंत होता. या तीन वर्षांत बऱ्याच सुधारणा होऊन देशाची संपत्ति वाढली. ईजिप्शियन सैन्यानें महादीवर बरेच जय मिळविले. न्यायखात्यांत सुधारणा झाली. रिआझनंतर मुस्तफा पाशा फेहमी याची नेमणूक केली. न्यायकोर्टें, तुरुंग, आरोग्य व शिक्षण यांत सुधारणा करण्यांत आल्या.

१८९२ त खेदीव टयुफिक मरण पावला व त्याच्यामागून त्याचा मुलगा अबास हिल्मी हा गादीवर बसला. याला परकीय सत्तेचें जूं नको होतें म्हणून यानें मुस्ताफापाशास काढून ( १८९३ ) तेथें फक्रीपाशाची नेमणूक केली. परंतु ब्रिटिश प्रतिनिधीनें राज्यकारभारांत ढवळाढवळ होऊं नये म्हणून फक्रीपाशास राजिनामा देण्यास लाविलें. त्याच्या जागीं रिआझ नेमला गेला; परंतु खेदीव व लॉर्ड क्रोमर (सर इव्हेलीन बेअरिंग ) यांच्यांत बेबनाव होता. त्यानें राष्ट्रीय व ब्रिटिशांच्या विरुद्ध पक्षास उत्तेजन दिलें. हळू हळू खेदीव व ब्रिटिश यांचे संबंध चांगले झाले. १८९४–९५ त नुबरपाशा अधिकारावर आला व त्याच्यानंतर पुनः मुस्ताफा फेहमीची नेमणूक झाली.

आंग्लो-ईजिप्शियन कारभारामुळें बराच आर्थिक फायदा होऊन १८९६–९८ त महादीपासून सुदान प्रांत परत मिळविला. त्या भागांत फ्रान्स व ग्रेटब्रिटन यांच्या चळवळीचें क्षेत्र ठरविण्यांत आलें. ईजिप्त गडबडींत आहे असें पाहून फ्रान्सनें नाईलवरील खोरें घेण्याचें ठरविलें. फ्रेंच कांगोमधून नाईल नदीवरील फॅशोडा घेण्यासाठीं सैन्य पाठविलें; परंतु लॉर्ड किचनेरनें चांगलीच दौड मारल्यानें फ्रेंचांचा बेत फसून २१ मार्च १८९९ च्या तहानें कांगोफ्रीस्टेटच्या उत्तर सरहद्दीपासून ट्रिपोलीच्या दक्षिण सरहद्दीपर्यंत दोन्ही राष्ट्रांच्या चळवळींचें क्षेत्र ठरविण्यांत आलें.

सुदानच्या राज्यकारभारासंबंधीं ठराव १९ जानेवारी १८९९त करण्यांत आले. त्याच्या अन्वयें ब्रिटिश सरकारच्या अनुमतीनें खेदिवानें गव्हर्नर जनरलची नेमणूक करून त्याच्या हातीं सर्व लष्करी व मुलकी सत्ता द्यावयाची. सुदान प्रांत ईजिप्तप्रमाणें आंतरराष्ट्रीय कायद्यानें बांधला नव्हता. सुधारणा करण्यांत ब्रिटिश, ईजिप्शियन व सुदानीज या सर्वांनीं मदत केली. तेथील पहिला गव्हर्नर जनरल सर रेजिनाल्ड विंगेट हा नेमला.

विसाव्या शतकाच्या आरंभीं ईजिप्तची चांगलीच भरभराट झाली. बिगार बंद करण्यांत आली. गुलामांचा व्यापार नव्हताच म्हटलें तरी चालेल. अरबी पाशाला सिलोनमधून ईजिप्तमध्यें येण्यास परवानगी मिळाली. फेलाहिन लोक सुखी झाले. ब्रिटिशांनीं नाईल खोरें घेतल्यामुळें व सैन्य न नेल्यामुळें फ्रान्सच्या मनांत अद्यापि तेढी होतीच.ता. ८एप्रिल१९०४ च्या तहानें फ्रान्सचें मोरोक्कोंत व ब्रिटिशांचें ईजिप्तमध्यें चळवळीचें क्षेत्र असल्याचें ठरलें. याच ठरावाला अनुसरून खेदीवाच्या जाहीरनाम्यानें १९०५ पासून ईजिप्त व परकीय रोखेवाले यांचे नवीन संबंध ठरले. या दोन्ही गोष्टींपासून बराच फायदा झाला. तहानें ब्रिटनचा ईजिप्तमध्यें शिरकाव होऊन त्याला यूरोपीय मान्यता मिळाली व फ्रेंच लोकांच्या विरोधापासून मुक्तता झाली. खेदीवाच्या जाहीरनाम्यानें कायसेदीलाडेटेची सत्ता कमी होऊन ईजिप्तला आर्थिक स्वातंत्र्य मिळालें. कर्जाची फेड होण्यासाठीं साऱ्याचा बराच भाग राखून ठेवण्यांत आला.

वरील तहानें एक बाबतींत मात्र फरक झाला नाहीं. ती म्हणजे तुर्कस्तानशीं झालेल्या तहानें म्हणजे कॅपीटयूलेशन पद्धतीनें यूरोपियन लोकांनां विशेष हक्क मिळाले होते ही होय. दिवाणी खटले मात्र 'मिश्र न्यायकोर्टां'च्या मार्फत चालत. फौजदारी खटल्यांत परराष्ट्रीय वकीलाचा अधिकार चाले. यूरोपियन लोकांच्या बाबतींत १५ राष्ट्रांच्या संमती शिवाय कायद्यांत फरक करणें शक्य नव्हते. अशा रीतीनें कॅपिटयूलेशन जाचक झालें होतें. लॉर्ड क्रोमरचें मत यूरोपियन लोकांचें एक कौन्सिल करवून त्यांच्याकडून कायदे पास करवून घ्यावे असें होतें.

१९०५–६ या वर्षी तुर्कांची कारस्थानें व मुसुलमानी धर्मवेड यांच्यामुळें बराच त्रास झाला. याच सुमारास एक पक्ष अस्तित्वांत आला.याचें म्हणणें 'ईजिप्त स्वराज्यासयोग्य असून फक्त ब्रिटिशांचा कांटा मार्गांत येतो.' असें होतें या पक्षाचा

अध्वर्यु मुस्तापा केमेलपाशा ( १८७४-१९०८ ) हा होता. या ' राष्ट्रीय ' पक्षानें ' इस्लाम धर्मांच्या ' चळवळीला प्रोत्साहन दिलें. या पक्षाच्या वर्तमानपत्रांनीं ईजिप्त सरकार सिनाई द्वीपकल्पांत किल्ले बांधून दमास्कस ते मक्केपर्यंत होणाऱ्या तुर्की रेल्वेला अडथळा आणणार आहे अशी हूल उठविली. यामुळें ' टाबा प्रकरण ' उपस्थित झालें तें पुढें दिलें आहे. यामुळें लोकांच्या मनांत धर्मवेड शिरलें आणि पत्रांतील लेखांमुळें सर्व ख्रिस्ती व यूरोपियन यांच्याविरुद्ध मतें झालीं, लोकांच्या मनांत दहशत उत्पन्न करून शांतता स्थापण्यासाठीं ब्रिटिश सैन्य वाढविण्यांत आलें. याच सुमारास डेनशवाई खेड्यांत ब्रिटिश सैन्यांतील ५ अधिकाऱ्यांनीं हुकुमाशिवाय कबुतरें मारलीं म्हणून लोकांनीं त्यांच्यावर हल्ला केला. यांत एक कामगार ठार होऊन दोन जखमी झाले. या प्रकरणाची चौकशी होऊन गुन्हेगारांस चांगलीच शिक्षा करण्यांत आली. यामुळें ईजिप्तमध्यें बरीच गडबड उडाली.

टाबा प्रकरण म्हणजे इ. स. १९०६ त सुलतानानें सिनाईवर दाखविलेला हक्क होय. याचें मूळ इ. स. १८९२ पासून उपस्थित झालें होतें. मेहमतअल्लीपासून ट्युफिकपर्यंत सिनाई व इतर जागा यांवर ईजिप्तचा अंमल चालत असे. परंतु अबासच्या वेळीं सुलताननें नवीन फर्मान काढून त्यांत जवळजवळ ईजिप्तचा सिनाई वरील हक्क उडविला. याच सुमारास ईजिप्तमधील धर्मवेड्या लोकांनीं ईजिप्शियन सरकार सिनाईंत तटबंदी करणार असल्याची गप्प उठविली. यामुळें तुर्कस्ताननें टाबा आपल्या ताब्यांत घेतलें. यामुळें बरीच गडबड झाली. अखेरीस ब्रिटिशसरकारनें खेदिवाची बाजू घेऊन निर्वाणीचा खलिता पाठविला. यामुळें सरहद्द ठरून तुर्क सैन्य टाबा येथून निघालें यामुळें ब्रिटिशांची चांगलीच छाप बसली. १९०७ मध्यें लॉर्ड क्रोमर यानें राजिनामा दिला. यानें २४ वर्षांच्या कारकीर्दींत ईजिप्तमध्यें फार सुधारणा घडवून आणली. इ. स. १८८३ तील ईजिप्त व १९०७ मधील ईजिप्त यांत जमीनअस्मानाचा फरक होता. याच्या मागून सर एल्डन गोर्स्ट याची नेमणूक झाली.

१९०७ मध्यें बऱ्याच कारणांनीं आर्थिक बाबतींत बराच घोटाळा झाला. तरी पण फेलाहिनची स्थिति चांगली होती. १९०८ मध्यें मुस्तापाकेमेल मरण पावला व डेनशवाई प्रकरणांतील लोकांना सोडण्यांत आलें. पुढें राष्ट्रीय पक्षांत बरीच दुफळी माजली व महंमदबे फरीद याला पुढारी म्हणून नेमण्यास बराच त्रास पडला. १९०८ सालीं कायदेकौन्सिल व सभासद सभेचे लोक इंग्लंडमध्यें गेले होते. त्यांना सर एडवर्ड ग्रे, परराष्ट्रीय मंत्री, यांनीं बरेंच आश्वासन दिलें.

इ. स. १९०८ मध्यें तुर्कस्तानमध्यें झालेल्या राज्यक्रांतीमुळें इजिप्तमधील राष्ट्रीय पक्षास आशा उत्पन्न झाली. परंतु त्यांना तरुण तुर्कांकडून फारसें उत्तेजन मिळालें नाहीं. ब्रिटिशांशीं सहकारित्व करण्याचाच त्यांना उलट सल्ला मिळाला. सर एल्डननें गोर्स्टनें एका पत्रांत ब्रिटिश सरकारचे उद्देश जाहीर करून ईजिप्तला सध्यां पार्लमेंटपद्धति चांगली नसल्याचें कळविलें. त्याचप्रमाणें म्युनिसिपालिटी वगैरे बाबतींत मात्र त्यांना बरीच स्वतंत्रता देण्यांत आली. नोव्हेंबर १९०८ मध्यें मुस्तापा फेहमीनें राजीनामा दिला व त्याच्या ऐवजी बुत्रासपाशा नांवाच्या काप्टाची नेमणूक झाली. याचें राष्ट्रीय पक्षाशीं वैमनस्य येऊन त्याचा १९१० त खून झाला.

**ई जि प्त चा १९०९-१९२१ प र्यं त चा अ र्वा ची न रा ज की य इ ति हा स.**—क्रोमरच्या जागीं १९०७ सालीं गोर्स्ट नेमून आला होता. तो ईजिप्तमधील लोकांना राज्यकारभारांत अधिकाधिक हक्क मिळत जावेत या मताचा हा असल्यानें आपल्या कारकीर्दींत त्यानें उदार धोरणाचा पुरस्कार केला. प्रांतिक कायदेमंडळांना बरेच हक्क देण्यांत आले. हे हक्क देऊं केल्यानें, इजिप्तमधील असंतोषाची लाट दबेल असें गोर्स्टला, वाटत होतें पण उलट ही असंतोषाची चळवळ अधिकच फैलावत चालली. सन १९१० च्या फेब्रुवारींत, बुत्रास घालीपाशा या प्रधानाचा एका तरुण राष्ट्रीय इजिप्शियनानें खून केला. इंग्लिशांसंबंधींच्या द्वेषाचें अधिकच प्रदर्शन होऊं लागलें. या परिस्थितीला आळा घालण्यासाठीं, गोर्स्टला कठोर उपाय योजण्याची शिफारस करावी लागली. तरुण राष्ट्रीय पक्षाचा पुढारी शेक अब्द-एल अझीझ शवीश याला हद्दपार करण्यांत आलें व तो बर्लिन येथें जाऊन राहिला. घालीपाशाच्या मृत्यूनंतर, महंमद सय्यदपाशा हा मुख्य मंत्री झाला. १९११ सालीं गोर्स्ट हा मरण पावल्यामुळें त्याच्या जागीं सुप्रसिद्ध लार्ड किचनेर याची नेमणूक झाली. लॉर्ड किचनेरनें अधिकार आपल्या ताब्यांत घेतला नाहीं तोंच इटली व तुर्कस्तान यांच्या दरम्यान युद्ध सुरू झालें. या युद्धांत ईजिप्त तटस्थ राहील असें किचनेरनें जाहीर केलें. पण तुर्कस्तानांतील जातभाईबद्दल ईजिप्तमधील मुसलमानांना जात्याच सहानुभूति वाटत असल्यामुळें, त्याना मनांतून ही गोष्ट पसंत नव्हती. त्यामुळें त्यांनीं बंडखोरीस सुरवात केली. १९१२ सालीं लॉर्ड किचनेर, महमदपाशा व खेदीव या तिघांना ठार करण्याचा गुप्त कट करण्यांत आला पण तो उघडकीस आला.

लॉर्ड किचनेर यानें, आपल्या कारकीर्दींत, इजिप्तमधील शेतकरीवर्गाच्या उन्नतीप्रीत्यर्थ बरीच चळवळ केली. पाक्षिसंरक्षक कायदा त्यानें अंमलांत आणला. १९१२ मध्यें, सार्वराष्ट्रीय-कापूस-काँग्रेस भरविली गेली. १९१३ मध्यें खेदिव व महंमदपाशा यांचें न जमल्यामुळें महंमदपाशा यानें राजीनामा दिला. त्याच्या जागीं हुसेन रशदीपाशा याची नेमणूक झाली. १९१३ सालीं, पूर्वीचें वरिष्ठकायदेमंडळ व प्रांतिक कायदेमंडळ यांचें एकाच कायदेमंडळांत रूपांतर करण्यांत आलें; व या मंडळास बरेच हक्क देण्यांत

आले. नवीन निवडणुकी झाल्या, त्यांमध्यें सय्यद झगलूल-पाशा हा प्रचंड बहुमतानें निवडला गेला व लोकांच्या तर्फे त्याला अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आलें. ईजिप्तच्या स्वातंत्र्याचा हा पक्का कैवारी होता. त्यामुळें त्यानें, लॉर्ड किचनेर याच्यावर व ब्रिटिशांच्या ईजिप्तविषयक धोरणावर खरमरीत टीका करण्यास सुरवात केली. व या कामीं त्याला खेदिवाचीहि फूस मिळूं लागली.

याच सुमारास यूरोपमध्यें महायुद्ध सुरू झालें. लॉर्ड किचनेरला इंग्लंडमध्यें बोलावण्यांत आलें व त्याला ब्रिटिश सैन्याचा मुख्य सेनापति निवडण्यांत आलें. १९१४ सालीं ईजिप्तमधील जर्मन, ऑस्ट्रेलियन वगैरे शत्रुपक्षीय लोकांनां हांकलण्यांत आलें. ईजिप्तमध्यें लष्करी कायदा पुकारला गेला. पुढें कांहीं दिवसांनीं तुर्कस्तान हें जर्मनीला मिळालें. तेव्हां ईजिप्तमधील लोक कदाचित बंड करतील या समजुतीनें एक जाहीरनामा काढण्यांत आला. त्यांत असें जाहीर करण्यांत आलें होतें कीं, 'या युद्धांत ईजिप्शियन लोकांनां भाग घेण्याची सक्ती करण्यांत येणार नाहीं.' पण ईजिप्तमधील लोकांनीं आपण होऊनच स्वयंसेवक पथकें उभारून, ब्रिटिशांनां मदत केली.

ईजिप्तचे सुलतान हे तुर्कस्तानचे मांडलिक असल्यामुळें, व इंग्लंडविरुद्ध तुर्कांनीं हत्यार उपसल्यामुळें, ईजिप्तची व्यवस्था लावून टाकणें इंग्लंडला भाग पडलें. ईजिप्त हें ब्रिटिश साम्राज्याला जोडण्यांत यावें अशी एक कल्पना पुढें आली. पण विचारांतीं, ईजिप्तला आपल्या संरक्षणाखालीं घ्यावयाचें ठरवून 'ईजिप्त हें तुर्कस्तानच्या ताब्यांतून काढून घेतलें असून तें ब्रिटिशांचें संरक्षित संस्थान झालें आहे व त्याच्या संरक्षणार्थ इंग्लंड हें शक्य तितकी काळजी घेईल' असा जाहीरनामा इंग्लंडनें काढला. लगेच दुसरे दिवशीं 'ईजिप्तचा खेदिव अब्बास हिल्मी हा कॉन्स्टांटिनोपलमध्यें असून तो ब्रिटिशांविरुद्ध तुर्कस्तानला मदत करतो आहे अशी शंका आल्यामुळें, त्याला पदच्युत करण्यांत आलें आहे अशा अर्थाचा दुसरा एक जाहीरनामा काढण्यांत आला. त्याच्या जागीं, प्रिन्स हुसेन कॅमेल हा गादीवर आला. पण तुर्कस्तानला जरी युद्धाच्या बाबतींत ईजिप्तमधील मुसुलमानांनीं मदत केली नाहीं तरी पण खिलाफतवर जें संकट येऊं पहात होतें त्या बाबतींत त्यांनां मुळींच स्वस्थ बसवेना; आणि महायुद्धानंतर ईजिप्तला स्वातंत्र्य देण्याचें जर्मन एजंटांनीं अभिवचन दिलें होतें, तिकडेहि कानाडोळा करवेना अशी त्यांची चमत्कारिक स्थिति झाली होती.

ईजिप्त हें संरक्षित संस्थान म्हणून ठरल्यामुळें त्याची व्यवस्था पाहण्याकरितां, इंग्लंडनें सर एच मॅकमोहन याची हायकमिशनर म्हणून नेमणूक केली.याच्याच ताब्यांत परराष्ट्रमंत्र्याचीं सूत्रें आपोआपच आल्यामुळें, ईजिप्तचा पूर्वीचा परराष्ट्रमंत्री, याला आपल्या अधिकाराचा राजीनामा द्यावा लागला.

महायुद्धामध्यें ईजिप्तमधील पुष्कळ ब्रिटिश अधिकाऱ्यांनां युद्धावर जावें लागलें; ही संधि साधून,लोकपक्षीय पुढाऱ्यांनीं राष्ट्रीय चळवळ फैलावण्यास सुरवात केली.त्यांतच इंग्लंडच्या हितशत्रूंनीं वाटेल त्या भलत्या सलत्या कंड्या पिकवून ब्रिटिशांच्या विरुद्ध लोकांचीं मनें चिथावून टाकलीं. सिव्हिल सर्व्हिसमधील ईजिप्शियन लोकांनां, ब्रिटिश सिव्हिल सर्व्हंट हे आपल्या मार्गांतील अडथळे आहेत असें वाटत असे. या कारणानें हेहि या लोकांच्या चळवळींत सामील झाले. वकील वर्ग व विद्यार्थी वर्ग यांनींहि या चळवळींत प्रमुखपणें भाग घेण्यास सुरुवात केली. ख्रिश्चन लोकांच्या ताब्यांत मुसुलमानांनीं काय म्हणून रहावें;त्यांच्या ताब्यांतून स्वतःला सोडवून घेतलेंच पाहिजे अशा प्रकारची विचारसरणी तरुण ईजिप्तच्या डोक्यांत घोळूं लागली.

इ.स.१९१६च्या डिसेंबरमध्यें, सर रेजिनाल्ड विंगेट यांची हायकमिशनरच्या जागीं नेमणूक झाली. १९१४ पासून सुलतान हुसेनची प्रकृति बिघडलेली होती; ती सुधारण्याचीं लक्षणें दिसेनात.त्यामुळें त्याच्या पाठीमागून कोणाला गादीवर बसवावें यासंबंधींचा प्रश्न उपस्थित झाला.यावर बरीच भवति न भवति होऊन शेवटीं खेदिव इस्मायलचा सहावा मुलगा अहमद फुअद हा वारस म्हणून ठरविण्यांत आला;व १९१७ सालीं सुलतान हुसेन वारल्यानंतर अहमद हा गादीवर आला.

महायुद्धानंतर,प्रेसिडेंट वुइल्सन यानें जीं चौदा तत्त्वें पुकारलीं होतीं त्यांचा ईजिप्तच्या सुशिक्षित जनतेवर फार परिणाम झाला होता. ईजिप्त हें संरक्षित संस्थान म्हणून कायमचें आमच्या ताब्यांत आम्हीं ठेवूं इच्छित नाहीं असें इंग्लिश मंत्र्यांनीं वारंवार आश्वासन दिलें होतें. तें आश्वासन पुरें करण्याची वेळ आली असून ईजिप्तला स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें, स्वतंत्रता देण्यांत आली पाहिजे असें ईजिप्तमधील मवाळ, जहाल वगैरे सर्व पक्षांचें मत बनूं लागलें. नोव्हेंबर १९१८ मध्यें, इंग्रज व फ्रेंच यांनीं असा जाहीरनामा काढला कीं, 'तुर्की अंमलाखालीं, प्रजेच्या हक्कावर जो घाला आला होता तो नाहींसा करून लोकमतानुसार राज्यकारभार चालविण्याचें धोरण प्रस्थापित करण्यांत येईल.' या जाहीरनाम्याला अनुसरून ईजिप्तला स्वयंनिर्णयाचे हक्क मिळालेच पाहिजेत असें ईजिप्तमधील लोकांनां वाटूं लागल्यास यांत आश्चर्य नाहीं. अशा रीतीनें लोकमताचा वारा वाहूं लागला असतां, तत्पूर्वी कांहीं दिवस, ईजिप्तच्या कायदेमंडळाच्या पुनर्घटनेसंबंधीं विचार करण्याकरितां, एक कमिशन बसलें होतें, त्याचा अभिप्राय याच सुमारास प्रसिद्ध झाला. त्या अभिप्रायाप्रमाणें पुनर्घटना घडून आल्यास, कायदेमंडळाच्या ताब्यांत कायदे करण्याची सत्ता मुळींच राहणार नाहीं व परकीयांचें बहुमत असलेल्या सीनेटच्या ताब्यांत ती सत्ता जाऊन ईजिप्तचें नुकसान झाल्याशिवाय रहाणार नाहीं असें ईजिप्तला वाटूं लागलें व त्याच्या निषेधार्थ त्यांनीं जाहीर सभा

भरविल्या व लोकमत प्रक्षुब्ध केलें. राष्ट्रीय पक्षानें आपल्या पक्षाची उत्तम रीतीनें संघटना करून झगलूल पाशाला आपला पुढारी निवडलें. त्यानें लगेच हायकमिशनरची गांठ घेऊन, ईजिप्तच्या स्वातंत्र्याची कल्पना इंग्लंडमध्यें प्रस्तुत करण्यासाठीं लंडनला जाण्याची इच्छा दर्शविली. पण हायकमिशनरला तें पसंत पडलें नाहीं. त्याच वेळीं ईजिप्तसंबंधीं पुढील विचार करण्याकरितां सुलतानच्या संमतीनें प्रधानानें लंडनला जाण्याचा बेत केला; पण इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री व इतर मंत्री हे शांततापरिषदेला जाणार असल्यामुळें ईजिप्तसंबंधीं वाटाघाट करण्यास त्यांनां अवसर सांपडणार नाहीं. तेव्हां यावेळीं जाण्याचा कांहीं उपयोग नाहीं असें हायकमिशनर यांनीं ईजिप्तच्या प्रधानाला कळविलें. यामुळें चिडून जाऊन रशदीपाशा व अदलीपाशा या दोघांनीं राजीनामे दिले. राजीनामे परत घेण्याविषयीं त्यांनां विनंति करण्यांत आली पण त्यांनीं राजीनामे परत घेतले नाहींत. अशी स्थिति पहातांच इंग्लंडच्या प्रधानमंडळानें हायकमिशनर यास ईजिप्शियन प्रश्नासंबंधीं सल्ला देण्यास बोलाविलें. हाय कमिशनरनें राष्ट्रीय चळवळीवरील दडपण काढून टाकण्याचा व ईजिप्तच्या प्रधानमंडळाला लंडनला बोलावण्याचा सल्ला दिला. पण ईजिप्तनें प्रधानमंडळ, झगलूल व त्याचे अनुयायी यांनां लंडनला जाण्याची परवानगी दिल्याशिवाय लंडनला जाण्यास तयार होईना. झगलूलनें तर ब्रिटिशांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध करण्याची जंगी चळवळ चालविली होती, त्यामुळें झगलूलला परवानगी देणें अशक्य होतें व इंग्लंडच्या प्रधानमंडळानें तर ईजिप्तच्या प्रधानमंडळाला आमंत्रण केलें होतें. अशी विलक्षण स्थिति प्राप्त झाली असतां, हायकमिशनरला अशी बातमी लागली कीं, झगलूल व त्याच्या पक्षानें ईजिप्तला स्वातंत्र्य मिळावें यासाठीं परराष्ट्रांपुढें आपल्या मागणीचा खलिता ठेवण्याचा बेत केला आहे. ही बातमी अगदीं खरी होती. तसेंच झगलूलपाशानें सुलतानकडे 'ईजिप्त हें स्वतंत्र राष्ट्र आहे व त्यानें ब्रिटिशांपासून स्वतंत्र होण्याचें ठरविलें आहे' अशा अर्थाचा अर्ज पाठविला होता. अर्थातच हायकमिशनरला कठोर उपायांचा अवलंब करणें भाग पडलें. मार्चच्या आठव्या तारखेला झगलूल व त्याच्या हाताखालील तीन प्रमुख पुढारी यांनां पकडून माल्टा येथें पाठवण्यांत आलें.

झगलूल पाशाच्या अटकेची बातमी समजतांच, लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं. विद्यार्थ्यांनीं कायरोमध्यें ब्रिटिशांबद्दलच्या द्वेषाचें निरनिराळ्या तऱ्हेनें प्रदर्शन केलें. टँटा येथें व ईजिप्तच्या नदीमुखप्रदेशामध्यें बंडाळी माजली. रेल्वेचे रूळ उखडण्यांत आले. कायरो येथील रूळ व तारांचा विध्वंस करण्यांत आला. मार्चच्या १८ तारखेला लोकांनीं चिडून जाऊन डिरत येथें कांहीं ब्रिटिश अधिकाऱ्यांचे खून केले. ईजिप्तमधील शेतकरीवर्ग सुद्धां या बंडाळींत सामील झाला. महायुद्धांत त्यांच्यावर सैन्यांत सामील होण्यासाठीं जुलूम करण्यांत आला होता; व त्यामुळें तेहि असंतुष्ट झाले होते.

या परिस्थितीला आळा घालून, ब्रिटिशांचें हित संरक्षण करण्यासाठीं लॉर्ड अलेनबी यास हाय कमीशनर म्हणून धाडण्यांत आलें. लॉर्ड अलेनबी यानें समेटाचें धोरण स्वीकारून, ईजिप्शियन राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीवरील दडपण काढून टाकलें. झगलूलचीहि बंधमुक्तता झाली. तो थेट पॅरिस येथें आला. पण तो ज्या दिवशीं पॅरिसमध्यें उतरला त्याच दिवशीं, 'ईजिप्त हें ब्रिटिशांचें संरक्षित संस्थान आहे' या म्हणण्याला प्रेसिडेंट विल्सन यानें संमति दिली. शांतता परिषदेपुढें आपलें म्हणणें मांडण्यासाठीं त्यानें पुष्कळ प्रयत्न केले पण त्याला यश आलें नाहीं.

लॉर्ड अलेनबी यानें ईजिप्तमधील बंडाळी मोडण्यासाठीं कंबर बांधली. बंडखोर लोकांनां त्यानें चांगली दहशत बसविण्याचा प्रयत्न केला पण सर्व अधिकारीवर्गानें याचा निषेध म्हणून संप करण्याचें ठरविलें. हा संप कांहीं दिवस टिकला पण त्याचा परिणाम विशेष झाला नाहीं. या असंतोषाच्या कारणांची चौकशी करून त्याच्यावर अभिप्राय देण्यासाठीं इंग्रज सरकारनें मिल्नरच्या अध्यक्षतेखालीं एक मंडळ नेमलें. इकडे राष्ट्रीयपक्ष हा ब्रिटिशांविरुद्ध असंतोष पसरविण्याचें काम सारखें करीतच होता. तसेंच या मिल्नर कमीशनवर बहिष्कार घालण्यासाठींहि या पक्षानें जोरानें चळवळ चालविली होती.

मिल्नर साहेब आपल्या कमिटीसह डिसेंबर १९१९ मध्यें ईजिप्तमध्यें येऊन पोहोंचले. या कमिटीचें संरक्षण करण्यासाठीं शक्य ती खबरदारी घेण्यांत आली होती. ईजिप्तमधील लोकपक्षाच्या पुढाऱ्यांनींहि या कमिटीवर बहिष्कार घालण्याचे कसून प्रयत्न चालविले होते. ईजिप्तमधील प्रसिद्ध पुढाऱ्यांनीं या कमिशनपुढें आपलें म्हणणें मांडण्यास जाऊं नये या साठींहि लोकांनीं खटपट चालविली होती. लोकांनीं संप पुकारला होता; व रस्त्यामधून त्यांनीं दंगाधोपा सुरू केला होता. या चळवळींत पुष्कळ बायकांनींहि भाग घेतला होता. कोणता पुढारी साक्षीला जातो याच्यावर टेहेळणी ठेवण्यांत आली होती व त्याची वर्तमानपत्रांतून नाचक्की करण्यांत येत होती. टँटा येथें कमिटी आली असतांना तेथेंहि दंगे झाले व ते लष्कराच्या मदतीनें, शमविण्यांत आले. कायरोमध्यें कमिटी बसली असतांना तेथेंहि दंगा होऊन ईजिप्तच्या प्रधानमंडळावर बाँब फेकण्याचा प्रयत्न करण्यांत आला. कायरो येथील अल-अझर विश्वविद्यालयानें ईजिप्तचा पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचा हक्क आहे अशा अर्थाचा खलिता मिल्नर कमिशनकडे पाठवला. ईजिप्त हें संरक्षित संस्थान यापुढें राहूं नये अशा अर्थाचें पत्र खेदिवाच्या राजघराण्यांतील सहा राजपुत्रांनींहि मिल्नरकडे रवाना केलें.

मिल्नर कमिटी ही अलेक्झांड्रिया येथें चौकशीला गेली. तेथील प्रसिद्ध फ्रेंच, इटालियन व ग्रीक लोकांच्या साक्षी घेण्यांत आल्या. ब्रिटिश व्यापारीसंघाच्या अध्यक्षाचेंहि म्हणणें ऐकून घेण्यांत आलें. राज्यकारभारांतील प्रत्येक खात्याची या कमीटिनें बारीक तपासणी केली. अशा रीतीनें सर्व माहिती काढून घेऊन हें कमिशन आपला रिपोर्ट लिहिण्याकरतां लंडन येथें परत आलें. याच वेळीं, ईजिप्तमधील लोकपक्षीय पुढाऱ्यांचें मंडळ पॅरिस येथें गेलें होतें. या मंडळाची, व मिल्नर कमिटीची मुलाखत घडून येण्याची संधि अडलीपाशाच्या मध्यस्थीनें प्राप्त झाली. झगलूल व त्याचें मंडळ हें मिल्नर कमिटीकडे आपलें म्हणणें मांडण्याकरतां लंडन येथें आलें. दोन्ही मंडळांमध्यें बरेच दिवस चर्चा चालून दोघांच्या संमतीनें, ईजिप्तच्या पुढील राज्यव्यवस्थेसंबंधींची एक सर्वसाधारण रूपरेषा आंखण्यांत आली. ही रूपरेषा लोकांनां पसंत पडल्यास तिच्यावर आपण सही करूं असें झगलूलनें मिल्नरला कळविलें व लोकांची याला संमति घेण्याकरतां त्यानें, आपल्या पैकीं चार जणांनां ईजिप्तला रवाना केलें. मिल्नर व झगलूल यांनीं आपल्या मंडळाच्या संमतीनें जो खर्डा तयार केला होता त्यांतील आशय पुढील प्रमाणें होता.

'ईजिप्तचें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यासाठीं इंग्लंड व ईजिप्तमधील, पुढील संबंध मुक्रर करणें अत्यवश्यक आहे. यासाठीं खालील गोष्टी करण्यांत याव्या.

'ग्रेटब्रिटन व ईजिप्तमध्यें सलोख्याचा तह होऊन त्या तहान्वयें इंग्लंडनें, ईजिप्तमध्यें प्रातिनिधिक एकसत्ताक राज्यपद्धतीची स्थापना करून, ईजिप्त हें स्वतंत्र राष्ट्र मानावें; व ईजिप्तनें इंग्लंडच्या ईजिप्तमधील हितसंबंधाला कोणत्याहि तऱ्हेनें धोका न पोंहोचेल अशी खबरदारी घ्यावी. परराष्ट्राशीं ग्रेटब्रिटननें युद्ध पुकारल्यास ईजिप्तनें ग्रेटब्रिटनला मदत केली पाहिजे. परराष्ट्रांत ईजिप्तला आपले वकील ठेवण्याचा अधिकार असावा. ग्रेटब्रिटनच्या हितसंबंधाच्या विरुद्ध व ग्रेटब्रिटन व ईजिप्त मधील सलोख्याच्या तहाविरुद्ध कोणतेंहि धोरण ईजिप्तनें ठेवतां कामा नये. ब्रिटिशांचें लष्कर, आपल्या हितसंबंधांचें संरक्षण करण्यासाठीं ईजिप्तमध्यें राहील. ईजिप्तनें आपल्या न्याय खात्यांत, एक ब्रिटिश न्यायमंत्री नेमावा व ग्रेटब्रिटनच्या संमतीनें फडणिसाच्या जागेवर एक अधिकारी नेमावा. परकीयांच्या विरुद्ध ईजिप्तनें कायदा पसार केला तर त्यांत ढवळाढवळ करण्याचा ग्रेटब्रिटनला पूर्ण हक्क असावा." याखेरीज परधर्मसहिष्णुता, परकीयांच्या हक्कांचें संरक्षण वगैरे बाबतींसंबंधींहि या खर्ड्यांत पुष्कळ सूचना आहेत.

हा खर्डा ईजिप्तमधील लोकांनां साधारणतः पसंत पडला असें म्हणावयास हरकत नाहीं. लोकांची या खर्ड्याला संमति आहे हें कळविण्यासाठीं, झगलूलचे चार प्रतिनिधी पुन्हां लंडन येथें परत आले, यानंतर किरकोळ चर्चा होऊन झगलूलचें मंडळ ईजिप्तकडे यावयास निघालें, निघतांना ईजिप्त हें संरक्षित संस्थान म्हणून यापुढें राहतां कामा नये, व तें स्वतंत्र गणण्यांत यावें ही हमी जर इंग्लंड न घेईल तर नुकताच तयार करण्यांत आलेला खर्डा कुचकामाचा ठरेल असें झगलूलनें मिल्नरला बजावलें. यानंतर मिल्नर साहेबांनीं परराष्ट्रमंत्र्याकडे आपला रिपोर्ट, ९ डिसेंबर १९२० रोजीं पाठविला व तो पार्लमेंटपुढें १ जानेवारी १९२१ रोजीं ठेवण्यांत आला.

या रिपोर्टचें अरबी भाषेमध्यें भाषांतर झालें. लोकांनाहि तो रिपोर्ट सर्वसाधारण रीतीनें पसंत पडला. अडलीपाशा यानें संयुक्त प्रधानमंडळ बनविलें. थोड्याच दिवसांनीं इंग्रज सरकारतर्फे असें जाहीर करण्यांत आलें कीं, 'मिलनर कमिटीचा अभिप्राय वाचून त्यावर विचार केल्यानंतर, इंग्रज सरकारला असें आढळून आलें आहे कीं, यापुढें ईजिप्त हें ब्रिटिशांचें संरक्षित संस्थान म्हणून रहाणें युक्त नाहीं. यापुढें ईजिप्त व इंग्लंड यांमध्यें कोणत्याप्रकारचें नातें असावें यासंबंधीं, सुलताननें निवडून दिलेल्या प्रतिनिधींशीं चर्चा करण्याची सरकारची इच्छा आहे.

झगलूलपाशा हा पॅरिसहून एप्रिलच्या ५ तारखेस ईजिप्तमध्यें आला. त्याचें लोकांनीं अपूर्व तऱ्हेनें स्वागत केलें. अडलीपाशानें जें संयुक्त प्रधानमंडळ बनविलें होतें त्याला विरोध करण्याची त्यानें चळवळ सुरू केली. तसेंच सुलताननें ग्रेटब्रिटनशीं ईजिप्तचें नातें काय असावें यासंबंधीं चर्चा करण्याकरितां जें प्रतिनिधिमंडळ निवडावयाचें होतें त्यांत झगलूलला एक जागा देण्यांत आली; पण या प्रतिनिधि मंडळाचे अध्यक्ष आपणाला निवडल्यास आपण प्रतिनिधि मंडळांत सामील होऊं असें झगलूलनें सुलतानास कळविलें. झगलूलचें हें करणें, त्याच्याच कित्येक अनुयायांनां पसंत पडलें नाहीं. तरी पण तिकडे लक्ष न देतां, या प्रतिनिधि मंडळानें इंग्लंडला चर्चा करण्याकरितां जाऊं नये, यासंबंधीं त्यानें जोरानें चळवळ सुरू केली. या बाबतींत ईजिप्तमधील मवाळ लोकांनीं त्याला विरोध केला; पण जहाल पक्षानें मात्र झगलूलला पाठिंबा दिला. झगलूलनें याचा पूर्ण फायदा घेऊन, या प्रतिनिधींच्या जाण्याविरुद्ध मोठमोठ्या सभा भरविल्या. कायरो व अलेक्झांड्रियामध्यें लोकांनीं दंगे करण्यास सुरवात केली. यूरोपियन लोकांवरच या लोकांचा मुख्य रोख दिसून येत होता. अलेक्झांड्रियामध्यें या दंग्याला फारच उग्र स्वरूप आलें; त्यामुळें लष्कराची मदत घेणें जरूर झालें. या दंग्यांत ६८ ईजिप्शियन व १९ युरोपियन ठार झाले आणि १६२ ईजिप्शियन व ६६ यूरोपियन जखमी झाले. झगलूल पाशानें या झालेल्या प्रकाराबद्दल खेद व्यक्त केला, पण संयुक्त प्रधानमंडळाविरुद्ध तसेंच प्रतिनिधी पाठवण्याविरुद्ध चळवळ चालूच ठेवली व फार जहाल भाषणें करण्यास सुरवात केली. त्यामुळें, या दंगेखोरांचा व झगलूल

पाशाचा अप्रत्यक्ष संबंध जोडण्यांत येऊं लागला. १९२१ च्या हेमंत ऋतूमध्यें अडलीपाशा हा ईजिप्तच्या भावी घटनेसंबंधीं पार्लमेंटशीं चर्चा करण्याकरितां लंडन येथें गेला. पण त्या चर्चेत कांहींच निष्पन्न न होतां तो ईजिप्तमध्यें परत आला. ब्रिटिश प्रधानमंडळाचें हें अरेरावी व बिन मुत्सद्दीगिरीचें धोरण खुद्द लंडन टाइम्सलाहि पसंत पडलें नाहीं. ब्रिटिश प्रधानमंडळाच्या या धोरणाचा झगलूल पाशानें व त्याच्या अनुयायांनीं जाहीर रीतीनें निषेध केला. झगलूलनें महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीच्या दिशेबरहुकूम ईजिप्तमध्येंहि असहकारितेची चळवळ सुरू केली. लोअर ईजिप्तमध्यें बंडाळी माजली. कायरो येथील विद्यार्थ्यांनीं, सरकारी शाळा ओस पाडल्या यामुळें ईजिप्तमध्यें पुन्हां लष्करी कायदा पुकारण्यांत आला.

अडलीपाशानें प्रधानपदाचा राजीनामा दिल्यामुळें, सरवत पाशाला प्रधानपदाचा स्वीकार करण्याची विनंति करण्यांत आली, पण त्यानें कांहीं अटींवर प्रधानपदाचा स्वीकार करण्याचें कबूल केलें. यांपैकीं मुख्य अटी अशा होत्या. संरक्षित संस्थान या नात्यानें ईजिप्तनें यापुढें राहूं नये. ईजिप्तचें परराष्ट्रखातें स्थापण्यांत यावें; ईजिप्तच्या शासनसंस्थेंत लोकनियुक्तांचाच भरणा असावा. लष्करी कायदा रद्द करण्यांत यावा. परदेशीय अंमलदारांच्या जागीं ईजिप्तमधील ईजिप्शियन अंमलदार नेमण्यांत यावेत. या अटींना मान्यता मिळाल्यामुळें सरवतपाशा हा प्रधान झाला. असहकारितेचे जे आठ प्रणेते त्यांनां पकडण्यांत आलें व झगलूलपाशाच्या बाजूचीं जीं वर्तमानपत्रें होतीं तीं बंद पाडण्यांत आलीं. झगलूलपाशाला हद्दपारीची शिक्षा दिली गेली.

लॉर्ड अलेनबीनें आपली एक योजना पुढें आणली होती. तींत लष्करी कायदा रद्द करण्यांत यावा अशी त्यानें शिफारस केली होती. लॉर्ड अलेनबी यानें जी आपली योजना पुढें मांडली होती, ती साधारणतः ईजिप्तमधील ब्रिटिश लोकांनां पसंत पडण्यासारखीच होती. फेब्रुवारी १९२२मध्यें, ब्रिटिश पार्लमेंटनें अलेनबीच्या सूचना कबूल करून, ईजिप्तची नवीन घटना करण्याचें ठरविलें, तरी पण ईजिप्तमधील झगलूल पाशाच्या जहाल पक्षानें दंगा धोपा करण्यास सुरवात केली, त्यामुळें थोडें फार हक्क मिळतील अशी जी आशा होती तीहि दुरावण्याचा रंग दिसूं लागला. शेवटीं १९२२ च्या फेब्रुवारीच्या २८ तारखेस ब्रिटिश सरकार व ईजिप्तचा सुलतान यांमध्यें पुढील अटींवर करारनामा झाला. ( १ ) ईजिप्त हें यापुढें संरक्षित संस्थान म्हणून न राहतां तें स्वतंत्र राष्ट्र म्हणून मानलें जाईल. ( २ ) इंग्रज सरकार ज्यावेळीं ईजिप्शियन रहिवाश्यांनां उद्देशून, माफीचा कायदा पास करील त्यावेळीं तावडतोब, लष्करी कायदा रद्द करण्यांत येईल. ( ३ ) ईजिप्त मधील साम्राज्यविषयक दळणवळणाचीं साधनें ब्रिटिशांच्या ताब्यांत राहतील; त्याचप्रमाणें परराष्ट्रांचा ईजिप्तमध्यें शिरकाव होऊं लागल्यास ईजिप्तचें संरक्षण करण्याचा हक्क ब्रिटिश सरकारकडे राहील, तसेंच परराष्ट्रीय हितसंबंध व अल्पसंख्याकांचे हितसंबध रक्षण करण्याचा हक्क ब्रिटिश सरकारकडे राहील.

या अटींना ईजिप्शियन लोक प्रतिकूल नव्हते. त्यामुळें या अटींवर करारनामा होऊन १६ मार्च १९२२ रोजीं ईजिप्तला स्वातंत्र्य मिळालें. सुलताननें ‘ ईजिप्तचा राजा’ ही पदवी धारण केली.

ईजिप्तला स्वातंत्र्य मिळतांच, ईजिप्त सरकारनें, निरनिराळया महत्त्वाच्या खात्यांवर जे ब्रिटिश अधिकारी होते त्यांनां काढून त्या जागीं ईजिप्शियन लोक नेमले. ईजिप्शियन पीनलकोडची दुरुस्ती करण्यांत आली. नवीन नवीन सुधारणा करण्यांत आल्या. तरी पण अद्यापि ईजिप्तमधील असंतोषाची लाट पूर्णपणें दबली नव्हती. ईजिप्तला जें स्वातंत्र्य मिळालें तें तुजबी स्वातंत्र्य असून, खरें स्वातंत्र्य अद्यापि मिळालेंच नाहीं असें जहाल पक्षीय मंडळी प्रतिपादन करीत होती. शिवाय झगलूल पाशाला हद्दपारी झाली असल्यामुळेंहि लोकांत असंतोष माजला होता व त्याला परत ईजिप्तमध्यें आणण्यासंबंधींची चळवळ चालू होती. त्यांतच ईजिप्तच्या राजाची आंतून झगलूलपाशाबद्दल सहानुभूति होती. अर्थातच अशा स्थितींत सरवतपाशाला आपल्या मंत्रिमंडळासह राजीनामा देणें भाग पडलें. यानंतर टेवफिक नेसीम यानें आपलें मंत्रिमंडळ बनविलें, पण तेंहि लवकरच मोडलें जाऊन, त्याच्या जागीं येहिया इब्राहिमचें प्रधानमंडळ अस्तित्वांत आलें. इकडे झगलूलपाशाच्या सुटकेबद्दल तर जहाल पक्षानें प्रचंड चळवळ चालविली होती. त्या चळवळीला यश येऊन १९२३ च्या एप्रिल महिन्यांत झगलूलपाशाची सुटका झाली.

सन १९२३ मध्यें ईजिप्तच्या राज्यशासनपद्धतीची पुनर्घटना होऊन ईजिप्त हें पूर्ण स्वतंत्र राष्ट्र बनलें. इस्लाम हा राष्ट्रधर्म म्हणून जाहीर करण्यांत आला. दरबारची भाषा अरबी ठरविण्यांत आली. सक्तीचें व मोफत प्राथमिक शिक्षण, मुलामुलींना दिलें जाईल असें प्रसिद्ध करण्यांत आलें. १८ वर्षांच्या आंत मुलांचा व १६ वर्षांच्या आंत मुलींचा विवाह करण्यास कायद्यानें प्रतिबंध करण्यांत आला. याला मुख्य कारण म्हणजे १९२१ सालीं स्थापन झालेल्या ‘ वीमेन्स यूनियन ’ ची चळवळ होय. सुदानचा दर्जा मात्र काय असावा हें या पुनर्घटनेंत ठरविलें गेलें नाहीं. सुदान हें ईजिप्तच्या राजाच्याच ताब्यांत असणें अत्यंत जरूर आहे असें जहाल पक्षाला पूर्णपणें वाटत होतें. त्यामुळें वरील पुनर्घटनेसंबंधीं त्यांनीं नापसंती दर्शविली. तरी पण सर्व साधारण लोकमत या पुनर्घटनेला विरुद्ध नव्हतें. जून १९२३ मध्यें ‘ ॲम्निटी ॲक्ट ’ मंजूर झाल्यामुळें व लष्करी

कायदा रद्द करण्यांत आल्यामुळें, अडीचशें ईजिप्शियन लोकांनां मुक्तता मिळाली. १९२४ च्या जानेवारींत बहुपत्नी-कत्वाच्या चालीस प्रतिबंधक असा कायदा करण्यांत आला. याच वर्षाच्या जानेवारी महिन्याच्या अखेरीस झगलूलपाशा हा प्रधान झाला. इजिप्तचें पहिलें राष्ट्रीय पार्लमेंट १९२४ च्या मार्चमध्यें उघडलें. ब्रिटनशीं सख्य ठेवण्याच्या आवश्यकतेचें धोरण त्यावेळीं जाहीर करण्यांत आलें.

[संदर्भ ग्रंथ.—जी. एबर्स—ईजिप्त, डिस्क्रिप्टिव्ह, हिस्टॉरिकल, पिक्चरेस्क ( भाषांतरकार—क्लॅरा बेल २ भाग लंडन १८८७ ); बर्च—ईजिप्त फ्रॉम दि अर्लिएस्ट टाइम्स टु बी. सी. ३००; केली—ईजिप्त, पेंटेड अँड डिस्क्राइब्ड; ए. बी. एडवर्ड्स—ए थाउजंड माइल्स अप दि नाइल ( लंडन—१८८९ ); एडवर्ड्स—फॅरोआज, फेलाहज अँड एक्सप्लोअरर्स ( लंडन १८९२ ); मॉर्डन—जिऑग्रफी ऑफ ईजिप्त ( लंडन १९०२ ); वॉर्ड—पिरॅमिड्स अँड प्रोग्रेस (१९००); वुइलकॉक्स—ईजिप्शियन इरिगेशन ( १८९९ ); लेकॅने—दि मीटिऑरॉलजी ऑफ ईजिप्त अँड इट्स इन्फ्लुएन्स ऑन डिसीज ( १८९७ ); कॅप्टन जी. ई.—शेले-बर्ड्स ऑफ ईजिप्त ( लंडन १८७२ ); लेडी डफ गॉर्डन—लेटर्स फ्रॉम ईजिप्त ( लंडन १९०२ ); लेन्स—मॅनर्स ॲण्ड कस्टम्स ऑफ दि मॉडर्न ईजिप्शिअन्स ( लंडन १८६० ); लेन पूल—सोशल लाइफ इन ईजिप्त ( १८८४ ); सेंट जॉन—व्हिलेज लाइफ इन ईजिप्त ( २ भाग १८५२ ); विल्किन्सन—मॅनर्स अँड कस्टम्स ऑफ एन्शंट ईजिप्शियन्स; ईजिप्शियन इन दि टाइम ऑफ फॅरोआज; विलमोर—दि स्पोकन ॲरेबिक ऑफ ईजिप्त (द्वितीय आवृत्ति लंडन १९०५); नाइट—अकाउंट्स ऑफ दि गॉड्स, ॲम्युलेटस एटसेट्रा ऑफ दि एन्शंट ईजिप्शियन्स; इजिप्टॉलॉजिकल रीसर्चेस ( वॉशिंग्टन १९०६ ); थॉम्सन अँड, रँडाल मॅक इव्हर—एन्शंट रेसेस ऑफ थीबेड ( ऑक्सफोर्ड १९०५ ); अर्मन-लाइफ इन एन्शंट ईजिप्त (भाषांतरकार-एच.एम. टिरार्ड लंडन १८९४); मॅस्पेरो लाइफ-इन एनशंट ईजिप्त अँड असीरिया (भाषांतरकार मॉर्टन लंडन १८९२) स्टीनडॉर्फ—एन्शंट रिलिजन ऑफ इजिप्शियन्स; वीडेमॅन रिलिजन ऑफ एन्शंट ईजिप्शियन्स; टीले—हिस्टरी ऑफ ईजिप्शियन रिलिजन ( ट्रुब्नर ओरिएंटल सीरीज ); मॅस्पेरो—मॅन्युअल ऑफ ईजिप्शियन अर्केऑलजी आणि ईजिप्शियन आर्ट—स्टडीज; शार्प—ईजिप्शियन ॲंटिक्विटीज इन दि ब्रिटिश म्यूझियम; फोडेन अँड फ्लेचर. टेक्स्ट बुक ऑफ ईजिप्शियन ॲग्रिकल्चर ( दोन भाग ); शार्प—ईजिप्शियन हीरोग्लिफिक्स बुइंथ ए व्होकॅब्युलरी; रनॉफ—एलेमेंटरी ग्रामर ऑफ एन्शंट ईजिप्शियन लँग्वेज. मरे—एन्शंट ईजिप्शियन लीजंड्स; बज—ईजिप्शियन लिटरेचर २ भाग, ऑस्वर्न—मॉन्युमेंटल हिस्ट्री ऑफ ईजिप्त ( दोन भाग ) कॅपर्ट प्रिमिटिव्ह आर्ट इन ईजिप्त; पेट्री—ईजिप्शियन टेल्स ( दोन भाग लंडन १८९५ ); ब्रेस्टेड एनशंट रेकॉर्डस ऑफ ईजिप्त ( शिकॅगो १९०६ ); ए हिस्टरी ऑफ ईजिप्त फ्रॉम दि अर्लिएस्ट टाइम्स टु दि पर्शियन कॉंक्वेस्ट; (न्यूयॉर्क लंडन १९०५); ब्रेस्टेड—ए हिस्टरी ऑफ एनशंट ईजिप्शियन्स ( न्यूयॉर्क अँड लंडन १९०८ ); बज—ए हिस्टरी ऑफ ईजिप्त १-८ भाग (लंडन १९०२); पेट्री-ए हिस्टरी ऑफ ईजिप्त (फ्रॉम दि अर्लिएस्ट टाइम्स टु दि थर्टिएथ डिनॅस्टी); मॅस्पेरो—दि स्ट्रगल ऑफ दि नेशन्स, दि पासिंग ऑफ दि एम्पायर्स ( लंडन १९०४ ); महाफी—दि एम्पायर ऑफ दि टॉलेमीज (लंडन १८९५); मिल्ने—ए हिस्टरी ऑफ ईजिप्त अंडर रोमन रूल (लंडन १८९८); गिबन—डिक्लाइन अँड फॉल ऑफ दि रोमन एम्पायर; बटलर—दि अरब कॉंक्वेस्ट ऑफ ईजिप्त १९०२; सर डब्ल्यू म्यूर—दि मॅमेल्युक ऑर स्लेव्ह डिनॅस्टि ऑफ ईजिप्त (लंडन १८९६); ड्रेडन—हिस्टरी ऑफ मॉडर्न ईजिप्त; पेटन—हिस्टरी ऑफ दि ईजिप्शियन रेव्होल्यूशन ( २ भाग १८७० ); मस्का—ईजिप्त अंडर मेहेमेट अली (दोन भाग); डी. ए. कॅमेरॉन—ईजिप्त इन दि नाइंटीन्थ सेंचरी (लंडन १८९८); डायसी—दि स्टोरी ऑफ दि खेदिव्हेट (लंडन १९०२); जे. सी. मॅकक्कोन-ईजिप्त अंडर इस्माइल (लंडन १८९९); लॉर्ड-क्रोमर मॉडर्न ईजिप्त (दोन भाग लंडन १९०८); लॉर्ड मिलनर—इंग्लंड इन ईजिप्त ( ११ वी आवृत्ति लंडन १९०४ ); कॉल्व्हिन दि मेकिंग ऑफ मॉडर्न ईजिप्त ( लंडन १९०६ ); वॅलेस ईजिप्त अँड ईजिप्शियन क्वश्चन ( लंडन १८८३ ); ब्लंट सीक्रेट हिस्ट्री ऑफ दि इंग्लिश ऑक्युपेशन ऑफ ईजिप्त ( लंडन १९०७ ); फाइफ—न्यू स्पिरिट इन ईजिप्त; रायले—दि ईजिप्शियन कँपेन्स १८८२—१८९९ ( लंडन १९०० ); स्टीव्हन्स—बुइथ किचनेर टु खार्टम; एडिंबरो ( १८९८ ); चर्चिल-दि रिव्हर वार ( लंडन १९०२ ); बटलर—कॅंपेन ऑफ दि कॅटेरॅक्ट्स ( लंडन १८८७ ); ]

**ईजियन समुद्र.**—भूमध्यसमुद्राचा एक भाग. पश्चिमेस ग्रीस व पूर्वेस आशियामायनर यांमधील मधून मधून द्वीपें असलेल्या या मोठ्या जलसंचया ( आर्किपेलागो ) च्या उत्तरेस युरोपमधील तुर्कस्तान असून मार्मोरा समुद्राला, व काळ्या समुद्राला डार्डानेल्सनें हा जोडला गेला आहे. याला ईजियन हें नांव कसें पडलें याबद्दल अनेक कथा सांगतात. या समुद्रांतील प्रमुख द्वीपें पुढील होत. थेसॉस; सॅमोथ्रेस; इंब्रॉस आणि लेम्नॉस; युबोया (सर्वांत मोठें बेट ); नॉर्दर्न स्पोरेडीज; लेस्बॉस आणि चिऑस; सॅमॉस आणि निकारिया; कॉस; आशियामायनर किनाऱ्यालगतचीं सर्व बेटें व सायक्लेडीजचा मोठा द्वीपसमूह. द्वीपांच्या रांगांमुळें ईजियन समुद्र कमीजास्त खोल बनलेला आहे. यांतील असंख्य द्वीपें व त्यांचा डोळ्यांत भरणारा उंचवटा या योगानें ईजियन चांगला सुंदर व चित्रविचित्र दिसतो, पण यांतून जहाजें नेणें फार त्रासदायक व धोक्याचें असतें. यांतील कांहीं बेटें ज्वालामुखीपासून बनलेलीं तर कांहीं संगमरवरी दगडाचीं व ज्यांत लोखंड सांपडतें अशींहि

आहेत. मोठाल्या बेटांतून सुपीक व भरपूर पाणी असलेल्या अशा दऱ्या व सपाट मैदानें आहेत. गहूं, दारू, तेल, अंजीर, मध, मेण, कापूस, रेशीम वगैरे जिन्नस तयार होतात. स्पंज, पोंवळीं व जलचर प्राणी पकडण्याचा येथील लोकांचा व्यवसाय आहे. पुरुष कांटक, मजबूत बांध्याचे व देखणे असतात. येथील स्त्रिया तर सौंदर्याविषयीं प्रसिद्ध आहेत. १९१२ पूर्वी सायक्लेडीज, नार्दर्नस्पोरेडीज व ग्रीक किनाऱ्यालगतचीं यूबोया आणि लहान लहान बेटें हीं ग्रीसच्या ताब्यांत व बाकीचीं तुर्कस्तानाकडे होतीं. पण त्यानंतर ईजियन बेटें कांहीं ग्रीसकडे व कांहीं इटलीकडे गेलीं. गुदस्ता झालेल्या लासेनच्या तहान्वयें इंब्रॉस व टेनेडॉस हीं दोन बेटें तुर्कांच्या स्वाधीन करण्यांत आलीं आहेत.

**ईजियन संस्कृति.**—बुद्धपूर्वजग ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड; विभाग ३ ), उत्तरभाग, प्रकरण ३, पहा.

**ईटन–इंग्लंड.** बंकिंगहॅमशायरमधील हें शहर थेम्स नदीच्या उत्तर तीरावर विंडसर विभागांत लंडनपासून २२ मैलांवर आहे. १९०१ सालीं या शहरची लोकसंख्या ३३०१ होती. हें विद्यालयांकरितां फार प्रसिद्ध आहे. सहाव्या हेनरीनें किंग विद्यालय १४४० सालीं स्थापिलें. १५०६ सालीं येथील वार्षिक वसूल ६५२ पौंड होता. १४४१ सालीं शाळेकरितां बांधलेल्या इमारती फार प्रेक्षणीय आहेत. या इमारतींत वाचनालय, प्रार्थनामंदिर व तें बांधणाराचा पुतळा आहे. मठ व शाळा यांच्यामध्यें रॉजर लुप्टनचें स्मारक म्हणून एक मनोरा बांधला आहे. सर आर्थर ब्लूमफील्डच्या प्रार्थनामंदिरांत खालच्या वर्गांची शाळा ( लोअर स्कूल ) आहे. दक्षिण आफ्रिकेंतील युद्धांत पडलेल्या लोकांच्या स्मरणार्थ सातव्या एडवर्डनें बांधलेल्या इमारतींत शाळा, वाचनालय व उत्तम पदार्थसंग्रहालय हीं आहेत; तिसऱ्या जॉर्जच्या जन्मदिवसाप्रीत्यर्थ जून महिन्याच्या चवथ्या तारखेस येथें उत्सव होतो. या उत्सवांत थेम्स् नदींतून बोटींची मिरवणूक निघते. मॉंटेम उत्सव येथील शाळेंतील मुलें करीत असत. ह्या उत्सवांत मिरवणूक काढून सर्व मुलें सॉल्टहिल टेंकडीवर जात व वर्गणी करून जमविलेले पैसे खर्च करीत.

**ईडनिंबू.**—यास संस्कृतांत जंबीर, कोंकणांत चोर निंबू, बंगालींत गोडा लिंबू, मराठींत ईड निंबू, इत्यादि नांवें आहेत. ईड निंबू ही एक निंबाचीच जात आहे. हिंदुस्थानच्या सर्व प्रदेशांत हें झाड आढळतें. हें फळ नारिंग वगैरे निंबाहून मोठें असतें. याची साल खरबरीत असून तीवर टेंगळें आलेलीं असतात. पिकल्यावर सालीचा रंग स्वच्छ पिंवळा होतो व त्यास वासहि उत्तम येतो. यांत लहान व मोठें निंबू अशा दोन जाती आहेत त्यांचीं फळें व फुलें सारखींच असतात. लहान जातीच्या फळाची साल पातळ असून मोठ्या फळाची साल जाड असते. या लिंबाचें उत्तम स्वादिष्ट लोणचें होतें. ह्याच्या रसाचें लेमोनेड करतात. ईडनिंबू, आंवट, तुरट, व पित्तकफनाशक आहे. मोरचुताच्या विषावर ईडनिंबाच्या रसांत साखर घालून देतात; अम्लपित्तावर सायंकाळीं थोडा रस पिण्यास देतात. [ पदे. ]

**ईथर** ( इन्धक )—शास्त्रीय लेखकांनीं ईथर किंवा आकाशतत्व या नांवाचें एक सर्वव्यापी तत्त्व आहे या प्रकारची कल्पना गृहीत धरली आहे. यास मराठींत इन्धक असा प्रतिशब्द योजतात. शास्त्राच्या प्रगतीच्या मध्यकाळांत निरनिराळ्या प्रकारचे ईथर गृहीत धरले होते. परंतु प्रयोगानें एकच प्रकारचा ईथर सध्यां गृहीत धरणें भाग आहे. प्रथमतः विद्युच्चुंबकत्व, गुरुत्वाकर्षण इत्यादि सृष्टिविषयक कार्यें घडण्यास त्या त्या प्रकारचीं 'ईथरें' गृहीत धरलीं होतीं; आतां फक्त प्रकाशाचें अवकाशांतून गमन होण्यास एकच ईथर गृहीत धरला आहे; व याच ईथरमार्फत विद्युल्लता आणि चुंबकत्व यांचीं कार्यें होतात असें मत प्रस्थापित होऊं पहात आहे.

आतां जर आपण अशी कल्पना केली कीं, ईथर आणि इतर सामान्य जडद्रव्य यांत साम्य आहे, आणि यांच्या गुणधर्मांत जो फरक दिसतो तो यांच्या ठिकाणीं असणाऱ्या लघुगुरुत्वामुळें हा फरक दिसत आहे, तर आपणास ईथर आणि इतर जड द्रव्यें यांची तुलना करितां येण्यासारखी आहे. सूर्यापासून उष्णतादिकांचें जें उत्सर्जन होत आहे त्यावरून ही तुलना करणें जास्त सुलभ आहे. सूर्यापासून पृथ्वीवर दर चौरस सेंटिमीटर क्षेत्रफळावर तीन ग्रामक्यालोरी इतकी शक्ति प्राप्त होते; म्हणजे दर चौरस सेंटमीटरला सुमारें $१.३\times१०^{६}$ इतके अर्ग याप्रमाणें शक्ति येते असें समजावें. पृथ्वीवर वातावरणाबाहेर दर घनसेंटिमीटर इतक्या अवकाशांत $४\div१०^{-५}$ अर्ग इतकी शक्ति सूर्यप्रकाशांत असते. या वस्तुस्थितीच्या योगानें अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रमप्रमाणांत गणना करून त्यावरून सूर्यपृष्ठावर किती शक्ति असते याचें अनुमान करितात. सूर्यपृष्ठावर दर चौरस सेंटिमीटरला १.८ अर्ग प्रमाणांत शक्ति वास करिते. आतां 'इ' ही इथरची स्थितिस्थापकता आहे असें समजून गणना करितां असें उत्तर आलें आहे कीं, ईथरची घनता $१\div१०^{१}$ पेक्षां जास्त आहे आणि ईथरची स्थितिस्थापकता $१०^{३}$ इतकी आहे. यावरून कांचेच्या स्थितिस्थापकतेपेक्षां ईथरची स्थितिस्थापकता $१\div१०^{६}$ पट आहे असें दिसून येतें. अवकाशांतून जड पदार्थ जात असतांना त्या योगानें ईथरला गति प्राप्त होते काय याविषयीं शास्त्रज्ञांनीं बरेच प्रयोग केले आहेत. वार्षिक गतीनें पृथ्वी सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा करीत असतांना ती दर सेकंदास सुमारें अठरा मैल या वेगानें गमन करिते; अर्थात पृथ्वीचें या वेगानें गमन होत असतांना तिच्या गतिमुळें ईथरमध्यें गति उत्पन्न होत असल्यास ती गति दृग्गोचर व्हावी म्हणून शास्त्रज्ञांनीं अनेक प्रयोग केले आहेत. परंतु ईथरला गति प्राप्त झाल्याचें अद्याप पावेतों निदर्शनास आलें नाहीं.

अलीकडील शोध.—सूर्यप्रकाशाचें पृथक्करण होऊन जो इंद्रधनुष्यात्मक पट्टा पडतो त्यावर चुंबकशक्तीच्या योगानें परिणाम होतो असें सन १८९६ च्या सुमारास पी. झिमन नांवाच्या शास्त्रज्ञानें दाखवून दिलें. त्यावरून अणूमध्यें कम्प पावणारे विद्युत्कण असतात असें अनुमान कांहीं शास्त्रज्ञांनीं काढलें आहे. मक्सवेल यानें प्रकाशासंबंधानें जे प्रयोग केले आहेत त्यांच्या योगानें ईथरच्या सिद्धान्तास दुजोरा मिळाला आहे. त्याच्या प्रयोगांच्या योगानें असें सिद्ध झालें आहे कीं, उत्सर्जनाच्या योगानें यांत्रिक संस्थिति( मेकॅनिकल सिस्टिम) वर परिणाम होतो असें दिसून आलें. पी. एन. लेबेडयू यानें सन १९०० सालीं जे प्रयोग केले त्या प्रयोगांत एका चक्राचा उपयोग करण्यांत आला होता; व एतत्सदृश प्रयोग दुसऱ्या पुष्कळांनीं केले आहेत. त्यावरूनहि असेंच सिद्ध झालें आहे कीं, प्रकाशादिकांच्या योगानें ईथरमध्यें जे प्रकंप उत्पन्न होतात ते दृग्गोचर करितां येतात.

ईडर, सं स्था न.—मुंबई इलाखा. महीकांठा एजन्सी. हें उत्तर अक्षांश २३° ६' आणि २४ २९ व पू. रे. ७२° ४५' आणि ७३ ३९' यांमध्यें वसलेलें आहे. ह्या संस्थानच्या उत्तरेस सिरोही व उदेपूर हीं संस्थानें; पूर्वेस डोंगरपूर; दक्षिणेस व पश्चिमेस मुंबई इलाखा व गायकवाडचें राज्य, हीं आहेत. ह्या संस्थानाचा नैर्ऋत्येकडील भाग सपाट व वालुकामय आहे. पण इतरत्र सर्व प्रदेश सुपीक, वृक्षाच्छादित, डोंगर व नद्या यांनीं व्याप्त आहे.

ह्या संस्थानचा पूर्वेतिहास बराच गमतीचा आहे. इ. सन ८९० पासून ९७० पर्यंत हें संस्थान गेहलोट अमलाखालीं होतें; नंतर सन १००० पासून १२०० पर्यंत परमार रजपूत अमलाखालीं आलें. अमरसिंग या शेवटच्या परमार राजानें हें संस्थान हाथी सोर्दे या कोळ्याच्या स्वाधीन केलें. त्याच्या मुलापासून सामैत्राचा राव सोनंग यानें काबीज केलें. यानंतर बारा पिढ्यांनीं राव जगन्नाथ यास १६५६ मध्यें मुरादबक्ष या गुजराथच्या सुभेदारानें हुसकावून दिलें. सन १७२८ सालीं जोधपूरच्या राजाच्या आनंदसिंग व रायसिंगच्या या दोन बंधूनीं येथें आपली सत्ता प्रस्थापित केली. पण दमाजी गायकवाडच्या नोकरींत असलेल्या बच्चाजी दुवाजीनें श्रीमंत पेशवे सरकारच्या वतीनें ईडर संस्थान ताब्यांत घेतलें. पण ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. रायसिंगनें पुन्हां ईडर घेतलें व त्याचा पुतण्या शिवसिंग हा कारभार पाहूं लागला. ह्या संस्थानचे कांहीं भाग प्रांतेज, विजापूर जिल्हे व मोडासा बायद व हारसोल या जिल्ह्यांचा अर्धा भाग पेशव्यांनीं घेतला ( पण कांहीं कालानें ते ब्रिटिश सरकारला द्यावे लागले ); व बाकीचा मुलुख गायकवाडच्या ताब्यांत गेला. मध्यंतरी बऱ्याच घालमेली झाल्या. गायकवाड सरकारला १८१२ सालीं ईडर व अहंमदनगर यांच्या उत्पन्नाबद्दल २४००० रुपये व ८९५० रुपये कायमचे द्यावयाचे ब्रिटिश सरकारनें ठरविलें सन १७९१ त शिवसिंग मृत्यु पावला. व त्याच्या मागून गादीबद्दल तंटे सुरू झाले, व त्यामुळें ईडर संस्थानचीं शकलें झालीं. त्याच्या एका मुलाला अहंमदनगर व दुसऱ्या दोन मुलांनां मोडासा व बायद हे प्रांत मिळाले. पण हीं तीन घराणीं फार दिवस टिकलीं नाहींत. सन १८४८ सालीं ब्रिटिश सरकारनें हे तिन्ही मुलुख पुनः एकत्र केले व त्यावेळेपासून नवीन घराणें सुरू झालें. ह्या संस्थानच्या अधिकाऱ्याला महाराजा ही पदवी आहे. त्याला दत्तक घेण्याचा अधिकार आहे. व त्याला १५ तोफांची सलामी मिळते. १९०२ सालीं प्रतापसिंग ईडरच्या गादीवर बसला. हा राजा फार शूर होता. जेव्हां सर प्रतापसिंहानें १९११ सालीं जोधपूरचा राजप्रतिनिधि झाल्यावेळीं ईडरवरचा हक्क सोडला तेव्हां त्याचा मुलगा दौलतसिंह गादीवर आला. ह्या संस्थानची लोकसंख्या सन १९२१ सालीं २२६३५१ होती. शहरें व खेडेंगांव मिळून ८८४ गावें होतीं. सर्वांत हिंदु लोकांची संख्या जास्त आहे; त्यानंतर मुसलमान आणि मग जैन असा संख्यानुक्रम येईल. ह्या संस्थानांतील मुख्य शहरें अहंमदनगर, ईडर व वडाली हीं होत. संस्थानचें क्षेत्रफळ १६६९ चौ. मैल आहे.

ह्या संस्थानांतील जमीन सामान्यतः सुपीक आहे; पण उत्तर व ईशान्य भागांतील जमीन निकस व वालुकामय आहे. मुख्य पिकें धान्य, तीळ व ऊंस हीं होत. येथें साबणाचे कारखाने आहेत व अहमदनगर येथें दगडाच्या खाणी आहेत व त्या खाणींतला दगड इमारतीच्या कामीं उपयोगी पडतो.

ह्या संस्थानच्या अधिपतीला पहिल्या प्रतीचा अधिकार आहे. मृत्यूची शिक्षा फर्माविण्याची सुद्धां अधिकार आहे. संस्थानचें उत्पन्न सन १९०३–४ सालीं ६ लाख होतें. त्या त्या पैकीं ४ लाख संस्थानाधिपतीचें व बाकीचे ज्या सरदार लोकांच्या पूर्वजांनीं ह्यांच्या अधिपतीच्या मूळ पुरुषाला हें संस्थान मिळवून देण्यांत मदत केली त्या सरदार लोकांचें होतें. ईडरच्या महाराजाला सरदार व तालुकदार यांकडून खिरदंडी व इतर राजहक्कांबद्दल ५५४५७ रुपये मिळतात. उलट महाराजाकडून गायकवाडाला सालीना ३०३४० रुपये खंडणी जाते.

श ह र.—उत्तर अ. २३ ° ५०,' व पूर्व रे. ७३ ° ३'. लोकसंख्या ( १९२१ ) ६०७२. बाँबे बरोडा सें. इं. रेल्वेच्या अमदाबाद--प्रांतेज फांट्यावर हें स्टेशन लागतें.

या शहराचा इतिहास संस्थानच्याच इतिहासांत अंतर्भूत होतो. शहराला विटांची तटबंदी असून ती अद्याप फारशी मोडकळीस आली नाहीं. येथून एक मैलावर रामेश्वराचा तलाव आहे. त्याच्या पश्चिम कांठावर ईडर राजघराण्यांतील पुरुषांचीं थडगीं आहेत. तलावाच्या बाजूला लहान लहान देवळें आहेत. एक दोन दगडी विहिरी व खोदकाम केलेल्या कांहीं घरांच्या खिडक्या यांच्याशिवाय

फारसें महत्वाचें असें दुसरें कांहीं नाहीं. किल्ल्याच्या पठारावर असलेल्या ज्या दोन इमारतीकडे तावडतोब लक्ष जातें, त्या इमारती म्हटल्या म्हणजे रणमल्लाची चौकी व 'रुथी राणीनो महाल' या होत. चांदणीचा ठाकूर सुरजमल यानें मराठ्यांपासून ईदरचा जरी बचाव केला तरी पण तो इतका गर्वानें फुगला होता कीं, भवानीसिंग राजपुत्राचा देखील तो अपमान करण्यास कचरत नसे. राजपुत्राला ही वर्तणूक सहन न होऊन त्यानें या ठाकुराचा वरील वाड्यांत खून केला. गडावर जातांना श्री शांतिनाथजीचें व श्री शांभवनाथजीचें अशीं दोन जैन मंदिरें लागतात. हीं दोन देवळें फार प्राचीन काळचीं आहेत. पण कालनिर्णय करण्याकरितां कांहींच पुरावा नाहीं. येथील किल्ल्याला मागच्या बाजूनें आणीबाणीच्या प्रसंगीं पळून जाण्याला एक चोरवाट आहे. शांभवनाथजींच्या देवळापाशीं उभें राहून रुष्ट राणीच्या वाड्याकडे नजर फेंकल्यास फारच मनोहर सृष्टिसौंदर्य पहावयास मिळतें. किल्ल्याच्या पायथ्याशीं गुहेंत खोरवनाथ महादेवाचें पडीत देऊळ आहे. हें सरासरी ४०० वर्षांपूर्वीचें असावें असा समज आहे. याशिवाय मंकालेश्वर महादेवाचें व धानेश्वर महादेवाचें अशीं दोन आणखी देवळें आहेत. [ इं. गॅ. मु. गॅ. इंडियन ईयर बुक. ]

**ईंदिग**—ही तेलगु ताडी कलालांची जात उत्तर सरकार, नेलोर कडप्पा जिल्हा, चिंगलपट, उत्तर अर्काट, सालेम वगैरे भागांतून आढळते. बलिज वंशांतील हे लोक असून धंद्यामुळें दूर झाले आहेत असें कोणी म्हणतात. हे मुख्यतः वैष्णव असून त्यांचे उपाध्ये सतानी आहेत. यांच्यांत दोन वर्ग आहेत.—एक दंड्डु ईंदिग व दुसरा बलिज ईंदिग कांहीं धंद्यासंबंधींच्या चालीमुळें हे तामिली शानानपासून विभक्त दिसतात. तामिली ताडी कलाल दारू नारळीपासून काढतात पण खजुरीपासून काढीत नाहींत, याच्या उलट तेलगु खजूरीपासून ताडी काढतात. पण नारळीला शिवत नाहींत. यांचा पिढीजाद धंदा ताडी, गाळण्याचा असला तरी हल्लीं फार थोडे लोक तो चालवितात. पुष्कळसे मोलमजुरी शेतकी व इतर धंदे करून पोट भागवितात. मद्य देवता जी एलम्मा तिला हे लोक भजतात. यांचे पुरोहित ब्राह्मण असतात. मद्य पिणें यांच्यांत वर्ज मानिलें आहे. हे व्यासांपासून आपली उत्पत्ति झाल्याचें सांगतात. यांची मूळभाषा तेलगु आहे व कांहीं कानडीहि बोलतात.

या जातींत बहुपत्नीत्व रूढ आहे. प्रौढविवाह करण्यासंबंधीं या जातींत नियमच आहे. जातिभ्रष्टता अगर व्याभिचार या दोन कारणाशिवाय पुरुषांस स्त्रीचा त्याग करतां येत नाहीं. त्याच प्रमाणें नवरा जातिभ्रष्ट झाला तरच स्त्रीस त्याच्याशीं घटस्फोट करतां येतो. बसवीची चाल यांत रूढ नाहीं. यांच्यांत श्राद्धाची वहिवाट नसून महालय अमावास्येच्या दिवशीं व वर्षप्रतिपदेच्या दिवशीं आपल्या मृतपितरांच्या नांवानें ते दानधर्म करतात. लग्न व इतर उत्सव प्रसंगीं ब्राह्मणांस उपाध्ये म्हणून ते बोलावतात.

हे मृतांनां पुरतात व बारा दिवस सुतक पाळतात. दोष घालविण्याकरितां ब्राह्मणांस ते आपल्या घरांत बोलावितात. 'ताताचार्य' म्हणून एक वैष्णव ब्राह्मण त्यांचा गुरु असतो. कित्येकांचा 'सतानी' गुरु असतो. उच्च जातींच्या लोकांस ते क्वचित् प्रसंगीं आपल्या जातींत घेतात.

हे शिवभक्त त्याच प्रमाणें विष्णुभक्त आहेत. यांच्यांत एक भिक्षुकांचा वर्ग असून त्याला ते ठराविक वेळीं देणग्या देतात. १९११ च्या खानेसुमारींत ३२३९५७ ईदिग लोक भरले.

[ सेन्सस रिपोर्ट ( म्हैसूर ) १९११; थर्स्टन–कास्ट्स अँड ट्राईब्स ऑफ सदर्न इंडिया ]

**ईव्हशाम**—( इंग्लंड ) वोर्सेस्टरशायर मधील ईव्हशाम पार्लमेंटरी विभागांतलें बाजाराचें शहर. लंडनच्या वायव्येस ग्रेटवेस्टर्न रेल्वे मार्गानें हें १०७ मैलांवर आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ७१०१ होती. हें फार प्राचीन शहर ॲव्हॉन नदीच्या उजव्या तीरावर असून येथें सेंट एग्विननें बेनेडिक्टाईन मठ बांधला. घंटामंदिराजवळ सेंट लॉरेन्स व ऑल सेन्टस् प्रार्थना मंदिरें आहेत. एलिझाबेथचें नगरभवन, ॲबट लिचफील्डनें स्थापलेली प्राथमिक शाळा व दानगृह या इमारती प्रेक्षणीय आहेत. येथील राज्यकारभार १ मेअर, ४ आल्डरमेन व १२ सभासद यांच्या हातांत असतो. शहरचें क्षेत्रफळ २२६५ एकर आहे.

बनेडिक्टाइन मठाच्या भोंवतीं वसलेल्या या शहराला एडवर्ड दी कनफेसरनें १०५५सालीं बाजार व व्यापारी शहराचे हक्क दिल्यामुळें याला पुष्कळ महत्त्व आलें. १४८२ पर्यंत हें शहर ॲबटच्या स्वामित्वाखालीं असे. पुढें सरफिलीप हॉबी यावर मालकी चालवूं लागला. पहिल्या जेम्सनें याचा कारभार एक मेअर व सात आल्डरमेन यांजकडे सोंपविला. फक्त १२९५ व १३०७ या दोन सालांत येथील सभासद पार्लमेंटांत गेले होते. पण पुढें १६०४ पर्यंत हा प्रातिनिधिक हक्क बाजूस सारला गेला होता. १८६७ च्या कायद्यानें दोन प्रतिनिधींपैकीं एक कमी केला, पुढें १८८५ सालीं तर बरोचा मत देण्याचा हक्क अजीबात काढून घेतला.

१२६५ सालीं लीस्टरचा अर्ल सायमन डि मॉंटफर्ट व प्रिन्स एडवर्ड यांमध्यें झालेल्या लढाईला इव्हेशामनें आपलें नांव दिलें. लढाई झाल्याठिकाणीं एक स्तंभ आहे.

**ईशोपनिषद्**—हा शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेचा चाळीसावा अध्याय आहे. या ईशोपनिषदाचीं ईशावास्योपनिषद् वाजसनेयी उपनिषद्, संहितोपनिषद्, मंत्रोपनिषद अशीं निरनिराळीं नांवें आहेत. इतर उपनिषदांमध्यें व या उपनिषदामध्यें एक मोठा महत्त्वाचा भेद असा आहे कीं, इतर सर्व उपनिषदें, ऋषिप्राणीत ब्राह्मण ग्रंथांत अगर आरण्यकांत आलीं आहेत; पण हें एकच उपनिषद तेवढें वाजसनेयी

संहितेमध्यें अंतर्भूत झालें आहे. या दृष्टीनें इतर सर्व उपनिषदांपेक्षां याचें महत्त्व अधिक आहे.

प्रो. डॉयसेन यांच्या मतें उपनिषदांचे सर्वसाधारण चार वर्ग पडतात. ( १ ) प्राचीन गद्य उपनिषदें. ( २ ) पद्योपनिषदें. ( ३ ) नंतरचीं गद्योपनिषदें व ( ४ ) अथर्वोपनिषदें. या चार वर्गांपैकीं दुसऱ्या वर्गांत ईशोपनिषद मोडतें. ब्राह्मणांच्या पूर्वी संहिता मानल्या तर संहितेमध्यें ईशोपनिषदाचा अंतर्भाव होत असल्याकारणानें हें फार प्राचीन काळचें मानावें लागतें. तथापि यांतील विचार व भाषा या दृष्टीनें तें फार नाहीं तरी थोडें अर्वाचीन मानावें लागतें.

या उपनिषदाचे केवळ १८ च श्लोक आहेत; पण या १८ श्लोकांत सर्व वेदांताचें सार आलें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं; पण या १८ श्लोकांतील तात्पर्यासंबंधानें प्राचीन आचार्यांत मतभेद आहे.या उपनिषदाप्रमाणें ज्ञानानेंच मोक्ष मिळतो व कर्मानें अगर उपासनेनें किंवा कर्म आणि उपासना मिळून मोक्ष मिळत नाहीं, असें शंकराचार्यादि अद्वैतवादी अगर ज्ञानमार्गी म्हणतात, तर ज्ञान व कर्म या समुच्चयाच्या अनुष्ठानानें मोक्ष मिळतो, असें बौधायनप्रभृति वृत्तिकार व त्यांचे रामानुजाचार्यप्रभृति अनुयायी प्रतिपादन करतात; पण निर्विकारबुद्धीनें विचार केल्यास निष्कामकर्मपर हें उपनिषद् मानावें लागतें.

या उपनिषदांतील ज्या पहिल्या दोन मंत्रांचे निरनिराळे अर्थ लावले गेले आहेत, ते दोन मंत्र खालीलप्रमाणें आहेत.

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृध्रः कस्यस्विद्धनम् ॥ १ ॥
कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥

निवृत्तिमार्गी लोक हे दोन श्लोक निरनिराळे असून त्यांमध्यें, दोन निरनिराळे मार्ग सांगितले आहेत असें म्हणतात; पण त्याला विशेष पुरावा नाहीं. पहिल्या मंत्रांत ' निष्काम भावानें जगताचा भोग कर, कोणाच्या धनाची लालसा करूं नको ' असें सांगून ' जो निष्कामबुद्धीनें शंभर वर्षें कर्में करतो, त्याला कर्माची बाधा होत नाहीं' असें दुसऱ्या मंत्रांत प्रतिपादन केलें आहे. अशा रीतीनें या दोन्ही मंत्रांची संगति लागूं शकते व त्यावरून हें उपनिषद् निष्कामपर असून निवृत्तिपर नाहीं असें सिद्ध होतें.

तीन ते आठ या मंत्रांत आत्मा म्हणजे काय, आत्मज्ञ म्हणजे काय, आत्मज्ञाला त्रिविध ताप कां होत नाहींत, याचें सुंदर वर्णन आलें आहे.

नऊ ते अठरा या मंत्रांत कर्म व उपासना यांचीं निरनिराळीं व समुच्चियित फलें काय होतात, कर्मी व उपासक यांचा संसार कसा सुटत नाहीं इत्यादि विषयांचें विवेचन केलें आहे.

या उपनिषदामध्यें एक विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हटली म्हणजे या उपनिषदांत ' ब्रह्म ' ऐवजीं ' ईश ' हा शब्द आला आहे. तसेंच संभूति, असंभूति, विद्या, अविद्या, मातरिश्वा असे वादग्रस्त शब्द या उपनिषदांत आलेले आहेत.

ईशोपनिषदावर शंकराचार्य, आनंदतीर्थ, रंगरामानुज, श्रीनिवासतीर्थ, दामोदराचार्य, परशुराम, बाळकृष्णानंद, ब्रह्मगिरी, ब्रह्मानंदसरस्वती, महीधर, राघवेंद्र, रामचंद्र, रामानुज, शंकरानंद, कौलाचार्य, सदानंद, हृदयराम इत्यादि विद्वानांनीं टीका लिहिल्या आहेत.

[ संदर्भग्रंथ—सातवेळकर-ईशोपनिषद् का स्वाध्याय; चिं. गं. भानू-ईशोपनिषद; आचार्य विष्णु वामन बापट—उपनिषदें; प्रो. डॉयसेन्सन—फिलॉसफी ऑफ दि उपनिषदस्; गौ—फिलॉसफी ऑफ दि उपनिषदस्. ]

**ईश्वरकृष्ण**—सांख्यकारिकांचा कर्ता. याच्या काळाविषयीं वाद आहे. चिनी पुराव्यावरून पाहतां हा वसुबंधुचा समकालीन होतासें दिसतें; पण वसुबंधूचाहि काल निश्चित नाहीं. तो इ. स. चवथें किंवा पांचवें शतक हा असावा, असें कीथ म्हणतो [ सांख्य सिस्टिम. ]

**ईश्वरीपूर**—हें खेडेगांव खुलना जिल्ह्यांत यमुनातीरीं आहे. उ. अ. २२° १९' व पू. रे. ८९° ७'. ह्याचें पूर्वीचें नांव यशोहर असून तें सतराव्या शतकांत प्रतापादित्य राजाची राजधानी होती. [ वेस्टलंड—रिपोर्ट ऑन जेसोर. ई. गॅ. ]

**ईश्वरसिंग**—एक जयपूरचा राणा. याचा बाप जयसिंग इ. स. १७४३ त वारल्यावर हा गादीवर बसला. याचा वडील भाऊ माधवसिंग मेवाडांत जहागीरदार होता. पण लागलीच तो मेवाडराण्याची मदत घेऊन ईश्वरसिंगाशीं लढूं लागला. ईश्वरसिंगानें शिंदे होळकरांची मदत मागीतली. त्यांनीं प्रथम ईश्वरसिंगाचा पक्ष घेऊन राजमहाल येथें माधवसिंगाचा पराभव केला व त्याचा तंटा तीन लाखांवर तोडला. पण माधवसिंगाचा मदतनीस मेवाडचा राणा जगतसिंग यानें खुद्द पेशव्याकडे वकील पाठवून मदत मागितली. माधवसिंगानें यापूर्वीच होळकरास पासष्ट लक्ष रुपयांचे आमीष दाखवून फोडला होता. शिंदे विरुद्ध असतांहि पेशव्यानें पैशाच्या लोभास्तव माधवसिंगाचा पक्ष उचलून जयपूर राज्यांतील नेवाई प्रांतावर स्वारी केली ( १७४७ ).तेव्हां ईश्वरसिंगानें नेवाईसुद्धां चार महाल माधवसिंगास व पेशवेहोळकरांस नजराणा अशा तऱ्हेचा करारनामा करून दिला. [बाळाजी बाजीराव रोजनिशी भा.१ ले. २०८]. परंतु पेशव्याशीं केलेला हा करार ईश्वरसिंगानें पाळला नाहीं म्हणून होळकर त्यावर चालून गेला व त्याची हड्डी नरम करून करार पुरा करून घेतला. [ इ. स.१७४८.राजवाडे खं.६. १९०, १९१, ५८१ ]. यापुढें ईश्वरसिंगास होळकराचा अतोनात जाच होऊं लागला. अखेर तो जिवाला कंटाळून विष खाऊन मेला [१७५१.रा. खं. ३. १६३ ]. त्याच्या

नंतर माधवसिंग गादीवर आला. [ मराठी रियासत मध्य-विभाग २ ].

**ईसॉप**—प्रसिद्ध ग्रीक कल्पितकथाकार. हा ख्रिस्ती शकापूर्वी ६२० ते ५६० या कालांत होऊन गेला. सॅमॉस इयाड्मनचा तो गुलाम होता, यापलीकडे त्याच्यासंबंधीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. ह्यामुळेंच त्याच्या अस्तित्वाबद्दलहि वरेच जण शंका घेतात. इयाड्मननें त्यास मुक्त केलें असलें पाहिजे असें म्हणतात. पुढें तो लिडियाचा राजा क्रोसिअस याच्या दरबारीं राहिला.तेथें सोलनची व त्याची गांठ पडली. एके ठिकाणीं तो फार कुरूप होता असें दर्शविलें आहे. हा कुबडा होता अशी समजूत आहे व त्यावरून इंग्रजींत ईसॉप म्हणजे कुबडा असें विशेषण रूढ झालें आहे. याच्या उलट ईसॉपला सुंदर म्हणूनहि म्हटलेलें आढळतें.

ईसॉप यानें आपल्या कथा बहुधा लिहून ठेवलेल्या नसून त्या परंपरेनें तोंडीच चालत आल्या असल्या पाहिजेत. "ईसॉपच्या कल्पित गोष्टी " (ईसॉप्स फेबल्स) हें पुस्तक अलीकडे रचण्यांत आलें. त्यांतील पौरस्त्य गोष्टी तर ईसापच्या नसून मागाहून त्या त्याच्या नांवावर पडल्या. प्लानुडीजनें आज आपणापुढें असलेल्या ' ईसाप्स फेबल्स ' ची प्रत तयार केली. या प्रतीच्या आधारें लोकांत रूढ असलेल्या अर्वाचीन यूरोपीय दंतकथा निघाल्या असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ईसापच्या गोष्टींचा मूळ ग्रीक ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वी शंभर गोष्टींचें लॅटिन भाषांतर रोम येथें १४७६ त प्रसिद्ध झालें. नंतर चार वर्षांनीं प्लानुडीजची संहिता मिळविण्यांत येऊन त्याच्या एकावर एक आवृत्त्या नवीन नवीन भर घालून काढण्यांत आल्या. विल्यम कॅक्स्टननें १४८४ त प्रथमच ईसाप्स फेबल्स इंग्रजींत छापलें. कार्ल व्हॉन हाल्मनें सर्व उपलब्ध गोष्टी सटीक प्रसिद्ध केल्या. १८९४ मध्यें क्रॅको युनिव्हर्सिटीनें एका पॅरिस येथील हस्तलिखित प्रतीवरून स्टर्नबॅचच्या विवेचनात्मक टीपांसहित ईसापचा कथासंग्रह प्रसिद्ध केला.

[ संदर्भग्रंथ—बेंटले–डिस्सर्टेशन ऑन दि फेबल्स ऑफ ईसाप. जेकब्स—दि फेबल्स ऑफ ईसॉप (१८८९). लॅम्प्रिरे—क्लासिकल डिक्शनरी.]

**ईस्ट इंडिया कंपनी**—सतराव्या व अठराव्या शतकामध्यें, हिंदुस्थान, जपान, चीन वगैरे पूर्वेकडील देशांशीं व्यापार करण्याकरितां हालंड, इंग्लंड, स्पेन, फ्रान्स, पोर्तुगाल इत्यादि यूरोपखंडांतील प्रमुख राष्ट्रांनीं आपापल्या कंपन्या स्थापन केल्या व त्यांना ईस्ट इंडिया कंपनी या अर्थाचीं नांवें ठेवण्यांत आलीं. या सर्व कंपन्यांमध्यें इंग्लंडची ईस्ट इंडिया कंपनी ही फार मोठी व महत्त्वाची व्यापारी कंपनी होय; व पुढें या कंपनीलाच ईस्ट इंडिया कंपनी या नांवानें संबोधण्यांत येऊं लागलें.

**ब्रि टि श ई स्ट इं डि या कं प नी**—पूर्वेकडील राष्ट्रांशीं व्यापार करण्याचें प्रथमतः डच लोकांनीं मनावर घेतलें. इंग्रजांनीं ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करण्यापूर्वी डच व्यापाऱ्यांनीं स्पाईस ( मसाल्याच्या ) बेटामध्यें चांगलेंच बस्तान बसविलें होतें. या कंपनीशीं स्पर्धा करून, त्यांचा व्यापार हाणून पाडण्यासाठीं इंग्रजांनीं सोळाव्या शतकाच्या अखेरीस आपली एक कंपनी स्थापन केली. सन १६०० मध्यें इलिझाबेथ राणीनें ' ईस्ट इंडीजशीं व्यापार करणारी लंडन व्यापाऱ्यांची कंपनी व गव्हर्नर' या नांवानें व्यापार करण्यासाठीं १५ वर्षांच्या करारानें राजसनद दिली. या सनदेनें केप ऑफ गुड होपच्या पलीकडील सर्व पौरस्त्य राष्ट्रांशीं व्यापार करण्याची या कंपनीला परवानगी मिळाली. ही कंपनी प्रथमतः कांहीं वर्षें ' रेग्युलेटेड कंपनी' होती पण पुढें तिचें हें स्वरूप पालटून, तिला ' जॉइंट स्टॉक कंपनी 'चें स्वरूप प्राप्त झालें. रेग्युलेटेड कंपनीचें स्वरूप तिला असतांना, या कंपनीतर्फे ज्या व्यापारी सफरी झाल्या त्या वैयक्तिक स्वरूपाच्या होत्या. प्रत्येकानें आपापल्या पर्यटणाचा खर्च सोसावयाचा अशी वहिवाट असे, व त्यावर जो फायदा होईल तो देखील सगळा ज्याचा त्याला मिळे. पण १६१२ पासून मात्र ही पद्धत मोडली जाऊन जॉइंट स्टॉक कंपनी ( समाईक भांडवलाच्या कंपनी )चें स्वरूप प्राप्त झाल्यामुळें व्यापारी सफरीपासूनचा सर्व फायदा कंपनीला मिळूं लागला. या व्यापारी कंपनीनें १६१०–१२ सालीं बंगालच्या उपसागराच्या मुखाजवळ मच्छलीपट्टण आणि पट्टेपुली या ठिकाणीं आपल्या वखारी घातल्या. पहिल्या जेम्सनें, सन १६०९ सालीं कंपनीला पूर्वेकडील देशांशीं व्यापार करण्याची कायमची परवानगी दिली.

पण या इंग्लिश ईस्ट इंडिया कंपनीचें व डच ईस्ट इंडिया कंपनीचें व्यापाराच्या बाबतींत भांडण होऊं लागलें. परस्परांनीं परस्परांचा व्यापार बसविण्यासाठीं जारीनें प्रयत्न सुरू केले. पण सन १६१९ सालामध्यें, दोघाहि व्यापारी कंपन्यांनीं भांडण मिटविण्याचा प्रयत्न केला व त्याला तात्पुरतें यश आलें. पण थोड्याच काळानंतर पुन्हां तंटे बखेडे सुरू होऊं लागले. सन १६२५ सालीं डच गव्हर्नरनें, ऑंबोयना किल्ला फसगतीनें ताब्यांत घेण्याचें इंग्रजांनीं कारस्थान केलें आहे अशी खोटीच कुरापत काढून त्या किल्ल्यांतील इंग्रजांची त्यानीं कत्तल केली. त्यामुळें इंग्लंडमध्यें भयंकर खळबळ झाली. या इंग्लिश कंपनीच्या व्यापारासंबंधींच्या बाबींमध्यें इंग्रजांचें लक्ष या कत्तलीमुळें वेधलें गेलें. तरी पण पुढें कांहीं वर्षें या कंपनीचा व्यापार मंदावतच चालला होता.

**कं प नी चें सं क ट म य अ र्ध श त क.**—इसवी सन १६२५ त राजा पहिला जेम्स मरण पावला. व त्याचा मुलगा पहिला चार्लस इंग्लंडच्या गादीवर बसला. बापाचेंच राज्यधोरण चार्लस राजानें जास्त जोरानें पुढें चालविलें. राजा हा ईश्वरदत्त होय. तो सांगेल तें लोकांनीं निमूटपणें

मान्य केलें पाहिजे. असा त्याचा ग्रह असल्यामुळें पार्लमेंटशीं त्याचा बेबनाव होऊन अखेरीस तंटा विकोपास गेला. राजपक्ष व प्रजापक्ष असे दोन उघड तट पडून युद्ध झालें. आणि अखेर प्रजापक्षास जय मिळाला. तेणेंकरून चार्लस राजास इ. स. १६४९ त देहांत शिक्षा भोगावी लागली. हा प्रकार इंग्लंडांत चालू असतां इकडे जपानांत सुरू केलेलें व्यापाराचें काम सोडून कंपनीचे व्यापारी तेथून जीव घेऊन पळून गेले. आंबोयनाच्या कत्तलीमुळें मसाल्यांच्या बेटांतूनहि त्यांना आपला पाय काढावा लागला. दुखण्याच्या भयंकर यातनांमुळें जाना बेटास रामराम ठोकणें त्यांस भाग पडलें. हिंदुस्थानांतहि पूर्व व पश्चिम किनाऱ्यावर त्यांस स्वास्थ्य बिलकुल नव्हतें. त्यांची पत बरीच कमी होऊन शंभरांचा शेअर ऐशींसहि विकला जात नव्हता. कर्जाचा बोजा मनस्वी वाढल्यामुळें नवीन कर्ज मिळेना. डायरेक्टर मंडळींत अंतर्वैमनस्यें चालू होतीं. ही कंपनी इंग्लंडचीं माणसें व इंग्लंडचा पैसा परदेशांत नेऊन नाहक बुडवीत आहे असा सामान्यतः इंग्लंडच्या लोकांचा ग्रह झाला होता. हा ग्रह दूर करण्याकरितां कंपनीच्या तर्फे अनेक गृहस्थांनीं कंठशोष केला, पण त्याचा फारसा उपयोग त्यावेळीं झाला नाहीं.

अशा संकटसमयीं राजाकडून कंपनीला मदत व्हावी तीहि झाली नाहीं. उलट कंपनीच्या विरोधकांसच राजाचें पाठबळ मिळूं लागलें. तेव्हां कंठीं प्राण आल्याप्रमाणें होऊन इ. स. १६२८ त कंपनीच्या डायरेक्टरांनीं पार्लमेंटकडे अर्ज केला. ‘ हा व्यापार राष्ट्रास विघातक आहे कीं काय, याचा आपण नीट तपास करावा, तपासाअंतीं तो विघातक आहे असें ठरल्यास तो खुशाल बंद करावा. पण फायदेशीर आहे असें दिसून आलें तर त्यास उघडपणें मदत मिळावी.’ अशी मागणी कंपनीनें पार्लमेंटकडे केली, ह्यावरूनच तिची निकृष्ट स्थिति व्यक्त होते. हा अर्ज म्हणजे त्या वेळच्या धोरणाचें व भावी उदयाचें निदर्शन होय. कंपनीच्या विरुद्ध लोकांचा आक्षेप असा होता कीं, ह्या व्यापाराच्या नादीं लागून हजारों लोक निष्कारण समुद्रांत जाऊन मृत्युमुखीं पडतात, त्यामुळें राष्ट्र बलहीन होत चाललें आहे. त्यावर कंपनीचें समर्पक उत्तर असें होतें कीं कंपनीच्या व्यापारामुळें इंग्लंडचे खलाशी नौकाशास्त्रांत व दर्यावर्दी कामांत तयार होत आहेत, परचक्र आलें असतां कंपनीच्या गलबतांचा खलाशांचा व सामानांचा अतिशय उपयोग होणारा आहे. राज्यांतील पैसा कंपनी बाहेर नेऊन परदेशांत बुडविते, ह्या आक्षेपावर कंपनीचें उत्तर असें होतें कीं, कंपनी राष्ट्राचा पैसा बुडवीत तर नाहींच, उलट हिंदुस्थानांतील माल इंग्लंडांत आणून तेथून तो यूरोपच्या इतर देशांत किफायतशीर विकीत असल्यामुळें राष्ट्रास मोठा फायदा होत आहे. शिवाय कंपनीच्या धाकामुळें डच लोक मर्यादेंत आहेत, नाहीं तर ते इंग्लंडचा सर्वच व्यापार गिळून टाकते. एवंच राजास व लोकांस आपला मोठा उपयोग आहे असें कंपनीनें प्रतिपादन केलें.

अशा स्थितींत राजाची वर्तणूक केवळ आपमतलबाची होती. ही कंपनी आपण स्थापन केली व आपल्या हुकुमानें ती चालते, असें राजा समजे; आणि येणेंकरून कंपनीवर तो एक प्रकारचें ममत्व दाखवी. पण चार्लस राजा नेहमींच पेंचात असल्यामुळें कंपनीकडून पैसे उकळण्यांत त्यानें सर्व भाडभीड सोडून दिली. इ. स. १६२८ त त्यानें कंपनीकडून एक लाख कर्ज मागितलें, तें कंपनीनें दिलें नाहीं. तेव्हां कंपनीचे शत्रु जे डच लोक त्यांजपासून तीन लाख रुपये घेऊन, त्यानें डच लोकांचा फायदा करून कंपनीचें नुकसान केलें. इ. स. १६४० त राजानें पुनः कंपनीकडे पैशाची मागणी केली, तेव्हां कंपनीजवळ रोख शिल्लक कांहींच नसून साडेसहा लाख रुपये किंमतीचीं मिरीं मात्र शिल्लक होतीं, तीं सर्व राजानें दीड लाखांस कंपनीपासून विकत घेतलीं; आणि स्वतः विकून टाकिलीं. ह्याशिवाय कंपनीला त्रास देण्याचे अन्य मार्गहि राजाजवळ पुष्कळ होते. जेम्स राजानें व्यापाराचा मक्ता कंपनीस कायमचा दिला होता, पण त्या सनदेंत असें एक कलम होतें कीं हा व्यापार राष्ट्रास अपायकारक होईल तर अगाऊ तीन वर्षांची नोटीस देऊन तो बंद करण्याचा अधिकार राजास आहे. अर्थात ह्या व्यापारापासून राष्ट्रास अपाय होतो किंवा नाहीं ह्याचा निर्णय करणें एकट्या राजाच्या मर्जीवर राहिलें. तेव्हां आपलें नुकसान करूनहि राजास व त्याच्या मर्जींतल्या मंडळीस खूष ठेवणें कंपनीस भाग पडूं लागलें. ह्यावेळेस दुसरेहि अनेक व्यापारी पैशाच्या जोरावर कंपनीशीं टक्कर मारण्यास तयार झाले होते. इ. स. १६३६ त कोर्टीन, पिंडर व पोर्टर ह्या धनसंपन्न व्यापाऱ्यांनीं संगनमत करून कंपनीचा व्यापार बुडविण्याची मसलत केली. त्यांनीं मोठमोठ्या रकमा राजास कर्ज देऊन त्यास आपणाकडे वळवून घेतलें, आणि त्याजपासून व्यापाराची सनद मिळविली. मात्र राजानें कंपनीची सनद रद्द केली नाहीं. तथापि ह्या कृत्यानें विलक्षण घोटाळा उत्पन्न होऊन हिंदुस्थान, चीन वगैरे ठिकाणीं कंपनीच्या इभ्रतीस मोठा धक्का बसला. कंपनीच्या उत्कर्षाविषयीं बाहेरून राजा फारच गोड गोष्टी बोलत असे. परंतु त्याचीं अंतस्थ कृत्यें कंपनीच्या विरुद्ध असल्यामुळें व कोणत्याहि तक्रारींचा निकाल राजाकडून वेळेवर होत नसल्यामुळें उघडपणें त्याजवर उठून पार्लमेंटकडे दाद मागण्याचा कंपनीच्या डायरेक्टरांनीं निश्चय केला ( इ. स. १६४१ ). परंतु पार्लमेंटकडेहि कंपनीची दाद लागली नाहीं. पार्लमेंटला वाटे कीं कंपनी राजाच्या बाजूची आहे. अशा संकटांत तरणोपाय नाहीं असें पाहून हळूहळू आपला व्यापार गुंडाळून अखेरीस तो बंद करण्याचा कंपनीनें निश्चय केला आणि सन १६४८ त हिंदुस्थानांतील सात वखारी बंद करण्याचें ठरविलें. एकंदरींत चार्लस

राजा फांसावर चढत असतां कंपनी अगदीं डबघाईस आली होती.

इकडे हिंदुस्थानांत मात्र कंपनीचे व्यापारी निराश झाले नव्हते. त्यांच्या आरंभींच्या वखारींचें धोरण केवळ व्यापारावर अवलंबून नव्हतें. हिंदच्या पश्चिम किनाऱ्यावरूनच सर्व परकीय व्यापाराची घडामोड चाले. हा किनारा पोर्तुगीज लोकांनीं व्यापिल्यामुळें त्यांच्याशीं टिकाव धरण्यासाठीं हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांचें पाठबळ कंपनीच्या व्यापाऱ्यांस पाहिजे होतें. ह्यासाठीं त्या किनाऱ्यावरील मोंगलांचें मुख्य ठिकाण जें सुरत तेथेंच प्रथम त्यांनीं वखारी घातल्या. सुरतेसहि डच लोकांनीं इंग्रजांचा पाठलाग करण्यास सोडलें नाहीं. परंतु मोंगल बादशहाच्या बंदोबस्तापुढे डच लोकांच्या हातून इंग्रजांचें वांकडें झालें नाहीं. इराणी आखातांत व पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीजांचा दंगा मोडण्यांत इंग्रजांचा चांगलाच उपयोग बादशहास झाला असल्यामुळें समुद्राकडून पश्चिम हद्दीच्या बंदोबस्तास इंग्रज आरमार आपल्यास फार उपयोगाचें आहे अशी बादशहाची समजूत होती. सनें १६२९ त शहाजहान बादशहानें पोर्तुगीज लोकांस वाटेल तेथें गांठून त्यांचा फडशा उडविण्याची परवानगी इंग्रजांस दिली. पुढील वर्षीं सुवाली येथें इंग्रज व पोर्तुगीज जहाजांची मोठी लढाई होऊन दोघांची बरोबरी झाली. तथापि इंग्रजांचा वरचढपणा कायम राहिला. इ स. १६३० त इंग्लंड व पोर्तुगाल ह्यांमध्यें माद्रिद येथें तह होऊन पूर्वेकडील व्यापारासंबंधीं उभयतांची गोडी झाली.

इ. स. १६२९ पासून १६३४ पर्यंत कंपनीच्या व्यापारांत ३६ गलबतें वावरत होतीं. पैकीं विल्यम नांवाच्या एका गलबतावर १६० खलाशी होते. त्यांतील आठ गलबतें वरील पांच वर्षांत नवीन तयार केलेलीं होतीं. सहा सातशें टन आकाराचें गलबत बांधण्यास त्यावेळीं पन्नास साठ हजार रुपये खर्च येत असे.

इसवी सन १६३३ त हिंदुस्थानांतील सर्व वखारींत मिळून १९० व्यापारी काम करीत होते. गरिबांस अन्न व भिक्षा वांटणें, हॉस्पिटलसारख्या संस्थांस वर्गण्यांची मदत देणें अशा कामीं कंपनीचा खर्च सढळ असे.

इ. स.१६४३त इंग्लंडांत विल्यम कॉकेन याची कंपनीच्या गव्हर्नरच्या जागीं नेमणूक झाली. त्याच्या हाताखालचा विल्यम मेथ्वोल्ड हा डेप्युटीगव्हर्नर हुषार होता.यास हिंदुस्थानांतील व्यापाराची उत्कृष्ट माहिती असून त्या व्यापारांत धनाढ्य होऊन हा परत गेला होता. हा प्रथम इ. सन १६१५ त सुरतेस आला व नंतर व्यापाराची माहिती मिळवीत सर्व हिंदुस्थानभर फिरला. गोवळकोंडा येथील हिऱ्याच्या खाणींची वार्ता यानेंच प्रथम प्रसिद्धीस आणिली. इ. स. १६३१ ते ३७ पर्यंत तो सुरतेचा प्रेसिडेंट होता व या अवधींत कंपनीची व्यापाराची शिस्त त्यानें चांगली ठेवली. बंगाल प्रांतांत कंपनीला वखारी घालण्याचें प्रोत्साहन यानेंच दिलें. सारांश इंग्लंडांत कंपनी टेंकीस आली असतां मेथ्वोल्डसारख्या गृहस्थांनीं हिंदुस्थानांत तिची बाजू फार चांगली संभाळिली होती.

अशा रीतीनें कंपनीचे व्यापारी खटपट करीत होते. चार्लस जिवन्त असतांना व त्याचा शिरच्छेद झाल्यावर कांहीं दिवसपर्यंत कंपनीला उघडपणें बोलण्याची सुद्धां मनाई होती. केव्हां कोणता पक्ष वरचढ होतो व आपली शेंडी कोणाच्या हातांत जाते याचा अजमास न सांपडल्यानें प्रत्येक व्यवहारांत तीस जपून वागावें लागे व कोणत्याहि पक्षास राग न येईल अशी भाषा वापरणें भाग पडे.

म द्रा स ची उ त्प त्ति.—पूर्व किनाऱ्यावर मद्रासच्या उत्तरेस तेवीस मैलांवर पुलिकत येथें डच लोकांचें ठाणें होतें. पुलिकत हें एक लहानसें बेट असून तें इ. स. १६०७ त डच लोकांनीं काबीज केलें होतें. इ. स. १६११ त सातव्या सफरींतील इंग्रज जहाजांनीं तें काबीज करण्याचा प्रयत्न केला, पण तो डच लोकांनीं चालू दिला नाहीं. तेव्हां पुलिकतच्या उत्तरेस पेट्टपुळी येथें कॅप्टन हिपोन यानें एक इंग्रजांची वखार इ. स. १६११ आगस्टमध्यें घातली. पेट्टपुळी हें हल्लीं कृष्णा जिल्ह्यांत निजामपट्टण म्हणून प्रसिद्ध आहे. इ. स. १६२० त डच व इंग्रज यांचें सख्य होऊन डच लोकांनीं पुलिकत येथें इंग्रजांनां व्यापार करण्याची मोकळीक दिली, पण आंबोयना येथील कत्तलीनंतर पुलिकतहि सोडून देणें इंग्रजांनां भाग पडलें. इकडे पेट्टपुळीचा व्यापार कांहीं दिवस चालला. पण तेथील हवा वाईट असल्यानें इ. स. १६२१ मध्यें तें ठिकाण इंग्रजांनीं सोडून दिलें. तथापि पुनः तेथें इ. स. १६३३ त त्यांनीं आपल्या वखारी घातल्या. अशा रीतीनें रडतखडत पेट्टपुळी येथें इंग्रज रहात असतां इ. स. १६८७ त कंपनीच्या हुकुमानें ती वसाहत मोडण्यांत आली. वरील ठिकाणीं आपला निभाव लागत नाहीं हें जाणूनच कॅप्टन हिपोन हा उत्तरेस मच्छलीपट्टण येथें गेला. पेट्टपुळी जसें कृष्णेच्या दक्षिण तीरावर आहे, तसें मच्छलीपट्टण उत्तरतीरावर आहे. येथें इ. स. १६११ त हिपोन यानें इंग्रजी वखार घातली. मच्छलीपट्टण येथें इंग्रजांस कापड पुष्कळ मिळे आणि तेथून अनेक बंदरांनां निरनिराळ्या प्रकारचा माल रवाना होई. गोवळकोंड्याचे हिरे, माणकें व अंतर्गत भागांतलीं सुंदर वस्त्रें यांचा बाह्यप्रदेशांत मोठा खप होत असे. तसेंच पूर्वेकडील बेटांतील सोनें, कापूस, ऊद वगैरे माल मच्छलीपट्टणास खपे. सुरतेस वखारी घालून इंग्रजांनीं पोर्तुगीजांचा पश्चिमेकडील सर्व व्यापार बळकाविला. त्याचप्रमाणें मच्छलीपट्टणच्या वखारीनें पोर्तुगीजांचा पूर्वेकडील व्यापार बळकाविला. मच्छलीपट्टणाबद्दल डच लोकांशीं इंग्रजांची चांगलीच चुरस लागली. इ. स. १६३१ मध्यें किनाऱ्यावरच्या एतद्देशीय अधिकाऱ्यांपासून इंग्रज व्यापाऱ्यांनीं सुवर्णपत्रावर व्यापार करण्याचा परवाना

लिहून घेतला. इ. स. १६१९ सालचा एक लेख असा आहे कीं, मच्छलीपट्टणची वखार थोड्या खर्चात अत्युत्कृष्ट चालली होती. तथापि लवकरच डच लोकांनीं इंग्रजांस इतका त्रास दिला कीं, मच्छलीपट्टणचे कांहीं इंग्रज व्यापारी इ. स. १६२८ त पळून जाऊन आर्मागांव येथें राहिले. तरी मच्छलीपट्टणाबद्दल त्यांची आशा नष्ट झाली नव्हती. इ. स. १६३३ त गोवळकोंड्याच्या कुतबशहापासून मच्छलीपट्टणच्या वखारीचा परवाना इंग्रजांनीं सुवर्णपत्रावर पुन्हां लिहून घेतला व त्याबद्दल इराणचे घोडे आणून शहास देण्याचें इंग्रजांनीं पत्करिलें. याप्रमाणें मच्छलीपट्टणास व्यापार सुरू केला व तो अद्याप अव्याहत चालला आहे

मच्छलीपट्टणच्या नजीक आर्मागांव येथें सन १६२६ त इंग्रजांनीं पहिली वखार घातली व तेथें तोफा वगैरे ठेवून डच लोकांपासून ते आपला बचाव करूं लागले. पण तेथें मालाचा पुरवठा बरोबर न झाल्यानें ती जागाहि त्यांस सोडून द्यावी लागली. आर्मागांवचा मुख्य व्यापारी फ्रान्सिस डे हा होता. त्यानें डच लोकांचा त्रास मिटविण्याकरतां पुलिकतच्या दक्षिणेस मद्रास येथें नवीन वसाहत स्थापण्याचें ठरविलें. तेथें बंदर चांगलें होतें व सेंट टॉमे येथील पोर्तुगीजांची त्यांस मदत मिळण्यासारखी होती.

आर्मागांव व मच्छलीपट्टण येथें डच लोकांपुढें इंग्रज व्यापाऱ्यांचा टिकाव लागेना, तेव्हां फ्रॉन्सिस डे हा चंद्रगिरीच्या नायकाकडे गेला ( इ. स. १६३९ ऑगस्ट ता. २७ ). चंद्रगिरीच्या वंशांतील पुरुष श्रीरंगराय नाईक म्हणून होता. श्रीरंगरायानें इ. स १६३९ त पूर्व किनाऱ्यावर आपल्या ताब्यांतलि कांहीं जागा व तेथें तटबंदी करण्याची परवानगी इंग्रजांस दिली. चंद्रगिरीचा नाईक निराश्रीतच होता, तेव्हां इंग्रजांनीं आपल्या मुलखांत तटबंदीचें ठिकाण बांधिलें असतां वेळेवर आपल्या बचावासहि तें उपयोगी पडेल अशा हेतूनें त्यानें ही इंग्रज कंपनी आपल्या घरांत आणिली. श्रीरंगरायापासून वरील करार करून घेऊन डे हा लगेच मच्छलीपट्टणास गेला. कर्ज वगैरे काढून डे यानें तट बांधण्याचें काम फेब्रुवारी सन १६४० ला सुरू केलें. ता. २३ एप्रिल रोजीं सेंट जॉर्ज साधूचा पुण्यदिवस होता. त्याच दिवशीं किल्ल्याचा तट समाप्त झाला, म्हणून त्या किल्ल्यास फोर्ट सेंट जॉर्ज असें नांव देण्यांत आलें. इ. स. १६४२ त डे विलायतेस गेला आणि मच्छलीपट्टणचे इंग्रज लोक मद्रासेस येऊन राहिले. मद्रासची स्थापना झाली, व पूर्व किनाऱ्यावर कंपनीचा पाय रोंवला गेला. थोड्याच दिवसांत इंग्रजांचा मद्रासेस चांगला जम बसला. आरंभीं मद्रासची वसाहत बँटमच्या ताब्याखालीं होती. पण इ. स. १६५३ त ' मद्रास प्रेसिडेन्सी ' ह्या नांवानें ती स्वतंत्र झाली. इ..स. १६४५ त गोवळकोंड्याच्या कुतुबशहाकडून मद्रासच्या वसाहतीची सनद कंपनीनें मिळविली. पुढें यूरोपांत क्रॉम्वेलनें डच लोकांशीं लढून त्यांचा बंदोबस्त केला, आणि इ. स. १६५७ त मद्रासची व्यवस्था नीट लावून दिली. तेव्हांपासून त्याची भरभराट होत आली आहे.

बं गा ल्यां ती ल व खा रीं ची सु रु वा त.—सुरत व मद्रास ह्यांहून बंगालचा प्रकार वेगळा आहे. बंगाल प्रांत मोंगलांच्या राजधानीपासून दूर असल्यामुळें तेथचे अधिकारी बहुतेक स्वतंत्रच असत. शिवाय गुजराथेंतील सुरतेवर जसें बादशहाचें प्रत्यक्ष लक्ष असे, तसें बंगाल प्रांताकडे नव्हतें. म्हणून मच्छलीपट्टणच्या इंग्रज वखारवाल्यांनीं प्रथम बंगाल प्रांतांत प्रवेश केला. त्यांनीं इ. स. १६३३ त राल्फ, कार्टराइट वगैरे कांहीं व्यापारी महानदीच्या मुखांतून वर ओरिसांत पाठविले. ओरिसाच्या अधिकाऱ्यानें त्यांस आपल्या प्रांतांत जमीन विकत घेऊन वखारी घालण्याची व जहाजें बांधण्याची इ. स. १६३३ त परवानगी दिली, आणि त्यांस मेजवानी देऊन निरोप दिला. पुढें त्या इंग्रजांनीं हरिहरपूर व बालासोर येथें वखारी घालून इ. स. १६३३ च्या जुलै महिन्यांत इंग्लंडहून आणिलेला माल उतरला. पण हा माल तेथें खपला नाहीं. ही आंतबट्ट्याची व्याद नको असें विलायतेंतील कंपनीस व इकडे मच्छलीपट्टणच्या अधिकाऱ्यांसहि वाटलें; आणि इ. स. १६४१ त बालासोरच्या व्यापाऱ्यांस निघून येण्याविषयीं इंग्लंडहून हुकूम आला. त्याच संधीस फ्रान्सिस डे मद्रासेहून बालासोर येथें गेला; आणि तेथील हकीकत पाहून ही वखार बंद करूं नये असें त्यानें ठरविलें. पुढें हा प्रश्न विलायतेस गेला; तेथेंहि इ. स. १६५० पर्यंत त्याचा निकाल लागला नाहीं. इ. स. १६५० त बंगाल्यांत वखार असण्याची जरूर आहे असें डायरेक्टरांनीं ठरविलें. इ. स. १६५१ पासून बंगाल प्रांतांत इंग्रजांचा व्यापार व्यवस्थितपणें सुरू झाला. म्हणजे बालासोर, पिंपळी, हुगळी, कासीमबझार, पाटणा ह्या व अन्य ठिकाणीं त्यांनीं हें काम चालू केलें. पण आरंभींच एवढा विस्तार कंपनीच्या मूठभर नोकरांस झेंपण्यासारखा नव्हता. सहा सात वर्षांतच मद्रासच्या कौन्सिलनें ठरविलें कीं, बंगाल्यांतील वखारी बंद कराव्या, पण इ. स. १६५७ त क्राम्वेलनें कंपनीच्या कारभाराची नवीन व्यवस्था लावून दिली. तेणेंकरून त्यांच्या उद्योगास निराळें वळण लागलें. हिंदुस्थानांतील इंग्रज व्यापारी कंपनीच्या फायद्याकडे न पाहतां स्वतःच्याच तुंबड्या भरीत. त्यांच्या बंदोबस्तासाठीं क्रॉम्वेलनें प्रत्येक वखारीचे नियम बांधून दिले. वखारींत एक मुख्य, त्याचे तीन मदतनीस व हाताखालीं दुसरे लोक, अशा नोकरांच्या पायऱ्या बांधून मुख्य अधिकार सुरतेचा, सुरतेच्या ताब्यांत मद्रास, व मद्रासच्या ताब्यांत हुगळी, असा बंदोबस्त क्रॉम्वेलनें केला. सारांश, इ. स. १६५८ हें वर्ष कंपनीच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे. इ. स. १६५८ पासून पुढें शंभर वर्षें पावेतों इंग्रज केवळ व्यापाराकडे लक्ष देऊन होते. इ. स. १७५८ त ते राज्य मिळवूं लागले. त्या राज्याची सांगता इ. स. १८५८ त झाली.

अर्थात हे तीन शतसंवत्सर ब्रिटिश अंमदानींत स्पष्ट लक्षांत ठेवण्याजोगे आहेत.

क्रॉम्वेलनें डच राष्ट्राचा पाडाव करून कंपनीच्या व्यापाराची सुव्यवस्था लावून दिल्यावर पंचवीस वर्षांत कंपनीची अतिशय भरभराट झाली. पोर्तुगीज लोकांची सत्ता संपून डच लोकहि मंदावले. पुढें दुसऱ्या चार्लस राजाच्या कारकीर्दींतहि या कंपनीस भाग्याचे दिवस लाभले. दुसऱ्या चार्लसनें दरवर्षी कंपनीकडून दहा पौंड भाडें घेऊन मुंबई बेट तिच्या हवालीं करावयाचें ठरविलें. यामुळें मुंबई बेटावर कंपनीची पूर्णपणें सत्ता चालू झाली; व अशा रीतीनें हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्तेचा पाय रोंवला गेला. याशिवाय इंग्लंडमध्यें व्यापारी लोकांचें एक मंडळ निर्माण करून त्यांत ईस्ट इंडिया कंपनीचे दोन प्रतिनिधी घ्यावयाचें चार्लसनें ठरविलें. पण याहूनहि महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे या राजानें कंपनीला पांच महत्त्वाच्या सनदा दिल्या ही होय. या सनदांमुळें या कंपनीला नवीन प्रदेश मिळविणें, कंपनीच्या नांवानें नाणीं पाडणें, किल्ले बांधविणें, सैन्य ठेवणें, वाटेल त्या राष्ट्राशीं सलोखा करणें अगर युद्ध पुकारणें व आपल्या हद्दींत दिवाणी, फौजदारी न्यायनिवाडा करणें इत्यादि बाबतींत हक्क मिळाले व त्यामुळें ई. इं. कंपनी ही एक प्रबल व प्रचंड अशी सनदशीर कंपनी बनली अशा स्थितींत व्यापाराचा उद्योग थोडासा बाजूस ठेवून, त्याच्या नांवाखालीं राज्यप्राप्तीचा उद्योग हातीं घेतां येईल, आणि जपून वागलें तर तो सिद्धीसहि जाईल, अशीं स्वप्नें कंपनीच्या नोकरांपैकीं कित्येकास पडूं लागलीं. मुंबईसारख्या स्वतंत्र जागा कंपनीच्या ताब्यांत आल्यापासून एकमेकांशीं झगडणाऱ्या एतद्देशीय सत्ताधीशांच्या दरम्यान लुब्रेपणा करण्यास कंपनीस चांगली सवड झाली. राज्यस्थापनेचीं स्वप्नें प्रथम ज्या इसमांस पडलीं, ते ऑक्झेंडन, ऑंजियर व चाइल्ड हे अधिकारी होत. सर जॉन चाइल्ड मुंबईस काम पाहूं लागल्यापासून हिंदुस्थानांत कंपनीची मजबुदी करण्याकडे अधिकाऱ्यांचें विशेष लक्ष होतें. सुरतेवर मराठे झडप घालूं लागल्यामुळें तेथची मोंगलसत्ता बहुतेक नाहींशी झाली होती. तिकडे मद्रास व कर्नाटक हेहि प्रांत अशाच स्थितींत होते. म्हणून जहाजें वाढवून त्यांवरून तोफांनीं आपला बंदोबस्त करणें एवढाच उपाय कंपनीच्या स्वाधीन होता. हा उपाय हळूहळू अमलांत आला. सुरत सोडून इंग्रज मुंबईस आले. मुंबईस इंग्रजांस मोंगलांचा आश्रय नाहींसा झाल्यामुळें एकतर आपला आपणच बंदोबस्त केला पाहिजे, नाहींतर हिंदुस्थान सोडून चालतें तरी झालें पाहिजे, असा प्रश्न त्यांजपुढें येऊन पडला. इकडे बंगाल्यांत शाएस्तेखानाशीं इंग्रजांचा झगडा सुरू होऊन, तेथेंहि 'शस्त्र तरी धारण करावें, नाहीं तर बंगालप्रांत सोडून चालतें व्हावें,' असा प्रसंग आला.

ह्या सर्व कागाळ्या विलायतेंत कंपनीच्या कानावर गेल्या. पुढें काय करावें ह्याची पुष्कळ भवति न भवति झाली. हिंदुस्थानांत सर जॉन चाइल्ड मोंगलांशीं दोन हात करण्यास उत्सुक झाला होता. त्यावेळीं विलायतेंत त्याचाच भाऊ सर जशुआ चाइल्ड हा कंपनीचा गव्हर्नर होता. त्याच्या सहाय्यानें कंपनीच्या कोर्टानें मोंगल बादशहाशीं युद्ध करून कंपनीची बाजू राखण्याविषयीं आपल्या नोकरांस हुकूम पाठविले. हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यस्थापनेचा हा खरा आरंभ होय.

मोंगलांशीं सामना करण्याचा कंपनीनें निश्चय केला, त्यास राजा जेम्सनें पाठबळ दिलें. ई. इं. कंपनींत त्याचें भांडवल होतें, त्याच्या फायद्यावरच त्यास हद्दपार झाल्यावर आपलें पुढील आयुष्य कंठतां आलें. फ्रान्स देशांत पळून जातेवेळीं ७० हजार रुपयांचे आपले भाग त्यानें विकले. राजाची मोठी रक्कम कंपनींत गुंतली असल्यामुळें, त्यानेंहि जहाजें, लोक, पैसे वगैरे वाटेल ती मदत एकदम कंपनीस दिली. तेव्हां त्यास खर्चास पैसा मिळाला. कॅप्टन निकलसनच्या हाताखालीं सहा पायदळ पलटणें व दहा लढाऊ गलबतें विलायतेहून बंगाल्यांत रवाना झालीं. ह्यांस हिंदुस्थानांतील वखारींतली मंडळी येऊन मिळणार होती. पश्चिम समुद्रावर मोगलांचीं यात्रेकरू जहाजें पकडावीं नंतर बंगल्यांतील सर्व लोक जमा करून पूर्व सरहद्दीवरील ठिकाण जें चित्तगांव तें काबीज करावें, तेथें एक टांकसाळ घालावी. नंतर गंगेच्या मुखांतून डाक्का येथें जाऊन सुभेदाराच्या वाड्यावर हल्ला करून त्याजकडून वाटेल तसा तह करून घ्यावा, इतकें केल्यावर सयामच्या राजाचें पारिपत्य करून मुंबईजवळच्या साष्टी व ठाणें ह्या जागा पोर्तुगीज लोकांशीं लढून घ्याव्या, असा ह्या स्वारीच्या चालकांस विलायतेहून हुकूम आला होता. पण 'बोलेल तो करील काय' अशी ह्या स्वारीची अवस्था झाली. मुंबई कोठें, चित्तगांव व सयाम कोठें, मोंगलांची सत्ता केवढी, इत्यादि गोष्टींविषयीं एवढा अंधार कंपनींत असावा हेंच आश्चर्य आहे. अर्थात वरचा एकहि बेत सिद्धीस गेला नाहीं.

युद्ध बंगाल्यांतच चाललें होतें असें नाहीं. सर जॉन चाइल्डनें पश्चिम किनाऱ्यावर मोंगलांचीं यात्रेकरूं जहाजें पकडलीं, तेव्हां मात्र बादशहास राग येऊन त्यानें इंग्रजांस आपल्या सर्व राज्यांतून हांकून देण्याचे हुकूम सोडिले. सुरत, मच्छलीपट्टण, विशाखापट्टण वगैरे ठिकाणच्या इंग्रजांच्या वखारी मोंगल अधिकाऱ्यांनीं काबीज केल्या. मुंबईवर सिद्दीच्या आरमाराची रवानगी झाली. बंगाल्यांतून तर इंग्रज पळून आलेच होते. जॉन चाइल्डनें फ्रेंच व डच यांची आपणांस मदत मिळविण्याबद्दल खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं.

मोंगल आरमाराचा मुख्य जंजिऱ्याचा सिद्दी याकूबखान पंचवीस हजार लोक घेऊन मुंबईवर आला ( सन १६८९

फेब्रुआरी). मध्यरात्रीस एकदम मुंबईवर घाला आल्याबरोबर किल्ल्यांत तीन तोफा सुटल्या. त्या ऐकून यूरोपियन व एतद्देशीय लोक बायकांमुलांसह सैरावैरा पळू लागले. सकाळीं सिद्दीनें मजगांव काबीज करून तेथें तोफखाना चढविला. माहीमचा किल्लाहि त्यानें हस्तगत केला. तिसऱ्या दिवशीं थोडीशी लढाई होऊन किल्ला शिवायं करून बाकीचें सर्व बेट सिद्दीनें हस्तगत केलें. तेव्हां हात जोडून शरण जाण्याशिवाय चाइल्ड यास गत्यंतर राहिलें नाहीं. अशा स्थितींत अत्यंत मानहानि सहन करून क्षमा मागण्याकरितां आपले दोन इंग्रज वकील त्यानें बादशहाकडे पाठविले. 'हात पाठीवर बांधून लोटांगणें घालीत ते बादशहापुढें आले' औरंगजेबाच्या मनांत इंग्रज व्यापारांस घालवून देण्याचें मुळींच नव्हतें. त्यांच्या व्यापारापासून आपणांस मोठें उत्पन्न आहे असें त्यास वाटून, झाली एवढी मानहानि पुरे, अशा बुद्धीनें कांहीं अटींवर त्यांचें म्हणणें बादशहानें मान्य केलें. मोंगल अधिकाऱ्यांचें किंवा हिंदुस्थानांतील रयतेचें जें जें नुकसान झालें असेल तें तें सर्व इंग्रजांनीं भरून द्यावें, आणि चाइल्ड ह्यानें हिंदुस्थानांत राहूं नये, असा करार ठरला.

इ. सन १६८८ तील चकमकीनें कित्येक गोष्टी कंपनीच्या पूर्णपणें लक्षांत ठसल्या. पहिली, मोंगलांशीं जमिनीवर उघड सामना करणें कंपनीस अशक्य होय; आणि दुसरी, मक्केस जाणाऱ्या यात्रेकरू जहाजांवर दहशत बसविणें आणि मोठमोठ्या व्यापारी बंदरांची आरमारानें नाकेबंदी करणें, ह्या दोन गोष्टींनीं मोंगलास वठणीस आणतां येईल. तिसरी, तटबंदी व फौज ठेविल्याशिवाय नुसत्या वखारींचा परकी राज्यांत निभाव लागावयाचा नाहीं म्हणून जेथें व्यापार चालावयाचा असेल, तेथें स्वसंरक्षणाची तजवीज अगोदर केली पाहिजे ही होय. तटबंदी करावयाची खरी पण तिचा खर्च कोण देणार ? कंपनीस राज्य नको होतें, म्हणून तटबंदी नको होती. अशा अडचणींत सर जशुआ चाइल्डनें डच लोकांची पद्धत स्वीकारली. ज्या ठिकाणीं तटबंदी करावयाची असेल तेथील लोकांवर व रयतेवर कर बसवून पैसा काढावा, आणि तो तेथच्या मजबुतीस लावावा, अशी परभारें खर्च भागविण्याची युक्ति चाइल्डनें काढिली. अशा प्रकारची नवीन पद्धत कंपनीनें स्वीकारून टॉमस रोची पद्धत सोडून दिली. इंग्लंडांत इ. स. १६८८ त जी मोठी राज्यक्रांति झाली तशीच कंपनीच्या उद्योगांतली ही पहिली मोठी क्रांति त्याच वर्षी इकडे घडून आली. ह्या वेळेसच कंपनीला पुढील राज्यस्थापनेचीं स्वप्नें पडूं लागलीं. तीं या वेळेस औरंगजेबास दिसलीं नाहींत. औरंगजेबाची बाहेरून सरशी दिसत असतां मोंगल बादशाही आंतून मोडत चालली होती, ह्याचें प्रत्यंतर कंपनीच्या नवीन उपक्रमांत दिसून येतें.

मद्रासची स्थितिः—मद्रासच्या स्थापनेची हकीकत पूर्वी येऊन गेलीच आहे. तेथील व्यवस्थाहि बऱ्याच अंशीं इतर ठिकाणांसारखी होती. इ. स. १६७० त मद्रासची अवस्था मोठी कठिण झाली होती. दक्षिणेस सेंट टॉमे नांवाचें बंदर होतें, तें फ्रेंच आरमारानें येऊन काबीज केलें. इ. स. १६७४ त डच लोकांनीं सेंट टॉमे फ्रेंचापासून काबीज केलें; आणि मद्रासहि त्याच वेळेस घेतलें असतें. पण इतक्यांत यूरोपांतून इंग्रज व डच यांमध्यें तह झाल्याची बातमी आली, तेव्हां मद्रासच्या इंग्रजांच्या जीवांत जीव आला.

लिंगाप्पा म्हणून गोवळकोंड्याच्या नोकरींत एक लष्करी अंमलदार होता, त्यानें मद्रासवर स्वारी करून चार महिनेपर्यंत इंग्रजांचा कोंडमारा करून त्यांचा सर्व व्यापार बंद पाडिला. शेवटीं नाइलाज होऊन तीस हजार रुपये दंड भरून लिंगाप्पापासून इंग्रजांनीं आपली सटका करून घेतली. इ. स. १६७९ त शिवाजी कर्नाटकांतून परत येत असतां मद्रासेस गेला. त्याप्रसंगीं सुमारें दोन अडीचशें रुपयांचें सामान त्यास इंग्रजांनीं नजर केलें. पुढें जिंजी पडल्यावर झुल्फिकारखानास चाळीस हजार रुपये भरून त्याच्यामार्फत इंग्रजांनीं व्यापाराच्या सनदा बादशहाकडून मिळविल्या. एकंदरींत अधिकाऱ्यांची तोंडदाबी करून इंग्रज आपला बचाव करीत होते. मद्रासच्या दक्षिणेस नागपट्टण नांवाचें ठिकाण व आजूबाजूचा थोडा प्रदेश छत्रपति राजाराम ह्याजपासून खरेदी घेऊन इंग्रजांनीं तेथें नवीन किल्ला बांधिला, तो फोर्ट सेंट डेव्हिड होय.

इकडील व्यापारांत कंपनीस कल्पनातीत प्राप्ति होऊं लागली. त्याबद्दल विलायतेंतील लोकांच्या मनांत हेवा उत्पन्न झाला. हें पाहून तिला अनेक शत्रू उत्पन्न झाले. इकडे खुद्द कंपनीच्या व्यवस्थापकांतहि दुफळी झाली. एका पक्षाचा मुख्य जशुआ चाइल्ड असून दुसऱ्या पक्षाचा टॉमस पॉपिलोन होता. चाइल्डचें म्हणणें असें होतें कीं, सर्व व्यापार कंपनीसारख्या एकाच संस्थेच्या ताब्यांत असावा आणि पॉपिलोनचा पक्ष म्हणे कीं व्यापार सर्वांस खुला असला पाहिजे. त्यावर आडकाठी बसविण्याचा अधिकार राजास नाहीं. ई. इं. कंपनीच्या विरुद्ध जे लोक व्यापार करीत असत त्यांचीं गलबतें व माल पकडून कंपनीनें घ्यावा आणि त्याच्या चौकशीसाठीं कंपनीनें आपसांतून एक आरमार–कोर्ट स्थापन करावें, असें फर्मान राजानें कंपनीस इ. स. १६८३ दिलें होतें. हें फर्मान कंपनीस देण्यास राजास अधिकार नाहीं असें कंपनीच्या पक्षाविरुद्ध पक्षानें ठरवून टॉमस सॅन्डिस नांवाच्या इसमाकडून ह्या बाबतींत कोर्टापुढें दावा आणविला. ह्या सँडिसचीं गलबतें कंपनीनें पकडलीं होतीं. हा दावा लॉर्ड चीफ जस्टिस जेफ्रिस ह्याजपुढें एक वर्षभर मोठ्या जोरानें चालला. दोनहि पक्षांनीं आपल्या बाजूनें अगदीं शिकस्त केली. शेवटीं चीफ जस्टिस जेफ्रिस ह्यानें कंपनीच्या तर्फेनें निकाल दिला.

सर जशुआ चाइल्डच्या हातांत हा निवाडा पडल्यावर, त्यानें कंपनीच्या व्यापारांत ढवळाढवळ करणाऱ्या इसमांचा तावडतोब बंदोबस्त केला. तथापि त्यामुळें धंद्याचें राजरोस स्वरूप जाऊन त्यास चोरीचें व चांचेपणाचें स्वरूप प्राप्त झालें. हा चांचेपणाचा धंदा पुढें जोरांत चालू झाला.

एवढ्या अफाट प्रदेशावरचा खासगी व्यापार बंद करणें कंपनीस शक्य नव्हतें. कंपनींतील अनेक नोकर नोकरींतून बडतर्फ झाल्यावर खुशाल खासगी धंदा करीत इ. स. १६८८ च्या राज्यक्रान्तीपूर्वी पार्लमेंटनें कंपनीच्या व्यवहारांत फारसें लक्ष घातलें नव्हतें. इ. स. १६८९ त कंपनीविरुद्ध असलेल्या सर्व तक्रारी कोर्टांतून निघून पार्लमेंटपुढें आल्या. पूर्वीची वर्गणी बंद करून नवीन कंपनी स्थापन करावी व ती तयार होईतोंपर्यंतच ई. इं. कंपनीनें व्यापार चालवावा, असा ठराव पार्लमेंटनें इ. स. १६९० मध्यें केला. तदनुरूप कंपनीच्या विरुद्ध पक्षानें एकदम मोठें भांडवल जमवून नवीन कंपनी स्थापिली ( इ. स. १६९१ ) राजानेंहि दोन्ही कंपन्यांचा समेट करण्याचा प्रयत्न केला. पण चाइल्डच्या आग्रहामुळें तो प्रकार साधला नाहीं. तेव्हां तीन वर्षांची मुदत कंपनीस देऊन पुढें ती साफ रद्द करण्याचा विचार इ. स. १६९३ त ठरला. परंतु हा प्रकार घडून येण्यापूर्वीच चाइल्डनें दरबारच्या मंडळीस लांच चारून प्रधानमंडळाकडून २१ वर्षांच्या मुदतीची पूर्वीच्या सर्व हक्कांची नवीन सनद ई. इं. कंपनीसाठीं मिळविली. नव्या कंपनीस पुढें पूर्व देशांशीं व्यापार करणारी इंग्रज कंपनी असें नांव मिळालें.

हिंदुस्थानांत नव्या कंपनीनें जुनीचीच पद्धत स्वीकारिली होती. जुन्या कंपनीनें काढून टाकिलेल्या लबाड व नालायक लोकांस नव्या कंपनीनें हातीं घेतल्यामुळें, हिंदुस्थानांत दोघांमध्यें कलह उत्पन्न झाला. अशा संकटसमयीं पार्लमेंटनें दोन्ही कंपन्यांचा समेट केला म्हणूनच इंग्रजांचें हिंदुस्थानांत वर्चस्व कायम राहिलें. इ. स. १७०१ च्या एप्रिल मध्यें दोनहि कंपन्यांचे सात सात मुखत्यार तडजोडीसाठीं बसले. एक वर्षभर नानातऱ्हेची वाटाघाट व खटपट चालली इ. स. १७०२ च्या एप्रिलांत दोनहि कंपन्यांच्या संमेलनाचा ठराव होऊन पसंतीसाठीं राजाकडे गेला. इतक्यांत राजा मरण पावला, व राणी ॲन तख्तावर आली. तिनें इ. स. १७०२ च्या जुलै महिन्यांत त्या ठरावास आपली संमति दिली. हा ठराव दोन कंपन्या व राणी ह्या त्रिवर्गांमध्यें झालेल्या तहाच्या स्वरूपाचा आहे. त्यांत पुढील अटींवर दोन कंपन्यांची एकी करण्यांत आली. (१) नवीन कंपनीस हिंदुस्थानाशीं व्यापार करणारी इंग्रजांची संयुक्त मंडळी असें नांव देण्यांत आलें. (२) प्रत्येक कंपनीनें बारा डायरेक्टर्स नेमावे व या चोवीसांनीं विलायतेंत सर्व कच्चा कारभार पहावा. त्यांनीं विलायती मालाचा अंदाज ठरवून दोन सारखे भाग कंपन्यांस वांटून द्यावे. (३) सात वर्षांच्या अवधींत पूर्वीच्या देण्याघेण्याचे सर्व व्यवहार संपवावे. त्यानंतर दोनही कंपन्यांचे व्यवहार व पूर्वीच्या सनदा व हक्क नवीन कंपनीनें वापरावे. (४) पहिल्या कंपनीच्या ताब्यांतील इमारती, किल्ले वगैरेंची किंमत तेहेतीस लाख रुपये व नवीन कंपनीच्या ताब्यांतील इमारतींची सात लाख रुपये ठरविण्यांत आली. येणेंप्रमाणें सर्व व्यवहार उलगडण्यांत आले.

इ. स. १७०२ मधील ठरावानें दोन कंपन्यांची संपूर्ण एकी झाली नाहीं. दोहोंसहि एकमेकांचा संशय येई. ह्यासाठीं इ. स. १७०८ त राणीचा मुख्य प्रधान अर्ल ऑफ गोडोल्फिन ह्यानें कांहीं दरडावणी दाखवून व कांहीं मध्यस्थी करून पार्लमेंटांत एक बिल आणिलें. तें मंजूर होऊन ता. २९ सप्टेंबर १७०८ रोजीं त्यास राणीचें अनुमोदन मिळालें. त्यास गोडोल्फिनची तडजोड असें म्हणतात.

इ. स. १७०८ नंतरच्या पुढील तीस चाळीस वर्षांत कंपनीचा उद्योग धिमेपणें परंतु जोरांत चालू झाला. ह्या वेळेपासून इ. स. १७४६ त इंग्रज–फ्रेंचांचें युद्ध सुरू झालें, तेथपावेतों कंपनीच्या उद्योगाचें नांव बाहेर फारसें ऐकूं आलें नाहीं. तथापि ह्या शांततेच्या काळांत कंपनीस व्यापारांत अतोनात फायदा झाला. बलाढ्य इंग्रज सरकारचें तीस पूर्ण पाठबळ मिळालें. हिंदुस्थानांत पाहिजे तो कारभार करण्यास सनदेनें कंपनीस अधिकार मिळालेला होता. इतके सर्व फायदे असल्यावर एकमेकांशीं झगडणाऱ्या पडक्या मोंगलशाहींतील अधिकाऱ्यांशीं झुंजण्याची कंपनीस शक्ति आली ह्यांत नवल नाहीं.

इ. स. १७१३ त युट्रेक्टचा तह झाल्यावर पंचवीस तीस वर्षें फ्रेंच व इंग्रज कंपन्यांस जें स्वास्थ्य मिळालें, तेणेंकरून त्यांची अतोनात भरभराट झाली; आणि ह्या उभयतांत जबरदस्त चुरस लागली हा त्या भरभराटीचाच परिणाम होय. यूरोपांत ह्या दोन राष्ट्रांचें भांडण लागलें म्हणजे त्याचे परिणाम हिंदुस्थानांतहि घडून येत. इ. स. १७४३ ते १७६३ च्या दरम्यान जीं वीस वर्षें गेलीं, त्यांत यूरोपांतल्या प्रमाणेंच हिंदुस्थानांत ह्या दोन राष्ट्रांचा जबरदस्त खटका उडाला. ह्यांत अनेक एतद्देशीय सत्ताधीश सामील झाले. ह्या झगड्याच्या शेवटीं फ्रान्संची पूर्वेकडील प्रदेशावरील सत्ता सर्वथैव मोडून इंग्रज पुढें विजय पावले. इ. स. १७६३ नंतर जो झगडा एतद्देशीय व इंग्रज यांमध्यें व्हावयाचा होता त्यांत यश कोणास येणार याबद्दल संशय बाळगण्याचें कारण नव्हतें, आणि अनेकांनीं त्याचें भाकित बिनचूकपणें अगोदरच करून ठेविलें होतें, ( विशेष माहितीसाठीं कर्नाटकांतील तीन लढाया; प्लासीची लढाई यावरील लेख पहा ).

अशा रीतीनें ईस्ट इंडिया कंपनी ही राज्य कमवणारी संस्था झाली. जोंपर्यंत ती केवळ व्यापारी संस्था होती

तोंपर्यंत तिच्या कामांत ढवळाढवळ करण्याचें पार्लमेंटला प्रयोजन नव्हतें पण ती ज्या वेळेस नवीन नवीन प्रदेश कमावूं लागली, तेव्हां या नूतन प्रदेशांवर ब्रिटिश सरकारचाहि ताबा असावा असें इंग्लंडमधील लोकांनां वाटूं लागलें. १७७३ मध्यें लॉर्ड नॉर्थ या बंगालच्या गव्हर्नरला रेग्युलेटिंग ॲक्ट पास होऊन त्या कायद्यान्वयें, गव्हर्नर जनरल हा हुद्दा मिळून, यापुढील जो गव्हर्नर जनरल कंपनी नेमील त्याच्या नेमणुकीला सरकारची संमति असली पाहिजे असें ठरलें. तसेंच, चार सभासदांच्या संमतीनें गव्हर्नर जनरलनें हा राज्यकारभार चालवावा, लढाई अगर तह करण्याचा त्यास अधिकार असावा, कायदे करण्याची त्याला मुभा असावी असेंहि या कायद्यान्वयें ठरलें. यानंतर सन १७८४ मध्यें पिटनें आपलें 'इंडिया बिल' पार्लमेंटपुढें आणलें. या बिलान्वयें, हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलुखांच्या राज्यकारभाराची देखरेख करण्याचें काम 'बोर्ड ऑफ कंट्रोल' नांवाच्या एका नियामक मंडळाकडे सोंपविण्यांत आलें. या वेळेपासून राज्यकारभाराचें धोरण हळूहळू कंपनीच्या ताब्यांतून जाऊन लंडनमधील प्रधानमंडळाच्या व हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरल इन कौन्सिलच्या हातांत येऊं लागलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. सन १८१३ मध्यें कंपनीच्या व्यापारावरहि देखरेख ठेवण्याची परवानगी 'बोर्ड ऑफ कंट्रोल' ला देण्यांत आली. फक्त चीनशीं चहाचा व्यापार करण्याची मात्र खास सवलत या कंपनीकडे राहिली होती. पण तीहि १८३३ च्या ग्रेच्या कायद्यानें नाहींशीं झाली. यापुढें कंपनीचें 'व्यापारी संस्था' हें स्वरूप नाहींसें होऊन ती राज्यकारभार चालविणारी संस्था बनली. पण एवढ्या अफाट मुलुखाचें काम एखाद्या खासगी कंपनीकडे असणें हें अगदींच अस्वाभाविक होतें व त्यामुळें १८५७सालच्या बंडानंतर या कंपनीकडे असलेली व्यवस्था नाहींशी होऊन, १८५८ सालच्या आगस्ट महिन्याच्या दुसऱ्या तारखेस हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी पार्लमेंटनें आपल्या कडेच घेतली.

**डच ईस्ट इंडिया कंपनी.**—ही संस्था २० मार्च १६०२ मध्यें नेदर्लंडसच्या स्टेट्स-जनरलकडून सनद मिळून स्थापन झाली. या संस्थेचा उद्देश हिंदी महासागरांत मोठ्या प्रमाणांत चालू असलेला डच लोकांचा व्यापार संरक्षण करून व्यवस्थित चालविणें, आणि स्पेन व पोर्तुगाल विरुद्ध चालू असलेल्या स्वातंत्र्ययुद्धांत मदत करणें असा दुहेरी होता. स्पेन व पोर्तुगाल १५८०-८१ मध्यें संयुक्त होण्यापूर्वी लिस्बनपासून उत्तर यूरोपपर्यंत प्राच्य देशांतील मालाची वाहतुक मुख्यतः डचांच्या हातीं होती. पण पुढें स्पॅनिश राजानें बंदी केल्यामुळें खुद्द प्राच्य देशाकडे जाण्याचा डच लोकांनीं प्रयत्न सुरू केला, आणि स्पॅनिश व पोर्तुगीज लोकांशीं संबंध न यावा म्हणून यूरोप व आशियाच्या उत्तरेकडून प्राच्य देशांकडे जाणारा जलमार्ग शोधून काढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण तो अयशस्वी झाल्यामुळें नाइलाजास्तव केप-ऑफ गुडहोपच्या रूढ मार्गानें जाण्याचा त्यांनीं निश्चय केला. १५९५ मध्यें कॉर्नेलियस हौटमन याच्या आधिपत्याखालीं पहिल्या डच सफरीचे लोक जावा बेटांतील बँटच्या सुलतानशीं तह करून व कांहीं माल घेऊन परत आले. या यशामुळें उत्तेजन मिळून १६०२ पर्यंत निरनिराळ्या कंपन्यांची मिळून साठ सत्तर जहाजें हिंदुस्थान व हिंदी महासागरांतील बेटें यांमध्यें जाऊन आलीं. पण त्यांच्यावर नियंत्रण नसल्यामुळें तीं आपसांत, तसेंच पोर्तुगीज व पूर्वेकडील देश्य लोक यांच्याबरोबरच भांडत; म्हणून १६०२ मध्यें सर्वांची एक डच ईस्ट इंडिया कंपनी स्टेट्स-जनरलनें स्थापली, आणि तिला सर्व व्यापारावर नियंत्रण ठेवण्याचा व स्पेन व पोर्तुगाल बरोबर युद्ध करण्याचा अधिकार दिला. या कंपनीनें पासष्ट लक्ष फ्लोरिन भांडवल जमविलें. कंपनीनें 'एक बोर्ड ऑफ कंट्रोल' स्थापलें, व गव्हर्नर जनरल बोर्डाच्या सभासदांनीं नेमावा असें ठरविलें. कंपनीला व्यापाराचा कुलमक्ता देण्यांत आला; तसेंच सैन्य ठेवणें, वसाहती स्थापणें, किल्ले बांधणें, तह व युद्ध करणें, वगैरेसंबंधीं अधिकार देण्यांत आले.

या कंपनीचा १६०२ पासून१७०० पर्यंतचा इतिहास युद्धें व परराष्ट्रीय करारमदारांनीं भरलेला आहे. जावामधील बटेव्हिया येथें या कंपनीनें मुख्य ठाणें ठेवलें व आपला पसारा पुष्कळ वाढविला. चीन व जपानबरोबर करार केले; मलाया बेटांत व सीलोनांत मुलुख जिंकून घेतला; केप ऑफ गुडहोप, इराणचें आखात, मलबार व कारोमांडल व बंगाल हे किनारे इतक्या ठिकाणीं वखारी स्थापल्या, पोर्तुगीजांना सीलोनांतून ( १६३८-१६५८ च्या दरम्यान, ) आणि मलाक्कांतून (१६४१ त ) हाकून दिलें. ही डचांची भरभराट १६६९ मध्यें शिखरास पोहोंचली होती. त्यावेळीं या कंपनीचीं दीडशें व्यापारी जहाजें, चाळीस लढाऊ जहाजें, व दहा हजार सैनिक होते व कंपनी चाळीस टक्के नफा देत असे. सतराव्या शतकाच्या अखेरीस कंपनीची स्थिति खालावूं लागली. याचीं कारणें अनेक झालीं. कंपनीनें कुलमक्त्याचा हक्क कडक रीतीनें बजावल्यामुळें प्रतिस्पर्धी व्यापाऱ्यांस फार राग आला. आंबोयनाच्या कत्तलीमुळें इंग्लिश राष्ट्र खवळलें, फ्रेंच व इंग्लिशांनीं हिंदुस्थान व सीलोन येथून डचांना हाकून लावलें, व्यापारांतला फायदा युद्धांत फार खर्च होऊं लागला; यामुळें अठराव्या शतकाच्या आरंभीं कंपनी बरीच डबघाईस आली. शिवाय कंपनीचे डायरेक्टर पैसेखाऊ बनल्याची ओरड होत असे. तरी कंपनी जीव धरून होती. पण फ्रेंच राज्यक्रांतिकारांच्या सैन्यानें हालंड जिंकल्यावर १७९८ मध्यें कंपनी बुडाली.

हिंदुस्थानशीं व्यापार करणाऱ्या जर्मन कंपनीची माहिती 'आस्टेंड कंपनी' या लेखांत आलेलीच आहे. फ्रेंच कंपनीची माहिती फ्रेंच इंडिया व हिंदुस्थानचा इतिहास यांत सांपडेल.

[ संदर्भ ग्रंथ.—परचस हिज पिलग्रिमिज भाग दोन ते पांच ( १९०५ ); सर डब्ल्यू हंटर—हिस्टरी ऑफ ब्रिटिश इंडिया ( १८९९ ); वेकफस्ट विल्सन—लेजर ॲन्ड सोर्ड ( १९०३ ); बर्डवुड—रिपोर्ट ऑन दि ओल्ड रेकॉर्ड्स ऑफ दि इंडिया ऑफीस ( १८७९ ); दि ईस्ट इंडिया कंपनीज फर्स्ट लेटरबुक ( १८९५ ); रेलिक्स ऑफ दि ऑनरेबल ईस्ट इंडिया कंपनी ( ग्रिक्सची प्रत १९०९ ); सरदेसाईकृत ब्रिटिश रियासत ( पूर्वार्ध ); रॉबिन्सन—दि ट्रेड ऑफ ईस्ट इंडिया कंपनी ( १९१२ ); ]

**ईस्ट इंडीज**–ब्रिटिश, डच, फ्रेंच व पोर्तुगीज असे चार ईस्ट इंडीज विभाग आहेत. पूर्वी हिंदुस्थान, फर्दर इंडिया व मलाया आर्चिपेलॅगो या समूहाला ईस्ट इंडीज म्हणत; कारण ज्यावेळी वेस्ट इंडीजचा शोध लागला त्यावेळीं तो हिंदुस्थानचा पश्चिम भाग असावा असा समज होता. हल्लीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलुखाला ब्रिटिश ईस्ट इंडीज, फ्रेंच मुलुखाला फ्रेंच ईस्ट इंडीज व पोर्तुगीज मुलुखाला पोर्तुगीज ईस्ट इंडीज म्हणतात. कधीं कधीं फक्त मलाया आर्चिपेलॅगोलाच ईस्ट इंडीज म्हणतात; व या प्रदेशांतील जावा, सुमात्रा वगैरे डच लोकांच्या मुलुखाला साधारणतः “डच ईस्ट इंडीज” म्हणतात. [ स्टेट्समन्स ईयर बुक ]

**ईस्टर**—ईस्टर हा ख्रिश्चन लोकांचा प्रमुख वार्षिक उत्सव आहे. येशू ख्रिस्ताच्या ‘पुनरुत्थाना’ च्या स्मरणार्थ हा उत्सव पाळण्यांत येतो. हा आनंदाचा उत्सव असल्याकारणानें, या वेळीं उपासनामंदिरें, व मंदिरांतील वेदी निरनिराळ्या सुंदर पुष्पांनीं व उत्तम दागिन्यांनीं सजविल्या जातात. पाद्री व इतर ख्रिस्ती लोक पावित्र्य, आनंद इत्यादि गुणांचीं दर्शक अशीं शुभ्र वस्त्रें परिधान करितात; जिकडे तिकडे रोषणाई करण्यांत येते.

ईस्टर हें नांव ट्यूटन लोकांच्या पुराणांतरीं आढळून येतें व वारांच्या नांवाप्रमाणेंच हेंहि नांव त्या पुराणांपासून घेतलेलें आहे. ‘ईस्टर’ हा शब्द ईओस्ट्रे अगर ओस्टार या वसंत देवतेच्या नांवापासून बनलेला आहे. या वसंत देवतेचा महिना एप्रिल हा आहे व त्याला ‘ईस्टर’ महिना असें संबोधण्यांत येतें. ‘ईस्टर’ उत्सवाचें मूळ हिब्रू लोकांच्या ‘पासोव्हर’ उत्सवांत आढळून येतें असें कांहींचें मत आहे, व तें बऱ्याच अंशानें खरेंहि आहे. पण या हिब्रू व ज्यू लोकांच्या ‘पासोव्हर’ ( निर्याण ) उत्सवांत ख्रिश्चन लोकांनीं ‘ख्रिस्त हा स्वार्थत्याग व सोशीकपाचें उत्कृष्ट उदाहरण आहे व त्याला कधींच मरण नाहीं’ या नवीनच कल्पनेची भर घातली व या उत्सवाला नवीन वळण लावलें. अशा रीतीनें पासोव्हरचें झालेलें रूपांतर म्हणजेच ख्रिश्चन लोकांचा ईस्टर उत्सव होय.

ईस्टर उत्सवाचा उल्लेख ‘नवा करार’ अगर ‘प्रेषितांचे ग्रंथ’ यांत आढळत नाहीं. तरी पण हा उत्सव पाळण्याची चाल, फार प्राचीन आहे यांत शंका नाहीं. पूर्वीपासूनच हा उत्सव केव्हां व कसा पाळला जावा यासंबंधीं अनेक भांडणें उपस्थित झालीं होतीं. ज्यू जातीचे ख्रिश्चन लोक ईस्टर मास सुरू होण्याचा पहिला दिवस उपवास म्हणून पाळीत तर ‘जेंटाइल’ ख्रिश्चन हे ईस्टर आठवडा सुरू होण्याचा पहिला दिवस उपवासाचा मानीत. पश्चिमेकडील ख्रिस्ती मंडळी ईस्टर आठवड्याचा पहिला दिवस पाळीत, तर पूर्वेकडील ख्रिस्ती मंडळी ईस्टर महिन्याचा पहिला दिवस पाळीत. यासंबंधीचा निकाल लावण्याकरितां, कान्स्टंटाइन बादशहानें ३२५ सालीं एक सभा बोलाविली. त्या सभेंत ईस्टरचा उत्सव, ईस्टर आठवड्यांतील रविवारींच पाळावा. व सर्व जगांत त्याच दिवशीं हा उत्सव पाळला जावा असें ठरविलें; हा रविवार कोणत्या तारखेला पडतो हें ठरविण्याचें व जाहीर करण्याचें काम अलेक्झांड्रिया येथील धर्मगुरुकडे सोंपविण्यांत आलें. वसंतसंपातानंतरच्या पौर्णिमेनंतरच्या पहिल्या आठवड्याचा रविवार हा ईस्टर उत्सवाचा मुख्य दिवस ठरला. पण निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या वेळीं वसंत संपात होत असल्यानें हा मुख्य दिवस देखील निरनिराळ्या तारखेस पडूं लागला. अद्यापि देखील पूर्वेकडील ख्रिस्ती मंडळांत व पश्चिमेकडील ख्रिस्ती मंडळांत हा फरक दृष्टीस पडतो.

ईस्टर उत्सवाचे चार भाग पडतात. ( १ ) ईस्टर सुरू होण्यापूर्वीचा चाळीस दिवसाचा उपवास. ( २ ) ईस्टरच्या पूर्वीचा रविवार व नंतरचा रविवार या मधील १५ दिवसांचा काळ; या अवधींत ईस्टर उत्सवाचे जे प्रमुख विधी ते करण्यांत येतात. ( ३ ) ऑक्टेव्ह ऑफ ईस्टर; या अवधींत बॉप्तिस्मा घेणारे नवे लोक शुभ्रवस्त्रें परिधान करतात. (४) ईस्टरटाईड—हा खरा ईस्टरचा काल होय. या कालांत उपासनामंदिरांत मोठा उत्सव साजरा केला जातो.

हा उत्सव धार्मिक स्वरूपाचा असल्यानें या उत्सवामध्यें आचारांचें बरेंच स्तोम माजलें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. प्रार्थनामंदिरांत वेदीवर चढतांना पहिल्या पायरीच्या जवळ उत्तर दिशेला एक भली मोठी मेणबत्ती रोंवून ठेवण्याची प्रमुख वहिवाट या उत्सवांत आढळून येते. कांहीं ठिकाणीं पायरीच्या मधोमध हा दिवा ठेवण्याची चाल आहे. या दिव्याला बाजूबाजूनें लहान लहान नळ्या लावल्या असून त्यांतहि एकेक मेणबत्ती खोंवलेली असते. हे मेणबत्तीचे दिवे कांहीं प्रार्थनामंदिरांत चांदीचेहि केलेले आढळतात. ज्या प्रार्थनामंदिराला पैशाची उणीव नसेल त्याठिकाणींच असले चांदीचे दिवे असणार हें उघड आहे. ईस्टरच्या उत्सवांत हा मेणबत्तीचा दिवा अहोरात्र लावण्याची, रोमनकॅथलिक प्रार्थनामंदिरांची चाल आहे.

**लौकिक आचार.**—मध्ययुगांत ईस्टरमध्यें लोक अनेक आचार पाळीत, पण ते पुढें पुढें बंद होत गेले.

कैद्यांना बंधमुक्त करणें, गरीबांनां दानधर्म करणें, देवस्थानांतून भोजन घालणें यांसारख्या गोष्टी त्यावेळीं होत. हल्लीं सुद्धां ईस्टर ह्या लग्नाला सुमुहूर्त समजतात. रशियामध्यें अद्याप ईस्टरमधील आदितवारीं एकमेकांचें चुंबन घेऊन व तोंडानें 'ख्रिस्त अवतरला आहे' असें म्हणून एकमेकांनां सलामी देतात. ईस्टरअंडीं देण्याची चाल सार्वत्रिक आहे. ओस्टारा ( वसंत ) देवीच्या प्राचीन उपासनेचा अवशेष म्हणून ही अंड्यांची कल्पना दिसते. हल्लीं हीं अंडीं साखरेचीं किंवा चाकोलेटचीं करितात. तीं भरींव किंवा पोकळ असून त्यांचा आकार वाटेल तेवढा लहानमोठा असतो. कधीं कधीं हीं अंडीं पुठ्ठयाचीं किंवा लांकडाचीं करून त्यांत मिठाई किंवा मुलांचीं खेळणीं भरतात. रशियांत शेतकरी लोक ईस्टरच्या दिवशीं कोंबडीचीं अंडीं चांगलीं उकळून त्यांनां भपकेदार रंग फांसतात व तीं रस्त्यातून गडगडत सोडतात. ईस्टरच्या मागचा लेंटचा सहा आठवड्यांचा काळ सन्यस्तवृत्तीनें रहाण्याचा म्हणून मानला जात असल्यानें ईस्टरचा मोसम केवळ मजा करण्याचा अशी लोकांची समजूत आहे.

[ संदर्भ ग्रंथ—विंगहॅम–दि अँटिक्विटीज ऑफ दि ख्रिश्चन चर्च; बेडे—एक्लिझियास्टिकल हिस्टरी ऑफ इंग्लंड; ब्रँड–पॉप्यूलर अँटिक्विटीज; चेंबर–बुक ऑफ डेज; एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका भाग ८; एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स भाग ५. ]

**ईस्टर बेट**—रापानुयी. दक्षिण पॅसिफिक महासागराच्या पूर्व भागांत दक्षिण अक्षांश २७ ८' व पश्चिम रेखांश १०९° २८' यांवर हें बेट वसलें आहे. याचा आकार साधारणतः तिकोनी आहे; व त्याच्या तीन कोनावर तीन ज्वालामुखी पर्वतशृंग आहेत. क्षेत्रफळ ४५ चौरस मैल. बेटाच्या किनाऱ्यांवर एकहि उत्तम बंदर नाहीं. सुपीक जमीन पुष्कळच असून हवा बरीच सर्द आहे.

कधीं कधीं नकाशांत ईस्टर बेटाला डेव्हिस बेट म्हटलेलें आढळतें, पण १६८६ मध्यें डेव्हिसनें रापानुयी खरेंच संशोधिलें कीं नाहीं यासंबंधीं निश्चयपूर्वक कांहीं सांगतां येत नाहीं. १७२२ सालच्या ईस्टरच्या दिवशीं ( ता. ६ एप्रिल ) अॅडमिरल रॉगेव्हीं या ठिकाणीं येऊन पोंहोचला. १७७४ त कॅप्टन कुकनें पुनः हें संशोधून याला टीपी किंवा वैहु असें नांव दिलें. यानंतर एक दोन संशोधक येथें आले होते. रॉगेव्हीं आला तेव्हां बेटावर बहुधां पॉलिनेशियन वंशाचे सुमारें दोन तीन हजार लोक होते. आपण रापाइटी किंवा उपारो या प्रदेशांतून आलों असें ते सांगत. १८६३ मध्यें पेरुव्हियन लोकांनीं येथील पुष्कळसे लोक धरून चिंचा बेटावर काम करण्यास नेले. पुढील सालीं एक जेसुइट मिशन येथें येऊन त्यांनीं पुष्कळशा लोकांनां ख्रिस्ती बनविलें. १८६८ त रापानुयींची संख्या ९०० होती पण १८८६ मध्यें ती सारी १५५ भरली.

ईस्टर बेट हें प्राचीन अवशेषांवरून फार प्रसिद्ध आहे. मोठमोठ्या घडीव दगडाचे सिमेंटनें जोडल्याशिवाय तयार केलेले पुष्कळसे चौथरे येथें सांपडले आहेत. समुद्र कांठीं असलेल्या चौथऱ्यांवर बांधलेल्या कांहीं भिंती ३० फूट उंच, २०० ते ३०० फूट लांब व ३० फूट रुंद आहेत. मोठमोठे दगडी पुतळेहि पुष्कळ सांपडले आहेत. हल्लीं बेटावर राहणाऱ्या लोकांनां या अवशेषांची पूर्व माहिती नाहीं.

येथील लोक उंचीला कमी असतात. बायका पुरुषांपेक्षां सुंदर दिसतात. मुलें लहान असतांना यूरोपियनाप्रमाणें दिसतात पण पुढें मोठीं झाल्यावर तीं काळीं पडतात. गोंदून घेण्याची चाल सध्यां कमी झाली आहे. इतर पॉलिनेशियन जातींपेक्षां यांचा नैतिक दर्जा उच्च म्हणतां येईल. मादक पेयें मुळींच प्रचारांत नाहींत. चोरी करणें हें अनीतीचें लक्षण मानण्यांत येत नसे. चोरी पचली नाहीं तर तो ईश्वरी कोप समजत. लग्नापूर्वीचें वदफैली वर्तन फारसें विचारांत घेत नसत. लग्नानंतर नवऱ्याला आपली बायको दुसऱ्याला उसनी किंवा विकत देण्याची पूर्ण मुभा असे. तथापि जारकर्माला देहांत शासन असे. घटस्फोट नवरा बायकोच्या संमतीनें करण्यांत येई. या लोकांतील करमणुकीच्या खेळांत पायापेक्षां हातांचा जास्त उपयोग करण्यांत येतो. उत्सवप्रसंगीं करण्यांत येणारा हूला—हूला नाच शृंगारिक आहे.

प्राचीनकाळीं ईस्टर बेटांत एकतंत्री राज्यकारभार असे. राजघराणें मोठें पूज्य मानून, अस्वस्थतेच्या काळांतहि त्याला कोणी धक्का लावण्यास धजत नसे. १८६३ त पेरुव्हियन लोकांनीं तेथील राजा व मुख्य मंडळी यांनां पकडून ठार मारिलें. तेव्हांपासून कोणतीहि एक सर्वमान्य सत्ता अस्तित्वांत नाहीं. या बेटाचे प्राचीन रहिवाशी मृतांनां कधीं कधीं पुरण्यापूर्वी प्राणी वगैरेंनां खाण्याकरितां उघड्यावर टाकीत. परवांपर्यंत नरमांस भक्षण यांच्यांत रूढ असे. तथापि ते धार्मिक विध्यनुसार नसे. या लोकांची भाषा पॉलिनेशियन असून त्या द्वीपसमूहांतलि याच बेटांत फक्त वर्णमाला आढळते.

यांचा मुख्य देव मेके मेके असून, त्याचा आकार पक्ष्यासारखा दाखवितात. देवळें मुळींच नाहींत. मंत्र, ताईत वगैरे प्रकार आहेतच. भुतांराक्षसांची यांनां भीति वाटते. सुंता किंवा तद्वाचक शब्द यांच्यांत नाहीं.

[ संदर्भवाङ्मय—थॉम्सन—टे पिटो टे हेनुआ ऑर ईस्टर आयलंड ( रिपोर्ट ऑफ दि युनायटेड स्टेट्स नॅशनल म्यूझियम, १८८९ ); १८९७ सालच्या याच रिपोर्टांतील कुकचा लेख; ए. रि. ए. मधील फ्लारेन्स ग्रेचा 'ईस्टर आयलंड' हा लेख रापानुयी लोकांची चांगली माहिती करून देईल]

**ईस्ट्विक्, एडवर्ड बॅक् हाऊस (१८१४–१८८३)**– पौरस्त्य वाङ्मयविशारद. अँग्लो इंडियन. चार्टर हाऊस आणि ऑक्सफोर्ड या ठिकाणीं शिक्षण झाल्यावर १८३६ त यानें मुंबई रिसाल्यांत नोकरी धरली; परंतु वाङ्मयाकडेच याचा कल असल्यामुळें याला लवकरच राजकीय कारभारांत घेतलें. १८४३ त 'किस्सोइ संजान' (पारशांच्या हिंदुस्थानांतील आगमनाचा इतिहास) या फारशी ग्रंथाचें भाषांतर यानें केलें व बॅंबे एशिआटिक सोसायटीच्या नियतकालिकांतून 'लाईफ ऑफ झोरॉस्टर' (झोरास्टरचें चरित्र), सिंधी शब्दकोश व निरनिराळे लेख लिहिले. आजारपणामुळें यूरोपांत असतां फ्रँकफोर्ट येथें तो जर्मन भाषा शिकला व त्यानें शेलरचें 'रीन्होल्ट ऑफ दि नेदरलंडस', (नेदर्लंड लोकांचें बंड) आणि बॉपचे 'कंपॅरेटिव्ह ग्रामर' (तुलनात्मक व्याकरण) या पुस्तकांचीं भाषांतरें केलीं. १८४५ त त्याला हेलेबेरी कॉलेजांत हिंदुस्थानी भाषेचा प्रोफेसर नेमिलें. पुढें दोन वर्षांनीं त्याचें हिंदुस्थानी व्याकरण प्रसिद्ध झालें. यानंतर गुलिस्तानची गद्यपद्य भाषांतरासहित नवी आवृत्ति, 'प्रेमसागर'ची हिंदी भाषांतरासहित एक आवृत्ति आणि 'बाग ओबहार' व विद्पयीचें 'अन्वार-इ-सुहाइली' यांचीं भाषांतरें त्यानें प्रसिद्ध केलीं. १८५१ त त्याला रॉयल सोसायटीचा फेलो निवडण्यांत आलें. १८५७–५८ त 'दि ऑटोबायोग्राफी ऑफ लुथफुल्ला' (लुथफुल्लाचें आत्मचरित्र) त्यानें छापलें. दक्षिणी भाषेंत बायबल सोसायटीकरितां 'बुक ऑफ जेनेसेस' छापलें. १८६० पासून ते ६३ पर्यंत तो इराणांत ब्रिटिश वकिलातीबरोबर चिटणीस म्हणून होता. तेथून परत आल्यावर दी जर्नल ऑफ दि डिप्लोमेट' हें पुस्तक लिहिलें. १८६६ त हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीचा तो प्रायव्हेट सेक्रेटरी झाला, व १८६७ त सरकारी कामाकरितां व्हेनेझुएला येथें गेला; परत आल्यावर चार्लस डिकन्सच्या विनंतीवरून त्यानें 'स्केचेस ऑफ लाइफ इन ए साउथ अमेरिकन रिपब्लिक' हा लेख लिहिला. १८६८–७४ पर्यंत तो पेनरिन आणि फालमाउथ यांच्या वतीनें पार्लमेंटचा सभासद होता. १८७५ त ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीकडून त्याला एम. ए. ची पदवी मिळाली. निरनिराळ्या वेळीं त्यानें मरेचीं अनेक 'इन्डियन हँडबुक्स' लिहिलीं. त्याचा शेवटला ग्रंथ म्हणजे 'केसर नामा–इ– हिंद' हा होय. ऑईल ऑफ वाइट मधील व्हेंट नोर या ठिकाणीं तो मृत्यु पावला.

**ईक्षणयंत्र**—या यंत्रास ईक्षण–यंत्र किंवा आरसाहि म्हणतां येईल. पण अलीकडे आरसा हा शब्द प्रचारांत, कांचेच्या आरशास (कांचेच्या पाठीस पारा लावून केलेला) लाविला जातो. पण ईक्षण–यंत्रांतील आरसा कांचेचा नसून तो एक धातूचा पत्रा असून, त्यावरून किरणांचें योग्य तऱ्हेनें पृथक्करण होण्याकरतां तो घांसून घासून चांगला चकचकीत केलेला असतो. प्रारंभीं हा तांबें व जस्त यांच्या मिश्रणांत तें पांढरें होण्याकरतां थोडेसें आर्सेनिक म्हणजे ताल (हा एक सोमलांतील धातु आहे) घालून यांच्या मिश्रणापासून जो धातु होतो त्याचें करीत असत. त्याचा उपयोग परावर्तक दुर्बिणींत (रिफ्लेक्टिंग टेलेस्कोप) करतात. शस्त्रक्रियेच्या वेळीं अंतरिंद्रियें पाहाण्याकरतां निरनिराळ्या ईक्षण–यंत्रांचा उपयोग करतात.

र च ना.—सर ऐझॅक न्यूटनच्या वेळेपासून आतांपर्यंत धातु–दर्पणाच्या कृतींत बराच फरक झाला आहे. चांदी, जस्त, निकेल किंवा आर्सेनिक यांचे निरनिराळ्या प्रमाणांत निरनिराळे मिश्र धातू वरील दर्पणास चांगले उपयोगी होतील, असें पुष्कळदां सुचविलें गेलें; पण प्रचारांत जास्त उत्तम असा मिश्र धातु २५२ भाग तांब्यांत ११७.८ भाग कथील मिळवून जो धातू होतो तोच चांगला ठरला आहे. अशा तऱ्हेचा धातु कठिण पण ठिसूळ होऊन त्याचा पृष्ठभाग घासून चांगला चकचकीत, गुळगुळीत, स्वच्छ होतो व त्याला ओलावा लागूं दिला नाहीं तर तो विटतहि नाहीं. बाह्य गोलभिंग (लेन्स) तयार करण्यास जीं हत्यारें लागतात तींच हत्यारें हा आरसा तयार करण्यास उपयोगी पडतात. परावर्तक भागाला हळू हळू गोलाकार देत देत नंतर शेवटीं त्याचें परवलय तयार करतात.

यानंतर लवकरच कांचेच्या पृष्ठभागावर रजतक्षारा (सिल्व्हर साल्ट) मार्फत शुद्ध रजताचा मुलामा देण्याची पद्धत लीबिग नांवाच्या शास्त्रज्ञाला सांपडली. व त्यामुळें कांचेचे आरसे तयार होऊन या धातूंच्या आरशास मागें पडावें लागलें. धातूच्या आरशाकरतां केलेला धातु कितीहि चांगला असला तरी तो नासणार नाहीं असें कधींच सांगतां येणार नाहीं. एवढेंच नव्हे तर या दर्पणाच्या सहाय्यानें जर बराच वेळ काम केलें तर त्याचा चकचकितपणा कमी होऊन त्याला पुन्हां जिल्हई द्यावी लागते, व अशा तऱ्हेनें बराच त्रास पडून अखेर तो शास्त्रीय निरीक्षणाकरतां त्याच्या पूर्वीच्या स्थितींत रहात नाहीं. त्याचें केन्द्रान्तर (फोकल लेंग्थ) बदलतें व त्यामुळें सूक्ष्ममापक वगैरेंतहि सुधारणा करणें भाग पडलें. याच कारणामुळें अलीकडे परावर्तक दुर्बिणीला धातुदर्पण वापरण्याऐवजीं कांचेचाच आरसा वापरण्याकडे विशेष प्रवृत्ति आहे (पण याला अपवाद म्हणून सर विल्यम ह्युजिन्स नामक शास्त्रज्ञाच्या बुलसेहिल नांवाच्या वेधशाळेंतील दुर्बिणींतील अठरा इंची धातूचा आरसा तयार केल्यापासून म्हणजे १८७० पासून तो तहत आजपर्यंत बिलकुल बिघडला नाहीं. व त्याला पुन्हां घांसावेंहि लागलें नाहीं. आणि याच आरशाच्या सहाय्यानें त्यानें निरनिराळे महत्त्वाचे वेध घेतले आहेत. त्याचप्रमाणें दुसरे सहा इंची आरसेहि आजपर्यंत जसेच्या तसेच चकचकीत आहेत). हर्शेल, रास, लॅसेल, व डीलास वगैरे शास्त्रज्ञांनीं धातूचेच आरसे वापरले पण ते त्यांनीं स्वतःच तयार करून घेतले होते.

कांचेच्या आरशाची जर यांशीं तुलना केली तर कांच धातूपेक्षां बरीच स्वस्त असून तिला पारा लावण्यास खर्च बराच कमी लागतो. त्याचप्रमाणें ती हलकी असून तिच्यावर कामहि सहज तऱ्हेनें करतां येतें. याशिवाय कांचेच्या आरशाची तेजोधारणाशक्ति धातूच्या आरश्यापेक्षां जास्त आहे तरी पण दूरदर्शक व्यास सारखाच असेल तर पदार्थाभिमुख कांचेच्या तेजोधारणाशक्तीपेक्षां आरशाची तेजोधारणाशक्ति कमी येईल. कांहीं चुकीच्या तुलनेमुळें फोकाल्ट नांवाच्या शास्त्रज्ञानें तेजोधारणाशक्तीच्या बाबतींत धातूचा आरसा कांचेच्या आरश्यापेक्षां जास्त पसंत केला होता. पण सर डेव्हिडगिलनें स्वानुभवानें असें दाखविलें कीं, १२ इंच दूरदर्शक व्यासाचा आरसा १० इंच दूरदर्शक व्यास असलेल्या वक्रीभवन करणाऱ्यापेक्षां चांगला असतो. पण यांचा आकार जर जास्त मोठा झाला तर, मोठ्या पदार्थाभिमुख कांचेच्या जास्त जाडपणामुळें, आणि त्यामुळें होणाऱ्या जास्त उजेडाच्या शोधनामुळें वर सांगितलेलें प्रमाण मोठमोठ्या कांचांच्या बाबतींत जवळ जवळ सारखें होतें.

रो स वि ल्य म पा र्स न (१८००–१८६७) यानें के ले ला धा तु चा आ र सा.—प्रथम विल्यम हर्शेल यानें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर परावर्तक दुर्बिणी तयार केल्या, पण यानें त्यांच्या आकृतीसंबंधीं कांहींच प्रसिद्ध न केल्यामुळें अर्थांतच त्याच्यामागून रोसला, धातूच्या आरशाच्या कृतीबद्दल श्रेय मिळालें.रोसनें १२६.४ भाग तांबें व ५८.९ भाग कथील घालून आरशाकरितां धातु तयार केला.त्याच्या निरनिराळ्या पट्ट्या करून त्या तीन फूट लांबींत सोळा बसविल्या, त्या बसविण्याकरितां २.७५ भाग तांबें व १ भाग जस्त यांचें मिश्रण करून एक हलका धातु तयार केला व त्याच्या चौकटींत वरील पट्ट्या बसविल्या. या दोन्हीहि धातूंचे प्रसरणगुणक सारखेच आहेत. १८२८ च्या 'एडिंबरो जर्नल ऑफ सायन्स' मध्यें त्यानें हा धातु घोटण्याच्या यंत्राचें वर्णन सविस्तर दिलें आहे. घोटणारा, आरसा फिरत असतांना, आरशावर सरळ व लंबपार्श्व अशा दोन्हीहि गतींनें फिरतो. आरसा व घोटणारा, यांना समकेंद्रांतून काढलें असतां; घोटणारा लंबवर्तुळांत फिरूं लागतो; पण त्याची केंद्रच्युति फार थोडी असते;अशा तऱ्हेनें खरी खरी परवलय रचना मिळते. १८३९ च्या सप्टेंबरमध्यें एक तीन फूट आरसा तयार करून तो दुर्बिणींत बसविला; त्यामुळें साधारण चांगलीं प्रतिबिंबें मिळालीं, व त्याची चौकटहि कांहीं विवक्षित असल्यामुळें वातावरणांतील उष्णतेच्या वगैरे फरकास तो लागलीच अनुरूप होत असे. यानंतर तीन फुटी घन आरसा करण्याचा रोसनें विचार केला. आतांपर्यंत घन आरसा तयार करण्यांत अशी एक अडचण होती कीं, तो हळू हळू आकुंचन पावत नसून त्याच्या बाजू एकदम आकुंचन पावतात व नंतर मध्य भागावर दाब पडून कधीं कधीं त्याला भेगा पडतात. हा घन तुकडा सारखा थंड होण्याकरतां ज्यांच्यांत या धातूचा रस ओतावयाचा त्या सांच्याचें बूड त्यानें 'हूप' लोखंडाचें( लोखंडाची एक जात ) केलें व बाजू वाळूच्या करून त्याचें तोंड उघडें ठेविलें,व अशा तऱ्हेनें वरील अडचण दूर करून भेगा किंवा रंध्र न पडतां त्यानें एक ३ फूटी घन तुकडा तयार केला. या लोखंडांत धातु थंड होत असतांना त्यांतून जो वायू निघेल, तो बाहेर जाऊं देण्याची शक्ती किंवा सोय असते. १८४० मध्यें ३ फूटी आरसा तयार झाल्यानंतर १८४२ सालीं याच पद्धतीनें त्यानें ६ इंच व्यासाचा दुसरा एक आरसा तयार केला व १८४५ त हा प्रवर्तक दुर्बिणींत बसवून दुर्बीण तयार केली. या यंत्राचें केन्द्रांतर ५४ फूट आहे. या दुर्बिणींतून 'ओरायन' (मृगशीर्ष) च्या तेजोमेघाचे त्यानें वेध घेतले.

हर्शेल किंवा रासे यांनीं तयार केलेल्या या धातूच्या आरशासारखे आरसे किंवा यांत्रिकदृष्ट्या त्यापेक्षांहि पूर्णत्वास गेलेले असे नष्ट झालेल्या पांपी शहरच्या अवशेषांत सांपडले. त्याचप्रमाणें सौरेनस नांवाच्या वैद्यकशास्त्रज्ञाजवळ हें ईक्षणयंत्र होतें.

उ—नागरी लिपींतील पांचवें अक्षर. याला हल्लींचें स्वरूप प्राप्त होण्याला चार अवस्थांतून जावें लागलें. पहिली अवस्था अशोकच्या गिरनार येथील शिलालेखांत (ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांतील) दृष्टीस पडते; तर दुसरी ख्रि. पू. पहिल्या शतकांतील मथुरेच्या लेखांत अंकित झाली आहे. तिसरी अवस्था दुसरींतील खालच्या रेषेला वांक पडून घडली आहे हें उघड दिसतें. चवथें वळण इ. स. ५३२ तील राजा यशोधर्म याच्या वेळच्या मंदोसर लेखांतलें आहे. आजचा उ इ. स. ८३७ च्या जोधपूर लेखांत स्पष्ट व वळणदार असा पहावयास मिळेल. [प्राचीन लिपिमाला.]

उकाँग.—एक चिनी बुद्ध श्रमण. हा मध्य आशियाच्या मार्गानें प्रवास करून गंधारप्रांतांत इ. स. ७५३ मध्यें व काश्मीरला इ. स. ७५९ मध्यें जाऊन पोंचला; ४ वर्षांनीं पुन्हां गंधारला परत येऊन तो मध्य हिंदुस्थानांत जाण्याकरितां ७६४ मध्यें निघाला; कपिलवस्तु, वाराणशी, श्रावस्ती, कुशिनगर व नालंद येथें त्यानें तीन वर्षें घालविलीं. इ. स. ७८३—७८४ च्या सुमारास तो चीनला जाण्याकरतां निघून ७९० मध्यें तेथें पोंचला. त्यानें दशभूमि, दशावल सूत्रें वगैरे संस्कृत पुस्तकें बरोबर नेलीं होतीं. [मावेल डफ]

उकुंद.—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. राणीबिन्नूरच्या पश्चिमेस सुमारें पांच मैलांवर हें एक खेडें असून तेथील कल्लेश्वराच्या देवालयांत एक जुना कानडी शिलालेख आहे. [मुं. गॅ.—धारवाड जिल्हा.]

उखाणे.—उखाणे म्हणजे स्त्रियांचें प्राकृत काव्य. मराठी वाङ्मयाचे जे निरनिराळे संप्रदाय आहेत त्यांमध्यें उखाण्यांचाहि समावेश होतो. विवाहाच्या मंगल कार्यांत, नवऱ्यानें बायकोचें, व बायकोनें नवऱ्यानें नांव घेतांना, तें नांव नुसतें न घेतां, इतर प्रासयुक्त वाक्यांचा उपयोग करून तद्वारां तें नांव घेणें याला उखाणा असें म्हणण्याची चाल आहे. लग्नांत विहिणीविहिणी एकमेकींनां उखाणे घालून उणेंपुरें काढतात व स्पष्ट नव्हे परंतु व्यंगोक्तिद्वारा त्यांनां नांवें ठेवितात. विहिणीपेक्षां करवल्याकडेसच हें काम सोंपविलेलें असतें.

मराठी भाषेंत जे उखाणे आढळतात त्यांचें वर्गीकरण केल्यास उखाण्यांचे दोन वर्ग पडतात. (१) साधे उखाणे व (२) कूट उखाणे. कूट उखाण्यांचें उदाहरण—तांबडी पालखी हिरवा दांडा आंत बसल्या बोडक्या रांडा (उत्तर-मिरचीचें बीं). ' सप्त शृंगें ज्याचे शिरीं तो प्रहर रात्रीं गर्जना करी, त्याचा शब्द ऐकोनिया नारी, भ्रतारातें त्यागिती '(उत्तर—कोंबडा). अशा प्रकारचे कूट उखाणे, म्हणीवजा असतात असें म्हटल्यास हरकत नाहीं. आशेचें वर्णन, ' पतिव्रता भली पण सारा मुलूख पालथा घाली. असें केलें आहे तें म्हणी वजा आहे. कांहीं कांहीं उखाण्यांत फारच कल्पकता असते. ' एवडासा करंडा त्यांत मोगऱ्यांच्या रांगा ( उ. डाळिंब ); ' एवढीशी टिटवी सगळें तळें आटवी ( उ. दिव्याची वात ). कांहीं उखाण्यांत निरनिराळ्या वस्तूंचें सूक्ष्म विवेचन केलेलेंहि आढळतें:— उदा. वाऱ्याचें वर्णन पहा. ' रंग नाहीं रूप नाहीं आभाळ म्हणशील काय ? आदि नाहीं अंत नाहीं देव म्हणशील काय ? आभाळ भूत देव नाहीं विचार करतोस काय? सांग मला नांव प्राणी व जीव निघून जाय ! संस्कृत भाषेंतहि उखाण्यांसारखे पुष्कळ कूट श्लोक आहेत. परिस्थितीप्रमाणें नवीन तऱ्हेचे उखाणे घेण्याचीहि पद्धत आहे. उदाहरण— ' लो. टिळकांनां लागला स्वराज्याचा छंद, × ×चें नांव घेतें तोंड करा बंद '; ' येरवड्याच्या तुरुंगाला पडला देशभक्तांचा वेढा ××च्या तोंडांत घालते पेढा'; इंग्रजी भाषेंतील शब्दहि प्रास साधण्यासाठीं घेण्याची पद्धत पडलेली दिसते. उदा. ' इंग्रजी भाषेंत चंद्राला म्हणतात मून,× ××चें नांव घेते ×ची सून;' इंग्रजी भाषेंत, पाण्याला म्हणतात वाटर ××चें नांव घेते ×× × ची डाटर इत्यादि. ब्राह्मणांच्या लग्नांत विहीण जेवीत असतांना, जीं उखाण्याच्या द्वारां उत्तरेंप्रत्युत्तरें होतात तीं मासाल्याकरितां पुढें दिलीं आहेत.

समोर होता कोनाडा त्यांत होता तवा, रुसूं नका, फुगूं नका, सावकास जेवा. चंदनाच्या पाटावर ठेवला पाय, सावकास जेवायला केलेंत काय ? समोर होता कोनाडा, त्यांत होता गहू, सावकास जेवायाला केले बुंदीचे लाडू. मांडवाचे दारीं होता चाफा, नवऱ्या मुलीकडच्या करवल्या कलावंतिणीचा ताफा.

पुढील भोळेबाळ उखाण्यांतून काव्य भरलेलें आहे एखाद्या साध्या माणसाची बायको सुद्धां आपल्या नवऱ्याला गौरवून त्याच्या पदरीं पडल्यानें आपल्याला धन्य समजत आहे. या प्रकारचे उखाणे घेतांना व ऐकतांना मनाला आल्हाद झाल्यावांचून राहात नाहीं.'झुणुक झुणुक जात होते, खिडकीवाटे पाहत होते, हा डौल कोणाचा, आबाजीच्या पोटचा, म्हनजीच्या पाठचा, चक्रीमुंडाशाचे बालुपाटील भ्रतार आमचा. मुली फुगड्या खेळतांनाहि एकमेकींवर उखाणे घेतांत. उदा. ' आपल्याचें झाड माझ्या झपाट्याखालीं, मामाची लेक माझ्या डाव्या हाताखालीं. '

**उखामंडळ**—बडोदा संस्थान. अमरेली प्रांताचा एक तालुका. हा बडोदे संस्थानाच्या अगदीं पश्चिमेकडील भागांत आहे. क्षेत्रफळ २७२ चौ. मै. लोकसंख्या (१९११) २१७४०. उखामंडळ हें गायकवाड सरकारच्या ताब्यांत सन १८१७ मध्यें आलें. येथील मूळचे रहिवाशी वाघेर लोक. यांनीं मध्यंतरीं जरा बंडाळी माजविली होती. पण बडोदें सरकारनें ती सैन्य पाठवून मोडली. या तालुक्यांत मुख्य गांव म्हणजे द्वारका हें पुराणप्रसिद्ध क्षेत्र होय. शिवाय इतर ४३ खेडीं आहेत.

हा प्रदेश म्हणजे रुक्ष सपाट जमीन आहे. समुद्रकांठचा प्रदेश रेताड असून इतरत्र सर्वसाधारण पीक होतें. मुख्य पीक म्हणजे बाजरी, ज्वारी वगैरे. पाऊस फार कमी पडतो. येथें मीठ सांपडतें पण तें बाहेर गांवीं पाठविण्यास सरकारची मनाई आहे.

**उग्रसेन**—यदुवंशांतील एक राजा. कंसाचा पिता. यास कंसानें बंदींत ठेवलें होतें पण कृष्णानें सोडविलें व मथुरेच्या गादीवर बसविलें. ( भाग. स्कं. १० अ. ४५ )

**उचकी** ( हिक्का )—छाती आणि पोट ह्यांच्यामध्यें एक विभाजक पडदा ( डायाफ्रम ) आहे. त्याच्यावर मेंदू मधून निघून एक मज्जातंतु ( फ्रेनिक नर्व्ह ) पसरला आहे. या विभाजक पडद्यास मध्यपटल व मज्जातंतूस मध्यपटलतंतु असें म्हणतात. उचकीमध्यें विभाजक पडदा एकदम संकोचन पावून खालीं उतरतो, त्यामुळें हवा, श्वासमार्गाच्या तोंडावरील पडदा जोरानें उघडून, आवाज उत्पन्न करणाऱ्या रज्जूवर ( व्होकल कार्डस ) आदळते व त्यामुळेंच उचकीचा विशेष आवाज उत्पन्न होतो.

**का र णें.**—मध्यपटलतंतूस इजा झाली असतां लागलीच उचकी लागते. अधिक अन्न किंवा उदक सेवन केल्यानें किंवा पचनक्रिया नीट न झाल्यामुळें कोठ्यांत वायूचा संचय होऊन कोठा अधिक फुगतो व तेणेंकरून उचकी लागते असा नेहमीं अनुभव आहे. विशेषतः मोठ्यापेक्षां लहान माणसास उचकी लागण्याचें कारण बहुधां हेंच असतें. उचकी प्रत्यक्ष किंवा दुसऱ्या कारणांनींहि उत्पन्न होते. पुष्कळांना उष्ण व तिखट पदार्थ सेवन करतांक्षणींच उचकी लागते. क्वचित थोड्यांना नुसता कढत पातळ पदार्थाचा घोट घेतल्यानें उचकी लागते. आंत्रवेष्टनत्वग्‌दाहामध्यें ( पेरिटोनायटीस ) जेव्हां मध्यपटलाच्या वरील सूक्ष्म जलत्वचा सुजते तेव्हां उचकी लागते. कोठ्यांत काळपुळी किंवा दुष्ट विद्रधि ( क्यानसर ) झाला असतांना उचकी लागते. महामारीचा रोगी बरा होत असतांना कधीं कधीं अनिवार उचकी लागते व त्याबरोबर ढेकरा येऊन एखादे वेळीं वांतीहि होते. सारांश बहुतकरून उचकी हें कोठ्यांतील किंवा उदरांतील विकाराचें सूचक लक्षण होय. तथापि मेंदूत विकार होऊन तो मध्यपटलतंतूच्या मुळास पोंचला असतांना फारच कठिण उचकी लागते. भूतोन्माद किंवा गर्भाशयोन्मादामध्यें ( हिस्टिरिया ) सारखी तासांचे तास स्त्रियांस उचकी लागलेली आढळते. क्षयादि दुर्धर रोगांच्या शेवटच्या स्थितींत, भयंकर विषम ज्वरांत, मेंदूमध्यें कायमचा बिघाड होऊन उत्पन्न झालेल्या रोगांत, व दुसऱ्या जाज्वल्य, ताज्या किंवा जुनाट आजारांत उचकी लागली असतांना तें असाध्य व भयंकर लक्षण समजतात. कांहीं विशेष रोग नसतांना कसलीहि भयंकर व एकसारखी उचकी लागली तरी भिण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण रात्रंदिवस मध्यें न खळतां आठ दिवस किंवा अधिक दिवसपर्यंतहि उचकी लागलेले रोगी, त्यांच्या यातनेवरून असाध्य वाटले, तथापि बरे होतात असें पुष्कळदां अनुभवास येतें. मात्र अशा रोग्यास अन्न जात नाहीं. निद्रा मिळत नाहीं व उचकीच्या सारख्या श्रमामुळें अगदीं थकून जातो, त्यामुळें त्याला आपण जगत नाहीं असें वाटतें व क्वचित असा प्रकार होणें संभवनीय आहे.

**उ पा य.**—उचकीवर उपचार करणें तो तिच्या कारणांवर अवलंबून आहे. कोठ्यांत अपक्व अन्नाचा संचय असल्यामुळें उचकी लागल्यास मोहरीची पूड, मीठ किंवा दुसरें वामक पदार्थ ऊन पाण्यांत द्यावे. नुसतें ऊन पाणी पुष्कळ पिऊन घशांत बोट घातल्यानेंहि वमन होतें, किंवा पचनाची कोठ्यांतील क्रिया वृद्धि पावून तें अन्न पचावें अशासाठीं पाचक औषधें द्यावींत. सोडा किंवा सज्जीखार दहा गुंजा व सुंठ दोन गुंजा पाण्याबरोबर द्यावी, किंवा थोडें हिंगाष्टक चूर्ण द्यावें. स्पिरिट अमोनिया आरोम्याटिकचे तीस थेंब किंवा चमचाभर ब्रांडी घोटभर पाण्यांत दिल्यानेंहि उचकी रहाते; पोटावर अथवा मानेवर राईचें पोटीस लाविल्यानेंहि उचकी रहाते. शंभर अंक मोजीपर्यंत श्वास न सोडला तर किंवा एक मिनिटपर्यंत श्वास कोंडून धरला तर उचकी रहाते; क्लोरोफार्म हुंगण्यास दिल्यानें किंवा एक दोन थेंब साखरेबरोबर पोटांत दिल्यानें तात्काळ उचकी राहाते. साखरेबरोबर कापराच्या अर्काचे पांच थेंब प्रत्येक पांच मिनिटांनीं उचकी राहीपर्यंत द्यावे; पोटास ब्रोमाईड दहा ग्रेन व क्लोरल हायड्रेट दहा ग्रेन घोंटभर पाण्यांत दिल्यानेंहि उचकी बंद होते, असा अनुभव आहे. थोडी कस्तुरी दिल्यानेंहि उचकी बंद होते. मॉरफियाची त्वचेखालीं पिचकारी दिल्यानेंहि सतत लागणारी उचकी राहते. पण ही क्रिया माहितगार वैद्यानेंच केली पाहिजे; बर्फाचे तुकडे चोखल्यानेंहि उचकी रहाते; संवय नसलेल्या मनुष्यानें तंबाखू ओढल्यानें उचकी तात्काळ बंद झाली असेंहि पाहण्यांत आहे; क्लोरोडाईन वीस थेंब उचकीवर देण्याचा पुष्कळांचा प्रचार आहे; पोटाच्या डाव्या बाजूस म्हणजे कोठ्याच्या भागावर पट्ट्यानें अथवा हातानें चांगला दाब ठेविल्यासहि उचकी रहाते [ भिषग्विलास पृ. १ पु. १२४—१२६ ].

आ यु र्वे दी य नि दा न.—यासंबंधीं आयुर्वेदकांत पुढील माहिती आढळते. श्वासाचीं व उचकीचीं कारणें, पूर्व रूपें, प्रकार व स्थानें एकच आहेत.

वायु ऊर्ध्व होऊन हिक् असा आवाज उत्पन्न करतो, त्यास हिक्का ( उचकी ) असें म्हणतात ( हिगितिकृत्वाकायते मा. नि. टी. पृ. ९० ). उचकीचे भक्तोद्भव, क्षुद्रा, यमला, महती व गंभीरा असे पांच प्रकार आहेत.

रुक्ष, तीक्ष्ण, जाडेभरडें व असात्म्य, अन्नपान, घाईघाईनें व यथेच्छ सेवन केल्यानें वायु पीडित होऊन उचकी उत्पन्न करितो. या उचकींत पीडा होत नाहीं. शब्द मंद असतो, ती शिंकेबरोबर येते आणि सात्म्य अन्नपानानें बंद होते तीस अन्नजा असें म्हणतात.

श्रमाच्या योगानें वायु किंचित् कुपित होऊन क्षुद्रा नांवाची उचकी उत्पन्न करितो. ही जत्रू ( गळ्याखालचें हाड )च्या मुळापासून उत्पन्न होते. हिचा वेग थोडा असतो. ही फारशी पीडा करीत नाहीं. श्रम केले असतां वाढते आणि जेवल्याबरोबर कमी होते.

आहाराचें पचन होऊं लागण्याच्या संधीस बऱ्याच वेळानें जी उचकी दुहेरी वेगानें सुरू होते व पचन झाल्यावर वाढते, जींत डोकें व मान हीं कापतात, पोट फुगतें, अतिशय तहान लागते, मनुष्य वडबडतो, वांती व जुलाब होतात, डोळे कावरेबावरे होतात व जांभया येतात, तीस यमला, वेगिनी किंवा परिणामवती अशीं सार्थ नांवें दिलीं आहेत.

महती नांवाच्या उचकींत भिवया व आंख तांठतात, डोळे पाण्यानें भरतात व चंचल होतात, शरीर निश्चेष्ट होतें, वाचा बंद होते, स्मृति व शुद्धि नाहींशी होते, अन्नमार्ग बंद होतात, हृदयादि मर्मास धक्का बसतो, रोगी पाठीच्या बाजूनें वांकतो आणि शरीर शुष्क होतें. हिचें उत्पत्तीकरण, शब्द, वेग व बल हीं जबर असतात.

गंभीरा उचकी पक्वाशयापासून किंवा नाभिस्थानापासून उत्पन्न होते आणि तिचा उत्पत्तिप्रकार व लक्षणें हीं महती नांवाच्या उचकीसारखींच असतात. विशेष एवढाच कीं हींत वरचेवर जांभया येतात व रोगी हातपाय ताणून आळस देतो. हिच्यामागून गंभीर नाद होतो म्हणून हीस गंभीरा असें म्हणतात. सदरहुपैकीं पहिल्या उचक्या अन्नजा व क्षुद्रा या साध्य आहेत. शेवटच्या दोन महती व गंभीरा असाध्य समजून सोडून द्याव्या. तशीच बाकी राहिलेली यमला सर्व लक्षणयुक्त असल्यास तीहि असाध्यच समजावी. तसेंच ज्या मनुष्याचा पुष्कळ दिवसांचा आम सांचला आहे असा व म्हातारा, फार स्त्रीसंग करणारा, इतर रोगांनीं ज्याचें शरीर क्षीण झालें आहे असा, अन्न तुटल्याकारणानें क्षीण झालेला, अशा मनुष्यास कोणत्याहि प्रकारची उचकी लागली तरी ती असाध्य समजावी.

चि कि त्सा.—दमा, व उचकी, यांचीं कारणें व संप्राप्ति एकच असल्यामुळें दोहोंची चिकित्साहि एक स्वरूपाचीच आहे. दम्याच्या चिकित्सेंत सांगितल्याप्रमाणेंच शेकणें, अनुलोमन औषधें, ओकारीचीं व हलकीं विरेचनें देणें यानेंच वायूचा अडलेला मार्ग मोकळा होऊन उचकी थांबते. इतकें करूनहि उचकी न थांबेल तर सूक्ष्म स्रोतसांतून चिकटलेला कफ सुटून बाहेर येण्याकरितां चंदन, राळ, दर्भ, या सारख्या पदार्थांचा धूम घ्यावा.

लसूण, कांदा, गाजर किंवा चंदन यांचा रस आंगावरील दुधांत वाटून नाकांत घालावा किंवा माशीची विष्ठा अळित्याच्या रसांत खलून नाकांत घालावी. यानें तावडतोब उचकी थांबते.

केव्हां केव्हां उचकी केवळ उपासानें थांबते. दुसऱ्या पुष्कळ रोगांनीं उचकी लागते त्यावेळीं त्या रोगावरील औषध दिल्यानें उचकी बरी होते.

तापाच्या जशा दोषभेदानें मुदती आहेत त्याप्रमाणें उचकी हा रोगहि केव्हां केव्हां मुदतीचा असतो. त्यावेळीं हलकें अन्नपान व अनुलोमन औषध एवढीच चिकित्सा करावी, तीव्र औषधें देऊं नयेत.

हर्ष, इर्ष्या इत्यादि मनोविकार उत्पन्न करूनहि दम्याप्रमाणेंच उचकी जाते. पथ्याकरितां साठेसाळी, हुलगे, सातू वगैरे धान्यें व दम्याच्या चिकित्सेंत सांगितलेल्या भाज्या व पाणी वगैरे सर्व अन्नपान दम्याच्या चिकित्सेप्रमाणें उचकीवरहि समजावें [ वाग्भट; चरक; योगरत्नाकर ]

**उचले व भामटे,**— उचले, भामटे अथवा गांठ चोर म्हणून एक चोरांचा प्रकार आहे. या लोकांची वस्ती पुणें जिल्ह्यांतील भिमथडी, हवेली, खेड आणि शिरूर या तालुक्यांतून आहे. हे लोक तेलगू मुलखांतून इकडे आले असावे. कारण त्यांची घरगुती बोलण्याची भाषा मोडकी-तोडकी तेलगूच असून पुष्कळशा बायकापुरुषांचीं नांवें दक्षिणेकडील नांवांप्रमाणेंच असतात. पुणें जिल्ह्याखेरीज हे लोक महाराष्ट्र, वऱ्हाड व गुजराथ या प्रांतांतील कित्येक ठिकाणीं आढळतात.या लोकांनीं मूळ देश केव्हां व कां सोडला यांची त्यांनां कल्पना नाहीं. व आपण दक्षिणेकडील द्राविड जातीपैकीं आहों याचीहि त्यांनां जाणीव नाहीं. पांच सहा पिढ्या इकडे पुणें जिल्ह्यांत रहात आहों असें हे लोक सांगतात; व ही गोष्ट बहुधा खरी असावी. पुण्याकडील उचल्यांनाच भामटे म्हणतात. परंतु वास्तविक भामटे हे दक्षिणेकडून आलेले नसून उत्तरेकडून आलेले आहेत. ते रजपूत जातीपैकीं आहेत, कारण द्राविडी जातीचे उचले व रजपुती जातींतील भामटे यांच्या शरीराच्या ठेवणीमध्यें फार फरक आहे. रजपुती भामट्यांचे शरीरावयव रेखीव व सुरेख असतात. त्यांचा रंग गौर असतो. आणि हे शरीरानें बांधेसूद भक्कम आणि चपळ असतात. हे भामटे लोक निरनिराळे वेष करितात. कांहीं वर्षें सतत एक प्रकारचाच वेष कायम ठेवून शेंकडों मैल दूरदूरच्या खेड्यापाड्यांत जाऊन तेथें ज्या तऱ्हेचा स्वतःचा वेष असेल तशाच प्रकारचा पोषाख

करणाऱ्या लोकांच्या घरांत शिरून चोऱ्या करतात. कित्येक वेळां स्वतःचें व रहात्या खेड्याचें खोटेंच नांव सांगून एकाद्या मोठ्या व्यापाराच्या किंवा धनिकाच्या घरीं त्याच्याच जातीसारखा वेष घेऊन नोकरी धरितात. प्रथम कांहीं दिवस नोकरी मोठ्या इमानानें करून धन्याचा विश्वास संपादतात. आणि नंतर संधि साधून पुष्कळसें धनद्रव्य व मालमत्ता चोरून पळून जातात.

खुद्द पुणें शहरांत या उचल्यांचा व भामट्यांचा फार सुळसुळाट होता. शिवाय आसपासच्या वडगांव, फुरसुंगीची वाडी, पाबळ, बोपुडी, कणेरसर, कोंढवें, मुंढवें, तळेगांव इत्यादि खेड्यांतहि हे आढळतात. पुण्याच्या उचल्यांमध्यें बहुतेक गायकवाड व जाधव हीं दोनच आडनांवें असतात. या उचल्यांच्या जातींत महार, मांग इत्यादि अस्पृश्य जातींखेरीज इतर कोणाहि हिंदू, व मुसलमान इसमाचा प्रवेश होतो. अशा उचल्यांच्या टोळींत ब्राह्मण, मारवाडी, वाणी, सोनार, शिंपी इत्यादि उच्च व मध्यम जातींचे हिंदू आढळून आलेले आहेत. व उचले बनलेले इसम आपल्या जातींतून नवे नवे लोक मिळवीत असतात. उचल्यांमध्यें गायकवाड व जाधव हीं दोनच आडनांवें असण्याचें कारण सदहू जातींतले मूळ इसम या दोन आडनांवांच्या घराण्यांत नोकरीला असून पुढें त्यांनीं आपल्या मालकांचीं आडनांवें घेतलीं असावीं असा एक तर्क आहे. उचल्यांच्या जातींचे मूळपुरुष या दोन घराण्यांतले होते, असें हे लोक सांगतात.

या जातींत शिरणाऱ्या माणसाला बराच विधि करावा लागतो. प्रथम जातीची जमात करून सर्वांची परवानगी मिळवावी लागते. व प्रवेश फी म्हणून १५ ते २५ पर्यंत रुपये द्यावे लागतात. नंतर दुसऱ्या दिवशीं या नव्या इसमाला आंघोळ घालून नवा पोषाख देतात. नंतर एक वृद्ध उचल्या त्याच्या तोंडांत हळद व साखर यांची चिमूट टाकतो. पुढें सर्वांचें जेवण होतें, त्यांत हा नवा इसम व दोन तीन वृद्ध उचले एका ताटांत बसून जेवतात. अशा रीतीनें हा विधि संपतो. नव्या इसमाला कोणत्या तरी एका आडनांवाचे पुरुष आपला कुटुंबी करून घेतात व नंतर दुसऱ्या आडनांवाचा इसम आपली मुलगी देऊन त्याचें लग्न करतो. या सर्व समारंभांत वाजंत्री, पानसुपारी वगैरे औपचारिक गोष्टी असतात.

या जातींत पुढील नांवें आढळतात. पुरुषवाचकः—बापू, चिनाप्पा, चंद्रया, धाग्या, एलाप्पा, गिडाप्पा, गितु, कुशाण्णा, फकिऱ्या, रामा, सखा व सिराळ्या इत्यादि. स्त्रीवाचकः—आकू, भागी, धोंडी, एल्ली, मुक्ती, मरी, राई, रमी रख्मी, सखी व तुकी इत्यादि. पुण्यांतले उचले कृष्णवर्णीय व द्राविड किंवा तेलगू लोकांच्या चेहऱ्याचे असतात. असें सांगतात कीं, हे लोक मारखाण्याची अगोदर पुष्कळ संवय करून घेतात. त्यामुळें पकडला गेलेल्या उचल्याला कितीहि मारहाण केली तरी त्याच्या डोळ्यांतून पाण्याचा टिपूसहि निघत नाहीं. आणि कबुली जबाब कधीं मिळत नाहीं.

हे लोक मोठमोठ्या मिशा, कल्ले, कानावर झुलपें आणि डोक्यावर शेंडी ठेवितात. दाढी मात्र कोणी ठेवीत नाहींत. त्यांची घरगुती भाषा मराठी आणि तेलगू यांच्या मिश्रणानें बनलेली आहे. "लेरा" = नाहीं, "इंपल" = भाकरी, "कुरा" = भाजी, "नेइ" = लोणी, "टलबटा" = पागोटें, "अंगी" = कोट, "नोर" = चेहरा, "मुकू" = नाक, "अटकल = केस", "यदुपराव" = तूं का पळतोस, "सितीगडक" = रागावूं नको, "देमती सकीनाषटी = तूं काय आणलें आहेस, "रुपायाची काया" = तूं रुपाया विसरलास काय, इत्यादि. यांची राहणी सामान्यतः मराठ्या सारखीच असते.

उचले लोक कधीं घर फोडीची किंवा मोठी मारहाणीची चोरी गांठीत नाहींत. असल्या चोऱ्या करणारे मांग, रामोशी हे लोक होत. उचले लोक खिसे कापणें किंवा गर्दीमध्यें अंगावरचे दागिने पळविणें असल्या चोऱ्या फक्त दिवसाच करितात. अर्थात जत्रा, यात्रा वगैरे यांचे चोरी करण्याचे मुख्य प्रसंग होत. माल कोणता व किती किंमतीचा चोरावा या बद्दल नियम नसतो. जें हाताला लागेल तें पळवितात. चोरीला निघण्यापूर्वी ते आपल्यांतील मुख्याचा सल्ला घेतात. या मुख्याला पाटील किंवा येंछुग्या म्हणतात. केलेली चोरी पचली म्हणजे जातीला जेवण देऊन त्यांत सर्वजण यथेच्छ मद्य पितात. या जेवणाखाणाचा खर्च जातीचा मुख्य पाटील आपल्या हिश्यांतून करतो. प्रत्येक चोरींतला कांहीं हिस्सा या पाटलाला द्यावयाचा असतो. चोरी करणारा सांपडल्यास त्याला सोडण्याकरतां वकील वगैरे देण्याचा खर्च पाटील करतो. रविवार व मंगळवार हे दिवस चोरीला अशुभ मानतात. कोणी कोणाविरुद्ध फितुर होऊन बातमी दिल्याचा आरोप केल्यास सर्व जातीच्या जमातीपुढें त्याची चौकशी होते. आरोप खोटा ठरला तर फिर्यादीला दंड होतो. आरोपी निर्दोषी आहे असें म्हणत असल्यास त्याला कढईंत उकळणाऱ्या तेलांत टाकलेला खबुतराच्या अंड्या एवढा दगड बाहेर काढण्याचें दिव्य करावें लागतें. त्यांची आराध्य दैवतें बहिरोबा, भवानी, खंडोबा मरीआई, म्हसोबा, वेताळ; व येल्लामा हीं होत. कोणी आजारी पडल्यास असल्या देवांना नवस करतात व बळी अर्पण करितात.

या जातींतल्या पाटलाचा उर्फ येंछुग्याचा अधिकार वंशपरंपरा चालतो. हे लोक चोऱ्या करण्याकरितां आगगाडीनें मद्रास कलकत्त्यापर्यंतहि जातात. खिसे कातरण्याकरितां त्यांच्या जवळ कोयत्याच्या आकाराची एक बारीक सुरी असते. तिला उल्लीमुख म्हणतात व ती ते तोंडांत किंवा जिभेखालीं लपवून ठेवितात. अलीकडे या जातीची संख्या कमी होत आहे व शिक्षण वाढत आहे. [ मुं. गॅ. ]

**उचाड.**—(मुंबई,) रेवाकांठामधील एक लहान संस्थान. मूळ उचाडच्या २६ चौ. मैल क्षेत्रफळाच्या दाहमा रजपुत जहागिरींचे चार विभाग पाडले आहेत; ते विरपुर, रेगन, विरायपुरा, व उचाड हे होत. उचाडच्या पैतृक संस्थानांत हल्लीं बाराच गांवें कायतीं आहेत; व त्यांचें क्षेत्रफळहि ८॥ चौरस मैलांइतकें राहिलें आहे उत्पन्न ( १८८० सालीं ) सुमारें नऊ हजार रुपये असून त्यापैकीं गायकवाडला खंडणी नऊशें रुपयापर्यंत देण्यांत येते. येथें वस्ती मुख्यतः कोळ्यांची आहे. [ मुं. गॅ. पु. ६. ]

**उच्च.**–पंजाब. भावलपूर संस्थानांतील अहंमदपूर तालुक्यांतील एक शहर सतलज नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर भावलपूर शहरापासून अग्नेय दिशेस१८मैलांवर उच (उंच जागा) आहे. चिनाब नदी याच ठिकाणीं सतलजला मिळालेली आहे. लो. सं. ( १९०१ ) ७२८३ असून म्यु. उत्पन्न १९०३–४ सालीं २ हजार रुपये होतें.

**उच्च शहर.**—पौराणिक व इतिहासदृष्ट्या हें फार महत्त्वाचें आहे. सर अलेक्झांडर, कनिंगहॅम यांचें असें म्हणणें आहे कीं, अलेक्झांडरनें पंजाबमधील नद्यांच्या संगमावर बांधलेलें हेंच शहर होय. शिवाय स्कंडचा मुलगा अयंड राज्य करीत असतां सिंध प्रांताचे ४ विभाग केलेले असून त्यांपैकीं एकाचें मुख्य शहर हें उच्च होतें, असें रशीदुद्दीनचें मत असल्यावद्दलहि तो उल्लेख करतो. बाराव्या शतकांत उचाला देवगड ही संज्ञा असून तेथील राजा देवसिंग मुसुलमानांच्या भीतीनें मारवाडांत पळून गेला होता. सय्यद जलालुद्दीन बुखारी यानें देवसिंगची मुलगी सुंदरपुरी हिला मुसुलमान बनवून एक उंच किल्ला बांधण्यास सांगितलें. मुसुलमान इतिहासकार याचा उल्लेख करीत नाहींत. रेव्हर्टीचें म्हणणें भटिया शहर हेंच होय. मुसुलमानी विद्येचें उच्च हें केंद्र होतें. फारसी इतिहासकार मिनाजुद्दीननें हें फिरोजी पाठशाळेचें मुख्य ठिकाण केलेलें होतें. नंतर बऱ्याचशा घडामोडी होऊन अखेर अकबर बादशहाच्या वेळीं मोंगल सत्तेखालीं उच्च आलें. अद्याप मुसुलमानांचें तें पवित्र स्थान मानलें जातें. याठिकाणीं त्यांचीं असंख्य मंदिरें आहेत. त्यांची व्यवस्था बुखारी व जिलानी मुकदम पाहतात. [ इं. गॅ. व्हा. २१. ]

**उच्च.**—तयमूरचा नातु पीरमहंमद जहांगीर हा काबूलचा सुभेदार होता इ. स. १३९७ च्या नोव्हेंबर डिसेंबरांत, त्यानें होड्यांचा पूल करून सिंधूनद उतरून उच्च शहरास वेढा दिला. मुलतानचा सुभा सारंखान यानें त्याला तोंड दिलें परंतु त्याचा पराभव झाला. [ मु. रि. भा. १ पु. १७६ मावेल डफ. इं. गॅ. ]

**उच्छर.**–मध्य हिंदुस्थान. नागोड संस्थानांतील एक जुनें शहर. ईस्टर्न इंडिया रेल्वेवर नागोडपासून २०मैल लांब आहे. लो. सं. ( १९११ ) ४५०७. उच्छरच्या आसपासच्या प्रदेशाला बरमे म्हणतात. १७२० पर्यंत नागोड संस्थानची ही राजधानी होती.

**उंज.**—बडोदें संस्थान. कडी प्रांत. सिद्धपूर तालुक्यांतील एक गांव. राजपुताना–माळवा रेल्वेवर असून हें अहमदाबादपासून उत्तरेस ५६ मैल व सिद्धपूरपासून दक्षिणेस ८ मैल लांब आहे. लो. सं. ( १९११ ) ९२५८. रजपूत राजाच्या वेळीं मारवाडांतून जे कडवे कुणवी गुजराथेंत उतरले ते याच गांवीं. गुजराथेंतील एकंदर लोकसंख्येंत कडवा कुणबी ⅟₂ भरतील. त्यांमध्यें १०–१२ वर्षांच्या ठरीव काळांत एकदांच उपवर वरवधूंचीं लग्नें होतात. ४० दिवसांची मुलगी झाल्यावरोबर तिचें लग्न केलेंच पाहिजे असा त्यांचा निर्बंध असल्यामुळें तितक्या मुदतींत जर कोणी चांगला वर सांपडला नाहीं तर एखादा मुखत्यार नवरा पाहून त्याच्याशीं लग्न लावतात. परंतु मुलगी अविवाहित ठेवीत नाहींत. पुढें वयांत आल्यावर मुलीचे आई बाप बरोबरीचा मुलगा पाहून त्याच्याशीं पाट (' नत्र ') लावून देतात कित्येकदां मुखत्यारहि सांपडत नाहीं अशा स्थितींत त्या लहान मुलींचें लग्न फुलांच्या गुच्छाशीं लावतात. व नंतर तो गुच्छ विहिरींत टाकून देतात.

या गावीं म्यु. कमिटी असून संस्थानाकडून २हजार रुपये दरसाल देणगी मिळते. कडव्या कुणव्यांचें एक मोठें देऊळ असून त्या ठिकाणीं दरसाल यात्रा भरते. शिवाय गुजराथीइंग्रजी दोन शाळा व गुजराथी शाळा, धर्मशाळा व स्थानिक कचेऱ्या आहेत.

**उज्जनी. जिल्हा.**—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थान. माळवा प्रांतांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १५०५ चौ. मै. ( १९११ ) लोक सं. ३२१६०३. एकंदर जिल्ह्यांत खेड्यांची संख्या ६६७ असून तीन मोठीं शहरें आहेत. उज्जनी, बारनगर व खाचरोड. जिल्ह्यामधून चंबळा व क्षिप्रा या नद्या वाहत असल्यामुळें हा प्रदेश फार सुपीक आहे.

**शहर.**—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थानांतील एक मोठें शहर. हें माळव्याच्या मध्यभागीं असून उज्जन–भोपाळ रेल्वेवर आहे.

हिंदु लोकांत उज्जनी शहराची प्रासिद्धि पुरातन काळापासून असून हें शहर फार प्राचीन समजलें जात आहे. हें क्षिप्रा नदीच्या कांठीं वसलेलें असून याचें क्षेत्रफळ दोन मैल आहे. सांप्रत जें शहर आहे त्याच्या उत्तरेसजुनें शहर होतें. परंतु त्याचा भूकंपानें व क्षिप्रेच्या पुरानें विध्वंस झालेला आहे. त्या ठिकाणीं इमारतींचे वगैरे जुने अवशेष अजून आढळतात. शहराची लो. सं. १९११ सालीं ३९२९५ होती. शहराच्या ' जयपुरा ' नांवाच्या भागांत जयपूरच्या सवाई जयसिंगानें स्थापन केलेली वेधशाळा असून तिचा पडका भाग अजून दृष्टीस पडतो. शहराच्या उत्तर भागीं कोट असून पलीकडे महाकालाचें स्थान आहे. महाकालाच्या देवळाजवळ दौलतराव शिंद्यांनीं बांधलेला राजवाडा आहे. शहरांतील इमारती पाहण्यासारख्या आहेत पण सांप्रत शहर निकृष्ट स्थितीला पोंचलेलें दिसतें.

फेब्रुवारी, मे आणि नव्हेंबर महिन्यांत यात्रा भरते. शिवाय दर बारा वर्षांनीं सिंव्हस्थ मेळा भरतो.

हिंदुस्थानांत जीं सात पवित्र शहरें मानलीं आहेत त्यांत उज्जनी एक होय. श्रद्धाळू हिंदु लोक सनातन कालापासून उज्जनी शहर आहे असें मानतात. याच ठिकाणाहून हिंदू भूगोलवेत्ते अक्षांशांचा आरंभ करितात. पूर्वी या शहराचें नांव अवंति असून सभोंवतालच्या प्रदेशाला अवंति देश म्हणत. ब्राह्मण लोक अजून तेंच नांव वापरतात ( अवंति पहा ).

प्राचीन काळीं माळव्यांत प्रथमतः आर्यांची वसती होती. बुद्धकालांत अवंतीचें राज्य हिंदुस्थानांत इतर प्रबळ राष्ट्रांपैकीं एक होतें. उज्जनीच्या राजाची मुलगी कौशांबीच्या उदयन नांवाच्या राजानें हरण करून नेली होती असें कथासरित्सागरांत वर्णन आहे. दक्षिणेकडून कोसलची राजधानी श्रावस्ती हिला जाणारा रस्ता उज्जनीवरून होता.

उज्जनीस मौर्य राजे उदयाला आले. टॉलेमी म्हणतो कीं, उज्जनी हे हिंदुस्थानांत अत्यंत भरभराटीला आलेलें शहर होतें. भडोच व सुरतेहून या ठिकाणी मौल्यवान कपडा व दागदागिने व नकशीचीं भांडीं येत असत. चौथ्या शतकांत उज्जनीवर मगध देशच्या चंद्रगुप्ताची सत्ता होती. नंतर विक्रमादित्यानें उज्जनी घेऊन गादी स्थापिली. याच्या दरबारांत ९ रत्नें ( हिंदुस्थानांतील विद्वान मनुष्यें ) होतीं. नाशिकच्या एका शिलालेखांत व अशोकाच्या एका शासनांत 'उज्जन्या' असा उल्लेख सांपडतो. अशोक चक्रवर्ती होण्यापूर्वी येथील सुभ्यावर होता.

सातव्या शतकांत कनोजचा राजा हर्षवर्धन यानें अवंति देश आपल्या राज्यास जोडला. तो मेल्यावर नवव्या शतकांत परमार नांवाच्या रजपूतांनीं अवंति घेतली. नंतर बाकीच्या प्राचीन शहरांप्रमाणें अवंतीची स्थिति झाली. गुजराथचे चालुक्य बुंदेलखंडचे चंडेल व मालखेडचे राष्ट्रकूट इत्यादि राजांनीं या शहरावर एकामागून एक हल्ले चालविले. सन १२३५ त अल्तमशनें स्वारी करून महाकाल देवळाचा विध्वंस केला. या कालापासून १८ व्या शतकापर्यंत उज्जनीस मोंगल सत्ता होती. १५६२ त अकबरानें तोच सुभा केला. १६५८ सालीं औरंगजेब व दारा यांच्यामध्यें धर्मपूर येथें एक लढाई होऊन त्यांत औरंगजेब यशस्वी झाला. व त्यानें धर्मपूर यास फत्तेबाद हें नांव दिलें. हें राजपुताना–माळवा रेल्वेवर स्टेशन आहे. रतलामचा राजा रतनसिंग या लढाईत मरण पावला. त्याचें थडगें अजून तेथें आहे. १७३३ त महंमद शहानें महाराजा सवाई जयसिंगला माळव्याचा सुभेदार करून पाठविलें होतें. १७४३ त बाळाजी बाजीराव पेशवे उज्जनीचे सुभे होते. व १७५० च्या सुमारास शिंद्याकडे कायमची उज्जनी आली. १९१० पर्यंत दौलतराव शिंद्याचें तें प्रमुख ठिकाण होतें.

१८९८ सालीं उज्जनी म्युनिसिपाल कमेटीची स्थापना झाली. म्यु. उत्पन्न दरसाल १८ हजार होतें. शहरांत पाण्याचा पुरवठा असून हें माळवा प्रांताच्या सरसुभ्याचें मुख्य ठिकाण आहे. येथें दोन संस्थानिक इस्पितळें, मिशनचा मोफत दवाखाना, माधव पाठशाळा व लहान मुलांच्या ७ शाळा व १ मुलींची शाळा या संस्था आहेत. खाजगी वेदशाळा व संस्कृत शाळा पुष्कळ आहेत.

अलीकडे उज्जेन, रतलाम रेल्वे व सेंट्रल इंडिया रेल्वे अजमीर–खांडवा व उज्जैन–भोपाळ रेल्वे रस्ते सुरू झाल्याकारणानें या शहराला पुन्हां महत्त्व येऊं लागलें. कापूस, धान्य व अफूचा व्यापार मुंबईशीं बराच असून सरकारी करोडगिरीच्या वखारी (डिपो) स्थापन केलेल्या आहेत.

२—(मद्रास) बेल्लारी जिल्ह्यांतील कुडलिगी तालुक्याच्या दक्षिण सरहद्दीवरील गांव लोकसंख्या ( १९०१ ) २९७५ होती. लिंगायत लोक या स्थानाला फार पूज्य मानतात कारण त्यांच्या एकंदर ५ सिंहासनस्वामीपैकीं हें एक स्थान होय. लिंगायत गुरूंचा मठ ही या खेड्यांत पाहण्यासारखी इमारत आहे. या इमारतींत सिद्धेश्वर स्वामींचें मंदीर असून समोर मोठा मंडप आहे.

**उज्जयन्ताद्रि**—गिरनार पर्वताचें नांव. द्वैआश्रय-मध्यें ग्राहरिपूची राजधानी वामनस्थली या पर्वतापासून ७ कोस दूर होती असें म्हटलें आहे. ( इं. अँ. १८७५ ).

**उझानी.**—उझानी हें संयुक्त प्रांतांतील बदौन जिल्हा व तालुक्यांतील एक शहर आहे. रोहिलखंड व कुमाउन रेल्वेवर बदौन शहरापासून हें ८ मैल आहे. १९११ सालीं लो. सं. ८२७४ होती. याबद्दल अशी दंतकथा सांगतात कीं, पूर्वी या गांवाला पिंपळाचीं झाडें पुष्कळ असल्यामुळें पिंपेरिया नांव होतें. परंतु उज्जनीच्या महीपाल राजानें तें नांव बदलून टाकिलें. रोहिल्यांच्या सत्तेखालीं हें गांव होतें त्यावेळीं दुसरा अबदुल्लाखान याची राजधानी उझानीस होती. त्यानंतर लवकरच इंग्रजांची सत्ता झाली व सारा वसुलीच्या वेळीं दंगा झाला.

शहरांत मुख्यत्वेंकरून घरें जरी चिखलमातीचीं बांधलेलीं आहेत तरीं एकंदर देखाव्यावरून शहर भरभराटींत आहे असें वाटतें. रस्ते फरसबंदी आहेत. अबदुल्लाखानचें अर्धें बांधलेलें थडगें व एक मशीद हीं येथील पाहण्यासारखीं स्थळें होत. म्युनिसिपल कमिटीची स्थापना सन १८८४ सालीं झाली. १९०३–४ सालीं म्यु. उत्पन्न सात हजार होऊन खर्च तेवढाच झाला. येथून तूप, साखर, आणि धान्य बाहेर गांवीं जातें. साखर शुद्ध करण्याचा मुख्य कारखाना आहे. पूर्वी नीळ पुष्कळ पिकत होती. सांप्रत तो धंदा लयाला गेला आहे. येथें दोन शाळा असून त्यांची व्यवस्था मु. कमिटीकडे आहे. शिवाय कमिटी दोन शाळांना मदत करिते.

उंट—हा शब्द उष्ट्र या संस्कृत शब्दावरून आला असून उष्ट्र या संस्कृत शब्दाचें अवेस्ता भाषेंतील उश्त्र या शब्दाशीं साम्य आहे. ऋग्वेद व अथर्ववेद संहितेंत आणि ऐतरेय व शतपथ ब्राह्मणांत उष्ट्र शब्द आला आहे. ( ज्ञानकोश ३ ३ विभाग २४७ पान ). उंटाला अरबी शब्द जेमल आहे व त्याचे हिब्रू शब्द गेमल, इटालियन शब्द गॅमेलो, फ्रेंच शब्द चॅमू, जर्मन कॅमेल, इंग्रजी शब्द कॅमल इत्यादि भाषांतील शब्दांशीं साम्य आहे. सस्तन व रवंथ करणाऱ्या प्राण्यांपैकीं ही एक जात असून तिच्या दोन पोटजाती आहेत. एक अरबी उंट व दुसरी बॅक्ट्रियन उंट. या दोन पोटजातींत महत्त्वाचा फरक हा असतो कीं, अरबी उंटाला एकच मदार असून बॅक्ट्रियन उंटाला दोन असतात. अरबी उंटाची जात बरीच पसरलेली असून अरबस्तानशिवाय इजिप्त, इराण, हिंदुस्थान, कॅनेरी बेटें, इत्यादि ठिकाणीं ती सांपडते. शिवाय अलीकडे ती जात आस्ट्रेलिया व उत्तर अमेरिका इकडेहि गेली आहे. बॅक्ट्रियन उंटाची जात हिमालय व तारस पर्वतांच्या आसपास आणि मध्य आशियांत सर्वत्र आहे. या दोन जातींमध्यें दुसरा महत्त्वाचा फरक असा कीं, अरबी उंटांपैकीं बॅक्ट्रियन उंटाचे आंखूड पाय असतत. पण एकंदर शरीर अधिक मोठें असतें व अंगावर केंस लांब व दाट वाढून हिवाळ्यांत त्याचें थंडीपासून रक्षण करतात. शिवाय बॅक्ट्रियन उंटांमध्यें रानटी व पाळीव अशा दोन जाती असून रानटी उंटाच्या मदारी लहान, केस कमी, कान व मुसकट आंखूड असतात. उंट जातीच्या प्राचीन प्राण्यांचे जे अवशेष सांपडले आहेत त्यांच्या आकाराशीं इतर उंटांच्या जातीपेक्षां या बॅक्ट्रियन रानटी जातीचें साम्य अधिक आहे; व त्यावरून असें ठरतें कीं, रानटी उंट ही पळून गेलेल्या पाळीव उंटापासून बनलेली जात नसून उलट रानटी उंट हीच सृष्टींतील मूळ. जात असून तिच्यापासून सुधारून दुसऱ्या जाती बनल्या असल्या पाहिजेत. याच उपपत्तीला डॉ.स्वेन हेडिननें रानटी उंटाची राहणी व संवयी नीट अवलोकन करून पुष्टी दिली आहे असें प्रो. लेंचे याचें म्हणणें आहे.जुन्या ख्रिस्ती धर्मग्रंथांत उंटाचा उल्लेख आहे. यावरून अरबी उंट ही सर्वांत जुनी पाळीव जात आहे असें पाश्चात्त्य लेखकांचें म्हणणें आहे. परंतु वेदांतहि हा शब्द आलेला असून गाईप्रमाणें उंटहि दान दिल्याचा उल्लेख असल्यामुळें हिंदुस्थानांतील पाळीव उंटाची जात फार जुनी होय.

उंट हा प्राणी दिसावयाला सुंदर नसला तरी त्याच्या विलक्षण शरीररचनेमुळें प्रेक्षणीय असतो यांत शंका नाहीं. आणि उपयोगाच्या दृष्टीनें पाहतां तर तो अत्यंत आवश्यक प्राण्यांपैकीं आहे. उंटाचा उपयोग लांबलांब ओसाड वाळूच्या मैदानांतून प्रवास करण्याकरितां, तसेंच दूरचा प्रवास जलद करण्याकरितां असा दोन्ही प्रकारें होतो. राजपुताना, अरबस्तान, मध्यआशिया, साहारा, वगैरे मोठमोठ्या वालुकामय प्रदेशांतून प्रवास करण्यास उंटाखेरीज दुसरें कोणतेंच जनावर टिकणें शक्य नाहीं. व यावरून उंटाला ' वालुकारण्य नौका ' ( शिप आफ दी डेझर्ट ) असें यथार्थ नामाभिधान प्राप्त झालेलें आहे; त्याच्या पोटाची रचना अशी असते कीं, बरेच दिवस पुरेल इतका मोठा पाण्याचा पुरवठा त्याली एकदम करतां येतो. व त्यामुळें निर्जल अशा शेंकडो मैल लांबीच्या वाळवंटांतून पाण्याचा थेंबहि न मिळाला तरी उंट प्रवास करूं शकतो. उंटाला चवथ्या वर्षापासून या कामाला हळूहळू लावतात, ठराविक खुणा किंवा शब्द उच्चारतांच बसणें व उठणें इत्यादि क्रिया करण्याचें त्याला शिकवितात व हळूहळूं अधिकाधिक ओझें वाहण्याची त्याला संवय लावतात. उंट ५०० ते १००० पौंडापर्यंत ओझें नेऊं शकतो. वाळवंटांत प्रवास करतांना साधारणपणें रोज २५ मैल याप्रमाणें तीन दिवस सारखा प्रवास उंट करतो. व चवथ्या दिवशीं त्याला पाणी मिळावें लागतें. तथापि विशेष चपळ जातीचे उंट रोज ५० मैलांप्रमाणें सारखे पांच दिवस चालूं शकतात. शिवाय प्रवासांत विसांव्याकरितां थांबविला तरी उंटाला सावलीची अपेक्षा नसते. तापलेल्या वाळूंत व भर कडक उन्हांतच उभा राहण्यानें त्याला आनंद वाटतो. वाळवंटांत जेव्हां मोठें धुळीचें वादळ उसळतें तेव्हां उंट पुढले गुडघे जमीनीवर टेकून व नाकपुड्या मिटून वेऊन मान वाळवंटावर पसरून ठेवतो व वादळ बंद होईपर्यंत स्वस्थ उभा राहतो व या स्थितींत उभा राहिल्यानें वरील माणसांनांहि त्याच्या मागल्या बाजूला आश्रय घेऊन वादळापासून बचाव करतां येतो. उंटाची चाल मात्र फार चमत्कारिक असल्यामुळें नवखा माणूस एका दिवसाच्या प्रवासानेंच अगदीं थकून जातो.

हत्तीप्रमाणें उंटांचाहि मद वाहूं लागून ते मस्त बनतात व अशा वेळीं मोठमोठ्यानें ओरडून एकमेकांशीं भयंकर मस्तीहि करतात. माणसांनां अशा स्थितींत त्यांच्यापासुन धोका असतो. उंटीण पुरे अकरा महिन्यांनीं विते. तिला दर खेपेस एकच पोर होतें व तें एक वर्ष अंगावर दुध पितें. उपजल्यापासून आठ दिवसांत त्याची उंची ३ फूट होते. परंतु पुरी वाढ होण्यास त्याला सोळा सतरा वर्षें लागतात. उंट चाळीस पन्नास वर्षें जगतो. अरबांनां उंटांचें मांस फार आवडतें. उंटणीचें दूधहि फार पुष्टिकारक असतें. त्याचें लोणी मात्र निघत नाहीं. उंटाच्या अंगावरचे लांब केस दर उन्हाळ्यांत कापून त्याचीं वस्त्रें करतात व रंग देण्याचें ब्रश करतात. कातडें कमवून फार टिकाऊ बनवितां येतें. त्याची लीद जळणास उपयोगी पडते व त्याच्या राखेपासून नवसागर काढतात.

उंटाचें मुख्य खाद्य झाडाचा पाला, झुडपें वगैरे होय. तें तो आपल्या भक्कम पुढल्या दातांनीं ओरबाडून खातो.हा प्राणी फार गरीब असतो खरा, परंतु घोडा व हत्ती यांच्या प्रमाणें धन्यावर प्रेम करणारा, व त्याच्या हुकुमांत वागणारा मात्र

तो बिलकूल नसतो. पाठीवर स्वार बसला न बसला याची तो कांहींच पर्वा न करतां तडक चालूं लागतो. वास्तविक पाळीव जनावरांतले गुण उंटाच्या अंगीं मुळींच उत्पन्न झालेले नसून तो गाढवासारखेंच मूर्ख, गरीब जनावर असल्यामुळें मनुष्य त्याच्या कडून काम करून घेऊं शकतो.

**उटकटारी**—ह्या झाडास संस्कृतांत उत्कट, गुजराथींत उटकटो, हिंदुस्थानी भाषेंत उडिंगण, उटकटावा, मराठींत उटकटारी, उताटी, कांटे चुबुक अशीं नांवें आहेत. ही वनस्पति हिंदुस्थानांतील बहुतेक भागांतील जंगलांत सांपडते. या झाडाची उंची सुमारें हात दोन हात असते. याचें फळ वाटोळें असून त्यावर लांब लांब कांटे असतात व फुलाचा रंग पांढरा असतो. हिचीं पानें किंचित् कोंपरे कातरल्या सारखीं असून त्यांच्या पृष्ठभागीं व शिरेवर सफेत रंगाचे कांटे असतात. उन्हाळ्यांत हीं झाडें सुकून गेल्यासारखीं दिसतात. परंतु पावसाळा सुरू होण्याबरोबर पुन्हां त्याच जागीं फुटतात. या वनस्पतीचें मूळ व बीं फार औषधी आहे. मुलास डांग्या खोकला होतो त्यावर या झाडाची मुळी शस्त्र न लावतां काढून मुलाच्या गळ्यांत बांधावी. धातु पुष्टतेवर या झाडाचें मूळ गोखरू व कवचबीज यांचा दुधांत पाक करून सेवन करावा. किंवा मूळाचें चूर्ण दुधांत घ्यावें. ( पदे )

**उटकमंड पो ट वि भा ग.**—मद्रास मधील निलगिरी जिल्ह्याचा एक पोटविभाग. ह्यांत उटकमंड व गुडलूर तालुक्याचा समावेश होतो.

**ता लु का.**—मद्रास इलाख्यांतील निलगिरी जिल्ह्यांतील तीन तालुक्यांपैकीं सर्वांत मोठा तालुका. पूर्वीच्या तोडनाद व कुंदहनाद विभागांचा हा तालुका झाला आहे. ह्यांत सिगुर घाटाच्या खालील मरनीगुदी खेड्याचा समावेश होतो. फक्त ह्याच खेड्यांत रयतवारी पद्धत सुरू आहे. क्षेत्रफळ ४६१ चौ. मै. लो. सं. ( १९११ ) ४२५८२. उटकमंड हा फक्त एकच गांव असून शिवाय १७ खेडीं आहेत. चहा व सिन्कोनाची बरीच लागवड येथें करितात ह्या तालुक्यांतून विकारा नदी वहाते. ह्या नदीस दोन धबधबे आहेत. अर्धे अधिक राखलेलें जंगल आहे.

**श ह र.**—मद्रास इलाख्यांतील निळगिरी जिल्ह्याचें व उटकमंड तालुक्याचें मुख्य ठिकाण निलगिरीच्या डोंगर सपाटीवर असून समुद्र सपाटीपासून ७५०० फूट उंच आहे. मद्रास शहरापासून ३५६ मैल.कूनूरपासून उटकमंडला लहान गाडी जाते. स्टेशनाला उटी असें नांव आहे. लो. सं. ( १९११ ) १८८२९ होती.

तालुक्याची व कलेक्टरची कचेरी येथें असून शिवाय मद्रास सरकारचें हें १८२७ पासून उन्हाळ्यांत रहाण्याचें थंड हवेचें ठिकाण आहे. दक्षिण हिंदुस्थानांत हेंच मुख्य हवा खाण्याचें ठिकाण आहे असें म्हटलें तरी चालेल.कोइम्बतूरचा कलक्टर ल्लिव्हन साहेब ह्यानें पहिल्यानें आपला बंगला येथें बांधला. ह्या गांवाच्या चारी बाजूस दोडबेट्टा, स्नौडन, एल्क टेंकडी व क्लब टेंकडी असे चार पहाड आहेत. सर्वांत दोडबेट्टा उंच आहे. हा पूर्वेस असून समुद्रसपाटीपासून ८७६०जार फूट वर आहे. येथील होबर्टपार्क फारच रम्य आहे. पश्चिमेस कान्दल खोरें आहे. ह्याच्याहि पश्चिमेस, 'वेन्लाक डौन्स' म्हणून शिकारीचें रमणीय स्थान आहे. येथून खालील प्रदेशाचा देखावा फारच मनोरम दिसतो. फर्नेहिलवर म्हैसूर, बडोदें व हैदराबाद येथील संस्थानिकांचे राजवाडे आहेत. गांवांत राहण्याजेवण्याकरितां पुष्कळ होटेलें आहेत. पाऊस ४९ इंच पडतो. हिंवाळ्यांत थोडेसें बर्फ पडतें. उष्णतामान जास्तींत जास्त ६५° अंश असतें. येथील हवा विलायतेप्रमाणें घटकोघटकी बदलते.

येथें म्यु. स्थापना १८६६ त झाली. बँक आफ मद्रासची एक शाखा आहे. येथें जो सरकारी बगीचा आहे त्यांत सर्व प्रकारचीं विलायतीं झाडें, कांचेचीं घरें, मोठमोठीं हिरवीगार पटांगणें, कारंजीं हीं आहेत. या बगीच्यावर सरकारनें बराच पैसा ओतला आहे.

दोन इस्पितळें, एक शेतकी कॉलेज, कांहीं शाळा व ख्रिस्ती देवळें असून करमणुकीकरितां दोन तीन क्लबहि आहेत. येथें चहा विशेष पिकतो.

यूकॅलिप्टस तेल ज्यांपासून तयार करितात तीं झाडेंहि येथें विपुल आहेत. तीं दीडशें फूट उंच वाढतात व तेथें तीं चोहोंकडे दिसतात. शिवाय लवंगा, वेलदोडे, जायफळ तसेंच पीयर्स, प्लम्स, चेरीज हीं विलायती झाडेंहि उटी येथें पाहण्यास मिळतात. दरवर्षी फुलांचें जें प्रदर्शन भरतें तें खरोखरीच प्रेक्षणीय असतें. [ इं. गॅ. अर्नोल्ड गाईड. मनोरंजन पु. २२ पू. भा. ४. ]

**उंड.**—वायव्य सरहद्द प्रांतांतील हें एक खेडें असून अटकपासून १५ मैलांवर सिंधुनदीच्या कांठीं आहे. याच्या पलीकडे पेशावर जिल्ह्याची हद्द लागते. मुसुलमानी स्वाऱ्या सुरू होण्यापूर्वी काबूल व गंधार देशावर तुर्क व हिंदी राजे राज्य करीत असतां त्यांची राजधानी उंड येथें होती. इलाच उडका अथवा उडा—भांडपुरा असें प्राचीन नांव असून चिनी प्रवासी ह्युएनत्संग तिजला उटोकियाहंच हें नांव देतो. त्यानें सदर शहराचें वर्णन असें लिहिलें आहे कीं, तें फार संपन्न असून त्याचा व्यास ४ मैल होता. वईहिंद येथें महंमद गिजनीनें या राजाचा पराभव करून पंजाबांतील आपला रस्ता मोकळा केला असें अल्बेरुणी, व मुसुलमान इतिहासकार लिहितात. वइहिंद म्हणजेच सांप्रतचें 'उंड' होय. १४ व्या शतकांत काश्मीरचा राजा शाबुद्दीन यानें गंधार व सिंधु प्रदेशचा राजा गोविंदखान याचा पराभव करून हांकून लावीपर्यंत हें ठिकाण महत्त्वाचें होतें.

**उंडवलें.**—मद्रास. गंतूर जिल्हा व तालुक्यांतील एक गांव. लो. सं. ( १९०१ )११२३. लेण्यांबद्दल याची प्रसिद्धि आहे. सर्वांत मोठें लेणें ४ मजली असून तिसऱ्या

मजल्यावर शेषावर निद्रिस्त विष्णूची मूर्ती आहे. याला अनंतशयन म्हणतात. अर्थात हें लेणें बुद्धोत्तर ब्राह्मणकालीन असावें.

**उंडविन.**—उत्तर ब्रह्मदेश. मेकटिला जिल्ह्यांतील आग्नेयीकडील तालुका. हा मंडाले रंगून रेल्वेच्या दोन्ही बाजूनें असून ४७० चौ. मैल क्षेत्रफळ आहे. तालुक्यांत खेड्यांची संख्या १३६ असून. लो. सं. १९११ सालीं ६९२७३ होती. तालुक्याच्या पूर्व भागावरून सामन नदी गेलेली आहे. तालुक्याचें मुख्य ठिकाण उंडविन हें असून त्याची लो. सं. १०९० आहे.

**उडियासांक्षिया.**—हे लोक संबळपुरांत राहतात. गवंडी व बांधकामाची मजूरी हे यांचे धंदे होत. हे उड्र किंवा ओड्र नांवाच्या फिरत्या लोकांचे वंशज आहेत. छत्तीसगडांत यांची संख्या एक हजार आहे. यांचा व सांक्षिया गुन्हेगारांच्या जातीचा कांहींच संबंध नाहीं. संबळपुरांत यांचा दर्जा वराच उच्च आहे. ब्राह्मण यांच्या हातचें पाणी पितात.

यांच्यात बनेटिया व खांदाईत असे दोन वर्ग आहेत. बनेटिया उच्च व खांदाईत नीच गणले जातात. हे उडिया राजांच्या घरीं शिपायाच्या खेरीज इतर कामें देखील करीत. बनेटिया सांक्षिया लोक खांदाईती लोकांबरोबर अनुलोम विवाह करतात. पण खांदाइत लोकांच्या घरीं जेवत मात्र नाहींत. फक्त दही व साखर खातात यांच्यातहि देवकांचें थोडेसें प्रस्थ आहे.

मुलींचीं लग्नें ७ ते १० च्या आंत होतात. १२ व्या वर्षी लग्न न झाल्यास विधवाविधीनें तिचें लग्न होतें. लग्नाची मिरवणूक फार थाटाची असते. लग्न उडिया पद्धतीनें लागतें. वरात घरीं आल्यावर पाण्यानें भरलेली सात भांडीं वर उपडी करतो. मग तो आपलें तोंड धुवून तीं भांडीं फोडतो व पळून जातो व बायका त्याच्यावर रंग ओततात. नवव्या दिवशीं वधू सर्व सासरच्या माणसांच्या कपाळास दही व साखरेचा टिळा लावते. घटस्फोट व विधवाविवाह जातीस संमत आहेत. हे लोक विश्वकर्म्याची पूजा करतात; श्राद्धेंहि करतात. हे लोक स्वच्छ प्राण्यांचें मांस खातात पण दारू पीत नाहींत. द्रुगच्या राजाची दृष्टी एका सांक्षिया स्त्री वर गेली व ती विवाहित असूनहि हस्तगत व्हावी म्हणून त्यानें फार खटपट केली. त्याला त्रासून नऊ लक्ष सांक्षिया वरार बांधाकडे गेले. तेथेंहि राजानें त्या बाईचा पाठलाग केला म्हणून तिनें अग्निप्रवेश केला. ही कथा ओडनी गीतांत आहे.

**उडीद**—हें एक द्विदल धान्य आहे. याचें झाड सुमारें एक हातभर उंच वाढतें. यास संस्कृतांत माष, गुजराथींत अडद, हिंदींत उरद वगैरे नांवें आहेत.

उडदाच्या दोन जाती आहेत. (१) काळे व जाड दाण्याचे (२) आणि हिरवट व बारीक दाण्याचे.

हिंदुस्थानांत उडदाची लागवड पुष्कळ होते; परंतु लागवडीच्या क्षेत्रफळाचे बरोबर आंकडे मिळत नाहींत.

उडीद सामान्यतः ज्वारी, बाजरी किंवा कापूस वगैरेवरोवर पेरतात किंवा केव्हां केव्हां त्याचें स्वतंत्र पीकहि काढण्यांत येतें. पावसाच्या आरंभीं पेरणी होऊन एक प्रकारचें पीक आगस्ट व सप्टेंबर महिन्यांत आणि दुसऱ्या प्रकारचें आक्टोबर, नोव्हेंबर महिन्यांत तयार होतें. मुगाप्रमाणें याला हलक्या जमिनीची जरूर नसते, उलट जड अथवा कठिण जमिनींतच त्याचें पीक चांगलें येतें. हें स्वतंत्र पेरलें असतां सरासरी दर एकरी ५ मण धान्य व त्याच्या तिप्पट चारा निघतो. उडीद हें बहुतेक खरीप पीक असून पुष्कळ वेळां तांदूळ निघाल्यानंतर त्या शेतांत रब्बी पीक म्हणूनहि पेरतात.

उडदाच्या हिरव्या शेंगांची भाजी करितात. वाळलेल्या धान्याची डाळ करून त्याची आमटी अथवा डाळ भाजून दळल्यावर त्याचे लाडू केले जातात. उडदाच्या पिठाचे पापडहि करितात.

पंजाबकडे उडीद अमळ गरम अशा पाण्यांत भिजवून, कुटून, वाळवून व त्यांत तूप अथवा ताक मिळवून त्याचे बरी व सेप नांवांचे पदार्थ करितात. उडीद हें धान्य व त्याचा चारा गुरांना खाण्यास देतात. उडदाच्या अंगीं औषधी गुणहि आहेत.

उडीद पौष्टिक, स्निग्ध, कफ करणारा, शुक्र वाढविणारा, मेंदु, मांस व बल वाढविणारा, पचनाला जड, शौचास साफ करणारा असून शुक्राचें उत्सर्जनहि करतो. अर्दित वगैरे वातरोगांवर उडदाचीं अन्नें हितकर होतात. [ वॅट वगैरे ].

**उडुपी, तालुका.**—मद्रास. दक्षिण कानडा जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ७१९ चौ. मैल असून खेड्यांची संख्या १५८ आहे. १९११ सालीं लोकसंख्या २७२७५६ असून तालुक्याचें मुख्य स्थळ उडुपी हेंच होय. १९०३–४ सालीं काळी व इतर बाबी मिळून उत्पन्न ४ लक्ष ४१ हजार होतें. तांदूळ व नारळ हे उत्पन्नाचे जिन्नस असून पश्चिम घाटाजवळ ताडमाडाचे बाग आहेत. तालुक्याची जमीन उत्तम काळी असल्यामुळें एकंदर तालुका भरभराटीच्या स्थितींत आहे.

**शहर.**—मद्रास.दक्षिण कानडा जिल्ह्यांतील उडुपी तालुक्याचें हें मुख्य ठिकाण असून येथील लो. सं. १९११ सालीं १०८७१ होती. मध्वाचार्यांनीं येथें कृष्णाची मूर्ति स्थापन केलेली आहे. या ठिकाणीं यात्रेकरू पुष्कळ येतात. वैष्णवांचे एकंदर ८ मठ आहेत. प्रत्येक मठाधिकारी पाळीपाळीनें २ वर्षेपर्यंत कृष्णाची पूजा करितात.

**उड्र**—( ओड्र, औड्र ) पूर्व विभागांतील अर्वाचीन ओरिसा देश व त्यांतील लोक.

यांचा उल्लेख महाभारत, बृहत्संहिता, मनुस्मृति वगैरे ग्रंथांत आढळतो. यास ओड्र, औड्र अशींहि नांवें दिलेलीं आढळतात.

**उतथ्य**—अंगिरस कुलांतील एक ऋषि. याची पत्नी भद्रा ही फार सुस्वरूप होती. तेव्हां वरुण तिच्यावर लुब्ध झाला व त्यानें तिला उतथ्याच्या आश्रमांतून पळवून नेली; व उतथ्याकडून नारद ऋषि परत तिला मागण्याकरितां आला असतांहि वरुणानें ती दिली नाहीं. तेव्हां उतथ्यानें रागावून सर्व समुद्र, सरोवरें व नद्या कोरड्या करून टाकिल्या व तो प्रदेश उजाड करून सोडला. तेव्हां वरुण शरण आला व त्यानें भद्रेला परत केली. बायको परत मिळाल्यानें उतथ्याला इतका आनंद झाला कीं त्यानें दोन्ही लोकांना व वरुणाला दुःखमुक्त केलें.

**उत्तंक**—वेद ऋषींचा शिष्य. एकदां गुरु अग्निशुश्रूषणादि कारभार याच्यावर सोंपवून परगांवीं गेले असतां गुरुपत्नी ऋतुमती झाली. तेव्हा आश्रमांतील स्त्रिया उत्तंकाला गुरुपत्नीचा ऋतु व्यर्थ न घालविण्याविषयीं आग्रह करूं लागल्या. पण उत्तंकानें मनोनिग्रह केला. त्यामुळें गुरु घरीं परत आल्यावर फार प्रसन्न झाले व ब्रह्मचर्याश्रम संपवून स्वगृहीं परत जाण्यास कांहीं दक्षिणा न मागतां त्याला अनुज्ञा दिली. पण गुरुपत्नीनें पौष्य राजाच्या स्त्रीचीं कुंडलें मागितलीं. तीं उत्तंकानें तक्षकाचा विरोध बाजूला सारून मोठ्या खटपटीनें गुरुपत्नीला अर्पण केलीं. यानेंच जनमेजय राजाला सर्पसत्राची कल्पना सुचवून तक्षकाचा सूड घेतला. [ म.भा. आदि. अ. ३]

**उत्तनगरै**—मद्रास. सालेम जिल्ह्यातील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ९१० चौ. मै. असून लो. सं. १९११ सालीं १५६७२५ होती. मलेरिया तापाचा प्रसार उत्तनगरै तालुक्यांत फार असल्यामुळें वस्ती अतिशय विरळ आहे. खेड्यांची संख्या ४५१ असून काळीचें उत्पन्न १९०३–०४ सालीं २०७००० झालें होतें.

**उत्तमपालेयम्**—मद्रास. मदुरा जिल्हा. पेरियाकुलम् तालुक्यांतील एक शहर. हें सुरुली नदीच्या कांठीं असून पेरियाकुलम्‌पासून ५४ मैलांवर आहे. १९११ सालीं लो. सं. ८७०२ होती. पूर्वी तेथें पुरातन मदुराच्या पालेयम् जमीनदाराचें मुख्य स्थान होतें. परंतु पेरियार कालवा सुरू झाल्यां दिवसापासून उत्तमपालेयम् गांव फार महत्त्वाला चढलें. नायब तहशिलदाराचें ठाणें येथें असतें.

**उत्तर**—मत्स्यदेशाधिपति विराट राजाच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. यास भूमिंजय असेंहि म्हणत असत. ( भार. विराट. अ. ३५ श्लो. ९ ). विराट राजाचीं गोधनें कौरवांनीं हरिलीं त्यावेळीं याचें सारथ्य करण्याचें बृहन्नडेनें स्वीकारिलें, व हा युद्धास गेला, आणि बृहन्नडेच्या साह्यानें विजयी होऊन परत आला.

हा भारती युद्धांत पांडवांकडे होता व बहुत योद्धयांशीं युद्ध करून, शेवटीं शल्य राजाच्या हातून मरण पावला (भार. भीष्म. अ. ४७. ) याची स्त्री, हा मरण पावला त्या वेळीं गरोदर होती, व तिला पुढें इरावती नामक जी कन्या झाली होती तीच पुढें अभिमन्युपुत्र परीक्षित राजा यास दिली होती.

**उत्तर अमेरिका**—अमेरिका खंडाचे मुख्य तीन स्वाभाविक विभाग आहेत; उत्तर अमेरिका, मध्य अमेरिका व दक्षिण अमेरिका. उत्तर अमेरिकेची व जुन्या जगाच्या उत्तर खंडाची तुलना केली असतां यूरेशिया व उत्तर अमेरिका यांच्यांत बरेंच साम्य आढळतें. या साम्यावरून असें दिसतें कीं, या दोन्ही भागांपैकीं कोणताहि भाग भूस्तरशास्त्रदृष्ट्या एकापेक्षां जुना अथवा नवा नाहीं. व दोहोंमध्यें अतिशय जुने असे भूस्तरविषयक फरक सारखेच झालेले आहेत.

उत्तर अमेरिका व यूरेशिया यांच्यांत हवापाण्यासंबंधींहि साम्य आहे. अमेरिकेंतील अपॅलेचेन व यूरोपांतील हर्सेनियन पर्वतांत विपुल कोळसा आहे व तो भूस्तरशास्त्रदृष्ट्या सारखाच जुना ठरतो. यावरून अति प्राचीन काळीं सुद्धां हवापाण्याच्या मानानें व भुगोलाच्या दृष्टीनें या दोहोंत साम्य होतें असें दिसतें. हल्लींहि हवापाण्याच्या दृष्टीनें अमेरिका व यूरेशिया यांच्यांत साम्य आहे. तथापि एकंदरींत येथील हवा विषम आहे. या भागांतील हिंवाळा यूरोपांतील हिंवाळ्यापेक्षां जास्त कडक असतो. पण पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेशांतून हवा कमी थंड असते.

या देशाच्या भूपृष्ठाचे ' लारेन्सियन हायलंड,' अपॅलेचेन हॅायलंड,'नार्थ अमेरिकेच्या पर्वतांच्या ओळी व मध्यवर्ती मैदान असे भाग पडतात.

न द्या.—येथील नद्यांमध्यें मिसिसिपीप्रणाली, नेलसन व सेंट लॅारेन्स प्रणाली, मॅकेंजी, यूकॅान, फ्रेझर, कोलोरॅडो व रिओग्रँडी ह्या मुख्य आहेत.

स रो व रें.—ऑंटारिओ, एरी, ह्यूरॅान, मिचिगान व सुपिरिअर हीं येथील मुख्य सरोवरें आहेत.

उत्तर अमेरिकेचें क्षेत्रफळ सुमारें ८०,००,००० चौरस मैल आहे. येथील लोकवस्ती बहुतेक ' जुन्या जगांतील ' आहे. नार्थ अमेरिकेंतील समशीतोष्ण कटिबंधांतील प्रदेश बराच प्रगतीच्या मार्गांत पुढें गेलेला आहे.कारण या भागांत यूरोपांतील सुधारलेल्या लोकांनीं वसाहत केलेली आहे. पूर्व किनाऱ्यावरील वसाहतीपासून आंतील भागांत झालेली प्रगति भूप्रकृतीला अनुसरून आहे.

सेंट लारेन्स नदीपासून ओहिओ व सेंट लारेन्सचें आखात व चेसॅपिक बे यांच्या दरम्यान असलेल्या अटलांटिक महासागराच्या किनाऱ्यापासून मैदानापर्यंतचा प्रदेश लोकसंख्या, उद्योगधंदे, संपत्ति, वगैरे बाबतींत विशेष पुढें गेलेला आहे. युनायटेड स्टेट्सच्या आग्नेय भागांत नीग्रो गुलामगिरी व

तिचे परिणाम अद्यापि दृष्टीस पडतात. येथें राहणारे इटालियन, हंगेरियन, जर्मन, इंग्रज वगैरे सर्व प्रकारचे लोक अमेरिकन झाले आहेत. मेक्सिकोमध्यें मूळ रहिवाशांचें प्रमाण उत्तरेंतील भागापेक्षां जास्त आहे.

दोन शतकांपूर्वी येथें बहुतेक फक्त मूळ रहिवाशीच होते. परंतु हल्लीं बहुतेक महत्त्वाच्या भागांतून त्यांच्या जागीं नवीन लोकांची वस्ती झाली आहे. मूळ रहिवाशांची हकालपट्टी बहुधां क्रूर, कडक व अन्यायी मार्गांनीं करण्यांत आली. तथापि एकंदर देशांत सुधारणेची प्रगति झाली. हे मूळ रहिवाशी उत्तर टोंकाकडे अथवा वायव्येकडे फारसे कमी झालेले नाहींत. यांच्या संस्कृतीची वगैरे माहिती ज्ञानकोश विभाग चवथा बुद्धोत्तर जग पृ. ४५८-४६५ येथें दिली आहे. [ कानडा, युनायटेड स्टेट्स, न्यू फाऊंडलंड या सदराखालीं उत्तर अमेरिकेंतील निरनिराळ्या देशांची माहिती त्या त्या लेखांत दिली आहे. ]

**उत्तरध्रुवप्रदेश**—उत्तरध्रुवाचें पूर्ण रीतीनें अद्यापि संशोधन झालें नसलें तरी त्या प्रदेशाचे भूगोलदृष्ट्या काय काय विशेष आहेत, तें सांगतां येण्याइतकें संशोधन झालें आहे यांत शंका नाहीं. उत्तरध्रुवाच्या कक्षेंत, आर्टिक महासागराच्या भोंवतालचा यूरोप, आशिया, अमेरिका व ग्रीनलंड यांचा उत्तरेकडील भाग येतो ग्रीनलंड व यूरोप यांच्यामधून अटलांटिक महासागराचा फांटा, आर्टिक महासागराला मिळाला आहे.

ज्या ठिकाणीं उन्हाळ्यांतील कांहीं दिवस सोडून दिल्यास कायमचें वर्फाचें आच्छादन असतें व ज्या ठिकाणची हवा अगदीं असह्य थंड असते अशा ठिकाणीं राहून संशोधन करणें किती कठिण असेल, याची कल्पनाच करणें बरें. अशा स्थितींत तेथें भूस्तरशास्त्रदृष्ट्या काय काय चमत्कार आढळतील तें पहाणें अत्यंत दुर्घट असल्यास त्यांत नवल नाहीं; तरी पण धाडशी संशोधकांनीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करून भूस्तरशास्त्रोपयोगी अशी माहिती मिळविली आहे. त्यावरून या प्रदेशांत अर्केयन दगड सर्व ठिकाणीं आढळून येतो. अगदीं ईशान्येकडील भागांत कोळसा उत्पन्न करणारे दगड सांपडतात. ज्यूरासिक दगड देखील, दक्षिणेकडील प्रदेशांत सांपडतो. लोखंड उत्पन्न करणारा चुनाहि सांपडतो. तृतीय युगांतील दगड व मायोसीन युगांतील प्रस्तरीभूत वनस्पतींहि क्वचित् आढळून येतात. ग्रँटलंड येथें तृतीय युगांतील कोळसा उपलब्ध आहे. उत्तरध्रुवाजवळील प्रदेशांत एकसुद्धां मोठा पर्वत आढळून येत नाहीं. क्वचित् लहानशा टेंकड्या मधून मधून आढळतात. ग्रीनलंडचें डोंगरपठार बरेंच विस्तृत आहे; पण तें नेहमीं बर्फाच्छादित असतें. या उत्तरध्रुवामधील प्रदेशांत जानमयेन या बेटांत मात्र एक ज्वालामुखी पर्वत आहे.

**ह वा मा न.**—आर्टिक महासागर व उत्तरध्रुवप्रदेश हे नेहमींच बर्फाच्छादित असल्यामुळें समुद्राच्या कांठचें हवामान व जमिनीवरचें हवामान यांत मुळींच फरक आढळून येत नाहीं. या प्रदेशांतील हवामानाची माहिती मिळविण्याकरितां रशिया, कानडा इत्यादि राष्ट्रांनीं स्वतंत्र अशा संस्था या प्रदेशांत काढल्या आहेत व त्या संस्थातर्फे या प्रदेशांतील हवामानाबद्दलचें संशोधन चालू आहे. चतुर्थयुगांतल्यापेक्षां तृतीययुगांत येथील हवा अधिक चांगली होती, असें या हवामानशास्त्रवेत्त्यांनीं ठरविलें आहे. या सर्व प्रदेशांत निरनिराळ्या ठिकाणचें निरनिराळें हवामान पाहून प्रो. मॅान यानें सर्वसाधारण हवामानाचे आंकडे पुढीलप्रमाणें दिले आहेत. संबंध वर्षांतली ६५°, ७०°, ८०°, ९०°, या अक्षांशामधील हवामानाची सरासरी अनुक्रमें २१°७°, १२°९°, १°१°, .९ फारेनहीट आहे. अगदीं उत्तरेकडील भागांत रात्रीपेक्षां दिवसा धुकें अधिक असतें. उन्हाळ्याच्या दिवसांत धुकें अतिशय असतें तर हिवाळ्यांत अजीबात नसतें; मे ते सप्टेंबर या महिन्यांत दर महिन्यांत वीस दिवस बर्फवृष्टि होते. ऑक्टोबर ते एप्रिल महिन्यांत हें प्रमाण महिन्यास साडे अकरा दिवस पडतें.

उत्तरध्रुवांतील भूप्रदेशांत, फार उंचीवर जरी विशेष वनस्पति व पुष्पें आढळून येत नाहींत तरी जसजसें आपण खालीं येऊं लागतों तसतसें आपणाला वनस्पति व पुष्पें दिसूं लागतात. ग्रीनलंड व एलेस्मीयर प्रदेशांत, उन्हाळ्यांत, निरनिराळ्या लता, झाडें, झुडपें दिसतात. या लतांची अगर वृक्षांची उंची फार नसते. गवत देखील पुष्कळ उगवतें, व या गवताच्या येथील एस्किमो जातीचे लोक उशा करतात.

फलपुष्पवनस्पतींच्या मानानें या प्रदेशांत प्राण्यांची वस्ती प्राचीन आहे. समुद्रांत देवमाशांची समृद्धि पुष्कळच आहे. या प्रदेशांत रानडुकर पुष्कळ आढळून येतात. कोल्हे, लांडगे, या जनावरांचेंहि वास्तव्य येथें आहे. निरनिराळ्या रंगाचे असे ससेहि येथें आढळतात. लोंकर उत्पन्न करणारीं जनावरेंहि या ठिकाणीं बरींच आहेत. पशूप्रमाणेंच पक्ष्यांचीहि वस्ती येथें आहे. पण हे पक्षी निरनिराळ्या ऋतूंमध्यें निरनिराळ्या ठिकाणीं सांपडतात. ग्रीनलंडच्या मध्य भागांत मात्र, नेहमीं बर्फाचें साम्राज्य असल्यामुळें पशुपक्ष्यांचें वास्तव्य आढळून येत नाहीं.

उत्तरध्रुवासारख्याच अत्यंत थंड प्रदेशांत वस्ती करून राहणें कल्पनातीत कठिण आहे. तथापि प्रयत्नानें कां होईना पण उत्तर अमेरिकेच्या अगदीं उत्तर भागांत व सैबीरियाच्या उत्तर टोंकाकडे कायमची वस्ती. करून राहतां येईल असें संशोधकानीं प्रतिपादन केलें आहे. नार्वेच्या उत्तरेकडील उत्तरध्रुवप्रदेशांत थंडी थोडी कमी प्रमाणांत पडत असल्यानें या प्रदेशांत, निरनिराळे जातिसंघ कायमची वस्ती करून राहतात व ते दक्षिणेकडील लोकांशीं तारायंत्रें, रेल्वे इत्यादिकांच्या साहाय्यानें दळणवळण चालू ठेवतात. ज्या ठिकाणीं उन्हाळ्यामध्यें बर्फ पडत नाहीं अशा उत्तर-

ध्रुवाकडील कोणत्याहि प्रदेशांत, ज्या ठिकाणीं फलपुष्प समृद्धि असेल तेथें, कायमची वस्ती करणें शक्य आहे असें संशोधकांचें मत आहे. दुर्दैवानें, या उत्तरभूप्रदेशांत खनिज पदार्थांची मात्र अगदीं वाण आहे. लॅप्स नांवाचे नेहमीं भटकणारे लोक हे यूरोपच्या उत्तर टोंकाकडील प्रदेशांतील मूळचे रहिवाशी असावेत असें मानण्याला प्रमाणें आहेत. या उत्तरेकडील प्रदेशाच्या पूर्व टोंकाकडील प्रदेशांत सॅमॉइडिस हे लोक रहात असून हेहि लॅप्स लोकांप्रमाणेंच, आपली उपजीविका काळवीट, मासे इत्यादिकांवर करतात. स्पिट्झबर्जन व फ्रँझ जोसेफ लँड या टापूंत, मूळचे कायमचे रहिवाशी नसावेत असें दिसतें. कानडा व अलास्का या प्रदेशांत उत्तरध्रुवाच्या अगदीं उत्तरटोंकाच्या बाजूपर्यंत, उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांच्या टोळ्या हिंडतात. अमेरिकेच्या किनाऱ्याच्या आश्रयानें रहाणाऱ्या एस्किमो लोकांच्या टोळ्या, यांचें अमेरिकेंतील कोळी लोकांशीं मिश्रण झालें असल्यानें शुद्ध एस्किमो जातीचा मनुष्य मिळणें हल्लीं दुर्लभ झालें आहे. उत्तरध्रुवाकडील द्वीपकल्पांमध्यें एस्किमो लोकांच्या वस्तीच्या ज्या खाणाखुणा सांपडल्या आहेत त्यावरून या प्रदेशांत पूर्वी एस्किमो लोकांना शिकारीला योग्य अशी ही जागा होती असें अनुमान काढतां येतें. ग्रीनलंड प्रदेशांतील एस्किमो लोकांत मात्र फारसा संकर झालेला आढळून येत नाहीं. ग्रीनलंडच्या पश्चिमेकडील एस्किमोंची वस्ती, डॅनिश लोकांच्या वसाहतींत असून ते आतां बरेच सुधारले आहेत. या वसाहतींतील यूरोपियन व एस्किमो या लोकांचें इतकें बेमालुम मिश्रण झालेलें आहे कीं या वसाहतींत अस्सल एस्किमो जातीचा मनुष्य मिळणेंच कठिण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मेलव्हिल उपसागराच्या उत्तरेस राहणारे जे एस्किमो लोक, त्यांनां 'आर्क्टिक प्रदेशांतील डोंगरी लोक' या नांवानें संबोधलें जातें. या डोंगरी लोकांचा, पेरी साहेबाला त्याच्या उत्तरध्रुवाच्या सफरींत अतिशय उपयोग झाला.

प्राचीन शोध.—उत्तरध्रुवासंबंधीची नक्की माहिती प्राचीन लोकांनां नव्हती. या प्रदेशांत कांहीं दिवस अजीबात सूर्य मावळत नाहीं व कांहीं दिवस अजीबात नसतोच अशा प्रकारच्या कांहीं चमत्कारिक गोष्टी प्राचीन (ऋग्वेद वगैरे) कांहीं ग्रंथांतून सांपडतात. तसेंच प्राचीन ग्रीक ज्योतिर्विदांनीं ज्योतिर्विज्ञान शास्त्राच्या आधारें देखील वरील अनुमान काढलेलें होतें. पण सर्वसाधारणपणें लोकांचा असा समज होता कीं उत्तरध्रुवाकडील प्रदेश वस्ती करून राहण्याला लायक असा नाहीं. या उत्तरध्रुवमंडळाच्या जवळ जाऊन आलेला पहिला मनुष्य म्हणजे पिथियास नांवाचा ग्रीक होय. यानें ख्रि. पू. ३२५ व्या वर्षी यूरोपच्या पश्चिम किनाऱ्याच्या बाजूनें सफर केली. त्यानंतर सुमारें हजार वर्षांनीं डिकूइल नांवाच्या एका आयरिश साधूनें लिहिलेल्या एका ग्रंथांत आयरिश साधूंनां फेरोज व आइसलंड हीं बेटें सांपडलीं व त्या बेटांत मार्च महिन्यांत अजीबात रात्रच आढळत नाहीं असा उल्लेख सांपडतो. नवव्या शतकाच्या अखेरीस नॉर्स लोकांनीं या आइसलंडमध्यें वसति केली. यानंतर कांहीं काळ लोटल्यावर एरिक दि रेड या नार्वेजियन गृहस्थानें ग्रीनलंड शोधून काढलें व त्या ठिकाणीं त्यानें वसाहत केली. थोड्याच दिवसांत या ठिकाणीं नॉर्स लोकांनीं दोन वसाहती केल्या. नॉर्स लोकांनीं पश्चिम किनाऱ्याच्या बाजूनें उत्तरेकडील प्रदेश शोधण्यास सुरवात केली. पंधराव्या शतकाच्या सुरवातीपर्यंत ग्रीनलंड व नॉर्वे या प्रदेशामध्यें दळणवळण चालू असल्याचा उल्लेख सांपडतो पण त्यानंतर दोन शतकें पर्यंत या वसाहतींसंबंधाची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. सोळाव्या शतकांत ज्यावेळीं ग्रीनलंडचें पुनःसंशोधन झालें त्यावेळीं या नॉर्स लोकांच्या वसाहतींचा मागमूसहि नव्हता.

नॉर्स लोकांनीं या उत्तरध्रुवाजवळच्या प्रदेशाची माहिती मिळवण्यासाठीं फार खटपट केली. या नॉर्स लोकांनांच जलपर्यटणांतील कौशल्याबद्दलचें श्रेय देणें आवश्यक आहे. या नॉर्स लोकांपासूनच इंग्लंडनें जलपर्यटणाच्या बाबतींत धडा घेतला. जॉन कॅबट नांवाचा इंग्लिश गृहस्थ हा १४९७ सालीं जलपर्यटण करण्यास निघाला व त्यानें अमेरिका खंडाचें पुनःसंशोधन केलें. १५०१-२ मध्यें इंग्रज व पोर्तुगीज लोकांनीं मिळून एक सफर काढली. त्यानंतर रटविलोबी, चॅन्सेलर, बरो, पेट, कार्टेरीअल इत्यादि संशोधकांनींहि चीन व हिंदुस्थानाकडे जाण्याला ईशान्य दिशेकडील रस्ता शोधून काढण्यासाठीं सफरी काढल्या. या सफरींमुळें उत्तरध्रुवाकडील विशेष माहिती जरी उपलब्ध झाली नाहीं तरी, उत्तरध्रुवाकडे सफरी नेण्याविषयींची महत्त्वाकांक्षा निरनिराळ्या राष्ट्रांत उत्पन्न झाली. या प्रदेशाचें संशोधन करण्यासाठीं 'मस्कोव्ही अथवा रशिया कंपनी' नांवाची व्यापारी कंपनी स्थापन झाली व तीनें निरनिराळ्या संशोधकांनां आपल्या खर्चानें सफरीवर धाडण्यास प्रारंभ केला. या कंपनीतर्फे पाठवल्या गेलेल्या स्टीफन बरो नांवाच्या गृहस्थानें नोव्हा झेमला, वैगाच बेट व कॅराची सामुद्रधुनी शोधून काढली.

ईशान्य दिशेनें चीन व हिंदुस्थान या देशाला जाणारा रस्ता शोधून काढण्याचे प्रयत्न सुरू झाले व त्यांत बरेंचसें यश आलें, हें आढळतांच वायव्यदिशेनेंहि या देशांत जाण्याचे मार्ग शोधून काढण्याचें इंग्लंडनें मनावर घेतलें. या सफरीला सुरवात सर फ्रोबिशर यानें केली. यानें उत्तरध्रुवाच्या पश्चिमेकडील प्रदेशाचें थोडें फार संशोधन केलें. पुढें सन १५६५ मध्यें डच लोकांनीं कोल येथें वसाहत केली. वसाहत स्थापण्याच्या कामीं ऑलीव्हियर ब्रनेल यानें पुढाकार घेतला हा गृहस्थ फार धाडसी असून यानें, सैबेरियाच्या किनाऱ्याच्या बाजूनें बराच प्रवास केला होता. तसेंच नोव्हा झेमलाच्या बाजूलाहि त्यानें एक सफर केली

होती. यानें १५८२ मध्यें, चीन व हिंदुस्थानला जाण्याचा ईशान्येकडील मार्ग शोधून काढण्यासाठीं एक सफर काढली पण ती यशस्वी झाली नाहीं. तथापि या प्रयत्नानें डच लोकांनां हा मार्ग शोधून काढण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली. १५९४ मध्यें बेरेंट्सच्या शासनाखालीं, दोन जहाजें सफरी करतां निघालीं. बेरेंट्सनें ग्रेट आइस केप पर्यंतचा सर्व किनारा शोधून काढला. याच वर्षी बेच्या नेतृत्वाखालीं जीं दोन जहाजें सफरीकरतां निघालीं होतीं त्यांनीं युगोरची समुद्रधुनी व यलमलचा पश्चिम किनारा शोधून काढला. पण युगोरच्या समुद्रधुनींतून कॅराच्या समुद्रांत जाण्याचें अशक्य झाल्यानें उत्तरेकडे थोडासा वळसा घेऊन काराच्या सामुद्रधुनींत प्रवेश करण्याचा निश्चय १५९६ मध्यें हीमस्कर्क व रिज्य या संशोधकांनीं ठरविला. उत्तरेकडे प्रवास करीत असतां त्यांनां बर्फाच्छादित असा प्रदेश आढळून आला. या प्रदेशाला त्यांनीं स्पिट्सबर्गन हें नांव दिलें, यानंतर नोव्हा झेमलाच्या उत्तर भागाला वळसा घालीत घालीत ते " आइस हॅवेत ' या ठिकाणीं आले. अशा रीतीनें १६ व्या शतकांतील उत्तरध्रुवसंशोधनाच्या इतिहासांत, बेरेंट्सच्या सफरींना प्रमुख स्थान मिळालें आहे.

मस्कोव्ही कंपनीच्या आश्रयाखालीं इंग्लिश लोकांनीं हा प्रदेश धुंडाळण्यास सुरुवात केली होतीच. सन १६०७ मध्यें हडसन नांवाच्या एका संशोधकानें एक सफर काढून ग्रीनलंडचें उत्तरेकडील टोंक शोधून काढलें. आपल्या दुसऱ्या सफरींत त्यानें स्पिट्सबर्गन व नोव्हा झेमला या टापूंतलि प्रदेशांचें संशोधन केलें. तिसऱ्या सफरींत त्यानें उत्तर अमेरिकन किनाऱ्याचें संशोधन करून, हडसनची सामुद्रधुनी शोधून काढली.

सोळावें व सतरावें हीं शोधांचीं व धाडसाचीं शतकें होऊन गेलीं. हडसनची सामुद्रधुनी, हडसनचा उपसागर, डेव्हीसची सामुद्रधुनी, बॅफीन बे, व ग्रीनलंडपासून स्पिट्सबर्गनमधील बर्फाचा समुद्र इत्यादि प्रदेशांचें या काळांत संशोधन झालें. पुढील शतकांत या सर्व ठिकाणीं वसाहती स्थापन झाल्या.

सन १७४६ मध्यें कॅप्टन मूरनें 'वॅगर इनलेट' नांवाचें बेट शोधून काढलें व हडसन बे कंपनीनें आपले संशोधक पाठवून अमेरिकन उत्तरध्रुवमहासागराचा किनारा शोधण्यासाठीं प्रयत्न केले. १७६९ ते १७७२ च्या अवधींत हर्न नांवाच्या धाडसी संशोधकानें कॉपरमाईन नदींतून उत्तरध्रुवसागरांत आपलें जहाज नेलें व १७८९ त मॅकेंझी यानें मॅकेंझी नदीचें उगमस्थान शोधून काढलें.

सैबीरिया प्रांत रशियानें काबीज केल्यानंतर त्या प्रदेशाच्या सर्व उत्तर भागाचें संशोधन होण्यास सुरवात झाली व रशियन संशोधकांनीं ओबी, येनीसी, लेना इत्यादि नद्यांचें उगमस्थान शोधून काढलें. १७७१ मध्यें लियाकॉफ नांवाच्या एका रशियन व्यापाऱ्यानें न्यू सैबीरिया बेटें शोधून काढलीं व त्या ठिकाणीं कांहीं अवशेष सांपडतात किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं तीं बेटें खणण्याची परवानगी त्यानें मिळविली.

१७७३ पासून तों १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत जें कांहीं उत्तरध्रुवसंशोधन झालें तें शास्त्रीयदृष्ट्या माहिती मिळविण्याच्या उद्देशानें मुख्यतः झालें. १७७३ मध्यें व त्यानंतर १७७८ मध्यें डेन्स बॅरिंग्टन आणि रॉयल सोसायटी यांच्या प्रोत्साहनानें, उत्तरध्रुवप्रदेशाकडे जहाजें रवाना झालीं पण त्यांत विशेष यश आलें नाहीं. पुढें 'फ्रेंच राज्यक्रांतीच्या' धामधुमींत जवळजवळ १८१५ पर्यंत संशोधनाचें कार्य बंद पडलें. पण १८१५ नंतर सर जॉर्ज बॅरो याच्या आत्यंतिक परिश्रमामुळें उत्तरध्रुवाकडील प्रदेशाचें संशोधन करण्यासंबंधीचा कायदा ब्रिटिश पॉर्लमेंटमध्यें पास झाला. त्याप्रमाणें स्पिट्झबर्गनच्या मार्गानें व बॅफीन बेच्या मार्गानें अशीं दोन जहाजें पाठविण्यांत आलीं. सन १८१९ मध्यें पॅरीच्या आधिपत्याखालीं नवीन संशोधनाची मोहीम निघाली. त्यानें आपलीं जहाजें लँकेस्टर साउंड मधून बॅरोच्या सामुद्रधुनींतून पश्चिम दिशेला नेलीं. तेथून त्यानें उत्तरेकडे ३०० मैल मेलव्हिली बेटापर्यंत प्रवास केला. पण पुढें त्याला बर्फाच्या नदीमधून जातां येईना. या सफरीचा बराच फायदा झाला. सन १८५० सालीं पुन्हां पॅरीनें आपल्या सफरीला सुरवात केली. मेलव्हिली बेटाच्या पुढें बरेच मैल प्रवास केल्यानंतर हडसन सामुद्रधुनीच्या मुखांतून पश्चिमेकडे एक खाडी जात असलेली त्याला आढळली. त्या खाडीला त्यानें 'फ्यूरीची खाडी' असें नांव दिलें. पॅरीचा स्नेही फ्रँकलिन यानें याच सुमारास कॉपरमाईन नदीच्या मुखापर्यंत जाऊन तेथून ५५० मैल पर्यंतचा किनारा धुंडाळून टाकला. आपल्या प्रवासाच्या शेवटच्या स्थानाला त्यानें 'कॅपटन बीन' हें नांव दिलें.

१८२१-२४ च्या अवधींत, रशियन कॅप्टन लुटके यानें, नोव्हा झेमलाच्या पश्चिम किनाऱ्याची पहाणी केली व नजीकच्या समुद्रांतील बर्फाचें संशोधन केलें. १८२३ मध्यें क्लेव्हरिंगनें, ग्रीनलंडच्या पूर्वकिनाऱ्याची पहाणी केली. सन १८२९ मध्यें, कॅप्टन ग्रह नांवाच्या डॅनिश संशोधकानें, केप फेअरवेलला वळसा घातला. अमेरिकेच्या बाजूच्या उत्तर ध्रुवप्रदेशाचें संशोधन, हडसन बे कंपनीच्या संशोधकांनीं केलें. पॅरी, फ्रँकलिन, रॉस इत्यादि संशोधकांनीं जे तुटक तुटक शोध केले होते ते सर्व शोध पूर्ण करण्याचें काम या कंपनीच्या संशोधकांनीं केलें. न्यू सैबीरियांतहि रशियन लोकांनीं बारकाईनें संशोधन चालविलेंच होतें. या कामांत अंजू, रॅंगेल, मिडेनडॉर्फ यांनीं फार मेहनत घेतली. १८४६ मध्यें फ्रँकलिननें जी मोहीम अंगावर घेतली ती यशस्वी झाली नाहींच पण त्या मोहीमेंत फ्रँकलिनचें काय झालें हें दोन वर्षें कळलेंच नाहीं. तेव्हां त्याच्या शोधार्थ रॉस, ऑस्टीन, केनेडी, बेलॉट, कॉलिन्सन इत्यादि संशोधकांनीं

खूप प्रयत्न केले पण त्याचा कांहीं पत्ता लागला नाहीं. पण या फ्रँकलिनच्या शोधार्थ निघालेल्या संशोधकांनीं इतर पुष्कळ शास्त्रीय शोध लावले.

फ्रँकलिन व त्याचे साथीदार यांचा शोध करण्यासाठीं म्हणून, अमेरिकेनें या उत्तरध्रुवसंशोधनाच्या बाबतीकडे लक्ष देण्यास सुरवात केली. त्यांच्या शोधार्थ जी सफर निघाली त्यांत डॉ. केन नांवाचा एक शास्त्रज्ञ होता. त्यानें, स्मिथसाउंड ते बॅफीन बे यांमधील प्रदेशांचें संशोधन केलें. नार्वेमधील संशोधकांनीं स्पिट्झबर्गनच्या भोंवतालच्या समुद्राचें पूर्ण संशोधन करण्यास सुरवात केली. या बाबतींत किलहौचे प्रयत्न महत्वाचे होते. पुढें या नोर्वेजियन संशोधकांचें अनुकरण, स्वीडनमधील लोकांनीं केलें. त्यांनीं या स्पिट्झ-बर्गनच्या किनाऱ्यावरील निरनिराळ्या ८० स्थलांची पहाणी केली. व बर्फाच्या पर्वतांची उंची निश्चित केली. पण उत्तर ध्रुवसंशोधनाच्या बाबतींत अतिशय महत्वाचा प्रश्न म्हणजे ग्रीनलंडचा अंतःप्रदेश होय. हा अंतःप्रदेश पूर्णपणें बर्फमय असल्यामुळें, त्याचें संशोधन करणें अतिशय कठिण झालेलें आहे. या प्रदेशाचा शोध लावण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले. शेवटीं नॉर्डेन स्कियोल्ड यानें, समुद्रापासून २२०० फूट उंची-पर्यंत या अंतःप्रदेशांत प्रवास केला.

१८७५ मध्यें ब्रिटिश संशोधकांची सफर निघाली व कॅप्टन मार्कहॅम वगैरे संशोधकांनी, उत्तरध्रुवप्रदेशाच्या ३०० मैलांच्या टापूचें निरनिराळ्या तऱ्हेनें निरीक्षण केलें. १८७९ मध्यें मार्कहॅम, व गोरेबुथ यांनीं, बेरेंट्स व कॅारा समुद्रांतील बर्फाच्या प्रवाहाचें व थरांचें शास्त्रीय तऱ्हेनें निरीक्षण केलें. १८७५ मध्यें प्रो. अमंडहेलंड या नार्वेजियन भूस्तरशास्त्र-वेत्यानें ग्रीनलंडची सफर करून ग्रीनलंडमधील बर्फाचा प्रवाह फारच जलद असतो असें सिद्ध केलें. ग्रीनलंडच्या अंतःप्रदेशाचें संशोधन करण्याचा प्रयत्न जेन्सेन, लेफ्ट-नंट हेमर, होल्मगर्डे, नान्सेन इत्यादिकांनीं केला व त्यांनीं ग्रीनलंडसंबंधीं पुष्कळच शास्त्रीय माहिती जमा केली.

सन १८७५ सालीं फ्रँझ जोसेफ लँडचा संशोधक लेफ्ट-नंट वायप्रेक्ट यानें, जर्मन सृष्टिशास्त्रवेत्त्यांच्या सभेंत एक निबंध वाचला. त्यांत त्यानें उत्तरध्रुवप्रदेशाच्या संशोधना-पासून कोणते फायदे होतील व ते कसे साध्य करून घेतां येतील, या संबंधींचें आपलें मत पुढें मांडलें. उत्तरध्रुव व दक्षिणध्रुव मंडळाच्या सभोंवतीं स्टेशनें उभारून त्या-ठिकाणांहून, ज्योतिर्निरीक्षण अगर इतर भौगोलिक निरीक्षण करण्यांत यावें अशा तऱ्हेची त्यानें सूचना केली. या त्याच्या सूचनेला अनुसरून सन १८७९ व ८० मध्यें हॅंबर्ग येथें सार्वराष्ट्रीय ध्रुवसंशोधकांच्या परिषदा भरून त्यांत प्रत्येक राष्ट्रानें, एक अगर अधिक स्टेशनें बांधून, तेथून ज्योतिर्नि-रीक्षण वगैरे १८८२ च्या आगस्टपासून करण्यास सुरवात करावी असें ठरलें. त्याप्रमाणें निरनिराळ्या राष्ट्रांनीं आपलीं स्टेशनें बांधलीं व ठरल्याप्रमाणें निरीक्षणास सुरवात झाली; व ठरलेलें निरीक्षणाचें कार्य सुखरूप तऱ्हेनें पारहि पडलें.

सन १८८३–८५ त होल्मच्या आधिपत्याखालीं निघा-लेल्या डेन लोकांच्या सफरींत, ग्रीनलंडच्या पूर्वकिनाऱ्याची पहाणी करण्यांत आली. १८९२–९३ मध्यें बर्लिन जीऑ-ग्राफिकल सोसायटीनें ग्रीनलंडच्या पश्चिम किनाऱ्यावरील बर्फाच्या थरांचा अभ्यास केला. ग्रीनलंडच्या अंतःप्रदेशाचें संशोधन करण्याचें काम पॅरी व नान्सेन यांनीं केलें. या अंतःप्रदेशांतील बर्फाच्छादित भागाची सर्वांत अतिशय उंची ५७०० फूट होती. तीवर पॅरी हा अत्यंत हालांत व उपसमारींत आपल्या दोन चार सोबत्यांच्या मदतीनें चढून गेला. तो चढून गेल्यावर त्याला चांगली जमीन लागली व समोर एक मोठा उपसागर दिसला. याला त्यानें 'इंडिपें-डन्स बे' हें नांव दिलें. परत येतांना तर त्याचे न भूतो न भविष्यति हाल झाले. या सफरीचा मात्र अतोनात फायदा झाला.

डॉ. नान्सेन यानें आर्क्टिक महासागराच्या आसपासच्या प्रदेशांतील हवेचें पूर्ण निरीक्षण करून नंतर त्यानें आपल्या सफरीला सुरवात केली. ज्या जहाजांतून त्यानें जावयाचें ठरविलें तें जहाज अत्यंत बळकट असून, त्या प्रदेशाला उपयोगी पडेल अशा तऱ्हेनें तें बांधण्यात आलें होतें. नान्सेन बरोबर दहाबारा मंडळी होती. जहाजाचें नांव फ्राम होतें. या जहाजांतून कॅारा समुद्रांतून प्रवेश करून, आशि-याच्या उत्तर दिशेला तो आला व तेथून त्यानें बर्फाच्या समुद्रांतून तें जहाज हांकारलें. इतका धाडसाचा व उंचीचा प्रवास अद्याप कोणी केलेला नव्हता. आशियाच्या किनाऱ्या-वर जें बर्फ जमतें तें तीन अगर पांच वर्षांनीं या उत्तरध्रुव प्रदेशाला येऊन मिळतें असें नान्सेन याच्या सफरीवरून पूर्णपणें सिद्ध झालें. या सफरींत असतांना, नान्सेन यानें अनेक ठिकाणांचें संशोधन केलें. ही सफर तीनचार वर्षांनीं शेवटास गेली. शास्त्रीयदृष्ट्या या सफरीचा अतिशयच फायदा झाला.

१८९७ मध्यें मार्टिन कॉन बे यानें स्पिट्झबर्गनच्या प्रदेशाचें संशोधन केलें. त्यानंतर मोनॅकोच्या राजपुत्रानेंहि पुष्कळ शास्त्रीय शोध लावले. पण सर्वांत अधिक उंचीचा पल्ला गांठण्याचें काम अॅब्रझीचा ड्यूक लुशी यानें केलें. यानें आपल्याबरोबर येणाऱ्यांच्या दोन टोळ्या केल्या. दुसऱ्या टोळीनें पायीं प्रवास करून ४५ दिवसांत ८६ अक्षांशांइतकी उंची गांठली. त्यावेळेपर्यंत इतकी उंची कोणीच गांठली नव्हती. येतांना या टोळीला अत्यंत त्रास झाला. तरी पण ६० दिवसानंतर ती टोळी सुखरूप परत आली.

सन १८९७ मध्यें, अॅंड्री नांवाच्या एका वैमानिकानें स्पिट्झबर्गनच्या उत्तरेला विमानाच्या द्वारें सफर करण्याचें ठरविलें. दोन वर्षांची शिधासामुग्री घेऊन तो प्रवास करून

त्यानें ८२ अक्षांशापर्यंतच उंचीवर आपलें विमान नेलें, पण पुढें त्या विमानाचा व अँड्रीचा पत्ताच लागला नाहीं.

सैबीरियाच्या भोंवतालच्या प्रदेशाचा नकाशा तयार करण्याच्या कामीं डॉ. बंगे व बॅरन टॉल या शास्त्रज्ञांनीं १८८६ सालीं प्रयत्न केला. १८९३ मध्यें बॅरन टॉलनें सस्तन प्राण्यांचे अवशेष शोधून काढले. न्यू सैबीरियाचा अगदीं उत्तरेकडील प्रदेश शोधून करण्याचा टॉलनें प्रयत्न केला पण त्यांत त्यालाच प्राणास मुकावें लागलें.

१९०१ मध्यें रोल्ड अमंडसेन नांवाच्या नार्वेजियन संशोधकानें उत्तरध्रुवापाशीं जाण्याचा प्रयत्न केला. अँड्रप नांवाच्या शास्त्रज्ञानें ग्रीनलंडच्या पूर्व किनाऱ्याची भौगोलिक माहिती मिळविण्यासाठीं १८९९–१९०० च्या दरम्यान पुष्कळ सफरी केल्या. याशिवाय मिलियस एरिचसेन यानेंहि निरनिराळ्या भागांचें संपूर्णपणें निरीक्षण केलें.

पण या सर्वांत अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे पॅरीचा उत्तरध्रुवाचा शोध ही होय. या महान धाडशी संशोधकानें या शोधानें आपलें नांव अजरामर करून ठेवलें आहे. त्यानें १८९८–९९ मध्यें ग्रीनलंडच्या उत्तरेकडील सर्वांत शेवटचें टोंक गांठलें. १९०२–०३ मध्यें त्यानें केप हेक्ला येथें पायीं प्रवास केला. तेथून त्यानें एस्किमो लोकांच्या साहाय्यानें उत्तरध्रुवाची मजल गांठण्याचा प्रयत्न केला पण ८७°. ६ इतक्या अक्षांशांत आल्यानंतर त्याला उत्तरध्रुवाकडे पुढें जाणें अशक्य झालें. त्यामुळें त्याला तो बेत रहित करावा लागला पण १९०७ सालीं त्यानें पुन्हां शेवटचा प्रयत्न करावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें तो १७ एस्किमो; ७ संशोधक व १३३ कुत्रीं बरोबर घेऊन पायीं प्रवास करण्यास निघाला. अनेक अवर्णनीय हाल सोसून तो शेवटीं ८९° ५७′ इतक्या अक्षांशांच्या उंचीवर येऊन पोहोंचला. तेंच उत्तरध्रुवाचें ठिकाण अशी त्यानें पूर्णपणें आपली खात्री करून घेतल्यावर त्यानें त्या ठिकाणीं अमेरिकेचें निशाण फडकविलें. अशा रीतीनें उत्तरध्रुव संशोधनाचें कार्य इतक्या वर्षांनंतर व अनेक अवर्णनीय साहसांनंतर सिद्धीस गेल्यासारखें झालें.

**अर्वाचीन शोध.**—सन १९०९ सालीं पॅरीनें उत्तर ध्रुवाचा शोध लावल्यानंतर त्या प्रदेशाचें शास्त्रीयदृष्ट्या संशोधन करण्याचे प्रयत्न सुरू झाले. डेन्स लोकांनीं ग्रीनलंडच्या प्रदेशाचें सूक्ष्म दृष्टीनें संशोधन सुरू केलें आहे व त्यामुळें भौगोलिक माहितीवर एस्किमो मानवजातीच्या उत्पत्तीसंबंधाच्या ज्ञानावर अधिकच प्रकाश पडला आहे. या प्रदेशाचें संशोधन करण्यासाठीं पुष्कळ पैसा व श्रम खर्ची पडले सन १९१० मध्यें रसमुसेन यानें नॉर्थ स्टार बे मध्यें थ्यूल हें ठिकाण पुढील संशोधन करण्यासाठीं मुक्रर केलें. सन १९१२ मध्यें रसमुसेन हा आपल्या दोघातिघा इसमासह ग्रीनलंडच्या प्रदेशांत जावयास निघाला. ३—४ महिने त्या प्रदेशांत हिंडून त्यानें पेरी चॅनल हें अस्तित्वांतच नाहीं असें सिद्ध केलें. हीच गोष्ट, याच्याहि पूर्वी निघालेल्या मिक्केसन व इन्द्वरसन यांच्या सफरीनेंहि सिद्ध झाली. १९१३ सालीं, डे कॉच व डॉ. वेगेनर यांनीं ग्रीनलंडच्या मध्यभागाची सफर केली. पण याहिपेक्षां महत्त्वाची सफर, रसमुसेन यानें ग्रीनलंडचा वायव्य किनारा शोधण्यासाठीं काढली. त्याच्याबरोबर कॉच, डॉ. वुल्फ, आल्सेन, वगैरे मंडळी होती. बर्फमय प्रदेशांतून ७०० मैल प्रवास केल्यानंतर सेंट जार्ज फ्जोर्ड या ठिकाणीं त्यांनीं संशोधन करण्यास सुरुवात केली. या ठिकाणीं एस्किमो लोक येऊं शकले असतील किंवा नाहीं यासंबंधीं रसमुसेन याला शंका वाटूं लागली. १९२०मध्यें कॉचच्या नेतृत्वाखालीं जी तिसरी स्वारी निघाली, त्या स्वारींत पॅरी लॅंड शोधून, ग्रीनलंडच्या वायव्य किनाऱ्याची अधिक माहिती मिळण्याच्या कामीं उपयोग झाला.

१९०६ मध्यें पॅरीनें ग्रँट लॅंडच्या पश्चिमेस, क्रोकर लॅंड नांवाचा प्रदेश आहे असें प्रसिद्ध केलें होतें त्यासंबंधींचा अधिक तपास लावण्याकरितां अमेरिकन जीऑग्राफिकल सोसायटीनें व इतर अमेरिकन संस्थानांनीं एक संशोधकांचें मंडळ १९१३ मध्यें रवाना केलें. या संशोधकांचा पुढारी डॉ. मॅकमिलन हा होता. या संशोधकांनीं एलेसमीरचा प्रदेश बारकाईनें तपासला, व त्याचा नकाशा तयार केला. ब्यूफर्ट समुद्राच्या भोवतालच्या प्रदेशांत देखील संशोधनाचा प्रयत्न करण्यांत आला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

१९०६—७ च्या उत्तरध्रुवावरील सफरींत स्टीफन्सन नांवाचा एक संशोधक सामील झाला होता. त्यानें मॅकेंझी टापूमधील एस्किमो जातच्या लोकांविषयींची बारीक सारीक माहिती करून घेतली; त्यांची भाषा त्यानें अवगत करून घेतली. त्याचा त्याला पुढील १९०८–१२ च्या सफरींत फार फायदा झाला. व्हिक्टोरिया बेटाच्या आसपासेंच संशोधन करीत असतां याला एक एस्किमो जातीचा मनुष्य भेटला. या एस्किमोनें गोरा माणुस आजीबाद पहिलाच नव्हता असें स्टीफन्सन यास आढळून आलें. १९१३ मध्यें तो पुन्हां कनडियन सरकारच्या आश्रयाखालीं, ब्यूफर्ड समुद्राचें संशोधन करण्यास निघाला. त्याच्या बरोबर इतर विद्वान शास्त्रज्ञ होते. तो कार्लक नांवाच्या जहाजांत बसून निघाला. कांहीं काळ प्रवास करून ते एका ठिकाणीं येऊन पोहोचले, त्या ठिकाणीं स्टीफन्सन व त्याचे साथीदार शिकार शोधत असतां, समुद्रांत तुफान होऊन तें जहाज भलतीकडेच जाऊन फुटून बुडलें. जहाजावरील इतर माणसांना सुरक्षितपणें कांठावर आणण्यांत आलें. पुढें स्टीफन्सननें पुष्कळ धाडसाचे प्रवास करून, समुद्रकांठचीं व समुद्रांतील निरनिराळीं बेटें त्यानें शोधून काढलीं. तसेंच, व्हिक्टोरिया व बँक्स वगैरे बेटांची त्यानें बारकाईनें पहाणी केली. स्टीफन्सन

याच्या या पहाणीमुळें व सफरीमुळें, मानव जातिशास्त्रांत व भूस्तरशास्त्रांच्या बाबतीत पुष्कळच नवीन शोध लागले.

रशियन संशोधकांनीं, उत्तरध्रुवाचा शोध लावण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केले पण त्यानां यश आलें नाहीं. पण आशियाच्या उत्तरेकडील प्रदेशाचें संशोधन करण्याच्या त्यांच्या प्रयत्नाला बरेंच यश आलें. पण त्या संशोधनाची समग्र माहिती नष्ट झाल्यामुळें त्यांच्या संशोधनाची हकीकत वाचावयास उपलब्ध नाहीं.

जून १९१८ मध्यें उत्तरध्रुवाच्या पायथ्याची माहिती मिळविण्याकरितां नॉर्वेहून संशोधकांचें एक मंडळ निघालें, या मंडळाचा मुख्य रोल्ड ॲमंडसन हा होता. यानें आर्क्टिक समुद्रांतून ईशान्येकडील मार्गानें प्रवास केला व तिकडील प्रदेशाची माहिती मिळविली.

गेल्या दहा वर्षांमध्यें या संशोधित उत्तर ध्रुवाजवळील प्रदेशावर कोणत्या ना कोणत्या तरी राष्ट्राचा ताबा सुरू झाला आहे. १९१७ च्या तहान्वयें युनायटेड स्टेट्सकडे ज्यावेळीं डॅनिश वेस्ट इंडिज बेटांची मालकी आली त्यावेळीं युनायटेड स्टेट्सनें डेन्मार्कचा ग्रीनलंड प्रदेशावरील पूर्ण स्वामित्वाचा हक्क मान्य केला होता. महायुद्ध सुरू झाल्यानंतर, आशियाच्या उत्तरेकडील उत्तरध्रुवाच्या प्रदेशांतील बेटांवर आपला हक्क आहे असें रशियानें जाहीर केलें व आगस्ट १९१४ त फ्रँझ जोसेफ येथें रशियन निशाणहि फडकूं लागलें. १९१९ मध्यें स्पिट्झबर्गन व बेअर बेटांची मालकी सुप्रीम कौन्सिलनें नॉर्वेकडे दिली. अमेरिकेनें शोधून काढलेला आर्क्टिक सागराचा ताबा मात्र कानडानें आपल्याकडे आहे असें जाहीर केलें.

उत्तरध्रुवप्रदेशावर अलीकडे तीन सफरी केल्या गेल्या, त्या अमुंडसेनची, रॅसमुसेनची व स्टीफॅन्सनची या होत.

अ मुं ड से न ची स फ र.—१९२३ मध्यें अमुंडसेननें विमानानें उत्तर ध्रुव ओलांडून जाण्याचा बेत केला. प्रयोगात्मक प्रयत्न १९२३ च्या उन्हाळ्यांत करण्यांत आले.१९२४ च्या उन्हाळ्यांत स्पिटझबर्गनपासून आलास्काला पोहोंचण्याकरितां उत्तरध्रुव ओलांडून विमानांतून जाण्याचा बेत अमुंडसेननें ठरविला आहे.

रॅ स मु से न ची स फ र.—१९२१-२३ या काळांत क्नूड रॅसमुसेन या डॅनिश संशोधकानें उत्तर व ध्रुवप्रदेशाकडील मानववंशशास्त्रीय, पुराणसंशोधनशास्त्रीय, व हवामान शास्त्रीय अशी बरीचशी माहिती मिळविली. १९२१ पर्यंत किनाऱ्यानजीक राहणाऱ्या एस्किमोबद्दलच फक्त माहिती मिळालेली होती. सदरहू सालीं रॅसमुसेननें अन्तःप्रदेशांत राहणाऱ्या एस्किमोंच्या दोन जाती असल्याचा शोध लागला. १९२२ मध्यें सुमारें एस्किमोंच्या दोनशें दंतकथा लिहून काढण्यांत आल्या, आणि रिपल्स बे व वेजर बे या उपसागराच्या किनाऱ्यांवरील हवामानाविषयींहि त्यानें बऱ्याच गोष्टी नमूद केल्या. एस्किमो लोकांमध्यें दोन निरनिराळ्या प्रकारचे आचारविचार ( संस्कृति ) आहेत. या म्हणण्याला पुष्टिकारक पुरावा मिळाला आहे. एका जातीच्या संस्कृतीचें व्हेल माशांच्या हाडांचीं व दगडांचीं जुनीं कायम व टिकाऊ घरें, हें निदर्शक आहे; व दुसऱ्या जातीची संस्कृति ऐविलिक व इडलुलिक एस्किमोमध्यें दिसून येते. या सफरीनें अन्तर्भागांतील एस्किमोंच्या जुन्यापुराण्या वस्तूंची लांबीरुंदीची मापें दिली आहेत. ज्या प्रदेशांत प्रवास केला त्याचे नकाशे तयार केले आहेत.

स्टी फे न स न ची स फ र:—१९२१ च्या सप्टेंबर महिन्यांत स्टीफेनसन नांवाच्या कानडांतील संशोधकानें रॅंगल नांवाच्या लहान बेटावर ब्रिटिश निशाण रोवलें. हें बेट उत्तरमहासागरांत सैबीरीयाच्या उत्तरेस आहे, व त्यावर जपाननें किंवा सोव्हिएट सरकारनें हक्क सांगू नये म्हणून ब्रिटिश निशाण रोंवण्याची सावधगिरी करण्यांत आली. शिवाय स्टीफेनसननें सहा इसमांची टोळी एक वर्षाची अन्नसामुग्री देऊन तेथें ब्रिटिशांचे हितसंबंध संरक्षण करण्याकरितां ठेविली.१९२२मध्यें त्यांनां मदत पोंहोंचविण्याकरितां एक जहाज पाठविण्यांत आलें, पण त्याला जाण्यास उशीर लागला, त्यामुळें बेटांत ठेवलेल्यां एका एस्किमो स्त्री खेरीज करून सर्व इसम मरण पावल्याचें १९२३ सालीं मदतीप्रीत्यर्थ गेलेल्या सफरवाल्यांस आढळून आलें. दहावीस वर्षांत उत्तरध्रुव समुद्र ओलांडून जाण्याचे पुष्कळ वैमानिक मार्ग सुरू होतील, हें सिद्ध करण्याकरितां १९२३ सालीं स्टीफेनसननें प्रयत्न करण्याचें ठरविलें. त्यानें असें प्रतिपादिलें कीं, सदर्हू प्रदेशांतील प्रकाशविषयक स्थिति अगदीं उत्तम आहे, हवामानविषयक परिस्थिति अनुकूल करून करून घेण्यासारखी आहे, आणि तेल, कोळसा व इतर सामुग्री या प्रदेशांत आहे.

या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला आहे कीं, युनाय. स्टेटस आरमारानें १९२४ सालीं आगबोटीनें व विमानानें उत्तरध्रुवाची सफर करण्याची नक्की योजना केली आहे. सर्वांत अधिक उत्तरेकडील लोहचुंबकीय वेधशाळा ( मॅग्नेटिक आब्झर्वेटरी ) रेफ्यूज बे, उत्तर ग्रीनलंड येथें वाशिंगटनची कार्नेजी इंस्टिट्यूशन व मॅकमिलन आर्टिक एक्स्पिडिशन यांनीं १९२३ मध्यें स्थापिली आहे. हें ठिकाण भौगोलिक उत्तरध्रुवाच्या दक्षिणेस ७०० मैल अंतरावर आहे; आणि लोहचुंबकीय उत्तरध्रुवाच्या ५५० मैल उत्तरईशान्येस( नार्थ-नार्थ-ईस्ट ) आहे.

[संदर्भग्रंथ:—ग्रीलि—हँडबुक ऑफ पोलर डिस्कव्हरी(लंडन ॲंड न्यूयॉर्क १९१० ); जे चव्हॅन—दि लिटरेचर ऑफ दि पोलर रीजन्स ( व्हिएन्ना १८७८ ); स्कोअर्स बी—ॲन अकाउंट ऑफ दि आर्क्टिक रीजन्स ( २ भाग एडिंबरो १८२०); पॅरी—अटेम्प्ट टु रीच दि नॉर्थ पोल (लंडन १८२८); ऑसबोर्न—दि डिस्कव्हरी ऑफ दि नार्थ वेस्ट पॅसेज ( लंडन

१८५७ ); नेर्स–व्हायेज टु दि पोलर सी ( १८७५–७६ २ भाग लंडन १८७८ ); ए. एच. मार्कहॅम–दि ग्रेट फ्रोझन सी; रिचर्डसन–दि पोलर रीजन्स ( एडिंबरो १८६१ ); मार्कहॅम–दि थ्रेशहोल्ड ऑफ दि अननोन रीजन ( लंडन १८७३ ); पॅरी–न्यूलँड्स् वुइदिन दि आर्क्टिक सर्कल ( २ भाग लंडन १८७६ ); नानसेन–दि फार्देस्ट नॉर्थ (२भाग लंडन १८५७); दि नार्वेजियन नॉर्थ पोलर एक्स्पिडिशन (१८९३-१८९६); नानसेन–इन नॉर्दर्न मिस्ट्स ( १९११ ); हल्थ-स्वीडिश आर्क्टिक अँड अन्टार्क्टिक एक्स्प्लोरेशनस( १७५८–१९१० ), अँड्रप–रिपोर्ट ऑन दि डेन्मार्क एक्स्पिडिशन्स (१९०६–८); मीकलसन-रिपोर्ट ऑन दि अलबामा एक्स्पिडि०(१९०९-१२) स्टीन्सबी-अँथ्रॉपॉलाजिकल स्टडी ऑफ दि ग्रीनलंड एस्किमो; दि अॅक्टिव्हिटीज ऑफ दि कॅनेडियन आर्क्टिक एक्स्पिडिशन; ( १९१६–१८ ); स्टीफनसन–माय लाइफ वुइथ एस्किमो ( १९१३ ); वार्लेलेट अँड हेल–दि लास्ट व्हायेज ऑफ दि कार्लक ( १९१६ ); नान्सेन–स्पिट्झबर्गन वाटर्स. ]

**उत्तरपाडा**—बंगालमधील हुगळी जिल्हा. श्रीरामपूर पोटविभागमधील एक शहर. हुगळी नदीच्या कांठीं आहे. येथील लो. सं. ( १९११ ) ७३७३ होती. जयकृष्ण मुकरजी नांवाचा जमीनदार या ठिकाणीं राहत असून येथें एक पुस्तकालय आहे तें फार प्रसिद्ध असून त्याची इमारत फार प्रेक्षणीय आहे. १८६५ सालीं म्यु. कमिटीची स्थापना होऊन १९०३–०४ सालीं उत्पन्न १७हजार व खर्च १७५०० रुपये झाला.

**उत्तर मेरूर**—मद्रास. चिंगलपट जिल्ह्यांतील मदुरांतकम तालुक्यांतील एक गांव. लो. सं. १९११ सालीं १२६७२ होती. पुष्कळशीं खेडीं मिळून उत्तरमेरूर हें गांव बनलेलें आहे. पुरातन काळीं फार महत्त्वाचें शहर होतें. अशाबद्दल दंतकथा आहेत. नायब तहसीलदाराचें येथें मुख्य ठाणें असून, आठवडा बाजार चांगला भरतो.

**उत्तर सरकार**—मद्रास इलाख्याच्या उत्तरेकडील गंजम,विजगापट्टण, गोदावरी, कृष्णा व गंतूर या५ जिल्ह्यांपैकीं प्रत्येकाचें नांव असून तें मुसुलमानी अमदानीपासून चालत आलें आहे.

१७५० त मुजफरजंग हा फ्रेंचांच्या मदतीनें दक्षिणेचा सुभेदार झाल्यावर त्यानें मच्छलीपट्टण व सभोंवारचा प्रदेश त्यांच्या स्वाधीन केला. यानंतर सलाबतजंग गादीवर आल्यावर त्यानें मच्छलीपट्टण व १७५३ त सर्व उत्तर सरकार प्रदेश फ्रेंचांनां देऊन टाकला. पुढें बुशी यानें याच्यावर एक नांवाचा राजा बसविला व सर्व सत्ता आपल्या हातीं ठेविली. याला विजयाराम राजराजा म्हणत. याच्या नंतर आनंदराव हा गादीवर आला. यानें हा प्रदेश बंगाल्यांतील इंग्रजांस देऊं केला व लगेच क्लाईव्ह यानें सैन्य पाठवून मच्छलीपट्टण हस्तगत केलें होतें. पुढें सलबतजंगाशीं तह करण्यांत आला व या तहान्वयें मच्छलीपट्टण व त्याच्या सरहद्दींतील ८० मैल लांब व २० मैल रुंद असा प्रदेश इंग्रजांस देण्यांत आला. यानंतर १७६५ त शहा अलम बादशहानें पांचहि सरकार कंपनी सरकारास दिले. ही देणगी संरक्षण करण्याकरितां इंग्रजांनीं कोंडपल्ली किल्ला हस्तगत करून ता. १२ नोव्हेंबर १७६६ रोजीं हैद्राबादच्या निजामाशीं तह केला. या तहान्वयें कंपनी सरकारनें देणगीचा मोबदला म्हणून दरसाल ९० हजार पौंड खर्चून निजामच्या मदतीकरितां फौज ठेवण्याचें कबूल केलें. यावेळीं गंतूरवर निजामचा भाऊ बसालतजंग याची खास मालकी असल्यामुळें तें मेहरबानी खातर तो मरेपर्यंत तहाच्या अटींतून वगळण्यांत आलें होतें. ता. १ मार्च १७६८ रोजीं दुसरा तह झाला. या तहान्वयें निजामानें शहा अलम बादशहानें सरकार प्रांताची दिलेली देणगी कबूल करून त्या प्रीत्यर्थ इंग्रजांकडून सालिना ५० हजार पौंड घेण्याचें ठरलें. याहि वेळीं गंतूर वगळण्यांत आलें होतें. १७६९ त इंग्रज या प्रांताची प्रत्यक्ष रीतीनें व्यवस्था पाहूं लागले. १७८८ त म्हणजे बसालतजंग मेल्यावर सहा वर्षांनीं गंतूर इंग्रजांच्या ताब्यांत आलें. पुढें १८२३ त इंग्रजांनीं निजामास ११६ $\frac{१}{२}$ लाख रु देऊन या प्रांतावर कायमची मालकी मिळविली.

**उत्तरा**(१)—प्राचेतस दक्षानें सोमास दिलेल्या सत्तावीस कन्यांतील एक.

(२)मत्स्य देशाधिपति विराट राजाची कन्या. हिचा अभिमन्यूशीं विवाह झाला. ( भार० विराट० अ० ७१–७२ ). भारती युद्धांत अभिमन्यु मरण पावला, त्या काळीं ही गर्भिणी होती; त्या गर्भाचें अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून श्रीकृष्णानें रक्षण केलें. पुढें त्यानंतर थोड्याच काळांत ही प्रसूत होऊन, परीक्षित नामक पुत्रास प्रसवली. ( भाग. १ स्कं. अ० ८ प्रा. को. )

**उत्तरापथ**.—उत्तर हिंदुस्थानचें प्रचारांतील एक नांव. तुलनार्थ ' दक्षिणापथ ' पहा. उत्तरापथ शब्दाऐवजीं उदीचीपथ असेंहि रूप कधीं कधीं आढळतें. पश्चिम चालुक्यांच्या इतिहासांत कनोजच्या हर्षवर्धनाला सर्व उत्तरपथाचा अथवा उत्तरेच्या प्रदेशाचा प्रभु म्हटलें आहे. याचा वृहत्संहितेंत उल्लेख आहे. ( ९.४१ )

**उत्तानपाद**—स्वायंभू मनूच्या दोन पुत्रांतील कनिष्ठ. प्रियव्रत राजाचा कनिष्ठ बंधु. ध्रुवाचा पिता ( ध्रुव पहा ). ( मत्स्य. अ० ४ प्रा. को. )

**उत्पल**—शैव संप्रदायी; काश्मीरचा शैव तत्त्ववेत्ता, उदयाकराचा मुलगा उत्पल. हा इ. स. ९३० च्या सुमारास उदयास आला. हा सोमानंदाचा शिष्य होता. त्यानें प्रत्यभिज्ञासूत्र, अजडप्रमातृसिद्धि आणि परमेश स्तोत्रावलि, हे ग्रंथ लिहिले आहेत. याच वेळीं भट्ट नारायण हा होऊन गेला. त्यानें स्तव-चिंतामणि हा ग्रंथ लिहिला आहे.

**उत्पादन**—अर्थशास्त्रांत उत्पादनाचें महत्व एका अर्थानें सर्वांत अधिक आहे; कारण सर्व राष्ट्रांचें पोषण व संस्कृति हीं उत्पादनावर अवलंबून असतात. दारिद्र्य, श्रीमंती, युद्धाची पात्रता हीं सगळीं उत्पादनाचीं फळें आहेत. एका दृष्टीनें असें म्हणतां येईल कीं पाश्चात्य राष्ट्रांचें आमच्या वरील सांस्कृतिक वर्चस्व हेंहि त्यांच्या अधिक यशस्वी व कार्यक्षम अशा उत्पादनाचें फल आहे.

उत्पादनाचीं तीन मुख्य अंगें गणलीं जातात; ( १ ) मानवीश्रम, ( २ ) नैसर्गिक शक्ति व जमीन इत्यादिक निसर्गदत्त वस्तू, ( ३ ) भांडवल अथवा उपकरणें. फिझिओक्रॅट्सची उत्पादनाची कल्पना अशी होती कीं शेतकी हेंच खरें उत्पादन आहे. कारण त्यांत खर्चीं घातलेल्या मालापेक्षां अधिक माल तयार होतो. कारखानें, व्यापार यांमध्यें असें होत नाहीं. म्हणून त्याच्या आर्थिक संप्रदायांत शेतकीस प्राधान्य दिलें जात होतें. नंतर स्मिथनें कारखान्यांचा उत्पादक अशा कर्मांत समावेश केला. परंतु व्यापार, रेल्वे वगैरेनीं इकडचा माल तिकडे नेणें हीं स्मिथच्या मतानें अनुत्पादकच होती. नंतर मिलनें उत्पादनाची विस्तृत व्याख्या करून या सर्वांचा उत्पादनांत समावेश केला, कारण या सर्वांपासून ' उपयुक्तता ' सिद्ध होते. आधुनिक अर्थशास्त्रज्ञ तर वस्तूचा उपभोग घेईपर्यंतच्या सर्व क्रिया उत्पादक आहेत असें समजतात व हेंच युक्तीस धरून आहे. जो माल ज्या ठिकाणीं निरुपयोगी तेथून तो उपयुक्त आहे त्या ठिकाणीं आणणें हें वस्तुतः उत्पादनच आहे. या नवीन विचारपद्धतीमुळें पूर्वींची कांहीं श्रम उत्पादक व कांहीं श्रम अनुत्पादक ठरविण्याची योजना त्याज्य ठरली आहे.

श्रमामध्यें शारीक श्रमाबरोबर मानसिक श्रम व नवीन कल्पना उत्पन्न करण्याचे श्रम यांचीहि गणना करणें युक्त आहे. असें न केल्यानें समाजसत्तावादी लोकांच्या अनेक कल्पना व सिद्धांत दूषित झाले आहेत. त्याचप्रमाणें देखरेख करण्याचे श्रम सुद्धां उत्पादनास अत्यावश्यक आहेत. श्रमामध्यें दुखः असल्यामुळें व मनुष्य स्वाभवतःच सुखप्रवण असल्यामुळें श्रमाकरितां द्रव्य, पारितोषिक किंवा तत्सदृश्य कांहीं तरी इष्ट वस्तु द्यावी लागते. हीच मजुरी, तनखा या नांवानें प्रसिद्ध आहेत. ही मजुरी इतकी असली पाहिजे कीं आवश्यक श्रमाचें दुःख सहन करण्यास कांहीं मनुष्यांनीं तरी तयार झालें पाहिजे.

जमीन व नैसर्गिक वस्तू यांमध्यें हवापाणी भूगोलाच्या दृष्टीनें देशाची रचना व भूस्तरशास्त्राच्या दृष्टीनें समृद्धता यांचा समावेश होतो. हीं जशीं उत्तम, मध्यम व कनिष्ठ असतील त्या मानानें उत्पादन व देशाची संपत्ति हीं उत्तम, मध्यम व कनिष्ठ असतात. जमीन विपुल असून शिवाय ती रासायनिक द्रव्यांनीं भरलेली असी पाहिजे. लोकवस्तीच्या मानानें जमीन कमी पडल्यास त्याचा उत्पादनावर फार घातक परिणाम होतो. धान्य महाग होत जाऊन कारखाने वगैरे उत्पादनाच्या अन्य शाखांनां कष्टदायक स्थिती उत्पन्न होते. म्हणून एका बिघ्यापासून शक्य तितकें जास्त उत्पादन होण्याची व्यवस्था केली पाहिजे. यानंतर पाणी व त्यापासून उत्पन्न केलेली वीज, वारा व त्यापासून चालणाऱ्या पवनचक्क्या, सर्व नैसर्गिक शक्ति यांचाहि जमीन व नैसर्गिक शक्ति यांमध्यें समावेश होतो.

भांडवल हें पूर्वींच्या श्रमानें उत्पन्न केलेल्या संपत्तीमधून वचत करण्यापासून उत्पन्न होतें. भांडवल हें उत्पादनास साहाय्यक असलें पाहिजे व त्यापासून वार्षिक प्राप्ति कांहीं तरी झाली पाहिजे. पूर्वींचें भांडवल असल्याशिवाय नवीन उत्पादन होणें अशक्य आहे. समाजसत्तावाद्यांच्या मतें भांडवल हें चोरीनें व अन्यायानें मिळविलेलें असतें. परंतु हें मत चुकीचें आहे.

जगाच्या इतिहासांत उत्पादनामध्यें पुढील अवस्था दिसून येतात. ( १ ) कुटुंबरचना, या अवस्थेंत प्रत्येक कुटुंब हें आपल्यापुरतें उत्पादन करतें. ( २ ) जातिवाररचना या अवस्थेंत एका धंद्यांतील लोक श्रेणी अथवा ' गिल्ड ' करून उत्पादन करतात. ( ३ ) मोठ्या व्यापाऱ्याच्या द्वारें प्रत्येक घरीं वस्तू उत्पादन करणें, या अवस्थेंत श्रेणी मोडून व्यापाऱ्यांच्या हातांत उत्पादन केंद्रीभूत होतें. ( ४ ) मोठे कारखाने. या अवस्थेंत हजारों मजूर एका इमारतींत एकत्र करून एखादा व्यापारी किंवा कंपनी उत्पादन आपल्या पूर्ण कह्यांत ठेवतें. पहिल्या दोन अवस्थांत उत्पादन लहान प्रमाणावर असतें व दुसऱ्या दोन अवस्थांत तें अतिशय मोठ्या प्रमाणावर असतें. मोठ्या प्रमाणावर उत्पादन केल्यास अनेक यांत्रिक साधनांचा उपयोग करण्यास सांपडतो व प्रत्येक वस्तूमागें उत्पादनाचा खर्च फार कमी येतो. शिवाय प्रत्येक मनुष्यास एकच काम दिल्यानें त्याची कार्यक्षमता वाढते. मोठ्या प्रमाणावर उत्पन्न करण्याची वल्पसि साधली म्हणजे देशाबाहेर माल पाठवून व्यापारवृद्धि करण्यास सुरुवात होते व अशा रीतीनें साम्राज्यतृष्णा व व्यापारतृष्णा या दोनहि अनावर होतात. हीं दोनहि दृश्यें यूरोपांत गेलीं तीन शतकें दिसून येतात. हल्लींच्या काळीं मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें हेंच श्रेयस्कर समजलें जातें व त्यामुळें पूर्वींच्या अवस्थांत हिंदुस्थानसारखे देश या जीवनकलहांत मागें पडतात. मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्यास भांडवलाची समृद्धि असावी लागते, त्यामुळें ज्या देशांत बँकिंग पूर्णावस्थेस जाऊन पोंचलें आहे असे देश जास्त प्रमाणावर उत्पादन करून ज्या देशांत कमी भांडवल आहे त्या देशांशीं सहज स्पर्धा करतात व त्यांनां मागें टाकतात. यांत्रिक साधनांशिवाय अति मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें शक्य नसतें व याच कारणाकरितां सर्व व्यापारी देश कारखान्यांकडे जास्त लक्ष पुरवितात.

शेतकी व कारखाने हे समप्रमाणांत असावेत. नुसता कृषिप्रधान देश निर्धन असतो व एकाच उद्योगावर अवलंबून असल्यामुळें तेथें दुष्काळाची भीति जास्त असते. म्हणून

हिंदुस्थानसारख्या देशांत अनेक उद्योगधंदे स्थापणें इष्ट आहे; आतां या धंद्यांत यांत्रिक उत्पादन असावें किंवा सर्व वस्तू हातानें कराव्या हें निश्चित ठरवितां येणार नाहीं; परंतु होईल तितकें कलाकौशल्याचें काम हातानें करावें हें उत्तम. एकाच तऱ्हेच्या हजारों वस्तू करावयाच्या असल्यास यांत्रिक साधनांचा उपयोग करावा. यांत्रिक उत्पादन अजीबात वर्ज्य करणें इष्ट नाहीं; परंतु शक्य तितकें तें मर्यादित राहील असें करावें.

उत्पादन व उपभोग यांमध्यें मोठी खिंड पडतां कामा नये. हल्लींच्या काळीं उत्पादन हें मागणीपेक्षां पुष्कळ वेळां जास्त असतें, त्यामुळें कारखानदारांचें नुकसान होतें व पुष्कळांचीं दिवाळीं निघतात. प्रत्येक कारखानदारानें आपल्या वस्तूंनां किती मागणी येईल याचा बारीक अंदाज केला पाहिजे; परंतु हल्लींच्या पद्धतींत हें शक्य नसते व त्यामुळें ही पद्धति म्हणजे यांत्रिक उत्पादन हेंच वर्ज्य करावें, असें अनेकांस वाटूं लागलें आहे; परंतु हें मत अगदींच एकांगी आहे. जास्त माल झाल्यास तो कमी दरानें देऊन टाकून पुढील वर्षी व्यवस्थित अंदाज करणें हा खरा मार्ग आहे. उत्पादनावर सरकारी नियंत्रिण असावें असें कांहींचें मत आहे; परंतु हें तत्त्व व्यक्तिस्वातंत्र्यास विघातक असल्यामुळें ग्राह्य मानतां येत नाहीं. सहकारितत्त्वावर दुकानें काढणें हा फाजील उत्पादन टाळण्यास एक मार्ग आहे. कारण सोसायटीचे सभासद किती आहेत व त्यांची मागणी किती आहे, हें प्रत्येक दुकानास माहीत असतें. सर्व उत्पादन अशा रीतीनें सहकारी मंडळांच्या ताब्यांत गेल्यास उत्पादन व उपभोग यांचा निकट संबंध होईल. उत्पादनांत सुधारणा करून तेवढ्याच श्रमानें व तेवढ्याच भांडवलावर दुप्पट किंवा दीडपट उत्पादन केल्यास अतिशय फायदा होईल. हल्लींच्या काळीं सर्व देशांत अमर्याद वेळ व मेहनत फुकट जाते असें निदर्शनास आलें आहे व त्यामुळें पुष्कळ लोकांचें लक्ष उत्पादनाची शक्ति व कार्यक्षमता वाढविण्याच्या युक्त्यांकडे वेधलें आहे. या सर्व युक्त्यांचा विचार करणें प्रस्तुत शक्य नाहीं पण हिंदुस्थानांत याविषयीं विचार होणें फार इष्ट आहे. येथील उत्पादनाची शक्ति अतिशय अल्प आहे. शंभर रुपये भांडवल व एका दिवसाचे श्रम यांनीं जें कार्य येथें होतें त्याच्या कित्येक पट इंग्लंड व जर्मनी येथें होतें. यास कौशल्यवाढविणें हा एक उपाय होय. त्याचा मार्ग शाळा व यांत्रिक कामाचे वर्ग काढणें हा आहे. परंतु याशिवाय दुसऱ्या मार्गांचाहि अवलंब केला पाहिजे. हे सर्व मार्ग फुकट जाणारे पदार्थ वांचविण्याच्या स्वरूपाचे आहेत. याविषयीं प्रत्येक कारखानदारानें अतिशय दक्ष राहिल्यास लक्षावधी रुपयांची बचत होईल हें निःसंशय आहे. शिवाय मजुरांचें आरोग्य उत्तम ठेवणें, त्यांनां मलेरिया इत्यादि रोग न होतील अशी तजवीज ठेवणें, त्यांनां प्रसन्न ठेवण्याकरितां करमणुकीचीं साधनें उत्पन्न करणें व बोनस अगर नफ्याचा कांहीं भाग त्यांनां देऊं करून त्यांची कारखान्याविषयींची हितबुद्धि दृढ करणें हेहि मार्ग अमलांत आले पाहिजेत. हल्लींची मजुरवर्गाविषयींची अनास्था नाहींशी होऊन त्या वर्गाविषयीं कळकळ उत्पन्न झाली पाहिजे. अशी योजना न झाल्यास भांडवलवाले व मजूर यांमधलि विरोध विकोपाप्र जाऊन समाजसत्तावाद अधिक फैलावेल व सामाजिक क्रांति घडवून आणण्याविषयीं मजूर उपक्रम करूं लागतील.

हिंदुस्थानच्या दृष्टीनें येथील उत्पादन अधिक वाढविण्याचा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. हल्लीं दर माणशीं प्राप्ती ४० रुपयांची आहे ती निदान शंभर रुपये होण्यास उत्पादन अडीचपट झालें पाहिजे. हें करण्यास शेतकी, कारखाने व व्यापार या तिहींमध्यें प्रगति झाली पाहिजे व ती प्रगति करण्यास प्रत्येक सुशिक्षित मनुष्यानें झटलें पाहिजे. देशाचें दारिद्र्य घालविणें म्हणजे उत्पादनाची मर्यादा वाढविणें होय.

उत्पादनावर सरकारचें नियंत्रण असावें किंवा नाहीं ह्या प्रश्नासंबंधानें दोन मतें आहेत. एका पक्षाच्या मतें उत्पादन हें व्यक्तिस्वातंत्र्यावर अवलंबून असावें. ज्याला जें पटेल तें त्यानें उत्पन्न करावें. उत्पन्न केलेली वस्तु आरोग्याच्या दृष्टीनें इष्ट आहे किंवा घातक आहे, नीतिदृष्ट्या उपभोग घेण्याच्या लायकीची आहे किंवा नाहीं या प्रश्नांत सरकारनें लक्ष घालूं नये. दुसऱ्या पक्षाच्या मतें अर्थशास्त्र व नीति यांचा निकट संबंध आहे व त्यामुळें उत्पादनावर समाजसत्तेची अर्थात् सरकारची पूर्ण दृष्टि पाहिजे. नीतीस अपायकारक असे पदार्थ अजीबात बंद केले पाहिजेत किंवा त्यांच्या उत्पादनाचें कांहीं विशिष्ट तत्त्वांवर नियंत्रण केलें पाहिजे. उत्पादनाच्या कामांत व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व अतिशय घातक आहे. हें मत रॉशर, हिल्डब्रॅंडप्रभृति जर्मन ऐतिहासिक संप्रदायाच्या अर्थशास्त्रज्ञांनीं फार मुद्देसूद रीतीनें प्रतिपादन केलेलें आहे व हेंच मत जास्त ग्राह्य आहे. इंग्लंडमध्येंहि हल्लीं या मतास अधिक पुष्टि मिळत आहे असें प्रचलित वादविवादांवरून दिसून येईल. याच तत्त्वावर मद्यप्राशन अगदीं संकुचित क्षेत्रांत ठेवण्याविषयीं हिंदुस्थानांतील लोकमताचे धुरीण सरकारास आग्रह करीत आहेत.

नीतिदृष्ट्या उच्चनीचपणा ठरवून उत्पादनांमध्यें एक प्रकारची श्रेणि लावितां येईल; जिवंत रहाणें हें नीतिदृष्ट्याहि आवश्यक असल्यामुळें सर्व प्रकारच्या आवश्यक अन्नांचें उत्पादन हें सर्वांत वर ठेवलें पाहिजे. त्यानंतर देशाचें संरक्षण करण्यास आवश्यक असें उत्पादन याचा अधिकार क्रमानें प्राप्त होतो. त्याच्याखालीं संस्कृतीस आवश्यक परंतु अनीतीस पोषक नाहींत अशा चैनीच्या पदार्थांचें उत्पादन ठेवलें पाहिजे व सर्वांच्या खालीं अगदीं कनिष्ठ दर्जाचें उत्पादन म्हणजे शरीरास, नीतीस व संस्कृतीसहि विघातक अशा वस्तूंचें उत्पादन हें होय. या शेवटल्या उत्पादनास होईल तितका प्रतिबंध प्रत्येक राष्ट्रानें केला पाहिजे. कांहीं वस्तू

नीतिदृष्ट्या आवश्यक आहेत किंवा नाहींत यासंबंधानें वाद आहे. उदाहरणार्थ औषधें, विशिष्ट प्रकारचे कपडे, कनिष्ठ कादंबऱ्या व काव्यें. परंतु हा वाद अर्थशास्त्राच्या तत्त्वानुसार सोडवितां येण्यासारखा नसल्यानें याचें निवारण नीतिशास्त्रावरच सोंपविलें पाहिजे. प्रत्येक मनुष्यास नीतिमान करण्याचा प्रयत्न केल्यास सरकारी नियंत्रणाशिवाय हा प्रश्न आपोआप सुटेल व अनीतिमान् उत्पादनास कोणीच मदत न केली म्हणजे तें सहज नष्ट होईल. परंतु ही गोष्ट कठिण असल्यामुळें कांहीं शतकें तरी सरकारनें उत्पादनाचें नियंत्रण करणें आवश्यक आहे.

उत्पादन शक्य तेवढें बहुविध असावें. होतां होईल तों सर्व तऱ्हेच्या वस्तू प्रत्येक देशास निदान प्रत्येक मोठ्या देशास करतां आल्या पाहिजेत. हें बहुविध उत्पादन करण्यास पुष्कळ वेळां संरक्षक जकातीच्या पद्धतीची आवश्यकता असते. अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यास कोणत्याहि देशानें संरक्षक जकाती ठेवण्यास मागेपुढें पाहूं नये. याच मार्गानें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांनीं आपलें उत्पादन सर्वांगीण व बहुविध करून घेतलें व त्याच मार्गाचा हिंदुस्थानास अवलंब केला पाहिजे. हें करण्यास दिरंगाई झाल्यामुळें आजपर्यंत या देशाचें अपरिमित नुकसान झालें आहे. (ले० प्रो, व्ही. एन. गोडबोले.)

**उत्रौला, तहशील.**—संयुक्त प्रांत. ही गोंडा जिल्ह्यांतील उत्तर आणि दक्षिणेकडील तहशील असून हींत उत्रौला, सादुल्ला नगर, बुढापारा, मणकापूर, बलरामपूर आणि तुलसीपूर वगैरे परराण्यांचा समावेश होतो. हिचें क्षेत्रफळ १५६५ चौ. मै. असून लोकसंख्या १९११ सालीं ६७०५८१ होती. एकंदर खेडीं १४७४ असून बलरामपूर व उत्रौला हीं दोन शहरें आहेत. १९०३–०४ सालीं काळीचें उत्पन्न ७५५००० असून इतर बाबीपासून १११००० रु. उत्पन्न झालें. तहशिलीचा बहुतेक भाग रापती नदीच्या उत्तरेस नेपाळ सरहद्दीवर हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. जंगल १४२ चौ. मैलांचें असून रापती नदीचा दक्षिणभाग जास्त सुपीक आहे. १९०३–०४ सालीं १००६ चौ. मै. जमीन लागवडी खालीं असून त्यांतील २२१ चौ. मै. पाण्याखालची होती.

**शहर.**—संयुक्त प्रांत. गोंदा जिल्ह्यांतील उत्रौला तहशिलीचें मुख्य ठिकाण. याची लो. सं. (१९११) ६५२३. असून येथें अलिखान यानें बांधलेलें एक सुंदर सरोवर अद्याप अस्तित्वांत आहे व सरोवराच्या कांठीं त्याच्याच वंशजांपैकीं कांहींचीं थडगीं आहेत. सुमारें १५५२ च्या सुमारास अलीखान यानें उत्रौला शहर हस्तगत करून घेतलें होतें. या ठिकाणीं एक जुना किल्ला आहे. त्याच्या कांहीं भागांत तहशील कचेरी असते. येथें म्यु. कमिटी असून १९०३–०४ सालीं तिचें उत्पन्न ५५०० होऊन खर्च ४००० झाला होता. स्थानिक व्यापार थोडा फार चालतो. मातीचीं भांडीं सुबक करितात. येथें ३ शाळा आहेत.

**उदमलपेट, तालुका.**—मद्रास. कोइमतूर जिल्ह्यांतील तालुका. याचें क्षेत्रफळ ५६६ चौ. मैल असून लोक सं. १९०१ सालीं १५९८०४ होती. खेड्यांची संख्या ८६ असून उदमलपेट या नांवाचें एकच शहर आहे. काळीची जमा १९०३–०४ सालीं २४८००० होती. तालुक्याचा बराच भाग सपाट असून दक्षिणेस अनैमलइ पहाड असल्यामुळें त्या भागांत जंगल जास्त आहे. दरसाल पावसाचें मान २२ इंच असतें. जमीन बहुधा लाल रंगाची आहे. परंतु कांहीं भाग काळा आहे. त्यांत कापूस पुष्कळ पिकतो.

**गांव.**—मद्रास. कोइमतूर जिल्ह्यांतील उदमलपेट तालुक्याचें मुख्य ठिकाण. यांची लो. सं. (१९११) १०४४५. पैकीं अष्टमांश मुसलमान लोक आहेत. कापूस, धान्य व कपडा यांचा मोठा व्यापार चालतो. येथील व्यापारी कोमटी, नाटुकोटु चेटी, व मुसलमान असतात. येथील लोहार फार कुशल म्हणून प्रसिद्ध आहेत. या ठिकाणीं जिल्हा मुनसफची कचेरी आहे.

**उदयगिरि, तालुका.**—मद्रास. गंजम जिल्ह्यांतील उत्तर एजन्सीतील तालुका. याचें क्षेत्रफळ ५०४ चौ. मै. असून बहुतेक प्रांत पहाडी आहे. १९११ सालीं लोकसंख्या ८१७३० असून खेड्यांची संख्या ४०३ होती. या तालुक्यांत गुमसूर, मालिया, कोरडा व राणवा या जमीनदाऱ्या असून सगळे गुमसूर उदयगिरी येथें राहतात. राणवा जमीनदार सरकारला कांहीं देत नसून, कोरडा सालीना १५ रुपये देतो. १९०३–०४ सालीं गुमसूर मालिया जमीनदारींत सरकारला २५०० रुपये काळीचा वसूल आला. एकंदर लोकसंख्येंत खोंड लोकांचा भरणा विशेष आहे.

(२)—मद्रास. नेलोर जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ८७१ चौ. मै. असून लोकसंख्या १९११ त ९८३९१ होती. खेड्यांची संख्या १३३ असून तालुक्याचें मुख्य ठिकाण उदयगिरी येथें आहे. काळीचें व इतर बाबी मिळून उत्पन्न ७४ हजार रुपये आहे. अगदीं उत्तरेस कालहस्ती ही जमीनदारी आहे. पश्चिमभाग पहाडी असल्यामुळें जमीन सुपीक नाहीं. पूर्वेकडील भाग चांगला आहे. मनेरु व पल्लिपेरु या नद्या उत्तरेस व बोगरु नदी दक्षिणेस वाहते. या नद्या कारभाऱ्यांच्या उपयोगी नाहींत. पाण्याचा पुरवठा विहिरींपासून होतो. तरी पाऊस कमी पडल्यास विहिरी आटण्याचा फार संभव आहे. एकंदरींत पाण्याचा पुरवठा कमी व पाऊसहि कमी, तेव्हां पीक कमीच. यामुळें लोकांची स्थिति चांगली नाहीं. त्यामुळें उदरनिर्वाहाकरितां लोक बाहेर जातात.

**गांव.**—मद्रास. नेलोर जिल्ह्यांतील उदयगिरी तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या (१९०१) ४०२१. पूर्वी हें शहर फार मोठें होतें. या शहराच्या सभोंवतीं तट होता तोहि आतां नाहींसा झाला आहे. तरी पहाडावरील कांहीं अवशेष अजून नजरेस पडतात. किल्ल्याला १३ दरवाजे होते.

पैकीं ८ पहाडावर असून ५ खालीं गांवांत होते. तटाच्या आंत देवळें, थडगीं व राजवाडे यांचे अवशेष सांपडतात. पहाडाचा कांहीं भाग संबंध तुटल्यामुळें दुर्गम झाला आहे. १४ व्या शतकांत या ठिकाणीं लांगूल गजपती नांवाचे राजे राज्य करीत होते. १५१२ त विजयानगरच्या कृष्णदेवानें तें राज्य बळकावलें. नंतर तें गोंवळकोंड्याच्या सत्तेखालीं आलें. पहाडाच्या शिखरावर एक मशीद आहे. तीवर एक फारसी शिलालेख आढळतो. त्यावरून ती मशीद गोंवळकोंड्याचा सुलतान अबदुल्ला राज्य करीत असतां १६६० मध्यें शेख हुसेन यानें बांधली असें कळतें. अर्काटच्या नवाबानें उदयगिरी जहागीर मुस्तफा अलीखान नांवाच्या मनुष्याला दिलेली होती. १८३९ सालीं त्या घराण्यांतल्या शेवटच्या मनुष्यास राजद्रोहाच्या आरोपावरून चिंगलपट येथें पाठवून देऊन जहागीर जप्त केली. या ठिकाणीं एक दवाखाना व शाळा आहे.

( २ ) ग्वाल्हेर संस्थान. भिलसा जिल्ह्यांतील एक प्राचीन गांव. बेट्वा आणि बेश नद्यांच्या मध्यभागीं भिलसापासून चार मैल दूर हें आहे. येथें पुष्कळ लेणीं असल्यामुळें यास महत्त्व आलेलें आहे. येथें जैनमंदिरांचे अवशेष असंख्य आहेत. वायव्येपासून आग्नेयीपर्यंत सरासरी टेंकडीची लांबी पाऊण मैल असून पायथ्यापासून ३५० फूट उंच आहे. येथें एकंदर लेणीं पुष्कळ आहेत. परंतु त्यांत नंबर ३, ४, ९ आणि १० हीं सुंदर असून ऐतिहासिक महत्त्वाचीं आहेत.

नंबर ३ चें लेणें १४ फूट लांब व १२ फूट रुंद आहे. त्याला कमानदार खोदींव दार असून व लगत एक खोली असून तींत अष्टमातृकेची मूर्ति आहे. नंबर ४ चें लेणें वराह अवताराचें आहे. त्यांत गंगायमुनांचा प्रवाह स्पष्ट दाखविला आहे. नंबर ९ चें लेणें सर्वोत्कृष्ट आहे. हें २२ फूट लांब व १९ फूट रुंद आहे. त्याच्या चोहों बाजूं ४ खांब असून वर उत्कृष्ट छत आहे. नंबर १० चें लेणें जैनांचें असून जैनांचा २३ वा तीर्थंकर पारसनाथ याची मूर्ति आहे. हें लेणें ५० फूट लांब, १६ फूट रुंद असून यांत ५ खोल्या काढलेल्या आहेत.

मगध देशाच्या चंद्रगुप्तानें गुजराथ आणि माळवा सर केला त्या वेळच्या तारखा शिलालेखांत स्पष्ट नमूद केलेल्या आहेत. असेच आणखीहि दुसरे शिलालेख पुष्कळ आहेत.

टें क डी—( सूर्योदय टेंकडी ) बंगाल. कटक जिल्ह्यांतील जाजपूर पोटविभागांतील एशिया पहाडावरील उंच शिखर. हें जिल्ह्याच्या अगदीं पूर्वेस टेंकडीवर असल्यामुळें याला उदयगिरी हें नांव पडलेलें आहे. या ठिकाणीं एक देऊळ असून त्याचे तीन भाग आहेत. यांत एक मोठी प्रचंड बुद्धाची बसलेली मूर्ति आहे. मूर्ति १० फूट उंचीची असून छातीपर्यंत जमिनींत गढलेली आहे. देवळाच्या उत्तरेस बोधिसत्वाच्या २ कोरींव मूर्ती आहेत. शिवाय २ मूर्ती अलीकडे सांपडल्या आहेत. पश्चिमेस एक विहीर असून द्वाराजवळ पद्मपाणी बोधिसत्त्वाची ८ फूट उंचीची मूर्ति एका खडकाची कोरलेली आहे.

**उदयन.**—मगध देशाचा राजा, शैशुनाग वंशांतील आठवा पुरुष. याचीं उदय, उदयन, उदयाश्व, वत्सराज अशींहि नांवें आढळतात. बौद्ध याला उदयीभद्र असें संबोधितात. हा वत्स देशाचा राजा होता. याचा काल खि. पू. ५०३ चा होय. यानें गंगेच्या कांठीं कुसुमपूर हें शहर वसविलें. याची राणी ही अवंतीच्या महासेन राजाची कन्या होय. [ व्हि. स्मिथ अर्ली हिस्टरी पृ. ३८—३९ व ऑक्स. हिस्टरी पृ. ४७ ].

उदयनासंबंधीं बऱ्याच कथा काव्यांतून ग्रथित केलेल्या आहेत. रत्नावली नाटकांतलि नायक उदयन आहे. उज्जनीची राजकन्या वासवदत्ता हिनें वत्सराजाला स्वप्नांत पाहिलें तेव्हांपासून तिचें मन त्याच्यावर बसलें. उदयनाला उज्जनीला फसवून नेण्यांत येऊन कैद करण्यांत आलें पण कैदेंत घालणाऱ्या चंडसेन राजाच्या प्रधानानें त्याची जेव्हां मुक्तता केली तेव्हां तो वासवदत्तेलाहि घेऊन गेला.

**उदयनाचार्य**—उदयनाचार्य हा विद्यारण्यांच्या पूर्वीचा असावा. कारण सर्वदर्शनसंग्रहांत याचा उल्लेख आहे. याच्या नांवावरचे ग्रंथ अचार्यमतरहस्य, आत्मतत्त्वविवेक किंवा बौद्धधिक्कार, कणादसूत्रभाष्य, किरणावली, जातिनिग्रह, स्थानव्याख्या, न्याय, कुसुमांजुली, न्यायपरिशिष्ट, न्याय वार्त्तिक, तात्पर्यपरिशुद्धि. बोधसिद्धि, लक्षणावलि वगैरे [ आफ्रेक्ट ]

**उदयपूर**—मध्यहिंदुस्थान. ग्वाल्हेर संस्थान. भिलसा जिल्ह्यांतील एक गांव. जी.आय. पी. रेल्वेवरील बरेथ स्टेशनापासून ४ मैल हें आहे. याची लो. सं. १९०१ सालीं ९२८ होती. हें ठिकाण प्राचीन काळीं महत्त्वाचें असल्यामुळें मुख्यत्वेंकरून येथें मुसुलमानांचे बरेच अवशेष आढळतात. किल्ल्याच्या तटाला ठिकाठिकाणीं भोंकें पाडून दरवाजे केलेले आहेत. दक्षिणेस अर्ध्या मैलावर एका टेंकडीवर बिन चुन्याची मोठी चिरेबंदी भिंत असून पूर्वी त्या ठिकाणीं एक बळकट आश्रयाची जागा असावी असें वाटतें. उदयेश्वराचें देऊळ प्रेक्षणीय आहे. त्याची बांधणी इतकी नाजूक व रंग इतका ताजा दिसतो कीं सर्व कांहीं शिल्प नुकतेंच रेखाटलेलें आहे असें वाटतें. तेथें एक उदयादित्य परमाराचें देऊळ दाखवितात. त्याचा अर्धा भाग बहुतेक पडलेला आहे. त्यांत उदयादित्यापर्यंत पूर्वींच्या राजांची वंशावळ दिलेली आहे. १३३६ सालीं मशीद बांधल्याची तारीख आहे. त्यावेळीं महंमद तघलख दिल्लीपति होता ११६३ ते ११७५ पर्यंत अनहिलवाडापट्टणचे चालुक्य राजे माळव्यांत राज्य करीत होते असा येथें एक शिलालेख आढळतो. दुसरा लेख धारच्या देवपालासंबधानें आहे.

**उदयप्रभसूरि**—" धर्माभ्युदयः महाकाव्य " आणि " आरंभसिद्धि " या ग्रंथांचा कर्ता. उदयप्रभसूरि याचा वि. सं. १२८७ म्हणजे इ. स. १२३१ सालच्या एका शिलालेखांत उल्लेख आला असल्यामुळें व वीरधवलाचा

( इ. स. १२४१ ) मंत्री वस्तुपाल यानें त्याला आश्रय दिला होता त्यामुळें याच सुमारास हा उदयास आला असावा असें दिसतें.

**उदयभानु**—उदेमान राठोड. शुक्रवार माघ वद्य नवमी श. १५९१ ( फेब्रुवारी सन १६७० ) रोजीं तानाजी मालुसऱ्यानें सिंहगड किल्ल्यावर रात्रींच्या वेळीं पन्नास माळव्यां निशीं अचानक हल्ला केला. तेव्हां उदयभानु हा त्या किल्ल्याच्या संरक्षणार्थ मोंगलांकडून नेमलेला तेथील अधिकारी होता व याच्या हाताखालीं रजपूत लोकांचें भरभक्कम सैन्य होतें. परंतु या हल्ल्याच्या वेळीं हा आपल्या सुमारें पांचशें लोकांसह मावळी लोकांशीं लढतां लढतां मरण पावला. शेंकडो रजपूत लोकांनीं तर मराठ्यांच्या तावडींतून सुटण्याकरितां किल्ल्याच्या कड्यावरून खालीं उड्या टाकल्यामुळें त्यांच्यापैकीं कित्येकांचा कपाळमोक्ष झाला. हा मूळचा रजपूत पण बाटून मुसुलमान झाला होता. [ जेधे शकावली ग्रँटडफ. ]

**उदयसिंह.(१)**—उदा राणा हत्यारा ( इ. स. १४६९–१४७४ ):उदयसिंह उर्फ उदाराणा हा आपला बाप कुंभो राणा याचा खून करून वि. सं. १५२५ ( इ. स. १४६९ ) मध्यें गादीवर बसला. त्याच्याविषयीं रजपूत लोकांनां इतका तिरस्कारा वाटतो कीं, 'हत्यारा' या निंदाव्यंजक नांवाशिवाय त्याला कोणी उल्लेखीत नाहीं. मागील राण्यांनीं आपल्या प्रयत्नांनीं मेवाडच्या राज्यास जें वैभव प्राप्त करून दिलें होतें त्यांपैकीं अर्धेअधिक हा आपल्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत गमावून बसला. त्यानें देवरा ठाकुरास अबूप्रांत देऊन स्वतंत्र केलें, आणि जोधपूरच्या राजास सांभर, अजमीर व त्या लागतचे जिल्हे देऊन त्याची मैत्री संपादण्याचा उपक्रम चालविला. परंतु एवढा लांच देऊनहि त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ह्या राजांच्या मैत्रीवर विसंबून राहणें त्यास धोक्याचें वाटल्यामुळें अन्यायानें संपादन केलेलें राज्य हातीं ठेवण्याकरितां शेवटीं तो दिल्लीच्या राजास शरण जाऊन त्यास आपली मुलगी देण्यास तयार झाला. परंतु ईश्वराच्या मनांत मेवाडच्या घराण्याच्या अब्रूस कलंक लागू द्यावयाचा नव्हता. उदयसिंह हा राजाची भेट घेऊन दिवाणखान्याबाहेर पडतो न पडतो तोंच तो अंगावर वीज पडून ठार झाला. ( रायमल्ल पहा ).

**उदयसिंह(२)** अजमासें इ. स. १५४१ते४२ –१५७२:– हा संग राण्यास त्याची हाडा वंशीय राणी कर्णावती हिजपासून झालेला मुलगा. संग मरण पावला तेव्हां कर्णावती ही याच्या वेळेस गरोदर होती ( संग व विक्रमाजित पहा). कर्णावती पुढें चितोडच्या दुसऱ्या जोहारांत मरण पावली. त्यानंतर बनबीर गादीवर आला. तेव्हां त्यानें उदयसिंहाचा जीव घेण्याचा प्रयत्न केला. परंतु पन्ना नामक स्वामिभक्त दाईनें उदयसिंहाचा जीव वांचवून त्यास गुप्तपणें कुंभोमेर किल्ल्यावर असासा नामक श्रावक सुभेदारापाशीं नेऊन ठेविलें. तेथें उदयसिंहानें सात वर्षें अज्ञातवासांत काढल्यावर तो जिवंत असल्याची हकीकत बाहेर फुटून राजपुतान्यांतील संस्थानिकांनीं त्यास मेवाडच्या गादीवर आणून बसविलें ( बनबीर पहा ).

चि तो ड चा वे ढा ( ऑक्टो. २०, १५६७ ते फेब्रु. २३, १५६८ ).—उदयसिंह एकंदरींत दुर्बल निघाला. हुमायूनचा पराभव होऊन दिल्लींत अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळें बरींच वर्षें पर्यंत त्याच्या वाटेस कोणी गेलें नाहीं. परंतु अकबर बादशहा सिंहासनावर बसल्यावर आपल्या हातीं साम्राज्यसत्ता आणण्याची त्याला हांव सुटून त्यानें हि. स. ९७५ ( इ. स. १५६७ ) मध्यें चितोडवर स्वारी केली. फेरिस्त्यानें ह्या एकाच स्वारीचें वर्णन दिलें आहे; परंतु रजपूत बखरींत हिच्यापूर्वी आणखी एक स्वारी झाली होती तिचीहि हकीकत आली आहे. ह्या पहिल्या स्वारींत अकबरास अपयश घेऊन परत जावें लागलें. ह्या प्रसंगीं चितोडचा बचाव करण्याचें सर्व श्रेय राण्याच्या एका रखेलीस देण्यांत येतें. ह्या शूर स्त्रीनें स्वतः पुढाकार घेऊन मोंगलांच्या छावणीवर हल्ले चढविले व एकदां तर ती थेट अकबराच्या छावणीपावेतोंहि जाऊन भिडली. अकबर परत गेल्यावर हा नेभळट राणा 'माझें संरक्षण माझ्या रखेलीनें केलें' असें उघड उघड म्हणूं लागला. रजपूत सरदारांनां हा अपमान वाटून त्यांनीं कट करून ह्या रखेलीचा जीव घेतला. मेवाडांतील अंतःकलहाची बातमी अकबरास लागतांच तो चितोडवर पुन्हां स्वारी करून आला. अकबराचें लष्कर पांडोलीपासून बसीपर्यंत, म्हणजे सुमारें पांच कोसपर्यंत पसरलें होतें. यांत अकबराचा तंबू जेथें होता तेथें एक तीस फूट उंचीचा मनोऱ्यासारखा संगमरवरी स्तंभ (याचा पाया बारा फूट चौरस व माथा चार फूट चौरस आहे.) उभा केला असून 'त्यास अकबरका दिवा' असें म्हणतात. अकबरानें चितोडला वेढा दिला न दिला तोंच ( रजपूत बखरकार म्हणतात कीं ) लोकांनीं उदयसिंहास चितोड सोडून बाहेर जावयास लाविलें. उदयसिंहालाहि तेंच हवें होतें. तथापि चितोडच्या संरक्षणास वीर पुरुषांची वाण पडली नाहीं. साहिदास हा आपले चोंडावत रजपुत घेऊन सूर्य दरवाजाचें रक्षण करण्यास उभा राहिला. मदारियाचा रावत संगावतांनां (हे संगराण्याचे पुत्र नव्हत ) घेऊन तयार होता. दिल्लीच्या पृथ्वीराजाचे वंशज बेडला व कोठारिओ येथील सामंत संस्थानिक, बिज्जोलीचा परमार, साद्रीचा झाला हे सर्व आपल्या स्वतःच्या उदाहरणानें आपआपल्या लोकांत वीरश्री उत्पन्न करीत होते. हे सर्व मेवाडचे सरदार झाले. बाहेरून जी कुमक आली तींत देवळ्याचा दुसरा राजपुत्र, झालोरचा सोनिगडराव ईसरीदास राठोड, करमचंद कच्छवाह, दुदा सादानी व ग्वाल्हेरचा तुवर संस्थानिक ही मंडळी प्रमुख होती. तथापि या प्रसंगीं ज्यांनीं आपलीं नांवें इतिहासांत अजरामर करून ठेविलीं व आपल्या शत्रूच्याहि मनांत आपल्या शौर्यानें आदर उत्पन्न केला, असे वीर

म्हटले म्हणजे वेदनोरचा जयमल्ल व केळव्याचा पुत्त. यांतील जयमल्ल हा मेडती घराण्यापैकीं एक राठोड होता व पुत्त हा चोंडापासून निघालेल्या जगावतें शाखेचा पुढारी होता. साळुंब्र्याचा साहिदास पडतांच सूर्य-दरवाज्याचें संरक्षण करण्याचें काम केळव्याच्या पुत्तानें अंगीकारिलें. याचें वय केवळ सोळा वर्षांचें होतें. याचा बाप अगोदरच वारला असून याची आई मात्र याचा सांभाळ करण्याकरितां राहिली होती. तिनें ह्या प्रसंगीं आपल्या मुलास केशरी पोशाख चढवून चितोडप्रीत्यर्थ प्राण अर्पण करण्यास पुढें केलें, व आपण स्वतःहि लढण्यास सज्ज होऊन मुलाचा जीव बायकोसाठीं मागें घुटमळत राहूं नये म्हणून आपल्या सुनेच्याहि हातांत भाला देऊन तिला आपल्यावरोबर घेतलें. अशा रीतीनें ही बालस्नुषा आपल्या सासूबरोबर किल्ल्याखालीं उतरून किल्ल्यांतील सर्व लोकांदेखत शत्रूंशीं लढतां लढतां धारातीर्थीं पतन पावली. आयाबहिणी जेव्हां इतकें शौर्य दाखवूं लागल्या तेव्हां कोण्या रजपुताच्यानें स्वस्थ बसवेल ? ते सर्व जिवावर उदार होऊन शत्रूच्या स्वाधीन किल्ला करावयाचा नाहीं अशा निश्चयानें लढूं लागले. पुत्त पडतांच चितोडच्या सैन्याचा जयमल्लानें पुढाकार घेतला. अशा रीतीनें किल्ल्यांतील लोक चार महिनेपर्यंत शत्रूच्या सैन्याशीं झुंजत होते. त्यांनीं आणखीहि टिकाव धरला असता पण मेवाडच्या दुर्दैवानें जयमल्ल गोळी लागून घायाळ झाला. शत्रूशीं दोन हात करावयास न मिळतांच गोळी लागून अकीर्तिकर मरण येण्याची कल्पना त्या वीर पुरुषास कशी-शीच वाटूं लागली. जयाची तर आशा बिलकूल दिसेना, कारण उत्तरेकडील सर्व तटबंदी जमीनदोस्त झाली होती. अशा स्थितींत त्यानें जोहार करण्याचा हुकूम सोडला. आठ हजार रजपुतांनीं अखेरचे विडे घेऊन केशरी पोशाख चढविले व ते किल्ल्याचे दरवाजे उघडून शत्रूवर तुटून पडले. अकबराच्या हातीं किल्ला लागला खरा, पण चितोडचे तीस हजार रहिवाशी त्याच्या विजयतृष्णेस बळी पडले होते. नऊ राण्या, त्यांच्या पांच कन्या व दोन अर्भक पुत्र आणि दुसऱ्या कित्येक रजपूत सरदारांचीं कुटुंबें अग्नीच्या ज्वालांत किंवा हल्ल्यांत बळी पडलीं. रजपूत बखरकारांप्रमाणें ही गोष्ट रविवार, चैत्र शुद्ध ११ संवत् १६२४ रोजीं ( म्हणजे मे १५६८ त ) घडली. चितोड हस्तगत झाल्यावर अकबरानें तेथें फार नासधूस केली. त्यानें देवळें व राजवाडे उध्वस्त करून तेथील नगारे व देवीच्या देवळांतील समया व दरवाजे काढून आपल्या बरोबर नेले.

उदयसिंह चितोड सोडून निघाला तो राजपिंपळ्याच्या जंगलांत गोहिलाच्या आश्रयास जाऊन राहिला. तेथून पुढें मग तो अरवली डोंगराच्या गिर्वो खोऱ्याकडे गेला. या खोऱ्याच्या मुखाशीं त्यानें कित्येक वर्षांपूर्वी उदयसागर नांवाचा तलाव बांधला होता. तेथें त्यानें आतां उदेपूर नांवाचें शहर वसवून ती आपली राजधानी केली.

चितोड मुसुलमानांच्या हातीं गेल्यावर उदयसिंह चार वर्षे जिवंत होता. तो गोगुंडा नांवाच्या गांवीं आपल्या वयाच्या बेचाळिसाव्या वर्षी मरण पावला ( फाल्गुन शुद्ध १५). त्याला एकंदर पंचवीस औरस पुत्र होते. यांपैकीं वडिलाकडे उदयसिंहाच्या मरणानंतर वस्तुतः गादी जावयाची; पण उदयसिंहानें मरणापूर्वी जगमल्ल नांवाच्या एका आपल्या आवडत्या राजपुत्रास आपल्या नामधारी सिंहासनाचा वारस म्हणून जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें उदयसिंह मरण पावल्यावर त्याचा दहनविधि चालू असतांच जगमल्ल तिकडे उदेपुरास जाऊन सिंहासनारूढहि झाला. परंतु मेवाडचा पिढीजाद कारभारी साळुंब्र्याचा चोंडावत रावत कृष्ण यानें मागून येऊन जगमल्लास हात धरून सिंहासनावरून खालीं उतरविलें व त्याच्या जागीं उदयसिंहाचा कायदेशीर वारस सोनिगड रावाचा भाचा प्रतापसिंह यास बसवून त्याच्या कमरेस तरवार बांधली.

**उदर**—शरीराच्या ज्या पोकळ भागांत पचनेंद्रियें असतात त्यास हें नांव आहे. यास इंग्रजींत अब्डोमेन हा शब्द आहे. यापैकीं मुखापासून जठरापर्यंतच्या भागांस अन्नमार्ग म्हणतात; व त्यापुढील आंतड्यापासून गुदापर्यंत भागास आंत्र-पद्धति हें नांव आहे. वास्तविक पाहतां अन्नमार्ग ( ॲलिमेंटरी कॅनाल ) म्हणजे मुखापासुन गुदद्वारापर्यंत जो पोकळ नळीप्रमाणें मार्ग आहे त्या सर्वांसच हें नांव लावणें युक्त आहे. परंतु सोयीसाठीं हा फरक करतात. अन्न-मार्गापैकीं ओंठ, मुख, टाळू,घसा हीं सर्वांच्या पूर्ण परिचयाचीं असल्यामुळें त्यांचें वर्णन न केलें तरी चालेल. यापुढील मार्ग म्हणजे गलस्रोत अथवा अन्ननालिका होय. ही नरड्याच्या वरील भागापासून जठराच्या ऊर्ध्व छिद्रापर्यंत सुमारें दहा इंच लांबीची नळी असते. व त्याची रुंदी अर्ध्यापासून एक इंचपर्यंत असते. एवढ्या जागेंत ही नळी गळा, छाती व उदर या तिन्ही ठिकाणीं असते. नंतर ती मध्यपटल नामक छाती व उदर यांमधील मोठ्या स्नायूमध्यें प्रवेश करून तेथें संपते. इच्या पुढें व मागें अशा दोन व्हेगस् नामक श्वासहृदयनियामक अति महत्वाच्या व हृदयश्वासपचननियामक मज्जातंतू असतात. आंतील भाग श्लेष्मल असून त्यास उभ्या वळकट्या असतात. तेणेंकरून या अवयवाचें प्रसरण होऊं शकतें. या नळींतून अन्न जठरांत शिरतें, यापुढील मार्ग विस्तृत असून कांहींसा मोठ्या बटव्यासारखा असतो.व हें जठर उदराच्या पोकळींतील ईशान्येकडील कोपऱ्यांत असतें व रिक्त स्थितींत चपट्या आकाराचें असतें.यास पुढील व मागील पृष्ठभाग असून त्यास उत्तर अगर लघु व दक्षिण अगर बृहत सीमा असतात. पोट अगर जठर साधारणपणें भरलें असतां बटव्याचा जाड भाग फुगीर होतो व डावेबाजूस फुगवटी दिसते. निमुळत्या दुसऱ्या टोंकाकडे दक्षिण छिद्र असून तें उजवे बाजूस असतें. या छिद्रांतून अन्न लघ्वंत्रांत प्रवेश करितें. अन्ननालिका जेथें जठरांत शिरते, त्या छिद्रास उत्तर

अगर हृदयच्छिद्र म्हणतात. या जठराची उत्तरसीमा अर्ध चंद्राकार असते. दोन्ही छिद्रांमधील जठराचा जो बाहेरील परिघ त्यास दाक्षिणसीमा म्हणतात. शरीराचें समोरून विच्छेदन झालेलें पाहिलें असतां जठराच्या पुढें यकृतपिंड, मध्यपटलस्नायु व जठरापुढील स्नायु असतात; जठराच्या मागें स्वादुपिंड, डावा मूत्रपिंड व त्यावरील उपमूत्रपिंड, प्लीहा, महास्रोत व त्यास जखडून ठेवणारें अंत्रावरण हीं इंद्रियें असतात. रिक्तस्थितीमध्यें जठर हें वळलेल्या नळी प्रमाणें लहान होतें व महास्रोताचा आडवा भाग जठराच्या रिकाम्या जागीं घुसून बसतो, जठराच्या दाक्षिणछिद्राच्या अलीकडील जठराचा एक इंच भाग नळीसारखा असतो. हें छिद्र अर्धा इंच रुंदीचें असलें तरी बरेंच प्रसरणशील असतें. त्याच्या तोंडाशीं घट्ट संकोचन पावणारे वाटोळे स्नायू बसविलेले असतात. जठराच्या रिक्तावस्थेमध्यें त्याच्या श्लेष्मल अंतर्भागास पुष्कळ वळकट्या असतात. श्लेष्मलत्वचेमागें उभ्या वाटोळ्या व आडव्या अशा स्नायूंचें कवच असल्यामुळें जठरास आपल्या पोकळींतील अन्नावर दाब पाडून अन्नपचन होऊन अन्न आपोआप पुढें लोटलें जावें अशी योजना या स्नायूंची असते. या कवचामागें म्हणजे सर्व जठरावर पापुद्र्यासारखें उदरांतील प्रत्येक इंद्रियास लपेटणारें व जखडणारें अंत्रावरण नामक आच्छादन असतें. यामुळें उदरांतील नानाप्रकारचीं इंद्रियें जागचेजागीं जखडलीं असतात. जठराच्या श्लेष्मलत्वचेंतील वळकट्यांच्या आसपास जठररसोत्पादक सूक्ष्मपिंड व नलिका बहुत असतात. त्या सूक्ष्मदर्शक यंत्रानें दिसतात. ही त्वचा एरवीं फिकट रंगाची असते. परंतु जिवंत प्राण्याच्या जठरांत अन्न आलें, अगर मुद्दाम घातलें किंवा त्या प्राण्यास सुसतें तोंडास पाणी सुटेल असें मिष्टान्न दाखिवलें अगर ही त्वचा बारीक पिसानें डवचून उत्तेजित केली तर ती गुलाबी अगर लाल होऊन अन्नपाचक जो जाठररस तो या असंख्य नलिकांतून घामाप्रमाणें स्रवूं लागतो व पुढें येणाऱ्या अन्नाचें पचन करितो. आंत्रपद्धतीचें सविस्तर वर्णन, 'आंत्रपद्धति' या लेखांत केलेंच आहे. ( पृ.'आ' १०१ ).

पचनेंद्रियाच्या रोगवर्णनांत उदरांत होणाऱ्या रोगांचें वर्णनहि आलें आहे ( उदाहरणार्थ आंत्रपुच्छदाह हा लेख ). हें उदर चिरून त्यांत शस्त्रक्रिया ज्या करतात, त्यांचें वर्णन त्या त्या इंद्रियांचें वर्णन देतांनां त्याच्या शेवटीं दिलें आहे. या लेखांत फक्त पोट चिरून शस्त्रक्रिया करतांनां कोणत्या तत्त्वांच्या अनुरोधानें शस्त्रवैद्यास वागावें लागतें त्याची माहिती दिली आहे. रोग्याची भयंकर अवस्था झाली असतांना नामांकित शस्त्रवैद्यांसहि उदरांतील रोगोत्पत्तीचें निदान करणें म्हणजे समुद्रांतील वस्तु शोधून काढण्यासारखेंच कित्येक वेळां अवघड होऊन जातें आणि अशा वेळेस पोट चिरून आंत बोट अगर पंजा घालून वस्तुस्थिति डोळ्यांनीं पाहून अगर हातांनीं चांचपून जरूर ती शस्त्रक्रिया करणें हाच श्रेयस्कर मार्ग असतो. म्हणजे केवळ रोगांचें निदान करण्यासाठींच पोट अलीकडे चिरतात हा चमत्कार आहे व तें निदान ठरल्यावर बहुधां शक्य असेल तर त्याच वेळेस रोग कायम बरा होण्याची शस्त्रक्रियाहि उरकून घेतात हें नवल होय. यासंबंधीं एका प्रसिद्ध शस्त्रवैद्यानें विनोदानें असें म्हटलें आहे कीं, टेबलावरील चादर काढून त्याचें लांकूड डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय कसल्या लांकडाचें टेबल आहे हें सांगणें अशक्य आहे. रोगाचें निदान करण्यासाठीं शस्त्रक्रिया करणें असेल तर ती रोगाच्या अगदीं आरंभींच करणें उत्तम. सर्व उपाय थकल्यावर व रोग्याची कठिण अवस्था झाल्यावर शस्त्रक्रियेस तयार होणें म्हणजे व्यर्थ होय असेंच सर्व अनुभविक शस्त्रवैद्यांचें मत आहे. वेळेवरच एखादी पोटांतील झालेली गांठ, गळूं, गुतांगुंत, दृढबंधन इत्यादि शस्त्रसाध्य विकृतींचें शस्त्रानेंच यथायोग्य रीतीनेंच समूळ निराकरण केलें असतां जो उत्तम परिणाम घडून येईल तो पुष्कळ औषधें पिऊनहि कदापि होणार नाहीं. औषधें घेतल्यानें कालाचा अपव्यय होऊन वरीलपैकीं एखादी विकृति होती किंवा नाहीं याचा संशय देखील येणें कठिण व तो संशय मृत्यूनंतर प्रेताची तपासणी करूनच फिटावयाचा. या उदरसंबंधीं शस्त्रक्रियेंत यूरोपियन व अमेरिकन शस्त्रवैद्य विशेष प्रगमनशील असण्याचें कारण तेथील सुशिक्षित व समंजस जनतेमध्यें या शस्त्रवैद्यांवर असलेला उत्तरोत्तर वाढता विश्वास हें होय. पूर्वी तिकडे देखील भिषग्वर्य आपापल्या रोग्यास असा धाक घालीत कीं 'पहा शस्त्रवैद्यास रोग दाखवाल तर तो आपलें शस्त्रक्रियेचेंच तट्टू पुढें ढकलणार;' परंतु कालांतरानें शस्त्रवैद्यांच्या नैपुण्यामुळें जनतेचा त्यांवरील विश्वास वृद्धिंगत होऊन त्यास येवढें खास कळून चुकलें कीं खरोखरीच आणीबाणीचा रोग असल्याखेरीज व तो निर्विघ्नपणें यशस्वी रीतीनें पार पाडण्याची धमक आंगीं असल्याखेरीज येवढे विद्वानलोक रोग्याचें जीवित कसें धोक्यांत घालतील? या विश्वासामुळें तेथें या कलेची फार झपाट्यानें प्रगति होऊन तिचें या देशांत अनुकरण व्हावें अशा योग्यतेला ती पोंहोंचली आहे. शस्त्रवैद्य म्हणजे कोणी रुधिरप्रिय खाटिक नसून प्रसंगानुसार चाकूनेंहि रोगनिर्मूलन करणारा तो वैद्यश्रेष्ठच आहे व त्याच्या मतास व शब्दास फार मान देणें उचित आहे हें लोकांस पटूं लागलें. पूर्वी तिकडे अशी वहिवाट होती कीं एकाएकीं उदरांतील रोगानें झालेले व्याधिग्रस्त रोगी रुग्णालयांत ( इस्पितळांत ) भिषग्वर्यांच्या हवालीं करून औषधें, पथ्य इत्यादिकांनीं रोग हटत नाहीं असें पाहून मग शेवटीं त्यास शस्त्रवैद्याच्या हवाली करावयाचें. पण हल्लीं हा प्रकार साफ पालटला आहे. व शस्त्रानें साध्य होणाऱ्या उदरांतील रोग्यांची संख्या व व शक्यता यांची प्रगति उत्तम प्रकारें होत आहे. या उदरांत

ज्या शस्त्रक्रिया करितात त्यांतील वरीच मोठी संख्या अपघातानें अगर शस्त्रानें फाटलेल्या, अगर नासलेल्या अगर रोगानें पुवाळलेल्या आंतड्यावर होणारी असते व त्या क्रिया यशस्वी होण्याचें साधन म्हणजे मर्फी नांवाच्या अमेरिकन डाक्टरनें शोधून तयार केलेला गंड ( बटन–कुड्रुप ) हें होय. याचा उपयोग नासलेलें आंतडें कापून काढल्यावर चांगल्या आंतड्याचीं दोन्हीं टोंकें साधण्याच्या कामीं होतो. हा गंड म्हणजे वर निकल धातूचा मुलामा असलेली दुहेरी डबी एवढी नळी असते व तिचें एकेक टोंक त्या आंतड्यांत झटकन घुसवून देतात. कांहीं दिवसांनीं त्या दोन्ही ताज्या कापलेल्या आंतड्यांचा संयोग झाल्यावर हा गंड ( बटन ) आंतड्यांत पोकळ भागांत सुटून येतो व मळाबरोवर बाहेर पडून जातो. आणखी याचा उपयोग जठर आणि आमाशय (लहान आंतडें) या दोहोंमध्यें कायमचा अन्नरस जाण्याचा मार्ग बनविण्याच्या कामीं होतो. कांहीं असाध्य रोगाची रोगग्रंथि वाढून जठराचें एक तोंड ( आमाशयाशीं संबंध असणारें ) बंद होतें तेव्हां अशा तऱ्हेनें कृत्रिम मार्ग बनविण्यांत येतो. वरच्याप्रमाणें अडथळा आला असतां आमाशय व थोरलें आंतडें अगर आमाशयाच्याच दोन भागांमध्यें कृत्रिम मार्ग करितां येतो. याच साधनामुळें मोठी पित्तवाहिनी आणि आमाशय यांचा संबंध मधील रोगग्रस्त भाग कापून टाकल्यावर जोडतां येतो. हें अमोलिक साधन म्हणजे कल्पकतेची कमाल होय व त्याच्या अभावीं वरील सर्व व्याधिग्रस्त रोगी मृत्यु पावले असते. या गंडाची मौज ही आहे कीं वरीलप्रमाणें संबंध जोडण्यास उशीर विलकूल लागत नाहीं आणि ही शस्त्रक्रिया झटपट आटोपणें ही तर महत्त्वाची बाब आहे.कांहीं शस्त्रवैद्य या गंडाचीं टोंकें रुतूं अगर खुपूं नयेत म्हणून हा गंड स्निग्ध हाडांच्या नळीचा करून ती नळी हे सांधे जोडण्यास उपयोगांत आणितात. जेव्हां शस्त्रक्रियेस अवधि लागला असतां चालण्यासारखें असतें तेव्हां आंतड्याचीं दोन्हीं टोंकें सुई व शस्त्रक्रियेचा दोरा यांनीं शिवणें हा उत्तम मार्ग होय व त्याचाहि अवलंब पुष्कळ वेळां केला जातो. या सर्व व्याधींत असें होतें कीं आंतड्यांत रोगवृद्धीनें जो अडथळा झालेला असतो त्याच्या वरील भागांत पातळ दुर्गंधिमय व कुजणाऱ्या मळाचें विष रक्तप्रवाह दूषित करितें व त्या विषबाधेनें मरण येतें. म्हणून शस्त्रवैद्य अलीकडे असें करितात कीं अडथळयावरील जें आंतडें फुगून ताठ झालेलें असतें त्याचे वेढे अंमळ बाहेर ओढून त्यास शस्त्रानें चीर पाडितात म्हणजे त्यांतील विषारी वायुमय व प्रवाही मळ बाहेर येतो. मग हें आतडें टांकें मारून पुनः पहिल्या जागीं नीट बसवितात. तेणेंकरून विषबाधा होत नाहीं. हा शोध लॅसनटेठ यानें लाविला. शस्त्रक्रियेनंतर तशीं चिन्हें दिसूं लागतांच थोडथोडें व वरचेवर एप्समसॉल्ट हें रेचक मीठ द्यावें ही युक्ति त्यानेंच काढिली. म्हणजे त्या योगानें विषारी मळ व वायु धुवून निघतो व लठ्ठ फुगलेल्या नळाच्या योगानें श्वसन व हृदय क्रिया यांच्या सुरळीत व्यापारास अडचण येत नाहीं. याशिवाय खालील उपचार केले असतांना या शस्त्रक्रियेनंतर मृत्यु येण्याचा संभव फार कमी असतो असा अनुभव येऊं लागला आहे. शस्त्रक्रियेनंतर रोग्यास बसवून शुद्ध मीठ सूक्ष्म प्रमाणांत विरघळविलेल्या शुद्ध कढत पाण्याचा बस्ति सावकाश देणें अगर रोगी फारच अशक्त असेल तर कांखांतून तें पाणी पिचकारीनें टोंचून घालणें. याचा परिणाम असा होतो कीं हें पाणी रक्तांत तेव्हांच मिसळून त्याचा संचय वाढवितें व त्यांत सांचलेलीं विषें धुवून जातात आणि अशास्थितींत जी भयंकर तृषा लागून कोरड पडते ती थांबते. याखेरीज पुढील प्रसंगीं ही शस्त्रक्रिया करितात त्याचें वर्णन विशेष संक्षेपानें दिलें आहे. उदरांत शिरणाऱ्या बंदुकीच्या गोळ्या; या अपघातांत आंतडीं अनेक ठिकाणीं फाडून गोळी पलीकडे जाते, अगर ती बारीक असल्यास हीं छिद्रें पुनः बुजून आंतील विषारी घाण बाहेरून येऊन घातुक आंत्रावरणदाह उत्पन्न करीत नाहींत. या जखमा रणांगणावर झाल्या असतां अनुभव असा आहे कीं जर मॉसर गोळ्यासारख्या बारीक गोळ्या उभयदळें वापरीत असतील तर यांच्या वाटेस विशेष न जावें हेंच बरें व असें केलें तरी सुद्धां शेंकडा ६० शिपाई उठतात. सर्व जंतुरहित शस्त्रोपकरणसिद्धता यथाशास्त्र करून ही असली अवधि लागणारी शस्त्रक्रिया एखाद दुसऱ्या शिपायाकरितां करणें लढाईच्या जागीं शक्य नसतें. कारण शेंकडो हातपाय तुटलेले शिपाई शस्त्रवैद्याच्या मदतीसाठीं खोळंबलेले असतात व शस्त्रक्रिया जरी केली तरी बरेच रोगी दगावतात असा अनुभव आहे. रोग्याचा एकदम गळाठा होऊं लागल्यास छिद्रें मोठीं असून रुधिर स्राव उदरांत सुरू आहे असें समजावें. त्यावेळीं काल, उपकरणें व सहाय्य यांच्या मानानें शस्त्रक्रिया करितात व गोळ्या शोधून काढितात व रक्तस्राव थांबवून भोंकें मिटवितात खंजीर, तलवार, इत्यादिकांनीं उदरांत खुपसून झालेल्या खोल जखमाः यांचें पर्यवसान अतिभयंकर असतें. याचें कारण त्या शस्त्राबरोबर होणारा आंत्रावरण दाहोत्पत्तिकारक जंतुप्रवेश हें आहेच, शिवाय आंतडीं ही शस्त्रानें फाटून रक्तस्राव होणें हें दुसरें कारण. या जखमांमध्यें इतर जखमा तपासण्याचे वेळीं जशी सळई घालून त्यांची खोली, रुंदी, दिशा वगैरे तपासतात तसें अगदीं करतां कामा नये. उत्कृष्ट यथाविधि सिद्धता करून या जखमा कुशल शस्त्रवैद्यास आंतडीं शिवून अगर तुटलेली शीर अगर धमनी बांधून सांडलेलें रक्त टिपून काढून रोग्याचे प्राण वांचविता येतात. बंडीची बाही आंत दुमडून बाहीची पोकळी बंद होऊन जसा आंत हात घालतां येत नाहीं तशी स्थिती लहान मुलांचे कांहीं रोगांत नळाची होऊन शौचमार्ग बंद होतो व कांहीं वेळ लोटला असतां मूल आसन्नमरण होतें. पूर्वीं शस्त्रवैद्य पाण्याचा मोठा बस्ति देऊन ही गुंतागुंत सोडविण्याचा प्रयत्न करीत पण तो

बहुधा यशस्वी होत नसे. उलट पाण्याच्या अतिरेकानें आंतडें फुटून मूल मात्र दगावतें. हल्लींचें शस्त्रवैद्य दुसरें तिसरें कांहीं न करतां उदर चिरून तें विवक्षित आंतडें चांचपून फक्त त्याची आंत दुमडलेली व त्यामुळें शौचमार्ग बंद करणारी घडी मोकळी करितात. फारच थोड्या प्रसंगीं रोगोद्भव बराच झाला असल्यामुळें त्यास ही घडी मोकळी करितां येत नाहीं. पण हीं उदाहरणें अपवादात्मक होत. क्यान्सर ग्रंथि हा एक दुःसाध्य रोग आहे, पण तो शस्त्रानें कापून काढिला असतां रोग्याचें जीवित लांबवितां येतें. अगर नळाचा रोग बराहि होतो. हा रोग झालेला नळाचा भाग काढून टाकितात व दोन्ही टोकें शिवून शौचमार्ग तयार होतो, व हा रोग मोठ्या आंतड्यास असेल तर रोगी साफ बराहि होतो. याच्या आधोभागीं रोग वाढला असतां मलोत्सर्ग न होण्यासाठीं कंबरेंत डावे नळावर छिद्र पाडून त्यांतून तो होण्याची तजवीज करीत. पण आतां हें छिद्र डाव्याजांगांत तयार करितात व त्याचे तोंडाशीं आंतड्याचा भाग ओढून आणून शिवतात, व तेथें तें आंतडें मांसलत्वचेशीं संयुक्त होतें. थोडे दिवसांनीं त्या आंतड्यास आडवें छिद्र पाडतात व नंतर गुदद्वाराचे ऐवजीं येथूनच मलोत्सर्जन होतें यास कृत्रिम गुदद्वार असें म्हणतात. दुसरी शस्त्रक्रिया करीपर्यंत रोगी नळ फुगून अत्यवस्थ होईल असें वाटल्यास त्यांत एक कांचेची विशिष्ट नळी अडकवतात व त्यास रबर लावतात त्या मार्गानें घाण निघून जावी अशी चातुर्यानें योजना केलेली असते व यामुळें ही विषारी घाण आंत्रावरण दूषित करीत नाहीं व जखमेचा बाहेरील भागहि दूषित करीत नाहीं व शस्त्रक्रिया यशस्वी होते.

**उदलगुरी**—आसाम. दरंग जिल्ह्यातील मराळदाइ पोट विभागांतील एक गांव. हें हिमालयाच्या पायथ्याशीं आहे. हिंवाळ्यांत या ठिकाणीं यात्रा भरते तेव्हां ल्हासा प्रांतांतील टोवंग येथील पुष्कळ लोक यात्रेला येतात. बाहेरून येणारे व्यापारी जिन्नस—तट्टें, बकरीं, सकलादी, मीठ व याक जनावरांच्या शेंपट्या हे होत. येथून बाहेर जाणारे व्यापारी जिन्नस तांदूळ, कापूस रेशमी कापड व पितळेचीं भांडीं इत्यादि. हिंवाळ्यांत या ठिकाणीं एक दरबार भरत असतो. त्यावेळेस तिबेटी लोक सरकारच्या हुकुमानें तट्टांवर बसून चिनी पोषाख घालून येतात. तो देखावा पाहण्यासारखा असतो. हिंवाळ्यांत उदलगुरी किल्ल्यावर ४६ शिबंदी असते.

**उदाजी चव्हाण.**—उदाजीचा आजा राणोजी चव्हाण हा मालोजी घोरपड्याजवळ चाकरीस होता. राणोजी लढाईत पडल्यावर त्याचा मुलगा विठोजी यास मालोजीनेंच वाढविलें. मालोजीच्या मृत्यूनंतर विठोजी चव्हाण व संताजी घोरपडे यांनीं बादशहाच्या तंबूवर छापा घालून सोन्याचे कळस काबीज करून आणिले(म. रि. पू. ६२७). त्यावेळीं हिंमतबहादूर हा किताब विठोजीस मिळाला. तेव्हांपासून विठोजी रामचंद्रपंताच्या हाताखालीं असे. इ. स. १६९६ सालीं कर्नाटकांत युद्ध चालू असतां विठोजी मारला गेला. नंतर त्याचा पुत्र उदाजी यास हिंमतबहादूर पदाचीं वस्त्रें मिळालीं. उदाजीहि पूर्वजांसारखाच पराक्रमी असून यावेळीं ताराबाईच्या पक्षांत जाऊन शिरोळ, रायबाग, विजापूर एवढ्या टापूंत दंगा करीत होता. शाहूला तो बंडखोर वाटे. परंतु संभाजीचा तो केवळ मुख्य साह्यकर्ता होता. त्यास प्रथम रामचंद्रपंत अमात्यानें वाढविलें. तो बलाढ्य व पुंड असून त्याच्याच आधारावर संभाजीनें शाहूशीं थोडीबहुत धडपड चालविली होती तेव्हां बाजीरावानें त्यास चांगलें धाकांत ठेविलें.

इ. स. १७२९ त बाजीराव व चिमाजी आपा दोघेहि बाहेर गेलेले पाहून उदाजी चव्हाणानें वारणेच्या तीरीं येऊन मुलूख लुटण्यास आरंभ केला. शिरवळच्या ठाण्यांत राहून बाहेरच्या मुलखास तो उपद्रव देऊं लागला. एके दिवशीं शाहू त्या बाजूस शिकारीस गेला असतां, चव्हाण जवळच आसपास आहे असें कळलें. त्यावरून अभय देऊन शाहूनें त्यास भेटीस बोलाविलें. भेट होऊन तो परत गेला. पुढें एके दिवशीं शाहूला मारण्यासाठीं आलेले चार मारेकरी जंगलांत भेटले. चव्हाणाकडून किंवा संभाजीकडून ते आले होते असें कळलें. तेव्हां संभाजीचें व चव्हाणाचें पारिपत्य करण्याचा विचार करून शाहूनें त्यासाठीं मोठी तयारी केली. सर्वांस पत्रें लिहून मोहिमेस बोलाविलें. त्रिंबकराव दाभाडे यांसहि शाहूनें ( रोजनिशी ले. ४६) पत्र लिहिलेलें आहे. 'हेरलें येथील वाडा घेऊन कोल्हापुराभोंवतें राहून चव्हाणास तंबी पोंचविणें, लांब न जाणें,' अशी शाहूची आज्ञा सेनापतीस आहे. सिधोजी थोरात, दावलजी सोमवंशी, राणोजी घोरपडे इत्यादि अनेक लहान मोठ्या सरदारांस उदाजी चव्हाणावर चालून जाण्याची शाहूनें आज्ञा केली ( रोजनिशी ले. २१५,२१६ ). आपण स्वतः वारणेच्या बाजूस तळ देऊन पलीकडे कोल्हापुरच्या राज्यांत त्यानें मोहीम सुरू केली. निजामास सामील झाल्यावेळेपासून प्रतिनिधि शाहूच्या मनांतून पुष्कळ उतरला होता, आणि कांहीं तरी पराक्रम दाखवून पुन्हां शाहूची मर्जी संपादावी अशी त्यास उत्कंठा झाली होती. तेव्हां शाहूनें तरी त्याची परीक्षाच पाहण्याकरितां बाजीराव वगैरे जवळ असतांहि मुद्दाम प्रतिनिधीस चव्हाणावर रवाना केलें.

उदाजी चव्हाणानें संभाजीस हिंमत देऊन शाहूमहाराजांशीं लढण्यास प्रवृत्त केलें. संभाजीनें आपल्या अष्ट प्रधानांस व सरदारांस पत्रें पाठवून आपापल्या फौजांसह हजर होण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें सर्व फौज येऊन वारणातीरीं जमा झाली. व्यंकटराव घोरपडे व भगवंतराव अमात्य हेहि या फौजेंत होते. पण त्यांची भक्ति अंतर्यामी संभाजीकडे नव्हती. शाहूची तयारी होतांच त्यानें श्रीनिवासराव प्रतिनिधी यास संभाजीवर चालून जाण्याचा हुकूम केला. प्रति निधीनें अकस्मात येऊन घालतांच संभाजीच्या

फौजेची दाणादाण होऊन, संभाजी व उदाजी चव्हाण सडेच पळून गेले. यानंतर संभाजीचा व शाहूचा तह झाला तरी शाहूच्या राज्यांत दंगा करण्याचें काम उदाजीनें चालूच ठेविलें होतें. त्याचा व संभाजीचा प्रधान केशव त्र्यंबक यांचा पत्रव्यवहार होता ( खं. ८ ले. १३३ ). इ. स. १७३१–३२ त यशवंतराव महादेव पोतनीस यास शाहूनें त्याजवर पाठविलें. यशवंतरावानें त्याचा मोड करून मोठा दंड घेऊन सोडून दिलें (शा. म. च. पृ. ६५व रा. खं २ पृ.६९) आणि शाहूनें त्यास कामगिरीहि सांगितली (रोजनि- ले. २२० ); त्यानंतर पुनः मिरजेवर स्वारी करण्याकरितां म्हणून इ. स. १७३७ त शाहू निघाला असतां उदाजी चव्हाण गनिमाची कुमक करूं लागला म्हणून त्याजवर शाहूनें प्रतिनिधीस रवाना केलें ( शा म. च. ६१, ७० व रा. खं. २ पृ. ७७ ). चव्हाण पळून मोगलाईंत गेला. ता. ८ नोव्हेंबर रोजीं प्रतिनिधीनें अथणीचें ठाणें काबीज करून मध्य रात्रीं निशाण चढविलें ( इ. सं. पे. द. मा. ले. ३९ ); चव्हाण मोंगलाईतून परत आला नाहीं. मधून मधून त्रास देतच होता त्याचा निःपात होय ते गोष्ट करणें, म्हणून त्रिंबकराव सोमवंशी यास इ. स. १७४८ सालची शाहूची आज्ञा आहे ( खं ६–१८७ ). नानासाहेब पेशव्यानें इ. स. १७५१ त युक्तीनें उदाजीस मोगलाईतून आणून डिग्रज येथें सरंजाम देऊन ठेविलें. तेथें अद्याप त्याचा वंश आहे ( का. सं. प. या.१४४ व ४२२ ). तथापि उदाजीची खोड गेली नाहीं. डिसेंबर १७५२ त व फेब्रुवारी १७५३ त त्याज- वर नानासाहेबांनीं स्वाऱ्या केल्याचे उल्लेख आहेत ( शा. म. रो.२२६, २२७, २३०, २३२), त्यांत 'पेशव्यामें उदाजीचा उपद्रव न लागेल असा बंदोबस्त केला. उदाजीचा शेवटहि लढाईंतच झाला. मिरज प्रांतीं एका खेड्यावर रोखा केला तो गांवकऱ्यांनीं मानला नाहीं, त्यावरून, उदाजीनें गांवावर स्वारी केली, त्यांत घोडीस गोळी लागली, ती उधळली रिकिबींत पाय अडकून डोकें फुटून मेले. पुत्र विठोजी डिग्रजेस व प्रीतिराव करविरीं शिवाजी महाराजांपाशीं राहिले.' असें आहे. [ मराठी रियासत मध्य विभाग भाग २ रा ]

**उदाजी पवारः**—पुण्याच्या ईशान्येस १५ कोसांवर मल- ठण गांव आहे. तेथील रहाणारे हे पवार धारच्या मूळच्या परमार घराण्याचे वंशज. शिवाजीमहाराजांच्या वेळीं संभाजी पवार हा मलठणचा पाटील असून महाराजांच्या सैन्यांत होता. याला एकंदर तीन पुत्र उदाजी, आनंद व जगदेव ( हिं. ऐ. राज्यें. पृ. २३८ ). औरंगजेबाच्या विरुद्ध मराठ्यांनीं रजपुतांस मदत दिली, त्यावेळीं १६९८ मध्यें, उदाजीनें माळव्यांत शिरून मांडवगडास तळ दिल्याचा उल्लेख आढ- ळतो. तथापि तेथें कायमचें वास्तव्य करण्यास उदाजीस सवड झाली नाहीं ( म. रि. म. वि. भा. १ पृ. ३५५ ). माळवा व गुजराथ या ठिकाणीं प्रारंभीं मराठ्यांचा जम बस- विणारा मुख्य इसम उदाजीच होता, असें १७२६ त शाहूनें ठरवून दिलेला ९ कलमी तह आहे त्यावरून दिसतें. १७१८ च्या नोव्हेंबरच्या सुमारास बाळाजी विश्वनाथ, सय्य- दाच्या मदतीस दिल्लीस गेले, तेव्हां उदाजीहि बरोबर होता. तिकडून १७२० त परत आल्यानंतर बाळाजीपंत नानांनीं जी सरंजामपद्धति ठरवून दिली, तींत उदाजीस माळव्यांत मुलूख दिला होता. उदाजी हा लहानपणीं पहिल्या बाजीरा- वाचा खेळगडी होता. त्यानें १७२४ त धार येथें आपलें ठाणें बसविलें. १७२७ च्या मार्चांत पेशवे कर्नाटकांत गुंतले असतां इकडे निजामनें महाराष्ट्रांत गडबड उडवून दिली, तेव्हां शाहूनें उदाजीस इकडे येण्याबद्दल निकडीचे हुकुम पाठविले होते. पुढें पुढें उदाजी हा बाजीराव यांनां डोईजड झाला; अखेर १७२८ त दोघांचें वाकडें येऊन, श्रीमंतांनीं त्याला कैदेंत टाकून त्याचा सरंजाम आनंदरावास दिला, परंतु तो लवकरच कैदेंतून सुटला. १७२९ च्या सुमारास होळकरानें व उदाजीनें मांडवगड काबीज केल्याचा उल्लेख आहे. पुढें माळ- व्याचा अंमल सुरळीत चालेना, तेव्हां १७३० च्या वेळीं उदा- जीनें, तिकडील मराठ्यांचे स्नेही नंदलाल मंडलोई यास जरबेचें पत्र लिहिलें आहे. डभईचे लढाईंत उदाजी हा बाजीरावाच्या विरुद्ध दाभाड्याकडून लढत होता. अखेर त्याचा पाडाव झाला.

यानंतर, दायबहादुराशीं मराठ्यांची जी ( १२–१०– १७३१ ) मांडवघाटावरील तिरलाची लढाई झाली, तींत उदाजीनें चांगला पराक्रम गाजविला. यापुढें १७३६ च्या सिद्दीवरील मोहिमेंत शाहूमहाराजांनीं उदाजीस येऊन मिळ- ण्याची आज्ञा केली त्याप्रमाणें तो आला होता. त्यानें त्या- वेळीं सिद्दी अंबर याच्याशीं लढाई करून त्याला ठार मारून गोवळकोटास वेढा दिला होता. यापुढील उदाजीची हकीकत समजत नाहीं. [ मराठी रियासत मध्यविभाग, पृ.३५५ पुढें. ]

**उदासी**—शीखांच्या धार्मिक पंथामध्यें 'उदासी' हा एक प्रमुख पंथ आहे. ह्या पंथास "नानकपुत्र" असेंहि म्हणत असून हा बराच जुना पंथ असावा. ह्या पंथाची स्थापना गुरु नानकाचा वडील मुलगा श्रीचंद यानें केली असें समजतात. शीखांचा तिसरा गुरु अमरदास यानें लढवय्या जातीच्या शीखांपासून उदासी पंथाच्या लोकांस वेगळें केलें. कांहींचे म्हणणें असें कीं हें पंथविभागणीचें काम शीखांचा पांचवा किंवा सहावा गुरु अर्जुन यानें केलें. कसेंहि असलें तरी ह्या विभागणीवरून शीखांनीं मोंगलसत्तेविरुद्ध टिकाव धरून राहाण्याकरितां समाजघटनेच्या केलेल्या प्रयत्नांची कल्पना येते. ह्या विभागणीमुळें उदासी पंथाचें स्वरूप हिंदु धर्मासारखेंच राहिलें. परंतु यामुळें उदासी- पंथास आपल्या अनुयायांची संख्या वाढविण्यास किंवा मूळ शीखधर्मगुरूंच्या शिष्यवृंदांपैकीं कांहीं लोकांस आपल्या पंथांत सामील करून घेण्यास बिलकुल अडचण पडली नाहीं. उदाहरणार्थः—सहावा शीखांचा धर्मगुरु

हरगोविंद यानें श्रीचंद यास आपला थोरला मुलगा गुरुदत्त यास आपला पट्टशिष्य करून घेण्याची मोकळीक दिली असें म्हणतात.

उदासी पंथाचे प्रथम चार भेद (धुआन = अग्नि) पडले. व त्यांचे संस्थापक अनुक्रमें बाबा हसन, फूल गोंदा व अल्मस्त हे असून त्यांपैकीं पहिलें नांव मुसुलमानी असून शेवटचें शुद्ध अरबी आहे व हे चौघे पुरुष गुरुदत्त याचे शिष्य होत. अल्मस्त साहिब यांचें मंदिर नैनिताल व जगन्नाथ येथें दाखीवण्यांत येत असतें, परंतु हीं स्थानें एकंदर शीखांचें मुख्य ठिकाण पंजाब याजपासून पुष्कळ दूर आहेत. गोंदासाहेबाची पूजा सिंधमधील शिकारपूर या ठिकाणीं व पंजाबमध्यें अमृतसर येथील एका मंदिरांत करण्यांत येत असते. व बाकीच्या दोघांचीं मंदिरें पंजाब मधील डोंगरपठारावर मात्र आहेत. ह्यावरून शीखसंप्रदायाचा विस्तार व्हावा या हेतूनें शीखांच्या धर्मगुरूंकडून कसे प्रयत्न करण्यांत आले याचें प्रत्यंतर मिळतें. ह्या पंथांतील सर्व अनुयायांची मिळून " बडा आखाडा " अशी एक सभा असून मागाहून सातव्या " हरराय " नांवाच्या शीख गुरूच्या "फेरू" नांवाच्या शिष्यानें "छोटा आखाडा" ही संस्था स्थापन केली. सर्व उदासी अविवाहित असतात. व जे ब्रह्मचर्य कडक रीतीनें पाळतात त्यांनां 'नंगे' म्हणतात. सर एडवर्ड मॅक्लेगन यानें त्याजविषयीं म्हटलें ( सेन्सस ऑफ इंडिया. १८९१ भाग १९ )आहे कीं जरी ते नेहमीं तांबडी वस्त्रें वापरतात तरी त्यांपैकीं बरेच लोक केवळ कटिवस्त्राशिवाय सर्व शरीर उघडें ठेवून अंगास राख फांसून फिरतात. ह्यांनांच ' नंगे ' ही संज्ञा लावण्यांत येते.

" भगत भगवान् " या नांवाचा एक पोटपंथ असून तो या चारांपैकींच एक आहे असें म्हणतात. परंपरेवरून ह्या पंथाचा हिंदु धर्माशीं कांहीं तरी संबंध असलेला दिसतो, कारण ह्याविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं एक ' भगदगीर ' नामक संन्यासी बलुचिस्तानांतील हिंगलाज क्षेत्रास यात्रेकरितां जात असतां वाटेंत शीख धर्माचा संस्थापक गुरु नानक ह्याचा ' डेरा ' पहाण्याकरितां गेला. तेथें नानकाचा नातु धर्मचंद यानें भगदगीर यांच्या भिक्षापात्रांत अन्न ओतलें परंतु ते भरेना. परंतु जेव्हां त्यानें श्रीगुरूचें नांव घेऊन थोडी प्रसादाची चिमूट पात्रांत टाकली त्यावेळीं तें भिक्षापात्र पूर्ण भरलें. ह्या चमत्कार पाहून भगदगीर यानें शीखसंप्रदायाची दीक्षा घेतली, व सर्व अनुयायांसह धर्मचंदाचा शिष्य होऊन तो स्वतःस 'भगत भगवान' म्हणवूं लागला. हे लोक जटा धारण करतात व अंगाला राख लावतात, परंतु नानकानें घालून दिलेल्या आचरणाचे नियम पाळतात.

उदासी पंथामध्यें ' संगत साहीब ' हा जो पंथ आहे तो मात्र ह्या चार पोटपंथांबाहेरचा आहे. शीखांचा सातवा गुरु हरराय याचा ' फेरू ' नांवाचा आचारी होता; त्याला हररायानें उपदेश देऊन शीखांवरील धार्मिक कर वसूल करण्याचें काम सांगितलें होतें. परंतु अशा प्रकारच्या जुलमांनीं शीख लोक संत्रस्त झाल्यामुळें पुढें गुरु गोविंद सिंग यानें ही वसुलीची चाल बंद केली. परंतु त्यावेळीं फेरू यानें कसल्याहि प्रकारचा अडथळा न केल्यामुळें गोविंदसिंगानें त्याजवर संतुष्ट होऊन ' संगत साहीब ' ही त्यास पदवी दिली व आपला संप्रदाय प्रसृत करण्यास अनुज्ञा दिली. ह्या पंथाची दाक्षिण व पश्चिम पंजाबमध्यें बरीच प्रसिद्धि आहे, परंतु आख्यायिकांवरून हा पंथ शीख गुरूंच्या वर्चस्वाखालीं पूर्णपणें असतो असें दिसत नाहीं.

दुसऱ्या एका आख्यायिकेप्रमाणें ह्या पंथाच्या संस्थापनेचा मान गुरु गोविंदसिंगानें धर्मांतर करविलेला सुप्रसिद्ध सुलतान सखीसखर याजकडे देण्यांत येतो. ह्या पंथाचा अमृतसर येथें ब्रह्मभूत आखाडा व लाहोर येथें एक संस्था आहे, त्यावरून हा पंथ नानकाच्या जुन्या शीख संप्रदायाशीं निगडित झाला असावा. ह्या पंथामध्यें गुरु नानकाच्या आदिग्रंथास फार मान आहे. शेवटीं राहिलेल्या ' रामदास उदासी ' पंथाबद्दल माहिती सांगितली पाहिजे. नानक याच्या एका शिष्याचा नातु गुरुदत्त यानें ह्या पंथाची स्थापना केली. ह्या पंथाचें रामदास या ठिकाणीं एक मंदिर आहे. उदासी संप्रदायाच्या प्रत्येक पोटपंथाची वर्गण्या जमवून एकंदर व्यवस्था करण्याकरितां एक सुयंत्रित संघटना आहे. ह्या प्रत्येक पोट पंथाचा एक मुख्य "श्री महंत" असून त्याच्या हाताखालीं दुसरे महंत असतात.

उदासी पंथामध्यें सर्व हिंदु जातींमधून लोक घेतले जातात, इतकेंच नव्हेतर कोणाहि हिंदूच्या हातचें अन्न घेतात. हे लोक काशी, अमृतसर इत्यादि ठिकाणीं प्रवास करीत असतात परंतु त्यांचीं मुख्य ठिकाणें पंजाबचा मध्यभाग रोहटक जिल्हा इत्यादि होत. ह्या लोकांचे आचार विचार सारखे नाहींत. ह्यांपैकीं कांहीं जटा राखतात, कांहीं सर्व केस काढतात, कांहीं लोक तिलक लावतात तर कांहीं लावीत नाहींत. मृतांचें दहन करण्यांत येतें व कधीं कधीं दफनहि करण्यांत येतें. ज्या ठिकाणीं एखाद्या महंताचा दहनविधि होतो त्याठिकाणीं एक समाधि बांधण्याची चाल आहे. ह्यांपैकीं बहुतेक तापसीवृत्तीचेच असतात, परंतु कांहीं थोडे उघडपणें किरकोळ धंदे करतात.

अशा रितीनें उदासी पंथामध्यें, व हिंदु धार्मिक पंथामध्यें आढळून येणारे सर्व विशेष म्हणजे उच्च ध्येय, परंतु व्यवहारांत त्याचा पदोपदीं त्याग, जुन्या संप्रदायाशीं तेढ न येईल अशा रितीनें केलेला नवीन मताचा पुरस्कार व तपस्वीवृत्तीच्या ब्रह्मचारी पंथाचें आनुवंशिक जातींमध्यें अपरिहार्य पर्यवसान इत्यादि गोष्टी पूर्णपणें आढळून येतात.

उंदिरखेड—मुंबई. पूर्व खानदेश. पारोळयाच्या नैर्ऋत्येस ३ मैलांवर हें एक खेडें असून येथें बोरी नदीमध्यें एका बेटावर श्री नागेश्वर महादेवाचें देऊळ आहे. हें देऊळ पेशव्यांनीं त्रिंबकराव मामा पेठे यांस हा गांव जहागीर दिला त्यावेळीं (सुमारें १७५५) त्यांनीं बांधलें असें सांगतात.

उंदीर.—रोडेंट नांवाच्या कुरतडणाऱ्या सस्तन प्राण्यांची ग्लायर नांवाची एक पोटजात आहे त्या जातीमध्यें उंदरांचा अंतर्भाव होतो. या उंदरांचे तीन भेद पाश्चात्य प्राणिशास्त्रकोविदांनीं केले आहेत. ( १ ) मुस मुस्कुलस–घरगुती उंदीर, ( २ ) मुस सिल्व्हॅटिकस—रानटी उंदीर, ( ३ ) मुस मिन्यूटस–पिकांच्या वेळीं येणारे उंदीर.

( १ ) मुस मुस्कूलस—हा घरगुती उंदीर जगाच्या पाठीवरील सर्व देशांत आढळतो. याच्या पाठीचा भाग काळसर निळसर असून खालचा भाग फिकट पिवळा असतो. याच्या डोक्याच्या लांबीच्या निम्यानें याचे कान असतात, पण ते रुंदट असतात. शेंपूट अंगापेक्षां आंखुड असतें. याचें डोकें पुढें आलेलें, दांत अणकुचीदार, व डोळे तीक्ष्ण असतात. या उंदरांची मूळ वसति मध्यआशियामध्यें असून नंतर हे सर्व जगभर पसरले असें बॅरेट, हॅमिल्टन वगैरे तज्ज्ञांनीं ठरविलें आहे. कारण मध्यआशियांत या घरगुती उंदरांशीं शारीरदृष्ट्या साम्य असलेल्या मुस बॅक्टियानस व मुस बॅग्नेरी या दोन जाती आहेत व त्यांच्यामध्यें व या घरगुती उंदरामध्यें गुणांत पुष्कळच सारखेपणा दृष्टीस पडतो. हे घरगुती उंदीर मनुष्य वस्तीपासून दूर रहात नाहींत; कारण त्यांचें जीवित माणसांवरच अवलंबून असतें. त्रास न देणाऱ्या इसमाजवळ हे मोठ्या धिटाईनें जतात. यांच्यामध्यें उत्पत्तीचें प्रमाण मोठें असल्यानें व चोरटेपणाची या जातीला हौस असल्यामुळें हे उंदीर घरादाराची नासधूस करतात. पीठ, भाकर, दुभतें लोणी वगैरे सांपडेल त्या जिनसावर ताव मारण्यास ते कमी करीत नाहींत. घरगुती उंदरांचा शत्रु म्हणजे मांजर; पण मांजराला देखील घरांतून सर्व उंदरांचें उच्चाटण करतां येत नाहीं.

( २ ) मुस सिल्व्हॅटिकस—रानटी उंदीर. हा उंदीरहि सर्व देशांत अढळून येतो. घरगुती उंदरापेक्षां याचें शेंपूट लांब असतें. याचा वरचा भाग तांबूस पिंगट रंगाचा व खालचा भाग फिकट रंगाचा असतो. याच्या छातीवर, पिंगट रंगाचा एक ठिपका अढळून येतो. हा उंदीर रानांत, अगर डोंगराच्या आश्रयानें बिळें करून राहतो. थंड प्रदेशांत हिंवाळयांत बाहेर पडतां येत नाहीं यासाठीं तो हिंवाळयापुरता बिळांत धान्याचा सांठा करून ठेवतो. या उंदराचा शेतकऱ्यांनां फार त्रास होतो.

( ३ ) मुस मिन्यूटस—हंगामी उंदीर. हा आकारानें वरील दोहोंपेक्षां लहान पण दिसण्याला फार सुंदर असतो. याच्यीं शरीराची लांबी फार झालें तर तीन इंच असते. त्याचा रंग फिकट–तांबूस असा असतो; व त्याच्या शरीराच्या ठेवणीप्रमाणें त्याचे कान, डोळे, शेंपूट हीं लहान असतात. या उंदराची जात नेहमीं गव्हाच्या अगर इतर धान्याच्या शेतांत आपलीं बिळें करून रहाते. या उंदराच्या पुष्कळ पोटजाती आहेत. या हंगामी उंदरांचा प्रचार इंग्लंडपासून जपानपर्यंतच्या मुलखांत आढळून येतो.

हिंदुस्थानांतहि उंदरांचा भरणा मोठा असून, त्यांच्या निरनिराळया जाती प्राचीन ग्रंथकारांनीं सांगितल्या आहेत. या जातींपैकीं, लालन, पुत्रक, कृष्ण, हंसिर, चुच्छुंदर, अलस, कषायदंत, कलिंग, अजित, कपिल, कोकिल इत्यादि प्रमुख जाती आहेत.

उंदरांचें विष फार बाधक आहे. निरनिराळया जातींच्या उंदरांच्या विषाचे परिणाम निरनिराळया तऱ्हेनें मनुष्याच्या प्रकृतीला अपायकारक होतात. उंदराचें विष, त्याच्या शुक्रामध्यें मुख्यत्वेंकरून असतें.आणि त्याच्या मूत्रांत, विष्टेंत, नखांत व दांतांतहि असतें. उंदराचें शुक्र मनुष्याच्या शरीराच्या कोणत्याहि भागाला लागलें असतां, किंवा शुक्र लागलेला उंदराच्या शरीराचा अवयव मनुष्याच्या कोणत्याहि अवयवाला लागला असतां, तेथील रक्त दूषित होऊन तें सर्व शरीरांत भिनतें व त्यामुळें गांठी, फोड, भयंकर त्वचेचे रोग उत्पन्न होतात. तसेंच पीडा, ज्वर, प्रबळ मूर्च्छा, वांती, रोमांच वगैरेहि लक्षणें होतात.

उंदराच्या अंगीं उपजतच धूर्तपणा असतो असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे. नार्वे देशांतील उंदरांची मनोरंजक हकीकत एका मासिक पत्रांत छापली होती, त्याचा सारांश असाः—नार्वे व स्वीडनमध्यें कोलेन डोंगराच्या खोऱ्यांत उंदीर पुष्कळ सांपडतात. त्यांची वाढ जलद असल्यानें, दहाबारा वर्षांत त्यांस अन्नाचा तोटा पडतो. त्यामुळें पुष्कळांना अर्धपोटीं रहाण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून कांहीं उंदीर आपले प्राण इतर उंदराच्या कल्याणाकरतां अर्पण करण्यास तयार होतात. ही गोष्ट खरी असेल तर तें एक आश्चर्यच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

उंदरांच्यामुळें प्लेगाची सांथ पसरते. प्लेग सुरू झाल्याचीं चिन्हें दिसूं लागतांच उंदीर धरून मारण्याची वहिवाट आहे. पण जपानी लोकांनीं मात्र या उंदरांना धरून, त्यांच्यापासून थंडीच्या निवारणार्थ उंदरांच्या कातड्याच्या कानटोप्या बनविण्याची नवीन पद्धत शोधून काढली आहे.

[ संदर्भ ग्रंथ—बीटन–डिक्शनरी ऑफ नॅचरल हिस्टरी; बॅरेट हॅमिल्टन–नोट ऑन दि हार्वेस्ट माइस ऑफ दि पॅली ऑर्टिक रीजन ( ॲनल्स ॲण्ड मेगेझाईन ऑफ नॅचरल हिस्टरी. एप्रिल १८९९ ). ]

**उदेपुरी बेगम**—औरंगजेब बादशहाची एक बायको. कोणी ह्मणतात कीं ती रजपूत असून उदेपूरच्या शिसोदिया घराण्यांतील होती. औरंजेबाचा समकालीन प्रसिद्ध व्हेनेशियन प्रवासी मनुची हा सांगतो कीं, ती दाराच्या जनानखान्यातील एक जॉर्जियन बटकी असून दाराच्या वधानंतर ती औरंगजेबाची रखेली होऊन राहिली (आयार्व्हिन-स्टोरिया डो मोगोर, १,३६१; २.१०७ ). ती त्यावेळीं अगदीं तरुण असली पाहिजे,कारण इ. स. १६६७ त तिला पहिलें मूल झालें. औरंगजेब उदेपुरीचा मुलगा कामबक्ष याच्यावर रागावला ह्मणजे त्याला 'बटकीचा पोर' "नायकिणीचा पोर' वगैरे नांवांनीं संबोधी. औरंगजेबाच्या मृत्यूसमयीं तिनें दुःखानें स्वतःला जाळून घेण्याची इच्छा दर्शविली. त्यावरून टॉड कल्पना करितो कीं, ती रजपूत जातीची असावी ( ॲनल्स ऑफ मेवार, प्र. १३, टीप ). पण मुसुलमान झालेल्या रजपूत स्त्रियांना मुसुलमानी धर्माप्रमाणें मूठमाती देत, जाळीत नसत. तेव्हां नवऱ्याच्या शोकानें उदेपुरीनें स्वतःला जाळण्यासंबंधीं काढलेल्या उद्गारावरून ती रजपूत होती असें ठरत नाहीं ( सरकार—हिस्टरी ऑफ औरंगजेब १, प्र. ४ ).

या ख्रिस्ती सुंदरीवर औरंगजेबाची फार मर्जी असे. तिला मद्यप्राशनाची त्यानें मोकळीक ठेविली होती. तिच्याकडे पाहून बादशहा कामबक्षाचे सर्व अपराध पोटांत घाली. औरंगजेबाच्या मरणसमयीं उदेपुरी सारखी त्याच्या उशाशीं बसून रडत होती. एकदां उदेपूरच्या राजाशीं युद्ध चालू असतां रजपुतांनीं उदेपुरीस पळवून नेली होती, पण लवकरच त्यांनीं तिला सोडून दिलें. ( मु. रियासत १ प्र. २६).

**उदेपूर संस्थान**-(मोठें) याला मेवाडहि म्हणतात. उदेपूर संस्थान राजपुतान्याच्या दक्षिणेस असून उत्तर अक्षांश २३° ४९' ते २५° ५८' व पूर्व रेखांश ७३° १' ते ७५°४९' यांमध्यें असून याचें क्षेत्रफळ १२६९१ चौ. मै. आहे. याच्या चतुःसीमाः— उत्तरेस अजमीर, मारवाड व शहापूर संस्थानें; पश्चिमेस जोधपूर आणि सिरोहि; दक्षिणेस डोंगरपूर, बन्सवाडा, प्रतापगड; पूर्वेस शिंदे सरकारचा प्रांत.

संस्थानचा उत्तरेकडील व पूर्वेकडील भाग उन्नत असून ईशान्येकडे उतरत गेलेला आहे. दक्षिण व पश्चिम भाग बहुधा डोंगराळ व जंगली आहेत. नैर्ऋत्येकडील प्रदेशाला मेवाडचा पहाडी प्रदेश म्हणतात व यांत अरवलीचा भाग समाविष्ट होतो. समुद्रसपाटीपासून अरवली २३८३ फूट उंच असून सर्वांत उंच शिखर ४३१५ फूट उंचीवर आहे. पूर्व सीमेवर मंडलगड किल्ला असून त्या पहाडाची ओळ ईशान्य दिशेस जहाजपूर शहरापर्यंत पसरली आहे. संस्थानांत मुख्य नदी चंबला असून तिला मिळणारी बनास नांवाची दुसरी नदी आहे. बनास नदी अरवली पहाडांतून उगम पावून बेरा व कोठारी या दोन नद्या तिला मिळतात. उत्तरेस खारी नांवाची नदी असून दक्षिणेस सोम व तिला मिळणारी जाकम नदी आहे.

उदेपूर संस्थानांत सरोवरें व तलाव असंख्य आहेत. त्यांत जयसमंद व राजसमंद हीं अतिशय सुंदर असून उदयसागर, पिचोल व फत्तेसागर उदेपूराजवळ आहेत.

उदेपुरांतील खडक बहुधा अरवलीसारखा बेरंगी सोपडतो. व दिल्लीच्या आसपास अनवार पेठ्यांत ज्याप्रमाणें स्फटिक मणी आढळतात त्यासारखे उदेपूरच्या पूर्व व आग्नेय भागांत आहेत. जावर येथें प्राचीन काळीं शिसें पुष्कळ निघत असे. अझूनहि तांब्याचे अवशेष खोल भागांत आढळून येतात. आणि भिलवाडा जिल्ह्यांत लोखंड पुष्कळ ठिकाणीं असल्याचें कळतें. काळवीट, हरणें, चित्तें, रानडुकरें, हीं पाहाडी प्रांतांत विपुल असून वाघ, अस्वल सांबर अरवली भागांत कुंभळगड पासून कोत्रापर्यंत आहेत.

हवा निरोगी असून उष्णता केव्हांहि अतिशय नसते. पारा ६१ अंशापासून ७७ पर्यंत चढतो व मे महिन्यांत ९१ पर्यंत जातो. पावसाचें मान दरसाल सरासरी २४ इंच असतें. खेरवाडा व कोनाला २६ पासून ३१॥ इंच पाऊस पडतो. सन १८९३ सालीं फक्त कोत्र्याला ५९॥ इंच पाऊस पडला होता.

इ ति हा स.–हिंदुस्थानच्या रजपूत संस्थानिकांत मेवाडचे महाराणे यांचा मान सर्वांत मोठा आहे. मेवाड ( मध्यवाड ) म्हणजे मध्यदेश. मेवाडच्या राण्यांचें आडनांव शिसोदिया. मूळ आडनांव गेहिलोत ( घेलोट ). रामायणांतील नायक अयोध्येचा राजा राम व त्याचा वडील मुलगा कुश हे मेवाडच्या महाराण्याचे मूळ पुरुष असें ते लोक म्हणतात. मेवाडचे महाराणे जितक्या धैर्यानें मुसुलमानांशीं लढले तितके दुसरे कोणीहि रजपूत राजे लढले नाहींत व एकहि मेवाडी राजकन्येनें मुसुलमान राजपुत्राशीं लग्न लावलेलें नाहीं म्हणून ते मोठा अभिमान बाळगितात.कुशाचा वंशज अयोध्येचा शेवटचा राजा सुमित्र नांवाचा होता.त्याच्या पुढें कनकसेन नांवाच्या राजानें आपली जुनी राजधानी लाहोर सोडून काठेवाडांत वल्लभी राज्याची स्थापना केली.त्यानें परमारांचा पाडाव करून इ. स. १४४च्या सुमारास वीसनगर स्थापलें. त्याच्या वंशजांनीं वल्लभीपुर राजधानी करून वल्लभीशकहि सुरू केला.हें हल्लींच्या भावनगराजवळ होतें. वल्लभी राजांचा मुसुलमानांपुढें टिकाव लागला नाहीं. त्यांपैकीं शिलादित्य नांवाचा राजा त्याकडून ठार मारला गेला. गोहादित्य(गृहादित्य)नांवाचा त्याला मुलगा होता. त्यानें मेवाडच्या आसपास ईदर येथें आपली राजधानी नेली. त्याला भिल्लांनीं ठार मारलें. गोहादित्याला बाप्पा नांवाचा मुलगा होता. या वेळीं तो अल्पवयी होता. त्याचें रक्षण अनेक साथीदारांनीं अरण्यांत केलें. यावेळीं मेवाडास चितोडगडावर परमार राजे राज्य करीत होते. बाप्पा हा वयांत आल्यावर या परमाराजवळ चाकरीस राहिला. एकलिंगाचें एक प्रसिद्ध देऊळ उदेपुराजवळ आहे. त्या देवाचा बाप्पा

हा निस्सीम भक्त होता. सोळंखी कुळांतील एका ठाकुराच्या मुलीबरोबरच बाप्पाचें लग्न झालें. परमार राजाची बाप्पावर मोठी मर्जी असे. शेवटीं बाप्पानें प्रबळ होऊन त्याचें राज्य बळकाविलें (इ.स.७२८). बाप्पा हा श्रीरामचंद्रापासून ८०वा (?) वंशज असून चितोड घराण्याचा मूळपुरुष होय. ह्याच्या वेळेसच सिंधवर महंमद कासीमनें स्वारी केली होती ( मु. रि. ३३७ ). यानेंच मुसुलमानांची लाट मागें फिरविली.

बाप्पानंतरचा १८वा पुरुष समरसिंह इ.स. ११४०त चितोडचे गादीवर बसला. दिल्लीच्या पृथ्वीराज चव्हाणाची बहीण पृथा ही समरसिंहाची राणी होती. हा फार शूर होता. तत्कालीन कवी त्याचें फार वर्णन करितात. ११९३ त स्थानेश्वराच्या युद्धांत पृथ्वीराजास मदत करीत असतां हा रणांत पडला. त्याचा वडील मुलगा कल्याणरायहि त्याच लढाईत मेला नंतर समरचा धाकटा पुत्र कर्ण गादीवर बसला. तो अज्ञानी असल्यानें त्याची आई करुणदेवी कारभार पहात होता. तिनें महंमद घोरीचा सरदार कुतुबुद्दीन याचा पराभव केला. १२१० त याचा नातु रहुप राजा होता. यानें मुसुलमानांचा अनेकदां पराभव केला. याच्यापासून या घराण्याचीं गहिलोत व रावळ हीं नांवें जाऊन सिसोदे व राणा हीं नावें मिळालीं. रहुपपासून नववा लक्ष्मणसिंह १२७५ त राणा होता याचा चुलता भीमसिंह व चुलती पद्मावती उर्फ पद्मिनी ही सिंहल द्वीपच्या हमीर राजाची मुलगी. तिच्या अभिलाषानें अल्लाउद्दीन खिलजीनें चितोडवर स्वारी केली होती. तींत त्याची झालेली फजीती प्रसिद्धच आहे. पुढें १३०३ त त्यानें चितोड घेतलें, त्यावेळीं राणा लक्ष्मणसिंह व त्याचे ११ मुलगे लढून मेले. त्यावेळीं चितोडचा सुप्रसिद्ध पहिला जोहार झाला. लक्ष्मणसिंहाचा पुतण्या हमीर हा फार पराक्रमी निघाला. याच्या पराक्रमापुढें मुसुलमानांचें कांहीं चाललें नाहीं. त्याचें व शिवाजीमहाराजांचें बऱ्याच बाबतींत साम्य आहे. अलाउद्दीनानें नेमलेल्या चितोडच्या मालदेव नांवाच्या अधिकाऱ्यापासून मोठ्या युक्तीनें हमीरानें चितोड परत घेतलें. पुढें अलाउद्दीनाचाहि यानें पराभव केला व त्याच्या मुलास कैदेंत ठेविलें ( १३१३ ). नंतर मोठी खंडणी ( ५० लक्ष रु, १०० हत्ती व कांहीं प्रांत ) घेऊन त्याला सोडलें. यानें सर्व रजपुतांची एकी केली व आपलें राज्य भरभराटीस आणलें. हा १३६५त मेला. याचा मुलगा खेतसिंह हा १३७३ त मेला. त्याचा पुत्र लक्ष्मणसिंह उर्फ लाखा राणा हा पराक्रमी व नीतिमान होता. लोकोपयोगी कामें यानें फार केलीं. हा शांततावादी होता. याच्या वेळीं जावऱ्यास चांदी व शिशाच्या खाणी सांपडल्या. चितोडचा जयस्तंभ त्याच्याच वेळचा आहे. मारवाडचा राणा रायमल्ल याची मुलगी लाखाची राणी होती. इचा मुलगा मुकुलसि हा १३९८त राणा झाला. याचा १४१९ त खून झाला. याचा पुत्र कुंभराणा हा फार हुषार व राजकार्यधुरंधर होता. चितोड घराण्यांत आजपर्यंत जे सन्माननीय पुरुष झाले त्या सर्वांचे गुण याच्यांत होते. आसपासच्या मुसुलमानांना त्यानें जिंकून, माळव्याच्या सुलतानास युद्धांत पराभूत केलें, परंतु खंडणी न घेतां त्याला सोडलें. राणा स्वत: कवि व विद्वानांचा पोशिंदा होता. त्यानें ३२ किल्ले बांधले; त्यानें ५० वर्षे राज्य केलें. अखेर त्याच्या उदयसिंह नांवाच्या मुलानें त्याला कपटानें ठार मारिलें (१४६९). उदयसिंह वीज पडून ( १४७४ ) मेला. नंतर याचा भाऊ रायमल्ल राणा झाला. दिल्ली व माळवा येथील शहाचा त्यानें पराभव केला. हा १५०९ त मेला. याला अनेक पुत्र होते. पैकीं वडील संग्रामसिंह ( संगराणा ) गादीवर बसला.

या वेळेला मेवाडची स्थिति अत्युत्तम असून, संस्थानचें उत्पन्न १० कोट होतें. कर्नल टॉड यानें संगराण्याच्या स्वारीचें वर्णन केलेलें आहे तें असें कीं ८० हजार घोडेस्वार, ६ राणे, ९ राव आणि १०४ राऊळ व ५०० हत्ती याच्या स्वारींत नेहमीं असत. तैमूरच्या घराण्याशीं लढण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यानें दिल्लीच्या बादशहाशीं १८ मोठ्या लढाया दिल्या. व त्यांत जय मिळविला याच्या कारकीर्दीत मेवाडच्या भाग्याचा कळस झाला. रणथंभोर व खंचार हे दोन किल्ले त्यानें घेतल्यावरून व सर्व रजपूत राजांपासून कारभार घेऊन सार्वभौमाप्रमाणें अनेक वर्षे वैभव भोगल्यावरून माळवा व दिल्ली येथील शहांचा त्यानें अनेकदां पराभव केल्यावरून त्याची कीर्ति फारच वाढली. नंतर बाबरनें संग राण्यावर स्वारी केली व सन १५२७साली फत्तेपूर येथें रजपुतांचा पूर्णपणें पराभव झाला. संगराणा युद्धांतून निघून गेला व बाबरचा सूड घेण्याचा बेत करीत असतां अरण्यांत मेला ( १५३० ). राणासंगनंतर रतनसिंग(द्वितीय)गादीवर आला. रतन हा बापासारखाच शूर होता. मुसुलमानांचा निःपात करीपर्यंत चितोडचें महाद्वार त्यानें उघडें ठेविलें होतें. यामुळेंच फत्तेपूरच्या जयाचा फायदा बाबरास मिळाला नाहीं. एका क्षुल्लक प्रसंगीं द्वंद्वयुद्ध करीत असतां त्याला कंदीच्या सुरजमलरावनें ठार मारिलें (१५३५). नंतर त्याचा भाऊ विक्रमादित्य मालक झाला. हा धाडसी पण मूर्ख होता. त्यामुळें बरेंच राज्य त्यानें गमावलें. त्याची अव्यवस्था ऐकून गुजराथच्या बहादूरशहानें त्याजवर स्वारी केली. या वेढ्यांत राण्याची मुख्य राणी लढतां लढतां पडली. या वेळीं मागील प्रसंगासारखीच गोष्ट घडली. म्हणजे चितोड हातचें जातें असें पक्कें समजल्यावर राण्याच्या बायकांनीं चिता तयार करवून त्यांत उड्या टाकून प्राण दिले. हा चितोडचा दुसरा जोहार होय. सर्व रजपूत चितोड रक्षणार्थ आले होते पण कांहीं उपयोग झाला नाहीं. संगाचा अल्पवयी मुलगा उदयसिंग होता. त्याला रानांत पाठवून त्याच्या आईनें जोहार केला. परंतु तत्पूर्वी तिनें हुमायूनास राखी पाठवून मदत मागितली. हुमायूनानें तिचा राखीबंधु भाई होऊन स्वतः बहादुरवर स्वारी केली. तेव्हां त्यानें चितोड सोडून दिलें. याप्रमाणें विक्रमादित्यानें आपली राजधानी परत घेतली पण १५३६ सालीं बनबीरनें त्याचा खून केला.

बनवीर हा संगाचा भाऊ पृथ्वी याचा दासीपुत्र. यानें अत्यंत जुलुम केला. उदयसिंहाचा जीव घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां पन्नादाईनें त्याला कसें पळविलें,ही गोष्ट प्रसिद्धच आहे.१५४१ त उदयानें येऊन आपलें राज्य घेतलें. बनवीर पळाला. उदय एकंदरींत दुर्बल निघाला. १५६७त अकबरानें चितोडवर स्वारी केली. तेव्हां उदयाच्या एका राखेच्या हातीं सर्व सत्ता होती.तिनें चितोड राखलें. उदय पळाला. शेवटीं जोहार झाला. हा चितोडचा तिसरा जोहार होय. अकबरानें ३० हजार लोकांची कत्तल केली व मंदिरें राजवाडे, जमीनदोस्त करून मशीदी वगैरे बांधल्या. मुख्य देवीच्या देवळांतील नगारे, दिवे, दागिने, दरवाजे दिल्लीस नेले. उदय अरण्यांत पळाला. पुढें अरवलीच्या एका खोऱ्यांत त्यानें उदेपूर गांव व उदयसागर तलाव बांधला. नंतर लवकरच १५७२ त तो मेला.

उदयानंतर त्याचा पुत्र प्रख्यात महाराणा प्रतापसिंह गादीवर आला. हा शूर व अत्यंत स्वदेशप्रेमी होता. अनेक यातना सोसून त्यानें आपलें स्वातंत्र्य कायम ठेविलें. अकबर सारखा हात धुवून त्याच्या मागें लागला होता पण अखेर त्याला त्याच्यापुढें हात टेकावे लागले. प्रताप हा रजपुतान्याचा खरोखर प्रताप होय असे अकबरानें अखेर उद्गार काढले. मुसुलमानांबरोबर बेटीव्यवहार करणाऱ्या रजपुतांबरोबर निष्कलंक रहाणाऱ्या अस्सल रजपुतांनीं सोयरीक करूं नये असा हुकूम प्रतापानें काढला होता.असलें शुद्ध घराणें फक्त उदेपूरचेंच राहिलें आहे. अकबरानें जंगी फौज देऊन शहाजादा सलीम यास बरोबर देऊन राजा मानसिंह यास प्रतापावर पाठविलें. त्याजबरोबर प्रतापानें मोठ्या निकराचें युद्ध केलें. हळदीघाटाची लढाई म्हणून ही मोहीम प्रख्यात आहे, परंतु त्याचा एकट्याचा टिकाव अकबराच्या अफाट सैन्याबरोबर लागेना. तेव्हां तो कुमळमेरकडे गेला. हळूहळू त्यानें मोंगलास लुटून सर्व मेवाड प्रांत हस्तगत केला. मात्र चितोड त्याला मिळालें नाहीं; एकाएकीं दुखण्यानें तो १५९७ त वारला. उदेपूरच्याच नव्हे तर साऱ्या राजस्थानच्या इतिहासांत प्रतापाचें नांव अजरामर झालें आहे. नंतर त्याचा पुत्र अमरसिंह गादीवर आला. यानेंहि बापाप्रमाणेंच मोंगलांशीं युद्ध आरंभिलें होतें. १६०८, १६१० व १६११ त मोंगलांचा त्यानें पराभव केला. शेवटीं सलीमनें शहाजहानच्या प्रचंड फौजेसह त्याच्यावर पाठविलें. यावेळीं राणा फार थकला असल्यानें त्यानें मोंगलांशीं तह करून नाम मात्र त्यांची सत्ता कबूल करून आपण स्वतः दिल्लीस न जातां मुलगा कर्ण यास पाठविलें. जहांगीरनें त्याला मोठी मनसब दिली. पण अमरला प्रतापाची शेवटची आज्ञा आठवून आपण मुसुलमानास शरण जाऊन ती पाळली नाहीं याबद्दल वाईट वाटून त्यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारला.व कर्णास गादीवर बसविलें. अमर १६२१ त मेला. हाहि शूर होता. यानें उदेपुरास किल्ला, राजवाडे वगैरे बांधले. जहांगीरच्या मुलांत तंटे लागले, तेव्हां शहाजहान उदेपुरास राण्याच्या आश्रयास आला होता. राणा १६२८ त मेला. नंतर त्याचा मुलगा जगत्सिंह राणा झाला. यानें जहांगीर मेल्याची बातमी शहाजहानास देऊन त्याला सुखरूप दिल्लीस पोहोंचविलें. याबद्दल शहाजहाननें त्याला फार सन्मानानें वागविलें. ह्याची कारकीर्द फार शांततेची गेली. हा १६५४ त मेला. पुढें त्याचा पुत्र राजसिंह गादीवर बसला. यानें दारा यास मदत दिली. औरंगजेबानें पुढें रजपुतांबरोबर प्रचंड युद्ध केलें, त्यांत राजसिंह हा रजपुतांचा पुढारी होता. हा औरंगजेबाचा कट्टा वैरी होता. यानें त्याचा बराच समाचार घेतला होता. रूपनगरच्या राजकन्येस औरंगजेबानें मागणी घातली असतां तिच्या विनंतीवरून राजसिंहानें तिला त्याच्या तडाक्यांतून सोडवून आपण स्वतः वरिलें. जिझिया कर रजपुतांवर जेव्हां पुन्हां बसविण्यांत आला तेव्हां राजसिंहानें बादशहास मोठें खरमरीत पत्र लिहिलें ( आपटे, 'रूपनगरची राजकन्या 'पहा) तेव्हां औरंगजेबानें मेवाडवर स्वारी केली; पण राजसिंहानें मोठ्या शौर्यानें व गनिमी काव्यानें त्याचा पराभव केला. राजसिंह इ. स. १६८१ त मरण पावला. यानें उदेपुरास मोठमोठीं कामें केलीं. राजसिंहानंतर त्याचा पुत्र जयसिंह गादीवर आला. त्यानें जयसमुद्र नांवाचा विस्तीर्ण तलाव बांधिला. हा आळशी असे. याचा मुलगा अमरसिंह १७०० त राणा झाल्यावर त्यानें रजपुतांची संघटणा केली व मुसुलमानांशीं अजीबात संबंध करूं नये असें रजपूत मंडळांत ठरविलें.

अमरसिंह फार धोरणी व कार्यदक्ष असे. तो १७१६ त मृत्यु पावल्यानंतर त्याचा पुत्र संग्रामसिंह गादीवर बसला. संग्रामसिंह प्रजाहिताकडे लक्ष देणारा असला तरी महत्त्वाकांक्षी नव्हता. म्हणून मोंगलाईच्या उतरत्या काळीं त्यानें आपला राज्यविस्तार करून घेतला नाहीं. तो १७३४त मरण पावला. त्याचा मुलगा जगत्सिंह फार विलासी होता. मराठ्यांची सत्ता यावेळेस अबाधित होती. खुद्द दिल्लीहून त्यांनीं चौथ वसूल केला. १७३६ सालीं बाजीराव पेशव्यांनीं राण्याजवळून दरसाल एक लाख खंडणी घेण्याचा तह केला.

जगत्सिंहानंतर त्याचा वडील पुत्र दुसरा प्रतापसिंह गादीवर बसला ( १७५२ ). शिंदे, होळकर व रघुनाथराव पेशवे ह्यांचे हल्ले एकसारखे रजपुतांवर चालू होते. सन १७५५त राजा प्रतापसिंह मरण पावला. आणि त्याचा मुलगा राजसिंह ( दुसरा ) गादीवर बसला. मराठ्यांनीं राजस्थानावर तीन स्वाऱ्या केल्या. आणि त्या सर्वांचा खर्च उदेपूरच्या खजिन्यांतून त्यांनीं घेतला. एक पै सुद्धां राजसिंहाजवळ शिल्लक राहिली नाहीं. स्वतःच्या लग्नासाठींहि त्यास कर्ज काढावें लागलें. सन १७६२ त हा दुर्दैवी राणा मरण पावला, आणि त्याचा चुलता राणा अरसीसिंह गादीवर बसला. याची कारकीर्द ' अरसीसिंह ' या लेखांत पहावयास मिळेल. अरसीसिंहानंतर त्याचा वडील मुलगा हमीर हा

गादीवर बसला. 'उदेपूरचा राणा' ह्या नावांत आतां फारसें महत्त्व राहिलें नव्हतें. अंतर्द्वेष फार वाढल्यामुळें चोहोंकडे शत्रू उत्पन्न झाले. हमीर ह्या फार लहान असल्यामुळें त्याची आई सर्व कारभार पाहात असे. राणा हमीर सन १७७८त मरण पावला. हमीरानंतर त्याचा लहान भाऊ भीमसिंह मेवाडच्या गादीवर बसला. आपल्या भावाप्रमाणें तोहि कांहीं दिवस आईच्या ताब्यांत होता. भीमसिंहानें पन्नास वर्षे राज्य केलें. मराठ्यांनीं त्याच्या राज्यावर वारंवार स्वाऱ्या करून तें अगदीं उध्वस्त करून टाकिलें. कृष्णाकुमारी म्हणून एक रूपवती कन्या भीमसिंहास होती. तिच्याबद्दल सर्व रजपूत राजांत तंटे लागून शेवटीं भीमसिंहानें तिला विष देऊन ठार मारिलें ( 'अमीरखान' पहा ). शिंद्यांचा सरदार अंबाजी इंगळे यानें मेवाडांत आपलें ठाणें दिलें. मराठ्यांशीं इंग्रजांचें दुसरें युद्ध संपल्यावर मराठयांच्या जाचांतून रजपूत सुटतील असें वाटत होतें पण तसा प्रकार झाला नाहीं कित्येक दिवस तर कोट्याचा जालिमसिंह याजकडून कांहीं नेमणूक घेऊन भीमसिंहास आपला निर्वाह करावा लागला. सन १८१७ मध्यें पेंढाऱ्यांशीं इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, तेव्हां भीमसिंहानें इंग्रजांचें सार्वभौमत्व पत्करिलें. भीमसिंह सन १८२९ त मरण पावला. भीमसिंहानंतर त्याचा पुत्र जवानसिंह यानें सन १८२९ पासून १८३८ पर्यंत राज्य केलें. नंतर त्याचे मुलगे सरदारसिंह व सुरूपसिंह यांनीं अनुक्रमें १८३८ ते ४२ व १८४२ ते १८५१ पर्यंत राज्य केलें. सुरूपसिंहाचा दत्तक मुलगा शंभुसिंह सन १८५१ पासून ७४ पर्यंत गादीवर होता. शंभुसिंह फार लोकप्रिय होता. त्याच्या मरणाबद्दल लोकांस फार वाईट वाटलें. त्याचा दत्तक मुलगा सज्जनसिंह यानें दहा वर्षे राज्य केलें. हल्लीं हिज़हायनेस महाराजाधिराज महाराणा फत्तेसिंह सन १८८४ पासून उदेपूर येथें राज्य करीत आहेत.

त्यांनां जी. सी. एस. आय. जी. सी. आय. ई. व जी. सी. व्ही. ओ. वगैरे पदव्या असून १९ तोफांच्या सलामीचा मान मिळाला आहे. चितोडपासून उदेपूरपर्यंतची ६९७ मैलाची रेल्वे त्यांनीं केली. जमीननिरख उत्तम लाविली. १८९९–१९०० सालचा भयंकर दुष्काळ महाराणा फत्तेसिंग यांच्या कारकीर्दींत झाला.

मेवाडांत प्राचीन इमारतींचे अवशेष पुष्कळ आहेत. शिलालेख, खिस्ती शतकापूर्वीं तिसऱ्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत मिती असलेले असंख्य आहेत. बाराव्या शतकाच्या अलीकडील ताम्रपट एकहि उपलब्ध नाहीं. नगरी येथें २ स्तूप फार प्राचीन आहेत असें म्हणतात. चितोड टेंकडीवर कीर्तिस्तंभ व जयस्तंभ नांवाचे २ स्तंभ १५ व्या शतकांत बांधलेले असावे. राजवाडे व देवळें बरीच आहेत. त्यांत बरोलीची देवळें व उदेपूर जवळच नागडा व एकलिंगजी येथलि प्रसिद्ध आहेत.

लोकसंख्या.—मेवाडी ९४ खेडीं खेरीज करून उदेपूर संस्थानांत खेडीं व शहरांची संख्या ६०४४ आहे. १९२१ सालीं लो. सं. १३८००६३ होती.

एकंदर संस्थानांत १७ जिल्हे आहेत. मोठ्या जिल्ह्यांनां जिल्हे व लहान जिल्ह्यांनां परगणे म्हटलेलें आहे. लहान परगण्यांनां भूमात म्हणतात. मुख्य शहरें उदेपूर, भिलवाडा, नाथवाडा व चितोड. मुख्य भाषा मारवाडी असून भिल्ल वगैरे गुजराथी बोलतात. भिल्लांची संख्या ११८ हजार होती. महाजन ९४ हजार, ब्राह्मण ९४ हजार, रजपूत ९१ हजार, जाट ५८ हजार, गुजर ५०हजार, व बाले ४१ हजार आहेत.

लोकांचा मुख्य धंदा शेतकी करण्याचा आहे. तरी कांहीं शेतकी करून अन्य उद्योग करतात. शेतकरीवर्गांत मुख्य जाट, गुजर, माळी, गड्री, डांगी आणि ढाकर हे होत. पण प्रत्येक गांवांत महाजन, तेली, कुंभार व ब्राह्मणहि शेतकी करणारे आढळतात. त्यांत कित्येक केवळ शेतकीवरच अवलंबून रहाणारे असतात व कित्येक अन्य धंदे करून शेतकी करतात.

शेतकी.—ठिकठिकाणची जमीन निरनिराळ्या तऱ्हेची आहे. दक्षिणेस पहाडातळची जमीन काळी असून कापसाचें उत्तम पीक देणारी आहे. छोटी खादरी जमीन चांगली कसदार नाहीं पिकाला काळीहून कमी दर्जाची आहे. नदीकांठावरील जमीनी वहितीला हलक्या, रेताड, पण पिकाला चांगल्या आहेत. येथील शेतकऱ्यांची स्थिति खाऊनपिऊन सुखी अशी आहे. चितोडची जमीन काळी पण पहाडाजवळ लाल गोटाडी आहे.

शेतकीचीं कामें अगदीं साधीं असतात. परंतु पहाडावरील उतरणी व दऱ्या वगैरेंमधून पाणी जावें म्हणून तात्पुरतीं धरणें वगैरे बांधण्याच्या कामांत बरीच पोंच राखून कामें करावीं लागतात. केव्हां केव्हां वहित केलेला भाग सबंध सोडून दुसरीकडे जावें लागतें. बहुधा भिल्ल लोक हीं करूं शकतात. केव्हां केव्हां जमीन तयार करण्याकरितां जंगल तोडून लांकडें जाळून राख खताच्या ठिकाणीं उपयोगांत आणतात. या कामीं बरेच श्रम लागतात.

मुख्य पीक.—मका, ज्वारी, तीळ, कापूस व ऊंस. हिंवाळ्यांत गहूं, जव, हरभरा वगैरे. वहित क्षेत्रफळापैकीं चतुर्थांश भाग बागाइत आहे. मुख्यत्वेंकरून विहिरींनींच पाणीपुरवठा करतात. विहिरींतील पाणी रहाटगाडग्यानें वर चढवून जमिनीच्या सपाटीबरोबर नेऊन सोडतात. ही युक्ती फसल्यास डोलानें पाणी दिलें जातें. उथळ विहिरींत पाय रहाटानें पाणी चढवितात.

जंगल.—मेवाडमध्यें ४६०० चौ. मै. जंगल आहे. पैकीं सुमारें ७२ चौ. मै. राखीव असून कधीं कधीं कांहीं भागाचा शिकारीकरितां व काहींचा जळाऊ लांकडाकरितां व भट्यांकरितां उपयोग होतो. राखीव नसलेल्या जंगलांत लांकडें

तोडण्याची व गुरें चारण्याची मोकळीक आहे. दरवर्षी उन्हाळ्यांत जंगल जळून नुकसान होतेंच. उत्तम जंगल अरवलीचे पश्चिम व नैऋत्येस व दक्षिणेस सालुंब्रा, दरियावड, व ढेबर सरोवराजवळ आहे. साग सिसव, वगैरे मौल्यवान झाडें क्वचित् सांपडतात. वार्षिक उत्पन्न पंधरा हजार व खर्च नऊहजार आहे. जंगली उत्पन्नाच्या बाबी मध, मेण, व गोंद या होत.

ख नि ज सं प त्ति.—मेवाडांत खनिज द्रव्यें विपुल आहेत. पण पद्धतशीर व्यवस्था नाहीं. उदेपूर पासून दक्षिणेस सोळा मैलांवर जावरा गांवीं शिसें व जस्त यांच्या खाणी आहेत. पूर्वी या खाणीपासून संस्थानला पुष्कळ उत्पन्न होत होतें असें म्हणतात. १८७२ सालीं कारखाना काढला होता परंतु पाणी उपसण्याकरितां इंग्रजी यंत्राचो जरूरी लागत होती ती संस्थानांतून न मागल्यामुळें कारखाना बंद ठेवणें भाग पडलें. लोखंड फार थोड्या प्रमाणांत काढलें जातें. राजनगर येथें पांढरा स्फटीक व चितोडला काळा स्फटीक उत्तम प्रकारचा सांपडतो.

उ द्यो ग धं दे व का र खा ने—उदेपूर येथें तरवारी कट्यारी, जरीचें काम, हस्तीदंती व लांकडी बांगड्या, जरीचें कापड वगैरेचे कारखाने आहेत. कथलाचीं भांडीं भिलवा. ड्यास होतात, दगडी खेळाचे जिन्नस व मूर्ती रखवदेव येथें तयार करितात. तूप, तेल ठेवण्याकरितां चामडी बुधले ठिकठिकाणीं करितात. भिलवाड्यास संस्थानचें एक सरकी काढण्याचें जिन व कापूस दाबण्याचा प्रेस असे दोन कारखाने आहेत.

व्या पा री नि र्ग त मा ल.—कापूस, लोंकर, अफू, तूप, गळिताचीं धान्यें, बकरी, स्वयंपाकाचीं भांडीं, कापड आणि सुकाळ असल्यास खाण्याचीं धान्यें ( गहू, तांदूळ, बाजरी इ.) आयात मालः—मीठ, तंबाखू, साखर, नारळ, धातूचे जिन्नस व तयार माल वगैरे.

राजपुताना माळवा ही रेल्वे संस्थानच्या अर्ध्या भागांतून जाते. हिची लांबी ८० मैल असून मेवाडचीं १० स्टेशनें आहेत. चितोडहून उदेपूरपर्यंत एक फांटा संस्थाननें केलेला आहे. याची लांबी ६७ मैल असून १९०५ अखेर २१ लक्ष खर्च झाला. रेल्वेचा खर्च १०४ हजार असून उत्पन्न १०३ हजार झालें.

संस्थानांतील पक्या सडकांची लांबी १४२ मैल व कच्चे रस्ते २५७ मैल आहेत. उदेपूरपासून खेरवाड्याला जाणारा रस्ता फार वाहतुकीचा आहे. नसिराबाद पासून निमचला जाणारी सडक ब्यायशीं मैल असून तिचें काम इसवी सन १८६६ पासून १८७५ पर्यंत चाललेलें होतें. तिजला खर्च दोन लक्ष रुपये आला असून त्यापैकीं संस्थानचा ३/४ व इंग्रजांचा १/४ असा भाग आहे. ही सडक खेरीज करून बाकीच्या सडका संस्थान चालवितें. रेल्वे झाल्यांपासून नसिराबाद–निमच रस्ता मागें पडला आहे.

टपाल आफिसांची संख्या ३६ असून त्यांत तार आफिसें आहेत. याशिवाय ब्राह्मणी डाकपद्धत सुरू आहेच, ब्राह्मणी डाक दरबारची व खाजगी पत्रांची ' नेआण ' करीत असते. ही डाक चालविण्याबद्दल दरसाल १९२० रुपयांस मक्ता दिलेला असतो. व पत्राचें वजन कितीहि असो अर्धा आणा तिकीट पुरें होतें मेवाडास दुष्काळ फार क्वचित् प्रसंगीं पडतात.

रा ज्य व्य व स्था:— सर्व व्यवस्था महाराणाजींच्या स्वाधीन आहे. त्यांनां सल्ला देणारे दोन कामदार आहेत. त्यांच्या कचेरीला ' महकमा खास ' म्हणतात. जिल्हा व परगण्याचे अधिकारी यांना हकीम ही संज्ञा आहे. जिल्ह्याच्या पोटविभागांवर नायब हकीम अधिकारी असतो.

दिवाणी व फौजदारी कामें इंग्रजी कायदे, हिंदुधर्मशास्त्र आणि रूढी यांना धरून चालतात. हकीम हुकूम देतील तीं कामें नायब हकीमानीं करावयाचीं. त्यांनां स्वतंत्र अधिकार दिलेला नसतो. ' महेंद्रजी सभा ' ही वरिष्ठ दर्जाची सभा होय. हींत आठ सभासद असतात. या सभेंत महाराणा बसतात तेव्हां ही वरिष्ठ दर्जाची समजली जाते. दरबारची सत्ता जहागीर इस्टेट पद्धतीनें चालते. फक्त चौदा मोठे जहागीरदार आहेत त्यांनां १८७८–७९ सालीं कांहीं सनदा दिल्या गेल्याकारणानें दरबारच्या अखत्यारीपासून ते अलग आहेत.

संस्थानचें एकंदर उत्पन्न ३५ लक्ष असून खर्च ३२ लक्ष आहे. संस्थानला कर्ज नसावें असें दिसतें. इंग्रज शिक्याचे रुपये संस्थानांत उपयोगांत आणतात. शिवाय पांच निरनिराळ्या तऱ्हेचे रुपये मेवाडांत चालतात; ते चितोडी, उदेपुरी, भिल्लारी, सरूपशाही आणि चांदोरी हे होत. चितोडी, उदेपुरी व भिल्लारी हे आतां टांकसाळेंतून निघत नाहींत. बाकीच्या रुपयांचा भाव बाजारच्या तेजी मंदीवर असतो. आठ आणे, चार आण्याचीं चांदीचीं लहान नाणीं प्रचारांत आहेत. जमिनीचे मुख्य प्रकार जहागीर, भूम, सासन आणि खालसा असे आहेत. नवीन राजा गादीवर आला म्हणजे व इतर कांहीं प्रसंगीं सर्व जहागीरदारांनीं नजराणा द्यावा लागतो. जहागीरदार मरण पावला तर त्याची जहागीर खालसा होऊन त्याचा वारस अथवा मुलगा वयांत येईपर्यंत दरबारकडे त्याची व्यवस्था राहते. कोणता तरी मोठा अपराध झाल्यावांचून इस्टेटी जप्त होत नाहींत. एखादा जहागीरदार निपुत्रिक मरण पावला तर दरबारची परवानगी घेऊन दत्तक घेतां येतो. माफी जमिनी बहुधा गोसावी, ब्राह्मण यांजकडेस आहेत. त्यांनीं सारा द्यावयाचा नाहीं व दरबारची नोकरी करावयाची नाहीं. त्याप्रमाणेंच चारण व भाट यांच्याकडे असलेल्या माफी जमिनीची अशीच स्थिति आहे. सन १८७८ पूर्वी जमिनीची मोजणी झालेली नव्हती तोपर्यंत सारा वसूल

करण्याचा बराच घोंटाळा होत होता. १८७८ नंतर कांहीं व्यवस्था लागली.

लष्करसंख्या एकंदर ६०१५. त्यांत १७५० पायदळ, ५६० घोडेस्वार, २३९ गोलंदाज. लष्कराकडे दरबारी खर्च वार्षिक साडेसहा लक्षापर्यंतचा आहे. दरबारखर्चानें इंग्रजी छावण्या खेरवाडा व कोत्रा या दोन ठिगाणीं आहेत. त्यास सहासष्ट हजार रुपये सालिना खर्च येतो.

उदेपुरास एक मोठा तुरुंग असून ५३७ कैदी त्यांत असतात. सन १९०५ सालचा तुरुंगखर्च पंचवीस हजार असून तुरुंग कारखान्यावरील नफा २३६० रुपये झाला.

शिक्षणाच्या बाबतींत राजपुतान्यांतील वीस संस्थानांत मेवाडचा नंबर सहावा आहे. संस्थानांत एकंदर शिक्षणाच्या संस्था ५४ असून १९०५ सालीं अडीचहजार विद्यार्थी रोज शाळेंत जाणारे होते. मुलींच्या शाळा पांच होत्या. शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च चोवीस हजार आहे.

खेरवाडा व कोत्रा येथील लष्करी दवाखाने धरून संस्थानांत चौदा इस्पितळें व सहा मोफत दवाखाने आहेत. पैकीं चौदा संस्थानांतून, तीन इंग्रज सरकारकडून, एक मिशनकडून व दोन अंशतः इंग्रज सरकार व अंशतः देणगीद्वारा चालतात. दवाखान्यांसंबंधीं संस्थानला पंचवीस हजार रुपये खर्च दरसाल येतो. देवी काढणें सक्तीचें नाहीं.

श ह र.—मेवाडचें मुख्य शहर राणा उदयसिंहानें बांधलें म्हणून यास उदेपूर हें नांव पडलें. मुंबईपासून ६९७ मैलांवर उदेपूर असून उदेपूर चितोड रेल्वेचें शेवटचें स्टेशन आहे. राजपुतान्यांत उदेपूर शहर पांचवें असून १९११ सालीं लोकसंख्या ३३२२९ होती. पैकीं हिंदु २०१३७, मुसुलमान ७५९४ आणि जैन ३५७२ होते.

शहराची वस्ती उतरणीवर असून वरील भागावर महाराण्याचा राजवाडा आहे. पश्चिमेस व उत्तरेस घरांच्या सारख्या रांगा पिशोला तलावापर्यंत गेलेल्या आहेत. फर्ग्युसनसाहेबांनीं वुइंडसर राजवाडा व उदेपूर राजवाडा पुष्कळ अंशांनीं बाह्यदृष्ट्या सारखे आहेत असें म्हटलें आहे. पिशोला सरोवर चवदाव्या शतकांत एका वंजाऱ्यानें केलेलें असून चौफेर राणा उदेसिंगाचें धरण आहे. त्याचें क्षेत्र सरासरी एक मैल भरेल. सरोवराच्या मध्यभागीं दोन मंदिरें, जगमंदिर व जगन्निवास नांवाचीं आहेत. जगमंदिर राणा जगसिंग (प्रथम) यानें सतराव्या शतकांत बांधलेलें असून जगन्निवास जगसिंह ( द्वितीय ) यानें बांधलेलें आहे. आग्रा येथील ताजमहालाच्या पद्धतीवर जगमंदिराची बांधणी असून घुमटाचा आकार तितकाच नाजूक दिसतो. जगमंदिराच्या जवळ एक लहानशी मशीद आहे. तीहि प्रेक्षणीय आहे. जगन्निवास मंदिरासभोंवतीं संत्रे, आंबे आणि दुसरीं फळझाडें असून सुंदर बाग आहे. बगीच्याचा देखावा अप्रतिम असून असें मनोहर स्थान हिंदुस्थानांत क्वचित् आढळतें. दुसरें प्रसिद्ध सरोवर पिशोल्याच्या उत्तरेस 'फत्तेसागर' नांवाचें आहे. सांप्रतच्या महाराण्यांनीं तें बांधलें असल्यामुळें त्याला 'फत्तेसागर' हें नांव पडलें.

दुसरीं प्रेक्षणीय स्थळें:—सज्जन निवासबाग, व्हिक्टोरिया हॉल व पदार्थसंग्रहालय हीं होत. पदार्थसंग्रहालयाच्या समोरच राणी सरकारचा पुतळा आहे.

उदेपूर शहरांत कारखाने मोठेसे नाहींत. जरीचें कापड तलवारी व कट्यारी चांगल्या करतात. या ठिकाणीं एक तुरुंग असून त्यांत ४५८ कैदी राहूं शकतात. शहरांत एकंदर शाळांची संख्या आठ असून त्यांत दोन मुलींच्या शाळा आहेत. विद्यार्थ्यांची संख्या आठशें आहे. उच्च शिक्षणाकरितां एक हायस्कूल असून तें अलाहाबाद विश्वविद्यालयास जोडलेलें आहे. लॅन्सडाऊन इस्पितळाखेरीज स्त्रियांकरितां वाल्टर इस्पितळ १८८८ च्या मे महिन्यांत सुरू केलेलें आहे.

उदेपूरच्या आसपास पहाण्यासारखें ठिकाण एकलिंगजी नांवाचें आहे. तें उदेपूरपासून उत्तरेस बारा मैलांवर आहे. या ठिकाणीं राजा रावळ यानें एक महादेवाचें देऊळ बांधिलें. मुळारंभींचें देऊळ पंधराव्या शतकांत मुसुलमानांनीं पाडून टाकिलें. सांप्रतचें देऊळ त्यानंतरचें बांधलेलें आहे. देऊळ अप्रतिम बांधणीचें असून आंत शिवलिंग चतुर्मुखी काळ्या स्फटिकाचें आहे. याच्या शेजारीं एक सुंदर तलाव आहे. राणा संग्रामसिंग याच्या सुने(मिराबाई-भोजराजाची बायको)नें बांधलेलीं शेंकडों देवळें आसपास आहेत. एकलिंगजीजवळ मेवाडच्या पुरातन स्थळांपैकीं नागडा या नांवाचें एक स्थळ आहे. त्या ठिकाणीं बाप्पाच्या पूर्वींचे सात महाराणे राज्य करीत होते. विष्णुमंदिरहि फार प्राचीन म्हणजे अकराव्या शतकांतलें आहे. जैनांचें एक मंदिर आहे, त्यांत शांतिनाथाची मूर्ति मोठी असून भव्य आहे.

शहर एका मोठ्या तलावाच्या कांठीं आहे. हा तलाव प्रशस्त व विस्तीर्ण असून त्याचें नांव पिशोला असें आहे. ह्या तलावांत जगन्निवास व जयमंदिर असे दोन मोठाले वाडे आहेत. ह्या वाड्यांत जाण्याकरितां व जलपर्यटण करण्याकरितां त्या तलावांत सात आठ नावा नेहमीं पडलेल्या असतात. वर उल्लेखिलेल्या वाड्यांतील पहिला जगसिंहानें बांधला असून दुसरा जयसिंहानें बांधला. दुसऱ्या वाड्यांत संगमरवरी दगडाची एक फारच सुरेख व शोभायमान बारावारी बांधली आहे व ती अवश्य पाहण्यासारखी आहे. शहरापासून दोन कोसांवर उदेसागर नांवाचा एक दुसरा मोठा तलाव असून तो उदयसिंहानें बांधला आहे. त्याचप्रमाणें तेथून जवळच राजसागर नांवाचा आणखी एक तलाव आहे व तो राजसिंहानें बांधला आहे. उदेपुरापासून २० कोसांवर जयसागर नांवाचा समुद्रासारखा अफाट तलाव आहे. त्यास ढेबरचा तलाव असें म्हणतात. त्याच्या कांठीं वृषभनाथाचें मंदिर आहे. उदेपुरांत चार देवस्थानें फार मोठीं आहेत. त्यांत पहिलें वृषभनाथाचें, दुसरें एकलिंगजीचें, तिसरें नाथद्वारचें व चौथें चतुर्भुजनाथाचें. या चारी देवांचे पृथक पृथक

असे चार नामदारखाने म्हणजे खजीने असून ते तेथील राजाच्या ताब्यांत आहेत. राजतलावावर (हा राजसागर असावा) चौकी आहे. या चौकीजवळ ज्या राण्यांनीं आपल्या देहाच्या वारंवार सोनें वजन करून त्याचा धर्माकडे विनियोग केला, त्यांचीं तोरणें बांधलीं आहेत. अशा प्रकारचीं तोरणें तेथें अनेक आहेत. त्यां तलावाच्या पलीकडील टोंकावर काकरोळी नांवाचें संस्थान असून त्यावर गोसावी महाराजांचा अधिकार आहे. तेथें ज्या मूर्तीची पूजाअर्चा व उपासना होत असते, ती अंबरीष नांवाच्या राजाची होय असें म्हणतात. काकरोळी हा गांव बराच मोठा असून त्यांत बाजाराचा भाग चांगला आहे. [लोकहितवादीकृत ग्रंथमाला ६, राजस्थानचा इतिहास, उदेपूर, परिशिष्ट ५.]

**उदेपूर संस्थान.**—(लहान) मध्यप्रांत २२° ३' ते २२° ४७' उत्तर अक्षांश आणि ८३° २' ते ८३° ४८' पूर्व रेखांश यांमध्यें आहे. क्षेत्रफळ १०५२ चौरस मैल. पूर्वी हें संस्थान बंगालच्या छोटा नागपूरच्या संस्थानांत मोडत होतें. परंतु सन१९०५सालापासून तें मध्यप्रांतांत घातलें आहे. याच्या उत्तरेस सुरगुजा संस्थान, आणि पूर्वेस जशपुर आणि रायगड संस्थानें; दक्षिणेस रायगड संस्थान आणि पश्चिमेस बिलासपूर जिल्हा. संस्थानचा उत्तरेकडील जवळ जवळ अर्धा प्रदेश डोंगराळ असून दक्षिणेकडील सपाट आहे. संस्थानांतील खनिज संपत्तीविषयीं विशेष तपास अजून झाला नाहीं; तथापि सोनें, लोखंड, अभ्रक, दगडी कोळसा वगैरे धातू येथें सांपडतात.

इ ति हा स.—रक्षेल रजपूत घराण्यानें सुरगुजा संस्थान काबीज केल्यापासून उदेपूर संस्थान हें सुरगुजा संस्थानची धाकटी पाती आहे. सन १८१८ सालीं मुधोजी भोसले (अप्पासाहेब) याजबरोबर झालेल्या तहांत हें संस्थान इतर संस्थानांबरोबर ब्रिटिश अमलाखालीं आलें. यावेळीं संस्थानिक कल्याणसिंग असून त्यानें खंडणी सुरगुजा संस्थानामार्फत दिली होती. इ. स. १८५२ सालीं संस्थानिक व त्याचे दोन बंधू यांजवर खुनाचा आरोप येऊन त्यांस कैदेची शिक्षा झाली; व संस्थान खालसा करण्यांत आलें. सन १८५७ च्या बंडांत कांहीं खटपट करून संस्थानिक व त्याचे भाऊ यांनीं उदेपूर संस्थानांत शिरून कांहीं वेळ तेथें राज्यहि केलें. पुढें सन १८५९ सालीं बंडाचा शेवट झाल्यावर त्यांस काळ्या पाण्याची शिक्षा देऊन अंदमान बेटांत त्यांची रवानगी करण्यांत आली व सन १८६० सालीं सुरगुजा संस्थानिकाचा भाऊ बिंदेश्वरी प्रसादसिंग देव याच्या स्वाधीन तें संस्थान केलें. यानें ब्रिटिश सरकारास बंडांत उत्तमप्रकारें मदत केली होती. त्याचप्रमाणें सन १८७१ सालीं केओंझर संस्थानांत झालेलें बंड यानें मोडलें. यास राजाबहादुर हा किताब मिळाला होता. सन १८७६ त हा मरण पावल्यावर त्याचा मुलगा धर्मजितसिंग देव गादीवर बसला. यानें रायकोट हें आपलें राहण्याचें ठिकाण करून त्यास धर्मजयगड असें नांव दिलें. हा सन १९०० सालीं मरण पावला व त्याच्या मागून त्याचा अज्ञान मुलगा चंद्रशेखरप्रसाद सिंगदेव यास गादी मिळाली. हा अज्ञान असल्यामुळें संस्थानची सर्व व्यवस्था ब्रिटिश सरकारच पहात होतें. हल्लीं हा स्वतःच कारभार पहातो. यास हिज हायनेस हा किताब आहे. येथील लोकसंख्या १९११ मध्यें ६४८५३ होती. एकंदर खेडीं १९६ आहेत. येथें मुख्य पीक भाताचें असून उडीद, मूग, अवहर व इतर कडधान्याचीं पिकें होतात.

उ द्यो ग धं दे.—येथील लोक स्वतःस लागणारे जिन्नस उत्पन्न करतात. उदाहरणार्थ ओबडधोबड कापड, स्त्रियांचे दागिने, विटा, कौलें, मोटा वगैरे.

व्या पा र.—बंगालनागपूर रेल्वे सुरू होण्यापूर्वी गया जिल्हा, मिर्झापूर, कलकत्ता वगैरे ठिकाणांहून बैलावरून व्यापार होत असे. हल्लीं धर्मजयगडहून ३९ मैलांवर रायगड नांवाचें स्टेशन आहे तेथूनच संस्थानचा सर्व व्यापार चालतो.

संस्थानिकास ब्रिटिश सरकारला ८०० रुपये खंडणी द्यावी लागते व ती वीस वर्षेपर्यंत वाढवावयाची नाहीं असा करार १८९९ व १९०५ मधील सनदांत आहे. संस्थानावर देखरेख कमीशनरची असून तो कर वगैरे बसविण्याच्या बाबतींत सल्ला देतो. चीफ कमिशनरच्या परवानगीवांचून आयात निर्गतीवर कर बसवितां येत नाहीं. येथें नऊ शाळा आहेत.

**उदेपूर गां व.**—आसाम टिपराहिल्स संस्थानांतलि एका पोटविभागाचें मुख्य स्थान. टिपरा संस्थानची ही जुनी राजधानी होती. सांप्रत तिचा नाश झाला असून हल्लीं सर्वत्र दाट जंगल व मोठीं सरोवरें मात्र अस्तित्वांत आहेत. त्रिपुरेश्वरीचें देऊळ पूर्वबंगाल्यांत प्रसिद्ध असून दरसाल हजारों लोक यात्रेकरितां येतात. हें देऊळ सोळाव्या शतकाच्या आरंभीचें आहे.

**उदेपूर श ह र.**—राजपुताना. जयपूर संस्थानांतील शेखावत निझामत (जिल्हा) मधील एका पोट विभागाचें मुख्य शहर. हें जयपूर शहरापासून वायव्येस सरासरी ६० मैलांवर आहे. शहराला जरी तटबंदी नाहीं तरी तें अरवली डोंगरावर वसलें असल्यामुळें सुरक्षित स्थितींत आहे. लो. सं. १९११ सालीं ७७४३ होती. जयपूर संस्थानच्या नाग शिवंदीचें हें राहण्याचें ठिकाण होय लढाईच्या अगर दुसऱ्या अशाच संकटाच्या प्रसंगीं शेखावतीचे सरदार लोक पुढें काय करावें म्हणून याच ठिकाणीं जमून विचार करीत. कर्नल टॉडचें असें म्हणणें आहे कीं उदेपूरचें प्राचीन नांव कुसुंबी होतें.

**उदेपूर.**—छोटा उदेपूर संस्थानचें (रेवाकांठा मुं. इ.) मुख्य ठिकाण. उ. अ. २२° २०'; पू. रे. ७४° १'; येथील तळ्यापलीकडील आंबराई व नदी यामधील जमिनीवरच तात्या टोपीच्या लोकांचा १८५८ त पराभव झाला. तळ्याच्या कांठावर एक देऊळ असून त्याच्या शिखरावर चित्रें कोरलेलीं आहेत. राजवाड्याभोंवतालच्या कांहीं

घरांखेरीज इतर घरांवरून येथील लोकांच्या निष्कांचनतेची कल्पना सहज करतां येण्यासारखी आहे.

**उदेय्यार पालेयम्**, ता लु का—मद्रास. त्रिचनापल्ली जिल्ह्यामधील ईशान्येकडील तालुका. क्षेत्रफळ ७५३ चौ. मै. असून १९११ मध्यें लोकसंख्या ३१८४४४ होती. यांतील खेड्यांची संख्या २२७ असून उदेय्यारपालेयम् व अरय्यलूर हीं दोन मोठीं गांवें आहेत. येथील जमीन लाल आणि काळी या मिश्रणची आहे. अरय्यलूर जमीनदारीचा बहुतेक भाग काळाभोर असून कापसाच्या पिकाला चांगली आहे. दरसाल पावसाचें मान ३९ इंचांपर्यंत असतें. काळीचें उत्पन्न ४०१००० आहे.

श ह र.-मद्रास. त्रिचनापल्ली जिल्ह्यांतील उदेय्यारपालेयम् तालुक्यामधलि एक शहर.१९११सालीं लो. सं.६७५९ होती. येथील जमीनदाराचें राहण्याचें ठिकाण याच गांवीं असतें. कर्नाटकमधील युद्धाच्या वेळीं अठराव्या शतकांत पुष्कळ संस्थानिकांनां अनेक स्थित्यंतरांतून जावें लागलें, त्यांपैकींच उदेय्यारपालेयमांची स्थिति झाली होती. १८०१सालीं त्रिचनापल्ली ईस्ट-इंडिया-कंपनीला दिली, तेव्हां जमीनदाराला फक्त हजार रुपये दर महिन्यास वेतन मिळत असून जमीनदारी नवाबाच्या स्वाधीन होती. इंग्रज सरकारनें १८१७ त कांहीं भाग जमीनदाराकडे दिला.

**उंदेरी**—मुंबई. कुलाबा जिल्ह्याच्या अलीबाग तालुक्यांतील एक बेट. मुंबई बंदराच्या द्वाराशीं असून याच्या नैर्ऋत्येस सवा मैलावर खांदेरी नांवाचें बेट आहे. उंदेरीच्या ईशान्येस नांवा नांगरतात त्या ठिकाणीं एक लहानसें कोरीव लेणें आहे. १६७४ सालीं उंदेरीसंबंधानें फ्रायर यानें असें लिहून ठेविलें आहे कीं, यांचें नांव हनेरी असून तें कानेरीच्या पाश्चिमेस होतें. १६८० सालीं सिद्दी कासमनें या बेटावर तटबंदी करून १७ वें शतक संपेपर्यंत त्या ठिकाणीं राहिला. शिवाजीचा एक आरमारी सरदार दौलतखान नांवाचा होता. खांदेरी येथें त्याचें आरमार होतें. सन १६८० त सिद्दी व मराठे यांच्या दोन लढाया होऊन मराठ्यांचा फायदा झाला. संभाजी ( शिवाजीचा मुलगा ) २०० लोकांसह उंदेरी येथें येऊन पोहोंचला.सिद्दीनें पुष्कळ मराठे पाडाव केले.१७६१ त उंदेरी राघोबादादा पेशव्यानीं इंग्रजांनां दिली. नंतर उंदेरी बेट पेशव्यांच्या वतीनें आंग्रे यांजकडे आलें. येथील किल्ल्यावर संस्थानिक कैदी ठेवीत असत. १८३६ सालीं एक चोरांची टोळी चोर वाटेनें जमिनीखालच्या तळघरांत आली अशा संशयावरून १५ मनुष्यांस तळघरांत कोंडून ठेविलें होतें. उजेड, हवा व पाणी बरोबर न मिळाल्याकारणानें त्या १५ पैकीं १३ मेले. १८४० सालीं उंदेरी इंग्रज सरकारकडे कायमची आली. तेव्हांपासून तो एक पोट विभाग करून उंदेरीस मुख्य ठाणें केलें. या पोटविभागांत १३० खेड्यांची संख्या होती.

**उद्गाता**, वै दि क.-यज्ञ कर्मांतील मुख्य चार ऋत्विजांपैकीं एक. यज्ञकर्मांत याच्याकडे सामगायनाचें काम असतें. यज्ञामध्यें याच्या गणांत आणखी प्रस्तोता, प्रतिहर्ता व सुब्रह्मण्य या ऋत्विजांचा समावेश होतो. याच्यासंबंधीं माहिती 'वेदविद्या' ( ज्ञानकोश विभाग २ पृष्ठ ३७२ ). या विभागांत आली आहे.

पौ रा णि क.—( स्वायंभूवा वंशज) ऋषभदेव कुळांतील प्रतीह राजाच्या तीन पुत्रांतील कनिष्ठ. हा यज्ञकर्मप्रिय असून, त्यांत हा परम निपुण होता. म्हणून याचें हें नांव पडलें होतें. ( भाग. स्कं० ५, अ० १५. प्रा. को. )

**उद्गीर**, ता लु का.—हैद्राबाद संस्थान. बेदर जिल्ह्यांतील एक तालुका. १९११ सालीं लोकसंख्या जहागीर धरून १,००,२४२ होती. क्षेत्रफळ ६७६ चौरस मैल होतें. तालुक्यांत उद्गीर नांवाचें एकच शहर असून खेड्यांची संख्या १६४ आहे व त्यांत ५४ जहागिरी आहेत. १९०१ सालीं काळीचा वसूल तीन लक्ष होता. १९०५ सालीं कांहीं खेडीं नांदेड जिल्ह्यांतील देगलूर तालुक्याकडे गेलीं व बाकीचीं वरवाल राजुऱ्यापासून उद्गीरला जोडलीं. मिरारा (जहागीर), उद्गीर व बेदर तालुक्यांत असून त्यांत पंचेचाळीस गांवें आहेत व त्यांची लोकसंख्या २१,७३४ आहे.

श ह र.—हैद्राबाद संस्थान बेदर जिल्ह्यांतील उद्गीर तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या १९११ सालीं ७,२१३ होती. येथें विजापूरच्या राजानें एक किल्ला बांधला असून १६३६ सालीं शहाजहान बादशहाच्या सरदारांनीं त्यास वेढा देऊन उद्गीर सर केलें. इसवी सन १७६० त निजाम व मराठे यांच्यामध्यें एक मोठी लढाई झाली होती व तींत निजामाचा सर्वस्वी पराभव होऊन मराठे सांगतील त्या अटी कबूल करून निजामानें तह केला. किल्ला १४९३ सालीं बांधला असून त्याच्या सभोंवतीं तट आहे. आंत दोन व बाहेर दोन असे दरवाजे होते, पण आतां सर्व पडलेले आहेत.

**उद्गीरची लढाई**—उद्गीर हें पुण्याच्या थेट पूर्वेस सुमारें शंभर कोसांवर मांजरा नदीच्या कांठीं आहे. ही मोहीम १७६० च्या जानेवारी ते मार्चपर्यंत चालली होती. लढाईचें कारण असें झालें कीं, नगरचा किल्ला पेशव्यांनीं किल्लेदार कविजंग यास दरसाल पन्नास हजार उत्पन्नाची जहागीर देऊन ता. ९।११।१७५९ मध्यें हस्तगत केला. म्हणजे पूर्वीची निजामशाहीची राजधानीच गेली. त्यामुळें निजाम चिडला. इकडे पेशवे म्हणत कीं, 'निजामानें मागें कबूल केल्याप्रमाणें दहा लक्षांची जहागीर व नगर व परांडा हे किल्ले तो आम्हांस देत नाहीं.' याप्रमाणें दोहोंकडून कारणें सांगण्यांत येऊन मोहिमेस प्रारंभ झाला. सन १७५९ आक्टोबर १ रोजीं दसऱ्यास पेशव्यांनीं गारपिरावर डेरे दिले. जानेवारींतच भाऊसाहेबांनीं इब्राहिमखान गारद्यास नोकरीस ठेविलें. यापूर्वी तो निजामाकडे होताव

त्याच्या हाताखालीं १ हजार फिरंगी होते. त्याची नेमणूक तोफखान्यावर केली. सदाशिवरावभाऊ, विश्वासराव व दादासाहेब असे त्रिवर्ग या मोहिमेंत होते. निजामबंधूंत सलाबतजंग पेशव्यांच्या विरुद्ध लढाईस राजी नव्हता. तो लढाईस न येतां अदवानीस निघून गेला. निजामअली मात्र पेशव्यांचा शत्रू बनला होता. निजामाकडून बुसी गेल्या नंतर पेशव्यांची अशी इच्छा होती कीं, निजामानें आतां सर्वस्वीं आपल्या ताब्यांत राहिलें पाहिजे. त्याच्यावर कोणी शत्रु आल्यास त्याचें निवारण आम्ही करूं व निजामचा बचाव करूं. या वेळीं असलेंच राजकारण इंग्रज निजामअलीशीं खेळत होते. हा डाव हाणून पाडण्याचा बेत पेशव्यांचा होता. पण निजामअलीस तो पसंत पडला नाहीं व त्यानें युद्धाची तयारी केली. मात्र, त्याची बाजू लंगडी होती. राज्यांतील वसूल बराच थकला होता म्हणून फौजेचाहि पगार तटला होता. पगारासाठीं फौज ओरडत होती. तरी पण निजामानें हैदराबादेहून निघून बेदरवरून धारूर गांठलें. इकडे भाऊसाहेबांनीं पुण्याहून नगरास येऊन तेथून नानासाहेबांना 'निजाम निघाला असल्यानें आपण फौजेसह नगरास यावें आम्ही पुढें जातों' असा निरोप पाठवून, नगर सोडून पांडेपेडगांवचा किल्ला बहादुरगड काबीज करून उद्गीरकडे चाल केली. पेशव्यांकडे गारदी १२ हजार होते; ते धरून एकूण ४० हजार फौज होती. निजामाकडे १० हजार गाडदी व शिवाय इतर फौज १२ हजार असून १०० तोफा होत्या. त्यानें अगोदरच व्यंकटराव निंबाळकर, रामचंद्र जाधवराव यांच्या हाताखालीं ७८ हजारांची तुकडी देऊन त्यास धारूरास पाठविलें होतें, व आपण स्वत: उद्गीररोखें चाल करीत होता. हें वर्तमान भाऊसाहेबांस समजतांच निजामाला धारूरला न जाऊं देतां मध्येंच गांठून रगडावा असें त्यांनीं ठरविलें व उद्गीरकडे रोंख फिरविला. आपल्या दोन्ही सैन्यांत पेशवे पाचर ठोकतात हें आतां निजामाला कळलें. उद्गीरच्या अलीकडे ६ कोसांवर उभयतांची गांठ पडली. निजामाच्या चौगीर्द वेढा भाऊसाहेबांनीं दिला. ता. १९ व ता. २० जानेवारी रोजीं दोन लढाया झाल्या. इब्राहिमखानानें प्रथम तोंड लाविलें. युद्धप्रसंग बराच झाला. मोंगलाकडे आगेचें (तोफांचें) बळ भारी. तरी मोंगलाकडील २१३ मातबर सरदार पडले. पेशव्यांनीं निजामाची दाणावैरण बंद केली. इकडे निजामानें धारूरच्या आपल्या सैन्याच्या मदतीची वाट पाहिली परंतु तो विभाग इकडे येऊं शकला नाहीं. कदाचित पेशव्यांनीं त्यांनां पायबंद दिला असावा. तेव्हां निजाम धारूरच्या सैन्यास मिळण्याकरितां निघाला; हें श्रीमंतांस समजतांच, 'धारूरास (निजाम) गेल्यावर, (निंबाळकर वगैरे) मराठे त्यास मिळाले म्हणजे विचार पडेल, हें उत्तम नाहीं,' असा भाऊसाहेबांनीं मनसुबा करून रविवार माघ वद्य २ (३ फेब्रुवारी) रोजीं प्रातःकाळीं युद्ध करावें असा निश्चय केला. निजाम धारूरकडे जात असतां औशीस मोंगलास श्रीमंतांनीं गांठलें. २ महिने सडे स्वारीनें रात्रंदिवस घोड्यावर जीन ठेऊन, सभोंवत्या फौजा ठेऊन विश्वासराव दावघाव पहात होते. निजामाच्या मार्गांतील गांव, खेडीं जाळून लुटलीं होतीं. रवीवारीं सकाळीं निजाम गोटावर अवलंबून बसला. दोन प्रहरीं युद्धास प्रारंभ झाला. मोंगलानें गोल करून भोंवतीं तोफखाना ठेविला होता. पेशव्यांनीं पिछाडीवर व बगलेवर हल्ले केले. तोफेची रंजक एक उडाली. उजवीकडून भाऊसाहेब व विश्वासराव आणि डावीकडून दादासाहेब यांनीं एकदम हल्ले केले. ते मारामारी करीत खाशाच्या हौद्यापर्यंत गेले. मोंगल कचरला. त्यानें हिंमत सोडली. त्यानें आणखी दम धरला असता, तर त्याला पार गर्दीस मिळविला असता. परंतु संध्याकाळ झाली व चारणाच्या बैलांची दाटी झाली. निजामाकडील लोक फार पडले व जखमी झाले. ७८ मातबर सरदार मारले. प्यादे व गाडदी यांस गणीत नाहीं. श्रीमंतांकडील केशवराव पानशी (तोफखान्याचे दरोगे) ठार होऊन इतर २००-४०० सैन्य जखमी झालें. दादासाहेबांच्या चिलखतावर तीर लागला. विश्वासरावांनां तिरंदाजी बहुत उत्तम केली. त्रिवर्ग श्रीमंत हत्तीवर होते. निजाम शरण आला; त्यानें दुसरे दिवशीं दिवाण विठ्ठल सुंदरराव शिक्केकट्यार देऊन तह करण्याकरितां पेशव्याकडे पाठविले. प्रथम भाऊसाहेबांनीं १ कोटीचा मुलूख व दौलताबाद मागितली. अखेर रदबदली होऊन पुढील तह झाला. साठ लाखांची जहागीर व दौलताबाद, सालेर, मुल्हेर, अहमदनगर, अशीरगड, विजापूर व ६ किल्ले पेशव्यांना मिळाले. हें वर्तमान आंबेपडदुरास नानासाहेब होते त्यांनां कळविलें. त्रिवर्ग श्रीमंतांनीं तेथें जाऊन त्यांची भेट घेतली. निजाम हैद्राबादी परत गेला. उद्गीरचा विजय हा मराठशाहीचा व पेशव्यांच्या कर्तबगारीचा कळस होय!

**उद्दंड**—उद्दंड रंगनाथ किंवा उद्दंडिन. तुंडीर मंडलांतील लाटपूरचा हा रहिवाशी असून याचें कुलनाम इसगपनाथ असें होतें. गोकुलनाथाचा पौत्र व कृष्णाचा पुत्र अशी याची वंशावली सांगतात.

हा कुक्कुटक्रोड (कालिकत) येथील मानविक्रम नांवाच्या झामोरिनच्या दरबारीं राजपंडित होता. हा १७ व्या शतकांत झाला. यानें झामोरिनच्या हुकुमावरून 'मल्लिका मारुत' नांवाचें दशांकी नाटक लिहिलें. यांत विद्याधर राजाची मुलगी मल्लिका मारुत नांवाच्या कुंतल राजपुत्रास दिली असल्याचें दाखविलें आहे. लग्नापूर्वी एका रानटी हत्तीशीं साहस व मल्लिकेचें राक्षसाकडून हरण दाखविलें आहे. उद्दंड व दंडी हे एकच असावेत असाहि एक चुकीचा समज आहे. [स्टीन कनो. आफ्रेक्ट].

**उद्दंडपुर**—बंगाल्यांतील पालराजांची अर्वाचीन राजधानी. हें गांव इ. स. ७३० च्या सुमारास पाल घराण्याचा

मूळपुरुष गोपालराज यानें वसविलें. गोपालराज हा बौद्धधर्मीय असल्यानें त्यानें येथें एक मोठा बौद्धमठ स्थापिला होता. हल्लीं हा गांव बहार प्रांतांत असून त्याला ओतंतपुरी असें म्हणतात. [ व्हिन्सेंट स्मिथ अर्ली हिस्टरी ]

**उद्दालक.**—आरुणि. गौतमगोत्रोत्पन्न अरुणि ऋषीचा पुत्र व धौम्य ऋषीचा शिष्य. आरुणि हा पंचाल देशांतला म्हणून यास आरुणि पांचाल असेंहि म्हणत. गुरूच्या शेतास घातलेला मातीचा बांध पाण्याच्या प्रवाहामुळें राहीना म्हणून, यानें स्वतः बरेच दिवस एकसारखें आडवें पडून पाणी थांबविलें होतें. या एकनिष्ठ सेवेमुळें धौम्य ऋषि प्रसन्न होऊन त्यांनीं उद्दालकावर अनुग्रह केला. यास श्वेतकेतु व नचिकेत असे दोन मुलगे व सुजाता नांवाची मुलगी होती. [ म. भा. आदि. ३ )

**उद्धव.**—वसुदेवाच्या देवभाग नांवाच्या भावाचा मुलगा. हा यादव मोठा कृष्णभक्त होता. हा महान योद्धा असून प्रत्यक्ष बृहस्पतीचा शिष्य व श्रीकृष्णाचा जिवलग स्नेही होता. श्रीकृष्ण याला आपलें हितगुज सांगत असे. तो मथुरेस आल्यावर कांहीं दिवसांनीं त्यानें उद्धवास गोकुळवासीयांचें विरहदुःख शमन करण्याकरितां त्यांच्याकडे पाठविलें होतें. " उद्धवा शांतवन कर जा । त्या गोकुलवासि जनांचें ॥ " हें मध्वमुनीचें यासंबंधीं पद विशेष हृदयंगम वाटतें. धर्मानें केलेल्या राजसूय यज्ञास जाण्याविषयीं नारदानें श्रीकृष्णास आग्रह केला असतां, कृष्णानें उद्धवाचा अभिप्राय मागितला, व उद्धवानें अनुमोदन दिल्यावरच तो इंद्रप्रस्थास गेला. यावरून श्रीकृष्ण उद्धवास किती चाहत असे हें दिसून येतें. श्रीकृष्णनिर्याणाच्या प्रसंगीं भगवंतानें उद्धवाला बराच उपदेश केला, व भागवताच्या एकादशस्कंधांत विवेचिलेलें सर्व ज्ञान उद्धवामुळेंच जगाला लाभलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीकृष्णाचा विरह झाल्यानंतर त्याच्याच आज्ञेनें तो बदरिकाश्रमीं गेला [ भागवत १, ३ व ११ ].

(१) सत्कथासार हा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे, त्यावरून याची व त्याचे गुरु काशिराज यांची जी माहिती मिळते ती अशी लक्ष्मण पत्नी भागीरथी व पुत्र शिववा ( उद्धव ) हे रामानुज संप्रदायी, श्रीकृष्ण उपासक व मुलहेर ( नाशिक ) येथें होते. काल सुमारें १५४०ते १६००. रंगनाथ ( मोगरे ) यांचे शिष्य एक काशिराज होते. परंतु ते व हे एक नव्हत. तसेंच निरंजन यांचेहि गुरु एक काशिराज होते. ते गाणपत्य होते. उद्धवाचे गुरू ( रामानुज असूनहि ) गणपति उपासक होते. दोघांचाहि काल एकच तेव्हां या दोन भिन्न व्यक्ती कीं काय हा संशय आहे. यांचे ग्रंथ अभंग, उद्धवबोध, बोधरहस्य संतमाळ, स्वरूपानुभव, पदें. इ. [ सं. क. का. सु. ]

**उद्धव गोसावी**—( १६२४–१७१३ ).—टाकळीचा, रामदासांचा पहिला शिष्य, सदाशिवपंत नामक देशस्थ ब्राह्मणाचा मुलगा. आईचें नांव उमाबाई. समर्थांच्या प्रसादानें हा मुलगा झाला म्हणून आईबापांनीं त्यास समर्थसेवेस दिलें. ही कथा अर्वाचीन कोशकारांनीं सविस्तर दिली आहे.

**उद्धवचिद्घन**—हा कवि इ. स. १६८० च्या सुमारास होऊन गेला. मोंगलाईत वाडी स्टेशनपासून ५७ मैलावर धारूर गांव आहे त्याठिकाणीं उद्धवचिद्घन राहात असे. याचें नांव उद्धव असून चिद्घन हें याच्या गुरूचें नांव आहे. हा देशस्थ ब्राह्मण रामोपासक होता.

" ज्याचे वंशीं कुलधर्म रामसेवा । त्याचे वंशीं मज जन्म देगा देवा ॥ ध्रु०॥" हें उद्धवस्वामींचें पद प्रसिद्ध आहे. याची कविता अगदीं साधी परंतु भक्तिरसपूर्ण आहे. भाषा अत्यंत सुलभ असून तींत परकीय भाषेंतले शब्द फारसे नाहींत. तथापि काव्यदृष्टीनें याची कविता फारशी हृदयंगम नाहीं.

" कृष्णा धांवरे लवकरी । संकट पडलें भारी ।
हरि तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारी ॥ ध्रु० ॥"

हा धांवा करुणारसपूर्ण असून स्त्रियांत रूढ आहे.

उद्धवचिद्घनाची कांहीं कविता काव्यसंग्रहांत छापिली आहे. याची छापिलेली कविता निरनिराळ्या वृत्तांत आहे. 'अनुभवशतक' हें अनेक वृत्तांत श्लोकबद्ध रचिलेलें आहे. याचा 'गीतार्थमंजरी' हा गीतेचा छायारूपी ग्रंथ सवाई वृत्तांत आहे. याचा शुकरंभा संवाद 'दिंडी' वृत्तांत आहे, व 'नागनाथ' आणि त्याचे शिष्य 'हेगराज' व 'बहिरंभट किंवा 'बहिरापिसा' यांचीं चरित्रें तसेंच मृत्युंजय, 'गोराकुंभार' वगैरेंचीं चरित्रें यानें साकी वृत्तांत गाइलीं आहेत; अशी याची विविध रचना आहे. परंतु उद्धवचिद्घनाचें नांव आपणांस नेहमीं ऐकूं येतें तें याच्या यांपैकीं कोणत्याहि प्रकरणावरून नसून याच्या अप्रसिद्ध व अनुपलब्ध अशा 'भक्तकथामृतसार' किंवा अशाच नांवाच्या संतचरित्रात्मक ग्रंथावरून होय. हा ग्रंथ कोठेंहि आढळत नाहीं. उद्धवचिद्घनानें रचिलेली एक संतमाला मात्र प्रसिद्ध आहे हींत पुष्कळ संतांचा उल्लेख असून कांहींच्या संबंधीं मुख्य अशी एखाद दुसरी गोष्ट सांगितलेली आहे. या संतमालेची नक्कल महीपतीबुवांनीं उतरून घेतली होती. उद्धवचिद्घन याची समाधी मौजे 'धारूर' येथें आहे. [ महाराष्ट्र कविचरित्र; महाराष्ट्र सारस्वत ]

**उद्धव नाला**—बंगाल. सोंथल परगण्यांतील गांव आणि नाला. याच ठिकाणीं सन १७६३ सालीं मेजर अॅडम्सनें नबाब मीरकासीमच्या सैन्याचा पराभव केला होता.

**उद्धव योगदेव.**—औरंगजेबानें इ. स. १६९० त रायगड काबीज करून येसुबाई व शाहू यांनां पकडून नेलें, त्यावेळीं त्यांच्याबरोबर हा होता. याला राजाज्ञा अशी पदवी त्यावेळीं होती. शाहू औरंगजेबाच्या कैदेंत असतां त्याचा राजकीय कारभार उद्धवपंतच पाही. यानेंच शाहूकरितां मुली पाहून त्याचीं लग्नें केलीं. शाहू दक्षिणेंत आला तरी उद्धव पंत मागें येसुबाईबरोबर राहिला होता. ( म. रि. म. वि. ३ पृ. ३०१ )

**उद्बोधनाथ**—एक महाराष्ट्र कवि. राशिन गांवचा यजुर्वेदी वाजसनेयी शाखेचा ब्राह्मण, आडनांव ठिपसे. नांव उद्धव. गैबीनाथाची शिष्या गुप्तनाथा हिनें उद्धवास उपदेश देऊन उद्बोध असें त्याचें नांव ठेविलें. उद्बोधनाथाचीं पदें, अभंग वगैरे रचना आहे. पदें योगमार्गी दिसतात. नाथाचे बरेच शिष्य होते, त्यांपैकीं केसरीनाथ पुढें प्रसिद्धीस आला.

उद्बोधनाथानें शके १६०९ त, वैशाख वद्य ९स समाधि घेतली. यांची समाधि राशिन येथे आहे. [ सं. क. का. सू. महाराष्ट्र कविचरित्र. महाराष्ट्र सारस्वत. ]

**उद्वेग रोग**—चित्तभ्रम हें ज्यांत कमीअधिक प्रमाणांत मुख्य लक्षण आहे अशी ही एक मानसिक व्याधि आहे. इंग्रजींत हिला हायपोकाँड्रिआसिस म्हणतात. या व्याधीनें ग्रस्त असलेल्या रोग्यांची स्थिति बहुतेक वेड्या माणसाप्रमाणें असल्यामुळें त्यास वेड्याप्रमाणेंच फार जपून वागवावें लागतें. पण असे रोगी क्वचित आढळतात. परंतु पुढील वर्णन सौम्य प्रकारच्या व्याधींचें दिलें आहे, तीं लक्षणें असलेले रोगी वैद्याच्या नजरेस वारंवार येतात. साधारण वेड्या माणसास इतर गोष्टींविषयीं चित्तभ्रम असतो परंतु या माणसांना हा चित्तभ्रम स्वतःच्या शरीरांतील इंद्रियांविषयीं होत असल्यामुळें तीं बिघडलीं आहेत असा बळकट संदेह उत्पन्न होतो.

का र णें.—वीस ते तीस वयाच्या पुरुषांनां हीं लक्षणें बहुतकरून होतात. व स्त्रियांनां तीं क्वचितच होतात. मातापितरेंहि अशा लक्षणांनीं पीडिलेलीं कधीं कधीं असतात. अति श्रम, मानसिक व शारीरिक काळजी, अपचन, लहानपणीं मज्जातंतूंचे विकार होऊन शरीर निर्बल होणें हीं अन्य कारणें होत.

ल क्ष णें.—आपणाला कांहीं मोठा कष्टसाध्य रोग झाला आहे हा भ्रम असलेल्या रोग्याला होऊन त्या काळजीनें चिंतातुर असतो. त्यामुळें त्याचें कोणत्याच कामधंद्याकडे लक्ष लागत नाहीं. शरीरांत आहार, हवामान इत्यादि कारणानें किंचित्हि विकार भासल्यास ' पराचा कावळा ' या न्यायानें तो आपलीं लक्षणें भयंकर वाढलीं आहेत या भावनेनें बेजार होतो. यांमुळें स्वतःचें मलमूत्र, जीभ, त्वचा इत्यादींचें निरीक्षण तो मोठ्या बारकाईनें करीत असतो. जरा पोटांत दुखल्यासारखें वाटलें कीं मला व्रण अगर उदरांतील क्यान्सर किंवा जीं इतर रोगांचीं नांवें ऐकलीं असतील त्यांपैकीं एखादा रोग खास झाला अशी त्याची समजूत बळावत जाते. पण डाक्टरानें पुष्कळ तपासून पाहिल्यास खरोखरी तसें कांहीं एक झालेलें नसतें पोट बिघडलें आहे हा भ्रम असलेल्या रोग्यांची संख्या बरीच मोठी असते. याच्या खालोखाल काल्पनिक वीर्यनाश, नपुंसकत्व इत्यादि विकारांच्या भीतीमुळें सदा उदासीन झालेले रोगी बरेच असतात. पोरपणीं यांच्याकडून वीर्यपातादि प्रमाद थोडेसे होऊन पुढें एखादे वेळीं स्वप्नावस्था झाल्यास असाच वीर्यनाश नेहमीं होत जाऊन नपुंसकत्व खास येणार या चिंतेनें ते अगदीं वेडे बनतात व लबाड लोकांच्या औषधांच्या जाहिरातींतील ठराविक लक्षणें वाचून ( जसें अशक्तपणा, भोंवळ डोकें हलकें होणें, स्मरणशक्तीचा ऱ्हास, कामावर लक्ष न लागणें हीं जीं लक्षणें सर्वसाधारण असल्यामुळें इतर व्याधींतहि असतात व कल्पनेनें भासतात ) ते अगदीं निराश होतात. " आपणांस लग्न कर्तव्य नाहीं; कारण नपुंसकत्व आपल्या कपाळीं ठेवलेंच आहे. यापुढें जगांत कांहीं सुख आपणांस उरलें नाहीं" अशा समजुती दृढ होतात किंवा अशांपैकीं ज्या थोड्यांच्याकडून वेश्यागमन इत्यादि प्रमाद झाले असतील, त्यांस उपदंशादि भयंकर रोग खरोखरी झाले नसतांनां ते झाले आहेतच, हा भ्रमच मुळीं चैन पडूं देत नाहीं. इंद्रियाच्या ठिकाणीं कांहीं भास झाला अगर दुखलें कीं, या समजुतींत भर पडते व तो रोग नाहीं, असें कोणी समजावून सांगितल्यासहि समजूत पटत नाहीं. चैन न पडून डोक्यांत अगर मेंदूंत कांहीं रोग किंवा गांठ झाली आहे, हा भ्रम होऊनच कित्येकजण काळजींत चूर होतात. कोणास वेड लागण्याची काल्पनिक भीति वाटत असते.

मध्यंतरीं सुधारणा जरी वाटली तरी हीं लक्षणें बरींच वर्षें नाहींशी होत नाहींत. क्वचित् काळीं या व्याधीचा शेवट वेडांत होतो. वेडामध्यें निरनिराळ्या रोग्यांत निरनिराळ्या प्रकारचे चमत्कारिक भ्रम उद्भवतात. कोणास वाटतें आपल्या पोटांत अगर मेंदूंत कांहीं जिवंत प्राणी वास्तव्य करीत आहेत. कोणास असा भ्रम होतो कीं, आपलें शरीर कांच अगर लांकूड यांचें बनलेलें आहे. ही मानसिक स्थिति कधीं कमी तर कधीं जास्ती होऊन कधीं भ्रम अगदीं नाहींसाहि होतो. आत्महत्येची प्रवृत्ति बहुधा नसते.

उ प चा र.—मानसिक दौर्बल्य इच्छाशक्तीनें घालविण्यास उत्तेजन द्यावें. त्यास होणारीं लक्षणें निव्वळ ढोंग आहे असें म्हणूं नये; पण त्यावर अति औषधांचा मारा करूं नये. रोगलक्षणांतून त्याचें लक्ष जेणेंकरून दुसरीकडे वळेल असा जीवनक्रम त्यास आंखून द्यावा. प्रवास, करमणूक, खेळ इत्यादि साधनांनीं या शरीरांतील काल्पनिक लक्षणांकडे लक्ष बरेंच कमी प्रमाणांत जातें. पांडुरता ( पंडुरोग ) बद्धकोष्ठ, अपचन, उष्णवात इत्यादि रोग या रोग्यांनां खरोखरीच असण्याचा संभव असतो. त्यावर मात्र औषधयोजना करीत जावें म्हणजे इतर लक्षणें व भ्रम हीं कमी अगर नाहींशीं होतात.

**उन**.—मध्यहिंदुस्थान. इंदूर संस्थान. नेमाड जिल्ह्यांतील पुरातन गांव. येथील लो. सं. १९०१ सालीं १२५६ होती. पूर्वीं हें स्थळ कांहींसें बरें होतें. हल्लीं निवळ खेडें झालेलें आहे. येथें एक जैन देऊळ बाराव्या शतकांतलें असून धारच्या परमार राजाचा शिलालेख आहे. तुकोजीराव होळकरांनीं तलाव बांधण्याचीं कामें सुरू करून मक्ते दिले त्यावेळीं मक्तेदारांनीं वरील देवळांची फार नासाडी केली. या ठिकाणीं एक पोष्ट आफीस व शाळा हीं आहेत.

**उन-देलवाडा**—मुंबई. काठेवाड.जुनागड संस्थानांतील एक जोड गांव. हें मचुंद्री नदीच्या कांठीं असून १९११ सालीं लो. सं. ६२५१ होती. प्राचीन उन गांवाला उन्नतदुर्ग म्हणत असून तें सांप्रतच्या उन गांवाजवळच होतें सांप्रतच्या गांवाचें नांव पूर्वी देल्वाडा होतें. म्हणून सबंध गांवाचें नांव उन-देलवाडा असें पडलें. पूर्वी येथें उनेवाल ब्राह्मणांची सत्ता होती. परंतु वेजल वाजो याच्या नवरीचा या ब्राह्मणांकडून अपमान झाल्यामुळें त्यानें साऱ्या ब्राह्मणांची कत्तल केली. ब्राह्मणवधामुळें उन्नतदुर्ग भ्रष्ट झाला म्हणून सर्व वस्ती जवळच्या देलवाड्यास आली. त्याला उन नांव पडण्याचें कारण हेंच. यानंतर उन्यास मुसुलमानी अंमल झाला. मुसुलमानांनीं उन्याच्या दक्षिणेस ३ मैलांवर नवी वस्ती वसविली. या नव्या वस्तीला देलवाडा म्हणतात. देलवाड्यापासून ४ व उनापासून ७ मैल दिववेट व किल्ला आहे; उन येथें शहाबागेंन संवत् १६५२ चा लेख आहे; त्यांत अकबरानें जिझीया वगैरे कर कसे उठविले याचें वर्णन आहे. [ मुं. गॅ. ८ इं. गॅ. २४ ]

**उनबदेव.**—मुंबई. पूर्वखानदेश. चोपडें तालुक्यांत अडावदच्या उत्तरेस तीन मैलांवर एक उजाड खेडें असून यथें एक उन्हाळें आहे. याचें ऊन पाणी एका देवळाच्या चौथऱ्याखालून निघतांना दिसतें व पुढें एका गायमुखांतून एका कुंडांत पडतें. येथें एक धर्मशाळा व दोन लहान देवळें आहेत. या पाण्यांत स्नान केल्यानें ( त्यांत गंधक असल्यानें ) त्वचेचे रोग बरे होतात अशी समजूत आहे. श्रीरामांनीं सारंग ऋषीचा रोग नाहींसा करण्याकरितां बाण मारून हा झरा उत्पन्न केल्याची दंतकथा आहे. पाण्याची उष्णता १४०° आहे. [ मुं. गॅ. १२ ]

**उना त ह शी ल.**—पंजाब. होशयारपूर जिल्ह्यांतील एक तहशील. क्षेत्रफळ ७१६ चौ. मै. आहे. शिवालिक पहाडाच्या रांगांमधील साहेन नांवाची एक मोठी खडकाळ दरी याच तहशलींत असून बिआस नदी येथून उगम पावते. शिवाय सतलज नदीच्या डाव्या तीरावर जंदवारी नांवाचा तालुका उना तहशीलींत मोडतो. १९११ सालीं लो. सं, २३१८५७ व खेड्यांची संख्या ५२६ होती. तहशीलींत उना व आनंदपूर हीं दोन मोठीं गांवें असून काळींचें उत्पन्न १९०३-०४ सालीं ३ लक्ष होतें.

**गां व.**—पंजाब. होशयारपूर जिल्हा. उना तहशीलींचें मुख्य शहर. याची लो. सं. १९०१ सालीं ४७४६ होती पहिला शीख गुरु बाबा नानकापासून कालाधाढी घराण्यांतून बेडी वंशाचे राजे उत्पन्न झाले होते. त्यांची मुख्य जागा उना शहरीं असल्यामुळें या गांवाला महत्त्व आलेलें आहे. व्यापार वगैरे फारसा नाहीं १८६७ सालीं म्यु. कमिटीची स्थापना झाली. १९०२-०३ सालीं उत्पन्न ३८०० असून खर्च २९०० रुपये झाला. ऐथें एक शाळा असून सरकारी दवाखाना आहे.

**उनियार.**—राजपुताना. जयपूर संस्थान. मालपूर जिल्हा ( निझामत् ) यांतील उनियार जमीनदारीचें मुख्य शहर. बनास नदीला मिळणाऱ्या तलवा नदीच्या कांठीं असून जयपूर शहरापासून ७२ मैल आहे. गांवाला तटबंदी असून किल्ला आहे. १९११ सालीं ४६१३ लो. सं. होती. उनियारचे रावराजे कच्छवाह रजपूत असून नरुक पंथाचे आहेत. हे जयपूरदरबारला ३७६०० रुपये दरसाल खंडणी देतात. या ठिकाणीं एक प्राथमिक शाळा आहे. सबंध जमीनदारींत १ शहर व १२४ खेडीं आहेत. १९११ सालीं जमीनदारीची लो. सं. ३३७०८ होती. जयपूर संस्थानांत उनियार हा फार सुपीक भाग असून रावराजांनां दरसालचें उत्पन्न ३ लक्ष रुपये आहे.

**उनी**—मध्य हिंदुस्थान माळवा एजन्सींत एक लहानसें ( ठाकूरात ) संस्थान. यांत एकच गांव असून त्या गांवांत ६४१ वस्ती आहे. वार्षिक उत्पन्न १८०० आहे.

**उन्कल.**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. हुबळीच्या उत्तरेस सुमारें तीन मैलांवरचा एक गांव. गांवांत तीन जुनीं देवळें असून तीं सर्व जखनाचार्यानें बांधलेलीं आहेत असें म्हणतात. यांपैकीं दोन म्हणजे कळमेश्वराचें व वीरभद्राचें देऊळ, हीं लहान व नवीन बांधणीचीं दिसतात. पण तिसरें चंद्रमौलेश्वराचें देऊळ काळ्या दगडाचें असून त्याच्या भिंती व खांब नक्षीदार आहेत. उन्कलच्या पडक्या किल्ल्यास जाण्याच्या रस्त्यावर दोन शिलालेख आहेत. [ मुं. गॅ. पु. २२ ]

**उन्नाव, जि ल्हा.**—संयुक्त प्रांत. लखनौविभागातील एक जिल्हा. हा गंगा नदीच्या इशान्येस असून याचें क्षेत्र १७९२ चौ. मै. आहे. चतुःसीमा उत्तरेस हरदोई, ईशान्येस लखनौ व रायबरेली, आग्नेयीस रायबरेली. भागिरथीनदी येथून खोल वाहत जाते. उन्नाव जिल्ह्याची मुख्य नदी भागीरथी असून ती संबंध नैर्ऋत्य दिशेची सरहद्द आहे. जिल्ह्याच्या उत्तरेकडून सायनदी वहात जाऊन भागीरथीशीं समांतर होऊन ईशान्य हद्दींतून वाहते. कल्याणी नांवाची लहान नदी भागीरथीच्या वरील प्रदेशांतून वाहत येऊन, लोणी नांवाची नदी उन्नाव जिल्ह्याच्या मध्यभागीं उगम पासून आग्नेयीकडून रायबरेलीकडे जाते.

उन्नाव जिल्ह्यांत लांकडांची समृद्धि आहे. लांडगे कोल्हे रानडुकर, निलगाई व काळवीट आढळतात. जंगली गुरें कळपानें फिरतात. नद्यांत मासे पुष्कळ सांपडतात. उन्नाव जिल्ह्याची हवा निरोगी असून उष्णकाळांत पारा ७५° पासून १०३° अंशापर्यंत जातो व हिंवाळ्यांत ४६° पासून ७९° पर्यंत असतो पावसाचें मान दरसाल ३५ इंच असतें.

**इ ति हा स.**—दंतकथेवरून जिल्ह्यांतील बऱ्याच गांवांचा संबंध रामायणांतील कथाभागांशीं जोडतात. याहून उन्नावचा इतिहास मुसुलमानी स्वाऱ्यापर्यंत विशेष नाहीं. सन १२०० सालीं उन्नाव घेण्याचा प्रयत्न रजपुतांनीं केलेला होता परंतु

मुसुलमानांपुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. अल्लाउद्दीनानें उन्नाव घेतलें होतें. पंधराव्या शतकांत जौनपुराहून इब्राहिम शहानें स्वारी करून सफीपूर घेतलें. अकबर बादशहा असतां उन्नाव लखनौ सरकारांत सामील केलेलें होतें. १८ व्या शतकांत अयोध्येचा नबाब सादतखान याचा पराभव बियास राजानें केला. १८५६ सालीं ज्यावेळेस उन्नाव जिल्हा इंग्रज राज्याला जोडला त्यावेळेस उन्नाव जिल्ह्याचें ठाणें करून पुर्विआ जिल्हा नवा केला एक वर्षानंतर५७सालच्या बंडाची धामधूम सुरु झाली. त्यावेळीं उन्नावच्या डेप्युटी कमिशनरला लखनौस पळून जावें लागलें. थोडे तालुकदार राजनिष्ट राहिले त्यांनीं शक्य ती मदत इंग्रजांना दिली. कांहीं तटस्थ राहिले. तथापि चांगला पुढारी नसल्याकारणानें इंग्रजांची बाजू फारशी डळमळली नाहीं. जुलईंस हॅवेलॉकनें कानपूर सोडून उन्नावपर्यंत प्रवेश करून लखनौवर चाल केली परंतु शेवटीं त्यास मागें हटावें लागलें. पुढें सप्टंबर महिन्यांत औटरॅमनें लखनौ सांडविलें व पुढें बंडाचा जोर कमी कमी होत चालला. १८६९ सालीं उन्नाव जिल्हा लखनौ व रायबरेलीचे परगणे मिळून सांप्रत आहे तसा बनवून टाकला.

बिठूरच्या समोर भागीरथीच्या कांठीं परैपर गांवाजवळ तांब्याचीं बाणाग्रें पुष्कळ सांपडलीं. बुद्धाच्या वेळचे अवशेष अढळतात. प्राचीन मुसुलमानी इमारती बांगरमाऊ येथें आहेत.

लो क सं ख्या.—जिल्ह्यांत एकंदर ८ शहरें असून खेडीं १६५४ आहेत. १९२१ सालीं लो. सं. ८१९१२८ होती. जिल्ह्यांत ४ तहसिली आहेत .उन्नावं, सफीपूर, पुर्विआ व मोहन. मोहन तालुक्याचें मुख्य ठिकाण हसनगंज आहे. उन्नाव येथें म्यु. कमिटी आहे.

शे त की.—उन्नाव जिल्हा सरासरी पिकाचा असून अयोध्येप्रमाणें सुपीक नाहीं. मुख्य धान्यें जव गहूं व हरबरा, तूर, बाजरी, मका, तांदूळ आणि ज्वारी पुष्कळ पिकतात. कापूस आणि गळिताचीं धान्यें थोड्या प्रमाणांत येतात. गुरें उत्तम प्रकारचीं नसून चांगली पैदास व्हावी म्हणून प्रयत्न चालू आहेत, या जिल्ह्यांत कालवे मुळींच नाहींत.

उ द्यो ग धं दे.—उन्नावमध्यें उद्योगधंदे फारसे नाहींत पूर्वी नीळ व मीठ होत होतें. आतां ते धंदे सफा बुडालेले आहेत. आतां भगवंत नगर, नवलगंज व मुरादाबाद येथें तांब्याचीं व पितळेचीं भांडीं तयार करतात. आपल्यापुरता जाड कापसाचा कपडा विणतात. उन्नावमधून धान्यें साखर, तूप बाहेरगांवीं पाठविलें जातें. बाहेरगांवाहून कापड, मीठ, धातू आणि मसाले येतात. कानपूरशीं गाडी मार्गानें दळणवळण बरेंच आहे.

म्युनिसिपलकमिटी फक्त उन्नाव येथें असून बाकी सात गांवांची व्यवस्था १८५६ च्या वीसाव्या कायद्यान्वयें चालते जरूर कामें बोर्डांतून निकालास लागतात.

शिक्षणाच्या बाबतींत उन्नाव मागेंच म्हणतां येईल.एकंदर लोकसंख्येंत शेंकडातीन लिहिणारे वाचणारे आहेत. १९०३–४ सालीं १८० शाळा असून ८०१८ विद्यार्थी शिकत होते. त्यांत ५२ मुली होत्या. शिवाय खाजगी शाळा ६१ असून त्यांत ६३९ विद्यार्थी होते. शिक्षण प्रीत्यर्थ खर्च एकेचाळीस हजार रुपये झालेला आहे. उन्नाव येथें इस्पितळ व दवाखाने मिळून ७ आहेत.

त ह शी ल—संयुक्त जिल्ह्यांतील एक तहशील. ईंत उन्नाव, शिकंदरपूर, परियर वहही हे परगणे येतात. क्षेत्रफळ ४०१ चौरस मैल असून १९११ सालीं लोकसंख्या १८४८५५ होती. खेड्यांची संख्या २८७ असून तहशिलीचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण उन्नाव येथें आहे. १९०३–०४ सालीं कालीचें उत्पन्न ३४७००० व इतर बाबींचें उत्पन्न ३६००० होतें. तालुक्यांतील वस्ती विरळ असून पीक उत्तम असतें. १९०३–०४ सालीं २१५ चौ. मै. जमीन वहितीखालीं असून त्यांत ७७ चौ. मै. जमीन पाण्याखालीं होती.

गां व—संयुक्त प्रांत. उन्नाव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें रोहिलखंड रेल्वेवर स्टेशन असून कानपूरपासून लखनौ पर्यंत जी मोठी सडक जाते ती उन्नाव शहरावरून जाते. लोकसंख्या १९११ सालीं ११८०९ होती. या शहरासंबंधानें दंतकथा अशी कीं, उन्नाव आठव्या शतकांत कोणी गोडोसिंग नांवाच्या मनुष्यानें बांधलें. पुढें कांहीं कालानंतर तेथें कनोजचे राजे राज्य करूं लागले. उनवंतासिंग नांवाच्या एका कामदारानें तेथील सुभेदाराला ठार मारून आपल्या नांवाचा एक किल्ला बांधला. १४५०सालीं सय्यदांनीं उनवंतसिंगाच्या वंशजाला ठार मारून उन्नाव आपल्या स्वाधीन ठेविलें. पुढें शहाजहान बादशहा गादीवर असतां उन्नाव येथें फत्ते उल्ला नांवाचा सय्यद रहात असे. त्यानें शहरांत चांगल्या इमारती उठविल्या. १८५७च्या जून महिन्यांत हॅवेलॉकनें बंडखोरांना उन्नाव येथें पिटाळून लावलें. म्यु. कमिटी १८६९ सालीं स्थापिली जाऊन १९०३–०४ सालीं१२हजार उत्पन्न होऊन सोळा हजार रुपये खर्च झाले. उद्योगधंदे फारसे नाहींत तरी हें भरभराटींत आहे. येथें एक साखरेचा कारखाना चालतो.

**उन्माद.**—या रोगास इंग्रजी भाषेंत "हिस्टेरीया" असा शब्द आहे या रोगामध्यें मेंदूंतील महामज्जास्थानांच्या क्रियेमध्यें विकृतावस्था उत्पन्न होऊन नाना तऱ्हेचीं चमत्कारिक लक्षणें होतात, व मानसिक लक्षणेंहि विशेष प्रकारचीं होतात. याशिवाय अधःस्थ मज्जास्थानाच्या व पृष्ठवंशांतील मज्जास्थानाच्या क्रियाहि अव्यवस्थित चालतात. परंतु त्याच्या रचनेमध्यें कांहींएक बिघाड झाल्याचें आढळून

येत नाहीं. या रोगाचा संबंध गर्भाशयाच्या रोगांशीं असतो अशी समजूत फार दिवसांपासून चालत आली आहे. पण ती बरीचशी निराधार होय. ज्या रोगांत रचना शाबूत असून मज्जास्थानें अगर मज्जातंतु यांच्या क्रियेंतच बिघाड होतो अशीं इतर रोगांतहि लक्षणें होतात. या रोगामध्यें केवळ कल्पनेचा पगडा शरीरावर बसून त्यामुळें शरीराची नेहमींप्रमाणें चालण्याची क्रिया विकृत होते. मेंदूंत पूर्वीच्या अनुभवाचीं स्मृतिचित्रें सर्व निरोगी माणसांनां असतात, पण या व्याधींत तीं पुसट होऊन रोगी नवीन जें लक्षण अगर भावना जोरानें पुढें येईल त्यास चटकन वश होतो. त्यामुळें त्यास रोगलक्षणेंहि जलद होतात व मांत्रिक अथवा वशीकरण शास्त्राप्रमाणें सूचक व उत्तेजक अगर विपरीत वचनांनीं मनावर संस्कार या रोगांत फार त्वरित होतो. मग त्यावेळीं चित्तसंक्षोभ, मनस्ताप अगर इतर मनोधर्म आवरून धरण्याचें जें प्रत्येकास स्वाभाविक सामर्थ्य असतें तें नष्ट होऊन त्याचें लक्ष या काल्पनिक लक्षणांतून निघत नाहीं. या बाह्य कारणांचा मनावर विशेष पगडा बसत असल्यामुळें त्यावेळेपुरती साधारण संज्ञाहीन स्थिति रोग्याची होते. स्वप्नचारी मनुष्यांत व वशीकरणसामर्थ्यानें मूढ झालेल्या मनुष्यांत त्यांचें नेहमींचें स्वत्व त्यावेळेपुरतें नाहींसें होतें. ही दुय्यम व गौण मानसिक स्थिति ध्यानांत आली असतां या रोगांतील नानाविध लक्षणें कशीं होऊं शकतात याचा उलगडा होतो. मज्जारोगशास्त्रवेत्त्यांनीं या रोगाची व्याख्या व लक्षणें नाना तऱ्हेनें वर्णन केलीं आहेत. पण त्या सर्वांचा येथें स्थूलमानानेंच विचार कर्तव्य आहे.

पूर्व प्रोत्साहक कारणें:— (१) आनुवंशिक संस्कार हें महत्त्वाचें व मुख्य कारण आहे. ज्या कुटुंबांत नानातऱ्हेचे मेंदूचे अगर मज्जेचे विकार होण्याची परंपरा असते तेथें हाहि रोग आढळतो. अंमळ बारकाईनें चौकशी केली असतां कुटुंबांतील मंडळींत भ्रम, वेड, फेंफरें इत्यादि रोग असल्याचें कळून येईल. (२) ज्या विशिष्ट वयोमर्यादेच्या सुमारास शरीराची वाढ झपाट्यानें होते अगर त्यांत कांहीं विशिष्ट संक्रमणावस्था प्राप्त होते अशा वेळीं हा रोग प्रगट होतो. उदाहरणार्थ, यौवनावस्था, गरोदरपणा, अगर स्त्रियांचें आर्तव नष्ट होण्याचा काळ हीं याचीं उदाहरणें होत. व अशा वेळीं हा रोग उत्पन्न होण्यास दुसरें कांहींएक कारण होण्याजोगें नसतें. (३) लहान मुलांमध्यें हा रोग नसतोच. पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें मात्र विशेष आढळतो. म्हणजे तें प्रमाण १–२० असें पडतें. पंधरा ते पंचवीस वयांत व त्यानंतर नष्टार्तव स्थिति प्राप्त होण्याच्या सुमारास स्त्रियांनां हा रोग होतो. कांहीं विशिष्ट जातींमध्यें हा रोग विशेष आहे असें म्हणतात. पण आपल्या देशांत अशी माहिती मिळवून याची प्रचीति पाहिली पाहिजे. चैनीची राहणी व निरुद्योगीपणा हीं कारणेंहि पूर्वप्रोत्साहकांत येतात.

तात्कालिक कारणें:—मनास धक्का बसण्यासारख्या गोष्टी घडणें, गरोदरपणा, बाळंतपण, गर्भाशयाचे रोग व इतर प्रबळ रोगांपासून शरीरास व मनास ग्लानि येण्यामुळें या रोगास आरंभ होतो. शृंगारपर कादंबऱ्या वाचणें, अतिविषयोपभोग, वीर्यपात करणें, व्यायामाचा अभाव हीं सर्व कारणें रोगोत्पत्तीस पोषक अशींच आहेत. तसेंच मुलाचे फाजील लाड करणें, त्यास क्रोध, मत्सर इत्यादिकांपासून मनाचें संयमन करण्यास शिकविणें, स्त्रियांचे आर्तवरोग, प्रेमसंबंधांत अगर संसारांत मनासारखें घडून न आल्यामुळें होणारी निराशा, एकदम वित्तहानि होऊन दारिद्र्य येणें, रोग्याची कष्टप्रद शुश्रूषा फार दिवस करावी लागणें, दुःख अगर भीति अशा सारख्या मनास व शरीरास अशक्तपणा आणणाऱ्या व धक्का बसविणाऱ्या कारणांनींहि पण हा रोग होतो.

लक्षणें:—हीं अति विविध प्रकारचीं आहेत. पण त्यांचे मुख्य भेद दोन आहेत. १ विक्षेपक व २ दीर्घकालीन. यांपैकीं त्यांच्या नांवावरून पहिल्या प्रकारामध्यें आंचके येतात हें उघडच होत आहे. या भेदाचें विस्तृत वर्णन असें—कांहीं मनास उद्वेग वाटण्यासारखें निमित्त घडतांक्षणीं आपणांस बेशुद्धि येणार आहे याविषयीं सूचक असा वात अंगांत खेळल्यासारखें होतें. गळ्यांत दाटून येऊन आंत बोळा कोंबला आहे व तो वर चढत आहे असा भास होतो. असाहि या सूचक वाताचा एक प्रकार असतो. त्यास उन्मादकंदुकवात म्हणतात. पुढें बेशुद्धि येते तिचें फेंपऱ्याशीं बरेंच साम्य असतें. पण हा रोगी बेशुद्ध पडतांना आपणास इजा न होईल अशा सावधागिरीनें पडतो व त्यास बहुतकरून इजा होत नाहीं. डोळे घट्ट मिटून घेतलेले असतात व शरीर आणि हातपाय ताठ होतात. धनुर्वाताप्रमाणें या ताठपणापासून कधीं कधीं शरीराची आंकडी होते, व मस्तक व टांचाच फक्त जमिनीवर टेंकतात. थोड्या वेळानंतर हातापायांची जोरानें धडपड होण्यास सुरुवात होते. तेव्हां बेशुद्धि अगदीं पूर्णपणें फेंपऱ्यांत असते तितकी असते असें नाहीं. अर्धा तास किंवा कमी अधिक काळपर्यंत हे आंचके येऊन धडपड सुरू असते, व नंतर ती एकदम थांबून रडणें अगर हंसणें इत्यादि मानसिक विकृतिदर्शक लक्षणें होतात. नंतर पोट फुगल्यासारखें वाटतें अगर पाण्यासारखी व विपुल अशी लघवी होते. या प्रकारच्या तीव्र भेदामध्यें बेशुद्धि फार असून ती जास्त वेळ टिकतेहि आणि या भेदापेक्षांहि फेंपऱ्याशीं तिचें सादृश्य अधिक असतें. दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे दीर्घकालीन रोगामध्यें लक्षणें कसलीं व किती प्रकारचीं होतील याचा नियमच नाहीं. तीं इतकीं कीं, एका प्रसिद्ध डॉक्टरानें या रोगांत "अशक्य लक्षण" असें कोणतेंच नाहीं असें म्हटलें आहे. हीं लक्षणें मानसिक व शारीरिक अशा दोन्ही प्रकारचीं असतात. तीं अशीं:—जितक्या प्रकारानें गात्रोपघात

व स्तंभ रोग होणें एरवी शक्य आहे तितक्या तन्हांनीं होऊन एक अगर अधिक हात अगर पाय निर्जीव व लुले पडतात. नंतर त्यांत ताठरपणा येऊन तो कित्येक आठवडे, महिने अगर वर्षेंहि टिकतो. अगर इतकी रोगाची मजल न जातां फक्त रोग्यास चालतां येत नाहीं; किंवा चाललाच तर अश्वसदृशगति व इतर चालण्याच्या ठराविक तऱ्हा ज्या दुसऱ्या खऱ्या पक्षाघातादि मज्जारोगांत आढळतात त्या तऱ्हांनीं न चालतां वेगळ्याच प्रकारानें अडखळत व पाय फरफटीत चालतो. स्पर्श, दुःख, वेदना शीतोष्णादींच्या संवेदनशक्तींत बिघाड होतो. याचीं उदाहरणें म्हणजे डोक्यावर कोणी एखादा खिळा आंत खुपसला आहे असें दुःख व भास होणें. अगर पाठीच्या कण्यांत मनस्वी दुखणें, शरीराच्या कांहीं भागांत किंवा अर्धांगांतहि स्पर्शज्ञानासंबंधीं बधिरता येते, आणि या लक्षणाची जाणीव रोग्यास कधीं कधीं नसतेहि. हातपाय व चेहरा या ठिकाणीं हा चमत्कार पहाण्यास सांपडतो. कांहीं रोगांत ही बधिरता पूर्णपणें नसते. म्हणजे जरी स्पर्शज्ञान नसलें तरी वेदनासंवेदनज्ञान असतें. अगर, हीं दोन्ही नसली, तरी विजेचा धक्का दिलेला समजतो. अगर डोळे मिटले असतां अवयव कशा तऱ्हेनें ठेविला आहे याचें ज्ञान रोग्यास होत नाहीं. जेव्हां सर्व अर्धांगास अशी बधिरता प्राप्त होते तेव्हां दृष्टि, श्रवणशक्ति, चव, आणि वास हीं विकृत बाजूच्या अर्धभागांत कमी अगर नाहींशीं होतात. कंठांतून आवाज उत्पन्न होत नाहीं. धूर्त लोक आणि मांत्रिक मंत्रप्रभाव किंवा जादूटोणा, ताईत, आंगारादिकांनीं ज्यांचें अर्धांग बरें करतात ते हे असल्या प्रकारचे रोगी असतात. विकृत मनोधर्म मात्र लवकर सुधारत नाहीं, व त्याचीं लक्षणें पुढीलप्रमाणें असतातः—कांहीं घडलेलें ऐकलें अगर वाचलें कीं मनावर त्याचा तीव्र ठसा उमटून वाजवीपेक्षां जास्त बरें अगर वाईट वाटणें, ज्यांत त्यांत अड थळा आणण्याची प्रवृत्ति, भोंवतालच्या माणसांची आपल्या दुखण्याची सदा कींव करावी ही इच्छा. या रोगांतील नेहमीं आढळणारीं दुसरीं लक्षणें म्हणजे फार दिवस टिकणारा अन्नद्वेष व त्यामुळें शरीर कृश होत जाणें, किंवा कोणत्याहि उपायानें लवकर न थांबणारी ओकारी अगर उचकी येणें इत्यादि अनंत लक्षणें या रोगाचीं आहेत.

उ प चा रः—हा रोग म्हणजे ढोंग समजूं नये. बिचाऱ्या रोग्याची तशी विकृत मनोरचना बनल्यामुळें त्यास मन आंवरतां न येऊन तो रोगवश होतो. यासाठीं वैद्याच्या अंगीं धोरण व समयसूचकता हे गुण बरेचसे पाहिजेत. औषधाचा उपयोग या रोगांत अन्यमासापेक्षां वास्तविक पुष्कळच कमी होतो. रोग्याचें मन युक्तीनें वळवून सदुपदेशानें तें अधिक बळकट करून आरोग्यास उत्तेजक असा जीवनक्रम पतकरण्यास त्यास तयार केलें पाहिजे. एवढ्याकरितां घरची मंडळी जेथें नाहींत अशा ठिकाणीं रोग्यास सुधारलेल्या परिस्थितींत कांहीं काळपर्यंत ठेवावें. घरांतील मंडळी रोग्याच्यां लक्षणांनीं घाबरून आश्चर्य प्रगट करीत गेल्यानें रोगलक्षणांस न कळत उत्तेजन देतात. पण अशाठिकाणीं या लक्षणांचें स्तोम परके लोक माजवीत नाहीं, तर फक्त आहार विहार, उष्णोदकस्नान, अंग चेपणें, विजेची पेटी व कांहीं थोडीं औषधें व विश्रांति व बेताचा व्यायाम यांचा योग्य संयोग यांच्या योगानें हीं लक्षणें नाहींशीं होतात. उलटपक्षीं जितकें त्यांजकडे लक्ष द्यावें तितकीं तीं बरीं होण्यास जास्त अवधि लागतो. रोगी बेशुद्ध होऊन आंचके आल्यास तोंडावर थंड पाणी जोरानें शिंपडावें. व रोग्यास आडवें निजवावें. खिडक्या मोकळ्या टाकून हवा खेळूं द्यावी. यापेक्षां अधिक लक्ष देण्याचें कारण नाहीं, बरा वेळानें रोगी शुद्धीवर येतो.

आ यु र्वे दी य नि दा न.— याविषयीं आयुर्वेदांतील माहितीः उन्माद हा विशेषेंकरून मनाचा विकार आहे. उन्माद सहा प्रकारचे आहेत. वातोन्माद, पित्तोन्माद, कफोन्माद, सान्निपातिक उन्माद, मानसिक दुःखजन्य उन्माद व विषजन्य उन्माद. शारीरिक वात, पित्त व कफ आणि मानसिक रज व तम हे दोष विकृत होऊन उन्मार्गगामी झाले असतां त्यामुळें जो मनास मद उत्पन्न होतो त्यास उन्माद असें म्हणतात. अहित अन्नपान, तसेंच विकृत, असात्म्य, मलिन व विषम असें अन्न सेवन केल्यानें दुःखी व दुर्बल मनाच्या मनुष्यास रोगाच्या जोरानें, क्षीण मनुष्यास विषम चेष्टा केल्यानें, पूज्यांच्या पूजेसंबंधानें मर्यादा भंग झाल्यानें आणि मानसिक रोग व विष आणि उपविष यांनीं चित्तभ्रंश झाल्यानें, या कारणांनीं सत्त्वगुणाचा ऱ्हास होऊन हृदयांत दोष दुष्ट होऊन ते बुद्धीस कलुषित करून मनोवह स्रोतें बंद करून उन्माद उत्पन्न करतात. त्यापासून बुद्धि, ज्ञान व आठवण नाहींशी होऊन मनुष्य सुखदुःखास मुकतो आणि सारथी नसलेल्या रथाप्रमाणें मी करतों काय व केलें पाहिजे काय याचा कांहींच विचार न करतां वाटेल तिकडे भडकतो.

वातोन्मादांत अंग कृश होणें, कारण नसतां रडणें, ओरडणें, हंसणें, गालांतल्या गालांत हंसणें, नाचणें, गाणें, वाजविणें, वेडींवाकडीं अंगें करणें, बोटें मोडणें, मुरली, वीणा वगैरे वाद्यांसारखे परंतु बेसूर असे वरचेवर आवाज काढणें, तोंडांतून फेंस येणें, एकसारखें भटकणें, बडबडणें, भलत्याच वस्तूंनीं शरीरास अलंकृत करणें, जें चालत नाहीं त्यावर बसून जाण्याचा यत्न करणें, खाण्याच्या पदार्थांवर इच्छा असणें; पण ते मिळाले असतां तिरस्कार करणें, डोळे सुजून वर आल्यासारखे व लाल होणें आणि अन्न जिरल्यावर रोग वाढणें हीं लक्षणें होतात.

पित्तोन्मादांत शिव्या देणें, निर्भर्त्सना करणें, रागावणें, हातांत ढेंकूळ वगैरे घेऊन तें किंवा ठोसे मारण्याकरितां लोकांच्या मागें लागणें,थंड छाया व गार पाणी यांची इच्छा असणें, नागवें रहाणें, अंग पिंवळट होणें आणि अग्नि, ज्वाला,

नक्षत्रें व दिवे हे नसतांना आहेत असें दिसणें हीं लक्षणें होतात.

कफोन्मादांत अरुची, वांति, आहार व चेष्टा आणि भाषण हीं अगदीं अल्प प्रमाणांत करणें, स्त्रियांची व एकांताची आवड, लाळ व शेंबूड वहाणें, घाणेरडेपणा, स्वच्छतेचा तिटकारा, फार झोंप, तोंड सुजणें व रात्रीं आणि जेवतांक्षणींच उन्मादाचा जोर वाढणें हीं लक्षणें होतात. ज्यांत वरील तिन्ही दोष वाढण्याचीं कारणें व लक्षणें होतात तो सान्निपातिक उन्माद भयंकर मारक आहे, त्यास वैद्यानें सोडावें.

द्रव्य, स्त्री, बंधु वगैरेंचा नाश झाल्यामुळें त्या दुःसह दुःखानें वेड लागतें व त्यांत भुतांचा संबंध असतो. त्यानें मनुष्य फिक्कट व दीनवाणा होतो. वरचेवर मूर्च्छित होतो. हाय, हाय म्हणून शोक करतो, एकदम रडतो, मेलेल्या मनुष्याच्या गुणांचें वर्णन करतो, त्याचें मन शोकानें क्लिष्ट झालेलें असतें, नेहमीं चिंता करीत बसतो. त्यास झोंप येत नाहीं व अंथरुणावर नुसता लोळत किंवा दुसरे कांहीं चाळे करीत असतो.

विषोन्मादांत रोग्याचें तोंड काळसर होतें, त्याची कांति, शक्ति व इंद्रियांचें सामर्थ्य हीं नाहींशीं होतात. वेग येऊन गेल्यानंतर देखील तो भ्रमिष्ट असतो व त्याचे डोळे लाल असतात, त्यास वैद्यानें सोडावें.

चि कि त्सा—वातोन्मादांत (वेड लागणें) प्रथम स्नेहपान करवावें आणि वायूनें स्रोतसांचे मार्ग बंद झाले असल्यास अगोदर स्नेहयुक्त सौम्यसें रेचक द्यावें. कफजन्य व पित्तजन्य उन्मादांतहि प्रथम स्नेहन व स्वेदन करून वमन, विरेचन, बस्ती व शिरोविरेचन द्यावें. याप्रमाणें शरीर शुद्ध झालें म्हणजे मन स्वच्छ होतें. याप्रमाणें उपाय करूनहि उन्माद शिल्लक राहिल्यास तीक्ष्णनस्य, अंजन, हर्ष, धीर देणें, भिवविणें, मारणें, निर्भर्त्सना करणें, अंगास तेल लावणें, उटणें लावणें, लेप, धूम व घृतपान, या उपायांची योजना करावी. हे उपाय शरीर शुद्ध करून मनुष्याचे बिथरलेलें मन ताळ्यावर आणतात. ब्राम्हीघृत, महापैशाचिकघृत, (उत्तर स्थान) हीं घृतें द्यावीं. अनेक प्रकारचीं तीक्ष्ण नस्यें द्यावीं. शिरसांचा कल्क स्नेह घालून नाकांत पिळावा. शिरसांचें तेल आंगास लावावें व चूर्ण नाकांत फुंकावें वातजन्य व कफजन्य उन्मादावर सडून घाण येत असलेला कुत्रा अगर मगर यांच्या मांसाची सतत धुरी द्यावी. अपांग किंवा ललाट या ठिकाणची शीर तोडून रक्त काढावें. मेदस्वी प्राण्याचें मांस पोटभर खाऊं घालून निर्वात जागेंत निजवावें. म्हणजे डोकें ताळ्यावर येतें. वेड लागलेल्या रोग्यास कोरड्या विहिरींत टाकून उपासांनीं सुकवावें. धर्माच्या व नीतीच्या गोष्टी सांगून सांत्वन करावें. आवडत्या वस्तूंचा किंवा मुलगा व बायको वगैरे आवडत्या माणसांचा नाश झाला म्हणून सांगावें, अद्भुत दृश्यें दाखवावीं. अंगास खाज कुहिलीच्या शेंगा लावाव्या. चाबकांनीं मारून खाड्यांत टाकावें. ज्यांत शस्त्रें, दगड व माणसें नाहींत अशा अंधार कोठडींत कोंडून ठेवावें. हातात नागव्या तरवारी घेतलेल्या शिपायांनीं त्यास मुसक्या बांधून बाहेर नेऊन "राजानें तुला मारण्याचा हुकूम केला आहे" असें सांगून मारण्याकरितां तरवारी उगारून मरणाचें भय घालावें. शरीरास होणाऱ्या दुःखाच्या भीतीपेक्षां प्राणाची भीति फार मोठी असते. तिच्या योगानें चोहोंकडे फाटलेलें मन शांत व स्थिर होतें. हे अनुभवसिद्ध उपाय देशकालादिकांचा विचार करून योजावे.

इष्टवस्तूचा नाश झाल्यामुळें ज्यास उन्माद होतो त्यास त्या वस्तूसारखी दुसरी वस्तु देऊन सांत्वन करून व धीर देऊन बरा करावा. काम, शोक, भय, क्रोध, हर्ष, ईर्ष्या, व लोभ, यांपासून झालेले उन्माद विरुद्ध मनोविकार उत्पन्न करून घालवावे. दोषजन्य उन्मादांपेक्षां जास्त लक्षणें दिसूं लागल्यास भूतोन्माद समजून त्यावरील उपाय म्हणजे होम, मंत्र, बलिदान व औषधें यांचा उपयोग करावा. सर्व प्रकारचें सात्विक अन्न व पान उन्मादावर प्रशस्त आहे. जो मद्य व मांस सेवन न करितां हितकर भोजन करून नियमपूर्वक व पवित्रपणानें राहतो अशा सत्वशील मनुष्यास दोषज किंवा आगंतु उन्माद होत नाहीं. [ वाग्भट, चरक योगरत्नाकर ]

**उन्सरी**—याला बहुधा अबुल कासीम उन्सरी अशा नांवानें संबोधीत. हा बल्खचा रहिवाशी असुन हा गझनीच्या सुलतान महंमदाच्या दरबारांतील एक पंडित होता. हा अबूल फरा संजरी याचा शिष्य असुन कवी अस्जदी आणि फरूखी यांचा गुरु होता. त्या काळीं पहिल्या प्रतीचा विद्वान् म्हणून याची गणना होत असे. कारण हा सर्वोत्तम कवी असूनहि शिवाय मोठा तत्त्वज्ञानी, सर्वशास्त्रपारंगत व सर्व भाषाकोविद असे. चारशें कवी व पंडित, शिवाय गझनीच्या विद्यापीठाचे सर्व विद्यार्थी यांचा गुरु म्हणून हा मानला जात असे. उन्सरीच्या ग्रंथांत सुलतान महमदाच्या कृत्यांविषयींचें एक वीरकाव्य आहे. एकदां रात्रीच्या ऐषारामांत दंग असतां सुलतानानें आपल्या आवडत्या दासीजनांचे लांब केंस कापून टाकिले; पण पुढें सकाळीं त्याला पश्चात्ताप झाला. त्या वेळीं उन्सरीनें समयोचित कांहीं कविता करून राजाला खुष केलें. तेव्हां राजानें त्याचें तोंड तीन वेळां रत्नांनीं भरून काढण्याविषयीं आज्ञा केली, अशी एक गोष्ट आहे. ३० हजार दोहरे असलेलें एक दिवाण त्यानें रचिलें. तो इ. स. १०४० त सुलतान महंमदाचा मुलगा पहिला मसाऊद याच्या कारकीर्दींत वारला. डॉ. स्प्रेंजरनें आपल्या कॅटलॉग ऑफ पर्शियन बुक्समध्यें उन्सरी इ. स. १०४९ त वारला असें म्हटलें आहे. (बीलचा कोश.)

**उपकन्चा**—सक्की संस्थानांत उत्तरेकडे हें खेडें असून येथें एक जलाशय (कुंड) आहे. त्याच्या नांवावरून खेड्याचें

नांव पडलें आहे. या जलाशयाचें पाणी कधीं आटत नाहीं. येथें कवार लोकांची वस्ती आहे.

**उपकेशगच्छ**—जेव्हां जैनांतील निरनिराळ्या धर्मगुरूंच्या धार्मिक मतांमध्यें फरक होत गेले, तेव्हां त्यांचे निरनिराळे संप्रदाय बनत गेले. अशा संप्रदायांनां गच्छ असें नांव आहे. प्रत्येक गच्छाची गुरुपरंपरा ( गच्छावलि, पट्टावलि ) असून महावीरापासून गच्छसंस्थापकापर्यंत त्रोटक माहिती व पुढें गच्छसंस्थापकापासून आजतागाईत प्रत्येक सूरीची विस्तारानें माहिति अशा पट्टावलींतून दिलेली असते. हे गच्छ अजमासें ८४ आहेत व या गच्छांमध्यें फार मोठेंसे भेद नसून केवळ एखाददुसरा आचार मात्र निराळा असतो. ज्या गुरूपासून दीक्षा मिळेल त्या गुरूच्या गच्छाचा तो शिष्य घटक बनतो. प्रत्येक गच्छ इतर गच्छाधिकाऱ्यांनां मान देतात.ओसवाल जैन उपकेशगच्छाचे असून ते आपली परंपरा पार्श्वनाथापासून मोजतात. गच्छाची गुरुपरंपरा गच्छसंस्थापकापासुन पुढची कांहींशी ऐतिहासिकदृष्ट्या विश्वसनीय मानतां येईल; पण इ. स. ९ व्या शतकापर्यंतची मात्र फार जपून ग्रहण केली पाहिजे. कारण मध्यंतरीं कोठें तरी तीन शतकांइतका कालानुक्रमांत मोठा खळगा पडलेला दिसतो. [ जैन बिब्लिओग्रॅफीवरील निबंध, पॅरिस १९०६ जैन एपिग्रॅफी वरील रिपोर्ट, पॅरिस १९०८.]

श्रीमालच्या ऊहडानें ओसनगरी स्थापिली. तेव्हांपासून या ठिकाणच्या जैनसमाजाला उपकेश हें नांव मिळालें व शहरालाहि उपकेशपट्टण किंवा नगरी असें नांव पडलें. उपकेशाची संक्षिप्त संज्ञा 'ओस' अशी रूढ होऊन उपकेश नगरीचें ओसनगरी असें नामांतर झालें.ओसच्या जैनजातीला ओसवाल किंवा ओस्त्वाल असें म्हणत. ('ओसवाल' पहा )

पार्श्वनाथाचे संतानीय ( संतान ही संज्ञा पट्टपरंपरा दर्शविण्यासाठीं योजितात. हिचा अर्थ "धर्मगुरूंची परंपरा" असा आहे. ) हे खालीं दिल्याप्रमाणें आहेत.

१ गणधर शुभदत्त—हा पार्श्वनाथाचा पहिला शिष्य होता. २ हरिदत्त—शुभदत्ताचा उत्तराधिकारी. ३ आर्यसमुद्र—हरिदत्ताचा उत्तराधिकारी. ४ गणधर केशिन्—आर्यसमुद्राचा उत्तराधिकारी. राजप्रश्नीय उपांगांत असें सांगितलें आहे कीं, ह्यानें श्वेयवीच्या प्रदेशी नृपाला ( मांडलिक राजाला ) दीक्षा दिली. ५ स्वयंप्रभ सूरि—केशिन्‌चा उत्तराधिकारी. ह्याचा उपदेश ऐकून विद्याधर रत्नचूड प्रतिबुद्ध झाला. रत्नचूडानें जिनपार्श्वांच्या मूर्तीची पूजा करण्याची इच्छा स्वयंप्रभसूरीला कळविली. त्यानंतर स्वयंप्रभानें विद्याधर रत्नचूडाला ( रत्नप्रभसूरी ) दीक्षा दिली. तो क्रमाक्रमानें १२ अंगें व १४ पूर्वे शिकला आणि महावीराच्या मृत्यूनंतर ५२ व्या वर्षी गुरूनें त्याला आपला उत्तराधिकारी नेमिला. ह्याप्रमाणें आचार्य पदवीवर नेमिला गेल्यामुळें तो पांचशें साधू बरोबर घेऊन पृथ्वीवर पर्यटन करू लागला.

६ श्री रत्नप्रभसूरि.—श्रीरत्नप्रभसूरि पांचशें शिष्य बरोबर घेऊन लवण-सरोवराच्या टेंकड्यांवर ( लूण-द्रवि-डुंगरी) आला. तेथील लोक जैन धर्मावर विश्वास ठेवणारे नव्हते. कोरंटकांत महावीराची मूर्ति आचार्य रत्नप्रभानें स्थापन केली. श्रीमाल येथील प्रधान ऊहड व त्याचे अनुयायी श्रावक बनले. रत्नप्रभानें सच्चिकादेवीच्या पूजेपासून लोकांचें मन परावृत्त केलें व स्वतः देवी मांसभक्षण सोडून जैनधर्मीय बनली. ह्यामुळें पुष्कळ लोक श्रावक बनले.

महावीरानंतर ८४ व्या वर्षी आचार्य रत्नप्रभ स्वर्गाप्रत गेला. ७ आचार्य यक्षदेव—रत्नप्रभाचा उत्तराधिकारी. ह्यानें यक्ष माणभद्राला दीक्षा दिली व या प्रकारें संघाचा त्रास नाहींसा केला.

ह्यानंतरचे क्रमशः उत्तराधिकारी— ८ कक्कसूरि. ९ देवगुप्तसूरि. १० सिद्धसूरि ११ रत्नप्रभसूरी. १२ यक्षदेवसूरि. १३ कक्कसूरि. १४ देवगुप्त-सूरि. १५ श्रीसिद्धसूरि. १६ श्रीरत्नप्रभ-सूरि.

१७ श्री यक्षदेवसूरि—महावीरानंतर ५८ व्या वर्षी होऊन गेला. वज्रस्वामिन्‌चा शिष्य वज्रसेन ह्याच्या मृत्यूनंतर त्याच्या १८ नागेंद्र, चंद्र, निवृत्ति व विद्याधर नांवाच्या चार शिष्यांनां १२ वर्षांच्या दुर्भिक्षांत ह्या यक्षदेवानें दीक्षा दिली व चार शाखा स्थापिल्या.

ह्यानंतर क्रमशः उत्तराधिकारी येणेंप्रमाणें होऊन गेले:—१९ कक्कसूरि, २० देवगुप्तसूरि, २१ श्रीसिद्धसूरि, २२ श्रीरत्नप्रभसूरि, २३ यक्षदेवसूरि, २४ कक्कसूरि, २५ देवगुप्तसूरि, २६ सिद्धसूरि, २७ रत्नप्रभसूरि, २८ यक्षदेवसूरि २९ कक्कसूरि, ३० देवगुप्तसूरि,३१ सिद्धसूरि, ३२ रत्नप्रभसूरि, ३३यक्ष देवसूरि,

३४ कक्कुडाचार्य:—यक्षदेवसूरीचा उत्तराधिकारी. ह्यानें १२ वर्षेंपर्यंत आचाम्लासह 'षष्ठतप' नांवाचें तप केलें. मरोटकोटांतील श्रेष्ठी सोमक हा त्याच्या स्तुतिस्तोत्राच्या योगानें बंधमुक्त झाला. त्यानंतर सोमकानें कक्कुडाचार्याची पादपूजा करण्याचा निश्चय केला, व म्हणून तो भरुअच्छा ( भडोच )ला गेला. तो जेव्हां कक्कुडाचार्याला भेटावयास गेला त्यावेळीं सर्व मुनि भिक्षा मागण्याकरितां निघून गेले होते. सच्चिकादेवी मात्र गुरुची सेवा करीत होती. हें पाहून सोमकाच्या मनांत संशय उत्पन्न झाला. सच्चिकादेवीनें हें जाणून त्याला रक्त ओकण्याची शिक्षा दिली. त्यानें आपला अपराध कबूल केल्यावर सर्वांनीं त्याची निर्भत्सना केली. गुरूनें मात्र त्याच्यावर दया करून त्याला पूर्वस्थितीवर आणिलें.

श्रीरत्नप्रभसूरि व श्रीयक्षदेवसूरि हे फार बलाढ्य होते. त्यांच्या नांवानें धान्यागारें स्थापन केलीं होतीं. परंतु संघ जेव्हां तृषेनें व्याकूळ झाला तेव्हां अर्बुद पर्वताच्या पार्श्वभागांवर काठी टोंचून कक्कुडाचार्यानें पाणी उत्पन्न केलें; आणि आपल्या धर्माच्या लोकांकरितां वाटणाऱ्या प्रेमामुळें

त्यानें जेसलपुराहून ( आतां, जेसलमीर ) भरुकच्छाला भडोचला ) धृत आणिलें.

ह्यानंतरचे क्रमशः उत्ताराधिकारीः—३५ देवगुप्तसूरि, ३६ सिद्धसूरि, ३७ कक्कसूरि ३८ देवगुप्तसूरि, ३९ सिद्धसूरि, ४० कक्कसूरि.

४१ दे व गु प्त सू रिः—विक्रमशकाच्या ९९५ व्या वर्षी हा उत्तराधिकारी झाला. हा क्षत्रिय जातीचा होता व ह्याला वीणा वाजविण्याचा फार नाद होता. ह्यामुळें कर्तव्यकर्मांत तो दुर्लक्ष करूं लागला. म्हणून चार संघांनीं त्याच्या जागीं. ४२ श्री सिद्धसूरि विशेविश्वोपकाला, नेमिलें.

४३ क क्क सू रिः—श्रीसिद्धसूरीचा उत्तराधिकारी. हा " पंचप्रमाण " नामक ग्रंथाचा कर्ता होता.

४४ श्री दे व गु प्त सू रिः—विक्रमशक १०७२ मध्यें हा कक्कसूरीचा उत्तराधिकारी झाला. हा "नवपदप्रकरण" नामक ग्रंथाचा कर्ता होता.

ह्यानंतरचे क्रमशः उत्तराधिकारीः—४५ सिद्धसूरि ४६ कक्कसूरि, ४७ देवगुप्तसूरि, ४८ सिद्धसूरि, ४९ कक्कसूरि,

५० दे व गु प्त सू रिः—विक्रमशक ११०८ मध्यें हा कक्कसूरीचा उत्तराधिकारी झाला. भीनमाल शहरांत ह्याच्या पदमहोत्सवाच्या [ पदावर आरूढ होण्याच्या वेळीं केलेला महोत्सव ] मेजवानीच्या प्रसंगीं साहु भैंसाक्ष यानें सात लक्ष द्रव्य खर्च केलें. त्याप्रसंगीं गुरूचें पादप्रक्षालन करून जें पाणीं मिळालें तें विषावर उतान्याचें औषध आहे असें आढळून आलें !

ह्या भैसाक्षाची माता श्रीशत्रुंजयाच्या यात्रेला जात असतां पट्टण येथें तिच्याजवळचें द्रव्य सरलें. म्हणून तिनें श्रेष्ठी ईश्वर ह्याच्यापाशीं मदत मागितली. त्यानें द्रव्य दिलें, परंतु तें देतांना भैंसाक्षाविषयीं तिरस्कारविषयक भाषण केलें. तो म्हणाला कीं 'तुम्ही माझें पिण्याचें पाणीं आणणाऱ्याची आई आहां असें मला वाटलें. " हा वृत्तांत तिनें भैंसाक्षाला कळविला. त्यानें पूर्वी डिडुवापुरांत आपल्या भैसा नांवाच्या बायकोच्या कांचेच्या बांगड्या जतन करून ठेविल्या होत्या. गुर्वाज्ञेप्रमाणें त्यानें गुरूचे पाय धुतल्यावर जें पाणी मिळालें त्यानें त्या बांगड्या धुतल्या तेव्हां त्यांची चांदी झाली. ह्या चांदीच्या मुद्रा पाडल्या. त्यांना गडहीय मुद्रा असें म्हणतात. ह्या सवालक्षाच्या रजतमुद्रा त्यानें गर्दभांवर पट्टणाला नेल्या. श्रेष्ठी ईश्वरानें " तूं देशील तितकी चांदी मी घेतों " असा पूर्वी करार केला होता; परंतु एवढी मोठी रक्कम पाहून तो आश्चर्यचकित झाला. गुर्जर देशांत रेड्यावर पिण्याचें पाणीं आणण्याच्या शिक्षेच्या करारावर भैंसाक्षानें ईश्वराला क्षमा केली. तो पैसा सप्तक्षेत्रासाठीं खर्च करावा असें भैंसाक्षानें सांगितलें. (सप्तकर्मक्षेत्रें) = .१ मंदिर बांधणें, २ तेथें प्रतिमा स्थापणें, ३ पवित्र ग्रंथांचा तेथें संग्रह करणें, वरील कृत्य करण्याच्या वेळीं, ४, ५ पुरुष व स्त्री साधूंना अन्न व वस्त्रें देणें, आणि ६, ७ शक्त्युसार पुरुष व स्त्री श्रावकांना धन देणें ) ह्याप्रकारें " गाडहीय शाखा " उत्पन्न झाली.

५१ श्री. सि द्ध सू रिः—हा देवगुप्तसुरीचा उत्तराधिकारी होता.

५२ श्री क क्क सू रि.—विक्रमशक ११५४ त हा श्रीं सिद्धसूरीचा उत्ताराधिकारी झाला. हेमसूरि. व कुमारपाल यांच्या सल्लयानें त्यानें क्रियाहीन मुनींना काढून लाविलें.

५३ श्री दे व गु प्त सू रिः—श्रीकक्कसूरीचा उत्तराधिकारी. ह्यानें एक लक्ष द्रव्य दान दिलें.

५४ श्री सि द्ध सू रिः—५५ श्रीकक्कसूरिः—विक्रमशक १२५२ हा सिद्धसूरिचा उत्तराधिकारी झाला. ह्यानें मरोटकोटाला पूर्वस्थितीप्रत आणिलें ह्यानंतरचे क्रमशः उत्तराधिकारीः—५६ श्रीदेवगुप्तसूरी, ५७ सिद्धसूरि, ५८ कक्कसूरि, ५९ देवगुप्तसूरि, ६० श्रीसिद्धसूरि, ६१ कक्कसूरि, ६२ श्रीदेवगुप्तसूरि, ६३ श्रीसिद्धसूरि, ६४ कक्कसूरि, ६५ देवगुप्तसूरि.

६६ श्री सि द्ध सू रिः—विक्रमशक १३३० त हा देवगुप्तसूरिचा उत्ताराधिकारी झाला. पाल्हणपुरांत साहु देशल ह्यानें त्याच्या पदारोहणाची मेजवानी दिली. समराच्या आश्रयाखालीं ह्या सिद्धसूरीनें शत्रुंजय पर्वतावर, सहाव्या उद्धाराच्या काळची आदिनाथाची मूर्ति बसविली. ( जैनांचा असा विश्वास आहे कीं ऋषभदेवाच्या काळापासून बहादुर शाहाच्या ( औरंगझेबाचा मुलगा ) काळापर्यंत, शत्रुंजय पर्वतावर १६ मोठे उद्धार (देवळाचे जीर्णोद्धार) होऊन गेले.

६७. श्री क क्क-सू रि.—हा श्री-सिद्ध सूरीचा उत्तराधिकारी होता. ह्याच्या पदारोहणाची मेजवानी साहु सहज याच्या आश्रयाखालीं विक्रमशक १३७१ त झाली. मच्छप्रबंध नांवाचा ग्रंथ यानें रचिला. ह्यांत देशलाचे दोन पुत्र ' समर ' व ' सहज ' यांचें चरित्र वर्णिलें आहे.

६८. श्री दे व गु प्त सू रि.—हा प्रख्यात कवि, विद्वन्मुकुटमणि, सिद्धांतपारंगत व अखिल शास्त्रनिकष होता. ५ हजार सुवर्णमोहरा खर्च करून सारंगधरानें १४०९ सालीं दिल्लींत त्याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

६९. श्री सि द्ध सू रि.—विक्रमशक १४७५ त हा श्रीदेवगुप्त सूरीचा उत्तराधिकारी झाला. त्याचा आश्रयदाता (आग्रह) चोरवेडी या गोत्राचा झांबानीम्ह यानें अणहल्लपुरांत याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

७०. श्री क क्क सू रि.—विक्रमशक १४९८ त हा श्री सिद्धसूरिचा उत्तराधिकारी झाला. चोरवेडी या गोत्राचा साहु सारंग व सोनापूरचा राजा यांनीं चित्रकूट ( चितोड ) येथें त्याच्या पदारोहणाची मेजवानी दिली. यानें १४४४ सालीं सर्व कच्छ प्रांतांत सर्व प्रकारच्या प्राणिवधाची मनाई मिळविली होती. त्यानें जाम श्रीवीरभद्राला जैन धर्माची दीक्षा दिली. यानें संस्कृत व प्राकृत ग्रंथ लिहिले. सर्व शास्त्रें

यानें अधीत केलीं. हा वाचस्पतीसारखा वक्ता ( वाग्मी ), सकल कलायुक्त व धर्मशास्त्रवेत्ता होता.

७१. श्री दे व गु प्त सू रिः—श्रेष्ठिगोत्राचा मंत्रीश्वर साहूल याचा पुत्र मुख्य प्रधान जयंत ( श्री देवगुप्तसूरीचा आश्रयदाता ). यानें मोठ्या समारंभानें श्रीदेवगुप्त सूरीचा पदारोहणविधि विक्रमशक १५२८ त करविला. यानें पार्श्वनाथाचा एक प्रासाद व एक उपोषणशाळा (उपास पाळण्याकरितां केलेली निवान्त जागा ) बांधली. त्यानें शत्रुंजयाची एक यात्रा केली. त्यानें पांच पाठक नेमले. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें.—श्रीधनसागरउपाध्याय, श्री देवकल्लोल उपाध्याय पद्मतिलक उपाध्याय, हंसराज उपाध्याय, मतिसागर.

७२. श्री सि द्ध सू रि.—हा श्री देवगुप्तसूरीचा उत्तराधिकारी, श्रेष्ठिगोत्राचा मुख्य प्रधान दशारथ याचा पुत्र मुख्य प्रधान लोलागर ( लोलाग्रहण )यानें मेदिनीपुरांत(मिदनापूर) विक्रमशक १५६५ त, याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

७३. श्री क क्क सू रि.—हा श्री सिद्ध सूरीचा उत्तराधिकारी झाला. हा योधपुरांत ( जोधपूर ) विक्रमशक१५९५ त गच्छाधिप ( गच्छाचा मुख्य ) झाला. श्रेष्ठि गोत्राचा मंत्री जग याचा पुत्र मुख्य प्रधान धर्मसिंह यानें जोधपुरांत याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

७४. श्री दे व गु प्त सू रि.—श्री कक्कसूरीचा उत्तराधिकारी श्रेष्ठिगोत्राचा प्रधान सहसवीर याचा पुत्र. प्रधान देद ( श्रीदेवगुप्तसूरिचा आश्रयदाता ) यानें विक्रमशक १६३१ त त्याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

७५. श्री सि द्ध सू रि.—१६५५ सालीं चैत्र महिन्याच्या शुक्ल पक्षांतील त्रयोदशीला हा श्री देवगुप्तसूरीचा उत्तराधिकारी झाला. मंत्रीश्वर ठाकूरसिंह (श्रेष्ठि गोत्रीय) यानें विक्रमपुरांत ( विक्रमपुरांत ) मोठ्या समारंभानें त्याच्या पदारोहणाची मेजवानी दिली.

[ संदर्भ ग्रंथ—मुनि आत्मारामजी आनंदविजयजी यांनीं अज्ञानतिमिरभास्कर नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे, त्यांत या गच्छाची पट्टावली सांपडेल. इं. अँ. पु. १९ पा. २३३–२४२ उवासगदसाओ ( हर्नोलची प्रत ). प्रिन्सेप—इंडियन अँटिक्विटीज पु. १०. पीटर्सनचा रिपोर्ट ४. ( बॉं. ब्र. रॉ, ए. सो. १८९४ ), ]

**उपनयन.**—त्रैवर्णिकांच्या सोळा संस्कारांपैकीं हा एक मुख्य संस्कार आहे. उपनयनानंतर आचरावयाचें जें ब्रह्मचर्य व्रत त्या व्रताच्या नांवावरून उपनयन झालेल्या मुलास ब्रम्हचारी असें म्हणतात. ब्रम्हचारी पदाचा ऋग्वेदांत ( १० १०९, ३ ) उल्लेख आहे परंतु तेथें याचा ब्रह्मचर्याश्रम असा अर्थ होत नाहीं. अथर्व वेदांत मात्र( ११. ७, ५ ) उपनयनाचा स्पष्ट उल्लेख असून ब्रह्मचारी यानें आचरावयाच्या धर्मांचाहि स्पष्ट उल्लेख आहे. तसेंच ब्रम्हचाऱ्यास त्याचा गुरु विद्यादानानें जन्म देतो असाहि उल्लेख आहे.

उपनयन म्हणजे गुरूनें विद्यार्थ्यास अध्ययनासाठीं आपल्या जवळ आणणें. चूडाकर्मापर्यंत बालकाचे सर्व संस्कार पित्यानें करावयाचे असून उपनयन हा संस्कार अध्ययन सांगणाऱ्या गुरूनें करावयाचा असतो. परंतु सध्यां विद्यार्थ्यांनें गुरुगृहीं विद्याभ्यासास जाण्याची चाल मोडल्यापासून पित्यानेंच पुत्राचा उपदेशकर्ता होऊन उपनयन संस्कार करण्याची चाल सुरू झाली.

ब्राह्मणपुत्राचें उपनयन आठव्या वर्षी करावें असें सर्व सूत्रांचें मत आहे. क्षत्रियांचा उपनयन संस्कार अकराव्या वर्षी व वैश्यांचा बाराव्या वर्षी करावा असें सांगितलें आहे.

उपनयनांत सर्व वेदांचें सार असा जो गायत्री (सावित्री) मंत्र त्याचा उपदेश करावयाचा असतो आणि नंतर वेदांचें अध्ययन करावयाचें असतें. याकरितां ज्या त्रैवर्णिकांना सावित्रीचा उक्तकालीं उपदेश होत नाहीं, त्यांना 'पतित सावित्रिक' अशी संज्ञा आहे. वरील संस्कार वेळच्या वेळीं न झाल्यास ब्राह्मणांनां शेवटची मुदत सोळावें वर्ष, क्षत्रियांनां बाविसावें वर्ष, व वैश्यांनां चोविसावें वर्ष अशी सांगितली आहे. या मुदतींच्या आंत जर उपनयन झालें नाहीं तर पुढें त्यांचें उपनयन करूं नये, त्यांनां वेदांचा उपदेश करूं नये, अशांचे पौरोहित्य करूं नये आणि यांच्यांशीं संसर्ग होऊं देऊं नये असें सांगितलें आहे. याज्ञवल्क्य स्मृतींत अशा प्रकारच्या पतित सावित्रीकांनां व्रात्य अशी संज्ञा दिली आहे, आणि अशांचे संस्कार ' व्रात्यस्तोम ' नामक क्रतु करून करावे असें सांगितलें आहे.

उपनयन संस्कारांत प्रथम कुमाराची हजामत करवून त्यास स्नान घालावें. नंतर उपनयनास उक्त असा होम झाल्यावर शिष्याकडून कौपीन, कृष्णाजिन, यज्ञोपवीत व वस्त्रें धारण करवावीं. नंतर आचार्यानें अग्नीच्या उत्तरेस पूर्वेकडे तोंड करून बसावें आणि आपल्यापुढें आपल्याकडे तोंड करून शिष्यास बसवावें आणि आपली ओंजळ पाण्यानें भरून ती शिष्याच्या पाण्यानें भरलेल्या ओंजळींत ओतावी. नंतर ' देवस्यत्वा ' हा मंत्र म्हणून त्याच्या शेवटीं शिष्याचें संबुध्यंत नांव घ्यावें आणि अंगुष्ठासह शिष्याचा उजवा हात धरावा. नंतर पुन्हां पूर्वीप्रमाणें ओंजळीनें पाणी ओतण्याचा विधि करून ' सविता ते हस्तमग्रभीत् ' हा मंत्र म्हणून गुरूनें पुन्हां शिष्याचा हात धरावा आणि मंत्राच्या शेवटीं शिष्याचें नांव उच्चारावें. तसेंच तिसऱ्यांदा पाणी ओतण्याचा विधि केल्यावर ' अग्निराचार्यस्तव ' असा मंत्र म्हणून त्याच्या शेवटीं नामग्रहण करावें. या विधीस ' अंजल्यवक्षारण ' असें म्हणतात. हा विधि कांहीं सूत्रांनीं व प्रयोगकारांनीं दिला नाहीं. कांहीं सूत्रांत शिष्यास अग्नीच्या उत्तरेस ठेवलेल्या दगडावर उभे करण्याचा विधि सांगितला आहे. नंतर ' हा शिष्य तुझा आहे याचें रक्षण कर ' अशा अर्थाचा मंत्र आचार्यानें पठण करून व शिष्यास पूर्वाभिमुख करून शिष्याकडून सूर्यावलोकन करवावें असा विधि सांगि-

तला आहे. कांहीं सूत्रांत आदित्य अथवा प्रजापति या देवतांच्या ठिकाणीं संरक्षणार्थ शिष्यास इंद्राच्या स्वाधीन करण्याबद्दल उल्लेख आहे. नंतर आचार्यानें शिष्याच्या दोन्ही खांद्यावर आपले दोन्ही हात ठेवून त्याला आपल्या सन्मुख करावें आणि त्याच्या हृदयावर आपला हात ठेवावा.

नंतर शिष्यानें अग्नीच्या पश्चिमेस बसून 'अग्निकार्य' नामक नित्यौपासन होम करावयाचा असतो. हा होम न करतां नुसती अग्नींत समिध द्यावी असेंहि मत आहे. नंतर अभिवादन करून शिष्यानें आपला उजवा गुडघा जमीनी-वर टेंकून सावित्रीचा ( गायत्रीचा ) उपदेश करण्याबद्दल आचार्यांची प्रार्थना करावी. अथवा शिष्यानें आपल्या उजव्या हातानें डावा कान व डाव्या हातानें उजवा कान धरावा आणि कान सोडून तशाच हातांनीं आचार्यांच्या पायांना स्पर्श करावा आणि अभिवादन करावें. अशा प्रकारचाहि एक अभिवादनाचा प्रकार सांगितला आहे. शिष्यानें प्रार्थना केल्यावर आचार्यानें शिष्याचे दोन्ही हात त्याच्या वस्त्रासह आपल्या हातांत घ्यावे आणि त्यावरहि आच्छादन घालावें आणि शिष्यास गायत्रीचा उपदेश प्रथम पादशः, नंतर अर्ध-र्चशः आणि नंतर सर्व मंत्र असा करावा. अथवा शिष्याला जसा ग्रहण करतां येईल तसा करावा. नंतर आचार्यानें शिष्याच्या हृदयावर आपला तळहात ठेवून 'माझ्या मता-प्रमाणेंच तूं वागावेस, माझ्याच व्रताचें आचरण करावेंस' अशा अर्थाचा मंत्र म्हणावा. व शिष्याच्या कमरेस मेखला बांधून हातांत दंड द्यावा. नंतर ब्रह्मचर्यव्रताचा (त्यानें पाळा-वयाच्या नियमांचा ) उपदेश करावा. शिष्यानें भिक्षा मागून आणावी व आचार्यास निवेदन करावी. सायंकाळीं चरु शिज-वून अनुप्रवचनीय होम आचार्यानें–शिष्यानें अन्वारंभ केला असतां–करावा. नंतर ब्रह्माचार्य यानें तीन रात्रीं अथवा बारा रात्रीं ब्रह्मचारी व्रताचें आचरण करावें आणि नंतर मेधाजनन नामक कर्म करावें.

कांहीं कारणानें पुनरुपनयन करणें झाल्यास उपनयनापूर्वी करावें लागणारें वपन ( हजामत ) करूं नये व मेधाजनन कर्महि करूं नये आणि गायत्री मंत्राचा उपदेश करावयाचा तो 'तत्सवितुर्वृणीमहे' या मंत्राचा करावा. निरनिराळ्या सूत्रकारांच्या मतानें वरील विधींत थोडा थोडा फरक आहे. वर विधि दिला आहे तो आश्वलायन सूत्राला अनुसरून आहे.

**उपनिधि.**—आपलें द्रव्य सुरक्षित रहावें यासाठीं दुसऱ्याजवळ ठेव म्हणून ठेवलें असल्यास त्यास औपनि-धिक असें म्हणतात. व तें द्रव्य ज्या करंड्यांत अथवा पेटींत ठेवलें असेल त्यास वासन अथवा उपनिधि असें म्हणतात. अशा प्रकारचा उपनिधि एखाद्याजवळ ठेवलेला चोरीस गेला, पुरून ठेवलेला नाहींसा झाला, अथवा राजानें तो हरण केला तर, ज्याच्या जवळ तो ठेवला असेल त्याच्याकडून तो ठेवणारानें घेऊं नये. मात्र खरोखरच तो निधि नाहींसा झालेला असला पाहिजे. द्रव्य ठेवणारा द्रव्य ठेव-लेल्या मनुष्याजवळ मागण्यास गेला असतां तें मागणारास दिलें नाहीं आणि त्यानंतर तें द्रव्य नष्ट होईल तर राजानें तें द्रव्य ठेवणाराला देववावें व त्या द्रव्याइतकाच तें द्रव्य ठेवून घेणारास दंड करावा. तसेंच एखाद्यानें वरील प्रकारच्या ठेवीचा व्यावहारिक ( व्याजी लावणें वगैरे ) उपयोग केल्यास त्यासहि राजानें दंड करावा. हा दंड करणें तो शेंकडा पांच टक्के प्रमाणें करावा असें याज्ञवल्क्य स्मृतींत ( व्यवहाराध्याय, उपनिधिप्रकरण ) सांगितलें आहे. ( ठेव पहा ).

**उपनिषदें.**—प्राचीन भारतीय आर्यांचे तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ म्हणजे उपनिषदें हीं होत. या उपनिषदांमध्यें प्राचीन भारतवासी आर्यांच्या तात्त्विक विचारांची आत्यंतिक अवस्था आपल्या निदर्शनास येते. या उपनिषदांमध्यें सांठविलेल्या विचाररत्नांच्या भक्कम आधारावरच आर्यांच्या तत्त्वज्ञानम्हा-ल्याची उभारणी झाली आहे. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य इत्यादि आचार्यांनीं उपनिषदांतील तत्त्वांच्या पायावर आपल्या अद्वैत, विशिष्टाद्वैत व द्वैत तत्त्वज्ञानाची मांडणी केली. या कारणामुळें उपनिषदांना भारतीय आर्यांच्या इतिहासांत अतिशय उच्च दर्जाचें स्थान प्राप्त झालें आहे व तें सर्वथैव योग्यच आहे.

'उपनिषद्' हा शब्द सद् या धातूला उप आणि नि हीं उपपदें लागून तयार झाला आहे. सद् याचा अर्थ बसणें. उपनिषद् याचा अर्थ जवळ बसणें असा होतो. अत्यंत भक्ति भावानें गुरूजवळ बसणें असा या 'उपनिषद्' शब्दाचा धात्वर्थ होतो. पण उपनिषद् या शब्दाचा रूढार्थ थोडासा निराळा झाला आहे. अत्यंत भक्तिभावानें गुरूजवळ बसून गुरूकडून जी पारमार्थिक विद्या शिष्य संपादन करतो त्या विद्येला उपनिषद् हा शब्द लावण्यांत येतो. कठोपनिषदा-वरील आपल्या भाष्याच्या आरंभीं उपनिषद् या शब्दांचे निरनिराळे अर्थ शंकराचार्यांनीं दिलेले आहेत. आचार्य म्हणतात कीं, उपनिषद् या शब्दांतील सद् या धातूचे विशरण, गति व अवसादन असे तीन अर्थ होतात. विशरण म्हणजे विध्वंसन. जे मुमुक्षू लोक विषया-पासून पराङ्मुख होऊन पारमार्थिक कल्याणाच्या प्राप्तीसाठीं उत्सुक असतात त्यांना ज्या विद्येमुळें अविद्येचा विध्वंस करतां येतो व पराविद्येची प्राप्ति होते त्या विद्येला उपनिषद् असें म्हणतात. अथवा सद् याचा दुसरा अर्थ 'गति' हा घेतला तर ज्या विद्येमुळें ब्रह्माचें ज्ञान होतें त्या विद्येला (ब्रह्मविद्येला) उपनिषद् असें म्हणतात. किंवा सद् धातूचा 'अवसादन' हा अर्थ घेतल्यास जन्म, जरा, मृत्यु या तापा-पासून ज्या विद्येमुळें निवारण होतें त्या विद्येलाहि उपनिषद् म्हणता येईल. अशा रीतीनें शंकराचार्यांनीं उपनिषद् या शब्दाचा अर्थ 'अविद्याविध्वंसिनी ब्रह्मविद्या' असा केला आहे. हा अर्थ धात्वर्थापासून प्राप्त होत नसून तो 'उपनि-षद्' शब्दाचा तात्कालिक रूढ अर्थ आहे हें मात्र ध्यानांत

ठेवणें जरूर आहे. अशा रीतीनें उपनिषदांचा अर्थ ब्रह्मविद्या असा झाल्यानंतर ज्या ग्रंथांमध्यें अगर ज्या मंत्रांमध्यें ही ब्रह्मविद्या सांगितली असेल त्या ग्रंथांनाहि उपनिषद असें नांव प्राप्त झालें. तात्पर्य, उपनिषद् या शब्दाचा अर्थ ब्रह्म विद्याप्रतिपादक ग्रंथ असा केल्यास त्यांत मुळींच वावगें होणार नाहीं.

अशा प्रकारचीं ब्रह्मविद्याप्रतिपादक उपनिषदें किती आहेत त्यांचा नक्की आंकडा सांगतां येणें अशक्य आहे. कोणी उपनिषदांची संख्या २५० मानतात. ब्रह्मविद्याप्रतिपादक आणखीहि उपनिषदें झाल्यास ही संख्या केव्हांहि फुगतच जाईल यांत शंका नाहीं. या २५० उपनिषदांत अल्लोपनिषद्, खंडोपनिषद अशा अगदीं अर्वाचीन उपनिषदांचीहि गणना केली गेली आहे. पण अशा उपनिषदांची संख्या वगळल्यास उपनिषदांची संख्या फारच कमी भरेल यांत शंका नाहीं. त्यांतल्यात्यांत निरनिराळ्या आचार्यांनीं आपापल्या भाष्यामध्यें ज्या उपनिषदांचा वेळोवेळीं उल्लेख केला आहे तीं उपनिषदेंच महत्त्वाचीं, प्राचीन व अधिक विश्वसनीय मानणें जरूर आहे. अशा प्रकारचीं शंकराचार्यांच्या ग्रंथांत उल्लेख केलीं गेलेलीं उपनिषदें ११ आहेत. तीं म्हणजे छांदोग्य, केन, ऐतरेय, कौषीतकी, ईश, कठ, मुंडक, तैत्तिरीय, बृहदारण्यक, श्वेताश्वतर व प्रश्न हीं होत. याशिवाय, अमृतबिंदु, कैवल्य, गर्भ, गोपालतापनी, छुरिका, जाबालसंन्यास, ध्यानबिंदु, नारायणीय, नृसिंहोत्तरतापनीय, महानारायण, मांडूक्य, मैत्री, योगतत्व, रामपूर्व (तापनी), वज्रसूची, सर्व इत्यादि किरकोळ तीस, बत्तीस उपनिषदें आहेत.

उपनिषदांचा नक्की काळ ठरवितां येणें शक्य नाहीं. एवढें मात्र खरें कीं, ब्राह्मणग्रंथानंतर उपनिषदें रचिलीं गेलीं. पण याच्या पलीकडे निश्चयात्मक असें विधान करतां येत नाहीं. प्रत्येक वेदाचीं निरनिराळीं उपनिषदें आहेत व तीं आरण्यकाच्या शेवटचे भाग या नात्यानें ब्राह्मण ग्रंथांत आले आहेत. उपनिषदांतील विषयांसंबंधीं विवेचन वेदविद्या पृ. १६४-१७९ येथें आलें आहे. तसेंच कोणत्या वेदाचीं कोणतीं उपनिषदें आहेत. यासंबंधीं माहिती पूर्वी ज्ञानकोश तिसऱ्या विभागांतील उत्तरार्ध पृ. १३९ येथें दिली आहे.

अथर्ववेदांगभूत उपनिषदांची संख्या बरीच मोठी आहे. शिवाय, ऋग्वेद, यजुर्वेद अगर सामवेद यांतील उपनिषदांचीं नांवें ज्याप्रमाणें वेदाच्या निरनिराळ्या शाखांवरून पडलेलीं आहेत त्याप्रमाणें अथर्ववेदांतील उपनिषदांची स्थिति नाहीं. या वेदांतील उपनिषदांचीं नावें त्यांतील वस्तुविषयावरून पडलेलीं दिसतात. ऋक्, यजु व साम हे वेद विशेषतः ब्राह्मणवर्गाच्या मालकीचे होते. पण क्षत्रियांनीं ज्यावेळीं आत्मा व ब्रह्म या विषयांवर विचार करण्यास सुरवात केली त्यावेळीं, त्यांनीं जीं तत्त्वें पुढें मांडलीं त्यांनाच उपनिषद हें नांव देण्यांत येऊन अशा प्रकारच्या पुष्कळ उपनिषदांची अथर्ववेदांत गणना होऊं लागली. ईशोपनिषद एवढेंच मात्र संहितांतर्भूत आहे. अथर्ववेदांतील उपनिषदांचे डॉयसनसाहेबांनीं पांच प्रकार पाडले आहेत. त्यापैकीं पहिला प्रकार म्हणजे ज्या उपनिषदांमध्यें वेदान्ताचें उद्घाटन केलेलें आहे अशीं उपनिषदें. उदा:—मुंडक, प्रश्न, मांडुक्य, गर्भ, गारुड इत्यादि. दुसरा प्रकार, योगोपनिषदांचा होय. अमृतबिंदु, छुरिका, नादबिंदु, ब्रह्मबिंदु इत्यादि. तिसरा प्रकार, संन्यासपर उपनिषदांचा होय. उदा, ब्रह्म, सर्वसार संन्यास, आरुणेय, आश्रम वगैरे. चवथा प्रकार शिवोपासनापर उपनिषदांचा होय. उदा. कैवल्य नीलरुद्र, अथर्वशिरस इत्यादि. पांचवा प्रकार, विष्णुपर उपनिषदांचा होय. उदा. आत्मबोध, नारायण, रामपूर्वतापिनी, रामोत्तरतापिनी वगैरे.

उपनिषदांचा नक्की काल ठरवितां येणें जरी अशक्य असलें, तरी जीं जुनीं व महत्त्वाचीं अशीं उपनिषदें आहेत त्यांच्यामध्यें अगोदरचीं कोणतीं व नंतरचीं कोणतीं हें अंतर्गत पुराव्यावरून, ठरवितां येतें. यां उपनिषदांचे डायसेननें चार विभाग पाडलेले आहेत, ते (१) प्राचीन गद्यात्मक उपनिषदें; बृहदारण्यक, छांदोग्य, तैत्तिरीय, ऐतेरेय, कौषीतकी, केन (२) पद्यात्मक; उपनिषदें, काठक, ईश, श्वेताश्वतर, मुंडक, महानारायण (३) नंतरचीं गद्योपनिषदें प्रश्न, मैत्रायणीय, मांडूक्य (४) नंतरचीं अथर्वोपनिषदें; गर्भ, पिंड, आत्मबोध इत्यादि. या चौथ्या प्रकारच्या उपनिषदांची संख्या बरीच मोठी आहे.

उपनिषदांच्या कर्त्याविषयींहि निश्चयात्मक सांगणें अवघड आहे. जीं उपनिषदें कोणत्या तरी आरण्यकाच्या अखेरीस आलेलीं आहेत, त्या उपनिषदांचे कर्ते, ज्यांनीं ब्राह्मण ग्रंथ रचिले तेच होत असें म्हणतां येईल. पण या शिवाय इतर उपनिषदांच्या कर्त्यांचा निश्चय करतां येत नाहीं. उपनिषदांच्या कर्त्यांचें नांव मुद्दाम न देण्यांत एक दोन हेतुहि आढळून येतात. उपनिषदांत तत्त्वज्ञानाविषयींचे परमोच्च विचार प्रगट झाल्यानें ते विचार कोणा एका विशिष्ट व्यक्तीचे आहेत असें म्हटल्यास त्या विचारांविषयीं जितका आदर उत्पन्न होतो त्यापेक्षां शतपटीनें अधिक आदर, ते विचार, ईश्वरनिश्वास आहेत हें म्हटल्यानें होईल, ही गोष्ट प्राचीनांच्या मनांत आली असावी व त्यामुळें त्यांनीं अमक्या उपनिषदाचा कर्ता अमका ऋषि असें न म्हणतां, अखिलवेद हे ईश्वराचे निश्वास व अतएव अपौरुषेय आहेत अशा प्रकारची विचारसरणी त्यावेळच्या तत्त्वज्ञानी पंडितांनीं पत्करिली असावी असें दिसतें. याचा दुसरा एक फायदा असा झाला कीं वरील विचारसरणीमुळें उपनिषदांचें सांप्रदायिक, अगर वैयक्तिक स्वरूप जाऊन त्यांना सार्वत्रिक स्वरूप प्राप्त झालें. दुसरें कारण म्हणजे असें कीं कांहीं उपनिषदें निरनिराळ्या ब्राह्मणांतील व वेदांतील निरनिराळे महत्त्वाचे मंत्र एकत्र करून रचिलीं गेल्यामुळें

अमक्या एका व्यक्तीचें नांव कर्ता या नात्यानें देतां येणें शक्य नसावेसें दिसतें.

उपनिषदांतील तत्त्वज्ञान.—सर्व उपनिषदें त्या त्या ब्राह्मणांतील ज्ञानकांडाचे प्रबंध होत या दृष्टीनें जरी त्यांचा ब्राह्मणांत अंतर्भाव केला आहे तथापि तीं कर्मकांडाशीं तत्त्वतः विरुद्ध अशा एका नवीन धर्मविचारांचीं द्योतक आहेत. देवांप्रीत्यर्थ यथासांग यज्ञकर्मे करून ऐहिक सुख व मृत्यूनंतर यमलोकीं सुख मिळवावें असा त्यांचा मुळींच हेतु नसून यथार्थ ज्ञानाच्या योगानें जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य होऊन या नश्वर देहांतून मुक्त व्हावें हेंच त्यांचें ध्येय आहे. म्हणून उपनिषदांत कर्मकांड निरुपयोगी होऊन ज्ञानकांडाला संपूर्ण महत्त्व प्राप्त झालें आहे.

विश्वात्म्याचें म्हणजे परब्रह्माचें स्वरूप हा उपनिषदांचा मुख्य विषय आहे. जगदुत्पादक सगुण प्रजापतीपासून सर्व चिदचिद्वस्तूंचें उद्भवकारण जें निर्गुणब्रह्म त्यापर्यंत झालेल्या वेदांत विचाराच्या विकासांतील शेवटली अवस्था उपनिषदांनीं व्यक्त होते. ऋग्वेदांत आत्मा हा शब्द केवळ 'श्वास' या अर्थी योजिलेला आहे. उदाहरणार्थ वरुणाच्या श्वासाला आत्मा अशी संज्ञा दिली आहे. ब्राह्मणग्रंथांत या शब्दाचा जीवात्मा अशा अर्थांत उपयोग होऊं लागला. पुढें उपनिषदांमध्यें आत्मा या शब्दाला 'सर्व विश्वाच्या चेतनेचें पवित्र कारण' असा अर्थ प्राप्त झाला. उपनिषदांत आत्मा आणि ब्रह्म या दोन्ही कल्पना सामान्यपणें समानार्थक आहेत परंतु खरें पाहिलें तर ब्रह्म या प्राचीन शब्दानें मनुष्यामध्यें व्यक्त असणारी चिच्छक्ति या अर्थाचा बोध होतो आणि अशा रीतीनें अज्ञेयब्रह्माचें स्पष्टीकरण करण्यासाठीं ज्ञात आत्म्याची योजना केली आहे. बृहदारण्यकांत अक्षर आत्म्याचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे 'सहोवाचैतद्वै तदक्षरं गार्गी ब्राह्मणा अभिवदन्त्यस्थूलमनण्वन्ह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छायमतमोऽवाय्वनाकाशमसङ्गमरसमगन्धमचक्षुष्कमश्रोत्रमवागमनोऽतेजस्कमप्राणममुखममात्रमनन्तरमबाह्यं न तदश्नाति किंचन न तदश्नाति कश्चन (बृह० अ० ३ ब्रा० ८ मं० ८). तसेंच याच ब्राह्मणाच्या ११ व्या मंत्रांत 'तद्वा एतदक्षरं गार्ग्यदृष्टं द्रष्टृश्रुतं श्रोत्रमतं मन्त्रविज्ञातं विज्ञातृ नान्यदतोऽस्ति द्रष्टृ नान्यदतोऽस्ति श्रोतृ नान्यदतोऽस्ति मन्तृ नान्यदतोऽस्ति विज्ञात्रेतस्मिन्नु खल्वक्षरे गार्ग्याकाश ओतश्च प्रोतश्चेति'. मानवी विचाराच्या इतिहासांत पहिल्या प्रथम येथेंच परमात्म्याचें आकलन करून निरूपण केलेलें आढळतें.

अधिक सगुण अशा प्रजापतीचें स्थान उपनिषदांत जगत्कारण असा जो आत्मा त्यास दिलें आहे. बृहदारण्यकांत म्हटलें आहे कीं, प्रारंभीं आत्मा किंवा ब्रह्म हेंच विश्व होतें. तो एकाकी असल्यामुळें त्याला भीति वाटूं लागली व आनंद वाटेना. आपण द्वितीय व्हावें अशी त्याला इच्छा झाली व तो पुरुष आणि स्त्री होऊन त्यापासून मानवजाति निर्माण झाली. याप्रमाणें त्यानें पुढें प्राण्यामध्यें नर व नारी या जाती निर्माण केल्या; शेवटीं त्यानें जल, अग्नि, देव वगैरे उत्पन्न केलीं. [अ. १ ब्रा. ४.]

'सर्व जग माया आहे व ब्रह्म मायिन् असून त्यानें ती माया उत्पन्न केली आहे' हा वेदान्त मतांतील प्रमुख सिद्धांत पहिल्याप्रथम श्वेताश्वतर नामक एका उत्तरकालीन उपनिषदांत आढळतो(श्वेताश्वतर अ. ४ मं. १०).तथापि हें मत मूळापासूनच प्राचीन उपनिषदांमध्यें अंगभूत झालें आहे. 'दृश्य वस्तू खऱ्या सद्वस्तूंच्या केवळ छाया आहेत या ग्रीक तत्त्वांत प्लेटोच्या मताशीं तसेंच 'दृश्य वस्तु तदंतर्गत सद्भावाचे दृश्य चमत्कार होत' या कांटनामक जर्मन तत्त्वज्ञान्याच्या मताशीं वरील उपनिषदांचें मत अगदीं सदृश दिसतें.'

'जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य आहे' हा उपनिषदांचा अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत आहे. छांदोग्य उपनिषदांत पुनः पुनः त्याच मताची त्याच शब्दांत वारंवार पुनरावृत्ति केली आहे. ती अशी 'हें सर्व जग ब्रह्ममय आहे, हेंच ब्रह्म सत् आहे, तेंच आत्मा, हे श्वेतकेतु तेंच तूं आहेस." 'तत्त्वमसि' या वाक्यांत उपनिषदांच्या सर्व वेदांतमताचें सार आहे. 'अहंब्रह्मास्मि' याहि वाक्यांत वरील मतच मांडलेलें आहे. या ब्रह्मात्मैक्याविषयीं बृहदारण्यक, मुंडक इत्यादि उपनिषदांत वारंवार उल्लेख आलेले आहेत.

सत्यज्ञानाच्या योगानें ब्रह्माशीं जीवात्म्याचें तादात्म्य होऊन परमसुखाची प्राप्ति होते, या सिद्धांताबरोबरच संसारसिद्धांत ( पुनर्जन्म अगर जन्मांतर ) रूढ झाला. या सिद्धांताचा विकास अत्यंत प्राचीन उपनिषदांमध्यें झाला आहे. आणि तो बुद्धधर्माची संस्थापना झाली, त्यावेळीं पूर्णपणें संस्थापित झालेला असला पाहिजे. कारण तो गौतमबुद्धानें निर्विवाद मान्य केला होता. या सिद्धांताचें अगदीं प्रारंभींचें स्वरूप शतपथ ब्राह्मणांत आढळतें. इहलोकीं पुनर्जन्म होतो, असें मानून उपनिषदांत या वरील कल्पनेस संसारवादाचें स्वरूप दिलें आहे. 'कर्माच्या योगानें पुनर्जन्म प्राप्ति होते व मनुष्याच्या स्वतःच्या कर्मांवर ती अवलंबून आहे', या कर्मवादाचा प्रारंभ बृहदारण्यकांत झालेला आढळतो. वेदकालीन संसारवादाचें अत्यंत महत्त्वाचें व सविस्तर वर्णन छांदोग्योपनिषदांत आहे तें असें कीं, ज्ञानसंपन्न व श्रद्धावान वानप्रस्थ तपस्वी, मृत्यूनंतर देवयानांत प्रविष्ट होतो व तेणेंकरून ब्रह्मांत त्याचा लय होतो; परंतु यज्ञकर्म व सत्कर्म करणारा गृहस्थाश्रमवासी पितृयानानें चंद्रलोकास जातो व तेथें त्याचें कर्मफल संपेपर्यंत तो वास करतो. नंतर तो पृथ्वीवर पुनः परत येतो व प्रथम वनस्पतिरूपांत जन्म घेऊन नंतर तीन उच्च वर्णांपैकीं एका वर्णांत मानवरूपांत जन्म घेतो. यांत प्रथम परलोकीं व नंतर पुनर्जन्माच्या योगानें इहलोकीं याप्रमाणें दुहेरी कर्मफलप्राप्ति झालेली दिसते. अशाच प्रकारचें वर्णन बृहदारण्यकांत (६ अध्याय ब्राह्मण २ मंत्र १५-१६) आहे.

सर्व उपनिषदें मिळून किंवा एकाच उपनिषदांत वेदांतमताचा न्यायशास्त्रानुसार पद्धतशीर विकास झालेला आहे व त्याचें सुसंगत व संपूर्ण ज्ञान आपणांस होऊं शकेल असें मात्र म्हणतां येत नाहीं. त्यामध्यें कांहीं अंशीं काव्यमय व कांहीं अंशीं आध्यात्मिक असे विचारसंवाद, चर्चा यांचें मिश्रण झालें असून त्यामध्यें तत्त्वविचार आनुषंगिक आहे. त्या तत्त्वविचाराला कालांतरानें पद्धतशीर वेदांतशास्त्राचें स्वरूप पुढें देण्यांत आलें.

नी ति त त्त्वें.—उपनिषदामध्यें जरी ब्रह्म, आत्मा, जग यांच्या स्वरूपाविषयींचे परमोच्च विचार मुख्यत्वेंकरून प्रगट करण्यांत आले आहेत तरी त्यांत नैतिक तत्त्वांचा अगदींच ऊहापोह नाहीं असें मात्र नाहीं. आध्यात्मिक चर्चेबरोबरच मधूनमधून नैतिक तत्त्वांची चर्चाहि बऱ्याच जागीं करण्यांत आलेली आहे. मोक्षप्राप्तीसाठीं जीं साधनें आहेत त्यांत चित्तशुद्धि हें एक प्रमुख साधन आहे व ती चित्तशुद्धि प्राप्त होण्यास मनुष्यानें दम, तप, सत्य, इत्यादि गुण अंगीं बाणून घेतले पाहिजेत अशा प्रकारचा उल्लेख केनोपनिषदांत आढळतो. ईशावास्यांत अशाच प्रकारचे विचार आढळतात. पण हें जग मायिक असून, या नश्वर देहापासून मनुष्यानें मुक्तता करून घेऊन ब्रह्मस्वरूपीं लीन झालें पाहिजे, हें मनुष्याचें वास्तविक ध्येय आहे, हें ठसविण्याचा उपनिषदांचा प्रधान हेतु आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

उपनिषदांतील तात्त्विक विचारांचा हिंदु लोकांवर किती पगडा बसला आहे हें या लेखाच्या प्रारंभीं सांगितलेंच आहे. हिंदुधर्माचे जे आचार्य व पुरस्कर्ते होऊन गेले त्यांनीं या उपनिषदांतलि तत्त्वेंच मूलभूत मानून त्यांवर आपल्या तत्त्वज्ञानाची टोलेजंग व सनातन इमारत बांधली. निरनिराळ्या हिंदुधर्माच्या सांप्रदायिकांनीं, आपल्या संप्रदायाला वजन प्राप्त व्हावें म्हणून उपनिषदांचा आधार आपल्या संप्रदायाच्या तत्त्वांनां आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला इतकें उपनिषदांना प्रामाण्य प्राप्त झालें आहे. पण या उपनिषदांचें महत्त्व केवळ हिंदु लोकांनाच पटलें आहे असा भाग नाहीं. ज्या ज्या भाषेंत उपनिषदांचें भाषांतर झालें आहे त्या त्या भाषेच्या लोकांनां उपनिषदांचें तत्त्वज्ञान वाचून उपनिषदांची योग्यता पटली आहे. शोपेनहार नामक पाश्चात्त्य पंडितानें उपनिषदांचें मोडकेंतोडकें भाषांतर ज्यावेळीं वाचलें त्यावेळीं त्याला उपनिषदांतील तत्त्वज्ञानाविषयीं इतका आदर उत्पन्न झाला कीं त्यानें 'या उपनिषदांच्या अभ्यासानें माझ्या मनाला कायमची शांति प्राप्त झाली व तीच शांती माझ्या मृत्युपर्यंत राहील' असे उद्गार काढले. अशाच तऱ्हेचे उद्गार कित्येक पाश्चात्त्य पंडिताच्या मुखांतून बाहेर पडलेले आहेत.

इ. स. १६५६ त उपनिषदांचें उर्दू भाषांतर, शहाजहान बादशहाचा वडील मुलगा दारा यानें अनेक हिंदु पंडितांकडून करविलें. १७७५ मध्यें या उर्दू भाषेंतील उपनिषदांचें लॅटिनमध्यें आंकेतिल डुपेरां यानें भाषांतर केलें. हें १८०१ व १८०२ सालीं स्ट्रासबर्ग येथें दोन भागांत प्रसिद्ध झालें. नंतर शोपेनहारनें तें भाषांतर वाचलें व नंतर त्याचा प्रसार यूरोपमध्यें होऊन मॅक्सम्युल्लर, डॉयसन प्रभृति विद्वज्जनांनीं उपनिषदांचा अभ्यास सुरू केला.

[संदर्भग्रंथ—डॉयसन—फिलॉसफी ऑफ दि उपनिषद्स इंग्लिश भांपतर, १७०६ एडिंबरो; ब्लूमफील्ड–दि रिलिजन ऑफ दि वेद, न्यूयॉर्क अँड लंडन १९०८; फ्रेझर–इंडियन थॉट पास्ट अँड प्रेझेंट, लंडन १७१५; मॅक्निकल–इंडियन थिइझम, ऑक्सफोर्ड १९१५, मॅक्सम्युल्लर–थ्री लेक्चर्स ऑन दि वेदान्त फिलासफी, लंडन १८९९; बार्नेट–ब्रह्म नॉलेज ॲन औटलाईन ऑफ दि फिलॉसफी ऑफ वेदान्त ॲज सेट फोर्थ बाय दि उपनिषद्स अँड शंकर, लंडन १९००; गेडन–स्टडीज इन दि रिलिजन ऑफ दि ईस्ट, लंडन १९१३; बार्थ–दि रिलिजन्स ऑफ इंडिया, इंग्लिश भाषांतर लंडन १८९१; गौ–फिलॉसफी ऑफ दि उपनिषद्स, लंडन १८८२ मॅक्डोनल ए हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर–लंडन १९००; ईशाद्यष्टोत्तर शतोपनिषद ( तुकाराम जावजी प्रत ) १९१७ मुंबई; भानु उपनिषत्समुच्चय; बापट उपनिषदें ]

**उपनेत्र**—( चष्मा ) मनुष्याच्या नेत्रांतील दोष दूर करण्याकरितां कांचेच्या किंवा गारेच्या भिंगांचा ( लेन्स ) उपयोग करितात; हीं भिंगें डोळ्यापुढें व्यवस्थित रीतीनें रहाण्याकरितां धातूच्या सांगाड्याचा ( फ्रेम ) उपयोग करितात. हीं भिंगें क्रौनग्लास नांवाच्या विलोरी कांचेचीं किंवा रॉक क्रिस्टल नांवाच्या गारेचीं करितात. गारेचीं भिंगें जास्त स्वच्छ ( जास्त पारदर्शक ) आणि थंड असतात. सांगाड्या साठीं पोलाद, निकेलपोलाद, सोनें इत्यादि धातूंचा उपयोग करितात. काळ्या किंवा दुसऱ्या रंगांच्या भिंगांचा उपयोग तीव्र प्रकाशापासून डोळ्यांचा बचाव करण्याकरितां करितात. डोळ्यांत फूल पडलें असल्यास आपलें व्यंग दिसूं नये म्हणून कित्येकांस असल्या प्रकारचीं भिंगें वापरावीं लागतात. असल्या प्रकारच्या रंगीत भिंगांकरितां निरनिराळे रंग आणि त्यांच्या अनेक छटा यांचा उपयोग करितात.

त्रि को नी किं वा स म पा र्श्व भिं गां चे च ष्मे.—असल्या प्रकारच्या भिंगांचा उपयोग तिरळेपणा घालविण्याकरितां करितात. त्रिकोनी भिंगा( प्रिझम )च्या अंगीं प्रकाश किरणांचें वक्रीभवन करून त्या किरणास त्रिकोणाच्या पायाकडे वळविण्याची शक्ति असते. तेव्हां तिरळे डोळ्यास प्रकाश सरळ रेषेंत आणून मदत करण्याचें काम या भिंगाकडून उत्तम प्रकारें बजाविलें जातें. जर एखाद्या मनुष्याच्या डोळ्यांत समीपदर्शित्वाचा किंवा दूरदर्शित्वाचा दोष असून त्या बरोबरच तिरळेपणाचा दोष असेल तर त्रिकोणी भिंगासहित अन्तर किंवा बहिर्गोल भिंगांचा उपयोग करितात. एका त्रिकोणी भिंगाच्या पुढें किंवा मागें अन्तर किंवा बहिर्गोल भिंग ठेवूनहि कार्यभाग होतो; परंतु अशा प्रकारच्या रचनेंत

बोजडपणा येतो तो न यावा म्हणून त्रिकोणी भिंगच घांसून त्याचें वर्तुलात्मक भिंग बनवितात.

व र्तु ला त्म क भिं गें ( लेन्स ).—असल्या प्रकारच्या भिंगांचे मुख्यतः तीन प्रकार असात. या भिंगांची केंद्रें किती इंच अंतरावर आहेत हें मोजून त्या प्रमाणें त्यांस नंबर देण्याची पद्धत चालू होती; परंतु लांबीच्या मापांत निरनिराळ्या देशांत फरक असल्यामुळें ही पद्धत गैरसोईची ठरली व नवीन पद्धति प्रचारांत आली आहे. या नवीन पद्धतींत ज्या भिंगाचें केंद्रान्तर ( फोकल लेंग्थ ) एक मीटर आहे त्याची वक्रीभवनशक्ति हें मूलमान ठरवून त्यास ' डॉयाप्टिक ' हें नांव दिलें आहे व या मानानें निरनिराळ्या भिंगांचे नंबर लावतात. वर निर्दिष्ट केलेल्या तीन प्रकारच्या भिंगांपैकीं पहिल्या प्रकारचीं भिंगें नेहमींच्या व्यवहारांत चष्म्याकरितां उपयोगांत आणलीं जातात. दुसऱ्या प्रकारचीं भिंगें भारी प्रतीच्या चष्म्याकरितां उपयोगांत आणतात. तिसऱ्या प्रकारचीं भिंगें क्वचित् प्रसंगीं उपयोगांत आणलीं जातात.

अं त र्गो ल भिं गें.—समीपदर्शित्वाचा दोष ज्याच्या नजरेंत उत्पन्न झाला असेल अशा मनुष्यास दूरचें नीट दिसण्याकरितां अंतर्गोलभिंगांचा उपयोग करितात. आतां समीपदर्शित्व मनुष्याच्या ठिकाणीं कसें उत्पन्न होतें हें पाहिलें पाहिजे. डोळ्यांत एक प्रकारचें भिंग असतें. हे बाह्यगोल असतें. नेत्रांतील या भिंगाच्या रचनेंत फरक पडल्यास दृष्टिदोष उत्पन्न होतात. हें भिंग जाडें झाल्यास समीपदृष्टिदोष प्राप्त होतो. हा दोष नाहींसा व्हावा म्हणून वरील प्रकारच्या भिंगांचा चष्मा वापरतात. साधारणपणें आठरा फूट अंतरावरून जाड्या टाईपांत लिहिलेलें वाचतां येईल इतक्या शक्तीचें ( नंबरचें ) भिंग वापरावें. समीपदृष्टि हा दोष फारच जास्त प्रमाणांत असेल तर जवळचें वाचण्याकरितां कमी शक्तीचें भिंग वापरावें लागतें. समीपदृष्टित्वाचा दोष बालपणींच बहुधा उत्पन्न होतो; व विद्यार्थिदशेंत हा बहुधा वाढतो. विशेषतः याची उपेक्षा केल्यास हा खात्रीनें वाढतो. याकरितां हा दोष असलेल्या मनुष्यानें उपनेत्रांचा उपयोग लवकर करून हा दोष घालवावा. शेंकडा ९५ बाबतींत हा दोष औषधोपचारानें बरा होण्यासारखा असत नाहीं. ज्यांच्या ठिकाणीं हा दोष उत्पन्न झाला असेल त्यांनीं वेळेवर शारीरिक व्यायाम घेऊन प्रकृति सुधारावी म्हणजे उत्पन्न झालेला दोष वाढत नाहीं व त्यामुळें चष्म्याचे नंबर वाढवावे लागत नाहींत. हा दोष असणाऱ्यांनीं खुली हवा, स्वच्छ उजेड, मोठ्या अक्षरांचींच पुस्तकें वाचणें आणि आरोग्य इतक्या गोष्टींकडे अवश्य लक्ष पुरवावें.

बा ह्य गो ल भिं गें:—दूरदर्शित्वाचा दोष ज्याच्या नेत्रांत उत्पन्न झाला असेल त्याला या प्रकारचीं भिंगें असलेला चष्मा वापरावा लागतो. दूरदर्शित्वाचा दोष ज्याच्या नेत्रांत येतो त्याच्या नेत्रांतील भिंगांच्या अंगचा फुगीरपणा कमी होऊन त्या जागीं बराच चपटेपणा उत्पन्न झालेला असतो. त्यामुळें डोळ्यांतील भिंगाचें केन्द्रान्तर बरेचसें वाढतें व त्यामुळें पदार्थांची प्रतिमा नेत्रान्तःपटल( रेटिना )वर नीट पडत नाहीं. तेव्हां पदार्थांची प्रतिमा पटलावर यावी एतदर्थ बाह्यगोलभिंगांचा उपयोग करितात.

ज्या वेळेस सुमारें आठ इंचांवरील पदार्थ स्पष्ट दिसेनासा होतो तेव्हां दूरदर्शित्वाचा दोष उत्पन्न झाला असें समजण्याची वहिवाट आहे. अशा प्रकारचा दृष्टिदोष बहुधा वयाच्या चाळिसाव्या वर्षापासून सुरू होतो. व या दोषापासून नेत्रांचा बचाव करण्याकरितां ज्या साधनाचा उपयोग करतात त्यास ' चाळिशी ' हा शब्द लावण्यास सुरुवात झाली. ज्या मनुष्याच्या पूर्ववयांत समीपदर्शित्वाचा दोष कांहीं प्रमाणांत असेल त्याच्या अंगीं दूरदर्शित्वाचा दोष फार उशिरानें उत्पन्न होतो. समीपदर्शिदोष असलेल्या मनुष्याची दृष्टि वृद्धपणांत सुधारूं लागते आणि ही दृष्टि सुधारत सुधारत सामान्य मनुष्याच्या दृष्टीप्रमाणें होते व नंतर कांहीं काळानें दूरदर्शित्वाचा दोष हळू हळू उत्पन्न होऊं लागतो. हा दूरदर्शित्वाचा दोष मनुष्याच्या ठिकाणीं फारच वाढल्यास त्याला जवळचेंच काय पण दूरचें पहाण्याकरितां कमी शक्तीचें भिंग लागूं लागतें. जसजसें मनुष्याचें वय वाढूं लागतें तसतसा हा दूरदर्शित्वाचा दोष वाढूं लागतो. यामुळें वरचेवर डोळे तपासून योग्य त्या शक्तीचें भिंग असलेला चष्मा वापरणें भाग पडतें.

न लि का का र भिं गें.—कित्येक मनुष्यांच्या डोळ्यांतील भिंगांत जो फुगीरपणा किंवा चपटेपणा उत्पन्न होतो तो सर्व दिशेनें सारखा असत नाहीं. त्यामुळें कित्येकांनां सृष्टींतील वस्तू चपटचा दिसूं लागतात तर कित्येकांनां त्याच वस्तू उभट व चिंचोळ्या दिसूं लागतात. असल्या प्रकारचे दृष्टिदोष सुधारण्याकरितां निराळयाच प्रकारचे चष्मे वापरतात. या प्रकारच्या चष्म्यांतील भिंगांचा आकार नलिकाकार असतो. अंतर्गोल किंवा बहिर्गोल भिंगांचा आकार भरीव वर्तुलच्छेदापासून उत्पन्न झालेला असतो. परंतु नलिकाकार भिंगांचा पृष्ठभाग नलिकांच्या आकाराचा असतो. त्यामुळें प्रकाशाचें विशिष्ट रीतीनें वक्रीभवन होऊन दृष्टींत असलेला वरील प्रकारचा दोष सुधारला जातो. कित्येक मनुष्यांच्या डोळ्यांत दूरदर्शित्वाचा किंवा समीपदर्शित्वाचा दोष असून त्याबरोबरच नलिकाकाराचे दोष असतात. असल्या प्रकारच्या मनुष्यकरितां " संयुक्त " भिंग तयार करितात. या प्रकारच्या दोषयुक्त दृष्टीच्या मनुष्यास योग्य त्या प्रकारचें आणि शक्तीचें भिंग तपासून देणें बरेंच कठिण आहे. परंतु खटपट करून योग्य तें भिंग शोधून काढणें श्रमसाध्य आहे. व योग्य तें भिंग शोधून काढल्यास श्रमाचें सार्थक्य होऊन दृष्टीस अत्यंत फायदा होतो.

**उपप्लव्य**—विराट नगरीसमीपचें स्थल. अज्ञातवासांतून पांडव प्रकट झाल्यावर त्या स्थलीं राहिले होते व कौरव सामानें राज्य देत नाहींत असें ठरल्यावर त्यांनीं येथेंच राहून युद्धाची सिद्धता केली. (भार. उद्योग. अ. ८. प्रा. को.)

**उपमन्यु**—धौम्यऋषीचा एक शिष्य. हा गुरुगृहीं गायी राखीत असे. हा प्रथम उदरनिर्वाहार्थ मधुकरी मागत असे. तें गुरूनें बंद केल्यावर दुग्धप्राशन, नंतर वासराच्या तोंडावरला फेंस, यावर निर्वाह करी पण तोहि गुरूनें निषिद्ध मानल्यावर उपमन्यु रुईचा चीक खाऊन राहूं लागल्यामुळें अंधळा बनून एके दिवशीं विहिरींत पडला. धौम्यऋषि त्याच्या भक्तीनें प्रसन्न झाले व त्याला दृष्टी येण्यास अश्विनीकुमारांची प्रार्थना करण्यास सांगितलें. तसें केल्यावर उपमन्यूला दृष्टि आली व दिव्य ज्ञान प्राप्त झालें [ म. भा. आदि ३ ]

( २ ) वसिष्ठ कुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक ऋषीचा पुत्र व धौम्यऋषीचा ज्येष्ठ भ्राता. याची आई यास पाण्यांत पीठ कालवून दूध म्हणून देत असे. एकदां यास खरें दूध मिळालें तेव्हां त्यानें आईजवळ तसेंच दूध मागितलें तिनें ईश्वरापाशीं मागावयास सांगितल्यावरून त्यानें ईश्वराराधन करून आकल्प आयुष्य व क्षीरसागराचें आधिपत्य, अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून यानें शिवसहस्रनाम रचिलें आहे. कृष्णानेंहि याजपासून शैव दीक्षा घेतली होती. (भार. अनुशा. अ. १४ व पुढें) हा तंडी ऋषीचा शिष्य झाला. याची कथा लिंगपुराण ( पू. १०७ ) व शिवपुराण (उमा संवाद) यांतहि आढळते.

**उपरवार**—मध्य हिंदुस्थान. माळवा एजन्सीमधील एक लहानसें संस्थान (ठाकुरात).

**उपरि**—खंडानें शेत घेऊन नांगरणाऱ्या शेतकऱ्यांस, मिरासदारांपासून ओळखण्याकरितां ग्रँटडफच्या वेळीं उपरि ही संज्ञा देऊं लागले होते. मिरासदाराचें शेत त्याच्या स्वतःच्या मालकीचें असे व तें दुसऱ्यास विकण्याचा त्याला हक्क होता. मिरासदार जोपर्यंत सरकारांत नियमितपणें सारा भरीत असे, तों पावेतो सरकारास त्याचें शेत त्याजकडून काढून घेतां येत नव्हतें. उपरी कुळांची मात्र तशी गोष्ट नव्हती असें दिसतें. ते मिरासदारांपासून किंवा सरकारांतून दरवर्षी खंडानें जमीन घेऊन नांगरीत असत. अर्थात् मिरासदार लोक, जो ज्यास्तींत ज्यास्ती खंड देण्यास कबूल होई त्यास आपली जमीन देत असले पाहिजे हें सांगावयास नकोच. [ग्रँड. पु. पहिलें पान २४]

**उपरिचर**—उत्तानपादकुलोत्पन्न एक राजर्षि. एकदां देवराज इंद्र, आणि महर्षि, यांच्यामध्यें असा वाद पडला कीं, यज्ञांत पशुहिंसा करणें हें विहित कीं अविहित ? त्यांत विहितत्वाविषयीं इंद्राचा पक्ष असून तद्विरुद्ध महर्षींचा होता. इतक्यांत हा तेथें साहजिक गेला तेव्हां यांचें मत विचारतां यानें इंद्राच्या बाजूनें मत दिलें म्हणून रागावून 'तूं अधोलोकीं पतन पावशील' असा शाप महर्षींनीं यास दिला (मत्स्य पुराण अ. १४२). यानें अनेक यज्ञ केले होतेसें दिसतें ( म. भा. शांतिपर्व अ. ३३६ ).

( २ )एक चेदिराज वसु. इंद्रकृपेनें हा अंतरिक्षांतून विमानांतून संचार करीत असल्यानें याला उपरिचर असें नांव पडलें. शुक्तिमती नदीची गिरिका नांवाची कन्या याची स्त्री झाली. याचें वीर्य अद्रिका नांवाच्या मत्स्यरूपी अप्सरेनें भक्षिल्यामुळें तिला मत्स्यराज व मत्स्यगंधा असें कन्यापुत्रांचें एक जुळें झालें. हीच मत्स्यगंधा पुढें सत्यवती नांवानें शंतनु राजाची पत्नी झाली. ( म. भा. आदिपर्व अ. ६३ )

**उपवेद**.—चार वेदांस अंगभूत असे चार उपवेद मानिले आहेत ते असेः-ऋग्वेदास आयुर्वेद, यजुर्वेदास धनुर्वेद, सामवेदास गांधर्ववेद व अथर्ववेदास अर्थशास्त्र. यांची माहिती वरील नांवाच्याच निरनिराळ्या स्वतंत्र लेखांत दिली आहे. गांधर्ववेदाची माहिती सामवेद व संगतिशास्त्र या विषयांत आढळेल.

**उपशून्य**—मध्यहिंदुस्थानांतील उद्यानाचा एक श्रमण. उपशून्य यानें इ.स.५३८तें५४०किंवा५४१पर्यंतच्या कालांत तीन बौद्ध ग्रंथांचें चिनी भाषेंत भाषांतर केलें. इ. स. ५४५त नंकिंगला जाऊन तेथें त्यानें दुसऱ्या एका ग्रंथाचें भाषांतर केलें.

**उपसाला**—स्वीडन. हें स्वीडनमधील शहर स्वीडनच्या आर्चबिशपचें राहण्याचें व विश्वविद्यालयाचें ठिकाण आहे. उपसाला जिल्ह्याचें हें मुख्य शहर नार्दर्न रेल्वेनें स्टॉकहोमपासून ४१ मैल उत्तरेस आहे. येथील लोकसंख्या १९१८ मध्यें २७८५९ होती.

येथील विश्वविद्यालय स्वीडनमध्यें सर्वांत जुनें व मुख्य असून त्याची स्थापना १४७७ त झाली. विश्वविद्यालयास एक ग्रंथसंग्रहालय जोडलें होतें. इसवी सन १७०७ पासून स्वीडनमध्यें जितके ग्रंथ छापले जातील त्यांची एक एक प्रत या ग्रंथसंग्रहालयास मिळावी असा हक्क या ग्रंथसंग्रहालयास मिळाला होता व येथील हस्तलिखित ग्रंथहि फार महत्त्वाचे व मौल्यवान आहेत. ग्रंथालयाखेरीज रसायन, पदार्थविज्ञान, व वैद्यक या शास्त्रांच्या शाखा, व उत्तरेंतील प्राचीन वस्तुसंग्रह याहि या विश्वविद्यालयांतील दुसऱ्या संस्था होत.

१७३० त स्थापन झालेली एक वेधशाला आहे. व्हिक्टोरिया पदार्थसंग्रहालयांत इजिप्तच्या प्राचीन वस्तूंचा संग्रह आहे. रॉयल सोसायटी ऑफ सायन्सेसची स्वतंत्र इमारत असून तींतील ग्रंथसंग्रहालय बहुमोल आहे. विश्वविद्यालयाचें उत्पन्न अजमासें २५हजार पौंड आहे व वार्षिक खर्च सुमारें ५६ हजार पौंड असून हा बहुतेक पार्लमेंटकडून मिळणाऱ्या देणगींतून भागतो. येथें एक जुनें प्रार्थनामंदिर आहे. शहराच्या उत्तरेस २ मैलांवर जुनें उपसाला शहर आहे त्याचा उल्लेख ९ व्या शतकापासून आहे. सर्व स्कॅन्डिनेव्हियांत हें शहर

येथील सुंदर पाखंडी देवालयामुळें प्रसिद्ध होतें व देशाचें केंद्र बनलें होतें. याच ठिकाणीं उपसालाच्या आर्चबिशप (धर्माधिकाऱ्यां)चें पहिले प्रार्थनामंदिर होतें (सन११००). परंतु आगीनें ही इमारत भस्म झाल्यामुळें अर्वाचीन उपसाला शहरांत १२७३ मध्यें आर्चबिशपची गादी नेली. त्यावेळीं या शहराला ओस्ट्रा आरोस म्हणत. पण लवकरच उपसाला म्हणूं लागले. मध्ययुगांत प्रार्थनामंदिर व आर्चबिशपची गादी यामुळें हें धार्मिक राजधानीचें शहर झालें. मोरा स्टोन्स ( उपसालाच्या आग्नेयीस १० मैल ) मध्यें राजाची निवडणूक झाली म्हणजे त्यास येथें राज्याभिषेक होत असे. १५९३ मध्यें स्वीडनमधील प्रॉटेस्टन्ट धर्माचा पूर्ण विजय झाला असें दर्शविणारी बिशपांची सभा भरली होती व याच वर्षी ९ व्या चार्लसनें विश्वविद्यालयाचा जीर्णोद्धार केला. १६५४ मध्यें गुस्टाव्हस अडोल्फस याच्या ख्रिस्टीना नांवाच्या मुलीनें येथील किल्ल्यांत दहाव्या चार्लसला आपली गादी अर्पण केली. १७०२ च्या आगींत येथील शहर, मंदिर व किल्ला यांची राखरांगोळी झाली येथील विश्वविद्यालयाच्या प्रोफेसरांत ज्यांची नांवें दूर देशांत देखील अजरामर झालीं आहेत असे कांहीं विद्वान प्रोफेसर म्हणजे थोरले ओलोफ रुडबेक 'अटलांटिका' (१६३०-१७०२)ग्रंथाचे लेखक. टोरबर्न बर्गमन (१७३७-१७८४) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ व एरिक गुस्टाफ गेजेर (१७८३-१८४७) इतिहासकार हे होत.

**उपांशु**—हळू अथवा मनांत पठण करणें याला उपांशु असें म्हणतात. यज्ञयागांत कांहीं देवतासंबंधीं याग उपांशु होत असतो. कदाचित या देवता विशेष श्रेष्ठ दर्जाच्या असाव्या. कदाचित इतर देवतांपेक्षां कमी दर्जाच्याहि असूं शकतील. कारण इष्टीमध्यें होता मुख्य यागानंतर सूक्तवाक नामक यागांत यजमानाच्या नक्षत्रनामाचा उच्चार करीत असतो. त्यावेळीं त्या यागामध्यें आर्त्विज्यासाठीं अगर दुसऱ्या कांहीं कारणानें यजमानाचा गुरु त्या ठिकाणीं असेल तर होत्यानें यजमानाच्या नांवाचा उच्चार उपांशु करावा असें आश्वलायन सूत्रांत सांगितलें आहे. ज्या अर्थी गुरु हा श्रेष्ठ असल्यामुळें त्याच्या सन्निध त्याच्या शिष्याच्या नामाचा उच्चार उपांशु केला जातो, त्या अर्थी ज्या देवतांसंबंधीं याग उपांशु केला जातो त्या इतर ( ज्यांच्यासंबंधीं उच्च स्वरांत याग केला जातो त्या ) देवतांपेक्षां कमी योग्यतेच्या असाव्या. उपांशुचें लक्षण आश्वलायन सूत्रांत (१.१) वृत्तिकारांनीं 'शनैरुच्चारयेन्मंत्रं मंदमोष्ठौ प्रचालयेत्। अपरैरश्रुतः किंचित् स उपांशु जपस्मृतः' ॥ म्हणजे हळूहळू ओंठ हलवून दुसऱ्याला ऐकू न जाईल असा शब्दोच्चार करणें' असें दिलें आहे.

**उपेनंगडी**.—मद्रास. दक्षिण कानडा जिल्ह्यांतील तालुका. याचें क्षेत्रफळ १२३९ चौ. मै. असून १९०१ सालीं लो. सं. १,८१,८४२ होती. पत्तूर हें पोट विभागाचें मुख्य स्थान असून खेड्यांची संख्या १८२ होती. काळीचें उत्पन्न १९०३-०४ सालीं २३१ हजार झालें होतें. तालुक्यांत जंगल पुष्कळ आहे. वेलदोड्याचें पीक चांगल्या प्रमाणांत असून पत्तूरच्या आसपास नदीकिनाऱ्याची जमीन सुपीक आहे. येथें हिंवताप फार असल्यामुळें पुष्कळ लोक म्हैसूर व कुर्ग प्रांतांत मजूरी करण्यास जातात. मुख्य पीक तांदुळाचें असून सुपारीच्या बागाहि वऱ्याच आहेत. नारळांचीं झाडें या ठिकाणीं चांगलीशी येत नाहींत. पूर्व सरहद्दीवर पश्चिम घांटाच्या कुद्रेमुख व सुब्रमण्य या दोन मुख्य टेंकड्या आहेत.

**उपेन्द्र परमार**—पद्मगुप्ताच्या नवसाहसांक काव्यांत याचें वर्णन आहे. हा परमार वंशातील राजा होता. याचा काल इ. स ८०० हा असावा. याच्या वेळीं याच्या दरबारांत सीता नांवाची एक कवयित्री होऊन गेली असावी· डॉ. हॉल व कनिंगहॅम हे उपेन्द्र व कृष्णराजा ( याचा नामनिर्देश वाक्पतिराज ( दुसरा ) याच्या शिलालेखांत आला आहे ). हे एकच असावेत असें समजतात. कारण दोघांचेंहि नांव एकार्थीच आहे. कदाचित् हा कृष्णराजा उपेन्द्रानंतर परंतु वाक्पतिराजापूर्वी झालेला एकादा राजा असावा. [ नवसाहसांक चरित्र, ज. बं. ए. सो. ३१. पृ. ११४ आर्कि. रिपो. १० पृ. ८४ टीप. ]

**उप्पर**.—यांची लोकसंख्या सुमारें एक लक्ष आहे. यांच्या पैकीं बरेचसे म्हैसूर संस्थानांत रहातात. त्रावणकोरमध्येंहि यांची थोडीशी वस्ती आहे. यांचा मूळचा धंदा मीठ काढण्याचा होता. पण आजकाल शेंकडा दोन माणसें देखील हा धंदा करीत नाहींत. त्यांचा हल्लींचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे शेतकी व मजुरी होय. कोलार, टुमकुर व बंगलोर जिल्ह्यांत हे लोक तेलगु भाषा बोलतात. व बाकीचे कानडी भाषा बोलतात. तामिळ प्रदेशांत रहाणाऱ्या या लोकांस उप्पलिगर म्हणतात व ते तामिळ भाषा बोलतात. यांपैकीं कांहीं तेलगु व कांहीं कानडी आहेत, पण त्यांत परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं. कांहींजण आपल्या धंद्यावरून स्वतःस गरेउप्पर, सुन्नाउप्पर, कल्लुकुटिगउप्पर, मोलेउप्पर, डोंबरउप्पर वगैरे नांवें घेतात. ज्यामध्यें परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं अशा समुच्चयास कूल अथवा बेडगु म्हणतात. यांचीं नांवें ज्या झाडांवरून किंवा प्राण्यावरून पडलेलीं असतात तें झाड कापण्याची अगर तो प्राणी मारण्याची यांस बंदी असते. यौवनावस्थेंत येण्यापूर्वी मुलीचा विवाह केलाच पाहिजे असा नियम नाहीं. मुलीबद्दल द्यावयाचें शुल्क बारा रुपयांपासून तीस रुपयांपर्यंत असतें. विधवाविवाहास व घटस्फोटास मोकळीक आहे. हे लोक श्राद्धें करीत नाहींत. मात्र ते भाद्रपदी अमावास्येच्या दिवशीं कलशाची पूजा करतात व तांदूळ व इतर पदार्थ पूर्वजांच्या नांवानें ब्राह्मण, जंगम व सतानी लोकांस देतात. हे लोक वैष्णव असून चेन्नाकेशव ही त्यांची कुलदेवता आहे. तिरुपति, कादरी, नंजनगुड वगैरे ठिकाणीं ते यात्रेस जातात. येलम्मा, दुर्गम्मा वगैरे देवतांचेंहि ते

पूजन करतात ब्रिटिश सरहद्दीपासून पांच मैल पर्यंत मीठ काढण्याची बंदी असल्यामुळें व समुद्रापासून काढलेलें मीठ स्वस्त असल्यामुळें मीठ काढण्याचा यांचा धंदा जवळ जवळ नामशेष होत चालला आहे. यामुळें हे लोक आजकाल शेती करूं लागले आहेत. शहरांत रहाणारे लोक गवंड्याचीं वगैरे कामें करतात. दक्षिण हिंदुस्थानांत कांहीं ठिकाणीं शेतकरी, व्यापारी, कारागीर वगैरे जातीचे मुख्य दोन वर्ग करतात त्यांस १८ फण व ९ फण अशीं नांवें आहेत. त्यापैकीं ही जात १८ फण वर्गांतील आहे.

**उप्माक.**—मद्रास. विजगापट्टम जिल्हा. सर्वसिद्धी तालुक्यांतील एक गांव. या गांवीं एक मोठें देऊळ असून आंत मूर्ति वगैरे कांहीं एक नाहीं. फक्त विष्णूचा शंख वगैरे आकृति: एका दगडावर कोरलेल्या आढळतात. मार्च महिन्यांत या ठिकाणीं मोठा मेळा भरतो. १९०१ सालीं येथील लो. सं. ५५३६ इतकी असून ३ हजार फक्त यात्रेकरू होते.

**उप्राई.**—मध्यप्रांत. जिल्हा. उमरावती. तालुका दर्यापूर घरें १३८ व लोकसंख्या ५७२. शाह दावल याच्या शाखेचें हें मुख्य ठिकाण असून त्याचें थडगें याच उप्राई गांवांत आहे.

**उप्लेटा.**—मुंबई, काठेवाड, गोंडल संस्थानांतील एक शहर. हें जुनागडच्या ईशान्येस १९ मैलांवर मोज नदीच्या पश्चिम किनाऱ्यांवर वसलें आहे. लोकसंख्या १९११ सालीं १०१८५ होती. गोंडल संस्थानांत गोंडल, धोराजी यांच्या खालोखाल संपन्न असें उप्लेटा हें शहर आहे. या ठिकाणीं एक दरबार राजवाडा असून धोराजीला जाणारी एक पक्की सडक आहे. हें भावनगर-गोंडल—जुनागड—पोरबंदर—रेल्वेचें स्टेशन आहे.

ऐनी—अकबरींत सोरठ सरकारचा एक परगणा म्हणून उप्लेटाचा उल्लेख आहे. मिरत—इ—अहमदींत या परगण्यांत ५३ गांवें असल्याचें लिहिलें आहे. शेरखान बाबी स्वतंत्र झाल्यावर उप्लेटा जुनागडच्या हद्दींतला एक तालुका म्हणून गणला जात असे. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत हा गोंडल राजाकडे गेला. [ मुं. गॅ. ८. इं. गॅ. २४ ].

**उंबर, नां वें.**—सं. = उदुंवर. गुज. = उंबरो. हिं. = उदुंबर, गुलर. बं. = यज्ञडुमुर. राज. पु. = उमरो. क. = अति. तैलं. = अह्निमाजु. तामिळ = अतिमार.फार. = अंजीरे,आदम. इं. = फिग ट्री. लॅटिन. = फिकस ग्लोमिराटा.

काश्मीरच्या पूर्वेकडील हिमालयाचा भाग, आसाम, बंगाल,ब्रह्मदेश दक्षिण व पश्चिम हिंदुस्थान आणि सिंहलद्वीप या प्रदेशांत हें झाड दृष्टीस पडतें. याचीं फळें अंजिरासारखीं असतात. तीं कच्चीं व पिकलीं दोन्हीहि खातात. दुष्काळांत तर त्यांचा फार उपयोग होतो. पानें हत्ती व गुरें यांना चारा म्हणून उपयोगी पडतात. लांकूड टिकाऊ नसतें तरी, त्याचीं दारें, गाडीचीं आडवीं दांडकीं वगैरे ओबडधोबड जिनसांकरितां उपयोग करितात. स्वयंपाक वगैरे करण्याच्या कामीं याच्या लांकडांचा सर्पणाकडे उपयोग करीत नाहींत. हा यज्ञिय वृक्ष असून याच्या समिधांचा ( काटक्यांचा )श्रौत व स्मार्त कर्मांत उपयोग करितात. व लांकडाची यज्ञिय उपकरणेंहि करितात.(ज्ञानकोश वि. तीन पूर्वार्ध पृ. २३२ पहा.)

उंबराची साल,पानें व कच्चें फळ ह्यांच्या अंगीं स्तंभक धर्म असल्यामुळें त्यांचा आमांशादि रोगांत पोटांत देण्याच्या कामीं व बाह्योपचाराच्या कामींहि उपयोग करितात. तोंडांत अथवा जिभेस गरे पडले असतां फळें पोटांत देतात. उंबर दुधांत शिजवून दिले असतां पोटांतील इंद्रियांच्या मार्गांत कांहीं अडथळा असल्यास तो दूर होतो. उंबराच्या फळांचा मधुमेहांत चांगला उपयोग होतो. पाण्यांत फळें व पानें शिजवून त्या पाण्यानें स्नान करीत राहिल्यास महारोग दूर होतो असें म्हणतात. सालीच्या अंगीं रेतस्तंभक धर्म असून तिळाच्या तेलांत तिची वस्त्रगाळ पूड मिसळून दुष्ट व्रणावर लावितात. मधुमेहांत सालीचा काढा घ्यावा.कोवळ्या पानांची पूड करून मधाच्या अनुपानांत पित्तविकारावर देतात. उंबराच्या मुळीस फांसण्या टाकून त्यांतून निघणारा पातळ पदार्थ अथवा उंबराचें पाणी पौष्टिक म्हणून पोटांत देतात.

उंबराच्या झाडाखालीं किंवा जवळच पाणी लागतें असें म्हणतात. उंबराखालीं दत्ताचें वास्तव्य असतें असा समज असल्यानें त्याची पूजा करण्यांत येते. व झाड तोडणें हेंहि गर्ह्य मानलें जातें. इतर झाडांप्रमाणें उंबराला प्रथम फूल व नंतर फळ असा प्रकार होत नसून एकदम आपणांला फळच दृष्टीस पडतें. तेव्हां सशाच्या शिंगाप्रमाणें तें अशक्य व दुर्लभ असा समज होऊन 'उंबराचें फूल' ( दुर्मिळ वस्तु ) ही म्हण पडली आहे.

[ पदे. भिषग्विलास पु, २१ वाट. दत्त—मटी. मेडि, हिंदु १९०० बोटॅनि. सर्व्हे इंडिया २, ३ ].

**उम्बेक**—हा मीमांसाचार्य होता. यानें कुमारिलकृत मीमांसावार्तिक यावर एक टीका लिहिली. हा सातव्या शतकाच्या उत्तरार्धांत होता. हा आणि भवभूति एकच होत असें कांहीं समजतात.

**उबेरो**—मुंबई. सिंध. सक्कर जिल्ह्यांतील तालुका. याचें क्षेत्रफळ ४६६ चौ. मै. असून लो. सं, १९०१ सालीं ४३०९८ होती. तालुक्यांत ७९ खेडीं असून तालुक्याचें ठाणें उबेरो येथें असतें. काळीचें व इतर बाबी मिळून उत्पन्न २ लक्ष आहे. पाण्याचा पुरवठा माहीवा नदीपासून अनिश्चित प्रकारचा असल्यामुळें शेतकऱ्यांची स्थिति चांगली नाहीं. तालुक्यांत जहागीर जमीनी पुष्कळ आहेत.

**उंब्रज.**—हें खेडेगांव पुणें—बेळगांव रस्त्यावर असून कऱ्हाडच्या वायव्येस १० मैल व साताऱ्याच्या आग्नेयस चार मैल अंतरावर आहे. येथील लोकसंख्या सुमारें

३००० आहे. याच्या जवळ कृष्णा, तारळी व मांड या नद्यांचा संगम होतो. मांड नदी जेथें मिळते तेथून पाटणांतल्या मल्हारपेठेंतून चिपळूणाकडे जाण्यास रस्ता आहे याच्या पूर्वेकडील कच्च्या रस्त्यावरून थोडा व्यापार चालतो. येथें या जिल्ह्यांतील एक अती जुनी व मोठी सावकारपेढी आहे. येथील बाजार रस्ता मोठा व प्रशस्त आहे. येथून मिरच्या, भुईमूग व तांदूळ सांगली, मिरज व चिपळूणास जातात व चिपळूणाहून मीठ, खजूर आणि किराणा माल येथें येतो. पाल व तारळयाहून लुगडीं व खण येतात. येथें एक मराठी शाळा, एक पोष्ट ऑफीस आणि इंजिनीयर खात्याचा एक बंगला आहे.

**उमत्तूर.**—म्हैसूर. म्हैसूर जिल्ह्यांतील चामराजनगर तालुक्यांतलें एक गांव. नंजनगड रेल्वे स्टेशनपासून १५ मैल आहे. १९०१ सालीं लो. सं. २०८१ होती. दक्षिण म्हैसुरांत उमत्तूरचें संस्थान बलिष्ठ संस्थानांपैकीं एक होतें. शिवसमुद्रम् बेटावर त्यांनीं एक किल्ला बांधला होता. निलगिरीचा कांहीं भाग त्याच्या सत्तेखालीं होता.१६ व्या शतकाच्या आरंभीं गंगराजानीं स्वतंत्र होऊन बंगलुर जिल्हा व त्याच्या आसपासचा प्रदेश संपादन करून पेन्नुकोंडावरहि ते हक्क सांगूं लागले. १५१० त विजयानगरच्या कृष्णरायानें त्याचा पाडाव केला. म्हैसूरच्या घराण्याचे पूर्वीचे प्रतिस्पर्धी अमत्तूरचे राजे असत. शेवटीं १६१० त म्हैसूरच्या राजांनीं तें घेऊन १६१३ त अमत्तूरहि काबीज करून म्हैसूरला जोडिलें. आतां चामराजनगर येथें चामराजेश्वराचें मंदिर आहे त्याजकडे देणगीरूपानें आहे.

**उमरकोट,** ता लु का—मुंबई. सिंध. थर आणि पारकर जिल्ह्यांतलि एक तालुका. क्षेत्रफळ १४६१ चौ. मै. असून लो. सं. ( १९०१ ) ४९११८ होती. तालुक्यांत खेड्यांची संख्या ११० असून मुख्य शहर उमरकोट हेंच होय. मुख्य पीक बाजरीचें असून काळीचें उत्पन्न १९०३–४ सालीं १.६ होतें.

**गांव.**—मुंबई. सिंध. थर आणि पारकर जिल्ह्याची मुख्य जागा १९०१ सालीं लो. सं. ४९२४ होती- नार्थवेस्टर्न रेल्वेवर कोर नांवाचें स्टेशन आहे. तेथून उमरकोट ७ मैल लांब आहे. या ठिकाणीं एक मोठा किल्ला असून. यावर ४०० शिंबदी राहूं शकते. सुमारें ७००वर्षांपूर्वी तो बांधलेला असावा असा अंदाज आहे. सांप्रत सरकारी आफीसें किल्ल्यांत असून गांवांतील लोकांचा मुख्य धंदा शेतकी व गुरांची जोपासना हा आहे. हिंदू लोकांचें लक्ष्य व्यापाराकडे असल्यामुळें बरेच हिंदू श्रीमंत आहेत. स्थानिक व्यापार धान्यें, तूप, उंट, गुरें आणि तंबाखु यांचा चालतो. कापसाचा जाड कपडा विणून तयार करितात. उमर नांवाच्या एका पठाणानें हें शहर वसविलें म्हणून यास उमरकोट हें नांव पडलें असें सांगतात. सन १५४२ त अकबर येथें जन्मला. अकबराची जन्मभूमि म्हणून एक शिला असून तिजवर लेख आहे ती दाखवितात. अकबर बादशहा झाल्यावर त्यानें रजपुतांपासून उमरकोट घेतलें. नंतर १८४३ सालीं तें इंग्रजांकडे आलें. उमरकोट हून ३ मैलांवर एक महादेवाचें देऊळ असून हिंदु लोक दर्शनार्थ पुष्कळ येतात. १८६० त म्यु. कमिटी स्थापन झाली. १९०३—४ सालीं उत्पन्न १४ हजार होतें. एकदवाखाना, दोन प्राथमिक शाळा असून तिला एक सुतार व लोहार वर्ग जोडलेला आहे.

**उमर खय्याम.**—फारसी ज्योतिषी व कवि. हा निशापूरचा रहिवाशी होता. याच्यासंबंधीं बऱ्याच दंतकथा ऐकिवांत आहेत, पण त्याचें खरेंखुरें चरित्र अद्याप अज्ञात आहे. इ. स. १८९७ पासून कांहीं विश्वसनीय पुरावे पुढें आलेले आहेत यांत शंका नाहीं. खय्याम किंवा खय्यामी हें आडनांव आहे, पण त्यावरून उमर किंवा त्याचा बाप तंबू तयार करणारा होता असें म्हणतां येणार नाहीं. उमरचा जन्म व मृत्युकाल अनिश्चित आहे. तो बहुधां इ. स. १०२५-५० यामधील कालांत जन्मला असावा. त्याचा समकालीन निझामी अरूदी याचा पुरावा लक्षांत घेतां, उमर ११११ आणि ११३५ याच्या दरम्यान वारला असावा असें दिसून येईल. वाङ्मय, सृष्टिशास्त्र, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान आणि वैद्यक या विषयांचें उमरला शिक्षण मिळालें होतें. त्यानें बरेच ग्रंथ लिहिले असें म्हणतात. आपल्याला भूमिति व बीजगणित यांवरचे त्याचे ग्रंथ उपलब्ध आहेत. तो ज्योतिषाचा धंदा करी. जलाली शक सुरू करण्यांत त्याचें प्रमुख अंग होतें. सुलतान मलिकशहा वारल्यानंतर ( इ. स. १०९२ ) उमरनें निशापूर सोडलें.

उमरची जी प्रसिद्धि आहे ती त्याच्या काव्यरचनेमुळें. 'रुबाईय्यात' नांवाचे त्यानें बरेच फारसी श्लोक लिहिले. आज जे रुबाई त्याचे म्हणून मानले जातात त्यांपैकीं बरेचसे दुसऱ्या कोणाचे तरी असून ते त्याच्या नांवावर दडपून दिलेले आहेत. बोड्लियन लायब्ररींतील इ. स. १४६१ च्या हस्तलिखितांत फक्त १५८ रुबाई आहेत. तेव्हां उमरच्या म्हणून गणल्या जाणाऱ्या रुबाईवरून त्याचा खरा स्वभाव आपणांस कळणार नाहीं. १३ व्या शतकांतील दोन फारसी ग्रंथकार आपण आधाराला घेतल्यास कांहीं थोडासा प्रकाश पडणार आहे. इब्नुल किफ्ती म्हणतो कीं उमरनें आपला धर्मलंडपणा लपविण्याचा प्रयत्न केला व आपलें खरें मत पुढें मांडण्याला कचरला. त्याच्या काव्यासंबंधीं इब्नुल किफ्तीचा शेरा असा पडतो कीं, उमरचें काव्य बहुतेकांच्या आवडीचें झालें असून, त्याचें अंतरंग परीक्षण करणाऱ्यांस तें अधार्मिक स्वरूपाचें आढळून येई. तथापि कधीं कधीं त्याचा आशय सुफींच्या शिकवणीस अनुसरून असे. नज्मुद्दीन दाय ( इ. स. १२५६ ) हा ग्रंथकार उमरला नास्तिक, भौतिकवादी म्हणून शिव्या देतो. पण श्रद्धालु सुफी तत्त्वज्ञान्यांचा उमरसारख्या शास्त्रज्ञांवर हा आरोप नेहमीं असणारच. उमरच्या म्हणून ज्या रुबाई निश्चित झाल्या आहेत

त्यांत सुखप्रयोजनता विवेचिली आहे; अपवित्र चर्चेचा निषेध केला आहे; जुन्या लोकांवर हल्ले चढविले आहेत; दैवदुर्विलासाबद्दल शोक दाखविला आहे; सांसारिक आपत्ती व अत्युच्च बुद्धि यांतील विरोध, मनुष्यप्राण्याचें क्षुद्रत्व, दैवी कृपेची आशा व जीमध्यें दुसऱ्याचें चांगलें करण्याचें कर्तव्य येतें अशी एक नीति यांसारख्या विषयांवर त्याचे विचार प्रथित केलेले आहेत. तथापि सुफींचा गूढवाद त्यांत सांपडणार नाहीं. समाजांतील दुःखीकष्टी लोकांकरितां तळमळ व अज्ञानी आणि ढोंगी भिक्षुकांबद्दल अनादर या गोष्टींमुळेंच उमर खय्यामला इराणचा किंवा पौरस्त्य व्हाल्टेअर म्हणतात; पण उमरचा रंगेलपणा या फ्रेंच तत्त्वज्ञानांत नव्हता. तात्त्विक विचारांत व काव्यकल्पनेंत सध्यां जो निराशावाद दिसतो तो उमरच्या रुबाईमध्येंहि आढळतो. [ रेनॉल्ड निकलसनचा ए. रि. ए. मधील 'उमर अलखय्याम'वरचा लेख; ब्रौनें—ए लिटररी हिस्टरी ऑफ पर्शिया. ए. ब्रि बील. ]

**उमरखान** (१८६०-१९०३).—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील जांडोलचा हा पठाण संस्थानिक १८९५ मधील चित्रळवरच्या मोहिमेस कारणीभूत झाला होता. जांडोलच्या खानाचा हा धाकटा मुलगा. पण यानें आपल्या थोरल्या भावाला मारून राज्य बळकाविलें व सरहद्दीवर प्रबल होऊन राहिला. १८९४ मध्यें सबंध बाजौरवर त्याची सत्ता होती. तो महत्त्वाकांक्षी असल्यानें चित्रळच्या अंतस्थ कलहांत पडला, तेव्हां हिंदुस्थान सरकारला मध्यें पडून उमरखानला चित्रळहून हांकून देणें भाग पडलें. चित्रळची मोहीम या कारणाकरितांच निघाली होती. उमरखान अफगाणिस्तानांत जाऊन राहिला व त्या ठिकाणीं १९०३ मध्यें वारला.

**उमरखेड**—मध्यप्रांत. जिल्हा यवतमाळ, तालुका पुसद. पुसदगांवाहून रस्त्यानें ४३ मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या १९०१ मध्यें ४५७० होती. येथें दवाखाना, पोलिसकचेरी आणि एक सरकी काढण्याचा कारखाना आहे. हें पूर्वी परगण्याचें ठिकाण असून साधारण महत्त्वाचें होतें. सन १७५० च्या सुमारास हें ठिकाण पेशव्यांकडे आलें, आणि १८१८ सालीं पुण्यास पराजय झाल्यानंतर पूर्वेकडे जात असतांना, पेशव्यांनीं या ठिकाणीं मुक्काम केला होता. साधूमहाराज नांवाचे कोणी ब्राह्मण होऊन गेले. त्यांना ज्या ठिकाणीं अग्नि दिला त्या ठिकाणीं एक लहानसें देवालय आहे. इ. स. १८७० सालीं गोमुखस्वामी नांवाच्या एका साधुपुरुषानें हें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. याला सर्व लोक गोचर स्वामी म्हणत व तो आपणांस कोणी चिंतामण भट यांचा शिष्य म्हणवीत असे. हा भिक्षा मागून दानधर्म व अन्नसंतर्पण करीत असे.

उमरखेड येथें साधुपुरुषांना पुष्कळ इनाम जमिनी दिलेल्या आहेत. जवळच असलेल्या अंबोना तलावाचा एका काळीं बागाईतीकरतां उपयोग करीत असत. परंतु हल्लीं तसें कोणी करीत नाहीं.

**उमरबिन खत्तब**—महंमदाचा एक जिवलग स्नेही व सासरा. हा अबूबकर सादिकनंतर दुसरा खलीफ झाला. यानें सिरिया आणि फिनिशिया जिंकून मोठ्या निकराची लढाई देऊन इ. स. ६३७ मध्यें यरुशलेम घेतलें. त्याच्या सेनापतीनें ईराण आणि ईजिप्त पादाक्रांत करून महंमदाचे अनुयायी वाढविले. याच्या सैन्यानें अलेक्झांड्रिया काबीज केल्यानंतर जो तेथील सुप्रसिद्ध ग्रंथसंग्रहालयाचा नाश केला त्याची भरपाई म्हणूनच कीं काय त्यांनें नाइल नदी आणि तांबडा समुद्र यांच्या मधला कालवा चालू केला. याच्या कारकीर्दींत मुसुलमानांनीं ३६ हजार शहरें जिंकून घेतलीं; चार हजार ख्रिस्ती देवळें उध्वस्त केलीं; आणि १४०० मशिदी बांधल्या. त्यालाच प्रथम अमीर-उल मोमीनीन ही खलिफांना असलेली पदवी मिळाली. त्यानें सात लग्नें केलीं. त्याची एक बायको अलीची मुलगी उम्म कुल्सूम ही होती. इ. स. ६४४ त एका इराणी गुलामानें तो सकाळचा नमाज पढत असतां त्याचा खून केला. त्याच्या मागून आफानचा मुलगा उस्मान हा खलीफ झाला. [बीलचा कोश ].

**उमरावती** ( जिल्हा )—वऱ्हाडांतील एक जिल्हा. उत्तर अ. २०° २५' ते २१° ३७' व पूर्व रे. ७७° १६' ते ७८° २९' यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ ४७५४ चौरस मैल. उत्तरेस मध्यप्रांतांतील बैतुल जिल्हा; पूर्वेस वर्धा नदी; दक्षिणेस यवतमाळ, दारव्हा आणि मंगरूळ तालुके; पश्चिमेस अकोला.

प्रदेश सपाट असून समुद्रसपाटीपासून सुमारें ८०० फूट उंचीवर आहे. गाविलगड डोंगरांत उगम पावलेली पूर्णा नदी या जिल्ह्यांतून वाहते. वन्य प्राणी फार कमी आहेत. वाघ क्वचितच दिसतो. येथें उन्हाळा फार भासतो. पावसाची सरासरी २९ इंच आहे.

इतिहास.—या जिल्ह्याचा स्वतंत्र असा इतिहास नाहीं. इ. स. १८५३ त वऱ्हाड निजामानें ब्रिटिशांकडे लावून दिल्यावर त्याचे पूर्व वऱ्हाड व पश्चिम वऱ्हाड असे दोन भाग करण्यांत आले. पूर्व वऱ्हाडाचें मुख्य ठिकाण उमरावती असून त्यांत उमरावती, इलिचपुर आणि वणी हे जिल्हे होते. इ. स. १८६४ सालीं वणी जिल्हा उमरावतीपासून निराळा करण्यांत आला. इ. स. १८६७ मध्यें इलिचपुर जिल्ह्यांतील मोरशी तालुका उमरावतींत घालण्यांत आला.

यांत शहरें २० व खेडीं १६२ ७क्षेत्रफळ ४७३३ व लोकसंख्या ( १९२१ ) ८२८३८४. या जिल्ह्याचे सध्यांचे तालुके उमरावती, मोरशी, चांदूर, एलिचपूर, दर्यापूर आणि मेलघाट असे आहेत. मुख्य पिकें ज्वारी व कापूस. या जिल्ह्यांत जंगल फारसें नाहीं. या जिल्ह्यांत सरकी काढण्याचे कारखाने पुष्कळ आहेत. इ. स. १९०३-४ सालीं जमीनमहसूल २१ लाख रुपये होता. इ. स. १९०५ सालीं वऱ्हाडांतील जिल्ह्यांच्या सरहद्दी बदलण्यांत आल्या. त्यावेळीं इलिचपुर

जिल्हा अजीबात कमी करून तो उमरावती जिल्ह्यांत घालण्यांत आला व मूर्तिजापुर तालुका अकोला जिल्ह्याकडे देण्यांत आला.

ता लु का.—वऱ्हाडांतील उमरावती जिल्ह्याचा एक तालुका. उ. अक्षांश २०° ४१' ते २१° १२' व पू. रे. ७७° ३२' ते ७८° २'. क्षेत्रफळ ६७२ चौरस मैल. लोकसंख्या ( १९०१ ) १५४९०२. या तालुक्यांत ४ गांवें व २६४ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४साली जमीनमहसूल ६२१ हजार रुपये व करांबद्दल ४९ हजार रुपये उत्पन्न होतें. वऱ्हाडच्या सुपीक खोऱ्यांत हा प्रदेश वसलेला आहे

गां व.—वऱ्हाड. उमरावती जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. समुद्रसपाटीपासून हें ११९८ फूट आहे. उ. अ. २०° ५६' व पू रे. ७७° ४७'. पूर्वी दक्षिण हैद्राबादचा रेसिडेंट याचा कारभार पहात असे. येथून हैद्राबाद दक्षिणेकडे २५० मैल आहे. उमरावती जी. आय. पी. रेल्वेच्या मुख्य मार्गावर नाहीं. पण बडनेराहून उमरावतीस एक ६ मैलांचा फांटा गेलेला आहे. या शहरानें तारखेड, राजापेठ, गांभ्रीपूर व महाजनपूर या खेडेगांवाचे कांहीं भाग व्यापलेले आहेत. क्षेत्रफळ ३६१ एकर ३८ गुंठे. लोकसंख्या ( १९११ ) ३४२७०.

उमरावतीस पुष्कळ हिंदूंचीं व दोन जैनांचीं देवालयें आहेत. कांहीं मशिदीहि आहेत. वडे नालसाहेबाच्या मशिदीला अजून इनाम आहे. सर्वांत महत्त्वाचें देऊळ अंबादेवीचें व बालाजीचें हीं होत. बालाजीचें देऊळ व यात्रेकरूंचा मठ यांचा खर्च याच तालुक्यांतील जामगांव नांवाच्या इनामी खेडेगांवाच्या उत्पन्नांतून चालतो. उमरावतींत अंबेचें देवालय सर्वांत जुनें आहे असें म्हणतात. याच देवळांत आपला भाऊ रुक्मी याबरोबर रुक्मिणी दर्शनास आली असतांना तिची व कृष्णाची भेट झाली. हा समारंभ पहाण्यास बरेच वऱ्हाडी अथवा वरहारी आले होते. हे लोक येथें स्थाईक झाल्यावर या प्रदेशाला त्यांनीं वरहार असें नांव दिलें. त्याचेंच पुढें वऱ्हाड झालें असें सांगतात. रुक्मी व कृष्ण यांची पुढें लढाई झाली. तींत रुक्मीचा पराजय झाला. तेव्हां तो तेथूनच पश्चिमेकडे १४ मैलांवर असलेल्या भातकुली गांवीं राहिला. याचें स्मरण म्हणून तेथें एक त्याच्या नांवाचें देऊळ आहे. या शहराशीं कृष्णाचा संबंध असल्यामुळें त्या गांवास अमरावती असें नांव पडलें आहे व उमरावती हा त्या शब्दाचा अपभ्रंश आहे, असा कित्येकांचा समज आहे. परंतु या शहराचें नांव अमरावती नसून उमरावती आहे व तें उदुंबरावतीचा अपभ्रंश आहे असें राजवाडे म्हणतात ( भा. इं सं. मं. १८१२ पृ. ५८ ). आश्विन शुद्ध ८, ९, व १० या दिवशीं येथें मोठी जत्रा भरते. देवस्थानाचें वार्षिक उत्पन्न (लोकांकडून देवापुढें ठेवण्यांत आलेलें व व्यापारी लोकांनीं फंड म्हणून जमा केलेलें ६०००रु.) आहे. यांतून सदावर्तें व दुसरीं परोपकाराचीं कामें चालतात. देवस्थानाची व्यवस्था येथील पेढीवाले व वजनदार गृहस्थांच्या कमेटीमार्फत चालते. हें देऊळ सोडून दिल्यास उमरावती गांव अगदीं अलीकडेच वसविलेलें आहे. उमरावती रघूजी भोंसला यानें वसविली असें म्हणतात.

अकोल्याच्या तालुकदारानें अठराव्या शतकाच्या अखेरीस लोकांवर फार जुलूम केला. त्यामुळें तेथील लोक उमरावतीस रहावयास गेले व त्यामुळें उमरावतीची भरभराट झाली. त्यामुळें येथें नागपूर व हैद्राबाद येथील राजांची सत्ता होती. नागपूरकर येथील उत्पन्नापैकीं शेंकडा ६० व हैद्राबादकर शेंकडा ४० घेत असत व दोघेहि लोकांवर जुलूम करीत. या वेळच्या दोन गोष्टी अजून पाहण्यास मिळतात. एक राजा विसनचंद याची हवेली. हींत प्रेक्षणीय कोरींव काम आहे. शिवाय दुसरी गांवासभोंवतीं असलेली भिंत. ही भिंत पेंढाऱ्यांचा उपद्रव होऊं नये म्हणून इ स. १८०४ सालीं निजामनें बांधण्यास सुरुवात केली. ती पुरी होण्यास १७ वर्षें लागलीं व चार लाख रुपये खर्च लागला. भिंतीचा घेर सवादोन मैल असून उंची २० पासून २६ फूट आहे. ही इतकी भक्कम आहे कीं, ती अजून नवीनच आहे असें दिसतें. या भिंतीस पांच मोठे दरवाजे आहेत(अंबा, सुसारी, नागपूर, खोलापूर, महाजन वेस ) आणि चार लहान दरवाजे आहेत. त्यांनां खिडक्या म्हणतात त्या( खुनारी, छत्रपुरी, माता आणि पटेलची खिडकी ). इ. स. १८१६ सालीं झालेल्या मोहरमच्या दंग्यांत जी खून मारामारी झाली तीवरून एकीस खुनारी असें नांव पडलें. या दंग्यांत ७०० माणसें मेलीं असें म्हणतात. वर दिलेल्या दरवाजांखेरीज आणखी दोन नवीन मार्ग अलीकडे पडले आहेत.

रस्ते अतिशय अरुंद असून नागमोडीचे आहेत. सांडपाणी जाण्याची सोय चांगली नाहीं. बाजाराचे दिवस रविवार आणि बुधवार. हा बाजार भिंतीच्या बाहेरच भरतो. नमुना म्हणून गांवाचा एक चांगला भाग आहे. या भागांत सरकारी कचेऱ्या, वकील व गांवांतील मोठमोठे लोक राहतात याच भागांत निकोलेट पार्क व जोगांचा चौक ह्या खुल्या जागा आहेत. याच्या आसपास हमालपुरा, मसनगंज, रतनगंज इत्यादि आहेत. यांत गरीब लोकांची वस्ती आहे. इ. स. १८६९ सालीं येथें म्युनिसिपालिटी आली.

वार्षिक उत्पन्न ( सरासरी ) रुपये ६४४०८. वार्षिक खर्च (सरासरी) ६४७१६ रुपये. घंटाघर, मुलांची शाळा नं. ३ व म्युनिसिपालिटीचा एक हॉल इतक्या चांगल्या इमारती म्युनिसिपालिटीच्या आहेत. प्रवाशांकरिता एक सराई बांधलेली आहे. इतर सरकारी इमारतीहि आहेत.

कापसांतील सरकी काढण्याचे कारखाने व तो दाबण्याचे कारखाने ५० वर आहेत. पहिला कारखाना इ. स. १८७२ सालीं निघाला. येथें एक दोन तेल काढण्याचे कारखाने

आहेत. त्यांत एक रामजी कान्नव आणि कंपनीचा आहे. उमरावती हें वऱ्हाडांतील कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. हंगामांत सरासरी एक लाखपर्यंत कापसाच्या गाड्या येतात.

येथें उर्दु वर्तमानपत्रें व शाळा आहेत. मराठी भाषेंत कर्तव्य व उदय ही पत्रें प्रमुख होत. तीन इस्पितळें व तीन ख्रिस्ती सांप्रदायिक संस्था आहेत.

हिंदु—मुसुलमान व मुली यांकरितां निराळीं हायस्कुलें आहेत. दोन मराठी व उर्दू शिक्षक तयार करण्याच्या शाळाहि दिसतात. एक म्युनिसिपालिटीचें स्कूल, एक खासगी हायस्कूल व कॉलेज यांची भरती नवीन झाली आहे. हायस्कुलें व कॉलेजें नागपूर युनिव्हर्सिटीस जोडण्यांत आलीं आहेत.

कँ प—उमरावतीच्या पूर्वेस थोडी उंचवटयाची जागा आहे त्या ठिकाणीं हा कँप आहे.समुद्रसपाटीपासून हें ठिकाण १२८३ फूट उंच आहे. क्षेत्रफळ १२ चौरस मैल. या कँपची जागा फार चांगली असून हवा कोरडी आहे. मृत्युसंख्येचे प्रमाण फारच कमी आहे. म्युनिसिपालिटी १८८९त स्थापना झाली.१९०७–०८, मध्यें उत्पन्न १७७२६, खर्च १२८६२.

पाणीपुरवठाः—या सर्व भागांत विहिरींचें पाणी मुबलक असून, सरकारी कचेऱ्यांनां वडाळी तलावाचें पाणी आणलें आहे.

येथें 'मालटेकडी' नांवाची एक टेंकडी असून तेथें पेंढारी लोकांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं उमरावतीच्या श्रीमंत सावकारांनीं आपली संपत्ति पुरून ठेविली होती असें म्हणतात. हल्लीं येथें तोफ असून तिचा सलामीकरितां उपयोग करतात. याच्या पूर्वेस चिलमशहा वली नांवाचा एक लहानसा पीर आहे. येथें उन्हाळ्यांत उरूस होत असतो. ( उमरावती जिल्हा गॅ. इं. गॅ. अर्नोल्ड गाईड वगैरे ).

**उमरी**—मध्य हिंदुस्थान एजन्सींतील एक लहानसें संस्थान. हे ग्वाल्हेर रेसिडेंटाच्या देखरेखीखालीं असतें. याचें क्षेत्रफळ ६० चौ. मै. असून १९०१ सालीं लो. सं. २४६९ होती. उमरी व भदौराचे संस्थानिक सिसोदिया रजपूत असून साम्रावत शाखेपैकीं आहेत. उदेपूर शहरचा स्थापनकर्ता राणा उदेसिंग याचा धाकटा मुलगा सागरजी नांवाचा होता. त्यापासून उमरीच्या संस्थानिकांची उत्पत्ति आहे. सागरजीनें अकबराची मदत घेऊन मेवाड आपल्या भावापासून परत घेण्याचा एकदां यत्न केला होता. सागरजीपासून पांचवा पुरुष प्रतापसिंह यानें १६२६ नहरगडच्या राठोड रजपूत नबाबाची मदत घेऊन उमरी घेतली. या वेळेस उमरी ठाकूर पह्लादसिंग याच्याकडे असून प्रतापसिंहाचा जांवई कोट्याचा राजा रामसिंग बाजूच्या लढाईंत ठार मारला गेल्याकारणानें साम्रावतांकडून उमरी परसत्तेत गेली. नंतर प्रतापसिंहाचा नातू जगतसिंग यानें भदौरी व आसपासचीं खेडीं संपादन केलीं. त्यांत उमरीचा समावेश होतो. मराठ्यांच्या अमदानींत उमरी व भदौराचा भाग बराच कमी झाला. सांप्रत पृथ्वीसिंग गादीवर असून त्यांना राजा ही पदवी पिढीजाद आहे.

संस्थानची जमीन सुपीक असून लोक संपन्न आहेत. उत्पन्न ६००० असून खर्च ३५०० रुपये आहे. १८९७पर्यंत सारा फुलशाईंत वसूल करीत. हल्लीं इंग्रजी नाण्यांतुन वसूल घेतात. उमरीची लो. सं. १९०१ सालीं ५८१ होती.

ज मी न दा री—जिल्हा भंडारा. साकोली तहशिलींतील नवे गांव येथील तलावाच्या पूर्वेस, पश्चिमेस व दक्षिणेस ही जमीनदारी असून तिचें क्षेत्रफळ१७चौरस मैल आहे. अर्धा भाग जंगल आहे. इ. स. १७७५ सालीं नागपूरच्या राजांनीं या घराण्याच्या उत्पादकास ( नजकराम ) त्याच्या मल्लविद्येंतील नैपुण्याबद्दल व एका रानटी हत्तीला शिकविल्याबद्दल ही जमीनदारी दिली होती.जमीनदारीस कर्ज आहे;व त्याची हप्त्यांनीं फेडण्याची व्यवस्था झाली आहे. हींत एकंदर १३ खेडीं आहेत. इ. स. १९०१ सालीं १६९७ लोकसंख्या होती. उत्पन्न २००० रुपये; टाकोली १००० रुपये.

**उमरेठ**—मुंबई. खेडा जिल्हा. आनंद तालुक्यांतील एक शहर. बी. बी. सी. आय. रेल्वेच्या गोध्रा फांट्यावर आनंदपासून १४ मैल व डाकोरपासून हें ५ मैल आहे. १९०१ सालीं लो. सं. १५५४९ होती. खेडा जिल्ह्यांत उमरेठ मोठ्या भर वस्तीचें व संपन्न असें शहर आहे. शहराच्या जवळच एक विहीर असून सुमारें ५०० वर्षांपूर्वी ती बांधलेली असावी असा अंदाज आहे. तिला पांच मजले असून १०९ पायऱ्या आहेत व अनहिल वाड्याच्या सिद्धराज नांवाच्या राजानें ती बांधली आहे. १८८९ सालीं म्यु. कमिटीची स्थापना होऊन १९०३–०४ सालीं उत्पन्न १४ हजार झालें. शहरांत कापूस पिंजण्याच्या कारखाना असून, सब जज्जाची कचेरी, दवाखाना, दोन इंग्रजी ( माध्यमिक ) शाळा पांच गुजराथी शाळा, व एक मुलींची शाळा आहे.

**उमरेड**, त ह शी ल.–मध्यप्रांत२०°३५'ते२१° ११' उत्तर अ. व ७८° ५६' ते ७९° ४०' पू.रे. यांमध्यें. या तहशिलीनें नागपूर जिल्ह्याचा मध्य आणि ईशान्येकडील प्रदेश व्यापला आहे.

क्षेत्रफळ १०४० चौरस मैल. यांपैकीं ७३ चौरस मैल सरकारी संरक्षित जंगल आहे. लोकसंख्या १९११ त १४४९३० होती.

या तहशिलींत उमरेड एवढा एकच गांव असून २ हजारावर लोकवस्ती असलेलीं सात खेडीं आहेत.

या तहशिलींतील जमीन या जिल्ह्यांत चांगली आहे. जमीनीपैकीं चारपंचमांश जमीनींत गहूं पिकेल. परंतु ही तहशील सर्वांत मागासलेली आहे. हल्लीं पाहणी झाल्यापासून रबी पिकाचें प्रमाण कमी कमी होत चाललें आहे असें दिसतें.तरी वहीत असलेल्या जमीनीपैकीं निम्म्यापेक्षां अधिक जमीनींत रबी पीक घेतात.

या तहशिलींत उमरेड येथेंच फक्त म्युनिसिपालिटी व पोलिस कचेरी आहे.

बंगाल–नागपूर रेल्वेची नागपूर ते उमरेड ही शाखा आहे. या तहशिलींत तीन खडी घातलेले रस्ते आहेत, (१) उमरेड ते बोरी ( जी. आय. पी. रेल्वे स्टेशन ), ( २ ) नागपूर ते उमरेड, ( ३ ) उमरेड ते मूळ ( चांदा जिल्हा ).

गां व—मध्यप्रांत. २०° ५२' उत्तर अ. व ७९° २०' पूर्व रे.हें उमरेड तहशिलीचें मुख्य ठिकाण असून नागपूरच्या वायव्येस २९ मैलांवर आहे. येथें एक मराठ्यांचा मोडकळीस आलेला किल्ला असून आंत एक देऊळ आहे. त्याच्या भिंती १७फूट जाड असून तें शिवाचें देवालय होतें. परंतु आतां त्यांत पिंडी नाहीं. देऊळ मुसुलमानी तऱ्हेवर बांधलेलें असल्यामुळें प्राचीन नाहीं. सोळाव्या शतकांत चांदा येथील गोंड राजांपैकीं राजा करणशहा यानें हा किल्ला बांधला असावा अशी कल्पना आहे. लोकसंख्या ( १९११ ) सालीं १७६३० होती.

गेलीं तीस चाळीस वर्षें हा गांव सारखा भरभराटीस येत आहे. आसपासच्या खेडेगांवांतील कोष्टी लोकांची या गांवांत भरती झाली असून हल्लीं रेशीमकांठी कापड हातमागावर विणण्याच्या धंद्याला येथें तेजी आहे. सुमारें १० हजार लोक या धंद्यावर अवलंबून असून सुमारें दोन लाख रुपयांचा माल बाहेर पाठविला जातो. कच्चें रेशीम गांवांत आणण्याकरितां कांहीं एक कर द्यावा लागत नाहीं. या धंद्यामुळें रेशीम रंगविण्याचा एक लहानसा धंदा उदयाला आला असून तो धंदा पटवेकरी करतात. येथें तेली लोकांचीहि वस्ती बरीच आहे.

म्युनिसिपालिटीची स्थापना सन १८६७ मध्यें झाली. इ. स. १९०५–६ सालचें उत्पन्न २१हजार रुपये होतें. येथें माध्यमिक इंग्रजी शिक्षणाची शाळा, मुलांमुलींकरितां प्राथमिक शिक्षणाच्या शाळा, दवाखाना, एक खासगी उर्दू शाळा असून पोलिसकचेरी आहे. इ. स. १८९६ सालीं २५०० रुपये खर्च करून एक टाऊन हॉल बांधला आहे.

येथें गुरांचा बाजार दर रविवारीं भरतो. येथें पुष्कळ तलाव असून त्यांच्या पाण्यावर विड्याचीं पानें, व इतर बागाइती पिकें होतात. हा गांव नागपूरच्या मेहदी बाग जातीच्या मि. मलक यांच्या मालकीचा आहे. परंतु देशमुखी जमीनी निराळ्या असून खाण्याचीं पानें पिकविणाऱ्या बागा बरिया जातींच्या लोकांच्या आहेत.

**उमा**—हिचा प्रथम उल्लेख केनोपनिषदांत सांपडतो. त्या ठिकाणीं ही वाचेशीं एकरूप झालेली दिसते. उमा हें महादेवीचें एक सौम्य स्वरूप आहे. शिव हाच पति प्राप्त व्हावा, म्हणून पार्वती घोर तप करीत असतां, 'वत्से असें तप करून शरीर कष्टवूं नको' असें तिला तिच्या मातेनें वारंवार म्हणावें, त्यावरून तिला असें नांव पडलें. कारण यांत उ हा वर्ण संबोधनार्थी असून, मा हा निषेधार्थी आहे. ( उ मेति मात्रा तपसो निषिद्धा पश्चादुमाख्या सुमुखी जगाम—कुमारसंभव १. २६. ) जास्त विवरण ' देवी ' ' पार्वती ' या लेखांत सांपडेल.

**उमाजी नाईक**—दक्षिणेंत इंग्रजांचा अंमल सुरू झाल्यावेळीं कोळ्यारामोश्यांनीं बरीच बंडाळी माजवून सरकारला त्रास दिला. देवबाराव दळवी, कोंडाजी नाईक, उमाजी नाईक, भर्गाजी नाईक वगैरे बंडवाल्यांच्या पुढाऱ्यांना पकडण्याकरितां सरकारनें मोठमोठीं बक्षिसें लाविलीं होतीं. उमाजी व त्याचे रामोशी पुरंदरभोंवतीं धुमाकूळ घालीत होते. पुढें १८२७ त उमाजी नाईकानें घोडे, तंबू व ३०० रामोशी यांसह सह्याद्री ओलांडून पनवेलच्या पूर्वेस १६ मैलांवर प्रबल डोंगराच्या पायथ्याशीं तळ दिला. प्रबलहून त्यानें असा जाहीरनामा काढिला कीं, कोणींहि इंग्रज सरकारला सारा वगैरे न देतां तो पैसा आपणांस द्यावा. असें न केल्यास लुटालुट जाळपोळ केली जाईल. याची खूण म्हणून गवत लांकूड व कोळसे लोकांत वाटले. याच वर्षी उमाजीच्या सशस्त्र लोकांनीं मुरबाडचा खजीना लुटून बारातेरा हजार रुपये लांबविले. इ. १८२८–२९ सालीं तर जास्तच दंगेधोपे होऊं लागले. तेव्हां इंग्रज सरकारनें कॅप्टन मॅकिन्टॉशला या कोळ्यारामोश्यांचा अजीबात नायनाट करण्याच्या कामावर नेमिलें. त्यानें पेंढाऱ्यांप्रमाणें यांचा सर्वत्र पाठलाग करून पकडिलें ( १८३४ ). उमाजी गोरगरीबांना न छळतां उलट त्यांना फार मदत करी. कंजूष बेपर्वा व जुलुमी माणसांना तो योग्य शिक्षा लावी, अशी त्याची ख्याति आहे. म्हणून त्याचें नांव लोकांच्या तोंडीं अद्याप आहे. त्याचा पोवाडा ( ले. यसू १८८७ ) मोठ्या प्रेमानें ऐकिला जातो. त्याचें एक चरित्र रा. अनंत नारायण भागवत यांनीं लिहिलें आहे ( १९१० ).

**उमापति**—यानें हिंदुपति हरिहरदेव याच्या कारकीर्दींत ' पारिजातहरण ' नांवाचें सत्यभामाकलहावर नाटक लिहिलें.

**उमापति शिवाचार्य**.—शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकांतील तामील ग्रंथकार. तामीळ चार तत्त्वज्ञानी आचार्यांपैकीं एक.

च रि त्र व ग्रं थ.–हा ब्राह्मण असून चिदंबरमूच्या देवळांतील पुजारी होता. याचा गुरु " मरइ गणसंबंध " (ब्राह्मणेतर)होता. गुरूच्या पानांतील उच्छिष्ट खाल्लयामुळें याला इतर ब्राह्मणांनीं गावांतून हांकलून दिलें, पण पुढें याच्या ग्रंथकर्तृत्वाची व साधुत्वाची ख्याति झाल्यामुळें याला देवाच्या वार्षिक जत्रेच्या प्रसंगीं परत बोलावलें. या वेळेस यानें कोदि कवि: हा ग्रंथ लिहिला. शके १२३५ सालीं " अनि " उत्सवाच्या प्रसंगीं यानें जे वादविवाद केले ते 'शंकर पनिरकरणं ' या ग्रंथांत ग्रथित केले आहेत. याचे मुख्य ग्रंथ येणेंप्रमाणें:—पुष्करागमावर संस्कृतभाष्य हें थिरुव वदुथुरै मठांत ठेवलें आहे.

शिवाय 'फोइर पुराण', चिदंबरम् देवळाचा इतिहास, शिवप्रकाशकं, व थिरुवारुत्पयन् या ग्रंथांत जीं वेदांततत्त्वें यानें पुढें मांडलीं त्यांचें संकलन आहे. तामीळामधील चौदा सिद्धांतशास्त्रग्रंथांत हें पुस्तक मोडतें यांतील मुख्य विचार येणेंप्रमाणें:—

ईश्वर रूपी, अरूपी व रूपारूपी, आहे. ज्ञानवंतांस तो ज्ञानरूपी आहे. तो कल्याण करतो म्हणून त्यास शंकर म्हणतात. त्याकडे जो जात नाहीं त्याचें तो चांगलें करीत नाहीं. त्याच्याकडे जो जातो त्याचें तो कल्याण करतो तथापि तो पक्षपाती नाहीं. मल तीन प्रकारचे आहेत ( १ ) मूल अथवा अनवमल, ( २ ) कर्ममल, ( ३ ) मायामल. मूलमल हा सर्वांसच असतो, कित्येक आत्म्यांचीं संमत, कर्म व मूल हे दोनच मल असतात आणि कित्येकांच्या मध्यें तिन्ही मल असतात. यामुळें मनुष्याचे तीन वर्ग होतात. खालच्या ( "तीन मलवाल्यांनीं" ) वरच्या वर्गांत जाण्याचा यत्न करावा. जन्ममृत्यूच्या फेऱ्याचें दुःख, मुक्ति, व ईश्वरकृपा या तिन्हीं गोष्टी, मनुष्याच्या अंगच्या अनवमलानें झांकलेल्या असतात. हाच अज्ञानरूपी पाश होय. जो 'अरुल्' ( ब्रह्म ) ओळखीत नाहीं त्यास मुक्ति नाहीं. पंचाक्षर मंत्र पढावा म्हणजे मुक्ति मिळेल "अरुल" शब्दाचें भाषांतर ईश्वरी कृपा असें नलस्वामी पिल्ले यानें केलें आहे पण या भाषांतराच्या सत्यतेबद्दल खात्री होत नाहीं. याचे भाग ( १ ) ईश्वरस्वरूप, ( २ ) आत्म्याचें स्वरूप, ( ३ ) पाशस्वरूप, ( ४ ) 'अरुल' स्वरूप, ( ५ ) सद्गुरुस्वरूप, (६) मार्गदीपिका, (७) आत्मप्रकाश, (८) मोक्षमार्ग, (९) पंचाक्षर सत्य, (१०) जीवन्मुक्त लक्षण इ.

**उमाबाई दाभाडे**—सेनापति खंडेराव दाभाडे यांची स्त्री. ही कर्तृत्ववान, दक्ष व पराक्रमी होती. इचा मुलगा यशवंतराव हा व्यसनी व दुर्बल होता. त्यानें राष्ट्रसेवा कांहीं तरी करावी म्हणून तिनें फार शिकस्त केली परंतु उपयोग झाला नाहीं. कित्येक प्रसंगीं स्वतः तरवार घेऊन तिनें लढाया मारल्या. गायकवाडास आपले दुय्यम नेमून तिनें जातीनें गुजराथचा कारभार कांहीं काळ केला. (म. रि. म. वि. २.) डभईच्या लढाईंत त्रिंबकराव मेले असतां बाजीराव पेशवे यांनीं स्वतः जाऊन बाईची समजूत घातली ( दा. ब. ). शाहूची मर्जी संभाळून पेशव्यांशीं ती बाणेदारपणें वागे. इ. स. १७५० मध्यें पेशव्यांनीं छत्रपतीच्या आज्ञेवरून तिच्या कडून गुजराथ काढून घेतली. त्यावेळीं ती रागावली. यावेळीं तिचा शाहूचा आधारहि गेला होता. तेव्हां तिनें ताराबाईच्या भेटी घेऊन पेशव्याविरुद्ध एक कारस्थान उभें केलें. २० आक्टोबर १७५० रोजीं तिनें आपला वकील पेशव्यांकडे पाठविला; परंतु त्यांनीं त्याला धुडकावून लावलें; तेव्हां स्वतः बाईनें २२ नोव्हेंबर रोजीं आळंदीस पेशव्यांची भेट घेतली. परंतु दाद लागेना. तिनें दमाजी गायकवाडास पेशव्यांवर पाठविलें. परंतु १७५१ च्या एप्रिलांत पेशव्यांनीं त्याचा पुरा मोड केला. ३० एप्रिल रोजीं वेण्याच्या तहांत बाईनें निरुपायानें गुथराथ पेशव्यांस दिली. या वेळीं ती पेशव्यांच्या हातांत सांपडली होती. तिचें मन दमाजी गायकवाडाबद्दल शुद्ध नव्हतें. तो आंतून पेशव्यांस सामील आहे व आपल्या सरदारीचा हा अपहार करतो अशी तिची ठाम समजूत होती. १७५१ चा एप्रिल ते नोव्हेंबर पर्यंत उमाबाई पेशव्यांच्या कैदेंत होती. पुण्यास होळकरांच्या वाड्यांत दाभाड्यांची सर्व मंडळी नजरकैदेंत होती. श्रीमंत २९ जुलै १७५१ रोजीं थेऊरास गेले असतां बाई त्यांच्या बरोबर गेली होती. दाभाडे मंडळी १६ नोव्हेंबर १७५१ रोजीं कैदेंतून पळाली; तेव्हां श्रीमंतांनीं उमाबाई व तिची सून अंबिकाबाई यांनां सिंहगडावर कैदेंत ठेविलें. ( सासूसुनांचीं मनें परस्परांबद्दल शुद्ध नव्हतीं. ) पुढें चन्होलीस बाईची व श्रीमंतांची भेट झाली. बाईला १४ फेब्रुवारी १७५२ रोजीं पुण्यास आणून ठेविलें. मध्यंतरीं वाटाघाट होऊन ५ एप्रिल १७५२ रोजीं श्रीमंतांनीं पुन्हां बाईची गांठ घेतली व अखेर उभयतांत तह झाला. गायकवाड पूर्ववत दाभाड्यांची चाकरी करतील, दाभाड्यांनीं राज्यांत बखेडा करूं नये, रामराजाला अनुकूल होऊं नये व पेशव्यांचे विचारें चालावें, दाभाड्यांस खर्चास दरमहा ५० हजार रु. मिळतील, पूर्वीचे मोकासे त्यांच्याकडे चालतील वगैरे मुख्य कलमें या तहाचीं होतीं. या तहानंतर बाईचा जप्त केलेला सरंजाम, श्रीमंतांनीं २ नोव्हेंबर १७५२ रोजीं सोडून दाभाड्यास वस्त्रें दिलीं. यापुढें पेशवे व दाभाडे यांचें सूत चांगलें जमलें. बाई वृद्ध झाली होती ती पुढें अजारी पडल्यामुळें श्रीमंतांनीं तिला उपचाराकरितां तळेगांवाहून पुण्यास आणलें. तिचा मुक्काम नडगेमोडीवर होता. ती दोन महिन्यानंतर २८ नोव्हेंबर १७५३ रोजीं वारली. मराठेशाहींतील अनेक पराक्रमी स्त्रियांत बाईची गणना केली पाहिजे. बाईनें जातीनें अमदाबाद ( गुजरात ) सर केल्याबद्दल खुद्द शाहूमहाराजांनीं तिच्या पायांत सोन्याचे तोडे घातले होते ( दाभाडे बखर पृ २९८. पुढें ) [ हिची साग्र हकीकत वाटसन्स हिस्टरी ऑफ गुजराथ, ३ या पुस्तकांत सांपडेल. ]

**उमीचंद**—याला अमीरचंद असेंहि एक नांव आढळतें. हा शीख होता. १७४० मध्यें अलिवर्दीखान हा बंगालचा सुभा सर्फराज याच्यावर चालून जात असतां त्याची अफगाण फौज पैशाकरितां त्याजवर उलटली असतां उमीचंदानें युक्ति योजून फौजेची समजूत घातली व अलिवर्दीला एकप्रकारें बंगालची सुभेदारी मिळवून दिली ( मु. रि. भा. १ पृ. ८४२ ). हा कलकत्यास रहात असे. हा मोठा वजनदार सावकार होता. कलकत्याचा इंग्रज गव्हर्नर ड्रेक व याची दोस्ती होती. पण १७५६ च्या प्रारंभीं ती थोडी बिघडली. सिराजउद्दौल्यास कलकत्त्यावर आणण्याचें व इंग्रजांविरुद्ध त्याला चिडविण्याचें काम उमीचंदानें केलें असें

इंग्रज म्हणतात. पण इंग्रजांचा हा संशय निष्कारण होता. १३ जून १७५६ रोजीं इंग्रजांनीं उमीचंदास पकडून किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. पकडण्याच्या वेळीं थोडीशी चकमक व रक्तपात झाला. सिराजुद्दौला व इंग्रज यांच्यांत रदबदली करणारे उमीचंद व खोजा वाजीद हे दोघेच होते. उमीचंदास पकडल्याचें खोजास पसंत पडलें नाहीं. १६ तारखेस सिराज कलकत्त्यास येऊन उमीचंदाच्या बागेंत उतरला. त्याला कलकत्त्याची सारी माहिती उमीचंदाच्या लोकांनीं दिली. १७ रोजीं सिराजनें इंग्रजांचा पराभव केला. तेव्हां इंग्रजांनीं उमीचंदाची, सिराजकडे जाऊन तडजोड करण्याबद्दल विनवणी केली, पण त्यानें ती मनावर घेतली नाहीं. सिराज आपलें म्हणणें ऐकणार नाहीं असें त्याचें म्हणणें होतें. पुढें १९व्या तारखेस इंग्रजांचा पुरताच मोड झाला. तेव्हां त्यांच्या विनवण्यांवरून उमीचंदानें ता. २० रोजीं सिराजकडे रदबदलीचें पत्र पाठविलें. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. किल्ला सिराजनें काबीज केला. उमीचंद कैदेंतून सुटला व सिराजजवळ राहिला त्यानें त्यास पोषाक वगैरे दिला. पुढें १७५७ त सिराजच्या दरबारीं उमीचंद हा इंग्रजांतर्फे वकील म्हणून होता. हाच सिराजच्या सर्व कारस्थानांची माहिती इंग्रजांस देई. या वेळीं चंद्रनगर इंग्रजांनीं काबीज केलें. त्या कामीं उमीचंदानें इंग्रजांस फार मदत केली. क्लाइव्ह म्हणतो, "कलकत्त्याचा धनवान व्यापारी उमीचंद याचे कंपनीवर कायमचे उपकार आहेत. दिवाण नंदकुमाराची आपणांस मदत झाली ती उमीचंदामुळेंच. ती झाली नसती तर चंद्रनगर मिळालें नसतें.' सिराजास पदच्युत करून मिरजाफरास नवाब करण्याच्या इंग्रजांच्या कटांत उमीचंद सामील होता. मिरजाफरास इंग्रजांनीं सुभेदारी मिळवून दिल्यास त्यानें त्यांचे उपकार कसे फेडावे याबद्दलचा लेखी ठराव ठरत होता; तो उमीचंदास ठाऊक होता. उमीचंद तो बाहेर फोडणार अशी भीति इंग्रजांस पडली. ठराव गुप्त ठेवण्याबद्दल उमीचंद ३० लाख रुपये मागूं लागला. क्लाइव्हनें त्याला फसविण्याचें ठरविलें. ठराव लिहिण्याकरितां एका कोऱ्या कागदावर मीरजाफरची सही घेऊन तो कागद कलकत्त्यास धाडला व त्यांत उमीचंदाबद्दल पाहिजे तें कलम घाला असें कळविलें. इकडे क्लाइव्हनें एक पांढरा व एक तांबडा अशा दोन कागदांवर तो ठराव लिहिला. पैकीं उमीचंदास ३० लाख रु. देण्याचें कलम तांबड्या कागदावर नमूद केलें, पांढऱ्यांत केलें नाहीं. पांढऱ्या कागदावरील ठराव खरा व तांबड्यावरील खोटा अशी त्यानें तजवीज केली. पांढऱ्यावर सर्व इंग्रज अधिकाऱ्यांनीं सह्या केल्या. परंतु तांबड्यावर ॲ. वॉटसन सही करीना तेव्हां क्लाइव्हच्या सांगण्यावरून ल्यूशिंग्टननें त्यावर वाटसनची बनावट सही केली. अशा तऱ्हेनें तयार केलेला लाल कागद उमीचंदास दाखवून तूर्त त्याची समजूत केली. खोटा कागद करणें व बनावट सही करविणें या घोर पातकांबद्दल क्लाइव्ह यास कधींच पश्चात्ताप झाला नाहीं. उमीचंदाचा विश्वास इंग्रजांवर त्याच्या म्हणण्याप्रमाणें चाळीस वर्षें होता. "चाळीस वर्षांत इंग्रजांनीं शब्द मोडल्याचें एकहि उदाहरण घडलें नाहीं" असें तो म्हणे. मीरजाफरनें गादीवर बसल्यानंतर इंग्रजांना जो पैसा द्यावयाचा त्यांत उमीचंदास २० लाख रुपये देण्याचें ठरलें होतें. मुर्शिदाबाद सोडून १४ जून १७५७ च्या सुमारास उमीचंद कलकत्त्यास इंग्रजांकडे आला. कलकत्ता ते प्लासी यांमधील कांहीं ठिकाणीं सिराजच्या फौजेची कांहीं ठाणीं होतीं. त्यांचे अधिकारी उमीचंदानें इंग्रजांच्या तर्फेनें फोडण्याचा प्रयत्न केला. प्लासीच्या लढाईंत उमीचंद हजर होता. लढाई झाल्यानंतर क्लाइव्हनें त्यास सांगितलें कीं, "तांबडा कागद खोटा आहे. तुम्हांस कांहीं एक मिळणार नाहीं" हे शब्द ऐकतांच उमीचंद बेशुद्ध होऊन पडला. त्यावेळीं नोकरांनीं उचलून नेऊन त्यास पालखींत घालून घरीं नेलें. पुढें तो भ्रमिष्ट झाला- कांहीं दिवसांनीं त्याची पुन्हां क्लाइव्हशीं गांठ पडली असतां क्लाइव्हनें त्याला तीर्थयात्रेस जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो तीर्थयात्रेस गेला व भ्रमिष्ट स्थितींतच १८ महिन्यांनीं मरण पावला. क्लाइव्हच्या या दुष्कृत्याबद्दल बहुतेक इंग्रज इतिहासकारांनीं त्याची निंदाच केली आहे. परंतु व्हि. स्मिथ म्हणतो कीं, तो वेडा झाला नाहीं. इंग्रजांशीं त्यानें पुन्हां व्यवहार सुरू केला. पुढें आपल्या मृत्युपत्रांत त्यानें लंडन येथील अनाथबालसंगोपनगृहाकरितां २००० पौंडाची रकम देण्याचें लिहून ठेवलें होतें. तसेंच गुरुगोविंदाच्या देवळासहि त्यानें बरीच रक्कम दिली. त्याचां घरेंदारें व जमीनजुमला कलकत्त्यास फार होता. [ ब्रि. रि. पु. पृ. ५३२ पुढें; व्हि. स्मिथ. ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ].

**उमेटा**—रेवाकांठांतील पांडुमेहवाच्या बारिया संघातील हें पश्चिमेकडील संस्थान आहे. यांत गांवांचे दोन समूह आहेत; एक खेडामधील पांच गांवांचा व दुसरा पेटलादमधील सात गांवांचा. ही जहागीर कांहीं भागांत १५ व्या शतकापासून व कांहींत १७ व्या शतकाच्या अखेरपासून चालत आली आहे. महंमद बेगडा यानें जेव्हां चंपानेर काबीज केलें (१४८४ ), तेव्हां तेथील झांजरजी नांवाचा परिहार रजपूत, माहीच्या जंगलांत जाऊन राहिला व तेथील भिल्लांच्या हातचें पाणी पिऊन बाटला. पुढें लवकरच जेव्हां त्यानें बिलपारच्या जयसिंगाला मारलें तेव्हां त्याला भेटशी राजाकडून आठ गांवें इनाम मिळालीं. नंतर २०० वर्षांनीं ( १६९४ ) उमेटाच्या राजानें कोळी लुटारूंना भिऊन झांजरजीचा वंशज जो दलपतसिंग याला चार गांवें देऊं करून मदतीस बोलाविलें. पेशवे आणि गायकवाड यांच्या वांटणीच्या वेळीं ( १७५१ ), पेशव्याकडे ५ गांवें व गायकवाडाकडे ७ गांवें आलीं. १८१२ आणि १८२० मध्यें उमेटाच्या ठाकोरला महीकांठा जहागीरदारांत घातलें

होतें; व त्याला ब्रिटिश व गायकवाड या दोघांनाहि खंडणी द्यावी लागे.

**उमेदवारी**—जेव्हां कोणी एखाद्या धंद्याचा मालक एखाद्या शिकाऊ इसमाला स्वतःच्या धंद्याचें ज्ञान शिकविण्याचें कबूल करतो आणि उलट तो शिकणारा इसम मोबदल्या दाखल त्या मालकाची कांहीं काल नोकरी करण्याचें कबूल करतो तेव्हां उभयतांमधील अशा प्रकारच्या बंधनाला उमेदवारीचा करार असें म्हणतात. हिंदुस्थानांत धंदेवाईक जाती कित्येक शतकें अस्तित्वांत असल्यामुळें धंद्याचें शिक्षण आनुवंशिक व घरच्याघरीं मिळण्याची व्यवस्था असते. पाश्चात्य लोकांची समाजरचना धंदेभेद व जातिभेद या तत्त्वांवर नसल्यामुळें कोणाहि मनुष्यास कोणताहि धंदा करण्याची मोकळीक असते. चालू कालांतल्या प्रमाणें धंदे व कला शिकविण्याच्या शाळा नसल्यामुळें पूर्वी धंदेशिक्षण मिळविण्याचा उमेदवारी हा एकच मार्ग सर्वत्र रूढ होता.

**पूर्वेइतिहास.**—तथापि ही पद्धति फारशी जुनी नाहीं. प्राचीन ग्रीक व रोमन काळीं ती अस्तित्वांत नव्हती. रोमन लोकांमध्यें कायद्यांची वाढ फारच परिणत स्वरूपास गेलेली होती पण उमेदवारीच्या करारासंबंधानें त्या कायदेपुस्तकांत मागमूसहि नाहीं. फार काय पण सदरहू अर्थवाचक असा शब्दसुद्धां ग्रीक किंवा लॅटिन भाषेंत आढळत नाहीं. ही पद्धति मध्ययुगात उत्पन्न झाली. मध्ययुगांत सरंजामदारांच्या बलिष्ठ वर्गाचा (फ्यूडल लॉर्ड) प्रतिस्पर्धी असा दुसरा व्यापार उदीमी वर्ग पुढें आला व या वर्गांतील लोकांनीं आपली परस्परसहायकारी मंडळें व संघ अथवा-श्रेणी (गिल्ड) स्थापले. मध्ययुगांतलि हे असले संघ, तसेंच तत्कालीन कारागिरींतील हस्तकौशल्य, स्थानिक मागणी व पुरवठा, मजुरीचे समान दर, तेजीमंदी व चढउतार यांचा अभाव या अनेक कारणांनीं उमेदवारीपद्धतीला तत्कालीन परिस्थिति अत्यंत अनुकूल होती शिकाऊ मुलाला त्याचे आईबाप उद्दिष्ट धंदेवाईकाच्या घरींच रहावयास ठेवीत. त्याच्या दुकानांत तो काम शिके, उमेदवारांचें जेवणखाण, राहण्यास जागा व कपडेलत्ते सर्व मालकाच्या अंगावर असे. उलट मालकाचा हुकूम पाळणें, धंद्यांतील गुप्त गोष्टींची परिस्फुटता न करणें, व कोणत्याहि परिस्थितींत आचरण योग्य ठेवणें वगैरे बंधनें उमेदवाराला पाळावीं लागत. इंग्लंडांत उमेदवारी ७ वर्षें, फ्रान्सांत ४ वर्षें ते ६ वर्षें, जर्मनींत २ ते ४ वर्षें वगैरे निरानिराळा काल करावी लागत असे. मात्र कोणत्याहि कलेचें किंवा शास्त्राचें शिक्षण याप्रमाणें उमेदवारी करून मिळविल्याशिवाय कोणालाहि स्वतंत्र धंदा करण्याची परवानगी नसे. मग तो धंदा सोनारालोहाराचा असो, शिंप्याचा असो, किंवा विद्वान पंडिताचा असो. म्हणून 'अप्रेंटिस' हा शब्द हलक्या धंद्यांतल्या उमेदवाराला लावीत. त्याप्रमाणें वाङ्मय, वैद्यक वगैरे विषयांतील विद्यार्थी (अंडर ग्रॅज्युएट व स्कॉलर्स) यांनाहि लावीत असत. याप्रमाणें त्या काळांत उमेदवारी करणें खुषीचें नसून सक्तीचें असे. १६ व्या शतकांत व्यापारीसंघ व उमेदवारी यांच्या संबंधानें सरकारकडून कायदेहि करण्यांत आले. उमेदवारीचीं वर्षें तर ठरविण्यांत आलींच पण शिवाय शिकून तयार झालेल्या इसमांना पगार किती द्यावा, त्यांच्याकडून काम दररोज किती तास घ्यावें, प्रत्येक शिकलेल्या नोकराच्या हाताखालीं उमेदवार किती असावे वगैरे सर्व बाबतींत कायद्यानें बंधन घालण्यांत आलें.

सदरहू परिस्थितींत फेरबदल उत्पन्न करणारी गोष्ट म्हणजे वाफेच्या यंत्राची युक्ति व त्या योगानें घडून आलेली औद्योगिक क्रांति ही होय. फ्रेंच राज्यक्रांतीपासून 'यथेष्ट व्यवहार करण्याचा प्रजेचा हक्क' या अर्थशास्त्रीय तत्त्वाचा पुरस्कार जोरानें सुरू होऊन उपर्युक्त बंधनांविरुद्ध जिकडेतिकडे ओरड सुरू झाली. यांत्रिक साधनें निघाल्यापासून हस्तकुशल कारागिरांचें महत्त्व कमी होऊन कारखान्यांतून व गिरण्यांतून अशिक्षित, अल्पवयी स्त्रियाहि काम करूं लागल्या. त्यामुळें अधिक पगारावर कुशल कारागीर नेमण्यास मालकहि तयार नव्हते. यामुळें "उमेदवारी" संबंधाचे कायदे मोडण्यास मालक व नोकर दोघांकडून सुरवात झाली. या पद्धतीवर दुसरा जोराचा आक्षेप संघांनीं उमेदवारांच्या संख्येवर घातलेल्या नियंत्रणासंबंधानें होता. या नियंत्रणामुळें कुशल कारागिरांची संख्या अपुरी पडूं लागली म्हणून हें नियंत्रण नसावें अशी मागणी उत्पन्न झाली. तिच्याविरुद्ध संघाचें म्हणणें असें असे कीं, उमेदवारांची संख्या अमर्याद वाढल्यास चांगले कुशल कारागीर न तयार होतां अर्धे कच्चे लोक बाहेर पडतील व धंद्याची त्यामुळें अवनति होईल. तथापि उत्तरोत्तर उद्योगधंद्यांचा प्रसार फार वाढल्यामुळें कारागिरांची संख्या अधिकाधिक लागूं लागली व त्याकरितां धंद्याचें शिक्षण देण्याकरितां स्वतंत्र शाळा व कॉलेजें असावीं अशी मागणी सर्वत्र होऊं लागली. लवकरच या मागणीचें महत्त्व सरकार व समाज दोघांच्याहि लक्षांत येऊन वाङ्मयतत्त्वज्ञानादि विषयांच्या शिक्षणसंस्थांप्रमाणें औद्योगिक व व्यापारीशिक्षणाच्या स्वतंत्र संस्था स्थापन होण्यास सुरवात झाली.

याप्रमाणें १९व्या शतकाच्या आरंभीं उद्योगधंद्यांच्या बाबतींत नवीं यांत्रिक साधनें व स्वतंत्र शिक्षणसंस्था उत्पन्न होऊन औद्योगिक क्रांति घडून आली. त्यामुळें जुने व्यापारी संघ (गिल्डस) व उमेदवारी संबंधाचे नियम व सरकारी कायदे आपोआप रद्द पडत गेले व उमेदवारीची जुनी पद्धति नष्ट होत चालली. तथापि कांहीं विशिष्ट धंद्यांत हस्तकौशल्याचें महत्त्व कायम असल्यामुळें व त्यांत यंत्रसामुग्री फारशी उपयोगी पडत नसल्यामुळें त्या धंद्यांत उमेदवारीची जुनी पद्धति अद्यापहि चालू राहणें अपरिहार्य आहे. उदाः—दगडावरील खोदकाम, सुतार काम, गंवडी काम, व जवाहीर

दुरुस्तीचें काम वगैरे कामें पूर्वीच्या उमेदवारी पद्धतीनेंच अद्याप शिकणें भाग आहे. तथापि हे अपवाद वगळल्यास हल्लीं प्रचलित झालेले मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंदे, श्रमविभागणी, यांत्रिक साधनें व कार्यविभागप्रावीण्यपद्धति ( स्पेशलायझेशन ) या गोष्टींमुळें कोणत्याहि धंद्याचें सर्वांगीं व संपूर्ण ज्ञान मिळविण्याची जरूरीच पडत नाहीं. हल्लींच्या कोणत्याहि मोठ्या कारखान्यांत एक दोन माणसें फार तर सर्व कारखान्यांतील कामांची माहितगार असतात. बाकी सर्व इसम यंत्राजवळ उभे राहून त्यांत माल सारणारे साधे मजूर असतात, आणि सर्व कामें यंत्रांनीं होत असतात. शिवाय हल्लीं प्रत्येक धंद्यांत कार्यविभागणी फार झालेली असून प्रत्येक शाखेचा कारखाना स्वतंत्र असतो; त्यामुळें सर्व शाखांचें ज्ञान उमेदवाराला एका ठिकाणीं राहून मिळणें शक्य नसतें.

याप्रमाणें सर्व शाखांची माहिती मिळविण्याकरितां अनेक मालकांच्या कारखान्यांत राहणें जरूर असल्यामुळें पूर्वीची उमेदवारीपद्धति निरुपयोगी झाली आहे. शिवाय सर्व शाखांचें ज्ञान असलेला तज्ज्ञ कारागीर शिक्षक लाभणें दुरापास्त आहे. कारखान्याचा मालक स्वतः फक्त देखरेखीचें व सामान्य व्यवस्थेचें काम करीत असतो. धंद्यांतील प्रत्यक्ष कसब त्याच्या अंगीं मुळींच नसतें, कारखान्यातले कामकरी स्वतःचें ज्ञान उमेदवाराला शिकविण्यास तयार नसतात. कारण त्याबद्दल त्यांनां स्वतंत्र वेतन मालकाकडून मिळत नसतें, म्हणून कोणत्याहि कारखान्यांत कोणी नवीन शिकाऊ इसम शिरल्यास त्याला केवळ दुसऱ्यांचें चाललेलें काम पाहून जें ज्ञान मिळेल तेवढ्यावर भागवावें लागतें, शिवाय कारखान्यांत शिरणारीं मुलें केवळ शिकण्याकरितां दोनदोन चारचार वर्षें मोडण्यास तयार नसतात. त्यांनां लवकर पैसा हातीं येण्याची उत्सुकता असते. त्यामुळें कोणत्याहि एखाद्या यंत्रावर काम करतां येऊं लागतांच प्रत्येक इसम कारखान्यांत पगारी नोकर बनतो व धंद्याच्या सर्व अंगांची माहिती मिळविण्याची फिकीर करीत नाहीं. कारखानदार मालकालाहि हीच गोष्ट हितावह असते कारण यंत्रांतून पुष्कळसा माल भराभर तयार करून काढण्याकडेच त्याचें सर्व लक्ष असतें. उमेदवार इसमांनां चांगलें शिक्षण देऊन तयार करण्यांत धोका असा वाटतो कीं शिकलेले कुशल इसम मूळ मालकाची नोकरी सोडून इतर प्रतिस्पर्धी कारखानादारांची नोकरी धरतील असा फार संभव असतो. वारंवार होणारे मजूरांचे संप, व धंद्यांत येणारी बूड यामुळें नोकरांनां वारंवार कारखाने बदलावे लागतात. त्यामुळें बरींच वर्षें उमेदवारी करून एखाद्या धंद्याचें संपूर्ण ज्ञान मिळविणें अशक्य असतें.

१९०४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या एका रिपोर्टावरून असें दिसतें कीं, युनैटेड स्टेट्समध्यें एकंदर धंद्यांपैकीं शें. १३.४१ धंद्यांत उमेदवारीची पद्धति मुळींच अस्तित्वांत नव्हती, व उरलेल्या धंद्यांपैकीं शें. ३०.९ मध्यें मालकांवर या बाबतींत कोणतेहि निर्बंध घातलेले नव्हते. उमेदवारीचा काल दोन ते पांच वर्षांपर्यंत असून १६ ते १८ वर्षें वयाचीं मुलें उमेदवार घेण्यांत येत असतात.

फ्रान्समध्यें या बाबतींत १८५१ व १८९२ ह्या दोन सालीं झालेले कायदे हल्लीं अमलांत आहेत. उमेदवार किती घ्यावे याबद्दल कायद्यानें मर्यादा घातलेली नाहीं. परंतु उमेदवारांनां धंदेशिक्षण दिलें पाहिजे इतकेंच नव्हे, तर तो सोळा वर्षांवर असून निरक्षर असल्यास त्यास प्राथमिक शिक्षणहि दिलें पाहिजे, व चवदा व सोळा वर्षांच्या मुलांनां अनुक्रमें दहा व बारा तासांपेक्षा अधिक काम सांगूं नये असा नियम आहे. फौजदारी गुन्हा केलेल्या मालकांनां मात्र मेयरच्या परवानगीशिवाय उमेदवार घेण्याची मनाई कायद्यानें केलेली आहे. स्विट्झर्लंडमध्यें साधारणतः अशाच प्रकारचे नियम असून शिवाय शिकून तयार झालेल्या उमेदवारांची परीक्षा घेणारें सार्वजनिक मंडळ ( पब्लिक बोर्ड ) असतें. जर्मनींत उमेदवारीसंबंधाचे करार लेखी व अगाऊ करावे लागतात व उमेदवारीची मुदत तीन वर्षांहून अधिक नसते. आस्ट्रियांत उमेदवारीची पद्धति निर्दोषपणानें चालू ठेवण्याचे प्रयत्न कायद्यानें चालू आहेत. बेल्जममध्यें मात्र या बाबतींत कांहींच कायदे अस्तित्वांत नाहींत.

तथापि एकंदरीनें व्यापारी संघामार्फत घातलेल्या उमेदवारांची संख्या मर्यादित करणारे निर्बंध पुष्कळ ठिकाणीं आहेत, व त्याविरुद्ध जनतेची ओरड चालू आहे. शिवाय अनेक धंद्यांत उमेदवारीची पद्धति अजीबात बंद पडूं लागली आहे तीहि पुन्हा चालू करण्यासंबंधानें सरकारमार्फत व सार्वजनीक रीत्या प्रयत्न चालू आहेत.

**हिंदुस्थानांतील उमेदवारी पद्धत.**—प्राचीनकाळीं उपनयन झाल्यावर गुरुगृहीं जीं मुलें रहात तीं गुरूकडून विद्या शिकून घेण्याकरितांच होय. वैद्य, गवयी, शिल्पकार इत्यादि धंदेवाईकांजवळहि शिष्य असत व ते पुढें गुरूचें नाव चालवीत. धंद्यांवरून जाती पडल्यामुळें बहुधां उमेदवार आपल्या जातीला योग्य तोच धंदा शिकत. व तो धंदा वंशपरंपरेनें घरींच चालत असल्यानें तिऱ्हाइताकडे उमेदवार राहण्याची जरूर पडत नसे. यामुळें धंदेवाईक उमेदवारांचें अस्तित्व स्पष्टपणें इकडे नजरेस येत नाहीं.

मराठेशाहींत शागीर्दपद्धति होती. कारकुनी शिकून सरकारी नोकरींत शिरण्यासाठीं, त्याप्रमाणेंच पंडितांजवळ किंवा वैद्यांजवळ संस्कृत पांडित्य किंवा वैद्यकीचा धंदा शिकण्यासाठीं शागीर्द असत ते गुरूची परिचर्या करीत. त्यामुळें स्वयंपाकाखेरीज इतर नोकरी करणाऱ्या ब्राह्मणांस शागीर्द म्हणण्याचा प्रघात पडला. मेस्तकासारख्या पुस्तकांत शागीर्दानें काय करावें अशा प्रकारचे उल्लेख आहेत. दक्षिणेकडे माध्वब्राह्मण महाराष्ट्रीय अधिकाऱ्यांकडे शागीर्दपणा करीत. तेथेंच ते मराठी शिकत आणि त्यामुळें मोडी

शिकल्यानंतर तेथील दप्तर मराठींतच असल्यामुळें त्यांचा कारकुनींत प्रवेश होई. जे आज शागीर्द ते कांहीं दिवसांनीं जांवई होत. या प्रकारच्या परिस्थितीमुळें दक्षिणेकडे कानडी व तेलंगी माध्व मंडळी महाराष्ट्रीय ब्राह्मणांतील माध्व घराण्यांशीं संबद्ध झाली आणि त्यांच्यामध्यें महाराष्ट्रीयत्वाचा अभिमान उत्पन्न झालेला दिसून येतो.

इंग्रजी अंमलापासून देशांत नवीन पद्धतीचे कारखाने सुरू झाले व धंदेशिक्षण घेण्याची लोकांनां आवश्यकता भासूं लागली. तथापि रेल्वेकंपन्यांखेरीज इतरत्र उमेदवारांना थारा नसे. त्यामुळें मोठमोठे धंदे चालविण्याची कुवत सुशिक्षितांतहि नव्हती व अद्याप नाहीं. हल्लीं सरकारच्या कार्नीकपाळीं ओरडून कांहीं धंद्यांतून उमेदवारांची सोय लावण्यांत आली आहे. १९२१ सालीं मुंबई सरकारनें धंदेशिक्षणासंबंधीं विचार करण्याकरितां सर विश्वेश्वर अय्याच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली होती. तिनें केलेल्या रिपोर्टांत उमेदवारांची सद्यःस्थिति व त्यांच्या उन्नतीची दिशा दाखवून दिली असून ती चिंतनीय आहे. निरनिराळे धंदे व कला शिकण्याकरितां परदेशांत हिंदी उमेदवार गेले पाहिजेत याची जाणीव लोकांना होऊं लागली आहे. १९२२ सालीं रा. समर्थ यांनीं असेंब्लीमध्यें, नौकाबंधन, नौकाशिल्प, समुद्रशास्त्र, बीनतारी संदेश, शस्त्रास्त्रें तयार करणें, खनिखोदन वगैरे देशाच्या हिताचे अनेक कला व धंदे, हिंदी व आंग्लो–इंडियन यांनीं शिकण्याकरितां मध्यवर्ती तिजोरींतून दरवर्षी निदान सहा लाख रुपये खर्ची पडावेत असा ठराव पुढें आणिला व तो पासहि झाला. त्याची अंमलबजावणी सरकार कसें करितें तें पहाणें आहे. सरकारापूर्वी हिंदी कारखानदारांनीं या बाबतींत मन घालून उमेदवारांनां चांगलें उत्तेजन देणे हें त्यांचें कर्तव्य आहे.

**उमेरिया**—मध्य हिंदुस्थान. रेवा संस्थानांतील एक शहर व कोळशाच्या खाणींचें केंद्रस्थान, बंगाल नागपूर रेल्वेच्या कटनी–बिलासपूर फाट्यावर आहे. सन १९०१ सालीं लोकसंख्या ५३८१ होती. सन १८८१ सालापासून म्हणजे कोळशाच्या खाणी सुरू झाल्यानंतर उमेरिया येथें वस्ती होऊं लागली. गोंडवणाच्या बाराकर भागांत सदरहु खाणी लागलेल्या आहेत. सन १८८१ पासून १८८५ पर्यंत संस्थानच्या व्यवस्थेंत खाणींचें काम चाललें होतें. नंतर खाणीची व्यवस्था हिंदुस्थान सरकारनें आपल्याकडे घेतली. १९०० सालीं दरबारनें खाणी पुन्हां आपल्या वहिवाटीखालीं आणल्या.

**उर**—हें प्राचीन बाबिलोनी शहरांपैकीं एक प्रसिद्ध शहर होतें. सांप्रत ह्या ठिकाणीं मुघैर अथवा मुकेयरचें टेंकाड आहे. हें बॅबिलोनच्या आग्नेयीस १४० मैलांवर, उत्तर अक्षांश३०°९५'व ४६°५' पूर्व रेखांश यांवर होतें. एननारचें प्रसिद्ध मंदीर येथें होतें व या ठिकाणीं ननार ( नंतरची सिन ) या चंद्रदेवतेची पूजा होत असे. खाल्डियन लोकांच्या अमलाखालील उर हें अब्राहामचें मूळ गांव होतें असा बायबलांत उल्लेख आहे. उर हें प्राचीन काळीं राजकीय व व्यापारी दृष्टीनें फार महत्त्वाचें होतें. सुमेरियन काळांत ( इ. स. पूर्वी ३ हजार ) उर हें बाबिलोनियांत प्रमुख होतें. लवकरच सेमेटिक वर्चस्व व सत्ता सुरू झाली. सारगानच्या वंशजांनंतर राजा उरगुर अथवा उर–एनगर याच्या अमलाखालीं उर शहर फार पुढें आलें. त्या वेळीं याची सत्ता दक्षिण व उत्तर बाबिलोनियांवर होती. उरचें प्राधान्य एलामाईट स्वारीपर्यंत होतें. खामूरबीनें बाबिलोनियन साम्राज्याची स्थापना केल्यामुळें ( इ. स. पूर्वी २७४० ) उरचें राजकीय स्वातंत्र्य व महत्त्व कमी झालें. पुढें बाबिलोनी काळाच्या शेवटपर्यंत उर हें धार्मिक व वाङ्मयात्मक बाबतींत प्रसिद्ध होतें. एननार देवालयाचे अवशेष वायव्य भागांत सांपडतात. याशिवाय बरेच शिलालेख व कांहीं इमारतींचे अवशेष सांपडले आहेत.

**उरगप्पा दंडनाथ**—इरुगप दंडाधिनाथ ( आफ्रेक्ट कोश ) हा कवि लष्करी खात्यांतील मोठ्या पदवीचा सरदार होता. कोणी म्हणतात कीं, विजयानगरचा राजा हरिहरराय याच्या पदरीं हा असे. याची गति संस्कृत व्याकरणांत चांगली होती. यानें नानार्थरत्नमाला आणि एकाक्षर निघंटु असे २ कोश केले. [ कविचरित्र. आफ्रेक्ट कोश ].

**उरण**—मुंबई. कुलाबा जिल्हा. पनवेल तालुक्यांतील एक गांव. उत्तरेस कारंजा नांवाचें बेट असून मुंबईच्या आग्नेयीस आठ मैलांवर आहे. १९०१ सालीं लोकसंख्या १२२३७ व १९११ त ८७४८ होती. सन १८६६ त या ठिकाणीं म्यु. कमिटीची स्थापना होऊन १९०३–४ सालीं उत्पन्न १० हजार झालें होतें. दारूबद्दल उरणची प्रसिद्धी पूर्वीपासून आहे. परगांवाहून मोहाचीं फुलें येऊन येथें दारू तयार होते.(मुं. गॅ. ठाणें जिल्हा पहा.)दारू तयार करण्याच्या भट्ट्या १९ असून येथून मुंबई, कुलाबा ठाणें या जिल्ह्यांनां दारूचा पुरवठा होतो. १९०३–४ सालीं निर्गतमाल ८३ लक्ष रुपयांचा असून आयात निव्वळ दहा लक्षपर्यंत होती. हें प्राचीन काळीं शिलेदारांचें एक ठिकाण होतें. येथील संगमेश्वर महादेवाचें देऊळ रामजी महादेव नांवाच्या सर सुभेदारानें ( १७६०–१७७२ ) बांधिलें. जामामशीद १७५० त बांधिलेली आहे. भीमाल तळें मॅन्युएल डिसोझा म्हणून येथें एक मामलेदार होता. त्यानें सुमारें ( १८५० ) त खोदून भोंवतालीं दगडी भिंती बांधल्या. हल्लीं उरणगांव ज्या ठिकाणीं वसलेलें दिसतें, त्या जागीं पूर्वी एक किल्ला होता. त्याचे कांहीं अवशेष अद्याप दिसतात. ( मुं. गॅ. पु. १३. इं. गॅ. २४ ).

**उरल पर्वत**—आर्क्टिक महासागरापासून दक्षिणेकडे जवळ जवळ कास्पियन समुद्रापर्यंत पसरलेली ही पर्वतांची

रांग यूरोप व आशिया या दोन खंडांच्या सरहद्दीवर आहे. वर्णनाच्या सोयीकरितां या पर्वताचे उत्तरभाग, मध्यभाग व दक्षिणभाग असे तीन भाग करतां येतील.

(१) उ त्त र भा ग.—हा खडकाळ, कडे व सुळके यांनीं युक्त असा असून यांतील सर्वांत उंच अशीं शिखरें खर्देयूस (३७१५ फू.) व पाइयर (४६५० फू.) हीं होत. पर्वतभागाचा उताराचा प्रदेश बहुतेक दाट अरण्यांनीं व्यापलेला आहे. तेथें यूरोपांतील फर व पाईन वगैरे प्रकारचीं झाडें मुबलक आढळतात. उत्तर बाजूस सुमारें २४०० फूट उंचीपावेतों वनस्पतींची वाढ आहे. त्यापुढें ही कमी कमी होत जाते. उत्तर अक्षांश ६५° वरच्या टापूंत वनस्पतींची वाढ मुळींच नाहीं.

उत्तरभागांत मोडला जाणारा असा एक फांटा उत्तर ६१° आणि ६४° अंश यांच्या दरम्यान आहे. येथें बऱ्याच विस्तीर्ण दलदलीच्या दऱ्या असून वनस्पतींची वाढ विपुल आहे. या भागावर लोकवस्ती नाहीं.

(२) म ध्य भा ग.—हा भाग ६१° आणि ५५°३०' उत्तर अक्षांश यांच्या दरम्यान असून येथें अत्युत्तम लोखंड, तांबें व सोनें यांच्या खाणी बऱ्याच आढळतात. उत्तर टोंकावर एक शिखर (मा. डेनेझकिन कामेन) व दक्षिण टोंकावर दुसरें शिखर (मा. तारान्यश) आहे. हा भाग दाट अरण्यांनीं व्यापलेला आहे. या भागांत बऱ्याच खाणी असल्यामुळें दऱ्या आणि उताराची जमीन बरीच सुपीक असल्यामुळें येथें बरींच खेडीं वसलेलीं आहेत.

(३) द क्षि ण भा ग.—उत्तर अक्षांश ५१° ते ५५°३०' यांच्या दरम्यान हा भाग असून पृथक् असा आहे. एकंदर उंची २८०० फुटांपेक्षां जास्त नाहीं. पश्चिमेकडे व दक्षिणेकडे पर्वताचे फांटे गेलेले आहेत. ठिकठिकाणीं प्रदेश अरण्यमय असा आढळतो. बहुतेक प्रदेशांत रशियन लोक वसाहती करूं लागले आहेत.

उरल पर्वताला भूस्तरशास्त्रविषयक महत्त्व बरेंच देण्यांत येतें. कारण येथें निरनिराळ्या प्रकारचीं खनिज द्रव्यें सांपडतात. उत्तम प्रकारच्या सोनें, तांबें वगैरे निरनिराळ्या धातूंच्या खाणी या भागांत बऱ्याच असल्यामुळें व्यापारविषयक महत्त्व दिवसानुदिवस वाढत जात आहे. वसाहतींचें प्रमाणहि वाढत जात असून लोकस्थिति चांगली आढळते. गिझनी–तागिल्स्क येथील लोखंडाचा व बोगास्लोव्हस्क येथें पोलादाचा कारखाना सुप्रसिद्ध आहे.

**उरलि.**—त्रावणकोरमधील एक डोंगरी जात. प्राचीन काळीं आपण फार पराक्रमी होतों असें हे म्हणतात. लो. सं. (१९११) ५७५८. हे शिकार चांगली करतात व रखवालदाराचें काम करतात. हे चांगल्या टिकाऊ चटया विणतात. यांच्यांत विटाळाचें फार बंड आहे. मरुमक्कथायम वारसाचा कायदा यांच्यांत प्रचलित आहे. विधवाविवाह असंमत नाहीं. प्रेतें पुरण्यांत येतात. हे लोक ओझीं नेहमीं पाठीवर वाहून नेतात. डोक्यावरून कधींहि नेत नाहींत.

**उरवकोंड**—मद्रास. अनंतपूर जिल्हा. गुत्ती तालुक्यांतील एक गांव. लोकसंख्या (१९०१) ९३८५ असून येथें नायब तहसिलदाराची कचेरी असते. मुख्य रस्ता चांगला रुंद असून दोहोंबाजूला झाडें लावलेलीं आहेत. गुत्ती तालुक्यांतील उरवकोंड ही व्यापारी घडामोडीची जागा असून येथील विणकामाची प्रसिद्धी बरीच आहे.

**उरिया, उडिया**—ओरिसांतील आर्य भाषा. अंदमान, निकोबार बेटें, आसाम, बंगाल, विहार व ओरिसा, ब्रह्मदेश, वऱ्हाड व मध्यप्रांत, मद्रास, हैदराबाद व म्हैसूर संस्थानें या भागांत उडिया भाषा बोलणारे लोक आहेत. उडिया बोलणारांची एकंदर संख्या (१९११) १०१६२३२१असून विहार, ओरिसा व मद्रास या प्रांतांतून ती फार दिसते.

या भाषेंतला पहिला लेख इ. स. १६ व्या शतकांतला आहे. उरिया लिपि बोजड व चमत्कारिक असल्यानें, ही भाषा वाढावी तशी वाढत नाहीं. ही लिपि मूळांत देवनागरीप्रमाणेंच आहे पण स्थानिक लेखक ती ताडपत्रावर लिहितात. ताडपत्रावर खिळ्यासारख्या लेखणीचे उठलेले ओरखाडे स्पष्ट वाचतां येतात. पण ते अधिक स्पष्ट दिसण्याकरितां पानाला शाई फांसण्यांत येते. ताडाचें पान अतिशय लवकर फाटणारें असल्यानें त्यांतील रेषांना समांतर असे ओरखाडे ओढले तर पान फाटतें.त्यामुळें देवनागरींतल्याप्रमाणें डोक्यावरच्या रेषा अक्षरांनां काढतां येत नाहींत व उभें लिहावें तर पान अरुंद असतें. म्हणून उरिया लेखक प्रत्येक अक्षराभोंवतीं वाटोळ्या रेषा काढतो. छापील उडिया पुस्तक वाचणें म्हणजे डोकेफोड होय. कारण टाईप बारीक असून प्रत्येक अक्षराचा स्थूल आकार वाटोळा असतो. त्यामुळें वर्तुळमध्यांत असलेलीं बारीक अक्षरें पहाण्यास फार त्रास पडतो. उडिया पुस्तक उघडतांच पहिल्यानें आपणांस सर्वच वर्तुळें दिसतील; पण पुन्हां एकदां बारीक दृष्टि फिरविल्यास प्रत्येक वर्तुळांत कांहीं तरी अक्षर आहे असें दिसेल.

उडिया व्याकरणपद्धति कांहींशी बंगालीसारखी असल्यानें ती बंगालीची एक पोटभाषा आहे असें कलकत्त्याचे पंडित म्हणत आले आहेत, पण तें चुकीचें होय. बंगाली व उडिया या भाषा सारख्या आहेत हें खरें पण एक दुसरीपासून निघालेली नसून दोन्ही प्राचीन मागध अपभ्रंशापासून निघालेल्या आहेत. उडिया व बंगाली यांचा संबंध ग्रीयर्सननें चांगला दाखविला आहे (सेन्सस ऑफ इंडिया, १९०१ पु. १. भा. १). भत्री पोटभाषा उडिया व मराठी यांमधली असून ती मराठी लिपींत लिहिली जाते.

प्रथम तेलंगी राजे, नंतर मराठी राजे (भोंसले)यांचें वर्चस्व पूर्वी ओरिसांत असल्यानें उडिया भाषेंत बरेच तेलगु व मराठी शब्द आणि म्हणी आलेल्या आहेत. यांखेरीज तींत

कोणत्याहि भाषेचें फारसें मिश्रण होत नाहीं. या भाषेंतलें वाङ्मय बरेंच मोठें असून, तें बहुतेक धार्मिक व पद्यमय आहे.

सुमारें शंभर प्रसिद्ध ग्रंथकारांच्या कृती या भाषेंत आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें व त्यांचे ग्रंथ पुढें अनुक्रमानें दिले आहेत अच्च्युतानंद दास याचे अच्च्युतानंद मालिका व सप्त भागवत हे दोन ग्रंथ आहेत. अभिमन्यु सामंतसिंह याचे विदग्ध चिंतामणि, प्रीति–चिंतामणि असे राधाकृष्णांच्या लीलावर्णनपर ग्रंथ आहेत. गुमसारचा राजा उपेंद्रभंग यानें चंद्ररेखा, चित्रलेखा, हेममंजरी, कामकला, मनोरमा, प्रेमलता वगैरे अद्‌भुतरसयुक्त, अभिनवरसतरंग, सुभद्रापरिणय वगैरे पौराणिक कथानकांवर रचलेले व चित्रकाव्य बंधदाय, रसपंचक, षड्‌ऋतु ( कालिदासाच्या ऋतुसंहाराचें रूपांतर ) संगीतकौमुदी, पुरुषोत्तममाहात्म्य वगैरे अनेक भिन्न भिन्न विषयांवर सुमारें ४२ ग्रंथ केले आहेत. कृष्णमिश्राचा साहित्यरत्नाकर अलंकारटीका नांवाचा ग्रंथ व कांहीं संस्कृत ग्रंथ आहेत. कृष्णसिंह यानें भारत, रामायण व भागवत यांचीं भाषांतरें केलीं आहेत. गोपिनाथ कविभूषण याचे रामचंद्रविहार या नांवाचा रामवनवास वर्णनात्मक व कविचिंतामणि नांवाचा छंदःशास्त्रावरील ग्रंथ हे प्रसिद्ध आहेत. चक्रदत्त याचा त्याच नांवाचा वैद्यशास्त्रावरील ग्रंथ प्रमाण मानला जातो तर जगन्नाथदास याचें भागवताचें भाषांतर विशेष लोकप्रिय आहे. याचाच पाषंड दलन नांवाचा एक ग्रंथ आहे. त्रिपुरारिदास यानें रामकृष्ण केलिकल्लोल, राधाकृष्ण केलिकल्लोल व केरलगीता नामक ज्योतिषग्रंथ केले आहेत. दीनकृष्णदास उर्फ सिंधु हा इतका लोकप्रिय ग्रंथकार होता कीं त्यास प्रत्यक्ष जगन्नाथाचा पुत्र असें मानीत. यानें कृष्णदासावलि, माधवकरगीता असे वैद्यकविषयक, रसकल्लोल, चक्रधरविलास, मधुसुदनविलास, गुणसागर, उज्वल नीलमणिकारिका वगैरे राधाकृष्णांच्या क्रीडावर्णनपर, प्रतापसिंधु नांवाचा वसिष्ठरामचंद्रांच्या संवादपर असे बरेच ग्रंथ केले आहेत. धरणीधर यानें जयदेवाच्या गीतगोविंद काव्याचें भाषांतर केलें आहे. नारायण पुरोहित याचा वृत्तरत्नाकर, नीलांबर भंज याचें कृष्णलीलामृत व पंचसायक, पद्मनाभपरीक्ष याचा गीतताल प्रबंध नांवाचा संगीतविषयक, असे प्रसिद्ध ग्रंथ आहेत. पीतांबरमिश्र कविचंदन यानें नारायणशतकटीका, जातकालंकार टीका, पीतांबरी चंडी वगैरे टीकाग्रंथ केले आहेत. बलभद्र भंज हाहि गुमसरचा राजा असून प्रसिद्ध कवि होता. बलरामदास यानें बेधापरिक्रम ( जगन्नाथाच्या प्रदक्षिणेचें विस्तृत वर्णन ), अर्जुनगीता, भवसमुद्र, भगवद्गीता. भक्तिरसामृतसिंधु, गौरवगीता, गुप्तगीता, गीतासार, रामायणाचें भाषांतर वगैरे अनेक ग्रंथ केले आहेत. महादेवदास यानें पद्मपुराण, मार्कंडेयपुराण, माघमहात्म्य, रामायण वगैरे संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें केलीं आहेत. लोकनाथ विद्याधर यानें चित्रकला, सर्वांगसुंदरी, चित्तोत्पल वगैरे प्रेमविषयकच ग्रंथ रचले आहेत. वसुदेवशर्मा यानें साहित्यदर्पणटीका, प्रभास्मृति या नांवाचे ग्रंथ केले आहेत. विश्वनाथ दास कवि उर्फ पुरुषोत्तम विश्वनाथ यानें केलेल्या विचित्र रामायणांतील उतारे लोकांनां मुखोद्गत असतात, व रामायणांतील कांहीं प्रसंग नाटकरूपानें दाखविण्याच्या वेळीं ते म्हणूनहि दाखवितात. श्रीपतिदास नांवाच्या ब्राह्मण कवीनें आपल्या नांवाचा ज्योतिषविषयक ग्रंथ केला असून तो मान्य गणला जातो. सदानंद सूर्यब्रह्म नांवाच्या ग्रंथकाराचे विस्तार नीलमणी, नामाचिंतामणि, प्रेमतरंगिणी, प्रेमलहरी, जुगलरसामृतलहरी, वगैरे भक्तिरसपर ग्रंथ आहेत. सरलदास कवीनें महाभारताचें भाषांतर उरिया भाषेंत केलें आहे. हलधरदास याचें अध्यात्मरामायणाचें भाषांतर असून तें विचित्ररामायणाची बरोबरी करणारें आहे.

या खेरीज ज्यांचे कर्ते निश्चित माहीत नाहींत असे अनेक महत्त्वाचे ग्रंथ या भाषेंत आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें पुढीलप्रमाणेः— अर्थकेलि, अश्वत्थक्षेत्रमाहात्म्य, वसंतकेलि, भक्तिरसामृतसिंधु, ब्रह्मज्ञान, चैतन्यचरितामृत ज्ञानचंद्र चूडामणि व इतिहाससलेखन ( अध्यात्मिक ), शिवपुराण, शिवलीलामृत. इ.

**उरी.**—मद्रास. कोलार जिल्हा. बौरिंगपेठ तालुक्यांतील एक गांव. हें बौरिंगपेठपासुन रेल्वेवर ७ मैलांवर आहे. ( १९०१ ) सालीं लोकसंख्या ६३८७ असून या ठिकाणीं १३ व्या शतकांतील रामनाथ होयसाल राजाच्या वेळचा एक तामिळ शिलालेख आहे. सोन्याच्या खाणी जवळपास असून अशोधित सोनें काढण्याला आरंभ १८७५ सालीं झाला व १८८५ सालीं राबर्टसनपेठ नांवाचें नवें शहर वसलें.

**उरुळी**—पुण्याच्या पूर्वेस १८ मैलांवरील एक खेडेंगांव. लो. सं. ( १८८१ ) १५८७. येथून जेजूरीस जाण्यास रस्ता आहे. १८१७ मध्यें येथील लोकांनीं दोन गोऱ्या ऑफिसरांस व त्यांच्याबरोबरच्या लोकांस पकडून नेलें. पैकीं दोन ऑफिसरांस पुण्यास पोहोंचवून देऊन इतरांस ठार केलें. या दोन ऑफिसरांस पुढें वासोटा ( साताऱ्याच्या आग्नेयीस ४० मैल ). येथील किल्ल्यांत नेऊन ठेविलें. पुढें इंग्रजांनीं हा किल्ला घेतला व त्यांस सोडविलें.

**उरोगामी**—या प्राणिवर्गांत सरडा, पाल, घोरपड, सर्प, कांसव व नक्र इत्यादि सरपटणारे प्राणी येतात. यास इंग्रजींत ‘ रेप्टाईल ’ असें म्हणतात.

**लक्षणें**—उरोगामी अथवा सरपटणारे प्राणी यांचा वर्ग सपृष्ठवंशांतील शीतरुधिर ( कोल्डब्लडेड ), सशीर्ष ( क्रानिएटा ) विभागांत येतो. जे पूर्वकालीन सपृष्ठवंश (व्हर्टिब्रेटा)प्राणी पहिल्याप्रथम पाण्यापासून अलिप्त झाले व स्वतंत्रपणें जमीनीवर राहूं शकले त्यांचे हे उरोगामी प्राणी वंशज होत. जलस्थलचरप्राणी उदाहरणार्थ, बेडूक यांच्यामध्यें ज्याप्रमाणें अर्भकाला त्याचा पूर्ण विकास होईतों श्वासोच्छ्वासाच्या

क्रियेकरितां कांहींकाल पाण्यांत दवडावा लागतो तशी गरज या वर्गांतील प्राण्यांनां लागत नाहीं. कारण परिपूर्णतावस्थेंत या प्राण्यांत भ्रूणाच्या ( एंब्रिओ ) नालाच्या (ॲलनटोइक) भागापासून एक बाह्य शरीरावरण तयार होतें व तें अशा प्रकारचें असतें कीं, त्यांतून रुधिराभिसरण होऊं लागतें, व या रुधिराभिसरणामुळें श्वासोच्छ्वासाची क्रिया म्हणजे रुधिराशीं हवेंतील प्राणवायूचें संलग्न होणें ही घडून येते. नालाच्या भागापासून झालेल्या या शरीरावरणाला नालावरण ( ॲले-न्टाईस ) म्हणतात. अशा प्रकारचें शरीरावरण पक्षी व सस्तन ( मॅमल्स ) या वर्गांतील प्राण्यांतहि बनत असतें. तसेंच परिपूर्णतावस्थेंत भ्रूणाचें पूर्व व पश्चिम शेवट व पृष्ठभाग मिळून सर्व एका बाह्यास्तरणाच्या ( एपिब्लॅस्टिक ) आवरणानें आच्छादिले जातात. म्हणजे भ्रूणाच्या पूर्व व पश्चिम शेवटा-पासून तसेंच दोहोंकडेनें पृष्ठभागावर बाह्यास्तराचा भाग वाढतो. व त्यामुळें भ्रूणाचे हे सर्व भाग या बाह्यास्तराच्या आवरणानें आच्छादिले जातात. तेव्हां अर्थातच भ्रूणाच्या या भागासभोंवतीं हा एक बाह्यास्तराचा कोश तयार होतो व या कोशाच्या विवरांत एक उदकरूपी द्रव सांठतो. म्हणजे भ्रूणाचें पूर्व व पश्चिम शेवट व पृष्ठभाग ह्या उदक-पूर्ण कोशानें आच्छादिले जातात. व या उदकपूर्ण कोशाचा उपयोग वाढत्या शरीराच्या रक्षणार्थ होतो. याला भ्रूणो-दककोश ( ॲम्निअन ) म्हणतात. ॲम्निअन किंवा भ्रूणोदक-कोश हा पक्ष्यांत व सस्तन प्राण्यांतहि झालेला असतो, व नालावरण व भ्रूणोदककोश हीं दोन्हीं आवरणें एक-समयावच्छेदेंकरून या तीन वर्गांत होतात. म्हणून उरोगामी पक्षी व सस्तन प्राणी यांनां नालावरणसहित (ॲलेन्टॉईडिया) व भ्रूणोदककोशसहित ( ॲम्निओटा ) असें म्हणतात. तेव्हां सपृष्ठवंशांतील हे तीन वर्ग मासे व स्थलजलचर या दोन वर्गांपासून भिन्नता पावतात. कारण या दोन वर्गांत नाला-वरण व भ्रूणोदककोश हे बनत नाहींत. यामुळें या वर्गांनां नालावरणरहित (अनॅलेन्टाईडिया) अथवा भ्रूणोदककोशविहीन ( अनॅम्निओटा ) म्हणतात. सपृष्ठवंश प्राण्यांत उरोगामी प्राण्यांचा वर्ग जणूं कांहीं एक मध्यवर्ती असलेला समूह असा झालेला दिसतो व या उरोगामी प्राण्यांचें पक्षी व सस्तन या वर्गांतील प्राण्यांशीं जितकें परस्पर सादृश्य आहे असें दिसतें, तितकें त्यांचें मासे व स्थलजलचर या वर्गांतील प्राण्यांशीं असलेलें दिसत नाहीं. पक्षिवर्गांशीं या उरोगामी वर्गाचें जास्त साम्य असल्याकारणानें उरोगामी व पक्षी या दोन वर्गांस वर्गीकरण करतांना एकाच विभागांत एकत्र केलें जातें व त्या विभागाला सौरोसीडा ही संज्ञा देतात.

उरोगामी अथवा सरपटणारे प्राणी हे शीतरुधिर सशीर्ष प्राण्यांमध्यें मोडत असून त्यांच्यांत बाह्य त्वचेंतून ( एपि-डर्मल ) शृंगमय पदार्थांचे खवले झालेले असतात व या खवल्यांचें शरीराला एक कवचरूपी आच्छादन बनतें. हें बाह्य त्वचेचें कवच मधून मधून काढून टाकलें जातें व तें पुन्हां पुन्हां तयार होतें. सर्पांमध्यें याला कात म्हणतात. पुष्कळ वेळां हें कवच श्वेतत्वचेंतून ( डर्मल ) झालेल्या अस्थिमय तगटांचें बनून बाह्यत्वचेच्या खवल्यांनीं आच्छा-दित असें झालेलें असतें. उदाहरणार्थ, कांसव व नक्र यांचें कवच. या वर्गांतील प्राण्यांच्या विशेषेंकरून आधुनिक विद्यमान उरोगामी प्राण्यांच्या पाठीचा कणा तपासला असतां असें आढळून येईल कीं, बहुतकरून मणक्यांचे कशेरुघन ( सेंट्रा ) पूर्वेखात (प्रोकॉइस) असे बनलेले असतात. तसेंच त्यांच्यांत त्रिकास्थि (सॅक्रम) हें बहुशः दोन मणके किंवा कशेरू जुळून झालेलें असतें. अस्थिपंजरांतील पूर्वउरोस्थि ( प्रिस्टर-नम ) जेव्हां झालें असतें तेव्हां तें जत्रूपासून ( क्लॅव्हिकल ) अलग रहातें व प्रगंडास्थिसंधिविवराच्या ( ग्लेनॉइड कॅव्हिटी ) भूमीचा भाग बहुतेक अस्थिमय झालेला असतो. तसेंच दोहों बाजूंचे भगास्थि ( प्यूबिक बोन्स ) व कुकुंद-रास्थि ( इश्चिआटिक ) ह्यांचा उदरतलभागीं बहुशः एकमे-कांशीं संयोग झालेला असतो. पादकूर्चशिरोस्थि (मॅटाटार्सल्स) व पादकूर्चास्थि ( टार्सल्स ) हे जुळलेले नसतात. या वर्गां-तील प्राण्यांत तोंडाचे जबडे बहुतकरून दंतपंक्तिवाहक असे झालेले असतात. मेंदूमधील चक्षुमस्तिष्क ( ऑप्टिक लोब्ज ) मेंदूच्या पृष्ठभागावर असणारे असे बनलेले अस-तात. या वर्गांतील नक्रगणांखेरीज करून इतर सर्व प्राण्यांत हृदयाच्या निःसारकर्णांचे ( व्हेंट्रिकल्स ) दोन भाग क्वचितच पडले जातात. म्हणजे सुसरींत निःसारकर्ण दोन कप्प्यांचें झालेलें असतें व इतर सर्व प्राण्यांत निःसारकर्णाला एकच कप्पा असतो. या वर्गांतील पूर्ण वाढ झालेल्या प्राण्यांत महाधमनीच्या ( एओर्टा ) दोन कमानी एक डावीकडे व दुसरी उजवीकडे अशा झालेल्या असतात.

व र्गी क र ण.—उरोगामी या वर्गांतील प्राण्यांचें वर्गी-करण खालीं दिल्याप्रमाणें आहे.—

गण १ ला—शल्कयुक्ततनु ( स्क्वॅमेटा ), उपगण–सरट गण ( लॅर्टालिज ), अपादउरग ( ऑफिडिया ),गण २रा–कूर्मगण ( चेलोनिया ), गण ३ रा–नक्रगण (क्राकोडिलिया ); गण ४ था–ऱ्हिंचोसिफॅलिया; गण ५ वा निर्वंश होऊन नष्ट झालेले.

उरोगामी वर्गांतील पुष्कळ प्राणी निर्वंश होऊन नष्ट झालेले आहेत. त्या सर्वांचे प्रस्तरीभूत ( फासिलाइज्ड ) अस्थि-पंजर इत्यादि अवशेष भागांवरून असें अनुमान निघतें कीं, हे प्राणी पक्षी व सस्तन प्राण्यांच्या पूर्वी या पृथ्वीच्या पाठीवर अस्तित्वांत आले. दुसरें असें कीं या वर्गाच्या आधुनिक गणां-तील प्राण्यांहून पूर्वीचे प्राचीन उरोगामी प्राणी भिन्न होते व त्यांचें वर्गीकरण केलें असतां त्यांचे निरनिराळे गण पड-तील, व ते प्राणी स्थूल मानानें पाहूं गेलें असतां आधु-निक प्राण्यांहून आकारानें मोठे असावेत. त्यांत कांहीं गण हवेंत उडणाऱ्या प्राण्यांचे होते तर कांहीं स्थलजलचर असेहि होते. आधुनिक उरोगामी प्राणी त्यांच्यापासून

पायरी पायरीनें भिन्नता पावून झालेले दिसतात. तेव्हां साधारणतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, उरोगामी प्राण्यांचा सपृष्ठवंश प्राण्यांमध्यें एक मध्यवर्ती असा समूह बनला, व त्या . अन्वयें त्यांच्यांतील कांहीं निर्वंश-गण आधुनिक स्थलजलचर म्हणजे बेडूक वर्ग यांच्याशीं साम्यता दाखवितात व याशिवाय त्यांच्यांतील दुसरे निर्वंश-गण पक्ष्यांशीं साम्यता दाखवितात व याशिवाय त्यांच्यांतील दुसरे कांहीं निर्वंशगण सस्तन वर्गांतील कांहीं प्राण्यांशीं साम्यता दाखवितात. एवढ्यावरून यांतील अमुकच एखादा निर्वंश-गण पक्ष्यांच्या किंवा सस्तनप्राण्यांच्या पूर्व पिढींतला गण होय असें जरी म्हणतां येणार नाहीं तरी एवढी गोष्ट बहुतकरून सिद्ध होते ती ही कीं, कांहीं फेरबदल होत असलेल्या उरो-गामी प्राण्यांपासूनच निरनिराळ्या रीतीनें पक्षी व सस्तन प्राणी यांच्या दोन शाखा स्वतंत्रपणें उत्पन्न झाल्या आहेत.

गण ( ऑर्डर ) शल्कयुक्ततनु ( स्कामाटा ) सरड, पाल, घोरपड, सर्प इत्यादि प्राण्यांचीं लक्षणेंः— सरट किंवा सरडा, पाल ( पल्लि ) घोरपड इत्यादिकांसारखे प्राणी तसेच सर्प व त्यांच्या सारखे प्राणी हे या शल्कयुक्त-तनु प्राण्यांच्या गणांत मोडतात. शल्कयुक्ततनु प्राण्यांचा गण हा उरोगामी वर्गाच्या गणांपैकीं एक होय. या गणांतील प्राण्याचें शरीर बाह्यतः बाह्यत्वचेपासून झालेलें ( एपिडर्मल ) शृंगमय शल्क किंवा खवले यांनीं आच्छादिलेलें असतें. याशिवाय कांहींमध्यें श्वेतत्वचेंतूनहि ( डर्मल ) अस्थिमय घट्टे झालेले असतात. या प्राण्यांच्या शरीराच्या पश्चिम अप्रान्त त्वचाविवराचें बाह्यमुख ( क्लोकल ॲपरचर ) आडवें पसरलेलें असतें. या गणांतील प्राण्यांत नराला शिस्नासारखे दोन अवयव असतात. पाठीच्या कण्यासंबंधीं मणक्यांचे कशेरुघन ( सेंट्रा ) बहुतकरून पूर्वखात ( प्रोकॉक्लस ) असे बनलेले असतात. या गणाचे दोन उपगण आहेत. त्यांपैकीं अपादउरग ( ओफिडिआ ) ह्या उपगणांतील अहिसमूह व अजगरसमूह यांमध्यें अस्थिपंजराला त्रिकास्थि ( सॅक्रम ) जें झालेलें नसतें तें सरटगण ( लॅसर्टिलिआ ) या उपगणांत दोन कशेरु अथवा मणके जूळून झालेलें असतें. पर्शुकांचीं कण्याला जोडलेलीं टोंकें साधीं एकेरीं असतात. करोटीपैकीं क्वाड्रेटास्थि अथवा हनुसंधानास्थि ह्याची हालचाल होऊं शकेल अशा रीतीनें तें करोटीला जूळून बनलेलें असतें. शीर्षाच्या भागांत कानपट्टीच्या अथवा कपोलपट्टीच्या ( टेंपो-रल आर्च ) खालच्या भागाचा उठाव या प्राण्यांत बरोबर झालेला नसतो. करोटीला लागलेलीं नासाछिद्रें निरनिराळीं अशीं बनलेलीं असतात. या गणांतील प्राण्यांत गात्रें झालेलीं असली तर ती त्यां प्राण्यांना जमीनीवर चालण्यास उपयोगीं पडतात ( उदाहरणार्थ सरड, घोरपड). अथवा तीं त्यांना पाण्यांत पोहोण्यास उपयोगीं पडतात. उदाहरणार्थ कांहीं नष्ट झालेला अजगरसमगात्रयुक्ततनु ( पायथेनोमॉर्फा ) होय. या गणांतील प्राण्यांत दांत हिरडीच्या वरच्या धारेला लागलेले असतात किंवा तिच्या अंतःपृष्ठाला लागलेले असतात. श्वासनेंद्रियें म्हणजे फुप्पुसें हीं साध्या पोत्याप्रमाणें झालेलीं असतात. हृदयाच्या निःसारकर्णाला ( व्हेंट्रिकल ) एकच कप्पा असतो. तरी त्याच्या डाव्या व उजव्या बाजूच्या पोकळीच्या भागांच्या मध्यंतरांतील भाग थोडासा पडद्याप्रमाणें बनून रुंद छिद्रयुक्त असा असतो. मेंदूंतील चक्षुमस्तिष्कांचे गोल ( ऑप्टिक होल्स ) एकमेकांना लागून राहतात व अनुमस्तिष्क ( सेरिबेलम ) फारच लहान असें झालेलें असतें. या गणाचे वर सांगितल्याप्रमाणें दोन विद्यमान उपगण आहेत ते असे.—एक सरटगण ( लॅसरटिलिया ) व दुसरा अपादउरग ( ऑफिडिआ ). हा होय.

उ प ग ण, ( सबऑर्डर ) सरटगण ( लॅसर्टिलिया ) लक्षणेंः—सरड, पाल, घोरपड इत्यादि यांच्यासारखे प्राणी या सरटगणांत मोडतात. हा उपगण शल्कयुक्ततनु (स्कामाटा) या गणापैकीं एक असून यांतील प्राण्यांनां गात्रें झालेलीं असतात व त्यांचा उपयोग प्राण्याची हालचाल होण्यास होतो. या उपगणांतील प्राण्यांचें तोंड बेतानेंच उघडतें अथवा तोंडाचा आ फारसा पसरूं शकत नाहीं. मुखाच्या भागाला लागलेलीं कांहीं हाडें म्हणजे मुखास्थी ( मॅक्सिला) तात्वस्थि (पॅलाटाइन)व बटेरीगॉईड नामक अस्थि जशी अपादउरग उपगणांतील सर्पांच्या शरीरांत मोकळ्या रीतीनें हालतात तशी या उपगणांतील प्राण्यांच्या शरीरांत तीं हालूं शकत नाहींत. यांच्यांत तोंडाचा खालचा जबडा कांहीं हाडें मिळून झालेला असतो व हीं दोन्हीं बाजूचीं हाडें पूर्णपणें मध्याला सांध्यानें जोडलीं गेलेलीं असतात. या उपगणांतील प्राण्यांच्या नेत्रांनां हालणाऱ्या पापण्या झालेल्या असतात व कर्णपटल ( इअर ड्रम अथवा टिम्पॅनम् ) चांगलें बनलेलें असून पूर्णपणें व्यक्त होतें. अस्थिपंजरापैकीं उरःफलक ( स्टर्नम् ) व पूर्वोरःफलक ( एपिस्टर्नम् ) झालेले असतात.

हे प्राणी साधारणतः फार चपळ असतात, व यांची कातडी पुष्कळवेळां रंगीबेरंगी झालेली असते. ह्या कातडीचा रंग कित्येक प्राण्यांमध्यें बाह्य परिस्थितींतल्या वस्तूंच्या रंगाला मिळून असा झालेला असतो, व या कारणामुळें तो रंग या प्राण्यांना प्राणरक्षक होतो. सरड्यासारखे या उपगणांतील प्राणी मनःक्षोभ झाला असतां रंग बदलतात व त्यांनां तसें करतां येतें, याचें कारण त्यांच्या कातडींमध्यें कामरूप रंगीत पेशी असतात, व त्यांच्या संकोचविकासानें रंगांत फरक होतो. कांहीं जातिविशेषांमध्यें शेंपूट आपोआप मोडून टाकून देतां येतें. शेंपूट किंवा एखादें गात्र तुटून गेल्यास तें सबंध पुन्हां नव्यानें वाढूं शकतें. या प्राण्यांचें भक्ष्य म्हटलें म्हणजे षट्पद कृमि इत्यादि लहान लहान प्राणी होत. कांहीं वनस्पतिभक्षक आहेत. पाल ही कित्येकवेळां स्वजातिभक्षक बनते. अति थंड प्रदेशांत हे प्राणी आढळून येत नाहींत. हे उष्ण प्रदेशांत

सांपडतात. या उपगणांतील दहुतेक प्राणी जमीनीवरच वावरणारे आहेत. कांहीं झाडांवर राहतात; पाण्यांत क्वचितच असतात. समुद्रांत राहणारांहि एक जात आहे. या उपगणांतील कांहीं प्राणी जरायुज ( व्हिव्हिपॅरस ) आहेत.

या उपगणांतील कांहीं ठळक उदाहरणें खालीलप्रमाणें आहेत.—

(१)घोरपड—व्हारेनस. ड्रासीना, मॉनीटर अथवा व्हारेनस-बेंगालेन्सिस, घोरपड मांसभक्षक असून नक्रांचीं पिलें, व त्यांचीं अंडीं यांची तिला विशेष आवड असते. घोरपडीला पाण्यांत पोहोतां चांगलें येतें व बुडीहि मारतां येते. तरी हा प्राणी पाण्यांत रहाणारा नव्हे. याला पाण्यांतला प्राणी असें समजणें ही चूक होय. याच्या पिलाला द्वित्त अशी जिव्हा असते त्यामुळें या पिलांना लहानपणीं विषार असतो असा समज झालेला आहे व या कारणानें त्यांना. उत्तर हिंदुस्थानांत ' घोसांप ' ही संज्ञा देतात किंवा ' बिसकोब्रा ' असें म्हणतात.

(२)सरडा:—(अ)( क्यालोटीस व्हर्सिकोलर. ) हा प्राणी सर्वसाधारण आढळतो. ( ब ) क्यालोटिस रूक्सै. हा जातिविशेष मुंबईच्या जवळ माथेरानच्या टेकडीवर आढळतो.

(३) पाल.—( अ ) (हेमीड्याक्टीलस ग्लीडोव्हिआय.) (ब)हेमीड्याक्टीलस कॉक्टीआय हे दोन्ही जातीविशेष घरांतून वावर करणारे होत. ( क ) जेको व्हर्टीसिलेटस. हा घरांत अथवा झाडांवर असणारा प्राणी. हा एक प्रकारचा ध्वनि करीत असतो.

(४) पालीसारखे दिसणारे प्राणी. (अ) जिम्नोड्याक्टीलस कच्छेन्सीस. ( ब ) जि. डेकनेन्सीस हे दोन्ही जातीविशेष मुंबई इलाख्यांत आढळतात. ( क ) ओफीऑप्स जरडोनाय या प्राण्याचा पृष्ठभाग तांब्याच्या रंगाचा असून बाजूला दोन उभ्या पिवळ्या रेषा काळ्या रेषांनीं मर्यादित अशा असतात. उदरतलाचा भाग पिंवळट पांढरा असतो.

(५) उडणारा सरड-ड्राको डसूमैरी. या प्राण्याला पंखरूपी अवयव त्वचेचे झालेले असतात. मलबार, कोचीन त्रावणकोर या देशांतील अरण्यांत व माडांची व सुपारीची लागवड असलेल्या मळ्यांत हे आढळतात म्हणजे विशेषेंकरून पश्चिम किनाऱ्याच्या सखल प्रदेशांत हे प्राणी सांपडतात.

उपगण,(सबऑर्डर)-अपाद उरग ( ओफिडिया ) सर्व प्रकारचे सर्प. उदाहरणार्थः—भुजंग, घोणस, अजगर, दिवड, धामण, फुरसें इत्यादि या उपगणांत मोडतात. हा उपगण ' शल्कयुक्ततनु ' या गणांत येतो, व 'शल्कयुक्ततनु' उरोगामी वर्गाच्या गणांपैकीं एक गण होय.

या उपगणांतील प्राण्यांचे देह अरुंद-लांबोळे असून गात्रविहीन असतात. या लक्षणांवरून हे प्राणी इतर सर्व उरोगामी प्राण्यांहून भिन्न आहेत हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तरी सरटगणांतील कांहीं उरोगामी प्राणी गात्रविहीन आहेत. तसेंच स्थलजलचरांतहि कांहीं प्राणी गात्रविहीन आहेत व माशांनां अंगुलीयुक्त गात्रें नसतात. म्हणजे मासे सुद्धां गात्रविहीन असतात. तेव्हां यावरून असें अनुमान निघण्यासारखें आहे कीं, शरीरासंबंधीं आतां वर सांगितलेल्या प्राण्यांत व या अपादउरगांमध्यें साम्य आहे. परंतु येथें एक गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे कीं, शरीराकृतीसंबंधीं या अपादउरगप्राण्यांची आतां वर सांगितलेल्या प्राण्यांशीं जरी साम्यता दिसली तरी या अपादउरगांच्या शरीरांतील इंद्रियांच्या रचनेंत बरीच भिन्नता आहे. शरीराकृतीचें बाह्यतः साम्य असणें हें केवळ बाह्यपरिस्थिति सारखी असल्यानें व आयुष्यक्रम एकाच तऱ्हेनें कंठिला गेल्यामुळें घडून येतें व त्या आयुष्यक्रमाला अनुसरून तें साम्य अशाप्रकारच्या शरीराकाराची सयुक्तता दर्शवितें. या उपगणांतील प्राण्यांनां जणुं कांहीं जमीनींतील भेगांत शिरण्याच्या संवयीमुळें अथवा मोठमोठ्या अडचणींतून सरपटून जाण्याच्या संवयीमुळें गात्रविहीनता प्राप्त झाली आहे. परंतु ही अपादउरगांची गात्रविहीनता नुसती त्यांना बाह्यगात्रें नाहींत यावरूनच दिसण्यांत येतें असें नसून त्यांच्यांत असंमंडल ( पेक्टोरल गर्डल ) व उरःफलक ( स्टर्नम ) हीं कधींच विकास पावत नाहींत व श्रोणिमंडलहि (पेल्व्हिक गर्डल) झालेलें नसतें. कदाचित छायारूपानें तें अजगरसमूहामध्यें दिसून येतें.

या उपगणांतील प्राण्यांत बाह्यत्वचेंतून बनलेल्या शल्कांचें किंवा खवल्यांचें आच्छादन सर्व शरीरभर झालेलें असतें व तें कांहीं नियमित कालानें संबंध बाहेर काढून टाकण्यांत येतें. यालाच सर्पाची कात म्हणतात. हे खवले दोन तीन प्रकारचे असतात. कांहीं सर्पांत शीर्षाच्या पृष्ठावरील खवले फार मोठे व पत्र्याप्रमाणें चपटे असतात व ते स्पष्टपणें एकमेकांपासून विभक्त असे बनलेले असून फक्त ते त्यांच्या कांठांनीं एकमेकाला जुळलेले असतात; जसें धामण, नाग इत्यादि. पुन्हां शरीराच्या उदरतलभागावर चपटे, अरुंद व लांबट पत्र्याप्रमाणें बनलेले परंतु आडवे रचलेले असे खवले असून त्यांचे कांठ एकमेकांवर शाकारलेल्या कौलांप्रमाणें चढलेले असे असतात. ह्या खवल्यांनां ' शिल्ड ' म्हणतात. उदाहरणार्थः—धामण, नाग इत्यादि. कांहीं सर्पांच्या शीर्षाच्या पृष्ठावरील खवले लहान असून एकमेकांवर चढलेले असे असतात, जसें फुरसें. खवल्यांचे हे प्रकार सर्पांचें वर्गीकरण करण्यास उपयोगी पडतात. सर्पांनां तोंडाचा आ फारच विस्तृत प्रमाणावर पसरतां येतो. याचें कारण हें आहे कीं, सर्पांच्या तोंडांतील खालच्या जबड्याच्या दोन्ही बाजूंच्या हन्वस्थींचा (मॅंडिब्यूलर बोन) संधि होऊन तीं जोडलेलीं नाहींत परंतु तीं पूर्वमध्यभागीं एका लवचिक व स्थितिस्थापक अशा संधिबंधनाच्या योगेंकरून जोडलेलीं आहेत. तसेंच पुरोमुखास्थि ( प्रिमॅक्सिलरी ), मुखास्थि ( मॅक्सिलरी ), तात्वस्थि ( पलॅटाइन ), हनुसंधानास्थि ( क्वाड्रेट ) व टेरी-

गॉईड नामक अस्थि हीं सर्व हाडें शिथिलबंधनानें करोटीशीं जोडलेलीं असतात व त्यामुळें तीं पुढेंमागें फिरूं शकतात. सरटगणांत व या उपगणातील प्राण्यांत हा मोठा भेद आहे.

मुखक्रोडाच्या ( माउथ कॅव्हिटी ) आकारापेक्षां अथवा गलविवराच्या आकारापेक्षां मोठ्या आकाराचा एखादा प्राणी सर्प गिळंकृत करूं शकतात ते या वरच्या कारणामुळें होय. व हीं करोटीचीं मुखक्रोडाभोंवतालचीं हाडें शिथिलतेनें बसलेलीं आहेत याचें कारणहि या प्राण्यांनां मोठ्या आकाराचें भक्ष्य गिळण्यास सुलभ व्हावें हेंच होय. असें जरी असलें तरी ज्या करोटीच्या भागांत मेंदू बसलेला असतो त्या मस्तिष्कावरणाच्या ( ब्रेनकेस ) भागाचीं हाडें अव्वल व घट्ट रीतीनें जोडलेलीं असतात. करोटीचीं सर्व हाडें येथें देण्याची जरूरी नाहीं. मुखक्रोडांत खालच्या बाजूला दांत दंतास्थींना ( डेन्टेरिक्स अ. मॅंडिब्युलर बोन्स ) चिकटून लागलेले असतात. वरच्या बाजूस ते मुखस्थींना, तालव्यस्थींनां व टेरीगाईड नामक अस्थींनां लागलेले असतात. क्वचितच पुरोमुखास्थींना लागलेले असतात. या दांतांपैकीं कांहीं विषदंत किंवा विषदंष्ट्रा ( फँग्स ) असतात. विषदंताला अंतिम अंगीं छिद्र असून तो सप्रणाल असतो अथवा त्याच्या बहिःपृष्ठावर खांचणी असते. या प्रणालींतून किंवा खांचणीच्या द्वारें विष खालीं उतरतें. विषदंत ओळखण्याचें हेंच लक्षण होय. सविष सर्पांच्या जातींत विषदंत फक्त मुखास्थींतच लागलेले असतात व विषदंतांची संख्या फार थोडी असते. हे विषदंत मोडून पाडले असतां त्यांच्या जागीं त्यांच्या पाठोपाठ असलेले परंतु वाढ न झालेले व जणू काय राखून ठेविलेले असे विषदंत वाढतात व हे नवीन विषदंत गमावलेल्या विषदंतांची जागा बरोबर भरून काढतात. याप्रमाणें सविष सर्पांमध्यें विषदंत एकामागून एक वाढतात. मुखक्रोडामध्यें लालापिंड (सॅलिव्हरि ग्लँड्स ) बनलेले असतात. व सविषसर्पांत या लालापिंडाचें विषपिंडा ( पॉयसन ग्लँड )मध्यें रूपांतर होतें. हे विषपिंड सविषसर्पांत नेत्रांच्या खालीं पश्चिमभागीं प्रत्येक बाजूस वरच्या जबड्यावर झालेले असतात व त्यांचें स्रोतस ( डक्ट ) विषदंताच्या मूळाशीं उघडतें. विषारी सर्प जेव्हां चावण्यास किंवा दंश करण्यास झडप घालतो तेव्हां त्याचा खालचा जबडा खालच्या बाजूस उतरतो व करोटीस शिथिलतेनें लागलेलीं कांहीं हाडें पुढें मागें ढकललीं जाऊन मुखास्थीला चक्राकार गति मिळते. यामुळें त्यावर बसलेले विषदंत उभे राहतात. ह्याच सुमारास विषपिंडावर एका स्नायूच्या संकोचानें दाब बसतो व विषदंतावाटे पिचकारीप्रमाणें विष बाहेर टाकलें जातें.

या उपगणांतील प्राण्यांत नेत्रांनां लागलेल्या पापण्या हालचाल करणाऱ्या अशा झालेल्या नसतात. तसेंच बाह्यकर्णरंध्र ( इअर ओपनिंग ) झालेलें नसतें व कर्णपटल ( टिंपॅनम ), कर्णपटलविवर ( टिंपॅनिक कॅव्हिटि ), व गलकर्ण पटलविवर संधिनलिका ( यूस्टाचिअन ट्यूब ) हीं पण झालेलीं नसतात. बाह्यनासाछिद्रें मुसकटाच्या पुढच्या टोंकाला लागलेलीं असतात. मुखक्रोडांत असलेली दुभंगलेली जिव्हा आंतबाहेर काढितां येण्यासारखी व वरचेवर हालणारी अशी झालेली असते. तिचा उपयोग एखाद्या विशिष्ट स्पर्शेंद्रियाप्रमाणें होतो. सर्पांचा अस्थिपंजर म्हटला म्हणजे करोटी ( स्कल ) व पृष्ठवंश ( बॅकबोन ) मिळून झालेला असतो. पृष्ठवंशाला ( अपेंडिक्युलर आर्चेस ) गात्रमंडलें लागलेलीं नसतात व पृष्ठवंशाच्या मणक्यांची संख्या पुष्कळ असते. या पृष्ठवंशाचे दोन भाग ओळखतां येतात. एक पुच्छाचा किंवा शेंपटाचा भाग व दुसरा कबंधाचा. प्रत्येक मणक्याचा कशेरुघन ( सेंट्रम ) पूर्वखात ( प्रोकॉल्स ) असा बनलेला असतो. म्हणजे कशेरुघनाच्या पूर्वशेवटाला कर्णिका असून पश्चिमशेवटाला कंदुक असतो. तेव्हां मणके कंदुककर्णिका संधीनें एकमेकांशीं जोडलेले असल्यामुळें सर्पांचा पाठीचा कणा साधारणतः हवा त्या दिशेस फिरूं शकतो.

पुच्छाला असलेल्या मणक्यांची संख्या बहुतेक कबंधाच्या मणक्यांच्या संख्येपेक्षां कमी असते. पहिले एक दोन कशेरु अथवा मणके खेरीज करून इतर सर्व कबंधाच्या भागाच्या मणक्याला हालचाल होईल अशा तऱ्हेनें दोहों बाजूवर पर्शुका (रिब्स) जोडलेल्या असतात. व या पर्शुकांचे अंतिम शेवट उदरतलावरच्या खवल्यांशी संलग्न झालेले असतात. शरीराच्या उदरतलावरील खवल्यांचा व पर्शुकांचा असे सर्व संधी चालून पालून अनेक पायांसारखे उपयोगी पडतात. सर्प चालतांनां किंवा सरपटतांनां पर्शुकांमधील स्नायूंच्या संकोचविकासानें यांपैकीं कांहीं खवले जमीनीवर घट्ट दाबिले जातात. आडवे असलेले उदरतलावरील खवले उभे होऊन त्यांचे कांठ चालून पालून जमीनीवर टेंकतात व त्यांवर सर्व शरीराचा भार तोलून धरून सर्प पुढें किंवा मागें सरतो. पुच्छाच्या भागीं पर्शुका झालेल्या नसतात परंतु त्यांच्याऐवजी कबंधाच्या भागांत नसलेले कशेरुबाहू ( ट्रॅन्सव्हर्स प्रोसेस )येथें झालेले असतात व ते पर्शुकांच्या जागीं त्यांच्याप्रमाणें वागून शरीराची हालचाल करण्यास मदत करितात. तेव्हां ह्या उपगणांतील प्राण्यांनां निराळीं गात्रें झालेलीं नसल्याकारणानें त्यांनां अपाद ही संज्ञा दिली आहे. परंतु खरें म्हटलें तर हे प्राणी अनेकपाद आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण उदरतलावरील खवले हे यांचे पायच होत.

या उपगणांतील प्राण्यांच्या मेंदूला दहा जोड्या मस्तिष्क रज्जूंच्या ( क्रॅनिअल नर्व्हज ) झालेल्या असतात. सुसरी शिवाय इतर सर्व उरगवर्गांतील प्राण्यांप्रमाणें या अपाद उरगांमध्यें हृदयाला तीनच कप्पे असतात. कारण निःसारकर्णांच्या आंतील भिंतीप्रमाणें असणारा पडदा अपूर्ण बनलेला असतो. शरीराचें पश्चिमद्वार ( क्लोकल अपर्चर ) हें आडवें पसरल्यासारखें झालेलें असतें. या प्राण्यांतील नराला शिश्नासारखीं दोन पोकळ व कंटकित अशीं

इंद्रियें असून तीं संभोगकालीं या पश्चिमत्वचाविवरमुखावाटे बाहेर पडतात.

सर्पांच्या शरीराच्या लांबोळया आकारामुळें कांहीं अंतरिंद्रियांच्या रचनेंत थोडासा फरक आढळून येतो तो असाः— डावीकडील फुप्फुस बहुतकरून लहान असतें. किंबहुना कित्येक सर्पांत एकच फुप्फुस बनलेलें असतें. यकृत बरेंच लांबवर वाढलेलें असतें व वृक्क दोन असतात, परंतु तीं एकमेकांसमोर झालेलीं नसतात.

नै स र्गि क वि स्ता र.—सर्प सर्व जगभर पसरलेले आहेत. तरी ते उष्ण कटिबंधांतील प्रदेशांत विशेषेंकरून आढळून येतात. न्यूझीलंड व आईसलंड ह्या प्रदेशांत सर्प मुळींच आढळून येत नाहींत. हिंदुस्थानांत सर्प विपुलतेनें सांपडतात व सर्पदंशानें दरवर्षी हजारों मनुष्यें मृत्यूमुखीं पडतात सर्प हा प्राणी सरसकट विषारी आहे असा बहुतेक लोकांचा ठाम समज झालेला दिसतो. पुष्कळवेळां दंश करणारा सर्प निर्विष असतो परंतु तो सविष असणार या समजुतीनें व धास्तीनें मनुष्य मरण पावतो. कांहीं खरे विषारी सर्प खेरीज करून पुष्कळ नेहमींच्या आढळण्यांतले सर्प निर्विष असतात. परंतु ते स्वभावतः क्रूर असल्यामुळें चावतात. ह्या कारणास्तव सविष सर्प कोणते व कसे ओळखावे याबद्दल थोडें विवेचन खालीं दिलें आहे.

व र्गी क र ण.—सर्पांचें वर्गीकरण निरनिराळ्या रीतीनें करण्यांत येतें. निर्विष व सविष असें सर्पांचें वर्गीकरण करणें वैद्यशास्त्राप्रमाणें जरी सयुक्तिक असलें तरी तें प्राणिशास्त्राच्या नियमानुरूप नाहीं म्हणून चुकीचें होय. शास्त्रीय पद्धतीनें वर्गीकरण करणें म्हणजे सर्पांच्या अस्थींचें भिन्नत्व व इतर सर्व सर्पांचीं दुसरीं लक्षणें हीं लक्षांत घेऊन करावयाचें असतें. व तें तसें केलें असतां विषारी व निर्विष सर्पांचा एकाच समूहांत किंवा कुटुंबांत समावेश झाला म्हणून बिघडत नाहीं. उलटपक्षीं अशा रीतीनें वर्गीकरण केलें असतां निरनिराळ्या सर्पजातींतील आप्तसंबंध काय आहे हें त्यामुळें सहज समजतें व वर्गीकरणाच्या मूळ उद्देशाची सिद्धता होते.

बोलेंजर यानें सर्पांचें वर्गीकरण शास्त्रीयरीत्या केलें आहे व त्यानें सर्पांची एकंदर नऊ कुलें ठरविलीं आहेत. हीं नऊ कुलें शास्त्रीयपद्धतीनें जाणण्यास व त्यांतील सर्पांच्या जाती व जातिविशेष ओळखण्यास सर्पांचें शरीरव्यवच्छेदन कुशलतेनें करावें लागतें; त्याशिवाय गत्यंतर नाहीं. व्यावहारिकरीत्या पाहिलें असतां हें करणें सर्वांनां शक्य नाहीं. परंतु व्यवहारांत सविष सर्प कोणता व निर्विष सर्प कोणता हें एकाद्या सुलभ रीतीनें ओळखतां येणें जरूर आहे म्हणून कर्नल एफ. वॉल ह्यानें मोठ्या प्रयासानें व दीर्घ प्रयत्नानें सर्पांच्या बाह्य लक्षणांवरून सविषसर्प कोणता व निर्विषसर्प कोणता हें ओळखण्याची एक रीति बसविली आहे. कर्नल वॉल ह्यानें बोलेंजर ह्यांच्या वर्गीकरणांतील नऊ कुलें ग्राह्य धरून त्यांची पुढें दिल्याप्रमाणें रचना केली आहे. त्यावरून कोणतीं सर्पकुलें विषारी आहेत हें सहज समजतें.

ज्या सर्पांचें पुच्छ किंवा शेंपूट पार्श्वभागीं अथवा दोहोंबाजूनें अगदीं चापटकें म्हणजे साधारण गोलाकार आहे असे सर्प असून, ज्यांच्या शरीराला उदरतलभागीं मोठें आडवे खवले ( ज्यांनां उदरतलस्थ खवलें म्हणतात ते ) नाहींत असे सर्प ( या सर्पांत साधारणतः एकच तऱ्हेचे खवले शरीराच्या पृष्ठभागावर व उदरतलभागावर असतात. यांत ( १ ) टायफ्लोपिडी व (२) ग्लौकोनैडी हीं दोन कुलें मोडतात. ) यांनां विष नसतें.

ज्यांच्या शरीराला उदरतलभागीं अरुंद, लहान व आडवे खवले ( ज्यांनां उदरतलस्थ खवले म्हणतात ते ) असून ते खवले त्यांच्या शरीराचा उदरभाग सर्वत्र व्यापून टाकित नाहींत असे सर्प ) म्हणजे ज्या सर्पांचें शव पाठीवर उताणें ठेविलें असतां त्याच्यांत पर्शुकस्थ खवल्यांची उदरतलभागा कडील शेवटली रांग किंवा त्यांच्यापैकीं जास्त रांगा शवाच्या बाजूस दिसून येतात—यांत ( ३ ) बॉईडी, ( ४ ) ईलीसैडी, (५) यूरोपेल्टिडी, ( ६) झेनोपेल्टिडी व (७) कोलूब्राईडींतील होमालाप्सीनी उपकुल हीं कुलें मोडातात. यांना विष नसतें.

ज्यांच्या शरीराला उदरतलभागीं मोठे रुंद खवले ( ज्यांना उदरतलस्थ खवले म्हणतात ते ) असून ते खवले त्यांच्या शरीराचा उदरतलभाग बहुतेक सर्वत्र व्यापून टाकितात आणि ज्या सर्पांचें शव पाठीवर उताणें ठेविलें असतां त्याच्यांत पर्शुकस्थ खवल्यांच्या उदरतल भागाकडील शेवटल्या रांगेंतील खवल्यांचा थोडासा भाग सर्पाच्या शवाच्या प्रत्येक बाजूस दिसून येतो. यांत कोलूब्राईडीं कुलांतील होमालॉप्सीनी व हैड्रोफाईनी हीं दोन उपकुलें खेरीज करून बाकीचीं सर्व उपकुलें येतात. यां उपकुलांत विषारी व निर्विष असे दोन्हीं प्रकारचे सर्प मोडतात. यांत ( ८ ) ॲम्ब्लीसीफालिडी कुल मोडतें व यांतील सर्प निर्विष असतात. तसेंच यांत ( ९ ) व्हिपरीडी कुलहि मोडतें. या कुलांतील सर्प विषारी असतात.

ज्यांचें शेंपूट किंवा पुच्छ पार्श्वभागाकडे दोन्हीहि बाजूनें अगदीं चपटलेलें म्हणजे ईलमाशाच्या पुच्छाप्रमाणें बनलेलें असतें असे सर्प. यांत कोलूब्राईडी कुलांतील हैड्रोफाईनी हें उपकुल मोडतें या हैड्रोफाईनी उपकुलांतील सर्व सर्प समुद्रांत राहणारे खरे क्षारोदक सर्प होत. हे सर्व सर्प विषारी आहेत.

वरील विवेचनावरून असें दिसतें कीं, कोलूब्राईडी व व्हिपरीडी या कुलांतील सर्प विषारी आहेत. व्हिपरीडी कुलांतील सर्वच जातीचे सर्प विषारी आहेत. परंतु कोलूब्राईडी कुलांतील सर्वच सर्प विषारी आहेत असें म्हणतां येणार नाहीं. कारण या कुलांतील कांहीं जातींच्या सर्पांच्या लाळेंत जरी विषद्रव्य कमी जास्त प्रमाणानें विषमय असें

झालेलं असलें तरी त्यांतील कांहीं दुसऱ्या जातींच्या सर्पांच्या लाळेंतील विषद्रव्य मनुष्याला बाधक होत नाहीं व त्यामुळें अशा सर्पांच्या दंशानें मनुष्याचा प्राणांत कधींच होत नाहीं. येथें वर सांगितल्याप्रमाणें लक्षांत ठेवण्याची एक गोष्ट आहे ती ही कीं, मनुष्याला सर्प चावला असतां तो अगोदर भितीनेंच मरणोन्मुख होतो व सर्प जरी निर्विष असला तरी पुष्कळवेळां या भीतीचा परिणाम प्राणोत्क्रमण घडवून आणण्याकडे होतो. तेव्हां मनुष्याला जो मृत्यु येतो तो सर्पाच्या विषारीपणाचा परिणाम खास नसून मनुष्याच्या गलितधैर्याचा अथवा धैर्यभंगाचा परिणाम होय. धामण ही निर्विष आहे. तरी तिच्या दंशानें मनुष्याला मृत्यु आलेली कांहीं उदाहरणें आढळून येतात. सारांश मनुष्याला सर्पाच्या दंशानें खरोखरच विषबाधा झाली म्हणजे त्या सर्पाला विषारी म्हणावें, व असे सर्व सर्प हेच खरे विषारी सर्प होत. बाकीचे सर्प निर्विष होत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. निरनिराळ्या जातींच्या विषारी सर्पांच्या दंशापासून होणारीं लक्षणें विषयाचें महत्त्व जाणून पुढें थोडक्यांत सांगितलीं आहेत. तसेंच सर्पांच्या विषासंबंधींहि थोडेसें विवेचन केलें आहे.

ज्या अर्थी कोलूब्राईडी व व्हिपरीडी कुलांत खरे विषारी सर्प आढळतात त्या अर्थी त्यांचें वर्गीकरण करून थोडीशी जास्त माहिती देणें आवश्यक आहे. कोलूब्राईडी कुलांत सहा उपकुलें मोडतात. व त्यांचें वर्गीकरण त्यांच्या मुखास्थींवर लागलेल्या दांतांच्या लक्षणावरून केलें जातें तें पुढील कोष्टकावरून समजेल.

कोलूब्राईडी कुल.

| विभाग १. | विभाग २. | विभाग ३. |
|---|---|---|
| अप्रणालदंतिन् | पश्चिमसप्रणालदंतिन् | पूर्वसप्रणालदंतिन् |
| ( ॲग्लिफा ) | ( ओपिस्थोग्लिफा ) | ( प्रोटेरोग्लिफा ) |
| उपकुलें | उपकुलें | उपकुलें |
| १ कोलूब्राईनी | ३ डिप्स्याडिनी | ५ एल्यापैनी |
| २ ॲक्रोकॉर्डीनी, | ४ होमालॉप्सीनी, | ६ हैड्रोफाईनी |

विभाग १ ला— अप्रणालदंतिन् ( ॲग्लिफा ) म्हणजे असे सर्प कीं ज्यांच्या मुखक्रोडांत मुखास्थींच्या पश्चिम शेंवटास असलेल्या दांतांनां खांचण्या नसतात किंवा ते दांत नलिकामय असले तरी त्यांच्या अंतिम शेंवटांनां छिद्र नसतें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे ज्यांच्यांत विष दंत नाहींत असे सर्प. ते निर्विष सर्प होत. या विभागांत वर दिलेलीं दोन उपकुलें मोडतात. अप्रणाल दंतिन विभागाच्या कोलूब्राईनी उपकुलांतील कांहीं नेहमींचीं आढळणारीं व सर्वसाधारणतः माहीत असलेलीं अशीं ठळक उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

धामण ( झामेनिस म्युकोसस ):— हा सर्प स्वभावतः क्रूर आहे व चावण्यास तत्पर असतो. याच्या शीर्षाचा भाग मानेपासून फारसा निराळा व स्पष्ट असा दिसून येत नाहीं व शीर्ष चपटलेलें असें असतें. हा फार चपळ असून चांगला पोहणारा आहे. दंश करतांना एकप्रकारचा अवाज करतो व थोडासा फुगतो, तसेंच शीर्ष व कबंधाचा पूर्वशेवटाचा भाग कमानदार वळून थोडा मागें ओढून घेतो. प्रत्येक वर्षी कुरणांत वावरणाऱ्या लोकांत सर्पदंशानें जी मृत्युसंख्या होते तीपैकीं पुष्कळ अंशीं बरेच मृत्यू या सर्पांच्या दंशानें झालेले असतात. बहुतेक भीतीनेंच मृत्यु येतो. याच्या शरीरावर पूर्वशेवटाला पृष्ठावर १७ खवल्यांच्या उभ्या रांगा असतात. व पश्चिमशेवटीं त्यांची संख्या १४ पासून १५पर्यंत असते. याच्या शीर्षावर तीन नासाक्षिमध्यस्थ ( लोरिअल ) खवले असतात. नासाक्षिमध्यस्थ खवले सविषसर्पांत नसतात. निर्विष सर्पांत ते बहुत करून असतात.

राजिल साप ( लैकोडॉन स्ट्रिआटस, ) लै. ऑलिकस व लै. फॅसिआटसः—लैकोडॉन ही जाति निर्विष आहे तरी ह्या जातिविशेषाच्या शरीरावर आडवे, पांढरे किंवा लाल पट्टे असल्यामुळें ते खऱ्या राजिल विषारी सर्पाप्रमाणें दिसतात. मानेचा भाग या जातिविशेषामध्यें साधारण स्पष्ट असा झालेला असतो. शीर्षावर नासाक्षिमध्यस्थ खवला असतो. पुच्छोदरस्थ खवले ( सबकॅडल्स ) दुहेरी असून दोन रांगांनीं लागलेले असतात. हे सर्प सुद्धां दंश करण्यास तत्पर असतात. ते कुरणांत वावरतात व रात्रौ संचार करतात. तेव्हां ह्यांच्या चावण्यानें सुद्धां विषारी राजिल सर्प चावला असें समजूत मनुष्य भीतीनें मरतो.

नानेटी ( ट्रोपीडोनोटस स्टोलेटस ):— पावसाळ्याच्या सुरवातीला हे पुष्कळ दिसतात. दिवड ( ट्रोपीडोनोटस पिस्केटर.) हें पाण्याजवळ आढळतें व पाण्यांत राहूं शकतें. हा सर्प निर्विष आहे तरी क्रूर असून चावण्यास तत्पर असतो व जबर चावा घेतो. फार रागावला असतां ताठ उभा राहूं शकतो व नागाप्रमाणें पूर्वशेवटीं थोडा फुगतो. तेव्हां हा सर्प अशा रीतीनें चवताळून मनुष्यास चावल्यास नागदंश झालेल्याचा गैरसमज होतो.

साप टोळी प्रमाणें दिसणाराः—ट्रो. लूंबीकलर अथवा म्याक्रोपिस्थोडन लूंबीकलर. ह्याचा रंग शरीराच्या पृष्ठाला एकसारखा हिरवा किंवा हिरव्या व काळ्या ठिपक्यांची भेसळ झालेली असा असतो. उदरतलाचा भाग पांढरा किंवा पिंवळा असतो. हा सर्प निर्विष आहे तरी वरवर पाहणाऱ्याला दिसण्यांत विषारी व्हीपरीडी कुलांतील व्हीपराईन सर्पाप्रमाणें भासतो. याच्या शीर्षपृष्ठावरील खवले मोठे पत्र्याप्रमाणें असतात व त्या लक्षणानें हा व्हिपराईन सर्प नव्हे हें कळून येतें.

वृक्षसर्प; मण्यारीप्रमाणें दिसणारे.(डेन्ड्रेलाफीस ट्रीस्टीस)— हा बहुतकरून झाडावर असतो. पूर्ण वाढ झाल्यावर क्रूर बनतो व चावण्यास तत्पर होतो. हा विषारी सर्प नव्हे परंतु ह्याच्या दंशानें सुद्धां मनुष्य निव्वळ भीतीनें हृदयाची क्रिया

बंद होऊन मरतो. डर्ड्रोफिस पिक्टस हा एक वरील जातीहून थोडा निराळा सर्प आहे.

विभाग २ रा—पश्चिमसप्रणालदंतिन् म्हणजे असे सर्प कीं ज्यांच्या मुखक्रोडांत मुखास्थींच्या पश्चिमशेवटीं त्यांनां असलेल्या दांतांनां खांचण्या असतात अथवा ज्यांच्यांत विषदंत मुखास्थींच्या पश्चिमशेवटांनां लागलेले असतात. या विभागाच्या दोन उपकुलांतील कांहीं नेहमींचे आढळणारे सर्प खालीं दिले आहेत.

उपकुल पहिले—डिप्स्याडिनी—यांतील सर्प जमीनीवर अथवा झाडावर वावरणारे आहेत.

(१) डिप्सस गोकुल—ह्या सर्पाला विषपिंड नाहीं म्हणून हा विषारी नाहीं. हां वाहेरून व्हीपरीडी कुलांतील विषारी सर्प फुरसू याच्याप्रमाणें दिसतो. तरी पन्याप्रमाणें असणाऱ्या मोठ्या शीर्षपृष्ठावरील खवल्यांच्यामुळें हा फुरसूं नाहीं हें कळतें.

(२) वृक्षसर्प.—डिप्स्याडोमॉर्फस ट्रेगोनेटस—या सर्पांनां देखील विष नाहीं. हा झाडावर असणारा उदी रंगाचा सर्प होय. ह्याच्या शिर्षाचा आकार, मानेची ठेवण, ऊर्ध्व कनीनिका यांवरून हा वरवर पाहणाऱ्याला व्हीपरीडी कुलांतील विषारी सर्पांप्रमाणें दिसतो. परंतु याच्या शीर्षावरील खवले निरीक्षण करून पाहिले असता हा व्हीपरीडी कुलांतील सर्प नव्हे हें सहज समजण्यासारखें आहे.

(३) वृक्षसर्प सापटोळीः—ड्रायोफीस मिक्टेरिझन्स-हिरवा; झाडावरील सर्प. हा बहुधा झाडावरील दुसऱ्या सर्पांप्रमाणें वेटोळें घालून बसत नाहीं. बहुतेक लांबवर शरीर पसरून असतो. हा सुद्धां चावतो. ह्याला विष दंताप्रमाणें दंत आहेत तरी ह्यांच्यांत विषपिंड मुळींच विकास पावलेला नसतो, त्या कारणानें हा निर्विष सर्प आहे हें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. निदान मनुष्याला ह्याचा विषार होणें शक्य नाहीं.

उपकुल दुसरें:—होमालॉप्सीनी या उपकुलांतील सर्प शुद्धोदकांत अथवा गोड्यापाण्यांत राहणारे आहेत. हे पाण्यांत राहणारे सर्प असल्याकारणानें यांचीं नासाछिद्रें मुसकटाच्या अगदीं पृष्ठावर झालेलीं असतात. हे जरायुज असून यांची वीण पाण्यांत होते.

(१) पाण्यांतील सर्प (सरबेरसर्‍हींचॉप्स) हे नद्यांच्या काठीं चिखलांत राहतात. समुद्राच्या कांठावर सुद्धां हा सर्प राहूं शकतो.

(२) हिप्सर्‍हीना एनहैड्रीस. याला उडण म्हणतात. हा विषारी सर्प आहे.

विभाग ३ राः—पूर्वसप्रणालदंतिन् म्हणजे ज्यांच्या मुखक्रोडांत मुखास्थींच्या पूर्वशेवटीं त्यांनां लागलेल्या दातांनां अंतिम टोंकाला छिद्र असून ते नलिकेसारखे असतात किंवा त्यांनां खांचण्या असतात ते खरे विषारी दंत ह्याच विभागांतील सर्पांनां असतात. या तिसऱ्या विभागांत दोन उपकुलें मोडतात तीं उपकलें म्हणजे जमीनीवरील कोलूब्राइडी कुलांतील विषारी सर्प व हैड्रोफाईनी अथवा क्षारोदक सर्प किंवा खरे समुद्रांतील सर्प.

एल्यापैनी उपकुलांत नेहमींचे आढळणारे विषारी सर्प नाग, अहिराज, क्रेट अथवा मण्यार (?) कॉरल सर्प इत्यादि होत. हे विषारी सर्प दरवर्षी मनुष्यहानि फार करितात. त्यामुळें व ते सर्वसाधारणतः आढळून येणाऱ्यापैकीं असल्याकारणानें त्यांचें प्रत्येकाचें व्यक्तिशः सविस्तर वर्णन विषयाचें महत्त्व जाणून पुढें दिलें आहे. पुन्हां वर वर्णन केलेल्यापैकीं कांहीं निर्विष सर्प ह्या विषारी सर्पांप्रमाणें वरवर पाहणाऱ्यास अगदीं सारखे दिसतात. तेव्हां त्यांनां बिनचूक ओळखण्याचीं खरीं लक्षणें जाणणें हें किती आवश्यक आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

आतां विषारी सर्पांचें राहिलेलें कुल व्हीपरीडी हें होय. या व्हीपरीडी कुलाला मंडलीकुल ही संज्ञा देतात. या कुलांतील सर्प बहुतेक विषारी आहेत हें वर सांगितलेंच आहे. या मंडलकिुलाचें वर्गीकरण केलें असतां त्याचीं दोन उपकुलें पडतात. पहिलें उपकुल व्हीपरैनी अथवा रंध्रविहित (पिटलेस) व्हीपरीडी सर्पांचें होय. यांत फुरसूं व घोणस अथवा मंडलीसर्प इत्यादि येतात. दुसरें उपकुल क्रोटॅलैनी अथवा रंध्रयुक्त (पिटेड) व्हीपरीडी सर्पांचें होय. यांत हरियाल किंवा हिरवा योनिज सर्प किंवा बांबूसर्प वगैरे येतात.

वरील वर्गीकरणाच्या विवेचनावरून साधारणपणें सविष सर्पांचीं कुलें कोणतीं व निर्विष सर्पांचीं कुलें कोणतीं हें थोडेंसें लक्षांत येण्यासारखें आहे. हिंदुस्थानांत साधारणपणें पाहूं गेलें असतां सर्पांचे ३३० जातिविशेष आढळून येतात. या एकंदर ३३० जातिविशेषांपैकीं शास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें ६९ जातिविशेष सविष आहेत व यांतील ४० जातिविशेष जमीनीवर वावरणारे आहेत व २९ जातिविशेष समुद्रांत राहणारे आहेत. तेव्हां तूर्त जमीनीवरील सविष जातिविशेषांपुरता विचार केला तरी वरील वर्गीकरणाच्या धोरणानें एकदम एखादा जातिविशेष सर्प ओळखणें अशक्यच आहे. शिवाय शरीराकृतीवरून किंवा कातडीच्या रंगारूपावरून सविष अथवा निर्विष सर्प ठरविणें हें किती धोक्याचें आहे हेंहि वरील विवेचनावरून सिद्ध होतेंच. पुष्कळ निर्विष सर्प खऱ्या विषारी सर्पांप्रमाणें दिसण्यांत दिसतात व कित्येक वेळां त्यांची चावण्याची ढब सुद्धां अगदीं खऱ्या विषारी सर्पांप्रमाणें असते. त्यामुळें मनुष्यहानि फार होते. या गोष्टीला थोडासा आळा बसावा यासाठीं सर्पांविषयीं जितकी जास्त शास्त्रीय माहिती फैलावेल तितकी इष्ट आहे. याच्यामुळें चावणारा सर्प खरोखर निर्विष आहे हें सर्प चावलेल्या मनुष्यास ताबडतोब कळल्यास त्याचा धैर्यभंग होणार नाहीं व त्याचे प्राण वांचविण्यास सुलभ पडेल.

हे एकंदर सर्व विचार मनांत ठेवून कर्नल वॉलसाहेबांनीं पुष्कळ मेहनतीनें सर्पांच्या कांहीं ठराविक बाह्य लक्षणांवरून

ची रीति बसविली आहे ती खालीलप्रमाणें आहे. त्यांच्या मताप्रमाणें सर्व सविष सर्पांचे पांच समूह पडतात. याला एकच अपवाद आहे; परंतु हा अपवादादाखल सर्प नेहमीच्या आढळण्यांतला नसल्यामुळें त्याचा विचार येथें करणें नाहीं. कर्नल वॉल यांची रीति नमूद करण्यापूर्वी एका गोष्टीचा उल्लेख येथें केला पाहिजे तो हाच कीं, त्यांच्या रीतीप्रमाणें सर्प ओळखण्यास सर्पांच्या अंगावरील खवल्यासंबंधीं साधारणतः माहिती अगोदर असावी लागते. कांहीं तज्ज्ञांनां सर्पांच्या खवल्यांचें महत्व इतकें वाटत नाहीं. परंतु पूर्ण अनुभवावरून ही गोष्ट सिद्ध होते कीं सर्पांच्या अंगावरील खवल्यांची संख्या व रचना निरनिराळ्या जातिविशेषांत कांहीं विवक्षित तऱ्हेनें झालेल्या असतात व त्यांच्यामध्यें क्वचितच फेरफार घडून येतो. तेव्हां खवल्यांची संख्या, रचना व स्थानपरत्वें त्यांचीं नांवें यासंबंधीं माहिती असणें जरूर आहे व कर्नल वॉल यांच्या रीतींत सर्प ओळखण्याची मुख्य भिस्त ह्या गोष्टीवरच आहे. तेव्हां सर्पांच्या खवल्यांची प्रथमतः स्थानपरत्वें नांवें जाणणें आवश्यक आहे. व तशीं तीं खवल्यांचीं नांवें येथें दिलीं असतां विषयांतर होणार नाहीं. तीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत—सर्पाचें मस्तक-(अ) मस्तकाचा ऊर्ध्व पृष्ठभागः–नासाग्रस्थ (रोस्ट्रल); नासास्थ (नॅसल); नासामध्यस्थ (इंटर नॅसल); ललाटाग्रस्थ (प्रीफ्रंटल अथवा अँटिरिअर फ्रंटल); ललाटस्थ (फ्रंटल); पार्श्वशीर्षस्थ (परीएटल); शिरःपृष्ठस्थ (ऑक्सिपिटल); ऊर्ध्वनेत्रस्थ (सुप्राऑक्युलर); नेत्राग्रस्थ (प्री आक्युलर); नेत्रपश्चिमस्थ (पोस्ट ऑक्युलर), (ब) मस्तकाचा अधःपृष्ठभागः—अधोनेत्रप्रांतस्थ (सबआक्युलर); ऊर्ध्वनासाक्षि मध्यस्थ (सुप्रालोरिअल); नासाक्षिमध्यस्थ (लोरिअल); कर्णप्रांतस्थ (टेंपोरल); ऊर्ध्वोष्ठस्थ (सुप्रालेबिअल) इत्यादि. सर्पाचा खालचा जबडा अथवा हनु यांवरील खवले हनुपूर्वमध्यस्थ (मेंटल); पूर्वाधोजिव्हास्थ (सबलिंग्वल); पश्चिमाधोजिव्हास्थ (पोस्टीरिअर सबलिंग्वल); अधरोष्ठस्थ (इन्फ्रालेबिअल्स) सर्पांच्या कवंधावरील खवलेः—(अ) ऊर्ध्वपृष्ठभाग. पृष्ठवंशस्थ (व्हर्टिब्रल्स); पृष्ठवंशीयप्रांतस्थ (डोरल्स); (ब) पार्श्वभागः–पर्शुकास्थ (कोस्टल्स).(क) उदरतल भागः–उदरतलस्थ (व्हेंट्रल्स); मलद्वारप्रांतस्थ (ॲनल). सर्पांच्या पुच्छावरील खालचा भागः—पुच्छोदरतलस्थ (सबकॅडल). वर म्हटल्याप्रमाणें सविष सर्पांचे पांच समूह ओळखण्याची कर्नल वॉल यांची रीतिः—

समूह १ लाः—पुच्छ चपटलेलें ईलमःशाप्रमाणें असून ज्याच्या मुसकटाच्या व मस्तकाच्या पृष्ठावर मोठे पत्र्याप्रमाणें किंवा तबकड्यासारखे खवले झालेले आहेत असे सर्प. या समूहांत सर्व क्षारोदकसर्प मोडतात व त्यांच्या २९ जाती आहेत.

समूह २ राः— पुच्छ गोलाकार असून ज्यांच्या पृष्ठवंशस्थ खवल्यांच्या अगदीं मध्याच्या रांगेंतील खवले संबंध कवंधभर मोठे बनलेले असतात व अधरोष्ठस्थ खवले चारच असून चवथा अधरोष्ठस्थ खवला सर्वांत मोठा असतो असे सर्प. या समूहांत "क्रेट" किंवा राजिल सर्प येतात.

समूह ३ राः—पुच्छ गोलाकार असून तिसरा ऊर्ध्वोष्ठस्थ खवला नासास्थ खवल्याला व नेत्राला स्पर्श करितो असे सर्प. या समूहांत नाग जाति व कॉरल सर्प मोडतात. यांत नऊ जातिविशेष आढळतात. हे तीन समूह त्रिपारी कोलुब्राईडी सर्पांचे होत.

समूह ४ थाः—पुच्छ गोलाकार असून नेत्र व नासाछिद्र यांच्यामध्यें मुखाच्या प्रत्येक बाजूवर स्पष्ट दिसणारें एक रंध्र असतें व पृष्ठवंशस्थ खवले व विशेषतः शीर्षपृष्ठवंशस्थ खवले मोठे बनलेले नसतात असे सर्प. या समूहांत रंध्रयुक्त मंडली सर्प अथवा क्रोटोलैनी हे मोडतात. यांच्यांत तेरा प्रकारचे जातिविशेष आढळतात.

समूह ५ वाः–पुच्छ गोलाकार असून सर्पांच्या मुसकटावर व शीर्षपृष्ठावर एकंदर सर्व खवले कवंधाच्या पृष्ठावरील खवल्याप्रमाणें लहान व समसमान असे असतात व सर्पाचें शव पाठीवर उताणें ठेविलें असतां त्याच्या पर्शुकस्थ खवल्यांच्या उदरतल भागाकडील शेवटल्या रांगेंतील खवल्यांचा थोडासाच भाग शवाच्या प्रत्येक बाजूवर दिसून येतो असे सर्प. या समूहांत रंध्रविहीन मंडलीसर्प अथवा व्हीपरैनी हे मोडतात. यांच्यांत सहा प्रकारचे जातिविशेष आढळतात. हे शेवटले दोन समूह म्हटले म्हणजे मंडलीकुलाचीं दोन उपकुलें होत.

वर निर्दिष्ट केलेल्या अपवादाखेरीज करून जर एखादा सर्प ह्या वर सांगितलेल्या पांच समूहांपैकीं कोणत्याहि एका समूहांत त्याच्या लक्षणांनीं मोडत नसल्यास तो निर्विष सर्प आहे असें खास समजण्यास कांहीं हरकत नाहीं. तेव्हां वर म्हटल्याप्रमाणें जमीनीवरील नेहमीचे आढळणारे सविषसर्प यांचें वर्णन क्रमानें खालीं दिलें आहे.

कोलुब्राईडी कुलाच्या पूर्व सप्रणालदंतिन् या विभागापैकीं एल्यापैनी या उपकुलांत कोब्रा म्हणजे नागकुटुंब व क्रेट म्हणजे राजिमंत कुटुंब हीं फार महत्त्वाचीं आहेत. कारण हे सर्प नेहमींच्या आढळण्यांतले असून यांचें विष फार जहाल असतें.

नागकुटुंब अथवा दर्वीकर सर्प यांचीं लक्षणेंः—यांचें पुच्छगोलाकार असतें, उदरतलस्थ खवले आडवे रुंद असे असतात. तिसरा ऊर्ध्वोष्ठस्थ खवला नासास्थ खवल्याला व नेत्राला स्पर्श करितो. या कुटुंबांत चार जाती आहेत त्यांपैकीं "नाया" म्हणजे नागजाति ही फार विपुलतेनें आढळणारी असल्याकारणानें ती महत्त्वाची आहे. तिच्या खालोखाल दुसऱ्या "हेमीबंगेरस" नांवाच्या जातीपैकीं "हेमीबंगेरस निग्रेसन्स" अथवा हिंदुस्थानांतील कॉरल सर्प हा जातिविशेष पुष्कळ वेळां

आढळून येतो. हा सर्प बहुधा पर्वतावरील रहिवासी असल्यामुळें पर्वतांवर आढळतो. तिसरी जाति " डोलिओफीस' व चवथी जाति " क्यालोफीस " ही होय. ह्या जातींतील सर्पांना सुद्धां " कॉरल " सर्प म्हणतात; कारण त्यांच्या उदरतलाचा रंग बहुतेकांमध्यें लाल पोवळयाप्रमाणें असतो. हा रंग मद्यार्कांत निघून जातो. या जातींतले सर्प बहुतकरून ब्रह्मदेश, मलाया प्रदेश व हिमालयांतील प्रांत याठिकाणीं विशेष आढळतात. त्यांतलि एखादा क्वचित सह्याद्रिपर्वतावर सांपडतो.

नाग अथवा दर्वीकरः—नाया या जातीमध्यें दोन जाती आहेत. एक नाया ट्रीपुडिअन्स अथवा नेहमींच्या आढळण्यांतला नाग व दुसरा नाया बंगेरस अथवा नागराज अथवा अहिराज.

नायाट्रीपुडिअन्सः—याचीं लक्षणें– ( १ ) पुच्छगोलाकार असतें.(२)उदरतलस्थ खवले आडवे रुंद असतात.(३) ऊर्ध्वौष्ठस्थ खवला नासास्थ खवल्याला व नेत्राला स्पर्श करितो. ( ४ ) नेत्राग्रस्थ खवला नासामध्यस्थ खवल्याला लागलेला असतो. ( ५) चौथ्या व पांचव्या अधरोष्ठस्थ खवल्यांच्या मध्यें एक लहान कीलाकार अथवा " क्यूनियेट " नांवाचा खवला आढळतो. कित्येकवेळां दोन किंवा तीन क्यूनियेट खवले असतात. ( ६ ) मलद्वारप्रांतस्थ खवला एकच अखंड असतो. ( ७ ) पुच्छोदरस्थ खवले संबंध पुच्छभर दुभागलेले असतात.

हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं आढळणारा मोठा विषारी सर्प नाग हा होय व या कारणानें हा सर्प सर्वास चांगल्या रीतीनें माहितीचा आहे. या सर्पास फणा असते म्हणून याला दर्वीकर म्हणतात. हा आपल्या शरीराचा पूर्वभाग ताठ करून उभा राहूं शकतो व तात्कळ फणा पसरतो. हा फार चपल आहे व पाण्यांत पोहूं शकतो. याच्या फणेवर चक्र, नांगर, छत्री, स्वस्तिक व अंकुश यांचीं चिन्हें असतात. कांहीं नागांमध्यें फणेवर मुळींच कसलेंहि चिन्ह नसतें. या चिन्हांवरून नेहमींचा नाग (जाति विशेष) म्हणजे नाया ट्रीपुडिअन्स याचे प्रकार ओळखतां येतात. पूर्णपणें फणा उभारणारा सर्प व त्याच्या फणेवर एखादें चिन्ह असलें कीं तो नाग होय व या लक्षणावरून नाग सहज ओळखतां येतो. परंतु एका प्रकारच्या नागामध्यें फणेवर चिन्ह नसतें. तसेंच फणेसंबंधीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, कांहीं निर्विष सर्प, ( उदा. धामण) थोडीशी फणा उभारूं शकतात. यावरून वरील लक्षणें ताडून पाहिल्याशिवाय एखादा सर्प नाग आहे हें ठरविणें किती धोक्याचें आहे हें वाचकांच्या लक्षांत सहज येण्यासारखें आहे. व वरील लक्षणांची महति किती आहे हेंहि समजून येण्यासारखें आहे. नागाच्या पृष्ठवंशाच्या चौथ्या कशेरूपासून पर्शुका त्यांनां लागलेल्या असतात. चौथ्या कशेरूपासून तर सत्तावीस कशेरूपर्यंत लागलेल्या पर्शुका इतर कबंधाच्या भागावरील पर्शुकासारख्या कमानदार नसतात व त्यांच्यापेक्षां ह्यांची हालचाल जास्त विस्तृत प्रमाणानें होऊं शकते. यांची हालचाल त्यांनां लागलेल्या स्नायूंच्या संकोचविकासानें होते. उजवीकडील ९ वी पर्शुका व डावीकडील १० वी पर्शुका ह्या वर सांगितलेल्या पर्शुकांत जास्त लांब असतात व तेवढ्या भागांत ह्यांच्या वरच्या व खालच्या पर्शुका अनुक्रमें कमी कमी होत जातात. या पर्शुकांनां लागलेल्या स्नायूंच्या संकोच पावण्यानें त्या सरळ उभ्या होतात व त्यामुळें त्या भागावरलें शरीराच्छदन विस्तार . पावतें व नागाची फणा म्हणजे हा शरीराच्छादनाचा विस्तार पावलेला भाग होय. आतां वर सांगितल्याप्रमाणें तो मध्यें जास्त विस्तृत असून दोहों शेवटाला कमी असतो त्यामुळें फणा अंडाकृति गोलाकार बनते. नागास फणा विस्तृत ठेवून तोंड चांगलें उघडतां येत नाहीं. व चावावयाचें असलें म्हणजे तो वरचेवर फणा आवरून किंवा मिटून वांकडी मान करून तोंड टाकीत असतो. नागाच्या कातडीचा रंग निरनिराळा असतो. शीर्षाचा भाग दबलेला असून मुसकटाचा भाग बराच कमी असतो व तो वरून गोलदार दिसतो. नासाछिद्र वरेंच मोठें असतें. नागाला कर्णरंध्र व कर्णपटल हीं नसल्याकारणानें ध्वनिवाहक हवेच्या लहरीमुळें त्याला ऐकूं येणें शक्य नाहीं. परंतु त्याला श्रवणक्रियेचें मुख्य साधन अंतरिंद्रियें हें आहे व त्याच्या साह्यानें घन पदार्थांच्या कंपामुळें होणारें ध्वनिज्ञान त्याला होतें. नागाचीं अंडीं गर्भधारण होऊन ६० दिवसांनीं साधारणतः घातलीं जातात व तीं अंडीं उबून वीण होण्यास सुमारें ६९ दिवस लागतात. नागाच्या पिल्लास जन्मतःच विष असतें. तरुणावस्थेंत नाग फारच रागीट व क्रूर असतो व झटकन दंश करितो. उतार वयांत आल्यावर एकाएकी अंगावर येत नाहीं.

नाग आढळत नाहीं असें एकहि ठिकाण नाहीं. पडक्या भिंतींत तो असावयाचाच. त्याला मनुष्यवस्तीपासून त्रास होत नाहींसा दिसतो. नाग बहुतकरून उंदीर, घूस, बेडूक इत्यादि प्राण्यांवर आपली उपजीविका करितो. केव्हा केव्हां हा सर्पभक्षकहि होतो.

नागाची दंष्ट्रा किंवा विषदंत लहान असतो. तरी तो मंडली सर्पाच्या अथवा व्हीपरीडी सर्पांच्या विषदंतापेक्षां सापेक्षतेनें जास्त मजबूत असतो. प्रत्येक मुखास्थीला पूर्ण वाढ झालेले असे दोन विषदंत झालेले असतात, परंतु ते एकामागून एक असे कांहीं दिवसांच्या अंतरानें टाकले जातात. नागाचे विषपिंड म्हटले म्हणजे त्याचे लालापिंड होत. व ते त्याच्या कर्णप्रांताला लागलेले असतात. ते एखाद्या पोकळ पिशवीप्रमाणें असून त्याच्यापासून एक स्रोतस निघतें. या पिंडाला एक मासीटर नांवाचा स्नायु लागलेला असतो. तो बहुतेक या पिंडावर पसरून बसलेला असल्या कारणानें जेव्हां या स्नायूचें संकोचन होतें तेव्हां या विषपिंडावर दाब बसतो. या दाबामुळें विष

स्रोतसांत जाऊन त्याच्या वाटे मुखांत येतें व विषदंताच्या प्रणालीच्या योगेंकरून बाहेर टाकिलें जातें.

नागाचें विष जेव्हां ताजें असतें तेव्हां तें निर्मळ परंतु थोडेंसें पिवळट व स्निग्ध असें दिसतें. तेंच उघडें ठेविलें असतां घन होतें व त्याचें वजन ६० ते ७५ टक्क्यानें कमी होतें. सुकून घन झाल्यावर तें पारदर्शक राहतें व डिंकाच्या खड्याप्रमाणें दिसतें. या स्थितींत त्या विषाचा विषारीपणा पुष्कळ वर्षे टिकतो. विषाचें परिमाण हें नागाच्या वाढीवर तसेंच त्याच्या शरीरस्वास्थ्यावर जरी अवलंबून असतें तरी तो चवताळला असल्यास जास्त होतें. त्याच्या वृद्धावस्थेंत विषाचें परिमाण कमी असतें.

नागाचें विष पेयरूपानें पोटांत गेल्यास इजा होत नाहीं ही गोष्ट बहुतेकांस माहित आहेच. परंतु तेंच विष रक्तांत मिसळल्यास तात्काळ भयंकर परिणाम घडून येतात. नागाचें विष फार जलद रीतीनें शरीरांतील रक्तामध्यें भिनून जातें. विषप्रयोगशाळेंत तज्ज्ञ लोकांनीं पुष्कळ तऱ्हेनें नागांच्या विषासंबंधीं प्रयोग करून निरनिराळ्या जातींच्या जनावरांच्या शरीरांत किती प्रमाणानें विष रक्तांत भिनलें असतां मृत्यु येतो हें ठरविलें आहे व त्यावरून मनुष्यासंबंधीं प्रमाण साधारणपणें अटकळीनें काढलें आहे. त्यावरून असें अनुमान निघतें कीं एका सर्वसाधारण अशा नागाच्या विषपिंडामध्यें एकावेळीं पंधरा मनुष्यांनां मृत्युमुखीं नेण्यासारखें विष असतें. तरीपण आजपर्यंतच्या नमूद केलेल्या सर्पदंशांच्या माहितीवरून व अनुभवावरून नागदंश झाला असूनहि कांहीं मनुष्यें त्यामुळें न दगावतां बरीं झालेलीं आहेत किंवा बचाविलीं आहेत. कांहींनां मुळींच विषबाधा झालेली दिसून आली नाहीं. या सर्व गोष्टींवरून साधारण सिद्धांत निघतो तो हाच कीं, जरी नागदंश झाला तरी त्याचें विष जितकें शरीरांत जावें, तितकें गेलेलें नसतें किंवा नागानें दंश केला तरी विष ओतलें जात नाहीं. तेव्हां भीतीचा भाग बाजूस ठेविला म्हणजे असें म्हणतां येईल कीं नागाच्या दंशांत सुद्धां मनुष्याला विषार न होण्याचा कांहीं थोडा संभव आहे. कारण कित्येक वेळां नागाचा दंश फारच ओझरता होतो. कित्येक वेळां ज्या प्रमाणानें विष शरीरांत भिनावें त्या प्रमाणानें तें भिनलें नसल्यामुळें किंवा ओतलें गेलें नसल्यामुळें जीवितनाश झालेला नाहीं. हे सर्व प्रकार अनेक गोष्टींवर अवलंबून असतात. त्यांचा सविस्तर उल्लेख येथें करणें अशक्य आहे.

नागाच्या विषाची क्रिया मुख्य ज्ञानेंद्रियें म्हणजे मेंदू व सुषुम्ना यांच्यावर होते. तेव्हां त्याच्या विषाचीं लक्षणें देणें अवश्यक आहे. नागांच्या विषाराचीं लक्षणें दोन प्रकारानें देतां येतील; पहिल्याप्रथम दंशस्थानीं आढळून येणारीं लक्षणें किंवा स्थानिक लक्षणें हीं होत. दुसरीं प्रकृतिपरिणामी किंवा सार्वदैहिक लक्षणें होत. दंशस्थानीं प्रथमतः व नित्याचें होणारें लक्षण म्हणजे असह्य व दाहक वेदना होत. या दुखापतीच्या मानानें फारच असतात व ताबडतोब सुरू होऊन पुष्कळ तास चालू राहतात. शरीराचा एखादा भाग ओरखडला गेल्यानें जशा साधारण वेदना होतात तशा वेदना दंशस्थानीं होऊन त्या थोड्या वेळानें बंद पडल्यावर विष शरीरांत गेलेलें नाहीं असें समजण्यास पुष्कळ आधार होतो. दुसरें लक्षण म्हणजे वेदना सुरू होतांच दष्टभाग सुजूं लागतो व सूज थोडी थोडी वाढत जाऊन तो भाग फुगतो. दष्ट भागांत विषाचा प्रवेश झालेला आहे ह्याची नेहमींची खूण म्हणजे तिसरें लक्षण होय व तें हेंच कीं, दष्ट भागांतून रक्तमिश्रित लस बाहेर वाहत राहणें. जर नेहमींच्या प्रमाणें एखाद्या ओरखडलेल्या भागावर जसें बाहेर रक्त गोठून ओरखडा बंद होतो तसें दष्टस्थान झालेलें दिसल्यास साधारण अनुमान असें निघतें कीं विष शरीरांतील धातूंमध्यें भिनलें नाहीं. चौथें स्थानिक लक्षण बाह्यतः दिसण्यांत येण्यासारखें नाहीं तरी तें दष्टभागावर शस्त्रक्रिया केल्यानें दिसून येतें. वरील तीन लक्षणें चांगल्या तऱ्हेनें दिसून आल्यास व विशेषतः ताबडतोब सूज येऊन फुगारा झाल्यास विष आहेच असें समजावयाचें. दष्टभागीं कापून पाहिलें असतां मध्याला जांभळेपणा दिसतो. नंतर रंग लाल जरद होऊन गुलाबी होतो व त्यापासून पातळ लस वाहूं लागते. जेव्हां हें लक्षण दिसून येतें तेव्हां खात्रीनें विष भिनलें आहे असें समजावें. जर हें लक्षण भाग कापून पाहिलें असतां आढळून आलें नाहीं, तर विष शरीरधातूमध्यें पोहोंचलें नाहीं, असें साधारणतः म्हणण्यास हरकत नाहीं. नागाच्या विषाचा जहालपणा या वर सांगितलेल्या तात्काळ घडून येणाऱ्या शरीरधातूवरच्या परिणामावरून व्यक्त होतोच. याशिवाय दुसरा विशेष हा कीं, दंश होऊन मनुष्य सुदैवानें त्यांतून निभावल्यास पृष्ठभाग सडल्यासारखा होऊन त्यांतून सर्व जळमट निघून जातें.

सार्वदेहिक लक्षणें म्हटलीं म्हणजे पक्षवायु क्रमाक्रमानें तरी बराच जलद रीतीनें होणें. कारण नागाच्या विषाचा परिणाम ज्ञानेंद्रियें म्हणजे मेंदू व सुषुम्ना यांची शक्ति नाहींशी करून त्यांचे व्यापार बंद पाडणें असा होतो व शेवटीं मेंदूंतील श्वसनक्रियेचें मर्मस्थान ( रेस्पिरेटरी सेंटर ) याचा नाश करून श्वासोच्छ्वासाची क्रिया बंद पाडून मृत्यू आणण्याकडे होतो. प्रथम पाय गळतात व चालण्याची किंवा उभें राहण्याची शक्ति नाहींशी होते. ही क्षीणता वर चढत जाऊन मानेची शक्ति जाते व त्यामुळें डोकें कोलमडूं लागतें. जिव्हा, ओंठ व घसा यांचे स्नायू शिथिल होतात व त्यामुळें वाचा बंद होते. ओंठ लोंबकळतात व लाळ गळूं लागते व कांहींहि गिळण्याची शक्ति राहत नाहीं. डोळ्यांच्या पापण्या लोंबकळूं लागतात व चेहेऱ्यावर झांपड येते. हे सर्व प्रकार घडतात तोंच श्वसनक्रियेंत बिघाड होतो, श्वासावरोध होऊं लागतो व शेवटीं श्वासोच्छ्वास बंद पडून मृत्यु येतो. श्वासोच्छ्वास अगदीं बंद पडल्यावरहि कांहीं वेळ ( २-३

मिनिटेंपर्यंत ) नाडीचीं स्फुरणें होत असतात. हीं वर सांगितलेलीं लक्षणें मुख्य होत; परंतु त्यांच्याबरोबर दुसरीं कांहीं लक्षणें दिसून येतात तीं म्हणजे तोंडाला मळमळ सुटून वेळेवर उलट्या होणें व रक्तस्रावहि होणें. असें होण्याचें कारण रक्ताच्या घटकरचनेंत विष फरक घडवून आणतें व त्यामुळें त्याची गोठण्याची शक्ति नाहींशी होते व त्यांतील रक्तपेशींचा विध्वंस होऊन त्या विरल्या जातात. तथापि हा रक्तावरचा परिणाम नागाच्या विषापेक्षां व्हीपरीडी सर्पांच्या दंशानें झालेल्या विषामध्यें विशेषतः आढळून येतो. येथें मोठी लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही आहे कीं, नागाच्या विषाचा परिणाम हृदयाची क्रिया प्रत्यक्ष बंद करण्याकडे जरी होत नाहीं तरी कांहीं इतर गोष्टींच्या परिणामादाखल हृदयाची क्रिया मंदावते. उदाहरणार्थ, वेदना व भीति यांच्यामुळें हृदयपात होण्याचा बराच संभव असतो. भीतीमुळें एकदम एका क्षणांत शक्तिपात होऊन मूर्च्छनाहि येते व ती मूर्च्छना तशीच राहून त्यांतच मृत्यू होतो. अंग थंडगार होतें व नाडी बरोबर लागत नाहीं व शेवटीं हृदयाची क्रिया बंद होऊन मृत्यू होतो. भीतीमध्यें श्वासोच्छ्वासाची क्रिया लघुतर होत जाते. तेव्हां दंश झाल्यावर त्यापासून होणाऱ्या लक्षणांची चिकित्सा करतांना भीतीचा प्रकार कोठपर्यंत गेला आहे, याची खबरदारीहि ठेवणें जरूर असतें.

नागाच्या दंशाच्या विषाराला खात्रीचा उपाय एकच आहे. व तो "ॲन्टीव्हिनीन" लस टोंचणें हाच होय; परंतु ही लस नागदंश झाल्यावर तावडतोब टोंचण्यांत आली पाहिजे. तसेंच ती शिरांमध्यें टोंचली पाहिजे म्हणजे तिचें कार्य तावडतोब होऊं लागतें. शिवाय तिचें परिमाण शंभर क्यूबिक सेंटीमीटरपेक्षां कमी नसलें पाहिजे व ही लस तयार केल्यावर दोन वर्षांच्यावर राहिलेली नसली पाहिजे. ह्या वर नमूद केलेल्या सर्व अटींमुळेंच असें उत्तम रामबाण औषध मनुष्याच्या हातीं असूनहि नागदंशाच्या विषारावर त्याचा व्हावा तितका उपयोग होत नाहीं. पुनः आतां वर सांगितल्याप्रमाणें जरी हृदयावर विषाचा व्यापार होत नाहीं, तरी हृदयपात दुसऱ्या कारणांमुळें होतो. हृदयाच्या क्रियेंत फरक झालेला असल्यास त्याविषयीं उपाय योजिले पाहिजेत व तसें न करतां निव्वळ लसेचाच प्रयोग करून राहिल्यास मृत्यू टळणार नाहीं. मंद किंवा जलद नाडी वाहणें व शरीर थंड पडणें, हीं लक्षणें स्पष्टपणें हृदयाच्या व्यापारामध्यें फरक झाल्याचें दर्शवितात व हृदयाच्या क्रियेचें उद्दीपन जेणेंकरून होईल असे उपाय तावडतोब अमलांत आणण्यास सुचवितात; तेव्हां नागदंश झालेल्या इसमाजवळ असणाऱ्या मंडळीनें न घाबरतां प्रथमतः वेदना होत असल्यास त्यांच्या शमनार्थ शेक करावा. अंग थंड पडण्यास सुरवात झाली असल्यास उष्णता आणण्यासाठीं सुंठीची पूड किंवा मोहरीची पूड शरीराला कांहीं ठिकाणीं घांसावी व बाकीचें सर्व अंग धाबळी किंवा बुरणूस अशासारख्या गरम कपड्यानें गुंडाळून ठेवावें व गरम पाण्यानें भरलेले शिसे अंगाला लावून ठेवावे. दंश झालेल्या इसमाला गिळतां येत असल्यास थोडी कॉफी किंवा ब्रॉन्हरीला असें पेय द्यावें; परंतु मद्यार्क किंवा ब्रॅन्डी कधींहि देऊं नये. खऱ्या विषारामध्यें ब्रॅन्डीमुळें फार हानि होते. विषार झाला नाहीं, अशी खात्री झाल्यावर दिल्यास हरकत नाहीं. नागदंश झाल्यावर वर सांगितल्याप्रमाणें केव्हां केव्हां विषार होत नाहीं. येथें विस्तारभयास्तव ह्या विषाचें जास्त विवेचन करतां येत नाहीं.

नागराज किंवा अहिराजः—नाया बंगेरस–दि हेमाड्रीयड. ह्या जातिविशेषाच्या फणेवर कसलेंहि चिन्ह नसतें; परंतु हा सर्प शरीरानें फार लांब, मोठा व बळकट असतो. कधीं कधीं याची लांबी १४ ते १५ फूट भरते. याच्या पिल्लाच्या कातडीचा रंग अगदीं काळा असून सर्व शरीरावर पांढरे किंवा पिंवळे आडवे पट्टे असतात व शीर्षाच्या भागावरसुद्धां चार आडव्या रेघा असतात; परंतु प्रौढावस्थेंत ह्या शीर्षावरील आडव्या रेघा नाहींशा होतात. कातडीचा रंग बदलतो व तो पिंवळा, पिंवळट–हिरवा, उदी किंवा काळसर उदी असा होतो व कबंधावरील आडवे पट्टे किंवा कमानदार रेघा स्पष्ट दिसतात. हा स्वभावतः फार क्रूर असून मनुष्याहून बळकट असतो. हा सर्प बहुधां बंगाल्यांतील सुंदर वनांत सांपडतो. सिंहलद्वीप, राजपुतान्याचा पश्चिम भाग व सिंधप्रांतखेरीज करून सर्व हिंदुस्थानांतील इतर ठिकाणीं क्वचित् सांपडतो.

या सर्पांचे विषदंत शरीराच्या मानानें फार लांब असतात व त्यामुळें याचा दंश फार भयंकर असतो. याचें विष नागापेक्षांहि जहाल असतें. हा बहुशः सर्पभक्षक आहे व आपली उपजीविका सर्पांवरच करतो.

याचीं लक्षणें:—( १ ) पार्श्वशीर्षस्थ ( पॅरिक्टल्स ) खवल्यांच्यामागें मोठे शिरःपृष्ठस्थ ( आक्सिपिटल ) खवल्यांची एक जोडी असते, व हे दोन शिरःपृष्ठस्थ खवले एकमेकांना लागून बनलेले असतात. ह्या एका लक्षणावरून नागराज सर्प सहज ओळखिला जाण्यासारखा आहे. कारण शिरःपृष्ठस्थ खवले दुसऱ्या सर्पांमध्यें असले तरी ते एकमेकांनां लागून झालेले नसतात. ( २ ) पुच्छोदरतलस्थ खवले पुच्छाच्या आरंभीं अखंड असतात परंतु पुच्छाच्या शेवटाला ते दुभागले जातात. ( ३ ) पृष्ठवंशस्थ खवले ( व्हर्टिब्रल )आकारानें व त्यांच्या परिमाणानें पाहिले असतां इतर पृष्ठवंशप्रांतस्थ ( डॉर्सल ) खवल्यांच्या सारखेच असतात. हीं दोन शेवटचीं लक्षणें पहिलें लक्षण हजर असल्यासच उपयोगाचीं आहेत व पहिलें लक्षण ताडून पहिल्यावरच तीं पहावयाचीं असतात. नाहींतर त्यांना महत्त्व नाहीं.

हेमीबंगेरस निम्रिसन्सः–हिंदी सर्वसाधारण कॉरल सर्प. हा जातिविशेष पर्वतावरचा राहाणारा असून सह्याद्रिपर्वत, निलगिरी वगैरे ठिकाणीं सांपडतो. याच्या विषासंबंधीं माहिती

फारशी ग्रंथित नाहीं. याची लांबी कधीं कधीं चार फूट भरते. याच्या शीर्षाचा व मानेचा भाग काळा असतो. शीर्षाच्या पश्चिम शेवटीं पिवळ्या रंगाचा तिरपा व आडवा बारीक पट्टा असतो. पृष्ठभाग सबंध लाल, जांभळा, तपकिरी अथवा लाल—तपकिरी असून त्यावर ३ पासून ५ पर्यंत ठिपक्यांच्या उभ्या ओळी झालेल्या असतात. किंवा कांहींमध्यें हे ठिपके एकत्र होऊन त्यांच्या रेषा बनलेल्या असतात. उदरतलाचा भाग सबंध सारखा लाल असतो. लक्षणेंः—नागकुटुंबाचीं दिलेलीं लक्षणें असून हा जातिविशेष ओळखण्याचीं खास लक्षणें पुढीलप्रमाणें आहेत ( १ ) मलद्वारप्रांतस्थ खवला दुभागलेला असतो. ( २ ) कर्णप्रांतस्थ खवला सात ऊर्ध्वोष्ठ खवल्यांपैकीं पांचव्या, सहाव्या आणि सातव्या ऊर्ध्वोष्ठ खवल्यांना स्पर्श करितो. याशिवाय दुसरीं पुराव्यादाखल लक्षणें.—(३) पुच्छोदरतलस्थ खवले सबंध दुभागलेले असतात. ( ४ ) पूर्वाधोजिव्हस्थ खवले चार अधरोष्ठ खवल्यांनां लागलेले असतात. ( ५ ) पश्चिमाधोजिव्हस्थ खवले चवथ्या अधरोष्ठ खवल्यांना लागलेले असतात. ( ६ )चवथा अधरोष्ठस्थखवला सर्वांत मोठा असून त्याच्या पाठीमागें तो दोन खवल्यांना स्पर्श करतो.

क्रेट—बंगेरस अथवा राजिमंत कुटुंब.—वर सांगितल्याप्रमाणें क्रेट कुटुंबांतील जातिविशेष ओळखण्याचें पाहिलें मुख्य लक्षण म्हणजे पुच्छ गोलाकार असून पृष्ठवंशीय खवल्यांच्या अगदीं मध्याच्या रांगेंतील खवले सबंध कबंधभर मोठें बनलेले असतात हें होय. या लक्षणाच्या अभावीं सर्प क्रेट कुटुंबांतील नव्हे. परंतु कांहीं निर्विष सर्पांनांहि हें लक्षण असतें म्हणून वर दुसरें लक्षण सांगितलें तें हें कीं, अधरोष्ठस्थ खवले या कुटुंबांत चारच असतात चवथा अधरोष्ठस्थ खवला सर्वांत मोठा असतो. या तीन लक्षणांखेरीज दुसरीं लक्षणें म्हटलीं म्हणजे ( ४ ) नासाक्षिमध्यस्थ खवले नसतात. ( ५ ) मलद्वारप्रांतस्थ खवला एकच अखंड असतो. ( ६ ) पुच्छोदरतलस्थ खवले सबंध पुच्छभर अखंड असतात, किंवा कांहीं जातिविशेषांमध्यें आरंभीं अखंड असून पुढें दुभागले जातात.

बंगेरस या जातींत बारा जातिविशेष आहेत. त्यांपैकीं बहुतेक हिंदुस्थानांत आढळतात.

बंगेरस सेरुलिअस—नेहमीं आढळणारा क्रेट किंवा राजिमंत सर्प ( मण्यार ? ):—वर दिलेलीं या कुलाचीं लक्षणें तपासून क्रेट आहे असें ठरल्यावर या जातिविशेषाला ओळखण्याचीं खास लक्षणें खालील होत—( १ ) याच्या शरीरावर पांढरे आडवे कमानदार पट्टे असतात व या पट्ट्यांचा रंग कबंधाच्या शेवटच्या भागीं जास्त स्पष्ट रीतीनें दिसण्यांत येतो. कबंधाच्या पूर्वशेवटीं हा रंग फिका पडून पट्टे दिसेनासे होतात. कांहीं निर्विष सर्पांनां असले पट्टे असतात परंतु ते त्यांच्या शरीराच्या पूर्वभागीं विशेष स्पष्ट रीतीनें पांढरे फटफटीत असून पश्चिमशेवटीं फिके पडलेले असतात. ( २ )शरीरावरील खवल्यांच्या उभ्या रांगा १५ असतात. ( ३ )पुच्छोदरतलस्थ खवले सबंध पुच्छभर अखंड असतात. ( ४ )तिसरा व चवथा ऊर्ध्वोष्ठस्थ खवला हे एकसारखे असतात. याच्या कातडीचा रंग तकतकीत काळा असून याच्या शरीरपृष्ठावर पांढरे कमानदार पट्टे जोडीनें झालेले असतात. शरीराच्या पूर्वभागीं कित्येकवेळां हे पट्टे दिसत नाहींत. उदरतलाचा रंग सुद्धां पांढरा तकतकीत असतो. याची लांबी साधारणतः ४॥ फूट असते. हा सर्प स्वभावानें क्रूर नाहीं. हा सर्पभक्षक आहे. हा शेतांत, कुरणांत सांपडतो. लांकडांच्या राशींत किंवा मोडून पडलेल्या घराच्या आवारांत व घरांच्या छपरांतहि असलेला आढळतो. याचा विषार बहुतेक नागाच्या विषाराप्रमाणें असतो. विषप्रयोगशाळेंतील प्रयोगांवरून याचें विष नागाच्या विषापेक्षां जास्त जहाल आहे असें समजतें. श्वासोच्छ्वासाच्या क्रिया बंद पडून मृत्यु येतो. याचा विषार झाला असतां दंशस्थानीं वेदना कांहीं वेळानंतर मागाहून होऊं लागतात दुसरें एक विशेष चिन्ह दिसून येतें तें हें कीं. या विषारांत असह्य पोटदुखी होते. याचें कारण बहुधा अंतरिंद्रियांत रक्तस्राव होणें हें होय. रक्तस्राव व्हीपरीडी सर्पांच्या विषारामध्यें नेहमीं होत असतो.

बंगेरस फयासीएटसः—म्हणजे पट्टेवाला क्रेट याला राजसाप म्हणतात. या जातिविशेषाला वरच्या जातिविशेषाचीं सर्व लक्षणें असतात. मात्र याच्या कातडीवर आडवे पिवळे पट्टे असतात व ते आळीपाळीनें शरीराच्या काळ्या भागाबरोबर स्पष्ट दिसतात. वरवर पाहाणाऱ्याला हा सर्प लायकोडान फयासीएटस या निर्विष जातिविशेषासारखा दिसतो. याचा स्वभाव क्रूर नाहीं. याचें विष नागाच्या विषाप्रमाणेंच मारक असतें तरी नागाच्या विषापेक्षां थोडें सौम्य आहे. आसामांत व ब्रह्मदेशांत हा जातिविशेष फार आढळतो.

व्हीपरीडी अथवा मंडलीसर्पकुलः—व्हीपरीडी अथवा मंडलीसर्प यांनां योनिजसर्प म्हणतात. कारण यांची प्रजा जिवंत निपजते. परंतु मंडलीसर्प हेच योनिज आहेत असें नाहीं, कारण क्षारोदकसर्प व शुद्धोदकसर्प हेहि योनिज आहेत.

व्हीपरीडी सर्पांचीं लक्षणें—( १ ) यांचें मुख्य लक्षण हें आहे कीं, यांचे मुखास्थी उभे बनलेले असतात व त्या प्रत्येकाला दोन नलिकासम दंष्ट्रा लागलेल्या असतात. दुसऱ्या सर्व सर्पांमध्यें मुखास्थि आडवे असतात ( २ ) यांचे विषदंत कोल्युब्रॉइडी विषारी सर्पांच्या विषदंतापेक्षां सापेक्षतेनें फार लांब असतात. (३) तसेंच हे विषदंत थोडे नाजूक असून जास्त कमानदार असतात व त्यांच्या प्रणालीसंबंधींची जोडरेषा त्यांच्या पृष्ठावर फार करून दिसून येत नाहीं. ही जोडरेषा सविष कोल्युब्रॉइडी सर्पांच्या विषदंतांत दिसते. (४) यांच्या मुखास्थीला फक्त विषदंतच लागलेले असतात. विषदंताखेरीज करून दुसरे साधे भरीव दांत मुखास्थीला कधींच लागलेले नसतात.

व्हीपरीडी कुलाचें वर्गीकरण दोन उपकुलांत करितात. हें वर्गीकरण या कुलांतील सर्पांत नासाक्षिमध्यस्थ रंध्र हजर असतें किंवा नसतें या लक्षणावरून केलें जातें. तेव्हां रंध्रविहीन व्हीपरीडी अथवा व्हीपरैनी हें एक उपकुल आहे. व दुसरें उपकुल म्हटलें म्हणजे रंध्रयुक्त व्हीपरीडी अथवा क्रोटोलैनी हें होय.

वर म्हटल्याप्रमाणें व्हीपरीडी सर्प एकंदर विषारी असतात. तरी त्या सर्वांचें विष सारख्या प्रमाणानें जहाल नसतें. कांहीं व्हीपरीडी सर्पांचा दंश फार भयंकर असतो व तो प्राणघातक होतोच. परंतु दुसऱ्या कांहींच्या दंशानें मृत्यु येत नाहीं व इतर कांहींच्या दंशानें फारच थोडी इजा होते. व्हीपरीडी सर्पांच्या विषाचा परिणाम हृदय व रुधिर यांच्यावर होतो व त्यांच्या विषारानें मृत्यु येतो तो रक्त दूषित झाल्यामुळें हृदयाची क्रिया बंद पडून येतो.

उपकुल(१)—क्रोटोलैनी अथवा रंध्रयुक्त व्हीपरीडी सर्प.या उपकुलांतील सर्पांचीं लक्षणें.—(१) पुच्छ गोलाकार असतें. (२) नासाक्षिमध्यस्थ रंध्र हें नेत्र व नासाछिद्र यांच्यामध्यें स्पष्टपणें दिसून येण्यासारखें असतें. (३)पृष्ठवंशीय खवले मोठे नसतात. या उपकुलांतील सर्प साधारणतः उंच डोंगरावरील प्रदेशांत आढळतात. यांच्या कातींवर सुद्धां हें नासाक्षिमध्यस्थ रंध्र दिसून येतें. परंतु त्याला त्याचा काय उपयोग होतो हें बरोबर समजलें नाहीं. या उपकुलांत हरियाळ (?) अथवा बांबूसर्प येतो.

ल्याकेसीस ग्रामीनिअस,—बांबूसर्प, हिरवा योनिजसर्प अथवा हरियाळ (?):—हिंदुस्थानांत रंध्रयुक्त व्हीपरीडी सर्पांतील जातिपैकीं हा जातिविशेष जास्त ठिकाणीं सांपडतो. हा सर्प हिरव्या गवताच्या रंगाचा असतो व याची कनीनिका मांजराच्या कनीनिकेप्रमाणें ऊर्ध्व बनलेली असते. केव्हां केव्हां याच्या कातडीवर काळ्या रेघा उभ्या किंवा आडव्या झालेल्या असतात. उदरतलाचा रंग पांढुरका असतो. याची लांबी कित्येक वेळां ३॥ फूट भरते. या जातिविशेषाचीं खास लक्षणें.—(१) कबंधाच्या पश्चिमभागीं एकंदर खवले १५ असतात. (२) ऊर्ध्वनेत्रस्थ खवला एकच असतो. (३) ऊर्ध्वोष्ठस्थ खवले ९ ते १२ असतात व यांतील दुसऱ्या खवल्याच्या वरच्या भागाला खांचणी असून ती रंध्राकडे गेलेली दिसते. या सर्पाचे विषदंत मोठे असतात तरी या जातिविशेषाचा विषार क्वचितच मारक होतो.

या जातीपैकीं दुसरा जातिविशेष सह्याद्रि व निलगिरी प्रांतांत आढळून येतो. तो ल्याकेसीस स्ट्रिगेटस अथवा नालांकित योनिज सर्प होय. हा सर्प उदी रंगाचा असतो व ह्याच्या कातडीवर नानातऱ्हेचे काळसर डाग पडलेले असतात; त्यामुळें ती कातडी चित्रविचित्र दिसते. याच्या मानेवर घोड्याच्या नालासारखें पिंवळट चिन्ह झालेलें असतें व नेत्राच्या पश्चात् प्रत्येक बाजूवर काळी रेघ असते. या जातिविशेषाचें खास लक्षण म्हटलें म्हणजे दुसरा ऊर्ध्वोष्ठस्थ खवला नासाक्षिमध्यस्थ रंध्रापासून संबंध अलिप्त असतो.

ह्याच्यासारखा दुसरा जातिविशेष ल्याकेसीस अनामालेन्सीस. हा कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील डोंगराळ प्रांतांत सांपडतो.

उपकुल(२) व्हीपरैनी अथवा रंध्रविहीन व्हीपरीडी सर्पः—या उपकुलांतील सर्पांचीं लक्षणें.—(१) पुच्छ गोलाकार असतें. (२) मुसकटावर व शीर्षपृष्ठावर कबंधाच्या पृष्ठावरील खवल्यासमान लहान खवले असतात. (३) ह्या सर्पांचें शव पाठीवर उताणें ठेविलें असतां शेवटल्या पश्चिमस्थ खवल्याचा किंचित भाग उदरतलस्थ खवल्यांच्या दोहोंबाजूस दृष्टीस पडतो. (४) नासाक्षिमध्यस्थ रंध्र यांच्यांत कधींहि बनलेलें नसतें. या उपकुलांत फुरसें व घोणस हीं येतात. फुरसें म्हणजे 'एक्सीस करैनेटा" अथवा करवतीच्या दांत्याप्रमाणें खवल्यांना दांते असलेला व्हैपर. या जातिविशेषास—रंध्रविहीन व्हीपरीडींचीं सर्व लक्षणें असून पुढील खास लक्षणें असतात. (१) पुच्छोदरतलस्थ खवले दुभागलेले नसतात. (२) ऊर्ध्वनेत्रस्थ खवला दुभागलेला नसतो. (३) नासिकास्थ खवला नासाग्रस्थ खवल्याला व पहिल्या ऊर्ध्वोष्ठस्थ खवल्याला स्पर्श करितो. (४) सर्व ऊर्ध्वोष्ठस्थ खवल्यांत चवथा (क्वचित तिसरा) ऊर्ध्वोष्ठस्थ खवला मोठा असतो. (५) नेत्राच्या खालीं त्याच्या व ऊर्ध्वोष्ठस्थ खवल्यांच्या ओळीमध्यें दुसऱ्या खवल्यांच्या दोन ओळी असतात.

याचा रंग वाळूच्या रंगासारखा असून कित्येक वेळां तो काळसर उदी बनतो. याच्या प्रत्येक बाजूवर एक नागमोडी फिकट रेघ बहुतेक स्पष्ट रीतीनें झालेली दिसते व याच्या शीर्षपृष्ठावर पक्ष्याच्या पदचिन्हाप्रमाणें एक फिकट चिन्ह झालेलें असतें. उदरतलाचा रंग सारखा पांढरा असतो किंवा त्यावर काळसर ठिपके पसरलेले असतात.

हा जिवंतपणीं शरीराला फुगवटा आणून आपल्या शरीराची दुहेरी चक्राकार अळी घालतो व तीं अळी एकमेकांवर घासतो त्या घर्षणामुळें एकप्रकारचा फूत्कार उत्पन्न होत असतो. हा जातिविशेष बहुतेक सर्व ठिकाणीं सांपडतो. याची लांबी दोन फूट असते. याच्या विषारासंबंधीं एकमत नाहीं. तरी याचें विष मारक आहे. याचा विषार एकदम चढून येत नाहीं तरी शेवटीं त्याचा हानिकारक परिणाम होतो.

घोणस—मंडलीसर्प—रसेलचा व्हैपर, अथवा दि डबोईआ अथवा चेन व्हैपर.—या जातिविशेषास रंध्रविहीन व्हीपरीडींचीं सर्व लक्षणें असून पुढील खास लक्षणें असतात. (१) अधोजिव्हास्थ खवले चार किंवा पांच अधरोष्ठस्थ खवल्यांनां लागलेले असतात. (२) पुच्छोदरतलस्थ खवले दुभागलेले असतात. (३) शरीराच्या पृष्ठावर तीन उभ्या ठसठशीत मोठ्या ठिपक्यांच्या ओळी-एक मध्यस्थ व तिच्या दोन्ही बाजूवर दोन अशा—झालेल्या असतात. (४) ऊर्ध्वनेत्रस्थ खवला एकच असतो.

याचा रंग फिकट उदी किंवा म्हशीच्या कातडीसारखा असून त्याच्या पृष्ठावर तीन उभ्या ठसठशीत मोठ्या ठिपक्यांच्या ओळी असतात प्रत्येक ठिपक्याचा आंतला भाग कातडीच्या रंगाचा असून त्याला काळसर रंगाचें वेष्टन झालेलें असतें व या वेष्टणाला पांढुरकी किनार असते. शीर्षावर काळसर चिन्हें असतात व शीर्षाच्या दोहों कडांवर फिकट गुलाबी दोन रेघा झालेल्या असून त्या मुसकटाच्या शेवटपर्यंत जाऊन तेथें मिळतात. उदरतळाचा भाग पांढरा असून त्यावर अर्धचंद्राकृति काळे डाग असतात.

हा जातिविशेष बहुतकरून सर्व ठिकाणीं सांपडतो. याची लांबी ५ फूट असते. कित्येक वेळां ५॥ फूटहि भरते.

हा सर्प मंद असला तरी स्वभावानें फार क्रूर आहे. याचें विष फार जहाल असतें. याच्या विषानें बहुतकरून प्राणहानि होते.

याच्या विषाराचे परिणाम रक्तदोष घडवून आणतात. याच्या विषारामध्यें एक द्रव्य असतें, तें रक्त रुधिरपेशींचा (रेड ब्लडकॉर्प्युस्कलस) नाश करितें. शरीरांत या रक्तरुधिर-पेशींचा मुख्य व्यापार म्हटला म्हणजे शरीरधातूंना प्राण-वायु पोहोंचविणें हा होय. तेव्हां त्यांचा नाश झाल्याकार-णानें शरीराची जीवनक्रिया बरोबर चालेनाशी होते. तसेंच मेंदूतील रुधिरवाहिनी मर्मस्थानाचा ( व्हेसोमोटर सेंटर ) व्यापार बंद पडतो व हृदयाच्या स्नायूवर मारक परिणाम होऊन हृदयाची क्रिया बंद पडते व मृत्यु येतो.

याच्या विषाराचा दुसरा भयंकर परिणाम दिसून येतो तो रक्तस्राव होय. हा रक्तस्राव अंतरिंद्रियांत होतो व तो बाहेरून दिसून येत नाहीं. किंवा दष्टस्थानापासून व दुसऱ्या इतर ठिकाणांहून होतो व बाहेरून दिसतो. एखाद्या वेळीं दष्ट-स्थानापासून रक्तस्राव प्रथम बंद होतो व नंतर कांहीं दिव-सांनीं सुरू होतो. इतकें यांचें विष जहाल आहे व तें शरी-रांत भिनून जातें. रक्तस्राव होण्यास मुख्य दोन कारणें होतात. एक कारण हें असावें कीं, याच्या विषाच्या द्रव्या-मुळें रक्ताची गोठण्याची शक्ति नाहींशी होते. व रक्त बाहेर निघत असतें. दुसरें कारण हें असावें कीं, या विषाच्या द्रव्यानें रक्तवाहिन्यांची अंतरकला नाश पावते व त्यामुळें रक्त वाहिन्यांतून अंतरिंद्रियांत शिरूं शकतें. याच्या विषारामध्यें पोटदुखी होते ती बहुतकरून हा अंतःस्राव झाल्यानें होत असली पाहिजे. तेव्हां रक्तस्राव जेणेंकरून होणार नाहीं असे उपाय योजण्याचें धोरण ठेविलें पाहिजे. कारण साधारणतः व्हीपरीडी सर्पांच्या विषाराची खूण म्हटली म्हणजे रक्तस्राव होणें ही होय. याचा दंश झाल्यावर दष्ट भागीं सूज येणें व त्यांतून रक्तस्राव न होणें, तसेंच पोट-दुखी वगैरे न होणें हीं चांगलीं चिन्हें होत. व्हीपरीडी सर्पांच्या विषारामध्यें पक्षवायूचा झटका येत नाहीं परंतु गलितधैर्यपणा विशेष वाढतो व त्यामुळें धैर्यभंगी मुर्च्छना येऊन हृदयाची क्रिया बंद पडते व मृत्यू येतो. तेव्हां उपाय योजीत असतांना ही गोष्ट विसरतां कामा नये. दष्टस्थानापासून किंवा दुसऱ्या ठिकाणाहून जो सारखा रक्तस्राव वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां होत असतो तेव्हां त्या ठिकाणीं सांसर्गिक विषारी जंतूंचा प्रवेश होण्याचा संभव असतो. यासाठीं या सांसर्गिक विषारी जंतूंचा शरीरांत प्रवेश होणार नाहीं असे उपाय योजिले पाहिजेत. रक्तस्राव झाल्याकारणानें व रक्तदूषित झाल्याकारणानें या जंतूंचा नाश करण्याची शरीराची शक्ति नाहींशी झालेली असते. याच्या विषाच्या जहालपणामुळें दष्टस्थानीं शरीरधातू नाश पावून तेथें जखमट निघत असतें व अशा वेळीं सांस-र्गिक विषारी जंतू आपला प्रभाव दाखवितात.

कूर्मगण ( चेलोनिया )—लक्षणें:—याला संस्कृतमध्यें कच्छप, मराठींत कांसव व इंग्रजींत टॉर्टाइज किंवा टर्टल असें म्हणतात. या गणांत जमीनीवरील कासव व पाण्यांतील कांसव इत्यादि प्राणी मोडतात. हा कूर्मगण उरोगामी प्राण्यांच्या वर्गांतील एक गण आहे. या गणांतील उरोगामी प्राण्यांचें शरीर एका कवचानें आच्छादिलेलें असतें व हें कवच अस्थिमय तवकड्यांचें बनलेलें असतें. या कवचाला दोन भाग असतात; एक पृष्ठावरला भाग; ज्याला कांसवाची ढाल म्हणतात तो होय, व दुसरा भाग उदरतलभागीं असतो या कवच्यांच्या तवकड्यांच्या पृष्ठावर बाह्यत्वचें-(एपिडर्मल)तून झालेल्या शृंगमय खवल्यांचें आच्छादनहि असतें. या कवच्यांच्या ढालीची उत्पत्ति कशी होते हें पाहूं गेलें असतां असें आढळून येतें कीं, ती श्वेतत्वचेंतून बनलेल्या अस्थिमय तवकड्या व अस्थिपंजराचा कांहीं भाग या दोहोंचा संयोग होऊन झालेली असते. तेव्हां कांसवाची ढाल ही पाठीच्या कण्याचे चपटलेले कशेरुकंटक व दोहों बाजूनें चपटलेल्या व एकमेकांना जुळून कशेरूकांना जोडलेल्या पर्शुका ह्यांचा पृष्ठावरील श्वेतत्वचेंतून झालेल्या अस्थिमय तवकड्यांशीं संयोग होऊन झालेली असते. उदरतलाव-रील कवचाचा भाग श्वेतत्वचेंतून झालेल्या अस्थिमय तवक-ड्यांचाच झालेला असतो. या गणांतलि कांहीं जातींत वर सांगितलेली ढाल बनलेली नसते. परंतु पृष्ठकवचाचा भाग श्वेतत्वचेंतूनच फक्त झालेला असतो. क्वाड्रेटास्थि किंवा हनुसंधानास्थि हालूं शकणार नाहीं अशा रीतीनें करो-टीच्या भागाला अचल जुळलेलें असतें. या प्राण्यांस बाह्यभागीं तोंडाला नासाछिद्र एकच असतें. मुखाच्या जबड्यांना दांत लागलेले नसतात परंतु जबडे एका शृंग-मय आच्छादनानें झांकले जातात. गात्रें अंगुलीयुक्त झालेलीं असतात. या गणांतील जमीनीवर वावरणाऱ्या प्राण्यांत या गात्रांच्या अंगुलींना नख्या लागलेल्या अस-तात. परंतु पाण्यांत असणाऱ्या प्राण्यांत या गात्रांचें पोहोण्या-करितां वल्ह्याप्रमाणें बनलेल्या अवयवांत रूपांतर झालेलें असतें. या प्राण्यांचीं श्वसनेंद्रियें फुप्पुस असून त्या फुप्पुसांच्या आंतील पोकळ्याचें पुष्कळ विभाग झालेले असतात. शरीरचें पाश्चिम

# उरोगामी


मगर.


कांसव.


साप.


सरडा.


सापाचा सांगाडा.


सापाचें डोकें व विषारी दंत.

# विशिष्ट प्राणी.

दोन मदारी उंट.



एक मदारी उंट.





ओरँग उटंग.

डोक्यांतील ऊ व तिचें अंडें.



उंदीर.



द्वार अथवा पाश्चिमबाह्यत्वचाविवरमुख ( क्लोकल अॅपरचर) हें उभें पसरलेलें असतें. या प्राण्यांत तें आडवें कधींच नसतें. प्रजननासंबंधीं पाहिलें असतां जननेंद्रियांखेरीज करून दुसरे सहकारी भाग ( किंवा इंद्रियें ) विशेष झालेले नसून नरामध्यें मध्यभागीं एकच शिश्न झालेलें असतें. हे प्राणी अंडज असून यांच्या अंड्यांनां 'चेलोनिडी' जाती शिवाय करून इतरांत टणक व बहुतकरून चुनखडी क्षाराचो अशी एक कवची असते.

हे प्राणी बहुतकरून उष्ण प्रदेशांत राहणारे असून वनस्पतीवर आपली उपजीविका करितात. ह्यांच्यांत कांहीं प्राणी मांसभक्षक आहेत व ते मृदुकायप्राणी ( मोलस्का), कवचधरसंधिपाद ( क्रस्टासिया ) व मासे भक्षण करितात. समुद्रांत राहणाऱ्या कांसवांची पाठ सपाट असते व त्यांचें शीर्ष व गात्रें त्यांनां कवचाच्या आंत ओढून घेतां येत नाहींत. शुद्धोदकांतील व पंकांतील कासवांचीहि पाठ सपाट असते. परंतु त्यांनां आपलें शीर्ष कवचाच्या आंत ओढून घेतां येतें. जमीनीवरच्या कांसवाची पाठ बाह्यतः कमानदार असून अस्थिमय असते. यांनां शीर्ष व गात्रें कवचाच्या आंत ओढून घेतां येतात. यांचीं गात्रें गोलदार असून त्यांच्या अंगुली नखापर्यंत जुळलेल्या असतात. गात्रांच्या तळाचा भाग जाड झालेला असतो. हे प्राणी बहुशः वनस्पतिभक्षक आहेत. या गणांतील ठळक उदाहरणें खालीं दिलीं आहेतः

ज्यांच्या पृष्ठावर ढाल झालेली असते असे.—( १ ) टेस्टूडो एलेगन्स यांच्यांत ढाल फार कमानदार झालेली असते, जबड्यांनां दांत असतात, कवचाची लांबी दहा इंच असते. हे जमीनीवरील कांसव होत. ( २ ) एमीस ट्रैजूगाः—नेहमीं आढळणारा गोड्या पाण्यांतला कांसव. हा जमीनीवरहि राहूं शकतो. याला लोक विहिरीमध्यें बहुतकरून टाकतात. हा गोड्या पाण्यांतले खेंकडे मारून टाकतो. हे खेंकडे विहिरीच्या तळाचा भाग खोदून बरीच नुकसानी करतात. तेव्हां त्यांनां मारून टाकण्यास हा कांसव फार उपयोगी पडतो. हा बहुतकरून मासे खात नाहीं. याच्या पाठीला ढाल असते. याच्या पूर्व गात्रांच्या अंगुलींना चार किंवा पांच नख्या असतात; परंतु पश्चिम गात्रांनां चारच असतात. अंगुली कातडीनें जोडलेल्या असतात. (३ )एमीडा सिलोनेन्सीस अथवा व्हिटेटः—हा कांसव सुद्धां गोड्या पाण्यांत राहणारा आहे. याच्या पाठीचें कवच गुळगुळीत चामड्यासारखें मासतें. हा मांसभक्षक व वनस्पतिभक्षक आहे.( ४ ) चेलोनिआ व्हिरगेटा अथवा समुद्रांतील हिंदी हिरवा कांसवः—ह्याला ढाल झालेली असते. ह्याला गात्रांच्या ऐवजीं वल्ह्याप्रमाणें अवयव झालेले असतात. व या प्रत्येक अवयवावर दोन नख्यांपेक्षां जास्त नख्या नसतात. ह्या लक्षणांवरून हे कांसव इतर पाण्यांतील कांसवापासून सहजी ओळखतां येतात. यांच्यांत मादी एका वेळेस सुमारें शंभरावर अंडीं घालते व तीं ती समुद्रकिनाऱ्यावरील रेतींत पंधरा इंच खोल असा खाडा करून त्यांत पुरून ठेविते. (५ ) (अ ) चेलोन इंम्ब्रीकेटाः— अथवा चेलोनिआ ऑलिव्हेसिआ अथवा ' क्यारेटा स्क्वॅमेटा ' ह्मणजे बहिरीससाण्याच्या चोंचीप्रमाणें तोंडाचे जबडे असणारा कांसव. याच्या कवचाच्या तवकड्या जाड असून त्यांच्या फण्या वगैरे जिन्नस होतात. तेव्हां ह्याचें कवच व्यापारी दृष्टीनें उपयोगाचें आहे. (बं.)ज्यांच्या पृष्ठावर ढाल मुळीच झालेली नसते; परंतु कवचाच्या श्वेतत्वचेंतून झालेल्या तवकड्या अस्थिमय असतात. ( ६ ) ' डर्मोटोचेलीस कॉरिएशिआ ':—या कांसवांत पाठीच्या कण्याचे मणके व पर्शुका श्वेतत्वचेंतून झालेल्या कवचाला संयुक्त झालेल्या नसतात. तेव्हां यांनां ढाल नसून ह्यांचें पाठीवरचें कवच लवचिक चांबड्यासारखें असतें. विद्यमान प्राचीन मोठ्यांतले मोठे कांसव हे होत. यांची लांबी सहा फूट असते. हे समुद्रांतील कांसव होत.

न क्र ग ण ( क्रोकोडिलिया ), लक्षणेंः— सुसर, नक्र, मगर इत्यादि प्राणी नक्रगण या गणांत मोडतात. नक्रगण हा उरोगामी वर्गांतील कांहीं प्राण्यांचा समूह आहे. सर्व आधुनिक उरोगामी प्राण्यांत या गणांतील प्राणी शरीरानें फार मोठे व लांबलचक असे असतात. तरी त्यांच्या शरीराची ठेवण साधारणतः सरड्याप्रमाणें झालेली आहे. तथापि सरडगणामध्यें व या गणांतील प्राण्यांत सकृद्दर्शनीं एक मोठा फरक दिसून येतो तो तोंडाच्या जबड्यासंबंधीं होय. यांचे जबडे करोटीच्या इतर सर्व भागांशीं ताडून पाहिले असतां फारच मोठे व लांबलचक असे वाढलेले असतात व त्यामुळें त्या प्राण्यांना तोंडाचा आ विस्तृत रीतीनें पसरतां येतो. या गणांतील आधुनिक प्राणी बहुतेक सर्व गोड्या पाण्यांत राहणारे आहेत. सरोवरांत किंवा मोठ्या तलावांत, नद्यांत व विशेषकरून त्यांच्या मुखाजवळ सुसरी आढळतात. या गणांतील समुद्रांत राहणारे प्राणी बहुतेक निर्वेश होऊन नष्ट झालेसे दिसतात. हिंदुस्तानांतील सुसर सुमारें १८ फूट लांब असूं शकते. कित्येक वेळां याच्यापेक्षां जास्तहि मोठी आढळते. पूर्ण वाढ झाल्यावर हा प्रबळ प्राणी पाण्यांत असल्याकारणानें बहुतेक आजिंक्य आहे. याला मनुष्याखेरीज इतर शत्रू फार थोडे असतात. कारण शत्रु कितीहि मोठा बलवान असला तरी त्याला जबड्यांत धरून पाण्यांत बुडविण्याची शक्ति याच्या अंगीं असते. तथापि सुसरीचीं अंडीं लहान मुंगूस व कांहीं सरडगणांतील प्राणी ( उदाहरणार्थ घोरपड ), हे खाऊन टाकतात. सुसर फार खादाड असते. तिच्याशीं इतर प्राणी सलगी करीत नाहींत. तरी एका जातीच्या लहान पक्ष्यामध्यें व सुसरीमध्यें मित्रभाव जमलेला दृष्टीस पडतो. हा पक्षी या गणांतील प्राण्यांच्या कातडीला लागलेले कांहीं बाह्य परोपजीवि जीव ( पॅरासाइट् ) खातो व त्यामुळें या प्राण्यांची कातडी स्वच्छ राहते. आधुनिक सुसरींमध्यें तीन जाती (जनिरा) आहेत एक'अलीगेटर' नांवाची होय. या जातीच्या सुसरींमध्यें

शीर्षाचा भाग आंखूड व रुंद असा असतो. ही जात अमेरिका खंडांत विपुलतेनें सांपडते. दुसरी जात "क्रॉकोडाईल" नांवाची होय. हिच्यामध्यें शीर्षाचा भाग ॲलीगेटरपेक्षां लांब झालेला असतो. ही जात हिंदुस्थानांत आढळते. तिसरी जात " गेव्हिअल " नांवाची होय. या जातीच्या सुसरीमध्यें मुसकटाचा भाग अगदीं अरुंद व लांबलचक असा पुढें वाढून झालेला असतो. गंगा नदींत या प्रकारची जात पुष्कळ आढळते. ही मुख्यत्वेंकरून मासे खाऊन राहते. या जातींतलि वयोवृद्ध झालेल्या नरांमध्यें मुसकटाच्या शेवटीं पृष्ठावर एक तरुणास्थोचें बनलेलें टेंगूळ तयार होतें व त्यांत पोकळी बनून हवा सांचते. यामुळें या जातींतलि माद्या व तरुण नर यांच्यापेक्षां हे वृद्ध नर पाण्यांत जास्त वेळ राहूं शकतात.

उरोगामी वर्गाच्या या गणांतील प्राण्यांत शरीराच्या पृष्ठभागावर किंवा पृष्ठ व उदरतल अशा दोन्ही भागांवर श्वेतत्वचेंतून खोदीव कामाप्रमाणें दिसणाऱ्या आस्थिमय तगटांच्या रांगांचें आच्छादन झालेलें असतें, व या तगटांवर बाह्यत्वचेचे खवलेहि लागलेले असतात. या गणांतील आधुनिक प्राण्यांत पाठीच्या कण्याच्या मणक्यांचे कशेरुघन (सेंट्रा) पूर्वस्थान (प्रोकॉक्स ) असे झालेले असतात. उरोभागावरील मणक्यांचे कशेरुबाहू ( ट्रॅन्सव्हर्स प्रोसेस ) लांब व द्वित्त असे झालेले असतात. त्रिकास्थि ( सॅक्रम ) हें दोन मणक्यांचें झालेलें असतें. पृष्ठवंशाला लागलेल्या पर्शुकांच्या टोकांनां दोन फांटे झालेले असतात. " क्वाड्रेटास्थि " अथवा हनुसंधानास्थि हें अचल असें करोटीला लागून झालेलें असतें. उरःफलक (स्टर्नम) बनलेलें असतें, व उदराच्या भागीं कांहीं पर्शुका बनलेल्या असतात. या प्राण्यांना जमीनीवर चालतां यावें अशा रीतीनें यांच्या शरीराचीं गात्रें बनलेलीं असतात. मुखक्रोडांतील हिरड्यांच्या उथळ्यामध्यें यांचे दांत बसलेले असतात. यांचीं श्वसनेंद्रियें फुप्फुसें असून फुप्फुसाची पोकळी आंतून पुष्कळ विभागली गेलली असते. हृदयाचें निःसारकर्ण ( व्हेंट्रिकल ) एका पडद्यानें आंतून विभागलें जातें व त्यामुळें त्याला दोन कप्पे झालेले असतात. या कारणास्तव पक्षी व सस्तन या वर्गातील प्राण्यांप्रमाणें सुसरींमध्यें हृदय चार कर्णांचें बनलेलें असतें. महाधमनीच्या दोन कमानींपैकीं उजवी कमान या निःसारकर्णाच्या डाव्या कप्प्यांतून निघते व ती ग्रीवाधमनीवाटें मेंदूला व जत्रुधमनीवाटे पूर्वगात्रांच्या जोडीला शुद्ध रक्त पुरविते. शरीराचें पश्चिमद्वार अथवा पश्चिमत्वचाविवराचें बाह्य मुख लांबट असून पूर्वपश्चिमरीत्या उभें पसरलेलें असतें. या प्राण्यांत नराला शिश्न एकच असून तें मध्यभागीं असतें. हे प्राणी अंडज आहेत. अंडीं जमीनीच्या भेगांमध्यें घातलीं जातात. व त्यांनां चुनखडी क्षाराचें किंवा खड्प्रमाणें असणाऱ्या पदार्थाचें टणक कवचीसारखें आच्छादन असतें.

सुसरीमध्यें गात्रें जमीनीवर वावर करण्यालायक झालेलीं असलीं तरीं त्यांचा उपयोग स्वच्छंदानें हालचाल करण्याकडे नसून तीं फक्त शरीर फरपटत नेण्यास उपयोगी पडतात. सुसरीचें शेंपूट दोहोंबाजूंनीं चपटलेलें व बरेंच लांबलचक असें झालेलें असल्यामुळें तिला पाण्यांत पोहोण्याचें तें एक मुख्य व मोठें साधन आहे. शेंपटीमुळें सुसरीचें बळ पाण्यांत दुणावतें. भक्ष्य पकडण्याकरितां हे प्राणी पाण्याच्या कांठावर दबा धरून बसलेले असतात. यांचीं बाह्य नासाछिद्रें त्यांच्या लांब मुसकटाच्या अंतिम टोंकाला झालेलीं असतात. व मुखक्रोडाच्या आंतील नासाछिद्रें ध्वनिमंजुषामुखाजवळ किंवा ध्वनिद्वाराजवळ झालेलीं असतात. यामुळें या प्राण्यांनां पाण्याच्या आंत सर्व शरीर लपवून ठेवून श्वासोच्छ्वासाकरितां फक्त मुसकटाचा बाह्यनासाछिद्रें असलेला अंतिम टोंकाचा भाग अचल अशा तऱ्हेनें पाण्याच्या वर ठेवून तासांचे तास दबा धरून बसतां येतें. अशा संधींत एखादें गैरसावध सावज पाणी पिण्यास तेथें आलें असतां त्याला अकस्मात गांठून हा प्राणी आपल्या मजबूत जबड्यांनीं त्याला पकडतो व पाण्यांत ओढून नेऊन बुडवितो व खातो. या गणांतील कांहीं परिचित उदाहरणें पुढें नमूद केलीं आहेत.

(१) क्रॉकोडीलिआ पाल्युस्ट्रिसः–सर्वसाधारण सुसर म्हणजे ह्या जातिविशेषा ( स्पीसीज ) पैकीं प्राणी होय. हे नद्यांत खोल तळ्यांत वगैरे पुष्कळ ठिकाणीं सांपडतात. यांचें मुसकट लहान असतें व प्रत्येक बाजूच्या पूर्वमुखास्थीला (प्रेमाक्सिला ) पांच दांत असतात. क्रॉकोडीलिआ पोरोसस ही जात बंगाल प्रांतांत व विशेषेंकरून हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रांतांत आढळते. नद्यांच्या मुखाजवळ वावरत असतांना हे प्राणी समुद्रांत शिरून भ्रमण करतात. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर ही जात आढळून येत नाहीं. ह्यांचें मुसकट लांबट असतें व पूर्ण वाढ झालेल्या प्राण्यांत पूर्वमुखास्थीला चार दांत असतात. ३३ फूट लांबीची सुसर या जातिविशेषापैकीं आढळलेली आहे.

(२) " गेव्हिएलीस ग्यांजेटीकस "— ही जात माश्यांवर आपली उपजीविका करून राहते. ह्यांचे अरुंद व लांब जबडे मासे धरण्यास फार सोईवार असतात.

(३ ) ॲलीगेटर– ही जात चीन देशाशिवाय आशिया खंडांत दुसऱ्या ठिकाणीं सांपडत नाहीं. अमेरिकाखंडांत हे प्राणी पुष्कळ सांपडतात. ( ले. प्रो. वि. ना. हाटे. )

**उर्दुबेगी**— हिंदुस्थानांत स्त्रियांचें पलटण तयार करण्याचा कसकसा प्रयत्न झाला होता याची माहिती चांगलीशी प्रसिद्ध नाहीं. मुसुलमान बादशहांनीं प्रथमतः आपल्या पडदानशीन राण्यांसाठीं स्त्रियांची फौज तयार करण्याचा प्रयत्न केला होता असें दिसतें. मनुची म्हणतो कीं, औरंगजेबाच्या जनानखान्यावर पाहारा करण्यासाठीं खोजे लोकांच्या ऐवजी स्त्रियांची योजना होऊन त्यांचें एक लष्कर बनलें होतें. या लष्कराच्या मुख्य स्त्रीकामगाराचें

नांव उर्दुबेगी होतें. या बाईचें एक चित्र मनुचीनें दिलें आहे. यावरून मुसुलमानी जनानखान्यावरील लष्करी स्त्रीअंमलदारांच्या पोषाखाची कल्पना येईल ( इ. सं. जुन्या ऐ. गोष्टी, पृष्ठ. १७ )

**उर्फी, मौलाना**—हा कवि सिराझ येथील रहिवाशी होता. याचें खरें नांव जमालउद्दीन असें होतें. पण उर्फी या टोपण नावानेंच तो प्रसिद्ध असे. दक्षिणेंत येऊन नंतर प्रथम आग्रा येथें जाऊन राहिला. पुढें १५८९मध्यें खानखानानें त्याची अकबर बादशाहाशीं ओळख करून दिली. बादशहानें त्याची योग्यता जाणून त्याला आपल्या पदरीं ठेविलें. पुढें लवकरच १५९१ मध्यें लाहोर येथें तो वारला, त्यावेळीं त्याचें वय ३६ वर्षांचें होतें. व एका कवितेंत 'आपलें कलेवर नजफ अश्रफ येथें अलींच्या शेजारीं पुरलें जावें' अशी त्यानें इच्छा प्रदर्शित केल्यावरून मीर साजीर इस्फहानी यानें त्याच्या मरणानंतर कांहीं वर्षांनीं त्याच्या अस्थी त्या जागीं पाठविल्या. उर्फीनें अनेक ग्रंथ रचले आहेत. त्यांपैकीं "दीवाण" आणि "कसाएद" हे प्रख्यात आहेत. [ बीलचा कोश ]

**उर्मिया, स रो व र.**–इराणांत वायव्येस हें एक सरोवर असून उ. अ. ३७° १०' व ३८° २०' आणि पू. रे. ४५° १०' व ४६° यांच्या दरम्यान आहे. पश्चिम किनाऱ्यावरील उर्मिया गांवावरून या सरोवरास हें नांव मिळालें असावें. "दर्या चेशाही" अथवा "शाही गोल" असेंहि या सरोवरास म्हणतात. सरोवराची मर्यादा अजमासें दक्षिणोत्तर ८० ने ९० मैल लांब व पूर्वपश्चिम ३० ते ४५ मैल रुंद आहे. पावसाळ्यांत मात्र ती बरीच विस्तृत होते. पूर्व किनाऱ्यावरील शाही द्वीपकल्प पाणी वाढल्यावर बेट बनतें व कधींकधीं वर्षाकाल संपल्यावरहि, बरेच दिवसपर्यंत उथळ पाण्यानें हें वेष्टिलेलें असतें. सरोवराच्या पाण्याची खोली साधारणतः १५ ते १६ फूट असते. क्षेत्रफळ प्रायः १५४४ ते २३१७ चौरस मैल यांच्या दरम्यान असतें. सरोवराच्या दक्षिणार्धांत जवळजवळ ५० बेटांचा एक समूह असून 'कोयन डघी' हें सर्वांत मोठें आहे. हें बेट ३ ते ४ मैल लांबीचें आहे तेथें एक गोड्या पाण्याचा झरा असून फिरस्ते कळपवाले बहुधा वस्ती करून राहतात. बाकीच्या बेटांत वस्ती नाहीं. गोड्या पाण्याच्या बऱ्याच नद्या व ओढे मिळत असले तरी सरोवराचें पाणी खारें असतें. निरनिराळीं क्षारद्रव्यें पाण्यांत तयार होतात.

**उर्मिया, श ह र.**—हें इराणांतील अझरबैजन प्रांतातील शहर ४४०० फूट उंचीवर असून अत्यंत सुपीक प्रदेशांत ताब्रिझच्या नैर्ऋत्येस ७८ मैलांवर व उर्मिया सरोवराच्या पश्चिम किनाऱ्यापासून ११–१२ मैलांवर उ. अ. ३७° ३४' व पू. रे. ४५° ४' यांवर वसलें आहे. याच्या सभोंवार तटबंदी व खोल पण कोरडा खंदक आहे. चहूंबाजूस फळोद्यानें व बगीचे आहेत. इराणांतील इतर शहरांच्या रस्त्यांपेक्षां येथील रस्ते रुंद असून यांपैकीं बहुतेकांच्या मध्यभागांतून पाण्याचे प्रवाह वाहतात. येथें मोठा बाजार व कांहीं जुन्या मशिदी आहेत. लोकसंख्या सुमारें ३५००० आहे. येथें पोष्ट व तार आफिस आहे. महत्त्वाची इमारत म्हटली म्हणजे शहराच्या मध्यभागीं असलेली आर्क अथवा अंतर्दुर्ग ही होय. यांत तोफखाना व लहानसा शिबंदी करितां बराकी आहेत. उर्मिया हें बऱ्याच वर्षांपासून मिश नरी लोकांचें ठाणें आहे. उर्मिया हें याच नांवाच्या ५० मैल लांब व वीस मैल रुंद अशा एका सुपीक जिल्ह्याच्या राजधानीचें शहर आहे. या जिल्ह्यांत तनिशेंहून जास्त खेडीं आहेत. येथून सुकीं फळें. सर्वोत्कृष्ट तुतुन व तंबाखू हे पदार्थ बाहेर देशीं रवाना होतात

**उर्वशी**—एक अप्सरा. नरनारायण ऋषी, बदरिकाश्रमीं तप करीत असतां त्यांच्या ब्रह्मचर्याची परीक्षा पाहण्यासाठीं तेथें वसंत, काम आणि कित्येक अप्सरा इंद्रानें पाठविल्या होत्या. त्यांनीं तेथें जाऊन नृत्यगीत हावभावादि प्रकारांनीं त्यास मोहित करावें म्हणून अनेक प्रकार केले; परंतु ते निष्फल झाले असें पाहून, कामादिक त्यांची स्तुति आरंभितात तों नरनारायणांनीं त्यांचें अत्यंत मृदुवाक्यांनीं आदरातिथ्य करून, 'कोणीकडे येणें' झालें म्हणून पुसलें, त्यावरून कामादिक लज्जित झाले व स्तब्ध उभे राहिले. इतक्यांत तेथें त्यांनीं कित्येक स्त्रिया पाहिल्या, त्या इतक्या रूपवती होत्या कीं, इंद्राकडून आलेल्या अप्सरा त्यांच्यापुढें निस्तेज दिसूं लागल्या, त्यावरून तर कामादिकांस अतिशयच लज्जा उत्पन्न झाली, व त्यांनीं स्वर्गास परत जावें असें, मनांत आणिलें. तें नरनारायणांनीं जाणून, त्यांस म्हटलें कीं, या आमच्या आश्रमांतील स्त्रियांतून, आपल्यास पाहिजे असल्यास एकादी स्त्री इंद्राकरतां घेऊन जावी. त्यावरून कामादिकांस हर्ष होऊन, नरनारायणाच्या ऊरूसमीप स्थित असलेल्या स्त्रीची त्यांनीं इच्छा दर्शवितांच व 'ही न्या,' असें नरनारायणांनीं म्हणताक्षणींच कामादिक त्यांस नमस्कार करून, तिला समागमें घेऊन स्वर्गास गेले, आणि इंद्रासमीप जाऊन नरनारायणांचें अद्भुत सामर्थ्य वर्णन करीत, तीला इंद्राच्या स्वाधीन केलें. हिचेंच नांव इंद्रानें, ऊरु समीपस्थ या संदर्भामुळें उर्वशी असें ठेविलें. ( भाग० स्कं० ११; अ० ४; पद्मपुराण अवंति खंड अध्याय. ८. ) मित्रावरुणांच्या शापानें ही मृत्यलोकीं अवतरली. तेथें केशी दैत्य हिला घेऊन पळत असतां, पुरूरव्यानें हीस सोडविलें. पुढें हिचें पुरूरव्याशीं लग्न झालें, पण इंद्रास हिचा विरह सहन न होऊन त्यानें हरएक प्रयत्नानें हिला परत आणविलें ( अप्सरा पहा ). ऋग्वेद संहिता आणि शतपथ ब्राह्मण यांत पुरूरवा व ऊर्वशी यांचें कथानक आलें आहे ( वेदविद्या पृ.४३ पहा ) कालिदासाच्या विक्रमोर्वशीय नाटकांतहि वरील संविधानक आहे.

**उलघबेग मिरझा:** ( १३९४–१४४९ ).—उलघबेग राजपुत्र अमीर तैमुरचा नातू व मिरझा शहारुख याचा मुलगा असून ज्योतिषशास्त्रांत चांगला पंडित म्हणून प्रसिद्ध आहे. तो इसवी सन १४४७ त समर्कंदच्या गादीवर बसला. आपल्या आयुष्याचा प्रधानभाग यानें ज्ञानार्जनांत खर्च केल्यामुळें सहाजीकच याच्या अंगीं युद्धकला नव्हती. आपल्या राज्यांतील सर्व ज्योतिर्विद एकत्र जमवून "झीज उलघबेग" नांवाचा ज्योतिष गणिताचा ग्रंथ यानें तयार केला. त्याच्याजवळ ताऱ्यांचे वेध घेण्याचीं मोठमोठीं यंत्रें होतीं असें म्हणतात. विशेषतः ताऱ्यांची उंची मोजण्याचें जें सूर्ययंत्र ( क्वाड्रंट = तुरीययंत्र ) त्याजवळ होतें तें १८० फूट (रामन ) उंच होतें. उलघबेगचा अंत फार वाईट प्रकारें झाला. इ. स. १४४९ मध्यें त्याचा मुलगा मिरझा अबदुल लतीफ यानें त्याला कैद करून ठार मारिलें. उलघबेगचा स्थिर ताऱ्यांचा तक्ता हैडनें ऑक्सफोर्ड येथें १६६५ त टीपांसहित प्रसिद्ध केला. उलघबेगच्या पूर्वींच्या नक्षत्रांच्या यादी अरबांनीं टॉलेमीपासून घेतल्या असल्यामुळें त्यांत बऱ्याच चुका होत्या. तेव्हां उलघबेगला ९९२ स्थिर नक्षत्रांच्या स्थिती पुन्हां काढाव्या लागल्या. समर्कंदच्या दक्षिणेस, फार अंतरावर असल्यानें तेथून न दिसणारीं अशीं आणखी सत्तावीस नक्षत्रें, अलसूफीच्या यादींतून आपल्या ग्रंथांत त्यानें उतरून घेतलीं [ बीलचा कोश ].

**उलूक.**—शकुनीचा पुत्र, यास दुर्योधनानें युद्ध आरंभण्यापूर्वी उपप्लव्य नगरीस पांडवांकडे पाठविलें होतें ( भार० उद्योग० अ० १६०–१६३ ). हा परत जाऊं लागला त्या वेळेस सहदेवानें, 'तुला व तुझ्या पित्याला मी युद्धांत मारीन' अशी प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणेंच हा त्याच्या हातून मरण पावला ( भार० शल्य० अ० २८ ). यास कैतव असेंहि म्हणत असत.

**उलूपी.**—ऐरावत नांवाच्या नागकुलांतील, कौरव्य नागाची कन्या, व अर्जुनाची एक स्त्री. धर्मद्रौपदीचा एकांतवास पाहिल्याचें प्रायश्चित्त म्हणून अर्जुन तीर्थें हिंडत चालला असतां गंगाद्वारीं गेला, व तेथें गंगेत उतरून स्नान करीत आहे तों उलुपीनें त्याच्या रूपास मोहित होऊन, त्यास ओढून पाताळांत नेलें. व त्यावरोबर लग्न करण्याची तिनें प्रबल इच्छा दर्शविली. मी बारा वर्षेंपर्यंत व्रतस्थ आहें. यास्तव तूं म्हणतेस तें घडणार नाहीं असें अर्जुनानें तिला म्हणतांच हिनें प्रार्थना केली कीं, आपण म्हणतां तें जरी सत्य आहे तरी हा आपला व्रतनियम द्रौपदीविषयक असल्यामुळें, येथें त्यास प्रत्यवाय नाहीं. त्यावरून अर्जुनानें तिला वरिलें. हिला जो त्यावेळेस अर्जुनापासून गर्भ राहिला, तोच पुढें इरावान् जन्मला ( भार० आदि० अ० २१४ ). युधिष्ठिरानें अश्वमेध केला त्या काळीं अर्जुन श्यामकर्णासमागमें असतां, मणिपुर नगरींत युद्धप्रसंगामध्यें त्याचें निधन झालें. त्यावेळेस हिनें त्यास सजीव केलें; ( बभ्रुवाहन पहा. ) अर्जुन बंधूंसहित महाप्रयाणास जेव्हां गेला, तेव्हां हिनें गंगेंत आपल्या देहाचा त्याग केला. ( भार० महाप्र० अ०१ )

**उलेमा.**—( अरबी शब्द उलमा म्हणजे ज्ञाते ) हे इस्लामी पंडित. धर्मवेत्ते, शास्त्रकर्ते, आचार्य, न्यायशास्त्री, मुफती इत्यादि असून सर्वजण सामान्यपणें मुसलमानी शास्त्रांत तात्विक व व्यावहारिक रीतीनें प्रवीण असतात. येथें शास्त्राचा अर्थ, परंपरा, ग्रंथ किंवा लोक यांच्यापासून जें शिकलें जातें तें ज्ञान उद्दिष्ट आहे. संकुचित अर्थानें हा शब्द सरकारी नोकरींत असलेल्या अशा पंडितांच्या मंडळाला योजितात. उलेमा अर्थाच्या विरुद्ध शब्द"आरिफ" हा आहे; त्याचा अर्थ ज्यांना धार्मिक ज्ञान, उलेमांप्रमाणें परंपरा किंवा बुद्धि यांच्या योगें न मिळतां गूढ दृष्टांत होऊन मिळतें ते मुसलमान असा आहे.

**उल्का**—रात्रीं सहज निरभ्र आकाशाकडे पाहिले असतां एखादी तारा तुटून पडली असें दिसतें, त्या पडलेल्या तारकेस उल्का असें म्हणतात. प्रत्येक तासास मध्यम प्रमाणानें आठ उल्का पडतात. प्रत्येक आगस्ट महिन्याच्या नवव्या व दहाव्या तारखांस व नोव्हेंबर महिन्याच्या १२, १३ व १४ या तारखांस दर तासास २६०० उल्कापात होतात. हे उल्कापात आकाशांतील एकाच बिंदूपासून होतात.

वर्षांतील निरनिराळ्या दिवशीं हा बिंदु आकाशांत कोठकोठें असतो. याचें एक कोष्टक झालेलें आहे.

पूर्वरात्रीपेक्षां उत्तररात्रीं उल्कापात जास्त होतो. उष्ण कटिबंधांत उल्का जशा तेजस्वी दिसतात तशा इतर कटिबंधांत दिसत नाहींत. उल्कांचे रंग तांबडा, पिंवळा नारिंगी, हिरवा पांढरा इत्यादि अनेक प्रकारचे आहेत. कांहीं उल्का अगदीं बारीक असतात. त्या पळभर दिसून आकाशांत वरचेवर नाहींशा होतात. कांहीं त्याहून मोठ्या असतात. त्या मोठ्या झपाट्यानें आकाशाचा बराच भाग क्रमून जमिनीवर पडल्याशा दिसतात. त्यांचें तेजहि बरेंच असतें. कांहीं तर खालीं येतां येतां फारच मोठ्या होतात. कधीं कधीं चंद्रा एवढ्या दिसतात. त्यांचा प्रकाशहि पडतो. एखादेवेळीं मोठी गर्जना होऊन त्या दिसेनाशा होतात. एखादी उल्का प्रथम मोठी असून पुनः लहान होते. कधीं कधीं एखादी मोठी उल्का फुटून तिच्या निरनिराळ्या उल्का बनून खालीं येतात. एखादेवेळीं ह्या स्फोटाचा कडकडाट इतका होतो कीं, धरणीकंप होत आहे कीं काय असा भास होतो. एखादी मोठी उल्का एखाद्यावेळीं जमीन व पाषाण यांचें विदारण करितें. अथर्ववेदसंहितेंत (१९. ९) उल्केचा उल्लेख आहे. वराहमिहीरादिकांनीं उल्केला अशनि असेंहि नांव दिलेलें आहे. उल्कापातासंबंधीं जुन्या उपपत्ती ' विज्ञानेतिहास ' ( पान ५९० ) या ज्ञानकोशाच्या प्रस्तावनविभागांत दिल्या आहेत. तसेंच धूमकेतु व उल्का यांचा संबंधहि त्या प्रथांत दाखविला आहे ( पा. ३५७ ).

उल्कापाषाण—उल्का कधीं कधीं पाषाणरूपानें पृथ्वीवर पडतात. आपल्यास आकाशस्थ गोलांच्या खनिज द्रव्यांचें प्रत्यक्षज्ञान होण्याचें साधन काय तें हे उल्कापाषाण होत. बाकी त्यासंबंधीं आपलें सर्व ज्ञान अप्रत्यक्ष आहे. म्हणून हे अशनि फार महत्त्वाचे असल्यामुळें त्यांचा संग्रह करून त्यांची परीक्षा करण्याचे प्रयत्न सांप्रत चालू आहेत. ब्रिटिश म्यूझियम मध्यें ह्या अशनींचा मोठा व उत्कृष्ट संग्रह आहे. मुंबई येथें व्हिक्टोरिया म्यूझियम मध्यें असे कांहीं पाषाण आहेत. भूस्तरसंशोधन खात्याच्या मार्फत कलकत्ता येथेंहि अशा पाषाणांचा चांगला संग्रह केला गेला आहे. उल्कापाषाणांचे मुख्यत्वेंकरून तीन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारांत बहुधां निकलशीं मिश्रित असें धातुमय लोखंड असतें. दुसऱ्या प्रकारच्या उल्कापाषाणांत लोखंडाशीं दगडासारखें द्रव्य संयोग पावलेलें असतें. तिसऱ्यांत बहुधा दगडच असतो.

अशनींचें पृथक्करण केल्यावरून असें दिसून आलें आहे कीं, त्यांत जरी पृथ्वीवरील तत्त्वांहून निराळीं तत्त्वें नसतात, तरी त्यांचे संयोग पृथ्वीवर आढळत नाहींत असे असतात; हिंदुस्थान, यूरोप, अमेरिका अशा निरनिराळ्या स्थळीं पडलेल्या अशनींचीं द्रव्यें बहुधा एकसारखीं असतात. अल्युमिनियम, कॅलशियम, कार्बन, लोखंड, मॅग्नेशियम, निकल, ऑक्सिजन, फॉस्फरस, सिलिकॉन आणि गंधक हीं द्रव्यें या पाषाणांतून नेहमीं जास्त प्रमाणांत सांपडतात. अँटिमनी आर्सेनिक, क्लोरिन, क्रोमियम, कोबाल्ट, तांबें,हायड्रोजन,मँगनीज, नैट्रोजन, पोटॅशियम,सोडियम,वगैरे कमी प्रमाणांत आढळतात.सोनें,रुपें,कथील वगैरे द्रव्येंहि क्वचित्प्रसंगीं आढळतात.

अशनी निरनिराळ्या आकाराचे व निरनिराळ्या वजनाचे असतात. इ. स. १८६५ मध्यें ३॥ टन वजनाचा एक अशनि ब्रिटिश म्यूझियममध्यें आला. आणि दक्षिण अमेरिकेंत तर १५ टन वजनाचा एक अशनि आढळला आहे. त्याची लांबी ७ फूट आहे.

प्राचीन काळापासून कधीं व कोठें उल्कापात झाले याचें टिपणहि सांपडतें ( वि. विस्तार, पु. ११. अं. ११–१२ ). चिनी, ग्रीक, अरब यांच्या प्राचीन ग्रंथांत उल्कापातांविषयीं पुष्कळ वर्णनें आहेत. इ. स. १५१० मध्यें इटली देशांत लांबर्डी प्रांतांत एके दिवशीं सायंकाळीं ५वाजतां११२०दगड आकाशांतून पडले. ते गारेपेक्षां कठिण होते. आणि त्यांस गंधकासारखा वास येत होता. त्यांतील मोठ्या दगडाचें वजन १२० पौंड होतें इ. स. १६२०मध्यें पंजाबांत जालंदर येथें एक अशनि पडला. त्याचा वृत्तांत जहांगीर बादशहानें स्वतः लिहिला आहे तो असाः—"त्या अशनीचें वजन १६०तोळे होतें. त्याचीं हत्यारें बनविण्याकरितां मी तो एका कारागिराच्या जवळ दिला त्यानें सांगितलें कीं, त्याचें लोखंड घनवर्धनीय नाहीं. म्हणून दुसरें लोखंड मिसळण्यास मी सांगितलें. तेव्हां अशनीचे ३ भाग लोखंड व इतर एक भाग लोखंड असें एकत्र करून त्याच्या दोन तरवारी, एक सुरी, व एक खंजीर अशीं हत्यारें केलीं."

इ स. १७९० मध्यें नववरच्या २४ व्या तारखेस रात्रीं ९ वाजतां फ्रान्स देशांत एक मोठी उल्का दिसली ती चंद्राहून मोठी होती.

इ. स. १७९८ मध्यें डिसेंबरच्या १९ व्या तारखेस रात्रीं आठ वाजतां काशी येथें एक उल्का पडली. ती पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी होती.

इ. स. १८७९ च्या नोव्हेंबर महिन्यांत सातारा जिल्ह्यांत कळंबी गांवीं अशनि पडला होता :( वर्णनाकरितां ता. ३१ जानेवारी १८८० चा टाइम्स ऑफ इंडियाची पुरवणी पहा). शहरें व गांवें यांनीं व्यापिलेला पृथ्वीवरचा भाग अंतरिक्षाशीं तुलना करण्याकरितां फार लहान असल्यानें, एखाद्या शहरांत उल्कावृष्टि होण्याचा संभव फार कमी असतो; माणसांना दुखापत होण्याचा संभव तर त्याहूनहि कमी असणार हें साहजिकच होय.इ.स.१८२७त मद्रू येथें एक मनुष्य आकाशांतून पडलेल्या दगडाच्या दुखापतीनें मेल्याचा दाखला आढळतो. अशा तऱ्हेचीं इतर उदाहरणें फारशीं नाहींत.

**उलबारिया**—बंगाल. हौरा जिल्ह्यांतील उलबारिया पोटविभागाचें मुख्य स्थान. हें हौऱ्यापासून १५ मैलांवर असून हुगळी नदीच्या उजव्या किनाऱ्यावर आहे. १९०१ सालीं लो. सं. ५२९५ होती. मिदनापूर कालव्यावर उलबारिया हें पहिलें ठिकाण असून बंगाल–नागपूर रेल्वेवर स्टेशन आहे. आठवड्यास गुरांचा बाजार मोठा भरतो. १९०३ सालीं या ठिकाणीं म्यु. कमिटीची स्थापना झाली. १९०३–०४ सालीं म्यु. उत्पन्न ३००० असून खर्च २६०० होता.

**उल्म**—रेल्वेनें स्टटगार्टच्या आग्नेयेस ५८ मैलांवर व म्यूनिचच्या वायव्येस ६३ मैलांवर डान्यूब नदीच्या डाव्या तीरीं वुर्टेंबर्गच्या राज्यांतील एका सुपीक मैदानांत वसलेलें, जर्मनीचें तटबंदीचें शहर. लोकसंख्या ( १९०५ ) ५१६८०. उल्मनें मध्ययुगीन साम्राज्यांतर्गत स्वतंत्र शहराचें आपलें स्वरूप अजून कायम ठेविलें असून ऐतिहासिकदृष्ट्या व कलाकौशल्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा त्या वेळच्या पुष्कळ इमारती येथें पहावयास सांपडतात. प्रॉटेस्टंट लोकांच्या ताब्यांत असलेली जी येथें गॉथिक क्याथीड्रल(मोठेंचर्च) आहे तिच्यांत ३० हजार लोकांचा समावेश होऊं शकतो. हिची बाहेरून ४६४ फूट लांबी व १५९ फूट रुंदी आहे. या ठिकाणीं ५२८ फूट उंचीचा एक मनोरा आहे. इतक्या उंचीचें सर्व जगांत याशिवाय दुसरें एकहि देऊळ नाहीं. नगरभवन, औद्योगिक पदार्थसंग्रहालय वगैरे आणखीहि कित्येक प्रेक्षणीय इमारती येथें आहेत.

या ठिकाणीं डान्यूब नदीला शहराच्या वरच्या बाजूस इलर नदी व खालील बाजूस ब्लॉ नदी या नद्या मिळतात.या ठिकाणीं डान्यूब नौकानयनार्ह आहे इतकेंच नव्हे, तर नेकर व ऱ्हाईन नद्यांच्या मार्गानें उल्मला फ्रान्सच्या आंतील भागाशीं देखील

दळणवळण ठेवितां येतें. येथील भाजीपाला, जव व बिअर नांवाचें मद्य प्रसिद्ध असून मद्यार्क काढण्याचे, शुद्ध करण्याचे ( ब्लीचिंग ) व पितळेचें ओतीव काम करण्याचे कारखानेहि येथें आहेत.

उल्म हें बऱ्याच दिवसांपासून एक पहिल्या प्रतीच्या तट बंदीचें शहर आहे. १८७६ त येथें एक मजबूत बालेकिल्ला व शहरासभोंवती तटबंदीबाहेर अंतराअंतरावर दुर्ग बांधण्यांत आले; परंतु इ. स. १९०० त म्युनिपालिटीनें दुर्गाची जागा विकत घेऊन ते पाडून टाकिले व त्या जागीं आतां सडका केल्या आहेत. विल्हेल्म्सबर्ग बालेकिल्ला मात्र कायम ठेविला आहे आणि डान्यूब नदीच्या डाव्या तटावरील तटबंदी वगैरे अधिक भक्कम केली आहे. येथें शांततेच्या काळांत ५६०० लोकांचें संरक्षक सैन्य राहतें; परंतु युद्धाच्या वेळीं एक लक्ष सैन्याच्या राहण्याची सोय या ठिकाणीं करतां येते. 'ब्लॅक फॉरेस्ट 'च्या मागील युद्धाच्या हालचाली करण्याचें हें जर्मन सैन्याचें मुख्य ठिकाण आहे.

इ. स. ८५४ च्या कागदपत्रांत या उल्मचा पाहिला उल्लेख आढळतो याला १०२७ त नागरिक हक्क मिळाले. ११५५ तं हें साम्राज्यांतर्गत स्वतंत्र शहर बनलें. १५ व्या शतकांत हें उत्कर्षाच्या शिखरास जाऊन पोहोंचलें होतें. या वेळीं ३०० चौरस मैलांवर याची सत्ता होती व लोकसंख्या ६० हजार होती. हें शहर १८०३ त बव्हेरियाकडे आलें; परंतु १८०९ त तें वुर्टेम्बर्गला दिलें गेलें. १८०५ त आपल्या २३ हजार सैन्यासह जनरल माक ह्या या ठिकाणीं नेपोलियनला शरण गेला होता.

**उल्लतन**—त्रावणकोर व कोचीनमधील डोंगराळ व सपाट प्रदेशांत आढळणारी एक शिकारी जात. यांची राहणी मुळींच स्थायिक नसते. हे मरुमक्कथायम कायदा पाळतात. यांची स्थायिक संख्या सुमारें चार हजार आहे. पुलया व पराया हे यांचा विटाळ मानतात.

**उल्लाळ**—मद्रास. दक्षिण कानडा जिल्हा. मंगलोर तालुक्यांतील एक गांव. मंगलोर शहराच्या समोर नेत्रवती नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर उल्लाळ वसलेलें आहे. १६-१७ व्या शतकाच्या सुमारास या ठिकाणीं जैनांचें एक कुल महत्त्वाला आलेलें होतें. सोमनाथाचें पडकें देऊळ व दक्षिणेस एका मैलाच्या अंतरावर पडकें परंतु विलक्षण खोदीव कामाचे अवशेष नजरेस पडतात, यावरून पूर्वी हें गांव उर्जितदशेंत होतें असें अनुमान करतां येतें. सांप्रत मंगलोरशीं कांहीं व्यापार चालतो. १९०१ सालीं लोकसंख्या ६१८१ होती.

**उवा**.—शरीराच्या निरनिराळ्या भागांवर सर्वांपासून एक प्रकारचा जवळ जवळ इसबासारखा पुरळ उठतो. त्यापासून पुष्कळदां फार त्रास होऊन रोग्याच्या स्वस्थतेचा अगदीं भंग होऊन त्यास कांहीं सुचेनासें होतें. स्थानपरत्वें त्यांच्या जाती निराळ्या असून त्यांपासून होणारीं लक्षणेंहि अंशतः भिन्न असतात. उवांच्या मुख्य तीन जाती आहेत. डोक्यांतील उवा ( पेडिक्युली क्यापिटिस ); अंगावरील उवा ( पेडिक्युली कारपोरिस ); आणि गुह्य भागावरील उवा ( पेडिक्युली प्यूबिस ).

डो क्या व री ल उ वा व त्यां चीं ल क्ष णें:—डोकें वितवितल्यासारखें होऊन दुखरें होतें; विशेषतः डोक्याच्या मागील भागाच्या खालील ग्रंथी किंवा कानाच्या पुढील अथवा मागील किंवा गळ्याच्या ग्रंथी सुजून, केव्हां केव्हां पिकतात व त्यामुळें रोग्यास गंडमाळांचा तर विकार झाला नसेलना, असा प्रथमारंभीं संशय येतो. परंतु पुढें अमळ बारकाईनें तपास करितां असें दिसून येतें कीं, केस विशेषतः त्यांच्या बुडांशीं खपल्या धरून, एकमेकांस चिकटलेले असून इसबांतल्याप्रमाणें डोक्यावर जागजागीं पुरळ उठलेला आहे. व मधून मधून थोडथोडें कुरतडल्याप्रमाणें झालेलें आहे. विशेषतः ज्या बायकांचे केस लांब असतात त्यांच्या डोक्यावरील कुरतुडलेली जागा केव्हां केव्हां खोल असून तिचा दाह झालेला असतो. तेथील केंस वर करून नीट पाहतांच उवा स्पष्ट दृष्टीस पडतात.

परीक्षाः—कांहीं संशयच असल्यास तो दूर होण्यासाठीं केसांची नीट तपासणी करावी. केसांस चिकटून त्यांच्या बुडाजवळ उवांचीं अंडीं दृष्टीस पडतात. त्यांचा एकेक पुंजका फक्त टांचणीच्या डोक्याएवढा मोठा असून त्याचा रंग करडा असतो. प्रत्येक केसास चिकटून असा बहुधा एकच पुंजका असतो. तो एकाहून अधिक दृष्टीस पडल्यास असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं, केसाच्या बुडास अथवा अगदीं मुळास चिकटून जो पुंजका असतो त्याची वीण अगदीं नुकतीच झालेली असून डोक्याच्या पृष्ठभागापासून सुमारें एक इंच अंतरावर केंसास चिकटलेल्या पुंजक्याची वीण होऊन म्हणजे उवा होऊन बरेच दिवस झाले असावे. व त्या अवधींतच केंस इतके लांब वाढले गेले. अंडीं समूळ नाहींशीं करितां येण्यासाठीं तीं केंसास कशीं चिकटतात ह्या गोष्टीची अगदीं बरोबर माहिती पाहिजे, व ती होण्यासाठीं सूक्ष्मदर्शक कांचेची मदत घ्यावी. प्रत्येक केसाभोंवतालीं एक लांबट कडें असून तें केसास चिकटलेलें असतें व त्याच्या बाहेरच्या बाजूस अंडें चिकटलेलें असतें. ऊ ह्या अगदीं बारीक किडा असून तो केसांच्या मुळाजवळच रहातो, कारण त्या ठिकाणीं त्यास विशेष ऊब व चांगलें संरक्षण हीं साहजिकच मिळतात. उवेची लांबी $\frac{1}{8}$ इंच असते व ती फार चपल असते. अंडें घातल्यानंतर सुमारें नऊ दिवसांनीं त्यांतून ऊ बाहेर पडते व सुमारें तितक्याच दिवसांनीं तिची पूर्ण वाढ होऊन पुढें सुमारें नऊ दिवसांनीं ती प्रजोत्पत्तीस योग्य होते.

चिकित्सा.—वरील हकीकतीवरून ही गोष्ट सहज ध्यानांत येईल कीं, चिकित्सा करितांना फक्त उवा मरून जाव्यात एवढाच यत्न करून उपयोगी नाहीं, उवांबरोबरच त्यांच्या असंख्यात असलेल्या अंड्यांचाहि ( लिखांचाहि )

नाश केला पाहिजे. उवा व अंडीं ह्या दोहोंचा नाश करण्याचा सोपा उपाय म्हटला म्हणजे डोक्याचे सर्व केस वस्तऱ्यानें काढून टाकणें हा होय, व असें केल्यावर फक्त डोक्याचा पुरळ बरा करण्याशिवाय दुसरी खटपटच राहत नाहीं. पुरळ अथवा डोक्याचें इसब बरें होण्यास कांहीं स्निग्ध उपाय करावा. व्हॅसलीन डोक्यास लावावें, किंवा झिंकआंइटमेन्ट, अथवा समभाग गोडें तेल व चुन्याची निवळी ह्यांच्या मिश्रणाचा उपयोग करावा. परंतु पुष्कळदां हिंदु लोकांत स्त्रियांचे केंस काढून टाकणें मुळींच शक्य नसतें व विशेषतः उवांची पीडा स्त्रियांच्याच मागें फार असते. अशा स्थितींत पुढील उपाय करावेतः—१:४० ह्या प्रमाणांत कर्बाम्ल (क्यार्बोलिक आसिड) पाण्यांत मिसळून मिश्रण तयार करावें व त्यावरोबर जवसाचें पोटीस करून डोक्यावर लावावें म्हणजे उवांस पळून जाण्यास संधि न सांपडतां सर्व उवा मरून जातात किंवा साबणानें अथवा वरील प्रमाणांतल्या क्यार्बोलिकच्या मिश्रणानें डोकें व केस चांगले घासून धुतल्यानेंहि त्या मरतात; उवा मरून जाण्याचा अगदीं विनखर्ची व सोपा उपाय म्हटला म्हणजे राकेल तेल नुसतें अथवा खोबरेल तेलाशीं मिश्र करून डोक्यास व केसांस चोपडून ठेवणें हा होय. हा उपाय केला असतांना दिव्याजवळ अथवा विस्तवाजवळ बसूं नये, नाहींतर केंस पेट घेण्याचा फार संभव असतो. उवा मेल्या तरी त्यांचीं अंडीं मागें राहतातच, त्यांचा नाश होण्यासाठीं क्यार्बोलिकचें मिश्रण अथवा शिरका केसांच्या बुडास चांगला चोळून काळजीपूर्वक केंस रोज कांहीं दिवस विंचरण्याची खबरदारी घ्यावी. असें केल्यानें केसांभोंवतालीं झालेलीं कड्डीं ढिली होऊन निघून जातात व त्यांच्याबरोबर त्यांस लगटलेलीं अंडींहि निघून जातात. उवा अगदीं नाहींशा झाल्यानंतर पंधरा दिवसपर्यंत तरी डोकें ह्याप्रमाणें धुवून विंचरण्याची काळजी घेतल्यास अंड्यांचा समूळ नाश होऊन पुनः उवा होण्याची भीति रहातच नाहीं.

अंगावरील उवा (पेडिक्युली कार्पोरीस):—ह्यांचीं लक्षणें डोक्यांतील उवांप्रमाणेंच असतात. अंगावरील उवांचें मुख्य लक्षण म्हटलें म्हणजे अंगास अतिशय खाज सुटणें हेंच होय. ह्यांच्यापासून डोक्याच्या भागास मात्र खाज सुटत नाहीं, कारण त्या डोक्यांत कधींहि होत नाहींत. रोगी आपल्या नखांनीं जोरानें अंग खाजवितो त्यामुळें अंगावर जागजागीं लांब बोचकारे उमटलेले असतात, इतकेंच नव्हे, परंतु अंगावर मंडलें, पुटकुळ्या अथवा लहान जखमाहि उद्भवतात. उवांची पराकाष्ठा झाली असल्यास सर्व त्वचा काळवंडून जाते. कारण त्वचेखालीं सांखळलेल्या रक्ताचा रंग बदलून जातो, व जागजागच्या गांठी मोठ्या होतात. थोडें लक्ष दिल्यास ह्या विकाराचा दुसऱ्या विकाराशीं पित्त, इसब, इत्यादिकांशीं घोंटाळा होण्याचा मुळींच संभव नाहीं.

परीक्षाः—अंगावरील उवांची ठाम परीक्षा होण्यासाठीं रोग्याच्या कपड्यांची काळजीपूर्वक तपासणी केली पाहिजे. कारण ह्या उवांचें मुख्य वसतिस्थान रोग्याच्या अंगावरील कपडेच होत, त्यांतून त्या चैनीनें वाटेल तेव्हां अंगावर जाऊन आपलें भक्ष्य मिळवितात. कपड्यांत जेथें सुरकुत्या फार असतात त्या ठिकाणींच म्हणजे कांखेच्या खालच्या भागांत, कमरेच्या अथवा मानेच्या भोंवतालीं त्यापासून फार त्रास होतो, कांख व कुल्यासारख्या अंगाच्या ज्या भागास कपडा फारसा चिकटून नसतो त्या ठिकाणीं खाजविल्याच्या मुळींच खुणासुद्धां नसतात, कारण ह्या भागांवर उवा सहसा आतच नाहींत. ह्या उवांस अंगावरील उवा म्हणण्यापेक्षां कपड्यांवरील उवाच म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. डोक्यांतील उवापेक्षां ह्या उवा अधिक मोठ्या असून अधिक चपळहि असतात, त्यांचें डोकें लांबट व अधिक निमगोल असतें, आणि त्यांचा वर्ण मळकट पांढरा असून कडेला त्यांत काळी झांक असते.

चिकित्साः—रोग्याच्या त्वचेवर उपचार करण्यापेक्षां त्याच्या कपड्यावरच उपचार केले पाहिजेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. नुसते सर्व कपडे अधणाच्या पाण्यांत शिजवून वापरल्यास रोग्याची पीडा कमी होते. कपडे चांगले उकळल्यास ते जाळून टाकण्याची जरूरी नाहीं. ऊन पाण्यानें अंग धुण्यापलीकडे सहसा दुसरा कांहीं एक उपचार करावा लागतच नाहीं; परंतु एखाद्या वेळी लागल्यास डोक्यांतील उवांप्रमाणेंच उपचार करावेत.

गुह्य भागावरील उवा (पेडिक्युली प्युबिस) लक्षणेंः—वरच्याप्रमाणेंच खाज सुटणें हेंच मुख्य लक्षण असतें. अंगावरील उवांप्रमाणें ह्या उवांपासून होणारी खाज जरी फार तीव्र नसते तरी ती सतत चालू असते व तीपासून जे व्रण पडतात ते जवळ जवळ खरजेच्या व्रणाप्रमाणें असतात.

परीक्षाः—उवांचा शोध करून पाहतांच खाजण्याचें कारण सहज कळून येतें. डोक्यांतील उवांपेक्षां ह्या उवा आंखूड असून थोड्या अधिक रुंदटहि असतात. कांसवाच्या आकाराची सूक्ष्म कल्पना केल्यास तीप्रमाणें ह्या उवांचा आकार असतो असें म्हणतां येईल. ह्यांचीं अंडीं अगदीं केसाच्या बुडास चिकटून असल्यामुळें केंस वस्तऱ्यानें काढून टाकिल्याशिवाय त्यांचा समूळ नाश होणें कठिण पडतें. ह्या जातीच्या उवा, मिशा, दाढी, पापण्या, भिंवया व केसाळ माणसाच्या छातीवरील केंस ह्यांमध्यें होतात. परंतु त्या डोक्यांत अथवा अंगावर म्हणजे मुख्यतः रोग्याच्या कपड्यावर कधींहि आढळत नाहींत. ह्या उवांचा उपद्रव होण्यास बहुधां मैथुनसमयच कारणीभूत होतो, तथापि दुसऱ्या मार्गानेंहि त्यांचा उपद्रव होत नाहीं असें म्हणतां येत नाहीं.

चिकित्सा.—रोज थोडें पाऱ्याचें मलम (अंग्वेंटम हायड्रारजिरि) नुसतें अगर थोड्या गोड्या तेलांत मिसळून

चोळावें, अथवा राकेल गोड्या तेलाशीं मिश्र करून लावावें. सारांश, डोक्यांतील उवांप्रमाणें चिकित्सा करावी.

कोणच्याहि प्रकारच्या उवांना जबडे नसल्यामुळें चावतां येत नाहीं; परंतु त्यांनां रक्त शोषून घेतां येण्यासाठीं विधात्यानें एकप्रकारचें इंद्रिय दिलें आहे, तें त्या मनुष्याच्या त्वचेंत भोंसकून रक्त शोषण करून आपली उपजीविका करितात.

ह्याशिवाय तंबाखूचा काढा, पेपरमिंटचें, वेलदोड्याचें, लवंगांचें किंवा बडिशेपांचें तेल, यांपासूनहि उवा मरतात.

**उशना**, वै दि क.–ऋग्वेदांत उशना काव्याचा उल्लेख कुत्स व इंद्र यांबरोबर केलेला दिसतो. ( १. ५१, १०; ८३, ५; १२१, १२; ४. १६, २; ६. २०, ११; ८. २३, १७; ९. ८७, ३; ९७, ७. १०.४०, ७. इत्यादि. अथर्व. ४.२९, ६, ) पुढील वाङ्मयांत ( तै. सं. २. ५, ८ ८, ५. पंच. ब्रा. ७. ५, २०. शांखायन श्रौ. सु. १४. २७, १ ) देवदैत्यांच्या कलहांत हा असुरांच्या कडील पुरोहित म्हणून वावरतांना आढळतो. कवि उशना असें याचें दुसरें नांव आहे. (ऋ. ४. २६, १ ) ब्राह्मण ग्रंथांतूनहि हा आचार्य म्हणून दिसतो. (पंच. ब्रा. १४. १२, ५ जै. उप. ब्रा. २. ७, २, ६ ).

पौ रा णि कः–स्वायंभू मन्वंतरांतील भृगुपुत्र कवि, त्याचा पुत्र. यास काव्य असें नांव असून, प्रियव्रत राजाची कन्या ऊर्जस्वती, ही याची स्त्री होती. यास भार्गव असेंहि म्हणत. कारण हा भृगुवंशज होता.

वैवस्वत मन्वंतरांतील जो वारुणि कवि, त्याच्या आठ पुत्रांतील चौथा; यासहि काव्य असें नांव असून, शुक्र असेंहि क्वचित म्हटलेलें आहे. हा चालू मन्वंतराच्या तिसऱ्या पर्यायामध्यें (चौकडींत)व्यास होता. हिरण्यकशिपूच्या वेळेस हा दैत्यांचा पुरोहित असून, प्रल्हादास अर्थ कामादि पुरुषार्थपरबुद्धि शिकविण्याच्या प्रसंगीं, हा तपार्थ गेला होता म्हणून, याचे दोन पुत्र शंड व मर्क तें पौरोहित्य चालवीत होते ( भाग. स्कं. ७ अ. ५ ). [ सेंटपीटर्सबर्ग डिक्शनरी. गेल्डनेर–वेदिश स्टुडिओं २; बर्गेन–रिलिजन वेदिक, २; मॅकडोनेल–वेदिक मायथॉलॉजी. वेदिक इंडेक्स ].

**उशीनर**.–(१)भोजनगरीचा राजा, यास ययातिकन्या जी माधवी तिजपासून शिबि नामक पुत्र झाला होता.

( २ ) सोमवंशी अनुकुलोत्पन्न महामना राजाच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यास सुरथा स्त्रीपासून शिबि, वन, शमि आणि दक्ष असे चार पुत्र झाले होते.

(३) भारतवर्षीय देश व लोक ( भार० भीष्म० अ०९ ) यांचा भागवत ( स्कं ७. अ. २ ) व बृहत्संहितेंत ( ४. २२; १६, २६ ) उल्लेख आलेला आहे. यांतील लोकांस औशीनर असेंहि नांव होतें.

**उषकुरः**–प्राचीन नांव हुष्कपुर. हें गांव कुशानवंशीय हुविष्कानें काश्मीरांत स्थापिलें. तत्कालीन लोक याला (हिंदुस्थानांत जाण्याचें ) 'पश्चिमद्वार' म्हणत असल्यानें याचें बरींच शतकें फार महत्त्व होतें. ह्युएनत्संग काश्मिरांत गेला तेव्हां उषकुर येथील मठांतून त्याचें आदरातिथ्य फार झालें. हल्लींहि येथें एका प्राचीन स्तूपाचा अवशेष आहे.

**उषा**.–प्रभात. या सृष्टिचमत्काराला देवता कल्पिलेलें, व तिचें स्तवन केलेलें सर्व वाङ्मयांतून आढळतें. उषेचें वैदिक स्वरूप "वेदविद्या" ( प्रस्तावनाखंड विभाग २ रा. पा. ३२९–३० यांत आलें आहे.

**उषा**–एक दैत्यराजाची कन्या. ही बलिपुत्र बाणासुर याची लाडकी कन्या होती. एकदां उषेनें स्वप्नांत एक राजपुत्र पाहून त्याच्या विरहानें ती झुरणीस लागली. तेव्हां तिच्या चित्रलेखा नांवाच्या सखीनें पुष्कळ देव, दैत्य, मानव, ऋषी यांचीं चित्रें काढून तिला तिचा प्रियकर कोणता तें ओळखण्यास सांगितलें. कृष्णपौत्र जो अनिरुद्ध तोच आपल्या सखीचा स्वप्नगत प्रियकर असें चित्रलेखेनें जाणून त्याला मायाबलानें उषेच्या मंदिरांत आणिलें. बाणासुराला उषा–अनिरुद्ध समागमाची वार्ता कळतांच त्यानें अनिरुद्धाला बंदिवान केलें. कृष्णाला ही बातमी समजतांच तो मोठ्या सैन्यानिशीं बाणावर चालून आला, व शिवस्कंदाची बाणासुराला मदत असतांहि त्याचा पराभव करून अनिरुद्धाला सोडविलें. पुढें उषेचें अनिरुद्धाबरोबर लग्न होऊन ती द्वारकेला गेली. अशा आशयाची कथा भागवतांत आहे.(स्कं. १०, अ. ६२–६३ )

**उष्ट्रखाना**.–मराठेशाहींतील अठरा कारखान्यांपैकीं एक [ 'अठरा कारखाने' पहा]. याला उष्ट्रशाला किंवा शुतरखाना असेंहि म्हणत. सातारच्या छत्रपतींच्या खाजगी खात्याकडील या कारखान्यासंबंधीं शके १७४१ मधील कांहीं नियम पुढीलप्रमाणें:–

जा ब ता उ ष्ट्र ख़ा ना.– उष्ट्रखान्याचे हवालदार यांनीं सारवान याजपासून आपल्या रुबरू उंटाची निगा करवीत जावी. वैरण दाणापाणी, समयाचे समयास जनावरांस पोंचून तार्जी राखावीं. धुणें जनावरांस आठा चौ रोजीं करीत असावे. मसाला आजार जहाल्यास चौकशीनें देत असावे. मजलमसाला तयार असावा. मजल पाहून द्यावे, व सरंजाम नवा जुना वरचेवर पाहून सरकारांत कळवीत जावें.सदरहू लिहिलेप्रमाणें बंदोबस्त जलदीनें हुषारीनें राखील व चाकरी करून दाखवील त्याजवर सरकारमेहेरबानी होईल. ज्याच्याकडून हें न घडे त्यास इजा पोहोंचून पुन्हां त्या कामावर चाकरीवर रहाणार नाहीं, व रदबदली होऊन चाकरी मिळणार नाहीं. हें स्पष्ट समजोन लिहिल्याप्रमाणें वागावें व चाकरी करावी. ज्यास चाकरीवर वागणें त्यानें जें वस्त्रपात्र असेल तें निर्मळपणें जेथील तेथें प्रातःकाळीं अंघोळ करून सर्वांलपणें गळाठा न दिसतां स्वच्छतेनें असत जावें. घरास वगैरे जातां येतां हजीरनीस यांस रुजू होऊन जात जावें. हें न केल्यास गेल्या दिवसाच्या तारखा मंजुरा पडणार नाहींत.

कारकून यांनीं सामान, चंदी व वैरण रोजच्यारोज पाहून त्याची याद करून नित्यशः वर्दी हुजूर देऊन तर्तूद करून घेत जावी. बोभाट पडूं देऊं नये. उंटास पाळणा वगैरे सरंजाम लेश राखावा. सरंजाम गाफीलपणें लेश न राखिल्यास व उंट पाठीस लागल्यास खोळंबा सरकार-कामाचा होईल. याकरितां बहुत सावधगिरीनें हवलदार व तुम्ही सदरहू लिहिलेप्रमाणें उभयतांनीं बंदोबस्त राखावा व सांडणीस्वार विश्वासू, वातमी खरी सांगणारा, वर्दी बोलणार चांगला असावा. अशी वरचेवर ताकीद देत जावी. लबाडी करून कांहीं खाऊं नये. या कामास आळस करूं नये.

कारखान्याबद्दल कायदे चालवयाचेः—

१ हवालदारास सरकारचा हुकूम कारखान्यासंबंधें कोणतेहि कामकाजावद्दल व्हावा म्हणोन कलम लिहिलें आहे. त्याप्रमाणें होत जाईल.

१ दसरियाबद्दल बकरें शिरस्तेप्रमाणें पावत जाईल.

१ दिपवाळीबद्दल तेल व धुका हवालदार व कारकून व दमासीयास पावतो म्हणोन कलम लिहिलें आहे. त्याप्रमाणें पावेल.

१ बारा सणांचे विडे प्रथम हवालदारास, मागाहून कारकून, याच्या मागून सर्वांस पावत आल्याप्रमाणें पावत जातील.

१ राखी पौर्णिमेस पोतीं व राखी हवालदारास व कारकुनास शिरस्तेप्रमाणें पावतील.

१ दसऱ्याबद्दल कारखान्याची पूजा व दक्षणा पावते म्हणून कलम. त्याप्रमाणें पावत जाईल.

१ गुरुवाराबद्दल पीरास शेरणी व ऊद दरबारीं पावतो म्हणोन कलम आहे. त्यास चौकशी होऊन पावत जाईल.

१ सरकारांत नजर हवालदार व कारकून व दमासी व सांडणीस्वार यांनीं करीत जावी.

१ जू मांगीची मुठी दमासी घेतात, त्यानें कारखान्यांत खैरात व भणंग भिकारी वगैरे खर्च करीत आहां म्हणून कलम आहे. त्याप्रमाणें करीत जाणें [ इतिहाससंग्रह पु. ६. अं. ७, ८, ९. ]

**उष्णताः**—उष्णताशास्त्र हा पदार्थविज्ञानशास्त्रांतील एक भाग आहे उष्णता ही एक तऱ्हेची शक्ति आहे. तरी किल्येकवेळां तो शब्द निरनिराळ्या संकुचित अर्थी उपयोगांत आणितात. असें ( अ ) उष्णताभास, (ब) उष्णमान, (क) उष्णतेचें शक्तिमान व (ड) उष्णताविसर्जनशक्ति.

(अ) स्पर्शजन्य भासामुळें प्रथम उष्णतेची कल्पना उद्भवली व त्यामुळें पदार्थांत कांहींतरी फरक होतो असें कळूं लागलें. उष्णता एका पदार्थांतून दुसऱ्या पदार्थांत जाते, व दोन्हीहि सारखेच उष्ण होतात.

(ब) निरनिराळे पदार्थ कमीजास्त उष्ण असल्यामुळें, उष्णतेच्या तीव्रतेचें मापन करण्याकरितां उष्णमानमापन यंत्र निघून निरनिराळ्या पदार्थांतील उष्णतेच्या तीव्रतेचें प्रमाण मोजणें.

(क) उष्णतेचें परिमाण पदार्थांच्या आकारावर अवलंबून असतें. सारख्याच उष्णमानाच्या पेलाभर पाण्यांत मोठ्या मांड्याभर पाण्यापेक्षां कमी उष्णता असते. उष्णमान पदार्थांच्या आकारावर अवलंबून नसतें, तें विवक्षित आकारांत केलेल्या उष्णतेच्या एकीकरणावर अवलंबून असतें.

(ड) सूर्यकिरण एकाद्या पदार्थावर पडले तर तो पदार्थ उष्ण होतो यावरून उष्णता मधील मोकळ्या जागेंतून इकडून तिकडे जाते असें वाटत होतें, पण अलीकडे ती उष्णता नसून, एकप्रकारची 'विसर्जनशक्ति' आहे व तिचें उष्णतेंत रूपांतर होतें असें कळून आलें आहे. ही विसर्जनशक्ति तिच्यामुळें उत्पन्न झालेल्या उष्णमानानेंच मोजीत असल्यामुळें तिचें 'उष्णताविसर्जनशक्ति' हेंच नांव कायम आहे.

उ ष्ण मा न मा प कां चा शो ध.—उष्णतेचा भास आणि तिची शक्ति कळल्यानंतर ती मोजण्यास उष्णमानमापकांचा शोध जरूर होता. या यंत्रांनीं उष्णतेची तीव्रता मोजतां येते पण परिमाण मोजतां येत नाहीं.

या बाबतींत गॅलिलिओनें पहिल्यानें एक हवेचें उष्णमानमापक यंत्र शोधून काढलें. त्यांत त्यानें दोन कांचेचे गोळे ( पोकळ ) एका कांचेच्या नळीनें जोडले होते. वरच्या गोळ्यांत हवा होती, व खालील गोळ्यांत रंगाचें पाणी होतें. जरी यांत उष्णमान सूक्ष्म तऱ्हेनें दाखविलें जात होतें, तरी हवेच्या दाबामुळें त्यांत फरक होत असे. त्यानंतर १६१२ त त्यानें 'अलकोहल' वापरलेलें असें एक नवीन उष्णमानमापक यंत्र काढलें व रंगाचें पाणी घातलेल्या कांचेच्या फुग्याच्या एकसहस्रांश भागाला तो एक अंश म्हणूं लागला. पण अशा यंत्रांची एकमेकांशीं तुलना करणें शक्य नव्हतें म्हणून कोणता तरी एक नियमित उष्णमानांश घेऊन तेथून पुढें उष्णमानाचें माप आखणें जरूर होतें. पहिल्यानें मनुष्याच्या अंगांतील उष्णमान हें एक नियमित उष्णमान घेणें स्वाभाविक होतें, पण 'सर ऐझॉक न्यूटन'नें, पाणी गोठण्याच्या वेळचा उष्णमानांश हा शून्यांश घेऊन मनुष्यप्राण्याच्या शरीराचें उष्णमान १२ अंश ठरविलें. त्याच वेळीं 'फॅरेनहीट'नें शून्यांश आणखी खालीं नेऊन त्यानें तो बर्फ आणि मिठाच्या मिश्रणानें उत्पन्न होणारी थंडी दाखवूं लागला व त्यानें पूर्वीप्रमाणेंच आपला बारावा अंश मनुष्यप्राण्याचें शरीरोष्णमान ठेवलें. त्यानंतर उष्णमानांतील फरक जास्त बरोबर कळावे म्हणून १२ अंश हा ९६ अंशांवर कल्पिला व त्याचे जास्त भाग केले. याप्रमाणें मनुष्याच्या अंगांतील उष्णता ९६ अंशांवर कायम ठेविली असतां याप्रमाणें पाणी गोठण्याचे व उकळण्याचे अंश अनुक्रमें ३२ व ११२ येऊं लागले. व फॅरेनहीट उष्णमानमापक यंत्र, त्याच्या लहान लहान अंशांतरामुळें व शून्य अंश पाणी

गोठण्याच्या पेक्षांहि खालीं असल्यामुळें तें वायुस्थिति शास्त्रांत फार उपयोगी होतें. याशिवाय दुसरीहि उष्णमानमापक यंत्रें आहेत, त्यांपैकीं शतभाग उष्णमानमापक यंत्र शास्त्रीय उपयोगांकरितां चोहोंकडे वापरतात. यांत पाणी थिजण्याचा उष्णमानांश शून्य असून (७६० मिलिमीटर दाब उकळण्याच्या असतांना) शंभर आहे व मधील जागा बरोबर शंभर भागांत विभागली आहे; या सर्वांत उष्णतेनें प्रसरण पावणाऱ्या पाण्याच्या धर्मांचा फायदा घेतला आहे.

प्र स र ण ध र्मा व र ब स वि ले ल्या उ ष्ण मा न मा प क यं त्रां ची तु ल ना.—वरीलप्रमाणें तयार केलेल्या यंत्रांची परस्परांशीं तुलना करतां येईल. मात्र त्यांत कांच व द्रवपदार्थ हीं एकाच जातीचीं असलीं पाहिजेत. पण त्यांत मुख्य दोष असा आहे कीं, दोन मुख्य मार्गांशिवाय केलेले मधील भाग त्या द्रवपदार्थाच्या प्रसरणावर अवलंबून असतात. आणि पाण्यासारखा एखादा पदार्थ जो घनरूप होतेवेळीं प्रथम आकुंचित होतो, व नंतर जोरानें प्रसरण पावतो, असा एखादा पदार्थ अशा यंत्रास निरुपयोगी होईल. आणि ह्या पाण्याचा धर्म बाकीच्या द्रवपदार्थांत कमीजास्त प्रमाणांत नाहीं असें म्हणतां येत नाहीं; आणि याचप्रमाणें तेल, पारा, अलकोहल वापरून तयार केलेलीं उष्णमानमापक यंत्रें दोन विवक्षित अंशाखेरीज बाकीच्या अंशांत परस्परांशीं जमत नाहींत. यानंतर कांहीं दिवसांनीं गे ल्युसॅक (१८०२) आणि रेगनॉल्ट (१८४७) यांनीं वायुरूप पदार्थांचें प्रसरण द्रवरूप पदार्थांच्या प्रसरणासारखें गुंतागुंतीचें नसून साधें आहे तसेंच सर्व वायुरूप पदार्थांचें प्रसरण सारख्या उष्ण मानास एकसारखेंच असतें असें सिद्ध केलें. या प्रसरणाच्या सारखेपणावरून हें प्रमाण उष्णमानमापक यंत्र वायूचें असावें असें दर्शविलें. पाऱ्याचीं उष्णमानमापक यंत्रें जवळ जवळ वायुउष्णमानमापक यंत्रांसारखींच आहेत, शिवाय तीं वापरण्यास सोईचीं आहेत आणि पाऱ्याची वाफ फार होत नसल्यामुळें दाब कमीजास्त होत नाहीं व प्रसरण सारखें होतें. तसेंच पारा कांचेला चिकटत नाहीं इत्यादि त्याच्यामध्यें गुण आहेत म्हणून तीं यंत्रें नेहेमींच्या उपयोगांत वापरतात. पाऱ्याच्या उष्णमानमापकापेक्षां जास्त उष्णमान मोजावयास विद्युदुष्णमानमापक यंत्र व त्याहिपेक्षां जास्त उष्णमान मोजण्यास उष्णताविसर्जन नियमानुसार केलेलीं उष्णमानमापक यंत्रें वापरतात ( उष्णमानमापक पहा ).

स्थि त्यं त र.—प्रत्येक पदार्थ घन, द्रव आणि वायु या तीन स्थितींमधून जात असतो, आणि या तीन स्थिती त्याला उष्णतेमुळें प्राप्त होत असतात, एखाद्या विवक्षित पदार्थाचें रूपांतर विवक्षित उष्णमान असतानांच होऊं शकतें, तें सुद्धां त्या उष्णमानाच्यावेळीं कांहीं एक ठराविक उष्णता दिल्याशिवाय किंवा काढून घेतल्याशिवाय एखाद्या पदार्थाचें स्थित्यंतर होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ एक बर्फाचा तुकडा घेतला व त्यास उष्णता लाविली तर शून्यांशापर्यंत येईपर्यंत त्याची उष्णता वाढते व बर्फ वितळावयास लागतो; पण त्यावेळीं आणखी जास्त उष्णता दिली तरी बर्फाची उष्णता वाढत नाहीं; ती इतका वेळ कीं, तितक्याच आकाराच्या पाण्यास तितकीच उष्णता दिली असतां तें ८०अंशांवर जाईल. या बर्फास लागलेल्या उष्णतेस 'अनुद्भूत उष्णता (लॅटंट हीट) म्हणावें असें जोसेफ ब्लॅक यानें ठरविलें घनपदार्थाचें द्रवरूपांत रूपांतर व द्रवरूप पदार्थांचें वायुरूपांत रूपांतर होण्यास उष्णता द्यावी लागते. तेव्हां त्यांचें याच्या अगदीं उलट स्थितींत रूपांतर करावयाचें झाल्यास त्यांतून उष्णता काढून घ्यावी लागेल. स्थित्यंतरासाठीं लागणाऱ्या उष्णतेचें परिमाण निरनिराळ्या पदार्थांच्या बाबतींत निरनिराळें आहे. वाफेच्या अनुद्भूत उष्णतेचें प्रमाण १७६४ सालींच 'जेम्स वॅट' नांवाच्या माणसानें काढिलें होतें. तो म्हणतो कीं २१२ फॅरनहीट अंशाच्या वेळची वाफ त्याच्या सहापट आकाराच्या पाण्यास उकळी आणूं शकते.

अ नु द्भू त उ ष्ण ते च्या यो गा नें उ ष्ण ता मा प न.—पाण्याची वगैरे केलेलीं उष्णमानमापक यंत्रें उष्णतेची तीव्रता मोजतात. पण त्या उष्णमानमापकापेक्षां एक निराळें उष्णतामापक आहे. त्याच्या योगानें नियमित उष्ण पदार्थांची उष्णता तो नियमित थंड पदार्थांत मिसळून उष्णमान सारखें झाल्यानंतर काढावयाची असते. तेव्हां यावरून उष्णतेचें परिमाण काढतां येतें. अगदीं आरंभीं थंड पदार्थ म्हणजे बर्फाचा एक ठोकळा घेऊन, त्यांत ज्या उष्ण पदार्थांतील उष्णता मोजावयाची असेल, तो बसेल इतका खळगा पाडून त्यांत तो तापविल्यांनतर ठेवीत असत व नंतर दुसरा एक बर्फाचा तुकडा त्यावर झांकण म्हणून ठेवीत असत. अशा रीतीनें बाहेरील उष्णता आंत जात नसे व आंतीलहि बाहेर येऊं शकत नसे. व त्या पदार्थांतील सर्व उष्णता बर्फ वितळण्यांत खर्च होत असे. आणि अशा तऱ्हेनें बर्फाच्या वितळण्यावरून त्या पदार्थांतील उष्णतेचें परिमाण मोजलें जात असे. पण यांत वितळलेलें बर्फ अगदीं बरोबर मोजलें जात नसे, कारण कितीहि पाणी पुसुन काढलें तरी थोडा तरी पाण्याचा पातळ थर किंवा थेंब बर्फावर रहातो. १७८० मध्यें लाप्लास व लाव्हॉझिए यांनीं बर्फाच्या ठोकळ्याऐवजीं एक दुहेरी पडद्याचें धातूचें भांडें घेऊन त्यांत बर्फाचे तुकडे वितळविण्याची रीत काढली, पण त्यांत वरील अडचण जास्तच भासूं लागली.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं बनसेननें हर्शेलच्या पद्धतीप्रमाणें बर्फ वितळल्यावर कमी झालेल्या आकारावरून किती बर्फ वितळलें हें काढण्याची रीत उपयोगांत आणली व तिच्या योगानें वरील पाण्याच्या थराची अडचण नाहींशी झाली.

एक भाग पाण्याचें बर्फ केलें असतां तें १.०९२० भाग भरतें, तेव्हां बर्फाचें पाणी होत असतांना.°०९२ इतक्या प्रमाणानें प्रत्येक भाग कमी होतो व त्यावरून वितळलेलें बर्फ किती हें काढून नंतर उष्णतापरिमाण मोजतां येईल.

एंजिनमध्यें उत्पन्न होणाऱ्या उष्णतेसारख्या मोठ्या परिमाणाच्या उष्णतेचें परिमाण त्यांत होणाऱ्या पाण्याच्या वाफेवरून काढतात. पाण्याच्या एका भागाची स्वाभाविक हवेच्या दाबाखालीं वाफ होण्यास लागणारी उष्णता, मोजण्यास मूलमान ( यूनिट ) म्हणून घेतात. प्रयोगशाळेंत, याच्या उलट म्हणजे वाफेच्या द्रवीकरणाची पद्धत उपयोगांत आणतात. व ती जास्त सोयीची असते.

उ ष्ण ता मा प क यं त्रा नें उ ष्ण ता मा प न.— ज्या योगानें उष्णता बाहेर कोठेंहि जाणार नाहीं अशा एखाद्या भाड्यांत ( तें भांडें बहुतकरून दुहेरी असतें व भांड्याचा बाहेरील व आंतील उष्णतासंबंध अप्रवाही पदार्थानें तोडलेला असतो; अशा तऱ्हेनें त्या भांड्यांतील उष्णता फारशी बाहेर जाऊं शकत नाहीं ) पाणी घालून त्यांत ज्या पदार्थाची उष्णता मोजावयाची असेल तो पदार्थ टाकतात व उष्णतामान सारखें झाल्यावर पाण्याची उष्णता किती वाढली किंवा कमी झाली हें काढतात. एक भाग पाण्याची एक अंश (शतभाग) उष्णता वाढविण्यास जी उष्णता लागते तें उष्णतेचें मूलमान होय. व त्याला कॅलोरी म्हणतात. पण ब्रिटिश एंजिनेयरांचें मूलमान निराळें आहे. ते एक पौंड पाणी एव. फॅरेनहीट अंश तापविण्यास लागणाऱ्या उष्णतेस मूल उष्णतामान धरतात. ही पद्धत कौंट रमफोर्डनें पहिल्यानें काढिली व त्यानंतर रेगनॉल्टने पूर्णतेस नेली. यांतील दोष म्हणजे पाण्याचें भांडें सभोंवतालच्या वातावरणापेक्षां जास्त तापलें म्हणजे थोडीशी तरी उष्णता हवेंत विसर्जन होते, व त्यामुळें चूक होण्याचा संभव हटकून असतो. त्याचप्रमाणें भांडें तापण्यांतहि उष्णतेचा थोडासा भाग खर्च होतो.पण या चुका पुष्कळसे पोटप्रयोग करून बरोबर रीतीनें दुरुस्त करतां येतात ( उष्णतामापन व विशिष्ट-उष्णता पहा ).

वॅ ट ची द र्श क आ कृ ति अ थ वा वा फे च्या प्र स र णा मु ळें झा ले लें का म.—अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत उष्णताशास्त्राची आणि त्याबरोबरच वाफेनें चालणाऱ्या यंत्राची पुष्कळ प्रगति झाली. तत्पूर्वी वाफेनें चालणाऱ्या यंत्रांतील मुख्य जो पंचपात्रासारखा भाग (सिलिंडर) त्याचाच तापक ( बायलर ) व शीतक ( कंडेन्सर ) अशा दोन्हीहि तऱ्हेनें उपयोग करीत असत व त्यामुळें बरीच उष्णता वाया जात असे. त्यानंतर इ. सन १७०० सालांत तापक निराळा ठेवून मुख्य पंचपात्र आणि शीतक हे एकत्र ठेवले गेले तरी, मुख्य पंचपात्र कामानंतर थंड करण्याकरतां त्यांत प्रत्येक वेळीं थंड पाणी घालावें लागत असल्यामुळें उष्णता वांचविण्याच्या दृष्टीनें याचा फारसा फायदा झाला नाहीं. त्यानंतर १७६९ सालीं जेम्स वॅटनें तापक, शीतक आणि मुख्य काम करणारें पंचपात्र हे तिन्ही भाग निरनिराळे करून, व मुख्य पंचपात्र सतत सारखेंच उष्ण ठेवून वाफेचें यंत्र चालविण्याची युक्ति काढली. या पद्धतीनें पूर्वीपेक्षां फायदा होऊं लागला खरा पण यांत एक दोष राहिला तो हा कीं, दट्ट्याचा, मुख्य पंचपात्रांत पूर्ण प्रवास होईपर्यंत तापकांतून वाफ सोडली जात असे, व नंतर त्या वाफेच्या अंगीं आणखी काम करण्याची शक्ति असूनहि ती शतिकाकडे थंड होण्यास जात असे. हाहि खर्च कमी व्हावा म्हणून वॅटचा उपाय असा होता कीं, दट्ट्याचा $\frac{1}{4}$ प्रवास पूर्ण होईपर्यंतच तापकांतून वाफ सोडावी व त्यानंतरचा त्याचा $\frac{3}{4}$ प्रवास वाफेच्या प्रसरणशक्तीनें पूर्ण व्हावा व त्यानंतर ती वाफ अशा तऱ्हेनें पूर्ण उपयोगांत आल्यानंतर शीतकाकडे जावी. तापकांतील वाफ बंद केल्यावर, प्रसरणाच्या योगानें वाफेचा दाब कमी कमी होऊं लागे, व अखेर शीतकांत जाण्याच्या मार्गाजवळ आल्यावर तिचा दाब नाहींसा होत असे, हा वाफेचा दाब दाखविणारें एक यंत्र त्यानें मुख्य पंचपात्रावर बसविलें होतें व त्यास तो दर्शकघड्याळ ( इंडिकेटर ) असें म्हणत असे.

एखाद्या वाफेच्या यंत्रानें केलेलें काम म्हणजे, त्याला केलेला प्रतिरोध व तो प्रतिरोध मागें हटविलेलें अंतर यांचा गुणाकार असतो, उदाहरणार्थ दट्ट्यावर दर चौरस इंचाला पन्नास पौंड दाब असला व दट्ट्याचें क्षेत्रफळ १०० चौ. इंच असेल तर त्यावर एकंदर दाब ५०० पौंडांचा बसतो व नंतर दट्ट्याचा धक्का जर एक फूट लांबीचा असेल तर प्रत्येक धक्याला ५००० पौंडांचें वजन १ फूट उंच उचलण्याइतकें किंवा ५० पौंडांचें वजन १० फूट उचलण्या इतकें काम झालें.

उ ष्ण ते ची का र्य क्ष म ता.—एखाद्या उष्णतायंत्रास लाविलेली उष्णता व त्याउष्णतेमुळें झालेलें काम, या प्रमाणास त्या यंत्राची औष्णिक कार्यक्षमता असें म्हणतात. एक पौंड पाण्याची उष्णता शतभाग उष्णमानमापकाच्या एका अंशानें चढविण्यास जितकी उष्णता लागते त्याच्या ६५० पट उष्णता १ पौंड शून्यांशावर असलेल्या पाण्याची वाफ करण्यास लागते. हा वॅटचा सिद्धांत त्याच्यामागें क्लेमंट आणि डिझार्म्स यांनीं कायम केला. तेव्हां अर्थातच एक पौंड वाफ म्हणजे कांहीं तरी उष्णतापरिमाण होय आणि तेवढ्यांत जितकें फूटपौंड काम होईल त्याला कार्यक्षमता म्हणूं लागले, किंवा हार्स-पॉवर-अवरमध्यें किती पौंड वाफ खर्च होते यावरूनहि कार्यक्षमता काढतात. ( हॉर्स-पावर-अवर - म्हणजे एका अश्वशक्तीनें एका तासांत होणारें काम आणि एक अश्वशक्ति म्हणजे ३३००० फूट

पौंड ). कार्यक्षमता जसजसा दाब वाढवावा व प्रसरण पूर्ण करावें तसतशी वाढत जाते.

उ ष्ण ते चें स्व रू प.—अगदीं पहिल्यानें उष्णता हा एक ' तापकर ' द्रव आहे आणि तो निर्भार आहे असें समजत असत. तो निर्भार आहे असें समजण्याशिवाय गतीच नव्हती; कारण कोणत्याहि पदार्थाचें उष्णतेनें वजन वाढत नव्हतें पण उलट तें कमी होत होतें. पण तें वाफेमुळें वगैरे कमी झालें असेल असें शास्त्रज्ञ म्हणत असत. ह्या काल्पनिक द्रवाची कल्पना पदार्थांत ' कोणत्याहि स्थित्यंतरांत तो सारखाच असला पाहिजे ' ह्या कल्पनेला पोषक झाली, आणि तिनें स्थित्यंतराच्या चमत्काराचा बरोबर उलगडा केला. पण घर्षणामुळें उत्पन्न होणारी उष्णता किंवा वायुरूप पदार्थांच्या प्रसरण आकुंचनामुळें होणाऱ्या उष्णमानांतील फरक यांचा मात्र संबंध त्या तापकर द्रवाच्या सिद्धांतांत जमेना. घर्षणजन्य उष्णतेचा अर्थ तापकर सिद्धांतवाले असा करीत कीं, पदार्थ पिळून काढला म्हणजे त्यांतून बाहेर निघणारा तो 'तापकर'(कॅलोरिक)द्रव होय व अशा तऱ्हेनें पिळून काढलेल्या किंवा दाबलेल्या पदार्थांत ' उष्णताधारणशक्ति ' कमी होते. हा त्यांचा मुद्दा खोडून काढणें फारच कठिण होतें, कारण तोफा वगैरे कोरीत असतां निघणारा चूर आणि उष्णता हीं बरीच असत.

पण पुढें ' रमफोर्ड ' नांवाच्या शास्त्रज्ञानें एका बोथट गिरमिटनें त्याचा प्रयोग केला व सुमारें अडीच तासांत ४१४५ ग्रेन चूर काढून त्याच्या उष्णतेनें २६.५ पौंड पाण्यास आधण आणलें. पुढें त्यानें तो चूर व तितक्याच वजनाच्या धातूच्या ठोकळ्याची उष्णता एक अंशानें चढविण्यास सारखीच उष्णता द्यावी लागते, तेव्हां चुराची उष्णताधारणशक्ति, कमी झाली नाहीं हें दाखविलें पण दुर्दैवानें ( तापकरद्रवसिद्धांतवाल्यांचें ) ' उष्णताधारणशक्ति ' या शब्दाचे दोन अर्थ होऊ लागले. त्यांत एक म्हणजे पदार्थांत असलेलें उष्णतेचें परिमाण आणि दुसरा— पदार्थाचें उष्णमान एका अंशानें वाढविण्यास लागणारी उष्णता. यापैकीं पहिलें मोजणें अशक्य. रम्फोर्डनें चूर आणि ठोकळा यांचें उष्णमान एका अंशानें वाढविण्यास सारखीच उष्णता द्यावी लागते हें सिद्ध करतांना पूर्वी त्यांच्यांत उष्णतापरिमाण सारखेंच होतें हें सिद्ध केलें नाहीं, त्यामुळें त्याला ' तापकरद्रवसिद्धांतवाल्या ' वर म्हणावा तसा जय मिळाला नाहीं.

त्याच्या नंतर १७९९ मध्यें ' डेव्हि ' नांवाच्या शास्त्रज्ञानें हें काम हातीं घेतलें. त्यानें बर्फाचे दोन तुकडे एकमेकांवर घासून त्यांचें पाणी केलें. पाण्यांत वास्तविक बर्फापेक्षां जास्त उष्णता आहे पण ' तापकरद्रवसिद्धांतवाल्यांच्या ' सिद्धांतानें त्यांत कमी उष्णता असली पाहिजे, कारण ते म्हणतात कीं, घर्षणानें उष्णता पिळून निघते व घर्षित पदार्थांतील उष्णताधारणशक्ति कमी होते व पाणी हा घर्षित पदार्थ म्हणून त्यांतील उष्णताधारणशक्ति कमी असावयास पाहिजे, पण प्रत्यक्ष वस्तुस्थिति याच्या विरुद्ध आढळून आली. यावेळीं ' तापकरद्रवसिद्धांतवाल्यांचा ' पुरा मोड झाला व उष्णता हा ' तापकरद्रव ' नसून तो तो एक ' गतीचें स्वरूप ' आहे असें डेव्हीनें सिद्ध केलें. या नंतर, लाप्लास, डाल्टन, गेलुस्टॉक, व ड्युलाग वगैरे शास्त्रज्ञांनीं या सिद्धांतास वायुरूप पदार्थांच्या निरीक्षणानें पुष्टि दिली. सिद्धांताची प्रगति निरनिराळ्या समांतर मार्गानें एकाच वेळीं चालू होती, तरीपण वायुरूप पदार्थांचे गुणधर्म शोधल्यानें खरा सिद्धांत कसा काढतां आला हें समजेल.

वा यु रू प प दा र्थां चे उ ष्ण ते ब द्द ल ध र्म.—१६६२ मध्यें ' रॉबर्ट बॉइल ' नांवाच्या शास्त्रज्ञानें वायुरूप पदार्थ दाबाला प्रतिरोध करतात हें शोधून काढलें व ज्या प्रमाणांत दाब वाढवावा त्याच प्रमाणांत वायूचा आकार कमी होतो हें त्यानें सिद्ध केलें. उष्णतेनें वायुरूप पदार्थ प्रसरण पावतात हें त्यास माहीत होतें, पण उष्णमानमापक यंत्र अस्तित्वांत नसल्यामुळें त्यास हें बरोबर सिद्ध करतां आलें नाहीं. त्यानें एवढेंच ठरविलें कीं, उष्णमान जर सारखें ठेविलें तर जसा दाब वाढवावा तसा वायुरूप पदार्थाचा आकार कमी होतो तो असा कीं, दाब व आकार यांचा गुणाकार नेहमीं तोच कायम असतो.

डॉल्टन आणि गे ल्युसॅक यांनीं १८०२ सालीं, दाब कायम ठेवला तर शतभाग उष्णमानमापकाच्या प्रत्येक अंश उष्णतेला वायुरूप पदार्थ $\frac{1}{266}$ अंशानें वाढतो हें सिद्ध केलें त्यानंतर ५० वर्षांनीं रेग्नाल्टनें ते $\frac{1}{273}$ अंशानें वाढतात असें ठरविलें. या नियमाप्रमाणें कोणत्याहि वायूचा आकार ' ट ' अंशाला २७३ + ट या प्रमाणांत असला पाहिजे. शतभाग उष्णमानमापकाच्या शून्यांशाच्या ठिकाणीं २७३ वा अंश येणाऱ्या उष्णमानमापकास ' केवल उष्णमानमापक ' म्हणतां येईल. उष्णता जर केवल उष्णमानमापक यंत्रानें मोजली तर प्रसरणाचा नियम आणि बॉईलचा नियम यांच्या मिश्रणानें दा × आ = र × ट ही सारणी निघूं शकते. यांत ( दा = दाब, आ = आकार आणि ट = केवल उष्णमानमापक यंत्रानें दाखविलेलें उष्णमान ) जर दोन वायूंचें एकसारख्या दावांत सारखें आकारमान घेतलें व त्यांचें सारखेंच उष्णतामान असलें तर 'र' दोघांना किंवा सर्व वायूंना सारखाच असतो व जर सारख्या वजनाचे घेतले तर ' र ' ची किंमत त्यांच्या अणुभारांच्या व्यस्त प्रमाणांत असते.

वा यु रू प प दा र्थां ची वि शि ष्ट उ ष्ण ता.—कोणत्याहि पदार्थाची विशिष्ट उष्णता म्हणजे तो पदार्थ व त्याच उष्णमानाचें व आकाराचें पाणी यांचें उष्णमान एक अंश वाढविण्यास लागणाऱ्या उष्णतेचें प्रमाण. वायुरूप पदार्थांची

विशिष्ट उष्णता मोजण्याचा पहिला प्रयत्न द्विकुड्य पात्रा ( डबल वॉल्ड व्हेसल अथवा कॅलोरीमीटर ) च्या सहाय्यानें ' लॅव्हॉझिए ' या शास्त्रज्ञानें केला, पण त्याचीं उत्तरें फारच अनिश्चित येऊं लागलीं. त्यानंतर ' गे ल्युस्सॅक ' नें दोन धातूंचे फुगे घेऊन केला. एक फुगा निर्वात केला व दुसऱ्यांत वायू भरला, तेव्हां अर्थातच ज्यांत वायु भरला होता. त्याचें उष्णमान व त्यावरील दाब हा दुसऱ्यापेक्षां जास्त होता. नंतर त्यानें रिकाम्या फुग्यांत त्यांतील वायु सोडला तेव्हां पहिल्याचें उष्णतामान जितकें कमी झालें तितकेंच दुसऱ्याचें वाढलें. या तऱ्हेनें त्यानें बरेच प्रयोग करून वायू जर सारख्या आकाराचे असतील तर त्यांची ' उष्णताधारण-शक्ति ' सारखीच असते, हाच सिद्धांत त्यानें निरनिराळया उष्णमानाचे दोन वायू घेऊन त्यांच्या मिश्रणाचें उष्णमान दोघांच्या उष्णतामानाच्या सरासरी इतकें येतें हें दाखवून दुसऱ्या तऱ्हेनें सिद्ध केलें. याला अपवादात्मक फक्त उज्ज ( हायड्रोजन ) आणि कर्बद्विप्राणिद (कर्बन डाय ऑक्साइड) होते. याच वेळीं ' डेलारोशे ' आणि बेरार्ड ' यांनींहि वरील नियमाला पुष्टिकारक असा प्रयोग केला. एकाकी वायूपेक्षां संयुक्त वायूची विशिष्टउष्णता जास्त असते हेंहि त्यांनीं दाखविलें. त्याचप्रमाणें वायुवरचा दाब जसजसा वाढवावा तसतशी त्याची विशिष्ट उष्णता कमी होते, आणि त्यामुळें ' तापकरद्रव सिद्धांतवाल्याचा ' सिद्धांत त्यांनां कांहीं वेळ खरा वाटूं लागला.

यानंतर डाल्टननें प्रयोग केले. त्यानें वायूचा आकार एकाएकीं जर $\frac{1}{2}$ केला तर ५० अंश फॅरेनहीट उष्णमान वाढतें हें दाखविलें. न्यूटनच्या ध्वनिगतीच्या उदाहरणांत होत असणारी चूक कदाचित याच कारणामुळें असेल, कारण वायु एकदम दाबला असतां त्यांतील उष्णता बाहेर जाऊं शकत नाहीं व मग त्याला लागणारा दाब हळूहळू त्याचा आकार कमी केला असतां जितका लागतो त्याच्या पेक्षां १.४१ पट लागतो, कारण दुसऱ्या स्थितींत उष्णता विसर्जनाला वाव मिळतो. आणि या १.४१ प्रमाणानें जर न्यूटनचें गणित केलें तर प्रयोग आणि गणित या दोन्ही-चेंहि उत्तर बरोबर येऊं शकतें. पण या प्रमाणाचा शोध यानंतर लाप्लास नांवाच्या शास्त्रज्ञानें लाविला. तो म्हणतो कीं, हें प्रमाण दाब स्थिर असतां वायूची विशिष्टउष्णता व आकार स्थिर असतां जी दुसरी विशिष्ट उष्णता येते त्याचें आहे.

**का नों चें उ ष्ण ता शा स्त्रां ती ल का म, उष्णतेची प्रेरक शक्ति.**—एखादें वाफेचें यंत्र जर सारखें काम करूं लागलें तर उष्णतेची प्रेरकशक्ति किती उपयोगितां येईल ? उष्णतेची कार्यक्षमता मर्यादित आहे कीं काय ? उष्णतेची प्रेरकशक्ति वाढविण्यास वाफेशिवाय दुसरे कोणते पदार्थ चांगले आहेत काय ? वगैरे प्रश्नांची 'सादी कार्नो' यानें उत्तरें दिलीं. त्याचें म्हणणें असें कीं, फक्त उष्णतेनें काम केलें असें म्हणण्यांत, त्या कामांत फक्त उष्णताच खर्च झाली आहे आणि काम करणारे जिन्नस ज्या स्थितींत प्रथम आले होते त्याच स्थितींत पुन्हां आहेत कीं काय हें पाहिलें पाहिजे, नाहीं तर केवळ उष्णतेनें काम झालें असें म्हणतां येणार नाहीं. त्याप्रमाणेंच एक फेरा पुरा करून आल्यावर त्या यंत्रांत आरंभींच्या इतकीच उष्णता असली पाहिजे.

विचारांत घेतलेल्या उष्णतेनें चालणाऱ्या यंत्रांत, उष्णता ही फक्त आकारभेदासंबंधानेंच प्रेरकशक्ति आहे असें म्हणतां येतें. कार्यकारी पदार्थाच्या आकारांत भेद म्हणजे त्याचें प्रसरण किंवा आकुंचन होणें हें उष्णतेनें होतें आणि त्यामुळेंच वाफेचें यंत्र चालूं शकतें; आणि एवढ्या करतांच तापक आणि शीतक यासारखे यंत्रांत दोन भाग लागतात. तापक आणि शीतकाच्या उष्णमानांत फरक असतो, आणि त्यामुळेंच उष्णतेच्या अंगीं प्रेरकशक्ति येते;किंवा उष्णमानांत फरक असल्याशिवाय प्रेरकशक्ति उत्पन्न होत नाहीं. तेव्हां मग उष्णतेची प्रेरकशक्ति देण्याकरितां फायदेशीर रीतीनें यंत्राच्या दोन भागांच्या उष्णमानांत किती फरक ठेवतां येईल, आणि कांहीं एका विवक्षित उष्णमानांतरानें आणि विवक्षित उष्णता परिमाणानें सर्वांत जास्त प्रेरकशक्ति कशी व किती मिळूं शकेल हे प्रश्न उत्पन्न होतात.

**उ ष्ण ते च्या प्रे र क श क्ती ची प र म नि ष्प त्ति.**—ज्याअर्थी उष्णमानांतराशिवाय प्रेरकशक्ति उत्पन्न होऊं शकत नाहीं, त्याअर्थी, एंजिनमधील जे भाग अशा तऱ्हेनें कमी जास्त उष्णमानांत ठेवलेले असतात त्यांच्यांत परस्पर ( विसर्जनानें किंवा प्रवाहानें ) उष्णता ग्रहण होतां कामा नये. कारण त्या-योगानें उष्णमानांतर बिघडतें व प्रेरकशक्तीची परमनिष्पत्ति होऊं शकत नाहीं. यंत्रामध्यें ज्या भागांत उष्णमानांनतर ठेवण्याम पाहिजे असे तीन भाग आहेत. तापक पंचपात्र व शीतक. यांत तापकामधून पंचपात्रांत वाफ जात असतांना तिची कांहीं उष्णता पंचपात्रास मिळते. याशिवाय तापकांतील वाफ व पंचपात्रांतील वाफ यांच्या उष्णमानांत फरक असतो व त्याचप्रमाणें पंचपात्रांतील वाफ व शीतक यांच्याहि उष्णमानांत फरक असतो. या फरकामुळें कार्य-क्षमता कमी होते आणि ती जर वाढवावयाची असेल तर हे फरक शक्य तितके कमी केले पाहिजेत. परमनिष्पत्ति मोजीत असतांना हे सर्व दोष नाहींत असें धरून चालतात.

**का नों चें म नः क ल्पि त नि र्दो ष क्रि या च क्र.**—कामा-ची परमनिष्पत्ति ज्यापासून मिळेल अशा एका पद्धतीची कार्नोनें कल्पना केली, आणि तिच्या सिद्धतेकरितां त्यानें पूर्वींच्याच वाफेच्या यंत्रांत वाफ वापरून पाहिली, पण त्यांत वाफेच्या पूर्ण प्रसरणानंतर तिचें द्रवरूप होईपर्यंत ती तेथेंच थंड करीत असत. अशा तऱ्हेनें पाण्याची वाफ होऊन, पुन्हां वाफेचें पाणी होऊन चक्र जरी पूर्ण होत असलें, तरी उष्णमानाचा फरक अतिशय पडत होता व उष्णतेला उष्ण

भागांतून थंड भागाकडे एकदम मार्ग होता, त्याऐवजी त्यानें मध्यंतरीं निराळीं यंत्रें घालून उष्णमानांतील फरक जरी तितकाच असला तरी प्रत्येक यंत्र विवक्षित उष्णमानांत काम करील अशा तऱ्हेनें ठेविलें. नंतर त्यानें आपल्या गोष्टीच्या सिद्धतेकरितां वायुरूप पदार्थ एकदम दाबला असतां उष्ण होतो व एकदम प्रसरण होऊं दिला तर थंड होतो या गोष्टीचा फायदा घेऊन त्याचा उष्णतेचें प्रेरकशक्तींत रूपांतर करण्याकडे उपयोग दाखविला. वायु जर हळू हळू दाबला व त्याचा एखाद्या उष्णवाहकाशीं संबंध असला तर उत्पन्न होणारी उष्णता तो उष्णवाहक घेतो व नंतर तो हळू हळू प्रसरण पावूं दिला तर त्याला दुसऱ्या उष्ण वाहकामधून उष्णता मिळते. अशा तऱ्हेनें दोन्ही वेळां वायूची उष्णता कायम राहिली पण दुसऱ्या वेळीं म्हणजे वायु प्रसरण पावत असतांना असलेली उष्णता, त्याचें आकुंचन होत असतांना असलेल्या उष्णतेपेक्षां जास्त असते. व म्हणून यंत्र प्रगमनशील असतांना जास्त उत्पन्न झालेली उष्णता प्रेरकशक्तीकडे खर्च करतां येते किंवा तिच्याकडून कांहीं बाह्य काम करून घेतां येतें. उष्णतेच्या योगानें अशी प्रेरकशक्ति उत्पन्न करतां येते तसेंच यंत्र उलट चालविलें तर प्रेरकशक्तीपासून उष्णताहि उत्पन्न करतां येते. आणि हीं दोन्हीं कार्यें अगदीं सारखीं असलीं पाहिजेत. म्हणजे जर कांहीं उष्णतेपासून प्रेरकशक्ति उत्पन्न केली व उलट त्या प्रेरकशक्तीपासून उष्णता मिळविली तर ही उष्णता खर्च केलेल्या पहिल्या उष्णतेइतकीच असली पाहिजे.

कार्नोचें प्रत्यावर्ती क्रियाचक्रविषयीं तत्त्व— ' उष्णतेपासून मिळणारी प्रेरकशक्ति ती मिळविण्याकरितां घेतलेल्या कोणत्याहि साधनावर अवलंबून नसून व्यापाराच्या शेवटीं ज्या यंत्राच्या भागांतून जाते त्याच्या उष्णमानाच्या फरकावर अवलंबून असते ' आणि हें फक्त ज्यावेळीं त्या दोन भागांत प्रत्यक्ष उष्णतेची देवघेव नसेल त्याच वेळेस साधतें.

जर दोन वस्तू अगदीं जवळ जवळ सारख्या उष्णमानाच्या असल्या व जर एकीची उष्णता दुसरीपेक्षां किंवा दुसरीची पहिलीपेक्षां थोडी जास्त वाढली तर उष्णतेचा प्रवाह लागलीच सुलट किंवा उलट होतो म्हणून उष्णतेच्या स्थानांतराच्या बाबतींत कार्नोचा नियम म्हणजे प्रत्यावर्ती चक्राची अंतिम सीमा होय. जर यंत्राच्या प्रत्येक भागांत यांत्रिक, आणि औष्णिक शक्तिसमता असेल तर चांगलें यंत्र केव्हांहि थोडासा फरक झाल्याबरोबर उलट चालूं लागेल. या समजावर कार्नोचें तत्त्व उभारलें आहे. दुसऱ्या निराळ्या शब्दांत सांगायाचें म्हणजे ' प्रत्यागमास अतिशय तत्पर ( सद्यःप्रत्यावर्तनक्षम ) यंत्राची कार्यक्षमता परम असते व ती फक्त ज्या उष्णमान मर्यादांत तें यंत्र काम करतें त्यांवर अवलंबून असतें. हें तत्त्व निरनिराळ्या यंत्रांना लावावयाचें असेल तर कार्यक्षमता उष्णमानभेदावर कशी अवलंबून असतें हें पहिलें पाहिजे.

कार्नोनें दिलेली त्याच्या तत्त्वाची सिद्धता.— त्यानें समजा ' र ' नांवाचें एक यंत्र घेतलें व तें 'उ' उष्णता घेऊन ' क ' कामास उपयोगी पडतें, व दुसरें एक ' स ' यंत्र तितकीच उष्णता घेऊन ' का ' काम करतें. 'का' काम ' क ' कामापेक्षां जास्त आहे, तर मग दुसऱ्या यंत्रांतून ' क ' कर्तृत्वशक्ति घेऊन जर त्याला तेवढ्या शक्तीनें उलट काम करण्यास लाविलें तर प्रत्येक वेळीं ( का–क ) असें काम बाकी राहील आणि तें काम नंतर मग तापकांतून उष्णता न घेतां करतां येईल, कारण आहे त्याच स्थितींत यंत्र आलें असतां, त्याची आरंभीची ' उ ' उष्णता त्यांत राहील. व तिच्या योगानें तें पुन्हां काम करूं लागेल आणि नंतर मग कोणत्याहि तऱ्हेनें खर्च न करतां आपणास वाटेल तेवढें काम मिळेल असें प्रतिपादन केलें पण असें प्रत्यक्ष कृतींत केव्हांहि आढळून येत नाहीं.

कार्नोचें काम त्याच्यानंतर क्लेपेरॉन नांवाच्या शास्त्रज्ञानें व्यवस्थित तऱ्हेनें मांडिलें. अनुद्भूत उष्णतेच्या योगानें प्रसरणासंबंधीं त्यानें कांहीं सूत्रें किंवा सारण्या काढल्या त्या आजहि उपयोगांत आहेत. पण त्यानें ' तापकरसिद्धांत' गृहीत धरून कार्नोच्या क्रियाचक्राचें वर्णन केल्यामुळें कार्नोनें टाळलेल्या कांहीं चुका केल्या.

त्यानें असें म्हटलें आहे कीं, वायूनें पहिल्यानें जेवढी उष्णता घेतली तितकी परत जाईपर्यंत तो दाबावा. यावेळीं आरंभींइतकीच उष्णता त्याच्यांत आहे व नंतर तो त्याच्या आरंभीच्या आकारावर आणावा म्हणजे मग तो पूर्वस्थितींत येईल. या क्लेपेरानच्या चुकीचा दोष कार्नोला लावतात व पुढें लार्ड केलवीन, टामसन व क्लार्क मॅक्सवेल वगैरेंनीं केलेल्या दुरुस्त्याच बरोबर म्हणून कार्नोला चूक म्हणतो, पण वास्तविक कार्नोची मूळची चूक नव्हती.

उष्णतेविषयीं यांत्रिक सिद्धांत, ' तापकरद्रव सिद्धांत ' नांवाचें वायु ज्यावेळीं प्रसरण पावतो त्या वेळीं तो ग्रहण करीत असलेली उष्णता गुप्त होते, व तो पुन्हां दावला असतां बाहेर पडते' असें म्हणणें होतें पण, असें असेल, तर वायूच्या प्रसरणाच्या वेळीं तो जी प्रेरकशक्ति देतो, तिचा नीटसा उपयोग करतां येत नाहीं.

यांत्रिक सिद्धांतांत, घर्षणजन्य उष्णतेची उपपत्ति गतीमुळें पदार्थांच्या परिमाणूंत उत्पन्न होणारी खळबळ अशी लावतात. तरी पण घर्षणापासून जशी उष्णता तशी उष्णतेपासून जी प्रेरकशक्ति उत्पन्न होते तिची उपपत्ति त्यांनीं दिली नाहीं. अमुक एक काम झालें म्हणजे उष्णता नाहींशी होते, व फिरून तितक्याच प्रेरकशक्तीपासून तितकीच उष्णता उत्पन्न होते हें सिद्ध करून दाखविल्याशिवाय वरील सिद्धता पूर्ण मानतां येत नाहीं. १८३० त

याविषयीं कार्नोनें कांहीं लिहिलें आहे. त्यानें दोन विशिष्ट उष्णमानांतील फरकापासून उष्णतेच्या यांत्रिक सममूल्याची (मेकॅनिकल इक्विव्हॅलंट) किंमत ३७० कि. ग्रॅ. मि. काढली.

उष्णतेच्या यांत्रिक सममूल्याचें प्रमाण काढण्यास वायुरूप पदार्थांचा फार उपयोग झाला, कारण त्यांचें प्रसरण होत असतां कांहीं तरी बाह्य काम होतें व त्यांची कांहीं उष्णता खर्च होऊन ते थंड होत असतात. मार्क सेगविन नांवाच्या शास्त्रज्ञानें वरील पद्धतीनें पहिल्यानें उष्णतेची यांत्रिकशक्ति मोजली. 'कांहीं एक विवक्षित उष्णता खर्च केली असतां अनियमित काम मिळतें हें हास्यास्पद आहे, व प्रत्येक कामाला कांहीं तरी उष्णता त्या प्रमाणांत खर्च होत असली पाहिजे' असेंच त्यानें प्रतिपादन केलें.

या प्रश्नासंबंधीं जूल नांवाच्या शास्त्रज्ञानें कांहीं प्रयोग केले व त्यानें उष्णतेचें यांत्रिक सममूल्य काढलें. व वायूच्या आकुंचनाच्या वेळीं उष्णता किती उत्पन्न होते हें मोजिलें. यानंतर वायु, प्रसरणानें बाह्य काम करीत असतां त्याच्यांतील उष्णता गुप्त होत नसून ती खर्च होत असते. म्हणजे उष्णतारूपांत रहात नाहीं हेंहि त्यानें दाखविलें.

जू ल चा यां त्रि क स म मू ल्या सं बं धीं सि द्धां त.—उष्णतेच्या यांत्रिक सममूल्यासंबंधी बहुतांशीं पुष्कळसे प्रयोग जूलनें केलेले आहेत. ज्या ज्या ठिकाणीं यांत्रिक सामर्थ्यानें उष्णता उत्पन्न होते. किंवा उष्णतेच्या योगानें यांत्रिक सामर्थ्य उत्पन्न होतें. त्या त्या ठिकाणीं उष्णता आणि यांत्रिक काम यांच्यामधील किंवा काम आणि उष्णता यांच्यामधील प्रमाण नेहमीं सारखेंच असतें. त्यानें पहिल्यानें रासायनिक किंवा विद्युत्‌शक्ति यांचा विद्युत्प्रवाही पदार्थांत उत्पन्न झालेल्या उष्णतेशीं काय संबंध आहे याविषयीं प्रयोग केले. आणि या रीतीनें १ पौंड पाण्याची उष्णता फॅरेनहीट १ अंशानें वाढविण्यास ८३८ फूटपौंड काम लागतें असें काढलें, पण त्यानंतर जास्त बरोबर अशा रीतीनें तें ७७० येऊं लागलें.

नंतर हवेच्या प्रसरणानें आणि आकुंचनानें होणाऱ्या उष्णमानांतील फरकापासून ७९८ फूटपौंड काम हें एका ब्रिटिश उष्णताप्रमाणाबरोबर आहेत. त्यांतल्या त्यांत पाणी घुसळून केलेल्या प्रयोगानें काढलेल्या उष्णतेचें यांत्रिक सममूल्य जास्त विश्वसनीय होय असें त्याचें म्हणणें होतें. वरील प्रयोगांत त्यानें पाण्याच्याऐवजीं, पारा, तेल, वगैरे अनेक पदार्थ वापरले व त्या सर्व प्रयोगांवरून ७८२ फूट पौंड काम हें उष्णतेचें यांत्रिक सममूल्य आहे असें ठरविलें. आणि शक्य तेवढ्या सावधगिरीनें होतील तेवढ्या सुधारणेनें त्यानें पुन्हां एकदां पाणी घुसळून प्रयोग केला. या वेळीं त्याचें उत्तर ७७२ फूट पौंड आलें. हें आतांपर्यंत बरोबर धरलें जात आहे.

जूलच्या या कार्याचें महत्त्व त्यानें स्थापित केलेल्या 'शक्तिनित्यत्व' सिद्धान्तावर अवलंबून आहे (विज्ञानेतिहास पृ.५३९ व पुढें). या तत्त्वाच्या सिद्धीकरितां शक्य तितके प्रयोग केले. एका विवक्षित द्रव्याच्या प्रयोगांतच त्यानें काढलेलें प्रमाण उपयोगी पडतें असें नसून तें प्रयोगांत घेतलेल्या कोणत्याहि द्रव्याच्या बाबतींत किंवा प्रयोगाच्या कोणत्याहि रीतींत खरें ठरेल हें त्यानें सिद्ध केलें.

जूलच्या एकंदर कार्यावरून उष्णता ही एक 'शक्ति' आहे व तिचीं सगळीं स्थित्यंतरें 'शक्तिनित्यत्व' या सिद्धान्तान्वयें चालत असलीं पाहिजेत असें धरण्यास हरकत नाहीं. उष्णताशास्त्रांत या सिद्धान्ताला उष्णतागतिशास्त्रांतील (थर्मोडायनॅमिक्स) आद्यसिद्धान्त म्हणावें लागेल. आणि तो म्हणजे जेव्हां जेव्हां उष्णतेचें दुसऱ्या एखाद्या शक्तींत किंवा दुसऱ्या एकाद्या शक्तीचें उष्णतेंत स्थित्यंतर होतें तेव्हां शक्तीची एकूण बेरीज केव्हांहि बदलत नाहीं; म्हणजे जितकी उष्णता खर्च होते तितकीच दुसरी शक्ति उत्पन्न होते आणि जितकी दुसरी शक्ति खर्च होते तितकीच उष्णता उत्पन्न होते.

उष्णतेच्या एका भागाबरोबर (म्हणजे एक भाग उष्णता उत्पन्न करण्यास) जितके भाग यांत्रिक काम लागेल. त्यास उष्णतेचें यांत्रिकसममूल्य म्हणतात. व हें मुख्यतः जूलनें शोधून काढल्यामुळें त्यास 'जूल' हेंहि नांव देतात. त्याचें प्रमाण येणें प्रमाणेः—

७७७ फूट पौंड (४५ अक्षांशावर) = उष्णता मूलमान. (१ पौंड पाण्याची फॅरेनहीटच्या एक अंश वाढलेली उष्णता.) १३९९ फूट पौंड = १पौंड पाण्याची शतभाग मापकाच्या एक अंशानें वाढलेली उष्णता. ४२६. ३ कि. ग्रॅ. मि. = १ कि. कॅलरी (१ कि. ग्रॅ. पाणी शतभाग मापकाचा एक अंश). ४२६.३ ग्रॅ. मि. = कॅलरी (१ ग्रॅ. पाणी शतभाग मापकाचा एक अंश चढणें). ४.१८० जूल. = कॅलरी (१ ग्रॅ. पाणी शतभाग मापकाचा एक अंश चढणें).

उष्णतेचें सममूल्य मोजण्याकरतां पाणी शतभाग २० अंश उष्णमानाचें किंवा फॅरेनहीट ६८ चें घेतात. पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाचा जोर ९८०.७ सें. मि. ग्रॅ. धरतात.

उष्णताशक्तीचा दुसरा नियम म्हणजे कार्नोचें तत्त्व होय, पण या नियमावरून कार्नोचें तत्त्व निघण्याऐवजीं या ठिकाणीं तत्त्वावरून नियम निघाला आहे. आणि या दृष्टीनें पाहिलें तर यांनां पहिला आणि दुसरा नियम अशीं नांवें देणें योग्य होणार नाहीं.

यां त्रि क श क्ती चा सि द्धां त आ णि का र्नो चें त त्त्व यां ची सं ग ति—होल्टझमन् नांवाच्या शास्त्रज्ञानें यावेळीं उष्णताशास्त्रावर एक निबंध लिहिला; त्यांत तो म्हणतो कीं, लाप्लास आणि पॉइसन यांचा सिद्धान्त, वायूंच्या बाबतींत जमत नाहीं, आणि क्लॅपेरानचा सिद्धान्त कदाचित बरोबर असेल तरी त्यांत एक अनिश्चित असा सारणीचा भाग ठेविला आहे (कार्नोचा फ' ट व क्लॅपेरानचा के)

त्यानें सारणीच्या भागाची $\frac{\text{यांत्रिक सममूल्य ज्}}{\text{उष्णतामान उ}}$ = अशी किंमत काढिली. त्यावेळीं गृहीत धरलेल्या विशिष्ट मानाच्या अंतरावरून ( .०७८ वरून ) त्यानें ३७४ कि. ग्रॅ. मि. काम म्हणजे १ कि. कॅलरी उष्णता असें काढलें. त्यानें 'उष्णावरोधक प्रसरणा' विषयीं सारणी शोधून काढिली; पण त्याचा समज 'वायुरूप पदार्थाचें प्रसरण होत असतां जी उष्णता घेतली जाते ती त्यांतच रहाते, म्हणजे प्रसरणानें तितकें काम होतें त्याची सममूल्य उष्णता वायूंतच रहाते,' ह्याच मूलारंभीं चुकल्यामुळें त्याची ती सारणीहि चुकली.

हेल्महोल्ट्झ नांवाच्या शास्त्रज्ञानें क्लॅपेरानच्या सारणीपेक्षां होल्टझमनचें तत्व जूलच्या प्रयोगाचा आधार असल्यामुळें जास्त मान्य केलें, पण त्याच्याहि मूलारंभांत होल्टझमनची शक्तिनित्यत्वतत्वच गृहीत धरण्यांत कशी चूक झाली हें लक्षांत आलें नाहीं.

जूलनें प्रयोगानें वायुप्रसरणानें केलेलें काम त्याच्या कमी झालेल्या उष्णतेच्या समतुल्य असतें हें दाखविलें (१८४५). आणि या प्रयोगाच्या आधारें त्याला 'सेगविन' नांवाच्या शास्त्रज्ञाचाहि पक्ष खरा वाटला, पण हें जर खरें धरून चाललें, तर क्लॅपरानचें सूत्र जमत नाहीं हें त्यास कळलें पण 'कार्नोचें तत्व जर यांत्रिक शक्तीच्या तत्वाला लावावयाचें असेल तर त्यातील अस्पष्ट फ' ट या सूत्रभागाची किंमत जू÷उ धरली पाहिजे अशा तऱ्हेचें एक पत्र त्यानें लार्ड केलविनला १८४८ त लिहिलें होतें.

लार्ड केल्व्हिनला (१८४९) क्लॅपेरानची यादी व जूलचे प्रयोग यांत कितपत विसंगतता आहे हें साधारण समजलें; पण त्याला त्यांतून मार्ग सापडेना, नंतर त्यानें कार्नोचें तत्व कांहींसें गृहीत धरून व रेमाल्टनें काढलेल्या वाफेचा दाब व तिची एकंदर उष्णता यांच्या प्रमाणावरून त्यानें कार्नोच्या सारणीच्या किंमतीचें एक कोष्टक तयार केलें. व या पद्धतींत ज्या मानानें रेमाल्टनें दिलेलीं प्रमाणें बरोबर होतीं त्यां मानानें त्याचींहि उत्तरें बरोबर आलीं. याप्रमाणें आलेल्या किंमती कार्नो आणि क्लॅपेरान यांनीं दिलेल्या किंमतीशीं बहुतांशीं बरोबर जुळूं लागल्यावर त्यानें असें दाखाविलें कीं, ह्या सारणीची किंमत जूलनें दाखविल्याप्रमाणेंच उष्णतामानाच्या वाढीबरोबरच त्याच्या व्यस्त प्रमाणांत कमी होते.

क्ला शि अ स व रॅं की न चीं का र्यें.—या दोघांनीं यांत्रिक सिद्धांतानुरोधानें उष्णताशक्तीच्या सारणींत सुधारणा केली. कार्नोच्या तत्वाप्रमाणें एखाद्या द्रव्याला कामाकरितां जर कांहीं उष्णता दिली, तर त्यांत अंतर्भूत राहाणारी उष्णता नेहमीं सारखीच असते, पण त्यांच्या बाह्य कामाची उष्णता मात्र कामाप्रमाणें खर्च होईल. त्याचप्रमाणें एखाद्या द्रव्यानें कामाकरतां घेतलेली उष्णता त्याच्या कामाच्या रूपांत बहुतेक परत मिळते, पण ती तितकीच मिळते असें मात्र नाहीं. त्यांत फरक हा असतोच. या तत्त्वावरून क्लासिअसनें संपृक्त वाफेची विशिष्ट उष्णता ऋण आहे असें ठरविलें. हें तत्त्व बाकीच्या वायूंना लाविलें तर त्यांच्या समोष्णिक (आयसोथर्मल) प्रसरणांत त्यांनीं घेतलेली उष्णता त्यांनीं केलेल्या बाह्य कामा इतकी असते हेंहि त्यानें जूलच्या व्यतिरिक्त शोधून काढलें; पण तें पूर्ण सिद्ध केलें नाहीं. यावरूनच नंतर त्यानें कार्नोनें काढलेल्या तत्वाचा पुनः शोध लाविला व वायूची विशिष्ट उष्णता त्याच्या घनतेवर अवलंबून नाहीं हे दाखविलें.

'उष्ण भागातून थंड भागांत उष्णतेचें स्थित्यंतर होत असतांना, कोणत्याहि तऱ्हेनें उष्णतेचें नुकसान न होतां ती त्या प्रमाणांत काम देते.' या शब्दांत त्यानें कार्नोचें तत्त्व मांडलें. कामाची सिद्धता आणि उष्णतेचें ग्रहण यांच्या समीकरणावरून त्यानें कार्नोच्या फलाची (फ' ट) किंमत जू÷उ काढली. कार्नोच्या मूळ कामासंबंधीं त्याला विशेष माहिती नव्हती; पण क्लॅपेरानने दिलेल्या त्याच्या कामाच्या वर्णनाची निर्जीवता त्यानें ओळखली व नंतर स्वतः यांत्रिक सिद्धांतांच्या अनुरोधानें व उष्णता आपण होऊन थंड भागापासून उष्ण भागाकडे जाणार नाहीं हें गृहीत धरून त्यानें एक सिद्धता दिली, तरी पण हें कार्नोच्या सिद्धतेपेक्षां जास्त खात्रीलायक असें झालेच नाहीं; पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, कार्नोच्या फळाची किंमत ज÷उ धरून क्लासिअसनें नियमित उष्णताक्षेत्रात त्या फळाची किंमत दिली नाहीं.

रॅंकीननें आपल्या अण्वीयआवर्तसिद्धातप्रगतींत ( डेव्हलमेंट ऑफ दि थिअरी ऑफ मॉलिक्युलर व्हर्टायसिस ) यांत्रिक सिद्धाताचा आधार घेतला; पण त्याचे ते लेख फार उशीरा प्रसिद्ध झाले. जूलच्या यांत्रिकसममूल्याचा आधार घेऊन स्थिर दाबाच्या वेळीं हवेची विशिष्ट उष्णता. २४०४ आहे असें दाखविलें. उ, उ० हें नियमित कार्यक्षेत्र घेऊन कोणतेहि द्रव्यवापरल्यास परम कार्यक्षमता उ,–उ०+उ,–क या सूत्रानें काढता येईल, हें रॅंकीननें सिद्ध केलें. ( येथें क हा एक स्थिरांक आहे. )

प्रो फे स र टॉ म स न ( लार्ड केलविन ) चें म तः— याच्या मतें क्लासिअसनें काढलेली कार्नोच्या फलाची(फ' ट) किंमत = जू÷उ आहे; पण ती त्यानें कोणत्याहि तऱ्हेचे प्रयोग न करतां केवळ जूलच्या यांत्रिक सममूल्याचा आधार घेऊन सिद्ध केली आहे, तेव्हां ती कदाचित् कोणत्याहि उष्णतामानाच्या वेळीं खरी ठरेल असें मानतां येत नाहीं. एवढ्या अटीवर जू÷उ ही किंमत धरून ( उ,–उ ) शतभाग किंवा केवळ उ–उ०उष्णतामापक अंश या नियमित क्षेत्रांत कार्यक्षमता मोजण्याकरितां एक सूत्रें सिद्ध केलें तें अस-

$$\frac{\text{का}}{\text{उ}} = \frac{\text{उ}_1 - \text{उ}_0}{\text{उ}_1 + २७३} = \frac{\text{उ}.१ - \text{उ}_0}{\text{उ}^1}$$

(का = झालेलें काम; उ = दिलेली उष्णता उ, = अखेरचें उष्णमान; २७३° = केवल उष्णमानमापकयंत्रावरील अंश; उं० = आरंभींचें उष्णमान; $\text{उ}_1$ = केवल उष्णमान.

केवल उष्णमानमापक (आबसोल्यूटस्केल ऑफ टेंपरेचर)—ज्याअर्थी कार्नोचें फल उष्णमानावर अवलंबून आहे व त्याचा द्रव्याच्या गुणधर्मांशीं कांहींएक संबंध नाहीं, त्याअर्थी यावरून ज्यांत पदार्थाच्या गुणधर्माप्रमाणें फरक होणार नाहीं अशा तऱ्हेचें एखादें उष्णमानमापक तयार करतां येईल, असें लॉर्ड केलव्हिन यास वाटलें. त्याची अशा तऱ्हेची सूचना होती कीं, ज्यायोगानें कार्नोच्या फलाची किंमत सारखी राहील अशा तऱ्हेचाच एक अंश धरावा. या तऱ्हेनें केलेल्या उष्णमानमापकाच्या प्रमाणांत आणि हवेच्या व पाण्याच्या उष्णमानमापकाच्या प्रमाणांत अतिशय फरक पडूं लागला. त्यानंतर वायूच्या उष्णमानमापकाच्या केवल शून्यांशापासून जर उष्णता मोजली तर कार्नोचें फल त्याच्या व्युत्क्रमप्रमाणांत असतें व 'थ व थ' या दोन मर्यादेंत जर कार्नोचें यंत्र काम करीत असलें तर त्याची कार्यक्षमता थ,–थ÷थ या पदसंघातानें दाखवितां येईल. यानंतर केवलांश थ व वायू उष्णतांश ट यांचा कसा मेळ बसतो हेंच दाखवावयाचें राहिलें. त्याकरितां त्यानें सरंध्रबुचाचा प्रयोग (पोरसप्लग एक्स्पेरिमेंट) केला व हवेचें उष्णमानमापक व केवळ उष्णमानमापक यांत थोडा फरक पडतो; पण तो विचारांत घेण्याइतका पडत नाहीं, पण हायड्रोजनचा जर उष्णमानमापक केला तर तोहि पडत नाहीं व तो केवल उष्णमानमापकाशीं तंतोतंत जुळतो व म्हणूनच हायड्रोजनचा उष्णमानमापक प्रमाण मानला जात आहे.

ज्वलन उष्णतेची उपयुक्तता.—१° उष्णमानांतर (१००°नंतर) = १.१३ कि. ग्रॅ. मीटर्स काम हें प्रमाण घेऊन कार्नोनें १६०° अंशांवर उष्णता घेऊन ४०° वर उष्णता सोडणाऱ्या एका यंत्राचें काम १३४ कि. ग्रॅ. मि.कि. कॅलरी असें काढलें; पण जास्त बरोबर काढलें तर तें ११८ येतें म्हणजे १ कि. कॅलरीचा जो यांत्रिक सममूल्य ४२६त्याला जवळ जवळ शेंकडा २८ येतें. कार्नोनें नंतर सर्व उष्णमानांतर जर उपयुक्त होऊं लागलें तर ३.९ दशलक्ष कि. ग्रॅ. मी. कि. कॅ. कामाला एक कि. ग्रॅ. कोळसा लागेल असें काढलें; पण त्या वेळच्या अपूर्ण प्रमाणानें पाहूं गेलें असतां तें पुष्कळसें बरोबर आहे असेंच म्हणावयास पाहिजे. पूर्णयंत्रांत सुद्धां ज्वलन उष्णतेचा कार्नोनें काढला इतका भाग मिळत नाहीं. स्थिर दाब ठेवून जर कोळसे हवेंत जाळले तर २३००° शतभाग उष्णमान उत्पन्न होतें व यावरून ४०° अंशी यंत्राचें हें थंड उष्णमान धरलें तर ज्वलन उष्णता शेंकडा ८९ उपयुक्त होईल, पण तापक जर सारखी उष्णता घेऊं लागला. तर २३००° ज्वलन उष्णता उत्पन्न होणार नाहीं. तापक 'क' उष्णता घेतो असें धरून चाललें व 'का' ही ज्वलन उष्णता आहे आणि 'म' ही शीतकाची उष्णता आहे तर (का÷म) इतकी ज्वलन उष्णता पुरवठ्याला मिळते; पण त्यापैकीं उपयुक्त फक्त (का–क)÷(का–म) इतकीचा जास्त मिळते आणि (का०–म)÷(का–म) इतकी फुकट जाते. तापकाला पुरविलेल्या उष्णतेपैकीं (क–म)÷क इतकी फार तर कामीं येईल.

आतां वरील प्रमाणावरून का–म = २३००° घेतलें आणि म = ३१३° केवलांश घेतले, तर क = २०३° केवल किंवा ६३० शतभाग उष्णमान होईल. कारण क = $\sqrt{\text{काम}}$ (भूमितीश्रेढीनें) यावरून तापकास मिळालेली. उष्णता ज्वलन उष्णतेच्या शेंकडा ७४·४व या यांपैकीं शें ६५·३ कामाला मिळते व म्हणून एकंदर ज्वलन उष्णतेपैकीं शेंकडा ४९ च फक्त कामीं येते. ८९ मिळत नाहीं. आतां तापक जर पूर्वीप्रमाणें १६० अंशावर ठेविला तर शेंकडा २६·३२इतकीच उष्णता उपयोगी येईल व म्हणून उष्णताप्रमाण कितीहि वाढविलें तरी त्याच प्रमाणांत उष्णतेची उपयुक्तता वाढत नाहीं. ही फुकट जाणारी उष्णता जर यापुढें ओळीनें आणखी कार्यकारी द्रव लाविलें तर त्यांनां उष्ण करण्यांत उपयोगी पडेल असें कार्नोनें काढिलें. ज्या यंत्राचा तापक ३००° अंशांवर आहे व ज्यावर १२६० पौंड दर चौरस इंचावर दाब आहे. अशा तापकामुळें शेंकडा ४० उष्णता उपयुक्त होते. फुकट जाणाऱ्या उष्णतेस उपयुक्त करण्याकरितां कार्नोच्या वेळेपासून जास्त उष्ण करणें, पुनःप्रसरण करणें, वगैरे निरनिराळ्या युक्त्या करतात. आधुनिक उत्तम वाफेच्या यंत्रांत ज्वलन उष्णतेपैकीं फक्त शेंकडा २० च उपयुक्त होते. तेव्हां ह्या सिद्धांतीय शेंकडा ४० प्रमाणाचा बराच भाग उपयोगांत येतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. आरंभींचा १२६० पौंड दाब–पूर्ण प्रसरण–आणि वाफेचें पूर्ण बाष्पीभवन न करणारें यंत्र. या गोष्टीवरील शेंकडा २० ज्वलन उष्णता उपयुक्त करण्यास जरूर आहे.

अंतर्ज्वलनाचे फायदे—निराळा तापक वापरला असतां उष्णतेपैकीं शेंकडा ५० ज्वलन आधींच बाद होतें म्हणून कार्नोनें उष्णतायंत्रांत कार्यकारी द्रव म्हणून वातावरणांतील हवा वापरावी असें सुचविलें. कारण अंतर्ज्वलनाच्या योगानें त्यास प्रत्यक्ष उष्णता लावितां येते. प्रसरणक्षेत्र असल्याशिवाय अंतर्ज्वलन–उष्णता ग्रहण करण्यास द्रवास अडचण पडते. सिद्धांताच्या दृष्टीनें एरीसन आणि स्टर्लींग यांचें यंत्र जरी पूर्ण असलें तरी तें फारच अवजड म्हणून निरुपयोगी ठरलें. उपयुक्त यंत्रांत स्थिर दाब ठेवून स्फोटक द्रव्यांच्या ज्वलनानें उष्णता उत्पन्न करतात. या तत्त्वावर एम. एम. नीप नांवाच्या शास्त्रज्ञानें एक यंत्र काढलें. तें हवा व शेवाळचूर्ण (लायको पोडियम पावडर) यांच्या मिश्रणानें चालत असे.

लेनायर ( १८६० ), ओटो आणि लॅन्जेन यांचीं यंत्रें याच पद्धतीवर चालत होतीं. मात्र त्यांत शेवालचूर्णा ( लायको पोडियम )ऐवजीं दिव्याचा वायू ( इल्युमिनेटिंग गॅस ) वापरीत असत. यांत बहुतेक आकार स्थिर ठेवून ज्वलन करीत असत व परम कार्यक्षमता $(१-लाग_{इ}र) \div (र-१)$ १ या सूत्रानें मिळत असे. (लाग = घातांक गणीत; र = आरंभींचें उष्णमान व शेवटचें उष्णमान यांची सरासरी)आतां ज्वलनानें २३००° अंश उष्णता वाढली व शेवटीं ०° अगर २७३° केवल उष्णता झाली, असें धरलें तर शेंकडा ७३·३ कार्यक्षमता येते; पण ही कार्यक्षमता येण्याकरितां वायू आरंभींच्या २७० पट प्रसरण पावावा लागतो. वायूचें अपूर्ण प्रसरण व त्वरित थंडपणा यामुळें कांहीं यंत्रांची कार्यक्षमता शेंकडा ५ वर येते.

हें पाहिल्यावर यंत्र जास्त कार्यक्षम बनविण्याकरिता शेवालचूर्ण व हवा यांचें मिश्रण ज्वलनापूर्वी जास्त दाबांत ठेविलें पाहिजे असें त्यास वाटलें आणि त्यापासून तीन फायदे दृश्य झाले. (१) यामुळें प्रसरणाला जास्त अवकाश मिळतो. ( २ ) कार्यक्षम दाब सर्वसाधारण वाढतो व त्यामुळें यांत्रिक कार्यक्षमता व शक्ति वाढते. ( ३ ) ज्वलनारंभाच्या वेळीं होत असलेलें उष्णतेचें नुकसान कमी होतें. ज्वलनापूर्वी वायू त्याच्या आकाराच्या १/५ पेक्षां जास्त दाबला जात नाहीं. आधुनिक यंत्रांत आकुंचन कार्नोच्या तत्त्वावरच ठेविलें आहे. पण कार्यक्षमता जितकी आकारमानावर तितकी उष्णतामानादर अवलंबून नाहीं. रोकास आणि ओटो ( १८७६ ) यांच्या चक्रांत उष्णताग्रहण व विसर्जन स्थिर उष्णमानाऐवजीं स्थिर आकारमानाच्या वेळीं ठेविलें आहे. प्रसरणाच्या व आकुंचनाच्या उष्णमानाच्या मर्यादेवर कार्यक्षमता अवलंबून असते. ती काढण्याचें सूत्र का—क÷का हें होय. ( का= परम उष्णमान; क=प्रसरणानंतर असलेलें उष्णमान ). ज्वलनाची प्रत्यक्ष पैदास, वापरलेल्या जळणावर अवलंबून असते; आणि हवेव्यतिरिक्त त्याचे गुणधर्म असतात; पण कार्यक्षमता मात्र आकुंचनाप्रमाणें हवेसारखीच बदलत असते. याच कारणामुळें आकुंचनांच्या प्रमाणांतील फरक मोजण्यास हवा समप्रमाण मानावी असें १९०५ सालीं सिव्हिल एंजिनियर संस्थेच्या कमेटीनें ठरविलें, आणि सापेक्ष कार्यक्षमता म्हणजे हवेच्या तितक्याच दाबाच्या यंत्राच्या कार्यक्षमतेशीं त्या यंत्राच्या कार्यक्षमतेचें प्रमाण होय.

वि श्ले ष णा चे प रि णा म व वि शि ष्ट उ ष्ण ते ची वा ढ—उष्णतेचें आणखी एक महत्त्वाचें कार्य म्हणजे तिच्या योगानें पदार्थांच्या संघटित परमाणूंचें (डिसोसिएशन) विश्लेषण होतें. परमाणूंचें संघटन होत असतांना जर उष्णतेची जरूर लागत असेल, तर विश्लेषणाच्या वेळीं उष्णता बाहेर पडत असते. उष्णमान जसजसें वाढत जातें तसतशी बाष्पीभवनाची अनुद्भूत उष्णता ( लेटंट हीट ऑफ व्हेपरायझेशन) कमी होते आणि विश्लेषित झालेल्या बाष्पपरमाणूंचा दाब वाढत जातो. त्याचप्रमाणें संघटित परमाणूंच्या बाबींतहि, संयोगाची उष्णता ( हीट ऑफ कोंबिनेशन ) कमी होऊन विश्लेषणजन्य द्रव्यामुळें दाब वाढत जातो. संयुक्त कर्बद्विप्राणिद ( कांपाउंड कार्बोनडायॉक्साइड ) यास उष्णता लाविली असतां त्याचें कर्बएकप्राणिद ( कार्बन मोनाक्साइड ) व प्राण (ऑक्सिजन )असें विश्लेषण होतें, व उष्णमान जसजसें वाढवावें तसतसें हें विश्लेषण वाढत जातें. हें दृश्य, व द्रवाचें बाष्पीभवन यांत बराचसा सारखेपणा आढळून येतो. विश्लेषणासंबंधीचे नियम उष्णतागतिशास्त्राच्या नियमांहून भिन्न नाहींत; परंतु निरनिराळ्या तऱ्हेचे परमाणू आणि सध्यां कांहीं बाबतींत अतिशय उष्णता दिल्याशिवाय विश्लेषण ओळखतां येणाऱ्या अडचणी यांमुळें त्यांचा संबंध लावणें जास्त कठिण झालें आहे. उष्णमानांत दिसणाऱ्या दोषांचा हिशेब लावण्यास ज्वलनोत्पन्न( ज्वलनानें उत्पन्न झालेल्या ) द्रव्यांची विशिष्ट उष्णता वाढत्या उष्णमानाबरोबर वाढते असें समजलें पाहिजे. कर्बद्विप्राणिद, हवा व वाफ यांची सामान्य उष्णमानाच्या वेळीं हीच स्थिति असते. विशिष्ट उष्णतेची वाढ ही विश्लेषणाच्या जोडीचीच आवश्यक गोष्ट आहे.

क्लार्क, चॅटेलियर यांच्या संशोधनाप्रमाणें वाफेच्या यंत्रांत ज्वलनोत्पादित द्रव्याची विशिष्ट उष्णता .२४ ऐवजीं सुमारें ·३४ किंवा ·३३ धरावी ( त्यांचें काम १०००° ते १७००° उष्णमान-मर्यादित चाललें असेल तर )आणि विशिष्ट उष्णतेचें प्रमाण १·४१ ऐवजी १·२९ धरावें यामुळें ज्वलन उष्णतेची उपयुक्तता कमी होते. कारण या योगानें ज्वलनापासून उत्पन्न होणारें प्रत्यक्ष उष्णमान शेंकडा ३० किंवा ४० नें कमी होतें, आणि यामुळें वर दिलेलें सूत्र बरोबर लागू पडत नाहीं. कारण विशिष्ट उष्णतेचें प्रमाण, आणि प्रसरण आकुंचन यावेळीं सारखें राहूं शकत नाहीं. पण ज्याअर्थी काम बहुतेक प्रसरणावर अवलंबून असतें त्याअर्थी वरील सूत्रानें येणारी कार्यक्षमता अगदीं बरोबर नसली तरी जवळ जवळ बरोबर असते.

जर आकुंचनाचें गुणोत्तर ५ घेतलें व विशिष्ट उष्णता १.४१ ऐवजीं १·२९ घेतली तर कार्यक्षमता शेंकडा ४८ ऐवजीं ३८ येऊं लागते. आकुंचनाचें गुणोत्तर जर ५ धरलें तर चांगल्या मोठ्या वायूच्या ( वायुनें चालणाऱ्या ) यंत्रांत शक्य असलेल्या पैकीं निदान शेंकडा ३४ पर्यंत कार्यक्षमता मिळते आणि यावरून ज्या ज्या मार्गांनीं उष्णतेचा विनाश होण्याचा संभव आहे, ते मार्ग पूर्ण तऱ्हेनें कसे सुधारले आहेत हें दिसतें.

वाफेच्या यंत्रांत उष्णमानाचा जितका पल्ला असतो तितका वायूच्या यंत्रांत नसतो म्हणून तें त्यापेक्षां सापेक्षतेनें कमी कार्यक्षम आहे असें म्हणतात, आणि म्हणून त्यांत पुष्कळ सुधारणा होण्यास पाहिजे अशी चुकीची समजूत झाली आहे. पण आकाराच्या मर्यादेकडे जर पाहिलें तर

तें अशक्य आहे असें दिसून येईल, कारण कार्नोच्या परम कार्यक्षमतातत्त्वाप्रमाणें जर क॑ अंशापर्यंत प्रसरण होऊं दिलें आणि आ (मूळ आकार) पर्यंत आकार कमी होत असतांना क॑ उष्णता ठेविली तर शेंकडा कार्यक्षमतेचें प्रमाण ८० वर जाईल. पण याला प्रसरणाकरितां मूळ आकाराच्या ५०० पट आकाराची जागा लागेल. मूळ आकारापेक्षां जर प्रसरण जास्त होऊं दिलें तर थोडासा फायदा होईल पण तसें केलें असतांहि श्रमाच्या मानानें फायदा जास्त झाला नाहीं असें म्हणावें लागतें.

यापेक्षां जास्त व्यवहार्य पद्धत 'डीसेल' यानें काढली. ती ही कीं, आकुंचनाच्या शेवटीं द्रव जळणाचा (लिक्विड फ्युएल) अशा तऱ्हेनें पुरवठा करावा कीं, त्याच ज्वलन स्थिरदाबानें होईल. आकुंचनाचें गुणोत्तर १४ घेतलें तर कार्यक्षमता ४० येऊं शकते. पण यामुळें गतिस्तंभकाची ( ब्रेक ) कार्यक्षमता शेंकडा ३१ वर आली.

जरी कार्नोच्या तत्त्वावरून एखाद्या यंत्राची शक्य ती यांत्रिक शक्ती मोजतां येईल व दिसणारे उष्णताविनाशाचे मार्ग कमी करतां येतील तरी प्रत्यक्ष कृतींत जे उष्णता विनाशाचे मार्ग दिसून येत नाहींत त्यांची सुद्धां काळजी घ्यावी लागते. काल्पनिक महत्तम कार्यक्षमता मिळविण्याकरितां वाटेल तेवढा वेळ खर्च झाला तरी पण व्यवहार्य अडचणीकडे पाहिलें तर तें अशक्य आहे हें दिसून येतें. जळणाची काटकसर ही एक उष्णतायंत्रांत गोष्ट आहे. तरी पण सुरक्षितता, यंत्रास शक्य तितकी कमी जागा लागणें, यंत्र जास्त दिवस टिकणें, इत्यादि गोष्टींकडे पाहिलें तर ती दुसऱ्या प्रतीचीच होईल असें कार्नोचें मत आहे.

**उष्णतेचें स्थलांतर.**–स्थलांतराच्या पद्धती.–उष्णतेच्या स्थलांतराच्या तीन मुख्य पद्धति आहे ( १ ) प्रापणधर्म, ( कन्व्हेक्शन) (२) वहनधर्म ( कंडक्शन) व(३) विसर्जनधर्म ( रेडिएशन )

( १ ) प्रापणधर्मः—यांत उष्णता उष्ण झालेल्या द्रव्याच्या परमाणूंच्या गतीनें पसरविली जातें. उदाहरणार्थ पाणी तापतांना पाण्याच्या तळाचे परमाणू ( उष्णतेजवळील परमाणू ) वर येतात व वरील थंड परमाणू खालीं जातात अशा वेळीं तें द्रव्य हलवून त्याची सर्व ठिकाणीं सारखी उष्णता करावी लागते.

( २ ) वहनधर्मः–यांत उष्ण झालेल्या द्रव्याच्या परमाणूंत कोणत्याहि तऱ्हेची दृश्य गति नसते. एका परमाणूची उष्णता त्याच्या अतिनिकट अशा शेजारच्या परमाणूंत स्पर्शाच्या योगानें जाते. उदाहरणार्थ,एखादा लोखंडाचा लांब तुकडा भट्टींत घातला असतां त्याचें भट्टीबाहेरील दुसरें टोंक हळूहळू उष्ण होतें ( उष्णतावाहन पहा. )

( ३ ) विसर्जनः—उष्ण पदार्थ भोंवतालच्या ईथरमध्यें एक प्रकारची आंदोलनगति ( मोशन ऑफ व्हायब्रेशन ) उत्पन्न करतो. ती गति चारी दिशास सारखी असते, व तिला अडथळा करून ग्रहण करणारा एखादा पदार्थ मिळालाच तर ती त्यांत उष्णतारूपानें पुन्हां प्रकट होते. अशा तऱ्हेनें किरण विसर्जनानें भोंवताली कांहीं नसलें तरी उष्णता वाहूं शकते, तशी प्रापण व वहनधर्माची गोष्ट नाहीं.

बहुतांशीं सर्व द्रव्यांच्या बाबतींत उष्णतावहनाचे हे तिन्ही मार्ग अमलांत येतात. आणि त्यामुळें त्यांचा संकलित परिणाम मोजणें कठिण होतें, कारण स्थलांतराच्या सर्व पद्धती निरनिराळ्या नियमांनीं बद्ध आहेत. विसर्जनधर्माच्या वेळीं पूर्ण निर्वात प्रदेश अथवा शून्यावकाश ( परफेक्ट व्हॅक्युअम ) मिळणें अशक्य व त्यामुळें भोंवताली असलेल्या वायूमुळें प्रापण व वहनधर्माला जागा मिळते. त्याचप्रमाणें पाण्याच्या वेळीं प्रापणधर्म मुख्यत्वेंकरून असतो, व एखादा धातूचा तुकडा घेतला तर त्यांतहि अंतःकिरणविसर्जन ( इंटर्नल रेडिएशन )शक्य असतें.

**न्यूटनचा पदार्थ थंड होण्याविषयीं नियम.**—कोणत्याहि तऱ्हेचें उष्णतेचें स्थलांतर झालें तरी त्याला उष्णमानांतलि फरक ही गोष्ट अत्यावश्य आहे म्हणजे उष्णता उष्ण पदार्थापासून थंड पदार्थाकडे जाईल. पण दोन्ही पदार्थांचें उष्णमान जर सारखें असेल तर उष्णतेचें स्थलांतर कोणत्याहि पद्धतीनें होणार नाहीं. उष्णमानमापकाच्या भांड्यांत जर एखादा पदार्थ ठेवला तर त्याच्या उष्णतेचें स्थलांतर तीनहि पद्धतींनीं होतें. प्रत्येक पद्धतीनें झालेलें उष्णतेचें स्थलांतर हें निरनिराळ्या कारणांवर अवलंबून आहे. उदाहरणार्थ—त्या पदार्थाचा व त्याचप्रमाणें त्या खोलीचा आकार, आणि जाति, ते कसें काय ठेविलें आहे, खोलीच्या भिंतीपासून त्याचें अंतर आणि माध्यम ( मीडिअम ) याचा स्वभावधर्म वगैरे. पण जर उष्णमानांतील फरक थोडा असेल तर उष्णताविसर्जनाचें प्रमाण उष्णमानाच्या फरकावर अवलंबून असतें.

जर थंड होणाऱ्या पदार्थाची विशिष्ट उष्णता स्थिर राहील तर उष्णमानाचा उतार व उष्णतेचें विसर्जन हें समप्रमाणांत ( प्रपोर्शनल ) असतात; किंवा थंड होण्याचें प्रमाण व उष्णमानांतलि फरक हे समप्रमाणांत असतात; हा न्यूटनचा नियम होय. पण हा न्यूटनचा नियम उष्णमानाच्या महदंतराला लागू होत नाहीं. किरणविसर्जन, प्रापण किंवा वहन यांचें प्रमाण उष्णमानाच्या फरकाच्या प्रमाणापेक्षां वाढत जातें. कांहीं दिवसांनीं सर जॉन हर्शल यानें उष्णमानाचा फरक आणि किरणविसर्जन हीं समप्रमाणांत आहेत असें धरून पृथ्वीच्या पृष्ठावरील सौरकिरणविसर्जन मोजून सूर्याचें उष्णमान काढण्याचा प्रयत्न केला, आणि त्यानें सूर्याचें उष्णतामान कितीं तरी लाखो अंश आहे असें ठरविलें. पण आतां जर गणित करून पाहिलें तर तें हजारों पट जास्त आहे असें दिसतें. न्यूटनच्या नियमाप्रमाणें जर अतिशय उष्णमानांतराचें विसर्जन काढलें तर उत्तर

हटकून चूक येतें, पण साधारण उष्णमानाच्या वेळीं शेंकडा दोन किंवा तीन चुकीपेक्षां जास्त चूक होत नाहीं. पण उष्णमानांतर शतभाग उष्णमापकाच्या १०° अंशापेक्षांहि कमी असेल तर शेंकडा चूक याहूनहि कमी येते.

डयू लां ग आ णि पे टि ट यां चा थं ड हो ण्या वि ष यीं चा प्र यो ग सि द्ध नि य म.—डयूलांग आणि पेटिट यांनीं ३००° अंश ( शतभाग उष्णमापक ) पासून पाण्याच्या उष्णमानमापकाचें थंड होण्याचें प्रमाण ०° व ८०° यांच्या मध्यंतरी पाहिलें. ज्या खोलींत उष्णमानमापक ठेविलें होतें तिच्याभोंवती पाण्याचें आवरण ठेविलें होतें. फक्त विसर्जनानें थंड होण्याचें प्रमाण काढण्याकरितां त्यांनीं उष्णमानमापक खोलींत ठेवून ती खोली शक्य तितकी निर्वात अथवा शून्यावकाश केली, तरी पण ती पूर्णशून्यावकाश झाली नाहीं. पण तेवढ्यावरून त्यांनीं थंड होण्याचा वेग ( वे ) काढणारें सूत्र काढलें. तें वे = अ ($न^{उ}$ $न^{उ_0}$) असें आलें. ( वे = वेग ( थंड होण्याचा ); न = एक स्थिर प्रमाण ( किंमत = १.००७५); उ = उष्णमानमापकाचें उष्णमान, $उ_0$ = खोलीचें उष्णमान ) ह्या सूत्रानें काढलेली किंमत न्यूटनच्या नियमान्वयें आलेल्या किंमतीपेक्षां पुष्कळच बरोबर असे. तरी पण शून्यावकाश केल्यानें प्रापणधर्म जरी कमी झाला असला तरी वहनधर्म कमी झाला नाहीं, कारण वहनधर्म हा हवेच्या दाबावर अवलंबून नाहीं. दाब जर अजिबात म्हणजे पुष्कळसा कमी केला तर थंड होण्याचें प्रमाणहि बरेंच कमी होतें. असें कूकनें १८८१ सालीं सिद्ध केलें. नंतर त्या खोलींत निरनिराळे वायू भरून त्या योगानें थंड होण्याच्या वेगांत जो फरक होतो तो पुढील सूत्रानें दाखविला आहेः—
संज्ञाः—वे = व दा क($उ-उ^{\circ}$)१-२३३. यांचें स्पष्टीकरणः—
वे' = वायूच्या योगानें थंड होण्याचा वेग (अर्थात विसर्जनानें ) वः स्थिरगुणक; दा = दाव –क = कोणता तरी एक घात. $उ-उ_0$ = उष्णमानांतील फरक.

प्रापणाच्या योगानें येणारें थंड होण्याचें प्रमाण विसर्जनाप्रमाणेंच वस्तूच्या पृष्ठभागावर अवलंबून नाहीं. पण त्यांत 'दा'चा घात जो क व उष्णतामानाची जी वाढ $उ-उ_0$ त्याप्रमाणें बदल होतो. हीं सूत्रें फक्त अशाच तऱ्हेच्या प्रयोगाच्या किंमती काढण्यास उपयोगीं पडतील. डिसेन वगैरे शास्त्रज्ञांनीं गुणक अ व ब हेहि उष्णमानावर व थंड होण्याच्या प्रमाणांत खोलीच्या आकारावर अवलंबून आहेत असें दाखविलें. ज्याअर्थी प्रापणप्रवाह बरेचसे खोलीच्या आकारावर अवलंबून आहेत त्याअर्थी त्यांचें विधान बरोबर दिसतें आणि म्हणून प्रापणासंबंधीं सर्वसाधारण सूत्र काढणें कठिण आहे.

पृ ष्ठ भा गा व री ल उ ष्ण ते ची वि स र्ज न श क्तिः—थंड होण्याच्या प्रमाणाबद्दल जो नियम तोच यालाहि लागू पडतो, कारण हा गुणक ( विसर्जनशक्तीचा गुणक ) म्हणजे पृष्ठभागावरील क्षेत्रफळाच्या मूलमानाला दर एक उष्णतांशाच्या वाढीला उत्सर्जन होणाऱ्या उष्णतेचें प्रमाण; आणि उष्णता उत्सर्जनांत ( विसर्जन, प्रापण, वहन या ) तिन्हीहि पद्धती येऊं शकतात या तिन्ही पद्धतींनें होणारें उत्सर्जन, उष्णमानांतराशीं समप्रमाणांत असूं शकतें. मात्र तें उष्णमानांतर थोडें असलें पाहिजे, पण तें पृष्ठभागाच्या विस्तारांशीं सम प्रमाण नसतें. विसर्जन फक्त पृष्ठभागाच्या विस्ताराशीं समप्रमाण असतें. प्रापण व वहन यांच्या योगानें उष्णतेचें उत्सर्जन होतें त्यांत पृष्ठभागाच्या आकारमानानें फरक होतो. आणि ज्या खोलींत तो ठेवला आहे ती खोली जर मोठी नसेल तर त्या खोलीचें क्षेत्रफळ व आकार यांचा त्यावर परिणाम होतो. जर एखाद्या पदार्थाचें रेषा परिमाण ( लीनिअर डायमेन्शन्स) लहान असेल तर उष्णताविसर्जन त्याच्या वहनधर्मावर अवलंबून असते. कारण एखाद्या तारेंतून विद्युत्प्रवाह सोडला असतां उष्णतेचा ऱ्हास पृष्ठभागाला प्रत्यक्ष समप्रमाण असण्याऐवजी त्यावर अवलंबून सुद्धां नसतो. वहन आणि किरणविसर्जनामुळें होणारा उष्णतेचा ऱ्हास हा पदार्थाचा व खोलीचा आकार आणि त्याभोंवती असणाऱ्या वायूची उष्णतावहनशक्ति यांची माहिती असल्यावर मोजतां येईल, पण प्रापणधर्मानें होणारा उष्णतेचा ऱ्हास मात्र प्रत्यक्ष प्रयोगानें मोजावा लागतो. हवेच्या प्रवाहानें थंड होण्याचें प्रमाण बाकी सर्व गोष्टी सारख्या असतील तर प्रवाहाच्या गतीवर अवलंबून असतें. पण प्रापण धर्माला हे नियम लागू नाहींत व त्यामुळेंच पृष्ठभाग—उत्सर्जनाचे जे आंकडे आहेत ते केवळ बरोबर नसतात; कारण किरणविसर्जन व वहन या धर्मामुळें जाणारी उष्णता कांहीं तरी नियम व सूत्रें यांनीं काढतां येते तशी प्रापणधर्माची गोष्ट नाहीं.

उ ष्ण ता व ह न.—घन पदार्थाच्या आंत उष्णतास्थलांतर कसें होतें हा एक अगदीं आरंभींच्या प्रयोगाचा प्रश्न होता. फोरियर नांवाच्या शास्त्रज्ञानें काढलेला नियम अगदीच साधा असून त्यानें तो साध्या गोष्टीवरून काढला.

व ह न श क्ती ची तु ल ना.—निरनिराळ्या पदार्थांत उष्णता वहनशक्ति निरनिराळी असते हें फार प्राचीन काळापासून माहीत आहे. एखाद्या भांड्याला दोन तीन धातूंच्या सारख्या आकाराच्या कांबी लाविल्या व त्यावर मेण लाविलें, त्यानंतर त्या भांड्यांत ऊन पाणी ओतिलें तर त्या कांबी ती उष्णता वाहून नेतील, व त्यांनीं घेतलेली उष्णता हवेंत विसर्जन होईल, व तसें होत असतांना मेण वितळेल तेव्हां, जितक्या लांबीवर मेण वितळेल, तितक्या प्रमाणांत त्या कांबीची उष्णतावहन शक्ति होय. तेव्हां उष्णमान सारख असेल तर गजांची उष्णतावहनशक्ति जितक्या लांबीपर्यंत मेण वितळलें असेल त्या

अंतराच्या वर्गाशीं प्रमाणांत असते. ( फोरिअर व डेस्प्रेट्झ १८२२).

उ ष्ण मा ना चें अ भि स र ण (डिफ्यूजन).—शेवटीं मेण किती वितळलें हें सोडून अगदीं उष्णता मिळाल्याबरोबर तिचें जें प्रसरण होतें तें त्या पदार्थाची विशिष्ट उष्णता व वहनशक्ति या दोन्हींवरहि अवलंबून असतें ( जॉन टिंडेल व डेव्ही ). विस्मथ ( एक धातू ) व लोखंड यांचे दोन त्रिकोणी तुकडे घेऊन त्यांना मेण लावून ते जर उष्ण केलेल्या पत्र्यावर ठेविले तर विस्मथवरील मेण अगोदर वितळूं लागतें, पण त्याची वहनशक्ति मात्र लोखंडापेक्षां कमी आहे. याचें कारण विस्मथची विशिष्टउष्णता लोखंडापेक्षां कमी आहे. म्हणजे त्यांच्या विशिष्ट उष्णतेचें प्रमाण ३:११ आहे. त्यांची घनता अनुक्रमें ९.८ व ७.८ आहे व म्हणून दोन्ही तुकड्यांची उष्णताधारणशक्ति अनुक्रमें.२९ व.८६ होते, व त्या तुकड्यांना जर सारख्याच प्रमाणांत उष्णता मिळेल तर विस्मथ मेण वितळण्याच्या उष्णमानाला तिप्पट लौकर जाईल. या प्रयोगावरून वहनशक्ति व विशिष्ट उष्णता यांच्या प्रमाणावर अवलंबून असलेलें, उष्णमाना भिसरणाचें प्रमाण लोखंडापेक्षां विसमथमध्यें अधिक आहे असें दिसतें, पण हें अगदीं चूक आहे; कारण लोखंडाची वहनशक्ति विसमथपेक्षां ६ पट आहे म्हणून उष्णताभिसरणाचें प्रमाण लोखंडांत विसमथपेक्षां दुप्पट होईल. उष्ण वस्तूपासून उष्णता घेण्याकरितां त्या दोन्ही वस्तूंचा सांधा बरोबर असला पाहिजे, तो नसणें हेंच वरील प्रयोग चुकण्याचें कारण आहे. कां कीं, ते जर दोन्ही एका तिसऱ्या तांब्याच्या पेटीवर घट्ट बसविले व ती पेटी तापविली, तर लोखंडावरील मेण विसमथपेक्षां दुप्पट जलद वितळतें.

मं द वा ह क द्रव आ णि वायु.—उष्णमानमापक जर कापसाच्या किंवा लोंकरीच्या कापडानें गुंडाळला तर त्यास थंड होण्यास किती वेळ लागतो हें पाहून काउंट रमफोर्डनें निरनिराळ्या पदार्थांच्या उष्णतावहनशक्तींची तुलना केली. एखाद्या पदार्थांतून उष्णता लवकर न जाण्याचें त्याच्या दृष्टीनें कारण असें होतें कीं, मंदवाहक जे असतील त्यांच्यांत हवा जास्त असते; व त्या हवेमध्यें त्या पदार्थाचा तंतुमय भाग असतो व तो भाग त्या हवेच्या प्रापणप्रवाहास ( कन्व्हेक्शन करंट ) प्रतिरोध करतो. वाळूची भुकटी मूळ वाळूच्या खड्यांपेक्षां कमी उष्णतावाहक आहे. गतिसिद्धांतावरून वायुरूप द्रव्यांची उष्णतावहनशक्ति त्यांच्या परमाणूंच्या विक्षेपणावर अवलंबून असते. मॅक्सवेलच्या मतानें तांब्यापेक्षां हवेची वहनशक्ति २० हजार पट कमी आहे; एवढेंच नव्हे तर प्रापण व किरणविसर्जनशक्ति सोडून दिली तर वायुरूप द्रव्यांना वहनशक्ति आहे कीं नाहीं हीच शंका आहे. टी. अँड्र्यू, ग्रोव्ह व मॅगनस या शास्त्रज्ञांनीं असा प्रयोग केला कीं, विद्युत्प्रवाहानें उज्जपेक्षां हवेंत तारज्यास्त तापते, पण टिंडालनें उज्जच्या परमाणूंची चंचलता ज्यास्त आहे व त्यामुळें प्रापणप्रवाह ज्यास्त जोराचे होत असतील असें त्याचें निराकरण केलें. द्रवरूप आणि वायुरूप पदार्थांत वहनधर्माऐवजीं प्रापणधर्म इतका प्रबल असतो कीं, वहनधर्मानें स्थलांतर झालेली उष्णता मोजण्याइतकी सुद्धां नसते. किरणविसर्जन आणि प्रापणधर्म यांचे परिणाम अजीबात नाहींसे करून शुद्ध वहनधर्म मोजणें अशक्य असल्यामुळें, उष्णमानाच्या वाढीबरोबर वहनशक्ति वाढते कीं कमी होते हें सांगतां येत नाहीं. द्रव पदार्थांचा चिकटपणा ( व्हिस्कॉसिटी ) उष्णता दिली असतां कमी होतो. पण वहनशक्ति तीच असते. पण वायुद्रव्यांचा चिकटपणा वाढतो व तो वहनशक्तीशीं समप्रमाण असतो.

प्रे षि त उ ष्ण ते च्या प रि मा ण मा प नां ती ल अ ड च णी—डेस्प्रेट्झ् वीडमन, या फ्रेंच शास्त्रज्ञांनीं या वरील इंगेनहौसच्या प्रयोगांत सुधारणा केली. त्यांनीं त्या धातूंच्या गजांत ठिकठिकाणीं भोकें ठेऊन तेथें लहान लहान उष्णमानमापक (थर्मामिटर) बसविले व मेण वितळवून एके ठिकाणींच मोजण्यापेक्षां निरनिराळ्या ठिकाणीं उष्णमान मोजलें. या प्रयोगानें परस्परसापेक्ष वहनशक्तीच्या किंमती आल्या पण प्रत्यक्ष उष्णता किती वाहिली हें मात्र काढतां आलें नाहीं. ही उष्णता फोर्बस ( १८५२ ) नांवाच्या शास्त्रज्ञानें, त्या एकएका गजाचें हवेंत थंड होण्याचें प्रमाण काढून मोजिली. त्यानंतर पुढें क्लेमंटनें ३ मि. मि. जाडीचा एक तांब्याचा पत्रा घेऊन त्याच्या एका बाजूवर १००° वाफ व दुसऱ्या बाजूवर ३८° पाणी सोडलें व त्या पत्र्यांतील दोन्ही तोंडांची उष्णता अनुक्रमें वाफ व पाणी यांच्या उष्णतेइतकी असेल असें वाटून पत्र्यांतील उष्णता एका बाजूपासून दुसऱ्या बाजूपर्यंत ७२° उतरली असेल असें धरलें व त्यावरून वहनशक्ति काढली. पण हें त्याचें उत्तर २०० पटीनें चुकलें. कारण दोन्ही बाजूंतील उष्णमानाचा फरक ३६° शतभाग इतकाच असतो; आणि ७२° तील बाकी पाणी व वाफ या मंदवाहक पडद्यांतच रहातो. त्याचप्रमाणें तापकांत एकाबाजूला १५०° पाणी व दुसऱ्याबाजूला १५००° उष्णता असली तर तापकाच्या धातूंत ( पत्र्यांत ) उष्णतेचा इतका उतार असूं शकत नाहीं. तापकाचा पत्रा पाण्यापेक्षां फार तर थोडा ज्यास्त उष्ण असतो. उष्णतेच्या मार्गांत पुष्कळसा प्रतिरोध पत्र्याजवळ असलेल्या वायूच्या थराचाच होतो; कारण वहनधर्मानें उष्णतेस जावें लागतें. बनसेन दिव्यानें एखादा पदार्थ उष्ण करीत असतांना असाच वायूच्या थराचा अडथळा येतो, पण त्याच्या ऐवजीं फुंकणी वापरली तर फार उष्णता मिळते. याचेंहि कारण हेंच आहे. वायूमधून धातूकडे जातांना एकदम उष्णमानांत फरक होत नाहीं. पण धातूच्या उष्णमानापासून ज्योतीच्या उष्णमानाकडे सारखा उतार होत येतो. आतां हा

उतार दर मि. मि. १००० ° हून अधिक असूं शकेल, पण त्यांत मध्येंच खंड पडूं शकत नाहीं.

वायूच्या पडद्याचा उष्णतेच्या मार्गांत किती अडथळा होतो हें साधारण काढतां येईल. वायूची समाकार तांब्यापेक्षां वहनशक्ति १०००० पट कमी आहे, असें धरलें तर १ मि. मि. वायूचा पडदा १० मीटर तांब्याबरोबर किंवा १.२ मीटर लोखंडाबरोबर होईल. दर मि. मि. १०००° उष्णता-उतार आहे असें धरून चाललें तर हा पडदा दर सेकंदास दर चौरस मीटर १ग्रॅं. कॅ. उष्णता जाऊं देईल. अशा तऱ्हेचें १०० चौ. सेंट मीटर क्षेत्र असेल तर २०° अंशाचें एक मिटर पाणी १००° अंशावर ८०० सेकंदांत येईल. बनसेनच्या उत्तम दिव्यानें ८ पासून १० मिनिटें लागतात. तेव्हां तेथें असलेला वायूचा पडदा १ मि. मि. रुंदीचा असला पाहिजे. पण ज्योत जर फुंकणीनें फुंकली तर लवकर आधण येतें म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें वायूचा पडदा कमी रुंद होतो, व उष्णतेचा जास्त पुरवठा होतो. थोडासा प्रतिकार पाण्याच्या थराचाहि होतो, पण तो इतका होत नाहीं; कारण वाफ होत असल्यामुळें पाण्याचा पडदा तोच सतत कायम राहूं शकत नाहीं.

**वाफेच्या घनीकरणा ( कन्डेन्सेशन ) नें उष्णकरणें.**—वाफेच्या घनीकरणदाबाच्या ( कन्डेन्सेशन प्रेशर) उष्णमानापेक्षां कमी उष्णमान असलेल्या एखाद्या धातूच्या पत्र्यावर वाटेल तेवढी वाफ गोठेल. त्याच्या उलट वाफ होण्यामुळें पाण्यानें त्या पत्र्यांतून घेतलेली उष्णता मात्र त्या पत्र्याच्या पृष्ठभागावर उष्णता वाहून आणण्याच्या त्या पत्र्याच्या आंगच्या वहनशक्तीवर अवलंबून आहे असें नेहमीं म्हणतात. वाफेच्या घनीकरणानें पुरविलेली उष्णता साध्या दिव्यापासून मिळणाऱ्या उष्णतेपेक्षां जास्त आहे, पण ती अनंत असें आहे मात्र म्हणण्यास आधार नाहीं. कॅलेंडर आणि निकलसन यांनीं केलेल्या प्रयोगावरून असें दिसते कीं, बाष्पीभवनानें उष्णताकर्षण किंवा घनीकरणानें उष्णतादान हें पत्र्याच्या व संपृक्त वाफेच्या उष्णमानांतरावर अवलंबून आहे आणि व्यवहारांत जो दाबाचा ( घनीकरणदाबाचा ) पल्ला दिसतो त्यांत उष्णमानांतराशीं समप्रमाण पद असतें. हें अंतर जर २०° शतभाग असेल तर दर चौ. सें. मी. दर सेकंदाला ८ कॅलरी पुरवठा होतो. पण ही किंमत प्रयोगानें सिद्ध झालेल्या किंमतीपेक्षां जास्त आहे. कारण प्रत्यक्ष प्रयोगाच्या वेळीं वाफेंत हवा मिसळलेली असते. तिचा वाफेच्या घनीकरणाला अडथळा होतो. त्याच प्रमाणें उष्णमानांतर २०° अंश ठेवतां येत नाहीं. त्याच उष्णमानांत उष्ण हवेपेक्षां वाफेकडून उष्णतेचा हजारपटीनें जास्त पुरवठा होतो. प्रयोगांत जरी हें इतकें सिद्ध होत नसलें, तरी वाफ उत्पन्न करणें, उष्णतेची वाहतुक करणें, त्याचप्रमाणें वाफेची जंगी अनुद्भूत उष्णता आणि उष्णमान तांब्यांत ठेवण्यासारखें असल्यामुळें मोठमोठ्या कारखान्यांत वाफेनेंच उष्णता पसरवितात.

**अंडाकारस्थिति ( स्फिरॉयडल स्टेट ).**—द्रव पदार्थ एखाद्या धातूच्या पत्र्यांतून वाफ होण्याकरितां जलदीनें उष्णताग्रहण करतो, याच्या उलट म्हणजे ही अंडाकार स्थिति होय. एखाद्या तापलेल्या तव्यावर जर पाण्याचा थेंब टाकला तर तो सारखा फिरूं लागतो, व त्याची वाफ होत असते. पाणी उकळण्याचें जें उष्णमान असतें त्या उष्णमानापेक्षां या थेंबाचें उष्णमान कमी असतें. याचें कारण पाण्याच्या थेंबाचा तापलेल्या तव्याशीं प्रत्यक्ष संबंध येत नाहीं. त्यांच्यामध्यें वाफेचा लहानसा पडदा असतो, व हा पडदा उष्णतामंदवाहक असल्यामुळें पाण्याला जोराची उष्णता मिळत नाहीं. उष्णमान २००° अंश होईपर्यंत वाफेच्या योगानें थेंब तसाच झेलला जातो, पण त्यावेळीं मात्र त्याचा स्फोट होऊन त्याची एकदम वाफ होते आणि तवा जर पातळ असेल तर त्याचेंहि उष्णमान १००° वर येतें. अंडाकार स्थितींत पाण्यांत विद्युत्–वाहिनी तारेचें एक टोंक ठेविलें व दुसरें तव्याला लाविलें तर प्रवाह दिसून येत नाहीं. यावरून पाणी व तवा हे एकमेकांला लागलेले नसतात असें सिद्ध होतें.

**किरणविसर्जनाबद्दलकांहीं सिद्धांत.**—औष्णिक, प्रकाशक आणि विकारक (ॲक्टिनिक) अशा तऱ्हेचे किरण-विसर्जनाचे तीन प्रकार आहेत अशी आरंभीं कल्पना होती. पहिलें उष्णता देतें, दुसरें उजेड देतें व तिसरें रासायनिक विकार घडवून आणतें. दुसऱ्यापेक्षां तिसऱ्याचें जास्त व पहिल्याचें कमी वक्रीभवन होतें. त्रिकोणाकृति समपार्श्व अशा कांचेंतून प्रकाश नेला असतां तो भिंतीवर निरनिराळ्या रंगांत पडतो. त्यापैकीं निळा आणि जांभळा या दोन रंगांचाच परिणाम प्रकाशलेखक कांचेवर ( फोटोग्राफिक प्लेट ) होतो. त्यांत उष्णमानमापक धरलें असतां त्याची उष्णता चढत नाहीं, पण तेंच तांबड्या रंगाच्या किरणांत धरलें तर उष्णता चढूं लागते व वास्तींत जास्त उष्णता तांबड्या पट्ट्याच्या अगदीं सुरवातीला न दिसणाऱ्या अशा ठिकाणींच चढते. यावरून औष्णिक विसर्जनाच्या किरणापासून उजेड मिळत नाहीं असें ठरतें.

परंतु हल्लीं किरणविसर्जन एकाच तऱ्हेचें असून वरील तिन्ही त्याचेच निरनिराळे प्रकार आहेत व ते आंदोलन-गतींत घडणाऱ्या निरनिराळ्या फरकांवर व ज्या पदार्थांवर पडतात त्याच्या जातीवर अवलंबून आहेत असें ठरलें. ज्या वेळेला किरणविसर्जनाचें पूर्ण ग्रहण होतें त्यावेळीं उत्पन्न झालेली उष्णता किरणविसर्जनशक्तीच्याच बरोबर असते. तेथें मग रंगाचा प्रश्न येऊं शकत नाहीं. रासायनिक क्रिया मात्र आंदोलनकाल व क्रिया घडत असलेल्या वस्तूचे गुण-धर्म यांवर अवलंबून असते.

प्रकाशलेखक कांचेचां व डोळ्यांतील पडद्याची प्रकाश किरणाविषयीं एकच स्थिति आहे. एका विवक्षित आंदोलन गतीपर्यंत डोळ्यांनां किरण ओळखूं येतात. त्या मर्यादेच्या बाहेर येत नाहींत. आणि म्हणूनच कधीं कधीं कांहीं विवक्षित रंगांपुरतींच कांहीं माणसें आंधळीं असतात.

भौतिक गुणधर्मांत एखाद्या उष्ण वस्तूपासून निघणारे दृश्य व अदृश्य किरण सारखेच असतात असें धरूं. दृश्य किरणाप्रमाणेंच अदृश्य किरणहि (१) समरूपी माध्यमातून (होमोजिनिअस मीडिआ) सरळ रेषेंत जातात (२) परावर्तन व प्रसरणहि त्याच नियमानुसारें होतें. (३) मोकळ्या जागेंत त्यांची गति तीच असते. माध्यम घन असेल तर कमी होते. त्याच प्रमाणें वक्रीभवनाचेहि (रिफ्रॅक्शन) नियम तेच आहेत (४) ध्रुवीभवन (पोलरायझेशन) व द्वीवक्रीभवन (डबाल रिफ्रॅक्शन) होते. ५ संवरणात्मक संग्रहणालाहि ते पात्र आहेत. (६) अपभवन ( डिफ्रॅक्शन ) प्रतिरोध (इन्टफिअरन्स) हीं दृश्यींहि त्यांनां लागू आहेत. दृश्य किरण डोळ्याना दिसत असल्यामुळें त्याच्यांत हे गुणधर्म विशेष आहेत असें वाटतें. पण उत्तम अंशुमापकानें (रेडिओमीटर ) उत्तम दृश्य किरणाच्या दोन शतांश गति असलेल्या किरणाच्या अंगीं तेच गुणधर्म आहेत हें दाखवितां येतें. विद्युत्विसर्जनाच्या योगानें उत्पन्न झालेल्या विद्युत्चुंबक लहरींत सुद्धां हेच गुणधर्म असतात.

वि नि म य सि द्धां त.–( थिअरी ऑफ एक्सचेंजेस ) या सिद्धांताची प्रेव्होने १७९१प्रथम प्रतिज्ञा पुढें मांडली. त्याच्या मतें प्रत्येक पदार्थ थंड असो कीं, उष्ण असो तो सतत उष्णताविसर्जन करीत असतो; आणि दोन पदार्थांतील सारखें उष्णमान म्हणजे त्या दोघांचाहि किरणविसर्जनांतील सारखेपणा हा होय. हा सारखेपणा जर मोडला. तर कमी जास्त किरणविसर्जनानें तो पुन्हा बरोबर होतो. बर्फाचा ठोकळा आणि उष्णमानमापक या दोघांच्या किरणविसर्जनांत उष्णमानमापकाची उष्णता जास्त असल्याकारणानें त्यापासून विसर्जन होणारे किरण बर्फापासून विसर्जन होणाऱ्या किरणांपेक्षां जास्त होत. एखाद्या पदार्थाचें किरणविक्षेपण त्याच्या जातीवर व उष्णमानावर अवलंबून असून त्याच्या शेजारच्या पदार्थांवर अवलंबून नसतें. स्थिर उष्णमान असलेल्या खोलींत उष्णता सारखी असते हें जें प्रेव्होनें गृहीत धरलें तें कार्नोच्या तत्त्वावरून होय असें म्हणतात. ज्याअर्थी काम करण्यासाठीं उष्णमानांत फरक लागतो त्या अर्थी वरील पद्धतींत कामच अशक्य होईल. आणि उष्णतेचे स्वाभाविक फरकहि होणार नाहींत. कारण त्यामुळें बाह्य काम होईल. म्हणून अशा खोलींत उष्णतेचा सारखेपणा जरी समविनिमयानें होत असला; तरी सर्वांचाच किरण विनिमय सम असल्यामुळें एकमेकांना तो शून्य करतो, पण प्रत्यक्ष उष्णतेचें स्थलांतर होत नाहीं. एका खोलींतील सर्व पदार्थ समउष्णमानांत असतात किंवा शेवटीं होतात. पण उष्णतेचा एकापासून दुसऱ्यापर्यंत प्रवाह सुरू होण्यास त्यांच्या उष्णमानांत फरक असावा लागतो.

पू र्ण आ णि सं व र णा त्म क ( सिलेक्टिव्ह ) कि र ण वि स र्ज न; उ त्स र्ज न आ णि ग्र ह ण यां चा मे ळ:—बहुतेक सर्व किरणविसर्जन कमीजास्त प्रमाणांत संवरणात्मक आहे. लेस्ली मेलानी वगैरे शास्त्रज्ञांनीं असें दाखविलें आहे. कीं, कांच पाणी वगैरेसारखे पदार्थ जे दृश्य किरणांना पारदर्शक दिसतात तेच कमी गतीच्या–अल्पकंपनावृत्तीच्या (फ्रीक्वेन्सी) अदृश्य किरणांनां अतिशय अपारदर्शक होतात. आणि चकचकीत धातू, ज्यांच्यावरून किरणांचें पूर्ण परावर्तन होतें त्यांच्याकडून बाकीच्या त्याच उष्णमानाच्या अंधुक किंवा काळसर पदार्थांपेक्षां किरणविसर्जन मात्र फार कमी होतें. जर दोन पदार्थ निरनिराळ्या प्रमाणांत निरनिराळ्या कालमानाचें ( पीरिअड ) किरणविसर्जन करूं लागले तर समउष्णमानाच्या वेळीं त्याचें किरणविसर्जन कांटेतोल कसें होतें हें पाहणें पहिल्याप्रथम सोपें नसतें. या सर्व अडचणी बालफर स्टुअर्ट नांवाच्या शास्त्रज्ञानें कायम केलेल्या कल्पनेनें सुटतात. ती कल्पना ही कीं, सारख्या उष्णमानाच्या अभेद्य खोलींत पूर्णविसर्जनप्रवाह हा एकसारखाच असतो ही होय. यावरून असें दिसतें कीं, कोणत्याहि उष्णमानाच्या वेळीं विसर्जन आणि ग्रहणशक्ति, कोणत्याहि पदार्थाची सारखीच असते. चकचकीत आणि ज्यावरून परावर्तन होतें असा धातुचा पत्रासुद्धां कांहीं किरण ग्रहण करतो व विसर्जन करतो. आपातविसर्जना ( इन्सिडंट रेडिएशन )पैकीं कांहीं किरणांचें तो परावर्तन करतो व कांहीं ग्रहण करतो. जे ग्रहण करतो त्याच्याच इतकें तो विसर्जन करतो आणि अशा तऱ्हेनें आलेलें आणि गेलेलें हीं दोन्हींहि विसर्जनें(रेडिएशन्स) सारखींच होतात. जो पदार्थ त्यावर आलेलें सर्व विसर्जन ग्रहण करतो. तो पूर्ण विसर्जक ( परफेक्ट रेडिएटर ) किंवा कल्पनातीत काळा पदार्थ होय. अशा पदार्थांपासून होणारें विसर्जन त्याच उष्णमानाच्या समोष्णखोलींतील विसर्जनप्रवाहाबरोबर असतें. परंतु याचप्रमाणें किंवा जवळजवळ इतकेंच विसर्जन एखाद्या आंतून काळ्या केलेल्या भांड्याला एक बारीक भोंक पाडलें तर मिळूं शकतें. प्लॅटिनम धातूची पातळ नळी घेऊन ती जर विद्युत्प्रवाहानें उष्ण केली तर तशाच तऱ्हेच्या काळ्या नळीपेक्षां ती जास्त चमकते. पण त्या चकचकीत नळीच्या बाजूंत जर एक भोंक पाडलें तर त्या भोंकांतून येणारा उजेड काळ्या नळीपेक्षांहि जास्त असतो, जणूं काय नळीचा आंतील भाग बाहेरील भागापेक्षां फार उष्ण आहे. जर छिद्र लहान असेल तर त्यांतून होणारें विसर्जन पूर्ण काळ्या पदार्थाच्या विसर्जनाइतकें असतें. जरी तेथें छिद्र नसतें तरी आंतील विसर्जनप्रवाह दुसऱ्या त्याच उष्णमानाच्या काळ्या पदार्थाइतका असतो. मग परावर्तनशक्ति कितीहि चांगली असली किंवा विसर्जनशक्ति कितीहि

कमी असली तरी त्यानें कमी होत नाहीं. कारण विसर्जनशक्तींतील कमीपणा अंतःपरावर्तनानें भरून निघतो.

विसर्जन आणि ग्रहणासंबंधीं बालफर स्टुअर्टनें पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत. तो म्हणतो रंगीत कांचेचे तुकडे जर निखाऱ्यांत टाकले व तुकड्याचें उष्णमान निखाऱ्याइतकें चढलें तर त्यांचा रंग नाहींसा झाल्यासारखा दिसतो. कारण त्यावेळीं त्या तुकड्यानें ज्या रंगाचे किरण ग्रहण केले असतात, त्या रंगाचें तो विसर्जनहि करूं लागतो. विछिन्नकिरण पृथक्करण ( स्पेक्ट्रम अनॅलिसिस ) या शास्त्राचा पाया म्हणजे प्रदीप्त वायूंच्या बाबतींत होणारें प्रकाशलहरींचें ग्रहण व विसर्जन यांचा सारखेपणा होय. फ्रॅन होपरनें मेणबत्तीच्या उजेडाचा विच्छिन्नकिरणपट घेऊन त्यांतील दोन चमकणाऱ्या पिवळया रेघा सूर्यविच्छिन्नकिरणांतील 'डी' रेघेशीं जमतात असें पाहिलें. विजेच्या कमानी दिव्यांत ( आर्कलँप ) त्याच रेघा जास्त चकचकीत दिसतात. किर्चोफ नांवाचा शास्त्रज्ञ सूर्याच्या विछिन्नकिरणपटांतील काळया रेघांसंबंधीं विवेचन करीत असतां म्हणतो कीं, ज्यावेळीं सूर्य भोंवतालच्या किरण ग्रहण करणाऱ्या वायूंच्यापेक्षां उष्ण असतो त्यावेळीं या रेघा व्यस्त दिसतात.

संवरणात्मक विसर्जन कसल्याहि प्रकारचें असलें तरी तें त्या किरणाचें पूर्ण काळया पदार्थांतून जितकें विसर्जन होईल त्याच्या कोणत्या तरी अपूर्णांकापेक्षां जास्त असूं शकणार नाहीं.तो अपूर्णांक म्हणजे त्या पदार्थाची विसर्जनशक्ति होय. आणि तिची किंमत एकापेक्षां केव्हांहि अधिक येत नाहीं. जो ग्रहणाचा अपूर्णांक तोच विसर्जनाचा होय, कारण ग्रहण आणि विसर्जन सारखें असतें.

उ ष्ण ता वा ह क श क्ति—मेलॉनीं, टिंडाल, मॅगनस, वगैरे शास्त्रज्ञांनीं पारदर्शक पदार्थांची उष्णतावाहकशक्ति सिद्ध करण्याकरितां बरींचशीं प्रयोगसिद्ध प्रमाणें जमा केलीं होतीं. उष्णतेचा सांठा व सूक्ष्मउष्णमानमापक यांच्यामध्यें ज्या पदार्थांची उष्णतावाहकशक्ति मोजावयाची आहे तो ठेवीत असत, पण या पद्धतीनें येणाऱ्या किंमती परिमाणदर्शक येण्याच्या ऐवजीं गुणदर्शक अशाच येऊं लागल्या. निरनिराळया प्रयोगांत जे कांहीं चमत्कारिक फरक येऊं लागले त्यांपैकीं कांहीं संवरणात्मक विसर्जनामुळें असावेत अशीहि कल्पना आली. या संशोधनाचा सर्वसाधारण उपयोग असा कीं, पाणी, तुरटी, कांच यांसारखे कमी उष्णमान असतांना अविसर्जक असणारे पदार्थ, उष्णमान वाढूं लागलें असतां यांची विसर्जकशक्ति जास्त प्रमाणांत वाढूं लागते, हें त्यांच्या स्वभावधर्मास-दृश्य किरणास पारदर्शक असणें-धरूनच आहे. मूळ उष्णतेपैकीं जी उष्णता विसर्जन केली जाते तिचें प्रमाण केवळ त्या पदार्थाच्या उष्णमानावर अवलंबून नसून त्यापासून निघणाऱ्या किरणांवरहि अवलंबून असतें. उदाहरणार्थ—एखाद्या दिव्यापुढें कांच धरली तर ती कांच पुष्कळ विसर्जितकिरण अडवूं शकते. पण त्याच दिव्यांत जर एखादी प्लॅटिनमची तार तापत ठेवली तर त्या तारेपासुन निघणारे किरण फारसे अडवूं शकत नाहीं. याचें कारण तारेंतून पुष्कळ दृश्य किरणविसर्जन होतें आणि ते किरण कांचेंतून पार जाऊं शकतात व अदृश्यकिरण बरेचसे ज्योतींतून निघतात ते मात्र जाऊं शकत नाहींत.

पदार्थांचें किरणविसर्जन जर गुणरूपानें मोजतां येतें, तर ते त्यांपैकीं निरनिराळया धातूंच्या पत्र्यांनीं किती वाहून नेलें हेंहि मोजतां येईल. पण पत्र्यांचा संवरणात्मक ग्रहण आणि विसर्जन धर्म अतिशय महत्त्वाचा असल्यामुळें वाहकत्व त्यांच्या जाडी वगैरेवर अवलंबून आहे कीं काय हें सांगतां येणार नाहीं. व म्हणूनच निरनिराळया पदार्थांच्या उष्णता वाहकशक्तीचा एकच स्थिरगुणक ( कॉन्स्टंट ) असूं शकत नाहीं.

यावेळीं टिंडालनें वायु आणि वाफेच्या ग्राहकशक्तीविषयीं प्रयोग केले पण प्रयोग करणें फार कठिण व दुसऱ्या शास्त्रज्ञांचीं कांहीं विसंगत उत्तरें आल्यामुळें याच्या प्रयोगावर बराच वादविवाद झाला. पण नंतर मॅगनस, लेशेर आणि पर्नटर यांनीं प्रयोग केल्यावर वाफ व वायुसंबंधीं त्याचे प्रयोग बरोबर असून हवा कोरडी असो किंवा सर्द असो तिच्यामध्यें उष्णतेचें ग्रहण विशेष दिसत नसे मात्र मिश्र वायु घेतल्यास तें चांगलेंच प्रत्ययास येतें असें सिद्ध केलें. तसेंच दाबाच्या योगानें उष्णता ग्रहणांत फरक पडत नाहीं. तें नेहमीं संवरणात्मक असतें पण मिश्रणाबरोबर तें वाढत जातें हें टिंडालचें मत ग्राह्य झालें.

त्यानंतर लँगले नांवाच्या शास्त्रज्ञानें विच्छिन्न-किरण-सूक्ष्म उष्णतामापकानें ( विच्छिन्न किरणाच्या योगानें सूक्ष्म उष्णता मोजणाऱ्या यंत्रानें ) पाहिलें असतां तांबड्या किरणांत त्याला काळे पट्टे दिसून आले. त्या पट्टयांच्या स्वरूपावरून पाण्याची वाफ उष्णताग्रहणाच्या बाबतींत वायुचक्रशास्त्रांत बराचसा भाग घेते हें दिसून आलें. पण तो भाग मात्र प्रयोगशाळेंत चार फूट लांबीच्या नळींत हवा घेऊन मोजण्याइतका मोठा नाहीं.

उ ष्ण मा न व कि र ण वि स र्ज न यां चा सं बं ध.—प्लॅटिनम १२००° उष्णता असतांना होणारें विसर्जन ५२५° वेळीं असणाऱ्या विसर्जनाच्या ११.७ पट असतें असें टिंडाल यास आढळून आलें होतें. हें उष्णमान जर केवलउष्णमान मापकावर मोजलें व त्या उष्णमानाचा जर चतुर्थघात केला तर त्याचें जें प्रमाण येईल तेंच हें होय. असें स्टीफन यास वाटलें. व थोडीशी निराळी कल्पना गृहीत धरून म्हणजे दोन पदार्थांतील किरणविसर्जन त्या दोन पदार्थांच्या केवलउष्णमानाच्या चतुर्थघाताचें जें अंतर येईल, त्या मानानें बदलतें अशी कल्पना केल्यास ड्युलांग व पेटिट यांच्या प्रयोगांशीं हें प्रमाण जवळजवळ जुळतें असें त्यांस आढळून आलें. तेव्हां वरील नियमाप्रमाणें एखाद्या काळ्या

पदार्थाचें उष्णमान क° असलें व खोलीचें उष्णमान र° असलें तर त्यांचें किरणविसर्जन ( $क^४ - र^४$ ) या प्रमाणांत असतें. हा नियम जरी साधा आणि सोईस्कर असला तरी तो भक्कम पायावर नव्हता. कारण टिंडालनें मोजलेलें उष्णमान उष्ण पदार्थांच्या रंगावरून धरलें असल्याकारणानें त्यांत साहजिकच मोठी चूक होण्याचा संभव होता. तेव्हां टिंडालचे प्रयोग या चतुर्थघाताच्या नियमाशीं जमावेत हा निव्वळ काकतालीय न्याय होय. त्याचप्रमाणें ड्रेपरनें केलेले कांहीं प्रयोग सुद्धां या नियमांत बसूं लागले, पण यांतहि उष्णमान प्रसरणगुणकावर मोजलें असल्या कारणानें, व हे गुणक बरोबर नसल्याकारणानें, त्यांच्या जमण्यांत वरील न्यायच लागू पडूं लागतो. यावरून त्यावेळच्या प्रयोगसिद्ध प्रमाणावरून स्टीफनचा नियम हें एक प्रयोगसिद्ध सूत्र आहे. पण तें अगदीं बरोबर मात्र नव्हे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

विद्युत्चुंबकीयविसर्जनाचा किरण जर एखाद्या पदार्थावर टाकला तर त्यापासून जो यांत्रिक दाब उत्पन्न होतो तो आकारमानाच्या दरएक मूलमानाच्या विसर्जनशक्तीच्या बरोबर असतो असें मॅक्सवेलनें ( १८७३ ) दाखविलें. बारलोटी नांवाच्या शास्त्रज्ञानें (१८७५) हेंच तत्त्व किरणविसर्जनाच्या उष्णतागतिशास्त्राचा पाया ठरविलें. व लेबेडयू ( १९०० ), निकोल्स व हल ( १९०१ ) यांनीं तो दाव प्रयोगांनीं सिद्ध केला. बोल्टझमननें ( १८८४ ) कार्नोच्या क्रियाचक्राला उष्णताकिरणविसर्जन हा काम करणारा पदार्थ घेऊन, कोणत्याहि उष्णमानाच्या वेळीं पूर्णविसर्जनशक्ति केवळ उष्णमानाच्या चतुर्थघाताच्या प्रमाणांत असते हें दाखविलें ( १८८४ ). हीनरीक स्नीबेलीनें या सूत्राची समाधानकारक सिद्धता दिली. शेगडीच्या भिंतींत एक बारीकसें भोक ठेवून त्यांतून त्यानें हवेच्या उष्णमानमापकाच्या फुग्याच्या किरणविसर्जनाचें निरीक्षण केलें. वरील सोईनें काळ्या पदार्थाचा फायदा मिळतो. प्लॅटिनमचें किरणविसर्जन निरनिराळ्या उष्णमानाच्यावेळीं निरनिराळ्या प्रमाणांत असल्यामुळें, बॉटमली, पाशेन वगैरेंचे प्रयोग फसले (१८९७). लुमर व प्रिंगशीम यांनीं किरणविसर्जन व उष्णमान यांचा संबंध जुळवून आणणारे बरेच प्रयोग केले. त्यांनीं एका समान उष्णमानाच्या खोलीला एक लहान भोंक ठेविलें व त्यांतून कमी जास्त उष्णमान केलें असतां किरणविसर्जन कोणत्या प्रमाणांत होतें तें पाहिलें.—१९०° ते २३००° ( शतभाग ) एवढ्या मोठ्या मर्यादेंत चतुर्थघाताचा नियम सिद्ध झाला. या नियमान्वयें विसर्जनशक्ती (' व ') ची किंमत खालील सूत्राप्रमाणें काढतां येते.

$$व = म.इ.प. ( क^४ - क_०^४ )$$ यांत म = किरणविसर्जनाचा गुणक; इ = विसर्जनशक्ति; प = पृष्ठभाग; क = पदार्थाचें उष्णमान; $क_०$ = खोलीचें उष्णमान.

१८९८ मध्यें कर्लबमनें या किरणविसर्जनगुणकाची विद्युत्पद्धतीनें किंमत काढली; म्हणजे एका विवक्षित उष्णमानाच्या वेळीं सूक्ष्म उष्णमानमापकानें एका पदार्थाचें किरणविसर्जन मोजलें. आणि नंतर तितकें उष्णमान उत्पन्न करण्याला विद्युत्शक्ति किती लागते हें काढलें. यावरून त्यानें $म = ५.३२ \times १०^{-५}$ अर्ग प्रत्येक चौ. सें. मि. ला दर सेंकड असें काढलें. ख्रिश्चनसेननें यापूर्वीच ज्याची उष्णताग्रहणशक्ति माहीत आहे अशा तांब्याच्या पत्र्याच्या थंड होण्याच्या प्रमाणावरून वरील गुणकाची किंमत काढली होती. पण ती वरीलपेक्षा शेंकडा ५ नें कमी आली. याचें कारण वरील ( ख्रिश्चनसेनची ) पद्धत खात्रीलायक नव्हती.

**चतुर्थघातनियमाची औपपत्तिक सिद्धता.**— पूर्णविसर्जन ( किरण ) व संपृक्त वाफ यांचे या बाबतींत सारखेच गुणधर्म आहेत व म्हणून कार्नो किंवा क्लॅपेरान यांनीं एकाला लावलेले नियम दुसऱ्यासहि लागू पडावेत. कोणत्याहि उष्णमानाच्या वेळीं आकाराच्या प्रत्येक मूलमानावर असणारा विसर्जनाचा दाब व शक्ति ही संपृक्त ( सॅच्युरेटेड ) वाफेच्या दावाप्रमाणेंच उष्णमानाचीं फलें होत. उष्णतेचें प्रमाण तेंच ठेवून जर खोलीचा आकार वाढवला तर उष्णमान सम करण्याकरितां भिंतीपासून किरणविसर्जन होतें. आकाराच्या वाढीच्या वेळीं जी उष्णता ग्रहण केली जाते तिची बाष्पीभवनाच्या अनुद्भूत उष्णतेशीं तुलना करतां येईल. किरणविसर्जनाच्या व त्याचप्रमाणें वाफेच्या या दोन्हीहि बाबतींत अनुद्भूत उष्णताघटनेची किंवा रचनेची अंतरुष्णता व स्थिर दाबानें झालेलें बाह्य काम मिळून असते. ज्याअर्थी आकाराच्या प्रत्येक मूलमानाला जितकी शक्ति असेल त्याच्या $\frac{१}{३}$ जर दाब असतो तर बाह्यकाम आंतील वाढत्या शक्तीच्या $\frac{१}{३}$ असलें पाहिजे. तेव्हां ग्रहण केलेली उष्णता म्हणजे या उदाहरणांत जी अनुद्भूत झाली आहे ती बाह्य कामाच्या चारपट आहे. बाह्य काम म्हणजे दाब व वाढता आकार यांचा गुणाकार. तेव्हां आकार जर एका मूलमानानें वाढेल तर अनुद्भूत उष्णता दाबाच्या चौपट असते. कार्नोच्या सूत्राप्रमाणें वाढत्या आकाराच्या प्रत्येक मूलमानाच्या संपृक्त वाफेची अनुद्भूत उष्णता ही संपृक्त वाफेचा दर वाढत्या उष्णतांशाला वाढणारा दाब व केवळ उष्णतामान याच्या गुणाकाराबरोबर असते.

सूत्रः—ल ÷ आ = ४दा य.त ल = अनुद्भूत उष्णता; आ = आकार; दा = दाब.

या सूत्रावरून उष्णमानाच्या शेंकडा एक वाढी बरोबर दाब शेंकडा चौपट वाढतो हें सिद्ध होतें. याचा अर्थ दाब उष्णमानाच्या चतुर्थघाताप्रमाणें बदलतो असा होतो.

**बीनचा स्थलांतरासंबंधीं नियमः—** चतुर्थ घाताच्या नियमानें विसर्जनपरिमाण काढतां

येतें. पण विसर्जनधर्म किंवा गुण हे सुद्धां नियमन करण्यासारखे आहेत. तेव्हां तें कसें करतां येईल हा प्रश्न राहिला ह्या प्रश्नाचे साधारणतः दोन भाग होतील. (१) उष्णमान बदललें म्हणजे लहरीची दीर्घता किंवा कल्पनावृत्ति (फ्रीक्केन्सी) ही कशी बदलतात व (२) विच्छिन्न किरणांत उष्णतेचें वर्गीकरण कोणत्या प्रमाणांत आहे. टिंडाल, ड्रेपर लँगले वगैरेंनीं संशोधनानें असें दाखविलें आहे कीं, वाढत्या उष्णमानाबरोबर प्रत्येक कल्पनावृत्तीची विसर्जनशक्ति वाढत असतांना विच्छिन्न किरणांत लघुलहरीच्या आवृत्तीची किंवा थोर उच्च कल्पनावृत्तीच्या दिशेनें महत्तमतीव्रविसर्जनाच्या तीव्रतेचा परमावधि होऊन विसर्जनाची शक्ति वाढत असतांना स्थलांतर होतें. किरणाचें पूर्ण परावर्तन होण्याच्या जागेंत उष्णतावरोधक पद्धतीनें आकुंचन करून वीननें डॉप्लरच्या तत्त्वान्वयें असें प्रतिपादिलें कीं विसर्जनाच्या प्रत्येक अवयवाची लहरीदीर्घता, आकुंचनानें उत्पन्न झालेल्या उष्णतावाढीनें लहान होत जावी; कारण लहरीदीर्घतेचा व केवळ उष्णतामानाचा गुणाकार नेहमीं एकच असावा. वरील विषयावर लिहावयाचें म्हणजे बरेंच खोलांत जावें लागेल म्हणून त्याचें विवेचन तूर्त येथें केलें नाहीं.

**उष्णताजन्य विद्युत्**—ॲलेसन्ड्रो व्होल्टा (१८०१) *याला* असें आढळलें कीं, जरी दोन धातूंच्या संयोगानें धन व ऋणविद्युत् वेगळ्या होतात, व सूक्ष्म विद्युन्मापकाच्या योगानें जरी त्याचें ज्ञान होतें तरी त्यापासून तितक्याच परिमाणाचा अस्खलित प्रवाह त्या निवळ धातूंच्या मंडलांत कांहीं द्रवाचा अंतर्भाव केल्याशिवाय मिळत नाहीं; कारण एका संयोगाच्या ठिकाणच्या विद्युचालकशक्तीशीं दुसऱ्या संयोगाच्या ठिकाणच्या तितक्याच विरुद्ध शक्तीचें समतोलन होतें. यानंतर बार्लीन येथील प्रोफेसर सीबेक यास १८२१ सालीं असें आढळून आलें कीं, दोन भिन्न भिन्न धातूंच्या कांबी घेऊन त्यांचीं टोकें धातूंच्या दोन तुकड्यांनीं जोडून एक चौरस तयार केला, व त्या चौरसाचा एक सांधा उष्ण केला तर विद्युत्प्रवाह सुरू होतो. हा विद्युत्प्रवाह उत्पन्न होण्याचें कारण त्यानें असें दिलें आहे कीं, व्होल्टानें यापूर्वीच निरनिराळ्या धातूंच्या तवकड्या एकीवर एक ठेवल्या असतां विद्युत् उत्पन्न होतें हें दाखविलें होतें व ती विद्युत् धातूंच्या उष्णमानावर अवलंबून असते असेंहि दाखविलें होतें अर्थात् एका सांध्याचें उष्णमान वाढल्यास एकाबाजूकडून दुसऱ्या बाजूकडे विद्युत्प्रवाह सुरू होतो. त्यानें ह्याचें स्पष्टीकरण असें केलें कीं, व्होल्टाची संगमविद्युचालकशक्ती ही उष्णमानाप्रमाणें बदलते व म्हणून एकच सांधा जास्त उष्ण केला म्हणजे समतोलन रहात नाहीं. दोन धातूंची विशिष्ट एक जोडी अथवा जोर घेतली असतां प्रवाहाचा प्रकर्ष (प्र)चौरसाच्या उष्ण व थंड सांध्यामधील उष्णमानांतराशीं (उ-उ,)चौरसाच्या समप्रमाणांत व त्या विद्युत्प्रवाहास होणाऱ्या मार्गांतील धातूच्या अंगांतील विरोध अथवा प्रतिबंधाशीं (प्रति) व्यस्त प्रमाणांत असतो असेंहि आढळून आलें आहे. यावरून उष्णमानांतर बेताचें असतांना ओहमचा नियम लावून या दोन उष्णमानांतरांतील विद्युचालकशक्ति (वि) स्थूलमानानें आपणांस समीकरणानें दर्शवितां येईल.

समीकरणः—वि = प्र × प्रति. = प (उ-उ, ).

सीबेकचा प्रयोग पुढीलप्रमाणें करतां येतो, एक तांब्याची कांब दोहों टोंकांकडे वांकवून एका बिस्मथ धातूच्या कांबीस डांकानें जोडावी. चौरसाच्या मध्यभागीं एक चुंबक कांटा ठेवून तो फिरता चुंबक कांटा दक्षिणोत्तर राहील असें तें यंत्र ठेवावें व नंतर जर तांबें व बिस्मथ यांचा सांधा उष्ण केला तर कांटा आपलें स्थान सोडतो. त्याचप्रमाणें तो भाग बर्फानें अगर ईथरनें थंड केला तरीहि कांटा स्थान सोडतो पण विरुद्ध दिशेनें फिरतो; तथापि दोन्ही वेळेस जास्त उष्णमानाकडून कमी उष्णमानाकडे प्रवाह वाहतो असें दिसून येईल. व त्याचप्रमाणें असेंहि दिसून येईल कीं, सांध्याच्या उष्णमानांत ज्या प्रमाणांत अंतर असेल त्या प्रमाणांत प्रवाह कमजास्त जोराचा असतो. यावरून वरील सिद्धांत सिद्ध होतो. (विज्ञानेतिहास पृ. ५३४ पहा).

अशा रीतीनें दोन भिन्न भिन्न धातूंच्या लहान लहान कांबी घेऊन त्यांचीं एका बाजूचीं टोकें डांकानें जोडलीं व दुसऱ्या टोंकास तारा जोडून त्या, विद्युन्मापकास जोडिल्या व सांधा उष्ण केला तर, विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो व विद्युन्मापकांतील कांट्याच्या स्थलांतरावरून त्याची दिशा समजते. विद्युन्मंडल पुरें केल्यानंतर थंड जोडाच्या बाजूला जर 'अ' धातूकडून 'आ' धातूकडे प्रवाह गेला तर ती धातू (अ) दुसऱ्या धातूशीं (आ) उष्णता विद्युद्दृष्टीनें धन आहे असें म्हणतात. याप्रमाणें निरनिराळ्या धातूंच्या जोडाचे प्रयोग करून आपणांस अशी एक आवलि उर्फ माला तयार करतां येईल कीं, तीमध्यें कोणत्याहि धातूच्या पुढील धातूशीं संयोगानें धनविद्युत् व मागील धातूशीं संयोगानें ऋणविद्युत् उत्पन्न होते. व्होल्टाच्या रसायनविद्युद्घटमालेहून ही माला निराळी आहे व तींत धातूचा शुद्धपणा, काठिण्य वगैरे भौतिक परिस्थितीप्रमाणें फेरबदल होतो असेंहि आढळून आलें आहे. उष्णमानाप्रमाणें ह्या क्रमांत फेरफार होतो असें जे. कमिंगला आढळलें आहे. उदाहरणार्थ नेहमींच्या उष्णमानावर तांबें हें लोखंडाशीं ऋण आहे पण ३००° अंश. किंवा यापेक्षां जास्त उष्णमानावर तें त्याशीं धन आहे. त्याचप्रमाणें ह्या जोडीची विद्युच्चालकशक्ति (वि. चा. श.) २७०° श उष्णमानापर्यंत वाढत जाते पण पुढें ती कमी कमी होत जाऊन नाहींशी होते व अखेरीस चिन्ह बदलतें. असो. रसायनजन्य विद्युच्चक्रामध्यें द्रव जें काम करतें तें ह्या प्रकारच्या विद्युन्मालेमध्यें सांध्यामुळें होतें.

एखाद धातूचें जर मंडल बनविलें असेल व त्या धातूवर जर कसलाहि ताण अगर जोर बसणार नाहीं तर उष्णमानावर

फेरबदल केल्यामुळें त्यांत प्रवाह उत्पन्न करणें शक्य नाहीं. उष्णमानांत आकस्मिक बदल करून, किंवा एकाच धातूच्या दोन निरनिराळ्या उष्णमानावरील कांबी एकमेकांवर दाबून जीं परिमाणें कित्येक वेळां दृष्टीस पडतात तीं त्यावर पडणाऱ्या ताणामुळें होत. ह्याचें एक मनोरंजक उदाहरण म्हणजे ट्राऊटन चा ( १८८६ ) प्रयोग होय. विद्युन्मापकाच्या एका मंडलांतील लोखंडी अगर पोलादी तार एका विवक्षित बिंदूजवळ आरक्तोष्ण करावी. नंतर ज्योत स्थिर असेपर्यंत कांहींहि आढळून येत नाहीं पण जर ती एका दिशेनें हलविली तर प्रवाह सुरू झाला असें दिसून येतें व ज्योतीच्या दिशेप्रमाणें त्याचीहि दिशा बदलते. याचें कारण इतकेंच कीं, आरक्तोष्ण केली असतां ती धातु जणूं काय दुसरीच बनते व त्यामुळें दोन धातूंच्या सांध्याहून ही बाब निराळी अशी रहात नाहीं. उष्णतेमुळें धातूचें रूप बदलतें हें त्यामुळें त्यांतील विद्युत अगर चुंबनसंबंधीं गुणधर्म बदलतात ह्यांवरून स्पष्ट होतें.

उष्णताजन्य प्रवाहांची विद्युच्चालकशक्ति फार थोडी असते. परंतु या प्रवाहामध्यें सातत्य फार असतें; म्हणजे या प्रवाहांच्या जोरांत फारसे फेरफार न होतां ते एकसारखे नियमित जोरानें फार वेळ वाहतात. या उष्णताविद्युन्मालेच्या समोरासमोरच्या सांध्यास वितळणारें बर्फ व कढणारें पाणी यांच्या योगानें ०° श आणि १००°श या उष्णमानावर सहज ठेवतां येतें. याच कारणाकरितां ओहम यानें आपला सिद्धांत सिद्ध करण्यासाठीं प्रयोग करण्यास याच प्रवाहांचा उपयोग केला होता. या प्रवाहांनीं साध्या रसायनजन्य विद्युन्मालेचीं सर्व जातींचीं कार्यें होतात; फक्त त्यांचें मान मात्र कमी असतें. लोखंड व जर्मनसिल्व्हर या धातूंच्या तुकड्यांच्या जोडीचीं ७६९ चक्रें घेऊन त्यांची उष्णताजन्यमाला केली व दोहोंकडील सांध्याची उष्णमानें १०°श व १५°श अशी ठेवून कोलराश्क यानें मालेच्या दोहों शेवटांत धन व ऋण विद्युत् आहेत असें सिद्ध केलें आणि असलेल्या एका चक्राची विद्युच्चालकशक्ति एका डेनियलच्या चक्राच्या $\frac{1}{5000}$ असते असेंहि त्याला आढळलें. सारांश उष्णताजन्य विद्युन्मालेनें फक्त निःशक्त रसायनकार्यें होतात. प्लाटिनम व लोखंड यांच्या तारांच्या जोडांच्या १२० चक्रांच्या मालेनें बोटो यानें पाण्याचें पृथक्करण केलें आहे.

**उष्णतामापन आणि विशिष्ट उष्णताः—** उष्णमान आणि उष्णतापरिमाण यांतील फरक वाचकांस प्रथमतः कळणार नाहीं याकरितां पुढील उदाहरण घेतलें आहे. समजा कीं, एक पौंड आणि दहा पौंड पाणी घेऊन त्यांचें उष्णमान १००°शतांशपर्यंत चढविलें; आतां एक पौंड पाण्यांत जितकी उष्णता वास करीत असेल त्याच्या दसपट उष्णता दहा पौंड वजनाच्या पाण्यांत असली पाहिजे. परंतु एक पौंड वजनाचा पारा घेऊन त्याचें उष्णमान १००° अंश केलें तर वरील एक पौंड वजनाच्या पाण्यांत जितकी उष्णता असेल तितकी उष्णता त्यांत असेलच असें आपणांस म्हणतां येणार नाहीं; म्हणजे उष्णमान एकच असतांनां दोन पदार्थांत भिन्न परिमाणांची उष्णता असूं शकेल. तसेंच भिन्न उष्णमान असतांनां दोन पदार्थांत एकाच परिणामाची उष्णता असूं शकेल. जलास्थितिशास्त्राच्या दृष्टीनें उष्णमान आणि उष्णतापरिमाण यांच्याविषयीं बोलूं लागलों तर . उष्णमानास पाण्याच्या उंचीची ( लेव्हलची ) उपमा देतां येईल आणि उष्णतापरिमाणास पाण्याच्या द्रव्यांशाची ( मास ) किंवा परिमाणाची उपमा देतां येईल. असो. उष्णतेचें मापन करण्याच्या रितीची सामान्यतः तीन तत्त्वें आहेत. ( १ ) पदार्थाचें वाढणारें उष्णमान, ( २ ) पदार्थाचें अवस्थान्तर आणि ( ३ ) पदार्थांतील शक्तीचें रूपांतर या तीन तत्त्वामुळें उष्णतामापन करण्याच्या रितीचे तीन प्रकार झाले आहेत. यांतील कांहीं पुढें दिले आहेत.

पहिल्या तत्त्वास अनुसरून ज्या रिती बसविल्या गेल्या आहेत त्यांचे दोन पोट-भेद होतात; ( १ ) मिश्रणाची पद्धत व ( २ ) पदार्थ शीत होऊं देण्याची पद्धत.

मिश्रणाची पद्धतः—या पद्धतींत अनेक पोटभेद आहेत; हे सारे प्रकार येथें देण्यास सवड नाहीं, त्यांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. रेग्नॉल्टची पद्धत प्रथमतः दिली आहे.

रेग्नॉल्टची पद्धत.— एक तांब्याचें पंचपात्र घेऊन तें दुसऱ्या एका मोठ्या पंचपात्रांत बुचासारख्या अतिमंदवाहक द्रव्याच्या तुकड्यावर मधोमध अधांतरीं ठेवावें. आंतलि पात्रांत वजन करून पाणी भरावें व रिकाम्या पात्राचें वजनहि काढून ठेवावें. नंतर आपणांस ज्या पदार्थाची विशिष्टउष्णता काढावयाची असेल तो ठराविक उष्णमानापर्यंत तापवावा. त्याकरितां एक विशिष्ट योजना केलेली असते. ती अशीः— त्याकरितां एकांत एक अशीं दोन पंचपात्रें असतात; मध्यभागाच्या पंचपात्र्याच्या पोकळीच्या जागेंत इष्टवस्तु ठेऊन देण्याची सोय केलेली असते; बाहेरील पंचपात्रांत वाफ खेळविलेली असते. या पात्रांत कांहीं काळपर्यंत तो पदार्थ राहूं दिल्यास त्या पदार्थाचें उष्णमान वाफेच्या उष्णमानाइतकें होतें. नंतर तो पदार्थ पाणी ठेवलेल्या तांब्याच्या पंचपात्रांत हळूच सोडून देतात. पदार्थ सोडून देण्यापूर्वी थंड पाण्याचें वजन घेतात; व त्याचप्रमाणें थंड पाण्याचें उष्णमान घेऊन ठेवतात. नंतर कांहीं वेळानें उष्ण पदार्थाच्या योगानें त्या पाण्याचें उष्णमान चढलेलें दिसून येतें; हें उष्णमान किती अंशानें चढलें आहे हें काढतात. वाफेच्या उष्णमानापासून त्या पदार्थाचें उष्णमान कांहीं अंशानें खालीं उतरलें व त्यामुळें जी उष्णता पाण्यांत गेली तिच्या योगानें पाण्याचें उष्णमान कांहीं अंशानें वाढलें. अर्थात पाण्याची वाढलेली उष्णता पदार्थाच्या कमी झालेल्या उष्णतेइतकी आहे हें उघड आहे. या तत्त्वाच्या अनुरोधानें गणित करून त्या पदार्थाची विशिष्टउष्णता काढतां येते हें कसें तें एक उदाहरण घेऊन

सांगतों. एका दगडाचा तुकडा ११. ५३ ग्राम वजनाचा आहे, तो वाफेनें १००° अंश इतका तापविला; व ३.२१ ग्राम वजनाच्या पाण्याचें १७° शतांश उष्णमान असतांना त्या पाण्यांत तो पाषाणखंड बुडविला; तेव्हां त्या पाण्याचें उष्णमान ३२° शतांश झालें. अर्थात ३२°–१७° = १५° शतांश इतकें उष्णमान पाण्याचें चढलें आणि १००°–३२°=६८° शतांश इतकें उष्णमान त्या पाषाणखंडाचें उतरलें. समजा कीं, 'क्ष' ही त्या पाषाणाची विशिष्ट उष्णता आहे, तेव्हां पुढील समीकरण मांडतां येतें.

मिळालेली उष्णता = गेलेली उष्णता

$$३.२१ \times १५^{\circ} = क्ष \times ११.५३ \times ६८$$

$$क्ष = \frac{३.२१ \times १५}{११.५३ \times ६८}$$

$$\therefore क्ष = .०६१४१$$

म्हणजे वरील पाषाणखंडाची विशिष्टउष्णता .०६१४१ आहे.

**पदार्थ शीत करून विशिष्ट उष्णता मापणें:—** पदार्थ शीत होऊं देण्याच्या पद्धतीचें येथें थोडें दिग्दर्शन करितों. रुप्याच्या एका पोकळ गोळ्यांत इष्टद्रव भरून त्याचें उष्णमान हवेच्या उष्णमानाहून कित्येक अंशानें चढवितात व नंतर तो गोळा सर्वत्र समानउष्णमान असलेल्या खोलींत टांगून ठेवितात व किती अंश उष्णमान उतरण्यास किती काळ लागतो हें टिपून ठेवितात. नंतर तितक्याच वजनाचें पाणी घेऊन त्याचें उष्णमान तितक्याच अंशापर्यंत चढवितात व नंतर तो गोळा त्या पाण्यानें भरून तसल्याच खोलींत टांगून ठेवितात. त्या गोळ्याचें तितकेंच उष्णमान उतरण्यास किती काळ लागला हें अवलोकन करितात. ठराविक उष्णमान उतरण्यास दोन द्रवास जो काळ लागतो तो त्यांच्या विशिष्टउष्णमानाच्या सम–प्रमाणांत असतो. मात्र याप्रमाणें विशिष्टउष्णमानाची गणना करीत असताना रुप्याच्या गोळ्याची विशिष्टउष्णता वरील गणनेंत जमेस धरावी लागते. या पद्धतीनें येणारी विशिष्टउष्णता अगदीं बरोबर अशी बहुधां असत नाहीं.

**वितळविण्याची पद्धत:—** या पद्धतींत कांहीं फायदे आहेत व कांहीं तोटे आहेत; कारण या प्रकारांत इष्टफलामध्यें विसर्जनपात्राची, विशिष्टउष्णता, इ. इ. प्रकारांबद्दल दुरुस्ती करावी लागत नाहीं. असें जरी आहे तरी या पद्धतीनें इष्टपदार्थांची विशिष्टउष्णता बिनचूक काढतां येत नाहीं. या प्रयोगांत एकांत एक अशीं खालीं निमूळतीं होणारीं तीन पात्रें असतात. बाहेरच्या दोन पात्रांत बर्फ भरलेला असतो; इष्टपदार्थ वजन करून त्याचें ठराविक अंशापर्यंत उष्णमान चढवून तो सर्वांत आंतील भांड्यांत घालून झांकण बसवितात. या उष्णतेनें मधील पात्रांतील बर्फ वितळून त्याचें पाणी होऊन तें मधल्या भांड्यास असलेल्या तोटीनें एका चवथ्या बाहेर ठेवलेल्या पात्रांत जमतें. या पाण्याच्या वजनाच्या योगानें त्या पदार्थाची विशिष्टउष्णता काढतां येते. एक पौंड वजनाच्या बर्फास वितळविण्यास सुमारें ८० अंश उष्णता लागते. पुढील उदाहरणानें वरील पद्धतीचा उत्तम खुलासा होईल. समजा कीं, कथलाचा चार शेर (म्हणजे आठ पौंड) वजनाचा पदार्थ घेऊन तो १००° अंश उष्णमानापर्यंत तापवून आंतील पात्रांत सोडला; या योगानें $\frac{६}{१०}$ पौंड वजनाचें बर्फ वितळून तें पाणी बाहेरील चवथ्या पात्रांत जमा झालें. तेव्हां ६ पौंड बर्फ वितळण्यास $८० \times .६ = ४८$ अंश उष्णता लागेल. ही उष्णता ८ पौंड वजनाचा कथलाचा तुकडा शून्य अंशापर्यंत थंड होत असतां बाहेर पडली आहे. म्हणून कथलाची विशिष्टउष्णता $४८ \div (८ \times १००) = \frac{४८}{८००} = .०६$ इतकी झाली.

**थिजविण्याची पद्धत:—** या पद्धतीचा उपयोग करून विशिष्टउष्णता काढतां येते. या पद्धतीनें अतिसूक्ष्म प्रमाणांत उत्तर मिळत नाहीं; परंतु ही पद्धत कित्येक शास्त्रीय प्रयोगांत अति उत्तम रीतीनें उपयोगी पडते.

**वायुची विशिष्ट उष्णता.—** वायुची विशिष्टउष्णता दोन प्रकारची असते. (१) दाब स्थिर असून आकारमान अस्थिर असतांना काढलेली विशिष्ट उष्णता. आणि दुसरी (२) स्थिर आकारमान असून अस्थिर दाब असतांना काढलेली विशिष्टउष्णता यांपैकीं दुसऱ्या प्रकारची विशिष्टउष्णता साध्या रीतीनें काढणें बरेंच कठिण आहे. त्याकरितां पाण्याची वाफ थिजवून त्या योगानें वायुचें विशिष्टउष्णतामान काढावें लागतें. या प्रयोगांत मंदवाहक द्रव्याची बनविलेली एक पेटी असते. तींत एका मार्गानें वाफ शिरण्याची योजना केलेली असते. एका तांब्याच्या गोळ्यांत वायु भरून तो पेटींत ठेवलेला असतो व वाफ सोडण्यापूर्वी पेटी आणि वायुयुक्त ताम्रगोलक यांचें उष्णमान घेतात; नंतर तो गोळा एका तराजूंत तोलून धरतात. व त्या पेटींत वाफ सोडतात. ती वाफ त्या थंड गोळ्यास लागून थिजूं लागते. याप्रमाणें वाफ थिजून झालेलें पाणी त्या गोळ्याच्या तळाशीं बसविलेल्या 'एका तबकडींत जमतें. पेटीच्या बाजूस वाफ लागून जें पाणी थिजतें तें गोळ्यावर पडूं नये म्हणून गोळ्याच्या वरच्या अंगास एक तबकडी बसविलेली असते. या तबकडीस भोंक पाडून त्यांतून गोळ्यास जोडलेली एक तार वर जाते; ही तार तराजूच्या पारड्यास जोडलेली असते. गोळ्याचें व त्यांतील वायुचें उष्णमान १००° अंशापर्यंत (म्हणजे वाफेच्या उष्णमानाइतकें) चढलें म्हणजे वाफ थिजून पाणी जमण्याचें थांबतें. थिजलेल्या वाफेचें वजन काढतात. वाफेच्या पाण्याच्या वजनाच्या सहायानें गणना करून गोळ्यांत भरलेल्या वायूची विशिष्टउष्णता काढतां येते. याप्रमाणें विशिष्टउष्णता काढित असतांना ताम्रगोलकाची विशिष्टउष्णता ध्यानांत घेऊन वायूची विशिष्टउष्णता काढतात.

**शक्तिरुपांतराची पद्धत:—** यांत अनेक प्रकारांचा समावेश होतो. (१) यांत्रिक पद्धत व (२) विद्युत्पद्धत या महत्त्वाच्या

दोन पद्धती आहेत. त्यापैकीं पहिलीचें प्रथम वर्णन केलें आहे.

यां त्रि क प द्ध तः—यांत्रिक पद्धत हें नांव अगदीं शास्त्रशुद्ध नाहीं; परंतु दीर्घकालपर्यंत हेंच नांव उपयोगांत आहे आणि दुसरें असें कीं, यापेक्षां जास्त चांगलें नांव देतां येण्यासारखें नाहीं म्हणून हेंच नांव वापरलें आहे. ही पद्धत प्रथमतः जूल यानें वसविली. ठराविक यांत्रिकशक्ति आणि उष्णतापरिमाण यांत कांहीं ठराविक विशिष्टसंबंध आहे व तो संबंध आपणांस कांहीं एका संख्येनें दर्शवितां येतो असें प्रथमतः जूल यानें दाखवून दिलें. जूलनें असें दाखवून दिल्याकारणानें शक्तिनित्यत्वाचा सिद्धांत शास्त्रज्ञास प्रस्थापित करितां आला. जूलनें प्रथम केलेला प्रयोग सारांशरूपानें पुढें दिला आहे.

एक तांब्याचें भांडें, घेऊन त्यांत त्यानें एक घुसळणी ठेवली. या भांड्यांत पाणी भरलें आणि नंतर कप्पीवरून दोरी आणून त्या दोरीच्या टोंकास वजन बांधलें. हें वजन गुरुत्वाकर्षणानें खालीं उतरतें व त्यायोगानें ही घुसळणी फिरते. घुसळणीबरोबर पाणी फिरूं नये म्हणून भांड्याला पडदे बसाविले होते.

घुसळणीनें पाण्यास घर्षण केलें असतां पाण्याचें उष्णमान वाढतें. यावरून किती यांत्रिकशक्ति खर्च केली असतां किती वजनाच्या पाण्याचें किती उष्णतामान वाढतें हें काढतां येतें. जूल यानें जे प्रयोग केले त्यावरून असें ठरलें कीं, ७७२·६९२ फूटपौंड इतकी गतिविशिष्टशक्ति खर्च केली असतां एक पौंड वजनाच्या पाण्याचें उष्णमान १° अंश फॉरनहीट इतकें चढतें. आतां समजा कीं, पाऱ्याची विशिष्टउष्णता काढावयाची आहे तर ठराविक वजनाचा पारा वरील भांड्यांत घालून त्यावर घुसळणीनें ठराविक गतिविशिष्टशक्ति खर्च करावी; व त्या पाऱ्याचें किती उष्णमान वाढलें हें काढावें म्हणजे त्यावरून पाऱ्याचें विशिष्टउष्णता काढतां येतें.

विद्युत्पद्धतः—पूर्वी राष्ट्रांराष्ट्रांमध्यें निरनिराळीं विद्युत्परिमाणें होतीं; परंतु आतां सर्व राष्ट्रांनीं एक ठराविक विद्युत्परिमाण मान्य केलें आहे असें म्हणण्यापेक्षां सर्व राष्ट्रांची विद्युत्परिमाणें निरपेक्ष परिमाणाच्या तुलनेंत इतक्या सूक्ष्म प्रमाणांत मापलीं गेलीं आहेत कीं, त्या योगानें एक ठराविक विद्युत्परिमाण योजलें गेल्यासारखेंच झालें आहे. कारण एका देशांतील परिमाणांचे दुसऱ्या देशांतील परिमाणांत अत्यंत सूक्ष्म प्रमाणांतसुद्धां रूपांतर करितां येतें या कारणानें कांहीं ठराविक परिमाणाच्या विद्युल्लतेचें उष्णतेंत रूपांतर करून त्यायोगानें ठराविक वजनाच्या इष्टद्रव्याचें उष्णमान किती वाढतें हें काढतात; या वाढत्या उष्णमानावरून त्या द्रव्याची विशिष्ट उष्णता ठरवितां येते असो. याशिवाय या पद्धतींत हा मोठा गुण आहे कीं, या रीतीनें प्रयोग केला असतां उत्पन्न झालेली उष्णता विद्युत्प्रवाहाच्या परिमाणावरून मापतात आणि विद्युत्प्रवाहाचें परिमापन करणें सुलभ आहे. अर्थात प्रयोग सिद्ध झाल्यावर तत्संबंधीं समीकरण मांडून गणना करणें सुलभ असतें. असो. आतां या पद्धतींत प्रयोग कसा करितात हें अगदीं थोडक्यांत पुढें दिलें आहे. या प्रयोगांत एक धातूची पेटी घेतात. पेटींत पाणी घालून तींतून तारांनीं विद्युत्प्रवाह पाठवितात. या विजेच्या तारा पेटीमध्यें उभ्या नळ्या सोडून त्यांतून घातलेल्या असतात. त्यांतून विद्युत्प्रवाह आणतात. ही मध्यपेटी दुसऱ्या एका पेटींत आधांतरीं टांगलेली असते; ही दुसरी पेटी म्हणजे स्वतःच एक मोठें उष्णमानमापक यंत्रच असतें. तिला दुहेरी भिंती असू । त्यांच्यामध्यें पारा असतो. या पाऱ्याचें प्रसरण झाल्यास तो त्या पेटीच्या एका अंगास असलेल्या सूक्ष्मनलीकेंतून जाऊन उष्णमान दर्शवितो. हें पारदउष्णमानमापक यंत्र किंवा पेटी पाण्यानें भरलेल्या दुसऱ्या एका मोठ्या पेटींत टांगलेली असते या पेटींतील पाणी एका विशिष्ट-उष्णमानावर सतत राहील अशी योजना करितात. नंतर आंतील पात्रांतील पाण्यांत बुडालेल्या तारेंतून विद्युत्प्रवाह पाठवितात. हा प्रवाह कांहीं काळ गेल्यानंतर त्या पेटींतील पाण्याची उष्णता वाढते. पाण्याची उष्णता वाढत असतांना विसर्जनानें कांहीं उष्णता बाहेर जाते; ही बाहेर जाणारी उष्णता उष्णमानमापकयंत्रात्मक पेटीवर पडते. त्यायोगानें विसर्जनानें किती उष्णता बाहेर जाते हें कळतें. आंतील पेटींतील पाणी विद्युत्प्रवाहानें तापविलें जात असतांना तें खूप ढवळावें लागतें; याप्रमाणें पाणी ढवळलेलें असतांना त्या ढवळण्याच्या क्रियेंतील गतीचें उष्णतेंत रूपान्तर होतें; ही उष्णता किती असते हें प्रयोगानें काढावें लागतें. ढवळण्यानें उत्पन्न होणारी उष्णता आणि विसर्जनानें बाहेर जाणारी उष्णता या दोन्हीं ध्यानांत घेऊन वरील प्रयोगाची गणना करून त्यायोगानें विशिष्टउष्णता काढतां येते. हा प्रयोग ग्रिफिथ यानें प्रथमतः केला म्हणून या प्रयोगास ग्रिफीथचा प्रयोग असें नांव आहे. या प्रयोगापेक्षां किंचित् निराळया प्रकारचा प्रयोग शुष्टर आणि ग्यानन या शास्त्रज्ञद्वयांनीं केला; त्यांचा प्रयोग फार सुलभ आहे; विद्युत्पद्धतीचा प्रयोग करतांना बहुधा शुष्टर आणि ग्यानन यांच्या युक्तीचा अवलंब करितात.

उ ष्ण ते चें प रि मा णः—हें काढण्याच्या तीन तऱ्हा आहेतः(१) एक परिमाण वजनाच्या ठरीव द्रव्याचें एक अंश उष्णमान वाढण्यास किती उष्णता लागतें हे काढतात आणि नंतर ती उष्णता एक परिमाणाची आहे असें ठरवितात.(२) एक परिमाणाच्या इष्ट द्रव्यास ठरीव उष्णमान आणि दाब असतांना जी उष्णता लागते ती उष्णता एक परिमाणाची मणतात किंवा ( ३ ) निरपेक्ष यांत्रिकशक्तीचें एक परिमाण घेऊन त्या शक्तीचें उष्णतेंत रूपान्तर केलें असतांना जितकी उष्णता उत्पन्न होते तितकी उष्णता एक परिमाणाची गणण्याची पद्धत असते. या तीनहि पद्धती उत्तम आहेत; परंतु

जेथें ज्या प्रकारची गरज असेल त्या प्रकारची योजना करितात. गणिताच्या दृष्टीनें विचार करून समीकरणें सोडविण्याची जेथें फार अवश्यकता असते तेथें तिसऱ्या प्रकारच्या परिमाणाचा उपयोग करून समीकरणें मांडतात. साध्या प्रयोगांत बहुत करून पहिल्या प्रकारच्या परिमाणाचा उपयोग करितात. पहिल्या प्रकारच्या परिमाणाची व्याख्या करणें अवश्य आहे. त्याकरितां पाणी हें द्रव्य घेतात, व त्याचें उष्णमान सुमारें १५° ते २०° अंशापर्यंत असावें लागतें.

वा यू ची वि शि ष्ट उ ष्ण ता;—वायूंची विशिष्ट उष्णता दोन प्रकारची असते, (१) वायूचें आकारमान स्थिर असून त्याचा दाब बदलत असतांना घेतलेली विशिष्ट उष्णता आणि (२) वायूचा दाब स्थिर असून त्याचें आकारमान बदलत असतांना घेतलेली विशिष्ट उष्णता; या दोन प्रकारच्या दोन विशिष्ट उष्णतांपैकीं पहिल्या प्रकारची विशिष्ट उष्णता कशी काढावी हें पूर्वीच सांगितलें आहे; दुसऱ्या प्रकारची विशिष्ट उष्णता काढण्याची पद्धत येथें सांगण्याची विशेष गरज नाहीं. नेहमींच्या दाबाखालीं वायु असतांनां वायूची उष्णता ग्रहण करण्याची शक्ति फार अल्प प्रमाणावर असते, या कारणानें प्रयोगानें एखाद्या वायूची विशिष्ट उष्णता मापणें फारच कठिण आहे. विशेषतः नंबर एकच्या बाबतींत ही अडचण अत्यंत विकट आहे. असो. या दोन प्रकारच्या विशिष्ट उष्णतेंत परस्पर काय संबंध असेल याविषयीं अनेक शास्त्रज्ञांनीं आपापल्या कल्पना बसविल्या होत्या. रेनॉल्ट आणि विडमन यांनीं जे प्रयोग केले आहेत त्यांवरून त्यांनीं असें दाखवून दिलें आहे कीं, कोणत्याहि द्विपरमाण्वात्मक स्थिर वायूचा एक ग्रामचा अणुभार घेतल्यास त्यात सारखीच उष्णता समावते. हेंच दुसऱ्या शब्दांत पुढील वाक्यानें सांगतां येईल. कोणत्याहि द्विपरमाण्वात्मक स्थिर वायूच्या प्रत्येक अणूंत सारखीच उष्णता समावते. गणितानें असेंहि सिद्ध झालें आहे कीं, कायम दाबाखालीं वायु असतांना वायूची जी विशिष्ट उष्णता असेल त्या विशिष्ट उष्णतेचें त्याच वायूच्या कायम आकारमानाखालीं काढलेल्या विशिष्ट उष्णतेशीं ५:३ हें प्रमाण असतें. गणितानेंही जी गणना केली आहे तीस प्रयोगानें बळकटी मिळाली आहे.

**उष्णता-रसायनशास्त्र,**— व्या ख्याः—रासायनिक क्रियेबरोबर घडून येणाऱ्या उष्णताविषयक क्रियेविषयीं विचार करणाऱ्या शास्त्रास उष्णतारसायनशास्त्र म्हणतात. ही भौतिकशक्तिशास्त्राची एक शाखा आहे.

पू र्वे ति हा स.—बंदुकीच्या दारूचा स्फोट, लांकूड वगैरेंचें दहन, अन्नपचन वगैरे अगदीं नेहमींच्या वहिवाटींतल्या रासायनिक क्रियांपासून उष्णता उत्पन्न होते, हें प्रत्येकाच्या नित्यानुभवांतलें आहे. अशाच क्रियांवरून ह्या बाबतींत जास्त शोध करण्याची बॉइल, लाव्हाझिए, लाफ्लास वगैरेंना स्फूर्ति झाली; परंतु त्यांनीं केलेले परिमाणदर्शक प्रयोग अत्यंत ढोबळ उपकरणाच्या साहाय्यानें केलेले असल्यामुळें त्यापासून कोणताहि निश्चित सिद्धांत काढणें शक्य नव्हते, तरी पण ढोबळ मानानें इतकें दिसून आलें कीं, "संयुक्त पदार्थाच्या पृथग्भवनास जेवढी उष्णता लागते तेवढीच मूल द्रव्यापासून तो बनत असतांना त्यापासून बाहेर पडते."

त्यानंतर या शास्त्राची खरी प्रगति गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत हेस्स, अँड्र्यूज, बर्थेलोट वगैरे शास्त्रज्ञांच्या परिश्रमामुळें व शक्तिनित्यत्वाच्या (१८४०) सिद्धांताच्या पक्क्या प्रस्थापनेमुळें त्याच्या आधारावर जलदीनें झाली.

हेस्स व अँड्र्यूजः—या दोघां शास्त्रज्ञांच्या प्रयत्नानें खालील सिद्धांत निष्पन्न झाले. (अ) सारख्या परिस्थितीमध्यें कोणत्याहि अम्लाशीं एखाद्या अनाम्लाचा संयोग होऊन निर्गुणीकरण होतें, तेव्हां उत्पन्न होणाऱ्या उष्णतेचें प्रमाण नेहमीं एकच कायम असतें. (आ) त्याचप्रमाणें सारख्या परिस्थितीमध्यें कोणच्याहि अनाम्लाशीं एखाद्या अम्लाचा संयोग होऊन निर्गुणीकरण झालें असतांना उत्पन्न होणाऱ्या उष्णतेचेंहि प्रमाण कायम असतें. तीव्र अम्ल, व अनाम्ल ह्यांच्या बाबतींत हे नियम तंतोतंत अनुभवास येतील.) (इ) कोणत्याहि रीतीनें अगर पायरीपायरीनें घडून आलं तरी एखाद्या विशिष्ट रासायनिक क्रियेमध्यें उद्भूत होणारे उष्णताविषयक परिणाम नेहमीं सारखेच असतात." ह्यालाच स्थिर संकलनाचा उष्णतासिद्धांत (लॉ ऑफ कॉन्स्टन्ट हीट सम्स) अशी संज्ञा आहे. शक्तिनित्यत्वसिद्धांताच्या आधारानें हा सिद्धांत तेव्हांच सिद्ध होतो; पण हेस्सनें स्वतंत्र रीतीनें प्रत्यक्ष सूक्ष्म प्रयोगावरून तो शोधून काढला व अशा तऱ्हेनें त्यास दुहेरी बळकटी आली. चौथें एक उपयोगी तत्त्व त्यांनीं काढलें तें असें. (ई) जलविद्रुत दोन निर्गुणक्षार-कोणत्याहि तऱ्हेचे बाह्य उष्णताविषयक परिणाम उत्पन्न न करतां परस्परांचीं मूलकें बदलूं शकतात. यालाच 'उष्णता निर्गुणत्वाचा' (थर्मोन्यूट्रॅलिटी) नियम अशी संज्ञा आहे.

फॅव्हे व सिल्बरमनः—या दोघांनींहि या शाखेंत पुष्कळसे उत्कृष्ट प्रयोग केले व त्या सर्वांचें फळ म्हणजे वरील सर्व सिद्धांतांचें एकीकरण करणारें खालील अनुमान त्यांच्या प्रत्ययास आलें. तें असें कीं, अम्लमूलकावर अवलंबून असणारी एक व अनाम्लमूलकावर अवलंबून असणारी एक अशा दोन स्थिर संख्यांची बेरीज केली असतां निर्गुणीकरणाचें उष्णतापरिमाण निघतें.

थॉमसेन व बर्थेलोट (१८७०-८२):—यानेंच प्रथम शक्तिनित्यत्वाच्या सिद्धातानुरोधानें ह्या शाखेंत प्रगति करण्यास सुरवात केली. मुख्यतः ह्याच्या व ह्याच्या शिष्यवर्गाच्या प्रयत्नानेंच या शाखेविषयीं सर्व कोष्टकें अगर गमकें स्थापित झालीं आहेत. थॉमसेन व बर्थेलोट या दोघांनींहि असें एक तत्त्व काढलें कीं, (हेंच बर्थेलोटचें तिसरें सूत्र किंवा आत्यंतिक कार्यसूत्र या नांवानें प्रसिद्ध आहे) प्रत्येक शुद्ध रासायनिक क्रियेबरोबर उष्णतेचेंहि उद्घाटन होतें.

बऱ्हंशीं हा नियम खरा असला तरी त्याला अपवादहि पुष्कळच आहेत म्हणूनच रसायनप्रीति व उष्णतापरिणाम ह्यांच्या परस्परसंबंधाचें मूल म्हणून ( असा या सिद्धांत्यांचा प्रथम समज होता ) याचा स्वीकार करतां येत नाहीं. कारण एका दिशेनें होत असलेल्या रासायनिक क्रियेमध्यें जर उष्णतेचें उत्पादन होत असेल तर थोडीशी परिस्थिति बदलून ती क्रिया विरुद्ध दिशेनें चालू केल्यास अलबत उष्णतेचें शोषण झालेंच पाहिजे. ( व प्रत्येक रासायनिक क्रिया परिस्थितीच्या योग्य बदलानें विरुद्ध दिशा घेऊं शकतें असें हळू हळू सिद्ध होत आहे. ) मूळ प्रस्थापकांनीं सुद्धां याचा पुढें त्याग केला असल्यामुळें त्यास आतां फक्त ऐतिहासिक महत्त्व उरलें आहे.कारण त्यामुळें या शाखेंत प्रगति होण्यास पुष्कळ वर्षें बरेंच चालन मिळालें होतें. असो.

वि वे च न, (क)शक्तिसातत्य व उष्णतारसायनः—आतां शक्तिनित्यत्व सिद्धांताच्या आधारावर या शास्त्राची उभारणी कशी होते तें आपण पाहूं. पदार्थमात्राच्या विशिष्ट भागामध्यें, विशिष्टपरिस्थितीमध्यें असणारें अंतर्गत शक्तीचें प्रमाण हें एकच व ठरीव असतें व त्या पदार्थामध्यें कितीहि भौतिक अगर रासायनिक फेरबदल झाले तरी पुनः जेव्हां तो पूर्वस्थितीप्रत येईल तेव्हां त्यामध्यें पूर्वीइतकीच अंतर्गतशक्ति असते. आतां एकाच निर्दिष्ट परिस्थितीमध्यें एका रासायनिक पदार्थीच्या क्रमाचें दुसऱ्या क्रमामध्यें स्थित्यंतर झालें असतां आपणांस सर्वसाधारणपणें असें आढळून येईल कीं, या दुसऱ्या क्रमाची अंतर्गतशक्ति पहिल्याहून भिन्न आहे. आपण क्षणभर अशी कल्पना करूं कीं—व पुष्कळ बाबींत अशीच स्थिति असते—दुसऱ्या क्रमाची अंतर्गतशक्ति पहिल्याहून कमी आहे. तर मग आतां या स्थित्यंतरामध्यें या फाजील शक्तीचें काय होणार ? अर्थात् उष्णता, प्रकाश, विद्युत, यांत्रिकशक्ति वगैरे कोणत्या तरी स्वरूपांत ती प्रगट झाली पाहिजे. आतां योग्य साधनांनीं ही सर्व शक्ति उष्णतेच्याच स्वरूपांत आणली व ती मोजतां आली म्हणजे उष्णतारसायनशास्त्र सिद्ध झालें व ही गोष्टहि सहज साध्य आहे. तेव्हां विशिष्ट परिस्थितीमध्यें ज्याअर्थी या दोन क्रमांची अंतर्गतशक्ति कायम असते व म्हणून दोन्हींतील फरकहि कायमच असतो, त्याअर्थी पहिल्या क्रमांतून दुसऱ्या क्रमामध्यें अवस्थांतर होतांना जेवढी उष्णता प्रगट होईल, तेवढीच दुसऱ्यांतून पहिल्या स्थितींत परिक्रमण झालें असतांना शोषली जाईल हें उघड आहे. त्याचप्रमाणें हें स्थित्यंतर सरळ अगर पायरीपायरीनें कसेंहि घडून आलेलें असो, त्यामुळें प्रादुर्भूत झालेले उष्णताविषयक परिणामांचें परिमाण कायमच असणार हेंहि ओघानेंच आलें. ( हेस्सचा स्थिरउष्णतासंकलनाचा सिद्धांत ) कारण तें सर्वस्वीं प्राथमिक व शेवटच्या अंतर्गतशक्तीवर अवलंबून असणार. आतां हें उघड आहे कीं, अंतर्गतशक्ति सर्वस्वीं परिस्थितीप्रमाणें बदलणारी असल्यामुळें प्रयोगानें हे सिद्धांत ताडून पहातेवेळीं ती परिस्थिति प्रयोगकालामध्यें कायम राखली पाहिजे व त्याचप्रमाणें उष्णतेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि अवस्थेमध्यें अंतर्गतशक्तीचें रूपांतर होऊं देतां कामां नये.

( ख ). अंतर्गतशक्तींत फरक करणारी परिस्थितिः— प्राथमिकक्रमामधून अंतिमक्रमामध्यें स्थित्यंतर होत असतांनां परिस्थितींत बदल उत्पन्न करणारी कारणें खालील होत.

( अ ) द्रावणाची विरलता उर्फ पातळपणा.—साधारपणें कोणताहि पदार्थ विद्रावित केला असतांना उष्णताविषयक बरेच परिणाम होतात व पाणी ज्या मानानें घालावें त्या मानानें ह्यांचेंहि प्रमाण बदलतें. तेव्हां जर आपण अविरल द्रावणें घेतलीं तरच तीं जास्त पातळ होण्याचा व त्यामुळें उष्णताविषयक फेरबदल होण्याचा संभव आहे. तेव्हां द्रावणें जर मूळचींच पातळ घेतलीं तर हा फरक गणितास बाधा न आणण्याइतका अल्प प्रमाणांत होईल, व अशा रीतीनें ह्या एका चुकीचा संभव टाळतां येतो.

( आ ) पदार्थाची भौतिकस्थितिः—परस्पर क्रिया घडत असलेल्या पदार्थांची भौतिकस्थितीहि लक्षांत घेतली पाहिजे कारण द्रवीभवन अगर बाष्पीभवनामध्यें बरीच उष्णता शोषली जाण्याचा संभव आहे. ( उ. बर्फ १४४० कॅलरी वाफ ९६७० कॅ. वाफ ).

( इ ) आकारमानांत फरक—बाह्यदाबाविरुद्ध घडणाऱ्या आकारमानांतील फरकामुळें होणाऱ्या परिमाणाची धन, द्रव, अगर द्रावित पदार्थांच्या बाबतींत उपेक्षा केली असतां चालेल, कारण हे होत असले तरी ते अत्यंत सूक्ष्म असतात. पण वायुरूप पदार्थांच्या बाबींत मात्र त्या प्रमाणें दुरुस्ती करणें भाग आहे. ( उ. जस्त व गंधकाम्ल ह्यांच्या परस्पर क्रियेमध्यें उत्पन्न झालेला वायूचा एक अणु विवक्षित दाबाखालीं व नेहमींच्या उष्णमानाच्या वेळीं ५८० कॅ. इतकें कार्य करतो. )

( ई ) अनेकरूपी (स्वरूपांतर) फरक.—कित्येक पदार्थांचें ( उ. कर्ब, स्फुर, गंधक वगैरे ) अनेक रूपांमध्यें वास्तव्य असतें ह्यापैकीं कोणत्या रूपांतील प्रयोगांत तो उपयोगिला आहे हें पाहिलें पाहिजे. कारण एकाच स्वरूपांतून दुसऱ्या स्वरूपांत जातांना बरेच उष्णताविषयक फरक घडतात. ( उ. पिवळ्या स्फुराचा तांबडा प्रकार होतांना बरीच उष्णता बाहेर पडते ).

(उ) उष्णमानांतील फेरबदलः—उष्णमानांतील फेरबदलामुळें रासायनिक क्रियेच्या उष्णताविषयक परिमाणावर बराच परिणाम घडण्याचा संभव आहे. पण प्राथमिक व अंतिम-उष्णमानें नेहमीं साधारणपणें रसायनशालेच्या उष्णमाना-इतकींच केलीं असतां ह्या बाबतींत होणारी चूक टळेल.

( ग ). मापण्याची पद्धत एकांक, संकेतलिपी वगैरेः— बहुतेक सर्व रासायनिक क्रिया द्रावणांच्या निवळ परस्पर मिश्रणामुळें घडून येत असल्यामुळें उष्णताविषयक परिमाण मापणें फार सोपें झालें आहे. मिश्रणास सोईचें असें नेह-

मींच्या पद्धतीप्रमाणें एक उष्णमानमापक यंत्र घ्यावें व त्यांत ज्याविषयीं प्रयोग करावयाचा तीं द्रावणें मिसळून उष्णताविषयक काय फेरबदल होतात ते नेहमींप्रमाणें ('उष्णतामापन' पहा) कॅलोरी ह्या मापानें मापतां येईल. कॅलोरीच्या शंभरपट अगर सहस्रपट मूलमान घेण्याविषयीं पुष्कळ चर्चा झाली आहे. पण निश्चित असें अजून कांहींच ठरलेलें नाहीं. आतां ह्यांची संकेतलिपि खालीलप्रमाणें आहे. पुष्कळशा सुधारणाअंती बर्थेलॉटची समीकरणपद्धति सध्यां अमलांत आलेली आहे. एक दोन उदाहरणें घेऊन हा विषय आपण सोपा व सुबोध करूं.

$$ग + प्र_२ = गप्र_२ + ७११०० \text{ कॅलोरी.}$$

या ठिकाणीं 'ग' म्हणजे गंधकाचा एक परमाणुभारांक व $प्र_२$ प्राणाचे दोन परमाणुभारांक दर्शवितात. ह्या दोहोंच्या संयोगानें गंधकद्विप्राणिद हा पदार्थ तयार होतो. तो तयार होतांना ७११०० कॅलोरी उष्णता बाहेर पडते. अशा रीतीनें मूळचें भारसमीकरणाचें शक्तिसमीकरण तयार झालें. यावरून असें दिसून येतें कीं, गंधक व प्राण ह्या दोन्हीची मिळून अंतर्गतशक्ति गंधकद्विप्राणिदापेक्षां ७११०० कॅलोरींनीं जास्त आहे. ही जर कमी असेल म्हणजे उष्णता जर शोषली जात असेल तर उणें चिन्हाचा उपयोग करावा लागेल जसेः—

$$उ_२ + द_२ = २उद - १२२०० \text{ कॅ.}$$

या ठिकाणीं उज्ज व अद ह्या दोन्हींची मिळून अंतर्गत शक्ति त्यापासून बनलेल्या संयुक्त पदार्थापेक्षां कमी आहे. त्याच्या पृथक्करणामध्यें अर्थात इतक्याच कॅलोरी उष्णतेचें विसर्जन होणार हेंहि समीकरणावरून स्पष्ट कळून येईल. ह्या समीकरणावरून परिस्थितीचा बोध होत नाहीं. ती दर्शविण्यास कांहीं युक्तया (जाड अक्षरांचा उपयोग इ.) निघाल्या आहेत पण तिचा शब्दांनीं स्पष्ट निर्देश करणेंच बरें.

(घ). रासायनिक उष्णता ठरविण्याची पद्धत. रचनोष्णताः—रासायनिक उष्णतेची गणना करण्यासाठीं मूलद्रव्यांपासून बनणाऱ्या संयुक्त पदार्थांची रचनोष्णता माहीत असणें अत्यंत अगत्याचें आहे. मग तो पदार्थ प्रत्यक्ष मूलद्रव्यांच्या संयोगानें बनवितां येत असो अगर नसो. अप्रत्यक्ष रीतीनें ती कशी काढतां येते हें खालील उदाहरणानें स्पष्ट होईल. प्रत्यक्ष संयोगानें सिद्ध झालेलीं खालील दोन शक्तिसमीकरणें घ्या.

$$क + २ प्र = कप्र_२ + ९४३०० \text{ कॅ.}$$

$$कप्र + प्र = कप्र_२ + ६८००० \text{ कॅ.}$$

दुसरें पहिल्यांतून वजा टाकलें असतां आपणांस काय मिळतें पहा.

$$क + प्र = कप्र + २६३०० \text{ कॅ.}$$

झालें! ह्या सोप्या गणनेनें प्रत्यक्ष संयोजित न होणाऱ्या कर्बकप्राणिदाची रचनोष्णता आपणांस काढतां आली.

आतां हें स्पष्ट आहे कीं, संयुक्त पदार्थाची रचनोष्णता म्हणजे ज्या मूलद्रव्यांपासून तो बनला त्यांच्यापेक्षा ह्यामध्यें अंतर्गतशक्ति किती जास्त अगर कमी आहे हें दर्शविणारी संख्या (उष्णतामापक मूलमानामध्यें) होय. आतां मूलद्रव्यांची केवल अंतर्गतशक्ति किती आहे हें आपणांस कळत नाहीं व गणनेमध्यें त्याचा केन्द्रांच संबंध येत नसल्यामुळें (कारण एका मूलद्रव्याचें दुसऱ्यामध्यें रूपांतर करणें अजून शक्य झालेलें नाहीं) ती शून्य असते असें गृहीत धरण्यास प्रत्यवाय नाहीं. तेव्हां वरील पहिल्या समीकरणांत जर कर्बद्विप्राणिदाची अंतर्गतशक्ति 'क्ष' धरली तर मूलद्रव्यांच्या बद्दल शून्य घालून 'क्ष' ची किंमत काय निघते पहा.

$$० + ० = क्ष + ९४३०० \text{ कॅ. (रचनोष्णता).}$$

$$क्ष = -९४३०० \text{ कॅ. (अंतर्गतशक्ति).}$$

ह्यावरून एवढें दिसतें कीं रचनोष्णतेच्या विरुद्ध चिन्हाची अंतर्गतशक्ति असते. तेव्हां संयुक्त पदार्थांची रचनोष्णता आपणांस माहीत असल्यास कोणतेंहि शक्तिसमीकरण सोडवून त्या रासायनिक क्रियेचें उष्णतापरिमाण आपणांस मोजतां येईल. खालील उदाहरण घ्याः—

$$म + खप्र = मप्र + ख.$$

आतां 'खप्र'ची रचनोष्णता १३१०००व' मप्र'१४६००० आहे म्हणून ह्या रासायनिक क्रियेमधील उष्णतापरिमाण जर 'क्ष' धरलें तर काय निघतें पहा. ०–१३१००० = १४६००० + ० + क्ष = क्ष १५००० कॅलोरी.

अशा रीतीनें बहुतेक संयुक्त पदार्थांच्या रचनोष्णता मापलेल्या असल्यामुळें कोणत्याहि रासायनिक क्रियेमुळें किती उष्णता बाहेर पडेल अगर शोषली जाईल ह्याची आपणांस अगाऊच गणना करतां येते. ज्यांची रचनोष्णता धन असते त्यांनां उष्णताविसर्जित व ज्यांची ऋण असते त्यांनां उष्णताशोषित पदार्थ अशा संज्ञा आहेत. उष्णताशोषित पदार्थ फारच थोडे आहेत, व ते बहुतेक अस्थिर असतात.

दहनोष्णताः—सर्वसाधारणपणें सेंद्रिय पदार्थांची उष्णतामापक गोळ्याच्या साहाय्यानें दहनोष्णताच मोजतात. त्यावरून रचनोष्णतेची कशी गणना करतां येतें हें एक उदाहरण घेऊनच स्पष्ट करणें बरें. मीथेन '$कउ_४$' हा पदार्थ जाळला असतां २१३८०० कॅ. उष्णता बाहेर पडते. म्हणून खालील समीकरणानें आपणांस ही क्रिया दाखवितां येईल.

$$कउ_४ + ४ प्र = कउ_२ + २ उ_२प्र + २१३८००$$

आतां कर्बद्विप्राणिदाची व पाण्याची रचनोष्णता अनुक्रमें ९४३०० व ६८३०० आहे हें आपणांस माहीत आहे. तेव्हां 'क्ष' जर 'मीथेनची' रचनोष्णता धरली तर खालीलप्रमाणें समीकरण तयार झालें.

$$क्ष + ० = ९४३०० - २ (६८३००) + २१३८००$$

$$क्ष = १७००० \text{ कॅ.}$$

निर्गुणीकरणोष्णताः—अम्लमूलकार अवलंबून असणारी एक व अनाम्लमूलकावर अवलंबून असणारी एक अशा दोन संख्यांची बेरीज केली असतां निर्गुणीकरणाचें उष्णतापरिमाण निघतें हें पूर्वी दिग्दर्शित केलेंच आहे. एवढेंच नव्हें तर असेंहि आढळून आलें आहे कीं, तीव्र एकानाम्लमूलक अम्लें जर तीव्र एकाम्लमूलक अनाम्लामुळें निर्गुण झालीं तर सर्वांच्या बाबतींत निर्गुणीकरणाची उष्णता जवळ जवळ सारखीच असते (सरासरी१३७००कॅ.). एकदां अशी कल्पना होती कीं एका विवक्षित अनाम्लाशीं मिसळून निर्गुण होतांना ज्या मानानें जें अम्ल ज्यास्त उष्णता विसर्जन करील त्या मानानें तें ज्यास्त तीव्र होय.पण पुढें पुष्कळ प्रयोगांतीं ही कल्पना खरी ठरूं शकली नाहीं.

द्रावणोष्णताः—जेव्हां पदार्थांचे पाण्याच्या संयोगानें जलद उज्जित तयार होतात तेव्हां त्यांची द्रावणोष्णता बहुधा घन असते पण जेव्हां उज्जित जलदीनें बनत नाहींत किंवा आगाऊच बनलेले असतात तेव्हां विद्रावण होतांना त्यांची द्रावणोष्णता बहुधा ऋण असते.

उष्णतावहन.—एका पदार्थांतून दुसऱ्या पदार्थांत उष्णता जाण्याचें तीन प्रकार आहेत. (१) प्रापण(कन्व्हेक्शन) (२) वहन (कण्डक्शन)व (३) विसर्जन (रेडिएशन) अथवा सरलक्षेप या तीन प्रकारांनीं उष्णतेचें स्थलान्तर होतें. प्रस्तुत उष्णतेच्या स्थलान्तराच्या दुसऱ्या प्रकाराबद्दल सामान्य माहिती द्यावयाची आहे.

उष्णतेच्या वहनांत एका अणूपासून दुसऱ्या अणूंत उष्णता जाते आणि त्या क्रियेनें उष्णता स्थलान्तर करिते. निरनिराळ्या द्रव्याच्या उष्णतावहनत्वाची तुलना करण्याच्या युक्तीची कल्पना प्रथमतः फ्रांकलीन यानें बसविली. परंतु असला प्रत्यक्ष प्रयोग इंगेनहौस यानें प्रथमतः केला. या प्रयोगाचें दिग्दर्शन उष्णता या सदरांत केलें आहे.

व्यावहारिक उपयोगः—कित्येक पदार्थांतून उष्णतेचें मंदपणें गमन होतें. व या धर्माचा उपयोग करून घेतात. लांकडाचा भुसा अत्यंत मंदवाहक आहे म्हणून बर्फ लांकडांच्या भुशांत ठेवतात. त्या योगानें बर्फ दीर्घ कालपर्यंत राहूं शकतो. लोकरीच्या या गुणधर्मामुळें लोकरीचे हिंवाळ्याकरितां कपडे करितात.

पदार्थांची उष्णता-वहन-शक्ति शास्त्रीय रीत्या कशी मोजतात हें पाहूं. समजा कीं, आपणांस तांब्याच्या गजाची उष्णता वहन-शक्ति काढावयाची आहे. तर त्या गजावर ठराविक अंतरावर भोकें पाडून त्या भोकांत उष्णमानमापक-यंत्रें ठेवितात; नंतर गजाचें एक टोंक ठराविक उष्णमानावर ठेऊन देतात व उष्णमानमापकांचें उष्णमान चढूं देतात.प्रथमतः उष्ण टोंकाच्या जवळच्या उष्णमानमापकाचा पारा चढूं लागतो;नंतर त्याच्या शेजारच्या उष्णमानमापकाचा पारा चढूं लागतो. याप्रमाणें पारदस्तंभांत होणारा फेरफार चालू राहून कांहीं वेळानें सर्व उष्णमानमापकें स्थिर-उष्णमान (कान्स्टंट टेंपरेचर) दर्शवूं लागतात, परंतु पहिल्या टोंकापासून तें दुसऱ्या टोंकापर्यंत उष्णमानमापकांतील उष्णमान उत्तरोत्तर कमी कमी असतें. अशी स्थिति असते तेव्हां उष्ण अग्राला जितकी उष्णता मिळते तितकीच उष्णता शीत अग्र आणि गजाच्या बाजू यांच्याकडून नाहींशी होते. आतां या निरनिराळ्या उष्णमानबिंदूंचा मार्ग पाहून त्याचा वक्र निश्चित करतां येतो. याप्रकारें वक्र निश्चित केल्यावर रेखागणिताच्या आधारें विचार करून शास्त्रज्ञांनीं असें ठरविलें आहे कीं,मूळ तुकड्यांतून जाणारी उष्णता (उ); ही उष्णतावहनशक्ति (य) × गजाचा छेद (छ) × वक्राची स्पर्शरेषा (स्प) (टॅंजंट ऑफ दि कर्व्ह) याप्रमाणें असते.

उ = य × छ × स्प.

वरील समीकरणाच्या योगानें गजाची उष्णता-वहन-शक्ति सहज काढतां येते. आतां उष्णतावहनाच्या दुसऱ्या पद्धतीचें अवलोकन करूं.

या प्रयोगांत एक धातूचा तुकडा घेतात. त्याच्या दोहों बाजूस बर्फ आणि वाफ रहाण्याची व्यवस्था केलेली असते. वाफ आणि बर्फ ठेवण्याचे एकांत एक असे दोन दोन कप्पे असतात. असे दोन दोन कप्पे करण्याची प्रमुख दोन कारणें आहेतः धातूच्या तुकड्यांत उष्णतेचें वहन एका विशिष्ट दिशेनें होतें. अर्थात या ठिकाणीं काढलेला उष्णतावहनाचा गुणक जसा योग्य असेल तसा त्याच पदार्थांतील दुसऱ्या ठिकाणचा असणार नाहीं हें उघड आहे. दुसरें असें कीं, वाफ आणि बर्फ यांना बाहेरील थंडी किंवा उष्णता लागून योग्य असा उष्णतेचा गुणक मिळणार नाहीं; याकरितां एकांत एक असे दोन कप्पे केले असतां फक्त बाहेरील कप्यांतील बाष्पादिकावर परिणाम घडेल, परंतु आंतील कप्प्यावर असा परिणाम घडणार नाहीं. त्यामुळें धातूच्या तुकड्याच्या विशिष्ट दोन बिंदूंच्या दरम्यान ०° ते १००° इतक्या उष्णमानाचा फरक होता असें आपणाला निश्चयपूर्वक समजतें व त्यामुळें गणना करण्यास सोपें जातें.

वरीलप्रमाणें रचना करून कांहीं वेळपर्यंत बर्फ आणि वाफ राहूं देतात. याप्रमाणें कांहीं वेळ स्थिति असल्यानें धातूच्या तुकड्यास जोडलेलीं दोन्ही उष्णमानमापकें स्थिर उष्णमान दर्शवूं लागतात. वाफेचें झालेलें पाणी आणि बर्फाचें झालेलें पाणी वजन करितात. वाफेच्या पाण्याच्या वजनाइतक्या वजनाच्या वाफेंतील उष्णता धातूच्या तुकड्याच्या मध्यभागांतील विशिष्ट क्षेत्रांत शिरली हें उघड आहे. उष्णतावहनाचा गुणक पुढील गणितमय सूत्रात्मक-संकेतानें काढतां येतो. जसें:—

$$\text{सं.} = \text{ग} \times \text{क्ष} \times (\text{उ}_1 - \text{उ}_2) \div \text{अं.}$$

या ठिकाणीं:—

सं. ची किंमत = एकंदर वाहणाऱ्या उष्णतेचें परिमाण

ग " = उष्णतावहनाचा गुणक

क्ष किंमत " = विशिष्ट प्रदेशाचें क्षेत्रफळ

उ₁, ऊ₂ } " = दोन ठिकाणचीं उष्णमानें.

अं = दोन ठिकाणच्या पृष्ठभांतील अंतर.

आतां या समीकरणाच्या योगानें उष्णता वहनाचा गुणक काढतां येतो; परंतु तो काढतां येण्यापूर्वी सं = (एकंदर वहन पावलेली उष्णता) आपणास समजली पाहिजे. ती वाफेच्या पाण्याचें वजन, पाणी जमण्यास लागणारा काल आणि वाफेचें पाण्यांत रूपान्तर होतांना उद्भूत होणारी उष्णता या वरून काढतां येतें.

**उष्णमानमापक यंत्रः**—उष्णतेनें पदार्थाचें वर्धन होतें एखाद्या लोखंडाच्या गजाला उष्णता लावली असतां त्याची लांबी वाढते. हें प्रयोगानें स्पष्ट करतां येतें.

एक धातूची कांब घेऊन तिला शेवटीं एक कांटा जोडून तो कांटा ती कांब वाढली असतां लोटला जाऊन त्याचें दुसरें टोंक एका स्केलावर फिरेल अशी योजना करावी. कांब थंड असतांना कांटा कोठें रहातो हें पाहून ठेवावें, नंतर त्या कांबीखालीं दिवा ठेऊन ती तापवावी. जसजशी कांब तापूं लागेल तसतशी कांबीची लांबी वाढूं लागेल. ही वाढती लांबी कांट्याचें टोंक स्केलवर हलल्यामुळें स्पष्टपणें दृग्गोचर होऊन दिसूं लागेल. यावरून उष्णतेनें पदार्थ वाढतात हें स्पष्ट होतें. या गुणाचा उपयोग करून उष्णमापकाची एक पद्धत उपयोगांत आली आहे. कांचेच्या एका सूक्ष्म नळीस पोकळ फुगा जोडलेला असतो. व वरच्या बाजूस नरसाळ्याप्रमाणें एक कांचेचें नरसाळें असतें.

**उष्णमानमापकांत पारा भरणें.**—वरील नरसाळ्यांत पारा भरून नंतर खालील फुगा किंचितसा उष्ण करितात, व नंतर त्या फुग्यास थंड होऊं देतात. फुगा उष्ण केल्यानें फुग्यांतील हवा बाहेर जाते व फुगा थंड झाल्यावर हवेच्या दाबानें थोडासा पारा फुग्यांत उतरतो. नंतर फुग्यांतील या थोड्याशा पाऱ्यास सडकून तापवितात; त्या योगानें पारा कढूं लागतो व पाऱ्याच्या वाफेनें नळी भरून जाते नंतर एकवार नळीस थंड होऊं देतात. यामुळें नळी आणि फुगा पाऱ्यानें भरून जातो, या खेपेस नळी पाऱ्यानें पूर्णपणें न भरल्यास फिरून एकवार नळी तापवितात व थंड करितात. याप्रमाणें नळींत पूर्णपणें पारा भरल्यानंतर फुग्यासहित नळी सडकून तापवितात. याप्रमाणें नळी तापविली असतां पारा आणि त्याची वाफ यानें सर्व जागा भरून जाते. नंतर नळीचें वरील टोंक वितळवून बंद करितात. या रीतीनें नळीचें टोंक बंद केल्यावर फुगा आणि नळीचा कांहीं भाग यांत पारा असला पाहिजे.

**उष्णमानमापकावर प्रमाण बिंदु मांडणें:**—वर दिल्याप्रमाणें उष्णमानमापक भरल्यावर उष्णमान ज्याप्रमाणें वाढेल किंवा कमी होईल त्याप्रमाणें नळींतील पारा चढेल किंवा कमी होईल. आतां उष्णमान मोजण्याकरितां नळीवर खुणा करून विभाग पाडले पाहिजेत; यांस व्यवहारांत अंश अशी संज्ञा आहे. हे अंश मांडतां येण्याकरितां नियमित व कायमची उष्णमानें दर्शविणारे दोन बिंदू ठरवावे लागतात; ते पुढील युक्तीनें ठरवितात.

एका पात्रांत बर्फाचा चुरा भरतात; आणि नंतर तो चुरा वितळवून जें पाणी तयार होऊं लागतें त्या पाण्यांत वरील उष्णमानमापक ठेवितात. थोड्याच वेळांत नळींतील पारा उतरून एका जागीं स्थिर होतो. ज्या बिंदूपाशीं पारा स्थिर होतो त्या बिंदूवर खूण करून ठेवितात. नंतर तप्त वाफेचा बिंदु निश्चित करण्यासाठीं उकळणाऱ्या पाण्याच्या वाफेंत हें उष्णमानमापक धरावें लागतें. त्याजकरितां एका पात्रांत पाणी तापवून त्याची जी वाफ होते ती त्या पात्राच्या वरच्या अंगास जोडलेल्या एका नळींत नेतात व त्या नळींतून ती वाफ नंतर बाहेरील सर्व बाजूस असलेल्या आवरणात्मक नळींत जातें व नंतर बाहेरील नळींतून ती वाफ वातावरणांत शिरते. व दुसऱ्या बाजूस एक दाब मोजणारें यंत्र लावलेलें असतें त्यामुळें वाफेचा दाब खूण करण्याच्या वेळीं किती असतो हें पहातां येतें. यामुळें मधल्या नळींतील उष्णमान वाफेच्या उष्णमानाइतकें कायम रहातें. मधल्या नळींत उष्णमानमापक यंत्र ठेवितात; उष्णमानपद्धाचा फुगा हा नेहमीं वाफेंत ठेविला पाहिजे. कारण पाणी उकळण्याचें उष्णमान पुष्कळवेळां भांड्यावर व तसेंच त्यांतील मिश्रित पदार्थावर अवलंबून असतें; परंतु वाफेचें मात्र तसें नसून नुसतें दाबावर अवलंबून असतें. व वाफेच्या योगानें पाऱ्याचा बिंदु कोठपर्यंत चढून स्थिर होतो हें काढतात. हा बिंदु निश्चित करतेवेळेस वातावरणाचा दाब मोजतात. त्यावरून वाफेचें उष्णमान अगदीं सूक्ष्म प्रमाणात काढतां येतें. याप्रमाणें शतांश उष्णमानाचा हा १०० बिंदु त्या नळीवर कोठें येईल हें निश्चित करितात व दरम्यानचें अंतर यथायोग्य प्रमाणांत विभागतात. हे अंश या नळीवर कायम टिकविण्याकरितां पुढील युक्ति योजितात. प्रथमतः त्या नळीवर मेणाचा पातळ थर देऊन त्या थरांत सुईच्या अग्रानें अंश कोरतात. नंतर त्या कांचेच्या नळीवर उज्जल्-वाम्ल (हैड्रोफ्ल्युओरिक आसिड) ओततात व ५।१० मिनिटांनीं तें अम्ल धुवून काढतात. या अम्लाचें कार्य मेणावर होत नाहीं. ज्या ठिकाणचें मेण निघून कांच उघडी पडली आहे त्या ठिकाणीं मात्र कांचेवर कार्य घडून कांच खाली जाऊन खोदली जाते व त्या ठिकाणीं खुणा उठतात; नंतर टरपेनटाइन तेल नळीवर ओतून नळी स्वच्छ करितात. नंतर कज्जलादिकांच्या योगानें त्या खुणा स्पष्ट दृग्गोचर होतील असें करितात.

**चक्राकार उष्णमानमापक.**-हर्मन व फीस्टर यांनीं एक प्रकारचें महत्तम व लघुतम उष्णमानमापक यंत्र केलें आहे.

लोखंड आणि पितळ यांचा प्रसरणगुणक ( कोइफिशंट ऑफ एक्सपॅन्शन) फार भिन्न आहे. ०° शतांश आणि १००°यांच्या दरम्यान लोखंडाचा प्रसरणगुणक.००००१२२० आहे, परंतु पितळेचा प्रसरणगुणक. ००००१८७८आहे. म्हणजे पितळेचा प्रसरणगुणक लोखंडापेक्षां सुमारें दीडपट आहे. एक यार्ड लांब, अर्धा इंच रुंद आणि ३/४ इंचाइतकी जाड अशी पोलादी पातळ पट्टी घेतात आणि तेवढ्याच आकाराची पितळेची पट्टी या पोलादी पट्टीवर बसवितात. नंतर या जोड पट्टीची गुंडाळी करितात; या गुंडाळीचें मध्य टोंक एक खुंटाला मजबूत रीतीनें पक्कें बसविलेलें असतें व बाहेरील टोंकास उच्चालक बसवितात व या उच्चालकास कांटा जोडतात व तबकडीवर आंकडे मांडलेले असतात. आतां उष्णतेनें पितळ आणि पोलाद यांचें कमी जास्त प्रमाणांत प्रसरण होतें व त्या योगानें गुंडाळी कमी जास्त प्रमाणांत उलगडली किंवा गुंडाळली जाते. आणि त्या योगानें कांट्याचें चलन होतें. पाऱ्याच्या उष्णमानमापकांशीं तुलना करून या धातूंच्या पट्टीच्या उष्णमानमापकावर आंकडे मांडतात. हें यंत्र पाऱ्याच्या उष्णमानमापकाइतकें सूक्ष्म नाहीं असें शास्त्रज्ञ मंडळाचें मत आहे. म्हणून या चक्राकार यंत्राचा फारसा उपयोग करीत नाहींत.

उ ष्ण मा न मा प का ची दु रु स्ती.—पाऱ्याच्या उष्णमानमापकांतील शून्य आणि शंभर या अंशांतील स्थानांत फरक पडतो व त्यामुळें तदनुरोधानें इतर अंशांच्या स्थानांत फरक पडूं लागतो. असा फरक पडण्याचें कारण असें आहे कीं,त्या उष्णमानमापकावर ज्या प्रमाणें कार्य घडलें असेल त्याप्रमाणें या अंशांत फरक पडतो. उदाहरणार्थ जर उष्णमानमापकाचा खालील गोलक तापवून थंड केला व नंतर त्याला वितळणाऱ्या बर्फांत ठेवलें तर शून्य अंशाच्या स्थानांत फरक दिसेल. ८।१५ दिवसांत हा फरक कमी कमी होत शून्य अंश मूलस्थानाप्रत येतो. याचप्रमाणें कांचेची नळी नवीनच तयार होऊन त्यावर नव्यापणांच खुणा मांडल्या तर कांहीं काळानें त्या उष्णमानमापकावरील प्रमाणबिंदूंच्या स्थानांत फरक पडतो. याशिवाय उष्णमानमापकांत आणखी तीन प्रकारच्या दुरुस्त्या कराव्या लागतातः—(१) उष्णमानमापकांतर्गत आणि उष्णमानमापकबाह्य दाब लक्षांत घ्यावा लागतो. ( २ ) उष्णमानमापकाच्या नळीचा किती भाग बाहेर उघडा पडला आहे हें ध्यानांत घ्यावें लागतें व त्याप्रमाणें हिशोब करावा लागतो. ( ३ ) उष्णमानमापकाच्या नलिकेचा व्यास सर्व ठिकाणीं अगदीं सारखा असत नाहीं; त्यामुळें जरी प्रमाणबिंदू अगदीं बरोबर असले तरी मध्यंतरीच्या खुणा अगदीं चुकीच्या असतात. त्याकरितां नलिकेच्या छेदाविषयीं दुरुस्त्या कराव्या लागतात.

वा यु यु क्त उ ष्ण मा न मा प क यं त्र.—उत्तम प्रकारच्या उष्णमानमापकापासून जसें कार्य होतें तसेंच कार्य वायूच्या उष्णमानमापकापासून होतें,किंबहुना पारद-उष्णमानमापकापेक्षां जास्त उत्तम कार्य वायूच्या उष्णमानमापकापासून होतें. पाऱ्याची वाफ सुमारें३५०°अंशावर होते. यामुळें३५०°अंशापेक्षां जास्त उष्णमान पाऱ्याच्या उष्णमानमापकानें मोजतां येत नाहीं. कांचेचें प्रसरण कित्येकदां अनियमितपणें होतें.त्याच्या योगें पाऱ्याच्या स्तंभाकडून उष्णमान अगदीं बरोबर दर्शविलें जात नाहीं. पाऱ्याऐवजीं वायूचा उपयोग केल्यास या प्रकारच्या चुका अगदीं अल्प प्रमाणावर होतात; कारण कांचेच्या गुणकाच्या मानानें वायूचा प्रसरणगुणक फारच मोठा आहे; त्यामुळें कांचेच्या अनियमित प्रसरणानें उष्णतादर्शकांत फारसा फरक पडत नाहीं. वायूचें प्रसरण फारच नियमित रीतीनें होतें व त्यामुळें कोणत्या उष्णमानावर वायूचा आकार आणि दाब किती होईल हें गणितानें काढतां येतें. यामुळें वायूच्या आकारमानाच्या योगानें किंवा दाबाच्या योगानें उष्णमान अगदीं सूक्ष्मपणें निश्चित करतां येतें हा या वायूच्या उष्णमानमापकांत पाऱ्याच्या उष्णमानमापकापेक्षां विशेष गुण आहे. पाऱ्याच्या उष्णमानमापकांत एक कांचेचा लहानसा फुगा असतो; त्या फुग्याला कांचेची नळी ळावलेली असते; आणि त्या नळीस एक रबराची नळी जोडलेली असते; या नळींत पारा भरलेला असतो.फुग्यांतील हवेस किंवा दुसऱ्या एखाद्या वायूस (हायड्रोजन, आक्सिजन नैट्रोजन इ. इ. ) उष्ण करून त्याच्या योगानें वायूचें किती प्रसरण होतें किंवा दाब किती वाढतो हें काढतात; आणि प्रसरणाच्या किंवा दाबाच्या योगानें उष्णमान काढतां येतें. व्यवहारांत या यंत्राचा सरसहा उपयोग होऊं शकत नाहीं. परंतु शास्त्रीय प्रयोगांत अनेकवेळां या यंत्राचा उपयोग करितात. ज्या ज्या ठिकाणीं उष्णमान अगदीं सूक्ष्मपणें निश्चित करावयाचें असतें त्या त्या ठिकाणीं या उष्णमानमापकाचा उपयोग करितात.

वि द्यु दु ष्ण मा न मा प क.—पाऱ्याच्या उष्णमानमापकावरील अंश पाहिले कीं, लागलीच उष्णमान समजतें. परंतु उष्णमानमापकाचा मर्यादित उष्णमानापर्यंतच उपयोग करितां येतो.विद्युदुष्णमानमापकाचा उपयोग करितां येण्याची मर्यादा फार मोठी आहे; परंतु विद्युदुष्णमानमापकास बरींच उपकरणें लागतात, हा विद्युदुष्णमानमापकांत एक दोष आहे. जरी हा दोष विद्युदुष्णमानमापकांत आहे तरी पाऱ्याच्या उष्णमानमापकापेक्षां विद्युदुष्णमानमापक जास्त सूक्ष्म आहे. तसेंच त्याची जास्त ठिकाणीं योजना करितां येते व तें अत्यंत भिन्नभिन्न उष्णमानांवर वापरतां येतें.या सर्व उपयुक्त गुणांमुळें शास्त्रीय शोधांत याचा फार मोठ्या प्रमाणांत उपयोग करितात. विद्युदुष्णमानमापकाची विस्तृत माहिती येथें देतां येणें शक्य नाहीं, यासाठीं त्रोटक माहितीच येथें दिली आहे.

विद्युदुष्णमानमापकाच्या दोन जाती आहेतः–( १ )एका प्रकारांत भिन्न धातूंच्या जोडाचा उपयोग करितात, आणि

(२) दुसऱ्या प्रकारांत प्लॅटिनम किंवा दुसऱ्या धातूस होणाऱ्या विद्युद्विरोधाच्या फरकाचा उपयोग करितात. दोन भिन्न जातींच्या धातूंचे तुकडे घेऊन ते एका ठिकाणीं सांधतात. जेव्हां उष्णमान मोजावयाचें असतें तेव्हां हा सांधा एका स्थळीं स्थिर ठेवतात व त्या योगानें उत्पन्न झालेला विद्युत्प्रवाह एका विद्युन्मापकानें (गल्व्हानो मीटरनें) मोजतात. सांध्यापासून उत्पन्न होणारा विद्युत्प्रवाह आणि तेथील उष्णमान यांत ठराविक प्रमाण असतें; म्हणून उष्णमान मोजतां येतें. कित्येकदां विद्युन्मापकाचा उपयोग न करितां विद्युत्प्रवाहाची तुलना करितात.

दुसऱ्या प्रकारच्या विद्युदुष्णमानमापकांत प्लॅटिनम किंवा दुसऱ्या एखाद्या धातूची तार घेऊन ती ज्या ठिकाणीं उष्णता मोजावयाची असेल त्या ठिकाणीं ठेवतात. त्या योगानें त्या तारेचें उष्णमान त्या ठिकाणच्या इतकें होतें व भिन्नभिन्न उष्णमानावर त्या धातूच्या तारेकडून भिन्नभिन्न प्रमाणांत विद्युत्प्रवाहास विरोध होतो. या विरोधांत आणि उष्णमानांत कांहीं विशिष्ट प्रमाण असतें. या प्रमाणाच्या योगानें उष्णमान काढतां येतें.

**महत्तम आणि लघुतम उष्णमापकेंः**—वायुचक्रशास्त्रांत (मिटिअरॉलॉजी) प्रत्येक दिवसाच्या सर्वांत जास्तींत जास्त आणि कमींत कमी उष्णमानाची नोंद करून ठेवावी लागते. पाऱ्याच्या साध्या उष्णमानमापकानें अशा प्रकारचें अवलोकन करवून घेण्यास सतत चोवीस तास मनुष्यानें पहात बसलें पाहिजे. या प्रकारें सतत चोवीस तासपर्यंत आळीपाळीनें उष्णमानमापकावर पहारा करण्याचें टाळण्याच्या उद्देशानें रुदरफोर्ड यानें एक उष्णमानमापक तयार केलें. याची नळी आडवी असते. या नळींत लोखंडाचा लहानसा डंबेल ठेवलेला असतो. पारदस्तंभ त्या डंबेलला रेटूं शकतो; परंतु लोखंड आणि पारा यांच्यामध्यें पृष्ठाकर्षणाचा अभाव असल्याकारणानें पारदस्तंभ आकुंचित होतांना डंबेल पारदस्तंभाबरोबर परत न जातां तेथेंच रहातो. या उष्णमानमापकानें महत्तम उष्णमान समजतें. लोहचुंबकानें त्या लोखंडी डंबेलास पारदस्तंभाशीं भिडवून ठेऊन यंत्र लावून ठेवतात.

या लघुतम उष्णमानमापकांत अल्कोहल (मद्यार्क) या द्रवाचा उपयोग केलेला असतो. या उष्णमानमापकांत एक लहानसा कांचेचा तुकडा ठेवलेला असतो. कांच आणि मद्यार्क यांच्या दरम्यान पृष्ठाकर्षण असतें, यामुळें मद्यार्काचा स्तंभ आकुंचित होत असतांना कांचेचा तुकडा पृष्ठाकर्षणामुळें परत येतो; परंतु मद्यार्काच्या स्तंभाचें प्रसरण होत असतांना कांचेच्या तुकड्याच्या बाजूनें मद्यार्क पुढें जातो; पण कांचेचा तुकडा पुढें ढकलला जात नाहीं. ज्या वेळेस हें उष्णमानमापक लावावयाचें असतें, त्या वेळेस हलवून कांचेचा तुकडा मद्यार्काच्या स्तंभाच्या अग्रभागाशीं आणून ठेवितात.

**सततलेखकउष्णमानमापक.**—वरील लघुतम आणि महत्तम उष्णमानमापकानें ठराविक काळांतील कमींत कमी किंवा जास्तींत जास्त उष्णमान तेवढें कळतें; परंतु दरम्यानच्या काळांत उष्णमानांत कसकसा फेरफार झाला हें कळत नाहीं. हें समजण्याकरितां शास्त्रज्ञांनीं सतत लेखकयंत्राची युक्ति बसविली आहे. कांहीं विशिष्ट युक्तीनें एका फिरत्या पंचपात्रावर शाईनें किंवा पेन्सिलीनें रेघ काढण्याची योजना केलेली असते. शाईच्या टांकाचें अग्र उष्णमानाच्या अनुरोधानें हलण्याची युक्ति योजिलेली असते, त्यामुळें पंचपात्रावरील कागदावर वक्र रेघ उमटते. या रेघेच्या योगानें (ग्राफच्या योगानें) ठराविक काळांतील वाटेल त्या वेळेचें उष्णमान समजतें.

**उस्का**—संयुक्तप्रांत. बस्ती जिल्ह्यांतील बन्सीतहसिलींतलें एक गांव. बंगाल अँड नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें गोरखपूरपासून अखेरचें स्टेशन आहे. येथील लो. सं. १९०१ सालीं ६७१८ होती सांप्रत उस्का शहर वाढत्या प्रमाणावर असून तांदूळ, जवस वगैरे जिन्नस बाहेर गांवीं पाठविले जातात. येथें एक शाळा आहे.

**उस्तरण**—एक पठाण जात. वायव्यसरहद्द प्रांतांतील डेराइस्माईलखान जिल्ह्याच्या अगदीं दक्षिणभागांतील डोंगरांतून या जातीचे लोक राहतात. उस्तरण ही मूळची व्यापारी जात असे. त्यांच्या शेजारचे जे मुसाखेल लोक त्यांच्यांशीं यांचें भांडण होऊन यांनीं दरवर्षी पश्चिमेकडे देशांतर करण्याची जुनी वहिवाट सोडून हे शेतकरी बनले. डोंगराच्या पायथ्याची बरीचशी सपाट जमीन त्यांनीं तेव्हांपासून हस्तगत केली. त्यांच्या मुलुखांत सुलेमान पर्वताची पूर्ण उतरण कायती येते. शिखराचा भाग मुसाखेल, इसाट आणि इस्मारै लोकांकडे आहे. उस्तरण लोक मोठे धाडसी व्यापारी असून कंदाहारपासून बंगालपर्यंत त्यांचा माल जातो. ही शूर जात शांत व सभ्य असून तींतील पुष्कळ लोक सैन्यांत व पोलिसांत आहेत.

**उस्मान** (१)—तुर्कांचा पहिला सुलतान. याचा आजा सुलेमान हा चेंगीझखाननें बल्खवर स्वारी केल्यावेळीं (१४१४) तो प्रदेश सोडून रोमला गेला व तेथें बुडून मेला. उस्मानचा बाप अमीर तुघ्रल याला सेल्जुक सुलतानानें आपल्या पदरीं बाळगिलें होतें तो इ. स. १२८८ मध्यें वारला. उस्मान हा अल्लाउद्दीन कैकुबाद नांवाच्या सेल्जुक सुलतानाच्या पदरीं होता. प्राचीन फ्रिजिया ज्या बाजूला होती त्या बाजूस त्याला एक जमीन बक्षीस मिळाली तेथें त्यानें ग्रीक बादशहापासून मुसा घेऊन उस्मानिया (ऑटोमन) सत्तेचा पाया घातला. इकोनियममचें सेल्जुक घराणें नष्ट झाल्यावर (इ. स. १२९९) उस्माननें बिथिनियाचा कांहीं भाग हस्तगत केला. ‘हफ्त अक्लीम’ ग्रंथावरून पहातां त्याची कारकीर्द इ. स. १२८९ पासून सुरू होते. इ. स. १३२६ त याचा अंत झाला. याच्या मागून याचा

मुलगा ओर्खान हा गादीवर आला. शेख एव्दली या पंडिताच्या मुलीशीं उस्मानचें जें लग्न झालें तें काव्यविषय होऊन बसलें आहे. आपला मुलगा ओर्खान याचें लग्न यानें एका ग्रीक सरदाराच्या मुलीशीं (तिला पळवून आणून) लावून दिलें होतें.

( २ ) ( सुमारें ५७४–६५६ )—तिसरा खलीफ. हा महंमद पैगंबराचा एक जांवई होता. दुसरा खलीफ उमर याच्या पश्चात उस्मानला खलीफ निवडण्यांत आलें. या दुबळ्या खलीफाच्या कारकीर्दींत कुरेष सरदारांच्या हातीं इस्लामची सत्ता गेली व यामुळें राज्यांत असंतोष उत्पन्न झाला. तथापि उस्माननें मुसुलमानांचें प्रचंड आरमार तयार केलें व खलीफतीची सत्ता भूमध्यसमुद्रापर्यंत पसरविली. उस्माननें कुराणाची एक शुद्ध प्रत तयार करवून बाकीच्या सर्व जाळून टाकिल्या; हीच प्रत हल्लीं चालू आहे. याच्या कारकीर्दीपासून अंतःकलहाला सुरुवात झाली ( बुद्धोत्तरजग विभा. ४ था 'खलीफत व इस्लामचा प्रसार' प्र. १७पहा. ) मेदिना येथें उस्मानचा खून झाला. तीन दिवसानंतर त्याच्या तशाच स्थितींत कांहीं एक संस्कार न करितां त्याचें शव पुरण्यांत आलें. नंतर अली खलीफ झाला.

**उस्मान नगर**—हैद्राबाद संस्थानाच्या नान्देड जिल्ह्यांत पूर्वी असलेला एक तालुका.

क्षेत्रफळ २९० चौ. मै. जहागिरी धरून लोकसंख्या १९०१ सालीं ३७६६७ होती. १९०५ मध्यें ह्या जिल्ह्याची विभागणी करून कांहीं भाग विलोलीमध्यें व कांहीं भाग कंदहारमध्यें घेण्यांत आला.

**उस्मानाबाद, जिल्हा**.—हैद्राबाद संस्थानच्या पश्चिम भागांतील एक जिल्हा. ह्यास पूर्वी 'नलदुर्ग' म्हणत असत. याच्या उत्तर–पश्चिम व दक्षिणेस मुंबई इलाख्याचे अहमदनगर व सोलापूर हे जिल्हे. उत्तर व पूर्वेसः—भीर व बेदर जिल्हे दक्षिणेस-अक्कलकोट संस्थान व आग्नेयीस गुलबुर्गा जिल्हा. क्षेत्रफळ ४०१० चौ. मै. पैकीं खालसा व सर्फ इ-खास जमीन २६२७ चौ. मै. असून इतर पैगाह व जहागीर आहे. जिल्ह्याचे दोन भाग पाडणारी एक वायव्य-आग्नेयोत्तर डोंगरांची ओळ आहे. वासी, ओवसा व कलम हे तालुके व तुळजापूर, उसमानाबाद व नलदुर्गाचा कांहीं भाग डोंगर सपाटीवर आहे. इतर सखल भागांत आहे. तुळजापूर पासून उस्मानाबादकडे जमीन उंच उंच होत गेली आहे. मोठी नदी मांजरा. इतर लहान नद्या सिन, खेरी, तिरना, आणि बोरणा या आहेत. जंगल फारसें नाहीं. बाभूळ, निम्ब, आंबा वगैरे झाडें आहेत. नलदुर्ग व ओवसा तालुक्यांची हवा उष्ण व रुक्ष आहे. तुळजापूर व उस्मानाबाद तालुक्यांची हवा थंड आहे. वासी, कलम व परेन्ड तालुक्यांची हवा दमट आहे. पाऊस ३३ इंच पडतो.

इतिहासः—चौदाव्या शतकाच्या सुरवातीपासून हा जिल्हा मुसुलमानांच्या वर्चस्वाखालीं होता. ह्यानंतर तो अलाउद्दीननें दिल्लीच्या साम्राज्यास जोडला. ब्राह्मणी राज्याच्या स्थापनेनंतर ह्याचा ब्राह्मणी राज्यांत समावेश होऊं लागला. व ब्राह्मणी राज्य लयास गेल्यावर हा अहमदनगर व विजापूरच्या राज्याखालीं मोडूं लागला. अवरंगजेबानें जेव्हां दक्षिण जिंकली तेव्हां हा जिल्हा पुन्हां दिल्लीपतीकडे गेला. अखेर १८ व्या शतकाच्या सुरवातीस जेव्हां हैद्राबाद संस्थानची स्थापना झाली तेव्हां तो हैद्राबाद संस्थानांत मोडूं लागला. रायचूर दोआबच्या तहाप्रमाणें हा १८५३ मध्यें इंग्रजांस देण्यांत आला होता. पण १८६० मध्यें तो निझामास परत देण्यांत आला.

प्रेक्षणीय स्थळें:—नलदुर्ग किल्ला, ओसवा तालुक्यांतील जाम मशीद, उस्मानाबाद शहराभोंवतीं असलेलीं दावर, चमार व लाचन्दर लेणीं, परेंडचा किल्ला, तुळजापूर ( येथें भवानीचें देवालय असून मोठी जत्रा भरते ), थेर येथें असलेले बौद्धकालीन अवशेष हीं पौराणिक कालचीं स्थळें प्रेक्षणीय आहेत.

जहागिरी धरून यांत गांवें ८६५ असून लोकसंख्या १९०१ सालीं ५,३५,०२७ होती.

मोठीं गांवें.—उस्मानाबाद, तुळजापूर, थेर, ओवसा, लातूर, मोरम. यांत शेंकडा ८९ लोक हिंदु आहेत. पैकीं शें. ८४ लोक मराठी भाषा बोलतात.

१९०५ सालीं वासीचा कलममध्यें व नलदुर्गाचा तुळजापूरमध्यें समावेश होत असे व अशारीतीनें ५ तालुके, ( उस्मानाबाद, कलम, तुळजापूर, ओवसा व परेन्ड ) शिवाय दोन मोठ्या गंजोटी व लोहाऱ्या पैगाह जहागिऱ्या व भूम व वालवडची जहागिरी असे विभाग असत.

लोकांच्या जातीः—कुणबी, मराठे, धनगर, महार, चाम्भार, वाणी व ब्राह्मण. शेंकडा ५८ लोक शेतकीवर उपजीविका करितात.

जमीन काळी कापसाची आहे. उस्मानाबाद, कलम, वासी व परेन्ड येथें चांगल्यापैकीं काळी जमीन आहे. त्यामुळें रब्बीचें पीक चांगलें येतें.

रिगर जमीनींत जवार, चणे, गहूं व कापूस पिकतो. व मसब ( लालपांढुरकी ) जमीनींत ज्वारी, बाजरी व कडधान्य पिकतें. खरपड जमिनीचा बागाईताकडे उपयोग करितात. कारण त्या जमिनींत चांगलें धान्य येण्याकरितां खत पुष्कळ लागतें. पहाडाच्या पायथ्याची जमीन सुपीक आहे.

रयतवारी पद्धत सुरू आहे. मुख्य खाद्य ज्वारी. कापूस सर्व तालुक्यांत होतो. कोठें कोठें विहिरीच्या पाण्यावर ऊंस करतात. शेतकींत अजून सुधारणा अशी कांहींच नाहीं. धनगर लोक घोंगड्या तयार करितात. ओवसा तालुक्यांतील लातूर व्यापाराचें मुख्यठिकाण असून येथें तीन जिनें आहेत.

बाहेर जाणारा मालः—ज्वारी व इतर खाद्यधान्यें, कडधान्यें, कापूस, गळीताचीं धान्यें, तेल, मिरच्या, गुरें, मेंढरें, तंबाखू, चामडें इ.

आंत येणारा मालः—मीठ, खारेमासे, अफू, मसाले, रुपें, सोनें, तांब्याचीं भांडीं, शुद्ध केलेली साखर, लोखंड, राकेल तेल, गंधक, कच्चें रेशीम, व सुती कापड हा माल येतो. लातूरच्या खालोखाल उस्मानाबाद हें व्यापाराचें ठिकाण आहे. वाणी, मारवाडी, कोमटी व भाटिया हे व्यापारी लोक होत. ग्रेट इन्डियन पेनिनशुला रेल्वे तुळजापूर तालुक्यांतून जातें.

व्य व स्थाः—ह्या जिल्ह्याचे दोन विभाग पाडले आहेत. एकांत कलम, ओवसा व परेन्ड हे तालुके येतात व दुसऱ्यांत उस्मानाबाद तुळजापूर हे आहेत. प्रत्येक तालुक्यावर एक तहशिलदार असतो.

जिल्ह्याच्या दिवाणी कोर्टावर नाझिम-इ-दिवाणीची नेमणूक आहे. १७ व्या शतकाच्या आरंभापासून मलिकंबरची जमाबंदीची पद्धत अमलांत होती. जमीनीची पहाणी करून तिच्या सुपीकतेवरून सारा ठरवीत असत. शिवाय सारावसुली सुलभ रितीनें व्हावी म्हणून गांवेंच्या गांवें शेतकऱ्यांकडे वसुलीकरितां मक्त्यानें लावून देत असत. सारा उत्पन्न ( १९०३ ) ११७७ हजार रु. व एकंदर उत्पन्न १२७१ हजार रु. उस्मानाबाद येथें म्युनिसीपालिटी आहे. मोठ्या शिक्षा पावलेले कैदी गुलबुर्गा येथें पाठवितात. शेंकडा ३.१ लोकांस लिहितां वाचतां येतें.

ता लु का.—हैद्राबाद संस्थानांत उस्मानाबाद जिल्ह्याच्या मध्यभागीं असलेला मुख्य तालुका. हा पूर्वी धारासिव ह्या नांवानें ओळखला जात असे. जहागिरी धरून क्षेत्रफळ ४१७ चौ. मैल आहे. १९०१ सालीं लोकसंख्या ७७५३३. गांवें दोन उस्मानाबाद व येर.खेडीं ८७.व जहागिरीः–९मोठीं जमीन काळी ( रेगर ) कापसाची आहे.

गां वः.—हैद्राबाद संस्थानमधील उस्मानवाद जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ १८° ११′ व पू. रे. ७५° ३′. सोलापूरच्या उत्तरेस ४३ मैल व बार्शीच्या पूर्वेस ३२ मैल आहे. लोकसंख्या १९०१त १०६०७ होती. हें बालाघाटमध्यें असून पूर्वी ह्यास धारासिव ह्या नांवानें ओळखीत असत. १८५३ ते १८६० हा जिल्हा ब्रिटिशांस दिला होता तेव्हां ह्याचें मुख्य गांव नळदुर्ग होतें. हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे. गांवाच्या ईशान्येस दोन मैलांवर ७ लेणीं आहेत. त्यांपैकीं चार जैन असून तीन वैष्णव आहेत.

**उळवी**—मुंबई. उत्तरकानडा जिल्ह्यांतील हल्याळ तालुक्यातलें एक गांव. लो. सं. (१९११) ९०५. सन ११५० मध्यें बिज्जलाच्या पुत्रापासून आपला जीव बचावण्यासाठीं बसव येथें आला व 'उळीवेनु' ( म्हणजे आतां मी मुक्त होऊन ) असा शब्द उच्चारून त्यानें विहिरींत उडी घेतली, अशी जैन कथा आहे. या 'उळीवेनु' शब्दावरून या गांवाचें नांव पडलें असें सांगतात. येथें त्याचें स्मारक एक मंदीर आहे व आणखी पुरातन देवळें आहेत. गवीमठ हें लेण्यासारखें देऊळ सर्वांत जुनें दिसतें. बुद्बुदतळें नांवाचें एक तळें आहे. त्यालाहि फार पूज्य मानतात. येथें प्राचीन काळीं म्हार किंवा होळयार राजा होता. नंतर म्हैसूरच्या सुलतानानें सदाशिव सुभेदाराच्या स्वाधीन हा गांव केला. येथील अवशेषांवरून हा गांव पूर्वी भरभराटींत होतासें दिसतें. दरसाल बसवेश्वराच्या यात्रेला फार गर्दी जमते. [ मुं. गॅ. १५. इं. गॅ. ९४. ]

---

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## ऊ



ऊ—'उ' ला एक फांटा नवीन जोडून हें अक्षर तयार झालेलें दिसतें. हा फाटा केव्हांपासून प्रचारांत आला तें पाहूं. भरहुतस्तूपावरील लेखांत 'ऊ' अक्षर असून, अशोकाच्या गिरनार लेखांतील 'ऊ' आकृतींत ('उ' पहा.) खालच्या आडव्या फाट्याच्या जरा वर त्याला समांतर असा दुसरा फाटा काढल्यास वरील भरहुत लेखांतील 'ऊ' ची आकृति तयार होईल. इ. स. पू. पहिल्या शतकाच्या सुमारच्या पभोसा येथील लेखांत वरच्या सारखीच ऊची आकृति आहे, पण त्यांतील फांटा दुसऱ्या अवस्थेंतील 'ऊ' ला काढला आहे. तिसऱ्या अवस्थेंतील 'उ' ला बांकदार फाटा काढून तयार केलेला ऊ इ. स. ५ व्या शतकांतील हूणराजा तोरमाण याच्या कुडा येथील लेखांत आढळतो आजच्या वळणदार 'उ' ला डोक्यापासून फाटा काढून बनविलेला 'ऊ' चंबा राज्यांतल्या सराहां येथें सांपडलेल्या इ. स. १० शतकांतील एका प्रशस्तींत पहावयास मिळतो.

ऊदाइन (बेंझाईन) (१)—क$_{६}$उ$_{५}$कउ प्रउ. कप्र. क$_{६}$उ$_{५}$ ऊदाइन हा कितन (केटोन) अल्कहल आहे. ऊदिल प्रायोज्जिदा (बेन्झ आल्डिहॉईड) चा अल्कहलांत द्रव करून तो पालाशकनिदा( पोटॅशियम सायनाईड )बरोबर उकळला म्हणजे ऊदाइन तयार होतो.

हा वर्णहीन स्फटिकरूप घन असतो. अल्कहल आणि इथ्र (ईथर) यांत सहज विद्रुत होतो. ऊदाइन १३७°शवर वितळतो आणि ३४३—३४४°शवर उकळतो. सीसप्राणिदा( लेड ऑक्साइड )स उष्ण करून त्यावरून ऊदाइनची वाफ नेली म्हणजे त्याचें रूपांतर ऊदिल (बेंझिल) आणि उदिल भानन (बेंझोफिनोन) यांत होतें. यावर प्राणिदीकरणाची (ऑक्सिडेशनची) क्रिया सहज होत असल्यानें त्याचा उपयोग उज्जीकारक (रिडयुसिंग एजंट) या नात्यानें करतां येतो. "फेहलिंगचा" द्रव थंड असला तरी "ऊदाइनच्या योगानें ताम्रसप्राणिदाचा (कुप्रस ऑक्साइडचा) रक्तनिपात (प्रेसिपिटेट) येतो. हर आणि नत्राम्ल (नायट्रिक ॲसिड) यांच्या योगानें ऊदाइनचें प्राणिदीकरण होऊन त्याचें रूपांतर "बेंझिल" म्हणजे ऊदिल यांत होतें. क्रुमाम्लाचें मिश्रण (क्रोमिक ॲसिड मिक्श्चर) आणि पालाश परिमंगलित यांच्या योगानें ऊदाइनचें रूपांतर ऊदाम्ल (बेंझॉइक ॲसिड) आणि ऊदिल प्रायोज्जिद (बेंझाल्डिहाइड) यांत होतें. ऊदाईन जशद चूर्णा( झिंक डस्ट )बरोबर उष्ण केल्यास निष्प्राण ऊदाइन (डेस ऑक्सि बेंझॉइन) (क$_{६}$उ$_{५}$कप्र.कउ$_{२}$.क$_{६}$उ$_{५}$) तयार होतो. सिंधुमेल (सोडियम अमलगॅम) च्या योगानें त्याचें रूपांतर उज्जऊदाइनमध्यें होतें आणि धूम्रभावी (फ्यूमिंग) उज्जअदाम्ला (हायड्रो आयोडिक ॲसिड) च्या योगानें १३०°श उष्णमानावर त्याचें रूपांतर द्विऊदिल (डायबेंझिल) क$_{६}$ उ$_{५}$ कउ$_{२}$. कउ$_{२}$ क$_{६}$उ$_{५}$) मध्यें होतें.

कवड्या ऊद यास इंग्रजींत ऊदाइन किंवा गमबेंजामिन असें म्हणतात. इंग्रजी बेंझॉइन हा शब्द अरबी शब्द लुबन =ऊद–धूप यापासून निघाला असावा अशी कल्पना आहे. लुबन या शब्दांतील लु हें उपपद समजून रोमन भाषेंत तें गाळण्यांत आलें व बन यापासून बेंझॉइन असें नांव पडलें. हा राळेच्या जातीचा एक प्रकारचा धूप आहे. कवड्याऊद हा "स्टिरॅक्स बेंझाइन" या नांवाचीं मोठमोठीं झाडें सुमात्रा आणि जावा बेटांत आहेत त्या झाडांचा चीक आहे. या शिवाय 'स्टिरॅक्स' जातीचीं दुसरीं झाडें आहेत त्यांपासूनहि कवड्या ऊद तयार होतो. या झाडांच्या सालींना फासण्या म्हणजे चिरा पाडून त्यांतून येणाऱ्या चिकापासून हा तयार होतो. स्वभावतः हा झाडामध्यें नसतो. तो फासण्याचा परिणाम होऊन तयार होतो. कवड्याऊदाच्या पुष्कळ जाती बाजारांत असतात. (१) सयामी ऊद असतो तो "स्टिरॅक्स बेंझाइन" पासून निघालेला नसतो. हा उत्तम असून यास अति मधुर सुवास असतो. याचे लहान लहान खडे असतात. या खड्यांची लांबी दोन इंचांपेक्षां क्वचित् अधिक असते व जाडी सुमारें ·॥· इंच असते. या खड्यांचे मोठमोठे ठोकळे केलेले असतात. एका प्रकारच्या तांबूस पिंगट अशा राळेनें हे खडे एकमेकांस चिकटविलेले असतात. सयामी ऊदाचा वास हा कांहीं अंशीं त्यांत असणाऱ्या वनिलिन (व्हॅनिलीन) वर अवलंबून असतो. यांत सरासरी शेंकडा ३८ इतके ऊदाम्ल असतें; परंतु दारुगंधाम्ल (सिनॅमिक ॲसिड) त्यांत मुळींच नसतें. (२) सुमात्रा ऊद म्हणून जो ऊद असतो तो मोठमोठ्या खड्यांच्या रूपानें असतो. हे फिकट तांबूस राळेच्या योगानें बनलेले असतात व यांत पांढऱ्या पांढऱ्या कवड्या असतात. यांत दारुगंधाम्ल सरासरी शेंकडा २० प्रमाणांत असतें व सुमारें शेंकडा १८ किंवा यांहून जास्त प्रमाणांत ऊदाम्ल असतें. (३) पॅलेंबंगऊद हा हलक्या प्रतीचा ऊद असतो. सुमात्रामध्यें "स्टिरॅक्स बेंझाइन" नांवाचीं झाडें आहेत त्यापासून हा तयार होतो असें म्हणतात. याचे करड्या रंगाचे चकाकीत राळेचे खडे असतात, त्यांत लहान लहान गोळ्या असतात. यांत दारुगंधाम्ल असावें असें वाटत नाहीं. धूपाकडे या ऊदाचा फार खप होतो.

**ऊदाम्ल**—( बेंझोइक ॲसिड ) क$_{६}$उ$_{५}$कप्रप्र.उ याचा शोध इ. स. १६०८ मध्यें लागला. हें प्रथम शील यानें इ. स. १७८५ मध्यें प्राण्यांच्या मूत्रापासून तयार केलें. याची घटना १८३२ मध्यें व्हूलर आणि लीबीग यांच्या संशोधनानें ठरली गेली. प्रथम हें अम्ल मलाया बेटांत होणाऱ्या स्टीरॅक्स बेंझोइन नांवाच्या झाडाच्या गोंदापासून तयार करीत असत. सृष्टीमध्यें सुद्धां हे ड्रॅगन्सब्लड पेरु आणि तोलुबाल्सम, क्रॅन्बेरीज इत्यादिकांत सांपडतें. ऊदाम्ल घोड्याच्या मूत्रांत ग्लिकोकोलशीं संयुक्त स्थितींत असतें, त्यास हिप्पुरिक ॲसिड ( अश्वमूत्राम्ल ) असें म्हणतात. त्यापासून ऊदाम्ल काढण्यास अश्वमूत्राम्ल उद्धराम्लांत उकळावें लागतें. ऊदाम्ल हें कोळशाच्या डामरांत सुद्धां असतें. ऊदिलहरिद ( बेंझिल क्लोराइड ) अथवा ऊदल हरिद ( बेंझल क्लोराइड ) यापासून कडु बदामाचें तेल तयार करतेवेळीं ऊदाम्ल हें आड उत्पन्न म्हणून पुष्कळ तयार होतें. हें अम्ल ऊदिल त्रिहरिद ( बेंझोट्रायक्लोराइड ) पाण्याशीं उच्च उष्णमानावर उष्ण केलें असतांहि तयार होतें. तें खालीं दाखविल्याप्रमाणें:—




ऊदाम्लाचे स्फटिक सूचिकाकार किंवा पिसाच्या आकारासारखे चकचकीत असतात. हें अम्ल थंड असतांना निर्गंध असतें; परंतु मंद उष्णतेनें त्यास ईषत्सुवास येतो. हें अम्ल १२०° अंशमानावर वितळतें आणि यापेक्षां किंचित् अधिक उष्णमानावर याचें ऊर्ध्वपातन ( सब्लीमेशन ) होतें. तें २५०° अंश मानावर वितळतें आणि पाण्याबरोबर उकळलें असतां पृथक्करण न होतां बाष्पीभूत होतें. हें २०० पट थंड पाण्यांत विद्रुत होतें. उष्ण पाणी असल्यास २४ पट पाण्यांत विरळतें. अल्कहलांत हें त्वरित विरतें. पालाश आणि अम्र ( अमोनिया ) इत्यादि अल्कांत सुद्धा ऊदाम्ल विरतें. या अल्कद्रवांतून अम्लाच्या योगानें त्याचा निपात ( प्रेसिपिटेट ) होतो.

लोह ऊदित ( फेरिक बेंझोएट ) खेरीज करून सर्व ऊदितें ( बेंझोएट्स ) कमी अधिक प्रमाणांत द्रवीभूत होतात. निर्गुण ऊदिताच्या द्रवांत लोहहरिदा( फेरिक क्लोराइड )चा द्रव घातला म्हणजे तपकिरी किंवा फिकट पिंवळ्या रंगाचा निपात ( प्रेसिपिटेट ) येतो.

ऊदाम्लांत प्रमाणापेक्षां अधिक चुनकळी मिळवून त्या मिश्रणाचें शुष्क पातन ( ड्राय डिस्टिलेशन ) केलें असतां त्याचें पृथक्करण होऊन ऊदिन ( बेंझिन ) तयार होतो. हें खालीं दाखविलेल्या रासायनिक समीकरणावरून समजेलः–




ऊदाम्लाची वाफ उष्ण केलेल्या जशदचूर्णावरून ( झिंक डस्ट ) नेली म्हणजे तिचें रूपांतर होऊन कडू बदामाचें तेल ( बिटर आमंड ऑईल ) तयार होतें, तें खालीं दाखविलेल्या रासायनिक क्रियाप्रतिक्रियेप्रमाणेः—




या कडू बदामाच्या तेलाचें रासायनिक नांव ऊदप्रायोज्जिद ( बेंझॉइक आल्डिहाइड ) किंवा ( बेंझ आल्डिहाइड ) असें आहे.

ऊदाम्ल तीव्र नत्राम्ला ( नायट्रिक ॲसिड )बरोबर उकळलें असतां त्याचें रूपांतर नत्रिल ऊदाम्लांत ( नायट्रो बेंझॉइक ॲसिड ) क$_{६}$उ$_{४}$(नप्र$_{२}$).कप्र$_{२}$उ होतें.

स्फुर पंचहरिदानें ( फास्फोरस पेंटा क्लोराइड ) ऊदाम्लाचें रूपांतर ऊदायिलहरिदां [ बेंझॉइल क्लोराइड ] त क$_{६}$उ$_{५}$कप्रह होतें. दारिल हरिदा [ ॲसिटिल क्लोराइड ]चा दार्वम्लाशीं जो संबंध आहे, तोच संबंध ऊदायिल हरिदाचा ऊदाम्लाशीं आहे. ऊदायिल आणि दारिल मूलकें यांचाहि संबंध सदरप्रमाणेंच उदिल आणि इथिल [ बेंझिल ॲंड एथिल ] या मूलकांशीं आहे असें दिसून येईल.




ऊदानिरुद ( बेंझॉइक अनहायड्राइड ) ( क$_{६}$उ$_{५}$कप्र )$_{२}$ प्र किंवा द्विउदायिल प्राणिद ( डायबेंझोइल ऑक्साइड ) हा पदार्थ ऊदायिल हरिदा( बेंझोयिल क्लोराइड )ची क्रिया पालाश ऊदितावर ( पोट्याशियम बेंझोएट ) केली म्हणजे तयार होतो तो असाः—




ऊदायिल हरिद, निर्जल काष्ठाम्लाबरोबर उष्ण केला म्हणजेहि ऊदनिरुद तयार होतो. या क्रियेंतील शेष पाण्यानें धुवून अल्कहलांत विद्रुत केला म्हणजे निरुद स्फटिकरूप पावतो. हे सूचिकाकार असून ४२° श मानावर वितळतात आणि ३६०° श वर उकळतात. हे पाण्यांत अविद्राव्य असतात परंतु अल्कहल व इथ्र यांत त्वरित विद्रुत होतात. ऊदनिरुद पाण्यांत उकळला असतां त्याचें ऊदाम्लांत रूपांतर होतें.

ऊदायिल हरिद ( क$_{६}$उ$_{५}$कप्रह ) हा पदार्थ तयार होण्याकरितां ऊदाम्ल आणि स्फुर पंचहरिद यांच्या मिश्रणाचें

निर्जल पातन करावें. हा निर्वर्ण रसरूप असून त्यास फार वाईट वास येतो. याचा उत्क्वथनांक १९८° श असतो. शीततजनक मिश्रणानें हा घनरूप होतो. हे स्फटिक —१° श वर वितळतात. यांमध्यें अम्लहरिदाचे ( ॲसिड क्लोराइडचे ) सर्व धर्म आहेत.

इथिल ऊदित ( एथिल बेंझोएट $क_{६}उ_{५}कप्र.क_{२})उ_{५}$ तयार करण्याची उत्तम रीत म्हटली म्हणजे ऊदाम्ल आणि अल्कहल यांच्या मिश्रणांत थोडेसें गंधकाम्ल मिश्र करून तें सर्व मिश्रण कांहीं तासपर्यंत बरेंच उकळत ठेवावें. हा निर्वर्ण रसरूप असून त्याचा उत्क्वथनांक २१३° श आहे. यास ऊदईथ्र ( बेंझाइक ईथर ) असेंहि म्हणतात. हें अत्तराच्या वर्गांतील असून यास चांगला वास येतो. याचे वि. गु. १.०५ आहे.

कवच्या ऊदांत ऊदाम्लाचें प्रमाण शेंकडा १२ ते २०पर्यंत असतें. अमोनि ऊदित ( अमोनियम बेंझोएट ) आणि सिंधु ऊदित ( सोडियम बेंझोएट ) यांचा औषधी कामांत फार उपयोग करतात. ऊदाम्ल हें मोठें शक्तिमान कोथघ्न अम्ल आहे. ऊदाम्ल पोटांत गेलें असतां तें अश्वमूत्राम्लाच्या रूपानें मूत्रांत येतें. मूत्रांतील अश्वमूत्राम्ल हे मूत्रमार्गांतील अंतस्त्वचेंतील श्लेष्मल पदार्थांस रोगबीजरहित करून उत्तेजितपणा आणतें

ऊदिदिन—( बेंझिडाइन ) $नउ_{२}. क_{६} उ_{४}. क_{६} उ_{४}. नउ_{२}$ ऊदिदिन यास द्विपरद्विअमिन द्विभानिल ( डाय पॅरा डाय अमिनो–डायफेनिल ) असेंहि नांव आहे. याची घटना $नऊ. क_{६}उ_{४}क_{६}उनउ_{२}$ अशी असून हा रासायनिक अनाम्ल ( बेस ) आहे. याचा द्विनत्रद्विभानिल ( डायनायट्रो डायभानिल ) घटनेचा जो पदार्थ आहे त्याचें उज्जिदीकरण केलें म्हणजे ऊदिदिन तयार होतो; किंवा अजीव ऊदिना(ॲझोबेंझिन )चें उज्जिदीकरण वंग ( टिन ) आणि उद्धराम्ल ( हायड्रोक्लोरिक ) यानें केलें म्हणजे हा ऊदिदिन तयार होतो. किंवा अजीवऊदिनापासून ऊदिदिन तयार करतांना उद्अजीवऊदिन ( हायड्राझो बेंझिन ) $क_{६}उ_{५}नउ.नउ.क_{६}उ_{५}$ हा पदार्थ प्रथम तयार होतो, आणि नंतर त्याची विशेष चमत्कारिक (पिक्युलिअर ) पुनर्घटना (रि अरेंजमेंट ) होऊन ऊदिदिन हा पदार्थ तयार होतो.

ऊदादिनाचे चपटे स्फटिक ( पाण्यापासुन ) होतात. हे १२२° श उष्णमानावर वितळतात, व ते ३६०° श उष्णमानावर उकळतात. यांचा गंधकित ( सल्फेट ) अति अविद्राव्य असतो. ऊदिदिन हा द्व्यअम्लक अनाम्ल (डायॲसिड-बेस ) असतो. व तो खनिज अम्लाशीं ( मिनरल ॲसिड ) संयुक्त होऊन त्याचे क्षार ( सॉल्ट ) तयार होतात. याचें स्तंभिदीकरण ( ब्रोमिनेटेड ) आणि नत्रितीकरण (नायट्रेटेड ) सहज होतें. गंधकाम्लाचें सान्निध्य असून नत्रितीकरण केलें असतां नत्रिलमूलक ( नायट्रो ग्रुप ) अमिन मूलकांच्या संबंधानें मित ( मेटा पोझिशन ) स्थान व्यापतो. ऊदिदिन याचा व्यापारी दृष्टीनें फार उपयोग आहे. कारण त्याच्या चतुरजीविसंयुक्त पदार्थां( टेट्राझो कॉंपाउन्ड )चा संयोग अमिन गंधकिताम्लाशीं ( ॲमिनो सल्फोनिक ॲसिड्स ) त्वरित होतो. तसेंच भानल कर्बप्राणिलाम्लें ( फिनोल कॅरबाक्झिलिक ॲसिड्स ) आणि भानल ( फिनोल ) आणि नख्तल गंधकिताम्लां( नॅप्थोल सल्फोनिक ॲसिडस )शीं संयोग होऊन त्यापासून बंधक रंग ( सबस्टान्टिव्ह डाइज ) तयार होतात. या वर्गांत म्हणजे बंधकरंगवर्गांत जे रंग येतात ते खालीं दिले आहेत.

( १ ) " क्रिसमाइन " किंवा ' फ्लेव्होफेनाइन " हा रंग हिवराम्ल ( सॅलिसिलिक ॲसिड ) आणि द्विअजीवीतीत ( डाय अझोटिझाइज्ड ) ऊदिदिन ( बेंझिडाइन )यापासून तयार होतो.

(२) " कांगोरेड " हा रंग सिंधु नख्तनित ( सोडियम नॅफ्थिओनेट ) आणि द्विअजीवीतीत ( डाय ॲझोटिझाइज्ड ) ऊदिदिन ( बेंझिडाइन ) यांपासून तयार होतो.

ऊदिदिन ( बेंझिडाइन ) रूपांतरः—गंधवर्गांतील ( ॲरोमॅटिक ) जे उदजीवि ( हायड्रो ॲझो ) संयुक्त पदार्थ आहेत व ज्यांच्यामधील पर–स्थान ( पॅरापोझिशन ) अव्याप्त ( फ्री ) असतें त्यांवर अम्लांची ( ॲसिड्स ); अम्ल हरिदांची ( ॲसिड क्लोराइड्स ) आणि निरुदें ( अनहायड्राइड्स) यांची क्रिया केली म्हणजे त्यापासून द्विभानिल ( डायफेनिल) जन्य पदार्थ तयार होतात. उदाहरणार्थ, वर सांगितल्याप्रमाणें उदजीविऊदिन ( हायड्राझो बेंझिन ) याचें रूपांतर ऊदिदिन ( बेंझिडाइन ) मध्यें होतें. व त्याच वेळीं द्विभानिलचा ( डायफेनिलिन ) अल्पांश तयार होतो. यांच्या गंधकितांची विद्राव्यता निरनिराळ्या प्रमाणांत असल्यानें हे दोन्ही पदार्थ निरनिराळे करतां येतात. या रासायनिक क्रियेला ऊदिदिन ( बेंझिडाइन ) रूपांतर असें म्हणतात. परंतु उदजीवि संयुक्तपदार्थां( हायड्रो कांपाउंड )तील एखादें परस्थान ( पॅरा पोझिशन्स ) आदिष्ट [ सबस्टिट्युटेड] असलें तर द्विभानिल [ डायफेनिल ] जन्य पदार्थ किंवा अजीवि [ ॲझो ] तयार होतात. या विकृतीला अर्धअदिन [ सेमिडाइन ] रूपांतर असें नांव आहे. उदजीवि संयुक्त पदार्थां[ हायड्रोझो कांपाउन्ड ]तील परस्थान [ पॅरापोझिशन ] एकदिष्ट [ मोनोसबस्टियूटेट ] असलें तर त्या उदजीवि [ हायड्रोझा ] संयुक्त पदार्थापासून वंगस हरिदाच्या [ स्टॅनस क्लोराइड ] उद्धराम्लाच्या [ हायड्रो क्लोरिक ॲसिड] द्रवाच्या सांन्निध्यांत---पर द्विभानलजन्य [ पॅरा डायफेनल डेरिव्हेटिव्ह] पदार्थ [आदिष्ट केलेला मूलक नाहींसा होऊन] किंवा आसन्न अर्धादिन [ ऑर्थो सेमिडाइन ], पर अर्धादिन ( पॅरा सेमिडाइन ), किंवा द्विभानिल अनाम्ल ( डायफेनिल बेस ) पदार्थ तयार होतो. याशिवाय एखादा अमिन ( अमाइन ) होऊन पृथक्करण ( डि कांपोझिशन ) हि होतें. आदिष्ट पदार्थांच्या ( सब्स्टिटयूअंट ) धर्माप्रमाणें क्रियेवर

( रिॲक्शन ) विशिष्ट ( स्पेसिफिक ) परिणाम घडतो. उदाहरणार्थ—हर, आणि स्तंभ, ( ब्रोमिन ) हे आदिष्ट झालेले असले तर आसन्न अर्धोदिन ( आर्थो सेमिडाइन ) आणि द्विभानिल ( डायफेनिल ) अनाम्लें ( बेसेस ) हे मुख्यतः तयार होतात. द्विमथिल अमिन ( डायमेथिल अमिनो )—न ( कउ$_3$)$_2$ आणि दारामिन (ॲसेट अमिनो)—नउकप्रकउ$_3$ हे संघ असले तर द्विभानिल ( डायफेनिल ) अनाम्ल ( बेस ) व पर अर्धोदिन ( पॅरा सेमिडाइन ) हे पदार्थ अनुक्रमें तयार होतात. मथिल हा संघ (मेथिल ग्रुप) असला तर मुख्य पदार्थ आसन्न अर्धोदिन ( आर्थो सेमिडाइन ) हा तयार होतो, आणि कर्वप्राणिल ( कॅर्बाक्झिलिक ग्रुप ) हा संघ असला तर द्विभानिल ( डाफेनिल) जन्य पदार्थ हा मुख्यतः तयार होतो.

आसन्न अर्धोदिन ( आर्थो सेमिडाइन ) आणि पर अर्धोदिन (पॅरा सेमिडाइन) यांचे जे निरनिराळे परीक्षक (री एजंट्स ) आहेत. त्यांच्या योगानें हे एकमेकांपासून ओळखतां येतात. जसें:—

( १ ) नत्रसाम्लाच्या( नायट्रस ॲसिड )योगानें आसन्न अर्धोदिना ( आर्थो सेमिडाइन )पासून अजीव-इमिद ( ॲझइमिडो ) पदार्थ तयार होतात, आणि पर अर्धोदिना( पॅरासेमिडाइन )पासून विकट ( कॉंम्प्लेक्स ) द्विअजीवि ( डाय ॲझो ) पदार्थ तयार होतात.

( २ ) पुत्तिकाम्ल ( फॉर्मिक ॲसिड ) किंवा दार्वम्ल ( ॲसेटिक ॲसिड ) यांच्या योगानें आसन्न अर्धोदिना ( आर्थो सेमिदिन )पासून अनाम्ल धर्माचे निरुद ( अनहायड्रो ) संयुक्त पदार्थ तयार होतात आणि पर अर्धोदिना ( पॅरा सेमिडाइन )पासून दारिल ( ॲसिल ) संयुक्त पदार्थ तयार होतात व यांस अनाम्ल धर्म नसतात.

**ऊदिन**-( बेंझिन) क$_6$उ$_6$ ऊदिन या उत्कर्वाचा ( हायड्रोकार्बन ) शोध इ. स. १८२५ सालीं फॅरडे यांनीं लावला. इ. स. १८३४ मध्यें इ. मित्सचेर्लिक यानें ऊदाम्लाचें ( बेंझाइक ॲसिड ) कळीच्या चुन्याशीं शुष्कपातन करून त्यापासून ऊदिन तयार केला; व इ. स. १८४५ मध्यें या उत्कर्वाचें अस्तित्व दगडी कोळशाच्या डामरांत असतें असें हॉफमन यांस आढळून आलें. बेंझाइन हें नांव प्रथम मित्सचेर्लिक यानें दिलें. परंतु त्यास बेंझॉल ( लॅटिन, ओलीयम = ऑईल या शब्दावरून ओल हा प्रत्यय सुचवून ) हें नांव द्यावें असें लीबीग यांनीं सुचविलें. बेंझीन हें नांव हॉफमन यांनीं निश्चित केलें. बेंझाइन हा शब्द कधीं कधीं व्यापारी भाषेंत कोळशाच्या डामरापासून निघालेल्या तेलास लावतात, तसेंच पाषाणतेलापासून जें हलकें पाषाणतेल ( लाइट पेट्रोलियम ) निघतें त्यासहि हाच शब्द योजतात. याचप्रमाणें बेंझोलाईन या शब्दापासून घोटाळा उत्पन्न होतो. " बेंझीन " या शब्दाचा उपयोग आंग्ल रसायनशास्त्रज्ञ करतात. " बेंझोल " हा शब्द जर्मनींत वापरतात आणि " बेंझोलें " हा शब्द फ्रान्समध्यें योजतात. इंग्रजी " बेंझीन " या शब्दाऐवजीं "ऊदिन" हा मराठी शब्द या कोशांत योजिला आहे.

ऊदिन हा मुख्यत्वें कोळशाचें (दगडी)शुष्कपातन धुराच्या दिव्यासाठीं करतांनां जो तेलकट पदार्थ तयार होतो यांत असतें. या तेलकट पाताचें आंशिक ( फ्रॅक्शनल ) पातन केलें म्हणजे १००°श उष्णमानाखालीं जो पात (डेस्टिलेट ) येतो त्यांत ऊदिन असतो. प्रथम ऊदिन तयार करीत. तो दिवे व रबर विद्रुत करण्याकरितांच करीत. हा ऊदिन शुद्ध नसून त्यांत दुसऱ्या सजातीय पदार्थांची मिसळ असे. परंतु " ऊदिनचा " उपयोग जेव्हां डामरी रंग ( कोलटार कलर) तयार करण्याच्या कामीं होऊं लागला तेव्हां शुद्ध ऊदिनाची मागणी फार येऊं लागली. आरंभीं या कामीं शेंकडा ३०;५०व९०च्या प्रमाणाचा ऊदीन लागत असे. शेंकडा ३० प्रमाणाच्या ऊदिनाचा उपयोग निलीन लाल ( अनिलीन रेड ) रंगाकरितां व शेंकडा ९० प्रमाणाच्या ऊदिनाचा उपयोग निलीनवील ( निलीन ब्ल्यू ) रंगाकरितां लागत असे. शेंकडा ३० प्रमाणाच्या ऊदिनाचा अर्थ असा कीं, १००°श उष्णमानाखालीं जो पात येतो त्याच्या शंभर मापांत ( आकारमान ) ३० मापें ऊदिन असतो. निलीनपासून निलीन काळा रंग व दुसरे इतर रंग जेव्हां साध्य झाले तेव्हां अधिक शुद्ध ऊदिनाची जरूर फार वाटूं लागली. ऊदिन शुद्ध करण्याची जी रीत आहे आहे ती मॅन्सफील्ड साहेबानें काढलेली आहे. डामरी तेलाच्या पातनांत १४०°श खालीं जो पात येतो त्यांत मुख्यत्वें ऊदिन ( बेंझिन ), बोलिन ( टोलुइन )आणि ज्वलिन ( झायलिन ) हे पदार्थ असतात. या पाताचें आंशिक ( फॅक्शनल ) पातन केलें म्हणजे ( १ ) विविध बाष्पभावी ( व्हालटाईल )अशुद्ध पदार्थ म्हणजे कर्बद्विगंधकिद ( कार्बन डायसल्फाइड ); (२) ८०°श उष्णमानावर उकळणारा ऊदिनभाग आणि (३) बोलिन ( टोलुइन ) भाग, १००°श उष्णमानावर उकळणारा भाग आणि (४)१४०°श उष्णमानावर उकळणारा ज्वलिन ( झायलिन ) भाग असतात. या निरनिराळ्या भागांत तीव्र गंधकाम्ल घालून ते हालवून चांगले मिश्र करतात. नंतर दाहक सिंधूच्या द्रवानें तें मिश्रण चांगलें धुतात. या धुतलेल्या भागांचें पुनः पातन करतात. बोलिन भागाची गंधकाम्लानें धुण्याची क्रिया अधिक काळजीनें व दक्षतेनें केली पाहिजे. कारण त्यांत बोलिन भागांत गांधिक बोलिन ( थिओटोलुईन ) चें गंधकिलीकरण ( सल्फोनेशन ) गांधिक भानिन ( थिओफीन ) इतकें लवकर होत नाहीं.

ऊदिन हा निर्वर्ण, नितळ व वक्रीभवन होणारा रसरूप पदार्थ आहे. त्यास आल्हादक वास असतो. याच्या शीततेनें स्फटिक करतां येतात. ते ५.४°श वर वितळतात. हा रसरूप ऊदिन ८०.४ वर उकळतो. याची वाफ फार ज्वालाग्राही असते, व त्याची ज्योत अतिशय धूम्रयुक्त

असते. ०° श वर याचें वि. गु. ०·८९९असतें. ऊदिन पाण्यांत फार अविद्राव्य असतें. अल्कहलमध्यें अधिक विद्राव्य असून इथ ( ईथर ), दार्वम्ल ( असेटिक ॲसिड )आणि कर्बद्विगंधकिद ( कार्बन डाय सल्फाइड ) यांत पूर्ण विद्राव्य आहे. गोंद, राळ, चरबी ( वसा ) वगैरे पदार्थांस द्रवीभूत करण्याच्या कामीं ऊदिन उत्तम द्रावक आहे. ऊदिनांत गंधक, स्फुर ( फास्फोरस ) आणि अद ( आयोडिन ) हे सुद्धां विद्रुत होतात.

ऊदिनवर नत्राम्लाची किंवा तीव्र गंधकाम्ल व नत्राम्ल ( सममापें ) यांच्या मिश्रणाची क्रिया केली असतां अतिशय झपाट्यानें रासायनिक क्रिया सुरू होते. त्यांतुन रक्तासारख्या लाल रंगाचा धूर निघावयास लागून सर्व द्रव तांबडा लाल होतो. हा द्रव त्याच्या पुष्कळपट पाण्यांत ओतला म्हणजे पाण्याच्या तळाशीं वजनदार तैलधर्मांचा पदार्थ निपात पावतो. हा पदार्थ नत्रिलऊदिन ( नायट्रोबेंन्झिन ) = क$_{६}$ उ$_{५}$ नप्र$_{२}$ होय. यांत होणारी रासायनिक क्रिया खालीं दाखविली आहे.



ऊदिन क$_{६}$उ$_{६}$ + नत्राम्ल नप्र$_{२}$.प्रउ = नात्रिलऊदिन क$_{६}$उ$_{५}$नप्र$_{२}$ + पाणी उ$_{२}$प्र

या प्रयोगांत जो लाल धूर उत्पन्न होतो ती उपक्रिया (सेकंडरी री ॲक्शन ) झाल्यानें उत्पन्न होतो. ती उपक्रिया वरील समीकरणांत दाखविली नाहीं. यांत गंधकाम्लाचा उपयोग नत्राम्लांतील पाण्याचा अंश शोषण करण्याकरितां केला आहे. कारण मंद नत्राम्लाचें ( बुईक ) कार्य ऊदिनावर घडत नाहीं. या नात्रिल ऊदिनास अतिशय उग्र, कडू बदामासारखा वास असतो. याचा अल्कहलांत द्रव करून गंधीं लोकांनां "मिरवेनएसेंन्स" या नांवानें विकण्यांत येतो. मोठ्या प्रमाणांत नत्रिल ऊदिन विषारी पदार्थ आहे. नत्रिलऊदिनाचा उपयोग निलीन ( आनिलीन ) तयार करण्याकडे करतात. याचे ०° श वर वि. गु. १.२ असून तो २०६° श वर उकळतो.

वर सांगितलेलें नत्राम्ल व गंधकाम्ल यांच्या सममापांत केलेलें मिश्रण घेऊन तें ऊदिनाबरोबर उकळलें व नंतर तें थंड केलें तर त्यांत पिंवळ्या रंगाचे घन स्फटिक तळाशीं बसतात. यांची घटना क$_{६}$उ$_{४}$(नप्र$_{२}$)$_{२}$ असून त्यास द्विनात्रिल ऊदिन ( डायनायट्रोबेंन्झिन ) असें नांव आहे. याचा उपयोग कांहीं प्रकारचे स्फोटक पदार्थ तयार करण्याकडे करितात. द्विनात्रिल ऊदिन तयार होण्याची रासायनिक क्रिया खालीं दाखविली आहे.



ऊदिन क$_{६}$उ$_{६}$ + नत्राम्ल २(नप्र$_{२}$.प्रउ) + द्विनात्रिलऊदिन क$_{६}$उ$_{४}$(नप्र$_{२}$)$_{२}$ + पाणी २उ$_{२}$प्र

नुसतें तीव्र गंधकाम्लसुद्धां उदिनांतील उज्जःच्या कांहीं भागाचें प्राणिदीकरण करतें. याकरितां हें मिश्रण उष्ण करावें लागतें. ऊदिनाच्या उज्जच्या स्थानीं गंधकिलमूलक ( सल्फोनिक ग्रुप ) किंवा गंधकाम्लाचा शेष ( सल्फ्युरिक ॲसिड रेसिड्यु ) गप्र$_{२}$प्रउ हा निविष्ट होतो.

नात्रिलमूलक नप्र$_{२}$ आणि नत्राम्ल नप्र$_{२}$.प्रउ यांचा जो परस्पराशीं संबंध आहे तोच संबंध गंधकिलमूलक गप्र$_{२}$प्रउ आणि गंधकाम्ल गप्र$_{२}$(प्रउ)$_{२}$ यांच्यामध्यें आहे. जसेः—



ऊदिन क$_{६}$उ$_{६}$ + गंधकाम्ल गप्र$_{२}$(प्रउ)$_{२}$ = पाणी उ$_{२}$प्र + ऊदिनगंधिकल क$_{६}$उ$_{५}$.गप्र$_{२}$प्रउ

नुसत्या गंधकाम्लाऐवजीं धूमोद्गावी (फ्यूमिंग सल्फ्युरिक ॲसिड) गंधकाम्लाचा उपयोग केल्यास ऊदीन मधील दुसरा उज्जचा परमाणु गंधकिलमूलकानें निःसारित होतो जसेः—

ऊदिन क$_{६}$उ$_{६}$ + धूमोद्गावी गंधाकाम्ल २गप्र$_{२}$ (प्रउ)$_{२}$ = पाणी २उ$_{२}$प्र + ऊ. द्विगंधकिला. क$_{६}$उ$_{४}$(गप्र$_{२}$प्रउ$_{२}$).

ऊदिनवर हरवायूची क्रिया केली व हरची रासायनिक क्रिया सुलभ होण्याकरितां थोडासा अद घातला तर एक हरऊदिन क$_{६}$उ$_{५}$ह तयार होतो. एकंदर ऊदिन हा रसरूप असून त्यास बदामासारखा तीव्र वास असतो. त्याचा उत्क्वथन बिंदु १३२° श. असतो. यावर दाहक अल्कांची क्रिया घडते व यामुळें याचें पृथक्करण होत नाहीं. परंतु पाणी आणि सिंधु मेल ( सोडिअम अमलगॅम) याची क्रिया केली म्हणजे त्याचें रूपांतर पुनः ऊदिनांत होतें. वरीलप्रमाणें हरची क्रिया ऊदिनवर पुढें चालू ठेविल्यास खालील प्रमाणें पदार्थ तयार होतातः—

द्विहर ऊदिन ( डायक्लोरोबेन्झिन ) क$_{६}$उ$_{४}$ह$_{२}$
त्रिहर ऊदिन ( ट्रायक्लोरो बेन्झिन ) क$_{६}$उ$_{३}$ह$_{३}$
चतुर्हर ऊदिन ( टेट्राक्लोरो बेन्झिन ) क$_{६}$उ$_{२}$ह$_{४}$
पंचहर ऊदिन ( पेंटाक्लोरो बेन्झिन ) क$_{६}$उ$_{१}$ह$_{५}$
षट्हर ऊदिन ( हेक्झाक्लोरो बेन्झिन ) क$_{६}$ह$_{६}$

हे सर्व स्फटिकरूप घन पदार्थ आहेत.

या आदिष्ट ( सब्स्टिट्यूशन ) पदार्थांशिवाय ऊदिनापासून सम्मीलित ( ॲडिशन ) पदार्थहि हरच्या क्रियेनें तयार होतात. उदाहरणार्थ ऊदिन द्विहरिद [ बेंझिन डायक्लोराइड ] क$_{६}$उ$_{६}$ह$_{२}$; ऊदिन चतुर्हरिद( बेंझिन टेट्राक्लोराइड) क$_{६}$उ$_{६}$ह$_{४}$, ऊदिन षट्हरिद [ बेंझिन हेक्झाक्लोराइड ] क$_{६}$उ$_{६}$ह$_{६}$. या सम्मीलित पदार्थांच्या अंगीं आदिष्ट पदार्थांइतकी स्थिरता नसते. उदाहरणार्थ ऊदिन षट्-हरिदावर अल्कहल विद्रुत पालाशची क्रिया केली म्हणजे त्याचें रूपांतर त्रिहर ऊदिन होतें. हें अंशमात्र पृथक्करण खालील समीकरणानें दाखविलें आहे.

उदिनषट्ह. क$_{६}$उ$_{६}$ह$_{६}$ + दाहकपालाश ३पाप्रउ = त्रिहरऊदिन क$_{६}$उ$_{३}$ह$_{३}$ + पाला.ह. ३पाह + पाणी ३उ$_{२}$प्र

ऊदिनापासून पुष्कळ संयुक्त व उपयुक्त पदार्थ तयार होत असल्यानें व त्यांचा कलाकौशल्याच्या कामांत अतिशय उपयोग होत असल्यानें, ऊदिन व्यापारी दृष्टीनें फार महत्वाचा पदार्थ आहे. रसायनशास्त्राच्या दृष्टीनें ऊदिन हा

फार चित्ताकर्षक व कुतूहलोत्पादक पदार्थ आहे. ज्यांस गंधित [ अरोमॅटिक ] किंवा ऊदिनोद [ बेंझोनॉइड ] पदार्थ म्हणतात. ते सर्व यापासून बहुतेक तयार होतात.

ऊदिनची वाफ रक्तोष्णमानावर असलेल्या नळींतून नेली असतां ती उज्ज, द्विभानिल, [ डायफेनिल ] द्विभानिल ऊदिन [ डायफेनिल बेंझिन्स ] आणि दारिलिन [ ॲसिटायलीन ] पदार्थ तयार होतात. दारिलीन तयार होणें हें विपर्यस्त क्रियेचें [ रिव्हर्सिबल ॲक्शन ] उदाहरण आहे; दारिलिनची वाफ रक्तोष्णमानावरील नळींतून नेली असतां ऊदिन होतो असें बर्थेलॉट यास आढळून आलें आहे. प्राणिदीकारकास ऊदिन हा फार स्थिर पदार्थ आहे, व यावरून प्राणिदीकरणांस ऊदिनची बीजनाभि अतिशय अवरोधक असल्यानें ऊदिनचें हें लक्षणच समजलें गेलें आहे. मंगलद्विप्राणिद ( मँगनीज डायऑक्साइड ) आणि गंधकाम्ल यांची क्रिया ऊदिनवर केली म्हणजे त्यापासून ऊदाम्ल ( बेंझॉइक ॲसिड ) व ऋजु फ्थालिक अम्ल ( ऑर्थो फ्थालिक ॲसिड ) यांत रूपांतर होतें. पालाशहरित आणि गंधकाम्ल यांच्या योगानें ऊदिनच्या बीजनाभीचें खंडन होतें. ओषण( ओझोन )च्या योगानें ऊदिनचें प्राणिदीकरण होऊन भयंकर स्फोटकद्रव्य $क_६ उ_६ प्र_६$ या घटनेचें तयार होतें. या स्फोटकद्रव्यास ओषण-ऊदिन ( ओझोनेंझिन ) असें म्हणतात. हें पांढरें शुभ्र घनद्रव्य असतें. उद-अदाम्लाच्या योगानें ( हायड्रो आयोडिक ॲसिड ) ऊदिनचें उज्जिदीकरण होऊन त्याचें रूपांतर षट्मथिलीन [ हेक्झामेथिलीन ] किंवा षट्ऊद-ऊदीन [ हेक्झा हायड्रो बेंन्झिन ] असें होतें. हर आणि स्तंभ यांच्या योगानें ऊदिनचें आदिष्ट [ सबस्टिटयूशन ] व संम्मीलित [ ॲडिशन ] पदार्थ तयार होतात, परंतु ही क्रिया योगवाहकाच्या [ कॅटॅलिटिक एजंट ] अभावीं फार सावकाश व मंद होते; याकरितां अद [ आयोडिन ], मोलब्दहरिद [ मॉलिब्डेनुम क्लोराइड ] किंवा लोहहरिद ( फेरिकक्लोराइड ) या योगवाहकाची योजना हरच्या बाबतींत व स्फट स्तंभिद [ ॲल्युमिनियम ब्रोमाइड ] या योगवाहकाची योजना स्तंभाच्या बाबतींत करतात. याचें नत्रितिकरण तावडतोब होतें, व नत्र-ऊदिन [ नायट्रोबेंझिन ] तयार होतें. आणि तीव्रगंधकाम्लासारख्या उदकशोषक [ डिहायड्रेटर ] पदार्थाचें सान्निध्य असल्यास, दोन किंवा तीन नत्रिल मूलकें हीं ऊदिनच्या बीजनाभीमध्यें [ बेंन्झिन न्युक्लुअस ] आदिष्ट [ सब्स्टिटयूट ] करतां येतात. गंधकाम्लाच्या योगानें ऊदिनपासुन गंधकाम्ल [ बेंन्झिन सल्फोनिक ॲसिड ] तयार होतें.

**ऊदिल अल्कहल**-[बेंझिल आल्कोहोल]$क_६ उ_५ कउ_२ प्रउ$ ऊदिल अल्कहलाचें दुसरें नांव भानिल कर्बिनल ( फेनिल कार्बिनोल ) असें आहे. हा अल्कहल सृष्टीमध्यें बराच आढळतो. पेरू धूपांत ऊदिल अल्कहल, ऊदाम्लाच्या ( बेंझोइक ईस्टर ] संयुक्त इथ्रच्या रूपानें, दारु गंधाम्लाच्या [ सिनॅमिक ॲसिड ] संयुक्त इथ्र रूपानें टोलूच्या धूपांत [ टोलु बलसाम ] आणि जाई, मोगरा यांच्या अत्तरांत, तसेंच शिला पुष्पांत [ स्टोरॅक्स ]हा अल्कहल असतो.

कृत्रिम रूपानेंहि हा अल्कहल तयार करतां येतो. ( १ ) ऊदायिल हरिदाचें [बेंझोयिक क्लोराइड ]उज्जीकरण ( रिडक्शन ] केल्यानें. (२) ऊदिल आमिना [ बेंझिल अमिन ]वर नत्रसाम्लाची [ नायट्रस ॲसिड ] क्रिया केल्यानें.(३)ऊदिल हरिद ( बेंझिल क्लोराइड ) पालाश कर्विता( पोटॅशिअम कार्बोनेट )च्या द्रवांत उकळल्यानें किंवा [४] ऊदिल प्रायोज्जिद ( बेंझि आल्डिहाइड ) दाहक पालाशाच्या द्रवांत हलविल्यानें ऊदिल अल्कहल तयार होतो. या चवथ्या क्रियेंत ऊदिल प्रायोज्जिदापैकीं अर्ध्याचें प्राणिदीकरण होऊन ऊदाम्ल होतें आणि दुसऱ्या अर्धाचें उज्जीकरण होऊन ( रिडक्शन ) अल्कहल होतो. या क्रियेस "कानिझरो क्रिया" असें म्हणतात. ही क्रिया खालील समीकरणानें दाखविली आहे.




हा वर्णहीन द्रव असून यास सौम्य सुगंध असतो. हा २६०°शवर उकळतो. नत्राम्लानें याचें प्राणिदीकरण(ऑक्सिडेशन ) केलें म्हणजे ऊदिल प्रायोज्जिद होतें आणि कुमाम्लाच्या ( क्रोमिक ॲसिड ) योगानें त्याचें ऊदाम्ल होतें. उत् अदाम्ल (हायड्रो आयोडिक ॲसिड)आणि स्फुर ( फास्फरस ) च्या योगानें १४०° श मानावर त्याचें रूपांतर बोलिन ( टोलुइन ) मध्यें होतें आणि दाहकपालाशाचा अल्कहल युक्तद्रवाबरोबर याचें पातन ( डिस्टिलेशन ) केलें म्हणजे बोलिन व ऊदाम्ल हीं दोन्हींहि होतात.

**ऊदिल प्रायोज्जिद** ( बेन्झाल्डिहाइड ).—ऊदिल-प्रायोज्जिद यास कडू बदामाचें तेल म्हणतात. याची घटना $क_६ उ_५ कउप्र$ अशी असून गंधप्रायोज्जिदा( ॲरोम्याटिक ) च्या वर्गांतील पदार्थांचा हा अगदीं साधा दर्शक प्रायोज्जिद आहे. याचा शोध प्रथम १८०३ मध्यें लागला. इ. स १८३७ मध्यें लीबीगनें याचें परिशीलन केलें. ऊदिल-प्रायोज्जिद $क_६ उ_५ कउप्र$ कडू बदामांत असणाऱ्या बादामिन [ अमिग्डालिन ] $क_{२०} उ_{२७} नप्र_{११}$ शीं संयुक्त असून चिक्किदा [ ग्लुकोसाईड ]च्या रूपानें असतें. कडू बदामाशिवाय अन्य वनस्पतिजन्य फळें, पानें वगैरे मध्येंहि हा बादामिन चिक्किद असतो. एक विशेष प्रकारचा बलकिद-[ आल्बुमिनाइड ] फेन [ फरमेंट ] वनस्पतीमध्यें असतो त्यावर याचें कार्य होऊन त्याचें पृथक्करण होतें व ऊदिल प्रायोज्जिद उत्कनाम्ल आणि द्राक्षशर्करा [ डेक्स्ट्रोस ]

यांत रूपांतर होतें तें खालील रासायनिक समीकरणानें दाखविलें आहे.

बादामिन + पाणी = उत्कनाम्ल + द्राक्षशर्करा + ऊदिलप्रा.
$क_{२०}उ_{२७}नप्र_{११}$ + $२उ_{२}प्र$ = उत्कन + $२क_{६}उ_{१२}प्र_{६}$ + $क_{७}उ_{६}प्र$

उत्कनाम्लाचें अस्तित्व असल्यानें कडू बदामाचें तेल विषारी असतें

ऊदिल प्रायोज्जिद हा पदार्थ कृत्रिम रीतीनें पुष्कळ तऱ्हेनें तयार करता येतो.

[ १ ] ऊदिल अल्कहल [ बेंझिल अल्कहलाचें प्राणिदीकरण [ ऑक्सिडेशन ] केल्यानें.—

ऊदिल अल्कहल + प्राण = ऊदिल प्रायोज्जिद + पाणी
$क_{६}उ_{५}.कउ_{२}प्रउ$ + प्र = $क_{६}उ_{५}कउप्र$ + $उ_{२}प्र$

हें तयार होतें

( २ ) नवजात ( नॅसंट हायड्रोजन ) उज्जाची क्रिया ऊदाम्ल( बेंझॉइक ॲसिड )च्या हरिदावर ( क्लोइाइडवर ) म्हणजे ऊदायिल हरिदावर केली असतां. जसें:—

ऊदायिल हरिद + उज्ज = ऊदिल प्रायोज्जिद + उद्धराम्ल
$क_{६}उ_{५}.कउह$ + $२उ$ = $क_{६}उ_{५}$ कउप्र + उह

( ३ ) ऊदलहरिदावर [ बेंझल क्लोराइड ] पाण्याची किंवा कळीचुन्याची [ जलद्रव ] क्रिया केली म्हणजे; जसें:—

ऊदल हरिद + पाणी = ऊदिलप्रायोज्जिद + उद्धराम्ल
$क_{६}उ_{५}.कउह_{२}$ + $उ_{२}प्र$ = $क_{६}उ_{५}.कउप्र$ + २उह

( ४ ) ऊदाम्ला( बेंझाइक ॲसिड )चें उज्जिदीकरण ( रिडक्शन ) केल्यानें ऊदिल प्रायोज्जिद तयार होतें. परंतु या रीतींत प्रत्यक्ष ऊदाम्ल न घेतां खटऊदित व खटपुत्तकित [ क्याल्शिअम फॉर्मेट ] यांच्या मिश्रणाचें निर्जल म्हणजे शुष्कपातन करावें लागतें; इत्यादि अनेक रीती आहेत. परंतु व्यापारी ऊदिलप्रायोज्जिद मोठ्या प्रमाणावर करण्याची रीत म्हटली म्हणजे बोलिन [ टोलुइन ] पासून करतात. बोलिनपासून ऊदिल हरिद [ बेंझिल क्लोराइड ] तयार करून तो सीसनत्रिता[ लेडनायट्रेट ]बरोबर उष्ण करतात; जसें:—

ऊदिलहरिद + सीसनत्रित = नत्रद्विप्राणिद +
$क_{६}उ_{५}.कउ_{२}ह$ + $स[ नप्र_{३} ]_{२}$ = $२नप्र_{२}$ +

+ हरिद अनाम्लसीस + ऊदिल प्रायोज्जिद
सह. प्रउ $क_{६}उ_{५}$ कउप्र

कडू बदामाच्या तेलांत ऊदिल प्रायोज्जिदाचें प्रमाण शेंकडा १.५ २ ते पर्यंत असतें.

शुद्ध ऊदिल प्रायोज्जिद हें पातळ वर्णहीन रस रूप असून त्याच्या अंगीं विलक्षण वक्रीभवनाचा धर्म आहे. यास एक प्रकारचा सुगंध वास असतो. हें १७९° श वर उकळतें. त्याचें वि. गु. १.०५ असतें. हें पाण्यांत फार अल्प प्रमाणांत विद्रुत होतें; परंतु अल्कहल व इथ्र [ईथर] यांत सर्व प्रमाणांत विद्रुत होतें. त्यांत पाणी मिसळलें म्हणजे ऊदिल प्रायोज्जिदांचा निपात [ प्रेसिपिटेट ] होतो. वातावरणाच्या सान्निध्यांत त्याचें प्राणिदीकरण होऊन ऊदाम्लांत तें रूपांतर पावतें. दार्वम्ल [ असेटिक ॲसिड ] वर्गांतील जीं प्रायोज्जिदें आहेत त्यांचें उज्जिदीकरण [ रिडक्शन ] धातूंच्या क्षारांवर जितकें होतें त्यापेक्षां या प्रायोज्जिदाचें कार्य कमी होतें. ऊदिल प्रायोज्जिद सिंधु गंधकायिताच्या दाट ( सोडियम सल्फाइट ) द्रवांत विद्रुत होतें. आणि या द्रवांत पातळ गंधकाम्लाच्या द्रवाचा एकएक थेंब घातला तर ऊदिल प्रायोज्जिद आणि अम्ल गंधकायित ( ॲसिड सल्फाइड ) यांचा संयोग होऊन तें स्फटिक रूपानें $क_{७}उ_{६}प्र.$ $धुउगप्र_{३}$ निपात पावतें. हा द्रव उष्ण केला म्हणजे स्फटिक विद्रुत होतात, पण थंड होऊं लागतांच पुनः निपात पावतात.

अम्न (अमोनिया ) च्या योगानें ऊदिल प्रायोज्जिदाचें रूपांतर उद–ऊदामिदांत ( हायड्रो बेंझ अमाइड ) $क_{६}उ_{५}क$ $उ_{३}$ $न_{२}$ होतें. हें पांढरें स्फटिक रूप असतें. ही रासायनिक क्रिया खालीं दाखविली आहे.

ऊदिल प्रायोज्जिद + अम्न = उद–ऊदामिद + पाणी
३( $क_{६}उ_{५}.कउप्र$ ) + $२नउ_{३}$ = $(क_{६}उ_{५}.कउ)_{३}न_{२}$ + $३उ_{२}प्र$

सर्व गंध वर्गांतील प्रायोज्जिदांचें कार्य अम्नवर याप्रमाणें होतें. व त्यायोगें चर्बीवर्गाचीं प्रायोज्जिदें आहेत त्यांपासुन यांस ओळखतां येतें.

ऊदिल प्रायोज्जिदाची ( कडू बदामाच्या तेलाची )परीक्षा करण्याची उत्तम रीत म्हटली म्हणजे तें थोडाशा दाहक पालाशाबरोबर परीक्षानळींत उष्ण करावें आणि तें थंड झाल्यावर त्याचा पाण्यांत द्रव करावा व त्यांत उद्धराम्ल घालावें म्हणजे पिसासारखे ऊदाम्लाचे स्फटिक निपात पावतात.

**ऊदिल भानन** ( बेंझोफिनोन ) $क_{६}उ_{५}.कप्र.क_{६}उ_{५}$ ऊदिलभानन यास द्विभानिल कितन ( डायफेनिल केटोन ) असेंहि दुसरें एक नांव आहे. याची घटना $क_{६}उ_{५}.कप्र.क_{६}उ_{५}$ अशी असून गंधवर्गांतील ( ॲरोमॅटिक ) जे खरे कितन ( केटोन ) आहेत त्यांचा हा दर्शक ( रिप्रेझेंन्टेटिव्ह ) आहे. ऊदिलभानन तयार करण्याच्या पुष्कळ रीती आहेत त्यापैकीं कांहीं खालीं दिल्या आहेत.

( १ ) खटऊदित [ कॅलशिअम बेंझोएट ] याचें शुष्क [ ड्राय ] पातन केलें म्हणजे ऊदिलभानन तयार होतो. किंवा

( २ ) ऊदायिल हरिदाची [ बेंझोयिल क्लोराइड ] क्रिया ऊदिन [ बेंझीन ] वर निर्जल स्फटंहरिदाच्या [ ॲल्युमिनिअम क्लोराइड ] सान्निध्यांत केली असतां जसें.—

ऊदिन + ऊदायिल हरिद + स्फटहरिद =
$क_{६}उ_{६}$ + $हकप्रक_{६}उ_{५}$ + [ $स्फह_{३}$ ] =

ऊदिलभानन + उद्धराम्ल
= $क_{६}उ_{५}.कप्र.क_{६}उ_{५}$ + उह

( ३ ) कर्बनिल हरिदाची [ कारबोनिल क्लोराइड ] क्रिया ऊदिनवर निर्जल स्फट हरिदाच्या [अल्युमिनम क्लोराइडच्या] सांनिध्यांत केली म्हणजे; जसें:—

ऊदिन + कर्बनिल हरिद स्फटंहरिद
$_{२}$क$_{६}$उ $_{६}$कप्रह$_{२}$ + [ स्फह$_{३}$ ] =
ऊदिलभानन उद्धराम्लें
= क$_{२}$उ$_{५}$ कप्र क$_{६}$उ$_{५}$ + $_{३}$उह.

हा द्विस्फटिकरूप ( डाय मॉरफस ) पदार्थ असून त्याचीं दोन रूपें असतात, तीं सव्य अपसव्य असतात. त्यास इंग्रजी नाव एनॲंटिओट्रॉपिक फार्म्स असें आहे. यांपैकीं एकरूप २६° श वर वितळतें व दुसरें ४८° श वर वितळतें. याचा उत्क्वथनबिंदु ३०६.१° श असतो. अस्फटिकरूप स्फुराच्या [ डायमॉरफस फास्फोरस ] सान्निध्यांत उज्ज-अदाम्ला [ उज्ज हें रूप योजल्यास उज्ज अदाम्ल व उज्ज-हें रूप योजल्यास उद् अदाम्ल = हायड्रॉ आयोडिक ॲसिड ] च्या योगानें याचें रूपांतर द्विभानिल मधून [ डाय फेनिल मिथिन ] [ क$_{६}$उ$_{५}$ ]$_{२}$कउ$_{२}$ मध्यें होतें. पालाशबरोबर याची द्रावणक्रिया [ फ्यूझन ] केली म्हणजे त्याच्या रूपांत ऊदिन व ऊदाम्ल [ बेंझॉइक ॲसिड ] यांमध्यें होतें. ऊदिभाननजन्य पुष्कळ पदार्थ आहेत. त्यांपैकीं त्रिमथिल-द्विअमिद-ऊदिलभानन [ ठेट्रा मेथिल डाय अमिडो बेंझोफिनोन ] किंवा ज्यास मिचलेरचा कितन [ केटोन ] ह्मणतात. तो कप्र [ क$_{६}$उ$_{४}$न. ( कउ$_{३}$ )$_{२}$ ]$_{२}$ हा फार महत्त्वाचा पदार्थ आहे. हा १७३° श वर वितळतो. औद्योगिकदृष्ट्या हा उपयुक्त पदार्थ आहे. कारण विविध प्रकारच्या पदार्थांशीं याचें घनीकरण [ कंडेन्सेशन केलें म्हणजे त्यापासून रंग तयार होतात. कर्बनिल हरिदा [ कार्बोनिल क्लोराइड ]ची क्रिया द्विमथिल नीलिन [ डायमेथिल अनिलाइन ]वर स्फटहरिदाच्या [ ॲल्युमिनियम क्लोराइड ] सान्निध्यांत केली ह्मणजे हा पदार्थ तयार होतो जसें:—

कर्बोनिल हरिद + द्विमथिल नीलिन
कप्रह$_{२}$ + $_{२}$क$_{६}$उ$_{५}$.न ( कउ$_{३}$ )$_{२}$ =
= उद्धराम्ल + मिचलेरचा कितन
$_{२}$उह + कप्र[क$_{६}$उ$_{४}$.न(कउ$_{३}$)$_{२}$ ]$_{२}$

**ऊधमबाई.**—या हिंदस्त्रीचें दिल्लीच्या महंमदशहा बादशहा बरोबर लग्न झालें होतें. अहंमदशहा बादशहाची ही आई; तो गादीवर बसला तेव्हां ( १७४८ ) हिला नबाबबाई, नबाब कुदसिया आणि साहिब झमानी अशा पदव्या मिळून, हिचा भाऊ जो मानखान याला ६००० ची दरकदारी देऊन मोतकीद–उद्दौला ही पदवी देण्यांत आली. वजीर गाजीउद्दीन यानें अहंमदशहाला कैद करून ( अहंमदशहा पहा.) त्याचे डोळे काढले तेव्हां हिचेहि काढले ( १७५४ ) होते.

अहमदशहाचा वजीर सफदरजंग व शहा यांचा वेबनाव मे १७५३ त झाला. त्यावेळीं या बाईनें वजीराच्याविरुद्ध कारस्थान उभें केलें. त्यावेळीं दरबारांत असलेला खोजा-जावेद हा हिचा मदतगार असे. या दोघांचें अंतःसख्य असून त्यांच्या दुष्कृत्यांची चर्चा राजधानींत उघड होई. शहा या दोघांच्या तंत्रानें वागे ( म. रि. म. वि. ३. पृ. २५ ).

**ऊरुस्तंभ.**—आर्यवैद्यक व आंग्लवैद्यक या दोहोंमधील या रोगाचा उद्भव कारणें व चिकित्सा या संबंधीं दक्षिण व उत्तर ध्रुवाइतका फरक दिसून येतो. लक्षणामध्यें मात्र बरेंच साम्य दिसून येतें. या रोगाचें कारण पृष्ठवंशरज्जु म्हणून जो मज्जासंस्थेचा भाग आहे त्यांत दाहक्रिया सुरू होणें हें होय. पाठीस मार, इजा, अतिजड ओझीं उचलणें. पाठीच्या कण्याजवळ झालेली शस्त्राक्षतें पसरून त्यांचा या ठिकाणीं शिरकाव होणें पृष्ठवंशरज्जूवर दाब पडणें मणक्यांचीं हाडें कुजणें व तेथें अस्थिव्रण होणें ग्रंथिरोगाचा तेथें दाब पडणें, सांथीच्या ज्वरानंतर व एरवींहि शरीरांत दूषित जंतूंचा प्रवेश होणें, हीं नेहमींचीं कारणें आहेत. फिरंगोपदंश हाहि एक सबळ कारण असून थंडी, गारठा व ओल यामुळेंहि हा रोग होतो. पृष्ठवंशरज्जूचा छेद केला असतां त्याच्या गाभ्यांत करड्या रंगाचा जो भाग असतो त्यांतील पूर्व शृंगाकार भागांमध्यें दाहक्रिया सुरू झाल्यामुळें त्यांतून मनाची इच्छा व संवेदनाप्रदर्शक खालीं व वर मज्जातंतूवाटें संदेश येणें व जाणें सर्वस्वीं बंद पडतें. विकृत भागांतील काठिण्य वाढत जातें. पृष्ठवंशरज्जूंतील कमी अगर अधिक अगर वरील, मध्य किंवा खालील भागांत रोग असेल त्यामानानें भेद व लक्षणें वेगळीं होतात.

लक्षणें:—विकृत (हाता पायांत) भागांत बधिरता, मुंग्या येणें; व आरंभीं अंग मोडून येणें व थोडा ज्वर हीं लक्षणें होऊन नंतर पायांत व हातांत कळा येतात. कधीं पेटके स्पर्शसंवेदनाधिक्य कंप, पाठींत वेदना हीं लक्षणें प्रथमच्या दाहावस्थेचीं सूचक आहेत. एक दोन दिवसानंतर हे हात पाय चेतनाशून्य व स्पर्शसंवेदनशक्तिहीन होतात. यांतील अनेक उपभेदानुसार अनेक लक्षणें होतात. तीं विस्तारभयास्तव देतां येत नाहींत. लेकरांत आढळून येणारा एक भेद आहे. हें लक्षांत ठेवावयाचें कीं, पृष्ठवंशरज्जु हा मज्जाभाग मानेपासून माकड हाड अगर पुच्छास्थिपर्यंत असतो; म्हणून हा या दोन शेवटांमध्यें कोठेंहि दाहक्रियेमुळें तो विकृत झाला असतां विकृत मज्जाभागाच्यावरील शरीराचा भाग रोगरहित व चलनशील व त्या मज्जाभागाच्या खालील शरीर अर्धांगवायुरोगाप्रमाणें मात्र दोन्ही बाजूस जड, डुलें व चेतनाविहीन असतें. हात अगर पाय तर राहो पण एखादें दुसरें बोटहि हलवितां येत नाहीं. बेंबीच्या जरा वर अगर खालपर्यंतचा ऊरुस्तंभरोगभेद अधिक प्रमाणांत आढळतो. बेंबीच्या रेषेवर स्पर्शज्ञान शाबूत व खालीं तें ज्ञान अगदीं नाहीं; सुई टोंचलेली कळत नाहीं, ढेंकूण चावलेले समजत नाहींत, मलशुद्धि बस्तीशिवाय अगर औषधाशिवाय होत नाहीं. व लघवीहि मूत्रनलिकेनें काढल्याशिवाय होत नाहीं. परंतु कांहीं दिवसांनीं मूत्र कोंडून मूत्राशय फुगून मूत्र थेंब थेंब आवरतां न आल्यामुळें

वहात असतें. अंथरुणांत पडून राहिल्यानें दीर्घकाल जाग्यावर शय्याक्षतें पडतात. नंतर हातांत अगर पायांत ताठपणा फार येतो. कमरेखालीं दाहरोग असल्यास हातापायाचे स्नायु पोषकमज्जातंतू विकृत झाल्यामुळें रूक्ष व निस्तेज आणि रोड होतात; व नकळत मलमूत्र विसर्जन तावा नसल्यामुळें होतें. मानेमध्यें विकृतस्थान असल्यास वरील सर्व प्रकार आढळून अधिक भयंकर स्थिति होते. ती अशी कीं, हातांतील व श्वसनक्रियेचे स्नायू व श्वसन मध्यपटलनायक मोठा स्नायु चेतनाहीन होतात व त्यामुळें कफसंचय, दम, श्वास उत्पन्न होऊन रोगी गुदमरतो. त्यामुळें हृदयक्रिया अनियमितपणें व जलद चालते. ज्वरातिशय, अन्न गिळतां न येणें, उचकी हींहि लक्षणें होतात. नाना तऱ्हेचे आगंतुक दोष उत्पन्न होऊन रोगी त्यापैकीं एखाद्यानें अगर अनेकांमुळें दगावतो अगर त्याचें दीर्घकालीन रोगांत रूपांतर होतें अगर रोगी कांहींसा सुधारण्याच्या पंथास लागतो.

रो ग नि दा नः—इतर मज्जारोग नाहींत व ऊरुस्तंभरोगच आहे अशी खात्री करून घेणें हें वैद्य डाक्टरांचें काम आहे. परंतु एखाद्या वातोन्माद अगर गर्भाशयोन्माद रोगाच्या मनुष्यास मानसिक दुर्बलतेमुळे हात पाय लुले पडून त्यास सर्व मज्जातंतु शाबूत असून अशा सारखीं लक्षणें होतात. त्यामुळें वैद्यानें फसतां कामा नये. तसेंच दीर्घकालीन दुखण्यांतून उठल्यावर अथवा अतिश्रम केल्यामुळें मेंदु व पृष्ठवंशरज्जु शाबूत असून केवळ श्रमातिशय व थकव्यामुळें त्यांजवर मनाची हुकमत चालेनाशी होते. ही स्थिति वैद्यास जाणता आली पाहिजे.

उ प चा रः—शय्याक्षतें होऊं नयेत म्हणून अति मउ बिछान्यावर दीर्घकाल पडून पूर्ण विश्रांति रोग्यास मिळाली पाहिजे. बोळ्यांनीं अथवा कढतपाणी रबरी पिशवींत घालून त्यानें शेकणें, मोहरीयुक्त व तसल्या औषधांनीं युक्त तैल व नाना तऱ्हेच्या चिकटपट्या, जळवा लावणें घटिका चूषणविधि तसेंच बर्फ इत्यादि बाह्य उपचार सुरू ठेवावे. पाठीच्या कण्यांत रक्तसंचय होऊं नये म्हणून रोग्यास शक्य तितका पालथा निजवावा. पोटांत घेण्यासाठीं रसकापूर पेटॅशियम आयोडाइड हीं औषधें देतात. पण त्याचा उपयोग दाह कमी करण्यांत होतो असें म्हणवत नाहीं. फिरंगोपदंश रोगामध्यें मात्र प्रथम गुण न दिसला तरी चिकाटीनें हीं औषधें सुरू ठेवावीं. अर्गट नामक औषध टोंचल्यानें उपयोग थोडासा होतो. सांधीचें दोषघ्न औषध सोडा सालिसिलेट देतात तें युक्तच आहे. शय्याक्षतें (बिछान्यावर एकसारखें निजून राहिल्यामुळें झालेलीं चकदळें)न होऊं देण्याविषयीं खबरदारी घ्यावी; कारण तीं मोठी भीतिप्रद असतात. मूत्रनलीकेचा उपयोग लघवी होण्यासाठीं करून ती नलीका जंतुघ्न औषधांत बुडवून ठेवावी. लघवी नासू नये म्हणून पोटांत जरूर तीं सॅलिसिलिक अगर बोरिक आसिड वगैरे औषधें द्यावीत. कफसंचय व दम, श्वास कमी करण्याच्याकामीं अमोनियाकार्बोनेटचा उपयोग चांगला होतो, परंतु तो टिकणारा नसतो. रोगाची प्रथमावस्था संपून रोग कायम होतोसा वाटल्यास क्विनाईन. सोमल हे व कुचल्याचें सत्व यांपैकीं कांहीं औषधें पौष्टिक म्हणून द्यावींत. हातापायांत ताठरपणा आला नसल्यास कोणत्याहि प्रकारच्या विजेच्या पेटीचा उपयोग स्नायूंवर केल्यानें ते सुधारतात. परंतु मांसलभाग पुष्ट ताठर असल्यास तिचा फारसा उपयोग होत नाहीं. इतकेंच नव्हे तर थोडी इजाहि होते.

आ यु र्वे दी य —कमरेपासून दोन्ही मांड्या व पाय जखडतात म्हणजे लांबआंखुड होत नाहींत या विकारास ऊरुस्तंभ म्हणतात.

का र णें:—थंड, ऊन, पातळ, कोरडे, जड, स्निग्ध इत्यादि परस्परविरुद्ध गुणाचे पदार्थ विशेष सेवन केल्यानें, तसेंच अजीर्ण झालें असतां भोजन केल्यानें आणि अतिशय श्रम, झोंप, किंवा जागरणें केल्यानें, शरीरांतील कफ, मेद, व वायु, दुष्ट होऊन अतिशय सांचलेल्या सामपित्ताला दुष्ट करून कमरेपासून पायांतील हाडांत कफ भरून रहातो त्यावेळीं मांड्या स्तब्ध थंड व स्पर्श न समजणाऱ्या होतात. त्या इतक्या अचेतन होतात कीं, त्या आपल्या नव्हेत तर दुसऱ्याच्याच आहेत असें वाटतें, त्यांत अतिशय पीडा होते. नेहमीं रोगी चिंतायुक्त असल्यासारखा दिसतो, आंग दुखतें, स्तिमितपणा येतो, झांपड असते. ओकारी, अरुची, व ताप हीं लक्षणें होतात. अतिशय झोंप, चिंतायुक्त असणें, ताप, आळस आंगावर रोमांच उभे रहाणें, अरुची, ओकारी मांड्या व पोटऱ्या जड वाटणें, हीं ऊरुस्तंभाचीं पूर्व चिन्हें होत.

हा ऊरुस्तंभ रोग कफाधिक्यानें होतो म्हणून यावर नीट रोगपरीक्षा झाली नाहीं तर हा वातरोग आहे असें समजून कोणी अडाणी वैद्यानें वातावरील स्नेहनादि उपचार केल्यास पाय जास्तच जड होतात व थोड्याच दिवसांत उचलेनासे होतात त्यांस स्पर्श केला तर कळत नाहीं, पाय कांपतात, थंड, स्पर्श कळत नाहीं, पाय उचलत नसल्यामुळें रोगी चालूं शकत नाहीं, इतकेंच नाहींतर या कुशीचे त्या कुशीवरहि दुसऱ्याच्या सहाय्यावांचून होत नाहीं. दाह, अतिशय पीडा, पाय कांपणें हीं लक्षणें झालीं असतां किंवा दुसऱ्या कोणत्याहि रोगानंतर झालेला ऊरुस्तंभ असाध्य असतो.

चि कि त्साः—ऊरुस्तंभावर (मांड्या आखडल्या असतां) स्नेहन किंवा शोधन दोन्ही उपयोगी नाहींत. कारण यांत कफ, मेद, व आम यांचें आधिक्य असतें. म्हणून ते कमी करण्याकरितां युक्तिपूर्वक रूक्ष उपचार करावे. जव, सांवे व हरीक यांचें अन्न, थोडेसे तेल घालून पाण्यांत शिजवून तयार केलेल्या अळणी भाज्याबरोबर खावें. जांगल मांस तुपाची फोडणी न देतां खावें. मद्य, पाणी व अरिष्ट प्यावें. हिरडे, गुग्गुळ अथवा शिलाजित गोमुत्रांतून सेवन करावें.

याप्रमाणें उपाय करून कफावृत व मेदोयुक्त वायु शांत झाला म्हणजे मग क्षार व गोमुत्रस्वेदन सेचन व उटणीं यांचा उपयोग करावा. मध, शिरस, वारुळाची माती यांचा

लेप लावावा. कफ क्षीण होण्याकरितां त्यास सोसेल इतका व्यायाम करावा. शक्तीच्या मानानें चालावें. स्त्रीसंभोग करावा. कोंडलेल्या व न वाहणाऱ्या पाण्याच्या व ज्यांत सुसरी वगैरे नसतील अशा बिन धोक्याच्या तलावांत पोहावें. प्रवाहाच्या उलट म्हणजे खालून वर पोहावें, या उपायांनीं कफ व मेद यांचा क्षय झाला म्हणजे मग स्नेहन वगैरे उपाय करावे.

**ऊर्ध्वपातनक्रिया**—पाणी अथवा इतर द्रव पदार्थ यांची आंच लावून वाफ करणें, व त्या वाफेचें पुन्हां द्रवपदार्थांत रूपांतर करणें, या सर्व क्रियेस ऊर्ध्वपातनक्रिया म्हणतात. निरनिराळे द्रवपदार्थ निरनिराळ्या उष्णमानांशावर उकळूं लागतात; म्हणून दोन किंवा अधिक द्रवपदार्थांच्या मिश्रणाचें पृथक्करण वरील क्रियेनें करतां येतें. मीठ किंवा साखर यासारखा पदार्थ पाण्यांत विरघळलेला असल्यास याच क्रियेनें तो पाण्यापासून अलग करितां येतो. याचें यंत्र साधें असतें. त्याचे मुख्यतः तीन भाग असतातः—

द्रव, पदार्थांचें मिश्रण किंवा द्रव व घनपदार्थांचें मिश्रण जें शुद्ध करावयाचें असतें, तें एका पात्रांत घालतात, त्याला तापक म्हणतात. नंतर त्याला खालून आच लावण्यांत येते. त्यामुळें आंतील द्रवाची वाफ होऊन ती त्या पात्रास जोडलेल्या एका नळींतून जाऊं लागते. या नळीला शीतक नलिका (कंडेन्सर) म्हणतात. यांत एका बाहेर एक अशा दोन नळ्या असतात. आंतील नळींतून द्रवपदार्थाची वाफ जात असते, व या नळीच्या बाहेर व बाहेरील नळीच्या आंत थंड पाण्याचा सतत प्रवाह चालू असतो. एका द्वारानें पाणी आंत शिरतें व दुसऱ्या द्वारानें बाहेर पडतें. या पाण्याच्या प्रवाहानें आंतील नळींनें जाणारी वाफ थंड होऊन पुन्हां द्रवरूप होते व तो द्रव पुढें ठेवलेल्या एका पात्रांत थेंब थेंब गळतो या पात्रास ग्राहक म्हणतात. मुख्य पात्रामध्यें अथवा तापकामध्यें एक ऊष्णमानमापकयंत्र ठेवतां येतें. त्यानें भांड्यातील द्रव कोणत्या अंशावर उकळूं लागला हें कळतें.

मीठ किंवा साखर याचें पाण्याशीं मिश्रण केलेलें असल्यास या क्रियेनें तें मीठ किंवा ती साखर तापकांत रहाते व पाणी ग्राहकांत जमतें.

दोन द्रवांचें मिश्रण तापकांत असल्यास त्यांपैकीं एक अगोदर उकळेल तें ग्राहकांत जमा केल्यानंतर दुसरा ग्राहक ठेवावा म्हणजे दुसरा द्रव त्यांत जमा होईल.

फार प्राचीनकाळीं अलेक्झांड्रियाचे लोक टरपेन तेल या क्रियेनें काढीत असत. इ. स. च्या पांचव्या शतकांत याच क्रियेनें "अर्क (स्पिरिट्स)" तयार करीत असत. यावरून ही क्रिया प्राचीनकाळच्या लोकांस अवगत होती. सध्यां तर डामर (कोलटार, धूर कोलग्यास) मधें (स्पिरिट्स) व अम्लें इत्यादि रासायनिक द्रव्यें तयार करण्याच्या कामीं या क्रियेचा फार उपयोग होतो.

**ऊंस**—यास लॅटिनमध्यें सॅकॅरम ऑफिसिनारम, इंग्रजींत शुगरकेन, मराठींत ऊंस, संस्कृतमध्यें इक्षु, गुजराथींत खोड, हिंदुस्थानींत गोंडा, पाडा, गन्ना इत्यादि नांवें आहेत

ऊंस हा तृणजातींत मोडतो. उंसाला हल्लींचा आकार येण्यास मनुष्य हाच कारणीभूत झाला आहे. यानें या गवतासारख्या बारीक झाडाची शहाणपणानें मशागत केल्यामुळें देशकालवर्तमानाप्रमाणें बाऱ्याउंसासारख्या अगदीं बारीक व पुंड्यासारख्या मोठ्या जाड्या जाती अस्तित्वांत आल्या आहेत. ऊंस सुमारें पांच ते सात हातपर्यंत उंच वाढतो. त्याचीं पानें सुमारें चार फूट लांब व दोन ते तीन इंच रुंद असून पीक तयार होण्याच्यापूर्वी खालचीं पानें वाळूं लागतात. कांहीं जातींत दरवर्षी फुलावरा येतो व कांहींना क्वचितच येतो.

**इ ति हा सः**—प्राचीन ग्रंथांत उसासंबंधीं जी माहिती उपलब्ध आहे तीवरून त्याचें मूलस्थान हिंदुस्थान, कोचीन, चीन हें असलें पाहिजे असें वाटतें. ग्रीकलोकांच्या वैद्यकीयग्रंथांत ख्रिस्तीशकापूर्वी हिंदुस्थानांतील उसास वोरूपासून काढलेला मध असें नांव दिलेलें आहे. इसवीसन ६२७ ते ६५० या सालांच्या दरम्यान चीनचा बादशाह टाईटसंग यानें आपल्या राज्यांतील कांहीं इसम साखर करण्याची कला शिकण्याकरितां बहार प्रांतांत पाठविलें होते असा इ० स १५५२ सालीं प्रसिद्ध झालेल्या चीनच्या ज्ञानकोशांत उल्लेख केला आहे. इक्षु शब्दाचा उल्लेख अथर्ववेद व नंतरच्या संहितांत आहे. यावरून उसाची माहिती असून त्याचा उपयोग गूळ किंवा साखर करण्याकडे होत असावा असें वाटतें. महाभारतकालीं शर्करा किंवा खांडव लोकांस माहीती होती, व पक्वान्नें करण्याकडे तिचा उपयोग होत असे असें दिसतें. इतर पुराणांतहि तसाच पुरावा सांपडतो. यावरून फार प्राचीनकालापासून हिंदुस्थानांत साखर होत होती, या वरील विधानास आधार मिळतो. उसाची लागवड इराणांतून व अरबस्थानांतून पाश्चात्य देशांत गेली. ती पसरत पसरत सोळाव्या शतकाच्या आरंभीं वेस्टइंडीज व दक्षिणअमेरिका या देशापर्यंत पसरली.

**उ प यो गः**—सुरतेकडे खजुरीया म्हणून खाण्याकरितांच ऊंस करितात. उंसाचा रसहि पुष्कळ लोक पितात. उंसाच्या रसापासून गूळ, राब, काकवी, साखर, खडीसाखर, वगैरे करितात. राजापासून रंकापावेतों सर्वत्रांनां गूळ किंवा साखर यांची जरूरी आहे. आपल्या खाण्यापिण्याच्या बहुतेक पदर्थांत गूळ किंवा साखर असते. गुळाचा व साखरेचा औषधांतहि फार उपयोग होतो. ऊंस समशीतोष्ण आहे. रस थंड आहे. गूळ उष्ण आहे. साखर समधात व खडीसाखर अगदीं निर्दोष असें मानतात. गूळ, साखर किंवा

उंसाचा रस हा पोटांत गेल्यावरोबर तावडतोब शरीरांत शोषलीं जाऊन रुधिराभिसरण जोरानें सुरू होतें. तेव्हां हे पदार्थ मनुष्याच्या जीवनास अत्यंत जरूरीचे आहेत. उंसाचा कोणताहि भाग फुकट जात नाहीं. बैलांस व घोड्यांस उंसाचे तुकडे करून देतात. वाढी जनावरांस खाऊं घालतात. चिपाटें व वाळलेलीं पानें यांचा उपयोग रस आटविण्यांत सर्पणाऐवजीं करितात पाचटाचें उत्तम खत होतें. पाचटाची राख व बारीक सारीक भुगा एखाद्या खड्यांत घालून त्यांत पाणी सोडलें व तें कुजलें म्हणजे त्याचें चांगलें खत तयार होतें. काकवीची दारू ( रम ) करितात. गूळ इमारतीच्या चुन्यांत व सिमेंटांतहि घालितात. तो घातल्यानें चुना फार चिकट व मजबूत होतो. कामिनीवर उंसाची पेरें खातात, मधुऱ्यावर वेडा ऊंस देतात. उचकी लागल्यास उंसाचा रस पितात.

व्या पा र.—सन १९१५ सालीं जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत त्यांवरून असें दिसतें कीं, सर्व जगांत मिळून त्या वर्षी साखरेचा एकंदर व्यवहार १,२५,००,००० टनापर्यंत झाला. यापैकीं ६०,००,००० टन साखर बीट नांवाच्या कंदापासून काढलेली होती व बाकीची ६५,००,००० टन साखर उंसापासून झाली; म्हणजे बीट व ऊंस यांचें प्रमाण बहुतेक समान आहे. हिंदुस्थानांत साखर अगर गूळ तयार होतो तो सर्व बहुतकरून उंसापासून होतो. हिंदुस्थानांतील हा साखरेचा किंवा गुळाचा आंकडा लहान नसून सर्व जगांत हिंदुस्थानचा नंबर दुसरा आहे; हें खालीं प्रमुख देशांचे आंकडे दिले आहेत त्यांवरून दिसून येईल.

| देशाचें नांव | टन साखर |
|---|---|
| क्यूबा ( अमेरिका ) | ३०,००,००० |
| हिंदुस्थान | २५,३४,००० |
| जावा | १५,९१,००० |
| हवाई | ६,१२,००० |

बाकी सर्व देशांचा नंबर याखालीं आहे. उंसाचें पीक सर्व उष्ण:कटिबंधांत व समशीतोष्ण कटिबंधांतील कांहीं भाग मिळून सरासरी ३७° अंश म्हणजे उत्तरेस स्पेन व दक्षिणेस न्यूझीलंडपर्यंत आढळतें.

हिंदुस्थानांतील सन १९१५–१६ सालचें क्षेत्र व उत्पन्नाचे आंकडे खालीं दिले आहेत.

| प्रांत | एकर | गुळ टन |
|---|---|---|
| संयुक्तप्रांत | १२६१००० | १२७८००० |
| पंजाब | ३४७००० | २७५००० |
| बहार, ओरिसा | २६२००० | २६०००० |
| बंगाल | २३१००० | २५६००० |
| मुंबई (संस्थानांसह) | १०६००० | २९१००० |
| मद्रास | ९५००० | १८६००० |
| आसाम | ३७००० | २९००० |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | ३१००० | ३३००० |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | २१००० | २६००० |
| | २३९१००० | २६३४००० |

उ त्पा द न क्षे त्र.—सन १९१५–१६ सालीं मुंबई व मध्यप्रांतांतील ऊंस पिकणाऱ्या प्रमुख जिल्ह्यांचें क्षेत्र खालीं दिलें आहे.

| मुंबई इलाखा | एकर | मध्यप्रांत व वऱ्हाड | एकर |
|---|---|---|---|
| सुरत | ३०६८ | बैतुल | ३३६३ |
| नाशिक | ६९४९ | बिलासपूर | ३६०७ |
| अहमदनगर | ४५३८ | छिंदवाडा | २२६७ |
| पुणें | १३४२४ | रायपूर | २०१६ |
| सातारा | १०७४० | भंडारा | १२८४ |
| बेळगांव | ११७९७ | चांदा | १२१३ |
| | | बालाघाट | ११७० |

वर दिलेल्या आंकड्याशिवाय मध्यप्रांतांत कोरडवाहू ऊंस सुमारें २००० एकरांत होता आणि अहमदनगर जिल्ह्यांत नव्या कालव्यामुळें उंसाखालील क्षेत्र वाढत आहे.

उसाखेरीज ताड, माड वगैरे ज्यांच्या रसापासून गूळ व साखर तयार करितात त्या झाडांच्या लागवडीखालीं सन १९१४–१५ सालीं १५६०० एकर जमीन असून इ.स. १९१६–१७सालीं १७५००० एकर होती. साखर किंवा गूळ हा उंसापासून अगर खारकेच्या किंवा ताडीच्या व नारळीच्या झाडाच्या रसापासून करितात. मद्रास व बंगाल इलाख्यांत ताडीपासून गूळ करण्याचा प्रचार जास्त आहे. ऊंस बहुतकरून हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं पिकतो. तथापि तो उष्णकटिबंधाच्या समशीतोष्ण प्रदेशांत चांगला होतो.

जा ती.—उंसाच्या अनेक जाती आहेत. सर्व जातींचे दोन वर्ग करितां येतील. एक जाडा, मऊ व रसाळ असतो; त्याला जमीन चांगली लागते; खत व पाणी सुबलक लागतें. दुसरी जात कठिण व बारीक असून रसाला कमी असते. हिला जमीन हलकी असली तरी चालते; त्याचप्रमाणें खत व पाणी कांहीं थोड्या प्रमाणावरहि पुरेसें होतें. ही कठिण व बारीक जात पाऊसकाळ चांगला व पुरेसा असल्यास निव्वळ पावसावरहि होते. कित्येक ठिकाणीं एकदोनदां पाणी द्यावें लागतें. या जातीची मांजरी फार्मवर जावापद्धतीनें लागवड करण्यांत आली व तिचें उत्पन्न जवळजवळ पुंड्या इतकें झालें. जावापद्धतीप्रमाणें तीस फूट लांब व पांच फूट खोल अशा अंतरानें चर खणून त्यांत पेरीं लावावीं व पीक जसजसें वर येईल तसतशी मातीची भर द्यावी. पावसाळा सुरू होईपर्यंत पाणी देऊन नंतर पाणी बंद करावयाचें. या जातीचा ऊंस कठीण असल्यामुळें या जातीस

कोल्हे, रानडुकरें वगैरे प्राण्यांचा उपद्रव कमी होतो. या उंसाला मररोग फारशी लागत नाहीं. पण एखाद्या वेळीं काजळ्या रोग होतो.

उंसाचे अनेक रंग आढळतात. कांहींचा पांढरा, कांहींचा हिरवट पिंवळा, कांहींचा बांगड्या, कांहींचा काळसर व कांहींचा तांबडा असतो. स्थलपरत्वें मोठ्या, जाड्या, मध्यम जाड्या व बारीक, जातीची लागवड सर्वत्र आढळते. १ जाडी—मलबारी ( सुरत ), देवगडी ( रत्नागिरी ), पुंड्या ( पुणें ), कबिन्या ( सोलापूर ). २ मध्यमजाडी—वानसे ( सुरत ), वेत्ता ( कारवार ), सणविळें ( धारवाड ). ३ बारीक—कळीजडी ( सुरत ), वाऱ्या, कळक्या अगर खड्या ( सातारा ), हुलकल्ल ( धारवाड ).

हल्लीं हिंदुस्थानांत परदेशी उंसाच्या जाती बऱ्याच आलेल्या आहेत. त्यांचीं नावें:—तांबडा व हिरवा मारिशस, जावा ३६, पट्याचा बी २०८, पट्याचा मारिशस वगैरे.

नि व ड:—उंसाच्या पिकांत सुधारणा घडवून आणण्याकरितां हिंदुस्थानांतील निरनिराळ्या परिस्थितीला योग्य जाती निवडून काढण्यास व संकर करून जाती तयार करण्यासाठीं कोइमतूर येथें एका प्रयोगक्षेत्राची स्थापना झाली. आहे. तेथें व मुख्यत्वेंकरून ऊंसाचें आगर जें उत्तरहिंदुस्थान, तेथें योग्य व चांगल्या जाती हुडकून काढण्यासंबंधीं शोध जोरांत चालू आहेत व ते बरेच सफल झाले आहेत. तेथें नेहमींचा होणारा ऊंस म्हटला म्हणजे कळक्या तांबडा व पांढरा उरवजातीच्या वर्गांतील होय. हल्लीं तेथें जे३६ व ॲशीमॉरीशस या जातींची लागवड सुरू झाली आहे ह्या जाती मध्यम जाडीच्या असून उत्पन्नाला देशीपेक्षां जास्त आहेत.

पंजाबांत जे३६, जे१०० ह्या मध्यम जाडीच्या जाती चांगल्या होत असून सणविळे ही जात चांगली होते. अलीमगडच्या मंगो व ढवरा जाती नदीकांठच्या भागांत बऱ्या होतात.

मध्यप्रांतांत जाड्या नरम जातीपेक्षां सणविळे, खारी आणि जावा२४७ या जाती उत्पन्नाला बऱ्या असून त्या लोकप्रिय झाल्या आहेत.

आसामांत पट्टेरा मारिशस्, बी३७६ आणि बी१४७ या उत्पन्नाला बऱ्या ठरल्या आहेत. येथें उंसाच्या लागवडीचा प्रसार होण्यास जास्त जागा आहे.

पेशावरांत पुंड्या ऊंस चांगला होतो. म्हैसुरांत पटापटी व तांबड्या मारिशस् जातींपासून चांगलें उत्पन्न येतें असा अनुभव आला आहे. साधारणपणें उंसाला बारा महिन्यांचें पीक असें म्हणण्याची चाल आहे. तथापि ही म्हण सर्व जातीच्या उंसाला लागू पडत नाहीं. कांहीं जाती १०-११ महिन्यांतच तयार होतात उ. पटेरा मॉरिशस्, रेडस्फोर्डस, जे ३६ वगैरे. कांहीं बारा तेरा महिन्यांत तयार होतात उ. पुंड्या कांहीं चौदा पंधरा महिने घेतात. उ. हिरवा मॉरिशस व कांहींना तयार होण्यास सोळा ते अठरा महिने लागतात. उदाहरणार्थ, मॉरिशस व तांबडा.

हिंदुस्थानांत बागाईत पिकांपैकीं ऊंस हें मुख्य पीक होय. याला मेहनत, मशागत, खत व पाणी हीं सर्व जास्त लागतात. या पिकाला खर्च जास्त लागतो, परंतु खर्चाच्या मानानें फायदाहि बराच होतो. या पिकाला पाण्याची सर्व वर्षभर फार आवश्यकता असल्यामुळें हें पीक कालव्याखालीं व विहिरीवरच बहुतकरून करितात. तथापि, डोंगराळ भागांत जेथें जास्त महिने पाऊस पडतो, तेथें हें पीक कोरडवाहू जमिनींत थोड्या प्रमाणांत करितात. मावळांत कोरडवाहूंत लागवड करितात तेव्हां प्रथम बियाण्यास मोड आणून मग शेतांत लावितात. पूर्वबंगाल्यांतहि अशीच चाल आढळते.

पा ल ट.—उसाचें पीक बारा महिन्यांचें असल्यामुळें त्याच त्याच ( एकाच ) जमिनींत हें पीक घेणें शक्य नसतें व जमिनीला विसावा मिळावा म्हणून कांहीं अर्धवट कोरडवाहू पिकांबरोबर याचा फेरपालट करणें जरूर असतें. याचा फेरपालट बहुतकरून इतर बागाईत पिकांबरोबर करतात. कालव्याखालीं वर्षाआड किंवा दोन वर्षांआड ऊंस लावतात. कांहीं ठिकाणीं एक वर्ष नवा ऊंस, दुसऱ्या वर्षी खोडवा व तिसऱ्या सालीं निळवा, ज्वारी ( चाऱ्याकरितां ) आणि हरभरा घेऊन पुन्हां ऊंस लावतात. विहिरीखालीं एक खोडवा घेऊन भुइमूग, मिरच्या, कांदे, खपली गहूं, हरभरा, भाज्या वगैरे पिकें एक दोन वर्षें घेऊन पुन्हां ऊंस लावितात. साताऱ्याकडे हळद, भुइमूग, मिरची घेण्याची फार चाल आहे. मिरचीचें बिवड उसाला चांगलें असें म्हणतात.

गुजराथेंत उंसाची फेरपालट आलें, हळद, भुइमूग, केळीं वगैरे पिकांनी करतात. वसईकडे ( ठाणें जिल्हा ) केळीं, आलें, पानमळा वगैरेशीं फेरपालट करण्याची चाल आहे. येथें पानमळा दीड वर्षापेक्षां जास्त ठेवीत नाहींत. कर्नाटकांत—भातखाचरांत—पहिल्या वर्षी भात, दुसऱ्या वर्षी ऊंस तिसऱ्या वर्षी मिरच्या, रताळीं, कांदे वगैरे भाजीपाला, चवथ्या वर्षी ऊंस याप्रमाणें लागवडीचा प्रघात आहे.

इतर ठिकाणीं पहिल्यावर्षी ऊंस, दुसऱ्यावर्षी खोडवा, तिसऱ्या वर्षी बटाटे अगर गहूं, चवथ्या वर्षी मिरच्या, रताळीं, भोपळे वगैरे, पांचव्या वर्षी ऊंस याप्रमाणें प्रघात आहे.

मांजरी फार्मवर प्रयोगाअंतीं खालीं दिलेला फेरपालट फायदेशीर ठरला आहे. पहिल्या वर्षी ऊंस, दुसऱ्या वर्षी निळवा (ज्वारी चाऱ्याकरितां), तिसऱ्या वर्षी भुइमूग(लवकर तयार होणारी जात स्पॅनिश अगर स्मॉल जपान) किंवा तागगाडणी, चवथ्या वर्षी ऊंस.

उंसाशिवाय निळवा व भुइमूग या पिकांना खत द्यावें लागत नाहीं. हीं पिकें दुसऱ्या पावसावर येत असल्यामुळें

जमीनीला पाण्यापासून विश्रांति मिळते. उंसाच्यापूर्वी मुग-मूग घेतल्यामुळें जमीनींत पोषक द्रव्याची वाढ होते. व उंसापूर्वी मुगमुगाचें पीक असल्यानें उंसाला मरीपासून अपाय होत नाहीं. कारण जोंधळा व ऊंस यांना अपायकारक मर(गाभा जळणें ) एकच प्रकारची असते. याकरितां मुगमूग मध्यें आल्यानें उंसाला फारशी मर होत नाहीं.

मि श्र पि कें.—उंसाची वाढ पाहिले तीन महिने कमी असते. त्यावेळीं उसांत मका, कांदे, गवारी, भेंडीं, खिरे, दूधभोपळा, काशीफळ वगैरे भाज्या (शहरजवळ असल्यास) लावण्याची फार चाल आहे. मका घेण्याची चाल मात्र सर्वत्र आहे. त्याचीं कणसें मिळून शिवाय गुरांना चाराहि होतो. बहुतेक ठिकाणीं जागोजागीं वरंब्यावर शेवरी पेरितात. शेवरी लवकर वाढते. त्या झाडांचा उंसाला आधार होतो, व वाऱ्यापासूनहि संरक्षण होतें. त्यांचा पाला गुरांना व शेरड्यांना खाण्याच्या उपयोगास येतो. शेताच्या भोंवतीं एरंड लावतात. त्यावर घेवड्याचे वेल सोडितात. घेवड्याच्या शेंगांची भाजी होते. व एरंड्यांचें तेल चरकाच्या ओंगणास व कढईच्या आंतून लावण्यास उपयोगीं पडतें.

ज मी न.—उंसाला कसलीहि जमीन चालते, परंतु त्यांतल्या त्यांत जमीन काळी असून तेल्या रंगाची अगर तांबूस काळी असावी. नदीकांठच्या मळईंत उसाचें पीक चांगलें येतें. त्याला पाणी पुष्कळ लागत असल्यामुळें ज्या जमिनीला पाण्याची सोय असते व ज्या जमीनींत पाणी जास्त झालें असतां झिरपून जातें अशी जमीन चांगली. भारी जमीनीपेक्षां मध्यम काळ्या जमीनींत उसाचें पीक चांगलें येतें. पाणथळ अगर क्षाराच्या जमीनींत उंसाचें पीक चांगलें येत नाहीं. पाण्यांत खारेपणा असल्यास चांगल्या जमीनींतहि उंसाचें पीक येत नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत पोयट्याच्या लापण जमीनीवर उंसाची लागवड मोठ्या प्रमाणावर करितात.

ज मी नी ची म शा ग त.—उंसाला सुमारें फूटभर खोल जमीन भुसभुशीत व मोकळी करावी लागते. गांवठी नांगरानें हें काम तीन नांगरटींनें होतें. प्रत्येक नांगरटीमध्यें निदान दोन किंवा तीन आठवडे अंतर असावें म्हणजे जमीनींत हवा चांगली खेळते व ती उन्हानें तापते. कुंदा, हरळी, लव्हाळा, वगैरेंच्या वर निघून आलेल्या मुळ्या वाळून जातात. प्रत्येक नांगरणीच्या वेळीं निघणारीं ढेकळें वाळल्यावर मैदानें फोडून टाकावीत. जीं ढेकळें अशीं फुटणार नाहींत तीं हातानें फोडावींत. मैद फिरविल्यानें ढेकळें फुटतात एवढेंच नाहीं तर त्यामुळें जमीन साफ होऊन नांगराच्या बैलास त्रास होत नाहीं व नांगरहि प्रत्येक पाळीस खोलखोल जमीन नांगरीत जातो. अशा रीतीनें तिसरणीच्या वेळीं सुमारें १०–११ इंच माती भुसभुशीत होते. हेंच काम म्हणजे नांगरटीपासून सरीपर्यंतचें काम सुधारलेल्या आउतांचा उपयोग केल्यास निम्मे खर्चांत भागतें. हीं आउतें म्हणजे ' नॅलोज ' नांगरानें एक नांगरट व नंतर ढेंकळें फोडणें व जमीन नरम व भुसभुशीत करणें. हीं कामें नावेंतील कुळव, तव्याचा कुळव वगैरेंनीं करून सऱ्या पाडण्याच्या यंत्रानें सऱ्या पाडाव्या. उंसाला शेणाचें खत देणें असल्यास दोन नांगरण्या झाल्या म्हणजे दहाबारा कदमांच्या अंतरानें खताच्या गाड्या आणून शेतांत रिचवाव्या. खताचे ढीग शेतांत पडल्यावर ते जमीनीवर सारखे पसरावेत. खत पसरून झाल्यावर तिसरी नांगरणी द्यावी. जमीनीला एका बाजूस उतार असल्यास त्याच्या मगदुराप्रमाणें उताराशीं आडव्या ताली घालाव्यात. कोपऱ्याची जमीन नांगरली जात नसल्यामुळें ती जागा हातानें खणून काढावी. ताली घालून शेत तयार झाल्यावर वाफ्याच्या पद्धतीनें ऊंस लावणें असल्यास चार बैली नांगरानें २॥. ते २॥. फुटाच्या अंतरानें सऱ्या पाडाव्या. सऱ्या जितक्या सरळ येतील तितक्या चांगल्या. सऱ्या पाडून झाल्यावर ११ ते १२ फुटांच्या अंतरानें सऱ्यांशीं आडवे पाट तयार करावे म्हणजे साधारणपणें १० फूट हमचौरस वाफे असावे.

ला व ण्या ची वे ळ.—उत्तर गुजराथेंत ऊंस मे महिन्यांत लावितात. कारण जमीन रेताड असल्यामुळें तेथें उन्हाळ्यांत वाळवीचा फार उपद्रव असतो, तो पावसामुळें कमी होतो. म्हणून तो टाळण्याच्या हेतूनें तिकडे पावसाच्या तोंडीं लागण करितात. दक्षिण गुजराथेंत व कर्नाटकांत नोव्हेंबर व डिसेंबर या महिन्यांत लागण करितात व पुणें जिल्ह्यांत जानेवारी ते मार्च महिन्यांत करितात.

वा फे व स ऱ्या.—वर सांगितल्याप्रमाणें लांब वाफे करण्याच्या ऐवजीं ४–५ फुटांच्या अंतरानें लांबच्या लांब सऱ्या पाडून लागण केल्यास उसाच्या खुरपणींत व पाण्यांत बरीच बचत होते असें अलीकडे आढळून आलें आहे. जास्त अंतर असल्यानें मध्यें कोळपा फिरवितां येतो. जास्त हवा व जागा मिळाल्यामुळें फूट जास्त होते व ती पोसली जाते. ऊंस बांधणीचें काम हातानें करण्याऐवजीं नांगरानें करितां येतें.

बि या णें.—वाफे अगर सऱ्या तयार झाल्यावर लागण सुरू करण्याच्या पूर्वी बेणें वरच्यावर पसरावें. लागणीकरितां बेणें चांगल्या जातीच्या उंसाचें असावें. बारीक, रोगट, गाभडी पडलेल्या, रंगलेल्या, उंसाचें नसावें. लागण सुरू करण्याच्या पूर्वी वाफ्यांत पाणी सोडून तें अंमळ जिरत आलें म्हणजे उजव्या किंवा डाव्या हातानें बेणें घेऊन एका पुढें एक असें टाकून त्यावर पाय देत देत सरींतून लागण करावी. पुण्याकडे सर्व उंसाचे तुकडे करून बेण्यास उपयोग करितात. सोलापूर, कोल्हापूर, बेळगांव, सातारा वगैरे ठिकाणीं वाढ्याचा उपयोग करितात. वाढ्याचें वियाणें तिरकस लावावें. कांडीं लावणें तीं डोळे बाजूस ठेवून लावावींत म्हणजे ते दडपून जाणार नाहींत. दोन पेऱ्यांत दोन ते तीन इंचांचें अंतर ठेवावें. लावणी

करितां बियाणें तयार करणें तें सबंध उसाचें अजमासें एक फूट लांबीचें, व प्रत्येक पेऱ्याला तीन तीन डोळे असलेलें असें असावें. कित्येक ठिकाणीं (अमलसाद–सुरत जिल्हा) सबंध ऊंस लावितात. कित्येक ठिकाणीं नुसतींच वाढीं लावितात. उंसाचा वरचा भाग गोडीला कमी असतो पण लागणीच्या दृष्टीनें तो उत्तम असतो म्हणून उंसाचीं वरचीं तीन कांडीं लागवडीस घ्यावीं. स्थानपरत्वें दर एकरीं तेरा ते अठरा हजार बियाणें लावितात (त्या हिशोबानें एक एकरांतील उंसाचें बियाणें दहा ते बारा एकरांस पुरतें). परंतु अशा पद्धतींत शेतांत अती दाटी होऊन उसाचें उत्पन्न जास्त येत नाहीं; याकरितां मांजरी फार्मवर प्रयोग करून असें ठरलें कीं, दर एकरीं सुमारें नऊ हजार बियाणें पुरें आहे; व यापेक्षांहि बियाणें कमी करण्याबद्दल प्रयोग चालू आहेत.

पा णी दे णें.—लागण झाल्यावर पांच सहा दिवसांत दोन वेळ पाणी द्यावें. याला अंबवणी व चिंबवणी म्हणतात. नंतर पुढें आठ ते दहा दिवसांनीं पाणी देत जावें. लागण झाल्यापासून सुमारें पंधरा वीस दिवसांत ऊंस उगवून वर येतो. उंसास बारा महिन्यांत अठ्ठावीसपासून तीस वेळ पाणी द्यावें लागतें. मध्यम प्रमाणानें पाणी दिल्यास खताचा अंश धुवून न जातां तो पिकाच्या भोगवट्यास पडतो. व त्यामुळें पीक चांगलें येतें. पाणी जास्त झाल्यास व तें निचरून जाण्याची सोय नसल्यास जमीनींवर मिठासारखा लोणा येतो व जमीनी नापीक होतात. अशा हजारों एकर जमीनी निरेच्या कालव्यावर (पुणें जिल्हा) पडीत पडल्या आहेत. इसवी सन १८९५ सालीं मांजरी (पुणें जिल्हा) येथील सरकारी मळ्यांत उंसास किती पाणी दिलें म्हणजे पीक चांगलें येईल याबद्दल अनुभव घेऊन पाहिला. त्यावरून नव्या उंसास भरपूर पाणी पावसाच्या मानानें ९५ इंच व मध्यम पाणी ७३ इंच लागतें. खोडव्यास ८५ व ६३ इंच पाणी पुरें होतें.

वरील अनुमानावरून असें सिद्ध होतें कीं, उंसाचे मळेवाले फार पाणी व्यर्थ खर्च करितात. त्यापासून पिकाला कांहीं फायदा न होतां उलट नुकसान होतें. करितां पाणी देण्याच्याकामीं जास्त काळजी घेतली पाहिजे. ऊंस गाळण्याच्या पूर्वी उसाला भरपूर पाणी द्यावें; असें न केल्यास रस कमी निघतो. ऊंसाला दर खेपेस सरासरीनें उन्हाळ्यांत प्रत्येक आठ दिवसांनीं अडीच इंच पावसाइतकें पाणी द्यावें. हिंवाळ्यांत दहा दिवसांनीं दिलें असतां पुरें होतें. तथापि दोन पाण्यांमधील अंतर जमिनीच्या मगदुरावर ठरतें.

च रा ची प द्ध त.–फार पाणी दिल्यामुळें त्या पाण्याच्या अगर पाटाच्या पाझरामुळें कांहीं भागांत उपळ तर कांहीं भागांत लोणा येऊन जमीनी पड टाकाव्या लागतात. अशा जमीनींत चर काढून निचरा केल्यास त्या पिकाऊ करतां येतात. तथापि असे चर निषेपर्यंतहि या जमीनींत विवक्षित मर्यादेपर्यंत ऊंसाचें चांगलें पीक घेतां येतें. जमीन नांगरून एक वर्ष चांगली तापूं द्यावी. नंतर तण काढून टाकावें, सोईवार पाडगीं पाडावीं नंतर जमीनीच्या उताराशीं काटकोनांत येतील असे ४ ते ५ फूट अंतर ठेवून १॥ ते १ फूट खोल असे समांतर चर काढावे व माती मधील कटांवर पसरावी. फेब्रुवारींत (माघांत) चर काढून १५।२० दिवसांनीं उंसाची लागण करावी. चरांत जास्त ओल अगर पाणी असल्यास थोडी राख टाकावी. लागणीपूर्वी तळाची माती ६ इंचपर्यंत मोकळी करावी. लावणीपूर्वी पंधरा दिवस शेणखत, लावतेवेळीं सल्फेट ऑफ आमोनिया नंतर दीड महिन्यानें व पांच महिन्यांनीं सल्फेट ऑफ आमोनिया, करडीची पेंड व एरंडीची पेंड द्यावी. ऊंस पुंड्यापेक्षां मांजार जातीचा लावावा. माघ ते चैत्र लागण करावी. वर्षांतून १४।१५ पाणी पुरतात. पांच महिन्यांचा झाल्यावर कटावरील माती कुदळीनें अगर सावूल नांगरानें उंसाच्या बुडास भर द्यावी. व आठवड्यास एक प्रमाणें कोळपणी द्यावी. उपळाच्या जमीनींतील ऊंस पक्का होण्यास तीनचार आठवडे जास्त लागतात. या पद्धतीच्या उंसाचा खोडवा उत्तम व जास्त फायदेशीर होतो.

जो पा स ना.—उंसानें एकदां कांडें बांधिलें म्हणजे मग खुरपणी, खांदणी, बधांणी व पाणी याशिवाय त्याचें कांहीं करावयाचें नसतें. जमीनीची मेहनतमशागत चांगली झाली असल्यास खुरपणीचा फारसा त्रास होत नाहीं. तरी तीनपासून पांच खुरपण्या द्याव्या लागतात. सुमारें पांच महिन्यांचा ऊंस झाला म्हणजे त्याची बांधणी करावी म्हणजे दोन उंसाच्या तासांतील वरंबा कुदळीनें फोडून त्याच्या मातीची उंसाच्या सरीस भर द्यावी. इतका वेळपर्यंत जो ऊंस सरींत असतो. तो आतां वरंब्यांत येतो. पुण्याकडे बांधणीचें काम मक्त्यानें देतात. त्यास दर एकरीं दहा रुपये खर्च येतो (मुंबई शेतकी खातें हस्त पत्रक नंबर ८ सन १९१४). तेंच काम लागणीच्या पद्धतींत थोडा फरक करून दोन ते अडीच फूट अंतर दोन ओळींत असतें, तें साडेतीन फुटांचें करून उंसाची लागण सलग ओळींत करावी. अशा पद्धतींत उंसाची बांधणी सावूल नांगराच्या साह्यानें सवादोन रुपयांत करतां येते.

ख त.—उंसाच्या पिकांत पाणी व खत या दोहोंचा परस्पर इतका निकटसंबंध आहे कीं, जर एकाचा विचार करूं लागलें तर त्याबरोबर दुसऱ्याचा करणें भाग पडतें. उंसाला देण्याच्या खतांत मुख्य नायट्रोजनचा विचार केला पाहिजे. उंसाला नायट्रोजन जास्त लागतो. दर एकरीं चांगल्या उंसाचें उत्पन्न ४४ टन धरल्यास त्यामध्यें १३० पौंड नायट्रोजन सांपडतो. परंतु यापेक्षां तो जास्त द्यावा लागतो. कारण ऊंस हें पुष्कळ पाण्याचें पीक असल्यामुळें त्या योगानें व इतर कारणानें यापैकीं बराच भाग वाहून जातो. उंसाच्या लागवडींत बहुतकरून गांवखत, मेंढीच्या लेंड्या

व सोनखत वगैरेंचा उपयोग करितात. शिवाय पेंडींचीं व मासळीचीं वरखतें देण्याची कालव्यावर पद्धत आहे. कांहीं ठिकाणीं तागासारखीं बेवडाचीं पिकें करून तीं शेणखताऐवजीं आंत गाडून टाकण्याचीहि पद्धत आहे. कर्नाटकांत मेंढ्यांच्या लेंड्या व कारळयाचें बेवड करण्याची चाल आहे. सुमारें पंधरा सतरा वर्षें मांजरी येथील मळ्यांत प्रयोग करून साधारणपणें असें सिद्ध झालें आहे कीं, हल्लींच्या पद्धतीनें उंसाचें उत्तम पीक मिळण्यास दर एकरीं साडेतीनशें पौंड नायट्रोजन मिळेल इतकें खत दिलें पाहिजे, हें खत इतर शेतकरी देतात त्यां मानानें पुष्कळ कमी आहे. शेतकरी पन्नास ते ऐंशी गाड्या शेणखत देऊन शिवाय दर एकरीं सुमारें तीन हजार पौंड पावेतों करंजी अगर एरंडी सारख्या पेंडी देतात. पेंड व सल्फेट ऑफ अमोनिआ याचें उसाला खत दिल्यास जास्त फायदा होतो, असें मांजरी फार्मातील कालव्याच्या पाण्यावर व सातारा जिल्ह्यांतील विहिरीच्या पाण्यावर केलेल्या प्रयोगावरून सिद्ध झालें आहे. एक एकर उंसाला किती व केव्हां खत द्यावें तें खालीं दिलें आहे.

का ल व्या व री ल ऊं स.—शेणखत ३० ते ३५ गाड्या सरी काढण्यापूर्वी. सल्फेट ऑफ अमोनिआ ११२ पौंड पहिली खुरपणी झाल्यानंतर. करडीची पेंड १२०० पौंड, अगर एरंडीची पेंड २४०० पौंड किंवा तितकीच करंजीची पेंड व २२४ पौंड अमोनियम सल्फेट बांधणीच्या वेळीं.

वि हि री व री ल ऊं स.—शेणखत वीस ते पंचवीस गाड्या सरी काढण्यापूर्वी. सल्फेट ऑफ अमोनिआ ११२ पौंड पहिल्या खुरपणीनंतर. करडीची पेंड ८०० पौंड अगर एरंडीची १६०० पौंड अगर तितकीच करंजीची व ११२ पौंड सल्फेट ऑफ अमोनिआ बांधणीच्या वेळीं. सल्फेट ऑफ अमोनिआनें उंसाला काळोखी फार लवकर येऊन फूट जोरानें होते व पिकाचा चांगला उठाव होतो.

जमीनीचा पोत कायम राखण्याकरितां कांहीं तरी भरभरीत खत द्यावें लागतें. हें काम शेणखतानें अगर तागाचें पीक करून गाडल्यानें होतें. परंतु हेंच काम पाचट गाडल्यानें कमी खर्चांत होतें ( उसाच्या वाळलेल्या पानांस पाचट म्हणतात ). एका एकरांत सुमारें चाळीस टन उंसाचें उत्पन्न येत असून त्याचें पाचट पांच टन पावेतों येतें. पाचटाचा उपयोग जवळ जवळ शेणखताइतकाच आहे.

मांजरीफार्मवरील प्रयोगाचा दर एकरीं गुळाच्या उत्पन्नाचा तपशीलः—

| खताचें नांव सन | १९११–१२ | १९१२–१३ | १९१३–१४ |
|---|---|---|---|
| | पौंड | पौंड | पौंड |
| शेणखत ३० गाड्या | ८४८० | ७,७३२ | ९,७२२ |
| पाचट ५ टन. | ८,१६४ | ७,७४६ | १०,०८० |
| ( एका एकरांतील ) | | | |

ख ता क रि तां पा च ट कु ज वि ण्या ची री तः—खताच्या खड्डयांत एक थर पाचट व एक थर माती अशा प्रकारें घालून तें एक पावसाळा कुजूं द्यावें व दुसऱ्या वर्षी शेतांत पसरावें. अगर उंसापूर्वीचें खरिपाचें पीक काढल्याबरोबर त्याची तागाप्रमाणें लोखंडी नांगरानें गाडणी करावी म्हणजे जमीनींत ओलावा भरपूर असल्यानें ऊंस लागणीपर्यंत हें सर्व कुजून जातें. शेणखताचा कस एक धरून तितक्याच वजनाच्या इतर जातींच्या खतांस "नायट्रोजन" चा कस साधारणपणें खालीलप्रमाणें असतोः—( १ ) शेणखत १, ( २ ) सोनखत २, ( ३ ) लेंड्याचें खत २, ( ४ ) ओलाताग ।॥।-, (५) पाचट ॥-, (६) तबेल्यांतील खत १।, (७) करडी पेंड १०,( ८ ) भुईमुग पेंड १२,( ९ ) एरंडी पेंड ७, ( १० ) सरकी पेंड ८, ( ११ ) करंजाची पेंड ५, ( १२ ) चिंगळी मासळी १५, ( १३ ) तारली मासळी १०, ( १४ ) धोत्रा १२, ( १५ ) अमोनियम सल्फेट ३२, ( १६ ) सोडा नायट्रेट २५.

बां ध णी.—उंसाची बांधणी झाली म्हणजे उंसाला मजबुती येऊन तो वाऱ्यानें अगर पावसानें पडत नाहीं. जमीनीवर लोळलेल्या उंसांत साखरेचें प्रमाण कमी पडतें. बांधणीच्या पूर्वीपासून जसजसा ऊंस वाढतो तसतसा तो त्याच्या आंगच्या मोकळ्या झालेल्या पानांनीं गुंडाळण्याची कांहीं ठिकाणीं चाल आहे. असें केल्यानें उंसाला हवा वगैरे पोंचते. जेथें एकसारखे उंसाचे मळे आहेत तेथें पानें गुंडाळण्यास फार खर्च येतो ( दर एकरीं सुमारें ४५ रुपये ). परंतु वसई (ठाणें जिल्हा) सारख्या ठिकाणीं जेथें एकएक लहान मळा अलग असतो तेथें उंदीर, घुशी, कोल्हे, रानडुकरें वगैरे श्वापदांपासून बचाव करणें या पद्धतीनें सोपें जातें.

मद्रास इलाख्यांत राजमहेंद्रीकडे उंसाला धीर देण्याकरितां शेतांत वांबू उभे रोंवून त्याला पुनः आडवे बांबू बांधितात. दर एकरीं सुमारें हजार दीडहजार बांबू लागतात व ते पांच वर्षें टिकतात.

प क्व ता प री क्षा.—ऊंस तयार झाला कीं नाहीं, हें समजण्याचीं अनेक लक्षणें आहेत. पहिलें—उंसाचा चोभा (वाढें ) मिळतो म्हणजे खालचीं बहुतेक पानें पिकून शेंड्यांस दमदार पानें रहातात. दुसरें—उंसाचे डोळे फुगूं लागतात. तिसरें—ऊंस खणखणीत वाजतो. चवथें—ऊंस मोडला असतां कांड्यावर तुकडा पडतो. पांचवें—ऊंस कापून पाहिला असतां त्यांतील साखरेचे कण चमकूं लागतात.

ऊंस तयार झाला किंवा नाहीं, हें पाहण्याच्या अनेक रीती वर नमूद केल्या आहेत; परंतु त्यांपैकीं अगदीं खात्रीची अशी एकहि नाहीं. याकरितां सोपी व विश्वसनीय रीत म्हटली म्हणजे उंसाच्या रसांतील कणांचें प्रमाण पक्वतामापकानें ( ब्रिक्स सॅकॅरोमिटरनें ) किंवा उसाच्या डिग्रीनें पाहणें होय. हें पाहण्याकरितां उंसाची डिग्री उभट ग्लासासह सुमारें चार पांच रुपये किंमतीपर्यंत मांजरी फॉर्मवर मिळते ती

घ्यावी. सकाळीं आठ वाजण्याच्या सुमारास जेव्हां रसाची उष्णता सुमारें साडेसतरा अंशांजवळ असते, त्या वेळीं स्वच्छ कपड्यांतून रस गाळून तो उभट ग्लासांत टाकावा. रसांतील बुडबुडे नाहींसे झाल्यावर डिग्री आंत सोडावी, ती ज्यावेळीं वीस अंश दाखवील त्यावेळीं ऊंस गाळण्यास तयार झाला असें समजावें.

खो ड वा.—ऊंस तयार झाला म्हणजे खोडवा ठेवणें नसल्यास तो मूळासकट उपटून काढावा. खोडवा ठेवणें असेल, तर तो जमिनीबरोबर कोयत्यानें अगर कुऱ्हाडीनें तोडावा व त्याचीं वाळलेलीं पानें सोलून काढून टाकावीं.नंतर उंसाच्या मोळ्या बांधून गाडींतून अगर डोकीवर गुऱ्हाळाच्या जागेवर न्याव्या. नंतर चरकानें उंसाचा रस काढून तो उथळ कढईंत चुलाणावर आटवून त्याचा गूळ तयार करावा.

च र क—अगदीं पूर्वी उंसाचा रस काढण्याकरितां तेलाच्या घाण्यासारखे दगडी घाणे असत. दगडी घाण्याच्याऐवजीं मग लांकडी चरक झाले. लांकडी चरक अजूनहि बरेच प्रचारांत आहेत. या चरकानें शेंकडा पंचावनपर्यंत रस निघतो. सन १८८२–८३ सालापासून लोखंडी उभ्या तीन लाटांच्या देशी चरकांचा पुष्कळ प्रसार झाला आहे. आकारमानाप्रमाणें त्याला १२५ ते २५० रुपये किंमत पडते. या घाण्यानें रसाचें प्रमाण शेंकडा ६४ ते ६६ पडतें. हल्लीं पुणें जिल्ह्यांत ऑइल एंजिननें चालणारे उंसाचे चरक [ पॉवरक्रशर ] चालू आहेत. मांजरीफार्मे येथील घाण्यानें रोज देशी सहा सात लोखंडी घाण्याइतका रस निघतो. या घाण्यानें रसाचें प्रमाण शेंकडा ७२ ते ७५ पडतें. असे चरक हल्लीं मद्रास, मध्यप्रांत व म्हैसूर येथें चालू आहेत. सरासरीच्या मानानें या यंत्राच्या चरकानें दर ताशीं अडीच तीन खंडी रस निघतो व २ टन [ एक टन = २२४० पौंड ] ऊंस लागतो. यंत्राच्या चरकानें व देशी चरकानें रस काढण्यास साधारणपणें खर्च सारखाच येतो; परंतु यंत्राच्या साहाय्यानें एका दिवसांत चोवीसपर्यंत आधणें पडतात व देशी घाणीनें फक्त चारच पडतात. या यंत्राच्या चरकापासून मुख्य फायदा म्हणजे बराच जास्त रस निघणें व वाढ्याची बचत हा होय. देशी चरकाच्या वेळीं वाढीं रवींतील बैलांस द्यावीं लागतात. दर एकरीं जास्त रसाचा गूळ व वाढे मिळून एकंदर साठ रुपयांचा फायदा होतो. इ. स. १९१४–१५ सालीं निरनिराळ्या देशी व परदेशी उसांच्या चरकांचे मांजरी फार्मवर तुलनात्मक प्रयोग करण्यांत आले त्याचा तपशील खालीं दिला आहे.

| चरकाचें नांव | किंमत रुपये | शंभर पौं. उसास रसाचें प्र. | शक्तीचा प्रकार | गलन प्र. ताशीं पौं |
|---|---|---|---|---|
| यंत्राचा चरक. | २२३५ | ७२ | १४हॉर्स पॉ. | ४५०० |
| Sथे.च.नं.४४ | ९५० | ७० | ५ ,, ,, | १६०० |
| ,, ,, नं.२३ | २०० | ६८ | ४ बैल. | ७५० |

| चरकाचें नांव | किंमत. रु. | शं. पौं. उसास रसाचें प्र. | शक्तीचा प्रकार | गलन प्र. ताशीं पौं |
|---|---|---|---|---|
| लोखंडी पुणें *स्क्रूचा च. | १७५ | ६६ | ४ बैल | ७५० |
| ×लो. च.पाचरी | १५० | ६४ | ४ ,, | ७५० |
| पर्लचरक | ३२५ | ७० | ४ ,, | ८५० |
| अलकाक. च. | २०० | ६८ | ४ ,, | ७५० |
| नाहान च. | १६० | ६६ | २ ,, | ४२५ |
| हत्ती चरक | ९० | ६८ | २ ,, | ३७५ |

वरील तपशिलाच्या कोष्टकांत ज्या S * × अशा खुणा केल्या आहेत त्यांचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें:—

Sही घाणी दहा ते वीस एकर मळेवाल्यांस उपयोगी आहे.

* स्क्रूची तजवीज आंवळण्याकरितां असल्यानें लाटा सैल करणें रस काढणाऱ्यांना शक्य नसतें.

× बैलांना चरक ओढण्यास सोपें जाऊन बैलवाले यांस दगडानें ठोकून या पाचरा सैल करण्याजोग्या असतात.

गू ळ रां ध णें.—पुणें जिल्ह्यांत गूळ रांधण्याचें काम उक्तें देतात. हें काम पत्करणाऱ्या लोकांच्या टोळ्या असतात. प्रत्येक टोळींत अकरा माणसें असून घाणी ओढण्यास बैल असतात. या टोळीस पुण्याकडे 'रवी' अशी संज्ञा आहे. हींत दोन माणसें महत्त्वाचीं असतात. एक गुळवा [ गूळ रांधणारा ] व दुसरा जाळवा [जाळ घालणारा]. गुळवा व जाळवा हीं दोन माणसें. चार माणसें शेतांतील ऊंस पुरंविणारीं [ फडकरी ]. दोन माणसें बैल हांकण्यास. दोन माणसें चरकाजवळ. ऊंस घालण्यास १ व उंसाचीं चिपाटें काढण्यास १. एक माणूस उंसाचे तुकडे करण्यास त्याला पेरोळ्या म्हणतात. याप्रमाणें एकूण अकरा.

हीं अकरा माणसें रोज दोनशें पौंड गुळाचें एक आधण याप्रमाणें चार आधणें काढितात व रोज सहा रुपये घेतात. सर्व कामावर मालकानें नजर ठेवून आपल्या पदरांत चांगल्या गुळाच्या ढेपा घ्यावयाच्या असा ठराव असतो.

कढई चुलाणावर ठेवण्यापूर्वी तिला ( आंतील बाजूनें रस जळूं नये व गूळ कढईस चिकटूं नये म्हणून ) उडदाचें पीठ रसांत कालवून त्याचा लेप करतात, व नंतर कढई चुलाणावर ठेवून तापली म्हणजे आंत गोडें तेल शिंपून एरंडाच्या पानानें चोळतात. याला लाढण असें म्हणतात. हें लाढण एकदां केल्यानंतर पुन्हां पंधरा वीस दिवसांनीं करतात.

वर निरनिराळ्या चरकांत रसाचें प्रमाण कसें पडतें हें सांगितलेंच आहे. रस काढून झाला म्हणजे तो गाळून कढईंत घालून चुलाणावर कढवितात. रस कढत असतांना पहिली ढोरमळी निघून गेली म्हणजे आंतील सर्व मळी निघावी म्हणून कित्येक ठिकाणीं रानभेंडीचा रस, दूध वगैरे आंत घालतात. रसांतील आंबटपणा कमी व्हावा म्हणून कांहीं ठिकाणीं दर हजार पौंडास वीस औंस चुना अगर एक औंस सोडा घालतात. पुणें व सातारा जिल्ह्यांत उंसाची

लागवड बरीच असून गूळ करण्याची चाल पूर्वीपासूनच आहे. परंतु दोन्ही ठिकाणच्या रस कढविण्याच्या कढया व चुलाणीं यांत बराच फरक आहे. पुण्यांतील कढई उथळ असून तिचा व्यास सात फूट व खोली दहा इंच असते व तींत एका खेपेस हजार ते बाराशें पौंड रस कढविला जातो. सातारा व इतर ठिकाणच्या कढईचा व्यास सात फूट असून बाजूची खोली अठरा ते वीस इंच असते. या कढईत दर खेपेस तेराशें ते पंधराशें पौंड रस कढतो. परंतु रसाची खोली जास्त झाल्यास तो कढविण्यास सर्पण जास्त लागतें. सातारा जिल्ह्यांत विनसोन्याची चुलाणें असल्यामुळें दर एकरामागें वीस ते तीस रुपयांचें पालाचिपाडाशिवाय सर्पण जास्त लागतें. याकरितां पुणेचालीच्या चुलाणाचा उपयोग केल्यास जळणाचा वेगळा खर्च येत नाहीं.

चु ला ण.—पुणें चालीच्या चुलाणांत खालीं भोइरा व हुगरें हीं असतात. हुगऱ्याचें तोंड चुलाणाच्या एका बाजूला काढून दिलेलें असतें. या रचनेमुळें ज्वलनक्रियेस ताज्या हवेचा पुरवठा या हुगऱ्याच्या द्वारें होतो व तो नियमितपणें होतो. खराब झालेली हवा जाळदोरावाटें निघून जाते. चुलाणाचा गाळा सात फूट असून त्याची उंची जमीनीपासून चार फूट असते. ( ह्या चार फुटांत सहा इंचाचा गाळा असतो ). या चुलाणाची भिंत साताऱ्याकडील चुलाणाप्रमाणें डेरेदार नसून नीट ओळंब्यांत असते. चुलाणाच्या खालचा भोइरा साडेतीन फूट खोल असून तो तळाशीं डेरेदार असतो. तळाशीं त्याचा गाळा साधारणपणें पांच फूट असतो. या भोइऱ्याच्या तोंडावर एक लोखंडी पत्रा असतो. या पत्र्याला मधोमध औरस चौरस नऊ इंचांचें एक भोंक असतें व त्यांतून राख खालीं पडते. हुगरें सुमारें दोन फूट रुंद असून तें वर सांगितल्याप्रमाणें भोइऱ्याशीं जोडलेलें असतें. याचें तोंड जाळदोराला काटकोनांत एका बाजूला बाहेर जमीनीबरोबर काढून दिलेलें असतें. भोइऱ्यांतील राख याच तोंडावाटे बाहेर ओढितात. चुलाणाच्या भोंवतालची जागा भरून काढतात. साताऱ्यांतील चुलाणास भोइराहि नसतो व हुगरेंहि नसतें. याची खोली पांच फूट असून हें वरच्यापेक्षां खालीं रुंद असतें. पुणें चालीच्या चुलाणास सातारच्या चुलाणापेक्षां जास्त खर्च येत नाहीं.

सु धा र ले लें चु ला ण.—कोणत्याहि चुलाणाचें खरें महत्त्व त्यांत घातलेल्या विवक्षित जळणापासून उत्पन्न होणाऱ्या उष्णतेच्या प्रमाणावर अवलंबून असतें. बहुधा हें जळण म्हणजे पाचट, चिपाट किंवा अशाच तऱ्हेचें असतें.

चुलाणाला मुख्यतः महत्त्वाचे तीन भाग असतातः— (१) जाळ घालण्याचें तोंड ( जाळदोर) (२) हवा पुरविण्याकरितां मार्ग व (३) धुराडें. कोणत्याहि चुलाणाची उपयुक्तता वरील तीन गोष्टींवर अवलंबून असते. म्हणून चुलाण असें बांधावें कीं त्यांत, घातलेल्या जळणापासून निघणारी सर्व उष्णता काहिलीला मिळावी.

साताऱ्याकडील कुंभारी चुलाणांत वरील तीन गोष्टी एका ठिकाणींच असतात. म्हणून जळण जास्त लागतें. पुणेरी चुलाणांत हवा जाण्याकरितां स्वतंत्र सोरा ठेविल्यामुळें जळण अधिक चांगलें जळतें, म्हणून नुसत्या पाचट चिपाटांवरच काम भागतें. सुधारलेल्या चुलाणांत आणखी धुराडें निराळें राखिल्यामुळें व हवा सारखी जोरांत पुरविल्यामुळें जळण फारच उत्तम जळतें; शिवाय धुराड्याकडे जातांना वाटेंत रसाच्या सांठ्याची काहील तापविण्यांत गरम धुराचा उपयोग केल्यामुळें बरेंचसें जळण वांचतें. ज्याप्रमाणें पुष्कळ चरक असल्यानें अगर यंत्राचा चरक असल्यानें रस कमी जास्त निघेल त्याप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेचीं चुलाणें बांधावीं. दुहेरी चुलाणांत एक सांठ्याची व एक रस कढविण्याची अशा दोन कढयांची सोय केलेली असते. तिहेरी चुलाणांत एक सांठ्याकरितां व दोन कढविण्याकरितां कढया असतात. जेथें रोज आठ आधणें काढतात तेथें हें चुलाण सोईचें आहे.

सं यु क्त चु ला ण.—यांत दोन कढया रस शिजविण्याकरितां व दोन अगर अधिक सांठ्याकरितां असतात. हें चुलाण जेथें तीन चरक अगर यंत्राचा चरक असेल तेथें उपयोगाचें आहे.

ढे पी पा ड णें:—पुणें चालीच्या पद्धतीनें रस काढण्यास दोन तास लागल्यास साधारणपणें गूळ रांधण्यास तितकाच वेळ लागतो. चुलाणावर गूळ तयार झाला म्हणजे ती कढई उचलून तो थंड होण्याकरितां दुसऱ्या कढईत ओतितात. या वेळीं मदनाचें उष्णमान ११७°–११८° अंश सेंटीग्रेड असतें ( धारवाड, खानदेश व निझामचें राज्य येथें निवविण्याचें काम जमिनींत एक घट्ट जमिनीचा वाफा ( ४ × २١) करून बाजूनें त्याला फळ्या लावून त्यांत करितात. व दुसऱ्या दिवशीं या गुळाचे कापून विटाप्रमाणें लहान तुकडे करितात. मध्यप्रांतांत हें काम लांकडाच्या वाफ्यांत करितात. नंतर गूळ फडक्यांत बांधून टांगून ठेवितात व त्यांतील कांकवी निथळून जाऊन गूळ घट्ट होतो. गुजराथेंत गूळ गाडग्यांत सांठवितात म्हणून तो थोडा अगोदर काहील उतरून भरतात. व तो साधारणपणें निवाला म्हणजे ढेंपाळ्यांत टाकितात. ढेंपाळें म्हणजे जमिनींत खड्डा घेऊन त्यांत कापड घालितात व त्यांत गूळ टाकून तो तेथें चोवीस तास पावेतों राहूं देतात. एवढ्या अवधींत गुळाची चांगली कणखर ढेप बनते व ती विकण्यास तयार होते. परंतु या पद्धतींत प्रत्येक ढेपेंतून सुमारें एक पौंड पावेतों काकवी वाया जाते, व जमिनींत ढेपाळी केल्यानें राखण ठेवूनहि गूळ चोरीस जाण्याचा संभव असतो. पत्र्याचीं ढेपाळीं केल्यानें गूळ बंदोबस्ताच्या ठिकाणीं नेऊन ठेवितां येतात. या पत्र्याच्या ढेपाळ्यांत किंवा बादलींत बुडाशिवाय आंतल्या बाजूला सुमारें तीन इंचावर राहील अशा बेतानें एक भोंक पाडलेली चाळणीवजा तब कडीं बसवावी. यांत नेहमींप्रमाणें फडकें घालून वर गूळ

टाकावा म्हणजे उतरलेली रशी जमिनींत जिरून जाण्या-ऐवजीं बादलीच्या बुडाशीं सांठेल

काकवी.—ज्यावेळीं गुळाऐवजीं नुसती काकवी करणें असेल त्यावेळीं मदनाचें उष्णमान १०२° सेंटीग्रेड असलें म्हणजे कढई उतरावी व जेव्हां साखर करणें असेल तेव्हां राबाचें उष्णमान ११०° ते ११२° सें. ग्रे. असेल तेव्हां उतरावी.

मळी.—सध्यां उसाचा रस शिजवितांना प्रथम जी मळी निघते ती पुष्कळ ठिकाणीं तशीच टाकून देतात एका आधणाच्या वीस शेर मळींत सुमारें बाराशेर रस असतो. दर आधणामागें बारा शेर रस वाया जाऊं देणें, म्हणजे दर आधणास चार आणे; म्हणजे दररोज एक रुपया तोटा करून घेण्यासारखें आहे. या हिशोबानें एका एकराच्या गुन्हाळांत साठ आधणें निघत असल्यामुळें पंधरा रुपयांचा रस मळी-बरोबर उकिरड्यांत फेंकला जातो. त्याची बचत व्हावी म्हणून एका विशिष्ट चाळणीचा उपयोग करावा. ही चाळण चौकोनी असून लोखंडी कल्हईच्या पत्र्याची केलेली असते. चाळणीच्या वरच्या तोंडाचें माप २० × २० इंच असतें. ती खालीं निमूळती होत गेलेली असून खालच्या तोंडाचें माप १० इंच × १० इंच असतें खालच्या तोंडापासून तीन इंचांवर एक भोकें पाडलेला पत्रा मजबूत बसविलेला असतो. ही चाळणी लांकडाच्या घडवंचीवर ठेऊन खालीं रसाकरितां एक भांडें ठेविलेलें असतें. चाळणीवर चाळणीच्या पत्र्याला टेंकेल इतका ढिला एक किंतानाचा तुकडा अंथरून त्यावर मळी टाकितात. हा जो रस गळून खालीं येतो तो कल्हईच्या पत्र्याच्या पन्हळीनें कढईत सोडावा. किंतानाचा तुकडा प्रत्येक आधणाच्यापूर्वी धुवावा म्हणजे रस गळण्याचें काम चांगलें होतें.

गुन्हाळघरांत लागणारी सामुग्री.—चरक अगर लोखंडी घाणी. नांद (मांदण) चरकांतील रस धरण्यास. कढया दोन एक रस कढविण्यास व एक गूळ थंड करण्यास. हौद२ रस सांठविण्यास, मळी गाळण्याची चाळणी. वरील चाळणी-साठीं किंतान, डेंपाळी १२, डेंपाळ्यांत घालण्याकरितां पडदा (कपडा), तरई(डेंपाळी ठेवण्याकरितां लोखंडी वांकडा पत्रा),हा (चरकाजवळ रस वायां जाऊं नये म्हणून ठेवितात ),फळया४ नांदीवर ठेवण्यासाठीं, लोखंडी वाट्या २ तेलाकरितां वगैरे, दंडाळी २ कढई उचलण्याकरितां, शिवीं २ मळी काढण्या-करितां, फावडी-गूळ थंड होत असतां हालविण्यास, हात्या—लांकडी—गूळ खरवडण्यास, खुरपें, घोडी—दिवा ठेवण्यास, टिनाच्या वाट्या २, मोठा दिवा, पांट्या २ चिपाडें राख वगैरे भरण्यास, घमेलें, आढें—चरकाकरितां, लोखंडी घागरी.

निरनिराळ्या प्रांतांतील लागण.—निरनिराळ्या प्रांतांतील परिस्थितीप्रमाणें उसाच्या लागणींत फरक आढळतो व त्याचा कांहीं ठिकाणीं उपयोगहि होण्यासारखा आहे म्हणून त्या पद्धतीचें वर्णन पुढें दिलें आहे.

कर्नाटकांतील लागणः—या प्रांतामध्यें जमीन खतावून वगैरे तयार झाल्यावर शेतांत लांब सऱ्या पाडितात. त्यांत पाणी सोडून उंसाचीं पेरीं लावितात. जमीन जराशी वाळली म्हणजे कुळवानें अगर हलक्या नांगरानें सपाट करितात. उंसाची फूट झाली म्हणजे उसाच्या ओळींत नांगर घालून सऱ्या पाडतात व नंतर पाणी देण्याकरितां वाफे तयार करितात. परंतु कठिण बारीक जात असल्यास जमीन तशीच सपाट ठेवितात. उंसाची बांधणी वगैरे करीत नाहींत; पाणी जमिनीवर सोडून देतात व कित्येक ठिकाणीं ओल बरेच दिवस टिकावी म्हणून शेतांत गवत पसरतात. याच्या योगानें पाणी कमीवेळां पुरतें ( बॉलीसन व्हा. ३).

धारवाड जिल्हाः—यांत फेब्रुवारी महिन्यांत नांगरानें सरी पाडून तींत ३ ते ६ इंच अंतरानें १२ ते १५ इंची पेरें, प्रत्येक पेरावर ओंजळभर खत घालून लावितात. दुसऱ्या तासानें पहिली सरी झांकून जाते. अशी सर्व लागण झाल्या-वर शेतांत पाणी सोडितात. जमीन वाळली म्हणजे ऊंस फुटण्यापूर्वी नांगरानें वरंबे फोडतात व ऊंस वरंब्यांत येतात; व लांब सरी पाणी सोडण्यास उपयोगी पडते.

गुजराथः—दक्षिण गुजराथेंत पेरें न करतां सबंध ऊंस लावितात.तिकडे ऊंस पेरण्यासाठीं मोठा जड नांगर असतो. त्याला पेरें टाकण्यासाठीं एक भोंक पाडून व्यवस्था केलेली असते. हा चालत असतांना नांगरावर एक मनुष्य बसून पेरें आंत खुपसतो. व तें तासांत सुमारें सहा इंच खोल गाडलें जातें. ही पद्धत चांगली नाहीं. हीनें उंसाचे पुष्कळ डोळे खराब होतात. व ऊंसच जर खराब असला तर निवडून काढितां येत नाहीं. लागणीनंतर जमीन सपाट करितात. व पाणी सोडून ती भिजवितात. जमीन वाळली म्हणजे नांगरानें वरील माती सुमारें तीन इंच भुसभुशीत करितात. यानें तण मरतें. ऊंस उगवून वर आला म्हणजे नांगर घालून सऱ्या व पाणी देण्याकरितां वाफे करितात. दुसरें पाणी दीड ते दोन महिन्यांनीं देतात. इकडे उंसाला पाणी एकंदर १२ ते १५ वेळां देतात.

कोंकणांतील लागणः—वेंगुर्लें. या प्रांतांत कोल्हे, कुत्रे, रानडुकरें, गुरें वगैरे जनावरापासून उंसाचा बचाव व्हावा म्हणून सुमारें चार फूट उंचीच्या मातीच्या भिंती तात्पुरत्या घालितात, व त्या पडूं नयेत म्हणून वर नारळाचे झांप घालितात बहुतकरून गांवांतील लोक, ( ज्यांना ऊंस लावायचा असेल, ते) सर्व मिळून एका ठिकाणींच मळा करितात. तिकडे उंसाची एकच जात मळ्यांत आढळून येत नाहीं. बहुत-करून दोन तीन जातींची भेसळ असते. पांढरा कबीऱ्या, पांढरा, पटेरा व तांबडा या चार जातींचे ऊंस एक ठिकाणीं आढळतात. ज्या जमिनींत ऊंस करणें असेल ती जमीन पूर्वी पाणी देऊन ओलवितात. दोन तीन दिवसांनीं ती वाळली म्हणजे उभी आडवी पांच ते सात वेळ नांगरितात. ढेकळें फोडितात व सपाट करून नंतर पाणी

जाण्याकरितां दांड राखून मगऱ्या तयार करितात.या मगऱ्या कुदळीनें खणून करितात. प्रत्येक मगरी सुमारें एक फूट खोल व नऊ इंच रुंद असते.दोन मगरींमध्यें दोन फूट अंतर असतें. या मगरींत कित्येक ठिकाणीं राब टाकून भाजवण करितात. तशी सोय नसल्यास घरांतील सांठवलेली राख प्रत्येक मगरींत टाकितात व पाणी सोडितात व कुदळीनें हालवून चिखल करितात. व ऑक्टोबर महिन्यांत वाढें (बियाणें) मगरींत टाकून आंत दाबतात. दुसरें पाणी दुसऱ्या दिवशीं व तिसरें चवथ्या दिवशीं देतात व पुढें दर चार दिवसांनीं पाणी द्यावें लागतें. एक मनुष्य व एक मुलगा ( पाणी देण्याकरितां) रोज आठ तास काम करून ओळीनें (८ ते १० फूट खोल विहीर असते ) चार गुंठे जमीन भिजवितो. पीक एक महिन्याचें झालें म्हणजे ताजें शेण पाण्यांत कालवून तें पाणी मगरींत सोडितात. तिसऱ्या महिन्यांत याप्रमाणेंच पुन्हां एक वेळ शेणाचें पाणी देतात. सुमारें साडे चार महिन्याचें पीक झालें म्हणजे प्रत्येक खोडास ओंजळभर कुजलेलें शेणखत देतात. पहिली खुरपणी पीक दोन महिन्यांचें झालें म्हणजे करितात. याप्रमाणेंच आणखी एक दोन खुरपण्या देतात. जसजसें पीक वाढेल तसतशी मगऱ्याच्या कडेला ठेवलेल्या मातीची सुमारें चार वेळ उंसाला भर देतात. शेवटची भरणी पीक सात आठ महिन्यांचें झालें म्हणजे देतात. ऊंस तीन महिन्यांचा झाला म्हणजे पुढें उंसाचीं पानें जसजशीं वाळतील तसतशीं काढून तीं मगऱ्यांत टाकितात. तीं कुजलीं म्हणजे खत होतें. हीं पानें काढलीं म्हणजे हवा मळ्यांत खेळती राहून उंसाला सारखा रंग येऊन लवकर तयार होतो.

रत्नागिरी जिल्ह्यांत मसुरें, वांदिवडें व वेरळ या ठिकाणीं उंसाची लागवड बरीच आहे. बहुतेक ऊंस खाण्यांतच खपतो. बाकी राहिलेल्याचा गूळ तयार करितात. मालवण वेंगुर्ल्याकडील कठीण सालीचा तांबडा ऊंस बहुतेक सर्व मचव्यांतून मुंबईस विक्रीकरितां येतो. दापोलीच्या (रत्नागिरी जिल्हा ) बाजूस बारीक कठीण उंसाची लागण फेब्रुवारी महिन्यांत करितात,

खोडवा:—गुजराथ व कोंकणांत खोडवा घेण्याची बहुतेक चाल नाहीं. सिंध प्रांतांत एक दोन वेळ खोडवा घेतात. कर्नाटकांत एक खोडवा घेतात. कालव्याखालीं एक वेळ अगर अधिक वेळहि घेतात. परंतु जमीन नवी असली म्हणजे एकापेक्षां अधिक वर्षेपर्यंत खोडवे घेतां येतात.मागून शेतांत हरळी, लव्हाळा वगैरे तणें इतकीं माजतात कीं, तीं नांगरटीखेरीज काढणें शक्य होत नाहीं. पुढें पुढें तर जमीन नेहमीं पाणी पिऊन बिघडते.

खोडव्यांत फायदा अनेक तऱ्हांनीं होतो. तो असाः— (१) मेहनत मशागत बहुतकरून नाहीं. (२) बियाणाचा खर्च वांचतो. (३) खत सुमारें दोन तृतीयांश पुरतें. (४) पाणी कमी लागतें. (५) गूळ गाळण्यास लवकर येऊन तोहि उत्तम प्रकारचा होतो."मांजरी फार्म"वरील सन १८९५।९६ सालच्या अहवालांत सोनखत दिलेल्या नव्या उंसाच्या खोडव्याचे आंकडे खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—नवा ऊंस, वजन पौं ८०७२० व गूळ पौं. १०४५५; खोडवा वजन पौं.५५४०५ व गूळ पौं. ७४१०.

संयुक्त प्रांतांतील उंसाची लागवडः—या प्रांतात मुख्यत्वेंकरून तीन जाती आढळतात. ऊख (तांबडा व पांढरा), गन्ना व पाऊंड्या. या प्रांतात उख जातींची विशेष लागवड असून, या उंसापासून गूळ व साखर तयार करितात. ऊख ही जात कडक व बारीक असल्यामुळें तिचा खाण्याकडे फारसा उपयोग होत नाहीं. याची लागवड कमी खर्चांत होते. ऊंस टणक असल्यामुळें रोगराई, हवापाणी वगैरेंपासून फारशी बाधा होत नाहीं.

गन्ना—या जातीचे ऊंस ऊखेपक्षां जाड असून ते उंच वाढतात. याची लागवड विशेषेंकरून मीरत, रोहिलखंड गोरखपूर आणि बनारस या भागांत करितात. इतर ठिकाणीं याची जुजबी लागवड खाण्याकरितां करितात. गन्ना ऊंस पोटीं लवकर रंगतो व या पिकाला कोल्हे व रानडुकरांपासून फार त्रास होतो, तसा वरील ऊख जातीला होत नाहीं.

पाऊंड्या याची लागवड फार खर्चाची असून ती सहाराणपूरजवळ आढळते इतर ठिकाणीं फक्त खाण्याकरितांच ऊंस करितात.

ऊख व गन्ना जातींची लागवडः—जमीन १५—२० वेळां नांगरितात, दर नांगरटीनंतर फळी फिरवितात. दर एकरीं २०० ते ३०० मण शेणखत देतात. पूर्वेकडील कांहीं भागात मेंढ्या बसवितात. पूर्वभागांत उंसाचे तुकडे करून लागण करितात, परंतु पश्चिमभागांत फक्त वाढेंच लावण्याची चाल आहे. ऊंस उगवण्यास पुरेशी ओल नसल्यास पूर्वी पाणी देतात. पूर्वभागांत ऊंस लावणीच्या वेळीं तीन नांगरांचा उपयोग करितात. पहिला नांगर जमीन भुसभुशीत करीत जातो. त्याच्या पाठोपाठ दुसरा नांगर फाळाला गवताची पेंढी अगर दोन बाजूला दोन शेणाच्या गोवऱ्या बांधून रुंद सरी पाडीत जातो. पश्चिम भागांत फाळाला सरी पाडण्यासाठीं माती लोटणारा लांकडी तक्ता लावितात, सरींत एकेक फुटाच्या अंतरानें बियाणें ठेविल्यावर तिसरा नांगर शेजारीं तास पाडून बियाणें झांकित जातो. दोन सरींत सुमारें एक फूट अंतर असतें. दर एकरीं सुमारें ४००० ते ५००० उंसाचें बियाणें लागतें. उंसाची लागण फेब्रुवारी ते एप्रील पावेतों चालते, पण जास्त लागण मार्च महिन्यांत होते. उंसाला लागणीपूर्वी एक पाणी व नंतर हंगामाप्रमाणें तीन ते सात पाणी देतात. खादर जातीच्या जमिनींत क्वचितच पाणी द्यावें लागतें. एकंदर ७ ते १४ कोळपण्या व खुरपण्या द्याव्या लागतात. पिकाच्या संरक्षणाकरितां सभोंवार कुंपण किंवा चिखलाच्या भिंती घालितात. पश्चिम भागांत

कांहीं कांहीं ठिकाणीं अंतर्वेदींत खोडवा ठेवण्याची वहिवाट आहे.

दर एकरीं सरासरी खर्च ( हार्डीच्या पुस्तकावरून ).

| | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १५ नांगरण्या | १५ | ० | ० |
| बेणें | ११ | ० | ० |
| लागण | २ | ८ | ० |
| ७ खुरपण्या व कोळपण्या | ५ | ० | ० |
| ४ पांणी [ विहिरीनें ] | १६ | ० | ० |
| खत | ६ | ० | ० |
| गूळ तयार करणें | ३६ | ० | ० |
| शेताचा खंड | १२ | ० | ० |
| एकूण रुपये | १०३ | ८ | ० |

उत्पन्न ३५ मण.

मध्यप्रांत.—या प्रांतांत सुमारें ३० वर्षांपूर्वी ४२५५१ एकर उंसाखालीं होते. सन १९१४ सालीं हें क्षेत्र अनेक कारणामुळें १७३९२ एकरांवर गेलेलें आहे. आतां हें क्षेत्र पाटाच्या पाण्यामुळें वाढण्याचा संभव आहे. इकडे कळक्या ऊंसाची जास्त लागवड करतात. त्याचा ३० मण गूळ होतो व सुमारें २०० रुपयांपावेतों किंमत येते.

तळ्यावरील खर्च

| | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| पाणपट्टी | ७ | ० | ० |
| खंड व इतर मजूरी | १२० | ० | ० |
| ऊंस कापणें व सोलणें | ९ | ० | ० |
| एकूण रुपये | १३६ | ० | ० |

या दरानें एक मण उंसास ६.९ आणे पडतात गूळ तयार केल्यास दर एकरीं रुपये १६२ खर्च येतो व गुळाची किंमत २०० रुपये येते, म्हणजे सुमारें दर एकरीं ३० रुपये फायदा राहतो.

मांजरी ( जिल्हा पुणें ) येथील कालव्याखालील पीकाचें सरासरी उत्पन्न.

एकरीं उत्पन्न पौंड

| | |
|---|---|
| दर एकरी ऊंस | २५००० |
| उसाचें वजन | ८८००० |
| वाढें | १२००० |
| पाचट | १२००० |
| पावर क्रशरनें काढलेला रस | ६२००० |
| + गूळ | ११००० |

खर्च रुपये

| | |
|---|---|
| खत किंमत | २०० |
| इतर खर्च | २२५ |
| गूळ तयार करणें | ७५ |
| एकंदर खर्च | ५०० |
| गुळाची किंमत रुपये | ७०० |
| निव्वळ फायदा रुपये | २०० |

+ विहिरीखालीं सरासरी ६०००-७०००पौंड गूळ पडतो. फायदा गुळाच्या भावावर अवलंबून असतो तथापि दर एकरीं वरीलप्रमाणें शेताची खतमशागत केल्यास १५० ते २०० रुपये फायदा व्हावा असा अंदाज आहे.

कि डी व रो ग—उंसाला अनेक तऱ्हेचे रोग होतात. त्यांपैकीं मर, उधई, ऊंस रंगणें व काजळ्या हे मुख्य होत. मर म्हणजे ऊंस अगदीं लहान असतांना कोंबाचे गाभे जळणें होय. या किडीचा अंमल भर उन्हाळ्यांत फार असतो. याकरितां जानेवारी महिन्यांत लागण करून एप्रिल-मे महिन्यांत जर ऊंस जोरांत असला तर मर फारशी लागत नाहीं. खोड किड्यावर उपाय-उंस जानेवारींत लावणें, पृष्ठ जमीन मऊ व मोकळी राखणें, सल्फेट व पेंड लवकर देऊन पीक जोमांत ठेवणें, उन्हाळ्यांत पाणी सावकाश जिरवणीचें देऊन ३ इंच पृष्ठ जमीनींत मुटका वळेल इतकी ओल सतत राखणें, जमीनीच्या खालीं २ इंच किंवा बेण्याच्या टिपरापर्यंत कोंब कापून मर काढणें व शेतांत दिवा ठेऊन फुलपाखरें धरणें हे आहेत. ऊंस रंगणें म्हणजे ऊंस पोटांत तांबडा होऊन आंतील गाभा भेंडासारखा होणें. याला उपाय उंसाच्या जमीनींत पाण्याच्या निचऱ्याची सोय करणें हा आहे व लागण बिनरोगी बियाची करावी. काजळ्या—हा रोग फार करून अगदीं बारीक उंसाच्या जातींत आढळतो. यासंबंधीं पूर्ण माहिती पिकांच्या रोगांवर उपाय या सदराखालीं पहावी—

उं सा चें पृ थ क्क र ण—हें शेंकडा प्रमाणांत पुढें दिलें आहेः—

| उसांतील माल) | नायट्रोजन (नत्र) | फास्फोरिक (स्फुराम्ल) | पोटॅश पाला-(क्षार्कर्बित) |
|---|---|---|---|
| पाचट | .४५५ | .१२४ | .८७०० |
| वाढें | .२०१ | .१०७ | .०१८ |
| ऊंस | .०४५ | .०५० | .१६० |

दर एकरी उंसाच्या पिकाला खर्च होणाऱ्या पोषक द्रव्याचा आढावा---( आंकडे पौंडांचे )

| | माल | नायट्रोजन | फास्फोरिक ॲ. | पोटॅश पा.कर्बित. |
|---|---|---|---|---|
| साळलेले ऊंस | ९८३०० | ४४.२३ | ४९.१५ | १५७.३० |
| हिरवीं वाढें | १४८४० | २९.८३ | १५.८८ | ९१.७१ |
| वाळलेलें पाचट | १२५७० | ५७.१९ | १५.५८ | १०९.३५ |
| एकूण— | १२५७१० | १३१.२५ | ८०.६१ | ३५८.३६ |

सा ख रः—करण्याची पद्धत पूर्वीपासून सर्व हिंदुस्थानभर अवगत होती. ईस्ट इंडिया कंपनीच्या वेळीं बंगाल्यांतून साखर परदेशीं जात असे. पुढें वेस्ट इंडीजमध्यें साखर

द्यावें लागल्यामुळें बंगाल्यांतील साखरेवर इतका कर बसविला कीं, ती पाठविणें तोट्याचें होऊं लागलें. पुढें इ. स. १८४५ सालीं ग्रेटब्रिटनमध्यें गुळापासून साखर करण्याच्या कारखान्यासाठीं हिंदुस्थानांतील गुळाला मागणी सुरू झाली. हा गूळ मद्रास इलाख्यांतून जात असे. नंतर युरोपियन पद्धतीनें हिंदुस्थानांत साखर करण्याचे कारखाने निघाले या योगानें कांहीं वर्षेंपर्यंत हिंदुस्थानांत साखर येणें बंद झालें. परंतु पुढें हिंदुस्थानांत साखरेची आयात वाढून निर्गत अगदीं कमी पडली. पूर्वी साखरेची किंमत फार असल्यामुळें तिचा उपयोग फक्त औषधपाणी व चैनीचे पदार्थ यांकडेच होत असे. परंतु अठराव्या शतकापासून चहा, कॉफी यांचा फैलाव फार जोरानें होऊन साखरेची अवश्य पदार्थांमध्यें गणना होऊं लागली. नेपोलियननें इंग्रजावर साखरेसाठीं अवलंबून रहावें लागू नये म्हणून देश्य वनस्पतींपासून साखर काढण्यास उत्तेजन दिलें त्याचें फळ बीटपासून साखर काढण्याची कृति होय. इ. स. १८०१ सालीं जर्मनी देशांत बीट नांवाच्या मुळांपासून साखर करण्याचा कारखाना निघाला. तेव्हांपासून ही साखर व उंसाची साखर यांमध्यें चढाओढ लागून जर्मनी, फ्रान्स, अमेरिका, जाव्हा वगैरे ठिकाणीं रसायनशास्त्र व यंत्रसामुग्री या दोहोंच्या साहाय्यानें साखरेचे कारखाने एवढे प्रचंड चालले आहेत कीं, पूर्वी ज्या हिंदुस्थानांतून इतर देशांस साखरेचा पुरवठा होत होता त्या हिंदुस्थानास स्वतःच्या खर्चास लागणाऱ्या साखरेकरितां दुसऱ्या देशांतील कारखान्यांकडे धांव घ्यावी लागत आहे. सुमारें २५ वर्षां पूर्वी हिंदुस्थानांत साखरेची आयात दरवर्षी सत्तर हजार टन होती. ती सन १९१८–१९ सालीं आठ लक्ष टन असून तिची किंमत पंधरा कोटी रुपये होती. ती मुख्यत्वेंकरून जावांतून येत असून जपानचा त्या व्यापारांत बराच भाग आहे. उत्पन्न व आयात यांचा विचार केला म्हणजे हिंदुस्थान इतका गूळ होत असून सुद्धां तो न पुरून साखरेची आयात वाढत्या प्रमाणावर आहे. हिंदुस्थानांत पूर्वी साखरेचे बरेच कारखाने होते. इ. स. १९१५ सालीं २६ मोठ्या प्रमाणावर चालणारे होते. त्यापैकीं ७ बंगाल्यांत असून मद्रास इलाख्यांत ५; संयुक्त प्रांतांत९;बिहार व ओरिसांत १, नेटिव संस्थानांत ३, व पंजाबांत एक. शिवाय लहान लहान कारखाने पुष्कळ होते प्रत्येक मोठ्या कारखान्यांत कमींत कमी ५० माणसें दर काम करीत होतीं (हिंदुस्थानांतील शेतकीचा प्रोग्रेस रिपोर्ट. सन १९१६–१७).

मद्रास इलाख्यांत पारी आणि कंपनीचे नेलीकूपम, सामल, कोटा, व पालकाट येथें साखर तयार करण्याचे कारखाने चालू आहेत व ही कंपनी पेपरमिंटच्या वड्या वगैरे मिठाई तयार करते. संयुक्त प्रांतांत रोझा व तामकोई हे साखरेचे मुख्य कारखाने आहेत. हिंदुस्थानांतील कांहीं कारखान्यांत गूळ विकत घेऊन साखर तयार करतात. कांहीं कारखान्यांत रम वगैरे मद्यें तयार करण्याची परवानगी आहे, कांहींत सोडावॉटरला लागणारा कर्बद्विप्राणिद वायु तयार करतात. ब्रह्मदेशांत जाड्या उंसाची लागवड चांगली होते. व तेथें क्षेत्रहि मुबलक असल्यामुळें तिकडे साखरेचे पुष्कळ कारखाने निघू शकतात. तंगू जिल्ह्यांत रोज चार टन पांढरी साखर व दोन टन गूळ तयार होईल असा कारखाना आहे. आसामांत लवकरच साखरेचे खाजगी कारखाने निघतील.

संयुक्त प्रांत, आसाम, बहार, ब्रह्मदेश व म्हैसूर, व मुंबई इलाख्याच्या कांहीं भागांत साखरेचे कारखाने मोठ्या प्रमाणावर निघणें शक्य दिसत आहे. कारण बऱ्याच ठिकाणीं नवीन कालवे निघत आहेत. व कांहीं ठिकाणीं चालूहि झाले आहेत. नुकताच अहमदनगरजवळ बेलापूर कंपनीचा कारखाना निघाला आहे. सध्यां त्यांत गूळ तयार होत असून लवकरच साखर तयार करण्याची व्यवस्था होईल असें वाटतें. कालव्याच्या पाण्यावर उंसाची लागवड मोठ्या प्रमाणावर करून त्याला जोडून हा कारखाना निघाला आहे याखेरीज बारामती येथें उंसापासून एकदम साखर करण्याचा कारखाना निघाला आहे. गणदेवी येथेंहि साखर तयार होते व वर्तकी साखरहि थोड्याफार प्रमाणांत बाजारांत येते. यांचा कारखाना पुण्यानजीक फुरसुंगी येथें हनुमान शुगर फॅक्टरी म्हणून प्रसिद्ध आहे. उंसापासून व त्याचप्रमाणें मद्रासेंत व बंगाल्यांत ताडीच्या रसापासून गूळ व साखर तयार करितात. सन १८५० पर्यंत सर्व साखर उंसापासूनच करीत असत. परंतु हल्लीं सरासरीनें $\frac{1}{3}$ साखर सहा महिने लागत असून उंसाला नऊ महिने लागतात. उंसाच्या वीस टनांत जितकी साखर सांपडते तितकीच साखर पंधरा टन बीटच्या कंदांत सांपडते.बीट मुळांचें पीक उंसानंतर थोडें खत देऊन अगर पूर्वीच्या तेवढ्या खतावरहि सहज घेतां येतें. पेशावर जिल्ह्यांत शुगरबीटचें पीक मार्च ते जूनपर्यंत करितां येतें व तेथें १५ नोव्हेंबरपासून १५ फेब्रुवारीपावेतों ऊंस मिळतो. अशी परिस्थिति असल्यामुळें तेथें साखरेच्या कारखान्यास सहा महिने चालण्यास पुरेसा माल मिळूं शकेल असा अंदाज आहे. पंजाब प्रांतांत काश्मीर येथें तयार झालेल्या बियांपासून लायलपूर, हांसी व गुरुदासपूर येथें शुगरबीटची लागवड करण्यांत आली व ती चांगली साधली. ही लागवड पंजाबांत वाढल्यास लागवडीसाठीं बियांचा पुरवठा काश्मीरांतून होऊं शकेल.

क्षेत्र.–हिंदुस्थानांतील उंसाखालीं असलेल्या क्षेत्रापैकीं शेंकडा नव्वद हिस्से क्षेत्र उत्तर हिंदुस्थानांत आहे. याठिकाणीं बहुतेक कठीण व बारीक जातीच्या उंसाची लागवड करतात. उंसात साखरेचें प्रमाण शेंकडा ९ ते १० भाग पर्यंत असतें. अशा जातीच्या उंसांत ( जावांत ) साखरेचें प्रमाण शेंकडा बारा ते तेरा भाग असतें, व दर एकरी चाळीस टन पावेतों ऊंस पिकतो; तोच संयुक्त प्रांतांत वीस टन येतो, व पंजाबांत अवघें दर एकरीं पंधरा टनांचें उत्पन्न होतें. मुंबई इलाख्यांत उसांत शेंकडा साखरेचें प्रमाण १५ असून उत्पन्न

सरासरी ४० टन येतें. जावांत एक टन साखर होण्याला दहा टन ऊंस लागतो व हिंदुस्थानांत १३·८ टन लागतो.

सा ख रे ची कृ ति.—गुळाऐवजीं साखर करण्याची असली म्हणजे काहील जराशी लवकर उतरावी लागते. त्यावेळीं काहिलींतील मदनाचें उष्णतामान ११०° अंश सेन्टिग्रेड असतें. या घट्ट झालेल्या रसास राब म्हणतात. ही राब पातळ असतांच ती मडक्यांत भरितात. कित्येक ठिकाणीं हीं गाडगीं घडवंचीवर ठेवितात व त्यांच्या बुडाला बारीक भोंकें पाडून खालीं पडणाऱ्या काकवीकरितां कुंड्या किंवा तरई ठेवितात. मडक्याच्या तोंडावर सुमारें दोन इंच जाडीचा शेवाळाचा थर बसवितात. व वरून पाणी मारितात. ती शेवाळ तीन चार दिवसांनीं काढितात. दरम्यान रस खालील कुंडींत पडतो तो काकवीसारखा असतो. व वरील गाडग्यांत शुभ्र साखर तयार होते. ही साखर खुरप्यानें खरडून काढितात व वाळत ठेवितात. वरील थर जास्त शुभ्र असतो. व खालील थर जरासा तांबूस रंगावर असतो.

कित्येक ठिकाणीं खोल वाफे करून किंवा वाफ्यांबद्दल मोठमोठ्या कळकाच्या कांवड्यांच्या दुरड्या करून त्यांत राब भरतात यांतील रस किंवा कांकवी धरण्याकरितां मोऱ्या करून त्या कुंडींत सोडलेल्या असतात. दुरड्यांत किंवा वाफ्यांत शेवाळ घालून पाणी मारतात. दरदोन दिवसांनीं शेवाळ काढून साखरेचा जेवढा थर पांढरा झाला असेल तेवढा काढून घेतात व पुन्हा शेवाळ घालून पाणी मारून ठेवितात; याप्रमाणें सर्व राबाची साखर होईपर्यंत ही कृति चालू असते. याला सुमारें एक महिना लागतो. या साखरेस उत्तर हिंदुस्थानांत खांड साखर म्हणतात.

सा ख र नि घ णा रीं झा डें.—साखर निघणाऱ्या जातींपैकीं कोंकणपट्टींत चार तऱ्हेचीं झाडें आढळून येतात. पहिलें माड, दुसरें पंखे करितात ती ताडाची जात, तिसरें खजुरी अगर रानखारका व चवथें सुरमाड. सुमारें पाऊण लक्ष एकर जमीनींत ताड व खजुराची लागवड आहे. माडाची चांगली जपणूक केल्यास त्याचे नारळ घेणें फायद्याचें आहे सुरमाड फारच तुजवी सांपडतात. ताड व खजुरी यांचीं झाडें ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत मुबलक आहेत. खजुरीचीं झाडें उंबरगांव पेटा, साष्टी व सर्व तालुक्याभर समुद्रकिनारीं अजमासें तीन लक्ष झाडें आहेत. हीं झाडें ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत टेंकड्यावरहि आढळतात. यांपैकीं शेंकडा दहा झाडांचा ताडीसाठीं उपयोग करितात. बाकी सर्व झाडें बहुतेक व्यर्थ आहेत. तथापि त्यांच्या पानापासून थोडेंसें उत्पन्न होतें. या झाडांपासून बंगाल, मद्रास व ब्रह्मदेश या ठिकाणीं गूळ बनवितात. या झाडांच्या रसापासून गूळ करण्याचा मक्ता गेल्या तीन वर्षें मि. सोराबजी बी. पटेल याला दिला होता, व तो बहुतेक फलद्रूप झाला आहे. शेतकी खात्यानें उंबरगांव पेट्यांत ताडगांव येथें प्रयोग केले. व त्याकरितां बंगाल्यांतून माहितगार माणूस आणलेला आहे. खजुरी व ताडापासून केलेल्या गुळास उंसाच्या गुळापेक्षां किंचीत कमी भाव येतो; तरी तो गूळहि खपतो. दर वर्षी एका झाडापासून गूळ करण्यास एक रुपया खर्च येतो, व दोन रुपये उत्पन्न होतें.

साखर हा गोड पदार्थ आहे म्हणून तो सर्वांस आवडतो. दरमाणशीं वार्षिक खपाचे आंकडे स्थूलवार खालीं दिले आहेत.

| | |
|---|---|
| इंग्लंड ... ... ... ... | ८६ पौंड |
| यु. स्टे.(अमेरिका) ... ... ... | ६४ ,, |
| डेनमार्क व स्वित्झर्लंड ... ... | ४५ ,, |
| जर्मनी, फ्रान्स, हॉलंड ... ... | ३० ,, |
| हिंदुस्थान ... ... ... ... | २२ ,, |
| इटली, ग्रीस, टर्की ... .... ... | ७ ,, |

साखरेसंबंधीं विस्तृत विवेचन साखर या स्वतंत्र लेखांत दिलें आहे. ( साखर पहा ) [ रा. ब. ग. कें. केळकर ].

———

ऋ.—वर्णमालेंतील सातवें अक्षर. हें अक्षर इ. स. ६ व्या शतकांतील उष्णीषविजय धारणीच्या ताडपत्रांत प्रथम आढळतें. वर्तमान नागरी 'ऋ' याच आकृतीपासून बनला आहे. यानंतर दहाव्या शतकांतल्या एका नेपाळी हस्तलिखित पुस्तकांत व ११व्या शतकांतल्या कांहीं लेखांत ऋ दिसतो.

मराठींत या एकाक्षरी शब्दाला कांहीं अर्थ नसून संस्कृतांत मात्र दहा लाख ( संख्या ), स्वर्ग व आदिति या अर्थी, व एक उद्गारवाचक अव्यय म्हणून वापरतात.

ऋग्वेद—चारहि वेदांत ऋग्वेद हा मोठा व त्यांतील अगदीं प्राचीन असा ग्रंथ आहे. या वेदाचीं आठ अष्टकें आहेत. प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय असतात. मिळून एकंदर अध्याय ६४ आहेत. अध्यायांच्या पोटभागास वर्ग म्हणतात. वर्गांत ऋचा असतात. हे वर्ग सुमारें दोन हजार आहेत. मंत्रद्रष्टे ऋषी यांनीं रचिलेले मंत्र निरनिराळे आहेत, ऋषींवरून ऋग्वेदाचे एकंदर दहा भाग केले आहेत. या भागांस मंडल असें नांव आहे. प्रत्येक मंडलांत अनुवाक असतात. अनुवाकांच्या पोटांत सूक्तें, व सूक्तांत ऋचा असे ऋग्वेदाचे विभाग केले आहेत. मंडलें दहा आहेत. अनुवाक ८५. सूक्तें ( ११ वालखिल्यें धरून ) १०२८ आहेत. एकंदर ऋचा १०५८०॥ आहेत. पदें १५३८२६, आणि अक्षरें ४३२००० आहेत गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज आणि वसिष्ठ हे अनुक्रमें २ ते ७ मंडलांचे ऋषी आहेत. या ऋषींनां 'माध्यम' म्हणतात त्यांच्या मंडलांत विशेष रचनापद्धति दिसून येते. स्वतःच्या गोत्राकरितांच त्या ऋषींनीं आपापले मंत्र निरनिराळे केले असावेत. यज्ञांत पशूच्या अंगयागापूर्वी 'आप्री' नांवाचे मंत्र म्हणावयाचे असतात, ते प्रत्येक ऋषींचे वेगवेगळे आहेत. हेच मंत्र त्यांनीं म्हणावेत, दुसऱ्या ऋषींचे मंत्र म्हणूं नयेत असें ऐतरेय ब्राह्मणांत ( २-४ ) सांगितलें आहे. या मंडलांत पहिल्यांदा अग्नी-विषयीं व नंतर इंद्रादिकांच्या ऋचा येतात. ह्या व इतर कारणांवरून हीं मंडलें अगोदर रचलीं असावींत, असा अजमास आहे. पहिल्या मंडलांत अनेक ऋषींचीं सूक्तें आहेत. त्यांत कण्व व कण्वगोत्रज ऋषींचीं सूक्तें बरींच आहेत. या ऋषींस शतर्चीं म्हणतात. कारण त्यांनीं शंभर शंभर ऋचा केल्या आहेत. आठव्या मंडलास प्रगाथ म्हणतात. यांतहि कण्वऋषींचीं सूक्तें बरींच आहेत. या सूक्तांत आणि पहिल्या मंडलांतील कण्वांच्या सूक्तांत बरेंच साम्य आहे. नववें मंडल, पहिलीं आठ झाल्यावर झालें असावें. यांत फक्त पवमानसोमाचें वर्णन आहे. वर सांगितलेल्या ऋषींनीं केलेलीं पवमानसूक्तें यांतच ग्रथित केलीं आहेत. दहावें मंडल शेवटीं झालें. यांत क्षुद्रसूक्तें व महासूक्तें आहेत. यांत पूर्वीच्या मंडलांत येणाऱ्या विषयांपेक्षां निराळे विषय आले आहेत. रुद्र, अग्नि आणि विशेषतः विश्वेदेव, मन्यु, श्रद्धा इत्यादि देवतांचें वर्णन यांत आहे. शिवाय विवाह, और्ध्वदेहिककर्म, सृष्टीची उत्पत्ति, तत्त्वज्ञान आणि वशीकरण वगैरेचे मंत्र इ. नवीन विषय या मंडलांत आले आहेत. अनेक देवता आहेत, ही कल्पना कमी कमी होत जाऊन एकच देव आहे ही भावना समाजांत जागृत झाली असावी असें या दहाव्या मंडलांत दिसतें.

ऋग्वेद हा हौत्रवेद असल्यामुळें होतृऋत्विजानें म्हणावयाचे मंत्र यांत आले आहेत. देवतांची स्तुति व त्यांचें महात्म्य, वैभव, तेजस्वीपणा, औदार्य, शहाणपणा इत्यादि गुणांचें वर्णन यांत आलेलें आहे. तसेंच आम्हास गोधन द्या, संतति द्या, आमची भरभराट होऊं द्या, युद्धांत आम्हांस जय मिळो, आमच्या शत्रूंचें निसंतान होवो, आमचें वैभव वाढो, आणि आम्ही दीर्घायु होवो! अशा प्रकारच्या प्रार्थना या वेदांत आल्या आहेत.

ऋग्वेदांत ३३ देवांचें वर्णन आलेलें आहे. परंतु फक्त सुमारें २० देवांचें वर्णन ३ किंवा तीनहून अधिक सूक्तांत झालेलें आढळतें. पर्जन्य, वात आणि यम यांचीं प्रत्येकाचीं फक्त तीनच सूक्तें आहेत. इंद्राचीं सूक्तें २५० आहेत. अग्नि आणि सोम यांचीं सूक्तें अनुक्रमें सुमारें २०० व १०० आहेत. इंद्र, अग्नि ( मित्र व मातरिश्वन् ) सोम, सूर्य यांचीं पांच स्वरूपें मित्र, अर्यमा, विष्णु, सविता आणि पूषा. अश्विनीकुमार, उषस्, वरुण, रुद्र, मरुत्, वायु, पर्जन्य, यम, प्रजापति, द्यौ [ आकाश ] इत्यादि देवतांच्या पराक्रमादिगुणांचें वर्णन, त्यांची स्तुति प्रार्थना व अशा अनेक गोष्टी ऋग्वेदांत आल्या आहेत.

ऋग्वेदाविषयीं बरेंचसें विस्तृत विवेचन वेदविद्या व बुद्ध-पूर्वजग या प्रस्तावनाखंडांतील दुसऱ्या व तिसऱ्या विभागांत केलें आहे. त्या विवेचनाची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं परंतु उल्लेख करणें अवश्य आहे. वेदविद्या या विभागांत वेदवाङ्मयांत ऋग्वेदाचें स्थान, ऋग्वेद संहितेची रचना, ऋग्वेदांतील सूक्तांच्या कालासंबंधीं भाषाविषयक व छंदविषयक, भौगोलिकज्ञानविषयक व सामाजिक गोष्टींसंबंधीं, उदाहरणार्थ पशुपालवृत्ति, शास्त्रें, कला वगैरेची प्रगति, स्त्रियांचा दर्जा, तत्कालीन लोकांची नीतिमत्ता, ग्रंथभाषेची दुर्बोधता वगैरे गोष्टींवरून उपलब्ध होणारा पुरावा व

त्यावरून निघणारीं अनुमानें, ऋग्वेदपुराणकथाभ्यासास महत्त्व, त्यांतील पुराणकथांचा उगम व वाढ, असुर व दासांसंबंधी कल्पना, ऋग्वेदांतील यम व अवेस्तांतील यिम यांचें साम्य, ऋग्वेदांत देवता व भक्त यांमध्यें दिसून येणारा संबंध, वरुण, इंद्र, अग्नि, उषा, वायु वगैरे देवतांच्या स्तुतिपर सूक्तें, यज्ञविधिविषयक सूक्तें, आप्रीसूक्तें, संस्कारसूक्तें अध्यात्मिक सूक्तें, आख्यानसूक्तें, मांत्रिकीसूक्तें, लौकिक सूक्तें दानस्तुतिसूक्तें, कूटसूक्तें, वगैरे ऋग्वेदसंहितेंत अंतर्भूत झालेले निरनिराळे विषय यांचें विवेचन प्रकरण २ मध्यें केलें आहे.

यानंतर नवव्या प्रकरणामध्यें वेदकालाचा निर्णय करतांना ऋग्वेदसंहितेची रचना इतर वाङ्मयाशीं सापेक्षतेनें केव्हां झाली असावी याविषयीं उहापोह केला आहे व मॅक्समुल्लरची केवळ अनमानधपक्याची गृहीत उपपत्ति, याकोबी यांचें ज्योतिःशास्त्रमूलक विवेचन, ओल्डेनबर्गचें संस्कृतिप्रगतीच्या गतीवर बसविलेलें अनुमान, व लो. टिळकांचें संपातचलनावरून ज्योतिःशास्त्राधारें काढलेलें अनुमान हीं दिलीं आहेत. वरील गोष्टींस व्यं. बा. केतकर यांनीं तैत्तिरीय ब्राह्मणांतील उताऱ्यावरून दिलेली पुष्टि परिशिष्ट 'अ' मध्यें दिली आहे.

वैदिक वाङ्मय, ब्राह्मणजाति व यज्ञसंस्था या प्रकरणांतहि संहितीकरणाच्या व यज्ञसंस्थेच्या व त्याबरोबरच ब्राह्मण जातीच्या विकासाचा परस्पर संबंध कसा होता, ऋग्वेदांत तीन निरनिराळीं संस्करणें अथवा संहितीकरणें कशीं स्पष्ट दिसतात, ऋग्वेदी ब्राह्मणांच्या शाखा कोणत्या व कोठें आहेत, अथर्ववेदाचें त्रयीपासून पृथक्करण कसें झालें, ऋग्वेदीय सूक्तांचा उपयोग करणारा मुख्य ऋत्विज होता याचें स्थान निश्चित व पृथक कसें झालं, होता व सामक यांचा संबंध, व समाजांतील चार वर्णांची उत्पत्ति वगैरे विस्तृत विवेचन आढळेल.

यानंतर दैवतेतिहास या बाराव्या प्रकरणांत ऋग्वेदांतील देवतांसंबंधीं यास्क व सायण यांमधील मतभेद, व ऋग्वेदांत आढळणाऱ्या ऋग्वेद व अथर्ववेद यांत सामान्य असणाऱ्या देवतांची यादी दिली आहे, नंतर वैदिक दैवतांविषयीं सामान्य विवेचन करून वेदांतील देवतांचें इतर देशांतील कोणत्या देवतांशीं साम्य दिसून येतें त्याची तुलना केली आहे. यापुढें इन्द्र देवतेचें स्वरूप, तिचे शत्रू असुर, इन्द्राचा त्रित आदित्य वगैरेशीं असलेला संबंध, इन्द्र व मरुत, इन्द्र व सोम, इंद्र व वायु, इंद्र व बृहस्पति, इंद्र व गंधर्व, इंद्र व अग्नि, इंद्र व विष्णु, इंद्र व त्वष्टा, इंद्र व ऋभु, इंद्र व वसू वगैरे एकत्र आढळणारीं देवतायुग्में, इंद्रानें जगदुत्पत्तीसाठीं केलेले प्रयत्न वगैरे या प्रमुख देवतेचें वर्णन सविस्तर केलें आहे. यानंतर इतर देवता वरुण, अग्नि, सोम, द्यौः, मित्र, विष्णु, आदित्य, अर्यमन्, भग, अंश, दक्ष, विवस्वत्, सूर्य, सविता, पूषन्, मरुत्, रुद्र, अदिति, दिति, वायु, अश्विन, उषा, त्रित आप्त्य अजएकपाद्, आप, पर्जन्य, अपान्नपात्, अहिर्बुध्न्य, सरस्वती, पृथिवी, बृहस्पती, इतर स्त्रीदेवता, आणि ऋभु, अप्सरा, गंधर्व इत्यादि कनिष्ठ देवता, इतर इष्ट देवता, देवतायुग्में देवतासंघ वगैरेंचें विवेचन केलें आहे. त्याचप्रमाणें वेदांतील देवतांचें सामान्य गुणवर्णन, वैदिक नीतिमत्ता, एकंदर देवतांची संख्या, त्यांचें यास्कांनीं केलेलें वर्गीकरण वगैरेसंबंधी माहिती दिली आहे.

वे द का ली न इ ति हा सः—यज्ञ संस्थेचा अधिक इतिहास, या प्रकरणांत यज्ञसंस्थेचें ऋग्वेदांत दिसणारें स्वरूप लक्षांत यावें म्हणून ऋग्वेदांत आढळणारीं व सूत्रोक्त प्रयोगाशीं जुळणारीं यज्ञिय पात्रें, यज्ञिय विहार, ऋत्विग्जनांचीं नांवें, शास्त्रें पठण करितांना मध्यें भरावयाचे निविद, शस्त्रें, स्तोत्रें, यज्ञीय हवी यांचें ऋग्वेदांतील सामान्य, पशुयागासंबंधीं, चातुर्मास्यांतर्गत महापितृयज्ञ, सोमयागासंबंधीं, सोमपानासंबंधीं व ऋतुयाजनामक यागासंबंधीं सुमारें ९३ उल्लेख मूळमंत्र व अर्थासह दिले आहेत त्याप्रमाणेंच ऋग्वेदमंत्रांत आढळणाऱ्या परंतु सूत्रोक्त यज्ञांमध्यें न दिसणाऱ्या क्रिया दाखविणारे ४४ उल्लेखमंत्र व अर्थासह दिले आहेत व त्यांवरून निघणारीं अनुमानें दिलीं आहेत. तसेंच अध्वर्युप्रमुख १६ ऋत्विजांपैकीं कोणकोणत्या ऋत्विजाचा ऋग्वेदांमध्यें किती वेळां उल्लेख येतो याचें कोष्टक व ऋग्वेदसंबद्ध मुख्य ऋत्विज होता याचें ऋग्वेदमंत्रावरून दिसणारें कार्य दाखविण्याकरितां मंत्रोल्लेख दिले आहेत व त्यांवरून होता हा यज्ञ करणाऱ्यांचा संप्रदाय असावा असें दाखविलें आहे.

तसेंच अध्वर्यूसंबंधीचे सर्व मंत्रोल्लेख देऊन अध्वर्यूंचा यज्ञविधि सोमप्रधान असून त्यांत अनेक क्रिया असत व मंत्राबरोबर तंत्रहि बरेंच वाढलें होतें हें दाखविलें आहे. ज्याअर्थीं यजूंचा यज्ञविधि हविःप्रधान अशी परिस्थिति होती त्याअर्थीं यजू अध्वर्यू यांचें एकत्व ऋग्वेदकालीं झालेलें नसावें. पोता, नेष्टा, वगैरे इतर ऋत्विजासंबंधीं उल्लेख देऊन त्यांचें कार्य स्पष्ट केलें आहे व ऋग्वेदांत, गायत्री, अर्की, उक्थी, ब्रह्मे वगैरे संप्रदाय दृष्टीस पडतात व होते, अध्वर्यू, ब्रह्मे वगैरेंनीं आपापल्या क्रिया पृथक करून यज्ञसंस्थेची वाढ केली हें दाखविलें आहे. त्याप्रमाणेंच एकंदर ऋग्वेदांतील मंत्र व त्यांचा निरनिराळीं ब्राह्मणें व श्रौतसूत्रें यांनीं कोणकोणत्या क्रियांकडे व कितपत उपयोग केला यासंबंधीं विवेचन केलें आहे, व याचें पृथक्करण परिशिष्ट (उ) मध्यें दुसऱ्या कोष्टकांत दिलें आहे.

यानंतर चवदाव्या प्रकरणांत ऋग्वेदांतील अतींद्रियस्थितीसंबंधानें कल्पना दिल्या आहेत. त्यांत आत्मा, स्वर्ग, नरक, पितर, यम वगैरेसंबंधीं विवेचन केलें आहे. तसेंच परिशिष्ट 'इ' मध्यें ऋग्वेदांमधील ज्या भागाचा हौत्राकडे उपयोग होत नाहीं असा किती आहे तें दाखविलें आहे.

युद्धपूर्वजग या विभागांत तिसऱ्या प्रकरणामध्यें असुर-राष्ट्रसंस्थापनेपासून तदनंतरच्या इतिहासार्थ वेदावलोकन केलें आहे. त्यांत आर्यन या काल्पनिक जातीविषयीं व आर्य या वेदभाषी जाती विषयींच्या कल्पना दिल्या आहेत व आर्य शब्दाचा अनेक ऋग्वेदांतील व अथर्ववेदांतील उतारे देऊन अर्थ निश्चित केला आहे. त्याप्रमाणेंच दस्यु व दास यासंबंधींचे उतारे देऊन त्या शब्दांचेहि अर्थ निश्चित केले आहेत. त्याप्रमाणेंच राजारामशास्त्री भागवत यांच्या देव, पूर्वदेव वगैरेसंबंधींच्या कल्पना दिल्या आहेत. नंतर मंत्रद्रष्टकालाचे इंद्रवृत्रादि पौराणिक कथांचा काल, अर्धवट ऐतिहासिक कथांचा काल व दाशराज्ञयुद्धाचा काल असे तीन कालविभाग पाडले आहेत. नंतर ऋग्मंत्रांत दिसणाऱ्या समाजाचें स्वरूप देऊन पूर्वीच्या ग्रंथकारांचें आर्य-दस्युयुद्धविषयक मत व आमचें आजचें मत दिलें आहे, व त्यावरून ऋग्मंत्रवाङ्मय हें सर्व भारतीय आर्यन लोकांचें नसून कांहींशा उत्तरकालीन आलेल्या भारतीयांचें वाङ्मय आहे आणि ब्राह्मणें हें वाङ्मय जुनें सूतवाङ्मय व नवें मांत्रवाङ्मय यांस जोडणारें आहे असा सिद्धांत काढला आहे, व त्याची कारणें व पद्धति दिलीं आहेत. नंतर ऋग्वेद व दाशराज्ञयुद्ध यांचा संबंध स्पष्ट केला व हें केवळ आर्यन् आणि नॉन आर्यन् यांमधील युद्ध नव्हतें हें सुदासाच्या शत्रूंच्या यादीवरून दाखविलें आहे. नंतर दाशराज्ञयुद्धविषयक उल्लेखांचा त्यांत येणाऱ्या व्यक्तींवरून अन्योन्याश्रय दाखविला आहे

अशा प्रकारें दाशराज्ञयुद्धविषयक सूक्तांत प्रत्यक्ष उल्लेखिलेल्या व तत्संबद्ध एकंदर ऋग्वेदांत आढळणाऱ्या व्यक्ती घेऊन त्यांची माहिती दिली आहे व तीवरून बहुतेक ऋग्वेदीय सूक्तांची युद्धोत्तरता सिद्ध केली आहे. शेवटीं अशा एकंदर ज्ञातसंबंध व अज्ञातसंबंध व्यक्तींचा आढावा घेतला आहे व प्रत्येक सूक्ताची दाशराज्ञयुद्धाशीं सर्वानुक्रमणी व वरील उल्लेखांच्या सहाय्यानें उत्तरकालीनता दाखविणारें कोष्टक दिलें आहे. यानंतर ऋग्वेदमंत्रांतील इतिहासाची स्थूल रूपरेखा व आयुष्यक्रम दिला आहे.

चवथ्या प्रकरणांत दाशराज्ञयुद्ध अथवा भरतदिग्विजयाचें सविस्तर वृत्त व त्यांतील प्रमुख व्यक्तींचे मंत्रोल्लेख देऊन सविस्तर विवेचन केलें आहे व शेवटीं त्यावरून निघणारीं अनुमानें दिलीं आहेत.

पांचव्या प्रकरणांत ऋग्वेदसह चारी वेदांतील शब्दांचें विषयवार वर्गीकरण करून व त्यांवर विस्तृत टीपा देऊन तत्कालीन संस्कृतीचें योग्य ज्ञान होण्याची सर्व साधनसामुग्री तयार करून ठेवली आहे.

ब्राह्मण्याचा इतिहास या सहाव्या प्रकरणांत ऋषींच्या सूक्तकर्तृत्वाविषयीं मंत्रांतील पुरावा देऊन सर्वानुक्रमणीकारांनीं दिलेल्या सूक्तद्रष्ट्यांपैकीं किती ऋषींचा मंत्रांत उल्लेख आहे हें दाखविलें आहे. नंतर ब्राह्मणांत उल्लेखिलेले सूक्तद्रष्टे देऊन सर्वानुक्रमणी व ब्राह्मणें यांतील या बाबतींतील भेद नजरेस आणला आहे. ज्या देवतांस सूक्तद्रष्टे ठरविलें आहे त्याहि वेगळ्या काढून दाखविल्या आहेत, तसेंच सूत्रांमध्यें गोत्रें म्हणून उल्लेखिलेल्या ऋषींपैकीं सर्वानुक्रमणीकारांनीं मंत्रद्रष्टे म्हटलेल्या ऋषींचा नामनिर्देश केंकला आहे. नंतर मंत्रकालीन पौरोहित्य व राजाश्रय या प्रश्नाचें कोणत्या ऋषीस कोणत्या राजानें काय काय देणग्या दिल्या त्यांची यादी देऊन विवेचन केलें आहे. नंतर आंगिरसादि मुख्य कुलांचा अंशसंबंध ऋग्मंत्रांवरून कितपत सिद्ध होतो तें दाखविलें आहे. तसेंच आप्रीसूक्तें व गोत्रें यांचा संबंध काय होता तें दाखविलें आहे. शेवटीं गोत्रांचा वेदाध्यायाशीं संबंध काय होता हें स्पष्ट केलें आहे.

**ऋचीक**—भृगुवंशांतील एक ऋषि. यानें वृद्धपणीं कान्यकुब्ज देशाच्या गाधिराजाची कन्या सत्यवती हिला स्वतः-करितां मागणी घातली. राजानें सहस्र श्यामकर्ण अश्व आणून देण्याची अट ऋचीकाला घातली असतांहि त्यानें वरुणाकडून तसे अश्व आणून राजास दिले व सत्यवतीशीं लग्न केलें. एकदां भृगुऋषि सत्यवतीवर प्रसन्न होऊन त्यांनीं तिला वर मागण्यास सांगितलें. सत्यवतीनें स्वतःला व मातेला पुत्र मागितले. तेव्हां भृगूनें एक ब्राह्मणोत्पत्तीचा व दुसरा क्षत्रियोत्पत्तीचा असे दोन चरु(हवि) दिले. सत्यवतीच्या मातेनें अदलाबदल करून पहिला चरु भक्षण केला. तेव्हां तिला ब्राह्मणप्रभावाचा विश्वामित्र पुत्र झाला व सत्यवतीला भृगुकृपेनें क्षत्रियप्रभावाचा पुत्र न होतां पौत्र झाला तोच परशुराम होय. (महा. भा. अनु. पर्व, अ. ५०–५१) शुनःशेप हा याच ऋचीकाचा पुत्र असून त्यानें तो बळी देण्याकरितां विकला, अशाबद्दलचा रामायणांत उल्लेख आहे.

**ऋणमोचन**—वऱ्हाड. जिल्हा व तालुका उमरावती. दर्यापूर तालुक्यांतील धनोरा गांवाबरोबर इ. स १८४० सालीं मिळालेला हा एक जहागिरीचा गांव आहे. येथून खोलापूर ४–५ मैलावर आहे. ऋणमोचनाचें क्षेत्रफळ २९५ एकर ६ गुंठे आहे. हें हिंदू लोकांचें पवित्र स्थान असून येथें पौष महिन्यांतील दर रविवारीं जत्रा भरते. येथील पूर्णा नदींत स्नान केलें म्हणजे मनुष्य ऋणमुक्त लवकर होतो असें म्हणतात. येथें पूर्णा नदी पूर्ववाहिनी असल्यामुळें आणि तीरावर महादेवाचें लिंग असल्यामुळें या ठिकाणीं स्नानाचें महत्त्व आहे, अशी कित्येकांची समजूत आहे. वरील दर्शविलेली ऋणमुक्तता व्यावहारिक नसून पितृऋणमुक्तता ही आहे.

**ऋतु.**—ऋग्वेदसंहितेंत शरद्, हेमंत इत्यादि ऋतूंचीं नांवें पुष्कळ आलीं आहेत, व ऋतु शब्दाचा उल्लेखहि आढळतो. तथापि यजुर्वेदांत व बह्वृच ब्राह्मणांत तो जसा फार वेळ आला आहे तसा ऋग्वेदांत आढळत नाहीं.

तैत्तिरीय संहितेंत ' मधुश्च माधवश्च वासंतिकावृतू शुक्रश्च शुचिश्च ग्रैष्मावृतू नभश्च नभस्यश्च वार्षिकावृतू इषश्चोर्जश्च शारदावृतू सहश्च सहस्यश्च हैमंतिकावृतू तपश्च तपस्यश्च

शैशिरावृतू ' ( तै. सं ४. ४, ११ ) याप्रमाणें महिने आणि ऋतूंचीं नांवें दिलीं आहेत. मात्र येथें ऋतु शब्द जवळ जवळ मासवाचक वापरल्यासारखा दिसतो. याप्रमाणेंच 'षड्ढाभिर्दी-क्षितःस्यात् षड्वा ऋतवः संवत्सरः' (तै. सं. ५. ६, ७). याप्रमाणें वर्षाचे सहा ऋतु असतात असा स्पष्ट उल्लेख आला आहे. याशिवाय तैत्तिरीय संहितेंत सहा ऋतूंचीं नांवें एक-लगत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत (४. ३, २; ५. ६, २३; ७.५, १४ ) वरील पहिल्या उल्लेखांतील वाक्यें वाजसनेयी संहितेंत निरनिराळ्या मंत्रांच्या आरंभीं आलीं आहेत ( १३. २५; १४ ६; १५; १६; २७, १५. ५७. )

कांहीं ठिकाणीं पांच ऋतु असतात असेंहि विधान आढळतें. पंचशारदीयेन यजेत । पंच वा ऋतवः संवत्सरः (तै. ब्रा. २. ७, १०) 'द्वादशमासाः पंचर्तवो हेमंतशिशिरयोःसमासेन' ( ऐ. ब्रा. १. १ ). यावरून पांच ऋतू मानीत व तेव्हां हेमंत आणि शिशिर यांचा एकत्र अंतर्भाव करीत असत असें दिसतें. याबद्दल तैत्तिरीयसंहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण यांतहि उल्लेख आहेत. क्वचित ऋतु तीन असाहि उल्लेख आढळतो. एका ठिकाणीं अग्निर्ऋतुः सूर्य ऋतुश्चंद्रमा ऋतुः ( तै. ब्रा. ३. १०, १ ) असा उल्लेख आहे

वेदांत सहाहि ऋतूंचा निर्देश जेथें जेथें एकत्र केला आहे तेथें तेथें वसंतापासून आरंभ केला आहे. याशिवाय ऋतूंत वसंत मुख्य होय अशीं स्वतंत्र विधानेंहि आहेत. 'मुखं वा एतदृतूनां। यद्वसंतः' ( तै. ब्रा. १. १, २ ). तस्यते वसंतः शिरः। ग्रीष्मो दक्षिणःपक्षः। वर्षाःपुच्छं शरदुत्तर पक्षः हेमंतो मध्यम् ( तै. ब्रा. ३. १०, ४ ) यासारखींच वाक्यें आणखीहि कांहीं स्थलीं आहेत. यांत संवत्सर हा एक पक्षी कल्पून वसंत शिर, ग्रीष्म उजवा पक्ष, वर्षा पुच्छ, शरद डावापक्ष व हेमंत मध्य अशी कल्पना केली आहे. 'उभय तोमुखमृतुपात्रं भवति कोहि तद्वेद यदृतूनां मुखं' (तै. सं. ६. ५, ३). ऋतुपात्रास दोहोंकडे तोंड असतें. ऋतूंचें मुख कोणतें हें कोणी जाणलें आहे ? म्हणजे कोणत्या ऋतूचा आरंभ केव्हां होतो हें नक्की समजत नाहीं. ऋतु सूर्याच्या स्थितीवर अवलंबून आहेत. एका वर्षी सौरमासाचा आरंभ एका चांद्रमासाच्या आरंभीं झाला तर पुढच्या वर्षी तो शुक्ल द्वादशीच्या सुमारास व तिसऱ्या वर्षी कृष्ण अष्टमीच्या सुमारास होतो. तेव्हां ऋत्वारंभ एका तिथीच्या संबंधें अनियमितच होय. इतकेंच नाहीं, तर सौरमाससंबंधेंहि तो थोडा बहुत अनियमित असतो. स्थलभेदानेंहि ऋत्वारंभांत फेर पडतो. आतां हा फरक दहा पांच दिवसांचा असावयाचा हें उघड आहे. चंद्रसूर्यांच्या गतींचें सूक्ष्म ज्ञान नसेल आणि काल मोजण्याचीं साधनें नसतील तर पक्षसंधि आणि ऋतु-संधि यांचें सूक्ष्म ज्ञान होणें फार कठिण आहे. याबद्दल पौर्णमासेष्टि आणि दर्शेष्टि या यागांनीं पौर्णमासी आणि अमावास्या हीं पर्वे निश्चित केलीं व चातुर्मास्य यज्ञांनीं ऋतु-संधि व्यवस्थित केले असा उल्लेख आहे ( श. ब्रा. १. ६,३ ) आश्वलायन श्रौतसूत्रांत एका ठिकाणीं ऋतूंचा संबंध आला आहे. तेथें वसंतापासून आरंभ आहे ( श्रौ. सू. ४. १२ ). महाभारतांत अश्वमेधपर्वांत ऋतवःशिशिरादयः (अश्व. ४४) असें म्हटलें असून ऋतूंत शिशिर ऋतूस अग्रस्थान दिलें आहे; तथापि महाभारतांत अनेक ठिकाणीं वसंतादि ऋतूंचा उल्लेख आहे. उदगयनारंभीं वर्षारंभ केला म्हणजे ऋतु शिशिरादि किंवा हेमंतादि असलेच पाहिजेत. परंतु एकंदर उल्लेख पाहतां ' चैत्रवैशाख वसंतऋतु ' हीच परिभाषा तेव्हां होती हें सिद्ध होतें. ऋतूंबद्दल विवेचन बुद्धपूर्व जग वेद-कालांतील शब्दसृष्टि ( पृ. २०० )व विज्ञानेतिहास ज्योतिषशास्त्राचा इतिहास ( पृ. २९३) या ठिकाणींहि केलेलें आहे.

सध्यां जरी चैत्रवैशाख वसंतऋतु अशी आपण ऋतूंची गणना करितों. तरी ऋतु हे चांद्रमासांवर अवलंबून नसून सौरमासांवर म्हणजे संक्रांतीवर अवलंबून असतात. तेव्हां हल्लीं वसंतऋतूचा आरंभ चैत्रशुद्ध प्रतिपदेस न होतां मीन राशीस सूर्य गेला असतां होतो असें समजतात. याप्रमाणें निर्णयसागरी ग्रहलाघवीय पंचांगांत शके १८४३ सालीं वसंतऋतूचा आरंभ फाल्गुन शुद्ध पौर्णिमेस दिला आहे; व पुढें शके १८४४ सालीं ग्रीष्मऋतूचा आरंभ सूर्य वृषभ राशीस जातो त्यादिवशीं म्हणजे वैशाख वद्य तृतीयेस दिला आहे. याप्रमाणें सूर्यानें दोन संक्रांती भोगल्या म्हणजे एक ऋतु पूर्ण होतो व याप्रमाणें एक वर्षांत सहा ऋतु होतात.

अलीकडे पाश्चात्त्यदेशांत व तदनुरोधानें इकडेहि चार ऋतू मानतात. आपण याअर्थी उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे हवामानावरून तीनच ऋतू अथवा काळ मानतों. पाश्चात्यदेशांत हवामानाच्या फरकावरूनच वसंत, उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे चार ऋतू अथवा ' सीझन्स ' मानतात. हे ऋतू पृथ्वीच्या वार्षिक गतीमुळें उत्पन्न होतात; तथापि हा हवामानांतील फरक केवळ वार्षिक गतीवर अवलंबून नसून पृथ्वीचा आंस तिच्या कक्षेच्या पातळीशीं ६६॥ व तिच्या वरील लंबाशीं २३॥ अंशांचा कोन करतो हें त्याचें मुख्य कारण आहे. हा कोन नेहमीं कायम असतो व आंस पृथ्वीच्या भिन्न भिन्न स्थितींत स्वतःशीं समांतर असतो. पृथ्वी आपल्या सूर्याभोंवतींच्या प्रदक्षिणेंत जून २२ तारखेस अशा स्थितींत असते कीं, त्यावेळीं उत्तरध्रुव सूर्याकडे कललेला असून सूर्यप्रकाश उत्तरध्रुवाच्या पलीकडे जातो. यामुळें उत्तर गोलार्धांतील प्रत्येक स्थलीं बारा तासांपेक्षां कांहींतरी मोठा दिवस असतो व याच्या उलट दक्षिण गोलार्धांत बारा तासांपेक्षां मोठी रात्र असते. यामुळें यावेळीं उत्तरगोलार्धांत उन्हाळा व दक्षिणगोलार्धांत हिंवाळा असतो. पुढें सप्टेंबर २१ तारखेस पृथ्वी अशा स्थितींत असते कीं, दोन्हीहि ध्रुव सूर्याकडे सारखेच कललेले असतात. त्यामुळें उत्तरगोलार्धांत व दक्षिणगोलार्धांतहि सूर्यप्रकाश बरोबर बाराच तास मिळून दिवस रात्र सारखींच असतात व

हवामान समशीतोष्ण असतें. या वेळीं आपल्याकडे पावसाळा असतो. नंतर डिसेंबर बावीस तारखेस व जून २२ तारखेस उलट म्हणजे दक्षिण ध्रुव सूर्याकडे कललेला अशा स्थितींत पृथ्वी असते, त्यामुळें दक्षिणगोलार्धांत दिवस मोठा असून उन्हाळा असतो व उत्तरगोलार्धांत रात्री मोठ्या असून हिंवाळा असतो. मार्च २१ तारखेस पुन्हां दिवसरात्र सारखीच असून हवा समशीतोष्ण असते, व उत्तरगोलार्धांत वसंतऋतु असतो. हिंदुस्थानांत वसंत व उन्हाळा असे दोन भिन्न ऋतु प्रत्ययास येत नसल्यामुळें येथें उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा असे तीनच काल मानण्यांत येतात.

**ऋतुपर्णः**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न अयुतायु राजाचा पुत्र, हा अक्षविद्यादिकांत परम निपुण असे. वीरसेनपुत्र नलराजा तो याचा परममित्र होता. ( नल पहा. ) यास पुत्र सर्वकाम अ० सर्वकर्मा नामांतरानें नल नांवाचा होता.

**ऋत्विज**—यज्ञादिकांमध्यें यजमानाकरितां श्रौतकर्म करणाऱ्या अग्निहोत्र्याच्या घरीं दररोजचा सकाळसंध्याकाळचा होम देणारा ऋत्विज ( अध्वर्यु ) एकच असतो. परंतु पौर्णिमेच्या व अमावास्येच्या दुसऱ्या दिवशीं करावयाच्या इष्टींत ऋत्विजांची संख्या चार असते.ते चार ऋत्विज म्हणजे अध्वर्यु, ब्रह्मा, होता व आग्नीध्र हे होत. चातुर्मास्य यागांत वरील चारांशिवाय प्रतिप्रस्थाता नामक एक जास्त ऋत्विज असतो पशुमंबंधीं ( निरूढ अथवा काम्य ) यागांत वरील पांचांशिवाय मैत्रावरुण नामक आणखी एक ऋत्विज असतो. अग्न्याधानांत ( अग्निहोत्र घेते वेळीं ) इष्टींतील चार ऋत्विजांशिवाय उद्गाता नामक पांचवा ऋत्विज असतो. अग्निष्टोमादि सोमयागांत वर उल्लेखिलेल्या सात ऋत्विजांशिवाय ब्राह्मणाच्छंसी, अच्छावाक, प्रस्तोता, पोता, प्रतिहर्ता, नेष्टा, उन्नेता, ग्रावस्तुत् आणि सुब्रह्मण्य हे ऋत्विज जास्त असतात. एकूण सोमयागांत प्रत्यक्ष कार्यकर्ते सोळा ऋत्विज असून सदस्य नामक ( सद नामक मंडपांत बसणारा ) एक सतरावा ऋत्विज असतो.

यज्ञादिकांमध्यें यजमानानें जे ऋत्विज नेमावयाचे त्यासंबंधीं ऋत्विक्वरण नामक विधि करावयाचा असतो. तो आश्वलायन गृह्यसूत्रांत ( १. २३ ) सांगितला आहे. त्याच ठिकाणीं ऋत्विज योजावयाचा तो अव्यंग व तरुण असावा असें सांगितलें आहे.

स्मार्त याज्ञिकांतहि शांति वगैरेंच्या हवनप्रसंगीं आचार्य ( अध्वर्यु ) व ऋत्विक्वरणाचा आचार आहे. ऋत्विज् शब्दासंबंधीं जास्त माहितीसाठीं ( बुद्धपूर्वजग विभाग ३, पूर्वार्ध पृष्ठ ३२२ पहा. )

**ऋभु वै दि क**—ऋभूंचें वर्णन 'वेदविद्या' ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड विभाग २, पा. ३३९–३४१ ) ग्रंथांत सांपडेल, पुराणांत ऋभु हा एक ब्रह्ममानसपुत्र. ( भाग० स्कं० ४ अ० ८ ) असून निदाघ ऋषि याचा शिष्य होता.

**ऋषभः**—(१)या नांवाच्या अनेक पौराणिक व्यक्ती व वस्तु आहेत ( महा. भा. वन अ. ११०; शांति, अ. १२५–१२८ रामायण युद्ध स. ७०, ७४; किष्किंधा. स. ४१. भागवत स्कं. ५. अ. ३–६ व स्कं. १०. अ. २२. इत्यादि ) पण त्या विशेष महत्त्वाच्या नाहींत.

(२)पहिला जैन तीर्थंकर. वंश इक्ष्वाकु. पूर्वजन्म सर्वार्थसिद्धि काल सुषम-दुःषमा, नक्षत्र उत्तराषाढा, जन्मस्थळ आयोध्या, पिता नाभिराज, माता मरुदेवी, ऊंची५०० धनुष्यें, वर्ण सुवर्ण, दीक्षास्थान वडाचें झाड, गणधर ८४, आसन पर्यंकासन, वय ८४ लक्षपर्व, लांछन वृषभ, यक्ष गोमुख, यक्षिणी चक्रेश्वरी व निर्वाणस्थान कैलासपर्वत. या तीर्थंकराच्या पंचकल्याणिकाच्या पर्वतिथी पुढीलप्रमाणेः—गर्भकल्याण—आषा. व. २. जन्मक. व दीक्षाक.—चैत्र व. ९. केवलज्ञानक. —फा. व. ११. मोक्षक.—मा. व. १४. [ जैन लोकांचा इतिहास ( श्रीचंद्रसागर जैन ग्रंथमालेंतील ) ] भागवत स्कं. ५ अ. ३–६, यांत जो ऋषभदेव वर्णिला आहे त्याचींहि मातापितरें मेरुनाभि होत. हा शेवटीं जडोन्मत्तप्रमाणें नग्नावस्थेंत फिरूं लागला असें म्हटलें आहे; त्यावरून बुद्धाप्रमाणें पहिल्या जैनतीर्थंकरालाहि पुराणव्यक्तींत स्थान मिळालें असावें. इतर तीर्थंकरांप्रमाणें ऋषभनाथाचींहि देवळें आहेत.

गां व.—उदेपूर-अहमदाबाद रस्त्यावर प्रसाद गांवापासून दक्षिणेस १० मैलांवर ऋषभनाथाचें एक स्थान आहे. ऋषभनाथ हें एक लहानसें गांव असून त्याच्या भोंवतीं तट आहे. व सर्व बाजूंस टेंकड्या आहेत. येथें एक मोठी धर्मशाळा आहे. ऋषभनाथाच्या मंदिराभोंवतीं दगडी पोंवळी असून तें गांवापासून अलग आहे. असें सांगतात कीं पूर्वी एकदां एका शेतकऱ्याची गाय एका विवक्षित ठिकाणीं जाऊन पुष्कळसें दूध देऊन येत असे. त्याठिकाणीं खोदून पहातां एक मूर्ति सांपडली. तेव्हां ऋषभनाथ येथें एक लहानसें देऊळ बांधून तिची स्थापना केली. आतां वाढतां वाढतां हें मंदीर बरेंच मोठें झालें आहे. आणि मुख्य मूर्तीशिवाय पुष्कळ जैन मूर्तींची स्थापना केलेली आहे. राजपुतान्यांतील सर्व राजांनीं या देवस्थानास देणग्या दिलेल्या आहेत आणि आजूबाजूच्या सर्व प्रदेशांतून पुष्कळ यात्रेकरू येथें येतात. ( इं. अँ. पु. १ पा. ९६, १८७२ ).

**ऋषि.**—'ऋषयोमंत्रद्रष्टारः वसिष्ठादयः' म्हणजे ज्यांनां मंत्र प्रथम दिसले ते ऋषी. वेदवाङ्मयांतील मंत्रभागाबद्दल अशी समजूत आहे कीं, मंत्र अपौरुषेय आहेत, ते कोणत्याहि मनुष्यानें केलेले नसून तीं ईश्वराचीं निःश्वसितें आहेत. हे मंत्र ज्या व्यक्तींस दैवी प्रेरणेनें दिसले त्यांस मंत्रद्रष्टे असें म्हणतात व त्या मंत्रांस प्रथम ते केवळ ऐकिले गेले म्हणून श्रुति असें म्हणतात. या श्रुतीस शब्दप्रामाण्य आहे. म्हणजे त्यांतील विधानांची सत्यता इतर बाह्य प्रमाणांवरून सिद्ध करावी लागत नाहीं अशी भारतीयांची

श्रद्धा आहे. स्मृतिवाङ्मय हें मानवप्रणीत असल्यामुळें त्याला श्रुतीइतकें प्रामाण्य नाहीं. यास्कानें ' यस्य वाक्यं स ऋषिः ' असें ऋषि शब्दाचें स्पष्टीकरण केलें आहे. याचा अर्थ ऋग्वेदांतील मंत्र ज्याच्या तोंडीं असेल तो त्या मंत्राचा ऋषि होय. या व्याख्येप्रमाणें अनेक देवता वगैरे-कडेहि ऋषित्व येतें. शौनकप्रणीत सर्वानुक्रमणीमध्यें प्रत्येक ऋग्वेदीय सूक्ताचा अथवा ऋचेचा ऋषि कोण हें सांगितलें आहे. बुद्धपूर्वजग पृ. ८७ वरील कोष्टकांत ऋग्वेदसूक्तकार ऋषी सर्व दिले आहेत. इतर ऋषिनामें वेदकालांतील शब्दसृष्टि या प्रकरणांत पृ. ४२७ वर दिलीं आहेत व पृष्ठ ४२८ वर विस्तृत टीप दिली आहे ती पहा. देव, ब्राह्मण व राजे यांपैकीं जे ऋषी असतील त्यांस अनुक्रमें देवर्षि, ब्रह्मर्षि व राजर्षि असें म्हणत. महर्षि, व कांडर्षि असेंहि ऋषींमध्यें आणखी भेद केलेले दिसतात. त्यापैकीं महर्षि म्हणजे ऋग्वेदाच्या सहा मंडळांचे जे गृत्ससद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज व वसिष्ठ इ. ऋषी व कश्यप हे असावेत. भगवद्गीतेंत (अ. १० श्लोक१६) पूर्वीच्या सात ऋषींनांच महर्षि म्हटलें आहे. तैत्तिरीय संहितेचीं जीं ५ कांडें आहेत त्यांच्या द्रष्ट्यांनां कांडर्षि म्हटलें असून त्यांचा कांडर्षि या नांवानें उल्लेख सत्याषाढ व बौधायन गृह्यसूत्रांत उपाकर्मप्रसंगीं आला आहे. तीं नांवें प्रजापति, सोम, अग्नि, विश्वेदेव व स्वायंभू हीं होत.

रा. राजवाडे ऋषि या शब्दाचें इंग्रजी रश = जोरानें जाणें या धातूशीं साम्य कल्पितात व ऋषि शब्दांत ऋष = जोरानें जाणें असा धातू कल्पून त्याचा अर्थ ईश्वराकडे जोरानें जाणारा मांत्रिक ( सोर्सरर ) असा करतात. शतपथ ब्राह्मणांत गौतम, भारद्वाज, विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ, कश्यप व अत्रि यांचा सप्तर्षि म्हणून उल्लेख केला आहे. बृहदारण्यकोपनिषदांतहि हींच नांवें आढळतात. महाभारतांत शल्यपर्वांत ( ४९.५२ दक्षिण प्रत ) व अनुशासन पर्वांत (१४१ द. प्र. ) वरील नांवें सप्तर्षि म्हणून आढळतात; पण शांतिपर्वांत ( ३४३३० द. प्र. ) मरीचि, अत्रि, अङ्गिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ अशीं नांवें दिलीं आहेत. मनूनें या सातांस व दक्ष किंवा प्रचेता, भृगु व नारद यांस प्रजापति म्हटलें आहे.

**ऋषिऋण**—ऋषींच्यासंबंधीं जें ऋण तें ऋषिऋण ( म्हणजे स्वाध्याय ). तैत्तिरीय संहितेंत ( ६. ३, १० ) " जायमानो वै ब्राह्मणः त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः "असें वाक्य आहे.त्याचा अर्थ असा कीं, जन्मास आलेला मनुष्य हा ऋषि, देव आणि पितर यांचा ऋणी असतो. तें ऋण त्यानें वेदाध्ययनानें ऋषींचें, यज्ञयागादिकांनीं देवांचें व प्रजोत्पादनानें पितरांचें याप्रमाणें फेडावयाचें असतें. सायणाचार्यांनीं ऋषिऋण याचें " वेदाभ्यासादिभिः अपाकर्तव्यं यदृणं " असें स्पष्टीकरण केलें आहे. या ठिकाणीं ऋण फेडणें यांचा अर्थ संतोष करणें असा दिसतो. व प्राचीन ऋषींनीं जें वाङ्मय निर्माण केलें तें जागृत ठेवून त्या योगें त्यांचा संतोष करणें हा ऋषिऋण याचा स्पष्टार्थ दिसतो. तेव्हां ऋषिऋण म्हणजे वेदाध्ययन-स्वाध्याय. विशेष विवेचनासाठीं ' स्वाध्याय ' पहा.

**ऋषिक** (१)—भारतवर्षीय भरतखंडस्थ देश. हा परम कांबोजच्या उत्तरेस असून याच्या उत्तरेस पुढें हिमालय पर्वत आहे. हाच प्रस्तुत रशिया असावा असें प्राचीन कोशकार म्हणतात( भार. सभा. अ. २९ श्लो. २५–२९ ).

(२) दाक्षिण विभागांतील एक जात. अशोकाच्या एका आदेशांतील ' ऋस्टिक ' अथवा ' रास्टिक ' या रूपांशीं या नांवाचा कांहीं संबंध असूं शकेल काय? ( बृहत्संहिता १८. १५; इं. अँ. पु. २० पा. २४०, २४७–२४८. )

**ऋषिपंचमी**—भाद्रपद शुद्ध पंचमीस ऋषिपंचमी म्हणतात. या दिवशीं कश्यपादि सप्तऋषी व अरुंधती यांचें पूजन करितात. नद्यांच्या संगमावर अथवा समुद्रस्नान या दिवशीं करावें व स्नानाच्या पूर्वी आघाड्याच्या काड्यांनीं दंतधावन करावें असा विधि आहे. उपवास करून बैलाच्या श्रमावांचून उत्पन्न केलेल्या खाद्यपदार्थांचा नैवेद्यास उपयोग करितात. हें व्रत ऋतुस्नात होणाऱ्या ( रजोदोष शमनार्थ ) स्त्रियांनीं करावयाचें असतें. कोणी पुरुषहि हें व्रत करतात. या व्रतासंबंधीं ब्रह्मांडपुराणांत कथा आहे ती अशीः—

सिताश्व राजानें विचारल्यावरून ब्रह्मदेवानें सांगितलें कीं, विदर्भ देशांत उत्तंक नांवाचा एक ब्राह्मण रहात असून सुशीला नांवाची त्याची एक पतिव्रता स्त्री होती. त्याला सुविभूषणनामक पुत्र असून वैधव्य प्राप्त झालेली अशी एक कन्या होती. आपल्या पुत्रास घरीं ठेवून विधवा कन्येसह तो अरण्यांत रहात असे. एके रात्रीं ती विधवा कन्या एका दगडावर निजली असतां तिच्या अंगावर अनेक कृमी उत्पन्न झालेले उत्तंकाच्या शिष्यानें पाहिले, व उत्तंकाच्या स्त्रीस सांगितलें. तिनें मुलीच्या अंगावर उत्पन्न झालेले कृमी पाहून एकाएकीं असे कृमी उत्पन्न होण्याचें कारण आपल्या भर्त्यास विचारलें असतां ' ही पूर्वजन्मीं ब्राह्मणस्त्री असून रजस्वला झाली असतां दूर न राहतां ती तशीच गृहांत वावरत असे या पातकामुळें या कन्येच्या शरीरावर नित्य रात्रीं असे कृमी उत्पन्न होऊन सकाळीं नाहींसे होतात असें सांगितलें.पत्नीनें विचारल्यावरून उत्तंक म्हणाला कीं स्त्रियांनीं रजःसंपर्क दोष नाहींसा होण्याकरितां अरुंधतीसहित कश्यपादि सप्तऋषींचें पूजनरूप ऋषिपंचमी नामक व्रत करावें म्हणजे रजःसंपर्क दोष नाहींसा होतो.

भविष्योत्तरपुराणांतील कृष्णानें धर्मास सांगितलेली ऋषिपंचमीची कथा अशीः—पूर्वी इंद्रानें वृत्राला मारिलें. वृत्रासुर ब्राह्मण असल्यामुळें ब्रह्महत्येचें पातक घडलेला इंद्र लज्जित होऊन ब्रह्मदेवास शरण गेला असतां ब्रह्मदेवानें त्या ब्रह्महत्येचे चार विभाग करून एक भाग अग्नीच्या प्रथम ज्वालेत, दुसरा भाग नदीला प्रथम आलेल्या पुरांत, तिसरा

भाग पर्वताशिखर व वृक्षजातींमध्यें आणि चवथा भाग स्त्रियांच्या रजांत ठेविला. यासाठीं रजस्वला स्त्रीस स्पर्श करूं नये. ती प्रथम दिवशीं चांडाली, दुसऱ्या दिवशीं ब्रह्मघातिनी, तिसऱ्या दिवशीं परटिणीप्रमाणें असून चौथ्या दिवशीं शुद्ध होते.

समजून अथवा न समजून झालेल्या रजःसंपर्कानें होणाऱ्या पापाचें क्षालन ऋषिपंचमी व्रतानें होतें असें सांगून यासंबंधीं श्रीकृष्णानें धर्मास आखणी एक कथा सांगितली आहे ती अशीः–विदर्भ देशांत सुमित्र नांवाचा एक विद्वान ब्राह्मण रहात होता. त्याची जयश्री नामक अत्यंत पतिव्रता पत्नी असून परिवार मोठा असल्यामुळें गृहकृत्यें करूनहि स्वतः आपल्या शेतांतील कामें तीं करीत असे. एकदां ती रजस्वला असतां अस्पृश्य न रहातां घरांत तशीच वावरली. या पातकामुळें मृत्यूनंतर ती कुत्रीच्या जन्मास गेली. सुमित्र स्वतः पातकी नसतां पातकी स्त्रीच्या सहवासामुळें त्यास मृत्यूनंतर बैलाचा जन्म आला. पूर्व जन्मींच्या कांहीं सुकृतामुळें त्या दोघांनां त्यांचा पूर्व जन्मींचा मुलगा जो सुमति त्याच्याच पदरीं राहण्याचा प्रसंग आला. एकदां सुमतीच्या बापाचा श्राद्धदिन आला असतां त्याच्या स्त्रीनें श्राद्धाकरितां स्वयंपाक तयार केला. त्या स्वयंपाकांतील पायसांत त्या स्त्रीच्या न कळत सर्पानें गरळ टाकलेलें थोड्या अंतरावरच असलेल्या कुत्रीनें पाहिलें आणि हा पायस भक्षण केल्यानें ब्राह्मणांनां मृत्यु येईल हें जाणून त्या कुत्रीनें स्वयंपाकास स्पर्श केला. सुमतीच्या बायकोनें हें पाहून अतिशय रागानें त्या कुत्रीच्या डोक्यांत जळकें लांकूड मारलें आणि तो सर्व स्वयंपाक टाकून देऊन दुसरा स्वयंपाक तयार केला. स्वयंपाक विटाळल्यामुळें कुत्रीस त्या दिवशीं नित्याप्रमाणें खावयास कोणी न घातल्यामुळें तिला उपवास घडला. तिला व बैल झालेल्या तिच्या पतीला पूर्व जन्मींचें स्मरण असल्यामुळें तीं दोघेंहि आपापल्या भाषेंत एकमेकाशीं बोलत असत. शेतांतून बैल घरीं आल्यावर कुत्रीनें घडलेली हकीकत बैलास निवेदन केली. बैलानेंहि "माझ्या मुलानें आज दिवसभर माझ्याकडून कष्टाचें काम करून घेऊन मला कांहींच खाऊ घातलें नाहीं आणि कामाची कसूर झाल्यास मारहि देण्यास कमी केलें नाहीं. आज मुलानें माझें श्राद्ध केलें परंतु मी बुभुक्षितच असल्यामुळें तें श्राद्ध व्यर्थ होय." असें सांगितलें. कुत्री व बैल यांचें हें भाषण जवळच असलेल्या सुमति ब्राह्मणानें ( त्याला जनावरांची भाषा कळत असल्यामुळें ) ऐकल्यावरून मातापितरांच्या या अवस्थेबद्दल त्याला अत्यंत दुःख झालें आणि या मातापितरांनां ही स्थिति कां प्राप्त झाली व ती कोणत्या उपायांनीं नाहींशी होईल हें त्यानें अत्यंत ज्ञानी अशा सर्वतपा नामक ऋषीला विचारलें असतां त्या ऋषीनें त्याच्या मातापितरांची पूर्व जन्माची हकीगत सांगून, हा रजःसंपर्क दोष नाहींसा होण्यास ऋषिपंचमी नामक व्रत करावयास सांगितलें. नंतर सुमतीनें यथासांग व्रत केल्यावर त्याच्या मातापितरांची पशुयोनीपासून मुक्तता झाली.

**ऋषियज्ञ**—( ब्रह्मयज्ञ ) गृहस्थाश्रमी यानें करावयाच्या पंचमहायज्ञांपैकीं एक. ब्रह्मयज्ञ पहा.

**ऋषिवरण**—आपण कोणत्या थोर व्यक्तींच्या कुलांतील आहोंत याची निवड करणें हा याचा अर्थ आहे. या विधीसंबंधीं जास्त विवेचन पूर्वीं बुद्धपूर्वजग विभा. ३ पूर्वार्ध पृ. ४९६ येथें आलें आहे.

**ऋष्यमूक**—भारतवर्षीय भरतखंडस्थ पंपा सरोवरासमीपचा जो मतंग नामक सामान्य पर्वत आहे त्याचें शृंग. हा अनागोंदीपासून आठ मैलांवर आहे. येथें मतंग ऋषिचा आश्रम असे. हा पर्वत मतंगाच्या शापामुळें वालीस गमनार्थ वर्ज्य होता म्हणून, सुग्रीव आपल्या सचिवांसह यावर राहून कालक्रमण करीत असे. मतंगपर्वतास, ऋष्यमूकाप्रमाणेंच मलय नांवाचें दुसरेंहि एक शृंग होतें. ( वा. रा. किष्किं. स. १–२ ).

**ऋष्यवान**—भारतवर्षीय भरतखंडस्थ एक उपपर्वत ( ' अष्ट कुलाचल ' पहा ). मंदाकिनी, दशार्णा, चित्रकूटा, तमसा, पिप्पली, श्येनी, चित्रोपला, विमला, चंचला, धूतवाहिनी, शुक्तिमति, शुनी, लज्जावति, मुकुटा आणि न्हादिका इ. नद्यांचें हा उत्पत्तिस्थान म्हटलेला आहे. ऋष्यवान हें ऋक्षवान् याचेंच नामांतर होय. ( मत्स्य. अ. ११३ ).

**ऋष्यशृंग**—कश्यपवंशीय विभांडक ऋषीचा पुत्र. विभांडकाचें रेत एका हरिणीनें भक्षिल्यावरून तिला हा पुत्र झाला. याच्या डोक्यावर एक हरणाचें शिंग होतें म्हणून याला ऋष्यशृंग हें नांव पडलें. हा बरेच दिवस ब्रह्मचर्याश्रमांत राहून विद्यार्जन करीत असे.

एकदां लोमपाद राजाच्या राज्यांत मोठी अनावृष्टि पडली; तेव्हां ऋषीनें राजास असें सांगितलें कीं देव रागावले असल्यामुळें, ऋष्यशृंग ऋषीस आपल्या राज्यांत आणिल्यास पाऊस पडेल. राजकन्या शान्ता हिनें ऋषीला मोह पाडून आणण्याचें काम आपल्या हातीं घेतलें शान्तेनें ऋष्यशृंगास मोह पाडिला नसून, दुसऱ्या एका स्त्रीनें त्यास मोह पाडला असें महाभारतांत आहे; परंतु मूळ कथेंत व महाभारताच्या जुन्या प्रतींतहि शान्तेनेंच त्या ऋषीला मोह पाडला असें आढळतें असें लुडरस यानें उत्तमप्रकारें सिद्ध केलें आहे. परंतु राजकन्येनें मोह पाडला या कल्पनेला हरकत घेऊन उत्तरकालीं कोणी तरी मनुष्यानें राजकन्येबद्दल वारांगना हा शब्द घातला असावा; परंतु अशा स्थितींत राजानें आपली मुलगी ऋष्यशृंगाला कां दिली तें समजत नाहीं; यावरून राजकन्या शान्ता, हिनेंच ऋष्यशृंगाला मोह पाडला असें हाल्टझमननें आपल्या भाषांतरांत म्हटलें आहे. तथापि शांता कीं वारांगना हा प्रश्न गौण आहे.

शांतेनें कृत्रिम झाडाझुडपांचीं आश्रमयुक्त नाव तयार करून ती ऋष्यशृंगाच्या आश्रमाकडे गेली. आश्रमाजवळ

जातांच ती खालीं उतरली व ऋष्यशृंगाचा बाप तेथें नाहीं असें पाहून त्या तरुण तपस्व्यापाशीं जाऊन तिनें त्याला उत्तम फळें व मद्य दिलें. हावभाव करून ती त्याच्याशीं खेळूं लागून तिनें त्याला दृढ आलिंगन दिलें; आपल्या सारखाच एखाद्या आश्रमांतील हा मुलगा असावा असें ऋष्यशृंगास वाटलें. ऋष्यशृंगाचा बाप आश्रमासमीप येतांच ती आपल्या नावेकडे निघून गेली. मुलाची चळवळ त्या वृद्ध मनुष्याच्या दृष्टीस पडतांच काय झालें असें त्यानें विचारिलें. घडलेल्या वृत्तांताचें मुलानें वर्णन केलें तें येणें प्रमाणें:—

"या ठिकाणीं एक विद्यार्थी आला होता; त्याच्या केंसांची वेणी घातलेली असून त्याचा चेहरा गोरा व डोळे काळे होते. त्याचें हास्यवदन असून त्याची अंगयष्टि बारीक होती. त्याची छाती उन्नत होती व वैशाख मासांतील कोकिलगीताप्रमाणें त्याचे शब्द फार मधुर होते. वसंत ऋतूंतील वाऱ्याप्रमाणें त्याच्या सर्व अंगांस मधुर सुवास येत होता. आम्ही जीं फळें खातों तीं तो खात नाहीं, व आमचें पेय तो पीत नाहीं. त्यानें मला दिलेलीं फळें फार स्वादिष्ट होतीं; त्यानें दिलेलें पेय मी प्याल्यानंतर मला फार आनंद झाला व भूमि हालतेशी वाटूं लागली. नंतर त्या मुलानें माझे केंस धरून माझें मस्तक आपल्याकडे ओढून घेतलें; व आपलें सुंदर मुख माझ्या मुखावर ठेऊन तो कांहीं बोलला, त्याच्या योगानें माझ्या अंगावर कांटा उभा राहिला; त्या मुलासाठीं मला तळमळ लागून राहिली आहे, तो असतो तेथें नेहमीं राहण्याची माझी इच्छा आहे. मला तो आतां कोठेंहि दिसत नाहीं; यामुळें मला फार दुःख होत आहे व माझें मन उद्विग्न झालें आहे. त्यानें जें तप केलें आहे तेंच तप करण्यास शिकण्याची माझी इच्छा आहे; कारण तें तप तुह्मी शिकविलेल्या तपापेक्षां मला अधिक आवडतें." नंतर ऋष्यशृंगाचा पिता त्यास म्हणाला "हे पुत्रा तपश्चर्येत विघ्न आणून धार्मिक लोकांनां मोक्ष मिळूं नये म्हणून, अशा प्रकारें सुंदर स्वरूप धारण करून दुष्ट लोक अरण्यांत भटकत असतात; तर त्याच्यावर विश्वास ठेवूं नको."

परंतु ऋष्यशृंगाचा पिता पुन्हां बाहेर गेल्यावरोबर आपल्या मित्राच्या शोधार्थ ऋष्यशृंगहि बाहेर गेला; लवकरच ती सुंदर शांता त्याच्या दृष्टीस पडली; आपल्या नावेंत येण्याविषयीं तिनें मोह पाडून ती त्याला आपल्या बापाच्या राज्यांत घेऊन गेली. तो तेथें जातांच मोठा पाऊस पडूं लागला; मोठमोठ्या देणग्या देऊन त्याच्या पित्याचें समाधान केल्यानंतर लोमपादानें ऋष्यशृंगास आपला जांवई केलें.

ही कथा महाभारत, वनपर्व अ. ११०–११३ यांत दिली आहे. रामायण, ( बालकांड, अ. ३ ) पद्मपुराण, बौद्धकथासंग्रह वगैरे ग्रंथांत या कथेचे अनेक तर्जुमे आढळतील. ही गोष्ट प्रथमतः आनंददायक परंतु ग्राम्य अशा प्रहसनांत गणली जात असे; अनेक लोकांनीं दुरुस्ती करून या गोष्टींतील बीभत्सपणा काढून टाकण्याचा प्रयत्न केला असें डॉ. विंटरनिट्झचें मत आहे. ज्यानें कधींहि स्त्री पाहिली नव्हती अशा त्या तपस्वी पुत्रानें ती सुंदर स्त्री पाहिली व तिच्या सौंदर्याचा जरी त्याच्यावर बराच परिणाम झाला तरी तो दुसरा एक तपस्वीपुत्र आहे असें त्यास वाटलें. या सर्व मनोरंजक प्रसंगाचा गोष्टीच्या मुख्य भागांत समावेश केलेला आहे. या भागाचें वर्णन ग्राम्य व विनोदमय आहे. बौद्धांच्या जातक ग्रंथांत यांपैकीं ग्राम्य विनोदाचीं कांहीं उदाहरणें आढळतात. तिबेट, चीन जपान वगैरे देशांतल्या निरनिराळया तर्जुम्यांमध्यें हें प्रहसन प्रसिद्ध असून पाश्चात्य देशांत होणाऱ्या एकशृंगाच्या प्रहसनांत या सुप्रसिद्ध कथेंतील कांहीं गोष्टी आढळतात; यावरून हें प्रहसन किती लोकप्रिय होतें हें समजतें.

भागलपूर जिल्ह्यांतील सिंघेश्वर या ठिकाणीं कुशिनदीच्या काठीं ऋष्यशृंगाश्रम आहे.

**ऋक्षरजा.**—रामायणांतील वालीसुग्रीवांचा पिता. ब्रह्मदेवाच्या आनंदाश्रूंपासुन याची उत्पत्ति आहे. मेरु पर्वतावरील सरोवरांत स्नान केल्यानें हा स्त्री झाला व इंद्र आणि सूर्य यांचे कामसंकल्प वाल व ग्रीवा या शरीरांगावर पडून वाली व सुग्रीव नांवाचे दोन पुत्र झाले. पुन्हां पुरुषत्व प्राप्त झाल्यावर ब्रह्मदेवानें याला किष्किंधेचें राज्य दिलें [ वा. रामायण उत्तर. स. १ ].

**ए**—मराठी वर्णमालेंतील आठवें अक्षर.पण संस्कृत वर्णमालेंतील अकरावें; कारण तींत ऋ,ऌ,ॡ, हीं तीन अक्षरें ऋ व ए यांमध्यें येतात. या वर्णाला सध्यांचे स्वरूप प्राप्त होण्याला पांच अवस्थांतून जावें लागलें आहे. पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत, दुसरी इ. स. ६ व्या शतकांतल्या उष्णीषविजय धारणीच्या ताडपत्री पुस्तकांत, तर तिसरी त्याच शतकांतील महानामनूच्या बुद्धगया येथील लेखांत आढळते. चवथी धार येथील शिलेवरील परमार भोजाच्या कूर्मशतक काव्यांत स्पष्ट दिसते; हिचा काळ इ.स. ११ वें शतक हा आहे. यानंतर या अक्षराला अर्वाचीन स्वरूप [ पांचवें ] प्राप्त होण्याला फार वेळ लागला नाहीं.

**एओलिस.**—एओलिस ( एओलिया ) हा आशियामायनरमधील एक प्राचीन प्रांत होता. प्राचीन काळीं एओलिअन ग्रीक लोकांनीं या प्रांतांत वस्ती केली होती. हें नांव हरमस नदीपासून लेक्टमच्या भूशिरापर्यंत जो किनारा आहे त्याला म्हणजे आयोनिया ( दक्षिण ) पासून ट्रोआस ( उत्तर ) पर्यंतच्या प्रदेशास होतें. आयोनिअन लोकांनीं या प्रांतांत बारा शहरें स्थापिलेलीं होतीं.

**एकचक्रा.**—भारतवर्षीय भरतखंडस्थ एक नगरी. पांडव, लाक्षागृहांतून वांचून निघाल्यावर, हींत विप्रवेषानें येऊन राहिले होते ( भार० आदि० अ० १५६ ). येथें कुंतीसहवर्तमान पांडव रहात असतां, बकासुर नामक कोणी एका राक्षसानें, त्या नगरींतील प्रत्येक गृहावर क्रमानें प्रति दिवशीं त्यास अमुक अन्नादि देत जावें, असा कर बसविला होता. ती पाळी, हे, ज्या ब्राह्मणाच्या गृहीं उतरले होते, त्यावर त्याच समयास आली होती. तिचें निवारण भीमाकडून कुंतीनें त्या राक्षसाचा वध करवून केलें व त्या ब्राम्हणासुद्धां सर्व नगरीस सुखी केलें ( बकासुर पहा ).

**एकत(१)**—एकताचा द्वित व त्रित यांसह तै. संहितेंत ( १. १, ८ ) पुरोडाश शिजविलेली पात्रीं धुवून तें पाणी वेदींत ओततांना या प्रत्येकास त्या पाण्याची आहुति देण्यासाठीं आला आहे.ब्राह्मणांमध्यें एकत,द्वित व त्रित हे उदकापासून जन्मलेले अग्नीचे पुत्र होते असें म्हटलें आहे ( श. ब्रा. १. २, ३, १-२; तै. ब्रा. ३. २, ८, १०-११ )सायणांनीं ऋ. १. १०५ वरील भाष्यांत शाट्यायन ब्राह्मणांतील आख्यायिका दिली आहे. तींत एकत, द्वित, त्रित हे तीन ऋषी असून त्रिताला दुसऱ्या दोघांनीं कूपांत टाकल्याची कथा आहे. ( त्रित पहा ).

(२)ब्रम्हदेवाचा मानसपुत्र. द्वित आणि त्रित, याचा ज्येष्ठ भ्राता. हे तिघेहि उपरिचर वसूच्या यज्ञामध्यें सदस्य होते. ( भार० शांति० अ० ३२६).

(३)गौतम ऋषीच्या तीन पुत्रांतील ज्येष्ठ.यांचींहि अशींच नांवें होतीं. ( भार० शल्य० अ० ३६).

**एकतत्त्ववाद**—या जगांत फक्त एकच सत्य तत्त्व आहे. मग तें भौतिक असो किंवा आध्यात्मिक असो. या तत्त्वज्ञानविषयक मतास एकतत्त्ववाद म्हणतात. सर्व ज्ञानाचा उद्देश या विश्वाचें स्पष्टीकरण करण्याचा आहे व दोन किंवा अधिक सर्वस्वी भिन्न सत्य स्वरूपें गृहीत धरणारे 'द्वितत्त्ववादी' व "बहुतत्त्ववादी" या विश्वाचें स्पष्टीकरण करूं शकत नाहींत. येथपर्यंत एकतत्त्ववाद्यांचें म्हणणें बरोबर आहे. पण आपल्या बुद्धीस स्पष्ट दिसणारे महत्त्वाचे भेद जेव्हां ते अमान्य करतात तेव्हां हा वाद पटत नाहीं.

एकतत्त्ववादाचे सर्व प्रकार. प्लोटिनसपासून आजतागायतचें व्यक्तीचें स्वतंत्र अस्तित्व व इच्छाशक्ति अमान्य करतात व भूतांचा एका निर्गुण निराकार अशा केवलशून्य तत्त्वांत अंतर्भाव करतात. यामुळेंच एकतत्त्ववादावर जोराची टीका झाली आहे. या मताच्या ऐतिहासिक स्वरूपाकडे पाहिलें तर प्लोटिनस यांस गूढएकतत्त्ववादी म्हणावें लागेल. तो त्या एकतत्त्वाशीं गूढ संयोगानें तादात्म्य पावून आपण या सर्व दृश्य चमत्कारांपलीकडे गेलों आहों असें प्रतिपादी.

स्पिनोझा हा जड एकतत्त्ववादी आहे. तो क्वचित् गूढत्वाचा आश्रय करतो व अनुभवाच्या आध्यात्मिक बाजूलाहि कांहींशी वरवर मान्यता दाखवितो. हेगेल हा बौद्धिक एकतत्त्ववादी आहे.तो भौतिक प्रकृति, इंद्रियसंवेदना,व्यक्तित्व व इच्छाशक्ति हीं सर्व विचारांचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत, असें म्हणतो. शॉपेनहार व व्हॉन हार्टमन यांचा एकतत्त्ववाद एक विश्वव्यापी इच्छाशक्ति असून तींत सर्व वैयक्तिक इच्छाशक्तींचा लोप होतो अशा प्रकारचा आहे. यांत हे हेकेलच्या वैयक्तिक इच्छाशक्तिनाशाचें निराळ्या रीतीनें स्पष्टीकरण देतात.

हेकेलचा एकतत्त्ववाद हा शुद्ध भौतिक वादच या निराळ्या नांवाखालीं मांडला आहे. या सर्व वादांत आपल्याकडील अद्वैतवादाचें स्वरूप थोड्या फार प्रमाणांत आढळतें. या सर्व वादांचें मुख्य तत्त्व असें आहे कीं, आपल्या बुद्धीला जे निरनिराळे भेद दिसतात विशेषतः आपण वैयक्तिक अथवा अवैयक्तिक असे जे भेद करतों ते एका विवक्षित मर्यादेपर्यंतच तात्पुरते मान्य करून आपल्या अनुभवाला व विचाराला पटेल असें त्यांच्या मुळाशीं जें एकतत्त्व असेल त्याचा शोध करीत गेलें पाहिजे.

**एकदंत भट्ट**—सहा गाणपत्यांतील स्वर्ण गणपतीचा उपासक. हा पहिल्या शंकराचार्यांच्या वेळेस होता. (आनंदगिरीच्या शांकरविजयांतील १८ वें प्रकरण पहा.)

**एकनाथ**—महाराष्ट्र संत व कवि (एकनाथाचा जन्म शके १४७०मध्यें (रा. पांगारकरांच्या मतें १४५०) पैठणास झाला. पूर्वी भानुदास या नांवाचा एक भगवद्भक्त देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण पैठणांत होऊन गेला. त्याच्याच वंशांत एकनाथ हा जन्मला. भानुदासाचा मुलगा चक्रपाणी, चक्रपाणीचा सूर्यनारायण व सूर्यनारायणाचा एकनाथ अशी एकनाथांची पितृपरंपरा आहे. एकनाथाच्या आईचें नांव रुक्मिणी. एकनाथाच्या जन्मानंतर त्याचीं मातापितरें लवकरच निवर्तलीं. यामुळें एकनाथाचें सर्व पालनपोषण त्याचा जो आजा चक्रपाणी त्यानेंच केलें. लहानपणापासूनच एकनाथाचें चित्त परमेश्वराकडे वळलेलें होतें. दगडाचे देव मांडून त्यांची पूजा करावी व कांहीं तरी पुराणांतील गोष्टी सांगून कीर्तन करावें, अशा तऱ्हेचे याचे खेळ असत. याची साहाव्या वर्षी मुंज होऊन पुढें विद्याभ्यासास सुरुवात झाली. एकनाथाची बुद्धि फार तीव्र होती, यामुळें गुरूनें दिलेली संथा त्याला तेव्हांच पाठ होई, असें त्याचे बहुतेक चरित्रकार सांगतात. रीतीप्रमाणें ब्रह्मकर्माचें सर्व म्हणणें पुरें झाल्यावर एक दिवस एकनाथास असा दृष्टांत झाला कीं, देवगिरीस जनार्दनपंत हा दत्तोपासक आहे, त्याचा अनुग्रह घ्यावा. याप्रमाणें एकनाथानें जनार्दनपंताकडे जाऊन त्याचा अनुग्रह घेतला व त्याजपाशीं पुढील ज्ञान संपादन केलें. जनार्दनपंतानें एकनाथास शके १४८० मध्यें कालयुक्त संवत्सरी उपदेश दिला व एकनाथानें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचें अध्ययनहि जनार्दनस्वामीपाशींच केलें. स्वामीच्या आज्ञेनें चतुःश्लोकी भागवत या ग्रंथास एकनाथानें टीका लिहिली. ती फारच सरस आहे. चतुःश्लोकी भागवताचें हें विवरण पाहून जनार्दनस्वामींनीं लवकरच आपल्या या शिष्यास श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधावर व्याख्यान करण्यास सांगितलें. पैठणास नाथानें लेखनास आरंभ करून विक्रमशक वृषसंवत्सर १६३० या सालीं कार्तिक शुद्ध पौर्णिमेस सोमवारीं हा ग्रंथ पुरा केला. या अपूर्व ग्रंथाचे ३१ अध्याय असून त्याची ओंवीसंख्या सुमारें २० हजार आहे. भागवत संपविल्यानंतर लागलीच पुरे पांच महिने लोटले नाहींत तोंच एकनाथानें 'रुक्मिणीस्वयंवर' लिहिलें. याचे १८ अध्याय असून ओंवीसंख्या सुमारें दोन हजार आहे. एकनाथाच्या चरित्रपर अथवा पौराणिक ग्रंथांपैकीं हा अगदीं पहिला ग्रंथ दिसतो. 'श्रीकृष्णानें श्रीखंड्याच्या रूपानें' 'स्वकरें चंदन घासलें' व 'कावडीनें गंगेचें पाणी भरलें, त्याच्या स्मरणार्थ हा कृष्णाचा स्वयंवरवृत्तांत नाथांनीं सांगितला आहे असें म्हणतात. भागवताच्या आधारानें दोन प्रचंड ग्रंथ लिहिल्यावर या पौराणिक ग्रंथाच्या वेळीं वेदांतविषय कवीच्या अगदीं दृष्टीआड झाला होता असें नाहीं. पौराणिक आख्यानांवर रचलेले दुसरे लहान लहान ग्रंथ 'बालक्रीडा' 'प्रल्हादचरित्र' व 'शुकाष्टक' हे होत. 'प्रल्हादचरित्र' हें लहानसें १७६ ओंव्यांचें प्रकरण जसें सुरस आहे, तसेंच १४४ ओंव्यांचें 'शुकाष्टक' हि आहे. हीं आख्यानें रचून एकनाथानें प्रथमच आख्यानवाङ्मयाचा पाया घातला व मराठींत काव्यरस ओतला. 'शुकाष्टका' शिवाय शुकाष्टकाच्या आधारें अथवा टीकात्मक असा रचिलेला 'स्वात्मसुख' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. अद्वैतावर हा लहानसा ग्रंथ फारच उत्कृष्ट उतरला आहे. स्वात्मानुभवाप्रमाणेंच 'आनंद-लहरी' 'अनुभवानंद' आचार्यांच्या हस्तामलकावरील टीका, चिरंजीवपद, गीतासार, मुद्राप्रकाश वगैरे हे सर्व ग्रंथ वेदांतपर असून अद्वैतमतप्रधान आहेत. यांखेरीज पदें, भारुड वगैरे लहान लहान चुटके आणि अभंग अशी विविध रचना एकनाथानें केली आहे.

हे लहानसान ग्रंथ लिहीत असतांना फार मोठें असें एक मराठी भाषेसंबंधाचें काम एकनाथानें आरंभिलें. तीनशें वर्षांपूर्वी लिहिलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रती मिळवून तो ग्रंथ प्रतिशुद्ध करण्यास आरंभ केला. ज्ञानेश्वरीच्या समाधीचा जीर्णोद्धार केल्यावर त्यांच्या कृतीच्या अवशिष्ट भागाचाहि जीर्णोद्धार करण्याची कल्पना एकनाथास सहजासहजीं सुचली असावी. एकनाथानें आळंदीस जाऊन ज्ञानेश्वरांच्या समाधीचा जीर्णोद्धार शके १५०५ मध्यें जेष्ठांत केला आणि नंतर वर्ष सव्वा वर्षानें म्हणजे शके १५०६ च्या भाद्रपदांत ज्ञानेश्वरीचा जीर्णोद्धार पुरा झाला. ज्ञानेश्वरीप्रमाणेंच अमृतानुभवासंबंधींहि कांहीं खटपट करून हा ग्रंथ महाराष्ट्रीयांस सुलभ करून देण्याचा एकनाथानें यत्न केला असावा. यावर एकनाथानें प्रत्यक्ष एक टीका लिहिली असावी असा विद्वानांचा तर्क आहे; परंतु ही टीका हल्लीं संपूर्ण उपलब्ध नाहीं असें रा. भावे म्हणतात. (सरदार मेहेंदळे यांनीं अमृतानुभवावरील एकनाथकृत टीकेचें एक पृष्ठ रा. वि. का. राजवाडे यांच्या हवालीं केलें होतें).

एकनाथाचा ग्रंथरचनेचा उद्योग अखेरपर्यंत सतत चालू होता असें दिसतें. आपल्या पूर्ववयांत यानें भागवतासारखा ग्रंथ मराठींत आणिला व त्यावर टीका रचिली. तसेंच उत्तरवयांतहि यानें दुसरा एक मोठा ग्रंथ रचण्याचा उपक्रम केला. हा ग्रंथ रामायण हा होय. मूळ रामायणाच्या आधारें हा ग्रंथ मराठींत लिहिण्यास सुरुवात अगदीं साठीच्या सुमारास केली असावी असें दिसतें. 'भावार्थरामायण' ग्रंथ युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापर्यंत रचून झाल्यावर एकनाथाची प्रकृति विशेष क्षीण झाली आणि ग्रंथरचनेचे परिश्रम त्याच्यानें होईनात, तेव्हां पुढील ग्रंथ पुरा करण्याचें काम आपला एक शिष्य गावबा यानवर एकनाथानें सोंपविलें.

एकनाथाच्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांपैकीं बहुजनमान्य व सर्वांगसुंदर ग्रंथ म्हटला म्हणजे भागवत एकादश स्कंधा-

वरील विस्तृत टीका हा होय भागवतांतील या भागाला उद्धवगीता असेंहि म्हणतात. नाथांचें चरित्र म्हणजे या ग्रंथांत प्रामुख्यानें प्रतिपादिलेल्या ( अ. २, ३, ५, २९ पहा. ) भागवतधर्मरहस्याचें प्रत्यक्ष केवळ उदाहरणच होय. या विषयाचें विवरण करतांना नाथांची वाणी रसाळ, प्रसंगविशेषीं 'प्रासादिक' कवित्वानें स्फुरलेली, समर्पक दृष्टांतांनीं खुललेली, सद्भावानें आर्द्र झालेली, प्राकृत जनांसहि गुंगवून त्यास सात्विकवृत्तिप्रवण करणारी, वक्तृत्वाची व निरूपणकुसरीची साक्ष पटविणारी व विवेचक अशी स्पष्ट दिसून येते. तसेंच भारदस्तपणांत परमार्थाचें उद्घाटन करण्याच्या कामीं संस्कृत भाषेला मराठी भाषा रेंसभरहि हार जाणार नाहीं ही बाब स्पष्टोक्तीनें व स्वरचनेच्या ठाकठिकीनें एकनाथानें निदर्शनास आणून दिली आहे. एकनाथाचा एतद्विषयक कटाक्ष बिलकुल अस्थानीं नाहीं हें उघड आहे. ज्ञानेश्वराचें अनुकरण करून एकनाथानें भारुडांची रचना करितांना रूपकें योजण्यांत अनुपम चातुर्य दाखविलें आहे. नित्याच्या व्यवहारांतीलच गोष्टी घेऊन व तत्कालीन समाजांत चालू असलेल्या विविध धंद्यांस अनुरूप अशी रोचक भाषापद्धति घालून आत्मज्ञान परोपरीनें विशद व सुगम करण्याची खुबी या चटकदार रचनेंत एकनाथाला ठळकपणें साधली आहे. या बहारीच्या रचनेंत मात्र एकनाथाचें कवित्व जसें निर्विवादपणें दिसून येत आहे तसें त्याचें योजकत्वहि पटत आहे. हा शके १५५१ मध्यें फाल्गुन वद्य षष्ठीस समाधिस्थ झाला. नाथाच्या जन्मशकाप्रमाणें मृत्युशकहि निश्चित नाहीं. अर्वाचीन कोशकार, रा. सहस्रबुद्धे (श्रीएकनाथमहाराजचरित्र) यांच्याप्रमाणेंच तो शके १५३१ धरतात. अर्वाचीन मराठी भाषेचा जनक म्हणून एकनाथाची योग्यता मोठी आहे. ज्ञानेश्वर व एकनाथ यांच्या मध्यें साडेतीनशें वर्षांचा काळ लोटला आहे. तेव्हां या दोघांच्या वेळची मराठी भाषा विचारांत घेतां असें दिसून येईल कीं, ज्ञानदेवाच्या वेळीं भाषेंत जुनीं रूपें आणि त्यांचे अस्थिर प्रकार फार होते. एकनाथाची भाषा सुसंस्कृत व अधिक स्थिरावलेली दिसते. ज्ञानेश्वर व एकनाथ यांमधील काळांत मराठी भाषा संस्कृत पेहरावानें विशेष नटली, तिनें पूर्वींचे गांवढळ शब्दप्रचार टाकून दिले व प्रौढपणा धारण केला. म्हणून या दोघांच्या भाषेंत फार फरक आढळतो. ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत सर्व ग्रंथकारांनीं अध्यात्मिक विषयाच्या विवेचनासाठीं ओवीबद्ध छंद वापरला आहे; तेव्हां एकनाथाचाहि पाठ तोच होता हें सांगणें नकोच. नाथाची ओंवी साडेचार चरणी असून शेवटच्या चरणांत अनुप्रास साधलेला आढळतो एकनाथाच्या काव्याचा मासला म्हणून रुक्मिणीस्वयंवरांतील ( अ. १५ ) रुक्मिणीवर्णन पहा:—

भिवई सुरेख सरळ नासिक। गंडस्थळीं तेज अधिक। नाकींचे मोतीं जडित माणिक। तेणें श्रीमुख शोभन॥ सुरंग तळवे आणि तळहात। अधरबिंब अति आरक्त। बोलीं मधुरता तळपत। तेणें झळकत दंतपंक्ति॥ कटिप्रदेश शोभवी जघन। माज अतिशयेंसी सान। घोटी कळाविया सुलक्षण। बरवेपण पाउलां॥ नेसली क्षीरोदक पाटोळा। त्यावरी नवरत्नाची मेखळा। सुनीळ कांचोळी वेल्हाळा। लेइली माथां मोतलग॥ गंगातीरींचीं चक्रवाकें। तैंवि कुचद्वय सुरेखें। हृदयीं घननीळ झळकें। शोभा पदकें दाविजे॥

विरहानलानें पोळणारी रुक्मिणी म्हणते—:

मज नलगे विंझणवारा। तेणें अधिकची होतो उबारा। प्राणरिघों पाहे पुरा। शारंगधरावांचोनी॥ आंगीं न लावा गे चंदन तेणें अधिकचि होय दीपन। माझे निघों पहाती प्राण। कृष्णचरण न देखतां॥ ( अ. ५ )

वेदांत सांगतांनाहि एकनाथाची वाणी अस्खलित व हृदयभेदी वाटते. स्वात्मसुख ग्रंथांत आस्तिकनास्तिकासंबंधीं बोलतांना पुढील विवेचन केलें आहे:—

जैसे सूर्याचे किरण। सूर्यापुढें धांवती आपण। तेणें प्रकाशे सूर्यपण। अधिकाधिक॥ कां चंदनास वास। चंदनाहुनि चौपस। धांवे तेणें अधिक प्रकाश। चंदनत्वा आणी॥ तैसें विश्वप्रकाश तया गभस्ती। त्यांचीं किरणें त्या त्या नाना व्यक्ती। तेथें नास्तिकता जे देखती। ते मूर्ख मृगतृष्णिका॥ मोत्यांची करूनियां भूषणें। अंगीं प्रत्यंगीं लेणें। बाणलिया सुंदरपणें। शोभे स्वयें॥ तैसें हें स्वरूप निर्विकार। त्याचें सर्वांग भूषण चराचर। तेणें अलंकारलें मनोहर। स्वरूपचि भासे॥ सुवर्ण आणि भूषण। तेथें काय आहे दोन्हीपण। प्रगट पाहतांही कांकण। सोनेंचि दिसे॥ सौधपट पाहतां दृष्टी। तंतुसीच होय भेटी। तैसी अवलोकितां सकल सृष्टी। स्वरूपचि भासे॥

एकनाथाच्या अभंगासंबंधीं विवेचन 'अभंग' या लेखांत आलेंच आहे.

एकनाथाची साधु म्हणून मोठी ख्याति आहे. त्यानें केलेले चमत्कार महिपतीनें भक्तिविजयांत वर्णिले आहेत. एकनाथ अस्पृश्यता जातिभेद वगैरे सामाजिक दोष मानीत नव्हता असें दाखवून देणाऱ्या कांहीं कथाहि सांगतात

[ संदर्भ ग्रंथ—महाराष्ट्रसारस्वत. एकनाथाचीं स्वतंत्र सहा चरित्रें आहेत, त्यांपैकीं एक रा. ल. रा. पांगारकर यांनीं लिहिलें आहे. अर्वाचीन कोश व कविचरित्र यांत एकनाथावर लेख आहेत, भक्तिविजय व भक्तलीलामृत या पुराणांतून एकनाथांच्या आख्यायिका वर्णिल्या आहेत, याशिवाय किरकोळ वाङ्मय बरेंच आहे ].

**एकबटाना**— ( आधुनिक—हमदान ) हें शहर मीडिया देशाचा राजा अस्तायाजीझ याचें राजधानीचें शहर होतें. हें सायरसनें नाबोनिडसच्या कारकीर्दीच्या सुरवातीपासून (इ. स. पूर्वी ५४९) सहाव्या वर्षी घेतलें व इराणी साम्राज्याची स्थापना केली. इराणी राजांचें एकबटाना हें उन्हाळ्यांत राहण्याचें ठिकाण होतें. नंतर एकबटानाला पार्थियन राजांनीं आपली राजधानी नेली.

**एकर**—(एका अथवा सेंट जीन द एकर) हें पॅलेस्टाईन मधील एका जिल्ह्याचें मुख्य शहर आहे. एकरच्या उपसागराच्या उत्तरटोंकावरील एका भुशिरावर हें शहर वसलेलें आहे. एकरची लोकसंख्या सु. ११००० आहे. पैकीं ८००० मुसुलमान व बाकीचे यहुदि व ख्रिस्ती आहेत. किनाऱ्यावर असल्यामुळें व इतर कारणांनीं याला 'पॅलेस्टाईनची किल्ली' म्हणत असत. येथील व्यापार मंद होत चालला असून, शहराचा वारंवार नाश झाल्यामुळे येथें पाहाण्यालायक इमारती मुळींच नाहींत. येथील पडलेली भिंत धर्मयुद्धाच्या वेळची असून, मशीद जेझरपाशानें बांधली आहे. एकर हें बाबिस्ट धर्मपंथाचें मुख्य ठिकाण आहे.

**इतिहास.**—तिसऱ्या टॅथमोसि (थॉथमिस १५०० इ. स. पूर्वी.) याच्या खंडणीच्या यादींत एआक नांव आहे व कदाचित हें एकर असावें असा तर्क आहे. परंतु टेल-एल-अर्मना पत्रव्यवहारांतील एक्का, व सांप्रतचें एकर यांत कांहींच फरक नाहीं. हिब्रू लोक याला एक्को म्हणत व त्यांच्या वेळेस या शहराचा संबंध सीरिया प्रांताशीं फार असे. इ. स. पूर्वी ७२५ व्या वर्षी एकर हें चवथ्या शलमनेसरच्या विरुद्ध सिडन व टायर यांच्या बाजूनें बंडांत सामील झालें. ग्रीक इतिहासकार या शहराला एके म्हणत व टॉलेमी सोटर यानें या शहराला टालेमेक असें नांव दिलें असावें. ख्रिस्तीशकापूर्वी १६५ व्या वर्षी सायमन मकाबीअसनें सीरियन सैन्याचा पराभव पुष्कळ ठिकाणीं करून त्यांना टालेमेसमध्यें हांकून दिलें. इ. स. पूर्वी १५३ व्या वर्षी सीरियाच्या गादीवर हक्क सांगणाऱ्या डेमेट्रिअसचा प्रतिस्पर्धी अलेक्झांडर बालस (अँटायोकस एपिफेनिसचा मुलगा) याला एकर येथें आश्रय मिळाला होता. अलेक्झांडर जेनाऊस, व क्लिओपाट्रा यांनीं हें शहर हल्ला करून घेतलें होतें. सेंटपाल या शहरीं एक दिवस राहिला होता. अरबांनीं हें शहर ६३८ त घेतलें. पण १११० त धर्म योद्धयांनीं परत घेतलें. सल्लाउद्दीननें हें ११८७ सालीं घेतलें. गाय दि लुसिग्नाननें ११८९त याला वेढा दिला.व इंग्लंडच्या पहिल्या रिचर्डनें ११९१ त हें जिंकून घेतलें सुलतान सेलिमाच्या अधिपत्याखालीं तुर्कांनीं हें शहर १५१७ त काबीज केलें. १८ व्या शतकाच्या शेवटीं येथील शेख धाहर-एल-अमिरच्या अंमलाखालीं या शहराची भरभराट झाली. याच्यामागून जेझरपाशानें येथें तटबंदी केली. १७९९ त नेपोलियननें दोन महिने याला वेढा दिला होता. तरी सर डब्ल्यू सिडने व ब्रिटिश खलाशी यांच्या मदतीनें तुर्कांनीं त्याला दाद दिली नाहीं. जेझरचा मुलगा सुलेमान याच्या वेळेस पुन्हां या शहराची भरभराट झाली. १८३१ त इब्राहिमपाशानें वेढा देऊन या शहराची फार नासाडी केली. १८४० त ब्रिटिश आस्ट्रियन व फ्रेंच या मित्र-संघांनीं तोफा डागून हें शहर घेतलें व एक वर्षानें तुर्कांच्या स्वाधीन केलें.

**एकरचील ढाई:**— ११८९ त झाली. जरुसलेमचा राजा गाय लुसिग्नाननें यास वेढा दिला असतां सल्लाउद्दीननें वेढा उठविण्यासाठीं फौज पाठविली तिचा पराभव या लढाईत झाला.

**एकरुक**—मुंबई इलाखा. सोलापूर जिल्हा. एकरुक हें सोलापूरच्या ईशान्येस ५ मैलांवर असून येथें एक मोठा तलाव बांधलेला आहे. याला ७२०० फूट लांब व ७२ फूट खोल बंधारा बांधलेला असून याच्यापासून ३ कालवे काढलेले आहेत.हा तलाव इ. स. १८८१-८२ मध्यें पूर्ण होऊन यास रु. १२१२६२० खर्च लागला. त्यावेळीं हा मुंबई इलाख्यांतील सर्वांत मोठा तलाव होता.

**एकलव्य**—निषादाधिपति हिरण्यधेनुकाचा पुत्र. द्रोणाचार्यांनीं कौरव राजपुत्रांबरोबर याला धनुर्विद्या शिकविण्याचें नाकारल्यावरून यानें त्यांच्या पादुका गुरुस्थानीं स्थापून स्वतःच धनुर्विद्येचा अभ्यास करून तींत प्रवीण झाला. कौरवराजपुत्रांना त्याच्या अलौकिक धनुर्धारित्वाबद्दल वैषम्य वाटून त्यांनीं द्रोणाचार्यांकडे तक्रार केली. द्रोणांनीं हा अर्जुनाच्या वरचढ होऊं नये म्हणून अशी गुरुदक्षिणा मागितली कीं, तूं बाण सोडतांना अंगठा लावीत जाऊं नकोस. हें व्रत सर्व किरात अद्याप पाळतात असा समज आहे. (महा भा. आदि. १४२, दाक्षिण प्रत, १९१४)

**एकलिंगजी**—मेवाडांत उदेपूर शहरापासून एका मैलावरील एक देवस्थान. (उदेपूर पहा.) एकलिंगजीचें संस्थान मोठें आहे. वैष्णव मारवाड्यांत ज्याप्रमाणें दोन स्नेही एकत्र भेटले असतां 'जयगोपाल' म्हणून परस्परांस नमस्कार करितात. त्याप्रमाणें मेवाडांत 'जय एकलिंगजी' म्हणून रामराम करतात. येथें प्रत्यहीं दोनशें रुपयांचा खर्च आहे. एकलिंगजीचें देऊळ डोंगराळ प्रदेशांत आहे. येथें प्रसिद्ध मल्हारराव होळकर हें देवस्थान लुटण्यास गेला होता; परंतु लुटालूट न करितां तो तसाच मागें फिरला. एकलिंगजीच्या देवळांत 'गध्याची सोगण' म्हणून एक स्तंभ पुरला आहे. [लो हि. प्रं. ६ राजस्थानचा इ. उदेपूर परिशिष्ट५]

**एकादशरुद्र**—या अकरा रुद्रांचा ब्राह्मण ग्रंथांत तेहेतीस देवांच्या गटांत "अष्टौ वसव एकादशरुद्रा द्वादशादित्याः" असा उल्लेख आहे. तेथें एकादशरुद्रांचीं नांवें दिलेलीं नाहींत. या रुद्रांचीं नांवें निरनिराळ्या पुराणांत निरनिराळीं आढळतात. एकट्या भारतांतच आदिपर्वांत—मृगव्याध, सर्प, निर्ऋति, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर,कपाली,स्थाणु,भग. शांतिपर्वांत—अजैकपाद,अहिर्बुध्न्य, विरूपाक्ष, रैवत, हर,बहुरूप, त्र्यंबक,सुरेश्वर सावित्र, जयन्त, पिनाकी व अनुशासनपर्वांत—अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, ऋत, पितृरूप, त्र्यंबक, महेश्वर,

वृषाकपि, शम्भु, हवन, ईश्वर, अशीं एकादश रुद्रांचीं नांवें सांपडतात.

**एकादशी**—प्रत्येक पंधरवड्यांतील अकरावी तिथि. एकादशीच्या दिवशीं उपवास करावयाचा असून दुसऱ्या दिवशीं त्या व्रताची पारणा करतात. हें व्रत काम्य व नित्य (नेहमीं करावयाचें) असें आहे. एकादशींत स्मार्त व भागवत असे दोन भेद आहेत. या स्मार्त व भागवत अशा प्रकारच्या एकादशा नेहमीं येत नाहींत. त्यांच्यांतील ठोकळ भेद म्हणजे असा कीं, ज्या वेळीं दोन एकादशा येतील त्या वेळीं स्मार्त पूर्व दिवशीं व भागवत एकादशी दुसऱ्या दिवशीं येते. भागवत एकादशी नेहमीं द्वादशीविद्ध असते. स्मार्त व भागवत या एकादशा केव्हां मानावयाच्या यासंबंधीं माहिती धर्मसिंधु, निर्णयसिंधु इत्यादि ग्रंथांत सविस्तर दिली आहे.

दर महिन्याच्या दोन एकादशा याप्रमाणें वर्षाच्या चोवीस एकादशांचीं नांवें निराळीं आहेत. त्यांपैकीं शुक्लपक्षांतील बारा एकादशांचीं नांवें चैत्रमहिन्यापासून अनुक्रमें कामदा, मोहिनी, निर्जला, शयनी, पुत्रदा, परिवर्तिनी, पाशांकुशा, बोधिनी, मोक्षदा, प्रजावर्धिनी, जयदा, आमलकी हीं असून कृष्णपक्षांतील एकादशांचीं नांवें चैत्रमहिन्यापासून अनुक्रमें पापमोचनी, वरूथिनी, अपरा, योगिनी, कामिका, अजा, इंदिरा, रमा, फलदा, सफला, षट्तिला, विजया हीं होत.

एकादशीच्या उत्पत्तीसंबंधीं पद्मपुराणांत ( उत्तरकांड अ. ३८), पुढील कथा आहेः—कृतयुगांत अत्यंत उन्मत्त अशा मुर नामक दैत्याच्या वधाकरितां देवांनीं विष्णूची प्रार्थना केल्यावरून मुर दैत्याचा वध करण्याची प्रतिज्ञा करून विष्णूनें सर्व देवांच्यासह चंद्रावती नगरींत जाऊन दैत्यांशीं युद्ध सुरू केलें. देव तर लागलीच पळून गेले परंतु पुष्कळ वेळ युद्ध करूनहि विष्णूचें कांहीं न चालल्यामुळें शेवटीं तोहि पळून जाऊन बदरिकाश्रमीं एका गुहेंत दडून बसला. मुर दैत्य विष्णूचा पाठलाग करीत त्याच गुहेजवळ आला असतां तेथें त्यास शस्त्रास्त्रांनीं युक्त अशी एक सुंदरी दिसली. तिच्याशींच दैत्य युद्ध करूं लागला असतां त्या स्त्रीच्या हुंकारानेंच तो दैत्य मरण पावला. विष्णूनें हें पाहून त्या सुंदरीस वर मागण्यास सांगितलें असतां "तिन्ही भुवनांत व चारी युगांत मला श्रेष्ठत्व असावें, सर्व तीर्थांहून मला श्रेष्ठ समजावें, जे कोणी माझ्या ( एकादशीच्या ) दिवशीं उपवास करून तुझी भक्ति करतील त्यांवर तूं संतुष्ट असावेंस " असा वर मागितला. विष्णूनें तिचें नांव एकादशी असें ठेवलें.

याशिवाय ज्या पूर्वी बारा महिन्यांतील मोक्षदा वगैरे चोवीस एकादशा सांगितल्या त्या प्रत्येकीसंबंधींहि एक एक लहानशी कथा पद्मपुराणांत पुढें (उत्तरकांड अ. ३९ ते ६६) दिली आहे.



**एकिल्**—या शब्दाचा अर्थ गरुड असा होतो. हें बेट आयर्लंडच्या पश्चिम किनाऱ्याजवळ आहे. आयर्लंडच्या पश्चिमेस 'कुराऊनै' नांवाचें जें एक द्वीपकल्प आहे त्यामध्यें व या बेटामध्यें ' एकिल 'ची एक अरुंद सामुद्रधुनी आहे. मेयो नांवाच्या आयर्लंडच्या पश्चिम विभागांत याचा समावेश होतो. हें बेट डोंगराळ व दलदलीचें आहे. येथील लोक कोळ्याचा धंदा करून आपलें पोट भरतात.

**एक्झीटर**—हें शहर इंग्लंडमधील डेव्हनशायर परगण्याचें मुख्य शहर व शहर, म्युनिसिपल, राजकीय व पार्लमेंटरी बरो आहे. हें लंडनच्या पश्चिम नैर्ऋत्येस १७२ मैल आहे. १९०१ सालीं येथील लोकसंख्या ४७१८५ होती. येथील हायस्ट्रीट व फोरस्ट्रीट रस्ते फार प्रेक्षणीय आहेत. अर्वाचीन वस्ती व सभोंवतालचा भाग प्रेक्षणीय आहे. येथील कॅथीड्रलहि सुंदर आहे.

एलिझाबेथच्या कारकीर्दीत बांधलेल्या गिल्ड हॉलमध्यें जनरल मंक व ऑर्लिअन्सची डचेस हेनरीएटा यांचीं चित्रें आहेत. आलबर्टच्या स्मरणार्थ बांधलेल्या पदार्थसंग्रहालयांत कलाभुवन व मोफत वाचनालय आहे. येथें रोगमॉंट नांवाचा किल्ला होता त्याचे अवशेष आहेत.

धंदेशिक्षणाचें विद्यालय, शिक्षकविद्यालय, शाळा व व्याकरणशाळा येथें आहेत. येथें पुष्कळ धर्मार्थ संस्था आहेत. एक्झीटर हें रेल्वेचें केंद्रस्थान असून समुद्रावरील व्यापाराचेंहि ठिकाण आहे. एक्झीटर जहाज—कालवा (शिपकॅनाल ), एलिझाबेथच्या कारकीर्दीत बांधला गेला. नदीच्या मुखाजवळ एक्समौथ बंदर आहे. कागद, धान्य व सफरचंदाचें मद्य हा येथील निर्यात माल होय. येथून पार्लमेंटांत १ प्रतिनिधि जातो. येथील राज्यकारभार मेअर, शहरचे १४ सनदी अधिकारी व ४२ सभासदांच्या हातांत आहे. शहराचें क्षेत्रफळ ३१५८ एकर आहे. हेवीट्री या उपनगराची लोकसंख्या १९०१ सालीं ७५२९ होती.

फार प्राचीन काळीं हें शहर रोमन लोकांच्या ताब्यांत होतें. १००१ सालीं डेन्स लोकांनीं या शहराला वेढा दिला पण त्यांत त्यांनां यश मिळालें नाहीं. १००२ सालीं एथलरेड राजानें तें एमा राणीला दिलें. तिनें नेमलेल्या ह्यूज या अधिकाऱ्याच्या विश्वासघातामुळें १००३ सालीं तें स्वीननें घेऊन त्याचा नाश केला १०५० सालीं लिओफ्रिकनें हें डेव्हनशायरच्या बिशपांचें राहण्याचें ठिकाण म्हणून ठरविलें. १०६८ सालीं १८ दिवस या शहराला वेढा दिल्यावर येथील लोकांनीं रोगमॉन्ट नांवाचा किल्ला विलियम दि कांकररच्या स्वाधीन केला. पुन्हां बाल्डिव्हन डी रेडव्हर्सनें मॅटिल्डाकरितां ११३७ सालीं या शहरास वेढा दिला. पाण्याच्या अभावामुळें लोकांनां शरण जाणें भाग पडलें.

१४६७ साली यॉरकिस्ट लोकांविरुद्ध १४९७ साली परकिन वॉरबेक विरुद्ध व १५४९साली कॉर्नवॉल आणि डेव्हन यांच्या लोकांविरुद्ध येथील लोकांनीं टिकाव धरला. यादवीच्या वेळीं एक्झीटरनें पार्लमेंट पक्षाची बाजू घेतली. १६४३साली राजपक्षानें हें शहर काबीज केलें. तें१६४६पर्यंत त्यांच्याकडेसच होतें. १६८८ साली ऑरेंजचा प्रिन्स वुइल्यम येथें आला. पहिल्या हेनरीनें दिलेल्या सनदेप्रमाणें येथील लोकांस स्वतंत्र जकातीचे हक्क मिळाले. १२२७पासून १८३५ च्या म्युनिसिपालिटीच्या सुधारणाकायद्यापर्यंत येथील राज्यकारभार मेअर व बेलिफ यांच्या हातांत होता. १२९५पासून १८८५ पर्यंत येथून पार्लमेंटांत दोन प्रतिनिधी जात असत. परंतु पुढें येथून फक्त एकच प्रतिनिधि जाऊं लागला. लोकरीच्या कापडाकरितां हें पूर्वी फार प्रसिद्ध होतें.

**एक्रान**—हें फिलिस्टाईन लोकांचें बादशाही शहर होतें. रॅमलेहपासून ५ मैलांवर असलेलें सीरियांतील ॲकीर शहर तें हेंच असावें. सॅम्युएलच्या वेळेस हें फिलिस्टाईन लोकांच्या ताब्यांत होतें. येथें बालझेबुबचें देऊळ होतें. इ. स. ७० त यरुशलेमचा पाडाव झाल्यावर यहुदी लोक येथें येऊन राहिले. सध्यां येथें यहुदी शेतकऱ्यांची वसाहत आहे. जवळचा प्रदेश सुपीक आहे.

**एक्स**—हें शहर फ्रान्स देशांतील आग्नेय भागांत बोशे ड्यु-ऱ्होन विभागांत असून मार्सेलिसच्या उत्तरेस आगगाडीनें १८ मैलांवर आहे. येथील लोकसंख्या १९०६ साली १९४३३ होती. कूर्स मिराबो या सुंदर रस्त्याच्या योगानें शहराचे दोन निरनिराळे भाग झालेले आहेत. या रस्त्यांत तीन कारंजीं लागतात व दुतर्फा झाडें लावलेलीं असून प्रेक्षणीय इमारती आहेत. उत्तरेकडील भाग जुना असून त्यांत सोळाव्या शतकापासूनच्या इमारती आढळतात. या शहरांत एक्स मार्सेलिस या विद्यापीठाचें कायदा व वाङ्मयशाखांचें पीठ आहे. या शहरांत प्राचीन काळच्या बऱ्याच इमारती व शिल्पकामाचे नमुने आढळतात. सेंट सौवूरचें कॅथीड्रल ही प्राचीन व पहाण्यासारखी इमारत आहे. येथें उन्हाळीं आहेत. त्यांत चुना व कर्बाम्लवायु असतो. येथें आर्चबिशपचें स्थान, अपील कोर्ट, अकॅडमी, शिक्षकविद्यालय, धंदेशिक्षणाची शाळा व पदार्थसंग्रहालय (त्यांत प्राचीन अवशेष, चित्रें, प्राणी, वनस्पती वगैरे आहेत). असून ऑलिव्ह तेल काढण्याचे, लोखंडाचे, टोप्यांचे वगैरे कारखाने आहेत. या शहराची स्थापना ख्रि. पू. १२३ मध्यें सेक्स्टिअस कॅल्व्हिनस या रोमन कॉन्सलनें केली इतका या शहराचा इतिहास जुना आहे.

**एक्स-ला-चॅपेल**—कोलोनच्या पश्चिमेस ४४ मैलांवर बेल्जियन व डच सरहद्दीजवळ एका रमणीय खिंडींत वसलेलें प्रशियाच्या राज्यांतील जर्मनीचें एक शहर आहे. या शहराच्या स्थानिक स्वराज्याची सीमा दोन्ही देशांच्या सरहद्दींनां जाऊन भिडली आहे. शहराच्या आसमंताद्भागीं खनिजोदकाचे झरे आहेत. लोकसंख्या (१९०५) १४३९०६ होती. येथून पूर्वेस कोलोनशीं व ड्युसेल्डॉर्फशीं, आणि पश्चिमेस लीज-ब्रुसेल्सशीं व मेस्ट्रिच-ॲंट-वर्पशीं, लोहमार्गांनीं दळणवळण ठेवतां येत असल्यामुळें, या ठिकाणचा व्यापार फार भरभराटींत आहे. मध्यभागीं कसबा असून, त्याच्या सभोंवतीं असलेला जुना कोट पाडून त्याठिकाणीं आतां सहल करण्याकरितां मार्ग केले आहेत. या रस्त्याच्या पलीकडे नवें शहर व उपनगरें वसलीं आहेत. एक्स-ला-चॅपेल येथें एखाद्या जुन्या मध्ययुगीन शहरापेक्षां आधुनिक तऱ्हाच अधिक दृष्टोत्पत्तीस येते.

नगरभवन ही १४ व्या शतकांत चार्लेमॅग्नेच्या राजवाड्याच्या जागेवर बांधलेली गॉथिक पद्धतीची एक इमारत आहे. नगरभवनाच्या मागें ग्रॅसहाउस नांवाची जी इमारत आहे. तिच्यांत रोमनलोकांचा राजा कार्नवालचा रिचर्ड याचा दरबार भरत असे. हल्लीं या ठिकाणीं स्थानिक स्वराज्याचे जुने कागदपत्र ठेविले आहेत. येथील कॅथीड्रल ही ऐतिहासिक व शिल्पकलेच्या दृष्टीनें फारच महत्त्वाची इमारत आहे. हिच्यांतील जो जुना भाग आहे तो बांधण्यास इ. स. ७९५ मध्यें चार्लेमॅग्नेच्या देखरेखीखालीं सुरुवात झाली. हिच्या गाभाऱ्याखालीं चार्लेमॅग्नेची कबर होती असें म्हणतात. त्या बादशहाच्या अस्थी कॅथीड्रलच्या एका भागांत अजून जतन करून ठेविल्या आहेत. याशिवाय येथें आणखी कित्येक पुरातन गोष्टींचे अवशेष आहेत. त्यापैकीं जे विशेष महत्त्वाचे आहेत ते दर सातव्या वर्षी दाखवावयास काढतात.

याशिवाय येथें जर्मन डच व फ्लेमिश चित्रकारांच्या उत्तम उत्तम कामांचा संग्रह असलेला अजबखाना, सार्वजनिक ग्रंथसंग्रहालय, खाणीचें व विद्युच्छास्त्राचें काम शिकविण्याची पाठशाळा, नाटकगृह, पोस्टऑफिस नवें रेल्वेस्टेशन आणि कलाविज्ञानाची शाळा या दुसऱ्या कांहीं पाहण्यालायक गोष्टी आहेत. याठिकाणीं जीं कांहीं सुरेख सार्वजनिक स्मारकें आहेत त्यांत बाजार चौकांत असलेलें कारंजें व चार्लेमॅग्नेचा पुतळा आणि नाटकगृहासमोरचा पहिल्या विल्यम बादशहाचा ब्रॉंझ धातूचा अश्वारोही पुतळा, ह्याची गणना होते.

येथील गंधकयुक्त ऊन पाण्याचे झरे रोमन लोकांस माहीत होते. त्याचें पाणी कित्येक शतकांपासून संधिवात, वातरक्त व गंडमाळा या विकारांवर रामबाण औषध समजलें जात आहे. येथें एकंदर ६ झरे आहेत. त्यांपैकीं एकाचें उष्णमान फॅरेनहीटचे १३६° इतकें असतें. यापेक्षांहि अधिक ऊन पाण्याचे झरे आसमंतात आहेत.

व्यापारांत व उद्योगधंद्यांत या शहराचा दर्जा बराच वर लागतो. येथें सुती व रेशमी वस्त्रें करण्याचे मोठमोठे कारखाने आहेत. आसपास कोळशाच्या बऱ्याच चांगल्या खाणी निघाल्यामुळें, याठिकाणीं बहुतेक सर्व प्रकारच्या

लोखंडी कामाचे कारखाने आहेत. याशिवाय मद्य व रासायनिक द्रव्येंहि येथें तयार होतात. धान्य, कमावलेलें कातडें, मद्य व इमारतीचें लांकूड हे येथील व्यापाराचे जिन्नस आहेत. येथें नामांकित विमाकंपन्या आहेत व शहरांत मोठ्या प्रमाणावर सावकारी चालते.

आठव्या शतकांत चार्लेमेंग्नेनें येथें एक भव्य राजवाडा बांधला व आपल्या साम्राज्यांत याला दुसऱ्या प्रतीचें शहर केलें, इतकेंच नव्हे तर त्यावेळीं कांहीं काळपर्यंत हें शहर पाश्चात्य ज्ञान व सुधारणा यांचें केंद्रस्थान होतें. या शहराला महत्त्व येण्याचें हेंच कारण होय. ८१३ पासून १५३१ पर्यंत येथें जर्मन राजांचे व बादशहांचे राज्याभिषेक समारंभ होत असत. इ. स. १३०० त या शहराच्या भोंवतालचा कोट बांधून तयार झाला. १४ व्या शतकांत हें रोमन साम्राज्यांतील एक स्वतंत्र शहर झालें. सोळाव्या शतकांत एक्स–ला–चॅपेलच्या र्‍हासास सुरवात झाली. हें फ्रान्सच्या सरहद्दीला लागूनच असल्यामुळें सुरक्षित राहणें शक्य नव्हतें. यूरोपांतील धार्मिक सुधारणेमुळेंहि या शहरास पुष्कळ त्रास झाला. १८०१ मधील ल्युनेव्हिले च्या तहानें हें फ्रान्सकडे आलें. परंतु पुढें व्हिएन्नाच्या कॉंग्रेसनें तें प्रशियाला दिलें गेलें.

याठिकाणीं एकंदर तीन महापरिषदा भरल्या. (१) १६६८ च्या मेच्या २ र्‍या तारखेस जी येथें प्रतिनिधिसभा भरली होती तिच्यांत प्रक्रांति युद्धा [ वॉर ऑफ डेव्होल्यूशन] नंतर झालेल्या तहावर सह्या झाल्या. (२) दुसरी परिषद आस्ट्रियन वारसासंबंधीं चाललेल्या युद्धाचा निकाल लावण्याकरितां, ता. २४ एप्रिल सन १७४८ रोजीं येथें झाली. आणि (३) तिसरी व शेवटची परिषद इ. स. १८१८ मध्यें, फ्रान्समधून दोस्तराष्ट्रांचें सैन्य काढून घ्यावयाचें किंवा नाहीं, व याउपर ग्रेटब्रिटन, आस्ट्रिया, प्रशिया, व रशिया या राष्ट्रांचे एकमेकांशीं, व फ्रान्सशीं कोणत्या प्रकारचे संबंध रहावयाचे या दोन प्रश्नांचा विचार करण्याकरितां भरली.

**एगमॉंट लॅमोरल कौंट ऑफः—**(१५२२–१५६८) हा १५२२ त लायनॉट शहरीं जन्मला. हा एगमॉंटचा कौंट चवथा जॉन याचा धाकटा मुलगा होता. १५४१ मध्यें याचा वडील भाऊ वारल्यामुळें बापाची पदवी व मालमत्ता यास मिळाली १५४४ त याचा पॅलॅटाईनचा इलेक्टर तिसरा फ्रेडरिक याची बहीण सॅबिना इच्याशीं स्पायर्स शहरीं मोठ्या थाटानें विवाह झाला. १५४६ त यानें फिलीप बरोबर नेदर्लंड देशांत प्रवास केला. १५५४ त हा आंग्ल मेरीचें फिलीपशीं लग्न जुळविण्याकरितां वकील या नात्यानें इंग्लंडांत गेला होता. १५५७ त याला घोडेदळाचा सेनापति नेमल्यानंतर यानें सेंटक्वीन्टीन व ग्रॅव्हेलाइन्स या शहरीं फ्रेंचांचा पाडाव केला व पुष्कळ ख्याति मिळविली. १५५७ साली यानें सम्राट प्रतिनिधी ( रीजंट )च्या मंत्र्यानें चालविलेल्या एककल्ली राज्यपद्धतीविषयीं आपला निषेध व्यक्त केला. १६६५ त हा फिलीप राजास नेदर्लंड देशाची खरी वस्तुस्थिति समजाऊन देऊन राजा व प्रजा यांच्यामध्यें समेट घडवून आणण्याकरितां स्पेन देशांत गेला परंतु याचे तेथील सर्व प्रयत्न निष्फळ ठरले, व फिलीप राजाची याच्यावर इतराजी झाली. पुढें रीजंट आल्हा यानें यास पकडून कैद केलें व कांहीं दिवसांनीं फांशी दिलें (जून ५,१५६८). मरणानंतर डेमोश स्वातंत्र्याकरितां जीव खर्ची घातलेल्या लोकांमध्यें याची गणना होऊं लागली. १८६५ सालीं ब्रूसेल्स शहरीं याला फाशीं दिलें. त्याच्या स्मरणार्थ त्या ठिकाणीं एक स्मारक उभारण्यांत आलें.

[ संदर्भग्रंथ—जे एल मॉटले-राइज ऑफ डच रिपाब्लिक, ३ भाग लंडन १८५६; जे. पी. ब्लॉक—हिस्टरी ऑफ दि पीपल ऑफ नेदर्लँड्स, तीन भाग न्यूयॉर्क १९०४ ]

**एगिनकूर—**फ्रान्सच्या उत्तरभागांतील पास–डी कॅले या विभागांतील एक खेडें आहे. १४१५ च्या आक्टोबर महिन्याच्या २५ व्या तारखेस इंग्लंडचा ५ वा हेनरी ह्यानें फ्रान्सवर विजय मिळविल्यामुळें ह्या खेडेगांवास महत्त्व आलें आहे.

**एचर्ड—**फ्रांझ कार्ल एचर्ड (१७५३–१८२१). हा प्रशियन रसायनशास्त्रज्ञ बर्लिन येथें १७५३ त जन्मला. बीट कंदांत साखर असते, हा मार्ग्रफचा शोध एचर्डनें कृतींत उतरविला. १८०० त प्रशियाच्या राजानें त्याला कूनर्न येथें कांहीं जमीन दिली. तेथें त्यानें बीट कंदांच्या साखरेचा मोठा कारखाना काढला.

**एंजिन.—**एंजिन ( विशेष प्रचारांतील मराठी शब्द इंजन ) म्हणजे शक्ति उत्पन्न करणारें यंत्र. जें यंत्र शक्ति उत्पन्न करीत नाहीं तें एंजिन नव्हे. तें केवळ विशिष्ट काम करणारें यंत्र. असल्या यंत्रापासून काम घेण्याला एंजिन पाहिजे. एंजिन नसेल तर यंत्रापासून काम होणार नाहीं.

एंजिनांचे पुष्कळ प्रकार आहेत. मुख्य मुख्य एंजिनें पुढें दिलेल्या तऱ्हांचीं असतात. बाष्पयंत्र—(स्टीम इंजिन)वाफेनें चालणारें इंजिन; तैलयंत्र-(ऑईलइंजिन), तेलानें चालणारें, धूम्रयंत्र( ग्यास इंजिन ) धुरानें चालणारें, पीडितवायुयंत्र (कांप्रेस्ड एअर एंजिन) उर्फ दाबलेल्या हवेनें चालणारें इंजिन; उष्णवायुयंत्र ( हॉट एअर इंजिन)—जलयंत्र (हायड्रॉलिक इंजिन), जलप्रेरितयंत्र ( वाटर टरबाईन ) आणि सूर्ययंत्र (सन पावर इंजिन); भ्रमणयंत्र ( रोटरी इंजिन ) व पुरोपश्चाद्गामी यंत्र--( रेसिप्रोकल ) मागेंपुढें चालणारें; चलयंत्र ( लोकोमोटिव्ह इंजिन ). सर्वांत जुनें व अद्यापहि सर्वांत महत्वाचें म्हणजे बाष्पयंत्र अथवा वाफेचें एंजिन होय. अजूनहि मुख्य मुख्य ठिकाणीं व मोठ्या शक्तीसाठीं वाफेचींच इंजिनें वापरतात. हीं इंजिनें सुमारें दीडशें वर्षांपूर्वी निघालीं. हीं शोधून काढण्याचा मान जेम्स वॅट या इंग्लिश

गृहस्थास देतात. याच्याहि अगोदर किंवा जवळ जवळ याच्याच सुमारास न्यू कोमन यानेंहि एक वाफेचें इंजिन शोधून काढलें होतें. वॅट याच्या मनांत वाफेच्या शक्तीची कल्पना एका किटलीचें झांकण वाफेनें उडतांना पाहून आली. अशाच नादांत तो एकदां किटलीच्या नळींतून येणाऱ्या वाफेसमोर एक चमचा हातांत धरून त्या वाफेचा जोर पहात होता. त्या वेळेस त्याच्या आजीला तो अगदां वेड्यासारखा काय खेळत बसला आहे असें वाटून ती त्याला रागानें बोललीहि होती. वाफेच्या प्रसरणशक्तीचा फायदा घेणें व वाफेचें पुन्हा पाणी करून त्या रितीनेंहि इंजिनची शक्ति वाढवणें किंवा कमी जळण लागण्याची युक्ति योजणें याहि दोन्ही गोष्टी यानेंच केल्या.

वाफेचें यंत्र चालण्याची तऱ्हा अशी आहेः—एका पंचपात्रांत ( सिलिंडर ) एक दट्टया ( पिस्टन ) असतो. या पंचपात्राच्या दोन्ही बाजू बंद असतात. तसेंच दोन्ही बाजूंनीं वाफ पंचपात्रामध्यें येण्याची व्यवस्था केलेली असते. दट्टया (पिस्टन) पंचपात्राच्या (सिलिंडरच्या ) एका टोंकाला असतो त्या वेळेस त्या टोंकानें वाफ त्या पंचपात्रांत येऊं लागते. त्या वाफेच्या जोरानें दट्टया पुढें जाऊं लागतो. दट्टया कांहींसा पुढें गेला म्हणजे वाफ येण्याचें बंद होतें व दट्टया वाफेच्या प्रसरणशक्तीमुळेंच पुढें जातो. तो दट्टया पंचपात्राच्या दुसऱ्या टोंकाला जाण्याच्या सुमारास त्या बाजूनें दट्टयाच्या ( पिस्टन ) दुसऱ्या बाजूला वाफ येण्यास सुरुवात होते. दट्टया दुसऱ्या टोंकाला जाऊन पुन्हां नव्या वाफेच्या जोरानें परत येऊं लागतो. याच वेळीं दट्टयाच्या अलीकडच्या बाजूची काम करून फुकट गेलेली वाफ परत जात असते. ही वाफ परत जाऊन दट्टया पहिल्या जागेवर आला म्हणजे पुन्हां त्या बाजूनें पंचपात्रांत वाफ यावयास लागून दट्टया ( पिस्टन ) पुन्हां मागें जातो. अशा रीतीनें दट्टया पंचपात्रांत मागें पुढें जाऊन इंजिन चालतें.

वर सांगितल्याप्रमाणें जी गति उत्पन्न होते ती मागें पुढें अशी होते. या गतीवरूनच या जातीच्या इंजिनाला पुरोपश्चाद्गामी यंत्र (मागें पुढें होणारें इंजिन-रेसिप्रोकेटिंग एंजिन) असें म्हणतात. या मागें पुढें होणाऱ्या गतीपासून वर्तुल गति उत्पन्न करावी लागते. त्यासाठीं निराळी योजना करावी लागते. पंचपात्रांत जो दट्टया मागेंपुढें होत असतो त्याला एक दांडा बसविलेला असतो. याला दट्टयाचा दांडा (पिस्टन-रॉड ) असें म्हणतात. हा दांडा पंचपात्राच्या एका बंद बाजूमधून बाहेर येत असतो. या दांड्याच्या दुसऱ्या टोंकास एक आडवा दांडा ( क्रॉसहेड ) बसविलेला असतो. या आडदांड्याचें ( क्रासहेडचें ) काम दट्टयाचा दांडा व जोडदांडा ( कनेक्टिंग रॉड ) यांचा सांधा करण्याचें असतें. दट्टयाचा दांडा अगदीं सरळ रेषेंत मागेंपुढें होत असतो. पण जोडदांड्याचें आडदांड्याला (क्रासहेडला) जोडलेलें टोंक हें एकाच रेषेंत सरळ मागेंपुढें होत असतें. पण त्याचें दुसरें टोंक—ज्याला गतिपरिवर्तकाचें टोंक ( क्रँकएंड ) म्हणतात तें चक्राकार फिरत असतें. या जोडदांड्याच्या, दट्टयाच्या दांड्याच्या सरळ समांतर रेषेंत, मागेंपुढें होण्याचा गतीवर कांहींहि परिणाम होऊं नये म्हणून आडदांड्याच्या खालीं व वरतीं किंवा आडदांड्याच्या दोन्ही बाजूंला त्याला लागून मार्गदर्शक (गाईड) बसविलेले असतात. क्वचित् हे आडदांड्याच्या खालींहि बसविलेले असतात. त्यांच्या योगानें दट्टयाच्या दांड्याची गति समांतर रहाते. जोडदांड्याचें (कनेक्टींग रॉडचें) दुसरें टोंक चक्राकार गतीनें फिरत असतें म्हणून वर सांगितलेंच आहे. हें टोंक गतिपरिवर्तकाच्या (क्रँकच्या) एका टोंकाला बसविलेलें असतें; व गतिपरिवर्तकाचें दुसरें टोंक एका मोठ्या लाटेला ( शाफ्टींगला ) बसविलेलें असतें. जोडदांड्याचें टोंक वाटोळें फिरावयास लागलें म्हणजे गतिपरिवर्तकहि वाटोळा फिरूं लागतो. तो फिरला म्हणजे त्याबरोबर लाटहि फिरूं लागते. अशा तऱ्हेनें मागेंपुढें होणाऱ्या गतीचें गोलगतीमध्यें परिवर्तन होतें.

वर सांगितल्याप्रमाणें एंजिनची गति गोल होते हें खरें. पण ती गति सारखी रहाण्याला आणखीहि कांहीं भाग लागतात. त्यांपैकीं पहिला मुख्य म्हणजे शक्तिसंग्राहक अथवा प्रधानचक्र ( फ्लायव्हील ) होय. या प्रधानचक्राचा उपयोग इंजिनांत फार आहे. किंबहुना या चक्राशिवाय इंजिन चालणारच नाहीं. पंचपात्रांत वाफ शिरूं लागली म्हणजे कांहीं वेळ दट्टया जोरानें पुढें जाईल. वाफ येण्याची थांबली म्हणजे वाफेच्या प्रसरण शक्तीनें दट्टया पुढें जाईल खरा; पण त्याची गति कमी कमी होऊन दट्टया दुसऱ्या टोंकाला जाईपर्यंत ती फारच सावकास होईल; व दट्टया थांबेलहि. याचप्रमाणें दुसऱ्या बाजूनें वाफ येत असतांहि हीच स्थिति होईल. पण शक्ति उत्पन्न करीत असतां उत्पन्न होणारी गति ही अगदीं सारखी राहिली तरच तिचा उपयोग होईल. एकदां फार जलद दुसऱ्यांदा एकदम कमी अशा तऱ्हेचा बदल केव्हांहि चालणार नाहीं. हा बदल न व्हावा म्हणूनच प्रधानचक्र घालावें लागतें. प्रधानचक्र लाटेवर बसविलेलें असतें. प्रधानचक्राची धांव ( रिम ) फार जड केलेली असते. प्रधानचक्र ( फलायव्हील ) जड असल्यामुळें तें एकदम फिरतहि नाहीं व एकदम थांबतहि नाहीं. कारण तें पहिल्यानें फिरावयास लागतांना स्थिर स्थितीमधून गतींत येण्यास पुष्कळ शक्ति खातें. याचा परिणाम असा होतो कीं, दट्टया आपल्या फेरीच्या सुरवातीस, म्हणजे पंचपात्राच्या एका टोंकापासून पुढें जाऊं लागतो त्या वेळेस, त्यावर वाफेचा पूर्ण जोर असल्यामुळें फार जोरानें पुढें जाण्याचा प्रयत्न करतो पण त्या वेळेस इंजिन चालू होतांना प्रधानचक्र( फलायव्हील ) स्थिर असतें. इंजिन चालावयास लागलें म्हणजे त्याबरोबर तें चक्रहि फिरूं लागतें. हें फिरावयास लावण्यासाठीं जोर पुष्कळ लागतो. सुरुवातीला दट्टयावर वाफेचा पूर्ण जोर असल्यामुळें प्रधानचक्रास फिरा-

वयास लावण्यांत तो खर्च होतो. पुढें पंचपात्रांत वाफ येण्याची बंद झाल्यावर दट्टयाची गति कमी होण्याचा संभव असतो. पण प्रधानचक्रामध्यें पहिली गतीची शक्ति सांठविलेली असते तिच्यामुळें प्रधानचक्र आपली गति कमी होऊं देत नाहीं यामुळें दट्टयाची गति सारखीच रहाते. अशा तऱ्हेनें सर्वच एंजिनची गती सारखी रहाते.

दुसरे मुख्य भाग म्हणजे पंचपात्रांत वाफ येऊं देणें, व काम झालेली वाफ बाहेर जाऊं देणें, यासाठीं जी उघड झांप करावी लागते ती करणारे पडदे ( व्हाल्व्ह ) व ते पडदे ( व्हाल्व्ह ) चालण्यासाठीं जी दंड्यांची तसेंच सैन्यांची ( एक्सेंट्रिक ) व्यवस्था करावी लागते ती होय. याला पडद्यांची गति ( व्हाल्व्ह मोशन ) असें म्हणतात. ही निरनिराळ्या तऱ्हेची असते; व तीवरून इंजिनच्या कोणीं निरनिराळ्या जातीहि करितात. या तऱ्हांची माहिती पुढें एका ठिकाणीं दिली आहे. आणखी एक महत्त्वाचा इंजिनचा भाग म्हटला म्हणजे नियंत्रक (गव्हर्नर) होय. मागें सांगितल्याप्रमाणें प्रधानचक्राच्या ( फ्लायव्हील ) योगानें एंजिनची गति सारखी रहाते हें खरें. पण ती अगदीं सर्वस्वी सारखी राहूं शकत नाहीं. कारण समजा, एंजिन चालू होत आहे पण त्याच्या गतमुळें दुसरीं कोणतीहि यंत्रें चालू नाहींत. अशा वेळीं पंचपात्रांत वाफ अगदीं थोडी सोडावी लागेल, नाहींतर एंजिन फार जोरानें धांवूं लागेल. इंजिन चालू झाल्यानंतर यंत्रें चालूं लागलीं म्हणजे जर पंचपात्रामध्यें जास्त वाफ सोडली नाहीं तर एंजिनची चाल कमी होईल. चाल वाढविण्यासाठीं पंचपात्रांत जास्त वाफ सोडावी लागेल. पण केव्हां कांहीं यंत्रें थांबल्यास पुन्हां चाल वाढेल. चाल वाढली कीं, पुन्हां वाफ कमी करावी लागेल. ही चाल सारखी ठेवण्यासाठीं वाफ आंत सोडण्याचा पडदा (व्हाल्व्ह) कमी जास्त उघण्याकरितां एक माणूस सारखा बसवून ठेवावा लागतो. आणि इतकेंहि करून इंजिनची गति कधीं सारखी राहणार नाहीं. या करितां ही गति सारखी ठेवण्याची एक योजना एंजिनमध्यें करावी लागते. तिला नियंत्रक ( गव्हरनर ) असें म्हणतात. प्रत्येक इंजिनला नियंत्रक हा असावाच लागतो. इंजिनची गती जितक्या चांगल्या रितीनें सारखी ठेवावयाची असेल त्याप्रमाणें उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे नियंत्रक ( गव्हर्नर ) इंजिनांवर बसविलेले असतात. क्वचित एखाद्या ठिकाणीं एंजिनची गति सारखी रहाण्याची जरूरच नसल्यास त्या जातींच्या इंजिनांनां नियंत्रकहि नसतो. एंजिनचे पडदे निरनिराळे असतात हें मागें एका ठिकाणीं सांगितलेंच आहे. अगदीं पहिला निघालेला व सर्वांतहि साधा अशा पडद्याला सरकपडदा ( स्लाइड व्हाल्व्ह ) असें म्हणतात. हा इंग्रजी 'डी'च्या आकाराचा असतो म्हणून याला 'डी' सरकपडदा असेंहि म्हणतात. अजूनहि फार लहान एंजिनांत, कांहीं साधारण मोठ्या एंजिनांत, बोटीमधल्या एंजिनांत, तसेंच आगगाडीच्या एंजिनांतहि हेच वापरतात. याच्या बाहेरून एंजिनच्या पंचपात्रांत वाफ जाते व आंतल्या बाजूनें बाहेर जाते. साध्या पडद्याला एकमुखी पडदा ( सिंगल पोर्टेड व्हाल्व्ह ) म्हणतात. इंजिन फार मोठें असल्यास त्यांत वाफहि पुष्कळ जावी लागते. ती एका बाजूनें पुरेशी जात नाहीं, म्हणून दोन किंवा तीन तोंडांचे द्विमुखी, त्रिमुखी पडदे ( डबल-ट्रिपल पोर्टेड ) करतात. असले पडदे बहुतकरून बोटींतल्या मोठाल्या एंजिनमध्यें असतात. असल्या एंजिनला सरकपडद्याचें इंजिन असें म्हणतात.

कांहीं एंजिनमध्यें सरकपडद्याच्या पाठीवर दुसरा एक पडदा चालत असतो. त्याचें काम एंजिनवर भार (लोड) ज्याप्रमाणें कमी जास्त येईल त्याप्रमाणें इंजिनमध्यें वाफ कमी जास्त सोडण्याचें असतें. हें काम आपोआप होत असतें; म्हणून असल्या एंजिनांना स्वयंप्रेरित ( आटोमॅटिक ) सरकपडद्याचीं एंजिनें असें म्हणतात.

सरकपडदा ( स्लाइडव्हाल्व्ह ) हा चालत असतांना एंजिनच्या सिलिंडरच्या एका बाजूवर घांसत असतो. या वेळीं त्यावर तापकांतील ( बॉयलर ) वाफेचा असणारा सर्व दाब ( प्रेशर ) असतो. अगदीं जुन्या तापकांमध्यें वाफेच्या दाबाचें प्रमाण फार कमी असे. हें १०-२०पौंड पर्यंतहि असे. हळूहळू हा दाब वाढत चालला. हल्लीं हा दाब साधारणपणें १५०पासून २५० पौंडपर्यंत असतो. कांहीं विशेष ठिकाणीं हा दाब १५०० आहे व एका ठिकाणीं तर ३५०० पौंड दाबाची वाफ तयार करण्याचा प्रयत्न चालू आहे. वाफेचा दाब जसजसा वाढूं लागला तसतसें सरकपडद्याचें पंचपात्राच्या बाजूवर जास्त घर्षण होऊं लागलें. घर्षण फार वाढल्यामुळें सरकपडद्याची बाजू व पंचपात्राची बाजू या दोन्हीहि खराब होऊं लागून त्यांमधून वाफ निसटूं लागली. तसेंच पडद्यावर दाब फार असल्यामुळें पडदा चालविण्यासाठीं एंजिनची शक्तिहि जास्त फुकट जावयास लागली; म्हणून दट्टेपडदा ( पिस्टन व्हॉल्व्ह )जातीचे दुसरे पडदे करण्यांत आले. या पडद्यांत दोन दट्टये (पिस्टन )असतात. यांची चालण्याची तऱ्हा सरकपडद्यासारखीच आहे. याचा प्रत्येक दट्टया मुख्य पंचपात्रांत प्रत्येक बाजूला वाफ आंत जाण्याची जी वाट असते त्या वाटेवर चालत असतो. दट्टयांच्या बाहेरच्या बाजूनें तापकांतील वाफ पंचपात्रांत जाते व दोन्ही दट्टयांच्या मधल्या भागांतून वापरलेली वाफ बाहेर जाते. या तऱ्हेच्या पडद्यामध्यें पडद्याचा दट्टयावर फारसा जोर नसल्यामुळें सरकपडद्यापेक्षां यामध्यें पडदा चालविण्यास शक्ति कमी पुरते. या जातीचे पडदे असलेल्या एंजिनांस दट्टेपडद्याचें एंजिन असें म्हणतात.

फार लहान शक्तीच्या एंजिनांसाठीं सरकपडदे चांगले म्हणून मागें सांगितलेंच. एंजिन लहान असल्यामुळें त्यास वाफ किती लागली, कोळसे किती लागले याकडे लक्ष जरा

कमीच असतें. कारण लहान एंजिनें फारकरून तुर्त उपयोगासाठींच असतात. एंजिनें मोठीं व्हावयास लागल्यामुळें त्यांमध्यें जाणारी वाफहि पुष्कळ लागूं लागली. पुष्कळ वाफ जाण्यासाठीं मार्गाचें तोंड मोठें करणें किंवा एकापेक्षां जास्त तोंडें ठेवणें हे दोनच उपाय सरकपड्यामध्यें होते. मोठें तोंड केलें असतां पड्याची चाल(मागें पुढें होणें) फार वाढेल. तोंडें लहान केलीं असतां एकापेक्षां जास्त लागतात. व त्यासाठीं दोन तोंडांचा (द्विमुखी = डबल पोर्टेड)किंवा जास्त तोंडाचा पडदा करावा लागतो हें मागें सांगितलेंच आहे. पण एवढाहि मोठा पडदा पुरत नाहीं. कारण जास्त दाबाची वाफ वापरून तिच्या प्रसरणशक्तीचा फायदा घेतला असतां आंत जाणाऱ्या वाफेपेक्षां बाहेर येणाऱ्या वाफेचा आकार किती तरी पटीनें मोठा असतो. यामुळें जर पंचपात्राचीं तोंडें पुरेशीं मोठीं नसलीं तर सर्व वाफ बाहेर न आल्यामुळें एंजिनपासून कमी शक्ति उत्पन्न होते. तसेंच सरक पड्यानें पंचपात्रात वाफ येण्याचें एकदम बंद होत नाहीं. मागें सांगितलेल्या सरकपड्यावर पडणाऱ्या दाबानें होणारें नुकसानहि असतेंच. हीं सर्व काढून टाकण्यासाठीं कार्लीस नांवाच्या एका अमेरिकन गृहस्थानें दुसरी एक नवी योजना केली. त्या योजनेला त्याचेंच कार्लीस असें नांव पडलें आहे. या योजनेमध्यें पंचपात्राच्या एका बाजूला ( वरच्या बाजूस ) दोन्ही टोकांस वाफ पंचपात्रांत जाण्याची वाट असते.त्याचप्रमाणें पंचपात्राच्या खालच्या बाजूला काम केलेली वाफ बाहेर जाण्यासाठीं दुसऱ्या वाटा त्याचप्रमाणें दोन्ही बाजूला असतात. वरच्या बाजूनें वाफ आंत येते व खालच्या बाजूनें बाहेर जाते. येवढाच या योजनेंत फरक आहे असें नाहीं. सरकपड्यामध्यें वाफेच्या दाबानें होणारें नुकसान होऊं नये म्हणून या जातीच्या पड्यामध्यें पडदा मागेंपुढें होत नाहीं. तो आपल्याचभोंवतीं फिरावा अशी त्याची योजना केलेली असते. त्याचा अर्धा भाग अगदीं वाटोळा असतो व राहिलेल्या अर्ध्या भागामध्यें गाळे पाडलेले असतात. जेव्हां वाटोळा अर्धा भाग पंचपात्रांत वाफ जाण्याच्या मार्गावर बसलेला असतो त्या वेळेस मध्यें फट न राहिल्यामुळें वाफ पंचपात्रांत मुळींच जात नाहीं. पण जर गाळ्यांचा कांहीं भाग त्या वाटेवर आला असल्यास त्या गाळ्यांमधून वाफ पंचपात्रांत जाते. ही उघडझांप अगदीं थोड्या वेळांत व्हावी, विशेषतः वाफ बंद होण्याच्या सुमारास हा वाटोळा पडदा फार जलदीनें फिरावा अशी योजना केलेली असते. तसेंच पडदा एकाच जाग्यावर असल्यामुळें त्याच्यावर फिरतांना वाफेच्या दाबाचा फारसा परिणाम होत नाहीं. वापरलेली वाफ जाण्याचा दुसरा पडदाहि वरच्याचसारखा जवळ जवळ असतो. कारण याचाहि खालचा अर्धा भाग सारखा वाटोळा असतो व वरच्या भागांत असणारे गाळे जास्त मोठे असनात. तसेच हे पडदे परत धांवेच्या वेळेस धांव सुरू होण्यापासून उघडतात ते धांव पुरी होण्याच्या वेळेस बंद होतात. हे पडदे जलदी उघडणें व जलदी बंद होणें याचें फारसें महत्त्व नाहीं. म्हणून हे सावकाशच बंद होत असतात. हे पडदे केव्हां केव्हां आंत येण्याच्या व बाहेर जाण्याच्या एकाच चाकापासून चालतात. केव्हां केव्हां वाफ आंत जाण्याचें चाक निराळें व वाफ बाहेर येण्याचें चाक निराळें असें असतें. कार्लिस पडदे १२५ पौंड वाफेच्या दाबावर चांगले चालतात. १२५ पौंडांवर वाफेचा दाब गेला तेव्हां कार्लीस एंजिनमध्येंहि जास्त त्रास होऊं लागला. जास्त दाब आल्यामुळें वाटोळा पडदा फिरतांना फार घांसून फिरूं लागला. त्याचा परिणाम पडदा वांकडा तिकडा घांसून तोंडावर बरोबर बसत नाहींसा झाला. म्हणून दुसऱ्या एका नवीन तऱ्हेचे पडदे निघाले. हे पडदे आपल्या जागेवर घांसत नाहींत, वरतीं उचलतात व खालीं पडतात. यामुळें वाफेच्या दाबाचा परिणाम यांवर फार थोडा होतो. तसेंच हे पडदे पंचपात्राच्या अगदीं टोंकाजवळ बसवितां आल्यामुळें पडदा व पंचपात्र यांमध्यें असणारी जागा अगदीं थोडी ठेवतां येते. यामुळेंहि वाफ कमी पुरते. हे पडदे अलीकडे २०–२५ वर्षें प्रचारांत आले आहेत. हे उचलून पडतात म्हणून यांनां उडतपडदे ( ड्राप व्हाल्व्ह ) असेंहि म्हणतात. कोणी त्यांच्या आकारावरून बाहुली पडदे ( पपेट व्हाल्व्ह ) असेंहि म्हणतात. या पड्यांवरून हे पडदे या असलेल्या एंजिनांस उडतपड्याचीं एंजिनें असें म्हणतात.

या वर सांगितलेल्या सर्व जातींच्या इंजिनांमध्यें वाफ एका बाजूनें येते, नंतर तिचें प्रसरण होतें. प्रसरण होतांना वाफ थंड होत जाते. नंतर पूर्ण प्रसरण झालेली वाफ परत त्याच बाजूनें बाहेर जाते. यामध्यें दोन तोटे होतात. थंड वाफ परत जातांना सर्व पंचपात्रास थंड करते. तसेंच वाफ ज्या बाजूनें येते त्याच्या उलट बाजूनें जात असल्यामुळें तिची दिशा बदलण्याला कांहीं शक्ति खर्च करावी लागते. तसेंच थंड झालेलें पंचपात्र गरम करण्यांत वाफेच्या अंगची कांहीं उष्णता खर्च होते. जेव्हां एंजिनें पूर्ण शक्तीनें काम करीत नसतात तेव्हां ह्या पंचपात्राच्या थंड गरम होण्यानें त्याचा परिणाम असा होतो कीं, दर अश्वशक्तीला ( हॉर्स पावरला ) लागणारें वाफेचें प्रमाण वाढत जातें. हें होऊं नये म्हणून एक नवीनच तऱ्हेचें इंजिन निघालें. हें प्रोफेसर स्टंफ नांवाच्या जर्मन प्रोफेसरानें शोधून काढलें. या जातीच्या एंजिनमध्यें वाफ पंचपात्राच्या टोंकानें आंत येते व त्याच्या मध्यावर द्वारें असतात त्यांमधून बाहेर जाते. यामुळें वाफेची वाहण्याची ( फ्लो ) दिशा बदलत नाहीं. म्हणून या जातीच्या एंजिनला एकदिग्वाहक ( यूनिफ्लो किंवा युनाफ्लो ) असें म्हणतात. या जातीच्या इंजिनांमध्यें इंजिनचे शेवट गरम असतात व मध्य थंड असतो. दट्या परत जात असतां आंत जी काय थोडी वाफ रहात असेल ती दाबली जाते. ती जसजशी दाबली जाते तसतसें तिचें

उष्णमान वाढत जातें. यामुळें पंचपात्रामध्यें वाफेचें पाणी होऊं शकत नाहीं. म्हणूनच तापलेले भाग थंड होत नाहींत व थंड भाग गरम करण्यासाठीं वाफेची उष्णता फुकट जात नाहीं. यामुळें एंजिन जरी कमीजास्त काम करीत असलें तरी एंजिनमध्यें दर अश्वशक्तीला लागणारें वाफेचें प्रमाण अर्ध्यापासून पूर्ण किंवा त्याहीपेक्षां जास्त शक्तीचें काम करीत असतांहि म्हणण्यासारखें बदलत नाहीं. या जातीचीं एंजिनें आजकाल अत्यंत उत्तम अशीं गणलीं जातात. या जातींच्या इंजिनमध्यें पंचपात्र एकच असतें. वाफेच्या एंजिनच्या इंजिन चालविण्याच्या तऱ्हेवरून आणखी दोन तऱ्हा आहेत. एक शीतकयुक्त ( कंडेन्सिग ) व एक शीतक-विरहित ( नॉनकंडेन्सिग ). साधें एंजिन चालत असतांना एंजिनमधली वाफ पंचपात्रांत काम करून नंतर बाहेर जाते. वाफ बाहेर जातांना तिचा दाब हवेच्या दाबापेक्षां कांहीं जास्त असावा लागतो. एंजिन पूर्ण शक्तीनें किंवा कमी चालत असेल त्याप्रमाणें हा जास्तींत जास्त पांच व कमींत कमी तीन इतका जास्त असतो. दाब जास्त नसेल तर एंजिन चालून शक्ति उत्पन्न करणार नाहीं. हवेचा दाब दर चौरस :चाला पंधरा पौंड असतो. हा दाब जर कमी करतां आला तर त्याच एंजिनमध्यें तीच वाफ जास्त शक्ति उत्पन्न करील किंवा तीच शक्ति उत्पन्न करण्यासाठीं कमी वाफ लागेल. हें करण्यासाठीं जी योजना करावी लागते तिला शीतक ( कंडेन्सर ) असें म्हणतात. ही योजना ज्या एंजिनला लावलेली असते त्या एंजिनला शीतकयुक्त ( कंडेन्सिग ) इंजिन म्हणतात, व ज्या इंजिनला ही योजना लावलेली नसते त्याला शीतकविरहित ( नॉनकंडेन्सिग ) एंजिन म्हणतात.

ज्या तऱ्हेच्या कामाला एंजिन लावावें त्या तऱ्हेवरूनहि एंजिनचे वर्ग पाडतात. विशेषतः अशा तऱ्हेनें तीन वर्ग पडतात. एक जमीनीवर चालणारें इंजिन, बोटीमध्यें चालणारें (मरीन) एंजिन, व आगगाडीचें एंजिन ( लोकोमोटीव्ह–चलयंत्र ). जमीनीवर चालणारें एंजिन बहुतेक आडवें असतें. त्याचा पाया ( बेड ) चांगला भक्कम असावा लागतो. त्याचे सर्व भागहि चांगले जड असावे लागतात. कारण जमीनीवरचें एंजिन चांगलें टिकाऊ व मजबूत करण्याकडे जास्त लक्ष द्यावें लागतें. वजन पुष्कळ झालें तर एकपक्षीं तें बरेंच असतें.कारण वजन जर चांगलें सारखें वाटून गेलें असलें तर एंजिन मुळींच न हादरतां धर्मी चालतें, तथापि उगाच नुसतें वजन वाढविण्यांतहि फायदा नसतो. क्वचित् जमीनीवरहि उभीं ( व्हर्टिकल ) एंजिनें असतात, पण तीं मरीन एंजिनापेक्षां जास्त भक्कम असतात.

मरीन इंजिनः—हें सदोदित उभेंच असतें. याचें पंचपात्र वर असतें व त्याचा गतिपरिवर्तक खालीं असतो. बोटीवर आडवीं एंजिनें चालत नाहींत. कारण त्यांना जागा जास्त लागते. बोटींवर जास्त जागा लागणारीं एंजिनें वापरणें शक्यच नसतें. यासाठीं उभीं एंजिनेंच बोटीवर वापरतात. बोटींवरचीं सर्व एंजिनें दोन किंवा दोहोंपेक्षां जास्त पंचपात्रांचीं सरकपड्यांचीं किंवा दट्टेपड्याच्या तऱ्हेचीं असतात. हीं एंजिनें शीतकयुक्तहि असतात व थोडक्या आटोपशीर जागेंत बसविण्याजोगीं केलेलीं असतात. या एंजिनला प्रधानचक्र नसतें. हीं मागें पुढें हवीं तशीं चालवितां येतात.

चलयंत्रें ( लोकोमोटिव्ह ) आगगाडीच एंजिनें.—हीं एंजिनें वाफेनें चालणारींच असतात. क्वचित विजेनें चालणारीं व क्वचित तेलानें चालणारीं असतात.हीं एंजिनें रुळांवर चालणाऱ्या एका गाडीवर बसविलेलीं असतात. यांमध्यें वरच्या बाजूला तापक आतो व खालच्या बाजूला तापकाखालीं एंजिन बसविलेलें असतें. हीं एंजिनेंहि सरकपड्यांचीं किंवा दट्टेपड्यांचीं ( व्हाल्व्हची ) असतात. बहुतकरून सगळीं शीतकविरहित असतात. क्वचित कोणी शीतकयुक्त करितात.

वाफेच्या एंजिनच्या दुसऱ्या दोन जाती आहेत.त्यांचीं नांवें एकेरी व संयुक्त ( सिंगल व कांपाउंड ). एकेरी म्हणजे एका पंचपात्राचें व संयुक्त ( कांपाउंड )म्हणजे दुहेरी किंवा तिहेरी एकापेक्षां जास्त पंचपात्रांचें. एकापेक्षां जास्त पंचपात्रें असल्यास पहिल्यापेक्षां दुसरें मोठें असतें व दुसऱ्यापेक्षां तिसरें मोठें असतें. पंचपात्रें जास्त असल्यानें सुरवातीचा वाफेचा दाब जास्त असून पुढें तो कमी कमी होत जातो हें मागें सांगितलेंच आहे. वाफेचा दाब वाढूं लागल्यावरोबर एंजिनमध्यें वाफेच्या प्रसरणशक्तीचा फायदा घेण्यांत येऊं लागला. पण वाफेचा दाब पुष्कळ म्हणजे १०० तें १२५ पौंडांपेक्षां जास्त झाल्यानंतर एकाच पंचपात्रांत वाफेच्या अंगच्या प्रसरणशक्तीचा उपयोग करून घेणें फार कठिण होऊं लागलें; कारण वाफेचा दाब वाढल्यामुळें पंचपात्रामध्यें येणारी वाफ लवकर बंद करावी लागे व पूर्ण पसरलेली वाफ थंड असल्यामुळें परत जातांना सर्व पंचपात्र फार थंड होऊन क्वचित वाफेचें पाणीहि होई. पंचपात्रामध्यें पाणी असणें फार धोक्याचें आहे. कारण त्यामुळें पंचपात्र किंवा त्याचें झांकण फुटण्याचा फार संभव असतो. म्हणून पंचपात्रांत येणारी वाफ एकाच पंचपात्रामध्यें पसरण्याच्या ऐवजीं दोन किंवा दोहोंपेक्षां जास्त पंचपात्रांमध्यें पसरू देतात. यामुळें प्रत्येक पंचपात्रामध्यें वाफ जास्त वेळ येऊं देतां येतें. व वाफ एकाच पंचपात्रांत पुरी न वापरल्यामुळें तें पंचपात्र फारसें थंड होत नाहीं. यामुळें नव्या वाफेच्या अंगची उष्णताहि उगाच पाहिले( थंड झालेले भाग गरम करण्यांत) फुकट जात नाहीं. यामुळें वाफ पुष्कळच कमी पुरते. जमीनीवर चालणाऱ्या एंजिनमध्यें बहुतकरून दोनच पंचपात्रें असतात. बोटीवरच्या ( मरीन ) एंजिनमध्यें दोहोंपासून चारपर्यंत असतात. चलयंत्रामध्यें ( लोकोमोटिव्ह ) सोयीसाठीं बहुतकरून एक पंचपात्रच असतें. क्वचित एकापेक्षां जास्त पंचपात्रांचेंहि एंजिन असतें.

वाफेच्या एंजिनची आणखी एक तऱ्हा आहे. त्याचें तत्त्व वर सांगितलेल्या एंजिनपेक्षां अगदीं निराळें आहे. समजा एखादें भिरभिरें आहे. तें जर वाऱ्यांत उभें केलें तर वाऱ्याच्या दिशेनेंच फिरावयास लागेल. नवें जें वाफेचें एंजिन आहे त्याची व याची तऱ्हा एकच.त्याचें नांव भ्रमणयंत्र (टरबाईन). भ्रमणयंत्रांत एका वाटोळ्या पातळ चाकाच्या धांवेवर भिरभिऱ्यासारखींच लहान लहान पुष्कळ पातीं बसविलेलीं असतात. या पात्यांवर वाफ सोडली तर त्या वाफेच्या जोरानें तीं पातीं फिरूं लागतात. यामुळें सर्व एंजिन फिरावयास लागतें. रोटरी म्हणजे आपोआप वाटोळें फिरणारें इंजिन तें हेंच. या एंजिनला दुसरे कांहींहि भाग लागत नाहींत. कारण याची मूळ उत्पन्न होणारी गतीच वाटोळी असते. यामुळें वर सांगितलेल्या मागें पुढें होणाऱ्या एंजिनांपेक्षां याला जागा फारच कमी पुरते.

भ्रमणयंत्राच्या (टरबाईनच्या) तीन तऱ्हा आहेत. एक वाफेच्या गतीनें फिरणारें, दुसरें वाफेच्या दाबानें फिरणारें व तिसरें वाफेच्या गतीनें व दाबानें फिरणारें. कोणत्याहि वायूच्या अंगीं अशी शक्ति आहे कीं, त्यावरील दाब काढला असतां त्याचा आकार मोठा होतो पण त्याच वेळीं त्यामध्यें गतिहि अतिशय उत्पन्न होते. हींच गोष्ट पहिल्या जातीच्या वाफेच्या भ्रमणयंत्रामध्यें होते. या जातीचीं भ्रमणयंत्रें अगदीं पहिल्यानें निघालीं. यांमध्यें एका लहानशा चक्राच्या धांवेभोंवतीं जीं पातीं बसविलेलीं असतात त्यांवर दाब काढून अतिशय वाढलेली पण त्यामुळें फार गति आलेली अशी वाफ सोडतात. यामुळें तें चाक अतिशय जोरानें फिरावयास लागतें. इतकें कीं लहानलहान भ्रमणयंत्रांत त्याचे फेरे मिनिटास तीस हजार होतात. म्हणून त्याचें चाक अतिशय हलकें व आंस बारीक बसवावा लागतो. दीडशें अश्वशक्तीच्या जातीच्या टरबाईनचा आंस दीड इंची असतो. यावर त्याची गति कमी करून दुसऱ्या यंत्राला जोडण्यासाठीं लहानमोठीं दांत्यांचीं चक्रें बसवावीं लागतात. या जातीचीं भ्रमणयंत्रें (टरबाईन) डी लाव्हल नांवाच्या गृहस्थानें शोधून काढलीं म्हणून त्यांना त्याचेंच नांव पडलें आहे.

दुसरीं दाबाच्या जातीचीं (प्रेशर) भ्रमणयंत्रें यांना 'पारसन्स टरबाईन्स' असेंहि (तीं शोधून काढणाऱ्या माणसाच्या नांवावरून) म्हणतात. वर उल्लेखिलेलीं यंत्रें मोठीं करतां येत नसत. लहान जातीचीं साधारणपणें चांगलीं चालत. पण मोठीं बनवितांना त्यांची गति आड येत असे म्हणून पारसन्स साहेबानें हीं नवीं शोधून काढलीं. पारसन्स हा एक लार्डचा मुलगा होता. या जातीच्या टरबाईन्स यंत्रांमध्यें एका आंसावर एकसारखीं चाकें न बसवितां एकापेक्षां दुसरें जरा मोठें, त्यापेक्षां तिसरें मोठें अशीं १०।१२ चाकें बसवितात. वाफ पहिल्यानें अगदीं धाकट्या चाकावर सोडतात. त्यावर त्या वाफेची क्रिया होऊन ती वाफ दुसऱ्या तिसऱ्या चाकांवर अशी जात असते. अगदीं शेवटल्या चक्रामध्यें काम करून ती बाहेर पडते. बाहेर पडतांना वाफेचें अगदीं पूर्ण प्रसरण झालेलें असतें. वाफ एकदमच न पसरतां संयुक्त इंजिनप्रमाणें एकापेक्षां जास्त जागीं पसरते. म्हणून याला कोणी संयुक्त भ्रमणयंत्र (कांपाउंड टरबाईन) असेंहि म्हणतात. या भ्रमणयंत्रा(टरबाईन)ची गति तीं लहान (२५०।३०० हार्स पावरचीं) असल्यास पांच हजार ते सहा हजार व मोठीं (३०।४० हजार हार्सपावरचीं) असल्यास दर मिनिटास दोन हजार फेरे असतात. या जातीचीं टरबाईन इंजिनें मोठ्यांत मोठीं म्हणजे सत्तर ऐंशीं हजार हार्सपावरचीं असतात. मोठीं इंजिनें पाहिजे असल्यास यांच्याशिवाय दुसरीं कोणतीहि चालत नाहींत. मोठमोठ्या बोटींवर जेथें फार मोठ्या शक्तीचीं इंजिनें घालावयाचीं असतात त्या ठिकाणीं याच जातीचीं इंजिनें वापरावीं लागतात.

तिसरें गतीचें व दाबाचें भ्रमणयंत्र (इंपल्सअँड प्रेशर):— या जातीचीं टरबाईनें लहानमोठीं सर्व जातीचीं असतात. या जातींमध्यें दोन्ही जातींचे गुण एका ठिकाणीं घेण्याचा प्रयत्न केला आहे. याचीं चाकें एकाहून जास्त असतात पण पारसन्स इतकीं नसतात. तीं सुमारें पांच सहा असतात, यामुळें हीं लांबीमध्यें पारसन्सपेक्षां जरा कमी असतात. गती दोघांची बहुतेक सारखीच असते हीं चालण्यासहि सारखींच असतात. कर्टीस, झोली वगैरे कांहीं लोकांचीं ह्या जातीचीं भ्रमणयंत्रें असतात. भ्रमणयंत्रें शीतकयुक्त व शीतकविरहित या दोन्हींहि तऱ्हांनीं चालवितात. पण बहुतकरून दुसऱ्याप्रकारचीं विशेष चालवितात.

धूम्रयंत्रें (ग्यास इंजिन्स):—वाफेच्या इंजिनाशीं स्पर्धा करणारीं इंजिनें म्हणजे धूम्रयंत्रें होत. धूम्रयंत्रें व तैलयंत्रें हीं दोन्हीं पुष्कळ अंशीं सारखींच असतात. त्यांची क्रिया सर्वस्वी एकच असते. फरक फक्त तेलाचा धूर करण्याची जी जास्त योजना तिच्यांतच असतो. म्हणून येथें धूम्रयंत्रा (ग्यास इंजिन)च्या तत्त्वाचें जें वर्णन देऊं तें तैलयंत्रा( आईल इंजिनास) सहि सर्वथैव लागू पडेल. याला लागणारा धूर (वायु) हि कोळशापासून उत्पन्न होतो. अलीकडे तेल, लांकूड, लांकडी कोळसा, भाताचें किंवा शेंगादाण्याचें भूस; टरफल इत्यादींपासून धूर करण्याचीं यंत्रें निघालीं आहेत पण ती शेंकडा पांच इतकींहि नाहींत. सर्व बहुतेक कोळशाचाच धूर करणारीं असतात. धूर जर एखाद्या नळींतून नेला व त्याला जर पेटविला तर तो पेटूं लागेल व तेथें उष्णता उत्पन्न होईल. जर एखाद्या लहान भांड्यांत कांहीं धूर व तो सर्व पेटण्यासाठीं लागणारी हवा ही खूप मिसळून भरून ठेवली व त्या मिश्रणास कांहीं योजना करून पेटवलें तर तें सर्व मिश्रण एकदम पेटून तेथें भडका होईल. ह्याच गोष्टीचा उपयोग धूम्रयंत्र (ग्यास इंजिनें) चालविण्यास होतो. वाफेचें इंजिन निघाल्यानंतर

धुराचें इंजिन निघालें. हें इंजिन निघण्याच्या अगोदर विलायतेंत साधारण मोठ्या शहरांत दिवे लावण्यासाठीं कोळशाच्या धुराचा उपयोग करण्यास सुरुवात झालेली होती. हाच धूर इंजिनें चालविण्यासाठींहि विकत मिळत असे. यामुळें लहान लहान इंजिनें चालविण्यास त्याचा फार उपयोग होण्याजोगा होता. म्हणून तैलयंत्रें निघण्याच्या अगोदर धूम्रयंत्रें प्रचारांत आलीं. धूम्रयंत्र निघाल्यानंतर तसल्याच पण धुरावर अवलंबून न रहाणाऱ्या अशा यंत्राची जरूर भासूं लागल्यावरून तैलयंत्र (ऑइल इंजिन) निघालें.

हें इंजिन चांगल्या तऱ्हेनें चालू करण्यावद्दल पुष्कळ प्रयत्न झाले पण त्यांत फारच थोड्या लोकांस यश आलें. त्यांत पहिला—निदान ज्यानें धूम्रयंत्र चांगलें चालण्यास जी क्रिया झाली पाहिजे ती क्रिया शोधून काढण्याचा—मान काउंट वो डी रोचास या फ्रेंच माणसास आहे. यानें ही क्रिया शोधून काढली खरी पण त्यानें तिचा उपयोग केला नाहीं. तो मान ऑटो नांवाच्या जर्मन गृहस्थास आहे. यावरूनच या एंजिनांतील क्रियेला ऑटोचा फेरा असें म्हणतात.

ही क्रिया अशी आहे; धूम्रयंत्राचा (ग्यास इंजिनचा) दट्ट्या मागपासून एका टोंकापासून पुढें जाणें किंवा पुढून मागें येणें याला एक धांव म्हणतात, या पहिल्या धांवेला धूर व हवा यांचें मिश्रण पंचपात्रामध्यें येतें. या वेळेस दट्ट्या पुढें जात असतो. दट्ट्या मागें येतेवेळेस हें मिश्रण दावलें जातें. यानंतर पुन्हां दट्ट्या पुढें जाण्यास सुरवात होण्याच्या वेळेस हें दावलेलें मिश्रण पेटतें व दट्ट्यावर जोराचा धक्का बसतो व या धक्क्यानें दट्ट्या पुढें जातो. दट्ट्या पुन्हां मागें यावयाच्या वेळेस हे जळलेले सर्व वायू बाहेर निघून जातात व पंचपात्रांत हवा व धुराचें मिश्रण पुन्हां येण्यास मोकळीक होते. यानंतर पुन्हां दट्ट्या पुढें जातो तेव्हां हवा व धूर यांचें मिश्रण पंचपात्रांत येतें. अशा रीतीनें हें गाडें चालतें. म्हणजे मिश्रण येणें, तें दवणें, नंतर पेटणें व नंतर पेटलेले वायू बाहेर जाणें या क्रिया सर्व धूम्रयंत्रांत होत असतात. हें प्रत्यक्ष ऑटोनें करून दाखविलें म्हणूनच त्याला धूम्रयंत्र तयार करण्याचा मान आहे.

सर्व लहानमोठ्या धूम्रयंत्रांत हीच तऱ्हा असते. यांत कांहीं फरक होत नाहीं. पण तैलयंत्रांत तत्त्व जरी एकच असलें तरी प्रत्यक्ष क्रियेंत थोडा फरक असतो. तो असाः— धूर हा सर्वसाधारण एकाच जातीचा असतो. पण तेलाची गोष्ट तशी नाहीं. पेट्रोल तेलाची वाफ तावडतोब नुसत्या हवेंत उघडे राहिल्यानें होते. राकेल तेलाला चांगलें तापवावें लागतें.यापेक्षां जास्त जाड जें तेल असतें त्याला नुसतें तापवूनच पुरत नाहीं तर त्याला आणखी फोडून त्याचे बारीक तुषार करावे लागतात. एका जातीच्या तैलयंत्रामध्यें जरी फार जाड तेल वापरतात तरी त्याला मुळींच तापवावें लागत नाहीं. उलट हवाच इतकी तापलेली असते कीं, तींत तेलाचा फवारा सोडल्यावरोबर तें तेल जळून जातें.

या तेल जळण्याच्या तऱ्हेवरून तैलयंत्रांच्या (आइल एंजिनांच्या) निरनिराळ्या जाती झाल्या आहेत. साधें पेट्रोल तेलानें चालणारें इंजिन तें पेट्रोल एंजिन. त्याच्यांत व ग्यास इंजिनमध्यें कांहीं फरक नसतो. फक्त पेट्रोलची वाफ करणारा मिश्रक (कारबुरेटर) लावलेला असतो. तसेंच यांमध्यें एंजिनमधील मिश्रणाचा दाव जास्तींत जास्त म्हणजे चाळीस पौंड असतो. तेलानें चालणाऱ्या इंजिनमध्यें तेलाची वाफ होण्यासाठीं पंचपात्राच्या पाठीमागें बाष्पक (व्हेपोराईझर-म्हणजे तेलाची वाफ करणारा) वसवावा लागतो. हा एंजिन चालू कराण्याच्या अगोदर तापवावा लागतो. इंजिन चालू झाल्यापासून तें चालू असेपर्यंत हा तापलेलाच रहातो. यामध्यें होणारी तेलाची वाफ व हवा यांचें मिश्रण पंचपात्रांत येतें. तें मागल्यापेक्षां जास्त दावावें लागतें. यांत दाब दर चौरस इंचाला साठ तें ऐशीं पौंडांपर्यंत वाढवावा लागतो. यालाच खरें आईल इंजिन म्हणतात. ज्याला क्रूड आईल किंवा सेमिडीझेल म्हणतात त्यांमध्यें वापरण्याचें तेल साधारणपणें दाट असतें. तें बाष्पकामध्यें जाण्याच्या अगोदर तापवावें लागतें व बाष्पकांत जातांना त्याचे अगदीं बारीक तुषार व्हावे लागतात. तेव्हांच त्या तेलाची चांगली वाफ होते. यावेळेस तर मिश्रणाचा दाव फारच वाढवावा लागतो. म्हणजे १२५ पौंडांपासून २००–२५० पौंडांपर्यंत हा दाब असतो. या तऱ्हेच्या एंजिनपासून सुरवातीला हवा व तेलाची वाफ यांचें मिश्रण पंचपात्रांत येण्याच्या ऐवजीं नुसती हवाच पंचपात्रांत येते. ती पुरी दवण्याच्या सुमारास म्हणजे दुसऱ्या धांवेच्या शेवटीं तेलाची वाफ पंचपात्रांत येते. यामुळें धांव पुरी होण्याच्या अगोदर मिश्रण पेटण्याचा संभव रहात नाहीं. नव्या निघालेल्या क्रूड आईल इंजिनमध्यें व डीझल एंजिनमध्यें फक्त नुसती हवाच पंचपात्रांत घेतात व ती नुसती दाबतात. या दाबण्याच्या वेळीं पंचपात्रामधला दाब दर चौरस इंचाला ३०० ते ५०० पौंडपर्यंत वाढतो. इतक्या दावामुळें हवा इतकी तापते कीं, तीमध्यें तेल आल्यावरोबर तें पेटतें, निराळें कांहीं करावें लागत नाहीं.

तैलयंत्राची (आईल इंजिनची) आणखी एक तऱ्हा आहे. मागें सांगितल्याप्रमाणें ज्या इंजिनमध्यें प्रत्येक क्रियेला एक धांव लागते त्या इंजिनला चार धांवांचें इंजिन (फोर सायकल इंजिन) असें म्हणतात. पण कांहीं कांहीं इंजिनमध्यें ह्या सर्व चारी क्रिया दोनच धांवांमध्यें होतात; म्हणजे पहिल्या जातीच्या एंजिनांमध्यें ती क्रिया पुर्ण होण्यास इंजिनचे दोन फेरे व्हावे लागतात. व दुसऱ्या जातीच्या इंजिनामध्यें त्या सर्व क्रिया एकाच फेऱ्यांत होतात. याला दुधांवी (दोन धांवांचें–टू स्ट्रोक सायकलचें–) इंजिन असें म्हणतात. यामध्यें इंजिनच्या पुढल्या भागास एक पोकळी

असते. ती अगदीं बंद असते. इंजिनमध्यें मिश्रणाचा भडका झाल्यानंतर जेव्हां दट्टया पुढें येतो त्यावेळीं या पुढल्या भागामध्यें असलेली हवा दबते. दट्टया खालीं येऊन ही हवा जेव्हां पुरी दबते त्यावेळेस दट्टयाच्या योगानें आपोआप दोन द्वारें उघडून एकामधून जळलेले वायू निघून जातात व दुसऱ्यामधून ही दबलेली हवा आंत येते. याच वेळेस तेलाची वाफहि आंत येते. दट्टया परत जातानां हें मिश्रण दबलें जातें. धांव पुरी होण्याच्या वेळेस हें मिश्रण पेटून दट्टया पुन्हां खालीं येतो. याप्रमाणें हें इंजिन चालतें. हें इंजिन चार धांवांच्या इंजिनपेक्षां जास्त साधें असतें. पण याला तेल थोडें जास्त लागतें.

धुराचें इंजिन किंवा तेलाचें इंजिनः—हें वाफेच्या एंजिन-प्रमाणेंच मागेंपुढें होणारें एंजिन आहे. यामुळें याचे व त्याचे बरेचसे भागहि अगदीं एकच असतात. पण वाफेच्या इंजिनमध्यें असणाऱ्या कांहीं भागांमध्यें फरक असतो. वाफेच्या इंजिनला ज्याप्रमाणें दट्टयाच्या दांड्याला मार्गदर्शक ( गाईड ) लावलेला असतो त्याप्रमाणें तेलाच्या एंजिनमध्यें असत नाहीं. कारण ह्याची शक्ति दट्टयाच्या एकाच बाजूला उत्पन्न होत असल्यामुळें दट्टयाची दुसरी बाजू उघडी असली तरी चालते. व ती उघडीहि असते. फक्त दट्टयाचा दांडा लांब करितात. यामुळें दट्टया व मार्गदर्शक अशीं दोन्हीं कामें एकाच दांड्याकडून होतात. दट्टयामध्येंच 'गजनपिन' बसविलेली असते व तिलाच जोड दांड्याचें एक टोंक जोडलेलें असतें.

तथापि कांहीं फार मोठ्या धुराच्या इंजिनमध्यें व दोन धांवांच्या मोठमोठ्या डीझल इंजिनमध्यें दट्टयाच्या दोन्ही बाजूंला शक्ति उत्पन्न होत असते.अशा ठिकाणीं सर्व व्यवस्था वाफेच्या एंजिनप्रमाणेंच करावी लागते. क्वचित कांहीं तेलाचीं इंजिनें करणारे आपल्या एंजिनमध्यें मार्गदर्शक ( गाईड ) लावतात. बहुतकरून असलीं इंजिनें दोन धांवांची असतात. व त्यांचे परिवर्तक बंद नसतात. दट्टयाच्या पुढेंच एक बंद भाग असतो, त्यांतच हवा दबली जाते.

दाबलेल्या हवेचीं इंजिनें फार थोड्या ठिकाणीं विशेषतः अगदीं कांहीं विशेष जरूर असल्याशिवाय कोणी वापरीत नाहींत. त्यांतलें तत्त्व व वाफेच्या इंजिनाचें तत्त्व हीं दोन्हीं एकच असतात. फक्त एंजिनच्या रचनेंत मात्र कांहीं थोडा फरक असतो. वाफेच्या चालू इंजिनला जर तितक्याच तऱ्हेच्या दाबाची हवा आणून जोडली तर तेंहि चालेल. पण हीं इंजिनें उर्फ हत्यारें फार लहान असतात. त्यांचा उपयोग दगड घडणें, फोडणें, टांकी देणें, भोकें पाडणें अशा विशेष ठिकाणींच होतो. दुसऱ्या कोठें यांचा मोठ्या शक्ती-साठीं मुळींच उपयोग होत नाहीं.

जलयंत्र ( हैड्रालिक एंजिन ):—पाण्याच्या जोरानें चाल-णारीं एंजिनें. यांच्यांत दोन प्रकार येतील. एक, एखाद्या दुसऱ्या मोठ्या यंत्राच्या सहाय्यानें फार दाबाचें पाणी उत्पन्न करणें व त्यानें दुसरी लहान लहान यंत्रें चालविणें. दुसरें पाण्याचा दाब, जसें नदीचा प्रवाह किंवा उंचावर बांधलेलें तळें, अशाचा फायदा घेऊन त्यापासून पाण्याच्या चक्क्या वगैरे घालून शक्ति उत्पन्न करणारीं. पहिल्या तऱ्हेचीं यंत्रें किंवा इंजिनें हीं पूर्ण इंजिनें नव्हतच. कारण तीं जरी कांहीं शक्ति उत्पन्न करितात तरी त्यांना दुसऱ्यांवर अवलंबून रहावेंच लागतें. म्हणून तीं यंत्रेंच. याचें सर्वसाधारण उदाहरण म्हणजे गोदींतल्या याऱ्यांना मिळणारें दाबाचें पाणी गोदीच्या एका बाजूला मोठें थोरलें इंजिन आणि पंप लावून तयार करावें लागतें. दुसऱ्या तऱ्हेचीं इंजिनें मात्र खरीं इंजिनें. कारण तीं शक्ति उत्पन्न करितात. ज्याप्रमाणें पाण्याची उंची कमी जास्त असेल त्याप्रमाणें यांचे चार पांच भेद आहेत. त्यांचीं नांवें अधःप्रवाही ( अंडर शाट व्हील), उपरि प्रवाही ( ओव्हरशाट व्हील ), लोहेड वाटर टरबाईन हायहेड वाटर टरबाईन, पेल्टन व्हील इत्यादि.

अधःप्रवाही चक्र ( अंडर शाट व्हील. ):—जेथें पाण्याची उंची म्हणजे पाणी जेथून विशिष्ट जागेवर पडतें त्याच्यामधील उंचीचें अंतर १० ते २५ फूट असेल त्या ठिकाणीं या जातीचीं चक्रें बसवितात. हीं चक्रें खूप मोठीं म्हणजे १०—१२ फूट व्यासाचीं सुद्धां केव्हां केव्हां असतात. या चक्रांच्या धांवेवर धांवेइतके रुंद पाण्याच्या वाटेंत आडवे येतील असे तुकडे बसविलेले असतात. धांवेचा खालचा भाग पाण्यांत थोडासा बुडेल अशा तऱ्हेनें हीं बसविलेलीं असतात. पाणी वहात असतांना त्यांच्याबरोबर चाकाच्या धांवेवर बसविलेल्या तुकड्यांवर जोर येऊन तींहि फिरावयास लागतात. व चाक फिरूं लागतें. असल्या तऱ्हेच्या चाकांचा जुने लोक पुष्कळ उपयोग करीत असत. विलायतेंत बहुधा याच्यावर धान्य दळण्याची चक्की चालत असे. उंची जर पंचवीस फुटांपेक्षां जास्त असेल तर त्या ठिकाणीं उपरिप्रवाही चक्र ( ओव्हरशाट व्हील ) हें बसवीत असत. यासाठीं पाणी बहुतकरून बांधून जरा बाजूला आणावें लागत असे.यांतहि चाकांच्या धांवेवरच पट्टया बसवि-लेल्या असतात;पण त्यांचा आकार कांहींसा निराळा असतो. यांमध्यें चाक पाण्यांत बुडालेलें नसतें. पाण्याचा लोंढा चाकावर वरच्या बाजूनें पडत असतो, व त्याच्या जोरानें चाक फिरतें. पण हीं दोन्हीं फार मोठ्या शक्तीचीं करतां येत नाहींत. व त्या वेळेस मोठ्या शक्तीचीं करण्याची जरूरहि नव्हती. पण पाण्याच्या शक्तीचा वीज उत्पन्न करण्याच्या कामीं उपयोग व्हावयास लागल्या-पासून हीं चाकें मागें पडलीं व दुसरीं पाण्याचा चांगला उप-योग करणारीं पुढें आलीं.

अल्पोच्चताप्रमित चक्र.—जेथें पाण्याची उंची फार नसेल तेथें हें ( लो हेड वाटर टरबाईन ) वापरतात. हें फार साधें असतें. बोटींचा पंखा पुष्कळांनीं पाहिला असेलच. अगदीं जवळ जवळ त्याच आकाराचीं हीं असतात. पाण्याची उंची

थोडी असल्यामुळें यांतून पाणी फार जावें लागतें. यामुळें यांचा आकारहि मोठा करावा लागतो. म्हणूनच यांची गतीहि फार कमी असते हीं अगदीं नवीं निघालेलीं आहेत.

जेथें पाण्याची उंची जास्त असते, उदाहरणार्थ कांहीं शेंकडे फूट असते त्या ठिकाणीं बहूच्चताभ्रमितचक्र ( हाय हेड वाटर टरबाईन ) वापरतात. हीं दोन जातींचीं असतात. एकामध्यें पाणी टरबाईनमध्यें बाहेरून येतें व तें टरबाईनच्या मधल्या भागांतून बाहेर जातें. दुसऱ्यामध्यें पाणी मधल्या भागांतून टरबाईनमध्यें शिरून बाहेरच्या बाजूनें बाहेर जातें. दोन्हींमध्येंहि कांहीं फायदे व कांहीं तोटे आहेतच. यांची रचना कांहींशीं वाफेनें चालणाऱ्या टरबाईनसारखी किंवा अगदीं साधारण प्रचारांतलें उदाहरण म्हणजे भिरभिऱ्यासारखी असते. तत्त्वांत फरक मुळींच नाहीं. फक्त कृतींत मात्र चांगल्या रीतीनें उपयोगी पडेल असा फरक करावा लागतो.

जेथें पाण्याची उंची फारच म्हणजे पांचशें फुटांहून जास्त असेल अशा ठिकाणीं पेल्टन व्हील म्हणजे पेल्टन साहेबानें केलेलें चाक वापरतात. यामध्यें एका चाकाच्या धांवेवर समांतर अशीं अर्ध्या वालदीच्या आकाराचीं भांडीं बसविलेलीं असतात. तीं एका बंद झांकणामध्यें फिरतील अशी व्यवस्था केलेली असते. या भांड्यांवर नळांतून आणलेलें पाणी एक किंवा एकापेक्षां जास्त तोट्यांमधून खूप जोरानें पडतें. याच्या चाकांना वेगहि पुष्कळ असतो. पन्नास अश्वशक्तीपासून पांचहजार किंवा जास्त शक्तीचींहि या जातीचीं चाकें वापरतात. मोठ्या शक्तीघरांमध्यें यांचा पुष्कळ उपयोग केला जातो. पाण्याचीं सर्व इंजिनें वाटोळीं फिरणारीं असतात. वाफेच्या किंवा आईलइंजिनासारखीं मागें पुढें होणारीं नसतात.

सूर्य यंत्रः—सूर्याच्या उष्णतेचा शक्ति उत्पन्न करण्यासाठीं उपयोग करण्याचा पुष्कळ प्रयत्न झाला. पण अजून त्यांत फारसें यश आलें नाहीं. तथापि त्या बाजूनें कांहीं प्रयत्न चालू असून कांहीं इंजिनेंहि चालू झालीं आहेत. सूर्यकिरणांमध्यें पुष्कळ शक्ति भरलेली आहे. नुसत्या हिशोबानेंच पाहिलें तर एकट्या सहाराच्या वाळवंटांत इतकी शक्ति उत्पन्न होईल कीं, ती सर्व जगांतले कारखाने चालविण्यास पुरून उरेल. तथापि ही गोष्ट अजून साध्य झाली नाहीं. तरी पण शूस्टर नांवाच्या अमेरिकन गृहस्थानें ईजिप्तमध्यें नाईल नदीवर एक यंत्र करून बसविलें आहे. त्यानें पाणी पंप करण्याचें काम चालतें.

या यंत्रामध्यें सूर्याच्या उन्हाच्या उष्णतेचा उपयोग तापकामध्यें वाफ उत्पन्न करण्याच्या कामीं केला आहे. उन्हाची उष्णता पाण्याची वाफ करण्याइतकी नाहीं. पण जर उन्हाच्या उष्णतेची दुप्पट किंवा कांहीं जास्तपट करतां आली तर तिनें वाफ उत्पन्न करतां येते. याचाच या यंत्रांत उपयोग केलेला आहे. एक मोठी परवलयाच्या ( पाराबोलाच्या ) आकाराची चौकट केली आहे. त्या चौकटींत पुष्कळसे आरसे बसविण्याची व्यवस्था केली आहे. यामुळें त्यापासून पडणारे उन्हाचे कवडसे एका समांतर रेषेंत येतात. दर कवडशाची उष्णता त्यावर पडणाऱ्या उन्हाच्या उष्णतेइतकीच असते. पण ते समांतर रेषेंत एका ठिकाणीं आले म्हणजे त्या ठिकाणची उष्णता कवडशांच्या संख्येच्या प्रमाणांत वाढते. या चौकटीच्या मध्यभागीं एक तापक पाण्यानें भरून ठेवलेला असतो. त्यावर सर्व कवडसे एकवटून पडल्यानें पाण्याला पुष्कळ उष्णता मिळून त्या पाण्याची वाफ व्हावयास लागते. चांगली वाफ होऊं लागली म्हणजे ह्या वाफेनें इंजिन चालवितात. सूर्य फिरत असल्यामुळें जसजसा सूर्य फिरेल तशी तशी आरशांची चौकट फिरण्याची व्यवस्था केलेली असते. यामुळें ती चौकट सदोदित सूर्यासमोर राहून तापकावर सारखे कवडसे पडलेले रहातात. यामुळें तापकामध्यें वाफ होण्याची क्रिया बंद पडत नाहीं.

या जातीचें यंत्र एकदां बसविलें असतां मागून त्याला फारसा खर्च येत नाहीं. पण तें पहिल्यानें बसविण्यासच फार खर्च म्हणजे त्याच शक्तीच्या दुसऱ्या एंजिनाच्या जवळ जवळ चौपट लागतो. तसेंच हीं इंजिनें ज्या ठिकाणीं ऊन पुष्कळ दिवस व सारखें असेल अशाच ठिकाणीं यांचा उपयोग होऊं शकेल. तसेंच हे इंजिन अजून फारसें पूर्णावस्थेस गेलेलें नाहीं, व याचें तत्त्वहि फारसें कोणाला समजत नाहीं. म्हणून हीं अजून प्रयोगावस्थेच्या फारशीं पुढें गेलीं नाहींत. पण जसजसा कोळसा कमी होत जाईल तसतशीं हीं इंजिनें पुष्कळ पुढें येण्याचा संभव आहे.

आणखी एक शक्ति उत्पन्न करणारें इंजिन म्हणजे पवनचक्की. याचें इंग्रजी नांव विंडमिल असें आहे. पुष्कळांनीं या पाहिल्या असतीलच या जमिनीवरोबर बसवून चालत नाहींत. कारण जमिनीजवळून वारा फारसा वहात नसतो. या जमिनीच्या सपाटीपासून पंचवीस ते पन्नास फुटांपर्यंत बसविलेल्या असतात. या बसविण्यासाठीं एक लोखंडी चौकोनी पोकळ शंकूच्या आकाराची उभी चौकट करावी लागते. या चौकटीच्या वरच्या टोंकावर भिरभिऱ्याच्या आकाराचें एक चाक बसविलेलें असतें. तें चाक वाऱ्याच्या प्रवाहांत रहाण्यासाठीं कोणच्याहि बाजूला फिरावें असें केलेलें असतें. हें चाक वाऱ्याच्या प्रवाहानें फिरत असतें. या फिरण्यापासून दांत्यांच्या चाकानें दुसरा एक दांडा फिरण्याची व्यवस्था केलेली असते. आपल्याला जें कांहीं कार्य करावयाचें असेल तें याच चक्रापासून करून घ्यावयाचें असतें.

हीं इंजिनें फार मोठीं असूं शकत नाहींत. तसेंच यांचें काम वाऱ्याच्या जोरावर असल्यामुळें यांपासून मिळणारी

शक्तीहि अनीश्चितच असते. वाऱ्याचा जोर चांगला असल्यास शक्ति चांगली मिळते. मुळीं वाराच नसल्यास इंजिन थांबतें. शिवाय हीं सधारणपणें ५-६अश्वशक्तीपेक्षां जास्त मोठीं नसतात. हॉलंड देशांत यांचा उपयोग फार करितात.कारण त्या देशांत समुद्राच्या बाजूनें वारा सारखा वहात असतो. त्या ठिकाणीं बहुतकरून यांचा उपयोग पाण्याचे लहान लहान पंप चालविण्यासाठींच फार होतो. आपल्याकडेहि तोच उपयोग करितात. हल्लीं एका अमेरिकन गृहस्थानें त्याच्यापासून विजेचे दिवे लावण्याची युक्ति काढली आहे.

याशिवाय भरती आहोटीच्या पाण्याच्या जोरापासून शक्ति उत्पन्न करणें, समुद्राच्या लाटांच्या जोरापासून शक्ति उत्पन्न करणें वगैरे पुष्कळ प्रयोग चालू आहेत. प्रयोग या नात्यानें यामध्यें बरेंच यशहि येत आहे. पण आजमितीला त्या युक्त्या प्रयोगावस्थेच्या पलीकडे गेल्या नाहींत. म्हणून शक्ति उत्पन्न करणारीं इंजिनें या दृष्टीनें त्यांचा येथें नुसता नामनिर्देश केला आहे. जास्त कांहीं लिहिलें नाहीं.

( ले. दिवाकर यशवंत फाटक. )

**एट्ना.**—एट्ना हा ज्वालामुखी पर्वत सिसिली बेटाच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. १९०० सालीं याची उंची मोजली ती १००५८ फूट भरली; १८६१ त ती १०८०० होती. यानें ४६० चौ. मै. ( जागा ) क्षेत्रफळ व्यापलें आहे. याचा आकार छिन्नशंक्वाकृति असून पश्चिमेकडे एक ३ मैल रुंदीचें खिंडार आहे. याशिवाय आजूबाजूस अनेक शंक्वाकृति टेंकाडें आहेत. याचे वनस्पतींच्या वाढीच्या दृष्टीनें तीन भाग पडतात. सर्वांत खालचा ( ३००० फूट पर्यंत ) अत्यंत सुपीक असून तेथें वस्तीहि बरीच दाट आहे. याच्या वरील भागांत देवदार व बर्चवुड, ओक, चेस्टनट इ० झाडें बरींच आहेत. तिसऱ्या व शेवटल्या कक्षेंत झाडी कमीच आहे. व आल्प्समधील वनस्पतींचा येथें पूर्ण अभाव आहे. येथें प्राणी मुळींच दृष्टीस पडत नाहींत. कारण येथें बरेच दिवस बर्फ असतें. उन्हाळ्यांत किंवा पावसाळ्यांत वर चढणें सोईस्कर असतें. निकोलोसी गांवापासून वर पोंचण्यास ८ तास लागतात. याचा खालीं दिलेल्या सनांत स्फोट झाला होता. ख्रि. पू. १२५, १२१, ४३ ख्रिस्तोत्तर.-१६२९, १८३०-५२-६५-७९-८६-९२-९९ व १९१०.

व्हेसुव्हियसहून एट्ना हा अधिक प्राचीन आहे. या पर्वताच्या पूर्व पायथ्यावर ट्रेझा येथें जे-बॅसॉल्टिक ( हा एक मऊ व लोखंडासारखा काळा दगड असून भूगर्भांतून किंवा ज्वालामुखींतून बाहेर पडणाऱ्या उष्णप्रवाही पदार्थांपासून उत्पन्न होतो. ) दगड सांपडतात त्यांवर प्रस्तरीभूत वनस्पतीसह मातीचा थर दिसतो. एट्नाचे प्रथमचे स्फोट मध्य व उत्तर यूरोपांतील ग्लेशियर कालाहूनहि जुने आहेत. फार प्राचीन कालापासून हा पर्वत म्हणजे एक दंतकथांचा विषयच होऊन बसला आहे.

**एट्रूरिया.**—हा इटलीचा एक प्राचीन प्रांत होय. प्राचीन काळीं या प्रांतांत टैबरपासून तो आल्प्सपर्यंतच्या उत्तर इटलीच्या मुलुखाचा समावेश होत असे. ख्रि. पू. ५ व्या शतकाच्या अखेरीस या प्रांताचा विस्तार बराच कमी करण्यांत आला. ख्रि. पू. १०० व्या वर्षी यांत अॅपेनाइन्सपासून टैबर पर्यंतचाच टापू मोडत असे. ऑगस्टस बादशहाच्या कारकीर्दींत इटलीचे जे सात भाग पाडण्यांत आले त्यांत एट्रूरिया हा सातवा भाग गणला जाऊन त्याच्यामध्यें मॅक्रा नदीपर्यंतचा उत्तरेकडील भाग समाविष्ट झाला.

**इतिहास.**—एट्रूरियाचा विश्वसनीय इतिहास फारच अल्प आहे. इतर राष्ट्रांप्रमाणेंच या राष्ट्राचीहि एकवार सद्दी होती; व ख्रि. पू. ६ व्या शतकापूर्वी एट्रूरियन लोकांनीं स्वाऱ्या करून, उत्तरेकडील मँटुआ, फोलिसना,मेलपम इत्यादि ठिकाणें व दक्षिणेस लॅटियम व कँम्पेनिया हीं ठिकाणें काबीज करून त्यांवर आपली सत्ता प्रस्थापित केली होती. रोमच्या प्राचीन इतिहासांत, एट्रूरियाच्या लोकांनीं महत्त्वाची कामगिरी बजावली होती. रोम शहरांत ज्या तीन महत्त्वाच्या जातींच्या लोकांचें वर्चस्व होतें त्यांत एट्रुस्कन अगर एट्रूरियन लोकांची गणना होते. टार्क्विन राजांच्या अमदानींत एट्रूरियाची चांगली भरभराट झाली होती.

पण टार्क्विन राजांची ज्या वेळीं हकालपट्टी झाली त्या वेळेपासून एट्रूरियाला उतरती कळा लागण्यास प्रारंभ झाला. पूर्ववैभव मिळविण्यासाठीं एट्रूरियानें खटपट केली नाहीं असें नाहीं; पण एट्रूरियाला पूर्वीचा जम पुन्हां बसवितां आला नाहीं. कांहीं कांहीं भागावर विशेषतः टिऱ्हेनियन समुद्रावर यांची सत्ता होती असें दिसतें. पण ख्रि. पू. ४७४ सालीं सिरॅक्यूजच्या हीरो राजानें एट्रुस्कन लोकांच्या आरमाराचा विध्वंस केला; व एट्रुस्कन लोकांची आरमारी सत्ता नष्ट केली. पुढें गॉल लोकांनीं, एट्रूरिया सरकमपदना म्हणजे राव्हेना व हॅड्रिया वगैरे प्रांत बळकावून घेतले. ख्रि. पू. ४२३ मध्यें कॅम्पेनिया हें सॅमनाइट्स लोकांनीं ताब्यांत घेतलें व व्हीइ शहर हें ख्रि. पू. ३९६ मध्यें रोमन लोकांच्या हातीं आलें. व्हॅडीमोनियन सरोवरावरील लढाईनें (ख्रि. पू. ३०९ ) तर एट्रुस्कन लोकांची सत्ता नवळ जवळ नष्ट झाल्यासारखीच झाली. पुढें एकदोन शतकें एट्रुस्कन लोक कसेबसे कांहीं शहरांवर आपला अंमल गाजवीत होते; पण त्यानंतर एट्रूरिया हें रोमचाच एक भाग बनून गेलें.

**लोक.**—एट्रुस्कन लोक एट्रूरियांतील मूळचे रहिवाशी नव्हते. प्रथमतः ते लीडियामधून आले असावेत असें दिसतें. तत्पूर्वी उत्तरेकडून रसेना नांवाच्या जातीच्या लोकांनीं एट्रूरियामध्यें वस्ति केली होती, व नंतर पूर्वेकडून लीडियन लोकहि त्या ठिकाणीं आले असावेत. या दोन्ही

जाती मिळून हल्लींचे एट्रुस्कन लोक झाले असावेत असा विद्वानांचा अभिप्राय आहे.

श ह रें व शा स न सं स्था.–एट्रूरियामध्यें व्हीइ, टार्क्विनी, कॅलेरी, केरे, वोल्सी, वोल्सिना, क्लूशियम, अरेटियम,कोर्टोना, पेरूशिया, वोल्टेरा, रसेले, पॉप्यूलोनियम, व फेशूले इत्यादि शहरें मोडलीं जात होतीं. या शहरांमध्यें दाट वस्ती असावी असें त्या ठापूंत सांपडलेल्या नष्ट वस्तूंवरून दिसून येतें. एट्रूरियाची राज्यव्यवस्था लोकनियुक्त राजाकडे सोंपवली जात असे. पण राजाला देखील त्या प्रदेशांतील सरदार लोकांच्या तंत्रानें व त्या प्रदेशांतील शहरांच्या पुढाऱ्यांच्या तंत्रानेंच राज्यकारभार चालविणें भाग पडे. पुढें तर या राजांची सत्ता नष्ट होऊन प्रत्येक शहराची व्यवस्था पहाण्याचें काम त्या त्या शहराचा जो नगराध्यक्ष त्याच्याकडेच आलें व त्यानंतर, या नगराध्यक्षांच्या ताब्यांतील सत्ता लोकांकडे आली. रोमची शासनपद्धति एट्रूरियाच्या शासनपद्धतीचें अनुकरण करून बनली असावी असें दिसतें. एट्रूरियांतील १२ शहरांचा एक संघ असून त्याची बैठक वोल्टम्नाच्या देवळांत भरली होती असें लिव्हीनें लिहिलें आहे. त्यावरून त्यावेळीं लोकशाहीची कल्पना रूढ असावी असें दिसतें. प्रत्येक शहराची राज्यव्यवस्था निरनिराळी खातीं पाडून चालविली जात असे. एट्रूरियन लोकांचें 'लिब्री डिसिप्लिने एट्रुस्के' या नांवाचें एक कायदेपुस्तक असून त्यांत राज्यकारभारासंबंधींची माहिती विस्तृत रीतीनें पहावयास मिळते.

चा ली री ति.—एट्रुस्कन लोकांच्या चित्रकलेचे जे अवशेष व्हीइ, कॉर्नेटो क्लूशियम इत्यादि ठिकाणीं पहावयास मिळतात, त्यांवरून या लोकांच्या चालीरीतीविषयीं थोडीफार माहिती मिळते. हे लोक फार चैनी असावेत असें दिसून येतें. त्यांचा प्रदेश फार सुपीक असल्यामुळें चैनीला पुरण्याइतका पैसा त्यांना जमीनीच्या उत्पन्नावर मिळत असे. त्यांचीं घरें मोठमोठ्या वाड्याएवढीं असून, तीं नेहमीं शृंगारलेलीं असत. सोन्याचांदीच्या भांड्यांची घरांत समृद्धि असे. ख्यालीखुशालींत हे लोक आपला वेळ घालवीत असत. वेश्यांचा त्यावेळीं फार भरणा असे. रोमन लोकांप्रमाणेंच एट्रुस्कन लोकांचा पोषाख होता. फक्त त्यांचे जोडे मात्र निराळ्या पद्धतीचे होते. जोड्यांचा खालचा भाग लांकडी असून वरचा भाग कातड्याचा असे. शिकार करणें, निरनिराळे मर्दानी खेळ खेळणें,इत्यादि त्यांचे व्यवसाय असत. नृत्यगीतांची त्यांना फार आवड असे.

उ द्यो ग धं दे.—एट्रुस्कन हे जातीचे लढवय्ये लोक असल्यामुळें,त्यांच्यांत व्यापारी वृत्तीचा बराच अभाव होता. देशोदेशीं आपला माल खपविण्यासाठीं हिंडण्याची त्यांना मुळींच संवय नसे. परदेशचे व्यापारीच एट्रूरियामध्यें येऊन तेथील माल खरेदी करीत असत. शेतकी व जंगल यांपासून त्यांना मुबलक धनप्राप्ति होत असे. निरनिराळ्या प्रकारच्या धातूंचीहि या प्रदेशांत पैदास होत असे. सोन्याच्या अगर कथलाच्या खाणी जरी एट्रूरियांत नव्हत्या तरी, एट्रूरियाच्या बाजारांत चोहों दिशेचे व्यापारी जमत असल्यामुळें सोन्याचा व इतर धातूंचा व्यापार या ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर होत असे. धातूंचीं भांडीं तयार करण्याचें काम या ठिकाणीं फारसें होत नसे; इतर देशचे व्यापारीच निरनिराळीं नक्षीदार भांडीं तयार करून एट्रूरियाच्या बाजारांत आणीत असत.

क ला कु स रीं चीं का मेः—एट्रूरियामध्यें कलाकुसरींचीं कामें फारशीं होत नसत. एट्रूरियामध्यें ज्या कुसरीच्या वस्तू आढळल्या त्यांजवरून एट्रूरियन लोकांमध्यें कलाकुसरींचीं कामें होत असत असें समजलें जात असे. पण शोधाअंतीं आतां असें सिद्ध झालें आहे कीं एट्रूरियामध्यें ज्या कलाकुसरींच्या वस्तू सांपडत असत त्या एट्रुस्कन लोकांनीं तयार केलेल्या नसून ग्रीक अगर सिसिलियन लोकांनीं तयार केलेल्या होत्या.एट्रुस्कन लोकांचीं जीं अस्थिपात्रें अगर खडकांमध्यें खोदलेलीं थडगीं उपलब्ध झालीं आहेत तीं पाहिलीं असतां, एट्रुस्कन लोकांचीं घरें कशा प्रकारचीं होतीं त्याची कल्पना करतां येते. या थडग्यांची बांधणी लक्षपूर्वक पाहिली तर तीवरून या लोकांचीं घरें अगदीं साधीं असलीं पाहिजेत असें प्रत्ययास येतें. शिल्पकौशल्य यांत मुळींच आढळून येत नाहीं. देवळांच्याकडे पाहिलें तर ग्रीक लोकांच्या शिल्परचनेची हीं केवळ नक्कल होत असें स्पष्ट दिसतें. नाटकगृहें, अगर सभागृहें देखील शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें शिल्पकौशल्यहीन दिसतात.खोदकाम, सोन्याचांदीचे दागिने तयार करणें इत्यादि. दुय्यम प्रकारच्या कलाकुसरींच्या कामांत मात्र यांनीं थोडीफार प्रगति केली होती. भांडीं तयार करण्याच्या कलेंत देखील त्यांनीं ग्रीक व आयोनियन लोकांचें अनुकरण केलेलें दिसतें. ब्रॉंझ धातूचा उपयोग मोठ्या प्रमाणावर केला जात असे. या धातूंचीं हत्यारें व ढाला केल्या जात असत. या हत्यारांवर व ढालींवर निरनिराळीं चित्रें खोदलीं जात असत. ब्रॉंझ धातू व लांकूड यांवर खोदकाम करण्याचा प्रघात असे. अशा प्रकारें ब्रॉंझ धातू ओतून तयार केलेले अनेक पुतळे एट्रूरियांत सांपडले आहेत व ते एकंदरींत बरे साधलेले आहेत. संगमरवरी दगडाची वाण असल्यामुळें संगमरवरी दगडांचा उपयोग खोदकामासाठीं क्वचितच करण्यांत येई. चित्रकलेच्या बाबतींत मात्र यांनीं बरीच प्रगति केलेली दिसते. टार्क्विनी, व्होल्सी, व्हीइ इत्यादि शहरांतील भिंतींवर जीं चित्रें काढलेलीं आढळतात तीं चित्रकलेच्या दृष्टीनें उच्च

दर्जाचीं आढळतात. या बाबतींत देखील ग्रीक चित्रकलेची छटा दिसून येते.

धर्मः—'चांगलें व वाईट, पाप व पुण्य, या द्वंद्वांचें अस्तित्व या जगांत आहे असें हे लोक मानीत. इष्ट गोष्टी करणारा ज्याप्रमाणें देव, त्याप्रमाणें सैतान नामक अनिष्ट गोष्टी घडवून आणणारी एक शक्ति आहे असा यांचा समज असे. या दुष्ट शक्तीच्या आज्ञेनेंच धरणीकंप, वादळ इत्यादि भयंकर गोष्टी घडून येतात; यांचें निवारण करण्यासाठीं या शक्तीला मनुष्याचा बळी देऊन संतुष्ट केलें पाहिजे अशी यांची समजूत आहे. देवतांचे 'डी कन्सेंटांस' अगर गौण देवता व 'डी इन्व्होल्यूटी' अगर प्रधानदेवता असे दोन वर्ग पाडलेले दिसतात. ज्यूपीटर, जूनो, मिनर्व्हा या देवता गौण होत. ग्रीक देवता अगर मध्य एशियांतील देवता यांनां देखील त्यांनीं आपल्या देवतासंघांत स्थान दिलेलें आढळतें. अशा प्रकारें देवतांचा भरणा या लोकांच्या धर्मांत असल्यामुळें एट्रूरियामध्यें उपाध्यायांचा खर्च बराच मोठा होता; व त्या काळीं एट्रूरियन उपाध्यायांची प्रसिद्धि फार दूरवर पसरलेली होती असें दिसतें.

भाषा.—एट्रुस्कन लोक आपल्या भाषेला रसेना म्हणून म्हणत असत असें डायोनिशियस हलिक यानें म्हटलें आहे. या एट्रुस्कन भाषेचा प्रसार, निरनिराळ्या भागांत झाला होता असें दिसतें. दक्षिणेकडील एट्रुस्कन भाषा व उत्तरेकडील एट्रुस्कन भाषा असे या भाषेचे दोन नमुने आढळून येतात. ख्रि. पू. ३०० ते १५० या काळाच्या दरम्यान इटलीच्या उत्तर भागांत एट्रुस्कन भाषा दोन प्रकारच्या अक्षरपद्धतींत लिहिलेली आढळते. १८८५ मध्यें लेमनॉस बेटांत ग्रीकपूर्व काळांतील थडग्यांतील लेख सांपडला आहे. त्या थडग्याच्या बांधण्याच्या पद्धतीवरून, व त्या थडग्यावरील लेखांतील अक्षरांचें एट्रुस्कन अक्षरांशीं साम्य दिसत असल्यामुळें तो लेख प्राचीन एट्रुस्कन भाषेंत लिहिला आहे असें विद्वानांनीं ठरविलें आहे.

एट्रुस्कन भाषेंतील शिलालेख हल्लीं बरेच उपलब्ध झालेले आहेत. लेप्सियस यानें प्रथमतः एट्रुस्कन भाषेंतील अक्षरें किती आहेत हें ठरविलें. त्या भाषेंत १९ अक्षरें आहेत व त्यांपैकीं कांहीं अक्षरें निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या तऱ्हेनें लिहिलीं जातात असें त्यानें सिद्ध केलें.

अशा रीतीनें एट्रुस्कन भाषेंतील अक्षरें स्थूल रीतीनें निश्चित झाल्यानंतर त्या भाषेंतील व्याकरणाकडे विद्वानांचें लक्ष वेधलें. एट्रुस्कन भाषेशीं साम्य असलेल्या इतर भाषांच्या व्याकरणांच्या आधारें या भाषेंतील वाक्यरचना वगैरे कशी आहे हें ठरविण्याचे प्रयत्न सुरू झाले पण त्यांत फारच थोडें यश आलें; कारण वरील प्रकारची व्याकरण ठरविण्याची दिशा चुकीची होती. याच्या उलट, डीके, पॉली इत्यादि विद्वानांनीं या भाषेंतील शिलालेख व इतर वाङ्मय परस्परांशीं ताडून पाहून तद्द्वारां व्याकरण-निश्चय करण्यास सुरुवात केली व त्याला हळू हळू यश येत चाललें आहे. त्यावरून एट्रुस्कन भाषा ही इंडोयूरोपीय भाषा नाहीं असें सिद्ध झालें आहे.

[संदर्भग्रंथ—डेनीस-सिटीज अँड सिमेट्रीज ऑफ एट्रूरिया; मेरीव्हेल-हिस्टरी ऑफ रोम; ड्राकवरो-हिस्टरी ऑफ रोम].

**एडगर**—(१०५०-११३०) हा एडमंड आयर्न साइड नांवाच्या इंग्लिश राजाचा नातू होय. हा हंगेरीमध्यें जन्मला. हॅरोल्ड राजाच्या मृत्यूनंतर आर्चबिशप अल्ड्रेड व लंडनचे रहिवाशी यांनीं याला राजा करावयाचें ठरविलें. पण वुइल्यम दि कॉंकरर हा चाल करून येत आहे हें वर्तमान कळतांच एडगरनेंच राजा होण्याचें नाकबूल केलें. १०६८ मध्यें उत्तरेस जें विल्यमविरुद्ध बंड झालें त्यांत एडगरचा थोडासा भाग होता. हें उत्तरेकडील बंड अयशस्वी झाल्यामुळें एडगर हा स्कॉटलंडांत दडून राहिला. पुढें दुसऱ्याच वर्षीं पुन्हां जें बंड उद्भवलें त्यांत देखील यानें भाग घेतला होता. पण मागील बंडासारखीच याहि बंडाची स्थिति झाली. १०७४ मध्यें त्यानें विल्यमशीं नॉर्मंडी येथें तह केला. पहिला हेनरी व नॉर्मंडीचा रॉबर्ट यांच्यामध्यें जो झगडा चालला होता त्यांत एडगरनें रॉबर्टचा पक्ष घेतला. ११०६ मध्यें टिंचेब्राइ येथें जी लढाई झाली तींत एडगर हा पकडला गेला. पण पुढें त्याची लगेच सुटका झाली. तो ११३० मध्यें मरण पावला.

**एडन**—अरबस्तानांतील येमेन प्रांताच्या दक्षिण किनाऱ्यावरील एक तटबंदीचें शहर. हें मुंबई सरकारच्या अधिकारांत होतें. तें हल्लीं साम्राज्यसरकारच्या ताब्यांत गेलें आहे. हें उत्तर अक्षांश १२°४७' व पूर्व रेखांश ४५°१०' मध्यें आहे. एडन एका स्फोट झालेल्या ज्वालामुखी पर्वताच्या मुखांत वसलेलें आहे. सभोंवतालचे डोंगर समुद्रसपाटीपासून १७७५ फूट उंचीचे आहेत. एडनचें बंदर जेबल शमशम व जेबल इशान या दोन सामुद्रधुन्यांच्या मध्यें आहे. त्याची लांबी ८ मैल असून रुंदी ४ मैल आहे. पेनिन्शुलर व ओरिएन्टल नॅव्हिगेशन कंपनीच्या बोटी दर आठवड्यास या बंदरांत येऊन डाक व उतारू यांची ने आण करतात. येथें दीपगृहें बरींच आहेत. त्यांतील मुख्य रास मारशागचें "एडन केप लाइट" नांवाचें दीपगृह समुद्रांतून २० मैलांवरून दिसतें.

उष्णतेचें साधारण मान घरामध्यें ८७° असतें. यूरोपियन लोकांमध्यें मृत्यूचें प्रमाण हजारीं ७.२४ असतें. म्हणजे सैन्याच्या ठाण्याला हें चांगलें निरोगी ठिकाण आहे. तरी फार दिवस येथें राहिल्यानें यूरोपिय तसेंच हिंदू लोकांच्या

प्रकृतीवर अनिष्ट परिणाम घडतात असा अनुभव आहे. पावसाचें मान. २५ इंचांपासून ४.५ इंचापर्यंत आहे.

नामशेष झालेल्या हेमेराइट राजांच्या वेळीं एडन हें येमेनचा एक भाग होतें. त्या वेळीं येथून मोठा व्यापार चालत असे. याच्या स्थलमहात्म्यासुळें रोमन साम्राज्य व पूर्वेकडील देश यांच्यामधील व्यापाराचें हें मुख्य केंद्र होतें. इ. स. ५२५ च्या सुमारास हें अबिसिनियन लोकांच्या हातांत गेलें. नंतर मुसुलमानीं सत्ता जोरांत आल्यावर हें पुष्कळ खलिफांच्या हातांत जाऊन इ. स. ९३२ मध्यें येमेनच्या इमामांच्या स्वाधीन झालें. मुसुलमानी सत्तेच्या पहिल्या कांहीं शतकांत येथें व्यापाराची फार भरभराट होती. कारण एडनचा त्या वेळेस हिंदुस्थान, चीन, ईजिप्त या देशांशीं व्यापार चालत होता. इ. स १५१३ पर्यंत याच्या पालकीबद्दल पुष्कळ लढाया होऊन हें कधीं एकाकडे तर कधीं दुसऱ्याकडे जात होतें. इ. स. १५१३ मध्यें पोर्तुगीज लोकांनीं अलबुककेच्या नेतृत्वाखालीं या बेटावर हल्ला चढवला. पण पुष्कळ नुकसान होऊनहि हें बेट त्यांच्या हातीं लागलें नाहीं. इ. स. १५३८ मध्यें तें तुर्क लोकांच्या ताब्यांत गेलें. इ. स. १६३० मध्यें तुर्क लोकांनां येमेनप्रांत सोडून द्यावा लागला व एडन तेथील इमामांच्या हातीं लागलें. डच कंपनी, पोर्तुगीज कंपनी, ईस्टइंडिया कंपनी यांनीं येथें आपला शिरकाव करून घेण्याचा या वेळीं पुष्कळ प्रयत्न केला; पण कोणाचीच डाळ शिजली नाहीं. सरतेशेवटीं इ. स. १८३९ मध्यें तेथील राजानें कांहीं इंग्लिश लोकांची कत्तल व लूट केल्या कारणानें इंग्लिश कंपनीनें सैन्य पाठवून एडन आपल्याकडे घेतलें. तेथील राजा अबदल्ली याला पेन्शन देण्यांत आलें. इ. स. १८७२ पर्यंत याच्या मालकीबद्दल मारामाऱ्या चालूच होत्या. पेरिम, सोकोत्रा व कुरिया मुरिया हीं बेटें एडनच्या अमलाखालीं आहेत. एडन द्वीपकल्प व पेरिम मिळून इ. स १९०१ मध्यें लोकसंख्या ४३९७४ होती. तींपैकीं अरब लोकांची संख्या १९४६८ असून शेख लोकांची संख्या ३१८० होती.

एडन बंदर पूर्वी व्यापारी दृष्टीनें फार महत्त्वाचें होतें. पण केप ऑफ गुडहोप सुरू झाल्यावर याचें महत्त्व थोडें कमी झालें होतें. पण सुएझ मार्ग सुरू झाल्यामुळें पुन्हां वाढलें. यूरोपांतून येणारीं जाणारीं सर्व जहाजें येथें थांबतात. हें शस्त्रास्त्रांनीं सज्ज व अभेद्य आहे. व लष्करीदृष्ट्या महत्त्वाचें आहे.

अ र बां च्या मु ख्य जा ती:—(१) अबदली हे चांगले सुधारलेले आहेत; पण हे लढण्याच्या कामीं अगदींच बेताचे आहेत. (२) फदली हे मानी, लढवय्ये व स्वतंत्र बाण्याचे आहेत. (३) अकाबि हे लोक फार धारिष्टवान आहेत. म्हणून इंग्लिशांनीं या लोकांनां तनखा देऊन आपलेसे करून ठेवले आहेत. येथील मुख्य प्रचलित भाषा अरबी आहे. तरी पण आशियाखंडांतील बहुतेक भाषा येथें चालतात. तसेंच इंग्लिश बोलणारे लोकहि पुष्कळ आहेत. एडनला धान्याचा पुरवठा सगळा बाहेरच्या देशांतून होतो. कारण येथें एक गवताची काडीसुद्धां उगवत नाहीं. हिंदुस्थानांतून तांदूळ जातो. येथील राहणी फार खर्चाची आहे.

सैन्याला व इतर लोकांनां चांगल्या निरोगी पाण्याचा पुरवठा कसा करावयाचा हा मोठा बिकट प्रश्न इंग्लिशांच्या पुढें होता. येथील विहिरींनां समुद्रसपाटीच्या खालीं ७०-९० फुटांवर पाणी लागतें. दुसरे मार्ग डोंगरांतून पाट बांधून आणणें, पूर्वीचीं तळीं वगैरे सुधारणें, समुद्राच्या पाण्यापासून वाफ करून ती थंड करून शुद्ध पाणी तयार करणें. इ. या सर्वांतलि शेवटला मार्गच पसंत पडला आहे व पाणी तयार करण्याचे ६ कारखाने चालू आहेत. १०० गॅलन पाण्याला १॥ रु. आकार पडतो.

हिंदुस्थानांतले लोक यूरोपकडे जातांना वाटेंत एडन पाहण्याकरितां बहुधा उतरतात. बंदरावरील पारशी, हिंदु, मुसुलमान कोणीहि गृहस्थ येणाऱ्या कोणाहि हिंदी इसमास पाहून आनंद पावतो व त्याशीं बंधुभावानें वागतो. बंदरापासून एडन गांव बराच लांब आहे. गांवांत जाण्यास भाड्याच्या गाड्या मिळतात. त्या चार चाकी असून एकच घोड्याच्या असतात व त्यांत चार माणसें बसतात. गाड्यांचीं तट्टें ठेंगणीं पण मजबूत असतात. माल वाहणाऱ्या गाड्या उंटांच्या असतात. गांव वृक्षहीन वाळवंटांत वसलेला आहे. डोंगरांतील किल्ल्यास उत्तम तटबंदी आहे. येथें गोरें लष्कर ठेवलेलें असतें. गांवांतील घरें महाराष्ट्रांतील धाबी घरांप्रमाणें आहेत. गांवांत स्वच्छता बरी आहे. मुख्य वस्ती अरब व शिद्दी यांची आहे. गाढवावर बसून जाणारे लोक पुष्कळ आढळतात. गाढवावर घोड्याप्रमाणें खोगिरें घालतात. बायका काळा बुरखा घेतात. येथें कोणत्याहि प्रकारचा माल तयार होत नाहीं. सर्व माल बाहेरून येतो. येथील मुख्य मेवा म्हणजे ओला खजूर; तो फार उत्तम असतो. येथें बर्फ बनविण्याचे कारखाने मात्र आहेत. त्यामुळें बर्फ चांगला मिळतो. जाणाऱ्या येणाऱ्या सर्व बोटी येथें कोळसा घेण्याकरितां थांबतात.

एडनची १९१५ सालीं ३६,९०० इतकी लोकवस्ती असून एडन व तेथील वसाहती या सर्वांची मिळून ४६००० लोकसंख्या होती. त्यापैकीं २३००० अरब लोक होते. त्याच्या खालोखाल सोमाली लोकांची वस्ती होती. यूरोपियन आणि ख्रिश्चन मिळून २००० ते ३००० लोक होते. मुसुलमानांची व ज्यू लोकांचीं अनुक्रमें ३४००० व ३७०० इतकी संख्या होती.

१९२१ च्या मार्चपासून एडनच्या कारभाराची व्यवस्था इंडिया ऑफिसच्या ताब्यांतून काढण्यांत आली व ती कलोनियल ऑफिसकडे सोपविण्यांत आली आहे. सन १९१४-१५ मध्यें एडनचें उत्पन्न साडेसत्यायशी लाख रुपये इतकें होतें; व त्यावर्षीचा खर्च ८२ लाखांपर्यंत होता. १९१९-२० सालामध्यें एडन येथील आयात निर्गत

१३६४१००० पौंडांची झाली. त्यांत ७१२४००० पौंडांची निर्गत असून ६५१७००० पौंडांच्या किंमतीची आयात होती. एडन हें निरनिराळ्या राष्ट्रांचें व्यापारी केंद्र आहे. १९१९–२० सालांत एडनमध्यें, ताग, कापसाचे गठ्ठे, कातडीं, कोळसा, धान्य, कॉफी, साखर वगैरे पदार्थांची आयात झाली व एडनमधून, तंबाखू, मीठ, कापसाचे गठ्ठे वगैरे माल बाहेर गेला. एडन बंदरांत मादक द्रव्यें, अफू इत्यादि पदार्थांशिवाय, इतर पदार्थांवर कोणत्याहि प्रकारचा कर नाहीं. पेट्रोलियम, हत्यारें व दारूगोळा मात्र एडनमध्यें आणण्याला परवाना लागतो.

एडन येथें पाण्याचा पुरवठा पूर्वीपासूनच विशेष समाधानकारक नाहीं. समुद्राच्या पाण्यापासून पाण्याचा पुरवठा मुख्यतः करण्यांत येतो. एडनमध्यें धान्याची विशेष उत्पत्ति नाहीं. मीठ, कॉफी व सिगारेट तयार करणें एवढेच काय ते मुख्य धंदे आहेत. एडनमधील व्यापारी रस्ते मुख्यतः तीन चारच आहेत; ( १ ) लाहेज ते सांनापर्यंत; ( २ ) टैझपासून मोचा व होडीजपर्यंत; व ( ३ ) निलब ते मकल्लापर्यंत.

महायुद्धामध्यें एडन येथील मुसुलमानी जातीला चिथावण्याचा तुर्कस्ताननें प्रयत्न केला. १९१५मध्यें तुर्की सैन्यानें लाहेजवर चाल केली. ब्रिटिशांनीं तेथील लोकांनां मदत करण्यासाठीं सैन्य पाठविलें. पण ब्रिटिशांचा पराजय होऊन ब्रिटिश सैन्य एडनला परत आलें. पण पुन्हां ब्रिटिश सैन्यानें अधिक सैन्यानिशीं तुर्कांना, शेक ऑथमन येथें तोंड देऊन त्यांचा पराजय केला. सन १९१७ मध्यें एडनच्या संरक्षणासाठीं एडनच्या भोंवतीं सैन्य ठेवण्यांत आलें व तेव्हांपासून लढाई थांबेपर्यंत, शत्रूंचा कांहींही त्रास एडनला झाला नाहीं.

**एडन कालवा**—बंगालमधील बरद्वान व हुगळी या जिल्ह्यांमध्यें असलेला पाणी देण्याचा कालवा. प्रांतांच्या ले. गव्हर्नरवरून हें नांव पडलें. ह्या कालव्यांत दामोदर नदीचें पाणी खेळविलें आहे. ह्या कालव्याच्या बांधणीस सुरवात १८७३ मध्यें झाली; व १८८१ मध्यें हा कामास आला. हा बांधण्यास अंदाजे ७.८ लाख रुपये खर्च आला.

**एडप्पल्ली**—मद्रासमधील त्रावणकोर संस्थानांत असणाऱ्या कुन्ननाड तालुक्यांतील छोट्या संस्थानांपैकीं सर्वांत मोठें संस्थान. क्षेत्रफळ साडेसहा चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १३३४८. हें नम्बुद्री ब्राह्मणाच्या ताब्यांत असून त्याला एडप्पल्ली राजा म्हणतात

**एन्डर**—एन्डर हें पॅलेस्टाईनमधील एक प्राचीन शहर होतें. ह्या ठिकाणीं रहात असलेल्या एका चेटकीचा सल्ला सॉलनें गिलबोआच्या युद्धाच्या पूर्वदिवशीं घेतला. सांप्रत येथें एन्डर नांवाचें लहान खेडें बेबल डाहीच्या उतरणीवर आहे.

**एडवर्ड(१)**—'एडवर्ड दि कनफेसर'. हा दुसऱ्या एथलरेडचा मुलगा होता. याची आई एम्मा ही नॉर्मंडीचा ड्यूक जो रिचर्ड त्याची मुलगी होती. १०१३ सालीं स्वेन हा जेव्हां इंग्लंडचा राजा झाला, तेव्हां एथलरेड हा आपल्या बायकांमुलांसह नॉर्मंडी येथें पळून गेला. १०४१ सालीं हार्डी कॅन्यूट यानें त्याला बोलावल्यामुळें तो इंग्लंडला परत आला. त्यानें आपल्या पश्चात एडवर्डला राज्याचा वारस ठरविलें. पुढें १०४२ सालीं हार्डी कॅन्यूट याच्या मरणानंतर तो राजा झाला. १०४३ त त्याला राज्याभिषेक करण्यांत आला.

एडवर्ड हा अर्धा इंग्लिश व अर्धा नॉर्मन असल्याकारणानें त्याचें लक्ष नॉर्मन लोकांकडे बरेंच असे. त्यानें आपल्या दरबारीं बऱ्याच नॉर्मन लोकांनां जागा दिल्या होत्या. जुमांजिझ गांवचा रॉबर्ट या नॉर्मन जोग्याला त्यानें लंडडचा धर्मगुरु नेमिलें. राजाच्या मर्जीतल्या या सर्व नॉर्मनांनां दाबांत ठेवणारा असा वेसेक्सचा अर्ल गॉडविन हा एकटाच पुरुष होता. त्याची कन्या एडिथ हिच्याशीं एडवर्डनें विवाह केला होता. गॉडविनचा त्या वेळीं सर्व देशावर अंमल चालत असे; पण एडवर्डच्या मर्जीतील नॉर्मन लोकांनां हें मुळींच आवडत नसे. याच सुमारास एडवर्डचा मेहुणा बूलोनचा यूस्टिस याचा डोव्हर येथील लोकांशीं तंटा झाल्यामुळें डोव्हरच्या लोकांनां शासन करण्याचें काम एडवर्डनें गॉडविन याला सांगितलें; पण गॉडविननें तें नाकारिलें. तेव्हां गॉडविन याच्यावर भलतेसलते आरोप ठेवून एडवर्डनें गॉडविन यास अपराधी ठरविलें. तेव्हां गॉडविन हा फ्लँडर्स येथें पळून गेला; पण लगेच पुढील सालीं तो परत आला. विटेन ( बुधजन ) मंडळानें त्याला त्याची पूर्वीची जागा देऊं केली; पण गॉडविननें या जागेचा एक वर्ष उपभोग घेतला नाहीं तोंच तो आकस्मात मरण पावला. त्याच्यामागें त्याचा दुसरा मुलगा हॅरोल्ड याला गॉडविनची जागा मिळाली. त्यानें नॉर्थंबर्लंड व वेल्स या प्रांतांत जे बखेडे झाले होते ते सर्व मिटविले. हॅरोल्डच्या अमलाखालीं लोक फार संतुष्ट होते. एडवर्डनें वेस्टमिनिस्टर येथें एक मठ बांधविण्यास सुरवात केली होती; पण तो पुरा झालेला पहाण्याचें त्याच्या नशीबीं नव्हतें. तो १०६६ च्या जानेवारींत ५ व्या तारखेस मरण पावला.

एडवर्ड हा साधुवृत्तीचा माणूस होता. राजाच्या अंगीं जे गुण असावे लागतात, त्या. सर्व गुणांचा त्याच्या ठायीं अभाव होता. त्याच्या स्वभावामध्यें एक प्रकाराचा लोकांनां भारून टाकण्याचा गुण होता.

[ संदर्भ ग्रंथ—डॉ. लॉर्ड यांनीं संपादित केलेलें. 'लाईफ ऑफ एडवर्ड दि कनफेसर. ( लंडन १८५८ ) ]

( २ ) ( पहिला ) (१२३९–१३०७).—इंग्लंडचा राजा एडवर्ड हा तिसऱ्या हेनरीचा ज्येष्ठ मुलगा होय. स्पेनचा राजा आलफान्सो याच्याबरोबर हेनरीनें जो तह केला, त्या

तहांत स्पेनच्या राजाची सावत्र बहीण एलेनॉर इच्याशीं एडवर्डचें लग्न व्हावें असें एक कलम होतें. अर्थातच स्पेनच्या राजाच्या बहिणीशीं लग्न करून घ्यावयाचें म्हणजे एडवर्डला देखील त्या मानाप्रमाणें खर्च चालवितां यावा इतका वडा तनखा मिळणें जरूर होतें. तेव्हां त्यासाठीं हेनरीनें त्याला गास्कनीची डची, चेस्टरचें अर्लडम, वेल्समधील सरकारी जमिनी व इतर वरीच जहागीर दिली. १२५४ त एडवर्डनें ही सर्व जहागीर आपल्या ताब्यांत घेतली. नंतर त्याच वर्षाच्या आक्टोबर महिन्यामध्यें तो स्पेनमध्यें गेला असतां आल्फान्सो यानें त्याला सरदारीचा किताव दिला व एलेनॉरशीं त्याचें लग्न लावून दिलें. तो परत गास्कनी येथें आल्यावर त्यानें वेल्सच्या आपल्या जहागिरींत सुव्यवस्था लावण्याची खटपट चालविली. इंग्लिश कायद्यांचा अंमल त्या ठिकाणीं करण्यास त्यानें सुरवात केली; पण वेल्समधील लोक चालू असलेले वेल्स कायदे नाहींसे करून इंग्रजी कायदे चालू करण्याच्या विरुद्ध होते त्यामुळें वेल्स लोकांचा एडवर्डवर फार राग झाला. शिवाय लहानपणीं तो गर्विष्ठ व उद्दाम असल्यानें तो लोकांनां अप्रिय झाला होता. १२५८ त 'ऑक्सफोर्डच्या कराराला' (प्रोव्हीजन्स ऑफ ऑक्सफोर्डला) त्यानें विरोध केल्यामुळें तो अधिकच अप्रिय झाला; पण पुढें त्यानें आपलें धोरण बदललें. १२५९ त त्यानें राज्यव्यवस्थेंत सुधारणा करूं पहाणाऱ्या सरदार लोकांशीं संगनमत करून त्यांनां आपला जोराचा पाठिंबा दिला. १२६३ त जो राजपक्ष स्थापन झाला होता, त्यांत याचें प्रामुख्यानें अंग होतें. १२६४ त राजा व बॅरन यांमध्यें जें युद्ध झालें त्यांत त्यानें महत्त्वाचा भाग घेतला. या लढाईंत राजाच्या वतीनें त्यानें चांगला पराक्रम गाजविला; पण लंडनच्या लोकांचा बेसुमार पाठलाग त्यानें केल्यामुळें राजपक्षीयांचा पराजय झाला व एडवर्डला लीस्टरला शरण जावें लागलें. हिअरफोर्ड येथें लीस्टरनें एडवर्डला कैदेंत ठेवलें होतें; पण १२६५ त त्यानें इरप्रयत्नानें सुटका करून घेतली. त्याच्या कैदेंतून निसटल्यानंतर लगेच त्यानें आपले जुने मित्र गोळा केले व त्यांच्या साहाय्यानें त्यानें लीस्टरवर स्वारी केली व लीस्टरला ईव्हशॅमच्या लढाईंत ठार मारलें.

सन १२७० त एडवर्ड हा 'धर्मयुद्धा'ला गेला. तो तिकडे असतांना इकडे हेनरी वारला. तेव्हां त्याच्या पाठीमागें एडवर्ड हा राजा झाला म्हणून लोकांस जाहीर करण्यांत आलें व तो धर्मयुद्धाहून परत येईपावेतों 'रॉयल कौन्सिल' अगर राजकीय मंडळानें त्याच्या नांवानें राज्यकारभार चालविला. एडवर्ड परत आल्यावर त्याला १२७४ त ऑगस्टच्या १९ व्या तारखेस राज्याभिषेक केला. या वेळीं तो वयानें ३५ वर्षांचा असून बांध्यानें उंच व बळकट होता. त्याचे केस काळे भोर असून डोळे सौम्य होते. तो आचरणानें अत्यंत शुद्ध होता. आपल्या मित्रमंडळींनां तो अतिशय प्रिय असे. आईबापांवर त्याची अत्यंत भक्ति होती. खेळांचा त्याला विशेषतः शिकारीसारख्या मर्दानी खेळांचा अतिशय नाद असे. तो लहानपणीं जरी थोडा कोपिष्ट होता तरी पुढें त्यानें आपला दोष नाहींसा करून टाकला. आपल्या नोकरचाकरांनां तो केव्हांहि कडक तऱ्हेनें वागवीत नसे. आपल्या बापाच्या चुका त्यानें पाहिल्या होत्या. यास्तव आपल्या लोकांचें प्रेम जोडावें आणि त्यांनां चांगले कायदे करून द्यावे अशी त्याची फार इच्छा होती. आपलें राज्यकारभाराचें धोरण लोकांनां पसंत पडेल अशा तऱ्हेनें तो आंखीत असे.

राज्यारूढ होतांच त्यानें तत्कालीन राज्यशासनपद्धतींत सुधारणा करून ती जेणेंकरून चांगल्या प्रकारची व जोमदार होईल अशी करण्याच्या प्रयत्नास सुरुवात केली. या कामांत त्याला रावर्ट बर्नेल, वेल्स व बाथचा धर्मगुरु यांचें उत्कृष्ट साहाय्य झालें. त्या वेळीं प्रचलित असलेल्या कायद्यांमध्यें त्यानें सुधारणा करण्याचा उपक्रम सुरु केला. प्रत्येक वर्षी तो कोणताना कोणता तरी नवा कायदा करीत असे. सरंजामी सरदारांचें ('फ्यूडेलिझम' चें) वजन राजकारणांतून नाहींसें करण्याकडे त्याचें लक्ष्य होतें. जे मतदार लेखी जामीन लिहून देणार नाहींत त्यांचा मत देण्याचा अधिकार काढून घ्यावयाचें त्यानें ठरविलें; पण ही त्याची योजना सरसहा अमलांत आणतां आली नाहीं. तो जरी पुराणमताभिमानी होता तरी स्वतः न केलेले कायदे पाळण्याची त्याची तत्परता नसल्यामुळें पेकहॅम वगैरे धर्मगुरूंशीं त्याला झगडावें लागलें. मॉर्टमेनच्या स्टॅटयूटनें त्यानें राजाच्या परवानगीशिवाय धर्ममंडळांनां जमीन दान देण्याची मनाई केली. तसेंच, 'सर्कमस्पेक्टेॲगेंटिस' च्या हुकुमानें धार्मिक कृत्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि कार्याकरितां चर्चची जागा वापरण्यांत येऊं नये असें त्यानें ठरविलें. या दोन्ही कायद्यांच्या बाबतींत धर्मगुरूंनीं त्याला बराच विरोध केला. पण तडजोड करून त्यानें कसाबसा हा विरोध दूर केला. जमीनींच्या संबंधींचे कायदे त्यानें फार काळजीपूर्वक सुधारले. न्यायदानाच्या पद्धतींतहि त्यानें इष्ट त्या सुधारणा घडवून आणिल्या.

याशिवाय त्याच्या कारकीर्दींतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यानें वेल्सदेश जिंकला ही होय. वेल्सचा राजपुत्र लुएलिन हा एडवर्डचा मांडलीक असतांना त्यानें एडवर्डची सत्ता झुगारून देण्याचा प्रयत्न चालविला होता. पुष्कळ दिवस एडवर्डनें तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. पण लुएलिन हा कांहींच ऐकत नाहीं असें पाहातांच त्याच्यावर त्यानें १०७७ मध्यें स्वारी केली व लुएलिनचा त्यानें पराभव करून त्याला शरण येण्यास भाग पाडिलें. एडवर्डनें त्याचा मांडलिकीचा अधिकार काढून आपला अंकित संस्थानिक या दर्जाला त्याला आणून बसविलें. पुढें वेल्स देशांत ज्यावेळीं त्यानें इंग्रजी कायदे चालू केले त्यावेळीं वेल्स लोकांचीं मनें असंतुष्ट झालीं. ही संधि

साधून लुएलिननें पुन्हां बंड केलें. पण एडवर्डनें त्याचा पुन्हां चांगला पराभव केला. लुएलिन हा या लढाईत ठार मारला गेला. एडवर्डनें वेल्स देश इंग्लंडच्या राज्याला जोडला.

परराष्ट्रीय धोरण आंखण्याच्या बाबतींत एडवर्ड हा फार काळजी घेत असे. फ्रान्सचा राजा तिसरा फिलिफ यार्शी त्याचें अंतस्थ नीट नव्हतें तरी तो वरकरणी त्याच्याशीं सरळ रीतीनें वागतो असें दाखवीत असे. पुढें १२८५ सालीं फिलिप वारल्यानंतर फिलिप दि फेअर फ्रान्सच्या गादीवर बसला. त्यावेळीं तो फ्रान्सला गेला व त्यानें फिलिपचें अभिनंदन केलें. याच सुमारास दोनतीन वर्षें तो गास्कनीमध्यें सुधारणा करण्याच्या बाबतींत गर्क झाला होता. त्यामुळें त्याच्या गैरहजरींत इंग्लंडमध्यें बरीच अंदाधुंदी माजली. पुढें १२८९ सालीं तो इंग्लंडमध्यें परत आला व त्यानें ती अंदाधुंदी मोडून टाकली. १२९० सालीं त्यानें सर्व यहुदी लोकांनां इंग्लंड सोडून जाण्याच्या हुकूम केला.

यानंतर त्याचें लक्ष्य स्कॉटलंडकडे वेधलें. १२८६ सालीं स्कॉटलंडचा तिसरा ॲलेक्झांडर राजा मरण पावला तेव्हां त्याच्या गादीला वारस त्याची नात मार्गारेट ही होती. हिचें व आपला ज्येष्ठ पुत्र एडवर्ड यांचें लग्न झाल्यास इंग्लंड व स्कॉटलंड यांची एकी होईल या हेतूनें एडवर्डनें आपल्या मुलाचा विवाह तिच्याशीं करावयाचें ठरविलें होतें; पण ती एकाएकीं वारल्यामुळें स्कॉटलंडच्या गादीवर कोणी राजा अगर राणी राहली नाहीं तेव्हां त्या गादीवर आपला हक्क सांगण्याकरतां तद्देशीय पांच वडे गृहस्थ पुढें आले. यांपैकीं कोणाला राज्यपद द्यावें हें ठरविण्याचें काम स्कॉच मंत्रिमंडळानें एडवर्डकडे सोंपविलें. एडवर्डनें या मंत्रिमंडळाकडून 'मी स्कॉटलंडचा फ्यूडल लॉर्ड आहे' असें कबूल करून घेतल्यानंतर या पांच वारसदारांची नीट चौकशी करून, जॉन बेलियल यास स्कॉटलंडचा राजा म्हणून पसंत केलें. त्याप्रमाणें बेलियल हा स्कॉटलंडचा राजा झाला व त्यानें एडवर्ड हा आपला अधिराज आहे असें कबूल करून त्याला प्रणाम केला; पण हें करणें स्कॉट लोकांनां पसंत पडलें नाहीं. त्यांनीं एडवर्डला स्कॉटलंडचा अधिराज म्हणण्याचें नाकारलें; व बेलियलची सत्ता झुगारून दिली; व व फ्रान्सशीं गुप्त तह केला. गास्कनीसंबंधानें फ्रान्स व इंग्लंडचें याच वेळीं वाकडें आलें. वेल्स लोकांनींहि या वेळीं बंड उभारलें. अशा रीतीनें एडवर्डवर एकापाठीमागून एक अशीं संकटें आलीं. या संकटांचें निवारण करण्यासाठीं त्यानें इंग्लंडमधील सरदार लोकांची व इतर लोकांची मिळून एक सभा बोलावली व पुढें कोणतें धोरण स्वीकारावें यासंबंधींची त्यानें खुल्या दिलानें त्यांच्याशीं चर्चा केली. त्यांच्या संमतीनें त्यानें वेल्सवर स्वारी करून वेल्स देश पादाक्रांत केला व १२९६ मध्यें स्कॉटलंड जिंकून घेतलें. जिकडे तिकडे शांतता प्रस्थापित झाल्यानंतर गास्कनीची कायमची व्यवस्था लावण्याचें त्यानें मनांत आणिलें. पण याच सुमारास कांहीं भानगड उपस्थित होऊन धर्मगुरूंनीं कर देण्याचें नाकारलें. सरदार लोकांनीं गॉस्कनीवरील स्वारींत मदत करण्याचें नाकारलें. त्यामुळें त्यांच्या मदतीशिवायच एडवर्डला फ्रेंचावर स्वारी करणें भाग पडलें. त्याच्या गैरहजीरींत राज्याची व्यवस्था पहाणाऱ्या अधिकारी मंडळावर सरदार लोकांनीं दाब पाडून जुलमी करांपासून संरक्षण करणारे कायदे पास करून घेतले. एडवर्डला या कायद्यांना नाखुषीनें कां होईना मान्यता देणें भाग पडलें. एवढ्यावरच एडवर्डवरील संकट थांबलें नाहीं. १२९७ मध्यें विल्यम वॉलिसच्या आधिपत्याखालीं स्कॉच लोकांनीं बंडाचें निशाण उभारलें. तेव्हां एडवर्डला त्यांच्याविरुद्ध शस्त्र उगारावें लागलें. १२९९ मध्यें फालकर्क येथें तुंबळ युद्ध होऊन एडवर्डनें स्कॉच लोकांचा पुरा पराभव केला. एकाच वेळीं स्कॉटलंड व फ्रान्स या दोन्ही शत्रूंशीं युद्ध चालू ठेवणें शक्य नाहीं असें एडवर्डला आढळून आल्यामुळें त्यानें फ्रान्सशीं तह केला, व फ्रेंच राजाच्या बहिणीशीं-मार्गारेटशीं-त्यानें लग्न केलें. नंतर १३०३ सालीं एडवर्डनें स्कॉटलंड पूर्णपणें कबजांत आणण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें १३०५ सालीं स्कॉच लोकांनां त्यानें जेरीस आणलें व त्यांचा पुढारी वॉलेस याचा शिरच्छेद केला. पण याच सुमारास बेलियलचा प्रतिस्पर्धी ब्रूस यानें आपल्याला स्कॉटलंडचा राजा म्हणवून घेतलें व एडवर्डविरुद्ध त्यानें बंड पुकारलें. त्यामुळें वृद्धावस्थेंत असून सुद्धां या बंडाचा बीमोड करण्याचें एडवर्डनें ठरविलें. त्यानें जातीनें युद्धावर जावयाचें ठरविलें; पण स्कॉटलंड त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत आलें असतां बर्घ ऑन सँड्स या गांवीं तो मृत्यु पावला. त्याच्या मृत्यूमुळें स्कॉटलंड जिंकण्याचें त्याचें काम अर्धवट राहिलें. तरी पण वेल्स जिंकणें, निरनिराळे कायदे अंमलांत आणणें, इत्यादि बाबतींत त्यानें केलेली कामगिरी चिरस्थायी अशी होती.

एलेनारपासून एडवर्डला चार मुलगे व नऊ मुली झाल्या. चार मुलांपैकीं कनिष्ठ पुत्र तेवढाच जिवंत राहिला. मार्गारेटपासून त्याला दोन पुत्र झाले.

[ संदर्भग्रंथ—टाउट-एडवर्ड दि फर्स्ट ( १८९३ ); सीलि-लाइफ अँड रेन ऑफ एडवर्ड दि फर्स्ट ( १८७२ ); मॉरीस-वेल्स वॉर्स ऑफ एडवर्ड दि फर्स्ट ( ऑक्सफर्ड १९०१. ) ]

( ३ ) दुसरा—( जन्म १२८४; मृत्यु १३२७ ). दुसरा एडवर्ड हा पहिल्या एडवर्डचा चौथा मुलगा होता. हा कार्नार्व्हन किल्ल्यांत जन्मास आला, म्हणून याला कार्नार्व्हनचा एडवर्ड असें संबोधण्यांत येतें. पहिल्या एडवर्डनें याला राजाच्या कर्तव्यकर्मांचें शिक्षण देण्याची फार खटपट केली. पण त्या खटपटीला मुळींच यश आलें नाहीं. दुसरा एडवर्ड हा फार चैनी, खेळांचा शोकी, हेकेखोर व मूर्ख होता. तो नेहमीं हलकट सोबत्यांच्या नादीं असे. पीअर्स गाव्हेस्टन नांवाच्या एका दुराचारी

माणसावर याची फार मर्जी असे. गाव्हेस्टन याच्या नादानें आपला मुलगा बिघडला या समजुतीनें पहिल्या एडवर्डनें त्याला हद्दपार केलें होतें. पण दुसरा एडवर्ड राज्यावर आल्याबरोबर त्यानें प्रथम गाव्हेस्टनला परत बोलावून आणलें व त्याच्या तंत्रानें राज्यकारभार करण्यास सुरवात केली. एडवर्ड हा जेव्हां फ्रान्समध्यें गेला त्या वेळीं त्याच्या गैरहजेरींत गाव्हेस्टन हाच स्वतः राज्यकारभार पहात असे. फ्रान्समध्यें असतांना त्यानें फ्रान्सचा राजा फिलिप दि फेअर याच्या मुलीशीं—इसाबेलाशीं—विवाह केला.

फ्रान्स देशाहून परत आल्यानंतर १३०८ च्या फेब्रुवारीच्या २५ व्या तारखेस त्याला राज्याभिषेक करण्यांत आला. त्यानें लगेच गाव्हेस्टनला आपला प्रधान नेमलें. त्याच्या वाईट संगतींत राजा ख्यालीखुशालींत आपला काळ घालवीत असे. दोनदां त्याला सरदार लोकांनीं हद्दपार केलें. तरी पण दर खेपेस राजा त्याला परत बोलावी. शेवटीं त्याला सरदार लोकांनीं धरून कैदेंत ठेवलें व नंतर गाव्हेस्टनचा हाडवैरी जो वारविकचा अर्ल त्यानें गाव्हेस्टनला निर्दयपणें ठार मारिलें.

एडवर्ड हा कमकुवत असल्याकारणानें त्याला गाव्हेस्टनच्या वधाचा सूड घेण्याची छाती झाली नाहीं. सरदार लोकांनीं राजाच्या हातून राज्यकारभार काढून तो २१ लॉर्ड आर्डेनर्सच्या कमिटीकडे सोंपविला होता; तरी पण राजाला त्याची फिकिर वाटली नाहीं. याच अवधींत रॉबर्ट ब्रूस हा स्कॉटलंडमधील शहरांवर शहरें काबीज करीत होता. स्टर्लिंग व बरिक या दोन शहरांखेरीज इतर सर्व शहरें ब्रूसनें जिंकलीं होतीं व स्टर्लिंग शहरालाहि त्यानें वेढा दिला होता. स्टर्लिंग शहराला वेढा दिला आहे ही बातमी समजतांच एडवर्ड व सरदार लोक दोघेहि चिडून जाऊन त्यांनीं ब्रूसला तोंड देण्याचें ठरविलें. बॅनॉकबर्न येथें दोन्ही पक्षांची लढाई होऊन त्यांत इंग्लिशांचा पूर्णपणें पराजय झाला. स्कॉटलंडनें पुन्हां स्वातंत्र्य मिळविलें. इंग्रजांचा पुरता सूड घेण्याच्या निमित्तानें ब्रूसनें इंग्लंडच्या उत्तरेकडील परगण्यांवर स्वारी करून तो प्रदेश जवळ जवळ बेचिराख करून टाकला.

इ. स. १३२० सालीं राजाची मर्जी डिस्पेन्सर नांवाच्या एका गृहस्थावर व त्याच्या मुलावर बसली. पण या दोघां पितापुत्रांशीं सरदारलोकांनीं थोड्याच काळांत कलह करण्यास सुरुवात केली. १३२१ मध्यें त्यांनीं पार्लमेंटमध्यें खल करून पार्लमेंटच्या संमतीनें, डिस्पेन्सर्सनां इंग्लंडमधून हांकून लावलें. या गोष्टीमुळें राजाला अत्यंत क्रोध आला. त्यानें १३२२ मध्यें डिस्पेन्सर्सनां परत बोलावून आणिलें, व त्यांच्या सहाय्यानें सरदार लोकांवर स्वारी केली. या स्वारींत एडवर्डला जय प्राप्त झाला. त्यानें शत्रूकडील पुढारी मॉर्टीमर याला कैदेंत टाकलें. त्यांचा दुसरा पुढारी लँकेस्टर याचा शिरच्छेद करण्यांत आला. नंतर राजानें ऑर्डेनर्स लोकांनीं केलेले नियम रद्द करून यॉर्क येथें पार्लमेंट भरविलें. उमरावांची सत्ता कह्यांत राखण्याची त्याची इच्छा होती. म्हणून त्यानें एक महत्त्वाचा कायदा पसार करून घेतला; तो असा कीं, सर्व गोष्टी कायम करणें त्या धर्माध्यक्ष, अर्ल, बॅरन व राज्यांतील सामान्य लोक या सर्वांनीं मिळून केल्या पाहिजेत.

पण डिस्पेन्सर्स हेहि चांगल्या रीतीनें राज्यकारभार करीत नसत. त्यामुळें व इतर दुसऱ्या कारणांमुळें लोक व इसाबेला राणी हीं उभयतांहि त्यांचा द्वेष करीत होती. त्यामुळें साऱ्या राष्ट्रांत बंडाळी माजलेली होती. इसाबेला ही फ्रान्समध्यें कांहीं कामाकरितां गेली होती. त्याच ठिकाणीं तिचा प्रियकर लॉर्ड मॉर्टिमर हाहि कैदेंतून निसटून पळून आला होता. त्या दोघांनीं मिळून एडवर्ड राजाला उलथून पाडून त्याच्या जागीं त्याच्या मुलाला (तिसऱ्या एडवर्डला) गादीवर बसवावें अशी गुप्त मसलत चालविली. १३२६ च्या सप्टेंबर महिन्यांत ती मॉर्टिमर याजबरोबर इसेक्स प्रांतांत येऊन उतरली. डिस्पेन्सर्सनां हांकून लावण्याचा उद्देश तिनें जाहीर करतांच तिच्या पक्षास भराभर लोक मिळूं लागले. त्यामुळें एडवर्ड राजाला कोणाचीच मदत न मिळाल्यामुळें त्याला पळून जाणें भाग पडलें. त्याचा पाठलाग इसाबेलानें चालविला. डिस्पेन्सर्सचा शिरच्छेद करण्यांत आला. एडवर्डला पकडून केनिलवर्थ येथें तुरुंगांत ठेवण्यांत आलें. १३२७ त वेस्टमिन्स्टर येथें पार्लमेंट भरलें व त्यांत पार्लमेंटनें एडवर्ड हा राज्यकारभार करण्याला नालायक आहे असें ठरविलें; व त्याचा पुत्र तिसरा एडवर्ड हा राजा झाला आहे असा जाहिरनामा काढला.

यानंतर एका किल्ल्यांतून दुसऱ्यांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत याप्रमाणें अनेक किल्ल्यांत एडवर्डला कैदेंत ठेवण्यांत येऊन त्याचे अनेक तऱ्हेनें हाल करण्यांत येऊन शेवटीं १३२७ च्या सप्टेंबर महिन्यांत, बार्क्लि येथील किल्ल्यांत मॉर्टिमरच्या हुकुमानें त्याचा निर्दयपणें वध करण्यांत आला. एडवर्डला इसाबेलापासुन दोन मुलगे व दोन मुली अशीं अपत्यें झालीं.

(४) तिसरा (जन्म १३१२, मृत्यू १३७७)— तिसरा एडवर्ड हा दुसऱ्या एडवर्डचा सर्वांत मोठा मुलगा होय. तो विंडसर येथें १३१२ मध्यें जन्माला आला. तो आठ वर्षांचा असतांना त्याला चेस्टरचा अर्ल करण्यांत आलें. १३२५ मध्यें तो अॅक्विटेनचा ड्यूक झाला. नंतर कांहीं वर्षें तो फ्रान्समध्येंच होता. त्याची आई इसाबेला व मॉर्टिमर या दोघांनीं मिळून ज्या वेळीं इंग्लंडवर स्वारी केली त्या स्वारीबरोबर तो इंग्लंडमध्यें आला. पुढें दुसऱ्या एडवर्डचा पराभव होऊन पार्लमेंटनें त्याच्या जागीं याला राजा म्हणून नेमलें. १३२७ त जानेवारीच्या२९व्या तारखेस त्याला राज्याभिषेक झाला.

तो अल्पवयस्क असल्यामुळें त्याच्या नांवानें इसाबेला व मॉर्टिमर यांनीं राज्यकारभार चालविला. १३२८ त त्याचा एनोचा कौंट याची कन्या फिलिप्पा हिच्याशीं विवाह झाला. १३३० सालीं जून महिन्याच्या १५ व्या तारखेस पुढें ' दि ब्लॅक प्रिन्स ' या नांवानें उदयास आलेला त्याचा पहिला मुलगा जन्मास आला. मॉर्टिमरच्या ताब्यांत रहाण्याचा त्याला तिटकारा आल्यामुळें त्यानें नाटिंगहॅम किल्ल्यामध्यें रात्रीं शिरून मॉर्टिमर यास कैद केलें व १३३०च्या नोव्हेंबर महिन्यांत टायबर्न येथें त्यास फांशीं दिलें. आपल्या आईला मात्र त्यानें कधींहि दुखविलें नाहीं.

मॉर्टिमरच्या ताब्यांतून तो मोकळा झाल्यानंतर त्यानें प्रत्यक्ष रीतीनें आपल्या हातांत राज्यसूत्रें घेतलीं. तो तरुण व उत्साही असल्यानें आपल्या आजाच्या वेळीं जी इंग्लंडची चलती होती तशा प्रकारचें वैभव इंग्लंडला पुन्हां प्राप्त करून देण्याची त्यानें महत्त्वाकांक्षा बाळगिली. १३२८ सालीं झालेल्या नॉर्थहॅम्प्टनच्या तहानें स्कॉटलंडला जें स्वातंत्र्य मिळालें होतें त्याचा त्यानें इनकार केला. याच सुमारास राबर्ट ब्रूस हा मरण पावल्यामुळें त्याचा अल्पवयी मुलगा राज्यावर बसला होता. ही संधि साधून एडवर्डनें स्कॉटलंडवर स्वारी करून स्काटलंडच्या राज्यावर बेलियलचा मुलगा एडवर्ड यास बसविलें. पण थोड्याच अवधींत स्कॉच लोकांनीं बेलियलच्या मुलाला राज्यावरून हांकून लावलें. हें पाहतांच एडवर्डला राग आला व त्यानें १३३३ त स्कॉच लोकांवर स्वारी करून त्यांचा हॅलिडॉनहिल येथें पराभव केला. तरी पण बेलियलच्या मुलाला कांहीं स्कॉच लोक राजा म्हणून कबूल करीनात; त्यांनीं थोड्याच वर्षांनीं ब्रूसचा मेहुणा डेव्हिड यास राज्यावर बसविलें.

पण या सर्व घडामोडी चालल्या असतां इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें वितुष्ट येत चाललें होतें. त्याला अनेक कारणें होतीं. एडवर्ड हा गास्कनीचा ड्यूक होता ही गोष्ट फ्रान्सला पसंत नव्हती. फिलिपचा व स्कॉच लोकांचा सलोख्याचा तहनामा झाला होता. त्यामुळें स्कॉच लोकांवर एडवर्डनें स्वारी करणें फिलिपला आवडलें नाहीं. शिवाय फ्लेमिंग लोकांचें व फ्रान्सचें वांकडें येऊन फ्लेमिंग्स लोकांना एडवर्डनें साहाय्य देण्याचें कबूल केलें. एवढेंच नव्हे तर आपली आई इसाबेला ही फ्रान्सांतील राजघराण्याच्या ज्येष्ठ शाखेची मुलगी असल्यानें तिचा मुलगा या नात्यानें फ्रान्सच्या राज्यावर आपला हक्क आहे असें एडवर्डनें सांगण्यास सुरुवात केली. अशा निरनिराळ्या कारणांमुळें फ्रान्स व इंग्लंडमध्यें ' शंभर वर्षांच्या युद्धाला ' तोंड लागलें.

१३३७ सालीं या युद्धाला सुरुवात झाली. १३४०सालीं स्लॉई नांवाच्या फ्लांडर्स देशाच्या किनाऱ्याजवळच्या बंदराबाहेर आरमारी लढाई होऊन तींत फ्रेंच आरमाराचा पूर्ण पराभव झाला. या युद्धांत एडवर्डनें प्रत्यक्ष भाग घेतला होता. लगेच एडवर्डनें फ्रान्सचा राजा हा किताब धारण केला. हा किताब पुढें तिसऱ्या जॉर्जच्या कारकीर्दीपर्यंत प्रत्येक इंग्लंडचा राजा आपल्याला लावून घेत असे. स्लॉइ येथील लढाई आटोपल्यावर कांहीं दिवस शांतता होती. पण ब्रिटनच्या डचीच्या वारसहक्कासंबंधानें वाद उपस्थित होऊन पुन्हां युद्धाला तोंड लागलें. सन १३४२ मध्यें त्याच्या सैन्यामध्यें व फ्रेंच सैन्यामध्यें ब्रिटनच्या प्रदेशांत चकमक उडाली; पण त्याचा निकाल लागला नाहीं. १३४३ सालीं तो इंग्लंडला परत आला. १३४४ मध्यें त्यानें विंडसर येथील किल्ला पुन्हां बांधण्यास सुरुवात केली; व ' आर्डर ऑफ दि गार्टर' ही पदवी अस्तित्वांत आणिली.

१३४३ च्या जुलै महिन्यांत पुन्हां इंग्लंड व फ्रान्स देश यांच्यामध्यें युद्धाला सुरुवात होऊन आपल्या ज्येष्ठ पुत्रासमवेत एडवर्ड हा नॉर्मंडी येथें उतरला. क्रेसी येथें दोन्ही सैन्यामध्यें लढाई होऊन फ्रेंच सैन्याचा पूर्णपणें पराभव झाला. लगेच पुढच्या वर्षी इंग्लिश सैन्यानें कॅले शहर जिंकून घेतलें. गास्कनी व ब्रिटन या मुलखांत देखील इंग्रजांचा दोन ठिकाणीं जय झाला. पण पैशाच्या अभावीं ही मोहीम पुढें चालविणें अशक्य होऊन इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें तात्पुरता तह घडून आला. एडवर्ड १३४७ त इंग्लंडला परत आला व त्यानें जयोत्सवानिमित्त निरनिराळ्या शर्यती केल्या. याच सुमारास काळा आजार नांवाच्या तापाची साथ इंग्लंडमध्यें पसरली. तरी पण मधून मधून फ्रान्स व इंग्लंड यांच्या दरम्यान किरकोळ लढाया चालू होत्याच.

१३४९ मध्यें कॅलेच्या आसपास झालेल्या लढाईंत तसेंच व विंचेल्सिया येथील आरमारी लढाईंत इंग्लंडनें जय मिळविले. पोपनें ही लढाई थांबावी यासाठीं पुष्कळ मध्यस्थी केली पण ती व्यर्थ गेली. १३५६ मध्यें एडवर्डचा मुलगा ब्लॅक प्रिन्स यानें पाइटियर्स येथील युद्धांत फ्रेंचांचा धुव्वा उडविला व फ्रान्सचा राजा जॉन याला पकडलें. जॉनचा त्यानें कोणत्याहि तऱ्हेनें उपमर्द केला नाहीं. १३५९ त एडवर्ड व जॉन यांमध्यें तह होऊन जॉननें एडवर्डला इतक्या सवलती द्यावयाचें कबूल केलें कीं, त्या तहाला फ्रेंच लोक मान्यताच देईनात. तेव्हां एडवर्डनें पुन्हां फ्रान्सवर स्वारी करण्याचें ठरविलें. तो कॅले येथें उतरून रीम्स येथें आला व त्या ठिकाणीं फ्रान्सचा राजा म्हणून राज्याभिषेक करून घेण्याचें त्यानें ठरविलें. पण फ्रेंच रहिवाश्यांनीं या त्याच्या कृत्याला जोराचा विरोध केल्यामुळें त्याचा तो बेत फसला. त्यामुळें चिडून जाऊन त्यानें पॅरीसवरच हल्ला करावयाचें ठरविलें. पण तोहि डाव हुकल्यामुळें १३६० मध्यें ब्रेटिग्नी येथें तो तहाची वाटाघाट करण्यास तयार झाला. शेवटीं कॅले येथें दोन्ही पक्षांचा तह होऊन एडवर्डला ॲक्विटेन प्रांताच्या मालकीवरच संतुष्ट होणें भाग पडलें.

या तहानें इंग्लंड व फ्रान्स यांमधील द्वेषाग्नि विझून दोन्ही राष्ट्रांनां शांततेचे दिवस येतील असें वाटत होतें. पण दुर्दैवानें तसें घडून आलें नाहीं. १३६२ व ६९ मध्यें काळा आजार सुरू झाला. त्यामुळें इंग्लंडांत लोकसंख्येच्या एकतृतीयांश लोक या सांथीला बळी पडले. सांथीच्या भयानें ग्रस्त झालेल्या लोकांनीं आपापल्या धंद्यांकडे जरूर तेवढें लक्ष्य दिलें नाहीं. मजुरांची संख्या थोडी राहिल्यामुळें मजुरीचें प्रमाण वाढलें. भांडवलवाले व मजूर यांमध्यें झगडा सुरू झाला. शेवटीं या अनर्थकारक स्थितीला आळा घालण्यासाठीं 'स्टॅट्यूट ऑफ लेबरर्स' उर्फ मजुरांचा कायदा पास करून काळ्या आजाराच्यापूर्वी जो मजुरीचा दर होता त्याच दरावर मजुरांनीं काम केलें पाहिजे असें ठरविलें. पण मजुरांनां हा नियम कडक वाटल्यानें त्यांनीं याविरुद्ध चळवळ सुरू केली. औद्योगिक भानगडीप्रमाणेंच याच वेळीं धर्माच्या बाबतींतहि बराच झगडा चालला होता. शेवटीं याहि बाबतींत पोव्हाइसरचा स्टॅट्यूट व प्रेम्यूनायरचा स्टॅट्यूट असे पोपच्या धगर धर्मगुरूच्या विरोधक कायदे पास करून पार्लमेंटनें याहि बाबतीची कशीबशी विल्हेवाट लावली.

सन १३६९ सालीं फ्रान्सचा राजा पांचवा चार्लस यानें ब्रेटीचा तह मोडून युद्धाचें शिंग फुंकलें. एडवर्डला जो फ्रेंचांचा मुलूख मिळालेला होता त्यांतील रहिवाशांनींहि चार्लस राजाचीच बाजू घेतली. एडवर्डनें त्या वेळीं हें बंड मोडण्याकरितां आपले पुत्र ब्लॅक प्रिन्स व जॉन यांस पाठविलें. फ्रान्सशीं त्या दोघांनीं युद्ध चालविलें असतां एडवर्डनें पैशाची उणीव भरून काढण्याकरितां चर्चच्या पैशावर व हक्कांवर मोहीम सुरू केली. त्यानें जुन्या धर्मोपदेशकांनां अधिकारावरून काढून टाकून नवे नवे अननुभविक धर्मोपदेशक नेमले. इकडे इंग्लंडमध्यें अशी परिस्थिति प्राप्त झाली असतां तिकडे फ्रान्समध्यें इंग्लिश सैन्याचा जिकडे तिकडे पराजय होत होता. १३७२ सालीं एडवर्डनें फ्रान्सवर पुन्हां स्वारी करण्याचा शेवटचा प्रयत्न केला; पण त्या वेळीं भयंकर तुफान होऊन त्याचा तो बेत फसला. त्यामुळें निराश होऊन तो फ्रान्सशीं तह करण्यास कबूल झाला. या तहान्वयें त्याच्या ताब्यांत कॅले, बोर्डो, बेयोन व ब्रेस्ट एवढींच काय तीं महत्त्वाचीं ठिकाणें राहिलीं.

एडवर्ड हा आतां बराच म्हातारा झालेला होता. त्याची राणी फिलिप्पा इच्या मृत्यूमुळें त्याच्या मनावर निराशेचें पटल आलें होतें. ॲलीस पेरेर्स नांवाच्या एका लोभी बाईनें त्याच्यावर आपला अम्मल बसविला होता. राजमंडळामध्यें ब्लॅक प्रिन्सची बाजू घेणारा पक्ष व जॉनची बाजू घेणारा पक्ष असे दोन पक्ष उपस्थित झाले होते व त्यांच्यामध्यें चांगलेंच जुंपलें होतें. ॲलीस पेरेर्सच्या वजनामुळें एडवर्डनें जॉनची बाजू घेतली होती व जॉन हाच वस्तुतः राज्याचा कारभार पाहूं लागला होता. पण जॉनला पूर्वी हांकलून दिले गेलेले धर्मोपदेशक व ब्लॅक प्रिन्स यांनीं पदोपदीं अडथळा करण्यास सुरुवात केली. शेवटीं १३७६ मध्यें गुड पार्लमेंटची बैठक झाली व पार्लमेंटनें पेरेर्सला राजाजवळून घालवून व प्रधानांनां त्यांच्या जागांवरून काढून लावलें. पण याच सुमारास ब्लॅकप्रिन्सला मृत्यूनें गांठल्यामुळें पार्लमेंटचा एक मोठा आधार नाहींसा झाला. त्यामुळें जॉनच्या ताब्यांत पुन्हां सत्ता आली. यानंतर थोड्याच दिवसांनीं १३७७ मध्यें जूनच्या २१ व्या तारखेस एडवर्ड मरण पावला.

पहिल्या एडवर्डच्या इतका जरी तिसरा एडवर्ड मोठा मनुष्य नव्हता तरी त्याच्या अंगीं मुत्सद्देगिरी व क्षात्रतेज हे गुण मोठ्या प्रमाणांत वास करीत होते. तो जात्याच उमद्या स्वभावाचा व हौशी होता. त्याच्या दरबारच्या डामडौलाइतका डामडौल तत्कालीन यूरोपमधील कोणत्याहि राष्ट्राच्या दरबारीं नव्हता. तो उदार, सुस्वभावी व मनमिळाऊ होता. उधळेपणा, वचनभंगाची संवय व कामातिरेक हे त्याच्या अंगचे दोष होते.

एडवर्डला सात मुलगे व पांच मुली होत्या. सात मुलांपैकीं पांच मुलांनीं कोणत्याना कोणत्या तरी बाबतींत आपलें नांव इतिहासांत स्मरणीय करून ठेवलें आहे.

[ संदर्भ ग्रंथः—लाँगमन—लाईफ ॲंड टाईम्स ऑफ एडवर्ड दि थर्ड; मॅकिन्नान—हिस्टरी ऑफ एडवर्ड दि थर्ड; बार्नेस—हिस्टरी ऑफ एडवर्ड दि थर्ड ( १६८८ ); स्टब्स—कॉन्स्टिट्यूशनल हिस्टरी ऑफ इंग्लंड ( भाग २ रा );टाऊटपोलिटिकल हिस्टरी ऑफ इंग्लंड (१२१६–१३००)].

( ५ ) चौथा.—( जन्म १४४२–मृत्यु १४८३. ) एडवर्ड हा रिचर्ड ड्यूक आफ यॉर्क याचा मुलगा होय. हा रुआं येथें १४४२ च्या एप्रिल महिन्याच्या २८ व्या तारखेस जन्मला. लहानपणीं त्याला 'अर्ल ऑफ मार्च' असें नांव पडलें होतें. १४५९ मध्यें लडलो येथें यॉर्किस्ट लोकांचा पराभव झाल्यानंतर एडवर्ड हा आपला चुलता अर्ल ऑफ सॅलिसबरी याच्यासह कॅले येथें पळून गेला. पुढें अर्ल ऑफ सॅलिसबरी व अर्ल ऑफ वॉरविक यांनीं ज्या वेळीं इंग्लंडवर स्वारी केली त्या वेळीं त्या स्वारीबरोबर तो लंडन येथें आला. त्याचा बाप यॉर्कचा रिचर्ड याला राज्याचा वारस ठरविण्यांत आल्यानंतर एडवर्ड हा वेल्सला परत गेला. थोडक्याच दिवसांत त्याला रिचर्ड हा वारल्याचें वर्तमान कळलें. त्यानंतर लगेच त्यानें आपलें सैन्य जमवून १४६१ सालीं मॉर्टिमर्स क्रॉस येथें पेम्ब्रोकचा अर्ल याचा पराभव केला व लंडनकडे आपला मोर्चा वळविला. सहाव्या हेनरीच्या त्रासाला कंटाळलेल्या लोकांनीं त्याचें मनःपूर्वक स्वागत केलें. लंडन येथें यॉर्कपक्षीय बडेबडे लोक जमले व त्यांनीं १४६१च्या मार्चच्या ४ थ्या तारखेस एडवर्ड राजा झाला म्हणून जाहीर केलें. त्यानंतर लगेच तो व वॉरविकचा अर्ल यांनीं उत्तरेकडे कूच केलें. सहाव्या हेनरीच्या राणीच्या सैन्याशीं

त्यांची लढाई होऊन टॉउटन फील्ड येथें एडवर्डनें मोठा जय संपादन केला. एडवर्ड हा लंडन येथें माघारा आला व त्याला जूनच्या २८ व्या तारखेस राज्याभिषेक झाला.

हें राज्य संपादन करण्याच्या कामीं एडवर्डला त्याच्या आजोळच्या लोकांची फार मदत झाली; व राज्यप्राप्तीनंतरहि तो कांहीं दिवस त्यांच्याच तंत्रानें चालत असे. तो स्वतः चैनी प्रवृत्तीचा होता तरी १४६२–६३ सालीं हेनरीच्या राणीच्या सैन्याबरोबर चाललेल्या लढायांत त्यानें भाग घेतला. पण या दरम्यानच्या वेळांत एलिझाबेथ वुडव्हिल नांवाच्या एका विधवा बाईवर त्याचें मन बसून त्यानें तिच्याशीं विवाह केला. पण अशा एका गरीब मुलीशीं लग्न लावणें हें वॉरविकच्या अर्लला मुळींच पसंत पडलें नाहीं. वॉरविकच्या मनांत एडवर्डचा कोणा तरी फ्रान्सच्या राजघराण्यांतील मुलीशीं विवाह करून फ्रान्स व इंग्लंड याचें सख्य जुळवावें असें होतें. पण वरीलप्रमाणें त्याचा बेत फसल्यामुळें त्याला एडवर्डचा राग आला. शिवाय एडवर्डनें आपल्या बायकोच्या आप्तेष्टांनां मोठमोठ्या हुद्याच्या जागा देण्यास सुरुवात केल्यामुळें तर एडवर्डच्या कृत्याची त्याला फार चीड आली. शिवाय फ्रान्सशीं सख्य करण्याचें वॉरविकचें धोरण न सांभाळतां बर्गंडीबरोबर तह करण्याला एडवर्ड प्रवृत्त झाला. या सर्व गोष्टींमुळें एडवर्डचें व वारविकचें पटेनासें झालें. तरी पण १४६९ पर्यंत त्यांच्या परस्परांमधील द्वेषाला तोंड फुटलें नाहीं.

एडवर्डच्या बायकोचे जे आप्तेष्ट अधिकारी झाले होते त्यांच्यासंबंधीं लोकांनां आदर वाटत नसे. या गोष्टीचा फायदा घेऊन वॉरविकनें एडवर्डचा धाकटा भाऊ ड्यूक ऑफ क्लॅरेन्स याच्या साहाय्यानें एडवर्डला अचानक कैद केलें व एडवर्डच्या सासऱ्याचा शिरच्छेद केला. एडवर्ड हा सहा महिने वॉरविकच्या नजरकैदेंत होता. पण याच सुमारास लॅंकेस्टरच्या तर्फेच्या लोकांनीं बंड केल्यामुळें एडवर्डला कैदेंतून सुटावयाची संधि सांपडली. लगेच तो लंडन येथें परत आला व त्यानें वॉरविक व आपला भाऊ राजद्रोही आहेत असें जाहीर केलें. त्यामुळें वॉरविकला व ड्यूक ऑफ क्लॅरेन्सला फ्रान्सला पळून जाणें भाग पडलें. एडवर्डला आतां आपण सुरक्षित झालों असें वाटलें; पण इतक्यांत वॉरविक व ड्यूक ऑफ क्लॅरेन्स यांनीं लॅंकेस्टरच्या लोकांशीं सख्य संपादन करून ते आपल्याशीं लढाई द्यावयास तयार झाले आहेत असें त्याला आढळून येतांच तो घाबरून गेला, व त्यानें फ्लॅंडर्स देशांत पलायन केलें. नंतर बर्गंडीच्या राजानें त्याला मदत देण्याचें कबूल केल्यामुळें त्याच्या सैन्याच्या मदतीनें तो पुन्हां लंडन येथें परत आला; व त्यानें बार्नेट येथें वॉरविकचा व ट्यूक्सबरी येथें लॅंकेस्टरचा पराभव केला. या जयामुळें त्याचा मार्ग निष्कंटक झाला. तथापि क्लॅरेन्स याची त्याला भीति वाटत होती. व ती दूर करण्याकरितां त्यानें क्लॅरेन्सवर तोहमत आणवून त्याला देहान्त शासन केलें.

मध्यंतरीं १४७५ मध्यें त्यानें फ्रान्सवर स्वारी करण्याचा विचार केला. पण फ्रान्सच्या राजानें त्याला खंडणी द्यावयाचें कबूल केल्यामुळें त्यानें तो बेत रहित केला. दर वर्षी पार्लमेंटची बैठक भरविण्याच्या तो भानगडींतच पडला नाहीं. तो एकतंत्री व लहरी होता. त्याचा अंमल फार कडक असे. त्याचें आचरण अनीतीचें व बदफैलीपणाचें असे. तरी पण लोकप्रियता संपादन करण्याची त्याला चांगली हातोटी साधलेली होती. नवीन विद्येला तो मोठ्या आस्थेनें उत्तेजन देत असे. कॅक्स्टनला त्यानें चांगला आश्रय दिला. तो १४८३ मध्यें एप्रिल महिन्याच्या ९ व्या तारखेस वेस्टमिन्स्टर येथें मरण पावला. त्याला विंडसर येथें पुरण्यांत आलें. त्याला एलिझाबेथपासून दोन मुलगे व पांच मुली होत्या. त्याच्या ज्या इतर स्त्रिया होत्या त्यांपैकीं जेन शोअर ही त्याची आवडती स्त्री होती.

[संदर्भग्रंथ—वार्कवर्थ–क्रॉनिकल; व दि आरायव्हल ऑफ किंग एडवर्ड दि फोर्थ; जेम्स रॅम्से–लॅंकेस्टर अँड यॉर्क (१८९२); ओमन–दि पोलिटिकल हिस्टरी ऑफ इंग्लंड भाग ४ था (१९०६)].

(६) पांचवा (जन्म १४७०–मृत्यु १४८३).—हा चौथ्या एडवर्डचा वडील मुलगा होय. चौथा एडवर्ड हा फ्लॅंडर्स देशांत पळून गेला असतां त्याची बायको एलिझाबेथ वुडव्हिल ही वेस्ट मिन्स्टरच्या देवळांत लपून राहिली होती. याठिकाणीं या एडवर्डचा जन्म झाला. १४७१ मध्यें त्याला प्रिन्स ऑफ वेल्स करण्यांत आलें. जेव्हां चौथा एडवर्ड राजा वारला त्या वेळीं अधिकाराच्या बाबतींत दोन पक्षांमध्यें झगडा सुरू झाला. एलिझाबेथ राणी व तिचे नातलग यांचा एक पक्ष व एडवर्ड राजाचा भाऊ ग्लोसेस्टरचा ड्यूक रिचर्ड याचा दुसरा पक्ष. रिचर्डनें या छोट्या एडवर्डला कसेंबसें आपल्या ताब्यांत आणिलें व राणीच्या रिव्हर्स वगैरे नातलगांनां ठार मारिलें. यानंतर त्यानें बालराजा एडवर्ड याच्या आईचें व चौथ्या एडवर्डचें लग्न धर्मविधीपूर्वक झालें नाहीं असा बहाणा करून राज्यपद बळकावलें. या वेळीं छोटा एडवर्ड व त्याचा धाकटा भाऊ रिचर्ड हे दोघे लंडनच्या टॉवरमध्यें तुरुंगांत होते. या दोघा राजपुत्रांची सुटका करण्याचा प्रयत्न करण्यांत आला. पण तत्पूर्वीच ते दोघेही मरण पावलेले आढळून आलें. पुष्कळ वर्षे या मुलांच्या मृत्यूचें कारण नक्की समजण्याला मार्ग नव्हता; पण त्यानंतर जो पुरावा सांपडला त्यावरून रिचर्डच्या हुकुमानें त्या दोघा मुलांनां बिछान्यांत गुदमरवून ठार करण्यांत आलें व जिन्यांत पुरण्यांत आलें असें निर्विवाद सिद्ध झालें आहे.

(७) सहावा—(जन्म १५३७— मृत्यु १५५३); हा आठव्या हेनरीचा जेन ऑफ सेमूरपासून झालेला

एकुलता एक मुलगा होता. हा ग्रीनीच येथें जन्मास आला. जन्मतःच हा अशक्त होता व हा फार दिवस जगणार नाहीं असें पुष्कळांनीं भाकित केलें होतें. सात वर्षांचा झाल्यावर डॉ. कॉक्से याला त्याचा शिक्षक नेमण्यांत आलें. त्यानें लहानपणींच लॅटिन, ग्रीक व फ्रेंच या भाषांचें ज्ञान संपादन केलें. अवघा तेरा वर्षांचा असतांना त्यानें आरिस्टॉटलचा 'एथिस्क' (नीतिशास्त्र) हा ग्रंथ मुळांतून वाचला होता; व सिसरोच्या 'डे फिलॉसॉफिया' या ग्रंथाचें ग्रीक भाषेंत भाषांतर करण्याचाहि त्यानें उपक्रम केला होता.

अवघा नऊ वर्षांच्या वयाचा असतांना तो राज्यारूढ झाला. पण तो अल्पवयस्क व अतएव अज्ञान असल्यामुळें ड्यूक ऑफ सॉमरसेट यास प्रथम व ड्यूक ऑफ नॉर्थबर्लंड यास मागाहून त्याचे संरक्षक म्हणून नेमण्यांत आलें. त्याला ज्ञानाची गोडी असल्यामुळें एडवर्डनें पुष्कळशा लॅटिन व ग्रीक पाठशाळांनां कायमच्या देणग्या दिल्या. तो जास्त फार उदार व कनवाळू होता असें म्हणतात. पण त्याच्या खऱ्या स्वभावाची ओळख होण्याला जितका अवधि पाहिजे होता तितकाहि त्याला लाभला नाहीं. त्याला क्षयरोगानें गांठलें होतें व तो फार दिवस वांचणार नाहीं असें त्याच्या आसपासच्या लोकांनां कळून चुकलें. अर्थातच त्याच्या पाठीमागें कोणी राज्यावर बसावें यासंबंधींची चर्चा सुरू झाली. जर त्याची बहिण मेरी ही गादीवर बसेल तर ती कॅथॉलिक धर्म पुन्हां स्थापन करील व आपला नाश होईल असें राजाचा राज्यसंरक्षक जो नार्थंबर्लंड त्याला वाटत होतें. म्हणून त्यानें हरेक युक्त्या करून एडवर्डचें एक मृत्युपत्र तयार केलें; व त्यावर एडवर्डला सही करण्यास प्रवृत्त केलें. त्या मृत्युपत्रांत एडवर्डच्या दोघी बहिणी मेरी व एलिझाबेथ यांनां एकीकडे सारून आठव्या हेन्रीची बहिण मेरी हिची नात जेन ग्रे हिनें एडवर्डच्या मागून गादीवर बसावें असें ठरविलें होतें. या मृत्युपत्रावर एडवर्डच्या भोंवतीं जे मोठमोठे पुरुष होते त्या सर्वांनीं सह्या केल्या. पण पार्लमेंटच्या संमतीवाचून तो कागद निरुपयोगी होता. एडवर्ड हा ग्रीनिच येथें १५५३ सालीं जुलैच्या सहाव्या तारखेस मरण पावला; व त्याला वेस्टमिन्स्टरमध्यें सातव्या हेनरीच्या चॅपलमध्यें पुरण्यांत आलें.

[संदर्भ ग्रंथ—मार्कहॅम-एडवर्ड दि सिक्थ (१९०० पोलार्ड- इंग्लंड अंडर सॉमरसेट व लाइफ ऑफ क्रॅन्मर)]

(८) सातवा— (जन्म १८४१, मृत्यु १९१०.) एडवर्ड हा महाराणी व्हिक्टोरिया व आलबर्ट यांच्यापासून झालेला ज्येष्ठ पुत्र होय. हा बकिंगहॅमच्या राजवाड्यांत, १८४१ सालीं नोव्हेंबर महिन्याच्या ९ व्या तारखेस जन्मला. लगेच महिन्यानंतरच त्याला प्रिन्स ऑफ वेल्स व चेस्टरचा अर्ल अशी पदवी देण्यांत आली. १८४२ मध्यें त्याला बाप्तिस्मा देण्यांत आला. बालपणीं त्याचें शिक्षण, लिटलटन बाईच्या देखरेखीखालीं झालें.नंतर तो थोडा मोठा झाल्यावर, हेनरीबर्च, गिब्स, रेव्हरंड टार्व्हर व हर्बर्ट फिशर या चौघांकडे त्याच्या शिक्षणाची व्यवस्था सोंपविण्यांत आली. पुढें प्रो. ल्फेयर याच्या हाताखालीं त्यानें एडिंबरो येथें रसायन शास्त्राचा अभ्यास केला व नंतर त्याच विषयाचा अभ्यास केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजमध्यें चालू केला.सन १८५८मध्यें त्यास 'नाइट ऑफ दि गॉर्टर' करण्यांत आलें, व सैन्यांतील सेनापतीच्या जागीं त्याची नेमणूक झाली.१८५९ मध्यें त्यानें इटली व स्पेन या देशांत प्रवास केला व लगेच पुढच्या वर्षी लॉर्ड रेनफ्र्यू या नात्यानें युनायटेड स्टेट्स व कॅनडा या देशांना त्यानें भेट दिली.

केंब्रिज येथील आपला अभ्यासक्रम पुरा केल्यावर १८६१ मध्यें त्यानें कराघ येथें सैन्यांत आपलें नांव दाखल केलें. १८६२ मध्यें त्यानें पॅलेस्टाइन (होली लँड) चें दर्शन घेतलें. १८६३ मध्यें तो प्रिव्हि कौन्सिलचा सभासद झाला व ड्यूक ऑफ कॉर्नवाल या नात्यानें हॉउस ऑफ लॉर्ड्समध्यें त्यानें प्रवेश केला. याच सालीं डेन्मार्कचा राजा नववा ख्रिश्चन याच्या अत्यंत लावण्यवती कन्येशीं-अलेक्झांड्राशीं-त्याचा थाटानें विवाह झाला. या विवाहापासून त्याला एकंदर पांच अपत्यें झालीं. व्हिक्टोरिया राणी ही नेहमीं एकान्तप्रिय असल्यामुळें कोणतीहि महत्त्वाची सभा अगर दुसरें एखादें महत्त्वाचें कार्य असो, त्या ठिकाणीं एडवर्ड व अलेक्झांड्रा यांनाच हजर रहावें लागे. सार्वजनिक व लोकोपयोगी कार्याला मदत करण्याची एडवर्डला स्वभावतःच फार हौस असे, व अशा प्रसंगीं तो जीं भाषणें करीत असे तींहि चांगलीं वठत असत. १८६९ सालीं त्यानें इजिप्तला भेट दिली. १८७१ मध्यें त्याच्या हस्तें सर्वराष्ट्रीय प्रदर्शन उघडण्यांत आलें.

याच वर्षी त्याला विषमाच्या तापानें पछाडलें; व तें दुखणें इतकें विकोपाला गेलें कीं कांहीं दिवसपर्यंत त्याच्या जगण्याची आशाच नव्हती; पण ईश्वरीकृपेनें हळू हळू उतार पडत चालला. त्यामुळें लोकांनां आनंद होऊन १८८२ च्या फेब्रुवारी २७ व्या तारखेस आनंदाप्रीत्यर्थ सेंटपॉल चर्चमध्यें मोठा उत्सव करण्यांत आला.

१८७५ सालीं एडवर्डनें हिंदुस्थानाला भेट दिली. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या संस्थानिकांचा त्यानें परिचय करून घेतला. अवघ्या चार महिन्यांच्या मुक्कामांत त्यानें हिंदुस्थानांतील महत्त्वाचीं सर्व ठिकाणें पाहून घेतलीं. सन १८७६ सालीं व्हिक्टोरिया राणीनें हिंदुस्थानची महाराणी अशी पदवी धारण केली.

इंग्लंडमध्यें परत आल्यावर त्यानें सार्वजनिक कार्यांत पुष्कळच भाग घेतला. आयर्लंडमध्यें असंतोष माजला असतांनासुद्धां त्यानें १८८५ मध्यें आयर्लंडला भेट दिली व तेथें बऱ्याच ठिकाणीं त्याचें थाटानें स्वागत करण्यांत आलें. १८८६ मध्यें हिंदुस्थान व वसाहतींतर्फे भरलेल्या प्रदर्शनाचा तो अध्यक्ष होता. १८८७ मध्यें व्हिक्टोरिया महाराणीची ज्युबिली झाली व तींत त्यानें बराच भाग घेतल

होता. १८८९ मध्यें त्यानें अर्धवट खासगी स्वरूपाची फ्रान्सला भेट दिली, १८९० सालीं फोर्थ ब्रिजचा उद्घाटन-विधि त्याच्या हस्तें झाला. १८९२ सालीं त्याचा ज्येष्ठ पुत्र अकस्मात वारल्यामुळें त्याच्यावर दुःखाचा डोंगर कोसळल्यासारखें झालें.

१८९४ साल हें एडवर्डला अतिशय गडबडीचें गेलें. गरीब लोकांनां वसतिगृहाची सोय करण्याच्या बाबतींत जें रॉयल कमिशन नेमण्यांत आलें त्यांत याची सभासद म्हणून नेमणूक झाली. टॉवरब्रिज उघडण्याचा समारंभ त्याच्या-हस्तें झाला. १८९६ सालीं वेल्स विश्वविद्यालयाचा चॅन्सेलर म्हणून त्याला निवडण्यांत आलें. ब्रिटिश म्यूझियमच्या व्यवस्थापकांत तो एक व्यवस्थापक होता. १८९७ सालीं व्हिक्टोरिया महाराणीची जी ज्युबिली साजरी करण्यांत आली तींत देखील पूर्वीप्रमाणेंच यानें महत्त्वाचा भाग घेतला होता. १८९८ मध्यें बॅरन फर्डिनंड डी रॉथशाइल्ड याला भेटण्यास जात असतां त्याला गुडघ्यात जबर दुखापत झाली. पण त्यांतून तो लवकरच बरा झाला. १८८९ सालींहि, एका अराजक तरुणानें ब्रूसेल्सहून सेंटपीटसबर्ग येथें एडवर्ड जात असतां, त्याच्यावर गोळीबार केला. पण सुदैवानें त्याला कोणत्याहि प्रकारची इजा झाली नाहीं.

निरनिराळ्या शारीरिक खेळांचा व करमणुकीचाहि तो भोक्ता होता. त्यानें १८९६ व १९०० मध्यें दोनदां शर्यत जिंकली; व १९०९ मध्यें राज्यारूढ असतांनां देखील त्याचा शर्यतींत पहिला नंबर आला. फ्रीमेसनरी संस्थेच्या कार्यांत, तसेंच, किंग एडवर्ड हॉस्पिटल फंडाच्या बाबतींतहि त्यानें उत्साहानें भाग घेतला. प्रत्यक्ष राज्यारूढ होण्यापूर्वी त्यानें, राजपदाला आवश्यक असणाऱ्या सर्व गोष्टींचा अनुभव घेतला होता. राजकारणांत प्रत्यक्ष भाग असा त्यानें कधींच घेतला नाहीं पण अप्रत्यक्षरीतीनें त्यानें इंग्रजी राजकारणाचा नीट अभ्यास केला, व त्याचा त्याला पुढें पुष्कळ फायदा झाला.

व्हिक्टोरिया राणी १९०१ सालीं मरण पावली व त्यानंतर हा सातवा एडवर्ड या नांवानें राज्यारूढ झाला. पुढें कांहीं महिन्यांनीं पार्लमेंटच्या कायद्यानुरूप एडवर्डनें 'एडवर्ड दि सेव्हन्थ, बाय दि ग्रेस ऑफ गॉड, ऑफ दि युनायटेड किंग-डम ऑफ ग्रेटब्रिटन अँड आयर्लंड अँड ऑफ ऑल दि ब्रिटिश डोमीनियन्स बियाँड दि सीज किंग, डिफेंडर ऑफ दी फेथ, एंपरर ऑफ इंडिया ही पदवी धारण केली. १९०२ मध्यें आफ्रिकन युद्धाची समाप्ति झाल्यानंतर जून २६ तारखेला एडवर्डला राज्याभिषेक व्हावयाचें ठरलें; पण दोनच दिवस अगोदर त्याला 'आंत्रपुच्छदाह' नांवाचा रोग झाल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्या-मुळें तावडतोब शस्त्रक्रिया करण्याचें ठरलें. त्यामुळें तो समारंभ ऑगस्टच्या ९ व्या तारखेला मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला.

१९०३ च्या फेब्रुवारी महिन्यांत एडवर्डनें पार्लमेंट उघडलें. नंतर एका महिन्यानें तो पोर्तुगालच्या राजाला भेटण्याकरितां गेला व तेथून त्यानें जिब्राल्टर, माल्टा, नेपल्स, या ठिकाणांनां भेट दिली. इटली मध्येंहि त्याचें मोठ्या थाटानें स्वागत करण्यांत आलें. मे महिन्यांत पॅरिसला त्यानें भेट दिली. सप्टेंबर महिन्यांत तो व्हिएन्ना येथें गेला. १९०४ मध्यें कील येथें बोटींच्या शर्यतीला गेला असतां जर्मन बादशहानें त्याचें थाटानें स्वागत केलें.

या निरनिराळ्या राष्ट्रांतील प्रवासांचा एडवर्डला अतिशय फायदा झाला. विशेषतः सार्वराष्ट्रीय शांतताप्रस्थापनेच्या कामीं या प्रवासाचा फार उपयोग झाला. १९०३-४ सालांत इंग्लंडचे फ्रान्स, स्पेन, इटली, जर्मनी, पोर्तुगॉल या देशांशीं सख्यत्वाचे तह झाले. एडवर्डला 'शांतताप्रस्थापक एडवर्ड' असें नामाभिधान पडलें व तें त्याला शोभणारेंहि होतें. १९०८ मध्यें फ्रान्सच्या अध्यक्षाचें त्यानें इंग्लंडमध्यें मोठ्या थाटानें स्वागत केलें व त्याचा परिणाम फ्रान्सशीं सख्य जोडण्यांत झाला. याच्या आदल्याच वर्षी अँग्लो-रशियन तह घडून आला होता. या दोन तहांमुळें इंग्लंडची परराष्ट्रीय राजकारणांत छाप पडली. तरी पण कांहीं जर्मन राजकारणी मुत्सद्यांनीं हा सर्व खटाटोप व हे रशिया व फ्रान्सशीं झालेले तहनामे जर्मनीचें नुकसान करण्यासाठीं केलेले आहेत असें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली. तेव्हां ही शंका दूर करण्यासाठीं १९०९ मध्यें एडवर्डनें बर्लिन येथें कैसरला मुद्दाम भेट दिली व त्या प्रसंगीं दोघांनींहि एकमेकांचें प्रेमानें स्वागत केलें व त्यामुळें या आक्षेपांचें आपोआप निरसन झालें.

१९०९ सालीं इंग्लंडमध्यें राजकीय परिस्थिति फार घोंटाळ्याची झाली होती. लाईड जॉर्जनें आपलें अंदाजपत्रक पुढें आणलें होतें, तें हॉउस ऑफ लॉर्डसनें फेटाळून लावलें. तेव्हां लिबरल पक्षानें आपल्या पक्षाच्या कार्यक्रमांत पीअर्स लोकांनां जो मनाईचा (व्हेटोचा) अधिकार होता तो नष्ट करण्यासंबंधींच्या चळवळीचा समावेश करावयाचें ठरविलें. एडवर्ड हा पुराणमतवादी पक्षाचा असल्यानें त्याच्या मनाला या उदारमतवादी पक्षाच्या चळवळीनें धक्का बसला. १९१० सालीं लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला व ॲस्क्विथनें असें जाहीर केलें कीं, लोकप्रतिनिधींच्या इच्छेला राजानें मान दिलाच पाहिजे, याबद्दल राजाकडून वेळप्रसंगीं जामीन घेणेंहि भाग पडेल. ही धमकी दिल्यामुळें एडवर्डच्या मनाला फारच अस्वस्थता प्राप्त झाली. त्यापूर्वी थोडे दिवस त्याची प्रकृति थोडीफार नादुरुस्त होती, ती यामुळें अधिकच भडकली व तो एका दिवसांतच मरण पावला. अशा अकल्पित रीतीनें राजाचें देहावसान झालें. ही भयंकर बातमी ऐकतांच जनतेमध्यें हाहाःकार उडाला. मे १७।१८।१९ हे तीन दिवस वेस्ट मिन्स्टरमध्यें त्याचें प्रेत ठेवण्यांत आलें. मे २० तारखेस

सर्व लंडनमधून शवाची फारच थाटानें मिरवणूक काढण्यांत येऊन त्याचें शव विंडसर येथें पुरण्यांत आलें. या शवाच्या मिरवणुकीला जर्मन बादशहा, ग्रीस, स्पेन, पोर्तुगाल,डेन्मार्क, नार्वे, बेल्जम, बल्गेरिया इत्यादि देशांचे राजे, याशिवाय आस्ट्रियाचा युवराज, हॉलंडचा राजा व इतर राष्ट्रांचे वकील हजर होते. चोहोंकडे शोकाचें साम्राज्य पसरलें होतें. केवळ इंग्लंडलाच नव्हे तर सर्व जगाला एडवर्डच्या मृत्यूमुळें हळहळ वाटली.

व्हिक्टोरियाच्या कारकीर्दींत इंग्लंडमध्यें ज्या सनदशीर राज्यपद्धतीची स्थापना भरभक्कम पायावर झाली होती ती अधिक चिरस्थायी करण्याचें काम एडवर्डनें केलें. राजा झाल्यावर, एडवर्डनें आपल्या अंगचे अनेक गुण जगाच्या निदर्शनास आणले. पूर्वी राजानें फारशी राज्यकारभारांत ढवळाढवळ करावयाची नाहीं अशी जी पद्धत होती ती नाहींशी करून त्यानें आपल्या राष्ट्राच्या राजकारणांत मन घालण्यास सुरुवात केली. एडवर्ड हा फार चांगल्या स्वभावाचा व मुत्सद्दीगिरींत निष्णात होता; व त्यामुळें त्यानें जनतेचें मन आपल्याकडे आकर्षण करून घेतलें होतें.

**एडवर्डसाबाद** — वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील बन्नू जिल्ह्यांतील गांव. कधीं कधीं बन्नू ह्या नांवानें हें ओळखिलें जातें.

**एडिंबरो.**—एडिंबरो हें स्कॉटलंड देशाच्या राजधानीचें शहर असून रॉयलबरो व काउंटी आहे. हें फर्थ ऑफ फोर्थ या खाडीच्या दक्षिणेस असून एडिंबरोशायर अथवा मिडलेथियन काउंटीचें गांव आहे.

मु ख्य इ मा र ती.—किल्ल्यांत सेंट मार्गारेटचें जुनें प्रार्थनामंदिर आहे. जवळच पार्लमेंटचा व मेजवानीचा दिवाणखाना असून त्यांत चिलखतें, शस्त्रें व सैन्याच्या तुकडीचीं निशाणें ठेविलीं आहेत. 'पॅलेसयार्ड'मध्यें राणी मेरी रहात होती. होलीरूड राजवाडा पूर्वी ॲबे होता. त्याची स्थापना इ. स. ११२८ त झाली. येथील पार्लमेंट सभागृहांत सध्यां वरिष्ठ कोर्टें भरत असतें. बाजूच्या इमारतींपैकीं एकांत स्कॉटलंडमधील सुंदर असें संग्रहालय (ॲडव्होकेट्स लायब्ररी) आहे. 'रॉयल इन्स्टिटयूशन'मध्यें स्कॉटिश रंगीत काम, खोदकाम व वस्तुसौंदर्य यांचें विद्यालय आहे. जवळच 'नॅशनल गॅलरी' असून त्यांत रेबर्न व इतर चित्रकारांचीं मूळ चित्रें आहेत. राष्ट्रीयचित्रसंग्रहालय ( नॅशनल पोर्ट्रेट गॅलरी ) व पुराणवस्तुसंग्रहालय क्वीनस्ट्रीटवर आहेत. हायस्ट्रीटच्या पूर्वटोंकाशीं जॉन नॉक्सचें घर अद्यापि दुरुस्त करून चांगल्या स्थितींत ठेविलें आहे. काल्टन टेंकडीवर तुरुंग आहे. 'शेरीफ कोर्टाच्या' इमारतीसमोर ॲड्रयू कार्नेजी यांचें मोफत ग्रंथसंग्रहालय आहे. स्कॉटचा पुतळा ईस्ट प्रिन्सेस स्ट्रीट नांवाच्या बगीच्यांत आहे. वाटर्लूच्या जयाचें स्मारक काल्टन टेंकडीवर असून तेथें बरींच स्मारकें आहेत. येथील प्रिन्सेसस्ट्रीटचा हा बाग फार जुना आहे. सध्यां आसपासचीं बरीच गांवें उपनगरांत मोडतात. न्यू हॅव्हन हें मासे मारण्यासाठीं प्रसिद्ध आहे. एडिंबरोच्या जवळचीं दोन प्रसिद्ध ठिकाणें म्हणजे रॉझलिन व हॅथॉर्नेडेन हीं होत.

द ळ ण व ळ णा चीं सा ध नें.—एडिंबरोस नार्थ ब्रिटिश व कॅलेडोनियन हे दोन मुख्य रेलवेचे फांटे आहेत. लीथ, ग्रॅन्टन व ग्रेन्जमाऊथ हीं एडिंबरोचीं बंदरें आहेत. शहराच्या बहुतेक भागांतून ट्रॅमगाडी जाते. याशिवाय उपनगरांतील शहरें एडिंबरोशीं रेल्वेनें जोडलीं आहेत.

इ. स. १८८५ च्या कायद्यान्वयें एडिंबरोचे पूर्व, पश्चिम, मध्य व दक्षिण असे चार विभाग पाडण्यांत आले. प्रत्येक भागाला पार्लमेंटांत एक सभासद पाठविण्याचा अधिकार आहे. म्युनिसिपालिटीचे हेच विभाग आहेत. येथें स्कॉटिश चर्चची सर्वसाधारण सभा भरते. त्या वेळीं राजा एखाद्याची 'लॉर्ड हायकमिशनर' च्या जागीं नेमणूक करतो. ह्याच्याच अध्यक्षतेखालीं सभा भरते. ह्याच वेळीं युनाटेड फ्रीचर्चची वार्षिक सर्वसाधारण सभा होत असते.

एडिंबरो विश्वविद्यालयाची स्थापना इ. स. १५८३ त झाली. स्कॉच विद्यालयांत हें सर्वांत नवें आहे. याच विश्वविद्यालयांत स्त्रियांनां प्रथम दाखल करण्यांत येऊन त्यांनां पदव्या मिळूं लागल्या. सेंट ॲड्रयूज व एडिंबरो या दोन विश्वविद्यालयांतर्फे पार्लमेंटांत एक सभासद जातो. येथील ग्रंथसंग्रहालयांत २,२०,००० पुस्तकें असून ७००० पेक्षां जास्त हस्तलिखित ग्रंथ आहेत. रॉयल स्कॉटिश पदार्थसंग्रहालयांत उद्योगधंदे, कला, शास्त्रें, यांच्यासंबंधीं वस्तु ठेविल्या आहेत.

ॲड्र्यू कार्नेजी यांच्या फंडातून एडिंबरो विश्वविद्यालयाला दरवर्षी कांहीं देणगी मिळते. येथें रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स व रॉयल कॉलेज ऑफ फिजिशियन्स या दोन संस्था आहेत. 'न्यूकॉलेजांत' ख्रिस्ती धर्मशास्त्र शिकवितात. येथील रॉयल हायस्कूल सोळाव्या शतकांत स्थापन झालें. याशिवाय दुय्यम प्रतीच्या शिक्षणासाठीं येथें पुष्कळ शाळा आहेत.

येथें दुबळ्या, अनाथ व पंगु लोकांसाठीं रॉयल इनफर्मरी व दुसऱ्या कित्येक संस्था आहेत.

एडिंबरो हें व्यापार अथवा कारखान्यासाठीं विशेष प्रसिद्ध नाहीं. तरी पण येथील उद्योगधंदे महत्त्वाचे असून भरभराटीस आलेले आहेत. पूर्वीपासून मुद्रणालयाबद्दल एडिंबरोची ख्याति आहे. येथें नकाशे, अक्षरांचे खिळे, पुस्तकें बांधणें वगैरे कामें फार चांगलीं होतात. दारू गाळण्याचे येथें कारखाने आहेत. याशिवाय येथें लांकूडकाम, कागद, कांच, रबर, यंत्रें, वगैरे वस्तु तयार होतात. येथील किल्ल्यांत नेहमीं एखादी पायदळाची पलटण असते.

इ ति हा स.—फार प्राचीन काळीं येथें समुद्राच्या किनाऱ्यावर ऑटेडेनी व गॉडेनी ह्या दोन जाती रहात होत्या.

यानंतर हा प्रदेश रोमन लोकांच्या ताब्यांत होता. यांच्या नंतर ब्रिटिश लोकांच्या अंमलाखालीं हा प्रदेश होता; व त्यांच्यापासून दाक्षिणपिक्ट लोकांनीं हा प्रांत बळकाविला. इ. स. ६१७ ( अथवा ६२९ ) सालीं नार्दंब्रियांचा राजा एडविन यानें पिक्ट लोकांचा पराभव केला. एडविनवरून एडिंबरो हें नांव आलें असावें.याचें गेलीक नांव ड्यूनेडिन होतें.

पहिल्या स्टुअर्ट राजांच्या वेळीं एडिंबरो हें सरहद्दीवरील तटबंदीचें शहर होतें. इ. स. १४३६ पासून एडिंबरो हें स्कॉटलंडची राजधानी व पार्लमेंटच्या बैठकीचें ठिकाण म्हणून प्रसिद्धीस आलें.

तिसऱ्या जेम्सच्या अंमलांत एडिंबरो शहराची फारच सौंदर्यवृद्धि झाली. परंतु फ्लॉडनच्या युद्धानंतर शहरास उतरती कळा लागली. सोळाव्या शतकांतील जॉन नॉक्स व राणी मेरी यांच्यामुळें एडिंबरोंत बऱ्याच चळवळी सुरू झाल्या. परंतु सहावा जेम्स ज्या वेळीं इंग्लंडच्या गादीवर बसला त्या वेळेपासून एडिंबरो शहराचें महत्त्व बराच काळपर्यंत नाहींसें झालें. इ. स. १७०७ च्या इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या एकीकरणाच्या कायद्यानें सुद्धां शहराची स्थिति सुधारली नाहीं.

इ. स. १७६० पासुन एडिंबरो शहरांत पुनरुज्जीवनाचा संचार सुरू झाला.येथें इमारती बांधल्या गेल्या,पूल उभारण्यांत आले, प्रिन्सेस स्ट्रीटसारखे सुंदर रस्ते तयार करण्यांत आले, त्याचप्रमाणें वाङ्मय, शास्त्र व विद्या या बाबतींत या शहराची चांगलीच प्रगति झाली. नॉक्स, मांटगोमेरी, रॅमसे,बर्न्स,स्कॉट यांसारखे नामांकित ग्रंथकार उदयास आले. 'ब्लॅकवुड्स मॅगाझिन' व 'एडिंबरो रिव्ह्यू' हीं दोन मासिकें प्रसिद्ध होऊं लागलीं. १९१० मध्यें शहरांत नवीन बाजार उघडण्यांत आले, व ठिकठिकाणीं कत्तलखाने स्थापण्यांत आले. सन १९१३ मध्यें कॉर्स्टरफाईन टेकडीवर एक प्राणिभवन उघडण्यांत आलें व त्यामध्यें जगांतील निरनिराळे जंगली प्राणी प्रदर्शनार्थ ठेवण्याचें ठरलें. सन १९१७ मध्यें ट्राम्वे कंपनी विकत घेऊन तिची सर्व व्यवस्था म्युनिसिपालिटीनें आपल्याकडे घेतली व साऊथ क्विन्सेबरी वगैरे इतर भागांत नवी ट्राम्वे सुरू करण्यांत आली.

सन १९२० त एडिंबरोचें सरहद्द वाढविण्यासंबंधीचें बिल मंजूर झाल्यामुळें एडिंबरोच्या कक्षेंत, लीथ, लिबरटन, कॉलिंटन, कॉर्स्टरफाईन इत्यादि शहरांचा व त्यांच्या सभोंवतालच्या मुलखाचा अंतर्भाव होऊं लागला आहे व त्यामुळें एडिंबरो हें क्षेत्रफळाच्या दृष्टीनें लंडनच्या खालोखाल मोठें शहर होऊन बसलें आहे. या बिलामुळें एडिंबरोचें क्षेत्रफळ १०५९७ एकरांपासून तों ३२४०२ एकरांपर्यंत वाढलें. क्षेत्रफळ वाढल्यामुळें व शहराची व्याप्ति विस्तृत झाल्यामुळें त्या मानानें म्युनिसिपालिटीच्या सभासदांची संख्या ५० पासून ७१ पर्यंत वाढली आहे व नवीन सात वार्ड पाडले गेले आहेत. १९२० सालीं खानेसुमारी झाली त्या वेळीं एडिंबरोची लोकसंख्या ४५०००० इतकी भरली.

शहरामध्यें मोठमोठ्या लोकांचीं जीं स्मारकें होतीं त्यांतहि अधिक भर पडली. थॉमस कार्लाईलचा एक पुतळा उभारण्यांत आला, तसेंच ग्लॅडस्टनचें स्मारकहि करण्यांत आलें. स्टीव्हन्सनच्या स्मरणार्थ स्टीव्हनसन क्लबची स्थापना करण्यांत आली. फ्रीमेसन संस्थेनें आपली प्रचंड इमारत या शहरांत बांधली व निरनिराळे अजबखाने अस्तित्वांत आले.

एडिंबरो हें राजधानीचें शहर असल्यामुळें व व्यापाराची देवघेव त्या ठिकाणीं पुष्कळच होत असल्यानें नवीन नवीन बँका व विमाकंपन्या स्थापन होणें अगदीं साहजिकच होतें व त्याप्रमाणें त्या स्थापन केल्या गेल्या.

क्विन्सेबरी व एडगर या बंदरांजवळ एडिंबरो असल्यानें महायुद्ध सुरू होतांच या बंदरांचें लष्करीदृष्ट्या महत्त्व वाढल्यामुळें एडिंबरोलाहि विशेष महत्त्व प्राप्त झालें. त्या ठिकाणीं लष्कराची छावणी ठेवण्यांत आली. जर्मन झेपेलिनची १९१६ मध्यें ज्या वेळीं या शहरावर धाड आली त्या वेळेपासुन या शहराच्या संरक्षणार्थ वैमानिक दलाची तरतूद करण्यांत आली. महायुद्धाच्या शेवटीं शेवटीं एडिंबरो हें रजेवर असलेल्या, अमेरिकन लष्कराची व वसाहतीच्या सैन्याची विश्रांतीची जागा झालें होतें.

**एडेन जॉर्ज—लॉर्ड ऑकलंड** ( १७८४–१८४९ )— हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल ( १८३६–४२ ). ऑक्सफोर्ड येथें शिक्षण संपवून १८०९ मध्यें हा वकिली करूं लागला. १८१४ त बाप वारल्यावर बॅरन ऑकलंड या नांवानें हा हौस ऑफ लॉर्ड्सचा सभासद झाला. १८३० त बोर्ड ऑफ ट्रेड( व्यापारीमंडळ )चा अध्यक्ष व टांकसाळीवरचा मुख्य अधिकारी व १८३४ सालांतले कांहीं महिने पहिला आरमारी अधिकारी या जागांवर त्यानें काम केलें. १८३५त त्याला हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल करण्यांत आलें. त्यानें गव्हर्नर जनरल असतांना हिंदी लोकांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें. यात्रेकरूंवरील कर, देवस्थानावरचा सरकारी ताबा, लोकांच्या धार्मिक संस्कारांच्या वेळीं कंपनीचें सैन्य व अधिकारी यांनीं हजर रहाणें यांसारख्या गोष्टी ऑकलंडनें बंद केल्या. एथपर्यंत ठीक झालें; व त्याला इंग्लंडांतील कारस्थानी मंत्र्यांनीं व हिंदुस्थानांतील बदसल्लागारांनीं जर राजकीय उलाढालींत व लष्करी मोहिमांत ओढिलें नसतें तर त्याची पांच वर्षांची अमदानी शांततेंत व उपयुक्त कामांत जाऊन त्याच्या व इंग्लंडच्या नांवाला काळीमा लागला नसता. या वेळीं इंग्लंडचा परराष्ट्रीय मंत्री लॉर्ड पामरस्टन होता. त्याला रशियाची फार भीति वाटत होती व त्याकरितां अफगाणिस्तान आपल्या कह्यांत ठेवण्याची त्याची धडपड असे. तेव्हां त्याच्या चिथावणीनें लॉर्ड ऑकलंडनें अफगाणिस्तानांत थोडी खळबळ दिसतांच त्याशीं युद्ध पुकारलें ( १८३८ ). युद्धाचा आरंभ चांगला

होऊन लॉर्ड ऑकलंड, युद्धसेनापति सर जॉन कीन वगैरेंनां मोठीं बाक्षिसें मिळालीं पण लवकरच पारडें फिरून ब्रिटिश सैन्याची सरसहा कत्तल झाली. आपलें धोरण फसलें व पहिल्या चुकीची दुरुस्ती करण्यास अवसर न देतां डायरेक्टरांनीं दुसरा गव्हर्नर जनरल नेमिला या दुहेरी अपमानांत ऑकलंडला स्वदेशाचा रस्ता धरावा लागला.पण अधिकारावर असलेल्या त्याच्या पक्षानें त्याच्या चुक्यांवर पांघरूण घालून त्याला पहिला आरमारी अधिकारी नेमिला. [ ट्राटर-अर्ल ऑफ ऑकलंड; स्मिथ-इंडिया ].

**एडेसा**—एडेसा हें वायव्यमेसापोटेमियांतील एका प्राचीन शहराचें ग्रीक नांव उ. अ. ३७° २१' व पू. रे. ३९° ६'. १५ व्या शतकांत याला उर्फा नांव मिळालें.

इ ति हा स.—भूमध्यसमुद्र व पूर्वेकडील देश यांमधील दळणवळणाच्या मार्गावर 'उरहाई एदेसा' असून बाविलोनियन व असुरियन काळांत त्याचें बरेंच महत्त्व असावें. नंतरच्या असुरियन साम्राज्याच्या वेळीं ह्या ठिकाणीं अरेमाइक भाषा बोलत असत.

ग्रीकोरोमन काळः—इ. स. पूर्वी ३०४ त उरहाईचें पुनरुज्जीवन पहिल्या सेल्युकस निकेटरनें केलें. ग्रीक संस्कृतीचें प्राबल्य असून देखील येथें अरेमाइक भाषा चालत असे. इ. स. पूर्वी १३२ त सातव्या अँटायोकस सिडेटेसच्या वेळीं एडेसा हें एका राजघराण्याची राजधानी झालें. या घराण्यांत ३० पुरुष झाले. पहिल्या राजाचीं अनेक नांवें प्रसिद्ध आहेत; त्यांपैकीं ओसरोझ (ओरहाई) हें एक नांव आहे. पार्थिया व रोम या प्रतिस्पर्धी साम्राज्यांच्या मर्यादेवर असल्यामुळे एडेसा कधीं एकाच्या व कधीं दुसऱ्याच्या हातीं जाई. लुकुलस, पांपे व क्रेसस याच्या स्वाऱ्यांच्या वेळीं एडेसा हें रोमचें मित्रराष्ट्र होतें. ११६ मध्यें येथें बंड झाल्यामुळें ट्राजनचा कान्सल एल् क्वायेटस यानें एडेसा शहर हल्ला करून लुटलें.

सस्सन काळः—२२६ त पार्थियन साम्राज्याचा लय होऊन सस्सन राज्याचा उदय झाला. हें रोमचें प्रतिस्पर्धी होतें. २४२ त एडेसा स्वतंत्र झालें पण २४४ त पुन्हां रोमच्या अमलाखालीं गेलें. २६० त इराणच्या पहिल्या शापूरनें एडेसाला वेढा दिला. व व्हॅलेरियनचा पराभव करून त्यास कैद केलें. ३६३ नोव्हियननें बहुतेक मेसापोटेमिया दुसऱ्या शापूरला दिला. शापूरनें एडेसा येथील ख्रिस्त्यांचा फार छळ केला.

इस्लाम काळः—सातव्या शतकारंभीं दुसऱ्या खुश्रूनें एडेसा शहर घेतलें. ६३८ त एडेसा मुसुलमानांच्या व १०४० त सेल्जुकांच्या ताब्यांत गेलें. १०९८ त पहिल्या धर्मयुद्धाचे वेळीं गॉडफ्रे बुलीननें हें शहर घेतलें. ११८२ त सलाद्दीननें हें शहर घेतलें. १६३७ त जेव्हां चवथ्या अमुराथनें बगदाद जिंकून मेसापोटेमिया आपल्या राज्यास जोडिला त्या वेळीं एडेसा तुर्कांच्या ताब्यांत गेलें. व त्याला त्यांनीं उर्फा नांव दिलें.

आधुनिक शहरः—उर्फा निमरूड डाघचे ईशान्येस आहे. शहराच्या पश्चिमेकडील कोपऱ्यांत दोन स्तंभ आहेत. त्यांनां 'निमरूडचें सिंहासन' असें म्हणतात. हें व शहर यांच्यामध्यें बिरकेटश्रलखलील नांवाचें तळें आहे. याच्या जवळच श्रब्राहामचें थडगें आहे. शहराच्या मध्यभागीं उलुगामी नांवाची सर्वांत मोठी मशीद आहे. उर्फा हें अलेप्पो प्रांतांतील त्याच नांवाच्या जिल्ह्याची राजधानी आहे. १८९५ त येथें ६५००० लोकसंख्या होती.

**एडोम**—एडोम हा प्रांत पॅलेस्टाईनचे दक्षिणेस मृत समुद्र व आकाबाचें आखात यांच्यामध्यें आहे. पूर्वेस मोआब व अरबस्तानचा उत्तर भाग, पश्चिमेस सिनाईचें द्वीपकल्प, इजिप्त व इस्रायल हे होत. एडोम प्रांत नापीक आहे. या प्रांतामधून व्यापाराचा मार्ग असल्यामुळें याचें महत्त्व फार होतें. एडोमचे प्राचीन रहिवाशी शासु (तिरंदाज) होते. जुन्या करारावरून असें दिसतें कीं, एडोमाईट लोकांनीं तेथील मूळच्या होराईट अथवा 'गुहानिवासी' लोकांनां हांकून दिलें.

एडोम हें इस्रायलपेक्षां प्राचीन राष्ट्र आहे. इस्रायलचा पहिला राजा सॉल यानें एडोम जिंकिलें. डेव्हिडनें देखील एडोम जिंकलें होतें. ९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत एडोमवर जूडाच्या जेहोशाफटचा अंमल होता. परंतु त्याचा मुलगा जेहोरम याच्या विरुद्ध एडोमनें बंड केलें. जूडाच्या अमेशिया राजानें पुन्हां एडोम जिंकिलें. त्याचप्रमाणें उझियानें देखील एडोम सर केलें होतें. नंतर असुरियाविरुद्ध झालेल्या फिलिस्ट्रीया व इस्रायल यांच्या संघास एडोम मिळालें व एलाथमधून जूडियन लोकांस घालवून दिलें. सातव्या शतकांत जंगली लोकांच्या टोळ्यांनीं एडोम व मोआब यांनां बराच त्रास दिला. यरुशलेमचा पाडाव होण्यापूर्वी पुष्कळ यहुदी एडोमला येऊन राहिले होते. इ. स. पूर्वी ३१२ त नेबाटिअन लोकांनीं एडोमाईट लोकांनां दक्षिण जूडाप्रांतांत हांकून दिलें. या नवीन प्रांताला इडुमिया नांव मिळालें.

**एड्रियन**—या नांवाचे सहा धर्मगुरु (पोप) इतालींत होऊन गेले.

प हि ला ए ड्रि य न.—(७७२-७९५) हा शार्लमेन बादशहाचा समकालीन होता. याचें व शार्लमेन बादशहाचें चांगलें सख्य होतें. लँबर्डीक राजानें एड्रियनच्या मुलुखांत स्वारी केली तेव्हां शार्लमेनं बादशहानें एड्रियन यास फार मदत केली. जरी या दोन थोर पुरुषांमध्यें ख्रिस्ताच्या मूर्तीची पूजा करावी किंवा न करावी याबद्दल मतभेद होता तरी यांचें सख्य शेवटपर्यंत कायम राहिलें.

दु स रा (८६७ ८७२).—यानें पहिल्या एड्रियनप्रमाणें फ्रान्स देशाच्या बादशहाशीं सख्य ठेवण्याचा

प्रयत्न केला. पण त्यास फ्रेंचांचा बादशहा दुसरा लुई याच्या मनाप्रमाणें चालावें लागत असे.

तिसरा (८८४-८८५).—हा वर्म्स गांवास जात असतांना वाटेंत मरण पावला.

चवथा (११५४-११५९)—धर्मगुरूच्या गादीवर बसलेला हा एकटाच इंग्रज होय. याचा जन्म ११०० मध्यें हर्टफर्ड परगण्यांत लांगले गांवीं झाला. हा पॅरिस शहरीं गेला व ११३७ सालीं यास प्रथम प्रायर व नंतर ॲबट नेमिलें. तिसऱ्या युजेनिसनें यास अलबानो येथें कार्डीनलची बहुमानाची जागा दिली. ११५२ ते ११५४ पर्यंत हा स्कॅन्डिनेव्हियांत होता. ११५४ सालीं हा धर्मगुरु झाला. पुढें हा, रोमची सेनेट सभा व तेथील बादशहा यांमध्यें तंटेबखेडे उत्पन्न झाल्यावरून यांस रोमं शहर कायमचेंच सोडावें लागलें.

पांचवा.—हा १२६६ मध्यें धर्मगुरू झाला व त्याच वर्षी जुलै महिन्यांत मरण पावला.

सहावा (१५२२-२३):—जन्म(१४५९)युट्रेच शहरीं. लहानपणीं धर्मशास्त्र, ख्रिस्तीधर्माचे कायदेकानु व तत्त्वज्ञान यांचा यानें अभ्यास केला व त्यांत बरेंच प्रावीण्य संपादन केलें. हा पांचव्या चार्लस बादशहाचा शिक्षक होता. पुढें स्पेन देशांत पांखंडी मताच्या लोकांची चौकशी करणाऱ्या सभेचा हा मुख्य होता. या चौकशीसंबंधानें यानें बऱ्याच सुधारणा केल्या. १५२२ सालीं हा धर्मगुरु झाला. यानें धर्मखात्यांत माजलेली अंदाधुंदी नाहींशी करण्याचा प्रयत्न केला. यूरोपांतील ख्रिस्ती राजांत एकी करण्याच्या प्रयत्नांत यास यश आलें नाहीं. लूथर यास पाखंडी म्हणून शिक्षा व्हावी असें याचें मत होतें. हा १५२३ सालीं मरण पावला.

**एदलाबाद** (१)–मुंबई. पूर्व खानदेश. एदलाबाद पेठ्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. सुमारें तीन हजार. मोंगलांनीं हें गांव घेतलें त्यावेळीं हें भरभराटींत असून येथें एक बारमाही पाणी असलेला तलाव होता (१६००). याच्या भोंवती एक चांगला तट असून येथें एक जुना किल्ला होता असें याचें १७५० मध्यें वर्णन केलेलें आहे. आतां सर्व गांव पडकें दिसतें. येथील किल्ला मोंगलांनीं बांधला असें सांगतात. हल्लीं हा पडून गेला आहे. याखेरीज कांहीं जुन्या इमारतींचे अवशेष व विहिरी आढळतात. येथें महालकरी असतो.

(२) मुंबई. धारवाड जिल्हा शेगांवच्या पश्चिमेस चार मैलांवर हें एक ओसाड खेडें आहे. येथें एक पवित्र मानलेली गंगाभावी नांवाची विहीर असून जानेवारी महिन्यांत येथें जत्रा भरते व त्यावेळीं २००० पर्यंत यात्रेकरू जमतात. विहिरीच्या आसपास सुंदर आमराई आहे. विहिरींतून एका लहानशा ओढ्याचा उगम झाला आहे. येथें कामेश्वराचें देऊळ असून त्यांतील लिंग स्वयंभू आहे असें मानतात. विहिरीच्या वायव्येस एक लेणें असून त्या ठिकाणीं जन्हू साधु राहत असे असें म्हणतात. याविषयीं आख्यायिका अशी आहे कीं, हा साधु विहिरींचें सर्व पाणी पिऊन ती कोरडी ठणठणीत करीत असे व पुन्हा कानावाटे पाणी सोडून ती पूर्ववत् करीत असे. या देवळास इनाम जमीन असून ती देवाची पूजा करणाऱ्या व देवळांत दिवा लावणाऱ्या पुजाऱ्याकडे आहे. मकरसंक्रांतीस येथें जत्रा भरते. या विहिरींत स्नान करून देवाची पूजा केली असतां तापानें पछाडलेला रोगी बरा होतो असा समज आहे.

**एनमे**—उर्फ थिग्विन. लोअर ब्रह्मदेशांतील मियॅंगम्या जिल्ह्याची एक वायव्येकडील टौनशिप (तालुका). क्षेत्रफळ ३१५ चौ. मै. लो. सं. (१९०१) ५९३६७. खेडीं १२२. मुख्य ठिकाण एनमे. येथील जमीन सपाट असून सुपीक आहे. एकतृतयांशाहून अधिक लोक करेन आहेत. येथें ख्रिश्चन लोकांचा भरणा बराच आहे.

**एनॅमल**—(कांच मिना) (अ) कांचमिना देणें म्हणजे कांचेच्या रसानें एखादें पात्र मढविणें होय. हा सिलिका, शेंदूर (मिनिअम) आणि पोट्याशच्या रासायनिक मिश्रणानें बनलेला रस धातूंच्या प्राणिदांशीं भट्टीमध्यें द्रवरूप असतां मिश्र करून निरनिराळ्या रंगांत तयार करतां येतो. हल्लीं एनॅमल म्हणजे अशा कांचरसानें भांड्यांवर काढलेलीं रंगीत चित्रें वगैरे समजतात.

(आ) धातूंवरील कांचमिना अगर एनॅमल हें मातीवरील मिन्यासारखेंच असतें, पण त्यांत पुढीलप्रमाणें थोडे फरक दाखवितां येतीलः—मातीवरील मिना थंड अथवा कच्च्या स्थितींत करतां येतो व धातूवर मिना करणें झाल्यास भट्टींतून गरम स्थितींतच करावा लागतो. केव्हां केव्हां जाहिरातींच्या पाट्या तयार करतांना लोखंडावर मिन्याच्या कामाचें मिश्रण मातीवरील कच्च्या कामाप्रमाणेंच केलेलें आढळतें.

प्राचीन असुरियन व ईजिप्शियन मातीचीं भांडीं व विटा यांवरील एनॅमलिंगमध्यें बरीच प्रगति झाली होती. अद्यापपावेतों टेल-एल-येहूदिया येथील तिसऱ्या रामेसिसचा राजवाडा व बाबिलोनियांत सांपडलेल्या निमरूदच्या राजवाड्यावरील धातूचें एनॅमलिंग काम निःसंशय उच्च दर्जाचें गणलें जात आहे.

अंगावर घालावयाच्या दागिन्यांत व इतर शोभेच्या वस्तूंत कांचमिना वापरल्याचीं उदाहरणें जुन्या ग्रीक व रोमन लोकांतून आढळून येतात. यांमध्यें ग्रीक शिल्पकारांनीं ख्रि. पू. चवथ्या व पांचव्या शतकांत कांचमिन्यावर जास्त परिश्रम केल्याचें दिसतें. जुन्या रोमन लोकांत प्राचीन ग्रीक लोकांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति जास्त असल्यानें ही कांचमिन्याची कला फार वाढली नाहीं. तथापि रोमन व एट्रुस्कन लोकांनीं केलेल्या कांचमिन्याच्या कामांत बरीच कल्पकता दाखविली आहे. बहुशः प्राचीन कांचमिन्याचीं कामें हीं सर्व सोनें व रुपें या धातूंवर केलेलीं आढळतात.

पुढें या असल्या कामास ग्राहकांची वाण पडूं लागली व उच्च दर्जाचें सोन्यारुप्यावरील कांचमिन्याचें काम जवळ जवळ लुप्त झालें.

सहाव्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत इंग्लंडमध्यें केल्टिक व सॅक्सन् लोकांचीं कांचमिन्याचीं कामें दृष्टीस पडतात. आयर्लंडमधील डब्लिन येथील पदार्थसंग्रहालयांत असलेला विख्यात आरडाघ पेला हें सॅक्सन लोकांचें या कलेंतील कौशल्याचें स्मारक होय. या पेल्यासारखीं दुसरीं पुष्कळ कामें केलीं गेलीं होतीं पण त्यांतील मिन्यांत कौशल्य नसून फक्त मिन्याच्या कलेची प्राथमिक अवस्था आढळते. ब्रिटिश पदार्थसंग्रहालय अथवा अजबखान्यांत एक ढाल आहे. तीवरील लाल कांचमिन्याचें काम अवर्णनीय आहे.

मिन्याची कला आयर्लंडमधून बिझांशिअममध्यें गेल्याचें दिसतें. या ठिकाणीं ही कला बरीच वाढीस लागली होती. इ. स. ११०५ सालचें अत्युत्तम मिन्याचें काम म्हणजे "पाला डी ओरो" (व्हेनिस येथील सेंट मार्कच्या देवळाकरितां पडदा) कान्स्टान्टिनोपलहून आणल्याचा दाखला आहे. हें काम क्लॉइसोन मिन्याचें आहे.

कां च मि न्या चे रं ग.—कांचमिन्यांतील रंगांत लाल, निळा आणि पिंवळा हे रंग थोड्या सफेत व काळ्या रंगाशीं मुख्यतः मिश्रित असतात. यांतून केव्हां केव्हां हिरवा व करडा हे दुय्यम रंग म्हणून वापरतात. बिझांशिअममधील सर्व कांचमिन्याच्या कामांतून सूक्ष्म रंगाच्या नाजूक छटा आढळून येत नाहींत. तशीच कांचमिन्याची पद्धत पण थोडी निराळी असल्याची दिसते. बिझांशिअम पद्धतींत रंग नेहमीं निरनिराळे खांचे पाडून एकमेकांशेजारीं भरलेले दिसतात व जवळ येणारे रंग द्रवरूप असतांना देखील ते परस्परांत मिसळत नाहींत. बिझांशिअमचीं कांचमिन्याचीं कामें यूरोपमध्यें सर्वत्र दृष्टीस पडतात.

पंधराव्या शतकाच्या अखेरीस या कलेंत झपाट्यानें वाढ झाली. इतकेंच नव्हे तर तिच्या पद्धतींतहि बरेच बदल झाले. १५ व्या शतकापर्यंत मिन्याचें काम करावयाचें म्हणजे धातूच्या पात्रावर खांचा पाडाव्या लागत व त्यांत मिना रहात असे, ही कल्पना रत्नें किंवा खडे बसविण्यासारखीच होती याच सुमारास असें आढळून आलें कीं, धातूला मिना चढवावयाचा असल्यास तो राहण्याकरितां धातूंत खांचा पाडून कोंदणें करण्याची जरूर लागत नाहीं. त्याऐवजीं खाचांच्या दोहों बाजूंस मिना देऊन नंतर या मिन्यावर दुसरें मिन्याचें पूट द्यावें म्हणजे झालें. या दुसऱ्या पुटानें पहिल्या मिन्याला धक्का पोंचत नाहीं.

आतांपर्यंत बहुतेक कांचमिन्याच्या चित्रांत काळ्या पृष्ठभागावर पांढऱ्या रंगांत काम केलेलें असे. हा पांढरेपणा ज्या ठिकाणीं दाट मिना असेल तेथें विशेष दिसत असे आणि पातळ थर बसलेल्या भागावर तेंच एनॅमिल किंचित् करडें दिसे. या योगानें प्रकाश व छाया यांचें कांहिंसें दृश्य दिसत असे. या प्रकाराला ग्रिसाइल म्हणत; परंतु केवळ हाच प्रकार बराच काळपर्यंत रूढ झाला नाहीं व पुढें तर मिन्यांतील चित्रें व वेलबुट्टी जास्त जास्त नकशीदार होऊं लागली, तथापि या कामांत भांड्याची किंमत मुख्य असून चित्र हें गौण असे. ग्रिसाइल पद्धत ही मातीच्या भांड्यावर एनॅमल करावयाच्या 'पाटे सुरपाटे' या नांवाच्या पद्धतीसारखीच होती व तिच्यांतील चित्ताकर्षकपणा बराचसा भांड्याच्या धातूंवर व आकारावर अवलंबून असे.

असुरी व इजिप्शिअन संस्कृतीच्या कालापासून कांच मिन्याच्या कलेंत मधून मधून प्रगति व लुप्तावस्था अशा क्रिया एकामागून एक अनेक वेळां चाललेल्या दिसतात; परंतु या कलेचें जेव्हां जेव्हां पुनरुज्जीवन झालें त्या प्रत्येक वेळीं या कलेंत मागील सर्व गोष्टी येऊन थोडीफार वाढ होत गेली. पांचशें वर्षांपूर्वी अखेरचें पुनरुज्जीवन होऊन त्याबरोबर एनॅमल कलेचा नवा जन्म झाला. ही कला पुढें एक शतकपावेतों वाढत गेली. पुढें ही कला पुनःश्च अस्तंगत होऊन बरींच वर्षें लुप्तावस्थेंत राहिली. अलीकडे एनॅमल कलेंत पुष्कळच सुधारणा झाली आहे. शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीमुळें एनॅमलमधील निरनिराळ्या क्रियांचें व कृतींचें ज्ञान वाढत चाललें आहे. कांचमिना हा पदार्थ तयार करणें व तो धातूंवर चढविणें, या क्रिया अधिक चांगल्या होऊं लागल्या आहेत. मुख्य धातू व त्यांचीं इतर धातूंबरोबर मिश्रणें यांच्या ज्ञानाच्या वाढीबरोबर अशुद्ध धातूंपासून शुद्ध धातू कशी तयार करावी व इच्छित आकाराचें भांडें व त्याचा इष्ट त्या आकाराचा पृष्ठभाग कसा तयार करावा हें बरोबर समजूं लागलें आहे. त्याचप्रमाणें दगडी व लांकडी कोळशाऐवजीं वीज व धूर हीं उष्णता देण्याचीं नवीन साधनें उपलब्ध झाल्यामुळें वाटेल तितकें उष्णमान उत्पन्न करतां येतें.

कांचमिना हा पदार्थ तयार करण्यांतहि पुष्कळ प्रगति झाली आहे. पूर्वी रंगाचे प्रकार व छटा फार मर्यादित असत; पण आज वाटेल तितक्या जाती व अनेक निरनिराळ्या पाहिजे त्या छटा तसेंच पूर्ण पारदर्शक व अपारदर्शक, कठिण, मऊ असे अनेक गुणधर्म एनॅमलमध्यें सांपडतात. आतां फक्त दोनच असे रंग आहेत कीं, जे अद्यापि आढळले नाहींत. ते म्हणजे कांचरूपांतील स्थितींत असलेला एक अपारदर्शक हिंगुळी व दुसरा लिंबाचा पिंवळा. हल्लींचें एनॅमल शुद्ध चकचकीत व टिकाऊ असतें, याचें कारण एनॅमलमधील सर्व घटक पदार्थांचें व त्यांच्या मिश्रणांच्या प्रमाणाचें पूर्ण ज्ञान आज उपलब्ध आहे हें होय.

एनॅमलचा पहिला थर रंगहीन, पारदर्शक व कांचमय मिश्रणरूपाचा असतो. याला फ्लक्स म्हणतात. हा वाळू, शेंदूर आणि पोटॅश यांच्या मिश्रणास आंच देऊन तयार

करतात. ह्या फ्लक्स अगर मूळ थरास तो द्रवरूप असतांच निरनिराळ्या धातूंच्या प्राणीदांच्या योगानें रंग देतात. व हा रंग फ्लक्सच्या सर्व भागांत सारखा पसरतो. एनॅमल कठिण अगर मृदु असणें हें वाळूच्या इतर पदार्थांशीं ( शेंदूर व पोट्याश ) असलेल्या प्रमाणावर अवलंबून असतें. कठिण एनॅमल वितळविण्यास फार आंच द्यावी लागते. एनॅमल जितकें जास्त कठिण असेल तितका त्यावर हवेचा परिणाम कमी होतो. नरम एनॅमल असेल तर हवेचा परिणाम प्रथम पृष्ठभागावर होतो, आणि नंतर सर्व एनॅमलवर तो दृष्टीस पडतो. म्हणून सर्व प्रयोगांतून कठिण जातीचें एनॅमल वापरणें हें जास्त इष्ट होय. त्याकरितां एनॅमल करावयाचीं भांडींहि शुद्ध धातूंचीं वापरणें चांगलें; कारण त्यांवर एनॅमल उत्तम रीतीनें टिकूं शकतें.

ए नॅ म ल म धी ल घ ट का व य व.—जर एनॅमल द्यावयाच्या धातूंत हीन धातूचें मिश्रण जास्त असेल, तर ती धातु एनॅमल लावतांच वितळेल, अगर धातू आणि एनॅमल चिकटून राहणार नाहींत. तसेंच ज्या एनॅमलमध्यें सोडा अथवा पोटॅश जास्त प्रमाणांत व शेंदूर कमी प्रमाणांत असेल त्याला चिरा पडण्याची जास्त भीती असते व तें धातूला चांगलें चिकटूनहि रहात नाहीं.

शुद्ध सोन्याचें अथवा शुद्ध तांब्याचें पातळ भांडें एनॅमल करावयास उत्तम. रुप्याचें भांडें सहसा वापरूं नये व वापरावयाचेंच असल्यास काळजीपूर्वक शुद्ध केलेल्या चांदीचें घ्यावें.

ए नॅ म ल म धी ल रा सा य नि क द्र व्यें.—एनॅमलची चकाकी ही त्यांतील पदार्थांच्या योग्य प्रमाणावर, त्यांचें मिश्रण पूर्णपणें एकजीव होण्यावर अवलंबून असते. मिश्रणाचा पूर्ण एकजीव होणें हें भट्टीला सारखी एकच प्रमाणांत उष्णता मिळण्यावर अवलंबून असतें. यासाठीं उत्तम रीतीनें बनविलेला फ्लक्स अथवा कच्चा एनॅमल रस घेऊन त्यांत आपल्यास ज्याप्रमाणें दाट किंवा फिकट रंग पाहिजे असेल त्या मानानें प्राणिद घालावें. एनॅमलचे रंग कांहीं वेळा प्राणिदांच्या रंगांपेक्षां फ्लक्समधील पदार्थांच्या निरनिराळ्या प्रमाणामुळें बदलतात. उदाहरणार्थ वैडूर्य निळा रंग बनवावयाचा असल्यास कृष्णताम्रप्राणिद ( ब्लॅक ऑक्साइड ऑफ कॉपर ) मध्यें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सिंधुकर्बित ( कारबोनेट ऑफ सोडा ) मिसळावा लागतो आणि पिंवळट हिरवा करावयाचा असल्यास त्याच प्राणिदाशीं शेंदुराचें प्रमाण वाढवावें लागतें. कोणतेंहि पारदर्शक एनॅमल आपारदर्शक करणें असल्यास कथिल आणि शिसें यांचें भस्म ( कॅल्क्स ) त्यांत मिसळावें. पांढरें एनॅमल करावयाचें असल्यास फ्लक्समध्यें स्टॅनिक व आर्सेनिअस ॲसिड घालावें. या ॲसिडच्या कमीअधिक प्रमाणानें एनॅमल दाट अगर पातळ होतें.

ए नॅ म ल च्या प द्ध ती चा वि चा र.—एनॅमल तयार केल्यानंतर त्याचा चुरा करावा लागतो. ह्यासाठीं एनॅमल एका दगडी खलांत टाकून त्यांत पाणी घालतात. नंतर वरून लांकडी मुसळानें घाव देतात. त्यानंतर खल घट्ट धरून त्यांत बत्त्यानें जोरानें घोटून एनॅमलची बारीक पूड करतात. या भुकटीस पुष्कळ पाण्यानें धुवून काढल्यानंतर तींत असणारे बारीक कण काढून टाकितात यानंतर ज्यावर एनॅमल करणें आहे त्या भांड्यास ॲसिड आणि पाणी यांनीं धुवून काढावें लागतें. तांब्यावर नैट्रिक ॲसिड, रुप्यावर सल्फ्यूरिक ॲसिड व सोन्यावर हायड्रोक्लोरिकॲसिडचा प्रयोग करितात. ह्या धातूवरील ॲसिडचा अंश प्रथमतः पाणी व कुंचलीनें धुवून काढितात; नंतर ते ओक लांकडाच्या भुशानें पुसतात.

ए नॅ म ल च ढ वि णें.—नंतर एनॅमलची पूड ज्या भांड्याच्या ज्या भागावर चढविणें असेल, तितक्या भागावर काळजीपूर्वक व सारख्या प्रमाणांत वाजवीपेक्षां जास्त थर कोठेंहि होऊं नये अशा रीतीनें पसरतात. नंतर तें भांडें भट्टीपुढें धरून सुकवितात. सुकविल्यानंतर त्यास सावकाश रीतीनें मुशींतून अगर लोखंडी तगटावर ठेवून भट्टींत घालतात व त्याखालीं चांगली उष्णता देऊन त्यावर काळजीपूर्वक लक्ष ठेवावें लागतें. एनॅमल धातूवर सर्वत्र चकचकीत झालेलें दिसतांच तो पदार्थ भट्टींतून काढून घ्यावयाचा. एनॅमल करण्यासाठीं थोडा वेळच आंच द्यावी लागते.

ए नॅ म ल प द्ध ती.—एनॅमलिंगचे चँप्लीव्ह, क्लाइसोने बॅस्सेटेल, प्लिक–आजूर, रंगीत, एनक्रस्टेड इत्यादि अनेक प्रकार आहेत. हे सर्व प्रकार वर दिलेल्या अनुक्रमानें निरनिराळ्या काळीं प्रचारांत आले. हल्लीं या सर्व प्रकारांत बरीच प्रगति झाली आहे. यांखेरीज नवीन प्रकार अद्यापि प्रचारांत आला नाहीं. वरील प्रकारांपैकीं महत्त्वाचे म्हणजे रंगीत एनॅमल, क्रस्टेड एनॅमल, आणि प्लीक-आ-जूर हे होत.

( अ ). चॅम्प्लीव्ह, या पद्धतींत पत्र्यावर खांचा पडून धातूचा भाग बाजूंनीं वर आलेला असतो. या खांचांत एनॅमलची पूड घालून नंतर तापवितात नंतर ते कुरुंदाच्या दगडाच्या कानसीनें कानसून प्युमिस दगडानें गुळगुळीत केल्यावर पिंवळ्या रंगाच्या भुकटीनें व वाटोळ्या दगडानें त्यावर जिल्हई चढवितात.

( आ )क्लाइसोने, या पद्धतींत धातूच्या पत्र्यावर धातूच्या बारिक तारा अगर पट्ट्या चित्राच्या अगर नमुन्याच्या सर्व बाजूंना बसवितात. व त्या रुप्याच्या डाकानें अगर एनॅमलनें धातूस चिकटवितात. ह्या तारा चित्राच्या बाजूंच्या वर असल्यानें खांचा तयार होतात. त्यानंतर एनॅमल करण्याची पद्धत वरीलप्रमाणेंच होय.

( इ ). बॅस्सेटेल, या पद्धतींत धातूवर कोरींव नकशीदार काम असतें व त्यावर एनॅमल चढविलेलें असतें. ह्या

पद्धतींत बहुधा सोनें अगर रुपें या धातू वापरतात. ह्यांवर चित्र काढून मग उठावदार नकशीप्रमाणें कोरतात. यावर एनॅमल चढवितांच तें एनॅमल बिनकोरलेल्या भागाबरोबरच्या पातळींत येतें. त्यावरील चित्र हें पारदर्शी एनॅमलमधून दिसूं लागतें.

(ई) रंगीत एनॅमल, ही पद्धति वरील सर्व पद्धतींहून कृतींत व दिसण्यांत निराळी दिसते. ह्या पद्धतींत वापरावयाचे धातू तांबें, रुपें व सोनें हे होत विशेषेकरून तांबेंच जास्त वापरतात. प्रथमतः याचे कात्रीनें कापून जरूर त्या आकाराचे पत्रे अगर ताटें, तबकें वगैरे बनवितात. नंतर तीं पात्रें पाणी व ॲसिडनें धुवून काढतात. नंतर पृष्ठभागावर वरून, खालून एनॅमलच्या पुडीचा सारखा थर पसरतात, आणि नंतर त्यास आंच देतात. एनॅमलचें पाहिलें पूट बसतांच, वरील चित्र काढून घेतात व ह्यावर प्रथम शुभ्र एनॅमल अथवा दुसरें एखादें अपारदर्शक एनॅमल चढवितात. नंतर त्यावर दुसरे रंग चढविणें सोपें जातें.

(उ) ग्रिसाइल रंगित एनॅमल, ह्यापद्धतींत शुभ्र एनॅमलमध्यें पाणी अगर टरपेन्टाइन अथवा लव्हेन्डरचें तेल अगर पेट्रोलियमचा अर्क मिसळून झाल्यावर नंतर शुभ्र एनॅमलचा फिकट भाग पाहिजे असेल तेथें दाट व काळसर भाग पाहिजे असेल तेथें पातळ थर देतात. या योगानें प्रकाश व छाया यांचें प्रमाण बरोबर साधतें. अनेकवर्णी रंगित एनॅमल ह्या पद्धतींत ग्रिसाइल पद्धतीनुरूप रंगविलेल्या पदार्थावर पांढरा पारदर्शक एनॅमल सर्वत्र पसरल्यावर पाहिजे येथें सोनेरी छटा देतां येतात. इतर रंगहि निरनिराळे वर्ख लावून साधतां येतात. यावर पारदर्शक एनॅमलची पूड ठेऊन आंच देतात.

(ऊ) प्लिक-आजूर, या पद्धतीचें एनॅमल अर्धपारदर्शक (क्लॉइसन) पद्धतीप्रमाणेंच करतात.

आ ण खी कां हीं प द्ध तीः—वरील वर्णन केलेल्या पद्धतीशिवाय आणखी दोन पद्धती सध्यां प्रचलित आहेत.

पहिली पद्धतः-प्लिक–आ–जूर–पद्धतींत जशा भांड्यावर खांचा लागतात तशा हींत लागत नाहींत व दुसऱ्या पद्धतींत रंगीत एनॅमलचीं उठावदार चित्रें काढतात. ह्या पद्धतींत पदार्थावरील एनॅमल विशेष चकचकीत दिसत नाहीं. तर गिलाव्यांत काढलेल्या चित्राप्रमाणें किंचित खरबरीत दिसतें. यांत वापरावयाचें एनॅमल फार उत्तमप्रतीचें व सुंदर असतें. यांतील विशेष हाच कीं, रंगीत शिल्पांत ज्याप्रमाणें रंगाचा एकच सर्वत्र सारखा मिलाफ दिसतो, व त्यांतलि रंग पदार्थावरून चोपडल्यासारखा दिसत नाहीं. या पद्धतींत उठावदार चित्राचे निरनिराळे भाग कोणकोणत्या एनॅमलमध्यें तयार करावयाचे हें प्रथम पसंत करून ठरवितात. नंतर हीं सर्व प्रकारचीं एनॅमलें उठावदार चित्राच्या सांच्यांत वितळवितात व नंतर जडाव्याच्या कामांतील हत्यारांनीं वरील पृष्ठभागास तकाकी आणतात.

रंगीत एनॅमलमध्यें पुष्कळ प्रगति झाली आहे. ह्या पद्धतींत पदार्थावर एनॅमल दोन्ही बाजूंनीं करावयाचें असतें. यासाठीं या पद्धतींत तयार करावयाचा धातूचा पत्रा बाह्यगोल करितात, म्हणजे अर्थात् आंतील बाजू अंतर्गोल बनते. त्यामुळें भट्टींत ठेवतांना तें भांडें ज्या तगटावर ठेवतात त्या तगटावर भांड्याचे फक्त कांठच टेंकतात. आंतलें अंग लागत नाहीं. यामुळें या भांड्याच्या कडा आंत वळत नाहींत व पुन्हां पुन्हां भट्टींत घातलें तरी दोहोंबाजूंनीं एनॅमल असल्यामुळें त्यास भेगा पडत नाहींत. या पद्धतींत भांडें तयार करण्यांतहि विशेष काळजी घ्यावी लागते. जुन्या एनॅमलमध्यें सूक्ष्मदृष्टीनें पाहिल्यास पांढऱ्या रंगावर सर्वत्र भेगा पडलेल्या दिसतात. तसें होऊं नये म्हणून पुढील गोष्टींत काळजी घेतली पाहिजे. ह्याचा उपयोग त्या पत्र्यावरून दोन्ही बाजूंनीं एनॅमल चढविल्यावर दुसऱ्या तापविण्याच्या वेळीं तें एनॅमल फुटत नाहीं. हा प्रयोग फार महत्त्वाचा आहे, कारण यापुढें शुभ्र एनॅमल वर चढविण्याच्या वेळीं तें न फुटण्याची तजवीज त्यायोगें होते. या पद्धतींत आंच देण्याच्या क्रियेकडे बरेंच लक्ष पुरविलें पाहिजे, पण त्याहीपेक्षां पत्रा यांत्रिक पद्धतीनें तयार करण्यांत जास्त काळजी घ्यावी लागते ती अशीः—

(१) पत्र्याचा धातू उत्तम असला पाहिजे. (२) पत्र्याची जाडी सर्वत्र सारखी असून त्याचा आकार सारखा असला पाहिजे. (३) त्याला या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सारखा बांक असावा. (४) पत्र्यावर प्रथमचें एनॅमलचें पुट नियमित दोन्ही बाजूंनीं सारख्या जाडीचें व पत्र्यावर सर्वत्र पसरलेलें असावें. (५) दुसरे कोणतेहि इतर रंग–सफेतखेरीज–वापरावयाचे असल्यास, सफेत प्रथमतः पुरा सुकल्यावर भांडें भट्टींत घालावें. (६) भट्टी चांगली पेटलेली असली पाहिजे;(७) भट्टींत ठेवावयाचें तगट कडकडीत तापलेलें पाहिजे; (८) त्यावर ठेवलेल्या पदार्थावर एनॅमल चढवितांच, तो चटकन भट्टींत घालून भट्टीचें दार झटकन लावलें पाहिजे कारण किंचितहि थंड वारा आंत जातां उपयोगी नाहीं. (९) भट्टींत पदार्थावर एनॅमल चढूं लागतांच लहान पदार्थावर हें एनॅमल एका मिनिटांतच चढतें. भट्टीचा दरवाजा थोडासा उघडून झाला पाहतां आलें पाहिजे; (१०) पदार्थावर एनॅमल सर्वत्र चकचकूं लागतांच तो पदार्थ भट्टींतून काढून घेतला पाहिजे.

ए नॅ म ल व र स फे त रं ग दे ण्या ची क्रि या.—एनॅमलवर सफेत रंग कोणत्या पद्धतीनें द्यावयाचा ही ज्याच्या त्याच्या आवडीची गोष्ट आहे. कोणी एनॅमलमध्यें इतर पातळ पदार्थ मिसळण्यापेक्षां शुद्ध पाणी जास्त पसंत करतात. कोणी टरपेन्टाइन आणि चरबीयुक्त टरपेंटाइन तेल तसेंच लव्हेन्डरचा अर्क वगैरे पदार्थ एनॅमलमध्यें मिश्र

करण्यास उपयोगांत आणितात. तेलाचें मिश्रण वाळण्यास काळ जास्त लागतो व या योगानें चित्रावर पाण्यांतील एनॅमलपेक्षां जास्त छटा उमटवितां येतात. अशी जरी स्थिति आहे तरी तेलामधील मिश्रणांत बरेंच वैगुण्य आहे. एनॅमलवर सफेती देणें हें विशेष त्रासदायक नाहीं. फक्त पारदर्शी एनॅमलची बारीक केलेली पूड एनॅमल केलेल्या पदार्थांवर सारख्या जाडींत पसरावी. म्हणजे झालें ह्या कृतींत मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची म्हणजे पदार्थाला जास्त आंच पोंहोचतां उपयोगाची नाहीं. नाहींतर मिश्रणापासून सफेतींत स्टॅनिक ॲसिड आणि आरसेनिअस ॲसिड तयार होऊन तीं वायुरूपानें निघून जाऊं लागतात.

प्लिक–आ–जूर पद्धत— ही क्लॉइसोन एनॅमलिंगप्रमाणेंच असते. तथापि या पद्धतीची थोडीशी विस्तृत माहिती येथें दिली आहे.

क्लॉइसोन एनॅमल पद्धतीप्रमाणें या पद्धतींत खांचा करण्यासाठीं धातूच्या तारा किंवा पातळ पट्ट्या एनॅमल करावयाच्या भांड्याशींच डांकानें सांधीत नसून त्या एकमेकांनांच सांधतात. नंतर सांधलेल्या तारा प्लॅटिनम, तांबें, रुपें, सोनें, अगर कठिण पितळेच्या पत्र्यावर ठुसत्या ठेऊन देतात, आणि एनॅमल वितळून तयार होऊन पुन्हां निवून थंड होऊन घट्ट झाल्यावर या तारा सहज काढून घेतां येतात. प्लीक–आ–जूर पद्धतीनें लहान भांड्यांवर किंवा पृष्ठभागावर एनॅमल करावयाचें झाल्यास त्याला धातूच्या पत्र्याचीहि जरूरी नाहीं; कारण एनॅमलचे कण लवकर वितळूं लागून ते एकमेकांस धरतात व निवून घट्ट बनतात. आणि बाहेर काढून ठेवतांच कठीण बनतात.

सांप्रत चालू असलेली एनॅमलकलेंतील व्यापारोपयोगी चढाओढ पूर्वी कधींच इतक्या थराला पोहोंचली नव्हती. आज सर्व यूरोपभर जपान व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांतून एनॅमलचीं कामें फार मोठ्या प्रमाणावर चालू आहेत. हल्लीं हलक्या प्रकारच्या एनॅमलच्या वस्तूंची फार मागणी आहे. हलकें जवाहीर, घड्याळांचीं घरें, एनॅमलचीं चित्रें, भांडीं वगैरे जिन्नस एनॅमलचे तयार होतात.

ही कला यूरोपमध्येंच फार वाढली आहे व एनॅमल केलेल्या जिनसांचा खप यूरोपमध्येंच फार आहे. यामुळें या कलेंत प्रावीण्य मिळविलेले लोकहि तिकडेच आहेत. त्यांपैकीं कांहींचा उल्लेख करावयाचा म्हणजे क्लॉडियस, पोपेलिन, ऑल्फ्रेड मेयर, पॉल ग्रँडोम, फरनांडे थेसमर, अलेक्झांडर फिशर हे होत.

[ सं द र्भ ग्रं थः—या विषयावर नेरी व सेलिनी यांच्या ग्रंथांखेरीज इतर अनेक जुने ग्रंथ आहेत. नव्या उपयुक्त पुस्तकांत एच्. कनिंगहॅमकृत ' आर्ट ऑफ एनॅमेलिंग ऑन मेटल्स ' ( १९०६ ); डल्पेराट–लिमोजेस एनॅमेल्स; अलेक्झांडर फिशर–दि आर्ट ऑफ एनॅमेलिंग अपॉन मेट्ल ( १९०६ ) इत्यादि सांपडतील. ].

' एन्नोर—मद्रास इलाख्यांतील चिंगलपट जिल्ह्याच्या पोण्णेरी तालुक्यांतील एक खेडें. हें बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यावर आहे. येथील लोकसंख्या १९०१ सालीं ३१९२. होती. ह्याचें नांव 'कत्तिवक्कम 'आहे. येथें पूर्वी बरेच यूरोपियन लोक रहात असत.

एपिक्टेटस—हा स्टोइक नांवाच्या पंथांतील एक प्रख्यात तत्त्ववेत्ता होऊन गेला. हा सुमारें ९० इसवी मध्यें प्रसिद्धीस आला. हा मुसोनिअस रूफसचा शिष्य होता. हा मूळचा फ्रिजीया येथील राहणारा असून गुलामगिरींत रोम येथें राहत असे.

या चीं म तें:—तत्त्वज्ञानाची व्याख्या त्यानें अशी केली कीं, ज्या शास्त्रापासून अमुक ग्राह्य व अमुक त्याज्य असें ठरवतां येतें तें तत्त्वज्ञान होय. या ज्ञानास तो "व्यवहारोपयोगी तत्त्वज्ञान" म्हणे. जगांतील सर्व बाह्य वस्तूंपासून अलिप्त राहणें यांतच खरें सुख आहे असें याचें मत होतें.

एपिक्यूरस—या तत्त्ववेत्याचा जन्म सॅमॉस येथें ख्रि. पू. ३४१–३४२ मध्यें झाला. याचा बाप निओक्लिस हा शिक्षक होता. एपिक्युरियन पंथाच्या तत्त्ववेत्यांच्या मतांप्रमाणें पाहतां हा स्वयंशिक्षित होता. परंतु इतर चरित्रलेखकांच्या मतें पँफिलस व नॉसिफेनिस हे याचे शिक्षक असावेत. या बाबतींत स्वतः एपिक्युरसचें असें म्हणणें आहे कीं, तो १४ वर्षांचा असतां जेव्हां हेसियड या कवीचीं काव्यें वाचतांना त्याच्या शिक्षकांस त्याचें शंकासमाधान करतां येईना तेव्हां त्यानें केवळ स्वतःच्या बुद्धिमत्तेच्या जोरावर आपला पुढील अभ्यासक्रम सुरू ठेवला. व पुढें यानें अध्यापनाचा धंदा स्वीकारिला.

प्रथम मिलिटिन, नंतर लँपस्कस व शेवटीं अथेन्स येथें तो शिकवीत असे. अथेन्स येथें त्यानें एक शाळा काढली व मरेपर्यंत म्हणजे ख्रि. पू. २७० पर्यंत आपल्या मतांचें अध्यापन केलें. याच्या मतांचा जो पंथ निघाला तो त्याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

याच्या शिष्यांपैकीं मेट्रोडोरस हेमार्कस, डायोनिसिअस व बॅसिलाइडस् हे प्रमुख होते.

या चें त त्त्व ज्ञा न.— यानें तत्त्वज्ञानाची " मानवजीवित सुखप्रद करण्याची कला" अशी व्याख्या केली आहे. हा भाग नीतिशास्त्राचा आहे व म्हणूनच एपिक्युरसच्या तत्त्वज्ञानांत नीतिशास्त्रासच प्रामुख्य दिसून येईल.या पंथांतील लोक तर्कशास्त्रास प्रमेयशास्त्र ( कॅनोनिक्स ) म्हणत असत; कारण ज्ञानप्राप्ति व सत्यान्वेक्षणाची प्रमेयें शोधून काढणें हेंच तर्काचें कार्य होय. व्यवहारदृष्ट्या जरी सुख व दुःख यांच्या योगानेंच" सत्याची " जाणीव होते तरी सत्याची परीक्षा संवेदने (सेन्सेशन)वर अवलंबून असते असें याचें मत होतें. पदार्थविज्ञानशास्त्राच्या बाबतींत हा डेमॉक्रिटसप्रमाणें " परमाणुवादी " ( अटॉमिस्ट ) होता. परमाणूच्या अंगीं एक स्वयंनिर्णयशक्ति असते व तिच्या योगानें ते आपले मार्ग

वितात हें नवीन मत त्यानें ठरविलें. जीवसृष्टीच्या उत्पत्तीसंबंधीं याचें असें मत आहे कीं,प्रथम पृथ्वीपासून सर्व तऱ्हेचे भेसूर व क्रूर प्राणी उत्पन्न झाले व विकासवादाच्या (एव्होल्यूशन) नियमाप्रमाणें जे योग्य होते ते जगले व बाकीचे नाश पावले. हा म्हणे कीं, धर्माची वाढ नैसर्गिक आहे व धर्माचा पाया मनुष्याचें अज्ञान व त्याच्या मनांतील भीति यांत आहे. याच्या मतें मानवदेह इतर प्राण्यांपेक्षां उच्च प्रकारच्या परमाणूंपासून बनलेला आहे व हे कण अग्नि, हवा, वाफ व चौथें एक अशा चार महाभूतांचे आहेत. याचें नीतिशास्त्र म्हणजे "सुखवाद (हेडोनिझम) होय. सुखाची व्याख्या त्यानें "निर्विवाद, चांगलें" अशी केली आहे.

**एपिनस, फ्रान्झ उलरिच थिओडार**—फ्रान्झ उलरिच थिओडार एपिनस याचा जन्म जर्मनींतील सॅक्सनी प्रांताच्या रॉस्टॉक गांवीं तारीख १३ दिसेंबर १७२४ रोजीं झाला. कांहीं काल वैद्यकी शिकून नंतर त्यानें गणित आणि पदार्थविज्ञानशास्त्र यांचा अभ्यास करण्यास सुरुवात केली. या दोन शास्त्रांत त्यानें लवकरच इतकी प्रगति केली कीं, बर्लिनच्या शास्त्रीय अकॅडमीनें त्याला आपला सभासद करून घेतलें. सन १७५७ सालीं सेंटपीटर्सबर्ग (हल्लींचें पेट्रोग्राड) येथील राजाश्रित शास्त्रीय अकॅडमीनें त्याला आपला सभासद केलें व तेथें त्याला प्रोफेसरची जागा मिळाली. या शहरीं तो १७९८ पर्यंत राहिला. यापुढील शेष आयुष्य त्यानें डारपाट येथें घालविलें. त्याचा मृत्यु तारीख १० आगस्ट १८०२ रोजीं झाला. रशियांत असतांना हा दुसऱ्या कॅथेराईन राणीच्या फारच मर्जीतला होता. या राणीनें आपला मुलगा पाल याचें शिक्षण याच्याकडेच सोंपविलें होतें. सदर राणीनें याच्याच देखरेखीखालीं आपल्या सर्वराज्यभर शाळा स्थापण्याचा उपक्रम केला. परंतु या कामांत म्हणण्यासारखें यश प्राप्त झालें नाहीं. एपिनस यानें विद्युत् आणि चुंबकत्व या विषयांत जे शोध लावले आहेत, जे प्रयोग केले आहेत व सिद्धान्त बसविले आहेत त्यांमुळें तो प्रसिद्धीस आला आहे. यानेंच प्रथमतः गणिताची विचारसरणी आणि त्या शास्त्राचीं तत्त्वें विद्युच्छास्त्र आणि चुंबकशास्त्र यांस लावून दाखविलीं. यानें खगोलशास्त्र, यंत्रशास्त्र, प्रकाशशास्त्र आणि शुद्धगणितशास्त्र यांच्यावर शास्त्रीय नियतकालिकांतून लेख लिहिले आहेत. एखादा ग्रह सूर्याच्या बिंबावरून जात असतां सूर्याचें अंतर काढण्यास त्या खगोलीय गोष्टीचा उपयोग करून घेतां येईल असें त्यानें दाखवून दिलें होतें.

**एपीडॉरस**—दक्षिणग्रीसमधील एक अति प्राचीन शहर. हें अरगॉलिसच्या पूर्व किनाऱ्यास असून त्याच्या उत्तरेस एक नैसर्गिक बंदर आहे. हा प्रदेश फार सुपीक आहे. एपीडॉरस हें अथेन्सच्या लगत असल्यामुळें व त्याची रचना व्यापाराला अनुकूल असल्यामुळें तें एक महत्त्वाचें शहर होऊन बसलेलें आहे.

या ठिकाणीं प्रथमतः केरियन लोकांची वसाहत होती, नंतर आयोनियन लोक येथें राहूं लागले, व पुढें अरगॉस येथील डोरियन लोकांनीं आयोनियनांस धुडकावून लावून स्वतः तेथें वस्ती केली. डोरियनांनीं येथें राजसत्ताकपद्धति सुरु केली. पुढें तिच्या जागीं अल्पजनसत्ताकपद्धति सुरू करण्यांत आली, तीहि नष्ट होऊन एकमुखी सत्ता स्थापण्यांत आली व शेवटीं फिरून अल्पजनसत्तेचा पुरस्कार करण्यांत आला.

एपीडॉरसमधील प्रेक्षणीय स्थळांपैकीं व वस्तूंपैकीं डायोनिअस व हीरा यांची देवालयें व आथेना देवतेची मूर्ति हीं प्रमुख होत. एपीडॉरसमध्यें थोलॉस म्हणून एक अतिशय सुन्दर इमारत आहे. या इमारतीच्या उत्तरेस अबाटॉन या नांवाचा एक लांब सज्जा आहे. या ठिकाणीं आजारी लोक आपण आजारांतून मुक्त व्हावें म्हणून ईश्वराची प्रार्थना करीत व झोंपीं जात. असें सांगतात कीं, झोंपेतून उठून पहावें तों ते रोगी रोगापासून मुक्त झालेले दिसत.

**एंपीडोक्लिस** (१)—याचा जन्म ख्रि. पू. सुमारें ४९० त सिसिलीमधील ॲग्रिजेंटम् या गांवीं झाला. याचें घराणें नामांकित असून सांपत्तिक स्थितीहि चांगली होती. हा फार धाडशी होता. यानें ईजिप्त व आशियामायनरमध्यें प्रवास करून इजिप्तमधील मगी लोकांपासून ज्योतिष व पौरस्त्यांपासून वैद्यक व जादूटोणा या विषयांचें ज्ञान संपादन केलें. हा स्वतःस परमेश्वर म्हणवीत असे व चमत्कारहि करून दाखवीत असे.

याच्या मरणाविषयीं दोन आख्यायिका आहेत. (१) एका सणाच्या दिवशीं हा सदेह स्वर्गास गेला, व (२) यानें एटना नांवाच्या ज्वालामुखींत उडी घातली. कारण असें करण्यानें याच्या मृत्यूचें कारण कोणासहि कळणार नाहीं व त्यामुळें त्यानें आपण "परमेश्वर" आहों असें भासविलेलें खोटें होणार नाहीं असें त्यास वाटलें असावें. परंतु त्याच्या टीकाकारांनींच ही गोष्ट कुत्सितपणानें रचली असावीसें वाटतें.

(२)—हा आयोनियन तत्त्वज्ञानपंथाचा एक प्रमुख पुरस्कर्ता होता यानें कांहीं काव्येंहि केलीं आहेत. याच्या काव्यांतील भाषासौंदर्यावरून ॲरिस्टॉटलनें यास पहिला साहित्यज्ञकवि असें म्हटलें आहे.

**याचीं मतें.**—संवेदनेपासून अगर इंद्रियांपासून ज्ञान मिळणें शक्य नाहीं. ज्ञानप्राप्तीचा मार्ग म्हणजे परमेश्वरदत्त बुद्धीचा विकास करणें हाच होय. त्यानें क्षेनॉफानिझप्रमाणेंच परमेश्वराच्या स्वरूपाच्या तत्कालीन कल्पनेवर टीका केली आहे. हा म्हणतो "हातापायांचा, कानानाकांचा परमेश्वर नसून तो सर्वव्यापी, पवित्रतम व सर्व-

शक्तिमान् आहे. " सृष्टीरचनेसंबंधीं याचें असें म्हणणें आहे कीं, 'सृष्टीचा गोल प्रथम द्रवरूप होता नंतर हळू हळू घनरूप झाला. हा गोल चार महाभूतांपासून बनलेला आहे. तीं पृथ्वी, आप, वायु, व अग्नि हीं होत. जगांतील सर्व वस्तू हीं महाभूतें निरनिराळ्या प्रमाणांत मिसळून बनतात. हें एकीभवन व पृथग्भवन ज्या शक्तीपासून होतें त्या शक्ती म्हणजे " प्रीति व द्वेष " ह्या होत. परमाणुवादाचें मूळ याच्या सृष्टीरचनेच्या विचारांतच सांपडतें."

**एफेसस**—एफेसस हें प्राचीन आयोनियन शहर आशियामायनरच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. ऐतिहासिक कालीं हें शहर कोरेसस व प्रायन या टेकड्यांच्या उतारावर होतें. येथील प्रसिद्ध आर्टेमिस अथवा डायाना देवीचें मंदीर मैदानांत एक मैलावर पूर्वईशान्येस आहे.

ग्रीक लेखकांच्या मतें येथील प्राचीन रहिवाशी 'अमेझॉन' होत. इ. स. ११ व्या शतकांत कोड्रूस नांवाच्या अथेन्सच्या राजाचा मुलगा अंड्रोक्लस यानें येथें वसाहत केली. त्याच्या वेळेपासून ग्रीक एफेससचा इतिहास सुरू झाला. एफेससची ग्रामदेवता आर्टेमिस होती. वेगवेगळ्या काळांत तिचीं निरनिराळीं रूपांतरें झालीं.

इ. स. पूर्वी ७००–५०० च्या दरम्यान या ग्रामदेवतेनें दोन वेळां शहराचा बचाव केला; पहिल्या वेळेस सिमेरियन लोकांनीं आशियामायनर उध्वस्त करून आर्टेमिशनसुद्धां जाळून टाकलें; पुन्हां क्रोससनें जेव्हां एफेससला वेढा दिला त्या वेळेस क्रोससनें मंदिरास बऱ्याच देणग्या दिल्या व तें बांधण्याच्या कामीं साहाय्य केलें. पुढें अथेन्स येथील एका पंडिताच्या मदतीनें एफेसस येथें कायदे करण्यांत आले. त्याचप्रमाणें येथें तत्त्वज्ञान व काव्य या विषयांत तज्ज्ञ असे विद्वान् निर्माण झाले. लिडियाच्या क्रोससच्या अंमलानंतर येथें इराणच्या सायरसचा अंमल चालू झाला. क्सर्क्सीझ व इराणी राजे यांनां या मंदिराबद्दल फार आदर वाटत असे. युरिमेडन येथें इराणी फौजेचा मोड झाल्यावर एफेसस अथेन्सला करभार देत असे. ४ थ्या शतकारंभीं पुन्हां इराणी अंमल चालू झाला. ३३४ त अलेक्झांडरनें येथें येऊन लोकसत्ताक राज्यपद्धति चालू केली. त्याच्या मरणानंतर लिसिमॅकसनें ग्रीक वसाहतवाले आणिले. ह्यानें आपली नायको ओमिओ हें नांव शहरास दिलें. परंतु जुनेंच नांव जास्त प्रचारांत होतें. ग्रीक अमलांत एफेसस फार भरभराटीस आलें होतें. येथें बरींच नाणीं सांपडतात. रोमन लोकांनीं सीरियाच्या अँटायोकस दि ग्रेटचा पराभव करून हें शहर परगॅममचा राजा युमेनिस याला दिलें. परगॅममच्या तिसऱ्या अॅटलसनें एफेसस हें रोमन लोकांस मृत्युपत्रांत लिहून दिलें. पाँन्टसच्या मिथ्रिडाटीझ युपेटरच्या कारकीर्दीखेरीज हें रोमन लोकांच्या ताब्यांत होतें. पहिल्या शतकामध्यें झालेल्या यादवींत एफेससनें दोनदां पराभूत पक्षास मदत केली. त्यामुळें याला चांगलाच दंड भरावा लागला.

संपत्ति व आर्टेमिसची पूजा या बाबतींत एफेससची सारखी भरभराट होत गेली. सेंटपॉलनें येथें चर्च स्थापन करून कांहीं चमत्कार दाखविले. त्याचप्रमाणें येथें जादूविषयक ग्रंथ जाळण्यांत आले. तथापि आर्टेमिसची पूजा येथें चालूच होती. आशियांतील पहिल्या प्रतीच्या शहराचा मान मिळावा म्हणून स्मर्ना व परगामम यांच्यांशीं एफेससची स्पर्धा होती. रोमन सुभेदार प्रथम येथें उतरून आपल्या हुद्याचीं वस्त्रें घेई. गॉथ लोकांनीं २६२ त शहर व मंदिर लुटून फस्त केलें. ४३१ त येथें ख्रिस्ती धर्माची सर्वसाधारण सभा भरली होती. यानंतर एफेससचा ऱ्हास झाला. जवळच असलेल्या शहरांत लोकवस्ती झाली.

वुड साहेबानें १८६३–७४ च्या दरम्यान येथें खणून शोध लाविले. आर्टेमिशनचा शोध त्याला १८६९ त लागला. वुडच्या नंतर आस्ट्रियन पुराणवस्तुसंशोधक मंडळानें खालील मुख्य इमारती शोधून काढल्या. त्या ( १ ) भव्य नाटकगृह, ( २ ) हेलेनिस्टीक आगोरा ( चौक ) व ( ३ ) रोमन अगोरा या होत.

सध्यांचें तुर्की शहर अयासोलुक हें प्राचीन शहराच्या ईशान्येस १ मैलापेक्षां जास्त अंतरावर आहे. ऐरिन रेल्वेमुळें हें सध्यां भरभराटीस आलें आहे. १३७५ त सेल्जुक, दुसरा इझावे यानें बांधिलेली मशीद येथेंच आहे.

**एबनी ( अबनूस )**—हें लांकूड उष्णकटिबंधांत सर्वत्र आढळतें. याच्या अनेक जाती आहेत. उत्तम प्रकारचें अबनूस अतिशय जड, काळेंभोर व गाभ्यांतलें असतें. याचा रंग, टिकाऊपणा, कठिणपणा व चकाकी ( पॉलीश ) येण्याचा गुण या कारणांमुळें चाकूच्या मुठी, पियोनाच्या पट्ट्या यांसारख्या नाजूक व कांतकामांत अबनुसचा उपयोग करितात. दक्षिण हिंदुस्थानांत व सिलोनांत त्रिंकोमालीच्या पश्चिमेस असणाऱ्या सपाट प्रदेशांत उत्तम अबनूस होतें. याचें झाड बुंध्यांत फारसें रुंद नसतें; साल काळी कुळकुळीत व जळल्यासारखी दिसते; पण तिच्या आंतलें लांकूड गाभ्यापर्यंत अगदीं पांढरें असतें; या झाडाच्या गाभ्यांतील लांकडाचे ठोकळे जरी पाहिजे असले तरी ते १ ते ३ फूट व्यासाचे सहज मिळूं शकतात. ईस्ट इंडियन एबनी म्हणजे बहुतेक कारोमांडल किनाऱ्यावरील एबनी होय. हें झाड ६० ते ८० फूट उंच व ८ ते १० फूट परिघाचें असतें. याची साल तुरट असून ती हुगवणीवर मिऱ्यांत मिसळून देतात. सिलोनमधील कालामांदेर नांवाचें अबनूस फार कठिण व पिंगट रंगाचें असतें. त्याचें मौल्यवान् लांकडी सामान होतें. अंगोला, जमेका वगैरे ठिकाणचें अबनूस निरनिराळ्या रंगाचें व गुणधर्माचें असतें.

टायरला येणाऱ्या व्यापारी जिनसांत एबनी असे असें एझेकील (२७. १५) वरून दिसतें. इथिओपियन लोक दर तीन वर्षांनीं एबनीचे २०० ठोकळे इराणला खंडणी म्हणून पाठवीत असें हिरोडोटस (३.९७) लिहितो. हिंदुस्थानांतला एक जिन्नस म्हणून व्हर्जिलला याची माहिती होती (जॉर्जिक्स, २. ११६). टिकाऊपणाबद्दल सायप्रेस व सेडर यांच्या तोडीची एबनीची ख्याति होती (प्लिनी नॅच. हिस्ट, (१२. ९; १६. ७९). राजदंड व मूर्ती करण्याकडे हिंदुस्थानचे राजे याचा उपयोग करीत व विषावर रामबाण म्हणून याचे पिण्याचे पेले बनवीत असें सोलिनस लिहितो (पॉलिहिस्टॉर ५१. पा. ३५३, पॅरिस, १६२१). 'एबनीला फळें पानें येत नाहींत व सूर्यप्रकाशांत असलेलें तें कधींहि दिसणार नाहीं' ही पार्सनिअसनें सांगितलेली व सौदेनें थाल्बामध्यें (१. २२) उल्लेखिलेली आख्यायिका या लांकडांच्या रंगावरून व कठिणपणावरून निघाली असावी.

**एबल सर फ्रेडरिक**—(१८२७–१९०२) हा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ १८२७त लंडन येथें जन्मला. हॉफमान याच्या लंडन येथील रॉयल कॉलेज ऑफ केमिस्ट्रींत त्याचें शिक्षण होऊन तो रॉयल मिलिटरी अकॅडेमींत रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. व पुढें लष्करी खात्यांतील रसायनज्ञाच्या जागेवर त्याची नेमणूक झाली. तेथें तो १८८८ पर्यंत होता. तेथें असतांना त्यानें स्फोटक द्रव्यांसंबंधीं (एक्स्प्लोझिव्हज) बरेच शोध लावले. त्याच्या महत्त्वाच्या शोधांपैकीं गनकॉटन तयार करण्यासंबंधींचा शोध महत्त्वाचा होता. त्यानें त्या कापसाचा लगदा (पल्प) करण्याची युक्ति काढली. त्यामुळें त्या कापसाला पाहिजे तो आकार देतां येऊं लागला व त्यामुळें त्याची उपयुक्तता वाढली व त्यावरूनच पुढें १९व्या शतकाच्या अखेर उपयोगांत आलेल्या विनधुराच्या दारूचा (स्मोकलेस पॉवडर) शोध लागला. तसेंच पेट्रोलियमचा चमकबिंदु (फ्लॅशपॉइंट) ठरविण्याच्या यंत्राचा शोध यानेंच लाविला.

**एंब्रान**—दक्षिण कानडांतून येऊन मलबारमध्यें वसाहत केलेल्या तुळु ब्राह्मणांचें मलयाळम नांव. ते तुळु व मलयाळम या दोन्ही भाषा बोलतात. यांतील कांहीं स्वतःला नंबुद्री म्हणवितात; पण ते नंबुद्रींशीं बेटिव्यवहार करीत नाहींत. हे शूद्रांचें पौराहित्य करतात. यांची लोकसंख्या ९४३ आहे. [थर्स्टन–सेन्सस रिपोर्ट].

**एमडेन**—ओल्डेनबर्गच्या वायव्येस रेल्वेनें ४९ मैलांवर असलेलें प्रशियाच्या हॅनोव्हर प्रांतांतलें एम्स नदीच्या मुखाजवळील शहर. लोकसंख्या (१९०५) २०७५४. पूर्वी एम्स नदी शहराच्या भिंतीजवळून वहात होती. परंतु आतां तिचा प्रवाह दोन मैलांच्या अंतरावर गेल्यामुळें शहरापासून नदीपर्यंत एक रुंद व खोल कालवा खणलेला आहे. या कालव्यावर अंतर्वर्ती व बहिर्वर्ती अशीं दोन बंदरें आहेत. यांपैकीं दुसरें ¾ मैल लांब, ४०० फूट रुंद व ३८ फूट खोल असल्यामुळें सर्वांत मोठें जहाज देखील याच्या धक्क्याजवळ येऊं शकतें. शहरांतून बरेच कालवे काढलेले असून त्यांच्या योगानें पूर्व फ्रीझलंडच्या बहुतेक सर्व शहरांशीं येथून दळणवळण ठेवितां येतें. या कालव्यामुळें एमडेनला पुरातन डच शहराचें स्वरूप आलेलें आहे. अँटवर्पच्या नगरभवनाच्या धर्तीवर बांधलेलें येथें १६ व्या शतकांतील एक नगरभवन आहे. त्यांत आयुधें व चिलखतें यांचा संग्रह केलेला आहे. येथें व्यापार, तारायंत्र व नौकानयन यांच्या शिक्षणाच्या शाळा असून दुसऱ्याहि अनेक शिक्षणसंस्था आहेत. शहरांत दोन पहाण्यालायक अजबखाने आहेत. शेतकीपासून उत्पन्न होणारे धान्यादि जिन्नस, घोडे, इमारती लांकूड, चहा व मद्य यांचा येथें व्यापार चालतो. यंत्रें, सिमेंट, तारांच्या दोऱ्या, तमाखू, कमावलेलें कातडें इत्यादि जिन्नस येथें तयार होतात. जर्मनी आणि इंग्लंड व उत्तर अमेरिका यांना जोडणाऱ्या पाण्याखालून जाणाऱ्या तारायंत्राचें हें एक महत्त्वाचें स्टेशन आहे.

इ. स. १२ व्या शतकांतील दप्तरांत एमडेनचा पहिल्यानें उल्लेख केलेला आढळतो. त्यावेळीं तें एम्सच्या काउन्टची राजधानी होतें. १२५२ त या काउन्टचे अधिकार मन्स्टरच्या बिशपला विकण्यांत आले. १४ व्या शतकाच्या शेवटीं गोथलंडहून हुसकून लावलेल्या चांचे लोकांस येथें व्यापार करण्याची परवानगी दिल्यामुळें या ठिकाणचा व्यापार वाढला. मध्यंतरीं कांहीं वर्षें हॅम्बर्ग व पूर्वफ्रीझलंड यांच्याकडे राहून, १५९५ त हें हॉलंडच्या छत्राखालीं साम्राज्यांतील एक स्वतंत्र शहर बनलें. १७४४ मध्यें पूर्व फ्रीझलंड व त्याबरोबर हें शहर प्रशियास मिळालें.

१८१५ त तें हॅनोव्हरला दिलें गेलें. परंतु १८६६ त प्रशियानें हॅनोव्हरबरोबर या शहरासहि आपल्या राज्यास जोडलें.

**एमॅन्युअल व्हिक्टर** (दुसरा)—या राजाचा जन्म टयूरिन येथें १४ मार्च १८२०रोजीं झाला. सार्डिनिआचा राजा चार्लस अल्बर्ट याचा हा मुलगा होय. पिडमाँटच्या कांहींशा उत्साहभंग करणाऱ्या व नानाप्रकारच्या दुराग्रहीपणानें पूरित झालेल्या वातावरणांत वाढल्यामुळें लष्करी व धार्मिक शिक्षणाबरोबरच जें बौद्धिक शिक्षण त्यास मिळावयास पाहिजे होतें तें मिळालें नाहीं. इ. स. १८४२ सालीं यांचें लग्न आस्ट्रियाच्या आर्चड्यूक रेनरच्या मुलीशीं झालें. या मुलीचें नांव एडिलेड होतें. आस्ट्रियाशीं आपला असलेला संबंध दृढतर करण्याच्या इच्छेनें राजानें हें लग्न घडवून आणलें. परंतु यामुळें व्हिक्टर एमॅन्युअलचें वैवाहिक आयुष्य कष्टाचें गेलें. आपला बाप जिवंत असेपर्यंत व्हिक्टरनें राजकारणांत फारसा भाग घेतला नाहीं. परंतु लष्करी बाबतींत मात्र तो उत्सुकतेनें पुढाकार घेत असे. १८४८ सालीं आस्ट्रियाशीं लढाई झाली त्यावेळीं आतां आपणांस आपलें शौर्य दाखवावयास मिळेल

म्हणून व्हिक्टरला आनंद झाला. यानें गॅायटो येथें चांगलाच पराक्रम दाखविला. मार्च १८४९ मध्यें नोव्हरा येथें पराभव पावल्यानंतर चार्लस आलबर्ट यानें आपल्या पुत्राला राज्यावर बसवून आपण राज्यसंन्यास केला. नंतर तो पोर्तुगालमध्यें जाऊन राहिला. व तेथें कांहीं महिन्यांनीं मरण पावला. जोराच्या प्रतिरोधास न जुमानतां व्हिक्टरनें इटलीची पूर्वीचीच राज्याची घटना कायम ठेविली. यामुळें लोकांत त्याचा 'इटलीच्या स्वातंत्र्याचा वाली' असा बोलबाला झाला. १८५० सालीं काव्हूर हा याचा मुख्य प्रधान झाला, व मध्यंतरीचीं कांहीं वर्षें वगळल्यास मरेपर्यन्त काव्हूर हाच त्याचा मुख्य प्रधान होता. व्हिक्टरला आपलें कार्य करण्यास परिस्थिति एक प्रकारें प्रतिकूल होती. कारण त्याच्या सैन्याची शिस्त बिघडलेली होती, खाजिन्यांत शिल्लक मुळींच नव्हती, लोकांनां एकप्रकारचें नैराश्य आलें होतें, स्वतः व्हिक्टरबद्दल गैरसमज पसरलेला होता व त्याच्या बापाप्रमाणें त्याच्यावरहि बेइमानपणाचा आरोप आलेला होता. अशा बिकट परिस्थितींत व्हिक्टरला आपलें कार्य करावयाचें होतें.

व्हिक्टरला काव्हूरसारखा मुख्य प्रधान मिळाला हें त्याचें मोठेंच भाग्य होय कारण त्याच्यासारखा विशालबुद्धीचा राजकारणी पुरुष जर तेथें नसतां तर इटली स्वतंत्र होणें केवळ अशक्यच झालें असतें. १८५०-५९ हीं वर्षें सार्डिनीयाची सांपत्तिक स्थिति सुधारण्यांत, सैन्याची पुनर्घटना करण्यांत व जुन्या संस्थांना नवीन स्वरूप देण्यांत गेलीं. १८५५ सालीं व्हिक्टरची आई, बायको व भाऊ हीं तिघेंहि थोड्याथोड्या दिवसांच्या अंतरानें मरण पावलीं. या सालीं याच्यावर ही मोठीच सांसारिक आपत्ति आली.

व्हिक्टर एमॅन्युअलचें ध्येय इटलीमधून आस्ट्रियानांना घालवून द्यावयाचें व पिडमॉंट प्रान्ताचें एक छोटेंसें राष्ट्र बनवावयाचें हें होतें. परंतु इटलीचें एकत्रीकरण करणें ही गोष्ट निदान त्यावेळीं तरी शक्य आहे असें त्याला वाटत नसे. तरींहि या दिशेनें इटलींत चळवळ चालू होतीच. इ.स. १८५९ सालीं काव्हूरच्या दूरदर्शीपणानें व उद्योगानें तिसरा नेपोलियन ऑस्ट्रियाच्या विरुद्ध पिडमॉंटला मिळूं शकला. परंतु त्यांत व्हिक्टरला सॅव्हाय प्रान्त सोडून देणें व आपली मुलगी कॉथिल्ड ही नेपोलियनच्या मुलाला देणें या दोन अप्रिय गोष्टी कबूल कराव्या लागल्या. सॅव्हाय प्रान्त ही त्याच्या कुटुंबाची वंशपरंपरेची राहण्याची जागा होती. व आपल्या मुलीवर त्याचें विशेष प्रेम असल्यानें नेपोलियनच्या मुलासारख्या नादान मनुष्याला मुलगी देणें हेंहि त्याला आवडलें नाहीं. परंतु राष्ट्राकरितां स्वतःच्या वैयक्तिक मनोभावना बाजूस ठेवण्याची त्याची केव्हांहि तयारी होती. काव्हूरनें आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करून नेपोलियन आपल्या बाजूस वळवून घेतला. परंतु फ्रान्सच्या सरहद्दीवर इटलीचें मोठें साम्राज्य व्हावें ही कल्पना नेपोलियनला सहन होईना. म्हणून इटलीला जय मिळण्याची आशा असतांना देखील आस्ट्रियाशीं तात्पुरता तह करावा असा नेपोलियननें हट्ट धरिला. प्रसंग पाहून नेपोलियनचा हट्ट व्हिक्टरला पुरादिणें भाग झालें व व्हिलाफ्रांका येथें तात्पुरता तह करण्यांत आला. काव्हूरला ही गोष्ट आवडली नाहीं. परंतु या बाबतींत व्हिक्टरनें जास्त दूरदर्शीपणा दाखविला यांत शंका नाहीं. १८५९-६० सालीं ज्या घडामोडी झाल्या त्यांचा परिमाण असा झाला कीं, टस्कनी व रोमान्मा हे प्रान्त पिडमॉंटला जोडले गेले. गॅरिबाल्डीनें सिसिलीवर स्वारी करण्याचें ठरविलें. तेव्हां व्हिक्टरनें त्याला शक्य त्या बाजूनें मदत केली. होतां होतां रोम व व्हेनिस या दोन शहरांखेरीज बाकीचा सर्व इटली प्रान्त एकत्र होऊन १८ फेब्रुवारी १८६१ रोजीं व्हिक्टर एमॅन्युअल हा संयुक्त इटली प्रान्ताचा राजा असें जाहीर करण्यांत आलें.

या पुढचीं कांहीं वर्षें व्हेनिस शहराचें स्वातंत्र्य परत मिळविण्यांत गेलीं, व इ. स. १८६६ सालीं झालेल्या ऑस्ट्रियन लढाईमध्यें इटलीच्या सैन्याला जरी फारसें यश आलें नाहीं तरी व्हेनिस प्रान्त त्यांच्या राज्याला जोडला गेला एवढी गोष्ट त्यांनीं मिळविली.

आतां फक्त रोमचा प्रश्न राहिला. परंतु पिडमॉंटला १८५९ सालीं जरी नेपोलियननें मदत केली होती तरी रोममध्यें पाऊल घालण्यास तो इटलीला संमति देईना. शिवाय त्यानें तेथें पोपचें रक्षण करण्याकरितां शिबंदीहि ठेविली होती. पुढें प्रशियाशीं लढण्याचा प्रसंग येतांच नेपोलियनला इटलीच्या मदतीची जरूर लागली. परंतु रोममध्यें अप्रतिबंध शिरकाव झाल्याखेरीज व्हिक्टर एमॅन्युअल या गोष्टीस संमति देईना, व अगदीं कंठाशीं येऊन ठेपेपर्यंत नेपोलियनच्या मनांत ऐकण्याचें आलें नाहीं. फ्रान्सचा पराभव होत असतां या शूर व उदार राजानें एक लाख सैन्याची मदत फ्रान्सला केली, परंतु फ्रेंच सेनापति थायर्स याला ती स्वीकारितां न आल्यामुळें इटलीला तटस्थ रहावें लागलें. अखेर ता. २० सप्टेंबर १८७० रोजीं फ्रेंच सैन्य रोममधून माघारें आलें व इटालिअन सैन्य तेथें गेलें. आणि ता.२ जुलै १८७१ रोजीं व्हिक्टर एमॅन्युअलनें रोममध्यें प्रवेश केला व इटली देशाची रोम ही राजधानी झाली.

रोममध्यें प्रवेश करण्यापूर्वींपासून या नवीन राज्यपद्धतीला पोपचा विरोध होताच. पण रोम काबीज केल्यानंतर तर धर्माधिकारी व राजा यांच्यातला संबंध अधिकच नाजूक झाला. समेट होण्याबद्दल राजानें बरेच प्रयत्न केले. परंतु पोपच्या लोकांनीं ते धुडकावून लाविले व पोप व राजा एका शहरांत राहून मरेपर्यन्त एकमेकांस भेटले नाहींत. व्हिक्टर एमॅन्युअल आपला कारभार मोठ्या दक्षतेनें करी. त्याचें लक्ष परराष्ट्रीय राजकारणांत बरेंच होतें. अर्थातच तो या मानानें घरच्या राजकारणाकडे कमी लक्ष देई

यामुळें एक मात्र फायदा झाला. तो असा कीं, इटलीमध्यें प्रान्ताप्रान्तांचा जो परस्पर संबंध होता त्यांत एमॅन्युअल ला बरीच सुधारणा करतां आली. हा राजा ता. ९ आक्टोबर १८७८ रोजीं रोममध्यें तापानें मरण पावला. व त्याचा दफनविधि पँथिऑनमध्यें करण्यांत आला. त्याच्या मागून त्याचा मुलगा हम्बर्ट हा गादीवर बसला.

व्हिक्टर एमॅन्युअल हा मोकळया मनाचा व सुस्वभावी असे. याची राहाणी अगदीं साधी होती. तरी देखील आपण राजे आहों ही कल्पना त्याच्या मनांत पूर्ण जागृत होती. व त्याच्या बाह्यवेषावरून त्याला ओळखणारे लोक त्याची सुस्तद्दीगिरी पाहून चकित होऊन जात. एमॅन्युअल हा शूर शिपाईगडी होता. परंतु १८६६ सालच्या प्रसंगीं त्याला कांहीं पराक्रम दाखवितां आला नाहीं. त्याला शिकारीचा नाद असे.

त्याच्याजवळ विनोदी गोष्टी व म्हणी यांचा सांठा बराच मोठा होता व वादविवादाच्यावेळीं हा उदाहरणें वगैरे देण्यांत त्याचा उपयोग चांगला करी. स्त्रियांच्या सहवासाचा याला फार शोक असे. व यानें पुष्कळशा उपस्त्रियाहि केल्या होत्या. यांपैकीं, एकजण रोझा व्हर्सिलोन नांवाची बाई अतिशय सुंदर होती. तिला यानें कौंटेसच्या पदाला चढविलें.व तिच्या संततीचा राज्यावर अगर बापाच्या संपत्तीवर कांहीं हक्क रहाणार नाहीं या अटीवर १८६९ सालीं तिच्याशीं लग्न लाविलें. तिच्यापासून याला एक मुलगा झाला होता.

**एमिनाबाद**— पंजाबमधील गुजरणवाला जिल्ह्यांतील व तालुक्यांतील एक गांव लो. सं. ( १९०१ ) ६४९४. ह्या गांवास पूर्वी सय्यदपूर म्हणत असत. ह्या गांवाची सियालकोटचा राजा शालिवाहन ह्यानें स्थापना केली असें म्हणतात. शेरशहानें १० व्या शतकांत ह्या गांवाचा नाश केला. व त्या ऐवजीं शेरगड स्थापिलें. महंमद अमीननें ह्या नवीन गांवाचा नाश करून यास आपलें नांव देऊन गांव स्थापिलें. मोंगल अंमलांत एमिनाबाद हें लाहोर सुभ्यांतील एका महालाचें मुख्य ठिकाण होतें. रणजितसिंगानें हा गांव जम्मूचा राजा ध्यानसिंग ह्यास जहागिरी म्हणून दिला होता व अजून तो त्याकडेसच आहे.

बाबा नानक ह्यानें केलेल्या तपश्चर्येचें लोकांस विस्मरण पडूं नये म्हणून येथें एक रोहरीसाहेब नामक शीख देवालय आहे. म्यु. स्था. १८६७. येथें एक आंग्ल—संस्कृत विद्यालय आहे.

**एमीन्स**—हें फ्रान्स देशाच्या उत्तर भागांतील सोमी विभागाचें मुख्य शहर, पॅरिसपासून उत्तरेस ८१ मैलांवर कॅलेला जाणाऱ्या रेल्वे मार्गावर वसलें आहे. येथील लोकसंख्या सुमारें नव्वद हजार आहे. येथें १७ व्या शतकांतील प्रसिद्ध विद्यार्थी चार्लस डयूकेंज ह्याचा पुतळा आहे.

येथील पिकार्डी नांवाच्या पदार्थसंग्रहालयांत बऱ्याच तसविरा, पुतळे व जुन्या अवशिष्ट वस्तूंचा भरणा आहे. येथें एक मोठें ग्रंथसंग्रहालय आहे.

हें धर्माधिकारी प्रिफेक्ट यांचें राहण्याचें स्थान असून येथें अदालत ( जूडिशियल ) कचेरी, अपील कचेरी व दुसऱ्या आर्मीकोरचें मुख्य ठाणें आहे. ह्याशिवाय पहिल्या प्रतीची न्यायकचेरी, व्यापारी न्यायकचेरी व फ्रान्सच्या मुख्य पेढीची एक शाखा ह्या संस्था आहेत. येथील विद्यालयांत मुलांमुलींच्या शाळा, शिक्षक तयार करण्याची शाळा, वैद्यकीची प्राथमिक शिक्षणाची शाळा, गायनशाळा वगैरे संस्था आहेत.

येथें लोंकर, रेशीम, ताग वगैरेंचे कारखाने आहेत. येथें धान्य, साखर, लोंकर, गळिताचीं धान्यें वगैरेंचा व्यापार चालतो.

एमीन्समध्यें ४ थ्या शतकाच्या आरंभीं सेंट फिरमीन नांवाच्या तेथील पहिल्या धर्माधिकाऱ्यानें ख्रिस्ती धर्माचा उपदेश केला. मध्ययुगांत या शहराभोंवतालचा प्रदेश अमीनॉयच्या कौंटच्या ताब्यांत गेला. पण त्यावर कौंटप्रमाणेंच तेथील विशपहि अधिकार चालवीत असे.

ह्या दोघांतील परस्पर मत्सरामुळें शहराच्या लोकांनीं १२ व्या शतकांत स्वातंत्र्याची सनद मिळविली. ११८५मध्यें अगदीं पहिल्या प्रथम हें शहर फ्रेंच राजा फिलिप आगस्टस याला मिळालें. फ्रेंच राजांच्या हातून पुष्कळ वेळां हें शहर इतरांच्या ताब्यांत गेलें.१४३५मध्यें आरासच्या तहानें बर्गंडीच्या डयूककडे गेलें. पुढें१४७७पर्यंत हें शहर त्याच्याकडेच होतें. १५९७मध्यें स्पेनच्या लोकांनीं अचानक छापा घालून तें घेतलें. त्यानंतर बऱ्याच वर्षांनीं ४ थ्या हेनरीनें बऱ्याच शिकस्तीनें हें शहर परत घेतलें. १७९० पावेतों पिकार्डी प्रांताचें तें राजधानीचें शहर होतें. १८०२ मध्यें एमिन्सचा तह या नांवाचा इंग्रज, फ्रेंच, स्पेन व डच यांच्यामध्यें फार महत्त्वाचा तह झाला. फ्रान्स व जर्मनीच्या युद्धांत १८७० च्या नव्हेंबरच्या २८ तारखेस हें शहर प्रशियन लोकांनीं काबीज केलें होतें.

**एमेअस**—हें पॅलेस्टाईनमधील दोन गांवांचें नांव आहे. डयूकच्या मतें हें गांव यरुशलेमपासून ७ मैलांवर होतें. हें कोठें होतें याबद्दल बराच वाद आहे. साधारणतः अर्वाचीन एल कुबैबेह अथवा उर्तास हें असावें. एमेअस—निकोपोलिस, सध्यांचें अमवास, हें समुद्राजवळच्या मैदानांत होतें. येथेंच जुडास मॅकोबीनें जार्जियसचा पराभव इ स. पूर्वी १६४ त केला. हें शहर पुन्हां बांधल्यावर याला निकोपोलिस नांव मिळालें. रोगनिवारक झऱ्यांबद्दल याची प्रसिद्धि होती.

**एमेरी**—ग्रीस देशाजवळ जीं बेटें आहेत त्यांपैकीं कित्येक बेटांतील पर्वताच्या पायथ्याशीं कणदार असे याचे ओबडधोबड दगड सांपडतात. एमेरी या भूशिराजवळ

नाक्सस बेटांत याची उत्पत्ति फार होते व त्यावरूनच यास एमेरी हें नांव मिळालें आहे; परंतु हल्लीं दुसऱ्या कित्येक ठिकाणींहि याचे दगड सांपडतात. हिंदुस्थानांत हे दगड सांपडल्याचें कोठें आढळत नाहीं व याहून जास्त उपयोगी कुरुंद विपुल मिळत असल्यानें याचा कोणी शोधहि केला नाहीं. एमेरी हा पांढुरका, काळ्या रंगाचा किंवा उदी रंगाचा अपारदर्शक खनिज पदार्थ असून याच्या अंगीं तकाकी असते. याचें विशिष्टगुरुत्व ३.७ ते ४.३ असतें व हिऱ्याच्या खालोखाल कुरुंदाइतका हा कठिण असतो. याच्या अत्यंत काठिण्यामुळें मौल्यवान दगड घांसून साफ व चकचकीत करण्यास व जिल्हई देण्यास जवाहिरे लोक याचा उपयोग करतात. पोलादी हत्यारास साफ व चकचकीत करण्यास शिकलगार व लोहार याचा उपयोग करतात. त्याचप्रमाणें कांचांस जिल्हई देण्यास व चष्म्यांचीं भिंगें करण्यासहि डिंकाच्या पाण्यांत याची पूड कालवून कागद किंवा कपडा यांवर सारवितात व तसल्या कागदांचा व कपड्यांचा उपयोग लोखंडी हत्यारें व लहानसहान दुसरे जिन्नस साफ करण्यास करतात [मोडक पदार्थवर्णन भाग १ ला. ]

**एम्मेट रॉबर्ट** ( १७७८–१८०३ )—रॉबर्ट एम्मेट हा देशभक्त आयर्लंडांतील त्या वेळीं प्रख्यात असलेला डॉ. एम्मेटचा कनिष्ठ मुलगा होता. हा डब्लिन येथें १७७८सालीं जन्मला. याचा १७९३ मध्यें ट्रिनिटी कॉलेजमध्यें प्रवेश झाला व त्याच्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांमध्यें तो एक तरतरीत व बुद्धिमान् म्हणून समजला जात असे. त्याला गणिताची व रसायनशास्त्राची विशेष आवड होती. त्यावेळीं युनिव्हर्सिटीचा चॅन्सेलर ( कुलगुरु ) लॉर्ड क्लेअर यानें विद्यार्थ्यांचीं राजकीय मतें काय आहेत याची उघड चौकशी सुरू केल्यामुळें त्या कृत्याच्या निषेधार्थ त्यानें १७९८ च्या एप्रिलमध्यें कॉलेजांतून आपलें नांव कोणतीहि पदवी न मिळवितांच काढून घेतलें. या वेळींच संयुक्त आयरिश मंडळामध्यें त्याचा भाऊ थॉमस एम्मेट हा प्रमुख असल्यामुळें त्यानेंहि त्यांत आपला थोडा फार प्रवेश करून घेतला होता व आतां तर शिक्षणविषयक बाबतींत त्याचा मार्ग खुंटल्यामुळें या मंडळाकडेच त्यानें आपलें लक्ष पुरविलें. शिवाय कॉलेजमध्यें असतांनाच उत्कृष्ट वक्ता या नात्यानें त्याची ख्याति असल्याकारणानें त्या वक्तृत्वाचेंहि त्याला पुष्कळ साहाय्य झालें. १७९९ मध्यें त्याच्यावर वॉरंट निघाल्यामुळें तो यूरोपमध्यें गेला. युरोपमध्यें त्याला संयुक्त आयरिश मंडळांतील पुष्कळ पुढारी भेटले व फ्रान्सच्या साहाय्यानें ते बंड करण्याच्या उद्योगांत आहेत असें त्याला आढळून आलें. सन १८०० मध्यें आयरिश पार्लमेंट मोडलें. हें ऐकतांच त्याला अतिशय दुःख झालें. १८०२ च्या आक्टोबरमध्यें तो पॅरीस येथें गेला व तेथें त्याची व नेपोलियन बोनापार्टची भेट झाली. १८०३ च्या आगस्टमध्यें फ्रान्स व इंग्लंड यांच्या दरम्यान युद्ध सुरू होईल त्यावेळीं फ्रेंच सैन्य आयर्लंडमध्यें उतरेल असें बोनापार्टनें त्याला आश्वासन दिलें. पॅरीसमध्यें संयुक्त आयरिश मंडळांतील जे पुढारी होते, त्यांच्यामध्येंच पुढील धोरणासंबंधानें मतभेद झाल्यामुळें पॅरीसहून तो डब्लिनला गेला. त्यावेळीं त्याच्यापुढें निश्चित अशी योजना नव्हती. इतर पुढारीहि अजीवात तटस्थच राहिले. शिवाय एम्मेटच्या अंगीं मुत्सद्दीगिरीचा अभाव होता. याचें एक उदाहरण म्हणजे पॅरीसहून आयर्लंडला जात असतां, वाटेंत विश्रांतीसाठीं लॉरेन्स नांवाच्या एका इंग्लिश गृहस्थाच्या घरीं उतरला असतां त्यानें आपला सर्व बेत सविस्तर रीतीनें त्याच्यापाशीं सांगितला हें होय. डब्लिन येथें येतांच त्याला अशी बातमी लागली कीं, आपण बंड करण्याचा प्रयत्न केल्यास १७ परगणे आपल्याला मदत करण्यास तयार आहेत; व यामुळें मोठ्या आशेनें त्यानें हत्यारें व दारूगोळा जमविण्यास सुरुवात केली.

सन १८०३ च्या मे महिन्यांत इंग्रज व फ्रेंच यांच्या दरम्यान युद्ध सुरू झाल्यामुळें एम्मेटला अधिकच आशा वाटूं लागली. पण जुलैच्या १६ व्या तारखेस पॅट्रिक रस्त्यावरील एम्मेटच्या एका दारूच्या कोठाराला आग लागल्यामुळें इंग्लिश अधिकारीवर्गाला तो कट समजून आला, व यामुळें शक्य तितक्या लवकर बंड करणें आवश्यक झालें. पीजन हौसवर व आयलंडब्रिज येथील तोफखान्यावर कांहीं सैन्यानें हल्ला करतांच उरलेल्या सैन्यानें राजधानीकडे मोर्चा वळवावयाचा अशी व्यवस्था एम्मेटनें केली होती. पण एम्मेटचे इतर सहकारी हे कुचकामाचे असल्यानें व त्यांनीं आयत्या वेळीं कच खाल्लयामुळें तें बंड पार फिसकटून गेलें. जुलै २३ तारखेला म्हणजे बंडाच्या दिवशीं एम्मेट व इतर सहकारी यांचें पुढील व्यवस्थेविषयीं एकमत होईना. पुष्कळसे लोक एम्मेटच्या आज्ञा पाळीनात. एका विश्वासू सेवकानें खर्चासाठीं पाठविलेले पैसे गट्ट करून पळ काढला. आयत्या वेळीं जें सैन्य येणार होतें तेंहि आलें नाहीं. अशा प्रकारें जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली असतां लष्करी सैन्य आपल्यावर चालून येत आहे अशी एम्मेट यास बातमी लागली.ती खरी आहे किंवा नाहीं याची चौकशी न करतां त्यानें आपल्या१००–१५०शिपायांसह राजधानीवर स्वारी केली.पण या शिपायांत शिस्त नसल्यानें व त्यांतील कांहीं लोक दारू प्याल्यानें लॉर्ड किलवार्डेन हा कांहीं जरूरीच्या कारणास्तव कोर्टाकडे जात असतांना त्याचा व त्याच्या पुतण्याचा या शिपायांनीं खून केला. त्याच्या मुलीला मात्र स्वतःच एम्मेटनें घरीं पोहोंचविलें. एम्मेटला अशा प्रकारची अंदाधुंदी दृष्टीस पडतांच व इंग्रज सैन्य येतांच गुप्त स्थळीं लपून बसावें लागलें. अशा रीतीनें या बंडाचा एकाच दिवसांत मोड झाला.

कांहीं दिवस लपून राहिल्यानंतर तो क्यूरन नांवाच्या वकीलाच्या घराजवळ मिसेस पामरस्टनच्या घरीं रहावयास

आला. क्यूरनची मुलगी सारा इचें एम्मेटवर फार प्रेम होतें, व त्यांच्यामध्यें पत्रव्यवहारहि चालू होता. एम्मेटनें तिला आपल्याबरोबर अमेरिकेला येण्याविषयीं आग्रह केला; पण आपला हेतु साध्य होत नाहींसें पाहून तो एकटाच अमेरिकेला जाण्याच्या विचारांत असतां पकडला गेला. त्याचें कोर्टामधील शेवटचें भाषण फारच वक्तृत्वपूर्ण व धैर्याचें झालें. त्याला सन १८०३ सालामध्यें सप्टेंबर महिन्याच्या २०व्या तारखेस फांसावर चढविण्यांत आलें.

त्याच्या सर्व मित्रांच्या म्हणण्यावरून एम्मेट हा फार विनयशील, सद्धेतुयुक्त असून त्याची मुद्रा करारी व दुसऱ्यावर वजन पाडणारी असे. त्याच्या अंगीं मुत्सद्दीगिरीचा पूर्ण अभाव होता. बंडाच्या व धामधुमीच्या वातावरणांत तो वाढला असल्यानें त्याचा उत्साह विवेकाचें बंधन नसल्यानें अनावर झालेला असे. प्रसिद्ध आयरिश देशभक्त व कवि थॉमस मूर हा त्याचा सहाध्यायी असून तो एम्मेटची फार स्तुति करीत असे. मनुष्यस्वभावाची त्याला पारख नव्हती. व प्रत्येकावर तो विश्वास टाकीत असे. असल्या बिकट प्रसंगामध्यें पुढाऱ्यांच्या अंगीं जे गुण असावे लागतात त्यांतील एक धैर्य शिवायकरून त्याच्यामध्यें एकहि गुण नव्हता. हा व क्यूरनबाई यांच्यामधील प्रेमसंबंधावर मूरनें सुंदर काव्यें केलीं आहेत व वाशिंग्टन आयर्व्हिंगनें 'भग्नहृदय' नांवाचें कथानक लिहिलेलें आहे. एम्मेट हा खुजा असून त्याच्या तोंडावर देवीचे वण होते. यानें थोड्याफार कविताहि केल्या होत्या असें म्हणतात. [ आयर्लंडचा इतिहास–न. चिं. केळकर. ]

**एरंडी**—याचीं हिंदी–अंडी. कानडी–अउड्ला. गुजराथी दिवेली. हीं नांवें होत. एरंड हिंदुस्थानांत आफ्रिकेंतून आला असावा. अबिसिनीयांत याचें झाड रानटी स्थितींत आढळतें. हिंदुस्थानांत एरंडाची लागवड सर्वत्र आढळते. ती बंगाल्यांत जास्त प्रमाणांत आहे. एरंडाच्या सरासरीनें सोळा जाती आहेत. पण या सर्वांचे दोन भाग करतां येतात. पहिला बहुवर्षायु. ही जात फार उंच वाढते. हिची लागवड कुंपणांत उंसाभोंवतीं व बागाइतांत पाटाच्या कडेनें करतात. याचें बीं जाडें असून त्याचें तेल हलक्या दर्जाचें समजलें जातें. दुसरा वर्षायु. ही जात स्वतंत्र पेरितात. किंवा इतर पिकांशीं मिसळून पेरितात. याचें झाड लहान असतें व याचें पीक कोरडवाहू जमिनींत करितात. यांचें बीं लहान असून त्याचें तेल उत्तम प्रकारचें निघतें. बहुवर्षायु एरंडीचें तेल दिव्यांत जाळण्यास व वंगणास उपयोगीं पडतें. व वर्षायूचें तेल औषधांत वापरतात. हें तेल सारक आहे. एरंडी दोन्ही हंगामांत होते. यापैकीं रब्बीचें पीक महत्त्वाचें आहे. एरंडी भुसभुशीत पोयट्याच्या, वाळूच्या व काळ्या जमिनींत चांगली वाढते. उत्तर गुजराथेंतही खरीफ हंगामांत मुईमूग, बाजरी कडदण वगैरें पिकांशीं मिसळून करतात. पीक उभें असतांना त्याची सावली आलें, हळद यांसारख्या बागाईत पिकांनां मानवतें. मळईच्या जमिनींत:एरंड, जोंधळा तूर, वाल वगैरेंशीं मिसळून पेरितात. सुरतेकडे भातखांचरांत वाल, चंवळी, एरंड आणि हरभरा हीं रब्बी हंगामांतील पिकें होत. हें पीक स्वतंत्ररीतीनें पेरिलें तर बियाचें प्रमाण दर एकरीं पंधरा वीस पौंड असतें. मिसळून पेरिल्यास दहा पौंड एरंडी व चाळीस पौंड वाल अगर हरभरा या प्रमाणांत असतें. या पिकाला एक खुरपणी व एकदोन कोळपण्या देतात. खरीप पीक नोव्हेंबरांत तयार होतें. रब्बी फेब्रुवारी अगर मार्चांत तयार होतें. एरंडीची बोंडें तयार झालीं म्हणजे काढून उन्हांत वाळवितात. व नंतर काठ्यांनीं तीं झोडून बीं तयार करितात. दर एकरीं उत्पन्न सरासरी स्वतंत्र पीक १००० ते १४०० पौंड व मिसळीचें पीक ४०० ते ६०० पौंड. तेलाचें शेंकडा प्रमाण अजमासें ३८ ते ४० असतें. तेल औषधास, जाळण्यास व वंगणास उपयोगी आहे. पेंडीचा बागाइतांत खताकरितां उपयोग करितात. ती कडू असल्यामुळें उधइचा त्रास कमी पडतो. पानें रेशमाच्या किड्यांस खावयास उपयोगी पडतात. एरंडाचा पाला बकऱ्यांस चारतात.

मुंबई इलाख्यांत एरंडीच्या लागवडीकडे दर वर्षी सुमारें एक लक्ष एकर जमीन असते. हें पीक अमदाबाद, सुरत, धारवाड, बेळगांव व सोलापूर ह्या जिल्ह्यांत महत्त्वाचें असून निझामच्या राज्यांत, तेलंगणांत याचा विशेष पेरा होतो. बैतूल, रायपूर व बिलासपूर या जिल्ह्यांत एरंडीची जास्त लागवड होते.

एरंडीचें तेल दोन रीतींनीं काढतात. थंड पद्धतीनें म्हणजे बीं दाबून काढलेलें तेल औषधास प्रशस्त होय. एरंड्या पाण्यांत कढवून उष्णतेच्या सहाय्यानें तेल काढतात. तें काळसर असून तितकें शुद्ध नसतें. इ. स. १७८८ नंतर इंग्लंडमध्यें एरंडेल तेलाचा औषधांत उपयोग करूं लागले. हिंदुस्थानांतून तेलापेक्षां अलीकडे एरंडीची निर्गत वाढत आहे. १९१३।१४ सालीं २ कोट रुपये किंमतीची एरंडी निर्गत झाली. याचें कारण तेल काढण्याची इकडील साधनें यूरोपीयांपेक्षां कमी दर्जाचीं असतात. एरंडीचा पुरवठा मुख्यतः संयुक्त प्रांतांतून होतो. दिल्ली व लाहोर येथें अलीकडे तेलाच्या गिरण्या निघाल्या आहेत. १९०४ मध्यें हिंदुस्थानांत एकंदर ११२ तेलाच्या गिरण्या होत्या. त्या बहुतेक कलकत्ता व मद्रासमध्यें होत्या. या तेलाचा उजेड मंद व लख्ख पडतो. याचा वंगणाच्या कामीं उपयोग फार होतो. पेंडीचा खताकडे व जाळण्याकडे उपयोग होतो.

एरंडेल सौम्य रेचक असल्यामुळें लहान मुलांसहि तें देतां येतें. संधिवातावरहि हें चोळल्यानें उपयोग होतो. साबणाच्या पाण्यांत मिसळून याचा बस्तीहि देतात. याच्या मुळाचा काढ्यांत उपयोग करितात. एरंडाचीं पानें रेशमाचे किडे खातात. यामुळें हे किडे बाळगणारे लोकहि याची लागवड करतात.

**एरंडोल ( ता लु का )**—मुंबई इलाख्यांतील पूर्वखानदेश जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ४५८ चौरस मैल, मोठीं गांवें–एरंडोल, धरणगांव. खेडीं—१९५. लोकसंख्या ( १९०१ ) १०५८४०. तापीच्या खोऱ्याचा प्रदेश सुपीक आहे. पाऊसपाणी २९ इंच.

**श ह र**—मुंबई. पूर्वखानदेश. एरंडोल तालुक्याचें मुख्य ठिकाण. लोकसंख्या ( १९०१ ) ११८८५. येथें १८६६ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे. हें अंजनी नदीवर वसलेलें असून सभोंवतीं तट आहे. येथून धुळें, धरणगांव व म्हसावद स्टेशन यांस सडका जातात. हें शिवाजीनें १६३० त लुटलें. हें कागदांकरितां प्रसिद्ध असून अद्याप कांहीं कागद तयार होतो. येथें कापुस, धान्य व नीळ यांचा व्यापार चालतो.

येथें मामलेदार कचेरी, दवाखाना व शाळा आहे. येथें पांडवांचा वाडा म्हणून एक जुना दगडी वाडा आहे. याच्या एका टोंकास देऊळ होतें. त्याची आतां मशीद झाली आहे. त्यांत एक फारसी शिलालेख आहे. गांवाच्या आग्नेयीस ५ मैलांवर एक सुंदर तलाव ( पद्मालय ) असून जवळ गणपतीचें देवालय आहे. एरंडोल रोड म्हणून तॅप्टी व्हॅली रेल्वेवर स्टेशन आहे. [ मुं. गॅ. इं. गॅ. बादशाहनामा, इलियटचा इतिहास ७. १६ ].

**एरन**—मध्य प्रदेशांतील सागर जिल्ह्याच्या खुरई तहसिलमधील एक खेडें. हें बिना व रेवती नद्यांच्या संगमावर आहे. लोकसंख्या ( १९०१ ) १७१. गांवानजीकच्या उंच भागावर बरेच अवशेष आहेत. येथें पूर्वी बरींच वैष्णव देवालयें होतीं; पण सध्यां तीं मोडून तोडून नाश पावलीं आहेत. मुख्य मूर्ति ' वराह ' ची आहे व त्यावर तोमरांण नामक हूण राजाचा लेख आहे. जवळील एका शिलेवर समुद्रगुप्ताचें नांव आहे. तसेंच येथें कांहीं नाणीं सांपडलीं आहेत. ह्यांवरून इ. स. च्या पूर्वी येथें वस्ती असावी असें सिद्ध होतें. तसेंच येथें बुद्धगुप्ताचा ( सन ४८४–५ ) शिलालेख आहे.

**एरनाड**—निलगिरी पर्वताला जोडलेला मद्रास इलाख्यांतील मलबारमधील एक तालुका. क्षेत्रफळ ९७९ चौ. मै. ह्यांत चौदा अमसम (खेडीं) आहेत. लोकसंख्या ( १९०१ ) ३५७१४२. मुख्य गांवें:–मन्जेरी (मुख्य ठिकाण), मलप्पुरम, फेरोख, निलंबूर व तिरूरनगडी. पूर्व भागांत निलंबूरचें खोरें असून त्यांत सागवान वगैरे उत्तमपैकीं इमारतीलांकूड होतें. समुद्रकांठच्या प्रदेशांत तांदुळाचें उत्पन्न चांगल्यापैकीं होतें.

**एरवल्लर**—मलबार आणि कोइमतूर जिल्ह्यांत राहणारी एक जंगली जात. कोचीनमधील एरवल्लरांविषयीं खालील माहिती सांपडतेः—

कोचीन संस्थानांतील जंगलांत राहणारी ही गरीब डोंगरी जात असून ?व वेदन ( धनुर्धारी शिकारी ) असें हिचें दुसरें नांव आहे. त्यांची भाषा तामिळ आहे. त्यांच्यांतील स्त्रीपुरुषांचीं नांवें हिंदु देवतांवरून ठेवलेलीं आहेत. हे लोक शेतावर मजूरी करतात. बायका देखील वेतन घेऊन काम करितात; पण त्यांना स्वतःला बंधनकारक अशी नोकरी आवडत नाहीं. हे फार विश्वासू, गरीब व देवाला भिणारे नोकर असतात अशी यांची ख्याति आहे.

यांच्यांत विधवेला फक्त विधुराशींच लग्न करतां येतें. बायको आवडली नाहीं तर पुरुषाला काडी मोडून देतां येते व अशा बाईला पुनः एखाद्या विधुराशीं लग्न जमवितां येतें. मृतांनां पुरतात व पांच दिवस सुतक पाळतात.

हे शुद्ध वन्यधर्माचे असून डोंगर, अरण्यें हीं भुतांराक्षसांनीं भरलेलीं आहेत असें ते मानितात. यांचे देव म्हणजे काली, मुनि, कान्निमार आणि करुप्परायन. काली व मुनि यांची पूजा अरण्यांत करतात व बाकीचे घरांत पूजितात.

यांचा मुख्य धंदा शेती होय. याशिवाय हे शिकारहि करतात. ससे, पक्षी, शेळयामेंढ्या, डुकरें यांचें मांस खातात. ब्राह्मण, नायर, कंमालर आणि इझावा व यांच्या हातचें अन्न खातात; पण मन्नन, पानन, परयन आणि चेरुमन यांनां शिवत देखील नाहींत.

**एरिडु**—एरिडु हें सुमेरियन धर्माचें एक अतिशय प्राचीन केंद्र होतें. प्राचीन बाबिलोनियन ग्रंथांत याला 'समुद्रनगर' असें नांव आहे. येथें एआ देवतेची पूजा होत असे ही समुद्र व ज्ञानदेवता होती. एरिडुला राजकीय बाबतींत कांहींच महत्त्व नव्हतें. एरिडूची जागा प्रथम गे. ई. टेलरसाहेबानें १८५४ त शोधून काढली. ही जागा अबुशाहरीन(अर्वाचीन देश्यनांव )मध्यें असून मोघेर (प्राचीन उर)च्या नैर्ऋत्येस आहे. ख्रि. पू. ७००० च्या सुमारास एरिडु बांधलें असावें. ख्रि. पू. ६ व्या शतकापर्यंत याचा शिलालेखांत उल्लेख सांपडतो.

**एरिथ्री**—एरिथ्री ( आधुनिक लित्री ) हें आशियामायनरमधील एक आयोनियन शहर होतें. हें एका द्वीपकल्पांत आहे; व त्या द्वीपकल्पांत उत्कृष्ट दारू तयार होत असे. कोड्रसचा मुलगा क्नोपास ह्याच्या वेळेस ह्या शहराची स्थापना झाली. बरेच दिवसपर्यंत हें शहर अथेन्सच्या अमलाखालीं होतें; परंतु पिलोपोनेशियन युद्धानंतर या शहरानें अथेन्सचें स्वामित्व झुगारून दिलें. एरिथ्रीमध्यें सिबिला व अथेनीस ह्या दोन भविष्यवादिनींचा जन्म झाला. ह्यांपैकीं अथेनीस ही अलेक्झांडरच्या वेळेस होती. अद्याप हेलेनिक भिंती बुरुजांसह चांगल्या स्थितींत आहेत. यांशिवाय किल्ला व बायझन्टाईन इमारती यांचे अवशेष आहेत. आधुनिक लित्री हें एक लहानसें बंदर आहे. त्याचा किआस व स्मर्नाशीं व्यापार चालतो.

**एरिनपुर.**—राजपुतान्यांतील सिहोरी संस्थानाच्या ईशान्य भागांत एक छावणीचें ठिकाण. लो. सं. ( १९०१ ). ३२०६. ४३ नंबरच्या फौजेचें ( रेजिमेन्ट ) हें ठिकाण आहे.

तसेंच येथें भिल्ल लोकांचीहि एक तुकडी ठेवण्यांत आली होती. १८५७ सालीं ते सर्व ( भिल्ल सोडून )बंडांत सामील झाल्यामुळें एरिनपुर इरेग्युलर फोर्स उभें करण्यांत येऊन भिल्लांस त्यांचें आश्रयस्थान देण्यांत आलें.

सध्यां ह्या फौजेंत शीख, मुसुलमान, ( पंजाबांतील ) रजपूत, मीना, मेर, मुसुलमान वगैरे आहेत.

**एरियन**—( फ्लेव्हिअस एरिअनस ) हा ग्रीक इतिहासकार व तत्त्ववेत्ता बिथिनियामधील निकोमिडियाचा रहिवाशी. हा इ. स. ९६ मध्यें जन्मला, व हेड्रियन, अँटोनिनस पायस व मार्कस आरेलिअस यांच्या कारकीर्दीत उदयास आला. त्याची कर्तबगारी ओळखून त्याला अथेन्स व रोम या दोन्हींचें नागरिक करण्यांत आलें. हेड्रियन याला फार चहात असून त्यानें याला कॅप्पॅडोशियाचा सुभेदार नेमिलें होतें ( १३१–१३६ ). सुभेदार असतांना अलनी लोकांवर केलेल्या मोहिमेंत एरियननें नांव गाजविलें. तिसऱ्या शतकापूर्वी पहिल्या प्रतीच्या रोमन सैन्याचें आधिपत्य एखाद्या ग्रीकाला दिलेलें हें एकच उदाहरण होय. अथेन्स शहरीं एरियनचा बराच काळ गेला; त्या ठिकाणीं तो १४७–१४८ मध्यें मुख्य न्यायाधीश होता. कॅप्पॅडोशिया येथून त्याला परत बोलावण्यांत आल्यापासून त्याचा अधिकारी पेशा संपला. उतारवयांत तो आपल्या गांवीं परत येऊन वाङ्मयीन कार्याला लागला. इ. स. १८० च्या सुमारास तो वारला. डायोकॅसिअसनें लिहिलेलें त्याचें चरित्र नष्ट झालें आहे.

तरुणपणीं एरियन एपिक्टेटसचा शिष्य व स्नेही असे. तो आपल्या गुरूचीं व्याख्यानें शब्दशः टिपून घेत असे. तीं त्यानें " डेसर्टेशन्स " (व्याख्यानें)( आठखंड ) व 'दि एन्चेइरिडिआन ऑफ एपिक्टेटस या अर्थाच्या नांवानीं प्रसिद्ध केलीं. पहिला ग्रंथ स्टोइक तत्त्वज्ञानास आधारभूत असून, दुसरा नीतिशास्त्रावर आहे. दुसऱ्या ग्रंथाचा ख्रिस्ती व पाखंडी लोक शिक्षणाच्या कामीं बरेच दिवस उपयोग करीत. सिंप्लिशिअसनें ५५० च्या सुमारास यावर लिहिलेली टीका उपलब्ध आहे.

एरियननें स्वतः रचलेल्या ग्रंथांपैकीं अतिशय महत्त्वाचा म्हणजे "अनाबासिस ऑफ अलेक्झांडर" याअर्थी अलक्झांडरच्या राज्यारोहणापासून मृत्यूपर्यंतच्या इतिहासाचा ग्रंथ. हा सात विभागांत लिहिलेला इतिहास अलेक्झांडरच्या स्वाऱ्यांबरोबर असलेले अरिस्टोबुलस ( कॅसन्ड्रेइआचा ) व लॅगसपुत्र टॉलेमी ( पुढें झालेला इजिप्तचा राजा ) यांनीं दिलेल्या माहितीवरून तयार केला. आपल्या नायकाच्या ठिकाणीं असलेल्या दोषांकडे दयार्द्रदृष्टि व त्याच्याविषयीं अंधश्रद्धा ग्रंथकर्त्यानें ठेविलेली दिसते. तरी अलेक्झांडरविषयीं जास्त विश्वसनीय व सर्वांगपरिपूर्ण माहिती या ग्रंथाखेरीज दुसरीकडे आढळणार नाहीं.

एरियनचे इतर उपलब्ध असलेले ग्रंथ म्हणजे "इंडिका", हा आयोनिक भाषेंत हिंदुस्थानसंबंधीं लिहिलेला ग्रंथ;"ॲसिईज कोन्ट्रा ॲलॅनोज," रोमन लष्करी कारभाराचें ज्ञान देणारा महत्त्वाचा लेख; " पेरिप्लुस ऑफ दि युक्झाईन, " हेड्रियन बादशहासाठीं लिहिलेली सरकारी माहिती; "टॅक्टिका" ट्राजनच्या कारकीर्दीत एलियानसनें हा लिहिला असें कोणी मानितात; " सिनेजेटिकस, " शिकारीवर विवेचन; 'पेरिप्लुस ऑफ दि एरिथ्रियनसी, ' हा एरियनचा समजला जाणारा ग्रंथ पुढील काळांतील एखाद्या लेखकाचा असावा. त्याचे नष्ट झालेले ग्रंथहि बरेच आहेत याची लिहिण्याची धाटणी साधी, स्पष्ट व जोरकस आहे; पण भाषा शुद्ध असूनहि तींत कांहीं विचित्रपणा आढळतो. झेनोफोनचें अनुकरण करण्यावरून एरियनला " धाकटा झेनोफोन " असें संबोधण्यांत येतें; तो स्वतःहि आपणाला झेनोफोन म्हणवून घेतो.

**ए रि य न नें व र्णि ले ला हिं दु स्था न.**—इंडिका या ग्रंथांत एरियन हिंदुस्थानाविषयीं ऐकीव माहिती देतो व तीवर जागजागीं खरेखोटेपणाबद्दल टीकाहि करितो. मेगॅस्थेनीज व निआर्कस यांनां असलेली इकडील माहिती देऊन आपलीहि मतें या ग्रंथांत तो व्यक्त करीत आहे. या ग्रंथांतील पुढील विधानें मनोरंजक वाटतील यांत संशय नाहीं. " गंगा व सिंधु या नद्या नाईल व डॅन्यूब नद्यांपेक्षां फारच मोठ्या आहेत." हिफासिस नदीपलीकडचें वर्णन फारसें विश्वसनीय नाहीं. कारण अलेक्झांडरचे लोक या नदीपलीकडे गेलेले नव्हते. हर्क्युलसनें हिंदुस्थानावर स्वारी केली होती असा समज करून घेऊन मेगॅस्थेनीज हिंदुस्थानचें वर्णन करतो. " डायोनिससनें हिंदी लोकांनां शेतकी, दारूपिणें, पागोटें घालणें ईश्वरोपासनेकरितां केंस वाढविणें यासारख्या गोष्टी शिकविल्या. मोती वापरण्याची चाल हिंदी लोकांनीं पसरविली. हर्क्युलसनें आपल्या पाठीमागें आपल्याच वंशांतील राजा हिंदुस्थानावर राज्य करण्यास असावा म्हणून उतारवयांत आपल्या सात वर्षांच्या मुलीशीं संभोग केला. तेव्हांपासून सातव्या वर्षी मुलींचीं लग्नें करण्याची चाल हिंदुलोकांत आली. यामुळें हे लोक तीस चाळीसच्या घरांत आले म्हणजे म्हातारे होतात. डायोनिससकालापासून सॅंड्रकोटस ( चंद्रगुप्त ? ) कालापर्यंत ६०४२ वर्षे लोटलीं व तीन वेळां प्रजासत्ताक राज्यें होऊन गेलीं. हिंदुस्थानांत नदीकांठचीं घरें लांकडाचीं असतात, कारण तीं वाहून जाण्याचा संभव फार. या देशांत सर्व लोक स्वतंत्र. गुलाम कोणीहि नाहीं. यति लोक राष्ट्रकल्याणाचींच फक्त भविष्यें वर्तवितात. छायेखालीं दहाहजार माणसें बसतील इतकीं मोठीं झाडें तेथें आहेत. राज्यांत काय काय प्रकार होतात हें राजास कळविणारा एक वर्ग आहे. खोटें बोलणारा हिंदु अद्याप आढळला नाहीं. मोठे खंदक खणून हत्तींची शिकार करितात. हत्तीकरितां मोठ्या

शहाण्या स्त्रिया सुद्धां व्यभिचाराला उद्युक्त होतात व तसें करणें फारसें वाईट मानण्यांत येत नाहीं. कोल्ह्यापेक्षां मोठ्या अशा सोनें खणणाऱ्या मुंग्या आहेत. ग्रीकांना सर्पदंशावर औषध सांपडलें नव्हतें पण हिंदु मांत्रिक तो चटूदिशीं बरा करीत. हिंदु बहुधां रोगी नसतात, कोणी असलेच तर औषधावांचून बरे होतात. ते धोतर नेसतात व अर्धे उपरणें डोक्याला गुंडाळून बाकीचें खांद्यावर सोडतात. दाढी रंगवितात; कांहीं छत्र्या व पांढरे जोडे वापरतात. ते उंच, सडपातळ व वजनानें हलके असतात. लग्नांत हुंड्याची चाल नाहीं; स्वयंवरपद्धतीनें लग्नें होतात. डोंगरी लोकांखेरीज बाकीचे लोक शाकाहारी आहेत."

**परिलिगारु.**—निलगिरी पठारावर व त्याच्या पायथ्याशीं असलेल्या अरण्यांतून हे एरिलिगारु रानटी लोक राहतात. जीविताला आवश्यक असलेल्या कलांत ते अगदींच अनभिज्ञ आहेत. ते बहुतेक नग्न असतात, झाडांखालीं निजतात व वाघांना मोहित करण्याची आपल्यांत ताकद आहे असें मानितात. त्यांच्या बायकांसंबंधीं असें सांगतात कीं, त्या भक्ष्यशोधार्थ जंगलांत जातांना आपलीं मुलें वाघांच्या स्वाधीन करितात व परत आल्यावर तीं त्या हिंस्रप्राण्याकडून सुखरूप जशींच्या तशीं परत घेतात. त्यांचीं गांवें पर्वतांच्या उतारावर वसलेलीं असून, त्यांच्या मध्यभागीं उबाऱ्याकरितां व हिंस्रपशु जवळ येऊं नयेत म्हणून एक मोठी आगटी पेटविलेली असते. शेळ्यामेंढ्या व गुरें यांची ते निपज करितात; जाळ्यांत पक्षी व वाघ धरितात आणि केळीं, नारिंगें यांच्या मोठ्या बागा लावितात. सभोंवतालच्या निरनिराळ्या भाषांच्या मिश्रणानें त्यांची हेंगाडी भाषा बनली आहे. शेजारच्या लोकांशीं दळणवळण वाढत असल्यानें एरिलिगारु माणसाळत चालले आहेत.

**एरोड, पो ट वि भा ग.**—मद्रास इलाख्यांतील कोइम्बतूर जिल्ह्याचा एक पोटविभाग. ह्यांत एरोड, भवानी, धारापुरम, व करुर तालुक्यांचा समावेश होतो.

**ता लु का.**—मद्रास इलाख्यांतील कोइम्बतूर जिल्ह्याच्या पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ५९८ चौ. मै. लोकसंख्या(१९०१) २,७५,४६०. खेडीं १९८. एरोड गांव हें मुख्य ठिकाण. पूर्व सरहद्दीवरून कावेरी नदी वहाते. कावेरी खोऱ्यांतील हवा उष्ण व कुंद असते. पाऊसपाण्याचें सरासरी वार्षिक प्रमाण २७ इंच. कापूस बराच पिकतो.

**गां वः**—मद्रास इलाख्यांतील कोइम्बतूर जिल्ह्याच्या पूर्वसरहद्दीकडील एरोड तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. ( १९०१ ) १५५२९. बरेच वर्षांपासून हा मोठा महत्त्वाचा गांव असावा असें दिसतें.

मराठे, हैदर व ब्रिटिश ह्यांच्या वेळोवेळीं होणाऱ्या स्वाऱ्यांमुळें हें गांव बहुतेक पडलें होतें. १६६७ मध्यें म्हैसूर सैन्यानें हा गांव काबीज केला व १७६८ मध्यें हैदराकडून तो ब्रिटिशांनीं घेतला; पण त्याच वर्षीं त्यानें तो परत घेतला. पुढें १७९० मध्यें तो मेडोनें घेतला होता. पण टिपू येतो आहे असें समजतांच त्यानें तो सोडून दिला. १७९२ च्या तहानंतर फिरून लोक रहाण्यास येऊं लागले. म्यु. स्थापना १८७१ मध्यें. तामीळ व ग्रंथलिपींत लेख असलेलीं येथें दोन प्राचीन देवालयें आहेत.

**एर्नाकुलम**—मद्रास इलाख्यांतील कोचीन संस्थानाची राजधानी. क्षेत्रफळ पांच चौरस मै. लो. सं. ( १९०१ ) २१,९०१; पैकीं हिंदूंची संख्या ११,१९७ कोचीन स्टेट रेल्वेचें हें अखेरचें स्टेशन आहे. हें भरभराटीचें शहर आहे. येथील सार्वजनिक इमारती दरबारहाल ( दिवाणखाना ), चीफ कोर्ट, राजाचें कॉलेज, दिवाणकचेरी या होत.

**एलगंडल जि ल्हा**—हैद्राबाद संस्थानांतील वारंगळ विभागातील जिल्हा. चतुःसीमाः-उत्तरेस व वायव्येस आदिलाबाद व निझामाबाद, पश्चिमेस मेदक, दक्षिणेस वारंगल, पूर्वेस गोदावरी व प्राणहिता या नद्या. क्षेत्रफळ ७२०३ चौ. मै. ( जहागिरी जमीनी धरून ). संस्थानाच्या मालकीच्या व सर्फ-इ-खास जमिनीचें क्षेत्रफळ ५८९८ चौ. मै. होतें. गुरपल्लीपासून तों थेट जगतियल पावेतों ईशान्येस एक डोंगराची ओळ असून सुनिग्राम नामक डोंगरांची एक ओळ आहे. यांतील गोदावरी, मानार, प्राणहिता, पेड्डवागु व चेल्लु व वागु ह्या सर्व नद्या गोदावरी नदीच्या उपनद्या होत. वाघ, अस्वल, चित्ता, लांडगा, तरस, गेंडा, वगैरे श्वापदें आढळतात. गोदावरीच्या प्रदेशाची हवा मलेरियाजनक आहे.इतर तालुक्यांतील हवा हितकारक आहे.वार्षिक पाऊस पाणी ३३ इंच.

**इ ति हा स.**—ह्या जिल्ह्याच्या पूर्वेतिहासापैकीं माहिती उपलब्ध नाहीं. तरी हा वारंगळच्या राज्याचा भाग होता एवढें मात्र खरें, मुसुलमानांनीं तेलंगण जिंकल्यानंतर व वारंगळचें राज्य लयास गेल्यावर ह्याचा अनुक्रमें ब्राह्मणी व कुतुबशाहि राज्यांत समावेश झाला. गोवळकोंडा जिंकल्यानंतर अवरंगजेबानें हा दिल्लीच्या साम्राज्यास जोडला; पण १८ व्या शतकाच्या सुमारास असफजाहनें हैद्राबाद संस्थानाची स्थापना केल्यानंतर हा जिल्हा दिल्लीच्या साम्राज्यापासून वेगळा होऊन हैद्राबाद संस्थानांत मोडूं लागला.

येथें बरेच किल्ले, देवालयें व मशिदी आहेत. खुद्द एलगंडल येथील किल्ला बराच प्राचीन काळीं बांधलेला असून त्यांत १७५४ सालीं झफर उद-दौलानें बांधलेली मशीद आहे. जमिकुन्हा तालुक्यांत ७०० ते १००० वर्षांपूर्वी बांधलेले अनुक्रमें बजगूर व मलंगूर नामक दोन किल्ले आहेत. ह्याच तालुक्यांतील गुरशाल व कतकूर देवालयांपैकीं पहिलें वारंगळचा राजा प्रतापरुद्र ह्याच्या कारकीर्दींत १२२९ सालीं बांधलें गेलें. सध्यां हीं देवालयें जीर्णावस्थेंत आहेत. देवालयांबाहेरील स्तंभावर उडिया भाषेंत कांहीं लेख आहेत. जगतियलचा किल्ला १७४७ मध्यें झफरउद्दौल्याकरितां बांधण्यांत आला. तसेंच गोदावरीतीरावर ह्याच तालुक्यांत

धरमपुरी येथें एक जुनाट देवालय आहे. अनंतगिरीचा जीर्ण किल्ला सिरसिल्ला तालुक्यांत आहे. महादेवपूर तालुक्यांत काळेश्वर व सोनिपेठ येथें असलेल्या दोन मशिदी व तसेंच सिद्दीपेठ तालुक्यांतील राजगोपाळपेठ येथील मशिदी औरंगझेबानें बांधलेल्या आहेत. महादेवपूर तालुक्यांतील प्रतापगिरी किल्ला राजा प्रतापरुद्रानें बांधला असें म्हणतात. ह्या जिल्ह्यांत १५२३ गांवें व खेडीं असून त्यांची लो. सं. १९०१ सालीं १०३५५८२. होती.

मुख्य गांवें:—जगतियल, कोरतला, मन्थनी, करीमनगर (जिल्ह्याचें मुख्य ठिकाण) व वेमलवाडा. शेंकडा ९६ लोक हिंदु आहेत. शेंकडा ९० लोक तेलगू भाषा बोलतात व शेंकडा ६ उर्दू बोलतात. १९०५ सालीं परकाल तालुका वारंगळमधून काढून ह्या जिल्ह्यास जोडण्यांत आला. व चिन्नूर व लखसेटिपेठ अदिलाबादास जोडण्यांत आला व सिद्दीपेठ मेदकला जोडण्यांत आला. ह्या जिल्ह्याचें सध्याचें नांव करिमनगर असून ह्यांत करीमनगर, सुलतानाबाद, महादेवपूर, जमिकुन्टा, परकाल, सिरसिल्ला, जगतियल ह्या सात तालुक्यांचा समावेश होतो. शेंकडा ३५ हून अधिक लोक आपली शेतकीवर उपजीविका करतात. जमिनीचे चल्का, मसव व रेगर असे तीन प्रकार आहेत. रेगर जमिनींत रब्बीचीं पिकें पेरतात. मसव जमिनीचा उपयोग कांहींसा बागाईताकडे तर कांहींसा रब्बीच्या पिकांची लागवड करण्याकडे करतात. खरीपाची पेरणी चल्का जमिनींत करतात. येथें तलाव बरेच आहेत. नद्यांची खोरीं अत्यंत सुपीक आहेत. येथें रयतवारी पद्धति चालू आहे. मुख्य पीक ज्वारीचें असून इतर पिकें कापूस, तांदूळ, चणे, कडधान्यें व गळिताचीं धान्यें हीं होतात. चिन्नूर, महादेवपूर, लखसेटिपेट व सिरसिल्ला व जगतियलच्या भागांत बरेंच जंगल आहे. एकंदर जंगल ३०१८ चौ. मै. पैकीं राखलेलें ८१६ चौ. मै. आहे.

बहुतेक सर्वत्र अशुद्ध लोखंड सांपडतें. कोनसमुद्रम् व इब्राहिमपट्टण येथील पोलाद सुप्रसिद्ध आहे. सिद्दीपेठ व जगतियल तालुक्यांत रेशमी साड्या व उपरणीं तयार होतात. तसेंच जाडें भरडें सुती कापडहि सर्वत्र तयार होतें. जगतियल तालुक्यांत कोरटला येथें कागद तयार करतात. चिन्नूर तालुक्यांत टसर रेशमाचें कापड होतें. करीमनगर व मानकोन्डूर येथें रुप्याचें उत्तम जरी व वेलबुट्टी काम होतें. तसेंच उत्तमपैकीं पितळेचीं भांडींहि येथें तयार होतात. मुख्य निर्गत मालः—तांदूळ, ज्वारी, तीळ, मोहच्या, एरंडीचें बीं, तंबाखू, रेशमी कापड, कापूस चामडें वगैरे. आयात मालः—सुती व लोकरीचें विलायती कापड कांचसामान, साखर, सोनें व रुपें, मीठ, अफू, केरोसीन तेल व पितळेचे व तांब्याचे पत्रे.

व्यापाराचीं मुख्य ठिकाणें:—सिद्दीपेठ, पेद्दपल्ली, कमानपूर, जगतियल, धांवीरवपेठ व करीमनगर. बहुतेक कोमटीलोक व्यापार करितात. आगगाडी नाहीं. येथें तलाव, विहिरी व जंगल बरेंच असल्यामुळें दुष्काळाचें उग्र स्वरूप अजून दिसलें नाहीं. १८९७ सालीं पाऊस फक्त २८ इंच होता व बहुतेक पिकें बुडालीं. ह्या जिल्ह्याचे ४ पोटविभाग पाडले आहेत. पहिल्या पोटविभागांत जमिकुन्टा व परकाल हे तालुके असून दुसऱ्या पोटविभागांत सुलतानाबाद व महादेवपूर, तिसऱ्या पोटविभागांत जगतियल व सिरसिल्ला व चवथ्यांत करीमनगर. प्रत्येक तालुक्यास एक एक तहासिलदार आहे. सन १८६६ पावेतों खेडीं व तालुके वसुलीकरितां मक्त्यानें देत असत. पण हा जिल्हा तयार करण्यांत आल्यानंतर रयतवारी पद्धति अमलांत आणण्यांत आली. सारावसुली (१९०३) १८२८. एकंदर उत्पन्न २८८६. १९०३ सालापासून १ आणा डोईपट्टी आकारण्यांत आली आहे. सहा महिन्यांहून अधिक शिक्षा झालेल्या लोकांस वारंगळच्या सेन्ट्रल जेलमध्यें पाठविण्यांत येतें. शेंकडा १.८ लोकांस लिहितां वाचतां येतें. चाळीस प्राथमिक शिक्षणाच्या शाळा व दोन माध्यमिक शाळा आणि पांच दवाखाने आहेत.

एलाम.—इराणांतील सुसिआना प्रांताला बायबलांत हें नांव दिलेलें आहे. इराणांतील एका प्रांताला हें नांव होतें अगर हिंदुस्थानच्या सरहद्दीपासून तों इराणच्या आखातापर्यंत पसरलेल्या डोंगराळ मुलुखाला हें नांव होतें याबद्दल जुन्या भूगोलवेत्त्यांत मतभेद आहे. सुसिआना हें नांव सुसा या राजधानीच्या शहरावरून पडलें. या सर्व प्रांतांत निरनिराळ्या राष्ट्रजाती राहात असत. त्यांपैकीं सुसिआना नांवाचे लोक फार प्रबळ होते. या प्रांतांत पुष्कळ नद्या वहात असत. चोआस्पिस व यूलिअस यांच्या संगमावर सुसा शहर होतें. नाडिटू, डिनसार वगैरे दुसरीं शहरें समुद्रावर होतीं. फार प्राचीन काळीं येथें वसाहत झाली. अक्कडच्या सारगननें एलाम जिंकलें (ख्रि. पू. ३८०० वर्षें) व बाबिलोनच्या सुभेदाराची सुसा ही राजधानी झाली. त्या वेळीं हें शहर भिंती वगैरे बांधून संरक्षित केलेलें होतें. यानंतर कित्येक शतकें हा प्रांत सेमिटिक सत्तेखालीं होता. बाबिलोनच्या पहिल्या राजवंशाचा उदय होण्यापूर्वी एलामनें आपलें स्वातंत्र्य मिळविलें होतें. ख्रि. पू. २२८० च्या वर्षी एलामचा राजा कुतुर नाखखुन्ते (बुद्धपूर्वजग उत्तरभाग पृ. ४० पहा) यानें बाबिलोनियांत स्वारी करून इरेक येथून नना देवीची मूर्ती आणली. येथील राजे व बाबिलोनियाचे राजे यांच्या परस्परांवर अनेक स्वाऱ्या झाल्या. सुत्रुक नाखखुन्ते (कित्ता) यानें (ख्रि. पू. १२२०) बाबिलोनियाचा राजा झमसुमुम इदिन यास मारून खमुरबीचें कायद्याचें प्रसिद्ध पुस्तक आणलें. खुंबानिगस (ख्रि. पू. ७२० वर्षें) एलामचा राजा असतांना त्याची असुरियनांशीं लढाई झाली.

तिचा परिणाम म्हणजे बाबिलोनिया स्वतंत्र झाला. नंतर बाबिलोनियाच्या ऐवजीं असुरियाशीं एलामचे तंटे सुरू झाले. खि. पू. ६९४ व्या वर्षी बाबिलोनिया पुन्हां एलामच्या सत्तेखालीं आला पण थोड्याच दिवसांनीं तो स्वतंत्र झाला. असुरिया दिवसेंदिवस प्रबळ होऊं लागला. अखेरीस (खि. पू. ६४०च्या सुमारास) एलामचा राजा खुम्बाखालदस यावर असुरियानें स्वारी करून त्यास पिटाळून लावलें व त्याच्या बहुतेक सैन्याचा नाश केला. सुसा लुटलें गेलें व त्याचा नाश करण्यांत आला. सर्व प्रांत उध्वस्त केला गेला. राजघराण्याचीं थडगीं छिन्नविच्छिन्न करण्यांत आलीं देव व ३२ राजे यांच्या चांदीसोन्याच्या मूर्ती नेण्यांत आल्या (असुरबनिपाल पहा). असुरियनांचें साम्राज्य नष्ट झाल्यानंतर सायरसचा पूर्वज परशियन तीस्पीस यानें एलाम प्रांत घेतला. सुसा येथें परशियन साम्राज्याची राजधानी झाली दरायसच्या कारकीर्दीत सुसिआनिअनांनीं बंड केलें; पण तें मोडलें. पुढें ते हळू हळू आर्य लोकांत मिसळून गेले व त्यांची भाषाहि बदलली. या भागासंबंधींच्या अनेक गोष्टी बाबिलोनियाच्या इतिहासाशीं संबद्ध आहेत.

आज जरी पुष्कळ एलामाईट लेख उपलब्ध आहेत, तरी एलामाईट लोकांचा धर्म कोणता होता हें नक्की सांगतां येत नाहीं. मुळारंभीं बाबिलोनी धर्माप्रमाणें तो वन्यधर्मसदृश असावा; पुढें पुढें तो अनेकेश्वरी बनत चालला. प्रत्येक शहराची एक विशिष्ट संरक्षक देवता असून तिला इतरत्र देवतागणांत मान्यता असे. नप हा एलामाईट देवतावाचक शब्द असे; हा असुरीबाबिलोनि लोकांनीं त्यांच्यापासून घेतलेला दिसतो. सुंगम—सरा, शुदानु, सिल--गरा, नप्सा, किंदकर्पु, उदुरन वगैरे नांवें देवतांचीं होत. [साईसचा बायबल कोशांतील एलामवरचा निबंध].

**एलाय.**—इंग्लंडमधील केंब्रिजशायरच्या न्यूमार्केट पार्लमेंटरी विभागांत एलाय शहर आहे. वेस्टर्न रेल्वेनें केंब्रीजच्या उत्तरईशान्येस हें १६ मैल आहे. १९०१ सालीं शहरची लोकसंख्या ७७१३ होती. औस नदीच्या पश्चिमतीरावर हें आहे. जवळच तेलाच्या गिरण्या आहेत. व्याकरणशाळा व ख्रिस्ती सांप्रदायिक विद्यालय येथें आहे. १०८३ सालीं सायमननें मुख्य प्रार्थनामंदीर स्थापिलें. येथें नॉर्दंब्रिआच्या राजानें एथेलरेडशीं तिची इच्छा नसतांना लग्न केलें. त्यापूर्वीच हें शहर बरेंच नांवाजलेलें होतें. येथें आल्यावर तिनें एक मठ बांधला. ८७० साली डेन्स लोकांनीं हा मठ उध्वस्त केला. विंचेस्टरचा बिशप एथल वोल्डनें ९७० सालीं येथें बेनिडिक्टपंथी मठ बांधला. एडवर्ड दि कनफेसरच्या कारकीर्दीत मिळालेले हक्क व मुलूख कायम राहतील या अटीवर मठवासीयांनीं १०७१ सालीं एलाय बेट राजास दिलें. सेंट एथलरेडच्या प्रीत्यर्थ येथें जत्रा भरत असे. १३२१ सालीं मुख्य प्रार्थनामंदिराचा मनोरा ढासळल्यामुळें तीन मठांचा नाश झाला. या मंदिरांत प्रख्यात पुरुषांचीं स्मारकें आहेत. जुन्या मठांचें अवशेष येथें पुष्कळ आढळतात.

ईल नांवाचे मासे येथें सांपडतात म्हणून यास एलाय असें नांव पडलें. मठामुळें याचें महत्त्व जास्त वाढलें. बिशपकडे एकतंत्री सत्ता असून १८५० पर्यंत तोच बेलीफची नेमणूक करीत असे. १२९५ सालीं फक्त पार्लमेंटांत येथून दोन सभासद पाठविण्यांत आले होते.

**एलिआकॅपिटोलिना**—एलिआकॅपिटोलिना हें शहर ओसाड पडलेल्या यरुशलेमच्या जागेवर बादशहा हॅड्रिअन यानें इ. स. १३१ त बांधलें. एलिआ हें बादशहाचें आडनांव होतें. व कॅपिटोलिना हें नांव ज्याच्या नांवानें यहुदी देवळाच्या ठिकाणीं देऊळ बांधण्यांत आलें होतें त्या जुलिअस कॅपिटोलिनस याच्या नांवावरून आलें. येथें रोमन वसाहत होती.

**एलिचपूर तालुका.**—हा पूर्वी एलिचपुर जिल्हा असतांना त्यांतील मुख्य तालुका होता. परंतु आगष्ट १९०५ पासून तो जिल्हा मोडल्यानें उमरावती जिल्ह्यांतील एक तालुका झाला. हा उ. अ. २१°९' ते २१°२४' व पू. रे ७७° २३' ते ७७°५३' यांमध्यें आहे. ह्याचें क्षेत्रफळ४६९चौ. मैल. आहे. यांत ३११ खेडेगांवे असून त्यांपैकीं ७ जहागीरीचीं गावें आहेत. सातपुडा डोंगराच्या पायथ्याशीं पाइन घाटामध्यें हा तालुका आहे.

सामान्यवर्णनः—उत्तरेस मेलघाट तालुका आणि मध्यप्रांतांतील बैतुल जिल्हा. पश्चिमेस दर्यापूर तालुका. दक्षिणेस आणि पूर्वेस उमरावती आणि मोर्शी तालुके आहेत. याची पूर्वपश्चिम लांबी २४ मैल असून उत्तरदक्षिण रुंदी १६ मैल आहे. आकारानें उमरावती जिल्ह्यांत हा सर्वांत लहान तालुका आहे. प्रदेश बहुतेक सर्व सपाट आहे. येथें अजून पुष्कळ जंगल आहे. पुष्कळ ठिकाणीं पाणी अगदीं जवळ सांपडतें. यामुळें हा तालुका पुष्कळ दुष्काळांतून निसटला आहे. हवा अगदीं निरोगी असून एप्रिल आणि मे महिन्यांत उन्हाळा बराच असतो. या तालुक्यांतील चंद्रभागा आणि पूर्णा या नद्या मुख्य आहेत. यांतील पाणी फार खोल असल्यामुळें कालवे काढणें अशक्य आहे. परंतु या नद्यांत पाणी बारा महिने असल्यामुळें पाण्याची ददात नाहीं. एलिचपुरपासून जवळच चंद्रभागेला मिळणारी सरपण नांवाची नदी वाहते. त्या पाण्याचा पुरवठा पूर्वी एलिचपूरला होत होता. तसेंच दत्तुराजवळ 'सातबुडकी' म्हणून असेंच पूर्वीचें बांधलेलें काम आहे. त्यांतून आजूबाजूच्या बागाईत जमिनीला पाणी मिळत असे. हौझकटोरा नांवाचें हल्लीं एक रिकामें तळें आहे. त्याचा आणि 'सातबुडकी' यांचा संबंध होता अशी एक दंतकथा आहे. लोकसंख्या (१९०१) १४६०३५. इतर तालुक्यांतील लोकसंख्येशीं तुलना केली असतांना याची लोकसंख्या फार थोड्या प्रमाणांत कमी झाली आहे असें दिसून येईल. हा प्रदेश सुपीक आहे याची

साक्ष यावरून पटते. दर चौरस मैलास ३११ लोक असें लोकवस्तीचें प्रमाण आहे. वऱ्हाडांतील सर्व तालुक्यांपेक्षां हें प्रमाण जास्त आहे. बहुतेक सर्व जमीन वहीत आहे. या तालुक्यांत पांच मोठीं गावें आहेत. एलिचपुर, परतवाडा, शिरसगांव, चांदुरबाजार, करजगांव आणि ३०६ खेडेगांवें आहेत.

शेतकी:—ज्वारी, कापूस, तूर, गहूं हीं पिकें येतात. बागाईत फारसें नाहीं. रब्बीच्या पिकाखालीं थोडी जमीन असून बहुतेक तींत गहूं होतो. इ. स. १९११ सालीं १६३८ एकर बागाईत होतें.

श ह र.—वऱ्हाडची पूर्वीची राजधानी व हल्लींचें तालुक्याचें ठिकाण. उ. अ. २१° १६' आणि पू. रे. ७७°३३.' समुद्रसपाटीपासून १२०० फूट उंचीवर हें असून उमरावतीच्या वायव्येस ३० मैलांवर आहे. लोकसंख्या १९०१ त २६,०८२ होती. म्युनसिपालिटीची स्थापना जुलई १८६९. इ. स. १९०६–०७ सालापूर्वीच सोळा वर्षांचें सरासरीचें उत्पन्न रु. २०,१७४ व खर्च रु. १९,७४८. इ.स. १९०७–०८सालचें उत्पन्न २०,६४७ रुपये होतें. त्या वर्षाचा खर्च रु. २९,०२९ होता. शहराला पाण्याचा पुरवठा अर्वाचीन पद्धतीवर अजून झालेला नाहीं. लोकांनां विहिरींचें आणि सरपण व बिचन नद्यांचें पाणी वापरावें लागतें. पूर्वी बिचन नदीला बांध घातलेला होता. तेथून पाणी शहरांत आणीत असत. दुल्ला दरवाजा आणि वारकल दरवाजा यांच्या दरम्यान अजून मातीचे नळ आहेत. परंतु ते उपयोगांत नाहींत. हे नळ हिजरी सन ८२९ म्हणजे इ.स. १४२५ सालीं अहमदशहा वली बहामनी याच्या कारकीर्दींत घातले होते. आणखी थोडासा खर्च केल्यास त्यांचा उपयोग करतां येण्यासारखा आहे.

ज्यावेळीं एलिचपूर भरभराटींत होतें त्यावेळीं येथें कापूस आणि रेशीम यांचा व्यापार फार चालत असून लांकडावरील खोदकाम व दगडावरील कामहि उत्तम होत असे. याची साक्ष जुन्या इमारती देत आहेत. येथें विणण्याचें व रंगविण्याचें काम पूर्वीपासून पुष्कळ होत आहे. परंतु अलीकडे या सर्वांनां उतरती कळा लागत चालली आहे. येथील सतरंज्या जरी ओबड धोबड असतात तरी टिकण्यांत चांगल्या असून जिल्ह्यामध्यें पुष्कळ खपतात. खादी, रुमाल, पागोटीं, पटके, रेशीमकांठी साड्या वगैरे येथें होतात. परंतु कोष्ट्यांनां मजुरी साधारण मजुरांइतकीच जेमतेम पडत असल्यामुळें, व त्यांनां गिरणींतील मालाशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें हे सर्व धंदे खालावत चालले आहेत. अलीकडील सर्वांत महत्त्वाचा धंदा म्हटला म्हणजे कापसाचा. जरी तालुक्यांतील बहुतेक कापूस उमरावतीस जातो तरी येथें तीन सरकी काढण्याचे कारखाने व एक रुई दाबण्याचा कारखाना मिळून चार कारखाने आहेत.

या शहराचे पूर्वी ५४ पुरे असून त्यांपैकीं हल्लीं ३५ आहेत. त्यांचीं सर्व नांवें मुसुलमानी आहेत. आतां येथें मूर्तिजापूर–एलिचपूर ही रेल्वे आहे.

इतिहासः—एलिचपूर शहराचा इतिहास म्हणजे सर्व वऱ्हाडचा इतिहास होय. परंतु तो इतरत्र दिला असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करण्याची जरूर नाहीं. जिकडे तिकडे असलेल्या जुन्या इमारती या शहराचें पूर्वीचें वैभव दाखवितात. त्यांपैकीं मुख्य पहाण्यासारख्या इमारती म्हणजे सुलतान इमाद उल्मुल्क याचा दुर्गा ( इ. स. १३४७ ), हौझ कटोरा तलाव व मनोरा, दरुस शफ मस्जीद ( १३४० ), दुल्लाशाह अबदुल रहमान यांचें थडगें ( यास हिंदु व मुसुलमान दोन्ही पूज्य मानतात ), मानासिंगानें बांधलेली ममदलशाह विहीर, चौकमशीद, जामीमशीद, सुलतानपुरा ( १७५४ ) नांवाची दगडी इमारत, इस्माइलखान यानें गांवाभोंवतीं बांधलेला तट इत्यादि होत. हौझकटोरा या मनोऱ्याचें काम बहुतेक १४ व्या शतकांतलें असावें. हा एक अष्टकोनी विटा, वाळू आणि चुना यांचा एक मनोरा आहे. पठाणांच्या धर्तीवर सर्व बांधीव काम आहे. गुलाम हुसेनखानानें एक मोठा इमामवाडा बांधलेला आहे. परंतु एलिचपूरमधील सर्वांत प्रेक्षणीय इमारत म्हटली म्हणजे शरमस्त पुऱ्यांतील नबाबांची पुरण्याची जागा. हींत इस्माइलखानाचें थडगें असून दुसऱ्या कांहीं लहान लहान इमारती आहेत. त्या सर्व चांगल्या असून विशेषतः त्यांत दगडांवर केलेलें जाळींचें काम फारच छान आहे. या सर्व इमारतींच्या भोंवती एक दगडी भिंत असून तिला मोठे दोन दरवाजे आहेत. सर्व नबाबांनां बागेचा शोक होता आणि एलिचपूरच्या आसपास असल्या बागेचे अवशेष अजून पहावयास मिळतात. सर्वांत चांगली बाग नामदार बाग नांवाची असून ती दुल्लारहिमान दर्ग्याच्या जवळच आहे. सभोंवती भिंत असून पाणी देण्याकरितां एक मोठी विहीर आहे. हल्लीं येथें सरकी काढण्याचा कारखाना आहे.

ल ष्क र.—लष्करी ठाणें यास परतवाडा म्हणतात. हें एलिचपुरच्या उत्तरेस आहे. उमरावतीस जाण्याकरितां येथून चांगला पक्का रस्ता आहे. अजनगांव सुर्जीला जाण्यास साधा मुरुमाचा रस्ता असून तें गांव १६ मैलांवर आहे. असाच एक रस्ता चांदुर बाजारला जात असून तो गांव येथून चौदा १४ मैल आहे. म्युनसिपालिटीच्या हद्दींत जमीन सुमारें दोन चौरस मैल ( ११२ एकर आणि साडेसहा गुंठे ) आहे. लोकसंख्या सन १९०१ सालीं १०४१० ( लष्कर सहित) होती. एलिचपुर सबडिव्हिजनचें परतवाडा हें मुख्य ठिकाण आहे. म्युनसिपालिटी १८९३ त स्थापन झाली. इ. स. १९०६–०७ मागील चौदा वर्षांचें सरासरीचें उत्पन्न १८४०५ व खर्च १४८४३ रुपये इतका होता. पाण्याचा पुरवठा विहिरींपासून आहे. बहुतेक विहिरी चांगल्या आहेत.

परतवाडा हा गांव आलिकडेच वसलेला आहे. सलाबतखानाच्या कवाइती सैन्याचें हें लष्करी ठाणें होतें. इ. स. १८२३ सालीं हें लष्करी ठाणें झालें असें 'तुरुल बेरार' वरून दिसतें. जयपुर कोठली हें ठाणें त्याच वेळीं सोडलें. कॅप्टन सेयर हा त्यावेळीं अधिकारी होता. इ. स. १८४० सालीं मेडोज टेलरनें असें लिहिलें आहे कीं, येथील सर्व ब्रिगेडिअर चिखलदारा येथें उन्हाळ्यांत जात असे. परंतु पुढें पुढें ही संख्या कमी कमी करण्यांत आली. गांवांतून बिचन नदी वाहते व तीमुळें वस्ती व लष्कर असे दोन भाग झाले आहेत.

व्यापार.—मेलघाटांतून सागवान या बाजारांत येतें. त्याची विक्री दर गुरुवारीं होते. सुमारें ६००० रुपयांची विक्री दर गुरुवारीं होते. गुरांचाहि व्यापार बराच चालतो. येथें दोन सरकी काढण्याचे कारखाने व एक रुई दावण्याचा कारखाना आहे. पूर्वी येथें एक आगकाड्यांचा कारखाना होता. परंतु तो बंद पडला.

येथें मुलकी व दिवाणी ऑफिसें, पोलीस कचेरी, तुरुंग वगैरे आहेत. परतवाडा हें रोमन कॅथोलिक मिशनचें मुख्य ठाणें असून कोव्हकू व सेंट्रल इंडिया हिल मिशनचेंहि ठाणें आहे. येथें अनाथ बालकांकरितां एक धंदेशाळा चालविली असून जवळच तीन मैलांवर काठारिया येथें एक महारोग्यांकरितां इस्पितळ आहे. या दोन्ही संस्थांना सरकारची मदत आहे.

**एलिझाबेथ (१)**—(१५३३-१६०३) एलिझाबेथ ही आठव्या हेनरीची ॲनबुलिनपासून झालेली मुलगी होय. आपल्या पाठीमागें एलिझाबेथलाच इंग्लंडचें राज्य मिळावें अशी प्रथम हेनरीची इच्छा होती व त्याप्रमाणें पहिल्या बायकोपासून झालेली थोरली मुलगी मेरी इच्या ऐवजीं एलिझाबेथलाच राज्य मिळावें अशी त्यानें व्यवस्था केली होती. पण मध्यंतरीं ॲनबुलिनवर त्याची खप्पा मर्जी झाल्यामुळें हेनरीनें तिच्याशीं घटस्फोट केला व त्यामुळें एलिझाबेथचा राज्यावरील हक्क आपोआपच नाहींसा झाला. याच सुमारास हेनरीला एक पुत्र होऊन त्याचें नांव एडवर्ड हें ठेवण्यांत आलें. अर्थातच हेनरीच्या मागें एडवर्ड व एडवर्डच्या नंतर मेरी ही गादीवर बसली. यामुळें एलिझाबेथचें बालपण विशेष सुखांत गेलें नाहीं. ती प्रॉटेस्टंटपंथी होती. मेरीच्या कारकीर्दीत तिला फार त्रास सोसावा लागला. मेरीला एलिझाबेथ ही आपल्या मार्गांतील कांटा आहे असें नेहमीं वाटत असे. मेरी ही कॅथोलिकपंथाची असल्यामुळें व स्पॅनिश लोकांशीं तिचें सख्य असल्यामुळें स्पॅनिश लोकांनीं एलिझाबेथचा शिरच्छेद करण्याविषयीं फार आग्रह धरिला. एलिझाबेथला १५५४ मध्यें 'टॉवर' मध्यें कैदेंत ठेवण्यांत आलें. पण लोकांची टयूडर घराण्याबद्दल सहानुभूति असल्यामुळें एलिझाबेथचा शिरच्छेद करणें शक्य नव्हतें. दोन महिने टॉवरमध्यें राहिल्यानंतर तिला वुडस्टॉक येथें सर हेनरी बेडिंगफिल्डच्या ताब्यांत ठेवण्यांत आलें. १५५५ मध्यें ती हॅटफील्ड येथें आली. व त्या ठिकाणीं तिनें मेरीच्या उरलेल्या कारकीर्दीत आपले दिवस घालविले.

मेरी ही कॅथोलिक पंथाची पुरस्कर्ती असल्यामुळें तिनें धर्मवेडाच्या भरांत प्रॉटेस्टंटपंथानुयायांपैकीं प्रमुख लोकांना ठार मारलें. यामुळें इंग्लंडमधील लोकांनां फार चीड उत्पन्न झाली होती. तसेंच तिच्या मूर्खपणामुळें कॅले शहर इंग्लिशांच्या ताब्यांतून फ्रेंचांकडे गेलें. यामुळें तर इंग्लंडांतील लोक खवळून गेले. पण इतक्यांत मेरी मरण पावल्यामुळें व तिलाहि संतति नसल्यामुळें एलिझाबेथकडे गादीचा वारसा आला. एलिझाबेथ गादीवर आल्यामुळें इंग्लंडांतील लोकांनां आनंद झाला.

एलिझाबेथ ही अस्सल इंग्लिश स्त्री होती. इंग्रज लोकांचे गुणदोष तिच्या अंगीं पूर्णपणानें वास करीत होते. याशिवाय, इटालियन कल्पनांची तिच्यावर बरीच छाप पडलेली होती. त्यामुळें मुत्सद्दीगिरीपणांत ती अत्यंत निष्णात अशी झाली होती. धर्मविधींचा ती मनांतून तिटकारा करीत असे; पण आपले राजकीय हेतु साध्य करून घेण्यासाठीं जरूर पडेल तेव्हां ती हे धर्मविधी पाळण्यास मागेंपुढें पहात नसे. राज्यशकट चांगला चालण्यासाठीं जे धर्मगुरु सहाय्य करतील त्यांनांच ती मान देत असे.

एलिझाबेथ गादीवर बसली तेव्हां इंग्लंडची स्थिति अत्यंत वाईट झाली होती. फ्रान्स देशाशीं युद्ध करून मेरीनें राज्याचा खजिना रिकामा केला होता. आयर्लंडांत अंतस्थ यादवी माजली होती. स्कॉटलंडची राणी मेरी स्टुअर्ट हिनें फ्रान्सच्या युवराजाशीं विवाह केला होता. ती "एलिझाबेथ ही सशास्त्र लग्नाच्या बायकोपासून झालेली नाहीं" असें उघड बोलूं लागली, आणि इंग्लंडची गादी आपणास मिळाली पाहिजे असा तिनें दावा मांडला. यूरोपखंडांत कॅथोलिक्स आणि प्रॉटेस्टंट्स यांच्या दरम्यान मोठा झगडा चालला होता. अशा विकट परिस्थितींत तिला राज्यशकट हांकावयाचा होता. तिला गादीवरील आपली स्थिति कायम राखावयाची होती. याशिवाय इंग्लंडचे परकीय शत्रू, जबर कर, व अंतस्थ दुफळी यांपासून इंग्लंडचें रक्षण करून तें बलाढ्य करण्याची तिची इच्छा होती. अर्थातच हें सर्व साधण्याला ज्या ज्या युक्त्या व डावपेंच करणें तिला भाग पडत असे त्या त्या सर्व युक्त्या ती योजीत असे. तिनें निरनिराळ्या लोकांवर मोहपाश टाकले ते सर्व राजकीय डावपेचांच्या स्वरूपाचे होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहीं अंतस्थ शारिरिक व्यंगामुळें तिला लग्न करणेंच शक्य नव्हतें असें म्हणतात. ती स्वरूपानें जरी सुंदर होती तरी तिच्यांत मेरीप्रमाणें मोहकपणा नव्हता. चैनबाजी, सुंदर पोषाख, नखरेबाजपणा, लटकी फुशारकी यांची तिला फारच आवड असे. पण

बाहेरून जरी स्त्रीस्वभावानुरूप नट्टापट्टा करण्याची तिला संवय होती तरी तिच्या अंगीं स्त्रियांना लागणारें मार्दव मुळींच नव्हतें. तथापि या नखरेबाजपणाचा तिनें राजकारणाकडे चांगला उपयोग करून घेतला. मेरी स्टुअर्ट अगर फ्रान्स यांच्यापासून इंग्लंडला अगर तिला स्वतःला भीति उत्पन्न होण्याचा प्रसंग उत्पन्न झाला कीं, ती लगेच आपल्या शत्रूंनां गप्प बसविण्यासाठीं ऑस्ट्रियाच्या आर्चड्यूकशीं लग्न लावण्याची हूल उठवीत असे. फिलिपनें मेरी स्टुअर्टशीं लग्न लावल्याबरोबर तिनें दोघा फ्रेंच राजपुत्रांनां आपल्या मोहपाशांत गुंतविण्याची शक्कल काढिली. तात्पर्य तिनें आपल्या सौंदर्याचा राजकारणाकडे उपयोग केला; व कांहीं वेळां तिच्या शीलाला डाग लागण्याचा जरी प्रसंग आला तरी तिच्या वर्तणुकींतील वरील हेतु लक्षांत आणून तिच्या स्वभावांतील दोषांकडे वरेच ग्रंथकार दुर्लक्ष करतात.

आपल्या पाठीमागें राज्याचा वारसा कोणाकडे असावा यासंबंधींहि तिला काळजी वाटे. मेरीला आपल्यामागें राज्य देण्यांत यावें असें तिला सांगण्याची छाती होईना. कारण त्यामुळें प्रॉटेस्टंट लोकांनां तोंडघशीं पाडल्यासारखें झालें असतें. त्याच सुमारास मेरीवर कट करण्याचा आरोप प्रस्थापित होऊन तिला मृत्यूची शिक्षा फर्मावण्यांत आली.

मेरीच्या शिरच्छेदानें तिच्यावरचा एक प्रसंग टळला; पण स्पेनपासून तिला याच सुमारास दुसरें संकट प्राप्त झालें. स्पेनचा यूरोपमध्यें मोठ्या प्रमाणावर व्यापार चालू होता. दक्षिण अमेरिकेंत स्पॅनिश लोकांनीं बराच मुलूख काबीज केला होता, व त्या ठिकाणीं त्यांनां सोनें वगैरे विपुल मिळत असे. पण १५७२ व १५७७ या सालीं ड्रेक या नांवाच्या इंग्लिश चांच्यानें स्पॅनिश लोकांच्या मुलुखांत जाऊन तेथून सोन्यानें भरलेलीं जहाजें लुटून विपुल सोनें इंग्लंडांत आणलें. एलिझाबेथनें व इंग्लिश लोकांनीं याबद्दल ड्रेकचा सत्कार करून त्याला 'नाइट' ही पदवी बहाल केली. पुढें पुन्हां ड्रेकबरोबर २५ जहाजें देऊन एलिझाबेथनें दक्षिण अमेरिकेकडे ड्रेक यास पाठविलें. या गोष्टीमुळें चिडून जाऊन स्पेननें इंग्लंडवर स्वारी करण्याचा घाट घातला. शेवटीं दोन्ही राष्ट्रांमध्यें आरमारी युद्ध होऊन स्पेनचा त्या युद्धांत पराभव झाला.

अशा रीतीनें इंग्लंडवर येणाऱ्या संकटाचा नाश झाल्यावर तिनें अंतस्थ सुधारणेकडे आपलें लक्ष पुरविलें. इंग्लंडच्या परदेशांशीं होणाऱ्या व्यापाराला तिनें उत्तेजन दिलें. साहसी नाविकांनां व संशोधकांनांहि तिनें चांगलें उत्तेजन दिलें. त्यामुळें इंग्लंडला चांगले भरभराटीचे दिवस आले व इंग्लंडचें नांव सर्व राष्ट्रांच्या मुखीं झालें.

पण एलिझाबेथचे शेवटचे दिवस दुःखासमाधानांत गेले नाहींत. ती अविवाहित असल्यानें व आप्तेष्टांमध्येंहि तिच्या जिव्हाळ्याचें कोणी माणूस नसल्यानें तिला आपल्या आयुष्यांतील शेवटचे दिवस कंटाळवाणे जावेत यांत नवल नाहीं. तशांत लीस्टर, बर्ले, एसेक्स वगैरे तिचे आवडते लोक वारल्यामुळें तिला अधिकच अस्वस्थता प्राप्त झाली. अशा स्थितींत ती १६०३ मध्यें मार्च महिन्याच्या २४ व्या तारखेस मरण पावली.

एलिझाबेथच्या कारकीर्दींतील महत्त्वाच्या गोष्टींबद्दल 'इंग्लंडचा इतिहास' हा लेख पहा.

[संदर्भ ग्रंथ.—बिशप क्रेटन–क्वीन एलिझाबेथ(१८९६); ल्यूसी ऐकिन–मेमॉयर्स ऑफ दि कोर्ट ऑफ क्वीन इलिझाबेथ (१८१८); राइट—क्वीन एलिझाबेथ अॅन्ड हर टाइम्स (१८३८)].

(२)—(१७०९–१७६२) एलिझाबेथ ही रशियाची बादशाहीण. पीटर दि ग्रेट व मार्था स्कोव्हरॉस्काया यांची मुलगी असून मास्को येथें १७०९ डिसेंबर १८ रोजीं जन्मली. लहान वयांतहि तिची बुद्धि चांगली दिसत होती; परंतु दुर्दैवानें तिला शिक्षण अपुरें व अव्यवस्थित रीतीनें मिळालें. पीटर दि ग्रेटला व्यवसायातिशयामुळें फावत नसे व मातोश्री स्वतःच अशिक्षित पडल्या. म्हणून एक फ्रेंच गव्हर्नेस नेमिली होती. पुढें एलिझाबेथला इटालियन, जर्मन, स्वीडिश या भाषासुद्धां चांगल्या बोलतां येऊं लागल्या होत्या. दिसण्यांत मात्र लहानपणापासूनच एलिझाबेथ फार सुंदर व प्रफुल्लित दिसत असे. पीटर दी ग्रेटच्या मनांत तिला फ्रान्सच्या १५ व्या लुईला देण्याचें होतें. पण लुईला बोर्बोन घराण्याचा अभिमान असल्यामुळें त्याला असलें नातें आवडेना. नंतर पुष्कळ स्थळांबद्दल वाटाघाट झाली, परंतु एलिझाबेथच्या मनास त्यांपैकीं कोणीच येईना. पुढें १७२७ मध्यें तिची आई वारली व आवडती बहिण अॅन होल्स्टीनला निघून गेली. तेव्हां वयाच्या अठराव्या वर्षी ती स्वतः सिद्ध बनली. त्यावेळीं दुसरा पीटर राज्यावर होता. आणि मेनशिकोव्ह प्रधान होता तोपर्यंत तिला तिच्या दर्जाप्रमाणें उदारपणानें वागविण्यांत आलें. परंतु लवकरच डोलगोरुकिस प्रधान झाला. तो पीटर दि ग्रेटचा द्वेषी होता; त्यानें पीटरच्या या मुलीला दरबारांत बहुतेक मज्जावच केला. पीटरच्याप्रमाणें त्याची मुलगी एलिझाबेथ हीहि विषयीवृत्तीची होती; शिवाय कोणी वडील माणसांचा दाबहि उरला नव्हता. मग काय विचारतां ? सौंदर्य, तारुण्य व राजैश्वर्य यांनीं मदोन्मत्त होऊन ती विषयोपभोगांत स्वैर स्वच्छंदपणें मौजा मारूं लागली. ऐन विशीच्या अंमलांत पीटर दि ग्रेटची ही राजकन्या सैन्यांतल्या एका अॅलेक्झियस शुबिन नांवाच्या सार्जेंटावर आषक होऊन त्याच्याशीं रमूं लागली! पुढें अॅन राणीच्या हुकुमानें या सार्जेंटाला जीभ कापून जेव्हां लांब सैबेरियांत हांकून लावण्यांत आलें तेव्हां हिनें राझुमोव्हस्की नांवाचा एक सुंदर तरुण कोसॅक शिपाई गांठला व त्याच्याबरोबरच तिनें लग्न लाविलें. आपली चुलत बहीण अॅन हिच्या कारकीर्दींत (१७३०–१७४०)

एलिझाबेथ बहुतेक अज्ञातवासांतच होती. पुढें ॲन लिओपोल्डोव्हना ही कारभार पाहात असतां विशिष्ट राजकीय परिस्थितीनें या खुपसुरत व आलस्यप्रिय राजकन्येला हालवून कार्योद्युक्त केलें.राज्याधिकारारूढ सर्व माणसांनां स्थान भ्रष्ट करून स्वतः रशियाची बादशाहीण होण्याचा या कर्तृत्ववान सुंदरीनें बेत केला. त्यावेळीं रशियन दरबारावर पगडा बसविण्याचें आस्ट्रियाचें कारस्थान सुरू होतें. तें हाणून पाडण्याकरितां तत्कालीन फ्रेंच वकिलानें वरील कल्पना एलिझाबेथच्या डोक्यांत शिरवून दिली हें खरें आहे. पण ही कल्पना सुचवून मदतीकरितां २००० ड्युकट देण्यापलीकडे मात्र फ्रेंच वकीलानें त्या कटांत भाग घेतला नव्हता. या अद्भुत क्रांतीचें सर्व श्रेय एव.ढ्या एलिझाबेथलाच आहे.तिला आजन्म एका मठांत कोंडून ठेवण्याचा विचार चालू होता. तसली घोर आपत्ति टाळण्याकरितां तिनें आपल्यामधील अद्भुत सामर्थ्य एकदम प्रकट केलें. १७४१ डिसेंबर ६ रोजीं मध्यरात्रीच्या समयास बरोबर कांहीं मित्रमंडळी म्हणजे तिचा वैद्य, खासगी कारभारी, भावी पति व आणखी दोघे इसम घेऊन ती प्रीओब्रेंझेस्की गार्ड्स यांच्या छावणींत गेली व तेथें स्फूर्तिदायक भाषण करून तिनें आपल्या कार्यात त्यांची सहानुभूति मिळविली व त्यांना बरोबर घेऊन विंटर पॅलेसकडे निघाली; वाटेनें तिनें सर्व मंत्र्यांनां कैद केलें; आणि राजवाड्यांत शिरून कारभारीण ॲन व तिची मुलें यांनां अंथरुणांतच गांठून पकडलें व सर्व बड्या लोकांची सभा बोलाविली. ही सर्व राज्यक्रांति तिनें एका रात्रींत इतक्या झटपट व बिनबोभाट रीतीनें घडवून आणिली कीं, खुद्द त्या शहरांतील लोकांनांहि सकाळीं आठ वाजेपर्यंत त्यांचा मागमूस नव्हता. अशा तऱ्हेनें केवळ तीस-तेहेतीसाव्या वर्षी सुखालस्यांत लोळणाऱ्या या स्त्रीनें राजव्यवहाराचें फारसें ज्ञान व मुळींच अनुभव नसतांहि रशियन साम्राज्याच्या बादशाहिणीचें पद प्राप्त करून घेतलें! तो काळ तर रशियन साम्राज्याला मोठा आणीबाणीचा होता.पण सुदैवाची गोष्ट अशी कीं, पीटर दि ग्रेटच्या या मुलींमध्यें जरी बरेच दोष होते, तरी बापाचें राजकारणकौशल्यहि बरेंच उतरलें होतें. तिची तीक्ष्ण न्यायबुद्धि व कारस्थानपटुत्व पाहिलें कीं पीटर दि ग्रेटचीच आठवण होते. तिच्या वर्तनांत दिसणारा अनिश्चितपणा किंवा दीर्घसूत्रीपणा हे खरोखर दोष नव्हते तर सुनिश्चय होण्याकरतां ती प्रसंगविशेषीं मुद्दाम कालावधी लावीत असे; व आपल्यामधील स्त्रीस्वभावसहज दुर्ग्रहांनां बळी न पडतां ती आपलीं साम्राज्यविषयक कर्तव्यें बरोबर ओळखीत असे.

तिनें प्रथम पीटर दि ग्रेटच्या नमुन्यावर सेनेट सभा स्थापन केली. स्वीडनपासून आपल्या नव्या कारस्थानकुशल बेस्तुझेवर्यूमिन नांवाच्या व्हाइस चॅन्सेलरच्या करामतीनें फिनलंडचा दक्षिण भाग मिळवून तिकडील भांडण मिटाविलें. नंतर बेस्तुझेवनें फ्रॅंको-प्रशियन दोस्तीचें धोरण सोडून देऊन ॲंग्लो-आस्ट्रो-रशियन दोस्तमंडळ स्थापन केलें. हें एलिझाबेथचें धोरणहि रशियाच्या अत्यंत हिताचें होतें. तिनें सैन्यहि जय्यत तयार ठेवलें होतें.यामुळें स्वीडन, पोलंड, टर्की वगैरे सर्व बाजूंनां रशियाचें वजन वाढून प्रशियाच्या फ्रेडरिक दि ग्रेटचे हातपाय जखडल्यासारखे झाले. याचें श्रेय बेस्तुझेवला आहे तितकेंच एलिझाबेथला आहे; कारण पुष्कळांनीं त्याच्याविरुद्ध कान फुंकले असतांहि त्याच्यावर तिनें अढळ विश्वास टाकला होता. एलिझाबेथच्या उत्तरावधींतील सप्तवार्षिक युद्ध हें महत्त्वाचें प्रकरण होय. त्यांत दोस्तींचे पूर्वकरार धाब्यावर बसवून ब्रिटन प्रशियास मिळालें तेव्हां एलिझाबेथनें फ्रॅंको-आस्ट्रो-रशियन दोस्ती करून १७५७ मेमध्यें कोनिग्जबर्गवर ८५००० हजार सैन्य धाडलें. युद्ध चालू असतां ती आजारी पडली, बेस्तुझेव अधिकारच्युत झाला व खुद्द सेंट पीटर्सबर्ग येथें परराष्ट्रांनीं अनेक कुलंगडीं उपस्थित केलीं. पण युद्ध नेटानें चालवून कुनेर्सडार्फला प्रशियाचा जंगी पराभव करून तिनें फ्रेडरिकचा सफा नाश करण्याची वेळ आणली. तेव्हांपासून फ्रेडरिकनें जयाबद्दल निराश होऊन धास्तीच घेतली. तथापि रशियन व आस्ट्रियन सेनापतींत कांहीं कलह होऊन रशियाचे बेत ढिले पडले. तरी १७६१ पर्यंत एलिझाबेथनें रशियाच्या फायद्याच्या दृष्टीनें फ्रेडरिकच्या राज्यमर्यादा निश्चित ठरवून व त्याला 'एलेक्टरां'च्याच यादींत लोटून शेजाऱ्यांस त्याच्या साम्राज्याकांक्षेचा उपद्रव होणार नाहीं असा बंदोबस्त करण्याची खटपट चालविली होती. फ्रेडरिकनेंहि १७६० मध्यें "माझे उपाय थकले, युद्ध चालू राहिल्यास मी ठार बुडणार!" असे उद्गार काढले परंतु १७६०-६१ हीं सालें फ्रान्स व आस्ट्रिया यांस यशस्वी न झाल्यामुळें त्यांनीं तहपरिषद भरविण्याचा रशियाला तगादा लावला. तरी १७६१ त रशियन सैन्यानें कोलबर्ग किल्ला जिंकून घेतलाच. त्यामुळें फ्रेडरिक पूर्ण निराशेंत असतां एकाएकीं मोठी आनंदाची बातमी त्याला मिळाली कीं, १७६२ जानेवारी ५ रोजीं ही रशियन बादशाहीण ख्रिस्तवास्ती झाली.

एलिझाबेथ अत्यंत स्वेच्छाचारी दिसत असली तरी तिच्या अंगीं अलौकिक गुण होते. ती पूर्ण स्वदेशाभिमानी असून जर्मनांनां पार हांकून लाविण्याचा तिचा बेत या गुणास अनुसरूनच होता. पीटरच्या वंशांत त्याचें नांव काढणारी तिच्याखेरीज दुसरी कोणी व्यक्ति झाली नाहीं. इंग्लंडच्या एलिझाबेथमध्यें हिच्यासारखे कांहीं अवगुण होते पण राजकारणपटुत्वाचा अभाव होता. तेव्हां ही रशियन सम्राज्ञी शहाणपणा व मुत्सद्देगिरी या बाबतींत स्त्रीजातीला ललामभूत आहे यांत शंका नाहीं. [ राबर्ट निस्बेट बेन--दि डॉटर ऑफ पीटर दि ग्रेट; सर्गिई-हिस्टरी ऑफ रशिया पु. २०-२२ ]

**एलिस**—ग्रीसमधील एलिस प्रांताचें एक मुख्य शहर हें पेनीअस नदीवर वसलें आहे. दंतकथेप्रमाणें ऑक्सीलस

हा या शहराचा मूळ संस्थापक होय. ख्रि. पू. ४७१ या वर्षीं नजीकचीं लहान लहान खेडीं यांत सामील केलीं गेल्यामुळें या शहराची मर्यादा व त्यावरोबर महत्त्वहि फार वाढलें. एलिसमधील प्रसिद्ध संस्था म्हणजे तेथील मल्लभूमि होय.ऑलिंपिआ येथील क्रीडोत्सवाकरितां या ठिकाणींच उमेदवार तालीम घेत असत. एलिसमध्यें पुष्कळ देवालयें आहेत. त्यांत अपोलो, सायलेनस व अथेना इत्यादिक देवतांचीं देवालयें प्रमुख होत.

ख्रि. पू. ३९९ या वर्षीं स्पार्टाच्या राजानें हें शहर हस्तगत केलें. ख्रि. पूर्व ३१२ त येथील अन्तर्दुर्गाला तटबंदी करण्यांत आली. परंतु थोडक्याच काळानंतर फायलेमॉन या अँटिगोनसच्या सेनापतीनें ती पाडून टाकिली.

**एलेनबरो** ( लॉर्ड— १७९०-१८७१ ) हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल ( १८४२-४४ ). याचें शिक्षण ईटन आणि केंब्रिज येथें झालें. सेंट मायकेल परगण्यातर्फे तो १८१८ पर्यंत हाऊस ऑफ कॉमन्सचा सभासद असे. त्या सालीं बापाच्या मृत्यूमुळें त्याला हाऊस ऑफ लॉर्ड्स-मध्यें जागा मिळाली. १८२८ तील वेलिंग्टनच्या कारभारांत त्याला ' लॉर्ड प्रीव्हीसील ' ( राजाच्या खासगी मोर्तबाचा अधिकारी ) करण्यांत आलें. परराष्ट्रीय राजकारणांत त्याचें बरेंच लक्ष असे. पण त्याला परराष्ट्रमंत्र्याची जागा न मिळतां बोर्ड ऑफ कंट्रोलच्या अध्यक्षाचा मान मिळाला. हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीकडून काढून घेऊन तो प्रत्यक्ष राजाकडे यावा असें त्याचें मत होतें. मध्यआशियाचें ज्ञान करून घेण्याकरितां त्यानें बर्नेसला तिकडे पाठविलें. लॉर्ड ऑकलंडच्या मागून डायरेक्टरांनीं गव्हर्नर जनरलच्या जागीं एलेनबरोची नेमणूक केली ( १८४२ ). एलेनबरो आशियांत शांतता प्रस्थापित करण्याच्या उद्देशानें गेला खरा पण त्याची अडीच वर्षांची सबंध अमदानी युद्धांत निघून गेली. हिंदुस्थानांत पाय ठेवल्यावर त्याला काबूल येथें इंग्लिशांची झालेली कत्तल, गझनी आणि जलालाबाद यांनां पडलेला वेढा व मद्रासच्या शिपायांची बंड करण्याची तयारी यांसारख्या चिंताजनक वार्ता कानीं आल्या. प्रथम अफगाणांचा पाडाव करून मग त्यांनां वाटेल तें करण्यास मोकळें ठेवावयाचें हा त्याचा पहिला बेत लगेच फिरून ब्रिटिश कैद्यांनां सोडविण्याकरितां पुढें चाल करून जात असलेल्या पोलॉक व नॉट या सेनापतींनां त्यानें मागें फिरण्याचा हुकूम केला. पण त्या शूर सरदारांनीं पहिलाच हुकूम मानून काबूलवर हल्ला चढविला व अफगाणांचा पुरा सूड उगविला. तेव्हां एलेनबरोहि आनंदानें बेहोष होऊन त्यानें नॉटला सुलतान महंमदानें सोमनाथाचें देवालय लुटून गझनीला नेलेले चंदनी दरवाजे परत आणण्याविषयीं लिहिलें; व त्यांच्या स्वागतार्थ मोठा समारंभ करण्याचा बेत करून जाहिरनामा काढिला. हा हास्यास्पद समारंभ कोणालाहि आवडला नाहीं. शिवाय गझनीहून आणलेले दरवाजे खरे सोमनाथाचे चंदनी दरवाजे नसून गझनीच्या मुसुलमान कारागिरांनीं पाईन लांकडाचे त्यावरहुकूम केलेले दरवाजे होते. पण लॉर्ड साहेबांनां स्वतःच्या बडेजावीची मोठी हौस असल्यामुळें त्यांनीं अशा प्रकारचे दुसरे कांहीं समारंभ करविले.

यानंतर सिंधच्या अमीराशीं विनाकारण युद्ध सुरू केलें व तो प्रांत आपल्या घशांत घातला; कारण सिंधुनदांतून होणारा व्यापार स्वतंत्रपणें सरकारला आपणाकडे पाहिजे होता. हें अन्यायी वर्तन इंग्रज इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ यालाहि पसंत नाहीं. सिंध लुबाडल्यानंतर ग्वाल्हेर संस्थानांतली लष्करी सत्ता मोडण्यांत आली; पण एलेनबरोनें यावेळीं मोठा शहाणपणा दाखवून ग्वाल्हेरचें राज्य कायम ठेविलें. ग्वाल्हेरवरची ही मोहीम अवश्यक होती; कारण पुढें शीख सैन्य व हें बंडखोर शिंद्यांचें सैन्य एक झालें असतें तर शीखयुद्ध कोणत्या थराला गेलें असतें तें सांगवत नाहीं. पण डायरेक्टर लोकांनां एलेनबरोला परत बोलाविणें जरूर वाटलें ( १८४४ ); कारण जरी इंग्लंडचें कारभारीमंडळ व राणी यांच्या तो विश्वासांतला होता तरी डायरेक्टरांची तो मुर्वत ठेवीत नसे व त्यांचें ऐकत नसे. या गव्हर्नरनें गुलामगिरी अमान्य ठरविणारा कायदा केला, लॉटरी बंद केल्या व बंगालमधील पोलिसांची सुधारणा केली.

इंग्लंडांत गेल्यावर १८४६ त तो पहिला आरमारी अधिकारी झाला. १८५८ त चवथ्यानें बोर्ड ऑफ कंट्रोलचा अध्यक्ष झाला.. लॉर्ड कॅनिंगच्या अयोध्येच्या जाहीरनाम्याविरुद्ध यानें टाईम्समध्यें खरमरीत टीका केल्यावरून दोन्ही हाऊसनीं त्याच्यासंबंधीं निंदाव्यंजक ठराव पास केला; तेव्हां त्याला राजीनामा देणें भाग पडलें. १८५८ सालीं हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत जो फेरबदल झाला तो बहुतेक सर्व १८५२ त एलेनबरोनें हाऊस ऑफ कॉमन्सच्या सिलेक्ट कमीटीपुढें दिलेल्या साक्षींत ग्रथित केलेला होता. तेव्हां १८५८ नंतरची हिंदुस्थानची राज्यघटना त्यानेंच आंखल्याप्रमाणें होती असें म्हणणें वावगें होणार नाहीं. अफगाणिस्तानासंबंधीं त्याचें धोरण, सिंधची जप्ती व ग्वाल्हेरवर मोहीम या त्याच्या अमदानींतल्या मुख्य गोष्टी होत. व त्यासंबंधीं अनुकूल प्रतिकूल टीका पुष्कळ होऊन गेल्या आहेत.

[ संदर्भग्रंथः—लॉर्ड कोलचेस्टर संपादित हिस्टरी ऑफ दि इंडियन अॅडमिनिस्ट्रेशन ( बेंटले. १८७४ ). मिनिट्स ऑफ एव्हिडन्स टेकन बिफोर दि सिलेक्ट कमिटी ऑन इंडियन टेरिटरीज ( जून १८५२ ). फ्रेंड ऑफ इंडिया ( १८४२-१८४५ ); सिंधच्या इतिहासावरील ग्रंथ.स्मिथ— दि ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ].

**एलेफन्टा**—' घारापुरी ' पहा.

**एल्जिन**—एल्जिन हें स्कॉटलंड देशामधील एल्जिन-शायर परगण्यांतलें मुख्य गांव असून रॉयल, म्युनिसिपल व पोलिसबरो आहे. हें गांव लॉसी नदीवर वसलेलें आहे. याची लोकसंख्या ( १९०१ ) ८४६० होती. हें फार प्राचीन गांव आहे. येथील एका टेंकडीवर गॉर्डनच्या ड्यूकचें स्मारक आहे. आगीनें या शहराचें फार नुकसान झालें. इ. स. १७४६ त राजपुत्र चार्लस एडवर्ड हा थंडर्टन वाड्यांत राहिला होता. १९व्या शतकाच्या आरंभापासून या शहरांत सुधारणा झाली. हें स्कॉटलंडमधील निसर्गरमणीय प्रदेशांत असून येथील निरोगी हवा, स्वस्त रहाणी, शिक्षणसंस्था यामुळें याची बरीच भरभराट झाली आहे. इ. स. १२२४ त बांधलेलें मोरेचें प्रार्थनामंदीर, नगरभवन, पदार्थसंग्रहालय, शिक्षणसंस्था, बाजार, कला व शास्त्र यांचें व्हिक्टोरिया विद्यालय, हीं महत्त्वाचीं स्थळें आहेत. येथील उद्योगधंदे म्हणजे दारू गाळणें, कातडीं कमावणें, लोखंडाचें ओतीव काम करणें, लोंकरीचीं वस्त्रें विणणें वगैरे आहेत. एल्जिन व दुसरीं पांच शहरें मिळून पार्लमेंटांत एक सभासद पाठवितात. एल्जिनच्या दक्षिणेस २॥मैलांवर बिर्नी नांवाचें स्कॉटलंडमधील अतिशय जुन्यांपैकीं एक प्रार्थनामंदीर आहे. हें इ. स. ११५० च्या पूर्वी बांधलें असावें.

**एल्जिन लॉर्ड** ( १८११–१८६३ )—हिंदुस्थानचा एक व्हाइसरॉय व गव्हर्नर-जनरल ( १८६२–६३ ). १८४१त हा ८ वा अर्ल ऑफ एल्जिन व १२ वा अर्ल ऑफ किंकार्डीन या नांवानें सरदार झाला. डलहौसी व कॅनिंग यांच्या जोडीनें हा ईटन व ऑक्सफोर्ड या ठिकाणीं विद्याभ्यास करीत होता. १८४२त त्याला जमेकाचा गव्हर्नर व पुढें चार वर्षांनीं कानडाचा गव्हर्नर-जनरल नेमण्यांत आलें. या दोन्ही हुद्द्यांवर असतांना त्यानें लोकांनां संतोषी व सुखी ठेऊन कारभार हांकला. १८५६ त चीन व इंग्लंड यांमध्यें तंटा उपस्थित झाला असतां याला चीनशीं बोलणें करण्याकरितां पाठविलें. लॉर्ड कॅनिंगनंतर याला हिंदुस्थानचा व्हाइसरॉय व गव्हर्नरजनरल नेमण्यांत आलें. त्याला या अधिकारावर असतांना फारसें काम करतां आलें नाहीं, सरहद्दीवरील बंडें मोडण्याकरितां त्यानें जय्यत तयारी ठेवली होती. सुमात्रामध्यें वरचढ झालेल्या डच लोकांनां आपल्या काबूंत आणण्याची त्यानें मोठी खटपट केली. चहाची लागवड व तिबेट आणि काश्गर यांनां जाणारे व्यापारी मार्ग हे प्रश्न निकालांत काढण्याकरितां सिमल्याहून सियालकोटला जात असतां वाटेंत धर्मशाळा या ठिकाणीं तो मृत्यु पावला. वालरोडनें त्याचीं पत्रें व रोजनिशा एकत्र करून प्रसिद्ध केल्या आहेत. तो ग्रंथ याचें समग्र चरित्र अवगमण्यास उपयोगी पडेल. 'फ्रेंड ऑफ इंडिया' १८६२–१८६३ मध्यें याचा हिंदुस्थानांतील छोटा कारभार वर्णिला आहे.

( २ ) याच नांवाचा हिंदुस्थानचा दुसरा एक व्हाइसरॉय. (१८९४–९९).हा वरील एल्जिनचा मुलगा असून याची कारकीर्द मोठीशी महत्त्वाची झाली नाहीं.१८९७–९८मधील सरहद्दीवरची बंडाळी हीच काय ती या कारकीर्दीतील विशेष गोष्ट म्हणतां येईल. पहिला प्लेग व भयंकर दुष्काळ या आपत्तींनीं याच्या अमदानींत हिंदुस्थान ग्रासलें गेलें होतें.१९०५ सालीं कँपबेल-बॅनरमन मुख्य प्रधान असतां हा वसाहतींचा सेक्रेटरी म्हणून नेमला गेला. पण याचा अंडर सेक्रेटरी विन्स्टन चर्चिल याच्यापुढें एल्जिनचें तेज पडेना. १९०८ सालीं आस्क्विथ मुख्य प्रधान झाला तेव्हां एल्जिनला प्रधानमंडळ सोडावें लागलें.

**एल्फिन्स्टन मौंट स्टुअर्ट** (१७७९–१८५९ )पेशवाईअखेरचा पुण्याचा रेसिडेंट. हा स्कॉटलंडचा रहिवासी असून तेथील एका सरदाराचा सर्वांत धाकटा मुलगा होता. जेव्हां सोळाव्या वर्षी बंगालमधील ईस्ट इंडिया कंपनीच्या खात्यांत लेखक म्हणून त्याला नेमण्यांत आलें तेव्हां त्याचें फारसें शिक्षण झालें नव्हतें. त्याचा चुलता त्यावेळीं ईस्ट इंडिया कंपनीचा एक डायरेक्टर असल्यामुळें त्याच्या वशिल्यानें एल्फिन्स्टनला ही जागा मिळाली एल्फिन्स्टनच्या आईनें तेव्हां हिंदुस्थानचा गव्हर्नरजनरल असलेला लॉर्ड मॉर्निंगटन याच्याजवळ आपल्या मुलाविषयीं रदबदली करण्याकरितां डंडासचें मन वळविलें. तेव्हां साहजीकच डंडासच्या शिफारसीवरून मॉर्निंगटननें एल्फिन्स्टनकडे आपलें लक्ष पोंचविलें, आणि त्याला १८०१ मध्यें पुण्यास कर्नल क्लोज या रेसिडेंटचा एक मदतनीस म्हणून मुत्सद्दीपणाच्या कामावर नेमलें. इंग्रजांच्या मराठ्यांशीं झालेल्या ( आसईच्या ) युद्धांत एल्फिन्स्टन हा सर आर्थर वेलस्लीच्या मदतनीस माणसांतील एक होता. त्या जागेवर असतांनाच वेलस्लीच्या शिक्षणाप्रमाणें त्यानें आयर्न ड्यूकपासुन हिंदुस्थानच्या इतिहासांत मुत्सद्देगिरी व राजकारण या नांवाखालीं मोडली जाणारी कुटिल नीति संपादन केली.

युद्धानंतर एल्फिन्स्टनची नागपूर येथें रेसिडंट म्हणून नेमणूक झाली. तेथें तो चार वर्षांहून अधिक दिवस होता. हिंदी संस्थानिकांच्या दरबारीं रेसिडेंट नेमण्याचा ईस्ट इंडिया कंपनीचा हेतु, गुप्त कट व अंतःकलह वळावून तीं संस्थानें शेवटीं स्वतःच्या घशांत टाकण्याला मार्ग करून देण्याचा असे. नागपूर येथें एल्फिन्स्टनची कामगिरी म्हणजे असा कट चालू ठेवणें व हेराचा धंदा करणें हीच असे. त्याचा धनी सर आर्थर वेलस्ली त्याला पत्रांत असें लिहितो कीं, "बातमी मिळविण्याकरितां तुम्हाला जें योग्य वाटेल तें कांहींहि तुम्ही करा. जर तुम्हांस असें वाटत असेल कीं जयकिसनराम तुमच्याकरितां तें काम करील किंवा तुम्हास बातमी देईल तर गव्हर्नरजनरलजवळ तुझी शिफारस करीन असें त्याला वचन द्या आणि याविषयीं त्यांनां कळवा."

ही शिफारस म्हणजे काय हें सर आर्थर वेलस्लीनें एल्फिन्स्टनला दुसऱ्या लिहिलेल्या पत्रांत सांगितलें आहे. "रामचंद्र निघून जाण्यापूर्वी त्यानें आपण चाकरी करण्याला

तयार आहों असें सांगितलें. त्याच्याविषयीं तुमच्याजवळ मी शिफारस केली. तो हुषार मनुष्य दिसतो व राजानें त्याला अतिशय महत्त्वाच्या दळणवळणाच्या कामगिरीवर नेमलेलें आहे. सालाला सहा हजार रुपये पेनशन देण्याबद्दल गव्हर्नरजनरलजवळ मी त्याची शिफारस केली आहे. मला वाटतें कीं तो तुम्हांस उपयुक्त बातम्या पुरवीत जाईल. ''

हा कटाचा मार्ग अनुसरल्यापासून राजकारणांत एल्फिन्स्टन पुरा बाकबगार बनला. आणि त्याच्या नीतिधर्माचा ऱ्हास झाला. हें तो एके ठिकाणी स्वतःच कबूल करतोः— तो उतारा असाः—

'' नागपूरला आल्यापासून मी फारच निष्ठुर व कठोर हृदयी झालों आहें. माझ्या मतें याचें कारण कांहीं अंशीं माझें काम होय. तें मला सुसंस्कृत विचार मनांतून पार घालवून देण्यास भाग पाडतें '' तथापि नागपूरला असतांनाच लेखनवाचन यांकडे त्याचें मन जाऊन तो आमरण विद्याव्यासंगी राहिला.

१८०८ मध्यें त्याला अफगाणिस्तानांत पाठविलें पण लॉर्ड मिंटोच्या कारकीर्दीतील त्याची मुत्सद्देगिरी या वकिली कामगिरींत पूर्ण अयशस्वी झाली. अफगाणिस्तानच्या जागरूक असलेल्या बादशहास त्याला फसवितां आलें नाहीं (कोलब्रूकनें लिहिलेलें चरित्र, पु. १. पा. २१८ ). या सफरीची आठवण म्हणून त्यानें काबूलसंबंधीं पुढें एक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. इतर ब्रिटिश लोकांप्रमाणें आपलें नांव कमविण्याची व हिंदुस्थानांत असलेल्या आपल्या सहकाऱ्यांनां आणि सहधर्मीयांनां मदत करण्याची त्याला महत्त्वाकांक्षा होती. अफगाणिस्तानांत असतांनाच त्यानें गव्हर्नरजनरलला अमिरापासून सिंध हस्तगत करण्याविषयीं लिहिलें होतें ( कित्ता, पा. २१८–२० ).

त्यावेळीं लॉर्ड मिंटो गव्हर्नर जनरल होता. त्यानें एल्फिन्स्टनची सूचना स्वतःला पसंत नसल्यानें मान्य केली नाहीं. पण आतां पुण्याचा रेसिडेंट म्हणून त्यास दुसऱ्या धन्याच्या हाताखालीं वागावयाचें होतें. मार्क्विस हेस्टिंग्ज हा महत्त्वाकांक्षी व बेदिक्कत मनुष्य होता. त्याचें धोरण म्हणजे कपटानें व बळजबरीनें हिंदुस्थानचा जेवढा म्हणून भाग आपल्या हातांत घेतां येईल तेवढा घ्यावयाचा. तेव्हां आपलें धोरण चालू ठेवण्याच्या कामीं एल्फिन्स्टन हा त्याला चांगला मदतगार मिळाला होता. एल्फिन्स्टन हाहि किती बेदिक्कत होता हें त्याच्या एका १८११–१२ मध्यें लिहिलेल्या पत्रावरून दिसतें.

पेशव्यांशीं प्रत्यक्ष संबंध न ठेवतां पेशवे आणि त्यांचा दरबार यांच्याशीं व्यवहार करण्याकरितां सर बॅरी क्लोजनें एक खुश्रु शेटजी जमशेटजी मोदी नांवाचा पार्शी वकील नेमला होता. हा न्यायी व मोठ्या हुद्याचा असल्यानें त्याची नेमणूक सर्वांनां पसंत होती. पण १८११ मध्यें एल्फिन्स्टन पुण्यास रेसिडेंट म्हणून आला तेव्हां आतांपर्यंत पेशवे आणि ब्रिटिश यांच्यामध्यें कांहीं वांकडें न येतां सुरळीतपणें चाललेली क्लोजनें केलेली व्यवस्था त्यानें मोडून टाकली. ('खुश्रु शेटजी मोदी' पहा.)

पेशव्यांचा अंत पाहण्याची व त्यांची मैत्री झुगारून देण्याची एल्फिन्स्टननें अतोनात खटपट केली. कोलब्रूकनें दिलेल्या एल्फिन्स्टनच्या डायरींतील एका उताऱ्यावरून असें दिसतें कीं, पेशव्यांशीं आणि त्यांच्या कारभाऱ्यांशीं बोलतांना एल्फिन्स्टन राग दाखवीत असे व गुरकावणीचा आवाज काढीत असे. पेशव्यांनीं निजाम आणि गायकवाड यांच्याकडे आपलें असलेलें देणें घेणें मिटवून टाकण्यासाठीं रेसिडेंटकडे एकसारखी मागणी केली होती. या गोष्टीचा निकाल लावण्यांत एल्फिन्स्टननें आपली नेहमीची तत्परता दाखविली नाहीं. या बडोदें प्रकरणांत गंगाधरशास्त्र्याची वकिली पेशव्यांनां मान्य नव्हती. पण एल्फिन्स्टननें ती त्यांवर मुद्दाम लादली. पुढें बाजीरावानें शास्त्र्याला आपल्याकडे ओढून घेण्याकरितां दिवाणगिरी देऊं केली. पण एल्फिन्स्टनच्या सल्ल्यावरून त्यानें ती नाकारली. एल्फिन्स्टननें जर शास्त्र्याच्या जीविताची हमी घेतली होती तर त्याच्याबरोबर पंढरपूरला संरक्षक सैन्य धाडावयास पाहिजे होतें. तसें कांहीं न करतां शास्त्र्याला पेशव्यांबरोबर एकटे सोडून आपण वेरूळचीं लेणीं पहावयास गेला. शास्त्र्याच्या खुनानंतर कांहीं गुप्त चौकशी करून त्यानें असें ठरविलें कीं, त्रिंबकजी डेंगळे यानें हा खून केला. व लगेच पेशव्यांनां तंबी देऊन त्रिंबकजीला पकडलें. पेशव्यांशीं आकस धरून एल्फिन्स्टननें त्यांचे खुश्रु शेटजी व त्रिंबकजी हे दोन चांगले कारभारी धुळीला मिळविले. पेशव्यांशीं वागतांना एल्फिन्स्टन फार निष्ठुर व स्वार्थी असे. १८१७ चा पुण्याचा तह व पेशवाईचा अंत या गोष्टींत एल्फिन्स्टनचें प्रमुख अंग असून त्याचें सविस्तर विवेचन मराठ्यांच्या इतिहासांत येईलच. बाळाजीपंत नातू व यशवंतराव घोरपडे हे त्याचे हस्तक होते. पेशवाई गेल्यावर याला त्या प्रांताचा कमिशनर नेमलें. पुढें १८१९–१८२७ पर्यंत हा मुंबई प्रांताचा ले. गव्हर्नर होता. यानें शिक्षणविषयक बरीच खटपट केली. तिचें स्मारक म्हणजे एल्फिन्स्टन कॉलेज होय. यानें अफगाणिस्तानचा व हिंदुस्थानचा असे दोन इतिहास लिहिले आहेत. हा १८५९ नोव्हेंबर २० ला मेला. हा जसा मुत्सद्दी होता तसा थोडाफार शिपाईहि होता.

एल्फिन्स्टन इतका महत्त्वाकांक्षी होता कीं, मराठ्यांशीं झालेल्या तिसऱ्या युद्धानंतर हिंदुस्थानांत त्याच्या महत्त्वाकांक्षेला वाव नव्हती म्हणून पुढें त्याला दोन वेळ देऊं केलेली गव्हर्नरजनरलची जागा त्यानें पत्करली नाहीं. ( त्याची रोजनिशी ता. १ सप्टेंबर १८३४ ).

[ संदर्भ ग्रंथ.—कॉटन—मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन; कोलब्रूक—लाईफ ऑफ मौंट स्टुअर्ट एल्फि. फॉरेस्ट—ऑफीशिअल राइटिंग्ज ऑफ मौंट स्टु. एल्फि. ].

**पल्ब**—ही नदी जर्मनींत बोहीमियामध्यें उगम पावते. समुद्रसपाटीपासून इच्या उगमाची उंची ४६१० फूट आहे. इच्या डावीकडील उपनद्या मुलडे व सेल या असून उजवीकडील हावेल व एलडे या आहेत. ही उत्तरसमुद्रास जाऊन मिळते. या नदीची लांबी ७२५ मैल असून ५२५ मैलपर्यंत तिच्यांत जहाजें चालतात.

या नदींतून व्यापार व इतर रहदारीहि बरीच होते. म्हणून इची स्थिति सुधारण्याकरितां सरकारांतून बराच पैसा खर्च झाला आहे. हॅम्बर्गपासून ऑसिगपर्यंत एक साखळदंड नदींत घातला असून त्याच्या सहाय्यानें जहाजांची ने आण सहज करतां येते. या नदीचे कालवे काढले असून तिच्यावर पूल बरेच आहेत. या नदीला ऐतिहासिक महत्त्वहि बरेंच आहे.

**पल्बा**—इटलीच्या पश्चिमेकडील एक बेट. लो. सं. (१९०१) २५०४३ (पिआनोसा धरून) व क्षे. फ. १४० चौ. मै. आहे. एल्बाचें सुप्रसिद्ध लोखंड तृतीयावस्थाक युगांतील आहे; तेथील ग्रॅनाईट रोमन लोक काढून नेत. पोर्टोफेराइमो हें एल्बाचें राजधानीचें ठिकाण असून प्राचीन काळापासुन उत्तम बंदर म्हणून प्रसिद्ध आहे. बंदराच्या वरच्या बाजूस पहिल्या नेपोलियनचा राजवाडा व तेथून नैर्ऋत्येस चार मैलांवर त्याची वाडी आहे. यांखेरीज दुसरी कांहीं इतिहासप्रसिद्ध गांवें या बेटावर आहेत.

प्राचीन काळापासून धातूंच्या खाणीसंबंधीं एल्बाचें नांव ऐकूं येतें. १८०२ मध्यें एमीन्सच्या तहान्वयें हें बेट फ्रान्सकडे आलें. पदच्युतीनंतर नेपोलियनला हें बेट व येथला सर्व राज्याधिकार देण्यांत आला. तो या ठिकाणीं ५ मे १८१४ पासून २६ फेब्रुवारी १८१५ पर्यंत राहिला. १८६० त हें पुन्हां इटलीकडे आलें. [ सर आर्. कोल्ट होरे ए टूर थ्रू दि आयलंड एल्बा ( लंडन १८१४ )]

**पल्युथेरापोलीस**—हें पॅलेस्टाईनमधील प्राचीन शहर यरुशलेमपासून २५ मैलांवर गाझाच्या रस्त्यावर आहे. इ. रॉबिन्सनच्या मतें हें आधुनिक बैत जिब्रीन असावें. टॉलेमी याला बेटॉगॅब्रा नांव देतो. यास सेप्टिमीअस सेव्हेरस (इ. स. २०२) हा सिरियांत गेला त्या वेळेपासून एल्युथेरापोलीस नांव मिळालें. इ. स. ७९६ त याचा नाश झाला होता. ११३४ त धर्मयोद्ध्यांनीं हें पुन्हां वसविलें. येथील प्रसिद्ध गुंफा आजूबाजूच्या डोंगरांत आहेत. जवळच अपोलोफानेझची कबर आहे.

**पल्युसिस**—हें अथेन्सजवळ एक ठिकाण आहे. ग्रीक पंचांगांत बोइड्रोमिऑन नांवाचा एक महिना आहे (बोइड्रोमिऑन व हिंदूंच्या पंचांगांतील भाद्रपद यांतलें साम्य लक्षांत घेण्यासारखें आहे). या महिन्याच्या १३ व्या दिवशीं अथेन्समधून लोक एल्युसिस येथें जात आणि परत येतांना एक देवीची मूर्ती आणीत असत. १६ व्या दिवशीं अथेन्स येथें मोठी जत्रा भरत असे आणि एक धार्मिक व्याख्यान होत असे. या व्याख्यानांत वक्ता "गूढ गोष्टी" सांगत असे. व्याख्यान सुरू होण्यापूर्वी व्याख्याता तुम्ही सर्व मनानें शुद्ध व पवित्र आहांत काय ? असें विचारीत असे; आणि एखादा अपवित्र मनुष्य आढळल्यास त्यास घालवून देत असत.

व्याख्यानानंतर सर्वजण समुद्रकिनाऱ्यावर जात; आणि स्नान करून अंगावर डुकराचें रक्त शिंपडून घेत असत. नंतर १९ व्या दिवशीं अथेन्सपासून एल्युसिसपर्यंत एक मिरवणूक निघे. एल्यूसिस येथें गेल्यानंतर तेथें एक पौराणिक नाटक होत असे. 'डिमीटर (पृथ्वी) इजला कोरी (कणीस) या नांवाची मुलगी होती. तिचे प्लुटो (अधोलोकाधिपति) यानें हरण केलें' हें या नाटकाचें संविधानक होय.

नाटकानंतर एक धर्माध्यक्ष सर्वांस एक तुटकें कणीस दाखवून मानवजीविताचा क्षणभंगुरपणा आणि आत्म्याचें पुनरुत्क्रमण व्यक्त करीत असे. यानंतर सर्वजण एके ठिकाणीं जमून आकाशाकडे पाहून "वृष्टि" आणि धरणीकडे पाहून "धारण कर' असें ओरडत. ही चाल ख्रि. पू. १०० वर्षांच्या सुमारास होती.

**पल्सिनोर**—एल्सिनोर (डॅनिश हेल्सिंगोर) हें डेन्मार्कचें बंदर असून फ्रेडरिक्सबर्ग प्रांतांत झीलंड बेटाच्या पूर्वकिनाऱ्यावर कोपनहेगनच्या उत्तरेस रेल्वेनें २८ मैलांवर आहे. हें साउंडच्या अगदीं चिंचोळ्या भागावर स्वीडनमधील हेल्सिंगबर्ग शहरापासून ३ मैलांवर आहे. यांच्यामध्यें वाफेनें चालणाऱ्या एका बोटीच्या साहाय्यानें दळणवळण सुरू असतें. येथील बंदरांत २० फूट खोल पाण्यांतून जाणारीं जहाजें येऊं शकतात. येथें जहाजें बांधण्याच्या गोद्या आहेत. लोखंडी कामाचे व एंजिनियरिंगचे कारखाने आहेत. येथून शेतींत पैदा झालेले पदार्थ बाहेर जातात व लोखंड, कोळसा, गळिताचीं धान्यें व सूत बाहेर देशांहून येतात. हेल्सिंगोरला १४२५ मध्यें नागरिक-हक्क मिळाले. १५२२ मध्यें ल्युबेकनें हें शहर काबीज करून जाळून टाकलें. परंतु १५३५ मध्यें दुसऱ्या ख्रिश्चननें तें पुन्हां घेतलें. शेक्सपियरच्या हॅम्लेट नाटकांतील एल्सिनोर हेंच होय. ज्याच्या इतिहासांतून हॅम्लेटची गोष्ट घेतली तो सॅक्सो ग्रॅमॅटिकस येथेंच जन्मला. वृक्षांनीं आच्छादिलेले कांहीं खडक हॅम्लेटचें थडगें म्हणून व येथील एक ओहोळ आफेलियाचा प्रवाह म्हणून दाखविण्यांत येतात. शहराच्या पूर्वेस एका भूशिरावर क्रॉनबर्ग अथवा क्रोनेनबर्ग नांवाचा किल्ला आहे. ही भव्य गॉथिक पद्धतीवर बांधलेली इमारत दुसऱ्या फ्रेडरिकनें १६ व्या शतकाच्या अखेरीस बांधली होती व १६३७ मध्यें लागलेल्या आगीनंतर चौथ्या ख्रिश्चननें ही इमारत पुन्हां बांधली. हा किल्ला स्वीडीश लोकांनीं १६५८ मध्यें घेतला होता. पण १६६० मध्यें तो पुन्हां डेन्स लोकांनां परत करण्यांत आला. याच्या मनोऱ्यावरून सामुद्रधुन्या व सभोंवतालचे देश यांचा चांगला देखावा दिसतो.

फ्लॅग बॅटरी म्हणजे किल्लयाच्या समोरील प्लॅटफार्म येथें हॅम्लेटचें भूत येत असतें अशी समजूत आहे. येथील प्रेक्षणीय स्थळ म्हणजे ज्या खोलींत इंग्लंडच्या तिसऱ्या जॉर्ज राजाची बहीण व सातव्या ख्रिश्चियनची राणी मॉटिल्डा हिला कैदेंत ठेविलें होतें ती खोली होय. येथील प्रार्थनामंदिरांत १७ व्या शतकाचें लांकडी कोरीव काम आहे. शहराच्या वायव्येस मॅरिएन्लिस्ट बंगला आहे. पूर्वी येथें राजवाडा होता, सध्यां समुद्रकांठचें हवा खाण्याचें ठिकाण आहे.

**एसर हडन**:-(असुर अरवी इद्दिना "असुरानें भाऊ दिलेला आहे"), एक असुरराजा. आपला बाप सेन्नाचेरिब याचा खून झाला तेव्हां (इ. स. पू. ६८१) अराराटशीं झगडत असलेल्या असुरी सैन्याचा एसर-हडन अधिपति होता. असुर देशाच्या योद्ध्यांनीं कटवाल्यांचा पराभव करून एसरला गादीवर बसविलें. तो जसा योद्धा तसा हुषार, मनमिळाऊ व राज्यकर्ताहि होता गादीवर आल्यानंतर यानें प्रथम दक्षिण बाबिलोनमधील खाल्डियनांचें बंड मोडून, बाबिलोन शहर पुन्हां भरभराटीस आणिलें, व तीं आपली राजधानी केली. पुढें एक दोन वर्षांतच मीडिया मांडलिक बनवून त्यानें आपला मोर्चा पॅलेस्टाइनकडे वळविला. तोहि प्रदेश पादाक्रांत करून असुर देशाच्या सरहद्दीवरच्या किमेरी लोकांवर तो चाल करून गेला. साम्राज्याची दक्षिण सरहद्द ताब्यांत ठेवणें जरूर असल्यानें तो अरबस्तानांत शिरला व अरबी लोकांनां त्यानें मोठी दहशत घातली. आतां तो असुरी साम्राज्याचा जो एकच शत्रु उरला त्यावर चाल करून जाण्यास मोकळा झाला. हा जुना शत्रु म्हणजे ईजिप्त होय. खि. पू. ६७३ व ६७० या दोन सालीं एसरनें इजिप्तवर मोहिमा केल्या व ईजिप्तचे तुकडे तुकडे केले. खि पू.६६८ मध्यें जेव्हां पुन्हां ईजिप्तनें वर डोकें काढिलें. तेव्हां त्याला दडपण्यासाठीं एसर निघाला असतां वाटेंतच आजारी पडून मरण पावला. असुर-बनिपाल (पहा) व समास-शुम-युकिन या त्याच्या दोन मुलांत त्याचें राज्य वांटण्यांत आलें. एसरनें स्वतःकरितां निनेव्ही येथें एक व असुरबनिपाल याच्या करितां केला येथें एक असे दोन राजवाडे बांधिले. [ बज्-हिस्टरी ऑफ एसर हडन (१८८०); मॅस्पेरो-पासिंग ऑफ दि एंपायर्स. ]

**एसेक्स परगणा**.—इंग्लंड. पूर्वेकडील एक परगणा. क्षेत्रफळ १५४२ चौ. मै. लो. सं. (भौगोलिक मर्यादेतली) १४६८३४१. या परगण्यांत आठ पार्लमेंट-विभाग आहेत, व प्रत्येक विभागाकडून एकेक पार्लमेंटचा सभासद निवडला जातो. हा परगणा शेतकीच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. एकंदर क्षेत्रफळाचा ⅘ भाग लागवडींत आहे. गंहू, बार्ली, आणि ओट हीं येथील मुख्य धान्यें होत. एसेक्सचा नैर्ऋत्यभाग लंडनच्या बाजूला असल्यानें त्या भागांत निरनिराळे उद्योगधंदे चालतात. रासायनिक व यांत्रिक कारखाने तसेंच रेशीम, दारू, सीमेंट, चुना हीं तयार करण्याचे मोठाले कारखानेहि या परगण्यांत आहेत. येथील लोकरीचा धंदा सॅक्सन काळापासूनचा आहे. ग्रेट ईस्टर्न रेल्वेच्या फांट्यांमुळें जिकडे तिकडे दळणवळणाचे मार्ग मोकळे आहेत. जलमार्गहि पुष्कळ आहेत.

एथेलस्टनच्या वेळीं हा परगणा अस्तित्वांत आला असावा. एलिझाबेथच्या वेळेपर्यंत एसेक्स व हर्टफोर्डशायर हे दोन परगणे एकाच मेयरच्या ताब्यांत असत. राजधानीच्या जवळचा प्रदेश म्हणून अनेक राजकीय उलाढालींत एसेक्सला पडावें लागलें. इंग्लंडांत आढळणाऱ्या चार वाटोळ्या देवळांपैकीं एसेक्समध्यें (लिटल मॅपलस्टेड येथें) एक आहे. कांहीं देवळांतून सॅक्सन व नॉर्मन बांधकाम दिसतें.

**एस्किमो**—उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकवस्ती. ग्रीनलंडपासून अलास्कापर्यंतचा अमेरिकेचा आर्क्टिक किनारा व आशियामधील बेरिंग स्ट्रेटचा कांहीं भाग, डेव्हिस स्ट्रेट आणि बॅफिन बे यांच्या दोन्ही बाजूंनां केवळ एस्किमोचीच वस्ती आहे. एल्युशियन लोक भाषा आणि संवयी या बाबतींत एस्किमोसारखेच आहेत. एस्किमो फार उंच नसून त्यांची उंची ५ फूट ४ इंच ते ५ फूट १० इंच यांच्या दरम्यान बहुतेक असते. स्त्री पुरुष दोघेंहि चांगलीं मांसल व चपळ असतात. दोघांचेहि चेहेरे आनंदी, आल्हाददायक व कधीं कधीं सुंदर असतात. तोंडाची ठेवण चपटी व उभट असून गाल फुगीर असतात. कपाळ उंच नसतें; नाक चपटें, डोळे तिरकस, बारीक, काळेभोर व पाणीदार असतात. डोकें मोठें असून त्यावर काळे पण राकट केंस असतात. डोक्याची कवटी रुंदीपेक्षां उंच जास्त असते. पुरुषांनां बारीक मिशा असतात, पण कल्ले किंवा दाढी नसते. हातपाय बारीक व नीटस असतात. एस्किमोचा सर्व पोषाख सील, रेनडियर (सांबर), अस्वल, कुत्रा किंवा कोल्हा यांच्या कातड्याचा असतो. बायका पुरुषांच्या सारखाच पोषाख करितात बायकाहि विजार घालतात. थंडीमध्यें दोन कपडे वापरतात. एक आंतून केंस असलेला व दुसरा बाहेरून केंस असलेला. कधीं कधीं ते पक्ष्यांच्या कातड्याचा सदरा व कुत्र्याच्या किंवा सांबराच्या कातड्याचे पायमोजे वापरतात. कपडे शिवण्याला पुष्कळदा हाडाची सुई व स्नायूंचा दोरा घेतात. हे लोक कधींच स्नान करीत नाहींत. आया आपल्या मुलांनां कधीं कधीं चाटून स्वच्छ करितात.

उन्हाळ्यांत एस्किमो शंक्वाकृति कातडी तंबूंत राहातात. हिंवाळ्यांत अर्धवट जमिनींत गाडलेल्या व दगड, माती, गवत आणि हाडें यांनीं बांधलेल्या झोपडींत राहातात. यां झोपड्यांनां रस्ता बोगद्यासारखा असून त्यांतून रांगत जावें लागतें. उपजीविकेसाठीं हे लोक शिकार करितात व मासे मारतात. त्यांच्या प्रदेशांत लागवड करणें शक्य

नसतें. सील, रेनडियर आणि देवमासे हें त्यांचें मुख्य भक्ष्य होय. त्यांच्या होड्याहि सीलच्या कातड्याच्या व देवमाशाच्या हाडांच्या केलेल्या असतात. बर्फावरून जाणाऱ्या गाड्यांनां चार ते आठपर्यंत कुत्रीं जोडलेलीं असतात. त्यांचीं शस्त्रास्त्रेंहि पशुपक्ष्यांच्या शरीराचीं पण फार कुशलतेनें व थोड्याशा साधनांत तयार केलेलीं असतात. एस्किमो फार खादाड असतात. दोघेजण एका बैठकींत सबंध सीलचा फडशा पाडतात. एका दिवसांत इतर खाण्याखेरीज सुमारें १० पौंड मांस एकटा मनुष्य खातो. पुरुष उताणा पडून त्याची बायको त्याला मांसाचें जेवण भरविते; व तें इतकें कीं शेवटीं त्याला हालवत सुद्धां नाहीं. असे प्रकार नेहमीं पाहावयास सांपडतात.

एस्किमो हे भ्रमणवृत्तीचे आहेत असें म्हणतां येणार नाहीं. शिकारीकरितां मात्र ते नेहमीं फिरत असतात. ते मालमत्ता करण्याच्या भानगडींत पडत नाहींत. जरूर तें सामान व भांडीं आणि एक सालची खाण्याची बेगमी हीच कायती मालमत्ता त्यांच्याजवळ असते. ज्यांच्याजवळ अन्नसामुग्री असेल त्यांनीं ती ज्यांच्याजवळ नसेल त्यांच्या समवेत उपभोगिली पाहिजे या जुन्या चालीमुळें एस्किमो समाज दरिद्रीच राहिला आहे. त्यांचीं शस्त्रास्त्रें व लौकिककथा यांच्यावरून एस्किमो बुद्धिमान आहेत हें लक्षांत येतें. त्यांनां गाण्याची व चित्रकलेची आवड असून परकीयांतील चमत्कारिक गोष्टी उचलण्याची हातोटीहि त्यांच्या अंगीं आहे. करार करणें किंवा देवघेवींत घासाघीस करणें त्यांनां आवडत नाहीं. सामाजिक अनीतीचे प्रकार त्यांच्यांत कमी आहेत; तथापि त्यांचा खाजगी आयुष्यक्रम उच्च नीतिमत्तेचा दर्शक असेंहि म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांच्या बायकांचें नेहेमीं वांकडें पाऊल पडत असतें; तरी सुद्धां त्यांनां अपमान किंवा मत्सर वाटत नाहीं. यूरोपियन लोकांशीं व्यवहार करतांना इतर रानटी जातींप्रमाणें एस्किमोहि खोटें बोलतात अशी यूरोपियन लोक तक्रार करीत असतात. एस्किमो वाङ्मय फारसें नाहीं. त्यांच्यांतील पुराणकथा मात्र फार असून त्यांचा संग्रह डॉक्टर रिंकसारख्या यूरोपियनांनीं केला आहे. डेन्मार्कमध्यें एस्किमो भाषेंतले ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. एस्किमो भाषा यूरोपियन भाषांपेक्षां उच्चारांत व घटनेंत अगदीं निराळी आहे. एखाद्या यूरोपियन भाषेंतले एक संबंध वाक्य एस्किमो भाषेंत केवळ एका शब्दानें दर्शविलें जातें.

एस्किमोचा मूळचा वन्यधर्म असून चांगल्यावाईट देवतांवर व स्वर्गनरकावर त्यांचा विश्वास आहे. मनुष्यजात आणि अमानुष शक्ति यांमधील अंतर चेटक्यांनां नाहींसें करितां येते, असा त्यांचा समज आहे. त्यांच्या नेहमीच्या व्यवहारांत उपयोगी पडणारा देवमासा त्यांचें उपास्यदैवत बनलें असल्यास नवल नाहीं. हल्लीं ग्रीनलंड व लाब्राडोर या भागांतील बहुतेक सर्व एस्किमो नांवाला का होईना, ख्रिस्ती आहेत.

एस्किमोचा राजकीय किंवा लष्करी पुढारी कोणी नाहीं. त्यांचा राज्यकारभार कौटुंबिक पद्धतीवर चालतो, गांवागांवांमध्यें राजकीय किंवा सामाजिक असें कांहीं बंधन नाहीं; तरी त्यांच्यामध्यें सलोखा असतो. एस्किमो हे शांतताप्रिय व पड खाणारे लोक असल्यामुळें त्यांच्यांत लढाया फारशा होत नाहींत, तथापि ते शूर नाहींत असें नाहीं. त्यांच्यात बहुपत्नीत्वाची चाल दिसत नाहीं पण घटस्फोट व पुनर्विवाह यांनां मुळींच आडकाठी नाहीं. मिळकतीवरील ताबा आणि पारधीचे हक्क यासंबंधीं त्यांचे नियम फार गुंतागुंतीचे वाटतात. एकमेकांनां भेटल्यावेळीं नाकावर नाक घासण्याची जुनी चाल ग्रीनलंडमध्यें बहुतेक बंद पडली आहे. आशियाच्या किनाऱ्यावर जे थोडेफार एस्किमो आहेत तें वगळल्यास त्यांची एकंदर संख्या सुमारें २९, ००० भरेल [ डॉ. रिंक—टेल्स अँड ट्रॅडिशन्स ऑफ दि एस्किमो; डॅनिश ग्रीनलंड; एस्किमो ट्राईब्स. फ्रिडजोफ नॅन्सेन—एस्किमो लाईफ.]

---

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## ऐ



ऐ—इ. स. पू. २ ऱ्या शतकांतल्या हाथीगुंफा येथील लेखांत पहिल्या अवस्थेंतील 'ए' ला डोक्यावर आडवी रेघ काढून 'ऐ' बनविल्याचें दिसून येतें. दुसऱ्या अवस्थेंतील 'ए' ला मात्रा देऊन 'ऐ' केल्याचें उदाहरण इ. स. ६ व्या शतकांतील उष्णीविजयधारिणीच्या पुस्तकांत आढळतें. पुढील शतकांतल्या कुयारकोट लेखांत तिसऱ्या अवस्थेंतील 'ए' ला चांगली मोठी मात्रा देऊन ऐ अक्षर काढलें आहे. दहाव्या शतकापर्यंत असाच ऐ काढीत असत असें दिसतें. १२ व्या शतकांतील हस्तलिखित पुस्तकांत हल्लींचा वळणदार ऐ पहावयास मिळतो.

ऐतरेय आरण्यक—हें ऋग्वेदाचें आरण्यक आहे. याचे पांच भाग असून अठरा अध्याय आहेत. वरील पांच भागांपैकीं प्रत्येकासहि आरण्यक हेंच स्वतंत्र नांव आहे. ऐतरेय आरण्यक हा ऐतरेय ब्राह्मणापैकींच अवशेष भाग असावा. कारण यांत आरण्यक विचारापेक्षां यज्ञविषयक विवेचन जास्त आहे. हौत्र कर्मापैकीं ब्राह्मणांत व आश्वलायन श्रौतसूत्रांत न आलेल्या अशा महाव्रतनामक श्रौतविधीच्या हौत्रासंबंधीं या ग्रंथांत पहिल्या, चौथ्या व पांचव्या आरण्यकांत विवेचन आलें आहे. दुसरें आरण्यक आध्यात्मिक विचाराचें असून पहिल्या तीन अध्यायांत पुरुष या नांवानें विश्वात्म्याचा विचार केला आहे. त्यापुढील चार अध्यायांसच ऐतरेय उपनिषद् म्हणतात. तिसऱ्या अरण्यकांत ऋग्वेद संहिता, पदपाठ व क्रमपाठ या तीन पठनक्रमांच्या गूढ अर्थासंबंधीं व रूपकमय अर्थासंबंधीं आणि अक्षर, वर्ण, स्वर संधि यांच्यासंबंधीं रूपकात्मक विवेचन असून सृष्टींतील कांहीं चमत्कार प्रत्यक्ष अथवा स्वप्नांत पाहिल्यास त्यासंबंधीं शांत्यर्थ कांहीं विधी सांगितले आहेत. ऐतरेय आरण्यक हें त्याच्या नांवावरून ऐतरेय ऋषीनेंच रचलें असावें असें वाटतें परंतु यांत महिदास ऐतरेयाचा उल्लेख (२.१,८) आल्यावरून शंका येते.

ऐतरेय उपनिषद्—ऐतरेय उपनिषद हें फारच लहान आहे. त्याचे तीन अध्याय आहेत. पहिल्या अध्यायामध्यें जग हें ब्रह्मापासून निर्माण झालें असून मनुष्यप्राणी हा त्याचें अत्युच्च व्यक्त स्वरूप होय असें म्हटलेलें आहे. तसेंच मनुष्यामध्यें इंद्रियें, मन व हृदय या तीन करणांत आत्मा वास करतो. व तदनुरूप जागृति, स्वप्न स्थिति व निद्रा या तीन अवस्था उत्पन्न होतात असेंहि त्यांत म्हटलें आहे. दुसऱ्या अध्यायांत आत्म्याच्या त्रिविध जन्मांचा विचार केला आहे. संसाराचा अंत म्हणजेच मोक्ष होय व स्वर्गांतील अमरत्व (पूर्ण स्थिति) म्हणजे मोक्ष होय असें म्हटलें आहे. तिसऱ्या अध्यायांत आत्म्याचें स्वरूप वर्णिलें असून प्रज्ञा म्हणजेच ब्रह्म होय असें प्रतिपादिलें आहे.

ऐतरेयब्राह्मण—ब्राह्मण ग्रंथासंबंधीं सामान्य विवेचन वेदविद्या या विभागांत सहाव्या प्रकरणांत केलेंच आहे. तेथें ऐतरेय ब्राह्मणासंबंधीहि कांहीं विवेचन आढळेल. ऐतरेय ब्राह्मण हा ऋग्वेदाचा ब्राह्मणग्रंथ आहे. या ब्राह्मणाला ऐतरेय ब्राह्मण हें नांव पडण्याचें कारण, सायणाचार्यांनी आपल्या उपोद्घातांत यासंबंधीं जी आख्यायिका दिली आहे, तिजवरून असें दिसून येतें.' 'अत्यंत तपस्वी असे कोणी एक महर्षि होते. त्यांनां अनेक स्त्रिया होत्या. त्यांपैकीं एकीचें नांव इतरा असें होतें. या इतरेला महिदास नांवाचा एक बुद्धिमान पुत्र होता पण महिदासाच्या पित्याची महिदासावर त्याच्या सावत्र बंधूइतकी प्रीति नव्हती. एकदां महिदासाचा बाप आपल्या सर्व मुलांसमवेत एका यज्ञाला गेला होता. यज्ञ चालला असतां, सहज त्याला पुत्रवात्सल्याचा उमाळा येऊन त्यानें महिदासाखेरीज सर्व मुलांनां आपल्या मांडीवर घेतलें. हा अपमान महिदासाला सहन न होऊन, तो त्या यज्ञांतून उठून रडत रडत आपल्या मातेकडे गेला व तिला त्यानें सर्व हकीकत सांगितली. तेव्हां आपल्या पुत्राचा कळवळा येऊन तिनें आपली कुलदेवता जी भूमाता तिचा धांवा केला. तो धांवा ऐकून भूमाता प्रगट झाली, व महिदासाला आपल्या हातीं धरून ती यज्ञसभेंत आली व त्याला एका उत्कृष्ट सिंहासनावर बसवून 'हा महिदास सर्व कुमारांमध्यें श्रेष्ठ आहे' असें तिनें सर्वांनां सांगितलें. तसेच 'ब्राह्मणसंज्ञक वेदवाङ्मयाचा तूं द्रष्टा होशील' असा तिनें त्याला वर दिला. त्या वरप्रसादानें महिदासाच्या अंतःकरणांत 'अग्निर्वै देवानामवमः' येथपासून 'स्तृणुतेस्तृणते' येथपर्यंत चाळीस अध्यायांनीं घटित असा ब्राह्मणग्रंथ स्फूर्तिरूपानें प्रगट झाला.' याप्रमाणें इतरानामक ऋषिपत्नीचा पुत्र ऐतरेय महिदास यानें प्रचलित केलेल्या ब्राह्मणग्रंथास 'ऐतरेय ब्राह्मण' असें नांव वैदिक संप्रदायांत रूढ झालें.

हल्लीं उपलब्ध असलेल्या ऐतरेय ब्राह्मणाचे चाळीस अध्याय असून पांच पांच अध्यायांची मिळून एक अशा याच्या आठ पंचिका आहेत. यज्ञांत होता नामक ऋत्विजानें करावयाचें जें होत्रकर्म त्यासंबंधीं ऋग्वेदांतील ऋचा कोणत्या यागांत कोणत्या क्षणावयाच्या हा या ग्रंथाचा मुख्य विषय आहे. या ब्राह्मणाचा प्रमुख भाग सोमयागविषयक आहे. त्याच्या

पहिल्या १–१६ अध्यायांत 'अग्निष्टोम' यज्ञाचा उहापोह केला आहे. या अग्निष्टोम नामक सोमयागाचे चार प्रकार वर्णिलेले आहेत. १७–१८ या अध्यायांत ३६० दिवस चालणाऱ्या 'गवामयन' विधीचा विचार केला गेला आहे. १९–२४ या अध्यायांत 'द्वादशाह' म्हणजे बारा दिवस चालणाऱ्या यागाचें विवरण आहे. व २४–३२ या अध्यायांत अग्निहोत्रविषयक चर्चा आलेली आहे. ३३–४४ या अध्यायांत राज्याभिषेकाचा विधि व राजपुरोहिताच्या पदवीचा उल्लेख आलेला आहे. अशारीतीनें सर्व ऋतूंचें वर्णन असून ठिकठिकाणीं कांहीं प्रासंगिक गोष्टीहि सांगण्यांत आलेल्या आहेत.

ऋग्वेदाचे दोन ब्राह्मणग्रंथ आहेत. ऐतरेय व कौषीतकी या कौषीतकी ब्राह्मणाला शांखायन ब्राह्मण असेंहि नांव आहे या ब्राह्मणाचे तीस अध्याय असून ऐतरेयाच्या पहिल्या २५ अध्यायांत जो प्रतिपाद्य विषय आहे तोच याचाहि विषय आहे. ऐतरेय व कौषीतकी ब्राह्मण यांचा सूक्ष्म तऱ्हेनें विचार केल्यास, असें आढळून येतें कीं ऐतरेय ब्राह्मण निदान त्या ब्राह्मणाचे पहिले पंचवीस अध्याय तरी कौषीतकीपूर्वींचे आहेत. कौषीतकी ब्राह्मणांत ज्याप्रमाणें हौत्रकर्माचें पद्धतशीर व सुस्पष्ट असें विवेचन केलेलें आढळतें तसें ऐतरेयांत आढळून येत नाहीं. ऐतरेय ब्राह्मणांत त्यांतील प्रतिपाद्यविषयाशीं साक्षात संबद्ध नसलेल्या अशा बऱ्याच कथा आहेत पण कौषीतकी ब्राह्मणांत तसा प्रकार फारसा दिसत नाहीं, तसेंच ऐतरेयांत, ऋत्विजांचे अंगीं मंत्रसिद्धीचें बळ असून,त्या मंत्रसिद्धीच्या जोरावर ऋत्विज हे यजमानाला अनेक प्रकारचे लाभ प्राप्त करून देऊं शकतात अगर प्रसंग पडल्यास यजमानाचें नुकसान करूं शकतात अशा प्रकारचे उल्लेख आढळतात. पण कौषीतकी ब्राह्मणांत यासंबंधाचा उल्लेख नाहीं. याचें कारण ऐतरेय ब्राह्मणकालीन नीतिकल्पनांमध्यें व तदनंतर झालेल्या कौषीतकी ब्राह्मणकालीन नीतिकल्पनांमध्यें बराच फरक पडला असावा हें होय असें कीथ म्हणतो. याशिवाय कौषीतकीमध्यें इतर ब्राह्मणग्रंथाचा ज्याप्रमाणें उल्लेख आढळतो तसा ऐतरेयांत आढळून येत नाहीं. एका ठिकाणींच ( ७, ११ ) पैंग्य व कौषीतकीचा उल्लेख ऐतरेयांत आढळतो, यावरून हा अध्याय मागाहून ऐतरेयांत अंतर्भूत झाला असावा असें कीथचें मत आहे.

ऐतरेय ब्राह्मणांत व कौषीतकी ब्राह्मणांत जरी बराच फरक दिसतो तरी पुष्कळ बाबतींत ऐतरेय व कौषीतकी यांच्यांत साम्यहि पण दिसून येतें. दोहोंमध्यें प्रतिपाद्य विषय एकाच प्रकारचा आहे. फक्त त्या विषयाच्या निरनिराळ्या प्रमाणांत कमी अधिक जोर दिलेला आहे. म्हणजे हे दोन्ही ब्राह्मणग्रंथ एकाच वैदिक शाखेचे असून त्या त्या ब्राह्मणाच्या प्रणेत्यांनीं आपापल्या मताप्रमाणें हौत्रकर्माचें निरनिराळ्या पद्धतीनें विवेचन केलें आहे.

अंतर्गत पुराव्यावरून पहातां ऐतरेय ब्राह्मणग्रंथ कौषीतकीच्या अगोदर रचिला गेला असें दिसून येतें. ऐतरेय ब्राह्मणांत रुद्रदेवतेला बरेंच महत्त्वाचें स्थान मिळालें आहे. कौषीतकी ब्राह्मणांत, त्याच्याहिपेक्षां अधिक महत्त्व रुद्रदेवतेला प्राप्त झालेलें दिसतें. या दोहोंतहि जन्मांतरासंबंधीं म्हणजे कर्मानुसार पुनर्जन्म प्राप्त होणें या कल्पनेचा अभाव दिसतो परंतु कौषीतकी ब्राह्मणांत पुनर्मृत्यूची कल्पना एका ठिकाणीं उल्लेखिलेली आढळते. यावरूनच पुढें पुनर्जन्माची कल्पना निघाली असावी व या विचाराची वाढ ऐतरेयापेक्षां कौषीतकीकालांत जास्त झालेली असावी.

**ऐतरेय ब्राह्मणाची रचना.**—सायणानें जी ग्रंथकथा दिली आहे तीवरून पहातां ऐतरेय ब्राह्मणग्रंथ हा सगळा एकाच्याच हातचा आहे असें दिसतें. पण वास्तविक प्रकार तसा नसून या ग्रंथांतील बराच भाग मूळचा नसावा असें दिसतें. सोमयाग हा या ब्राह्मणग्रंथाचा मुख्य विषय आहे. अर्थात त्या विषयाला धरून जो मजकूर असेल तोच मूळचा होय व बाकीचा असंबद्ध व अवांतर असा जो मजकूर असेल तो नंतर कोणी तरी त्यांत मागाहून घातला असावा असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरील कसोटी ग्रंथाला लावून पाहिल्यास, या ग्रंथाच्या सातव्या व आठव्या पंचिका नंतरच्या दिसतात. या दोन्ही पंचिकांमध्यें राज्याभिषेकाच्या वेळचें वर्णन आलें आहे. त्यांत क्षत्रियानें कशा तऱ्हेनें व कोणत्या प्रकारानें राज्याभिषेक करून घ्यावा, सोमपानाच्या ऐवजीं दुसरें कोणतें पान सेवन करावें, याबंधींचें विवेचन आढळून येतें. प्रत्यक्ष सोमयागाशीं याचा कांहीं संबंध दिसून येत नाहीं. शिवाय हें राज्याभिषेकाचें वर्णन, शतपथ ब्राह्मणांतील अश्वमेध यज्ञांतील वर्णनाशीं जुळतें आहे. कौषीतकी ब्राह्मणांत देखील सोमयाग हाच प्रतिपाद्य विषय असतां त्यामध्यें या राज्याभिषेकाचें वर्णन आलेलें नाहीं. यावरून या दोन पंचिका, कौषीतकी ब्राह्मणरचनेच्या कालानंतरच्या आहेत असें सिद्ध होतें. सहावी पंचिका ही सातव्या व आठव्या पंचिकांप्रमाणेंच मागाहून अंतर्भूत केली गेली आहे असें' वेबर, कीथ वगैरे विद्वानांचें मत आहे. सहाव्या पंचिकेमध्यें होत्यानें सोमयागाशिवाय आणखी कोणत्या गोष्टी करावयाच्या याबद्दलचें विवेचन असून पहिल्या पांच पंचिकांनां ही सहावी पंचिका पुरवणीदाखल आहे असें हौगप्रभृति विद्वानांचें म्हणणें आहे. एखादें मत त्याज्य म्हणून ठरवावयाचें असल्यास पहिल्या पांच पंचिकांमध्यें ' तत्तन्नदृत्यम् ' असा शब्दप्रयोग वापरण्यांत येतो. पण सहाव्या पंचिकेमध्यें ' तदुपुनःपरिचक्षते ' असा शब्दप्रयोग करण्यांत येतो. यावरून ही सहावी पंचिका नंतरची आहे असें हौग म्हणतो. याशिवाय कीथनें भाषा, व्याकरण व अन्य पुराव्यानीं ही पंचिका कशी प्रक्षिप्त ठरते हें विशद

केलें आहे ( कीथ-'ऋग्वेद ब्राह्मणाज ट्रॅन्स्लेटेड' या पुस्तकाच्या प्रस्तावनेचीं ३१-३३ पानें पहा. )

ऐ त रे य ब्रा ह्म णा चा र च ना का ल.—ऐतरेय ब्राह्मण केव्हां रचलें गेलें हें दोन तऱ्हेनें ठरवितां येतें. एक बाह्य पुरावा व दुसरा अंतर्गत पुरावा, हे ते दोन प्रकार होत.

बाह्य पुरावाः—ऐतरेय ब्राह्मण व कौषीतकी ब्राह्मण हीं यास्काला माहिती होती असें निरुक्तांतील कौषीतकी ब्राह्मणासंबंधींच्या उल्लेखांवरून उघड आहे. यास्कापूर्वी झालेल्या शाकल्यास व तसेंच शौनककालीन आश्वलायन व शांखायन सूत्रांच्या कर्त्यांनाहि ब्राह्मणग्रंथ माहीत होते असें अनेक विधानांनीं सिद्ध करतां येतें. यावरून ऐतरेयब्राह्मणाचा काळ निदान ख्रि. पू. ६०० च्या पूर्वीचा असलाच पाहिजे असें मानावें लागतें.

अंतर्गत पुरावाः—ऐतरेयब्राह्मणामध्यें ज्या ऋत्विजांचा, राजांचा व इतर लोकांचा उल्लेख आला आहे त्यावरून देखील बाह्य पुराव्यावरून ठरविलेल्या ऐतरेयब्राह्मणाच्या रचनाकालालाच पुष्टि मिळते. ऐतरेय ब्राह्मणांत जनमेजयाच्या राज्याभिषेकोत्सवाचें वर्णन आहे. हा जनमेजय राजा संहितीकरणाच्या प्राचीन कालाच्या शेवटीं शेवटीं झाला. अर्थात् त्याचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत प्रसिद्ध राजा म्हणून येणें साहजिकच आहे. यावरून ऐतरेयब्राह्मण कुरुयुद्धानंतर लवकरच रचलें गेलें असावें.

ऐ त रे य ब्रा ह्म णा ची भा षा.—ऐतरेय ब्राह्मणाची गद्य भाषाशैली अपरिणत, बोजड, तुटक अशा स्वरूपाची आहे. कौषीतकी ब्राह्मणाप्रमाणें यांत संक्षिप्ततेचा दोष आढळून येत नाहीं. उपमा अगर उत्प्रेक्षा या ब्राह्मणांत सहसा आढळून येत नाहींत. कांहीं कांहीं ठिकाणीं या ब्राह्मणांतील भाषा सोपी, सरळ व जिवंत अशी वाटते. शुनःशेपाची कथा सुलभ व सुंदर भाषेंत सांगितली आहे. शुनःशेपाच्या कथेमध्यें जे छंदोबद्ध भाग आहेत त्या छंदोबद्ध भागांची अगर गाथांची भाषाशैली फार सुंदर व सोपी अशी आढळते व या दृष्टीनें गद्यापेक्षां यांतील गाथा भाषेच्या दृष्टीनें उच्च दर्जाच्या आहेत यांत संशय नाहीं.

ऐतरेयब्राह्मणांत ज्या आख्यायिका आल्या आहेत व तसेंच जे ऐतिहासिक अगर इतर परिस्थितिदर्शक उल्लेख आले आहेत त्यांवद्दलची सविस्तर माहिति 'ज्ञानकोश प्रस्तावनाखंड भाग २ 'वेदविद्या' यामध्यें २३५—२४० या पानांत दिलेली आहे. शिवाय ऋक्संहितेंतील मंत्रांचा ऐतरेय ब्राह्मणानें कसा उपयोग केला आहे हें ज्ञानकोश विभाग दोन 'वेदविद्या' यांत शेवटीं परिशिष्टांतील कोष्टकांत दाखविलें असून ब्राह्मणग्रंथकालीं निरनिराळे पक्ष उत्पन्न करण्यासाठीं कोणकोणत्या चळवळी चालत असत याचें विवेचन बुद्धपूर्व जग विभाग ३ पूर्वार्ध पृष्ठ ५०५ येथें दिलें आहे.

[ संदर्भग्रंथः—ऐतरेय ब्राह्मण ( आनंदाश्रम संस्कृत-सीरीज ); हौग-ऐतरेय ब्राह्मण भाग १, २; वेबर-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर; मॅकडोनेल-हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर; ए. बेरीडेल कीथ-ऋग्वेद ब्राह्मणाज ट्रॅन्स्लेटेड (हार्वर्ड ओरिएंटल सीरीज व्हॉल्यूम २५ सन १९२०); ऐतरेय ब्राह्मण—प्रथमपंचिका, भाषांतरकार धुं. ग. बापट संपादक स्वाध्याय—पुणें. ].

**ऐन**—( टरमिनॅलिया टोमेंटोसा ) यास साग, आसन अथवा असैन, पियासाल, हुतन, अत्नक, अमरी, झान, टकसोर, सहाजू, सदरी, मट्टी, मुरड, टौक्यन इत्यादि नांवें निरनिराळ्या प्रांतांत आहेत. हिंदुस्थानांतील महत्त्वाच्या वृक्षांपैकीं हा वृक्ष सर्वांत जास्त आढळतो असें ग्यांबल म्हणतो. या झाडापासून स्वच्छ व पारदर्शक असा पुष्कळ डिंक निघतो. संताल लोक तो खातात व धूपाप्रमाणें जाळण्याकरितां आणि अंगाला लावण्याकरितांहि त्याचा उपयोग करण्यांत येतो असें म्हणतात. साल औषधी असून रंगाकरितांहि तिचा उपयोग करतात. परंतु सालीचा मुख्य उपयोग कातडें कमावण्याकरितां होतो. या झाडाच्या सालीची परीक्षा इंपीरियल इन्स्टिटयूटमध्यें करविण्यांत आली होती तीवरून असें समजलें कीं, सालींत रोगट द्रव्य म्हणजे ट्यानिन साधारण बरेंच असून सालीनें कातड्यावर रंगहि चांगला चढतो. कातडें कमावण्याकरितां फळांचाहि उपयोग करतात; परंतु हिरड्याच्या अथवा बेहड्याच्या फळांइतकीं तीं चांगलीं नसतात लांकूड सर्पणाकरितां चांगलें असतें व घरें बांधणें, खटारगाड्या, मुसळें, होड्या वगैरे कामाकरितांहि त्याचा उपयोग करितात. छोटा नागपूर व दुसऱ्या कांहीं ठिकाणीं या झाडावर लाख तयार होते; व पानांवर टसर रेशमाचा किडाहि पोसतो.

**ऐनापुर**—मुंबई इलाखा. बेळगांव जिल्हा. अथणीच्या नैर्ऋत्येस सुमारें १३ मैलांवर अथणी-कागवाड रस्त्यावर हा एक गांव आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार.

गांवाबाहेर एका मोठ्या तलावाजवळ पीर काजी फकीराचें थडगें आहे. इ. स. १६३९ तील फ्रेंच प्रवासी मंदेलस्लो यानें याचा एनाद्दर म्हणून उल्लेख केलेला आहे. मिरजच्या पटवर्धन घराण्यापैकीं गोपाळराव हे निपुत्रिक मरण पावल्यामुळें इ. स. १८४२ सालीं हा गांव व इतर आठ खेडीं ब्रिटिश मुलुखांत समाविष्ट झालीं.

**ऐनी-अकबरी**—अबुलफजलचा अकबरकालीन परिस्थितिदर्शक ग्रंथ. फजलच्या 'अकबर-नामा' या प्रचंड ग्रंथाचा हा तिसरा भाग होय. याची रचना इ. स. १५९८ त पुरी झाली. याची माहिती 'अबुलफजल' या लेखांत आलीच आहे. चंद्रगुप्तकालीन लोकस्थिति व राज्यकारभार यांविषयीं संपूर्ण माहिती जशी कौटिल्याच्या अर्थशास्त्रावरून कळते तशी या फारशी इतिहासावरून अकबराच्या वेळच्या परिस्थितीचें उत्तम ज्ञान होतें. इ. स. १७८३ त फ्रॅन्सिस

ग्लॅड्विन नांवाच्या इंग्रज लेखकानें मूळ फारशी ग्रंथावरून याचें इंग्रजी भाषांतर केलें व वारन हेस्टिंग्जनें सरकारकडून हें भाषांतर प्रसिद्ध करण्याच्या कामीं थोडाफार आश्रय देवविला म्हणून त्याला अर्पण केलें. हें ग्लॅड्विननें भाषांतर लंडन येथें प्रसिद्ध झालें ( १८०० ). इ. स. १८४८ त प्रो. ब्लॉकमननें केलेलें भाषांतर यापेक्षां चांगलें आहे. ऐनी अकबरीचें मराठींतहि एक भाषांतर आहे.

**पेनुद्दीन**—हिंदुस्थानांतील सर्व मुसुलमान संतांचा इतिहास ज्यांत आहे त्या " मूल्हकांत " आणि " किताव-उल अन्वार " या ग्रंथांचा हा कर्ता असून सुलतान अल्लाउद्दीन हसन वहामनी याच्या कारकर्दीत उदयास आला. [ वील. माबेल डफ. ]

**ऐनू**—जपानच्या अगदीं उत्तरेकडील बेटांत वस्ती करून राहणारी ही एक प्रागैतिहासिक लोकांच्या वंशजांची जात आहे. प्राचीन काळीं या जातीचे लोक सायबेरियापासून जपानच्या अगदीं दक्षिणेकडील भागापर्यंतच्या प्रदेशांत पसरले होते. हे लोक जपानचे मूळचे रहिवाशी होत असें कांहीं ग्रंथकार प्रतिपादन करतात. पण खरा प्रकार तसा नाहीं. हे लोक मूळ कुराइल्स बेटांत राहणारे असून, ते हळू हळू जपानच्या उत्तर भागांत येझो या ठिकाणीं आले व नंतर तेथून त्यांनीं सर्व जपानभर पसरण्यास सुरुवात केली असें हल्लीं निरनिराळ्या शोधांवरून सिद्ध झालें आहे. पुढें दक्षिणेकडून ज्यावेळीं सध्याचे जपानी लोक जपानमध्यें आले तेव्हां जपानी लोकांच्या युद्धकलेपुढें व त्यांच्या संस्कृतीपुढें या ऐनूंचा टिकाव न लागल्यामुळें त्यांनीं पुनरपि येझो बेटांत, कुराइल्स बेटांत व साघलिनच्या दक्षिणभागांत वस्ती करण्यास प्रारंभ केला. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत जपानी लोकांनीं त्यांनां पूर्णपणें जिंकून टाकिलें. ऐनू लोक हे प्राचीन काळीं चांगले शूर व कडवे होते पण हल्लीं मात्र ते चैनी, व्यसनी व आळशी बनलेले आहेत. त्यांची लोकसंख्या सुमारें १६ हजार ते १७ हजार असावी. जपानी लोकांपेक्षां ते राकट बांधाचे असू त्यांचा चेहरा रुंदट, नाकें चपटीं व डोळे काळेभोर असतात. त्यांच्या पायांचीं व हातांचीं कांहीं हाडें फारच चपटीं असतात, व या बाबतींत त्यांचें साम्य यूरोपमधील दऱ्याखोऱ्यांत राहणाऱ्या कांहीं जातीशीं दिसून येतें. ते अत्यंत केंसाळ लोक आहेत. कांहीं विवक्षित वयोमर्यादेनंतर त्यांच्यांत हजामत करण्याची चाल नसल्यानें त्यांनां मोठ्या मिशा व कल्ले असतात. ऐनू बायकांमध्यें हातांवर, कपाळावर व चेहऱ्यावर गोंदून घेण्याची चाल आहे. ओठाच्या वरच्या भागावर पुरुषांच्या सारख्या मिशा गोंदून घेण्याची चाल यांच्यांत आढळून येते.

पो षा ख.—ऐनू लोकांचा पोषाख म्हटला म्हणजे एल्म वृक्षाच्या सालीचा तयार केलेला पायघोळ अंगरखा हा होय. या अंगरख्यावर कमरेभोंवतीं त्याच वृक्षाच्या सालीपासून तयार केलेला पट्टा गुंडाळण्याची चाल आहे. बायका मात्र या आंगरख्याच्या आंत एक अंतर्वस्त्र परिधान करितात. हिंवाळ्यामध्यें चामड्याचे कपडे वापरण्याची पद्धत आढळून येते. कर्णभूषणें घालण्याची चाल बायकांप्रमाणेंच पुरुषांतहि सरसहा दिसून येते. बायकांनां मण्यांची माळ गळ्यांत घालून मिरवणें फार आवडतें.

अ न्न.—या लोकांचें मुख्य अन्न मांस व मासे हें होय. अस्वल, कोल्हा, लांडगा, घोडा, बैल वगैरे कोणत्याहि प्राण्याचें मांस हे खातात. कंदमुळें व वनस्पती यांच्यावरहि हे उदरनिर्वाह करूं शकतात. मांस अगर मासे कचे मात्र खाण्याची वहिवाट यांच्यांत नाहीं. मांस शिजवून व मासे तळून खाण्याची यांची चाल आहे.

घ रें.—यांचीं घरें, वांबूचीं झोंपडीवजा असतात. या घरांनां खोल्या वगैरे पाडलेल्या नसतात. झोंपडीच्या मध्यभागीं स्वयंपाकगृह असतें. घराला कोपऱ्यांत हवेसाठीं छिद्रें पाडलेलीं असतात. पूर्वेकडे फक्त एकच खिडकी असते व दोन दरवाजे असतात. भोजनगृहें, उपहारगृहें, सभागृहें अगर मोठमोठीं देवळें यांच्यामध्यें आढळून येत नाहींत. घरामध्यें लांकडी सामान जवळ जवळ नसतें म्हटलें तरी चालेल. चटया आंथरून त्याच्यावर ते निजतात. ऐनू लोक अत्यंत घाणेरडे असतात. त्यांच्यामध्यें स्नान करण्याची चाल अजिबात नाहीं. घरचीं स्वयंपाकाचीं भांडीं देखील ते दररोज घासतांना आढळत नाहींत.

भा षा.—ऐनू लोकांची भाषा साधी कर्णमधुर व सुरेल आहे. भाषेंतील वाक्यरचनेचें जपानी भाषेंतील वाक्यरचनेशीं साम्य आहे पण इतर बाबतींत जपानी भाषेंत व या भाषेंत पुष्कळच फरक आहे. ऐनूंची भाषा अगदीं दरिद्री असून त्यांतील शब्दसंग्रह फारच थोडा आहे. उच्च विचार व्यक्त करण्याला यांची भाषा निरुपयोगी आहे असें लँडार नांवाचा एक लेखक म्हणतो; पण ते सर्वांशीं खरें नाहीं. डेब्रोव्हास्की नांवाच्या ग्रंथकारानें ऐनू भाषेंतील१०,९३० शब्दांचा संग्रह केलेला आहे. व बॅचलरनें आपल्या ऐनू–इंग्लिश–जपानी कोशांत १४,००० शब्द दिलेले आहेत. त्यावरून लँडारच्या म्हणण्यांत वास्तविक तथ्य नाहीं हें सहज दिसून येईल. लेखनकला मात्र यांनां अवगत नसल्यामुळें यांच्यामध्यें वाङ्मयाची बरीच वाण दिसून येते. कांहीं पौराणिक गोष्टी व परंपरेनें चालत आलेलीं गाणीं एवढेंच काय तें यांचें वाङ्मय होय. यांचीं अंक मोजण्याची पद्धत फारच चमत्कारिक व घोंटाळ्याची आहे. अशा रीतीनें ते भाषेच्या व वाङ्मयाच्या दृष्टीनें जरी बरेच मागसलेले आहेत तरी ते कमी बुद्धिमान् आहेत असें मात्र मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं. जपानी लोकांनीं ऐनूंच्यासाठीं ज्या शाळा काढल्या आहेत त्यांमधील अनुभवावरून ऐनू लोक बुद्धिमान आहेत असें सिद्ध होतें. जपानी लोकांच्या भाषेशीं व वाङ्मयाशीं तरुण पिढीचा परिचय होत असल्यामुळें आपल्या जातीच्या

भाषेकडे हे तरुण लोक दुर्लक्ष करीत असलेले आढळून येतात.

शा स न प द्ध ति.—हल्लींच्या काळांत ऐनू लोकांनां जपानी कायदेच लावले जातात व जपानी कायद्याप्रमाणेंच ऐनूंमधील गुन्ह्यांचा निकाल लावला जातो. पण प्राचीन काळीं त्यांची शासनपद्धति निराळी होती. आपल्या ताब्यांतील प्रदेशाचे त्यांनीं सरु, उसू, व इशिकरी असे तीन भाग पाडले असून, सरुचा सर्व प्रदेशावर ताबा असे. प्रत्येक खेड्याची व्यवस्था, तीन पिढीजाद सरदारांकडे असे. पण या सरदारांकडे न्यायदानाचें काम मात्र नसे. गुन्हेगारांच्या अपराधांचा निकाल देण्याचें काम, त्या त्या जातींतील महाजनांच्या सभेकडे असे. गुन्ह्यांबद्दल देहांत शिक्षा कधींच दिली जात नसे. फक्त फटके देण्याचीच चाल सरसहा अस्तित्वांत होती. खुनाच्या गुन्ह्यांबद्दल मात्र गुन्हेगाराचे नाक, कान, डोळे, पाय वगैरे छाटले जात असत.

ल ग्न वि धी व चा ली री ती.—प्राचीन काळीं ऐनू-लोकांत मिश्र विवाहाची पद्धत नव्हती. पण हल्लीं ती प्रचारांत आढळून येते. जपानी लोकांमध्यें व ऐनूंमध्यें हल्लीं बरेच मिश्रविवाह झालेले दिसून येतात. विशेषतः संबत्सु या ठिकाणीं अशा प्रकारचे विवाह अधिक रूढ झालेले आढळतात. मँचुरियामधील लोकांच्या चालीरीतीशीं यांच्या चालीरीतींचें बरेंच साम्य आढळून येतें. ऐनू लोक हे सहवासप्रिय व मनमिळाऊ असून परकीय मनुष्यांशीं ते चांगल्या रीतीनें वागतात. अनेक शतकें लोटलीं असूनहि त्यांच्या चालीरीती फारशा बदललेल्या नाहींत. धर्मविषयक बाबतींत बायकांना एकदोन गोष्टी खेरीज करून ढवळाढवळ करण्याची मनाई आहे. नवऱ्याचें नांव बायकांनीं घेणें हें पाप आहे. तसेंच घुबड वगैरे प्राण्यांचे आवाज ऐकणें हें दुश्चिन्ह होय अशा यांच्या समजुती आहेत.

ध र्म.—ऐनूंचा धर्म शिंटो वगैरे धर्मांप्रमाणें फारच प्राचीन आहे. ऐनू लोकांनां धर्म नाहीं, त्यांच्यांत नीतिविषयक कल्पनांचा अभाव आहे हें म्हणणें बरोबर नाहीं. ऐनूंचा धर्म मुळांत एकेश्वरी असावा असें दिसतें. ईश्वरवाचक 'कामुई' हा शब्द आहे. पुढें ज्यावेळीं यांच्या धर्मांत अनेक देवतांची कल्पना रूढ झाली त्यावेळीं मुख्य ईश्वराला 'पसे कामुई' असें नांव देण्यांत आलें. या परमेश्वराचें वर्णन 'टुंटू' म्हणजे 'सर्व वस्तूंचा आधार' व 'शिंडा' म्हणजे 'निर्माता' अशा शब्दांनीं करण्यांत येतें. पंचभूतात्मक प्रकृति ही अनाद्यंत असून त्या प्रकृतीपासून हें जग निर्माण झाहें असें ऐनूंचे मत आहे या प्रकृतिपासून जग कसें विकास पावलें यासंबंधीं मात्र बऱ्याच अस्वाभाविक कल्पना यांच्यांत आढळून येतात.

मृ ता सं बं धीं च्या क ल्प ना.—मनुष्य मरण पावल्यानंतर त्याचा आत्मा त्याच्या पापपुण्याप्रमाणें स्वर्गांत अगर पाताळांत जाऊन रहातो अशी ऐनूंची समजूत आहे. या दृष्टीनें त्यांनीं सहा प्रकारचे स्वर्ग व सहा प्रकारचे नरक मानलेले आहेत. मृत मनुष्याला परमेश्वरापुढें पापपुण्याचा झाडा द्यावा लागतो व त्याप्रमाणें त्याला परमेश्वर स्वर्गांत अगर नरकांत ढकलतो अशी यांची कल्पना आहे. मरणोत्तर मनुष्याला स्वर्गांत अगर पाताळांत रहाण्याकरतां घर, शिकारीसाठीं धनुष्यबाण इत्यादि लागतात या समजुतीनें मृताच्या शरीराबरोबरच या वस्तूंचा नाश करण्यांत येतो. हेतु हा कीं या सर्व वस्तु मृताबरोबरच स्वर्गांत अगर पाताळांत जाव्यात. अशा प्रकारच्या मृतासंबंधींच्या कल्पना ऐनूंमध्यें आढळतात.

[ संदर्भ ग्रंथ.—बॅचलर–ऐनू अँड देअर फोकलोअर ( लंडन ), व 'दि ऐनू ऑफ जपान; इसाबेला बर्ड–कोरिया अँण्ड हर नेबर्स ( १८९८ ), व अनबीटन ट्रॅक्स ऑफ जपान ( १८८५ ); डगलस हॉवर्ड–लाइफ बुइथ दि ट्रॅन्स-सैबेरियन सॅव्हेजेस ( १८९३ ); रॉमिन हिच कॉक–दि ऐनूज ऑफ जपान ( वॉशिंग्टन १८९२ ); चेंबरलेन–थिंग्ज जॅपनीज ( लंडन १९०२ ); ]

ऐमक.—मोंगोलियन महावंशांतील एका भटकणाऱ्या जातीला ऐमक म्हणतात. हे लोक उत्तर व वायव्य अफगाणिस्तानांत रहातात. हे काल्मुक उपभाषेशीं साम्य असलेली भाषा बोलतात. हे लोक सुनी पंथाचे मुसुलमान असून धीट व चांगले लढवय्ये आहेत.

ऐयनर.—दक्षिण हिंदुस्थानांतील अति प्रसिद्ध व लोकप्रिय ग्रामदेवतांपैकीं ऐयनर ही एक क्षेत्ररक्षक देवता आहे. ती संकटापासुन पिकांचें निवारण करून रात्रीच्या वेळीं त्यांचा नाश करणाऱ्या दुष्ट जीवांना हांकूत लाविते असें म्हणतात. दक्षिणेच्या वरच्या भागांत या देवाचें नांवहि फारसें माहीत नाहीं; तथापि दक्षिणेंत बहुतेक प्रत्येक गांवांत ऐयनरचें एक तरी देऊळ असतेंच; त्या ठिकाणीं रोग व अवर्षण यांपासून पिकांचें रक्षण व्हावें म्हणून या देवाला अनेक वस्तु व स्तोत्रें अर्पण करण्यांत येतात. देवळाच्या भोंवतीं व गांवाजवळ, तांबड्या भाजलेल्या मातीचे ओबडधोबड घोडे, हत्ती, वगैरे त्या त्या प्राण्यांएवढे मोठाले एकत्र ठेवलेले बहुधा आढळतात. यांवर बसून परिवारासह ऐयनर राक्षसांचा पाठलाग करण्यास जातो असें मानण्यांत येतें. खेडेगांवचा माणूस काळोख पडल्यानंतर ऐयनरच्या देवळाजवळ जाण्याचें टाळतो कारण न जाणों कदाचित राक्षस समजून तो मारला जावयाचा।

या देवतेची मूर्ति मनुष्याच्या आकाराची असून कधीं कधीं मुकुट व राजदंड धारण करून बसलेली तर कधीं अश्वारूढ अशी दाखविलेली असते. पूरणी व पुडकला या त्याच्या दोन बायका कधीं कधीं त्याच्या शेजारीं असतात व दुष्टांपसरणाच्या कामीं त्या आपल्या पतीला मदत करितात. संकट किंवा पीडा आली असतांहि ऐयनरला आळविण्यांत येतें. त्यावेळीं देवळासमोरील दगडाच्या वेदीवर पशुयाग होतो व तर्पण केलें जातें. संस्कार चालविणारा पुरोहित

नेहेमीं हलक्या जातींतील असतो. दुखण्यांतून बरा केल्याबद्दल किंवा एखादें व्रत निर्विघ्नपणें पार पाडल्याबद्दल किंवा कोणतेंहि साहाय्य केल्याबद्दल गांवकरी ऐयनरला मातीचे घोडे दान करितात. तथापि हंगामाखेरीज इतर वेळीं या देवतेची जत्रा भरतांना किंवा उपासना होतांना दिसत नाहीं. सर मोनियर विल्यम्सनें आपल्या ब्राह्मणिझम व हिंदुइझम या पुस्तकांत परमगुडीच्या ऐयनरमंदिराला भेट दिल्यावेळचें जें वर्णन दिलें आहे तें बहुतेक दक्षिण हिंदुस्थानांतील पुष्कळशा देवस्थानांना लागू पडण्यासारखें आहे.

ऐयनर हें नांव "हरि-हर" या दोन नांवांचा संधि किंवा अपभ्रंश असावा व विष्णूनें जेव्हां स्त्रीरूप घेतलें त्यावेळीं शिवापासून त्याला झालेला हा मुलगा असें मानण्यांत येतें. ही कदाचित् आद्य द्राविड देवता असून, मागाहून आलेल्या आर्यांनीं तिला मान्यता देऊन आपल्या देवांत ओढलें व कुलकथा निर्माण केली, असें दिसतें. कधीं कधीं गणपतीची (म्ह. याच्या भावाची) मूर्ति या ऐयनर शेजारीं असते, पण गणपतीप्रमाणें ऐयनरला मंगलकार्यासाठीं किंवा आशीर्वाद देण्यासाठीं कधीं आह्वान केल्याचें आढळत नाहीं.

**ऐरणी**—मुंबई इलाखा. धारवाड जिल्हा. राणीबिन्नूरच्या पूर्वेस बारा मैलांवर सुमारें दोन हजार लोकवस्तीचें खेडें. येथें कलिंगडें उत्कृष्ट होतात. इ. स. १८७६–७७ च्या दुष्काळापूर्वी येथें कुरुवार लोक घोंगड्या चांगल्या करीत असत. यांच्यापैकीं दुष्काळांत पुष्कळ मेले व कांहीं येथून निघून गेले. त्यामुळें हा धंदा बसला. इ. स. १७९० सालीं टिपूविरुद्ध मराठ्यांच्या मदतीस आलेल्या कॅप्टन मूरनें ऐरणी गांवास लहानसा किल्ला असून गांव देखील बऱ्यापैकीं आहे असें वर्णन लिहून ठेवलें आहे. इ. स. १८०० (२०जून) सालीं कर्नल वेलस्ली (ड्यूक वेलिंग्टन) हा प्रसिद्ध मराठी लुटारू धोंड्या वाघ याचा समाचार घेण्याकरितां आला असतां त्यानें ऐरणीच्या किल्ल्यावर टेहेळणी करण्याकरितां म्हणून एक तुकडी रवाना केली होती. त्याच्या मनांत लढाई करून किल्ला सर करावयाचा होता; परंतु किल्ल्यांतील सैन्य किल्ला सोडून गेल्यामुळें ता. २१ जून रोजीं क. वेलस्लीच्या ताब्यांत आला. इ. स. १८४२ सालीं कॅ. बरगॉइन व ले. बेल यांनीं या किल्याचें वर्णन केलें आहे. तुंगभद्रेच्या वामतीरावर हा किल्ला असून साधारण भक्कम आहे.

**ऐरावत (१)**—एक नाग. ( तपस्य श० पहा ). हा कद्रुपुत्र होय.

(२) पृथ्वीच्या आसमंतात आठहि दिशांकडे जे दिग्गज आहेत त्यांतील पूर्वेकडील दिग्गज हा सर्व दिग्गजांचा स्वामी, व इंद्राचा वाहनरूप होय. हा शुभ्र वर्णाचा असून यास चार दांत आहेत.

(३) समुद्रमंथनकालीं निघालेला जो चवदा रत्नांतील गज तो हा होय.

**ऐहिकवाद**—होलियोकच्या समाजनीतिशास्त्रविषयक मतास ऐहिकवाद हें नांव आहे. नांवाप्रमाणें व्यावहारिक नीतिशास्त्र व समाजाच्या भौतिक व नैतिक उन्नतीच्या दृष्टीनें या मताची उभारणी केली आहे. हें मत ईश्वराच्या अस्तित्व नास्तित्वासंबंधीं मुग्ध आहे. हा एक उपयुक्ततावादाचाच प्रकार आहे. होलियोकनें लंडन येथें एक मंडळ स्थापन केलें. चार्लस ब्राडलॉच्या नेतृत्वाखालीं या मंडळानें प्रचलित ख्रिस्ती संप्रदाय मोडून काढण्याचा व इतर राजकीय व सांपत्तिक सुधारणांचा पुरस्कार केला.

**ऐहोळ**—विजापुर जिल्हा. हुनगुंद तालुक्यांतील एक गांव.उ. अ. १६° १' व पू. रे. ७५°५२' हें मलप्रभा नदीवर हुनगुंदच्या नैर्ऋत्येस १३ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें दोन हजार. नदीकिनाऱ्याला एक कुऱ्हाडीच्या आकाराचा खडक दाखवितात. विष्णूचा सहावा अवतार जो परशुराम त्यानें सर्व क्षत्रियांचें निर्मूलन केल्यावर आपला परशु येथें धुतला अशी दंतकथा आहे; व त्याचें स्मृतिचिन्ह म्हणजे परशूच्या आकाराचा हा खडक व नदीमध्यें खडकावर परशुरामाच्या पादुका आहेत व जवळच रामलिंगाचें देऊळ आहे.

गांवाच्या समोरच्या डोंगरावर मेगुतीचें मंदिर आहे. त्याची बांधणी द्रविड पद्धतीची आहे. या देवळाच्या पूर्व भिंतींत चालुक्यकालीन एक शिलालेख आहे. तो इ. स. ६३४ मधील आहे त्यांत "महाराष्ट्र" असा शब्द या देशाला प्रथमच लाविलेला आढळतो. सध्यां तें दुर्गा देवीचें मंदीर म्हणून प्रसिद्ध आहे व त्यावरून बौद्धांचीं डोंगरांतील लेणीं पहिल्यानें जैन व तदनंतर ब्राह्मणमंदिरें होण्यापूर्वी कोणत्या स्थित्यंतरांतून गेलीं हें चांगलें दिसून येतें. येथें डोंगरांत कोरलेलीं दोन लेणीं आहेत, एक जैन व दुसरें ब्राह्मणी. यांखेरीज दुसरीं देवालयें म्हणजे हुचिमल्लिगुडी, लाडखान व कोडदेव. याहि देवळांवर शिलालेख आहेत. यास अइवल्लि असेंहि नांव आहे [ इं. ॲं. ५, १९०८ व मुं. ग. विजापूर १८८४ ].

ओ, अर्थ.—( १ ) ब्रह्मदेव. ( २ ) महापद्म ( संख्या ). (३) हांकेस उत्तर, जसें ओ देणें. ( ४) ओकारी, जसें ओ होईपर्यंत जेवणें. इत्यादि.

अ क्ष र वि का स.—'अ' पासून 'ओ' वर्ण तयार झाला असावा ही सहजिक सुचणारी कल्पना चुकीची ठरते. कारण अशोकाच्या गिरनार लेखांत 'ओ' ची आकृति स्वस्तिकांतील उभ्या भागाप्रमाणें आहे. इ. स. पहिल्या त्या शतकांतील कुशाणवंशी राजाच्या वेळच्या मथुरा येथील लेखांत वरील 'ओ' च्या वरच्या आडव्या रेषेला बराच वांक आहे. पुढील शतकांतल्या नासिकच्या वासिष्ठीपुत्र पुलुमायीच्या लेखांत खालच्या रेषेलाहि वांक आहे. काली लेण्यांत सुद्धां असाच 'ओ' दिसतो. पांचव्या शतकातील जयनाथच्या दानपत्रांत हल्लींच्या 'उ' च्या सारखी 'ओ' ची आकृति दिसते. प्रतिहार कक्कुकाच्या घटिआला लेखांत ( इ. स. ८६१ ) हें साम्य अधिकच पटतें.१२व्या शतकांतील एका हस्तलिखित पुस्तकांत 'ओ' हा 'अ' ला मात्रा देऊन काढल्यासारखा दिसतो. आज आपण काढतो तसा ओ कोठेंच आढळत नाहीं. पूर्वी अक्षराच्या डाव्या हाताला काना काढून मात्रेचें काम भागवीत असत.

ओक.—एक वृक्ष. याच्या अनेक जाती असून, आकारहि निरनिराळे असतात. याचें फळ सुपारीसारखें असून खालच्या बाजूस एका लांकडी खवलेदार पेल्यांत ठेवल्यासारखें दिसतें. यूरोप, आशिया,उत्तर आफ्रिका व उत्तर अमेरिका या खंडांच्या समशीतोष्ण भागांतून ओक वृक्ष जिकडे तिकडे आढळतात. ब्रिटिश–ओक ज्याला म्हणतात तो समशीतोष्ण प्रदेशांत अतिशय मौल्यवान् असा मानला जातो. पक्का असला म्हणजे तो इतर बहुतेक लांकडांपेक्षां जास्त टिकतो व हवेंत बदल झाला तरी त्याच्यांत बदल होत नाहीं. याचें वजन दर घनफुटांस ४८ ते ५५ पौंड असतें. सालीच्या आंतलें लांकूड जास्त हलकें व फार कमी टिकाऊ असतें. तरी पुष्कळशा स्वस्त जिन्नसा करण्याच्या कामीं तें चांगलें उपयोगी पडतें. जहाजें बांधण्याच्या कामीं मागें ब्रिटनचें ओक लांकूड फार वापरीत. पण हल्लीं सागवानानें त्याची जागा पटकाविली आहे. लांकूड कृत्रिम रीतीनें वांकविण्याची कला माहीत नव्हती तेव्हां ओकच्या वांकलेल्या फांद्या व बुंधे नौकाबंधनाला फार महत्त्वाचे वाटत यांत शंका नाहीं. अजूनहि खेड्यांतील कारागीर गाड्या वगैरे तयार करण्याला ओक वापरतात; शिल्पी नक्षीकामासाठी घेतात. एडवर्ड दि कन्फेसरची वेस्टमिनिस्टर येथील ( ८०० वर्षांपूर्वीची ) कबर काळ्या ओक लांकडाची आहे. जळाऊ लांकूड म्हणूनहि याचें महत्त्व आहे. धातु वितळविण्याच्या कामीं याचे कोळसे चांगले असतात.पण यूरोपांतील ओक वृक्षाला किड्यांपासून फार भीति असते. एकानें असें दाखवून दिलें आहे कीं, वनस्पतिजीवि किड्यांपैकीं निम्मे ओक वृक्षावर जगतात. ओकच्या फळांनां मोठें आर्थिक महत्त्व प्राप्त झालें आहे; कारण तीं डुकरांनां नेहमीं खाऊं घालतात; व दुष्काळांत गोरगरीब तीं खाऊन रहातात.

हिं दु स्था नां ती ल ओ क वृ क्षां च्या जा ती.—पूर्व-हिमालय, खासिया डोंगर व मणीपूर येथील ओक झाडें पूर्ण वाढलेली असतात. हिंदुस्थान व ब्रह्मदेश मिळून यांच्या एकंदर ३१ जाती सांपडतात.

हिरवा ओकः—याला मोरू, तिलंगसा, किलोंज, रामशिंग, काळीराग, चोरा, परुंगा, बान, कर्शेझे इत्यादि नांवें आहेत. हा मोठा परंतु पानें गाळणारा वृक्ष, पश्चिमेस अफगाणिस्तान व सफेदकोह आणि पूर्वेस नेपाळपर्यंत आंतील हिमालयाच्या ७ ते ९ हजार फूट उंचीच्या प्रदेशांत होतो. या झाडाचें लांकूड टिकाऊ असून त्याचा इमारती, शेतकीचीं आउतें, कुऱ्हाडीचे दांडे वगैरे करण्याकडे उपयोग होतो. टॉन्सव्हॅली स्लीपरच्या कारखान्यांत ह्या लांकडाच्या विनचाकी गाड्या करून त्यांचा उपयोग देवदार काढण्याकडे करतात. सिमला जिल्ह्यांत ह्या लांकडाचे कोळसे करतात. पानें व कोंवळ्या फांद्या गुरांनां खाण्यासाठीं तोडतात.

करडा ओकः–(ग्रे ओक), बंज, सिला, सुपारी, रिन, भारू, कर्शु, शिंदर, सेरै,दघुनबान इत्यादि नांवें या जातीला आहेत. हें मोठें व नेहमीं हिरवे असणारें झाड सिंधू नदापासून नेपाळपर्यंतच्या २ ते ८ हजार फूट उंचीच्या हिमालयाच्या प्रदेशांत होतें. शान डोंगर व ब्रह्मदेश यांत सुद्धां हें झाड होतें. हिंदुस्थानांतील ओक वृक्षाची ही जात अत्यंत सुप्रसिद्ध आहे. हीं झाडें सिमला, मसूरी, नैनीताल वगैरे थंड हवा खाण्याच्या ठिकाणांजवळ फार दिसतात. इमारतीचें लांकूड म्हणून या झाडाच्या लांकडांचा उपयोग क्वचित करतात. हें लांकूड सरळ नसतें. कधीं कधीं मात्र याचा घरें बांधण्याकडे व शेतकीचीं आउतें करण्याकडे उपयोग करतात. जाळण्यासाठीं व कोळसे पाडण्यासाठीं याचा मुख्य उपयोग होतो. झाडाच्या सालीपासुन हरणाच्या तांबूस रंगासारखा रंग निघतो. त्याचा उपयोग कातडीं कमविण्याकडे होतो.

परीक्षणाअंतीं या झाडाच्या वाळलेल्या सालींत टॅनिक अम्ल ओक झाडांमध्यें सर्वांत जास्त म्हणजे शेंकडा २३.३६ या प्रमाणांत निघालें.

लामेलोसा ओकः—शलसी, फरतसिंधली, बुदम्रन, वूक अशीं याचीं नांवें आहेत. हें फार मोठें व नेहमीं हिरवें असणारें झाड पूर्वहिमालयांत नेपाळ ते डाफला टेंकड्यांपर्यंतच्या ५-९हजार फूट उंचीच्या प्रदेशांत होतें. मणिपूर भागांत हें झाड ७ ते ८ हजार फूट उंचीच्या प्रदेशांत वाढतें. दार्जिलिंगच्या जंगलांतील हें सर्वांत सुंदर व महत्त्वाचें झाड असून कधीं कधीं १०० ते १२० फूटांपर्यंत याची उंची असते. ओलसर जागेंत जर फार ठेवलें नाहीं तर या झाडाचें लांकूड फार टिकाऊ असतें. घराचे व पुलाचे खांब व तुळया, खिडक्यांच्या चौकटी वगैरे या लांकडापासून करतात. ह्याचा जाळण्यास फार चांगला उपयोग होतो. दार्जिलिंगमध्यें ह्याच्या सालींचा कातडीं कमाविण्याकडे उपयोग होतो.

सिंगट ओकः—नांवें-चेसी, कर्शू, खरेंड, बर्चेर, जंगल, कापरुंगी, केरु, सौज इत्यादि. पश्चिमेस सफेत कोह आणि अफगाणिस्तान व पूर्वेस भूतान आणि मणिपूर डोंगर यांमधील सर्व क्षेत्रांत हें झाड होतें. या जातीच्या ओकाला फारशी मागणी नाहीं, तरी हें भक्कम व टिकाऊ असतें. याचे कोळसे चांगले पडतात. पानें चारा म्हणून उपयोगी पडतात. चिनी रेशमाचे किडे या पानांवर रहातात. [ वॅट. अग्रि. लेजर, १९०२ नं. २,५५. इंडियन फॉरेस्टर २०.२१].

**ओक वामन दाजी**—( इ. स. १८४५-१८९७ ) महाराष्ट्रीय ग्रंथकार. जन्म कोकणांत गुहागराजवळील हेदवी गांवीं. स्थिति फारच गरिबीची होती. अभ्यास रत्नागिरी हायस्कुलांत झाला. १८७० मध्यें हे मॅट्रिक झाले. पुढें २।३ वर्षें मुंबईस खासगी शाळांतून नोकरी करून १८७५ सालीं नागपूर सिटी स्कूलमध्यें फर्स्ट असिस्टंटच्या जागीं त्यांची नेमणूक झाली; व पुढें त्याच शाळेंत हेडमास्तर झाले. पुढें संबलपूर व रायपूर हायस्कुलांत हेडमास्तर झाले. १८९० पासून आपल्या अंतकालापर्यंत हे 'काव्यसंग्रहा' चे संपादक होते. हे उत्तम कवि आणि लेखक होते. श्रीमन्माधवनिधनात्मक पद्यरत्नमाला ( १८८३ ), लॉर्ड बेकन ( १८८४ ), कादंबरीसार, मुद्राराक्षससार, वासवदत्तकथासार ( १८८९ ), वगैरें पुस्तकें यांनीं लिहिलीं. यांचा मराठी कवितेचा व्यासंग दांडगा होता. हे स्वभावानें शांत, निगर्वी व निर्व्यसनी होते. मृत्यु १३ जून १८९७ त झाला. [ मनोरंजन दिवाळीचा अंक १९१०; वाङ्मयसूची. ].

**ओकद्विन**—लोअर ब्रह्मदेशांतील टौन्गु जिल्ह्यांत एक टौनशिप ( तालुका ). १९०५ सालीं पियु टौनशिपचा कांहीं भाग वेगळा करून ही टौनशिप निर्माण करण्यांत आली. क्षेत्रफळ ९२४ चौ. मैल. लोकसंख्या ( १९११ ) ४९७५३. यांत गांवें ७५ आहेत.

**ओकपो**—लोअर ब्रह्मदेशांतील हेंझाड जिल्ह्याची एक टौनशिप. क्षेत्रफळ ८८० चौरस मैल. ही टौनशिप जिल्ह्याचे मध्यभागीं आहे. लोकसंख्या ( १९११ ) ९३२६०. खेडीं १०५. सध्यां यांस इंगाबू असें म्हणतात.

**ओकलंड शहर**—( अमेरिका ) कॅलिफोर्नियांतील अलमेडा परगण्याचें मुख्य ठिकाण असून सानफ्रान्सिस्को उपसागराच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेलें आहे. येथून सानफ्रान्सिस्को शहर ६ मैल आहे. शहराची लोकसंख्या ( १९०० ) ६६,९६० आहे. शहराच्या मध्यभागीं "मेरिट" नांवाचें सरोवर आहे व त्यामुळें शहरास एक प्रकारची शोभा आली आहे. येथील "कॅलिफोर्निया" व "सेंटमेरीज" हीं दोन कॉलेजें व त्याचप्रमाणें (स्त्रियांकरितां) मिल्स कॉलेज वगैरे प्रसिद्ध आहेत. यूबा नदी शहराला विद्युत्शक्ति पुरविते. औद्योगिक दृष्ट्या शहर फार महत्त्वाचें आहे. उपयुक्त जिनसांचे कारखाने बरेच असून त्यांचें एकंदर उत्पन्न १०,७२,५३९ डॉलर ( इ. स. १९०५ सालीं ) किंमतीचें होतें. "सदर्न पासिफिक," "सेंट्रल पासिफिक" वगैरे रेल्वे-शाखांचें हें शेवटचें स्टेशन आहे. रेल्वेमुळें हें महत्त्वाचें व्यापाराचें ठिकाण बनलें आहे.

**ओकहॅम**—ओकहॅम हें इंग्लंड देशांतील रटलंडचें काउंटी व बाजारगांव आहे. लोकसंख्या ( १९०१ ) ३२९४. येथील ओकहॅम किल्ल्याची स्थापना दुसऱ्या हेनरीच्या वेळीं झाली. यांतील नार्मन तऱ्हेचा दिवाणखाना प्रेक्षणीय आहे.

**ओकुमा, कौंट**—एक जपानी मुत्सद्दी. (जन्म १८३८) लहानपणीं यानें चिनी वाङ्मयाचा अभ्यास करून इंग्रजी व डच भाषांचेंहि चांगलें ज्ञान मिळविलें. या भाषांतलीं शास्त्रीय व राजकीय विषयांचीं पुस्तकें वाचून त्याच्या मनांत मोठी क्रांति झाली. बापानें त्याला लष्करांत घालण्याचें ठरविलें होतें; पण आपली सर्व शक्ति सरंजामी पद्धत मोडून त्या जागीं सनदशीर राज्यपद्धति स्थापण्यांत खर्च करावयाची असा त्यानें निश्चय केला. त्यानें लवकरच आपलीं मतें जाहीर केलीं व १८६८ च्या जपानमधील राज्यक्रांतींत त्याचें मुळींच अंग नव्हतें तरी त्याच्या विचारांचा लोकांवर बराच परिणाम झालेला दिसला. मिकाडोच्या कारकीर्दींत त्याला परराष्ट्रीय कारभाराच्या खात्यांत दुय्यम अधिकाऱ्याची जागा मिळाली. १८६९ त तो अंतर्व्यवहार व फडणिसी खातें यांवरचा चिटणीस झाला. यापुढील १४ वर्षें त्यानें निरनिराळ्या हुद्यांवर काम करून राजकारणांत घालविलीं. एकदां लोकमत त्याला अगदीं प्रतिकूल होऊन त्याच्या जिवावर बेतलें होतें. आपल्या सार्वजनिक आयुष्यांत त्यानें विद्यावृद्धीची जरूरी पाहून त्या दिशेनें खटपट केली होती. त्यानें आपल्या खर्चानें विशिष्ट विषयांकरितां एक शाळा चालविली होती. १८९८ त मार्क्विस इटोच्या मृत्यूनंतर त्यानें परराष्ट्रीय मंत्री व मुख्य प्रधान या जागेवर काम केलें. पण मंत्रिमंडळांत बेबनाव उत्पन्न होऊन थोड्या दिवसांतच

त्याला राजीनामा देऊन घरीं बसावें लागलें. टोकिओशेजारीं वासेडा येथें असलेल्या आपल्या सुंदर बगीचाची व्यवस्था करण्यांत तो राहिलेला काळ कंठीत असे.

**ओकू**—एक जपानी सेनापति. १९०४-५ च्या रूसो-जपानी युद्धांत ओकूनें मोठीच मर्दुमकी गाजविली. पोर्ट-आर्थर घेण्यापूर्वी नॅन्सन, टेलिसू व इतर ठिकाणें ओकूनें घेऊन लिआओ-यंग ( मांचूरिया ) कडे रशियाला हांकून लाविलें. प्रख्यात सेनापति नोगी याला ओकूची विशेष मदत होती.

**ओकेन, लॉरेन्झ** ( १७७९-१८५१ )— एक जर्मन सृष्टिशास्त्रज्ञ. वुर्झबर्ग व गॉटिन्जन विश्वविद्यालयांत वैद्यक व सृष्टिशास्त्र या विषयांचा यानें अभ्यास केला. १८०२ त यानें एक लहानसा ग्रंथ लिहून त्यांत कांटनें मानसिक व नीतिशास्त्रांत योजिलेलीं तत्त्वें यानें भौतिक शास्त्राला लाविलीं. अपृष्ठवंशीय, मासे, सरपटणारे प्राणी, पक्षी व सस्तन प्राणी असे प्राण्यांचे त्यानें पांच वर्ग पाडले. १८०५ सालीं त्यानें उत्पत्तीवर एक पुस्तक लिहिलें. सर्व सेंद्रिय प्राणी पेशींपासून उत्पन्न होतात व ते पेशींचेच बनलेले असतात असें त्याचें म्हणणें होतें. पुढील वर्षी जो त्याचा ग्रंथ प्रसिद्ध झाला त्यांत आंतडीं नाभिपेशीपासून उगम पावतात असें त्यानें सिद्ध करून दाखविलें. या सुमारास ओकेनची कीर्ति गॉएटेच्याहि कानावर जाऊन त्याला येना विश्वविद्यालयांत वैद्यक शास्त्राच्या प्रोफेसरची जागा मिळाली. येना येथील त्याच्या व्याख्यानांत सृष्टितत्त्वज्ञान, निसर्गेतिहास, प्राणिशास्त्र, शारीरविच्छेदन, मनुष्य, प्राणी व वनस्पती यांचे शारीरविज्ञान यांसारखे अतिविस्तृत विषय विवेचिले जात. एकंदर शरीरांत एकंदर विश्वाच्या हालचालींचें केलेलें एकीकरण म्हणजेच सेंद्रियरचना होय हें तत्त्व त्यानें १८०८ मध्यें लिहिलेल्या पुस्तकांत प्रामुख्यानें नजरेस येतें. एखाद्या मध्यवस्तूनें ध्रुवप्रदेशाच्या ठिकाणीं इतर ग्रहांबरोबर घडवून आणलेली ईथरची ओढाताण म्हणजेच प्रकाश; व उष्णता ही या ईथरची गति होय हा सिद्धांत त्याच वर्षी प्रसिद्ध झालेल्या त्याच्या दुसऱ्या एका ग्रंथांत आहे. खनिज क्षेत्रांतहि त्यानें वेगळी मांडणी केली. त्यानें धातूंच्या दगडांचें वर्गीकरण धातूंवरून न करतां त्यांच्या ऑक्सिजन, अम्ल व गंधक यांशीं होणाऱ्या संयोगानुसार केलें. १८१६ त त्यानें इसस नांवाचें एक नियतकालिक काढिलें; त्यांत शास्त्राखेरीज काव्यें व जर्मन संस्थानांच्या राज्यकारभारावर टीका प्रसिद्ध होत. त्याच्या राजकीय चर्चेमुळें वीमर दरबारनें त्याला एक तर पत्र बंद करण्याला नाहींतर प्रोफेसराची जागा सोडण्याला सांगितलें. तेव्हां ओकेननें प्रोफेसरी सोडली. पण दरबारनें वीमर येथें इसिस प्रसिद्ध करण्याची बंदी केली. तेव्हां रुडोल्स्टड येथें तें प्रसिद्ध होऊं लागलें. १८[illegible] पर्यंत तें नियमानें चाललें होतें. एका विश्वविद्यालयांतून दुसऱ्यांत अशा त्याच्या वारंवार बदल्या झाल्या. शेवटीं १८३३ त तो झूरिच येथें कायम झाला. अध्यापनाचें व शास्त्रीय प्रगतीचें काम त्यानें त्या ठिकाणीं आमरण चालविलें. ओकेननें लिहिलेल्या ग्रंथांत १५।१६ सुप्रसिद्ध आहेत. इसिस व इतर नियतकालिकांतून त्याचे अनेक लेख अंतर्भूत झाले आहेत.

**ओकोनेल डॅनियल** ( १७७५—१८४७ ):— प्रख्यात आयरिश देशभक्त. कॅथोलिक लोकांविरुद्ध जे कठोर व जुलमी कायदे करण्यांत आले होते व त्यामुळें कॅथॉलिक लोकांचा जो धर्मच्छल सुरू झाला होता त्यामध्यें जीं कित्येक कॅथोलिक घराणीं सांपडलीं त्यांतच ओकोनेलचेंहि घराणें होतें. या धामधुमींत त्याच्या पूर्वजांनीं आपल्या जमीनीहि गमावल्या होत्या. १८ व्या शतकांत हद्दपार केलेल्या आयरिश लोकांनीं फ्रान्समध्यें जी एक तुकडी बनविली होती तिची भरती करण्याकरितां ओकोनेलच्या पूर्वजांनीं आपले आप्तइष्ट पाठविले होते. जन्मापासून ओकोनेलच्या ठायीं ब्रिटिश लोकांविषयीं पूर्ण द्वेष, आपल्या धर्माविषयीं व कुलाविषयीं करडा अभिमान हे गुण परंपरागत आलेले होते. लहानपणींच मॉरिस नांवाच्या त्याच्या चुलत्यानें त्याला दत्तक घेतलेलें होतें व त्यामुळें आपल्या बापाची व चुलत्याची अशी दोघांचीहि इस्टेट त्याला मिळाली. तो अतिशय तीव्र बुद्धीचा होता. तो रुगळीं धुळाक्षरें अवघ्या दीड तासाच्या आंत शिकला असें म्हणतात. तो दहा वर्षांचा असतांनाच त्यानें एक छोटें नाटक लिहिलें. कॅथोलिक लोकांना शाळा घालण्याची परवानगी मिळाल्यामुळें जी क्वीन्सटाऊन येथें एक नवीन शाळा उघडण्याचें ठरलें होतें त्या शाळेमध्यें तो दाखल झाला; व नंतर त्याचें उच्च शिक्षण फ्रान्समधील सेंटओमर व डुई नांवाच्या कॉलेजांत झालें. या ठिकाणीं असतांना फ्रान्समधील जी परिस्थिति त्याच्या नजरेस पडली तिचा परिणाम त्याच्या मनावर फार झाला. फ्रेंच राज्यक्रांतीमध्यें जे अनेक रक्तपात झाले त्यांपैकीं कांहीं घोर प्रकार त्यानें आपल्या डोळ्यांनीं पाहिले होते. त्यांमुळें अशा अनर्थकारक प्रकारांबद्दल व समाजसत्तावादी तत्त्वांबद्दल त्याला चीड आली व त्या तत्त्वांच्या विरुद्ध त्याचें जें त्यावेळीं मत बनलें तें शेवटपर्यंत कायम राहिलें. त्याचप्रमाणें या कटु अनुभवामुळें त्याचें मत राजपक्षाला अनुकूल असें बनलें. फ्रान्समधून परत आल्यावर कायद्याचा अभ्यास करण्याकरितां तो इंग्लंडमध्यें गेला व सन १७९८ सालीं त्यानें आपल्या धंद्यास सुरुवात केली; व थोडक्याच काळामध्यें आपल्या धंद्यांत पहिल्या प्रतीचा लौकिक मिळविला. वकीलीच्या कामास लागणारे सर्व गुण त्याच्या अंगीं पूर्णपणें वास करीत होते व साक्षीदाराची उलट तपासणी करण्यामध्यें तत्कालीन वकीलांमध्यें त्याच्याइतका वाकबगार कोणीच नव्हता.

परंतु ओकोनेलची खरी योग्यता व मोठेपणा समजण्याला त्याच्या सार्वजनिक आयुष्याकडेच पाहिलें पाहिजे. त्यावेळीं कॅथोलिक लोकांवर जे जुलमी कायदे लादण्यांत आले होते ते जरी त्यावेळीं थोडे फार ढिले करण्यांत आलेले होते तरी पण प्रॉटेस्टंट लोकांच्या मानानें या कॅथोलिक लोकांची स्थिति अत्यंत केविलवाणी होती. तशांतच १७९८ सालचें बंड फसल्यामुळें कॅथोलिक पुढाऱ्यांची नाउमेद झाली होती. या वेळेपर्यंत लोकांच्या पुढारीपणाची सूत्रें ग्रॅटन, फ्लड, चार्लमॉंट यांच्या ताब्यांत असून त्यांच्या चळवळीला यश मिळण्याची अशा दिसत नव्हती. शिवाय या पुढाऱ्यांनीं जें समेटाचें धोरण पत्करिलें होतें त्यामुळें कॅथोलिक लोकांचें चर्च अधिकारी वर्गाच्याच ताब्यांत राहणार होतें. ओकोनेलनें या धोरणाबद्दल उघडपणें चर्चा करून त्याविषयीं आपली नापसंति व्यक्त केली. ओकोनेलनें आपलें स्वतंत्र धोरण आंखून या चळवळीला नवीन दिशेनेंच चलन दिलें. स्वतः कॅथोलिक असल्याकारणानें व लहानपणापासून त्या वातावरणांत वाढल्यामुळें त्यानें या कार्यामध्यें आपली सर्व शक्ति खर्च केली; व आपल्या निश्चयानें व स्वार्थत्यागानें ही चळवळ यशस्वी केली. त्यानें या कार्यासाठीं १८११ सालीं एक नूतन कॅथोलिक ॲसोसिएशन स्थापन केली व त्या सभेचा तीन वर्षांचा खर्च स्वतः सोसला. हळू हळू या नवीन संस्थेचें स्वरूप व्यापक होऊं लागलें. कॅथोलिक लोकहि या संस्थेला भराभर येऊन मिळूं लागले. अधिकाऱ्यांनीं अनेक प्रकारचीं कुलंगडीं आणून अडथळे केले पण ओकोनेलच्या कायद्यांतील पटुत्वामुळें ते अडथळे नाहींसे झाले; व अशा रीतीनें बरींच वर्षे अनेक विघ्नें सहन करून या संस्थेमध्यें एकूण एक कॅथोलिक लोक आले व त्यामुळें ही प्रबल अशी राष्ट्रीय चळवळ बनली. अर्थातच या चळवळीचा जनक व सूत्रधार ओकोनेल हाच होता. इतके असंख्य लोक या संस्थेंत असूनहि या संस्थेमध्यें गैरशिस्त अगर लोकांची हुल्लड कोठेंच दिसून येत नव्हती. कारण ओकोनेल हा शिस्तीचा फार भोक्ता होता. यानंतर क्लेअरपरगण्यांतील पार्लमेंटच्या सभासदाची जागा रिकामी झाली व त्या जागेकरितां कॅथोलिक लोकांनीं ओकोनेल याला उभें केलें; व तो मोठ्या प्रचंड बहुमतानें निवडून आला. याच सुमारास पीलनें राजाला न जुमानतां कॅथोलिक लोकांना मतस्वातंत्र्य देऊं केल्यामुळें त्या कायद्यान्वयें ओकोनेलला शपथ घेण्याचें कारण उरलें नाहीं. अशा रीतीनें १८२९ सालीं कॅथोलिकांना प्रॉटेस्टंट लोकांच्या मनाविरुद्ध कां होईना पूर्ण स्वातंत्र्य मिळालें.

पॉर्लमेंटमध्यें शिरल्यानंतर ओकोनेल हा व्हिग पक्षाला मिळाला. लगेच ओकोनेलनें टाईथच्या कराविरुद्ध पुनः चळवळ सुरू केली. हा कर स्वतः कोणीहि देऊं नये व त्यामुळें अधिकाऱ्यांनीं जर मिळकत जप्त केली तर ती लिलावांत कोणी घेऊं नये अशा प्रकाराची ओकोनेलनें जाहीर सूचना दिली. याचा परिणाम असा झाला कीं आयर्लंडमध्यें भयंकर दंगे, खून, रक्तपाताचे प्रसंग वगैरे अनर्थ झाले. एका टाईथच्या पायीं १८३२ सालीं नेहमीपेक्षां ९००० गुन्हे अधिक झाले व त्यांपैकीं नुसते २०० खून होते असें म्हणतात. अर्थातच लॉर्ड ग्रे यानें ही बंडाळी मोडून टाकण्यासाठीं शक्य ते उपाय योजण्यांत यावे अशा प्रकारची सूचना पार्लमेंटमध्यें आणली; व यावेळीं ओकोनेलनें या सूचनेला कसून विरोध केला. यामुळें त्याच्यामध्यें व व्हिगपक्षामध्यें तात्पुरता वेबनाव उत्पन्न झाला. पण ज्यावेळीं त्यांनीं (व्हिगनीं) हा टाइथसंबंधाचा कायदा रद्द केला त्या वेळीं तो पुनः व्हिगपक्षाला मिळाला.

यावेळीं हॉउस ऑफ कॉमन्समध्यें ओकोनेलला फार उच्च दर्जा प्राप्त झाला होता. वक्तृत्वामध्यें तो पहिल्या वर्गांत मोडला जात असे. त्याचें जोरदार आवेशयुक्त भाषण कानाला मधुर लागणारें नसलें तरी फार परिणामकारक होत असे. ओकोनेलनें लॉर्ड मेलबोर्नच्या प्रधानमंडळाला आपला टेकू दिला. लॉर्ड मेलबोर्न हा लिबरल पक्षाचा प्रधान असून त्याचें ओकोनेलविषयीं चांगलें मत होतें. लॉर्ड मेलबोर्नचे प्रतिपक्षी तर मेलबोर्नच्या प्रधानमंडळाला थट्टेनें अगर उपहासानें ओकोनेलचें मंत्रिमंडळ असें संबोधीत असत; व तें पुष्कळ अंशीं खरेंहि होतें. कारण आयर्लंडांतील हुद्याच्या जागांवर ओकोनेल सांगेल त्यांचीच मेलबोर्न हा निवड करीत असे. पण त्याला स्वतःला न्यायाधिशाची जागा देऊं केली असतां त्यानें ती नाकारली. तो धार्मिक बाबतींत जरी रोमची सत्ता मान्य करीत असे तरी पण इतर बाबतींत तो उदारमतवादी होता. इतकेंच नव्हे तर कट्टा सुधारणावादी होता. तो गुलामगिरीच्या निंद्य पद्धतीच्या विरुद्ध होता. खुल्या व्यापाराबद्दल त्याचें अनुकूल मत होतें. पण फ्रान्समध्यें असतांना लोकशाहीबद्दल त्याच्या मनांत जो तिरस्कार उत्पन्न झाला होता तो म्हातारपणावरोबर वाढतच गेला. समाजसत्तावाद्यांनीं तत्त्वें त्याला बिलकूल पसंत नव्हतीं. व आयरिश पुअर लॉचें बिल ज्यावेळीं पार्लमेंटमध्यें आलें त्यावेळीं हें बिल पास झाल्यास शेतकऱ्यांमध्यें व मजूरवर्गामध्यें समाजसत्तावाद बोकाळेल या भीतीनें त्यानें त्या बिलाला विरोध केला. तसेंच कर न देण्याच्या चळवळीलाहि त्यानें विरोध केला. यामुळें ओकोनेल हा लोकांच्या मनांतून बराच उतरला होता.

१८४१ मध्यें पील हा मुख्य प्रधान झाल्यावर आयर्लंडसंबंधींचें आपलें धोरण ओकोनेल यानें बदललें. पील हा टोरी होता. अर्थातच त्या वेळचें प्रधानमंडळ टोरी पक्षाचें होतें. त्यानें पीलचें प्रधानमंडळ आयर्लंडला घातुक झाल्याशिवाय रहावयाचें नाहीं असें जाहीर केलें. व यासाठीं त्यानें एक 'रिपील ॲसोसिएशन' स्थापिली. हळू हळू ती सभा लोकप्रिय होत गेली; व पुढें पुढें ती इतकी लोकप्रिय झाली कीं, तिच्या आफिसांत ४०।५० कारकून

पत्रव्यवहारकरितां लागत. तिच्या मार्फत मोठमोठ्या जंगी जाहीर सभा भरूं लागल्या

ओकोनेल सांगेल त्याप्रमाणें लोक करण्यास कधींहि चुकणार नाहींत अशी भीति अधिकारी वर्गाला वाटूं लागली. त्या वेळीं आयर्लंडांत एक तरुण वर्ग निर्माण झाला होता तो ओकोनेलनें सांगितल्यास बंड देखील करण्यास तयार होता. आयर्लंडमध्यें बंडाळी होणार असें बहुतेकांनां वाटूं लागलें. अर्थातच प्रधानमंडळाला ही भीति वाटून पीलनें ही चळवळ नामशेष करण्याचा निश्चय केला. जाहीर सभा बेकायदेशीर आहेत असा पीलनें हुकूम सोडला. अर्थातच ह्या सभाप्रतिबंधाचा जाहीरनामा फडकल्याबरोबर आयरिश पक्षामध्यें मतभेद उत्पन्न झाले. तरुण पक्ष म्हणूं लागला कीं कांहीं झालें तरी हरकत नाहीं पण सभा ही भरवलीच पाहिजे. ओकोनेलचा जन्म कायदेशीर चळवळी करण्यांत गेला होता त्याला हें धोरण पसंत पडेना. त्यानें सभा भरवितां कामा नये असा जिकडे तिकडे हुकूम सोडला. अर्थातच या तरुण पक्षाला फार वाईट वाटलें. ज्याप्रमाणें बार्डोलीच्या कायदेभंगाचा निश्चय एकदम महात्मा गांधींनीं मागें घेतला व त्यामुळें येथील तरुण पक्षाची नाउमेद झाली तीच स्थिति त्या वेळीं झाली. ओकोनेलला स्वतःला पुढें पश्चात्ताप झाला. पण एकदां गेलेली वेळ कशी परत येणार ?

ओकोनेल हा लोकांनां अप्रिय झालेला आहे असें पहातांच त्याचा फायदा घेऊन त्याला शिक्षा द्यावी म्हणजे ही चळवळ थांबेल असा पोक्त विचार करून अधिकाऱ्यांनीं त्याच्यावर खटला करावयाचें ठरविलें व त्याप्रमाणें त्याला पकडून जामीन घेण्यांत आला. हेंच धोरण महात्मा गांधींच्या बाबतींतहि ब्रिटिश सरकारनें बार्डोलीनंतर अंमलांत आणलें. त्याच्याच बरोबर सात आठ मंडळींवर खटला करण्यांत आला. खटल्याचा निकाल लागून त्याला एक वर्ष कैदेची शिक्षा झाली. त्याला वाटेल तो तुरुंग पसंत करण्यास सांगितलें व त्याच्या स्नेह्यांनीं रिचमंड येथील तुरुंग पसंत केला. त्या तुरुंगामध्यें त्याचा राजासारखा थाट ठेवण्यांत आलेला होता. उत्तम भोजन, गाणें बजावणें, चहापार्ट्या, निरनिराळ्या लोकांच्या भेटी घेणें वगैरे प्रकार चालू होते. इकडे ओकोनेलच्या स्नेही मंडळींनीं त्याच्या शिक्षेबद्दल अपील केलें होतें व त्यामुळें तो दोषमुक्त ठरला. ही बातमी कळतांच जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. ओकोनेलची थाटाची मिरवणूक निघाली. पण या वेळेपासून पुढें अनेक कारणांमुळें त्याची लोकप्रियता नष्ट होत चालली. तरुण पक्षामध्यें व याच्यामध्यें उघड खटके उडूं लागले. तरुण पक्ष हा दिवसेंदिवस प्रबल होत चालला. रिपीलची चळवळ अधिकाऱ्यांनीं लोकांमध्यें फूट पाडून नाहींशी करण्याचे प्रयत्न चालविले होते. तशांत याच सुमारास देशामध्यें दुष्काळ पडल्यामुळें ही चळवळ नामशेष झाली. ओकोनेलकडून या दुष्काळग्रस्त माणसांनां व्हावी तशी मदत झाली नाहीं. त्यामुळें शेतकरी वर्ग त्याच्याविरुद्ध नाराज झाला. एकदां अशा तऱ्हेनें लोकप्रियता नाहींशी झाल्याबरोबर त्याच्यावर लांचलुचपतीचे वगैरे खोटेनाटे आरोप येऊं लागले. अशा रीतीनें त्याची कीर्ति कमी होऊं लागली. म्हातारपणामुळें त्याची पार्लमेंटमध्येंहि छाप पडेनाशी झाली. अशामुळें वैतागून तो पॅरिस येथें गेला व नंतर रोमची यात्रा करण्यास निघाला. रोमहून परत येतांना वाटेंत जिनोव्हा येथें १५ मार्च १८४७ रोजीं तो मरण पावला. आयर्लंडमध्यें त्याचें प्रेत नेण्यांत येऊन मोठ्या समारंभानें पुरण्यांत आलें. व १८६९ सालीं त्याचें स्मारक म्हणून त्या जागेवर एक मनोरा बांधला.

ओकोनेल हा मोठा पुरुष होऊन गेला यांत संशय नाहीं. तो दिसण्यांत भव्य होता. समाजाला भुलविण्याइतकें अलौकिक वक्तृत्व त्याच्यामध्यें वास करीत होतें. कॅथॉलिक लोक त्याला 'उद्धारकर्ता' असें अद्यापीहि अभिमानानें म्हणतात. मोठमोठ्या चळवळी तो मोठ्या मुत्सद्देगिरीनें व कर्तबगारीनें करीत असे. पण गुणांबरोबरच त्याच्यामध्यें थोडे फार अवगुणहि होते. सार्वजनिक व्यवहारामध्यें जितका चोखपणा पाहिजे तितका त्याच्या अंगीं नव्हता. तो आपल्या स्वतःच्या प्रपंच्यासाठीं दरवर्षी वर्गणी जमा करीत असे. याशिवाय तो बॅरिस्टरीहि करीत असेच. यामुळें लोक त्याच्यावर अफरातफरीचा आरोप करीत व त्याला उघडपणें नांवें ठेवीत. तो तोंडानें फटकळ असल्याकारणानें उगाच आपल्याविरुद्ध त्यानें शत्रू करून घेतलेले होते. तथापि हे सर्व अवगुण व त्याच्या चुका लक्षांत घेऊनहि तो फार अलौकिक माणूस होता असेंच कोणालाहि कबूल करणें भाग पडेल यांत संशय नाहीं. [ संदर्भग्रंथ—ओकोनेलच्या जॉन नांवाच्या मुलानें त्याचें चरित्र ( १८४६ ) व आठवणी ( १८४९ )प्रसिद्ध केल्या आहेत. शिवाय फेगन ( १८४७ ), कुसॅक ( १८७२ ), रुर्की आणि कीफे ( १८७५ ) व हॅमिल्टन ( १८८८ ) या लेखकांनीं लिहिलेलीं ओकोनेलचीं चरित्रें आहेत. ].

**ओक्लाहामा**—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक संस्थान. क्षे. फ ७००५७ चौ. मै. व लो. सं. ( १९१८ ) २३७७६२९. राजधानीचें शहर ओक्लाहामा असून तेथील वस्ती ( १९१७ ) ९७५८८ आहे. सध्याच्या संस्थानाची घटना १९०७ सालीं झाली. ४४ सभासदांचें वरिष्ठ मंडळ ( सेनेट ) व नव्याण्णव ते एकशेदोन सभासदांचें प्रतिनिधिमंडळ ( हाऊस ऑफ रेप्रेझेंटिव्ह्ज ) असतें. ज्या इंडियन मनुष्यानें आपल्या जातीशीं असलेला सर्व संबंध तोडून टाकला असेल त्यास मताधिकार मिळतो. वरिष्ठ मंडळाचे दोन व प्रतिनिधिमंडळाचे आठ प्रतिनिधि कांग्रेसमध्यें घेतले जातात. निग्रो व गोरे यांच्या मुलांकरितां प्राथमिक व दुय्यम शाळा आहेत. शेतकी व यांत्रिक कॉलेज, तसेंच

शेतकी व अध्यापन शिकविणारी युनिव्हर्सिटी व वाङ्मयाभ्यासाठीं युनिव्हर्सिटी या उच्च शिक्षणाकरितां आहेत. ३ रुग्णालयें, सहा अनाथगृहें, मुलें व म्हातारीं माणसें यांची २ वसतिगृहें व अंधळया बहिऱ्यांकरितां एक एक शाळा या संस्थानांत आहेत. येथील मुख्य पिकें म्ह. मका, गहूं, ओट, कापूस, बटाटे हीं होत. पेट्रोलियमच्या जंगी व्यापारामुळें गेल्या कांहीं वर्षांपासून हें संस्थान खनिज संपत्तींत महत्त्वाचें गणलें जातें. कोळसा, शिसें यांसारखीं खनिज द्रव्येंहि काढण्यांत येतात. येथें सरकीचें तेल व पेंड तयार करणें, सरकी काढणें, धान्य दळणें वगैरे धंदे चांगले चालतात. १९१६ सालीं ६४५४ मैलांचा वाफेच्या गाडीचा व ३०१ मैलांचा विजेच्या गाडीचा रस्ता तयार होता. [ ओक्लाहामा 'रेडबुक' संस्थानाच्या निरनिराळ्या खात्यांचे रिपोर्ट. स्टेट्समन्स ईयर-बुक ].

**ओच्चन**—मारन लोकांनां किंवा तामिळ देशांतील वाद्यवादकांनां दिलेलें नांव. या जातीची लोकसंख्या सुमारें सहा हजार ( १९११ ) आहे. कांहीं हिंदु देवालयांत हे पुजाऱ्यांचें काम करतात. ते प्रायः शैव असतात. देवालयांत असेपर्यंत कांहींजण यज्ञोपवीत धारण करतात. त्रावणकोरमध्यें राजकृपेचें द्योतक म्हणून ओच्चन ही पदवी देण्यांत येते. यांच्या मृतांस पुरण्याची चाल आहे.

**ओजिब्वा**—उत्तर अमेरिकेंतील इंडियनांची एक जात. यांची एकंदर संख्या ३५,००० असून तीपैकीं सुमारें १५,००० कानडांत रहातात. युनायटेड स्टेटस्‌मध्यें १९१० सालीं २०२१४ ओजिब्वा लोक होते. यांचा इतर जातींशीं संबंध भाषेच्या व संस्कृतीच्या दृष्टीनें आहे. हे लोक मूळचे शिकारी, तरी कांहीं शेतकी करतात. यांचीं घरें चौकोनी, वाटोळीं व शंक्वाकार असत. यांचे कपडे कातड्याचे असत. अग्नि लांकडें घांसून किंवा दगडावर दगड घांसून काढीत. धनुष्यबाण व युद्धांतील गदा हीं मुख्य शस्त्रें होत. यांचे चटया व विणकाम हे मुख्य धंदे असत. बर्चच्या सालीपासून सर्व भांडीं तयार करीत. यांच्यांत अनेक वर्ग आहेत. त्यांनां प्राण्यांचीं नांवें दिलेलीं असतात. एकाच वर्गातल्या माणसांचे परस्पर विवाह होत नाहींत. नवराबायकोनें एकमेकांचें नांव घ्यावयाचें नसतें. तसेंच सासूनें जांवयाचें नांव घ्यावयाचें नसतें. ही मर्दानी जात असल्यानें त्यांचे खेळहि मर्दानी असतात. मृतांनां त्यांच्या जिन्नसांसह पुरतात. त्यांचे आप्तेष्ट तोंडाला काळें फांसतात, तसेंच हातापायांनां वाद्या बांधून टाकतात व केंस कापतात. कधीं कधीं चाकूंनीं जखमाहि करून घेतात. मृतांचे आईबाप व बायको प्रवासांत असतांना एक वर्षपर्यंत मृताची प्रतिमा म्हणून एक कापडाची बाहुली बाळगितात. ओजिब्वांच्या मॅनिटू नांवाच्या देवता आहेत. देवांनां तंबाखू वहातात व धार्मिक संस्कारांत कुत्रीं बळी देतात.

[संदर्भग्रंथः—पीटर जोन्स-हिस्टरी ऑफ दि ओजिब्वा इंडियन्स; रॅडिन-समृ मिथ्स ॲन्ड टेल्स ऑफ दि ओजिब्वा ऑफ साऊथ-ईस्टर्न ऑंटेरिओ; हॉफमन-मिडेविविन ऑफ दि ओजिब्वा; स्किनर-पोलिटिकल आर्गनिझेशन, कल्ट्स ॲन्ड सेरीमनिज ऑफ दि प्लेन्स-ओजिब्व ॲन्ड प्लेन-क्री इंडियन्स].

**ओझर**—जुन्नरच्या आग्नेयीस ६ मैलांवर कुकडीच्या डाव्या तीरावर हें एक लहानसें इनामगांव आहे. हें गणपतीचें स्थान आहे. गांवाचें उत्पन्न देवस्थानास इनाम आहे. येथील व्यवस्था देव उपनांवाच्या गृहस्थाकडे आहे.

**ओझा**—हे लोक गोंडांचे शकुन सांगणारे जोशी व त्यांचे भाट आहेत. पण यांची आतां स्वतंत्र उपजात झाली आहे. ओझा शब्दाचा अर्थ ओझ-आंतडें असा आहे. रोमन लोकांत जे पुरोहित असत ते बळी दिलेल्या प्राण्यांचीं आंतडीं काढून पाहून त्यांवरून शकुन, भविष्य वगैरे वर्तवीत असत. तशीच कदाचित यांच्याकडे कामगिरी असेल. यांची संख्या ५००० आहे. हे लोक सातपुड्यांत कोरकू लोकांचेहि जोशी बनले आहेत. यांपैकीं कांहीं लोक पक्षी पकडतात व म्हणून त्यांस मोधियाहि म्हणतात.

**ओट**—(धान्य व गवत) हें गवत पश्चिमेस बलुचिस्तान व अफगाणिस्तानपासून काश्मीर कुमाऊन व नेपाळमधून सिक्कीमच्या अगदीं पूर्वेच्या भागापर्यंत सर्वत्र आढळतें. परंतु तें कोठेंच पुष्कळ प्रमाणांत दिसत नाहीं. हिमालयाच्या समशीतोष्ण प्रदेशांत हें बहुधा आढळतें. या गवताच्या तेरा जाती आहेत. त्यांपैकीं 'ए. साटीव्हा' या गवताची लागवड केली जाते. आफ्रिका, अरबस्तान, इजिप्त, इराण, जपान व चीन यांमध्येंहि या गवताची लागवड करितात. कासपर बौहिननें या गवताच्या आलबा व मुडा अशा दोन जाती दिलेल्या आहेत. आलबा गवताला अरब लोक चुरतल म्हणत असत.

चेंगिझखानाच्या बरोबरच ओट गवत हिंदुस्थानांत आलें व तें सर्व मोंगलबादशहांनां माहीत होतें असें कांहीं लेखक म्हणतात.

ऐनी अकबरीमध्येंहि या गवताचा उल्लेख केलेला आहे. वॉरनहेस्टिंग्सनें मोथुझील येथें त्याची लागवड करविली होती असें म्हणतात. यावरून या गवताची लागवड निदान १९ व्या शतकाच्या आरंभीं झाली असली पाहिजे हें स्पष्ट दिसतें. अलीकडे ओट गवताची लागवड महत्त्वाची नसली तरी सर्व हिंदुस्थानभर होते. याचा दाणा चांगला भरत नाहीं. यामुळें धान्य मनुष्याच्या खाण्याच्या कामाचें नसतें. शिवाय दाणा पक्क झाल्यावर तो कणसांतून गळून पडतो; यामुळें याची कापणी लवकर करावी लागते ओटचा चारा तांदूळ व गहूं यांच्या चाऱ्यापेक्षां पौष्टिक असतो.

ला ग व ड:—ओट गवताची लागवड जव वालीप्रमाणेंच करितात. पाण्याचा पुरवठा भरपूर असल्यास हिरवा चारा तीनदां कापतां येतो. व नंतर धान्याचें पातळसें पीकहि होतें. दर एकरी २० मण धान्य व ३० मण गवत होतें. हिमालयाच्या खालच्या उतरणीवरील प्रदेशांत ओट धान्य सर्वांत उत्तम होतें. दिल्ली, हिस्सार व मीरत जिल्ह्यांत हें गवत पुष्कळ होतें. पुणें, अहमदनगर, सातारा व अहमदाबाद या जिल्ह्यांत हें गवत थोड्या प्रमाणावर होतें. सपाटीच्या प्रदेशांतील धान्य लांबट व बारीक असून त्यावर टरफलाचा भाग जास्त असतो व एक बुशेल धान्याचें वजन १५ ते ३७ पौंडांपेक्षां बहुधा अधिक नसतें. मुंबई प्रांतांत ओट हें रब्बी पीक आहे. ओटचें पीक भुसभुशीत व निचरा असलेल्या जमीनींत फार चांगलें होतें. चिकणमातीच्या व हलक्या जमीनींत हें होत नाहीं. ओटला लागणारी जमीन व इतर परिस्थिति हीं गहू व जव यांच्याप्रमाणेंच असावी लागतात. या गवताचें बीं फेकून पेरावें लागतें. एक एकर जमीनीस सुमारें १०० पौंड बी लागतें. पेरणीपासून पीक तयार होण्याला ३॥ ते ४ महिने लागतात. याचें भाताप्रमाणें झोडून किंवा त्यावर बैल फिरवून मळणी करतात. चांगल्या एक एकर जमीनींतील पिकाचें प्रमाण १८०० ते २२०० पौंड व चाऱ्याचें प्रमाण २५ हंड्रेडवेट आहे. ओट धान्य बहुधा भरडून व इतर धान्यांबरोबर मिसळून घोड्यांनां देतात.

ओट धान्य व गवत यांची आयात थोडीबहुत होते. परंतु त्यासंबंधीं स्वतंत्र आंकडे मिळत नाहींत. गवताची निर्गत बरीच मोठी आहे. गेल्या २० वर्षांत निर्गतीचें प्रमाण सरासरी ५० हजार ते ८० हजार हंड्रेडवेट यांच्या दरम्यान होतें. व पाठविलेल्या मालाची किंमत १॥ ते ४ लक्ष रुपयांपर्यंत होते. १९०६–७ सालीं २,२६,०२२ रु. किंमतीचें ५५,५१८ हंड्रेडवेट गवत परदेशीं पाठविलें गेलें. हा व्यापार मुख्यत्वेंकरून बंगाल व मॉरिशस यांच्या दरम्यान चालतो.

**ओटावा.**—उत्तर अमेरिकेंतील कानडा वसाहतीचें राजधानीचें शहर. हें ऑंटारिओ प्रांतांत कारलेटन जिल्ह्यांत आहे. हें ओटावा नदीच्या उजव्या तीरावर वसलें असून मॉंट्रिअलच्या पश्चिमेस १०१ मैलांवर उत्तर अ. ४५°-२५' व पश्चिम रेखांश ७५°४२' यावर आहे.

कॅनेडियन पॅसिफिक रेल्वेच्या मुख्य रस्त्यावर हें स्टेशन आहे. शहरांत विजेच्या आगगाड्यांनीं सर्वत्र जाण्याची सोय असून त्यांनीं हल, ऐलमर, व्हिक्टोरियापार्क इत्यादि ठिकाणींहि जातां येतें. हें शहर दिसण्यांत फार सुंदर आहे. पार्लमेंटच्या टेंकडीवरून शॉडिएर धबधबा दिसतो. रिडो कालव्यानें शहराचें खालचें व वरचें शहर असे दोन भाग झाले आहेत. वरच्या भागांत इंग्रज व खालच्यांत फ्रेंच लोकांची वस्ती आहे. सँडी हिल नांवाच्या भागांतहि श्रीमंत इंग्रज रहातात. पार्लमेंट टेंकडीवर बऱ्याच गॉथिक तऱ्हेच्या इमारती आहेत. त्यांत रॉयल मिंट, मुख्य कोर्ट, वगैरे बऱ्या इमारती आहेत. चर्च, शाळा, पोस्ट वगैरे आणखीहि इमारती आहेत.

ओटावा हें लांकडांच्या व्यापारासाठीं पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. शॉडिएर व रिडोच्या धबधब्याच्या शक्तीचा वीज करण्याकडे उपयोग करून बरेच कारखाने चालविण्यांत येतात ओटावा शहरांत व बाहेर कितीतरी उद्यानें आहेत. पार्लमेंटहिल हें एक सर्वोत्कृष्ट उद्यान आहे व यांत राजकीय पुढाऱ्यांचे पुतळे आहेत. ओटावाचा राज्यकारभार तेथील लोकांनीं निवडलेल्या लॉर्ड मेयरकडून व १६ आलडरमेनकडून पाहण्यांत येतो. वसाहतीच्या पार्लमेंटांत डोमिनियन हाऊस ऑफ कॉमन्समध्यें व प्रांतिक कायदेमंडळांत (प्रॉव्हिनशियल लेजिस्लेचर) या शहराकडून दोन सभासद पाठविण्यांत येतात. उपान्तभाग धरून या शहराची लोकसंख्या एक लाख आहे.

या शहरांत वस्तीला सुरुवात १८२० मध्यें निकोलस स्पार्कस नांवाच्या एका मनुष्यानें केली. या शहराचें पूर्वीचें नांव बायटाऊन होतें. पुढें येथें व्यापार वगैरे वाढला व ओटावा असें नांव बदलण्यांत आलें. १८५८ मध्यें व्हिक्टोरिया राणीनें या शहराला कानडाची राजधानी म्हणून ठरविलें. पार्लमेंटची पहिली बैठक येथें १८६५ मध्यें झाली.

**ओट्टो.**—(पहिला जन्म ९१२; मृत्यू ९७३) हा ओट्टो दि ग्रेट या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे. हा रोमचा बादशहा जर्मनीचा राजा पहिला हेनरी याचा ज्येष्ठ पुत्र होय. त्याच्या बालपणींच्या वृत्तान्ताविषयीं फार थोडी माहिती उपलब्ध आहे. त्याचा इंग्लंडचा राजा एडवर्ड दि एल्डर याच्या मुलीशीं विवाह झाला. लहानपणीं यानें आपल्या बापाबरोबर निरनिराळ्या लढायांत भाग घेतला होता व त्यामुळें युद्धांतील डावपेंचांचें त्याला उत्तम ज्ञान प्राप्त झालें होतें. ९३६ मध्यें तो जर्मनीचा राजा झाला व त्याला मेंझचा आर्चबिशप हिलेबर्ट यानें मोठ्या समारंभानें राज्याभिषेक केला. हेनरीनें आपल्या मांडलिक सरदारांशीं जी सौम्य वृत्ति ठेवली होती ती ओट्टोनें टाकून देऊन, आपल्या हाताखालील शेफारून गेलेल्या मांडलिकांनां शासन करण्यासाठीं यानें चंग बांधला. ९३७ मध्यें फ्रँकोनियाचा ड्यूक एबरहार्ड याला शासन करून त्यानें त्याच्याकडून बव्हेरिया प्रांत काढून घेतला. बोहेमियन व इतर स्लाव जातीच्या लोकांनीं जर्मनीच्या पूर्व सरहद्दीवर धुमाकूळ घालण्यास सुरुवात केली होती. त्याबद्दल त्यांचें पारिपत्य करण्याकरितां त्यानें आपल्या सरदारांनां पाठविलें. ठंकमर या नांवाचा त्याचा सावत्र भाऊ होता. त्यानें त्याच्याजवळ कांहीं मुलूख मागितला पण ओट्टोनें त्याला तो देण्याचें नाकारलें. त्यामुळें चिडून जाऊन त्यानें वुइचमन नांवाचा एक सरदार व फ्रँकोनियाचा ड्यूक एबरहार्ड यांच्या साहाय्यानें बंड उभारून ऐरसबर्गचा किल्ला ताब्यांत घेतला.

व ओट्टोचा धाकटा भाऊ हेनरी याला बंदिवान केलें. पण ओट्टोनें त्याच्यावर स्वारी करून त्या बंडाचा मोड केला. पुढें ९३९ मध्यें त्याचा भाऊ हेनरी यानेंच बंड पुकारलें. या बंडांत एबरहार्ड व लोरेनचा ड्यूक गिसेलबर्ट यांचें हेनरीला साहाय्य होतें. अर्थातच ओट्टोला त्यांच्यावर पुन्हां स्वारी करणें भाग पडलें. त्यानें क्सँटन येथें आपल्या भावाचा पराभव केला. पण अद्यापि फ्रँकोनिया व लोरेन येथील ड्यूकांनीं पुंडाई चालविलीच होती. तशांतच लोरेनचा ड्यूक यानें फ्रान्सच्या राजाचें मांडलिकत्व पत्करल्याचें जाहीर केलें. ओट्टोवर आणीबाणीचा प्रसंग येऊन ठेपला. पण सुदैवानें अडरनाक येथील लढाईंत ओट्टोचा जय होऊन एबरहार्ड व गिसेलबर्ट हे दोघेही प्राणाला मुकले. हेनरीला त्याच्या अपराधांची क्षमा करून त्याला त्यानें लोरेनचा ड्यूक केलें;पण तेथील व्यवस्था त्याला चांगली ठेवतां न आल्यामुळें ओट्टोनें त्याला पदच्युत केलें. यामुळें हेनरीला चीड येऊन ओट्टोचा खून करण्याची त्यानें मसलत केली; पण ती उघडकीस आल्यामुळें ओट्टोचा जीव बचावला. यानंतर ओट्टोनें बरींच मांडलीक संस्थानें आपल्या खास देखरेखीखालीं घेतलीं. लोरेनच्या ड्यूकला मदत केल्याच्या सबबीवर फ्रान्सवर स्वारी करण्याचें ओट्टोनें ठरविलें; पण लुईनें आपण होऊनच ओट्टोशीं तह केला. पुढें लुईलाच ज्या वेळेस लुईच्या एका मांडलिकानें तुरुंगांत टाकून लुईची सत्ता बळकाविली त्या वेळीं लुईच्या वतीनें ओट्टोनें त्या मांडलिकावर स्वारी करून लुईची सुटका केली.

इ. स. ९४५त बेरेंगर नांवाच्या एका मांडलिकानें इटलीमध्यें जाऊन तेथील बराचसा भाग जिंकला. ९५० मध्यें इटलीचा राजा निवर्तल्यामुळें त्याची बायको अॅडेलेड इच्याशीं लग्न करण्याची बेरेंगरनें इच्छा दर्शविली. अॅडेलडेनें ओट्टोला ही सर्व हकीकत कळवून त्याच्याजवळ मदतीची याचना केली. ओट्टोनें लगेच इटलीवर स्वारी करून लॉंबर्ड आपल्या ताब्यांत घेतलें; व अॅडेलेडच्या संमतीनें तिच्याशीं विवाह केला. बेरेंगर हाहि शरण येऊन त्यानें इटलीचा राजा या नात्यानें ओट्टोचें मांडलिकत्व पत्करलें. ओट्टोचा भाऊ हेनरी याला लुडॉल्फ नांवाचा मुलगा होता. ओट्टो हा निपुत्रिक असल्यामुळें ओट्टो व हेनरी यांच्या पश्चात त्यालाच राज्यपद मिळावयाचें ठरलें होतें. पण अडेलेडाला आतां ओट्टोपासून पुत्र झाल्यामुळें लुडाल्फचें धाबें दणाणलें. त्यानें लगेच लोरेनचा ड्यूक कॉन्राड व मेंझचा फ्रेड्रिक यांच्या साहाय्यानें अकस्मात् बंड उभारून ओट्टोला कैद केलें. पण ओट्टोनें त्यांचें म्हणणें मान्य करून युक्तीप्रयुक्तीनें आपली सुटका करून घेतली. नंतर त्यानें या दोघांचीहि जहागीर जप्त केली.

याच सुमारास मग्यार लोकांनीं बंड केल्यामुळें ओट्टोला त्यांच्यावर स्वारी करणें भाग पडलें. ९५५ मध्यें लीचफील्ड येथें त्यांचा ओट्टोनें पराभव केला व त्याच वर्षी स्लाव्ह लोकांचीहि रग जिरविली व अशा रीतीनें सरहद्दीवरील सर्व धुमाकूळ नाहींसा करून टाकला. मांडलिक राजांच्या बंडखोर स्वभावानें त्रासून जाऊन ओट्टोनें पोपशीं सख्य करण्याचें ठरविलें. त्यानें निरनिराळ्या उपाध्यायांनां जहागिरी दिल्या व मॅगडेबर्ग येथें मुख्य धर्माध्यक्षाचें पीठ स्थापन केलें. याच सुमारास इटली येथील बेरेंगर राजानें पोपला उपद्रव देण्यास सुरुवात केल्यामुळें पोपच्या विनंतीवरून ओट्टोनें रोमवर स्वारी केली. तेथें पोपनें त्याला रोमचा बादशहा म्हणून राज्याभिषेक केला व राजनिष्ठेची शपथ घेतली. पण थोडकाच काळ लोटल्यावर पोप हा गुप्त कट करूं लागला. तेव्हां ओट्टोनें धर्मगुरूंची सभा बोलावून या पोपला पदच्युत केलें व त्याच्या जागीं आठवा लिओ याला पोप नेमलें. एवढ्यावरच ओट्टो थांबला नाहीं तर त्यानें आपल्या संमतीशिवाय कोणत्याहि धर्मगुरूला पोप नेमण्याचा अधिकार नाहीं असें रोमन लोकांकडून कबूल करून घेतलें. ग्रीक व सॅरासन लोकांनीं दक्षिण इटलीमध्यें वंडाळी सुरू केल्यामुळें; त्यांनांहि हात दाखविण्याचा त्यानें प्रथम निश्चय केला. पण नंतर तो बदलून त्यानें त्यांच्याबरोबर तह करण्याविषयीं मध्यस्ती करण्याकरितां एका धर्मगुरूला पाठविलें. पण ग्रीक व सॅरासन लोकांनीं ती विनंती झिडकारिली. पण पुढें ग्रीसवर नवीन राजा बसल्यामुळें त्यानें ओट्टोशीं सख्य केलें व ओट्टोच्या मुलाला आपली मुलगी देऊं केली. अशा रीतीनें सर्वत्र शांतता झाल्यावर ओट्टो हा जर्मनीस परत आला. पण तेथें जाऊन थोडे दिवस लोटतात न लोटतात तोंच तो आकस्मिक रीतीनें मरण पावला. त्याला मॅगडेबर्ग येथें पुरण्यांत आलें.

ओट्टो हा अत्यंत धडाडीचा व चिकाटीचा मनुष्य होता. चर्चच्या सत्तेला आपल्या ताब्यांत आणून त्यानें आपल्या साम्राज्याला बळकटी आणिली. एकछत्री साम्राज्य स्थापण्याची त्याची महत्त्वाकांक्षा असल्यामुळें त्यानें सर्व स्वतंत्र संस्थानांनां आपलें मांडलिकत्व पत्करावयास लाविलें. तो स्वतः फारसा विद्वान् नसला तरी त्यानें आपल्या पदरीं अनेक विद्वानांनां आश्रय दिला होता. त्याचा स्वभाव जात्या दिलदार असून तो मृदु अंतःकरणाचा होता. ख्रिश्चन धर्माचा त्यानें आपल्या कारकीर्दींत पुष्कळ प्रसार केला.

**ओडर नदी**—ही जर्मन नदी मोरेव्हियन डोंगरपठारापासून आस्ट्रियांतून निघून बालटिक समुद्रास मिळते. हिची एकंदर लांबी ५६० मैल आहे. इच्या बेचक्यांत असेडॉन व वोलिन हीं बेटें आहेत. इच्या कांठचीं शहरें रॅटीबोर, ऑपेटन, ब्रिग, बेसलॉ, ग्लोगर, फ्रँकफोर्ट, कुसट्रिन्, स्ट्रेटिन् इ. इची सुधारणा करण्यासाठीं बरेच पैसे खर्च करून इचे निरनिराळे कालवेहि काढले आहेत. इच्यांतून लहान जहाजें चालूं शकतात.

**ओडेसा.**—रशियाच्या महत्वाच्या बंदरांपैकीं एक. लोकसंख्या व परदेशचा व्यापार या दृष्टीनें पाहतां ओडेसा हें पेट्रोग्राड, वार्सा व मास्को यांच्या खालोखाल आहे. हें काळ्या समुद्राच्या वायव्य कोनावर वसलेलें आहे. रशियांतील दोन मोठ्या नद्यांच्या आसपास असलेल्या प्रांतांतील व्यापाराकरितां हें मुख्य बंदर आहे. ओडेसाच्या उपसागराचें क्षेत्रफळ सुमारें १४ चौरस मैल आहे; व खोली ३० फूट आहे. पूर्वेकडील वाऱ्यामुळें जहाजें नांगरण्यास हें फार धोक्याचें आहे. येथें हिंवाळ्यांत थंडी असते व उन्हाळ्यांत बरीच उष्णता असते.

ओडेसा हें नवीन रशियाची व्यापार व बौद्धिक दृष्ट्या राजधानी आहे असें म्हणतां येईल. तसेंच येथें एक विश्वविद्यालय असून त्यांत १७०० विद्यार्थी आहेत. येथील लोकसंख्या सन १९१३ मध्यें ६३१०४० होती. निर्गत व्यापार, कारखाने, व जहाजासंबंधीं उद्योगधंदे चालतात. साखर शुद्ध करण्याचे कारखाने, चहा डब्यांतून बंद करण्याचे कारखाने, तेलाच्या गिरण्या, कातडें कमावण्याचे कारखाने, तागाचीं पोतीं करण्याचे कारखाने वगैरे मुख्य आहेत.

व्यापाराच्या दृष्टीनें ओडेसा हें निर्यातीकरितां रशियाचें पहिल्या प्रतीचें बंदर आहे व आयातीच्या दृष्टीनें हें पेट्रोग्राडच्या खालोखाल आहे. येथील आयातीचे मुख्य पदार्थ कापूस, लोखंड, शेतीचीं यंत्रें कोळसा वगैरे आहेत.

फार प्राचीन काळीं ओडेसाच्या उपसागरानजीक ग्रीक लोकांनीं वस्ती केली होती. १४ व्या शतकांत हा प्रदेश लिथुआनियन लोकांच्या ताब्यांत होता. १३९६ मध्यें लिथुआनियाच्या राजानें तीन तार्तर सरदारांचा पराभव केला. त्यांपैकीं खाजीबेग यानें हल्लीं ओडेसा आहे त्या ठिकाणीं एक किल्ला बांधला होता. १६ व्या शतकापर्यंत लिथुआनियन व पोल लोकांच्या ताब्यांत हा प्रदेश होता. पुढें तो तार्तर लोकांनीं घेतला. १७६४ सालीं त्यांनीं येथें किल्ला बांधला. १७८९ रशियानें हा किल्ला घेतला. इ. स. १७९१ मध्यें खाजीबे रशियाला देण्यांत आला. तेव्हां खाजीबे येथें एक बंदर बांधण्यांत आलें. १८२४ मध्यें ओडेसा ( न्यू ) नवीन रशियांतील बेसअरेबीयाच्या गव्हर्नराचें मुख्य ठिकाण झालें. १८६६ मध्यें आगगाडीनें ओडेसा कीफ, खारकोव्ह व रुमानियांतील जासी यांच्यांशीं जोडण्यांत आलें. सन १९०५-१९०६ मध्यें हें भयंकर राजक्रांतिकारक बेबंदशाहीचें ठिकाण बनलें. त्यावेळीं या बंडांत आरमारानेंहि भाग घेतला होता ही महत्वाची गोष्ट होय.

**ओडोनेल हेनरी जोसेफ** ( १७६९-१८३४ )—हा बॉयनेच्या लढाईनंतर आयर्लंड सोडून स्पेनमध्यें गेलेल्या ओडोनेलांचा वंशज होता. याचा जन्म स्पेनमध्यें झाला. पुढें मोठा झाल्यावर त्यानें स्पेनच्या लष्करी खात्यांत नोकरी धरली. १८१० मध्यें तो जनरल होऊन कॅटेलोनियामधील लष्कराचा अधिकारी झाला. येथेंच असतां त्याला फील्ड मार्शल हा किताब मिळाला. १८२३ त स्पेन सोडून त्यास फ्रान्समध्यें जावें लागलें. येथेंच तो १८३४ त मरण पावला.

२ याचा मुलगा लिओपोल्ड ओडोनेल (१८०९-१८६७) याचा जन्म सन्टाक्रूझ येथें १२ जानेवारी १८०९ रोजीं झाला. हा ख्रिश्चानिया राणीच्या सैन्यांतील एक अंमलदार होता. याचें एस्पॅर्टेरोच्या विरुद्ध १८४३ त झालेल्या राज्यक्रांतींत अंग होतें. १८४४-४८ पर्यंत यानें क्यूबामध्यें चाकरी बजावली. पुढें परत आल्यावर याला सेनेटचा सभासद नेमलें. १८५४ त हा युद्धमंत्री झाला. १८५६ त यानें मुख्य प्रधानपद मिळविलें. १८५९ त याला मोरोक्कोच्या मोहिमेवर पाठविलें, व टेट्अन शरण आल्यावर ड्यूक केलें. १८६६ त याला आपल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला. हा ५ नोव्हेंबर १८६७ रोजीं मरण पावला.

**ओतारी**—ओतकाम करणारांची एक जात. यांची वस्ती वऱ्हाड-मध्यप्रांतांत फार आहे. १९११ च्या खानेसुमारींत सबंध हिंदुस्थानांत ३१२१ ओतारी नोंदले गेले आहेत- पैकीं वऱ्हाड-मध्यप्रांतांतच २६३४ होते. तेथें त्यांचे गोंडाद्य व मराठे असे दोन भेद दृष्टीस पडतात. या दोहोंत रोटी व बेटी व्यवहार होत नाहींत. मुं. गॅझेटीयरवरून पहातां पुणें, सातारा व खानदेश या जिल्ह्यांतून त्यावेळीं १८८५ ओतारी होते असें दिसतें. त्यांची सविस्तर माहितीहि दिली आहे ( पु. १८ भा. १ ). ओतारी आपण क्षत्रीय आहों असें सांगतात. यांच्यांत पोटभेद नाहींत. त्यांचीं आडनांवें म्हणजे अहीर, वेद्रे, धनगर, गोटपागर, मगरघाट आणि महाडिक. एकाच आडनांवाच्या माणसांत लग्नें होत नाहींत. हे मराठे शेतकऱ्यांप्रमाणें दिसत असून मराठी भाषा बोलतात. दसऱ्याच्या दिवशीं तुळजापूरच्या अंबाबाईला बकरा बळी देतात. पैठणची काल्कादेवी ही त्यांची कुलस्वामीनी होय. घरांत बहिरोबा, भवानी, धनाई, जनाई, खंडोबा, मारुती व नागजी यांची पूजा करितात. देशस्थ ब्राह्मण यांचे उपाध्ये असतात. मराठे, महार वगैरेंच्या बायका जीं जोडवीं घालतात तीं ओताऱ्यांनींच केलेलीं असतात. कांहीं ओतारी देवांच्या मूर्ती ओततात. राक्षसविवाहाचा कांहीं अवशेष यांच्यांतच आहे असें म्हणतात. एखाद्याच्या मुलीला मागणी घालून त्यानें ती दिली नाहीं तर तिला पळवून नेण्यांत येतें; पुढें तिच्या बापास भरपाईदाखल कांहीं देण्यांत येतें. [ मुं. गॅ. रसेल आणि हिरालाल—कास्ट्स अँड ट्राईब्स ऑफ सेंट्रल प्रॉव्हिन्सेस ऑफ इंडिया. सेन्सस रिपोर्ट १९११ पु. १ भा. २ ].

**ओतुर**—मुंबई इलाख्यांतील पुणें जिल्ह्याच्या जुन्नर तालुक्यांतील एक खेडें. लोकसंख्या (१९०१) ६३९२. खानदेशांतील भिल्ल लोकांनीं फार त्रास दिल्यामुळें संरक्षणार्थ बांधलेला किल्ला येथें आहे. महादेवाचें व केशवचैतन्याचें अशीं

दोन देवाल्यें येथें आहेत. येथें श्रावण महिन्यांत शेवटच्या सोमवारीं प्रतिवर्षी जत्रा भरते.

**ओध**—पंजाबांतील एक जात. लो. सं. ३२२४६. हे हिंदु व मुसुलमान असून पंजाबांतील पूर्वेकडील संस्थानें सोडून बाकी सर्व पंजाबभर आढळतात. ते अडाणी मजूर असून त्यांना बेलदार असेंहि म्हणतात. ते आपल्या बायका मुलांसह कामाच्या शोधार्थ गांवोगांव हिंडतात. त्यांची भाषा निराळी असून तीस ओडकी म्हणतात.

**ओनला**, त ह शी ल.—संयुक्तप्रांत. बरेली जिल्ह्याची नैर्ऋत्य दिशेकडील तहशील. हींत ओनला, बालिश्री, सनेहा, आणि शिरोली(दाक्षिण,हे परगणे आहेत. उ. अ. २८° १०'ते २८° ३१' व पू. रे. ७८° ५८' ते ७९° २६' यांचे दरम्यान. क्षेत्रफळ ३०७ चौरस मैल. या तहशीलींत ३ गांवें व ३२६ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९११ ) २०७५९८. जमीनमहसूल ( १९०३–४ ) २,७५,००० व कर ४६०००.इ. स. १९०३–४ सालीं २४० चौरस मैल जमीन लागवडीखाली असून पैकीं ५६ चौ. मै. बागाइती होती.

गां व.—संयुक्तप्रांत. बरेली जिल्ह्याच्या याच नांवाच्या तहशिलीचें हें मुख्य ठिकाण असून अलीगड ते बरेली शहर या दरम्यान असलेल्या औध रोहिलखंड रेल्वेचें स्टेशन आहे. यांस ओनला, अल्वला हींहि नांवें आहेत. उ. अ. २८° १७' व पू. रे. ७९° १०' यांवर. लो. सं ( १९११ ) १३०२५. अन्वला नांवाच्या झाडापासून या गांवास हें नांव पडलें असावें. चौदाव्या व पंधराव्या शतकांत येथें दाट जंगल होतें. ऐनी अकबरींत हें एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें असें दाखविलें आहे. इ. स. १७३० सालीं रोहिल्यांचा पुढारी अली महमद यानें हा गांव काबीज करून आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. परंतु त्याच्या मरणानंतर त्याच्या मुलांनीं निरनिराळ्या जागीं आपलीं राहण्याचीं ठिकाणें केलीं त्यामुळें या गांवाचें महत्त्व कमी झालें. अली महमदच्या वेळचा किल्ला अद्यापि अस्तित्वांत आहे.

**ओनेगा**—हें सरोवर विस्तारांत लाडोगाच्या खालोखाल आहे. सर्व यूरोपांत याचा दुसरा नंबर लागतो. हें रशियांत असून स्व्हर नदीवाटे याचें पाणी लाडोगांत जाऊन पडतें.आग्नेय दिशेकडून वायव्य दिशेकडे हें पसरलेलें असून याचा दक्षिणभाग आकारांत व स्वरूपांत व्यवस्थित आहे. परंतु उत्तरभागांत लहान मोठीं बेटें, आखातें, अर्धवट बुडालेले खडक यांची पूर्ण समृद्धि आहे. वायव्य किनाऱ्यावर काळे व ठिसूळ स्लेट दगड आहेत. पूर्व किनाऱ्यावर ग्रेनाइट आढळतो. एके ठिकाणीं तर डायोरिट व डोलोमाइट हेहि दगड सांपडतात. हें सरोवर समुद्रसपाटीपेक्षां १२५ फू. वर आहे. जास्तींत जास्त खोली ३१८ ते ४०८ फूट इतकी आहे. पूर्वेकडून व्होड्का, अॅन्डोमा, व्हिटेग्रा, या नद्या येऊन यास मिळतात. ओनेगा कालवा (४५ मै. लांब ) १८१८–५१ त दक्षिण किनाऱ्याच्या बाजूनें काढला आहे. हा स्व्हर व व्हिटेग्रा या दोन नद्या जोडतो. अर्ध्या मे पासून ते अर्ध्या डिसेंबरपर्यंत यांत बर्फ नसतें. मार्चच्या प्रारंभीं पृष्ठभागाची सपाटी वरीच खालीं असते.ती जूनमध्यें २ फू. चढते. या सरोवराच्या भोंवती तुरळक वस्ती आहे. हे लोक इमारतीचें लाकूड, मासे व खनिज पदार्थांचा व्यापार इ. धंदे करतात.

**ओन्गोले**, पे ट वि भा ग —मद्रास इलाख्यांतील गन्तूर जिल्ह्याचा एक पोटविभाग. ह्यांत ओन्गोले व बापूटला तालुक्यांचा समवेश होतो.

ता लु का.—मद्रासमधील गन्तूर जिल्ह्याचा एक तालुका. क्षेत्रफळ ७९२ चौ. मै. बहुतेक जमीन सपाट असून कांहीं ठिकाणीं टेंकड्या आहेत. चिमाकुर्ति हें सर्वांत उंच शिखर असून त्याची समुद्रसपाटीपासून उंची २०७९ फूट आहे. मुख्य नद्या–गन्डलकम्मा,मुडिगंडी, मुसी व तिची उपनदी चिलकलेरु व पलेरू या आहेत. लो. सं (१९११ ) २४६२७३. मोठीं गांवें ओन्गोले, कोट्टपटम, अदान्कि हीं असून खेडीं १६१ आहेत. जमीन चिकण व काळी आहे. पाऊस पाणी चांगलें पडलें तर येथें पीक फार उत्तम येतें. मुख्य पीक सोलम हें आहे.

गां व—मद्रास इलाख्यांतील गन्तूर जिल्ह्यांत ओन्गोले पोटविभागाचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. मद्रासहून १८१ मैल.लो. सं.( १९११) ११२८६. म्यु. स्थापना १८७६. येथें औद्योगिक शिक्षणसंस्था आहेत. येथें शिक्षकांकरितां ट्रेनिंग कॉलेज आहे. येथून, कडधान्यें, तूप व चामडें मद्रास व इतर ठिकाणीं पाठविलें जातें.

**ओपोर्टो**—हें पोर्तुगालमध्यें दुसऱ्या प्रतीचें शहर आहे, व ओपोर्टो जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. हें शहर दौरो नदीच्या दोन्ही कांठीं वसलेलें आहे. येथील लोकसंख्या सन १९०० मध्यें १६७९५५ होती. या ठिकाणीं आगगाडीचे तीन मुख्य रस्ते मिळतात. पैकीं एक लिस्बनहून येणारा व दुसरे दोन सरहद्दीकडून येणारे आहेत. येथें लोकवस्ती फार दाट आहे व येथील हवा रोगट आहे. अतिशय गडबडीच्या रस्त्यावर असलेले रोगी व पंगु भिकारी यांपासून रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्यास फार त्रास होतो. ओपोर्टोमध्यें रहाणारे बहुतेक लोक शरीरानें बळकट व सुंदर आहेत. येथील लोक अतिशय दरिद्री आहेत.

ओपोर्टो जिल्ह्यांच्या ५,९७,९३५ रहिवाशांपैकीं ४,२२,३२० निरक्षर होते असें १९०० च्या खानेसुमारीवरून समजतें. हा दोष काढण्याकरितां बरेच उपाय करण्यांत आले. प्राथमिक शाळांशिवाय येथें शिक्षकांकरितां दोन शाळा आहेत. शिवाय वैद्यकशाळा, व्यापारशाळा, आरमारशाळा, वगैरे अनेक शिक्षणविषयक संस्था आहेत. ओपोर्टो हें नकशीच्या व सोन्याच्या मुलाम्याच्या दागिन्यांकरितां प्रसिद्ध असून येथें जवाहिरांचीं दुकानें आहेत ओपोर्टो हें पोर्ट दारूच्या

निर्गतीकरितां प्रसिद्ध आहे. हा व्यापार १६७८ मध्यें सुरू झाला. परंतु पुष्कळ वर्षेपावेतों ६०० पिपांपेक्षां जास्त दारू दरवर्षी बाहेर जात नव्हती. १७०३ मध्यें ब्रिटिश सरकारशीं झालेल्या तहान्वयें ते पोर्तुगीज दारू कांहीं सवलतीनें येऊं देऊं लागले. व तेव्हांपासून हा व्यापार वाढला. एक तृतीयांश लोकसंख्या कापूस, लोंकर, कातडीं, रेशीम यांचा पक्का माल तयार करण्यांत गुंतलेली असते. ओपोर्टोंचे हातमोजे व टोप्या पोर्तुगालमधील लोकांस फार आवडतात. सफर करणाऱ्या प्रवाशांचें दळणवळण येथें फार आहे. ओपोर्टोंहून दारू, कापसाचा पक्का माल, लांकूड, दगड, बूच, मीठ वगैरे माल बाहेर जातो.

ओपोर्टो शहर फार जुनें आहे. रोमन स्वारीच्या वेळीं हें दौरो नदीच्या फक्त दक्षिण किनाऱ्यावरच वसलेलें होतें. इ. स. ५४० च्या सुमारास हें व्हिसिगॉथ लोकांच्या ताब्यांत होतें. परंतु पुढें इ. स. ७१६ मध्यें मूर लोकांच्या ताब्यांत गेलें. इ. स. ९९७ मध्यें हें शहर ख्रिश्चन लोकांनीं घेतलें. पुन्हां मूर लोकांनीं घेतलें. परंतु इ. स. १०९२ मध्यें तें ख्रिश्चन लोकांच्या कायमचें ताब्यांत आलें. ब्रिटिश इतिहासांत हें शहर प्रसिद्ध आहे. इ. स. १८३२-३३ मध्यें या शहराला मिग्युलाईट्स लोकांनीं एक पक्का वेढा दिला होता. परंतु त्या वेळीं या शहराचें मोठ्या शौर्यानें रक्षण करण्यांत आलें.

**ओफीर**—प्राचीन काळीं या प्रदेशाची सोन्याबद्दल फार प्रसिद्धि होती. 'किंग्स' या ग्रंथामध्यें सॉलोमनच्या फिनिशियन नावाड्यांनीं सॉलोमनसाठीं पुष्कळ सोनें आणिलें असें म्हटलें आहे. अशाच प्रकारचे उल्लेख या ग्रंथांत पुष्कळ जागीं आढळतात. पण हा प्रदेश कोणता याबद्दल मात्र अद्यापिहि वादविवाद व तर्क सुरू आहेत.

हा प्रदेश कोणता असावा हें ठरविण्याचें एकच साधन उपलब्ध आहे. 'जेनसिस' या ग्रंथांत शेबा आणि हविलह या शहरांबरोबरच ओफीर याचा उल्लेख आला आहे. व त्याच ठिकाणीं 'हविह' ओफीर या प्रदेशाकडे जाणारीं जहाजें तांबड्या समुद्राच्या मुखाशीं असलेल्या एझियन गोबेर या बंदराहून निघत असत असेंहि म्हटलें आहे. अर्थातच या उल्लेखावरून ओफीर हा देश सुएझच्या दक्षिणेकडे अगर पूर्वेकडे असावा असें अनुमान निघतें.

पूर्व आफ्रिकेंतील मॅशोनालँड या मुलुखांतील झिंबाब्वे या ठिकाणीं जे अवशेष सांपडले आहेत त्यांवरून ओफीर प्रदेश तो हाच असावा असें थिओडार, बेंट इत्यादि संशोधकांचें म्हणणें आहे. पण अगदीं अलीकडे मॅकइव्हर वगैरे संशोधकांनीं जे शोध लावले आहेत त्यांवरून हा बेटप्रभृतींचा तर्क खरा नाहीं असें दिसून आलें आहे. कांहीं संशोधकांनीं ओफीर हा प्रदेश पूर्व दिशेच्या टोंकाला असावा असें म्हटलें आहे, तर कांहींनीं सिंधुनदीच्या मुखाजवळील अभीर म्हणनेच ओफीर असें ठरविलें आहे. ओफीर हा प्रदेश अराबस्तानांत असावा असेंहि कांहींचें मत आहे व तेंच सर्वांत अधिक ग्राह्य वाटतें.

**ओब्रायन वुइल्यम स्मिथ ( १८०३-१८६४ ).**—हा प्रख्यात देशभक्त व मुत्सद्दी सर एडवर्ड ओब्रायन याचा मुलगा होता. याच्या घराण्याचा मूळपुरुष आयर्लंडचा राजा बोरोइम्हे हा होता. ओब्रायन हा क्लेअरपरगण्यामध्यें १७ आक्टोबर १८०३ रोजीं जन्मला. त्याचें शिक्षण हॅरो व कॅंब्रिज येथें झालें. १८२८ मध्यें तो पार्लमेंटमध्यें एनिस परगण्यातर्फे निवडून आला. आणि १८३५ पासून १८४८ पर्यंत लिमरिक परगण्यातर्फे निवडून आला. ओकोनेलनें चालू केलेली ( कॅथोलिक लोकांच्या उद्धारार्थ ) चळवळ ही त्याला पसंत होती. तरी पण इतर पुष्कळ बाबतींत त्याचें व ओकोनेलचें पटत नव्हतें. सन १८४३ सालच्या हत्यारांच्या कायद्याविरुद्ध ( आयरिश आर्म्स ॲक्टविरुद्ध ) चळवळ करण्याकरितां तो ओकोनेलच्या 'रिपील ॲसोसिएशन'चा सभासद झाला. ओकोनेलच्या खालोखाल ओब्रायन हाच लोकप्रिय पुढारी होता. व या दोघांच्याहि परिश्रमानें ही चळवळ हां हां म्हणतां जिकडे तिकडे पसरली. पण पुढें ओकोनेलच्या वर्तनामुळें हा व याचे इतर स्नेही फुटून त्यांनीं १८४६ सालीं एक तरुणपक्ष स्थापन केला (ओकोनेल पक्ष). पुढें दुष्काळादि आपत्तींनीं आयर्लंडांतील लोक गांजले व त्यामुळें आयर्लंडमध्यें बंडाळी सुरू झाली. ओब्रायन यानें पॅरिस येथें जाऊन फ्रेंचांची कुमक मिळविण्याची खटपट केली पण त्यांत यश आलें नाहीं. १८४८ सालीं राजद्रोहाबद्दल त्याच्यावर खटला करण्यांत आला पण ज्यूरीमध्यें मतभेद होऊन तो सुटला. पुढें पार्लमेंटनें दडपशाहीचे नवीन कायदे सुरू केल्यामुळें ओब्रायन, डिलन वगैरे पुढाऱ्यांनीं लोकांना बंड करण्याचा उपदेश केला. स्वतः ओब्रायननें त्या बाबतींत पुढाकार घेऊन माणसें व हत्यारें जमविण्यास सुरुवात केली; व बॅलिंगारीच्या शेतकरी वर्गाच्या सहाय्यानें बंडाळी उभारण्याचा निश्चय केला. प्रथम प्रथम त्याला पुष्कळ लोक मिळाले; पण चळवळीमध्यें जितकी संघटना पाहिजे तितकी नसल्यामुळें व जरूर तितका पैसा न मिळाल्यामुळें लोक फुटूं लागले व आपल्यावर शत्रू चाल करून येत आहे एवढ्या नुसत्या बातमीनेंच बरेच लोक पळून जाऊं लागले. अशा रीतीनें एकदोन दिवसांतच हें बंड मोडलें. ओब्रायननें पळून जाऊन आपला बचाव केला. पुढें तो पकडला जाऊन त्याच्यावर खटला करण्यांत आला व त्याला फांशीची शिक्षा फर्मावण्यांत आली. पण पुढें ती रद्द होऊन त्याला काळ्या पाण्याची शिक्षा देण्यांत आली. 'आयर्लंडला परत जाऊन मी पुनःकांहींहि करणार नाहीं' अशी त्यानें शपथ घेतल्यामुळें १८५४ मध्यें त्याची सुटका झाली व १८५६मध्यें पुष्कळांबरोबर यालाहि पूर्ण माफी मिळाली व तो आयर्लंडला परत आला. १८५६ मध्यें त्यानें 'राज्यकारभाराचीं तत्त्वें अथवा हद्दपारींतील विचार' ( प्रिन्सिपल्स ऑफ गव्हर्न

मेंट ऑर मेडिटेशन्स इन एक्झाइल ) हा ग्रंथ लिहिला. आयर्लंडांत आल्यानंतर त्यानें कांहीं विशेष कामगिरी केली नाहीं. पण एक वर्षपर्यंत अमेरिकेमध्यें हिंडून त्यानें आयर्लंड विषयीं खरी माहिती लोकांनां समजावून दिली. तो १८ जून १८६४ सालीं बँगार येथें मरण पावला. त्याला पांच मुलगे व दोन मुली अशीं सात अपत्यें होतीं.

ओब्रायनच्या अंगीं जरी नांवाजण्यासारखें वक्तृत्व नव्हतें तरी पण आयर्लंडांतील इंग्रजी अधिकाऱ्यांविरुद्ध त्यानें आपली चळवळ सुरू केल्यामुळें तो लोकप्रिय पुढारी बनला. तो स्वभावानें मनमिळाऊ व उदार असल्याकारणानें लोकांचें त्याच्यावर फार प्रेम असे. तो स्वार्थत्यागी देशभक्त होता. आजन्म देशसेवेमध्यें त्यानें आपलें आयुष्य खर्ची घातलें. लेकी यानें ओब्रायनविषयीं आपलें फार चांगलें मत दिलें आहे. तो म्हणतो कीं, ओब्रायनच्या हातून जरी एक दोन चुका झाल्या तरी त्याच परिस्थितींत दुसरा कोणी असतां तरी त्यानें तेंच केलें असतें. तो हाडाचा स्वार्थत्यागी होता. त्याला देशभक्तीची कल्पना करणाऱ्या लोकांची व तसेंच स्वतःच्या पोटाची खळगी भरण्याकरतां देशाचें नुकसान करण्यास तयार असलेल्या लोकांची फार चीड असे.

**ॐ (ओम्)**—या अक्षराचा उद्भव कसा झाला असावा याबद्दल निश्चित अशी कांहींच उपपत्ति लागत नाहीं. "ॐ" या अक्षराचा उद्भव कसा झाला असावा ह्याबद्दल मॅक्समुलर ह्या प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञाच्या मतें "अव्" ह्या सार्वनामिक मूलरूपापासून हें अक्षर उत्पन्न होऊन "अवम्" ह्याचें संप्रसारण क्रियेनें "अउम्" असें रूप होऊन त्याच्यापासून सामान्य ध्वनींच्या संधिनियमांप्रमाणें "ॐ" अक्षर बनलें.

परंतु बोथलिंग व राथ ह्या दोघां शास्त्रज्ञांनीं शास्त्रीय पुराव्याच्या अभावीं वरील उपपत्ति त्याज्य ठरविली. ह्यांच्या मतें "ॐ" हा वर्ण "ओ" ह्या ध्वनीचें सानुनासिक असें उद्गारस्वरूप असून "आ" ह्या ध्वनीशींहि त्याचा संबंध आहे. ह्या उपपत्तीस वैदिक ग्रंथांतहि असा पुरावा सांपडतो कीं "ॐ श्रावय" ह्या वैदिक वाक्याबद्दल सूत्रग्रंथांत वारंवार "ओश्रावय' व "आश्रावय" हीं वाक्यें वापरण्यांत येतात, आणि उच्चार करतांना ध्वनींनां 'अनुनासिकत्व प्राप्त होणें ही वैदिक भाषेची सर्वमान्य रुढी आहे. प्रणव या ॐ कारवाचक संज्ञेपासूनहि कदाचित ह्या वर्णाच्या उत्पत्तीवर प्रकाश पडण्याचा संभव आहे. कारण श्रौतांत "पुरोनुवाक्या" मंत्र म्हणत असतां शेवटच्या अक्षराचा दीर्घ सानुनासिक उच्चार करणें व त्यांत "ओ" हा वर्ण मिळविणें असा प्रणव ह्या संज्ञेचा मूलार्थ आहे आणि ह्यावरूनच प्रणव संज्ञेनें दिग्दर्शित केलेला "ॐ" वर्ण उत्पन्न झाला असावा. व पाणिनीकृत अष्टाध्यायींतील "ओमाङोश्च" (पाणिनी ६. १, ९ ५) सूत्रामध्येंहि असाच नियम घालून दिला आहे कीं "ॐ" पूर्वीचा ऱ्हस्व किंवा दीर्घ अ यांत "अउम्" असा बदल न होतां ॐ कारच कायम राहून पूर्वीचा 'अ' नाहींसा होतो.

ॐ हा उद्गारवाचक वर्ण फार प्राचीन नाहीं. हा उत्तरकालीन वैदिक वाङ्मयांतच दिसूं लागतो. ऋग्वेद व अथर्ववेद या दोन्ही वेदांत हा आढळत नसून प्राचीन यज्ञप्रकरणीं व मंत्रतंत्र वगैरे लौकिक गोष्टींत हा प्रणव प्रचारांत असल्याचें दिसत नाहीं. तैत्तिरीय संहितेंतील कोणत्याहि मंत्रांत ॐ आला नसून फक्त एकदांच "प्रणव" या संज्ञेचा उल्लेख आला आहे; व त्या ठिकाणचा अर्थ उपरिनिर्दिष्ट पाणिनी सूत्राप्रमाणें आहे. वाजसनेयी संहितेमध्येंहि हा (२–१३) "ॐ प्रतिष्ठ" ह्या वाक्यांत आढळतो. त्याचप्रमाणें मैत्रायणी संहितेंत (४. १,११) "ॐ श्रावय" या वाक्यांत व दुसऱ्या ठिकाणीं ॐ कार आला आहे. परंतु ॐ वर्णाचा वाक्यांत प्रतिज्ञापूर्वक विधान म्हणून उपयोग प्रथम ब्राह्मण ग्रंथांतच दिसून येतो. यज्ञप्रसंगीं होकारार्थी ॐ चा उपयोग शतपथ ब्राह्मणामध्यें सामान्यतः पुष्कळ वेळां करण्यांत आला आहे.

परंतु ह्यापेक्षां 'सर्व वेद व सर्व लोक ह्या सर्वांचा दर्शक' ह्या गूढार्थानें ॐ काराचा करण्यांत आलेला उपयोग जास्त महत्त्वाचा आहे. ह्या दृष्टीनें पाहतां प्रथम ऐतरेय ब्राह्मणामध्यें असें म्हटलेलें आढळतें कीं ॐ हा स्वर्गलोक व सूर्यलोक असून अ उ म् अशीं तीन अक्षरें तदंतर्गत आहेत. व हीं तीन अक्षरें 'भूःभुवःस्वः' या ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांपासून उत्पन्न झालेल्या तीन व्याहृतीपासून निघालीं आहेत. अशाच प्रकारचे गूढविचार उपनिषद् ग्रंथांत जास्त प्रमाणांत परिणत झाले आहेत. परंतु गोपथ ब्राह्मणापूर्वीच्या दुसऱ्या कोणत्याहि ब्राह्मणग्रंथांत अशा प्रकारचे प्रणवसंबंधीं गूढविचार आढळून येत नाहींत हें विशेष आहे.

उपनिषदांपैकीं तैत्तिरीय उपनिषद (१.८) यामध्यें 'ॐ हें ब्रह्म असून सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति व लय ब्रह्माच्या आश्रयानेंच चालू असतात असें म्हटलें आहे. कठोपनिषदांत म्हटलें आहे कीः—

" सर्वे वेदा यत्पदमामनंति तपांसि सर्वाणि च यद्वदंति।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्॥

" सर्व वेद ॐ पदाचीच घोषणा करितात व ह्या ॐ पदाकरितांच तपश्चर्या केली जाते " यापेक्षां गोपथ ब्राह्मणांतील प्रणवोपनिषदांत ॐकाराच्या या गूढार्थांची पूर्ण परिणति झालेली आहे. वर ऐतरेयब्राह्मणांत वर्णन केल्याप्रमाणें ह्या गोपथब्राह्मणांतहि असेंच म्हटलें आहे कीं ॐ मधील 'व्' = (ओ) कारापासून आप, चंद्र, अथर्ववेद, व अनुष्टुभ् छंद उत्पन्न झाले. त्याचप्रमाणें 'म्' वर्णापासून इतिहासपुराणें व इतर सारस्वत, नाना प्रकारचीं वाद्यें, गीत व नृत्य, बृहती छंद निर्माण झाले. गोपथ ब्राह्मणांत ॐकारा

बद्दल दुसरी एक आख्यायिका आली आहे. तीमध्यें म्हटलें आहे कीं, एकदां असुरांनीं देवांचा पराभव केला त्यावेळीं देवांनीं ॐकार आपला अग्रणी करून असुरांचा विध्वंस केला, यासाठीं कोणताहि ऋक्, यजु,किंवा साम मंत्र म्हणतांना पूर्वी प्रणवोच्चार केला पाहिजे असा नियम केला. ह्याच ठिकाणीं असेंहि म्हटलें आहे कीं, निरनिराळ्या वेदांत प्रणवोच्चार निरनिराळ्या प्रकारें करावयाचा व या प्रणवाच्या चार मात्रा ब्रह्मा, विष्णु, ईशान व शर्व ह्या चार परमेश्वर विभूतींच्या निदर्शक होत.

उत्तरकालीन अथर्ववेदांतर्गत उपनिषदांत ह्या प्रणवाचें महत्त्व इतकें वर्णिलें आहे कीं, "एकवेळ वेदाध्ययन देखील प्रणवध्यानापुढें तुच्छ आहे"असा एकंदर वर्णनाचा रोख दिसतो तरी देखील प्रणवध्यान हें एक कनिष्ठ प्रतीचें साधन आहे हें जागजागीं सांगितलें आहे.

उपनिषदांतील प्रणवाच्या गूढार्थपर विकासाबरोबरच श्रौतसूत्रांमध्यें प्रणवाच्या यज्ञसंबंधीं उपयोगाचें विवेचन आलें आहे. ऋग्वेद प्रातिशाख्यामध्यें ॐकार होकारार्थी योजलेला आढळतो व वाजसनेयी संहितेमध्यें ॐ या वर्णाचा अर्थ भाषेंतील "अथ" शब्दासारखा असल्याबद्दल म्हटलें आहे.

धर्मसूत्रांमध्यें ॐकाराचा उपयोग निराळ्या तऱ्हेनें केलेला दिसतो. प्राचीन अशा बौधायन धर्मसूत्रांत म्हटलें आहे कीं प्रत्येक त्रैवर्णिकानें दररोज प्रणवोच्चारपूर्वक सव्याहृति असें वेदाध्ययन करावें, व ह्यालाच "ब्रह्मयज्ञ" असें म्हणतात. त्याचप्रमाणें वानप्रस्थाश्रमीयास वेदपठणाचा अधिकार सांगितला आहेच, परंतु त्याबरोबर वेदवृक्षाचें मूळ असा जो प्रणव त्याचें केवळ ध्यान केलें असतांहि त्याला ब्रह्मप्राप्ति होईल असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें वसिष्ठधर्मशास्त्र, मनुस्मृति यांमध्यें प्रायश्चित्तप्रकरणांत प्रणवोच्चारास जास्त महत्त्व दिलें आहे. दररोज प्रणवोच्चारपूर्वक व सव्याहृति सोळा प्राणायाम महिनाभर केले असतां ब्रह्महत्येचा दोषहि निघून जातो, इतकें प्रणवोच्चारपूर्वक होणाऱ्या प्राणायामास महत्त्व आलें आहे. त्याचप्रमाणें प्राचीन अभिचार इत्यादिकांचें भांडार असें जें कौशिक सूत्र त्यामध्यें आलेल्या उल्लेखांवरून आभिचारांत देखील प्रणवास किती महत्त्व आलें होतें हें सिद्ध होतें.

भारतीय तत्त्वज्ञानात्मक वाङ्मयांत, ब्रह्मप्राप्ति होण्याकरितां ध्यान करण्यास ॐ हें एक साधन सांगितलें आहे. भगवद्गीतेंत ॐ म्हणजे प्रत्यक्ष श्रीकृष्णस्वरूप (ब्रह्मच) होय असें म्हटलें असून, "ॐ तत् सत्" हा ब्रह्माचाच त्रिविध निर्देश होय " असें म्हटलें आहे. बादरायण सूत्रांत ( ४.३,१४ ) प्रणवध्यानाची योग्यता परब्रह्म प्राप्ति करून देणारी नसून अवांतर फल देणारी आहे असें म्हटलें आहे, परंतु हें सूत्रकाराचें मत प्रश्नोपनिषदाविरुद्ध आहे, कारण प्रश्नोपनिषदांत तर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं " प्रणवाच्या तिन्ही मात्रांचें ध्यान करणारा मनुष्य देवयान मार्गानें जाऊन ब्रह्मैक्य पावतो. " परंतु प्रणवविषयींचें हें मत तत्त्वज्ञानांत रूढ झाल्याचें दिसत नाहीं.

पातंजल योगसूत्रांत मात्र ( १.२७,२९ ) "तस्य वाचकः प्रणवः " इत्यादि सूत्रांमध्यें प्रणव हा ईश्वराचा वाचक वर्ण होय असें स्पष्ट म्हटलें आहे, व ह्या प्रवणाची पुनः पुनः आवृत्ति करावी व प्रणवाच्या अर्थाचें सतत अनुसंधान करावें, कारण त्या योगानें यथार्थ तत्त्वज्ञान होतें असें स्पष्ट सांगितलें आहे. ह्यानंतर एकंदर योगदर्शनांत प्रणवाचें महत्त्व फारच वाढलें आहे.

प्रवणाच्या रोजच्या धार्मिक व्यवहारांतील उपयोगाचा विचार करतां असें दिसून येतें कीं एकंदर सर्व भारतीय धार्मिक गोष्टींत वैदिक किंवा लौकिक मंत्रांबरोबर प्रणवोच्चाराचा अत्यंत महत्त्वपूर्वक उपयोग केला जातो. हिंदूंच्या धार्मिक कृत्यांतील अत्यंत महत्त्वाचा जो गायत्रीमंत्र त्याजबरोबर प्रणव व व्याहृतींचा उच्चार करावा लागतो, त्याचप्रमाणें विविध तांत्रिक मंत्रांतहि प्रणवोच्चार आवश्यक होऊन बसला आहे. प्रणवाच्या ह्या लोकप्रियतेचें कारण थोडेंबहुत प्रणवांतर्गत अ, उ, व म ह्या तीन वर्णांशीं ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या देवतात्रयाचें साधर्म्य दाखविलें जातें ह्या एका गोष्टीवर अवलंबून आहे. अशा रीतीनें प्रणवाची लोकप्रियता एकंदर धर्मकर्त्यांस दिसून येते तरी देखील महाशिवरात्रीसारख्या उत्सवप्रसंगीं ज्यावेळीं कनिष्ठ जातीचे लोकहि समानदर्शनानें धार्मिक कृत्यांत भाग घेतात, व ज्यावेळीं स्त्रियांना देखील मंत्रोच्चार करण्याचा अधिकार आहे, अशा वेळीं प्रणवोच्चाराचा मात्र त्यांच्या बाबतींत ॐकाराच्या अत्यंत पावित्र्यामुळें पूर्ण निषेध केला आहे. इ. स. ६ व्या शतकापासून महत्त्वाच्या हस्तलिखित ग्रंथांत व धर्मग्रंथांत मंगलप्राप्तीकरितां प्रणवपूर्वक ग्रंथारंभ केलेला आढळतो.

जैनधर्म व बौद्धधर्म ह्या दोन्हींच्या दृष्टीनें ॐ ह्याचा उपयोग करणें म्हणजे ब्रह्मकारणवाद स्वीकारणेंच होय असें प्रथम प्रथम मानण्यांत येत असे. परंतु पुढेंपुढें प्रणवाच्या लोकप्रियतेचा इतका जोरदार परिणाम झाला कीं अवलोकितेश्वर नांवाच्या बौद्ध देवतेच्या सुप्रसिद्ध " ॐ मणिपद्मे हुम् " या मंत्रांत प्रणवाचा अत्यवश्य रीतीनें अंतर्भाव करण्यांत आला. त्याचप्रमाणें ओरिसामधील सोळाव्या शतकांतील गूढार्थवादी बौद्धधर्मांत शून्यापासून प्रणव उत्पन्न झाल्याचें सांगून त्यापासून पुढें विश्वोत्पत्ति झाल्याचें वर्णन आहे. ह्याठिकाणीं प्रणवाचें शून्यतत्त्वाशीं सादृश्य दाखविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

पुराणग्रंथांमध्यें ॐकाराचा भिन्नभिन्न सांप्रदायिकांनीं आपापल्या विशिष्ट तऱ्हेनें विशिष्ट देवतापर उपयोग केलेला आहे. उदाहरणार्थ लिंगपुराणांत शिवलिंगाचें महत्त्व ब्रह्मा, विष्णूपेक्षां जास्त वर्णिलेलें असून त्याजवर प्रणवाक्षर असल्याचें वर्णिलें आहे. ह्याच्या विरुद्ध दुसऱ्या पुराणांतून

त्र्यक्षरात्मक प्रणव विष्णु, श्री व भक्त ह्या तिहींचा द्योतक असल्याबद्दल वर्णन आहे, त्याचप्रमाणें प्रणव म्हणजेच तीन वेद, तीन लोक, तीन अग्नी, तीन विष्णूचीं पाउलें असून प्रणवध्यानापासून पूर्णब्रह्मप्राप्ति होते असें सांगितलें आहे

**ओमान.**—अरबस्तानच्या आग्नेय कोंपऱ्यास हें एक स्वतंत्र राज्य आहे. हा भाग डोंगराळ आहे. समुद्रकिनाऱ्याशीं समांतर अशा पर्वतांच्या ओळीमुळें बंदरें व आंतील भाग यांचा संबंध तुटला आहे. समुद्रकिनारा सुमारें हजार मैल लांबीचा आहे. क्षेत्रफळ ८२००० चौ. मै. व लो. सं. सुमारें पांच लाख आहे. बहुतेक वस्ती अरबांची आहे. मस्कत हें राजधानीचें शहर आहे. सन १५०८ पासून १७ व्या शतकाच्या मध्यापर्यंत मस्कत पोर्तुगीजांच्या ताब्यांत होतें. पुढें बरींच स्थित्यंतरें होऊन अठराव्या शतकांत अहमद बिन सय्यद नांवाच्या एका येमेनाईट मनुष्यानें तें हस्तगत केलें व तेथला तो इमाम झाला (१६४१). हल्लींचा सुलतान याचाच वंशज आहे. तो मस्कत येथें आपल्या राजवाड्यांत राहतो. १९१३ पासून ओमानचा अंतर्भाग अरब जातींनीं निवडलेल्या एका इमामच्या हातीं असून सुलतानाची सत्ता फक्त किनाऱ्यावरील प्रदेशावर आहे असें म्हटल्यास चालेल. तथापि जकात व बंदरें यांवर त्याचा अधिकार चालतो. अंतर्भागांत नेहमी बंडाळी असते.

गेल्या शतकाच्या आरंभीं ओमानच्या इमामाची सत्ता अरबस्तानचा बहुतेक भाग, इराणी आखातांतील बेटें व इराण आणि आफ्रिका यांच्या किनाऱ्यावरील कांहीं प्रदेश एवढ्या विस्तृत मुलुखावर होती. १८५६ मध्यें सुलतान सय्यद मरण पावल्यावर त्याच्या एका मुलानें झांझिबारांत व दुसऱ्यानें मस्कतांत सुलतान म्हणून आपल्या नांवाची द्वाही फिरविली. हिंदुस्थानचा व्हाईसराय लॉर्ड कॅनिंग यानें मध्यस्थी करून दोन निरनिराळीं राज्यें केलीं. या पुढील तंट्यामुळें आशियांतील ओमानचें राज्य बरेंच संपुष्टांत आलें. हल्लीं बसिदु बंदर ब्रिटिशांकडे आहे. हिंदुस्थानसरकार व ओमान यांचा निकट संबंध पुष्कळ वर्षांपासून असून एक ब्रिटिश कॉन्सल व पोलिटिकल एजंट मस्कत येथें राहतो.

सुलतानचें उत्पन्न सुमारें सात लक्ष रुपयांचें आहे. बहुतेक व्यापार जलमार्गानें चालतो. खजूर, फळें, मासे, कापड, कातडीं हीं बाहेर जातात व तांदूळ, कॉफी, साखर, रेशीम, सूत, कापड, गहूं व इतर धान्यें देशांत येतात. हा व्यापार बहुतेक हिंदु लोकांच्या हातीं असतो. हिंदुस्थानांतून २४०४८१२ रुपये किंमतीचा माल जातो. मुंबईहून ओमानला दर आठवड्यास टपाल जातें व इंडो—यूरोपियन तारखात्याशीं मस्कतचाहि संबंध जोडला आहे. मराया थेरेसा डॉलर हें येथील सामान्य चलनी नाणें आहे.

[ संदर्भग्रंथः—ओमान—बेहेरीनच्या ब्रिटिश व्यापाराची स्थिति दाखविणारा एक अहवाल एच्. डब्ल्यू मॅक्लीन यानें प्रसिद्ध केला आहे (लंडन १९०३). दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या कान्सुलर रिपोर्टांवरून मस्कतच्या व्यापाराची माहिती होईल; प्रादेशिक व राजकीय माहिती ब्रिटानिका, स्टेट्समन्स ईयर बुक वगैरेंत सांपडेल. ]

**ओम्स्क.**—एक रशिअन शहर. हें आकमोलिंस्क प्रांताचें राजधानीचें शहर आहे. १९०० सालीं याची लोकसंख्या ५३०५० होती. सायबेरियांतील कोसॅक्स लोकांवर येथूनच राज्य करण्यांत येत असे. या ठिकाणीं बिशपहि राहतो. हें इर्टिश नदीच्या दक्षिणतीरावर वसलें आहे. येथील हवा रुक्ष व साधारण समशीतोष्ण आहे. वार्षिक पर्जन्यवृष्टि १२.४ इं. इतकी आहे. या ठिकाणीं एक शिक्षणसंस्था आहे. या संस्थेनें पुस्तकसंग्रहालयें स्थापिलीं असून व्याख्यानद्वारें ती लोकांनां शिक्षण देते. त्याचप्रमाणें, नाट्य, औषध, संगीत इत्यादि शास्त्रविषयक संस्थाहि आहेत.

**ओयामा**—एक जपानी सेनाध्यक्ष. याचा जन्म सत्सुमा येथें १८४२ त झाला. १८९४ सालच्या चीन—जपान युद्धांत यानें मोठें शौर्य गाजविलें होतें. त्याकरितां त्याला मार्शल ही पदवी मिळाली होती. १९०४–०५ च्या रूसो-जपानी युद्धांत याला मांचुरियांतील जपानी सैन्याचा अधिपति म्हणून नेमलें होतें. यानें रशियन सेनापति कुरोपाट्किन् याला लिआओ–यंग सोडून मुकडेनला पळून जाण्यास भाग पडलें व मुकडेन येथेंहि त्याचा मोठा पराभव केला. नोगीला पोर्ट आर्थर घेण्याच्या वेळीं यानें आपल्या सैन्याची मदत पाठविली होती. १९०७ मध्यें जपानी बादशहानें ओयामाला राजा (प्रिन्स) चा बहुमान दिला. आधल्या वर्षी त्याला 'ब्रिटिश ऑर्डर ऑफ मेरिट' चा किताब मिळाला होता.

**ओरई,** तहशीलः—संयुक्त प्रान्तांतील जालौन जिल्ह्याची मुख्य तहशील. क्षेत्रफळ ३०७ चौ. मै. लो. सं. (१९११)५८४६३. खेडीं १०५ व १ शहर. ओरई बेटवा नदीच्या उत्तरेस आहे. येथील जमीन फार सुपीक आहे. १८९३ सालीं पर्जन्यवृष्टीमुळें फार नुकसानी झाली. बेटवा कालव्याची हमीरपूर शाखा ह्या तहशिलींत असून तींपासून जमीनीस पाणी मिळतें.

गांवः—संयुक्त प्रान्तांतील ओरई तहसिलीचें व जालौन जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. कानपूर सागरच्या रस्त्यावर हें आहे. लो. सं. (१९११) ९१५१. सन १८३९ सालीं हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण करण्यांत आलें. 'बुंदेलखंड एनकंबर्ड इस्टेट्स' ॲक्टाप्रमाणें येथें स्पेशल जज्जाची नेमणूक झाली आहे. गांवाच्या दक्षिणेस एक मोठा तलाव आहे. म्यु. स्थापना १८७१. व्यापार कांहीं नाहीं.

**ओरँग ऊटंग** (ओटँग) (रानटी मनुष्य)—ओरँग ऊटंग हा प्राणी शेंपूट नसलेल्या अगर मनुष्यवत् वानरजातींतील एक प्राणी असून हा मलाया, बोर्निओ, सुमात्रा इ. देशांतील अरण्यांत सांपडतो. याची उंची ४–५ फूट असून

शरीराचें हाड मनुष्यापेक्षां मोठें व ओबडधोबड असतें. याची मान आंखुड असते. पुढील पाय ( हात ) लांब असतात; नाक रुंद व कपाळ उंच असतें. नराच्या वरच्या ओठावर तुरळक मिशा व हनुवटीवर तांबूस रंगाची लांब दाढी असते. या प्राण्याचीं लहान पोरें थेट माणसासारखीं दिसतात. पण मोठीं झाल्यावर मात्र तीं फार कुरूप दिसतात. त्याच्या शरीरावर लांब व खरखरीत केंस असतात व त्यामुळें त्याला पावसापासुन आपलें रक्षण करून घेतां येतें.

झाडावर चढतांना हा आपल्या हाताचा उपयोग करतो, व त्याचे हात लांब असल्याकारणानें त्याला एका झाडावरून दुसऱ्या झाडावर फांदीच्या आश्रयानें लोंबकळून जातां येतें. याचे पाय हातांपेक्षां आंखूड व कमजोर असल्यानें याला काठीचा अगर दुसऱ्या कशाचा आश्रय घेतल्याशिवाय दोन पायांवर चालतां येत नाहीं. झाडाचीं कोंवळीं पानें, वनस्पती, कंदमुळें व फळें यांच्यावर मुख्यतः तो आपली उपजीविका करतो. लहान पक्षी अगर पक्ष्यांचीं अंडीं देखील हा खातो.

या प्राण्याला माणसाचा सहवास आवडत नाहीं म्हणून हा आपल्या कुटुंबासह अरण्यांत अलिप्त असा राहतो. मादी आपल्या पोरावाळांची फारच चांगली जोपासना करते. हा प्राणी झाडावर उन्हाळ्याचीं घरें करून रहातो. हा बलवान प्राणी असल्यानें सुसरीशिवाय याला दुसऱ्या कोणत्याहि प्राण्यापासून भय वाटत नाहीं. हा माणसाळला असतां माणसासारखीं पुष्कळ कामें करूं शकतो.

[ संदर्भग्रंथः—कोल्हटकर—प्राणिशास्त्र १९२३; वीटन-डिक्शनरी ऑफ नॅचरल हिस्टरी ].

**ओरकझई**—तिरहूतच्या खोऱ्यांतून व सामान पहाडाच्या उत्तरेकडील उतारांत राहणारी पठाण लोकांची एक जात.

ह्या जातीच्या पोटजाती खालीलप्रमाणें आहेतः—

| जात | लोकसंख्या | जात. | लोकसंख्या. |
|---|---|---|---|
| मसोझई | ४५०० | इस्माइलझई | २००० |
| लष्करझई | ६५०० | मिष्ति | ३००० |
| अलिझई | ५०० | मलखेल | ८०० |
| महमदखेल | ३०० | शेकान | ३००० |
| दोलनझई | २००० | अलिखेल | ३००० |

**ओरछा, संस्थान.**—बुंदेलखंड एजन्सी खालील मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान. क्षेत्रफळ २०८० चौ. मै. उत्तरेस व पश्चिमेस संयुक्त प्रान्ताचा झांशी जिल्हा; दक्षिणेस मध्यप्रांताचा सागर जिल्हा, बिजावर व पन्ना संस्थानें; पूर्वेस चरखारी व बिजावर संस्थानें आणि गरौली जहागीर. ह्या संस्थानांत औरंगाबादजवळील पाहारपूर परगण्याचा समावेश होतो. पूर्वी ओरछा हेंच राजधानीचें शहर होतें; पण १७८३ पासून टिकमगड हें राजधानीचें शहर करण्यांत आलें. बेटवा धसान दुआबामधील सपाट प्रदेशांत हें संस्थान आहे. बलदेवगड, लधौरा, जटार व विर्सागड येथें मोठे मोठे तलाव आहेत.

बराच भाग जंगलमय आहे. पण जंगल विरळ असल्यामुळें चांगली शिकार सांपडत नाहीं. माळव्यापेक्षां येथील हवा उष्ण आहे. उत्तर भागांतील हवा रोगट असून मलेरिया नेहमीं असतो. पावसाचें मान ४५ इंच. ओरछाचे संस्थानिक राजे हे बनारसच्या गहरवारचे वंशज असून जातीनें बुंदेले रजपूत आहेत. १३ व्या शतकांत कोणी सोहनपालानें येथें येऊन आपली सत्ता स्थापित केली. त्याचा पिता अर्जुनपाल याशीं त्याचें पटत नव्हतें म्हणून तो घरून निघाला असावा. तो गढकुरारच्या खंगार राण्याविरुद्ध लढला होता. सोहनपालानें खंगारांचा पराजय करून गडकुरार येथें आपलें राज्य स्थापिलें. त्यानें आपली मुलगी पवानीय अधिपती पोंवार यास दिली. एव्हांपासून पोंवार, बुन्देले व धन्देले हे एकमेकांशीं मिळून मिसळून वागूं लागले. पित्याच्या मरणानंतर सोहनपालास महोनी संस्थानाची गादी मिळाली. १२६९ ते १५०१ चे दरम्यान आठ राण्यांनीं राज्य केलें. त्यांपैकीं प्रत्येकानें राज्यविस्तार केला. १५०१ मध्यें रुद्रप्रताप गादीवर आला. हा मोठा धाडशी स्वभावाचा होता. त्यास बहलोल व शिकंदर लोदीशीं वैमनस्य करण्याचे बरेच प्रसंग आले होते व बाबरच्या स्वाऱ्यांच्या धामधुमीच्या कालांत त्यानें आपला राज्यविस्तार केला. तो १५३१ सालीं मृत्यु पावला व त्याच्या पश्चात त्याचा ज्येष्ठ पुत्र भारतीचंद हा गादीवर आरुढ झाला. शीरशाहनें ज्या वेळीं ( १५४५ ) कालींजरवर स्वारी केली तेव्हां भारतीचंदानें त्यास अडथळा केला. पण त्यांत त्यास यश आलें नाहीं १५५४ मध्यें त्याच्या मरणानंतर त्याचा कनिष्ठ बंधू मधुकरशाह हा गादीवर आला व येथपासून त्याच्या राज्यास उतरती कळा लागली. मोंगलांनीं ओरछा संस्थानावर पहिल्यानें १५७७ सालीं स्वारी केली. त्यावेळीं सादिकखान ह्यानें जोराचा हल्ला करून ओरछा घेतलें. ह्या चकमकींत मधुकराचा ज्येष्ठ पुत्र होरलदेव मारला गेला. १५९१ मध्यें बुंदेले राण्यानें ग्वाल्हेरजवळील कांहीं परगणे हस्तगत केले. पण नरवरजवळ मोंगल सैन्यानें त्याचा पराभव केला. तदनंतर मधुकर हा अरण्यांत पळून गेला व तिकडेच मरण पावला. त्याचा पुत्र रामसाह (१५९२-१६०४) हा शरण गेला. पण रामसाह हा दुर्बल असल्यामुळें त्याचे बंधु सिंहदेव, इंद्रजित व प्रताप ह्यांनीं त्यास फार त्रास दिला. ग्वाल्हेर संस्थानांत अन्त्रि येथें १६०२ मध्यें 'ऐनी अकबरी'चा प्रसिद्ध लेखक अबुल फजल ह्याचा वीरसिंहदेवानें सलीमच्या सांगण्यावरून खून केला. अकबरानें त्याला पकडण्याकरितां तात्काल सैन्य पाठविलें. पण जरी त्याच्या सैन्यानें ओरछा संस्थान काबीज केलें तरी वीरसिंहदेव हा पळून गेला. १६०५ मध्यें जहांगिर हा गादीवर आल्यानंतर त्यानें वीरसिंहदेव ह्यास ओरछाचा राजा नेमलें व

रामशहा ह्यास चन्देरी व बानपूरची जहागिरी दिली. ओरछाच्या सर्व राज्यांत वीरसिंहदेवाची फार प्रसिद्धि आहे. गादीवर आल्यानंतर ह्यानें बराच राज्यविस्तार केला व संपत्ति मिळविली. हा योद्धा असून ह्यानें मोठमोठ्या इमारती बांधविल्या. ओरछा व दतिया येथील भक्कम राजवाडे व चतुर्भुज देवालय ह्यानेंच बांधलें. ओरछा येथील त्याच्या छत्रीवरून ह्या राजाची कलाप्रियता दृग्गोचर होते. ह्याच्या नंतर झुंजहारसिंग गादीवर आला; पण हा निर्बल असल्यामुळें सर्व राज्यांत अंदाधुंदी माजली. १६२८ मध्यें ह्यानें आपल्या राज्यांतून खानजहान लोदी पळून जात असतां त्याजकडे दुर्लक्ष केल्यामुळें ह्याची फार नाचक्की झाली. पण १६३० मध्यें खानजहान जेव्हां परत संस्थानांतून जाऊं लागला तेव्हां झुंजहारसिंगनें त्याजवर हल्ला केला. झुजहारसिंगनें त्यास क्षमा करून त्यास दख्खनमध्यें नोकरीवर पाठविलें. आपल्या गैरहजीरींत आपल्या बायकोचा हरदौल नांवाच्या भावाशीं संबंध असल्यामुळें त्यानें हरदौलास विष पाजलें. १६३४-३५मध्यें झुजहारसिंगनें बंडावा केला तेव्हां मोंगल सैन्यानें त्यावर हल्ला केला; त्यास व त्याच्या पुत्रास गोंडवणच्या जंगलांत हांकून लावलें व तेथें ते दोघेहि मारले गेले.

सन १६३५ ते १६४१ त ओरछा संस्थानांत सत्ताधारी राजाच नव्हता. त्यामुळें तें असून नसून सारखेंच होतें. या अवधींत बुंदेले ज्ञातीचे मुख्य दतिआचा राणा, चंदेरीचा राणा व पन्नाचा चंपतराय हे होते. सन १६४१ मध्यें वीरसिंहदेव ह्याचा पुत्र पहाडसिंग (१६४१—५३) ह्यास शहाजहाननें ओरछाच्या गादीवर अधिष्ठित केलें. त्याच्या नंतर चार राणे गादीवर आले. त्यांचीं नांवें. (१) सुजानसिंग (१६५३-७२) (२) इंद्रमणी (१६७२-७५) (३) जसवंतसिंग (१६७५—८४). (४) भगवंतसिंग (१६८४—८९). बुंदेलखंडच्या राजांनीं सार्वभौम मोंगल पादशहाची नोकरी इमानें इतबारें बजाविली व त्यास बदकशानवर स्वारी करण्यांत मदत केली. महाराजा उदोतसिंगा (१६८९—१७३५) च्या कारकीर्दीत मराठ्यांनीं बुंदेलखंडावर स्वाऱ्या केल्या. १७२९ मध्यें छत्रसालनें पेशव्यास मदतीस बोलाविल्यावरून बुंदेलखंडाचा बराच भाग मराठ्यांकडे आला. उदोतसिंगानंतर पृथ्वीराज (१७३५—५२) गादीवर आला. ह्याच्या कारकीर्दींत तर सर्व राज्य मराठ्यांनीं बळकावलें. त्याच्या नंतर सावंतसिंगास (१७५२—६५) दुसऱ्या अलमगीर बादशहाकडून महेन्द्र हा किताब मिळाला. ह्याच्या नंतर हातीसिंग (१७६५—६८) हा गादीवर आला. हातीसिंगानंतर मानसिंग (१७६८—७५), त्याच्यानंतर भारतीचंद्र (१७७५-७६) व त्याच्यानंतर विक्रमाजित (१७७६-१८१७) असे अनुक्रमें राजे गादीवर आले.

विक्रमाजितानें ब्रिटिशांशीं १८१२ मध्यें तह करून मैत्री जोडली. १८१७ मध्यें त्याचा पुत्र धरमपाल हा गादीवर आला. पण तो १८३४ मध्येंच मरण पावला. नंतर ह्याचा चुलता तेजसिंह (१८३४—४१) हा गादीवर आरूढ झाला. याच्यानंतर सुजानसिंह (१८४१—५४) व सुजान सिंहानंतर हमीरसिंग आला (१८५४—७४). ह्यास १८६२ मध्यें दत्तक घेण्याची परवानगी मिळाली. याच्यानंतर ह्याचा बंधु प्रतापसिंह हा गादीवर आला. हाच सध्याचा राजा होय. १८८० मध्यें ह्यानें आपल्या संस्थानांत मालावरची जकात बंद केली. बंडाच्या सालीं ह्यानें सरकारास चांगली मदत केल्यामुळें ब्रिटिश सरकारनें ह्यास तहरौली परगण्याबद्दल त्याच्याकडे फिरत असलेली खंडणी माफ केली. येथील राजास " हिज हायनेस सरामद-इ-इ-राजाइ-बुंदेलखंड महाराजामहेंद्र सवाई बहादूर " ही पदवी असून १७ तोफांची सलामी आहे.

लोकसंख्या (१९११) ३३००३२ टिकमगड हा राजधानीचा गांव असून खेडीं ७६३. भाषा बुंदेलखंडी. शेंकडा ४० लोक शेतकीवर उपजीविका करतात, चांभार, कच्छि, ब्राह्मण, लोधी, धीवर, छत्री, बुंदेले, रजपूत वगैरे ज्ञातींचे लोक आहेत.

जमीन साधारणपणें सुपीक आहे. माती लाऊ व पिंवळसर रंगाची आहे. मोट, काबर, परुआ, व रान्कर अशीं चार तऱ्हेची जमीन आहे. उत्तरेकडील तहरौली परगण्यांत जमीन फार उत्तम प्रकारची आहे. १६१४ चौ. मै. जमीन खालसा आहे. व ४६६ चौ. मै. जहागिरींत गुंतली आहे. ९९४ चौ. मै. जमीन पिकाऊ आहे. १६६ चौ. मै. जमीन जंगल आहे. कुरणें पुष्कळ आहेत. मुख्य पीकेः—ज्वारी, तांदूळ, जव, तीळ, चणे, गहूं, कडधान्य. पाटाच्या पाण्याचा बागाईतीकरितां उपयोग करितात. इमारतीच्या उपयोगाचीं लांकडें असलेल्या जंगलाचा कांहीं भाग राखून ठेवलेला आहे. जंगलांतील काम सहारिया लोकांकडे सोंपविलें आहे.

अलीकडे व्यापाराची बरीच वाढ झाली आहे. येथून मुंबई व कानपुरास धान्य, तूर, व जाडें भरडें कापड जातें. येथें पूर्वी लोखंड गाळून बंदुका तयार करीत असत. टिकमगड येथें संस्थानाच्या मालकीचा एक बंदुकीचा कारखाना आहे. झांशी—भोपाळ व झांशी—माणिकपुर ह्या रेल्वे शाखा ह्या संस्थानांतून जातात. १८९५ पावेतों संस्थानांत डांकेची कांहीं व्यवस्था नव्हती.

ह्या संस्थानाचे पांच परगणे केले असून प्रत्येक परगण्यावर एका तहशीलदाराची नेमणूक आहे. बलदेवगड, जटार, ओरछा, तहरौली व टिकमगड हीं तहसिलींचीं पांच मुख्य ठाणीं होत. जटार ही सर्वांत मोठी तहसिल आहे. संस्थानाच्या प्रधानास मदार-उल महाम म्हणतात. जातिविषयक तंटे पंचायत सोडविते. संस्थानाचें उत्पन्न ७ लाख. शिवाय जहागिरदारांचें उत्पन्न १.५ लाख रुपये. सारा गोळा करण्याचें काम गांवच्या पाटलाकडे सोंपविलेलें

असतें. सरकार कास्तकार लोकांस मक्त्यानें जमीनी लावून देतें. खर्च ६.५ लाख रुपये. अबकारीचा मक्ता दिला आहे. अजून संस्थानाच्या शिक्क्याचें नाणें पाडलें नाहीं. गजशाही रुपया चालतो. राजधानीच्या गांवांत टांकसाळ आहे. सोन्याचीं रुप्याचीं व तांब्याचीं नाणीं येथें पाडतात. सैन्यः— २५० घोडदळ, १००० पायदळ व ९० तोफा. टिकमगड येथें मुख्य तुरुंग आहे. शिक्षणाच्या बाबतींत इतर संस्थानांप्रमाणें हें संस्थान फारच मागसलेलें आहे. शिक्षणखात्याकडे वार्षिक खर्च सुमारें ३३०० रु. होतो.

गां व—मध्य हिंदुस्थानांतील ओरछा संस्थानाची पूर्वींची राजधानी. लोकसंख्या (१९०१)१८३०. भारतीचंदानें१५३१ मध्यें हा गांव वसविला. हा बेटवा नदीच्या किनाऱ्यावर आहे. भोंवताली जंगल आहे. सन १७८३ मध्यें विक्रमाजितानें राजधानी टिकमगड येथें बदलली. वीरसिंहदेवाच्या वेळच्या येथें मोठमोठ्या इमारती आहेत. येथील राजमंदीर व जहांगीर महाल प्रसिद्ध आहेत. चतुर्भुज वगैरे बरींच देवालयें आहेत. देवळांत नकशी काम वगैरे कांहीं नाहीं. येथें भारतीचंद मधुकरसाह, वीरसिंहदेव, पहाडसिंग, सावंतसिंग व त्यांच्या राण्या ह्यांच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं भव्य छत्र्या आहेत. चतुर्भुज देवालयानजीक हरदौलाचें थडगें आहे. ओरछा हें एका तहसिलीचें मुख्य ठिकाण आहे.

**ओरावन**—हिंदुस्थानांत यांची वस्ती ( १९११ ) ७५१९८३ आहे. ही एक द्रविड जात आहे. या जातीच्या लोकांची विशेष वस्ती छोटानागपुरांतील सपाट मैदानांत आहे. व मध्यप्रांतांतील जशपूर व सिरगुजा संस्थानांत यांची संख्या ( १९११ ) ८८५००० आहे. आसामांतच चहाच्या मळ्यांत यांच्या जातीचे ( १९११ ) २८५८३ मजूर आहेत. यांच्या नांवाच्या व्युत्पत्तीचा चांगलासा शोध अद्याप लागला नाहीं. नर्मदा खोऱ्यांत पेरणी करतांना पाभरींत धान्य टाकणारास ओरया म्हणतात.त्यावरून व या लोकांचा उपयोग हिंदु लोक फक्त मळ्यांत काम करण्याकरितां करून घेतात यावरून यांस ओरावन नांव पडलें असावें. गेटच्या मताप्रमाणें हे लोक पूर्वीं कर्नाटकांत रहात असत. तेथून ते नर्मदेच्या तीरावर जाऊन बिहारांत शोण नदीच्या तीरावर गेले. तेथून त्यांस मुसुलमानांच्या त्रासानें दुसरीकडे जावें लागलें.एक टोळी गंगेच्या कांठावर गेली व राजमहाल डोंगरांत वसली.तेथें त्यांस माले अथवा सौरिया हें नांव पडलें. दुसरी शोणा नदीच्या कांठानें जाऊन छोटानागपूरच्या सपाटीवर वसली. या भागांतल्या बऱ्याच गांवांचीं नांवें अद्याप मुंडारी आहेत. यांच्या गर्दीमुळें तेथील मुंडारी लोक अरण्यांत राहण्यास गेले. यांच्या बऱ्याच गांवांच्या पाटलास मुंडा म्हणतात व पाहन किंवा ग्रामदेवतांची पूजा करण्याकरितां मुंडा पुजारी आणतात.व याच पाहन लोकांकडे गांवाची सीमा ठरविण्याचें काम असतें. यावरून हे येण्यापूर्वी मुंडा लोक या गांवांत रहात असत असें दिसतें. ओरावन लोकांनीं युद्ध करून मुंडा लोकांस हांकून दिलें असेल असें वाटत नाहीं. कोरकू व बैगा यांनीं गोंड लोकांस जागा मोकळी करून दिली किंवा गोंड लोकांनीं हिंदु लोकांस जागा मोकळी केली तशीच मुंडा लोकांनीं ओरावन लोकांस रिकामी करून दिली असेल. ओरावननीं प्रथम वस्ती केलेल्या गांवांतील लोकांचे तीन भाग केले. यांस खुंट म्हणूं लागले व यांचीं नांवें मुंडा, पाहन व माहतो अशीं ठेवलीं. या प्रत्येक खुंटाचा गांवच्या जमीनींत हिस्सा असतो. या तिन्ही जाती भिन्न गोत्री समजल्या जातात.

यांच्यांत परस्पर भिन्न असे वर्ग किंवा उपवर्ग मुळींच नाहींत. पण यांच्यांत कुळें मात्र पुष्कळ आहेत व प्रत्येक कुळाचें ठरीव देवक असतें. तीं देवकें हे लोक कापीत किंवा खात नाहींत. हे लोक स्वकुळांतली किंवा आईच्या कुळांतली मुलगी करीत नाहींत. लग्नें प्रौढपणांतच होतात. लग्नापूर्वी घडलेल्या स्त्रीपुरुषसंबंधाबद्दल जातींत शिक्षा नाहीं. प्रत्येक ओरावन गांवांत अविवाहितांनां निजण्याकरितां धुमकुरिया नावाची एक खोली असते.या खोलींत जर कोणी अविवाहित माणूस निजला नाहीं तर त्यास दंड करतात.ओरावन लोकांच्या राहण्याच्या झोंपड्या लहान असतात. यामुळें तरुण स्त्रीपुरुषानां निजण्याची स्वतंत्र सोय करणें अवश्य असतें. कांहीं गावांत तर धुमकुरियासारख्या अविवाहित बायकांच्याहि निजण्याच्या जागा असतात. तेथें त्या एका वृद्ध पाठराखणीच्या ताब्यांत असतात. पण सर्वसामान्य चाल अशी आहे कीं, प्रत्येक तरुण मुलीला रात्रीं कोणा एका ठरीव विधवेच्या स्वाधीन करतात. तथापि कितीहि बंदोबस्त केला तरी तरुण मुली धुमकुरियापर्यंत बहुधा रोज रात्रीं पोंहोंचतातच व कांहीं गावांत तर त्या तेथेच निजतात. डाल्टन म्हणतो कीं, सिरगुजा संस्थानांत तरुण मुली तरुण मुलांच्या जवळ एकाच धुमकुरियांत निजतात. डाल्टन म्हणतो कीं येथें त्यांचा संयोग होतोच असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. पण रिस्ले म्हणतो कीं, तसा तो होत असावा. ज्यांनीं या गोष्टीसंबंधीं बारीक निरीक्षण केलें आहे, त्यांचें तर असें मत आहे कीं, कोणतीहि ओरावन वधू लग्नाच्या वेळीं अनुपभुक्त रहाणें शक्यच नाहीं. ही अनीति आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ज्या लोकांच्या समाजांत नीतितत्त्वें अद्याप विकास पावलीं नाहींत त्यांच्यावर आपल्या नीतीच्या कल्पना लादणें गैर आहे. यांच्या जातींतल्या जातींत घडलेले स्वैरसंबंध अनीतिकारक आहेत अशी यांच्यांत कल्पनाच नाहीं. देवकानें मर्यादित केलेल्या कुळाचा माणूस खेरीज करून कोणाबरोबर जरी या कुमारिकांनीं संबंध ठेवला तरी चालतो. पण त्यापासून जर ती गर्भवती झाली तर मात्र त्यांचें लग्न ताबडतोब करतात. पण बहुधा एकाच गांवांतल्या तरुण तरुणींच्या संबंधापासून लग्नें क्वचित घडून येतात. कारण बाहेर गांवची वधू करून आणणें थोरपणाचें

समजतात. मेळ्यांत, नाचांत व जातीच्या इतर संमेलनांत तरुण लोक आपल्या प्रणयिनीस निवडून तिच्या केसांत फुलें खोंचून भाजलेले उंदीर तिला देऊन तिची एकसारखी मनधरणी करीत असतात. लग्नें मात्र आईबापच जुळवितात व वधूवरांस विचारीत सुद्धां नाहींत. मुलीचें लग्न १५ व्या वर्षी व मुलाचें १६ व्या वर्षी होतें, तेव्हां धुमकुरियाची मौज उपभोगण्यास तरुण व तरुणींना फक्त दोन वर्षेंच सांपडतात.

लग्नांतला पहिला विधि' पानबांधी ' म्हणून असतो. यांत वधूचें शुल्क ठरवितात. ५रुपये व ४ मण धान्य बहुधा शुल्क द्यावें लागतें. हें ठरल्यावर मग सोहळा सुरू होतो. गांवांतल्या सर्व लोकांस बोलावतात. दोन मुलें सर्वांच्या अंगास तेल लावतात. गांवांतल्या प्रत्येक घराच्या ऐपतीप्रमाणें तांदुळाच्या मद्याची एक ' हंडिया ' आणतात व त्यांतील दारू पितात. इतका वेळ वधू घरांतच ठेवतात पण या वेळेस ती डोक्यावर मद्याची हंडिया घेऊन समाजांत आली कीं, तिच्या स्वरूपाची, तिच्या तारुण्याची, तिच्या पोषाखाची व शालीनतेची सर्व लोक आपसांत स्तुती करूं लागतात. मद्याचा घट डोक्यावर घेऊन वधू आपल्या भावी सासऱ्याजवळ तडक जाऊन उभी राहते. तो डोकीवरील घट उतरून तिला आलिंगन देतो व १ रुपया तिला नजर करतो. सर्व मेजवानी संपेपर्यंत वधू सासऱ्याच्या पाशीं असते.सर्व दारू पीत आनंदानें गात गात मौज करीत असतात व मोठमोठ्यानें एकमेकांशीं बोलणें सुरू करतात; गोंगाट होतो व कोणाचें भाषण कोणासहि ऐकूं येत नाहीं. या मनोरंजनांत नवीनपणा आणण्यास गांवांतल्या प्रौढ स्त्रिया मद्यपानानें उन्मत्त होऊन लाल डोळे गरगर फिरवीत व ठेंचा खात डोक्यावर विलक्षण प्रकारच्या टोप्या घालून हातांत गवताच्या मूर्ती वर समजून आणतात आणि डाकिणीसारख्या काय वाटेल तो धांगडधिंगा समाजांत घालतात. यानंतर दोन वर्षांनीं लग्न लागतें. या अवधींत वर्षांतून दोनदां भेटी मात्र होतात. लग्नाचा दिवस जवळ आला म्हणजे वर आपले इष्टमित्र पुरुष व स्त्रिया बरोबर घेऊन वधूच्या गांवीं जातो. त्याच्या बरोबरच्या पुरुष मंडळींजवळ खरीं किंवा खोटीं हत्यारें असतात. त्यांस भेटण्याकरितां वधूपक्षाचीं तरुण मुलें आपापलीं शस्त्रें घेऊन यांच्याबरोबर युद्ध करण्याच्या तयारीनें येतात. पण अखेरीस त्यांजबरोबर नाचूं लागतात. वधूवर दोन माणसांच्या कडेवर बसलेलीं असतात. व मध्यरात्रीनंतर मेजवानी होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं दारीवर म्हणजे गांवांतील झऱ्यावर जाऊन सर्व बायका वधूच्या आईनें केलेल्या पोळ्या खातात व नंतर पाण्याच्या एका भांड्यांत आंब्याचीं पानें घालून परत येतात. या अवधींत वधूवरांस त्यांच्या वहिणी तेल हळद चोळीत असतात. सर्व लोक बाहेर जमले म्हणजे वधूवरांस बाहेर आणतात आणि नांगराचें जूं व छताचें गवत यांच्या ढिगाजवळ एक पाटा ठेवतात त्यावर वधूवरांस वधूच्या टांचावर वराच्या पायाचीं बोटें पडतील अशा रीतीनें उभे करतात व पाया खेरीज कांहीं दिसूं नये अशी व्यवस्था करण्याकरितां त्याच्या भोंवतीं एक लांब कपडा गुंडाळतात. मुलाजवळ शेंदुरानें भरलेली वाटी देतात. तो मुलीच्या कपाळावर त्याच्या तीन रेघा ओढतो, व वधू देखील वराच्या कपाळावर त्याच स्थितींत त्याच्या पुढें उभी राहून त्याच्या कपाळावर तीन रेघा ओढते. तिला आपला हात पाठीमागें नेऊन रेघा ओढाव्या लागल्यामुळें रेघा वांकड्या तिकड्या चेहऱ्यावर कोठें तरी ओढल्या जातात व त्यामुळें पुढें हशा पिकतो. त्यानंतर बंदूक सोडतात व एकदम वधूवरांवर आणि सर्व लोकांवर पाणी ओतलें जातें. लग्न झालें, लग्न झालें म्हणून बायका ओरडतात. मग वधूवर आपले कपडे बदलण्याकरितां म्हणून एकांतांत जातात, पण पुष्कळ वेळानें परत येतात; आणि आल्याबरोबर त्यांस लोक नवराबायको म्हणून संबोधून नमन करतात. बाहेर पुरुषमंडळी हंड्यांतील मद्य झोंकीत बसलेले असतात. वधूवर बाहेर येतात व पुन्हां एकांतांत जातात. ते बाहेर आले म्हणजे वधू मद्याचा द्रोण घेऊन दिराजवळ जाते व त्याच्या हातांत देण्याऐवजीं तो जमीनीवर ठेवते. याच्याबरोबर इतःपर मैथून करूं नये याचा सूचक हा विधि आहे. यानंतर "खिरीतेंगन हंडिया"चा विधि होतो. हा विधि त्यांस त्यांच्या पूर्वजांपासून मिळाला आहे असें सांगतात. हाच लग्नांतलि खरा विधि आहे. सर्व लोकांच्या समाजांत वधूवर बसतात. कोणी तरी वृद्ध माणूस वरास म्हणतो " तुझी बायको साग आणण्यास गेली असतां झाडावरून पडली व पाय मोडला तर ही लंगडी झाली असें म्हणू नको. तिला नीट ठेव व तिची शुश्रूषा करून तिला खाऊं घाल. " मग वधूस उद्देशून म्हणतो " तुझा नवरा शिकारीस गेला असतां त्याचा हात पाय मोडला तर त्याचा त्याग करूं नकोस, त्याची शुश्रुषा कर, आपल्या स्वयंपाकांतून दोन हिस्से त्यास दे व एक हिस्सा तूं घे. तो आजारी झाला तर त्याची सेवा कर, त्याचे कपडे धू व त्याला स्वच्छ ठेव. " यानंतर मेजवानी होते. त्यानंतर वधूची आई तिला वराजवळ आणते व म्हणते कीं, " ही माझी मुलगी तुझी झाली. तिला थोड्या दिवसांकरितांच मी तुला दिलेली नाहीं तर नेहमी जन्मभर तुला दिली आहे. तिच्यावर प्रेम कर व तिची काळजी घे. " मग वराचा सोबती वधूला धरून घरांत आणतो.

दोन बायका करण्याची चाल यांच्यांत नाहीं. काडी मोडण्याची परवानगी असते. पण नवराबायकोंपैकीं कोणी तरी दुआर किंवा आसामला पळून गेलें म्हणजे झालें. यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. विधवेच्या प्रथम विवाहाच्या वेळीं वरानें तिला ३॥ रुपये दिले पाहिजेत. ती पुन्हां विधवा झाली तर तिची किंमत कमी कमी होत जाते. ती

५ व्यांदां विधवा होऊन लग्न करील तर तिला ८ आणेच मिळतात. यांच्यांत व्यभिचार कमी होतो. व्यभिचार करणारास तो संपन्न असेल तर फार मोठा दंड होतो न नसेल तर लहान दंड व पुष्कळ मार मिळतो.

यांनां संतति फार होते. त्यांना फार न गांजता जर कोठेंहि राहूं दिलें तर त्यांनां एकसारखीं मुलेंच होत असतात. ख्रिस्ती लोकांत त्यांच्या प्रथम आईला कष्टकर प्रसूतीचा जो शाप मिळाला होता तो ओरावन बायकोस मात्र लागू नसावा असें वाटतें. या फारच सुखानें बाळंत होतात. बाळंत झाल्या कीं आपल्या मुलास पाठीवर बांधून घागर डोक्यावर घेऊन आपण बाळंत झालों हें गांवींहि नाही अशा तऱ्हेनें झऱ्यावर रोजच्याप्रमाणें पाणी भरण्यास जातात. विलासपुरांतील ओरावन लोकांत बायको बाळंत झाली म्हणजे नवऱ्यानें बाळंतिणीचे उपचार करवून घेण्याची चाल आहे. त्या चालीचाच हा परिणाम असावा असा कोणी कोणी तर्क केला आहे पण अजून यास चांगला पुरावा सांपडला नाहीं.

जन्म झाल्यावर ८ व्या किंवा १० व्या दिवशीं मुलाचें नांव ठेवतात. सुवेर किंवा अस्पर्शपणा कांहींच नसतो. तांदुळाचा एक द्रोण व पाण्याचा एक द्रोण आणतात. पहिला तांदूळ मुलाचा म्हणून पाण्याच्या द्रोणांत टाकतात. मग आजा, पणजा, बाप, काका, मातामह व इतर नातलगांच्या नांवानें तांदूळ सोडतात. कोणाच्या नांवाचा तांदूळ पहिल्या तांदुळावर पडला तर मुलास त्याचाच अवतार समजून तेंच नांव ठेवतात.

मुलगा सहा किंवा सात वर्षें वयाचा झाला म्हणजे तो धुमकुरियाचा सभासद होण्यास लायक ठरतो मोठीं मुलें त्या सभासदाच्या बाहूच्या खालच्या भागावर कपडा जाळून त्यानें ५ डाग देतात. हीं ओरावन म्हणून ओळखला जावा म्हणून खूण करतात यामुळें त्याचा स्वर्गांतहि प्रवेश होतो अशी समजूत आहे. पुरुष अंगावर गोंदीत नाहींत पण बायका विपुल गोंदवितात. त्या कपाळावर उभ्या तीन रेघा गोंदवितात व हातावर, छातीवर, गुडघ्यांवर आणि गोप्यावर आडव्या उभ्यारेघा गोंदतात.

धुमकुरिया मंडळांतील बातमी बाहेर फोडली असतां फार कडक शिक्षा होते. व मुलींनीं जरी तेथलें कांहींहि गाऱ्हाणें सांगितलें तरी त्यांनां सुद्धां शिक्षा देतात आणि आपल्या अपराधाचें क्षालन करीपर्यंत त्यांस नृत्यांत सामील करीत नाहींत. आपल्यापेक्षां लहान वयाच्या मुलांकडून अंग चेपवून घेण्याचें व केस विंचरविण्याचें काम करून घेतात.

हे लोक प्रेतें जाळतात किंवा पुरतात. प्रेताच्या तोंडांत पैसा व अन्न टाकतात. मग तो पैसा राखेंतून काढून वाजंत्र्यास देणगी म्हणून देतात. एक बोरूचें झाड प्रेताच्या डोक्याकडे लावतात १० व्या दिवशीं डुक्कर, कोंबड्या बळी देतात. थडग्यावर भात ठेवतात. दहन केलें असल्यास अस्थी एका मडक्यांत भरून घरीं टांगून ठेवतात व मृताचा आत्मा घरीं आला हें समजण्याकरितां एक ठरीव विधी करून अस्थी नदींत टाकतात.

प्रत्येक सणाला पितरांची पूजा करतात. कोंबडीपुढें दाणे टाकतात. तिनें ते खाल्ले तर ते पितरांस पोंचले असें समजतात व बुक्की मारून तिचें डोकें ठेंचून तिला बळी देतात. हा विधि बैगा लोकांच्या डुकराचा बळी देण्यासारखा किंवा गोंड वधुवरांच्या गृहप्रवेशाच्यावेळीं त्यांनीं पायानें कोंबडे चिरडण्यासारखा आहे.

हे लोक परमेश्वरास धर्मेश म्हणतात. पुरोहित व शकुन सांगणारांचा उपाय थकला म्हणजे ते धर्मेशाची पूजा करतात. 'सर्व करून आम्ही दमलों आतां तरी तूं आमचें काम कर' अशी त्याची प्रार्थना करतात. "तो फार दयाळू आहे. सर्वांस सारखें वागविण्यात तो चुकणार नाहीं. आपल्या कृत्यांचा झाडा त्याच्याजवळ देण्याची गरज नाहीं. नरकाचें मुळींच अस्तित्व नाहीं. स्वर्गांत सर्वांस आनंद होणारच. प्रत्येकाला जमीन, नांगर व बैलाची जोडी मिळणारच. श्रमानंतर तांदुळाचें मद्य मिळणारच." बरेड म्हणजे दूत देवाकडून येऊन त्रास देईल म्हणून त्याला कांहीं इनाम देण्याकरितां प्रत्येकवेळीं धर्मेशला बळी अर्पण करतांना म्हणतात कीं, पहा तुला तर आम्ही यथाशक्ति बळी दिला, आतां तुझ्या दूतास दस्तुरी देत आहोंत.

याशिवाय अनेक भुतेंखेतेंहि हे पुजतात. चोलापाचो नांवाची देवी सर्नामध्यें ( आंबराईत )राहते, ती पाऊस देते. बाळंतपणीं जी मेली ती चुडेल होते. व आपल्या आवडत्या माणसास रात्रीं येऊन आलिंगन देते व गुदगुल्या करीत करीत प्राण घेत. भुला हीं कोणत्यातरी विचित्र रीतीनें प्राण गेलेल्या माणसांचीं भुतें आहेत. ओझा या भूलांस वठणीवर आणतो. मुरकुरी नांवाचें ठोसे मारणारें भूत आहे. जर इंग्रजानें कोणाची पाठ थोपटली व त्यास ताप आला तर इंग्रजाच्या अंगातली मुरकुरी आपल्या अंगांत शिरली असें त्यास वाटतें. चोरदेव नांवाची जादू करणारी कृत्या आहे. ती काळ्या मांजराच्या जीवांत जीव धरून असते. म्हणून धरण्यास अशक्य असें हें काळें मांजर जर पकडलें व त्याचा कोणताहि अवयव कापला तर इकडे या चोरदेवीचा तोच अवयव तुटतो. पूर्वी अशा चोरदेवीला जाळीत असत.

अन्नकुवारी व महाधानी नांवाच्या दोन देवता आहेत. या देवतांस चैत्रवैशाखांत हे लोक नरबळी देत. या अन्नकुवारीला नरबळी मिळाला कीं ती आपल्या भक्ताकडे लहान मूल होऊन राही; व त्या भक्ताच्या घरीं मात्र धान्याची विपुलता होई. कधीं कधीं ती कंटाळली कीं पुन्हां नरबळी घेऊन ती संतुष्ट होत असे. पण कांहीं

वर्षानंतर मात्र त्या कुळांतल्या सर्वांस मारून टाकल्याशिवाय तिला चैन पडत नसे.

जशपूर संस्थानांत एकंदर ४७००० ओरावन आहेत. त्यांपैकीं २३५०० लोक ख्रिस्ती झाले आहेत. पुष्कळ ख्रिस्ती व अख्रिस्ती लोक एकत्रच राहतात. हे लोक रोमन क्यॅथोलिक आहेत किंवा प्रॉटेस्टंट आहेत व त्यांत भेद काय आहेत हें हे विसरले आहेत.

यांचा सारहूल सण साल वृक्षास फुलें आलीं म्हणजे होतो व चैत्र वैशांखात भात कापण्याच्या वेळीं कर्मानृत्य नाचतात. रानांतून कर्मा झाडाचें रोप वाजत गाजत आणतात व आखाड्याच्या मध्यभागीं त्यास रोवतात. दुसऱ्या दिवशीं सर्व उत्तम पोशाख घालून आखाड्याभोंवतीं जमतात. तरुण स्त्रीपुरुष एकमेकांच्या हातांत हात घालून कर्मा झाडाभोंवती प्रदक्षिणा घालून नृत्य करतात. कर्मा झाडावर दागिने व लाल कपड्यांचीं तोरणें बांधून त्याला सजविलेलें असतें. सारहूल सणांत सूर्यदेवाचें व पृथ्वीदेवीचें लग्न लावतात. पांढरा कोंबडा सूर्याचा द्योतक व काळी कोंबडी पृथ्वीची द्योतक समजून त्यांस शेंदूर लावतात व त्यांचें लग्न लावून त्यांस बळी देतात. मग गांवचे लोक पाहून किंवा बैगाबरोबर सर्ना आंबराईंत जातात. तेथें सर्नाकढी ( पावसाळा आपल्या कह्यांत ठेवणारी) देवी असते. तिला ५ कोंबडीं बळी देऊन तीं खातात. तो दिवस जेवणांत घालवून साल वृक्षाची फुलें दरोबर घेऊन परत येतात. दुसऱ्या दिवशीं बैगा प्रत्येक घरीं फेरी मारतो. घरांतल्या बायका दोन द्रोण, एक तांदुळाच्या मद्यानें व दुसरा पवित्र तीर्थ घेण्याकरितां रिकामा घेऊन दाराबाहेर उभ्या राहतात. बैगा महाराज सर्व स्त्रियांच्या डोक्यांत फुलें घालतो व तीर्थ धान्यावर शिंपडतो. "तुमचें घर धान्यानें भरो व बैगाची कीर्ती वाढो" असा अशीर्वाद देऊन पुढें चालला कीं बायका त्याच्या अंगावर घागरभर पाणी ओततात. इतक्या पाण्याच्या घागरी अंगावर येऊन त्यास पडसें न व्हावें म्हणून प्रत्येक घरीं द्रोणभर मद्य पिण्यास मिळतें व तो घरीं पोंचण्याच्या आधींच मद्यानें उन्मत्त झालेला असतो. नंतर सर्व गांवच लोक मेजवानी करतात व तरुण स्त्रिया आपल्या कृष्ण वर्णाच्या पण तारुण्यानें मुसमुसलेल्या शरीरावर सालवृक्षाच्या पांढऱ्या फुलांच्या भूषणांनीं आपल्या नैसर्गिक सौंदर्यास जास्त खुलवून तरुण मुलांच्या हातांत हात घालून रात्रभर नृत्य करतात.

धान्य मळण्यापूर्वी कनिदार नांवाचा सण असतो. कोंबडा बळी देऊन त्याचें रक्त धान्यावर शिंपडतात. मग बैगा महादेवाच्या लिंगाजवळ जाऊन त्यावर दुध ओततो. सर्व लोक नाचतात आणि तांदुळाचें मद्य वाटेल तितकें पितात. त्यानंतर तेथेंच सर्व बंधनें सोडून वाटेल तो वाटेल त्या स्त्रीबरोबर मैथुन करतो व आपल्या कामविकारांस बेछूट मोकळीक देतो. त्या दिवशीं कोणीहि कोणाशीं कांहीं केलें तरी त्याला कोणी जबाबदार धरीत नाहींत.

धान्य उगवण्यापूर्वी आषाढाच्या महिन्यांत हे लोक अनुष्ठान करतात. हळद खात नाहींत, पत्रावळींवर जेवीत नाहींत.

या लोकांची ऊंची ४ फुट ५ इंच असते यांचें शरीर बांधेसूद असून नीट नेटकें असतें. हा आपल्या शरीराची व पोशाखाची धुमकुरिया कालांत असेपर्यंत फारच काळजी घेतात. व तारुण्याची पहिली खुमारी गेली कीं पोषाखाविषयीं निष्काळजी होतो. हा आपले केस लांब वाढवितो, व मागें त्यांचा बुचडा बांधतो व मोठ्या समारंभाच्या प्रसंगीं त्यावर लाल पागोटें घालतो. बुचड्यांत फणी व पितळेचे इतर दागिने घालतो. बुचड्याच्या मध्यभागीं वाटोळा आरसा घालतो. कानांत पितळेच्या सांखळ्यांत लटकावलेल्या बाळ्या घालतो, व तो तारुण्याच्या चपळ पण गंभीर चालीनें चालूं लागला किंवा त्यानें खंद्या घोड्याप्रमाणें मानेला हिसका दिला कीं त्याचे दागिने डोलूं लागतात व तितक्यांतच तो हांसला तर त्याचे पांढरे मोत्यासारखे दांत त्याच्या काळ्या शरीरास फारच शोभा आणतात व त्याचा आनंदी स्वभाव स्पष्टपणें खुलवितात. तो अंगांत सदरा म्हणून मुळींच घालीत नाहीं. पण त्याची छाती व कटि ही जुन्या शिल्पशास्त्राप्रमाणें सिंहासारख्या आकाराची झालेली दिसते. तो आपल्या कंबरेभोंवतीं कोशाच्या कापडाचा व वेताचा एक कंबरपट्टा बांधतो.

पण प्रथमतारुण्य उलटलें कीं स्त्रिया व पुरुष सौंदर्याकडे दुर्लक्ष करतात; एखादी चिंधी नेसतात केसांची जोपासना करीत नाहींत व फारच विद्रूप दिसूं लागतात.

बायकांचें लुगडें ६ वार लांबीचें असतें. डाव्या खांद्यावरून पाठीवर पदर सोडतात; तो फार सुंदर दिसतो. लाल मण्यांचे हार व पितळेचे अवजड दागिने गळ्यांत घालतात. तांब्याच्या आंगठ्या सर्व बोटभर जितक्या मावतील तितक्या घालतात. या बायका कांचेचा कोणताच पदार्थ घालीत नाहींत. केसांनां तेल लावून चिकण करतात व मोठे दिसण्याकरितां वरूनहि केस लावतात व एकाच बाजूला बुचडा बांधतात. कानांत आंगठीवजा बाळ्या घालतात. महत्त्वाच्या प्रसंगीं नृत्य करतांना त्या बुचड्यांत पिसें खोवतात व चांगल्या कांठाच्या कपड्यानें कंबरेवरचा भाग कसून गुंडाळतात.

यांचें खरें सौंदर्य यांच्या जातीच्या जत्रेंतून दृष्टीस पडतें. हे सोइस्कार अशा ठिकाणीं वर्षांतून एकदां जत्रा भरवितात. जत्रेचें ठिकाण बहुधा आंबराई असते. भोंवतालच्या लोकांस सूचना देण्याकरितां प्रत्येक गांवचे झेंडे व बावटे जत्रेला जाणाऱ्या रस्त्यावर आणून रोंवतात. ठरलेल्या दिवशीं सकाळीं सर्व तरुण मुली व मुलें आपलें सकाळचें काम आटोपून आपले उत्कृष्ट पोशाख आणि सौंदर्यवर्धनाची

सर्व सामग्री जुळवून स्वतःला भूषवीत असतात. ज्यांना जत्रेपर्यंत जाण्यांत बराच वेळ लागेल अशा तरुणी आपली अलंकारसामुग्री एका पोटळींत बांधून जत्रेजवळच्या तळ्यांवर नटत असतात. सर्व तरुण मुलींचा घोळका एकीकडे आपला शृंगार आनंदानें करतो; व तरुण मुलांचा घोळका दुसरीकडे स्वतःचा शृंगार करीत असतो. हे लोक सज्ज झाले म्हणजे वाद्यें वाजतात. त्याबरोबर प्रत्येक गांवचे लोक आपापली निरनिराळी मिरवणूक सजवितात. अघाडीवर शस्त्रास्त्रें घेतलेलीं तरुण मुलें असून त्यांच्यापैकीं कांहीं लोकांच्या हातांत झेंडे, तलवारी, ढाली, चवऱ्या व एका खांबावर फुलांच्या चित्रविचित्र माळा असून राजाच्या स्वारीचा सर्व थाट करतात. कधीं कधीं लांकडाच्या घोड्यावर कोणास तरी बसवून त्याला ओढीत नेतात व त्याच्या भोंवतीं कांहीं कांहीं लोकांस श्वापदाचें सोंग देऊन त्याला चित्र विचित्र रंग देऊन बरोबर चालवितात. यांच्या मागें एक मुलांची व एक मुलींची अशा क्रमानें झालेल्या दाट रांगांची एक परंपरा असते. मोठ्या ऐटीनें पण अत्यंत आनंदोल्हासानें तालावर समतोल पाय उचलून अत्यंत कुशल पदलालित्यानें, कधीं रांगांची चित्रविचित्र रचना करीत, कधीं निरनिराळ्या तुकड्या बनवीत, तर कधीं मध्येंच मंडळ घालून फेरे देत देत आपल्या नृत्यकौशल्यानें प्रेक्षकाचें चित्त वेधून मोठ्या थाटानें आंवराइतल्या नृत्यांगणांत प्रवेश करतात. या नृत्याचें नांव खारिया असें आहे. हें नृत्य ओरावन लोकांचेंच मूळचें आहे. जरी यांत मुलें मुली सामील होतात तरी पण हें त्यांचें नृत्य नव्हे. सर्व गांवांचे मेळे अशा समारंभानें नृत्यांगणांत एकत्र जमून एक अजस्र वर्तुळ तयार होतें. ढोल व वाद्यें हीं त्या वेळेस बाजूस ठेवतात व आवाजानेंच फक्त ताल धरतात. या ओरडण्यांत शेकडों नव्हे तर हजारों लोकांचे ध्वनी मिसळतात व त्याचा मनावर फार मोठा परिणाम होतो. या बृहद्वर्तुलांत असणाऱ्या अनेक तुकड्या जरी फार खचून भरलेल्या असतात तरी मंडलें फिरणें, पायाच्या तालावर उठणें व बसणें अगदीं नियमानें कवाइतीच्या धर्तीवरच चालू असतें. मध्यें मध्यें समेवर मात्र ‘ हुरु ’ नांवाची उसळी सर्व जनसमूह एकदम घेतो व जमीनीवर सर्व लोक एकदम खालीं येतात. त्यांच्या पायाचा ध्वनी फारच गंभीर असतो. हुरुनंतर थोडी विश्रांति घेऊन कोणाच्या तरी मोठ्या आरोळीनें पूर्वीचाच क्रम पुन्हां सुरू होतो. व थकेपर्यंत असेंच नृत्य चालतें. मग बृहद्वर्तुळ मोडून निरनिराळ्या गांवच्या टोळ्या अलग होतात. व संध्याकाळपर्यंत अलग अलग स्वतंत्र असें नृत्य करीत करीत आपआपल्या गांवीं जातात. बहुधा रात्रभर ते आपलें नृत्य तेथेंच चालवितात. दुसऱ्या प्रकारच्या नृत्यांत मुलींची रचना त्यांच्या उंचीप्रमाणें करतात. सर्वांत उंच मुलगी एका टोंकास व ठेंगणी दुसऱ्या टोंकास अशा अनेक रांगा करतात आणि एकमेकांचे हात घट्ट धरून तालावर बिनचुक नाचतात व सर्व समूह एका माणसा प्रमाणें उड्या घेतो. हे लोक फार सहवासप्रिय आहेत. सर्वांच्या सोबतींत यांना आयुष्य घालवावेसें वाटतें. हे मधून मधून एकमेकांस भेटण्यास जातात. कोणी घरीं आला तर तांदुळाच्या मद्याची हंडिया ही त्याच्या समोर ठेवलीच पाहिजे. तसें न केलें तर त्याचा धिःकार करतात. अश्विनापासून चैत्रापर्यंत एकमेकांच्या भेटी चालू राहतात. लग्नकार्यांत वरपक्षाला ४० मद्याच्या हंडिया एका दिवसाकरितां तयार कराव्या लागतात. प्रत्येक घरांतून यथाशक्ती लग्नमंडपांत मद्य पोंहोंचतेच. ३० घरांच्या गांवांत दीड दिवसांत ८०० शेर दारू फस्त होते.

हे लोक नृत्याकरितां प्रसिद्ध आहेत. सूर्यास्तापासून रात्रभर व सकाळपर्यंत हे गांवोगांव नाचत जातात. मद्यानें व गाण्यानें सकाळपर्यंत उन्मत्त होतात व जास्त जास्त वेगानें नृत्य करीत सुटतात व सूर्योदयाच्या सुमारास यांस जास्त वेग येतो. अखेरीस सोसाट्याच्या वाऱ्यासारखे साळीच्या शेतांतून नाहींसे होतात व एखाद्या खड्यांत दमून पडतात. मुली अशाच उन्मत्त होऊन तरुण मुलांच्या सहवासाला कंटाळेपर्यंत नृत्य करतात व बहुधा सर्व उत्सव लवकर संपला म्हणून हिरमुसल्या व अस्ताव्यस्त पोषाखानें घरीं परत येतात. सर्वांत अत्यंत आश्चर्य हें कीं हे लोक तडक आपल्या शेतांवर काम करण्यास तयार असतात व रात्रभर गाढ झोंपच जणूकाय झाली अशा ताज्या दमानें शेताचें काम करतात. दुपारीं ११ वाजता घरीं येऊन भाकर खातात व सोप्यांत गाढ झोंपी जातात, आणि कोणी हालवून हालवून जागे करीपर्यंत निजतात व जागे झाल्यावर डोळे चोळीत पुन्हां कामावर जातात.

हे बाहेरच्या लोकांस आतां आपल्या समाजांत घेत नाहींत. पुरुषास जातींतून बाहेर करण्यासारखा कोणताच अपराध यांच्यांत नाहीं. ओरावनखेरीज कोणा इतर माणसाबरोबर राहणाऱ्या बाईस मात्र जातींतून काढतात. यांच्या पंचाइतींतल्या सरपंचास पहना असें म्हणतात. हिंदुलोकांत यांचा दर्जा फार हलका आहे. गोंडांसारखे हे देखील स्वतःला रावणवंशी म्हणवितात. लंकादहनाच्या वेळीं मारुतीच्या शेपटास सर्वांचे कपडे बांधले तेव्हांपासून आमच्या जवळ कपडे नाहींत असें हे सांगतात.

हे लोक फार प्रामाणिक व आनंदी आहेत. यांना काम करण्याची हौस आहे. साधी कैद झालेला ओरावन हौसेनें काम करणाऱ्या कैद्यांत जातो. ऊन, थंडी, वारा या सर्व ऋतूंत हे आपल्या कामास आनंदानें जातात व आपल्या डोक्यांत फुलें घालून एकमेकांचे हात धरून आलिंगन देऊन नाचत गात परत घरीं येतात. यांच्यापैकी ⅔ लोक ओरावन भाषा बोलतात.

**ओरिसा**, वि भा ग.—विहार-ओरिसा प्रांताचा एक विभाग. पश्चिम बंगाल ते मद्रास व छोटानागपूरची डोंगर-सपाटी ते बंगालचा उपसागरपावेतों पसरलेला हा प्रदेश असून याचें मुख्य ठिकाण कटक शहर आहे ह्या विभागांत पांच जिल्ह्यांचा समावेश होतो. १९०५ सालीं मध्यप्रदेशाच्या छत्तिसगड विभागांतील सम्बलपूर जिल्हा या विभागांत घेण्यांत आला. पण त्यांतील दोन जमीनदाऱ्या मध्यप्रदेशांतच ठेवण्यांत आल्या आहेत. क्षेत्रफळ १३७४३. लोकसंख्या १९२१ सालीं ४९६८८७३ होती. या लोकसंख्येपैकीं ४७७६३०३ हिंदु ११७७८९ मुसलमान व ८२०९ ख्रिस्ती आहेत. इतर धर्मांचे लोक फार थोडे आहेत. या विभागांतील जिल्ह्यांचीं नांवें:—कटक, बालासोर, अन्गुल, पुरी व सम्बलपूर हीं होत.

ओरिसा म्हणजे उडिया भाषा बोलणारे लोक ज्या भागांत रहातात तो प्रदेश होय. पण ब्रिटिश अमदानींत ही संज्ञा चिल्का सरोवरापासून तों सुवर्णरेखा नदीपर्यंतच्या प्रदेशास लावितात. ह्यांत अगोदर सांगितलेल्या पांच जिल्ह्यांचा व ओरिसा मांडलिक संस्थानांचा ( हीं एकंदर २४ आहेत ) समावेश होतो. ओरिसाचा कमिशनर ह्या संस्थानांचा सुपरिंटेंन्डट आहे. त्यास सेशनजजचा व हायकोर्टाचा अधिकार आहे. पहिले चार जिल्हे छोटानागपूरच्या डोंगर-सपाटीचा समुद्रापर्यंतचा प्रदेश व्यापितात. सम्बलपूर महानदीच्या खोऱ्यांत आहे. बहुतेक भागांतून उडिया भाषा बोलतात. उडिया भाषेकरितां 'उरिया' पहा.

इ ति हा स.—ओढ्या हें नांव ओड्रदेश या प्राचीन प्राकृत नांवावरून आलेलें आहे; ओढ्यादेश म्हणजे पूर्वेकडे बंगालचा समुद्र आणि पश्चिमेस विंध्यपर्वत यांच्यामध्यें असलेला पट्टा होय. त्याची लांबी उत्तरेकडे गंगानदीच्या पश्चिम-मुखापासून तों दक्षिणेकडे चिल्कानामक प्रसिद्ध सरोवरापर्यंत आहे. या सरोवराचा विशेष असा आहे कीं, तें भरतीच्या वेळीं समुद्राचें पाणी आंत येऊन बनलेलें आहे इतका त्याचा प्रदेश समुद्रसपाटीच्या मानानें खोलगट आहे. पश्चिमेकडील पर्वतराशींवरून वहाणाऱ्या महानदीसारख्या मोठमोठ्या नद्यांबरोबर वाहून आलेल्या गाळाचा जो अरुंद थर बसला आहे तोच काय तो समुद्र व हें सरोवर यांची हद्द होय. हा जमिनीचा पट्टा फार सुपीक असल्यामुळें प्राचीन काळापासून वेळोवेळीं येथें बाहेरून येऊन लोकांनीं वसाहती केल्या आहेत. दंडकारण्यासारख्या निबिड प्रदेशांतहि वसाहती करण्यांत हौस मानणाऱ्या आर्यांचे धुरीण जो ब्राह्मण-वर्ग तोच येथील पहिला वसाहत करणारा होय. या आर्यांनीं येथें आल्यावर आपला धर्म आणि भाषा मूळच्या अनार्य लोकांनां स्वीकारावयास लाविली, व अशा रीतीनें त्यांच्यावर आपला पगडा बसविला. हे अनार्य लोक बहुतेक कैवर्त म्हणजे मच्छमारी वर्गांपैकीं होते. आर्यांनीं तेथें वसाहत केल्यापासून हा प्रान्त भरभराटीस लागला. तथापि अंग, वंग आणि कलिंग या प्रदेशांप्रमाणेंच पूर्वी तोहि शुद्ध आर्यांच्या वस्तीला निषिद्ध असाच मानीत असत. मनुस्मृतीमध्यें ( १०. ४४ ) ओड्रांनां म्लेच्छ म्हटलें असून आर्यांनीं तेथें जाणें अप्रशस्त मानिलें आहे.

आर्यांच्या मागाहून ओढ्या प्रांतांत वसाहतीसाठीं आलेले लोक बौद्ध होत. अशोकानें ओढ्याच्या पलीकडे दक्षिणेकडील कलिंग देश जिंकून तेथील अनेक लोकांची कत्तल केली, व तेव्हांपासून त्याला उपरति होऊन तो अहिंसावादी धर्माचा अनुयायी बनला हें प्रसिद्धच आहे. अशोकापासून म्हणजे इ. सनापूर्वी २५० पासून पुढें कित्येक शतकेंपर्यंत ओढ्या देशावर बौद्ध धर्माचें वर्चस्व होतें. पुढें इ. स. ३२० च्या सुमारास रक्तबाहु नांवाच्या कोणा राजानें तेथें येऊन बौद्धधर्मीयांचा पाडाव केला व तेथें आपलें राज्य स्थापिलें आणि त्याचा वंश तेथें इ. स. ४७४ पर्यंत नांदत होता असें सर विल्यम हंटरनें ताडपत्रावरील लेखांच्या आधारानें लिहिलें आहे.

या यवनांनीं म्हणजे ग्रीकवंशीय लोकांनीं आपल्या धर्माचें स्मारक म्हणून जीं कोरीव लेणीं करून ठेविलीं आहेत त्यांतील देव व मनुष्यें यांचे चेहरे ग्रीक वळणाचे आहेत असें पुराणवस्तुसंशोधकांचें ठाम मत आहे. एकंदर यवनांच्या हालचालीचा व या गोष्टीचा विचार करतां त्यांचे कर्ते म्हणजे ओढ्या प्रांतावर राज्य करणारे हे यवन मूळ बॅक्ट्रिया देशांतून इकडे आलेल्या ग्रीकांपैकींच होते ह्या म्हणण्याला चांगलेंच पाठबळ मिळतें. इ. स. ४७४ त या यवन राजघराण्याला ययाति केसरीनामक कोणा राजानें हुसकून लाविलें असें कांहीं ताडपत्रलेखांत म्हटलें आहे. हें नवीन केसरीघराणें मुख्यतः शिवोपासक असून विष्णूचा देखील स्थितिकर्ता म्हणून त्यांच्याकडून योग्य तो आदर होत असे. बौद्धमत व शैवमत यांचा परस्परांवर वर्चस्व संपादण्यासाठीं १५० वर्षेपर्यंत सारखा झगडा सुरू होता. केसरी घराण्याची राजधानी भुवनेश्वर नांवाची होती व तींत शैवमताचें वर्चस्व होतें.

केसरी राजांनीं शिवाचीं प्रचंड मंदिरें बांधिलीं, इतकेंच नव्हे तर त्यांनीं ब्राह्मण धर्माच्या पुनरुज्जीवनास देखील विशेष तऱ्हेनें हातभार लाविला. मोडकळीस आलेल्या बौद्धधर्मीय विहारादिकांच्या सन्निध केसरी घराण्याच्या भुवनेश्वर या राजधानीची स्थापना झालेली होती; व जयपूर येथील वसाहत म्हणजे धर्माच्या पुनरुज्जीवनामुळें स्थापन झालेली नवी राजधानी होय. या दोन ठिकाणांमध्यें महानदीचा दुआब आहे. या नव्या जयपूर राजधानीचा हळू हळू उत्कर्ष होत गेला आणि ह्युएनत्संगानें त्या नगराला भेटहि दिली होती असें कनिंगहॅम म्हणतो. केसरी राजांपैकीं पहिले पहिले राजे आपला दरबार शिवमंदिरांनीं खचित अशा भुवनेश्वरपुरांत कधीं भरवीत, तर कधीं महानदीच्या कांठीं नवीन वसविलेल्या ब्राह्मण वस्तीच्या जयपु-

रांत भरवीत. पण पुढें इ. स. ९५३ ते ९६१ पर्यंत राज्य केलेल्या एका रणधीर राजानें महानदीचीं मुखें फुटण्याच्या स्थळाचें लष्करीदृष्टया महत्त्व ओळखून तेथें कटक नांवाची आपली राजधानी स्थापन केली व तीच अद्यापीहि ओढ्या प्रांताची राजधानी आहे. केसरीघराण्याच्या भव्य इमारती व पुरींतील पुलासारख्या वैभवचिन्हांव्यतिरिक्त राजकारणविषयक कांहीं गोष्टी आज सांगण्यासारख्या नाहींत. केसरी घराण्याचा अंमल ओढ्या प्रांतांत इ. स. ११३२ पर्यंत होता; व इ. स. १०३० त कटक शहराची स्थापना झाल्यापासून त्याची राजधानी तेथेंच होती असें प्राचीन लेखांवरून दिसून येतें. इ. स. १०३० च्या सुमारास ओढ्या प्रांतांत राज्यक्रांति होऊन केसरी घराणें नामशेष झालें. या वेळीं राज्यपक्षाबरोबर धर्मक्रांति देखील झाली व एका अर्थी वैष्णवमतरूपानें बौद्ध धर्मानेंच आपलें डोकें पुन्हां वर केलें. [ वैद्य—मध्ययुगीन भारत, भाग १, पृ २४०–२५१ ].

तदनंतर कलिंग नगरच्या चोरगंगवंशाची अमदानी सुरू झाली. हे राजे वैष्णवधर्मीय होते. पुरी येथील जगन्नाथाचें देवालय व कोनारक येथील काळें देवालय त्यांनींच बांधिलें. जयपूर व इतर स्थळीं सूर्योपासनाहि होत असे. शांतीश्वराच्या देवळांत अग्न्युपासनेचा पंथ दिसत होता ( हंटरकृत ओरिसा १, १८६ ). यांचें मुसुलमानांशीं नेहमीं खटके उडत असत. १३६१ सालीं फिरोजशहानें ओरिसावर स्वारी केली. १४३४ मध्यें सूर्यवंशीय कपिलेश्वर देवराजानें गादी बळकावली व त्यानें दक्षिणेस पेन्नार नदीपावेतों आपला राज्यविस्तार केला. पण त्याच्या वंशजापासून गोंवळकोंड्याच्या मसुलमान राजांनीं हळू हळू हा जिंकिलेला प्रदेश हिरावून घेतला. उत्तरेकडून मुसुलमान राजे रेटूं लागले. व शेवटीं १५६८ मध्यें शेवटचा हिंदू राजा मुकुंद देव ह्यास सुलेमानकर राणीचा सरदार कालापाहाड यानें अर्धचंद्र दिला. पुढें१५९२पर्यंत ओरिसा अफगाण लोकांच्या ताब्यांत राहिला. व तदनंतर अकबराचा हिंदु सरदार राजा मानसिंग यानें तो मोंगल साम्राज्यास जोडला. पुढें मिदनापूर व बलासोर यांचा बंगालमध्यें समावेश करण्यांत आला. १७५१ सालीं अलिवर्दीखानानें ओरिसा हा प्रांत नागपूरच्या भोंसल्यास दिला ( अलिवर्दीखान पहा ). तो १८०३ पावेतों त्यांच्या ताब्यांत होता, नंतर ब्रिटिशांकडे आला. मराठ्यांनीं येथें सुव्यवस्था स्थापन करण्याचें तर मनावर घेतलें नाहींच; उलट इच्छेनुसार येथील लोकांस त्रास मात्र दिला. तेव्हां बंगाली लोकांप्रमाणें उडिया मराठ्यांनां त्रासले होते. १८०४ मध्यें या प्रांताच्या राज्यव्यवस्थेकरितां दोन कमिशनरांचें एक बोर्ड स्थापन करण्यांत आलें व पुढील वर्षी कलेक्टराची नेमणूक करून या प्रांतास ‘ कटकचा जिल्हा ’ हें नांव दिलें. १८२८ मध्यें याचे तीन रेग्युलेशन जिल्हे (कटक, बालासोर व पुरी)व मांडलिक संस्थानें (नॉनरेग्युलेशन) असे भाग पाडले. नंतर १९०५ मध्यें संबलपूर जोडण्यांत आला. वेगवेगळ्या प्रांतांतून असणारे ओरसाचे भाग एकत्र करावे अशी जी उडियांची चळवळ सुरू झाली तिचा परिणाम म्हणून मध्यप्रांतांतून संबळपूर काढून ओरिसांत घेतलें असें म्हणतां येईल. मद्रास व बंगालमध्यें असणाऱ्या उत्कलांनां एकत्र करण्याची खटपट चालू आहे. १९१२ मध्यें ओरिसाला बंगालमधून काढून बिहार–ओरिसा असा एक प्रांत करण्यांत आला. पण बिहारमध्येंहि राहण्यास ओरिसा खुष नाहीं असें दिसतें.

ओरिसा प्रांतांत दुष्काळापासून फार त्राप झाला. १८६५ ते ६७ सालीं तर तो बहुतेक उघडाच पडला. त्यावेळीं सर जॉन लॉरेन्स गव्हर्नरजनरल होता; पण त्यानें या भयंकर दुष्काळांतून लोकांनां वांचविण्याचे पाहिजे तसे प्रयत्न केले नाहींत त्यामुळें अंदाजे १० लाख लोक उपासमारीनें मेले. या प्रांतांतून आतां बंगाल–नागपूर रेल्वे जाते. कटक व व बालासोरच्या प्रदेशांत ‘ ओरिसा ’ कालवे सुरू केले आहेत.

येथील राज्यव्यवस्थेची माहिती बिहार प्रांतांत समाविष्ट झाली आहे. या विभागात गांवें ८ खेडीं व १५६६७ आहेत. कटक, पुरी, बालासोर हीं मोठीं गांवें व फॉल्सपाईन्ट, चान्दबली, बालासोर, पुरी हीं बंदरें आहेत.

पुरी येथील जगन्नाथाचें देवालय प्रसिद्धच आहे. जयपूर येथील देवालयें व खंडगिरी व उदयगिरी टेंकड्यांतील गुहा, भुवनेश्वरचे लिंगराज देवालय व कोनारक येथील काळें देवालय हे पुरातन कालचे अवशेष होत.

सध्यां ओरिसा हा एक प्रमुख हिंदू प्रांत बनून राहिला आहे. येथें ब्राह्मण वस्ती फार असून तिचें समाजांत वजनहि मोठें आहे. पुरी येथें वैदिक व लौकिक असे ब्राह्मणांत दोन पंथ आहेत. इ. स. १२ व्या शतकांत गंगथडीहून या ठिकाणीं आलेल्या ब्राह्मणांचे वंशज ते वैदिक. वैदिकांतहि पुन्हां कुलीन व श्रौत्रिय असे दोन भेद आहेत. लौकिक ब्राह्मण प्राचीन आर्य वसाहतवाल्यांचे वंशज म्हणून गणले जातात. ख्रिस्ती व इस्लामी धर्मांची या प्रांतांत फारशी डाळ शिजलेली दिसत नाहीं. ओरिसांत वन्यधर्मीय लोकहि आहेत ( ‘कंध’ पहा ). खेड्यांतील देवता नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें स्त्रीजातीच्या असून त्यांनां ग्रामदेवता किंवा ठाकुराणी म्हणतात. ओरिसांत कांहीं मराठे जातींचीं कुटुंबें स्थायिक झालीं आहेत व एतद्देशीयांबरोबर त्यांचा कधीं कधीं लग्नव्यवहारहि होतो.

[ संदर्भग्रंथ—डब्ल्यू. डब्ल्यू. हंटरनें १८७२ त प्रसिद्ध केलेले ओरिसावरचे दोन भाग फार अमूल्य आहेत. त्यांशिवाय पुढील ग्रंथ महत्त्वाचे आहेत. राजेंद्रलाल मित्र—अॅन्टीक्विटीज, ऑफ ओरिसा, कलकत्ता १८७५–८०; ए. स्टर्लिंग—ओरिसा; फर्ग्यूसन आणि बर्जेस—दि केव्ह टेंपल्स ऑफ इंडिया; गेट—सेन्सस ऑफ इंडिया, १९०१. पु. ६. १९११ पु. १. ].

**ओरिसा कालवे(१)**—बंगालमधील कटक जिल्ह्यामध्यें व कांहींसे बलासोर जिल्ह्यांत असलेले कालवे. ह्या कालव्यांत महानदी, ब्राह्मणी व वैतरणी नद्यांचें पाणी येतें. कालव्याच्या द्वारें ओरिसा व मिदनापूर जिल्ह्यांतील नद्यांचा उपयोग करून घेण्याची शक्कल पहिल्यानें १८५८ मध्यें सर आर्थर कॉटननें काढली अशा रीतिनें ३५१६ चौ. मै. जमीन भिजणें शक्य होतें. खर्चाचा अंदाज साधारणपणें १३० लाख रुपयांचा होता. शिवाय पात्रांतून नौका व होड्यांच्या मदतीनें मालाची ने आण करावयाची सोय झाली असती ती निराळीच. ह्या योजनेप्रमाणें १८६० मध्यें ईस्टइंडिया इरिगेशन व कॅनाल कंपनी' अस्तित्वांत आली व १८६५ मध्यें तिनें आपल्या कामास सुरुवात केली. तदनंतर कंपनीजवळून सरकारनें हें सर्व काम १०९ लाखांस विकत घेतलें व १८६९ मध्यें कम्पनी मोडली.

पहिल्यानें काम जरा रेंगाळत चाललें होतें. पण अखेरीस ओरिसामधील १७८१ चौ. मै. जमीन भिजविण्याचा विचार कायम ठरला.

एकंदर मुख्य चार कालवे आहेत. त्यांचीं नांवें:— १ हायलेव्हल कालवा २ केन्द्रपार कालवा ३ तालदंडकालवा व ४ माचगांव कालवा.

हायलेव्हल कालवा करण्यांत कलकत्ता व कटकमधील व्यापाराचा मार्ग सुलभ करणें हा मुख्य उद्देश होता. भोंवतालच्या प्रदेशांत पाणी खेळविणें हा उद्देश दुय्यम होता. ओरिसाचें क्षेत्र नद्यांनीं विभागलेलें आहे. महानदी व ब्राह्मणी नद्यांच्या प्रदेशामध्यें उत्तरेस पटामुन्डई कालवा व दक्षिणेस केन्द्रपार कालवा आहे. ह्या दोघांस जोडणाऱ्या कालव्यास गोब्री कालवा म्हणतात.

सारा वाढवण्याच्या भितीनें पहिल्यानें लोक ह्या कालव्यांच्या पाण्याचा फायदा घेईनात. पण हळू हळू पट्टी कमी करीत गेल्यामुळें त्यांना विश्वास आला. नंतर मक्त्यानें कांहीं वर्षेपर्यंत पाणी देण्याची युक्ति अमलांत आणण्यांत आली. कालव्यापासून उत्पन्न (१९०३-४) ४.३ लाख झालें.

(२)बलासोर जिल्ह्यांतील एक नाव्य(नौकागमनार्ह) कालवा. बंगालमधील मिदनापूर जिल्ह्यांतील हिजिली तिडल कालव्यांत ह्याचा भाग आहे. लांबी १३० मैल. ह्या कालव्याच्या योगानें रसूलपूर व सुवर्णरेखा नद्या जोडल्या गेल्या आहेत. हा कालवा नेआणीकरितां १८८५ सालीं उघडण्यांत आला.

**ओरिसांतील मांडलिक संस्थानें**—ह्यांस ओरिसा (फ्यूडेटरी स्टेट्स) मान्डलिक संस्थानें ही संज्ञा आहे. महानदीचा मुखप्रदेश व मध्यप्रदेश ह्यांमध्यें असलेल्या २४ मांडलिक संस्थानांच्या संघास हें नांव आहे. ह्याच्या पलीकडे ओरिसा विभाग आहे. १९°५३' ते २३° ३४' उ. अ. आणि ८७°१०' ते ८३°३५' पू. रे. यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ १४३८७ चौ. मै. लो. सं. (१९२१) ३८०७१७२. उत्तरेसः—सिंघभूम व मिदनापूर; पूर्वेसः—ओरिसा; दक्षिणेसः—मद्रास इलाख्यांतील गंजम जिल्हा. पश्चिमेसः—परणा, सोनपूर, रैराखोल, बामरा व बोनइ नांवाचीं मांडलिक संस्थानें.

ह्यांत समावेश होणाऱ्या संस्थानांचीं नांवें:—१ अथगड, २ तालचेर, ३ मयूरभंज, ४ निलगिरी, ५ केओंझर, ६ पाललहरा, ७ धेनकानाल, ८ अथमल्लिक, ९ हिन्डोल, १० नरसिंगपूर, ११ बरम्बा, तिगिरिया, १३ खंडपारा, १४ नयागड, १५ रणपूर, १६ दसपल्ला, १७ बौद १८ बामरा, १९ रैराखोल, २० सोनपूर, २१ पाटना, २२ कालाहंडी, २३ गंगपूर, २४ बोनाई. ओरिसा फ्युडेटरी स्टेट्समध्यें एकंदर २४ संस्थानें आहेत.

ह्या प्रदेशांत डोंगरांच्या ओळी आहेत, त्यामुळें तीन खोरीं तयार झालीं आहेत. पहिलें महानदीचें खोरें; यांतील प्रदेश फार सुपीक असून येथें तांदूळ खूप पिकतो. बरमुल खिंडीनजीक नदी पहाडास वळसा घालून जाते. दुसरा ब्राह्मणी नदीच्या खोऱ्याचा प्रदेश. याच्या भोंवतालच्या पहाडाची उंची २५०० ते ३५०० फूट आहे. तिसरा वैतरणी नदीच्या खोऱ्यांतील प्रदेश; याच्या भोंवतालच्या पहाडाची उंची ३००० ते ४००० फूट आहे. पहाडावरून दाट किर्र जंगल आहे. दिवसेंदिवस अधिकाधिक जमीन लागवडींत आणली जात आहे.

शिखरांचीं नांवें:—मलयगिरी ३८९५ फू. मेघासनी ३८२४ फू. गंधमादन ३४७९ फू ठाकुराणी ३००३ फू. तोमाक २५७७ फू. पांचधर २९४८ फू. गोआलदेस २५०६ फू. सुलिया २२३९ फू. कोपिलास २०९८ फू.

मुख्य नद्याः—महानदी, ब्राह्मणी, वैतरणी व बन्हावलंग.

महानदी पहिल्यानें बौद संस्थानांत प्रवेश करते. नंतर दक्षिणेस दसपल्ला, खंडपारा व कटकजिल्हा व उत्तरेस नरसिंगपूर, बराम्बा, तिगिरिया व अथगड असे दोन भाग करते. हिच्या पत्रांतून बोटी जाऊं शकतात. हिला येऊन मिळणाऱ्या नद्या—डावीकडून सापुआ, दन्डाटपा, मानो; उजवीकडून कुसुमी, कमाई, जोरामु, हिनामन्दा, गांडुणी, बोलत, साल्कीबाग, मारिनी व तेल. तेलनदी बौद व सोनपूर संस्थानमधील सरहद्दीवरून वहाते. गंगपूर संस्थानांत दक्षिण, दक्षिणकोयेल व सांख ह्यांच्या संगमास ब्राह्मणी नांव मिळालें आहे. ही तालचेर व धेनकानाल संस्थानांतून वहात जाऊन कटक जिल्ह्यांत शिरते. वर्षांतून कांहीं महिने ह्या नदीच्या पत्रांतून नावा चालूं शकतात. वैतरणीचा उगम केओंझर संस्थानाच्या वायव्येकडील टेंकड्यांत होतो. तीस मयूरभंज संस्थानांत उगम पावणारी सालंडी नदी येऊन मिळते. बन्हावलंग हिचा उगम मयूरभंजमध्यें होतो. हीस गंगाहर व सुनई ह्या दोन नद्या येऊन मिळतात.

अथमल्लिक, बरम्बा, धेनकानाल, हिन्दोल, मयूरभंज, निलगिरी व नरसिंगपूर येथील जंगलांत रानटी हत्ती पुष्कळ आहेत. वाघ, चित्ते, आस्वलें रानडुकरें वगैरे इतर वन्य श्वापदेंहि बरींच आहेत. वाघांपासून मनुष्यांस व गुरांस फार त्रास पोहोंचतो. नद्यांतून मगर विपुल आहेत. जंगलांत अहिराज सर्प व अजगर असतात.

हवामान ओरिसाप्रमाणेंच उन्हाळ्यांत उष्ण व हिवाळ्यांत थंड असतें. पाऊस सरासरी ५५ इंच पडतो. ब्राह्मणी व महानदी यांच्या पुरामुळें फार नुकसानी होते.

ह्या संस्थानांचा सुसंबद्ध असा इतिहास नाहीं. पूर्वीपासून ह्या प्रदेशांत लहान लहान स्वतंत्र संस्थानें होतीं. ह्या प्रदेशांतील मूळचे रहिवासी सूइया, सवर, गोंड व खोंड हे लोक होत. हळू हळू आर्य लोकांनीं आपल्या शक्तीच्या व हुशारीच्या जोरावर येथील लोकांस हुसकावून लाविलें. १३००वर्षांपूर्वी जयसिंग हा मयूरभंजचा राजा झाला. त्याच्या कनिष्ठ पुत्रानें केओंझरवर सत्ता बसविली. असेच बौद व दसपल्लाचे राजे होत. हे रजपूत लोक पुरी येथें यात्रेकरितां आले असतां मागें राहून त्यानीं येथें राज्यें स्थापिलीं. अथमल्लिक, नरसिंगपूर, पालहरा, तालचेर, व तिगिरिया येथील राजे देखील रजपूत होत. रणपूर संस्थान सर्वांत जुनें होय. आज अजमासें ३६०० वर्षांपासून हें संस्थान अस्तित्वांत आहे. येथील राजे खोंडवंशी आहेत.

१८०३ मध्यें ब्रिटिशांनीं मराठ्यांजवळून ओरिसा घेतलें. १० संस्थानिक एकदम मांडलिकत्व कबूल करण्यास तयार झाले. दसपल्लयास सैन्य पाठविल्यावर तेथील व इतर सर्व राजे कबूल झाले. खुर्दा संस्थान धरून त्यावेळीं एकंदर २० संस्थानें होतीं. पुढील वर्षी खुर्दाच्या राजानें बंड केलें तेव्हां त्याचें राज्य खालसा करण्यांत आलें व तें पुरी जिल्ह्यास जोडण्यांत आलें. १८४० मध्यें बाकीच्या राजांस पदच्यूत करण्यांत आलें. व त्यांचें राज्य खालसा करून कटक जिल्ह्यास जोडण्यांत आलें. १८४७ मध्यें अंगूलचें राज्य तेथील राजाच्या दुवर्तनावरून ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आलें १८९१ मध्यें खोंडमाल व ह्याचा मिळून एक वेगळा सरकारी जिल्हा बनविण्यांत आला. बौदचें अथमल्लिक व केओंझरचे पाललहरा अशीं मांडलिक संस्थानें होतीं. १८७४ चे सनदेप्रमाणें हीं दोन्हींहि स्वतंत्र संस्थानें मानण्यांत आलीं. व येथील अधिपतीस 'राजा' ही पदवी देण्यांत आली. अजूनहि पाललहरा केओंझरला खंडणी देतें. ह्या संस्थानांचा ब्रिटिश हिंदुस्थानांत समावेश होत नाहीं. मयूरभंज संस्थानांत खिचिंग येथें कांहीं पुराणवस्त्ववशेष व बौद खेड्यांतहि कांहीं चांगल्यापैकीं बांधलेलीं देवालयें आहेत.

लोकसंख्येची वाढ झपाट्यानें होत आहे. बहुतेक संस्थानांतील हवा पावसाळ्यांत व हिवाळ्यांत आरोग्यकारक नसते. गांवेः—धेनिकानालमध्येंः— १ धेनिकानाल २ भूवन. मयूरभंजमध्येंः— बरीपाडा. केओंझरमध्येंः— केओंझर. ओरिसा जिल्ह्याच्या सरहद्दीवरील लोकसंख्या सर्वांत अधिक वाढली आहे.

शेंकडा ७६.६ लोक उडीया भाषा बोलतात. मुन्डा भाषाहि बरेच लोक बोलतात. ह्यांत सन्ताली, हो, भूमिज जुआंग ह्या भाषांचाहि समावेश होतो. कांहीं लोक बंगालीहि बोलतात.

जातीः— चास, सन्ताल, पाग, गौर, हो, खंदैत, ब्राह्मण, खोंड, भूमिज, भुइया, कुर्मि, तेली, बाथुडी व सहर.

हिंदु म्हणवून घेणाऱ्यांत येथील मूळचे रहिवाशांचा बराच भरणा आहे. हे लोक मयूरभंज, केओंझर व बौद ह्या संस्थानांच्या डोंगराळ प्रदेशांतून वस्ती करून आहेत.

शेंकडा ७० ६ लोक शेतकीवर उदरनिर्वाह करितात. हरएक प्रकारची जमीन ह्या संस्थानांत आहे. खोऱ्यांतून जमीन अर्थातच सुपीक आहे. पाऊस पुरेसा पडतो. पेरणी बहुतेक खोऱ्यांतून व पहाडाच्या उतरांतून करितात.

मुख्य उत्पन्न तांदुळाचें आहे. ह्याचे तीन प्रकार आहेत. पावसाच्या सुरवातीच्या पिकास बियाली व हिवाळ्यांतील पिकास सारद म्हणतात व तदनंतर वसंत ऋतूंतील पिकास दालुआ म्हणतात. पैकीं पहिल्या दोन पिकांचें काम पावसावर भागतें. तिसरें पीक पाणथळ भागांत करितात. मका व कडधान्येंहि पिकवितात खाद्य धान्यें व गळिताचीं धान्यें पहाडांचे उतारांतून पिकवितात. ऊंस बराच लावतात. जाडी भरडी तयार केलेली साखर येथून कटक व इतर ठिकाणीं पाठवितात. कापसाचें पीकहि बरेंच होतें. सर्व कापूस बाहेर गांवीं पाठविला जातो. माळांतून तंबाखू पेरतात कुरणें बरींच आहेत. कालवे नाहींत. शेतांस जरूरी पडली असतां तलावाचें व विहिरीचें पाणी देतात.

जंगलांतून उत्तमपैकीं इमारतीलांकूड सांपडतें. महानदी व ब्राह्मणीच्या प्रदेशांत इमारतीलांकूड मुबलक आहे. धेनकनाल, केओझर, मयूरभंज, निलगिरी, पाललहरा व तालचेर संस्थानांतून 'सबई' नांवाचें एक प्रकारचें गवत सांपडतें. त्याच्या दोऱ्या वळतात व त्यापासून कागदहि तयार करितां येतो. जंगलापासून उत्पन्न ( १९०३–४ ) २.५ लाख झालें.

तालचेर येथें कोळसा सांपडतो. पण हा कोळसा चांगल्यापैकीं नाहीं. चुनखडी तर सर्वत्र सांपडते. लोखंडहि सांपडतें. मयूरभंज येथील लोखंड उत्तमपैकीं असतें. धेनकनाल, केओंझर व पाललहरा येथें सुवर्णरज सांपडतात. अथमल्लिक, मयूरभंज व नयागड येथें काव सांपडते.

बराम्बा व टिगिरियांत उत्तमपैकीं टसर रेशमाचे व सुती कापड तयार होतें. खंडपारा व नरसिंगपूर येथें पितळेचीं व कांस्याचीं भांडीं बरींच तयार होतात. पूर्वी येथें खोदीव काम फारच उत्तमपैकीं होत असे. बहुतेक व्यापार फिरस्ते

व्यापाऱ्यांच्या हातीं आहे. ते येथून तांदूळ, कडधान्यें, गळिताचीं धान्यें वगैरे घेऊन जातात व मीठ, सुके मासे, परदेशी सुती कापड व मातीचें तेल ( रॉकेल ) वगैरे माल बाहेरून विक्रीकरितां येथें घेऊन येतात. त्याप्रमाणें इमारती लांकूडफांटाहि हे लोक घेऊन जातात. मुसुलमान लोक चामड्याचा व्यापार करितात. कटक, बलासोर व पुरी ह्या गांवांशीं बहुतकरून व्यापार चालतो.

खंडपारामधील कान्तिलो, केओंझरमधील आनंदपूर व धेनकानालमधील भुवन व धेनकानाल हीं मुख्य बाजाराचीं गांवें होत. नद्यांच्या पात्रांतून वर्षांतून ८ महिने होड्या चालतात.

रणपूर, निलगिरी, मयूरभंज ह्या संस्थानांजवळून बंगाल-नागपूर रेलवेची लाईन जाते. बारीपाडा येथें नुकतीच छोटी लाईन झाली आहे.

१८६६ चा ओरिसांतील मोठा दुष्काळ ह्या संस्थानांतून भासला नाहीं. १८९७–१९०० च्या दरम्यान जरा दुर्भिक्ष भासलें.

१८०३ मध्यें हीं संस्थानें ओरिसाबरोबर ताब्यांत घेण्यांत आलीं होतीं, पण तेव्हां देखील हीं संस्थानें मांडलिक मानण्यांत येत असत. १८१४ मध्यें एक 'सुपरिंटेन्डेट ऑफ दि ट्रिब्युटरी स्टेटस' नेमण्यांत आला. त्याकडे जमीनदाराच्या जुलमांस व अरेरावीपणास आळा घालण्याचें काम सोंपविलें होतें. त्याचप्रमाणें १८१६ च्या ११व्या रेग्युलेशन-प्रमाणें राजाचे वारस नेमणेचा व गादीचे हक्क काढून घेण्याचा अधिकार देण्यांत आला. १८२१ मध्यें त्यानें फक्त राजकीय कामांतच ढवळाढवळ करावी असें ठरविण्यांत आलें. राजांचा वैरभाव वाढूं न देणें, घराण्यांतील भांडणें मिटविणें व मांडलिकांशीं तंटे न होऊं देणें, हीं कामें त्याजकडे सोंपविण्यांत आलीं. सरहद्दीविषयक भांडणें मिटविण्याकरितां बरेच कायदे पास करण्यांत आले. १८८२ मध्यें कलकत्ता हायकोर्टानें ओरिसा मांडलिक संस्थानें हीं ब्रिटिश हिंदुस्थानचा भाग नव्हे असें ठरविलें. इ. स. १८९४ सालीं सर्व संस्थानिकांनां सनदा देण्यांत आल्या. त्यांत हक्कांविषयीं वगैरे सर्व मुद्दे नमूद केले आहेत.

मयूरभंज संस्थान सोडून इतर संस्थानांतील राज्यपद्धति जुन्या चालीची आहे. प्रत्येक संस्थानांत दिवाणाची नेमणूक आहे. संस्थानिकांच्या अज्ञानपणांत संस्थानांची व्यवस्था सरकाराकडे असते. संस्थानिकांनां २ महिन्यांची कैद, १००० रुपये दंड, किंवा ३० फटके यांवर शिक्षा देण्याचा अधिकार नाहीं. १८६२ व १८९१ सालीं केओंझरमध्यें भुईया लोकांनीं बंड केलें होतें; त्याचप्रमाणें १८९४ मध्यें नयागडमध्यें खोण्ड लोकांनीं बंड केलें होतें.

संस्थानांतून उत्पन्नाचा व खर्चाचा बरोबर हिशेब ठेवला गेला नसल्यामुळें नक्की कांहींच सांगतां येत नाहीं. मयूरभंज व इतर ५ सरकारव्यवस्थेखालीं असलेल्या संस्थानांतून मात्र जमाखर्चाचा हिशेब ठेवण्यांत आला आहे. कांहीं कांहीं संस्थानांस जंगलामुळें चांगलेंच उत्पन्न होतें. जमाबंदीची पद्धत फारच साधी आहे. संस्थानिकांच्या परवानगीशिवाय कास्तकारास जमीन विकण्याचा, इनाम देण्याचा किंवा गहाण टाकण्याचा हक्क नसतो. जमाबंदीची मुदत १०।१५ वर्षें असते. सरबराईकारांच्या तर्फे सारावसुली करतात. सरबराईकाराची नेमणूक एका किंवा अधिक गांवाकरितां असते. त्यांनां शेंकडा ५ ते १५ टक्के सूट देण्यांत येते. प्रत्येक संस्थानांतून तुरुंग आहेत

हीं संस्थानें शिक्षणाच्या बाबतींत फार मागसलेलीं आहेत. १९०१ सालीं शेंकडा ३.३ लोकांस लिहितां वाचतां येत होतें. टिगिरिया संस्थान सोडून इतर सर्व संस्थानांत दवाखाने आहेत.

**ओमेरॉड एलिनॉर** ( १८२८-१९०१ )—ही प्रसिद्ध कीटकशास्त्रज्ञ बाई. 'हिस्टरि ऑफ चेशायर' या ग्रंथाचा कर्ता जॉर्ज ओमेरॉड एफ्. आर. एस. याची मुलगी होती. ग्लूसेस्टर परगण्यामधील सेडबरी पार्क या ठिकाणीं हिचा जन्म झाला. लहानपणापासूनच तिला या कीटकशास्त्राचा नाद होता व तिची घरची परिस्थिति चांगली असल्याकारणानें तिला या शास्त्राचा खोल अभ्यास करण्याला चांगली संधि मिळाली. किड्यांपासून शेतकीला नुकसानकारक असे कोणते कोणते रोग उत्पन्न होतात याची माहिती मिळविण्यासाठीं रॉयल हॉर्टिकल्चरल सोसायटीनें प्रयत्न सुरू केले. या कार्यांत, ओमेरॉड बाईची त्या संस्थेला फार मदत झाली व त्या संस्थेनें ओमेरॉडला एक पदक बक्षीस दिलें. १८७७ मध्यें तिनें 'नोट्स फॉर ऑब्झर्वेशन्स ऑन इंज्यूरियस इन्सेक्ट्स' यासंबंधीं एक छोटेसें पुस्तक प्रसिद्ध केलें व या शास्त्राविषयीं आवड असणाऱ्या प्रसिद्ध लोकांकडे त्याच्या प्रती फुकट पाठवून दिल्या. या शास्त्रांतील इतर तज्ज्ञांनीहि आपापले शोध ओमेरॉडला कळविले; व अशा रीतीनें या विषयासंबंधींची चर्चा करणारें दर वर्षी एक अहवालात्मक पुस्तक तयार होऊं लागलें. १८८१ सालीं 'टर्निपफ्लाय' ( टर्निप नांवाच्या झाडाला लागणारी माशी ) यासंबंधीच्या माहितीचें एक पत्रक तिनें प्रसिद्ध केलें. १८८२ सालीं रॉयल ॲग्रिकल्चरल सोसायटीच्या कीटकशास्त्र खात्याच्या बाबतींत सल्लागार म्हणून हिची नेमणूक झाली. सिरेन्सेस्टर येथील रॉयल ॲग्रिकल्चरल कॉलेजमध्यें तिला कीटकशास्त्रावर व्याख्यानें देण्यासाठीं नेमण्यांत आलें. पण तिची कीर्ति केवळ इंग्लंडमध्येंच पसरली होती असें नाहीं. तिला मॉस्कोच्या विश्वविद्यालयानें तिच्या कीटकशास्त्रनैपुण्याबद्दल पुष्कळ पदकें बहाल केलीं. तिनें दक्षिणआफ्रिकेमधील उपद्रवी कीटकांसंबंधीं एक छोटेसें पुस्तक प्रसिद्ध केलें. इ. स. १८९९ मध्यें फ्रान्समधील एका शास्त्रीय संस्थेनें तिला एक मोठें चांदीचें पदक अर्पण केलें. कॉवडेन जर्नल्स, मॅन्युअल ऑफ इंज्यूरियस इनसेक्ट्स,

हँडबुक ऑफ इनसेक्ट्स इंज्यूरियस टु ऑर्चेड अँड बुश-फ्रूट्स इत्यादि तिचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या शास्त्रांतील तिच्या नैपुण्यावद्दल तिची अत्यंत स्तुति करून एडिंबरो विश्वविद्यालयानें तिला एल्‌एल्‌. डी. ची पदवी बहाल केली. एल्‌एल्‌. डी. ची पदवी या विश्वविद्यालयाकडून मिळविणारी पहिली बाई हीच होय. १९०१ मध्यें सेंट अल्बन्स या ठिकाणीं ती मृत्यू पावली.

**ओलपाड**—मुंबई इलाख्यांतील सुरत जिल्ह्याचा एक वायव्येकडील तालुका. क्षेत्रफळ ३१२ चौ. मै. ह्या तालुक्यांत ११८ खेडीं असून एक ओलपाड नांवाचा गांव आहे. लोकसंख्या ( १९११ ) ५३५०६. जमीन सपाट असून हवा आरोग्यकारक आहे.पाऊस सरासरी३९इंच पडतो. या गांवाला मुलकी व पोलीस कचेरी व त्याशिवाय पोष्ट-ऑफीस, दवाखाना व सबॉर्डिनेट जज्जाची कचेरीहि आहे.

**ओल्डहॅम**—इंग्लंड देशांतील लँकाशायरमधील म्युनिसिपल काउंटी व पार्लमेंटरी बरो. लोकसंख्या (१९२१) १४८३००. ह्या शहरास पुष्कळ स्टेशनें असून मुख्य स्टेशनाचें नांव मंप्स आहे. हें शहर मेडलॉक नदीच्या मुखाजवळ एका उंच जागीं वसलेलें आहे. येथील मुख्य इमारती व संस्था म्हणजे नगरभवन, ग्रंथालय, चित्रसंग्रहालयें, व पदार्थसंग्रहालय, युनियन स्ट्रीट–स्नानागार व कोर्टे या होत. लिसिआममध्यें कला व विज्ञान यांच्या शाळा असून एक वेधशाळाहि आहे. याशिवाय दुसऱ्या शिक्षणसंस्था आहेत. हें कापडाच्या कारखान्यांचें केन्द्र असून संयुक्त राज्यांत येणाऱ्या कापसापैकीं १/४ कापूस ओल्डहॅम येथें येतो. येथें २३० गिरण्या असून त्यांत ३५००० लोक काम करीत असतात. याशिवाय ओतीव कामाचे कारखाने, गिरण्यांचीं यंत्रें तयार करण्याचे कारखाने, शिवणकामाचीं यंत्रें तयार करणें असे दुसरे उद्योगधंदे आहेत. सर्व कारखान्यांना लागणारा कोळसा जवळच खाणींत सांपडतो. १८३२ पासून या बरोतून पार्लमेंटला दोन सभासद निवडतात. या शहरांतून जाणाऱ्या रोमन रस्त्याच्या खुणा अद्यापि दृष्टीस पडतात.आर्कराईटच्या यंत्राचा उपयोग करूं लागल्यापासून ओल्डहॅमची फार सुधारणा झाली.

**ओल्डहॅम थॉमस** ( १८१६–१८७८ )–एक ब्रिटिश भूस्तरशास्त्रज्ञ. हा डब्लिन येथील ट्रिनिटी कॉलेजमध्यें अभ्यास करून १८३६ त बी. ए. झाला.पुढें एडिंबरो येथें एंजिनिअरिंगचा अभ्यास करीत असतां भूस्तरशास्त्र व खनिजशास्त्र यांत त्यानें पारंगतता मिळविली. १८३९ त डब्लिनला परत येऊन भूस्तरखात्याचा (ऑर्डनन्स सर्व्हेचा) अधिकारी कॅप्टन पोर्टलॉक याचा मुख्य मदतनीस झाला व 'रिपोर्ट ऑन दि जिऑलॉजी ऑफ लंडनडेरी एट्सेट्रा' तयार करण्याच्या कामीं चांगली मदत केली. १८४६ त आयर्लंडच्या भूस्तरशास्त्रीय पाहणीचा ( जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ आयर्लंड ) तो चालक झाला. यापूर्वी डब्लिनच्या विश्वविद्यालयांत भूस्तरशास्त्राचा प्रोफेसर म्हणून त्याची नेमणूक झाली होती. १८४८ त त्याला रॉयल सोसायटीचा फेलो (एफ. आर. एस.) निवडण्यांत आलें.पुढील सालीं ब्रेहेड येथील कॅंब्रियन खडकांत त्यानें "ओल्डहॅमिया' नांवाचा प्रस्तरावशेष शोधून काढला. १८५० मध्यें हिंदुस्थानच्या भूस्तरशास्त्रीय पाहणीच्या खात्याचा (जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडियाचा ) तावा घेण्यास त्याला बोलविण्यांत आलें. त्यानें त्याची नीट व्यवस्था करून ठेऊन टिपणें ( मेमॉईर्स ) भारतीय प्रस्तरावशेष (' पॅलीऑन्टॉलॉजिआ इंडिका' )व नोंद ( रेकॉर्ड्स )हीं नियतकालिकें सुरू करविलीं. त्यांतून त्याचे लेख प्रसिद्ध होत. ' ऑन दि कोल रिसोर्सेस ऑफ इंडिया ' हा हिंदुस्थानांतील कोळशासंबंधींचा अहवाल त्यानें १८६४ त प्रसिद्ध केला. १८७६ त यानें नोकरी सोडली व पुढें दोन वर्षांनीं रुग्बी येथें मरण पावला.

**ओल्डेनबर्ग**—जर्मनींतील ओल्डेनबर्ग लोकसत्ताक राज्यांतील मुख्य शहर. हें ब्रेमेनच्या पश्चिमेस २७ मैलांवर हुन्टे आणि हुन्टे एम्स काल्व्यावर वसलेलें आहे. ह्या कालव्यांत नावा चालूं शकतात. लोकसंख्या ( १९१० ) ३०२४२. येथें एकहि पद्माण्यासारखी जुनी अशा प्रकारची इमारत नाहीं. नवीन इमारतींपैकीं कांहीं मुख्य मुख्य इमारतींत युवराजांचा वाडा, नवीन नगरभवन, न्यायकचेऱ्या, प्राणिशास्त्राचा अजबखाना, पुरातन वस्तुसंग्रहालय यांची गणना होते. येथले उद्योगधंदे फारसे महत्त्वाचे नाहींत. लोखंड ओतणें,सूत काढणें, तमाखू, कांचसामान, साबू व कमावलेलें कातडें तयार करणें हे त्यांपैकीं कांहीं आहेत. येथें धान्याचा बराच मोठा व्यापार चालतो. व घोड्यांच्या जत्रा भरतात. इतिहासांत ओल्डेनबर्गचा उल्लेख ११०८ त केलेला आढळतो. ११५५ त.ह्याला तटबंदी केली; व१३४५ त नगरराज्याचे हक्क मिळाले.

**ओवसा ( औसा ), तालुका**.—हैद्राबाद संस्थानांतील उस्मानाबाद जिल्ह्याचा एक पूर्वेकडील तालुका. क्षेत्रफळ ३३६ चौ. मै. जहागिरी धरून लोकसंख्या ( १९०१ ) ८७४१६. मोठीं गांवें ओवसा ( तालुक्याचे मुख्य ठिकाण) व लातूर. खेडीं १३० पैकीं जहागिरी २६.

भीर व हा तालुका यांच्या दरम्यान मांजरा नदी आहे. पूर्वेस मांजरेच्या पलीकडे बेदर जिल्हा आहे. ओवसाच्या पूर्वेस ११ मैलांवर घरोसा खेड्यानजीक एक लहान डोंगराची ओळ आहे. साऱ्याचें उत्पन्न (१९०१) १.७लाख रुपये.

**गांव**.—हैद्राबाद संस्थानांतील उस्मानाबाद जिल्ह्याच्या ओवसा तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अ. १८° १५' व पू. रे. ७७° ३०' लोकसंख्या ( १९११ ) ५४४६. निजामशाहीचा प्रधान मलिक अंबर ह्यानें येथील किल्ला घेतला. त्या वेळेस ' अम्बरपूर ' हें नांव दिलें. त्याचाच अपभ्रंश अम्रापूर होय. हा किल्ला विजापुरच्या राजांनीं बांधला असें म्हणतात. येथें एक मोठी तोफ व एक मोठें भुयार आहे.

औरंगझेबानें दक्षिणेंत सुभेदार असतांना बांधलेली एक मशीद येथें आहे. येथें धान्याचा व्यापार चालतो. येथून माल सोलापूर व बार्शीस पाठविला जातो

**ओवा**.—ओव्यास संस्कृतांत धनानी, गुजराथींत यवान, हिंदींत अजवान, बंगालींत यमानी वगैरे नांवें आहेत.

ओव्याची लागवड सर्व हिंदुस्थानांत व मुख्यत्वेंकरून बंगाल्यांत करितात. मिसर, इराण व अफगाणिस्तानांतहि ओव्याचें झाड उत्पन्न होतें. यूरोपांत याची लागवड अलीकडे सुरु झाली आहे.

फ्रान्सच्या १४ व्या लुईच्या पदरीं असलेल्या पोमेट राजवैद्यानें उत्तम ओवा अलेक्झांड्रिया व क्रीटमधून येतो असें लिहिलें आहे ( १७१२ ).

**लागवड**.—हिंदुस्थानांत ओव्याची लागवड आक्टोबर व नव्हेंबर या महिन्यांत वांधांवरून प्रत्येक रोपामध्यें ६ इंचांचें अंतर ठेवून करितात. खतापासून याला बराच उपद्रव होतो व याला पाणी मुबलक लागतें.

ओवा बागाइतांत होतो. याचीं झाडें सुमारें हात दीड हात उंच वाढतात. ओव्याचा अर्क काढितात. त्यास ओव्याचें फूल म्हणतात. हें मध्यहिंदुस्थानांत उज्जनी, इंदूर येथें काढतात. हें फूल तयार करण्याचे कारखाने मुंबई,कलकत्ता वगैरे ठिकाणीं नवीन पद्धतीवर सुरू आहेत. मुंबई इलाख्यांत ओव्याच्या पिकाखालीं दरसाल सुमारें ५००-६०० एकर क्षेत्र असतें. मध्यप्रांतांत नेमाडांत याची लागवड जुजवी आढळते. मद्रास इलाख्यांत नंदियाल खोऱ्यांत व तिनवेल्ली जिल्ह्यांत काळ्या जमिनींत ओव्याचा उतवडा टाकितात. मुंबई इलाख्यांत खेडा जिल्ह्यांत याची लागवड हिंवाळ्यांत जिऱ्याबरोबर करितात. खेडा जिल्ह्यांत ओवा मार्च महिन्यांत म्हणजे जिरें काढल्यावर महिन्यानें अगर सव्वा महिन्यानें तयार होतो. पुणें जिल्ह्यांत ओवा जून जुलई महिन्यांत भुईमुगांत टाकितात. तो जानेवारींत तयार होतो. दर एकरी सरासरी उत्पन्न १२० पौंड होतें.

१९०३ सालीं मुंबईहून ८६४१ हंड्रेडवेट ओवा परदेशीं गेला. त्यापैकीं ८४४३ हंड्रेडवेट जर्मनीनें खरेदी केला व बाकीचा अमेरिका व ईजिप्त ( मिसर ) येथें गेला. ओव्यांतील अर्क व पाणी काढून टाकलेल्या ओव्यांत शेंकडा १५ पासून १७ पर्यंत ओजस द्रव्य असून शेंकडा २५ पासून ३२ पर्यंत चरबी असते म्हणून गुरांना तो चारतात ओव्यापासून पुढील जिन्नस तयार करतात.

**ओव्याचें तेल**.—ओव्याचें ताजें तेल अगदीं स्वच्छ व रंगरहित असतें, परंतु लौकरच तें किंचित पिवळसर होतें. ओव्याप्रमाणेंच त्यास वास असून रुचि तिखट व तीव्र असते हें एक थेंबापासून तीन थेंबांपर्यंत साखरेवर टाकून अथवा डिंकाच्या पाण्यांत मिसळून देतात.

**ओव्याचें पाणीः**—ठेंचलेला ओवा २० औंस व पाणी २ ग्यालन घेऊन रितीप्रमाणें त्या पाण्याची वाफ करून १ ग्यालन पाणी काढावें. पोटांत घेण्याचें प्रमाणः—१ औंसपासून २ औंसापर्यंत एरंडेलासारखीं घाण, वास, व रुचि असलेलीं सारक औषधें ह्या पाण्यांत मिसळून घेतलीं असतां त्यांची रुचि व वासहि न समजून त्यांपासून जी मळमळ व पोटांत कळ वगैरे लक्षणें उद्भवतात तींहि उद्भवत नाहींत. शिवाय, ह्याच्या अंगीं वायुहारक असे उत्तम गुण आहेत.

**ओव्याचें फूल**.—मध्यप्रदेशांत उज्जनी वगैरे ठिकाणीं, मुख्यतः थंडीच्या दिवसांत हें तेल तयार करितात. हें सर्व ठिकाणीं बाजारांत मिळतें. वाफ करून ओव्याचें जें पाणी तयार करतात. त्याच्यावर आपोआप ओव्याचें फूल जमतें. ह्याचे चकचकीत व अमळसे पिवळसर खडे असतात. हें जंतुमारक व दुर्गंधनाशक असतें. यानें ज्वर व हगवण कमी होते ( अजमोदल पहा ).

**ओव्याचें चूर्णः**—ओवा, शेंधेलोण, पादेलोण, यवक्षार, हिंग व हिरडा हीं समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण तयार करावें. प्रमाण १०–२० ग्रेनपर्यंत. हें ऊन पाण्याच्या घोटाबरोबर अगर मधांत मिश्र करून घेतलें असतां पोटदुखीवर चांगला उपयोग होतो.

**गुणधर्म व उपयोगः**—ओव्याच्या अंगीं उत्तम उत्तेजक, पौष्टिक व वायुहारक आणि स्नायूंचा संकोच दूर करण्याचे धर्म आहेत; म्हणजे अनुक्रमें मिरची किंवा मोहरी, काडे चिराईत व हिंग ह्या तिघांच्या अंगचे जे विशिष्ट गुण ते एकट्या ओव्याच्या अंगीं आहेत. ओव्याच्या माफक प्रमाणापासून लाळेची उत्पत्ति अधिक होते, तसेंच जाठररसहि अधिक उत्पन्न होऊं लागतो; घसा येतो तेव्हां दुसऱ्या स्तंभक औषधांबरोबर गुळण्या करणें वगैरे बाह्योपचाराच्या कामीं ओव्याचा पुष्कळ उपयोग करितात. घाणेरड्या औषधांची रुचि व गंध हीं समजून न येण्यास ओव्यासारखें दुसरें औषधच नाहीं म्हटलें तरी चालेल.

ओवा कडू, तिखट व उष्ण आहे. उचकी,पोट फुगणें,अरुची, या रोगांस हा घालवितो. अग्नि दीपन करतो. पोटदुखी, नळवात, खोकला अजीर्ण, पडसें मस्तकशूळ इत्यादि विकारांवर ओव्याचा फार उपयोग होतो. पोटदुखी, नळ,खोकला, व अजीर्णांवर ओवा खाऊन वर ऊन पाण्याचा घोट घ्यावा. पडसें व मस्तकशूळावर–ओव्याचें चूर्ण करून तें वस्त्रांत बांधून हुंगण्यास द्यावें किंवा ओव्याची विडी करून ओढावी. बहुमूत्रावर ओवा व तीळ एकत्र करून द्यावें.

**किरमाणी ओवा**.—यास इंग्रजींत वर्मसीड, संस्कृतांत चौर व मराठींत किरमाणी किंवा चौर ओवा असेंहि नांव आहे. काश्मीरपासून कुमाऊनपर्यंतच्या प्रदेशांत व पश्चिम तिबेटांच्या लवणांत हीं झाडें पुष्कळ आहेत. लिव्हॅन्टमधील किरमाणी ओवा, इराण व एशियामायनरमधून व बारबरी किरमाणी ओवा पॅलेस्टाईन व अरेबियामधून हिंदुस्थानांत येतो.

किरमाणी ओंव्याच्या फुलाचा वरचा भाग कृमिघ्न व रेचक औषध म्हणून उपयोगांत आणितात. या ओंव्यांतून 'सॅन्टोनाइन' नांवाचें सत्व १८३० मध्यें एका रशियन वैद्यानें शोधून काढलें. हें सत्त्व पोटांतील जंतविकारावर १ते३ गुंजांपर्यंत वयमानाप्रमाणें साखरेबरोबर रात्रीं देतात. व सकाळीं सुंठीचा काढा व एरंडेल तेल यांत देतात. सॅन्टोनिन हें सध्यां जर्मनीमधून हिंदुस्थानांत येतें. रशिया, अफगाणिस्तान व इराण या देशांतूनहि सॅन्टोनिन येतें. बाजारांतील सॅन्टोनिन बहुधा टंकिकाम्लाशीं व गोंदाशीं मिसळलेलें असतें. हिमालयांत घोड्यांनां हीं झाडें खावयास घालतात व ते आवडीनें खातात. किरमाणी ओंव्याच्या इतर जातींचीं झाडें पंजाबांत बकऱ्यांनां खावयाला देतात.

या झाडांत तंतूपेक्षां श्वेतकल्ककल्प(अल्ब्युमिनस)पदार्थांचें व कार्बोहायड्रेट पदार्थांचें प्रमाण कमी असतें. तरी इतर खाद्य धान्याच्या झाडांपेक्षां एब्युमिनसचा अंश जास्त असतो. हीं झाडें त्यांच्या उग्र वासामुळें व त्यांतील चोथ्यांमुळें घोड्यांनां जरी फारशीं उपयोगी नसलीं तरी इतर गुरांनां तीं चांगलीं पुष्ट करणारीं असतात.

ना ग डो णी.—याला फ्ली-बेन, नागडौन, नागडोनी, टाटोर,सुरबन्द इत्यादि नांवें आहेत.हिंदुस्थानांतील सर्व डोंगराळ प्रदेशांत हीं झुडपें समूहानें आढळतात. यूरोप, सयाम, जावा इत्यादि देशांच्या समशीतोष्ण प्रदेशांतहि हीं झाडें आहेत. हें जठराग्नि प्रज्वलित करणारें शक्तिवर्धक औषध आहे.हिंदु लोक याचा रेचक व आवर्तजनक औषधासारखा उपयोग करतात. याचा कधीं कधीं तापावरहि उपयोग होतो. चिनी लोक दुःखाच्या जागीं याचा लेप देतात.हा ओंवा प्रातःकाळीं शिळ्या पाण्याबरोबर किंवा विड्यांतून दिल्यास कृमिरोग (जंतविकार) दूर होतो. [ संदर्भ ग्रंथ—पदे. वॅट. भिषग्विलास, पु. १४ व १८. ]

**ओवेन, रॉबर्ट** ( १७७१-१८५८ )— इंग्रज समाजसुधारणावादी, याचा बाप न्यूटौनमध्यें जिनगराचा व लोहाराचा धंदा करीत असे. तेथल्या शाळेंत ओवेनचें शिक्षण ९ व्या वर्षांपर्यंत झालें. नंतर एका कापडवाल्याच्या दुकानांत कांहीं वर्षें नोकरी करून त्यानें मॅन्चेस्टर येथें स्वतंत्र दुकान काढलें. १९व्या वर्षी तो एका कापसाच्या गिरणीचा मॅनेजर झाला व स्वतःच्या हुषारीनें व मेहनतीनें त्यानें ती ग्रेटब्रिटनमधील पहिल्या प्रतीची गिरणी बनविली. १७९४ मध्यें तो मॅन्चेस्टर येथील चॉर्लटॉन ट्विस्ट कंपनीचा मॅनेजर व भागीदार झाला. ट्विस्ट कंपनीच्या भागीदारांनीं न्यू लॅनार्क मिल्स विकत घेतल्या व तेथला मॅनेजर व पातीदार होऊन ओवेन ग्लासगोला १८०० पासून राहूं लागला. त्या गिरणीमध्यें सुमारें दोन हजार कामकरी होते.त्यांपैकीं पांचशें मुलें होतीं. तीं बहुतेक ग्लासगो व एडिनबरो येथील अनाथालयांतून पांचव्या सहाव्या वर्षी आणून कामावर लावलेलीं होतीं. त्यांची सुधारणा करण्याचें काम ओवेननें हातीं घेतलें. लहान वयाच्या मजूर मुलांनां शिक्षण देण्याच्या रात्रीच्या शाळा वगैरे नव्या पद्धती त्यानें काढल्या. १८१३ मध्यें त्यानें मोफत शिक्षणासंबंधानें स्वतःचे कांहीं निबंध प्रसिद्ध केले. तत्कालीन धार्मिक आचाराविचारांवरहि त्याची श्रद्धा नव्हती. मनुष्याचा स्वभाव व संवयी तो ज्या परिस्थितींत वाढतो तिच्यावर अवलंबून असतात; म्हणून चांगल्यावाईट आचरणाबद्दल मनुष्य स्वतः स्तुतिनिंदेस पात्र नसून तत्संबंधीं सर्व जबाबदारी परिस्थितीवर आहे. म्हणून सद्वर्तनी बनविण्याकरितां मुलांनां अगदीं लहान वयापासून सत्संगतींत ठेवणें जरूर असतें. हीं ओवेनच्या शिक्षणविषयक व सामाजिक सुधारणेचीं मुख्य तत्त्वें होत. त्याच्या न्यू लॅनार्क येथील संस्थेचें महत्व इंग्लंडलाच नव्हे तर सर्व यूरोपला वाटूं लागलें.

आतांपर्यंत ओवेन सर्व कार्य परोपकार या एकाच बुद्धीनें करीत होता; परंतु १८१७ मध्यें तो समाजसत्तावादी बनला. नेपोलियनबरोबरच्या युद्धानंतर व्यापाराला मंदी आल्यामुळें मजूर बेकार होऊन त्यांची उपासमार होऊं लागली. त्याकरितां मजुरांनां काम मिळून उपासमार टळावी म्हणून त्यानें पुढील योजना सुचविली. १००० ते १५०० एकर जमीन घेऊन तेथें १२००पर्यंत लोकांची एक वसाहत करावी. सर्वांनीं एका इमारतींत राहून एकत्र जेवणखाण करावें. जमीनीची लागवड त्यांनीं समाईकप्रमाणें करावी व उत्पन्नाचा उपभोग एकत्र घ्यावा. शेतकी हा मुख्य धंदा असला तरी इतर प्रकारचे धंदे करून समाजाच्या सर्व गरजा तेथें भागवाव्या. यंत्राचाहि उपयोग करावा. येणेंप्रमाणें सर्व देशांत व सर्व जगांत वसाहती किंवा समाज वसवावे.१८२५मध्यें ग्लासगोनजीक ओवेनच्या एका अनुयायानें प्रयोगादाखल अशी एक वसाहत वसवली व खुद्द ओवेननें अमेरिकेंत जाऊन न्यू हार्मनी येथें दुसरा प्रयोग आरंभिला. दोन वर्षें हे प्रयोग चालून अखेर त्यांत पूर्ण अपयश आलें. सदरहू वसाहतींत चांगले उच्च दर्जाच्या व ध्येयाच्या इसमांबरोबरच भटके,अनाचारी, उतावळे, धाडसी अशा अनेकांची खिचडी झाल्यामुळें कोणाचा कोणाशीं मेळ बसेना. यामुळें तें कार्य सोडून देऊन व स्वतः पदराला बराच मोठा चट्टा लावून घेऊन ओवेन इंग्लंडांत परत आला; व तेथेंच राहून त्यानें पुन्हां कांहीं समाजसत्ताविषयक योजनांचे प्रयोग सुरू केले. १८३२ मध्यें त्यानें न्याय्य श्रमविनिमय ( एक्विटेबल लेबर एक्सचेंज ) पद्धति सुरू करून श्रमदर्शक नोटा ( लेबरनोट्स ) काढल्या; व अशा रीतीनें नेहमींचीं चलनें व दलाल वगैरे मध्यस्थांची आवश्यकता नाहींशी करण्याची मोठी चमत्कारिक योजना पुढें मांडली. १८३५ मध्यें सर्व राष्ट्रांतील सर्व वर्गांची असोसिएशन त्यानें काढली, व त्या संस्थेंतील वादविवादांतच सोशॅलिझम ( समाजसत्तावाद ) हा शब्द प्रथम प्रचारांत आला.विवाहसंबंधाविषयींचीं त्याचीं मतें कडक नीतिनिर्बंधन पोषक नव्हतीं; व तीं त्यानें या सुमारास प्रसिद्ध केल्यामुळें

तो एक समाजाला धक्का बसला. सामाजिक पंथी वसाहतींचे आणखी प्रयोगहि त्यानें चालू केले. त्यांतून खरें उपयुक्त व टिकाऊ असें सहकारी धंद्यांचें तत्त्व मात्र जोरांत पुढें आलें. ओवेनहि अखेर नास्तिकपणा टाकून देऊन अध्यात्मवादी बनला.

**ओवेन सर रिचर्ड**—( १८०४–१८९२ ). हा प्रसिद्ध प्राणिशास्त्रज्ञ १८०४ सालीं जुलै महिन्यांत लँकेस्टर या गावीं जन्मला. याच शहरांतील एका शाळेंत त्याचें प्राथमिक शिक्षण झालें. सन १८२० मध्यें, एका औषधीविक्याच्या दुकानीं तो नोकरीस राहिला. तेथें चार वर्षें नोकरी केल्यावर तो एडिंबरो विश्वविद्यालयांत वैद्यकीचा अभ्यास करण्यासाठीं गेला. एकच वर्षानंतर त्यानें तें विश्वविद्यालय सोडलें,व लंडन येथील सेंट बार्थोलोम्यू हॉस्पिटलमध्यें आपलें नांव दाखल केलें. या ठिकाणीं त्यानें आपला अभ्यासक्रम पुरा केला. या हॉस्पिटलमधील शस्त्रवैद्य जॉन अबरनथी याच्याबद्दल त्याच्या मनांत अतिशय आदर असे. या शस्त्रवैद्याच्या सल्ल्यानें त्यानें 'रॉयल कॉलेज ऑफ सर्जन'च्या म्यूझियमचा जो क्लिफ्ट नांवाचा व्यवस्थापक होता त्याच्या हाताखालीं नोकरी धरली. या जागेवर असतां या कॉलेजमधील 'हंटर'च्या स्मरणार्थ ठेवलेल्या वस्तुसंग्रहाचा त्यानें एक कॅटलॉग तयार केला. हें काम करीत असतांना त्याला शारीरशास्त्राची सांगोपांग माहिती झाली. व त्यामुळें त्याचा अतोनात फायदा झाला. १८३६ मध्यें 'रॉयल कॉलेज ऑफ सर्जन्स' मध्यें त्याची प्रोफेसरच्या जागेवर नेमणूक झाली. १८४९ मध्यें या कॉलेजच्या म्यूझियमचा क्लिफ्टच्या पश्चात तो मुख्य व्यवस्थापक झाला. १८५६ मध्यें ब्रिटिश म्यूझियमच्या जीवशास्त्राच्या शाखेचा व्यवस्थापक म्हणून त्याची नेमणूक झाली. त्याच्या प्रयत्नानें, या शाखेचा चांगला उत्कर्ष होऊन या शाखेसाठीं साउथ केन्सिंग्टन येथें स्वतंत्र इमारत बांधण्यांत आली. १८८४ मध्यें त्याला के. सी. बी. हा किताब मिळाला. १८९२ मध्यें तो मरण पावला.

हंटरच्या स्मरणार्थ ठेवलेल्या वस्तुसंग्रहाचा कॅटलाग तयार करीत असतां त्याला शारीरशास्त्राची सांगोपांग माहिती झाली असें वर सांगण्यांत आलेंच आहे. या ठिकाणीं असतांना त्याला तेथील प्राणिसंग्रहसंस्थेमधील जे प्राणी मरत असत त्यांच्यासंबंधीं प्रयोग करण्याची संधि मिळाली. या संस्थेतर्फे जे शोध प्रसिद्ध करण्यांत येत असत त्यांत ओवेननें आपल्या शोधांची पुष्कळच भर घातली.

पृष्ठवंश प्राण्यासंबंधींची सूक्ष्म माहिती यानें जमवून त्यासंबंधींचें तीन भागाचें एक मोठें पुस्तक लिहिलें. या पुस्तकांत त्यानें नष्ट झालेल्या पृष्ठवंश प्राण्यांच्या जातींसंबंधींहि बरीच माहिती दिली होती. प्राण्यांच्या दातांचा त्यानें खोल अभ्यास केला होता, व त्याबद्दलहि त्यानें सचित्र पुस्तक प्रसिद्ध केलें. मत्स्यासंबंधींहि त्यानें चांगला अभ्यास करून त्यांच्यावर पुष्कळ लेख लिहिले. या लेखांत विशेष महत्त्वाचा लेख म्हणजे प्रोटोप्टेरस नांवाच्या एका आफ्रिकेंत सांपडणाऱ्या चिखलांत राहणाऱ्या माशासंबंधींचा होय. सरपटणाऱ्या प्राण्यांच्या वर्गांतील जे प्राणिवर्ग अश्मीभूत झाले आहेत, त्या अश्मीभूत प्राणिवर्गासंबंधीं 'हिस्टरी ऑफ ब्रिटिश फॉसिलरेप्टाइल्स' या नांवाचें ४ भागांत एक मोठें पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें. यानंतर दक्षिण अफ्रिकेंत सांपडणाऱ्या अश्मीभूत सरपटणाऱ्या प्राण्यांची एक सूचि त्यानें तयार केली. पक्ष्यांसंबंधींचाहि त्यानें व्यासंग केला होता. डार्विननें दक्षिण अमेरिकेंतील सस्तन प्राण्यांचे अश्मीभूत अवशेष संगृहित केले होते. त्या अवशेषांच्याकडे त्याचें लक्ष्य वेधल्यामुळें त्यानें या अवशेषांसंबंधींचा पूर्ण अभ्यास केला व त्यासंबंधीं त्यानें पुष्कळ लेख लिहिले. १८४४—४६ या वर्षांमध्यें त्यानें 'हिस्टरी ऑफ ब्रिटिश फॉसिल मॅमल्स अँड बर्ड्स' हा ग्रंथ प्रकाशित केला.

ओवेननें अशा रीतीनें प्राणिशास्त्रांतील निरनिराळ्या विषयांवर पुस्तकें लिहिलीं. पण विशेषतः पृष्ठवंशप्राण्यांसंबंधींचा त्याचा ग्रंथ प्रमाण म्हणून गणला जातो. इतर प्राण्यांच्या बाबतींतील त्याच्या मतांना सार्वत्रिक मान्यता मिळाली नाहीं. प्राणिशास्त्रविषयक तत्त्वज्ञानाचा त्यानें अभ्यास करण्याचा प्रयत्न केला नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

[ संदर्भ ग्रंथ—रिचर्ड ओवेनकृत 'लाइफ ऑफ रिचर्ड ओवेन ( २ भाग लंडन १८९४ )]

**ओव्हिडः**—( पब्लिअस ओव्हिडियस नॅसो ) जन्म. ख्रि. पू. ४३–मृत्यु इ. सन. १७. आगस्टस या रोमच्या बादशहाच्या अमदानींत जे प्रसिद्ध कवी होऊन गेले त्या कविमंडळापैकीं ओव्हिड हा शेवटचा रोमन कवि होय. ज्या वर्षी हा जन्मास आला त्याच वर्षी लोकसत्ताक राज्याची इतिश्री होऊन साम्राज्यसत्तेची स्थापना झाली. त्याच वर्षी वाङ्मयक्षेत्रांत आपल्या लेखणीनें अजरामर कीर्ति मिळविणारा सुप्रसिद्ध वक्ता सिसरो हा मरण पावला. अब्रुजी पर्वताच्या रांगांमध्यें निसर्गरम्य अशा जागीं वसलेल्या पेलिग्नी तालुक्याच्या सुलमोना नामक एका शहरीं ओव्हिड याचा जन्म झाला. अर्थातच अशा निसर्गसुंदर स्थानाचा व त्या स्थानाभोंवतीं पसरलेल्या रमणीय प्रदेशाचा ओव्हिडच्या मनावर फार परिणाम झाला असावा यांत नवल तें काय ? ओव्हिडचें घराणें हें पेलिग्नीमधील प्रतिष्ठित जहागिरदार घराण्यांपैकीं एक असून रोमच्या तत्कालीन इतिहासामध्यें त्या घराण्यानें महत्त्वाचा भाग घेतला होता. त्या वेळच्या रुढीला अनुसरून ओव्हिडच्या बापानें ओव्हिडला व त्याच्या भावाला रोम येथें विद्याभ्यासाकरितां ठेवलें. त्या ठिकाणीं ओव्हिडनें आरेलियस फिस्कस व पोर्टियस लॅट्रो यांच्यापाशीं साहित्य व वक्तृत्व या शास्त्रांचा अभ्यास केला. तत्त्वज्ञानशास्त्र अगर

तर्कशास्त्र यांसारख्या रुक्ष व क्लिष्ट अशा शास्त्राची त्याला मुळींच आवड नव्हती. वक्तृत्वशास्त्रापेक्षां काव्याकडेच त्याचें मन धांव घेत असे. बालपणापासूनच त्याला कविता करण्याचा नाद असे. यापासून त्याला परावृत्त करण्याचा त्याच्या बापानें बराच प्रयत्न केला व सद्यःफलदायी अशा कायदेशास्त्राचा अभ्यास करण्याकडे त्याचें मन वळविलें पण 'स्वभावस्तु प्रवर्तते' या न्यायानें ओव्हिडचें चित्त काव्यक्षेत्रांतच रममाण होत असे. अनेक विषयांवर कविता करावयाच्या, चांगल्या साधल्या नाहींत तर पुन्हां त्याच विषयावर नवीन कविता रचावयाच्या असा त्याचा क्रम असे.

लहानपणींच 'आमेरेस' व 'हेरॉइडीस' हीं काव्यें त्यानें प्रसिद्ध केलीं होतीं. प्रसिद्ध कवि व्हर्जिल याचीं काव्यें व्हर्जिलचा मित्र मेसर याच्या तोंडून त्यानें भक्तिपूर्वक श्रवण केलीं होतीं. होरेस कवीचें काव्य वाद्यांच्या साथीवर गाइलें जात असतां तें ऐकण्यांत त्याला अत्यानंद होत असे. आपल्या समकालीन कवींशीं त्यानें ओळख करून घेतलेली होती व त्या सर्वांचा त्यानें अदरबुद्धीनें आपल्या काव्यग्रंथांत व पत्रांमध्यें उल्लेख केला आहे. त्यानें आपला शिक्षणक्रम संपविल्यानंतर अथेन्स, सिसिली व आशियांतील मुख्य मुख्य शहरें मेसर कवीबरोबर प्रवास करून पाहिलीं. अथेन्स म्हणजे विद्यादेवीचें माहेरघर. हें पाहिल्यावर ओव्हिडसारख्या तरुण व रसिक माणसाला किति आनंद झाला असेल याची कल्पनाच करणें बरें. या प्रवासांत त्याला जीं प्रेक्षणीय व इतिहासप्रसिद्ध स्थळें पहावयास मिळालीं त्याचा त्याच्या मनावर अतिशय परिणाम झाला होता हें त्या स्थलांसंबंधीं त्यानें आपल्या पत्रांत व काव्यांत जें वहारीचें वर्णन केलें आहे त्यावरून निदर्शनास आल्यावांचून रहात नाहीं.

प्रवास संपवून परत आल्यानंतर रोम हें त्यानें आपलें कायमचें निवासस्थान केलें. त्याच्यासारख्या मोठ्या कुलांत जन्म घेतलेल्या सुसंस्कृत माणसाचा त्यानें मनांत आणलें असतें तर राजसभेंत सहज प्रवेश झाला असता. किंबहुना निरनिराळ्या ठिकाणीं न्यायखात्यांत न्यायाधीश या नात्यानें त्यानें कामहि केलें. तथापि काव्य हा त्याचा आवडता व मुख्य व्यासंग होऊन बसला होता. कवित्व व शील या दोहोंची सांगड क्वचितच आढळते. ओव्हिडहि या नियमाला अपवाद नव्हता. त्याचें काव्य नेहमीं विषयोद्दीपक असे. त्याच्या काव्यांत निष्काम व दिव्य प्रेमाची छटा बिलकुल दिसून येत नाहीं. त्यानें स्वतः तीनदां लग्न करून घेतलें. पहिला विवाह त्याच्या लहानपणींच झाला. पण आपल्या मनाजोगती अशी बायको मिळाली नाहीं या सबबीवर तिच्याशीं घटस्फोट करून त्यानें दुसरीशीं लग्न केलें. तिच्यापासून त्याला एक मुलगी झाली. पण पुढें त्याचें तिच्याशीं पटेनासें होऊन त्यानें फेबिनस मॅक्सिमन नांवाच्या एका बड्या गृहस्थाच्या नातेवाईक तरुणीशीं लग्न केलें. ही तरुणी ऑगस्टस बादशहाची बायको लिव्हिया हिची मैत्रीण होती, व तिच्या वजनामुळें त्याचा राणीवशांत प्रवेश झाला. त्यामुळें त्याला राणीवशांत कसा सावळा गोंधळ असतो याची पूर्ण माहिति झाली. या तिसऱ्या बायकोवर त्याची फार प्रीति होती. तरी पण कॉरीन्ना नांवाच्या एका सुंदर मुलीशीं त्याचा चोरटा संबंध होताच. त्या काळचा रोमचा समाजच ख्यालीखुशालीचा भोक्ता असे. साम्राज्यसत्ता स्थापित झाल्यामुळें राजकीय उलाढालींचे दिवस नाहींसे झाले होते. त्यामुळें रोमन लोक ऐदी व खुशालचेंडू बनले होते. नीतीचीं बंधनें शिथिल झालीं होतीं. राजघराण्यांत तर राजकन्या जुलिया इत्यादिविषयीं तिच्या छंदिष्ट स्वभावामुळें सावळागोंधळ माजला होता. या सर्वांचें प्रतिबिंब ओव्हिडनें त्या सुमारास लिहिलेल्या 'आर्स ॲमेटोरिया' या काव्यांत दृष्टीस पडतें. हें काव्य अत्यंत उत्तान व बीभत्सशृंगारानें परिपूर्ण आहे. रेनॉल्डच्या 'मिस्टरीज ऑफ दि कोर्ट ऑफ लंडन' या ग्रंथाप्रमाणें तें आहे. या काव्यानें तत्कालीन रोमन समाजांत खळबळ उडवून दिलीच; पण या काव्यांत खुद्द राजकन्येच्या संबंधींचे अप्रत्यक्ष उल्लेख आल्यामुळें ऑगस्टस बादशहाच्या रोषाला ओव्हिडला कांहीं कालानंतर बळी पडावें लागलें.

यानंतरच्या पुढील दहा वर्षांत म्हणजे ख्रिस्ती शकाच्या आरंभींच्या सात आठ वर्षांत त्यानें 'फॅस्टी' आणि 'मेटामॉर्फोसेस' हे दोन ग्रंथ निर्माण केले. रोमन धर्मामध्यें जे धार्मिक विधी, व उत्सव आहेत त्यांचें सुरस व सांगोपांग वर्णन या फॅस्टी नामक ग्रंथांत ओव्हिडनें केलें. व अशा प्रकारें, 'राष्ट्रीय कवि' हें पद त्यानें प्राप्त करून घेतलें. पण ओव्हिडची प्रतिभा व कल्पनाशक्ति जर कोणत्या ग्रंथांत प्रामुख्यानें दृष्टीस पडत असेल तर तो ग्रंथ म्हणजे 'मेटामॉर्फोसेस' हा होय. रोमन देवांनीं यक्षकन्या व पृथ्वीवरील सुंदर स्त्रिया यांची प्राप्ति व्हावी म्हणून प्रेमासाठीं किती अचाट साहसें केलीं याचें अद्भुत व काव्यमय वर्णन त्यानें या ग्रंथांत केलें आहे. हा ग्रंथ प्रकाशित होण्याच्या अगोदर त्यावर पुन्हां एकदा आपला हात फिरवावा अशी त्याची इच्छा होती. पण तत्पूर्वी ऑगस्टसनें त्याला हद्दपारीची शिक्षा ठोठावल्यामुळें त्या आपमानाच्या भरांत त्यानें या ग्रंथाची प्रत जाळून टाकली. पण सुदैवानें या ग्रंथाची दुसरी एक प्रत त्याच्या एका मित्राजवळ होती ती त्या मित्रानें प्रकाशित केली.

ओव्हिडला हद्दपारीची शिक्षा होण्याचें काय कारण असावें याविषयींहि निश्चित कांहींच सांगतां येत नाहीं. राणीवशांत जो सांवळागोंधळ माजून राहिला होता त्याच्याशीं ओव्हिडचा नसता संबंध जोडण्यांत येऊन ऑगस्टस बादशहानें ओव्हिडसंबंधींच्या द्वेषाचें उट्टें काढलें असावें

हें एक अगदीं विश्वसनीय नाहीं, तरी संभवनीय कारण असावें असें दिसतें. या शिक्षेमुळें ओव्हिडला डान्यूब नदीच्या मुखाशीं असलेल्या एका शहरीं रहाण्याचा हुकूम झाला. त्याची मालमत्ता मात्र त्याच्याकडे बादशहानें राहूं दिली. हें टोमी शहर रानटी लोकांचें ठिकाण होतें. या शहरावर रानटी व डोंगराळ लोकांचे नेहमीं हल्ले होत असत. अशा शहरीं ओव्हिडसारख्या, सुधारलेल्या शहरांत काळ घालविण्याची संवय झालेल्या रसिकाला चैन कसें पडावें ? आपली शिक्षा रद्द करण्याविषयीं बादशहाला विनंति करण्याकरतां त्यानें रोममधील अधिकाऱ्यांनां व आपल्या मित्रांनां काव्यमय पत्रें लिहिलीं. पण त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. हीं पत्रें मात्र वाङ्मयाच्या दृष्टीनें फार सुंदर अशीं आहेत. या पत्रांत ओव्हिडच्या इतर काव्यांत दिसून येणारी प्रतिभा जरी दृग्गोचर होत नाहीं, तरी त्याला आलेले अनुभव व त्याच्या मनाची तळमळ हीं मात्र या पत्रांत पूर्णपणें नजरेस पडतात. या पत्रसंग्रहाचे दोन ग्रंथ असून त्यांचीं नांवें ट्रीस्टिया व एपिस्टुला एक्स पाँटो अशीं आहेत.

आपली हद्दपारीची शिक्षा रद्द होत नाहीं असें त्याला पक्कें समजून आल्यामुळें त्याच्या मनाला धक्का बसल्यासारखें झालें. तशा स्थितींतहि त्यानें आपल्या फॅस्टी या काव्यामध्यें थोडी सुधारणा करून तें पुस्तक प्रकाशित केलें. पुढें तो फार दिवस जगला नाहीं. आपल्या वयाच्या ६१ व्या वर्षी तो मरण पावला.

ओव्हिडनें रचिलेल्या काव्यग्रंथाचे तीन भाग पडतात, (१) ऐन तारुण्यांतील ग्रंथः–हे म्हणजे त्याचें प्रेमपात्र जें कॉरीन्ना तिला उद्देशून लिहिलेलें शृंगारविषयक 'अमोरेस' हें काव्य, मेडिकॉमिना, फॅसी व प्रणयी लोकांनीं परस्परांचें प्रेम कसें संपादन करावें यासंबंधीचें 'आर्स अमेटोरिया' हें काव्य; व रेमेडिया ॲमोरिस. (२) मध्यवयांतील ग्रंथः–१५ भागांत लिहिलेलें 'मेटामॉर्फोसिस' व सहा भागांत लिहिलेलें फॅस्टी. (३) उतारवयांतील ग्रंथः– पांच भागांत लिहिलेलें ट्रिस्टिया काव्य, इबिस एपिस्टुला एक्सपाँटो हेल्यूटिका.

ओव्हिडनें आपली कविता द्विचरणवृत्तांत व पद्चरणी वृत्तांत लिहिली. द्विचरणवृत्तांत त्याचा हातखंडा असे. या वृत्तांत लिहिलेलें त्याचें काव्य सहजमनोहर व जिवंत असें आहे. ग्रीक पुराणांतील निरनिराळ्या अद्भुत कथा व स्वतःच्या अप्रतिहत कल्पनाशक्तीच्या जोरावर निर्माण केलेल्या कथा काव्यामध्यें सांगण्याच्या कामीं या वृत्ताचा त्यानें फार उपयोग करून घेतला व त्या बाबतींत त्याला पूर्ण यशहि प्राप्त झालें. व्हर्जिल सोडून दिल्यास यूरोपमध्यें व इंग्लंडमध्यें याच्या काव्याइतकी दुसऱ्या कोणत्याहि रोमन कवीच्या काव्यांत लोकप्रियता नाहीं. काव्यांचा व्हर्जिलच्या एक प्रकारचा ध्येयवाद व त्याबरोबरच पावित्र्य व विचारगांभीर्य दिसून येतें. ओव्हिडच्या काव्यांत तत्कालीन रोमन समाजाच्या चालीरीतींचें प्रतिबिंब स्पष्टपणें नजरेस पडतें. त्याच्या काव्यांत अद्भुत रस ओतप्रोत भरलेला असून त्याच्या भाषेंत मूर्तिमंत ओजस्वीपणा दिसून येतो. त्याच्या कवितेंत रुक्ष तत्त्वज्ञानाचा उहापोह कधींहि आढळावयाचा नाहीं. मनुष्याला अज्ञात अशा गूढ विषयांचें विवरण त्याच्या काव्याला अपरिचित आहे. व्यवहारांतील साध्या गोष्टी आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें चटकदार रीतीनें लोकांपुढें मांडण्यांत त्याचें कौशल्य दृष्टीस पडतें. जगांत असलेल्या गोष्टींचा उपभोग घेणें, त्यांत रममाण होणें एवढेंच जीविताचें कर्तव्य अशी त्याची समजून असल्याकारणानें या गोष्टींचेंच वर्णन त्यानें आपल्या काव्यांत केलेलें आढळतें. तात्पर्य त्याची कविता स्वातंत्र्योद्दीपक नाहीं, तत्त्वविवेचनात्मक नाहीं, उच्च विचारांच्या क्षेत्रांत मनुष्याचें मन तल्लीन करणारी नाहीं. तर ती अगदीं साधी पण ओजस्वी व प्रासादिक अशी आहे.

[ संदर्भ ग्रंथ—ट्यूफील–हिस्टरी ऑफ रोमन लिटरेचर ( इंग्रजी भाषांतर ) ].

**ओशीमा**—हा जपानच्या ताब्यांत असलेला एक तीन बेटांचा द्वीपसमूह आहे. हा क्यिऊशिऊच्या दक्षिणेस उत्तर अक्षांश ३०° ५०' व पूर्व रेखांश १३०° वर आहे. यांतील बेटांची नांवें पश्चिमेपासून पूर्वेकडे कुरोशिमा, ओशिमा व टाकाशीमा अशीं आहेत. ओशीमा बेटावर २४८० फूट उंचीचा जिवंत ज्वालामुखी पर्वत आहे. हा द्वीपसमूह उत्तरेकडील आयझू नोशीचीटो अथवा, लूचू समूहाहून भिन्न आहे. जपानांत ओशीमा नांवाचीं दुसरींहि अनेक बेटें आहेत.

**ओषण**—$प्र_३$ हा वायू व्हान मॅरम(१७८५) ह्यानें, जर प्राणवायूंत विद्युत्स्फुलिंग पाठविला तर तयार करितां येतो असें दाखविलें. ह्यानंतर हा वायु निरनिराळ्या पद्धतींनीं तयार करूं लागले. अम्लमिश्रित पाण्यांतून जेव्हां विद्युत्प्रवाह जातो त्यावेळेस जो प्राणवायु उत्पन्न होतो त्यांतहि हा सांपडतो. भारद्विप्राणिदावर ( बेरिअम पेरॉक्साइड ) द्राविना ( फ्लुओरिन ) ची क्रिया केली असतांहि हा मिळतो. परंतु या सर्व कृतींमध्यें हा वायु प्राणवायुमिश्रित असा सांपडतो.

ओषणवायूस एक चमत्कारिक वास येतो. व त्याला रंग नसतो, परंतु तो द्रवरूपांत आणतात तेव्हां त्याचा निळा रंग असतो. हा तीव्र प्राणिदीकारक आहे. आणि सेंद्रिय रसायनावर ह्याचा परिणाम फार लवकर घडतो. त्याचा कर्बयुक्त पदार्थांशीं संयोग होऊन निरनिराळीं रासायनिक द्रव्यें होतात.

याची अन्तर्घटना काय असावी हा प्रश्न होता. परंतु ओषणापासून जेव्हां प्राणवायु करतात तेव्हां जें आकारमान वाढतें त्यावरून ओषणाचा परमाणु तीन अणूंचा बनलेला असतो हें सिद्ध करतां आलें. त्याचें परमाणुमूल्य ४७ ७८ आहे असें हेडनबर्गनें दाखविलें.

**ओसवाल**—एक वाणी जात. अजमीर–मेरवाड, मुंबई, वऱ्हाड–मध्यप्रांत, मध्यहिंदुस्थान, पंजाब इत्यादि ठिकाणीं यांची वस्ती आहे. ओसवालांत जैनांची संख्या मोठी आहे. १९११ सालीं सबंध हिंदुस्थानांत ४२७७७८ ओसवाल होते; त्यांपैकीं ३९६७०२ जैन व ३१०५४ हिंदु व १२ शीख व १० इतर असे होते.

मारवाडांतील लूनी नामक नदीजवळ ओस–नगरी नांवाचें एक स्थल आहे. ओसवाल लोकांचें नांव ह्या स्थलाच्या नांवावरून पडलें. हें स्थल होर्नेल साहेबाला कोणत्याहि नकाशांत आढळून आलें नाहीं; पण मुनि आत्मारामजी यांनीं आपल्या "अज्ञान–तिमिर–भास्कर" नामक ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत सोळाव्या पानावर असें लिहिलें आहे कीं, हें स्थल जोधपूरच्या पश्चिमेला २० कोसांच्या अंतरावर आहे; आणि तेथें एक प्राचीन जैन देवालय व महावीराची एक अद्भुत मूर्ति आहे. त्या स्थलाचें वर्णन असें दिसतें कीं, राजपुतान्यांतील एका ओसाड प्रदेशांत तें आतां एक निर्जन व अप्रसिद्ध स्थल आहे. ऊहड नांवाचा एक मनुष्य भीनमाल किंवा श्रीमाल नामक स्थलापासून ह्या स्थलीं आला. भीनमालच्या राजानें ज्याच्यावर कोटींनें मोजण्याइतकी संपत्ति नाहीं त्यांनीं शहरांत राहूं नये असा कायदा केला. ऊहडजवळ कोटीला एकच लाख रुपये कमी होते तेव्हां त्यानें भावाजवळ उसने मागितले, पण त्यानें दिले नाहींत. तेव्हां नवी वस्ती करण्यास तो बाहेर पडला. त्यानें आपल्याबरोबर पुष्कळ जैन नातलग व मित्र आणले होते. त्याला दिल्लीच्या राजानें एक जमिनीचा तुकडा दिला. त्या तुकड्यावर त्यानें ही "ओसनगरी" बांधिली. ( इ. स. १६६ ). अबूपर्वत व लुनीनदी ह्यांमध्यें सुमारें अर्ध्या मार्गावर अद्यापि भीनमाल हें एक लहान स्थान आहे. जैनधर्मगुरु रत्नप्रभसूरि ह्याच्या प्रयत्नानें या वसाहतीला चांगलें स्वरूप आलें. त्यानें सर्वांना जैन धर्माची दीक्षा दिली. श्रीमाली, वाणी, भट्टी, चोहाण, घेलोट, गोड, गोहिल, हाडा, जाधव, मकवाण, परमार, राठोड, व थर रजपूत हे सारे वसाहतकार यापूर्वी शैवपंथी होते. श्रीमाली ब्राह्मण ओसवाल जैनांबरोबर जेवले म्हणून त्यांनां वाळींत टाकण्यांत आलें. व तेव्हांपासून त्यांनां भोजक म्हणतात. ऊहडच्या वेळेपासून त्या स्थलाच्या जैन समाजाला उपकेश हें नांव मिळालें व ते उपकेशवंशी म्हणून जाहीर झालें. शहराला उपकेशपट्टण अथवा उपकेश नगरी असें नांव पडलें. अर्वाचीन देशी भाषेंत उपकेशाचें संक्षिप्त रूपांतर "ओस" असें झालें. ह्यामुळें त्या शहराला ओस–नगरी व तेथल्या जैन जातीला ओसवाल अथवा ओस्वाल असें म्हणतात.

जै न ओ स वा ल—उपकेशगच्छाचे जे गृहस्थाश्रमी अनुयायी त्यांचें ओस्वाल असें नांव आहे. ('उपकेशगच्छ' पहा ) ते राजपुतान्यांतील एका मुख्य व्यापारी जातीचे आहेत, आणि ते अजमीर, जेसलमीर, मारवाड, भरतपुर, बुंदी, डोंगरपुर विकानेर येथील लोकसंख्येचा एक प्रमुख भाग बनतात. बिकानेरांत ते पुढील गोत्रांतून विभागले गेले आहेतः—दद, कोठारी, सेठिया, सिरोनो, सावन, सूख, भवनी, भटिया, गोलेछा. मारवाडांतील ओस्वाल गोत्रें खालीलप्रमाणें आहेतः–भंडारी, मोहनोत्, सिंग्वी, मुहूता, लोधा, ह्या गोत्रांच्या ओसवालांनीं मारवाड संस्थानांत मोठ्या हुद्द्याच्या जागांवर कामें केलेलीं आहेत. मल्लानीचे बहुतेक ओस्वाल मात्र शेतकी करून रहातात. ओसवाल व्यापाऱ्यांच्या वसाहती हिंदुस्थानच्या दुसऱ्या कित्येक भागांत सांपडतात. उदाहरणार्थ, हुशंगाबाद, पुणें व काशी. काशीचा सुप्रसिद्ध राजा शिवप्रसाद ओसवाल जातीचा होता व भोजक ( श्रीमाली ब्राह्मण ) हे ओसवालांचे उपाध्ये होत. निर्वाणाला गेलेल्या संतांच्या पादुकांचे हे भोजक पुजारी असतात. ओसवालांचे खरे आचार्य पूर्ण अहिंसा आचरणारे जैन यती होत. हे अबूचा डोंगर, पालिठाणा, पारसनाथ, गिरनार, पावा वगैरे जैनांच्या क्षेत्रांनां जातात. शिवाय काशी, अयोध्या यांसारख्या हिंदु क्षेत्रांचीहि यात्रा करितात. मारवाडांतील ओसिया ही सर्व ओसवालांची कुलदेवता होय.

कच्छी ओसवालांत वीस, दस व पांच अशा तीन पोटजाती आहेत. दसांत जे विधवाविवाहाची चाल पाळतात त्यांनां पांच अशी संज्ञा आहे. दसांचा पोषाख भाट्यांप्रमाणें असतो. यांच्यांत सगुण व निर्गुण उपासक असे दोन धार्मिक भेद असतात. कायमची गांवपंचायत या ओसवालांत चालत आलेली आहे. कच्छच्या वीस ओसवालांत दोन गट आहेतः१ कांठी गट–यांत ५२ गांवें, व २ अब्दास–गट यांत ४२ गांवें आहेत. पटेलाची जागा वंशपरंपरेनें चालते. अहमदनगर येथेंहि एक लहानशी ओसवाल वसाहत आहे. दस व वीस यांच्यामध्यें रोटीव्यवहार होतो पण बेटीव्यवहार होत नाहीं.

**ओसाका अथवा ओझावा**—हें शहर जपानमधील सेस्सु प्रांतांत आहे. याची लोकसंख्या इ. स १९०८ सालीं १२२६५९० होती. हें ओसाका आखातावरील सपाट मैदानावर वसलें आहे. याच्या आखाताकडील बाजूस बिवा तळ्याचा एक सांड वाहत असून त्याच्या दोन्ही तर्फा उंच टेकड्यांची रांग आहे. या शहरांतून नदीचे फांटे व कालवे इतके गेले आहेत कीं, नवीन पाहणारास एखाद्या डच शहराचा भास होतो. हें एक आगगाडीचें महत्त्वाचें केंद्रस्थान असून येथून कोबे शहरास आगबोटी जातात. येथील बहुतेक घरें लांकडी आहेत. १९०९ सालीं या शहरास आग लागली व त्यामुळें सुमारें १२००० घरें व इतर इमारती जळाल्या. येथील किटाहमा नांवाच्या राजमार्गावर एक झुलता लोखंडी पूल बांधला आहे. येथील कावागुची भागांत कांहीं परदेशस्थ धर्मप्रसारक लोकांची वस्ती आहे. येथे बौद्ध व शिंतो पंथाचीं पुष्कळ देवालयें आहेत. याच्या

शिवाय येथील पाहण्यासारख्या इमारती म्हटल्या म्हणजे, किल्ला, टांकसाळ व शिलेखाना ( दारुगोळ्याची कोठी ) ह्या होत. येथील किल्ला हिडेयोशी यानें सन १५८३ त बांधला. सध्यां याचा लष्करी छावणीकडे व शिलेखान्याकडे उपयोग होतो. येथील टांकसाळ इ. स. १८७१ त यूरोपियन लोकांनीं स्थापली व सध्यांहि तिची व्यवस्था त्यांकडेसच आहे. येथें लोखंडी काम करण्याचे, साखर शुद्ध करण्याचे व कापूस पिंजण्याचे कारखाने आहेत. येथें जहाजें बांधण्याचेंहि काम होतें. येथील व्यापार व लोकसंख्या वाढत्या प्रमाणांत आहेत.

हें शहर शिनशु घराण्याच्या ८ व्या पुरुषानें म्हणजे रेमीओ शोनिन यानें १४९५–९६ च्या दरम्यान वसविलें. १५८३ त हिडेयोशी यानें येथें आपली राजधानी केली. १८६८ पासून याचा परदेशाशीं व्यापार सुरू झाला.

**ओस्कार ( पहिला )**—जन्म १७९९; मृत्यु १८५९. ओस्कार हा स्वीडन व नार्वेच्या चौदाव्या चार्लस राजाचा मुलगा होय. हा जात्याच फार बुद्धिमान होता व त्यांतच त्याला मिळालेल्या सुशिक्षणाची भर पडल्यामुळें आपल्या देशाच्या सामाजिक व राजकीय प्रश्नांसंबंधीं तो तज्ज्ञ म्हणून मानला जाऊं लागला. १८३९ त त्यानें शिक्षणविषयक बरेंच निबंध लिहिले. १८४१ मध्यें तुरुंगविषयक सुधारणेसंबंधीं एक ग्रंथ त्यानें लिहिला. त्यानें दोन वेळा नॉर्वेचा व्हाइसराय म्हणून काम केलें. १८२३ मध्यें जोसेफाइन नांवाच्या ल्युखटेनबर्गच्या डयूकच्या मुलीशीं त्याचा विवाह झाला. तो उदारमतवादी पक्षाचा असल्यामुळें त्याच्या बापाला त्याच्याविषयीं फार संशय वाटत असे. पण होतां होईल तों आपल्या बापाशीं खटका न होऊं देण्याविषयींची खबरदारी ओस्कार हा घेत असे. तो जरी उदामतवादी पक्षाचा होता तरी तो कोणतीहि गोष्ट विचारानें करीत असे, व त्यामुळें जे कट्टे उदारमतवादी लोक असत त्यांनां त्याची वागणूक फारशी पसंत नसे. तथापि तो लोकप्रिय होता. १८४४ मध्यें राज्यारूढ झाल्यावर त्यानें मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क लोकांनां दिला आपल्या कारकीर्दीत त्यानें स्वीडनची आर्थिक परिस्थिति सुधारावी या हेतूनें पुष्कळ लोकोपयोगी कायदे पास केले. १८५७ मध्यें स्वीडिश राष्ट्रसभेनें याला जें मानपत्र दिलें त्यांत त्यानें केलेल्या लोकोपयोगी कृत्यांचा तिनें पूर्णपणें गौरव केला आहे. परराष्ट्रीय राजकारणांत देखील त्याचें चांगलें वजन असे. १८४८ मध्यें जर्मनी व डेन्मार्क यांच्यामध्यें जो वाद माजला होता त्यांत ओस्कारनें डेन्मार्कची बाजू घेतली. १८५० मध्यें स्वीडन, डेन्मार्क व नॉर्वे हीं तीन्हीं राज्यें एकत्र करण्याचा त्यानें प्रयत्न केला; पण अनेक अकल्पित अडचणींमुळें त्याला त्यांत यश आलें नाहीं. रशियाशीं आर्जवानें वागण्याचें जें धोरण त्याच्या बापानें ठेवलें होतें तें त्यानें झिडकारून टाकलें. क्रिमियन युद्धामध्यें तो तटस्थ राहिला व रशिया कदाचित स्कँडिनेव्हियावर स्वारी करील या भीतीनें त्यानें १८५५ मध्यें इंग्लंडशीं व फ्रान्सशीं सलोख्याचा तह केला. ओस्काराला चार मुलगे होते; त्यांपैकीं कॉर्ल व त्याच्यामागून ओस्कार फ्रेडरिक हे दोघे ओस्काराच्या मरणानंतर राजे झाले.

२ ( दुसरा )—जन्म १८२९–मृत्यु १९०७. हा ओस्कार ( पहिला ) याचा मुलगा होय. आपल्या वयाच्या अकराव्या वर्षी ओस्कारनें आरमारी खात्यांत प्रवेश केला व सन १८४५ मध्यें तो दुय्यम लेफ्टनंट झाला. नंतर उप्साला विश्वविद्यालयामध्यें त्यानें गणितविषयाचा अभ्यास करून त्यांत चांगलें नांव कमावलें. १८५७ मध्यें नसौचा डयूक वुइल्यम याच्या कनिष्ठ मुलीशीं त्यानें लग्न केलें. १८७२ मध्यें तो राज्यारूढ झाला व १८७३ सालीं जुलै महिन्याच्या १८ व्या तारखेस त्याला राज्याभिषेक झाला. त्याच्या कारकीर्दीत स्वीडन व नॉर्वे या दोन राष्ट्रांमध्यें परस्परांत कलह माजून ते विकोपास गेले होते. पण याच्या व्यवहारकुशलतेमुळें व धिमेपणानें ते कलह मिटून स्वीडन व नॉर्वे हे परस्परांपासून अलग झाले. तो निःपक्षपाती व प्रामाणिक असल्यामुळें सर्वराष्ट्रीय प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत यूरोपियन राष्ट्रें त्याला पंच म्हणून नेमीत असत. ग्रेटब्रिटन, जर्मनी आणि अमेरिका या राष्ट्रांशीं सॅमोआसंबंधीं जे वाद ग्रस्त प्रश्न उपस्थित झाले होते त्यांत त्याला लवाद म्हणून नेमलें. १८५७ मध्यें व्हेनेझुएलासंबंधींच्या भानगडींत जे पंच नेमण्यांत आले होते त्यांत हा मुख्य होता. अँग्लोअमेरिकन तहाच्या बाबतींतहि हाच मुख्य लवाद होता.

ओस्कार हा नांवाजलेला लेखक होता. संगीतशास्त्रांतहि त्याची गति होती. आपल्या राज्यांत शिक्षणाचा फैलाव व्हावा यासाठीं त्यानें पुष्कळ खटपट केली. विद्वान लोकांनां तो नेहमीं मदत करीत असे. स्वीडन नाविक दळाच्या आठवणी ( 'मेमोरियल्स ऑफ दि स्वीडिश फ्लीट' ) म्हणून त्यानें १८५८ मध्यें जो काव्यसंग्रह प्रसिद्ध केला त्याबद्दल त्याला स्वीडनमधील विश्वविद्यालयानें दुसऱ्या नंबरचें बक्षिस दिलें. १७११–१२–१३ मधील स्वीडनच्या लष्करी इतिहासावर निबंध ( 'काँट्रिब्यूशन्स टु दि मिलिटरी हिस्टरी ऑफ स्वीडन इन दि ईयर्स १७११, १७१२, १७१३ ) या विषयावर त्यानें बरेच लेख लिहिले व ते शेवटीं १८६५ मध्यें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले. याशिवाय त्याचीं भाषणें, हर्डरकृत सिडचें भाषांतर, गोएटे कवीच्या 'टॉर्क्वेटो टॅसो'चें भाषांतर हीं सर्व १८७५ मध्यें दोन भागांत ग्रथित करून प्रसिद्ध करण्यांत आलीं. 'ईस्टर' वर त्यानें केलेलें काव्य व इतर कांहीं कविता स्कँडीनेव्हियन राष्ट्रामध्यें सर्वांच्या मुखीं आहेत. त्याच्या बाराव्या चार्लसच्या आठवणी या ग्रंथाचें इंग्लिश भाषांतर १८०९ मध्यें प्रसिद्ध झालें. त्याच्याजवळ संगीत विषयावरचीं पुष्कळ पुस्तकें व हस्तलिखित ग्रंथ होते. ओस्कर हा १९०७ मध्यें

मरण पावला. त्याला चार मुलगे होते व त्यांपैकीं त्याचा वडील मुलगा ओस्कार गस्टेव्हस हा त्याच्यानंतर गादीवर बसला.

**ओस्टीयाकः**—पश्चिम सैबेरियांत ऑब नदीच्या कांठीं रहाणाऱ्या एका जातीला ओस्टिआक म्हणतात. त्यांचा व्होगल लोकांशीं संबंध आहे. ते ठेंगणे असून त्यांचे केंस काळे व मऊ, डोळे काळे, नाक रुंद व चपटें, व ओठ जाड असतात. ही जात मिश्र उत्पत्तीची आहे. ओस्टीयाक लोक सौम्य, शांत स्वभावाचे असून प्रामाणिक असतात. या लोकांत चोरी व दंगेधोपे होत नाहींत. लांकडांवर नकशीकाम करणें व कातडीं कमावणें या कामांत ते फार वाकबगार आहेत. यांची थोडीशी माहिती बुद्धोत्तर जग ( पृ. ४०३ ) या विभागांतहि दिली आहे.

**ओह्म्‌,जार्ज सायमन.**—(१७८७-१८५४)या जर्मन शास्त्रज्ञाचा जन्म तारीख१६मार्च१७८७रोजीं एअरलांजन येथें झाला व तेथील विश्वविद्यालयांत त्याचें शिक्षण झालें. त्यानें कित्येक ठिकाणीं प्रोफेसराचें काम केलें. तारीख ७ जुलै १८५४ रोजीं म्युनिच येथें त्याचा मृत्यू झाला. त्यानें कित्येक लेख लिहिले आहेत. परंतु एका लेखाशिवाय बाकीचे सारे लेख अगदीं मध्यम प्रतीचे आहेत. सन १८२७ सालीं त्यानें बर्लिनमध्यें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकांत ओह्मचा सिद्धांत या नांवानें प्रसिद्ध असलेला सिद्धांत प्रथमतः ग्रथित केला आहे. हा सिद्धांत विद्युच्छास्त्राचा अगदीं प्राणभूत असें एक सध्याचें तत्त्व होऊन बसलें आहे. व तो अनेक प्रयोगांनीं सिद्ध झाला आहे.

हा सिद्धांत असाः—इतर सर्व गोष्टी सारख्याच असतील तर विद्युत्प्रवाहाचा जोर प्रत्येक बिंदूवर असलेल्या संभाव्यशक्तीच्या चढउतारावर अवलंबून राहील.

**ओह्ममापक**—हें एक मोठमोठाले विद्युत्प्रतिरोधक किंवा विद्युद्रोधनामुळें उत्पन्न होणारे प्रतिरोध मोजणारें विद्युद्यंत्र आहे. जर प्रतिरोध थोडासा मर्यादित असेल तर तो मोजण्याला जास्त सोईस्कर यंत्र म्हणजे व्हेटस्टोन ब्रिज ( पूल ) होय. पण ज्यावेळीं हा प्रतिरोध विद्युद्रोधकच मार्गांत आल्यामुळें मर्यादेबाहेर जास्त होतो त्यावेळीं त्या ब्रिजपेक्षां ओह्म-मापक जास्त उपयोगी पडतो.

**र च ना.**—साधारण ओह्ममापकांत दोन वेष्टनें असतात. त्यांपैकीं एक विद्युत्प्रवाहमार्गाच्याच क्रमांत येतें व दुसऱ्याला पार्श्ववाहक वेटोळें ( शंटकॉईल ) म्हणतात. ह्या वेटोळ्यांचें अक्ष ( ॲक्सिस ) एकमेकांशीं काटकोनांत येतील अशा तऱ्हेनें बसविले असतात, व ते ज्या ठिकाणीं एकमेकांस मिळतात, त्याच ठिकाणीं एका स्तंभावर ( पिव्हट ) एक मृदु-लोह-सूचि ( सॉफ्ट आयर्न नीडल ) बसविलेली असते व याच सूचीला दुसरी एक मोठी 'दर्शक सूचि' ( इंडिकेटर ) बसविली असते.

घरांत बसविलेल्या विद्युद्वाहक तारांच्या भोंवतीं असलेल्या विद्युद्रोधक वेष्टनाचा विद्युत्प्रतिबंध मोजणें असल्यास वरीलप्रमाणें रचना करावी. विद्युद्रोधकाची विद्युत्प्रतिबंध शक्ति मोजण्याचें कारण मुख्यत्वेंकरून असें आहे कीं, अमुक एक शक्तीचा प्रवाह तारेंतून सोडला असतां तो तारेंतून व विद्युद्रोधकांतून बाहेर पडून किती कमी होईल हें काढतां आलें म्हणजे, तारेंत सोडलेल्या प्रवाहांतून ही तूट वजा देऊन बाकी राहिलेला प्रवाह यंत्र चालविण्यास किंवा दिवे लावण्यास पुरेसा आहे कीं नाहीं हें काढतां येतें.

या यंत्रसामुग्रींत एक लहान गतिजन्य विद्युद्यंत्र असून हें यंत्र फिरविलें असतां २०० ते ५०० व्होल्टपर्यंत विद्युद्दाब उत्पन्न होईल इतकी याची शक्ती असते. वरीलप्रमाणें जोड दिल्यावर पार्श्ववाहक तार किंवा वेटोळें पाण्याच्या नळीसारख्या उत्तम शीघ्रवाहकाशीं जोडावें लागतें. गतिजन्य विद्युद्यंत्र सुरू झालें म्हणजे त्याच्या विद्युद्दाबाच्या प्रमाणांतच ओह्म-मापकाच्या पार्श्ववाहक वेटाळ्यांतून विद्युत्प्रवाह वाहूं लागतो, व विद्युद्रोधक वेष्टनांतून पृथ्वीच्या बाजूला जर विद्युच्छक्तीची कांहीं द्रव्य गळ होत असेल तर विद्युत्प्रवाहमार्गाच्या क्रमांत असलेल्या वेटोळ्यांत, या विद्युद्रोधक वेष्टनांतलि विद्युत्प्रवाही शक्तीच्या मानानें ( अर्थातच त्यावेळीं असलेल्या विद्युच्चालक शक्तीच्या मानानें ) दुसरा एक विद्युत्प्रवाह वाहूं लागतो. अशा तऱ्हेनें या दोन वेटोळ्यांच्या योगानें निरनिराळ्या शक्तींच्या विद्युच्चुंबकीय रेषा उत्पन्न होऊन त्या एकमेकांशीं काटकोनांत असतात; आणि मृदु-लोह-सूचि यांच्या निरनिराळ्या शक्तिप्रमाणानुरूप आपली जागा घेते. यावरून सूचि-विक्षेप विद्युद्रोधनाच्या विद्युत्प्रतिबंधाच्या प्रमाणांत असतो हें सिद्ध होतें. पार्श्ववाहक वेटोळ्याचा व गतिजन्य विद्युद्यंत्राचा संबंध तोडून सूचि ज्या जागेवर येते ती जागा व यंत्र चालू व जोडलेलें असतांना सूचीचें ज्या ठिकाणीं विक्षेपण होतें त्या दोन्ही स्थळांमधील कोनास विक्षेप कोन म्हणतात. या कोनाची स्पर्शज्या, गतिजन्य विद्युद्यंत्राचा दाब व विद्युद्रोधकांतून वाहणारा प्रवाह यांच्या प्रमाणांत असते. आतां जर प्रतिबंध 'प' म्हणून म्हटला, गतिजन्य विद्युद्यंत्राचा दाब 'द' म्हणून दर्शविला, व विद्युद्रोधकांतून वाहणारा प्रवाह जर 'प्र' या शब्दानें दाखविला तरः—

$$\text{विक्षेपकोन} = \frac{\text{प्र}}{\text{द}} = \text{प} \;\left(\text{प्रतिबंध} = \frac{\text{प्रवाह}}{\text{दाब}}\right).$$

अशा तऱ्हेनें त्या सूचिभोंवतीं काढलेल्या वर्तुळावर निरनिराळें ओह्म-प्रतिबंध-दर्शक आंकडे लिहितां येतात.

एव्हरशेड व व्हिग्नोल नांवाच्या शास्त्रज्ञांनींहि एक वरील तत्त्वावर ओह्म-मापक तयार केलें आहे. त्यांच्या यंत्रांत गतिजन्य विद्युद्यंत्र व ओह्म-मापक निरनिराळे नसून एकेच ठिकाणीं सांपडतात.

नालडर नांवाच्या शास्त्रज्ञानें स्थिरविद्युत तत्वावर एक ओह्म-मापक तयार केलें आहे. या यंत्रांत अखंड प्रवाह देणाऱ्या उच्च दाबाच्या गतिजन्य विद्युयंत्रामुळें सूची व तुरीय विद्युन्मापकाचें ( क्काड्रंट एलेक्ट्रोमीटर ) दोन पाद यांत शक्त्यंतर उत्पन्न होतें. हे दोन पाद, ज्याचा प्रतिबंध मोजावयाचा आहे त्यालाच जोडले असल्यामुळें त्यांच्यांतच शक्त्यंतर दिसून येतें. अशा वेळीं सूची ज्या स्थितींत असते त्या स्थितींत ती तुरीय विद्युन्मापकाच्या पदांतील शक्त्यंतर व प्रत्येक पद व सूची यांतील शक्त्यंतर यांनींच ठेविली जाते. म्हणजे विद्युत्प्रतिबंधकाच्या दोन्हीं टोंकांतील शक्त्यंतर व त्यांतून वाहणारा प्रवाह यांच्या प्रमाणाच्या मानानें त्या सूचीची स्थिति ठरविली जाते.

ओ ह्म मा प का ऐ व जीं च ल वि द्यु न्मा प का चा उ प यो ग.—ओह्ममापकच जास्त प्रमाणांत वापरला जातो याचें कारण त्या यंत्राचा सुटसुटीतपणा होय; पण जर ओह्म-मापक नसेल तर त्याचें काम दर्पण-चलविद्युन्मापक व आवश्यक दाब असलेल्या विद्युत्घटानेंहि भागवितां येतें. विद्युत्घटाचें एक टोंक जमीनीस जोडून, दुसरें टोंक ज्या तारेवरील विद्युद्रोधनाचा प्रतिबंध मोजावयाचा असेल त्या तारेला चलविद्युन्मापकामार्फत जोडतात. विद्युद्रोधनांतून जर कांहीं दृश्य विद्युत्प्रवाह वाहील, तर चलविद्युन्मापकांतील सूची-विक्षेप दिसून येतो.

ओ ह्म म्ह ण जे का य.—इ. स. १८९४ मध्यें ग्रेट ब्रिटनच्या कौन्सिलमध्यें विद्युत्प्रतिबंध मोजण्याकरितां एक व्यवहार्य असें मूलमान ठरविलें गेलें व तेंच पुढें जर्मनी, फ्रान्स, युनायटेडस्टेट्स वगैरे देशांनीं प्रमाण मानलें व म्हणून त्यास सार्वराष्ट्रीय अथवा प्रमाण ओह्म म्हणतात. ह्या प्रमाण ओह्म-प्रतिबंध म्हणजे १४.४५२१ ग्रॅम वजनाचा पारा घेतला व त्याची १०६.३ सें. मीटर इतकी लांबी तयार केली; ( अर्थातच त्याचा घेर सर्वत्र सारखा असला पाहिजे ) आणि ह्या पाऱ्याचा स्तंभ जर एखाद्या अखंड ( कंटीन्युअस ) विद्युत्प्रवाहाच्या मार्गांत घातला, तर या पाऱ्याच्या स्तंभाचा विद्युत्प्रवाहाला जो प्रतिबंध होईल त्यास प्रमाण-ओह्म म्हणतात. या प्रमाणओह्मच्या सोईसाठीं कांहीं पटी किंवा अंश करून त्यांचें एक कोष्टक तयार केलें आहे. उदाहरणार्थ. मॉयक्रोह्म् = एकदशलक्षांश ओह्म व मॅगोह्म = दशलक्ष ओह्म. एखाद्या पदार्थाची प्रतिबंधक शक्ति काढवावयाची असेल, तर त्याच्या एक घन सेंटिमीटरचा प्रतिबंध घेऊन तो मग सोईप्रमाणें मायक्रोह्म, ओह्म किंवा मॅगोह्ममध्यें दर्शवितात. प्रवाहप्रतिबंधकत्वाच्या उलट म्हणजे प्रवाहवाहकता, व म्हणूनच वाहकता दर्शविणारें मूलमान प्रतिबंधशक्ति दर्शविणाऱ्या मूलमानाचा व्युत्क्रम होय; व म्हणून ओह्म या अक्षरांचाहि व्युत्क्रम करून वाहकतेच्या मूलमानाला ' म्हओ ' म्हणतात आणि ज्याचें प्रतिबंधकत्व एक ओह्म असेल त्याची वाहकताहि एक 'म्हओ' धरली जाते. शुद्ध धातु किंवा मिश्र धातु यांची वाहकता बरीच मोठी असल्यामुळें यांची प्रतिबंधकशक्ति मॉयक्रोह्ममध्यें मोजतात. घनतेंत किंवा रासायनिक दृष्टीनें पदार्थांच्या शुद्धतेंत थोडा जरी फरक झाला तरी वाहकता आणि प्रतिबंधकशक्ति बरींच बदलूं शकतात; आणि म्हणून निरनिराळ्या प्रयोगांनीं एकाच धातूच्या प्रतिबंधकशक्तीसंबंधीं निरनिराळीं उत्तरें येणें साहजीक आहे.

ओ ह्म चा नि य म.—व्होल्टाच्या विद्युन्मंडलाचें परीक्षण करून इ. स. १८२७ सालीं जर्मन डॉ. जी. एस्. ओह्म यानें विद्युच्छास्त्राची बरीच कामगिरी केली असें म्हणावें लागतें. त्याच्या पूर्वीं विद्युच्छक्तीचे प्रवाह किंवा अन्य कांहीं गोष्टी मोजण्याचीं स्पष्ट प्रमाणें अस्तित्वांत नव्हतीं. प्रवाहाला प्रतिबंध करणें हा विद्युन्मंडलाचा धर्म आहे. त्यांतून विद्युत्प्रवाह वाहणें हें कार्य व विद्युच्चालकशक्ति हें त्याचें कारण होय. ही कल्पना पाहिल्यानें डॉ. ओह्मनें स्पष्ट केली; त्याचप्रमाणें प्रवाह हा विद्युच्चालकशक्तीच्या समप्रमाणांत व प्रतिबंधाच्या व्युत्क्रमप्रमाणांत असतो हेंहि त्यानेंच पाहिल्यानें दाखविलें, व यालाच ओह्मचा नियम असें म्हणतात. हा ओह्मचा नियम, फोरियरच्या उष्णतामंडलांतून वाहणाऱ्या उष्णताप्रवाहाच्या सादृश्यावरच बराचसा बसलेला आहे. सर्व मंडलभर विद्युत्संभाव्य ( इ. पोटेंशिअल ) पसरलेला आहे. ह्या खास कल्पनेचेंहि श्रेय ओह्मलाच आहे. पुलिएट ( १७९१-१८६८ ), वेक्केलर ( १७८८-१८७८ ), फेशनेर ( १८०१-१८८७ ), कोलराश ( १८०९-१८५८ ) यांनीं वरील नियमाबद्दल खात्री करून घेण्याचे प्रयत्न केले. ओह्मनें स्वतः विद्युच्चालकशक्तीचा उत्पादक म्हणून उष्णताविद्युत्घटा( थर्मो इलेक्ट्रिक पाइल )च्या सहायानें वरील नियमाचा ताळा पाहिला.

**ओहिओ**:—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं एक. क्षे. फ. ४१०४०; व लो. सं ( १९१८ ) ५२७३८१४. या संस्थानांत ८० परगणे आहेत. राजधानी कोलंबस. याचा यूनियनमध्यें प्रवेश झाला आहे. याचे कॉंग्रेसमध्यें १२८ सभासद असतात. येथें बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत. हें संस्थान कृषिप्रधान आहे.

[ संदर्भग्रंथः— ब्लॅक-दि स्टोरी ऑफ ओहिओ. बेगार्ट-फायनॅन्सियल हिस्टरी ऑफ ओहिओ.

**ओहिंद**.—उंद पहा.

**ओळंबा**—एका दोरीला गोटीसारखें एक वजन लोंबकळत ठेवून दोरी स्थिर झाल्यावर सिद्ध होणारा उभा लंब. याचा उपयोग उभी पातळी लंब रेषेंत आहे किंवा नाहीं हें तपासून पाहण्याकडे करतात. याच कामासाठीं उपयोगांत येणारी लांकडी पट्टीहि असते. तिची एक कड उभ्या पातळीस टेंकून ती तपासतात. 'प्लम लेव्हल' म्हणून एका टोंकास स्पिरिटचा बुडबुडा असलेली नळी असलेलें एक हत्यार असतें. यानेंहि उभ्या पातळीचा पडताळा पाहतां येतो.

औ—अर्थ-(१) विष्णु (२)अनंत ( नाग ).(३)जलधि ( संख्या )(४) पृथ्वी.

अक्षरविकास— इ. स. ६ व्या शतकांतील राजा यशोधर्मन् याच्या वेळच्या मंदसोर येथील लेखांत प्रथम 'औ' ची गांठ पडते. पांचव्या शतकांतील जयनाथ दानपत्रांतील 'औ' च्या कमरेवर एक वाकडी ( इंग्रजी एस सारखी ) रेघ काढून हा 'औ' तयार केलेला दिसतो. याच शतकांतील उष्णीषविजयधारिणीच्या ताडपत्री पुस्तकांत असाच औ आहे पण रेघेचा बांक कोन करून गेलेला दिसतो. दहाव्या शतकाच्या सुमाराच्या नेपाळांत सांपडलेल्या हस्तलिखित ग्रंथांत ' औ ' वरील प्रमाणेंच काढलेला आहे. ११ व्या व १२ व्या शतकांतील हा वर्ण अ सारखा रेखाटलेला दिसतो. इतर वर्णांप्रमाणें ओ व औ या वर्णांचा संगतवार विकास आढळून येत नाहीं. रा. गौरीशंकर ओझा यांनीं प्राचीन लिपिमालेंत या वर्णांची उत्पत्ति दिलेली नाहीं( लिपिपत्र ८२ पहा ).

**औक अथवा अवुक जमीनदार.**—हें घराणें एका काळीं त्या प्रांतांत वरेंच सामर्थ्यवान होतें. यांतील तारखा जवळ जवळ बिनचूक आहेत. कारण त्या बहुतेक ऐतिहासिक गोष्टींशीं जुळतात. हे सर्व जमीनदार आपणास राजे म्हणवीत असत. ( सिवेलनें ही माहिती व वंशावळ ऐकीव म्हणून दिली असल्यानें ती कदाचित चुकीची असण्याचा संभव आहे ).

हें घराणें विजयानगरच्या राजघराण्यापैकींच एक होय. बुक्क राजाचा मुलगा रामराज यानें लक्कमाम्ब इच्याशीं लग्न लाविलें. तिच्यापासून त्याला तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें तिम्म, कोंड व श्रीरंग हीं होत. त्यांत तिम्म हा अवुकु (औक) येथील, कोंड हा आदवाणी (अदौनी)चा सुभेदार होता. या तिम्मची वंशावळ पुढें दिली आहे. तसेंच या बुक्क राजाचा दुसरा मुलगा सिंग यास त्यानें नंदेल (नंद्याळ) ची जहागिरी दिली. या घराण्यानें विजयनगरकर राजांना वेळोवेळीं लढायांच्या व इतर कामीं सहाय्य दिलेलें आहे.

१ बुक्क ( मूळपुरुष )
( इ. स. १४७३-१४८१ )
|
२ रामराज
( इ. स. १४८१-१५०८ )
|

[ रामराज पुढें चालू ]

३ तिम्म
( इ. स. १५०८-१५३६ )
|
४ नल्लतिम्म (इ.स.१५३६-५५) — येसातिम्म — तिरुन्नाथ — अप्पल — ओबलपति*

४ नल्लतिम्म (इ.स.१५३६-५५)
|
५ रघुनाथ (इ.स.१५५५-५८)
|
६ पेद्द कृष्णम (इ.स.१५५८-८८) — ७ चिन्न कृष्णम (इ.स १५८८-१६१८)

तिरुन्नाथ
⋮
१९ नारायण (इ.स.१७७१-८५)

७ चिन्न कृष्णम (इ.स १५८८-१६१८)
|
८ ओबलपति (१६१८-१६४६)
|
९ नरसिंह (इ.स.१६४६-६८)
|
१० राघव (इ.स.१६६८-९१)
|
११ पेद्द कुमार राघव (इ.स. १६९१-१७३५) ( निपुत्रिक ) — दासम

दासम
|
१२ अप्प नरसिंह, (इ.स. १७३५-३७)
त्याची विधवा
१३ वेङ्कम्मा

*ओबलपति
|
( ? )
|
(पणतु) नरसिंह
|




( १ )यानें विजयानगरच्या राजापासून जमीनदारी मिळविली.

( ४ ) यानें ब्राह्मणांस देणग्या दिल्या.

( ६ ) मुसुलमानांनीं या जमीनदाराच्या कारकीर्दीत विजयानगरच्या रायांचा उच्छेद केला, व जमीनदारीचा आकार कमी केला ( १५६४ ).

( १२ ) यानें जमीनदारी इ. स.१७३९पावेतों चालविली. अप्पनरसिंह याच्यानंतर नरसिंह हा जमीनदार झाला. हा नरसिंह हा चवथा जमीनदार नल्ल तिम्म याचा सर्वांत धाकटा भाऊ ओबलपति याचा पणतु होता असें सांगितलें आहे. परंतु तारखांवरून पहातां हें अशक्य दिसतें.

( १३ ) चेल्लम्मा अप्प नरसिंह ( १२ ) याची विधवा अद्याप जिवंत असतां व वेंकट नरसिंह ( १८ ) याच्यापुढें वंश खुंटल्यामुळें तिला वारस नेमण्यास सांगितलें. तिनें नल्लतिम्म ( ४ ) याचा भाऊ तिरुनाथ याचा वंशज नारायण हा नंद्याल येथें रहात असे त्यास वारस नेमलें.

( १९ ) याला हैद्राबादच्या बसालतजंग यानें गादीवरून काढून कडापा येथें नेलें. हा श्रीरंगपट्टण येथें मेला.

( २० ) याच्याबरोबरच जमीनदारीचा अंत झाला.

**औट्रम ( सर जेम्स )**—( १८०३–१८६३ ). हा प्रसिद्ध इंग्लिश सेनापति बेंजामिन औट्रम या एंजिनीयरचा मुलगा होता. त्याच्या जन्मानंतर दोन वर्षांच्या आंतच त्याचा बाप वारल्यामुळें त्याची आई त्याला घेऊन अबर्डीन येथें रहावयास गेली. तेथेंच त्याचें प्राथमिक शिक्षण झालें. १८१८ सालीं अबर्डीन येथील मॅरिस्कल कॉलेजमध्यें त्याला ठेवण्यांत आलें. १८१९ सालीं हिंदुस्थानच्या लष्करी खात्यांत उमेदवारीची जागा त्याला मिळाली. अर्थात त्यासाठीं मुंबईस यावें लागलें. मुंबईस असतांना त्यानें आपले गुण तेथील अधिकाऱ्यांच्या नजरेस आणल्यामुळें त्याला १८२० च्या जुलै महिन्यांत १२ व्या पलटणीच्या पहिल्या तुकडीवर तात्पुरतें (ॲडज्यूटंट)जनरल म्हणून नेमण्यांत आलें. या जागेवर असतांना त्याला पुष्कळ प्रकारचे अनुभव आले; व त्याचा त्याच्या पुढील आयुष्यांत त्याला फार फायदा झाला. १८२९ सालीं त्याची खानदेश येथें बदली झाली. खानदेश येथें असतांना तेथील भिल्ल लोकांवर त्यानें आपल्या अंगच्या कर्तबगारीनें चांगली छाप बसविली. व त्यांचें एक पथक निर्माण करून शास्त्रीय पद्धतीनें त्या पथकाला त्यानें चांगलें लष्करी शिक्षण दिलें. या पथकाच्या साहाय्यानें खानदेशांतील लुटारूंचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. त्याला शिकारीचा विलक्षण नाद असल्यामुळें व शिकारीवर असतांना आणीबाणीच्या वेळीं जीं त्यानें अनेक अचाट साहसें केलीं त्यामुळें या भिल्ल लोकांची त्याच्यावर अतिशय भक्ति जडली होती. लहानपणीं तो फार अशक्त असे पण पुढें त्यानें चांगलेंच शरीर कमावलें व तो तारुण्यांत पुऱ्या सहा फूट उंचीचा जवानमर्द बनला. १८३५ मध्यें त्याला गुजराथमध्यें धाडण्यांत आलें व तेथें असतांना कांहीं काळ त्यानें 'पोलिटिकल एजंट' या नात्यानें काम केलें.

१८३८ मध्यें पहिलें अफगाण युद्ध सुरू झालें. त्या वेळीं सर जॉन कीन याचा ए. डी. सी. म्हणून त्याची नेमणूक झाली. या कामावर असतांना त्यानें पुष्कळ शौर्याचीं कृत्यें केलीं. त्यांतल्या त्यांत गझनीजवळील झटापटींत शत्रूंचें निशाण काबीज करण्यांत त्यानें जी मर्दुमकी गाजविली ती खरोखर वाखाणण्यासारखी होती. या त्याच्या धाडसी कृत्यामुळें त्याला मेजरचा हुद्दा प्राप्त झाला. १८३९ मध्यें त्याला लोअर सिंधचा पोलिटिकल एजंट नेमण्यांत आलें. नंतर थोड्याच दिवसांत अपर सिंधचा पोलिटिकल एजंट म्हणूनहि त्याची नेमणूक झाली. या जागेवर असतांना त्याचा वरिष्ठ अंमलदार सर चार्लस नेपीयर हा होता. नेपीयरच्या मनांत अपर सिंध खालसा करावयाचा होता. या गोष्टीला ओट्रम हा प्रतिकूल होता. त्यानें नेपीयरच्या कृत्यावर निर्भीडपणें सणसणीत टीका केली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढें कांहीं दिवस लोटल्यानंतर ८००० बलूची लोकांनीं हैद्राबाद येथील गोऱ्या लोकांच्या छावणीवर छापा घातला. त्यावेळीं औट्रम यानें आपल्या शौर्याची पराकाष्ठा करून आपल्या छावणीचें संरक्षण केलें. या वेळीं त्याची सर्वांनीं फारच तारीफ केली. खुद्द नेपीयर साहेबानेंहि 'हिंदुस्थानचा बायार्ड' असें यास उपनांव दिलें.

१८४३ मध्यें त्याला मराठी मुलुखांत धाडण्यांत आलें. या वेळीं त्याला लेफ्टनंट कर्नल असा हुद्दा मिळालेला होता. १८४७ त त्याला बडोदा येथें पाठवण्यांत आलें. बडोद्यास असतांना, त्यानें इंग्रज अधिकाऱ्यांनीं चालविलेल्या लांचलुचपतीच्या प्रकारावर उघड टीका केली. त्यामुळें मुंबई सरकारचा त्याच्यावर कांहीं काळ रोष झाला. १८५४ मध्यें लखनौच्या

रेसिडेंटच्या जागीं त्याची नेमणूक झाली. १८५६ सालीं त्यानें अयोध्या प्रांत इंग्लिशांच्या राज्याला जोडला व तो त्या प्रांताचा कमिशनर झाला. १८५७ मध्यें तो लेफ्टनंट जनरल झाला व त्याला पर्शियावर स्वारी करण्यास धाडण्यांत आलें. खुशाब येथें त्यानें शत्रूंची कत्तल करून त्यांनां शरण यावयास लावलें. या त्याच्या पराक्रमाबद्दल त्याला 'ग्रँड क्रॉस ऑफ दि बाथ ' हा बहुमानाचा किताब देण्यांत आला.

पर्शियामधून त्याला पुन्हां हिंदुस्थानांत बोलावण्यांत आलें, व कलकत्त्यापासून तो कानपूरपर्यंतच्या टापूंत जें लष्कर होतें त्याच्यावर त्याला अंमलदार नेमण्यांत आलें. याशिवाय अयोध्येच्या कमिशनराचें काम त्याच्याचकडे सोंपविण्यांत आलें. हें साल १८५७ होतें बंडाच्या धामधुमीला नुकतेंच तोंड फुटलें होतें. बंडखोरांच्या माऱ्यापुढें टिकाव धरणें अशक्य झाल्यामुळें हॅवेलॉक सेनापतीला कानपूर येथें आश्रय घ्यावा लागला होता. औट्रम हा आपल्या सैन्यानिशीं कानपूर येथें हॅवेलॉकच्या मदतीला आला. त्यानें लगेच हॅवेलॉकला लखनौ येथील फौजेच्या मदतीला पाठवलें व त्याच्याबरोबर स्वयंसेवक या नात्यानें तो गेला.मंगलवार व अलमबाग येथील हल्ल्यांत त्यानें चांगलेंच शौर्य गाजविलें व शत्रूंचा धुवा उडविला.त्याबद्दल त्याला व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आला. लखनौच्या दुसऱ्या वेढ्याच्या प्रसंगीं गोमती नदीच्या बाजूच्या बंडवाल्यांच्या सैन्यावर त्याला पाठवण्यांत आलें. या हल्ल्यांतहि त्यानें जय संपादन करून बंडवाल्यांचा कायमचा बंदोबस्त केला. लखनौ इंग्लिशांच्या ताब्यांत आलें. औट्रम याला लेफ्टनंट जनरल करण्यांत आलें. १८५८ मध्यें पार्लमेंटमध्यें त्याचे जाहीररीत्या आभार मानले. व त्याला बॅरोनेट करण्यांत येऊन एक हजार पौंडांचा सालिना तनखाहि देण्यांत आला. पुढें त्याची प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळें तो १८६० मध्यें इंग्लंडास परत गेला. त्यानें केलेल्या शौर्याबद्दल त्याचें अभिनंदन करण्यासाठीं इंग्लिशांनीं एक टूम काढिली व त्याप्रमाणें त्याला एक मानपत्र अर्पण करण्यांत येऊन, लंडन व कलकत्ता येथें त्याचा पुतळा उभा करण्याचें ठरलें. तो १८६३ च्या मार्च महिन्यांत मरण पावला. त्याचें शव वेस्ट मिन्स्टरमध्यें पुरण्यांत आलें व त्याच्या थडग्यावर 'बायार्ड ऑफ इंडिया' हे अर्थपूर्ण शब्द कोरण्यांत आले.

[ संदर्भग्रंथः—सर एफ्. जे गोल्डस्मिथ—जेम्स औट्रम ए बायोग्रफी २ भाग ( १८८० ); एल. जे ट्रॉटर—दि बायार्ड ऑफ इंडिया ( १९०३ )].

**औतें**–शेतकीच्या कामास उपयोगी पडणाऱ्या हत्यारांनां औतें म्हणतात. थोडया मजुरींत फार काम होण्यास चांगल्या औतांची फार जरूरी असते. यूरोप, अमेरिका वगैरे देशांप्रमाणें हरएक कामीं लागू पडणारीं अशीं अनेक सोयिस्कर औतें आपल्या इकडे नाहींत. परिस्थितिनुरूप उत्तम लागूं पडावें म्हणून एकाच जातीच्या औतांत अनेक प्रकार असावे. विशेप परिश्रम न पडतां काम उत्तम व्हावें व तें करतांना करणारास आनंद व हुरुप यावा अशीं औतें असणें फार जरूर आहे. औत (नांगर) वापरण्याची चाल आपणाकडे वेदकालापासूनची आहे. ऋग्वेदांत लांगल व सीरा हे शब्द आढळतात. सीरा ( नांगर ) ओढण्यास बैलांचा उपयोग करीत असत.

कुणब्यानें औतांची निवड करतांना जमीनीची जात, लागवडीचें आकारमान, पिकाची जात, लागवडीचें धोरण व उत्पन्नाची त्वरितता इतक्या गोष्टींकडे लक्ष दिलें पाहिजे. खडकाळ अगर चिकण जमीनीवर वापरण्याचें औत रेताड व भुसभुशीत जमिनीस नालायक होय.

मळ्यास लागणाऱ्या औतांत जनावरांनीं चालणारीं नांगर, कुळव, दंताळें, मैंद, पेटारी हीं औतें असून हातानें उपयोगांत येणारीं कुदळ, फावडें, टिकाव, पहार हीं होत. लागवडीस व लागवडीनंतर उपयोगांत येणारीं करवडी, कोळपें, पाभर, खुरगी वगैरे होत. गाडी, टोपल्या हीं स्थलांतरासाठीं उपयोगांत येणारीं औतें व कोयता, विळा, कोयती; कुऱ्हाड हीं कापणीचीं औतें होत.

यांतील मुख्य औत नांगर हें होय. जमीन फोडून खालचा थर वर आणणें हें त्याचें कार्य असतें. नांगरलेल्या जमीनींतील ढेकळें फोडण्याचें काम मैंदानें करतात. यानंतर दंताळ्याचा उपयोग करावयाचा असून त्यानें जमीन मोकळी होते. कुळवाचेंहि हेंच काम असतें. लागवडींत उगवलेलें गवत काढून रान मोकळें करण्यास कोळप्यांचा उपयोग होतो. खुरप्याच्या योगानें हातानें भांगलण करतात. बीं पेरण्याच्या औतास पाभर म्हणतात. यासहि दंताळ्याप्रमाणें दांते असून त्यांत पोकळ वेळूच्या नळ्या बसविलेल्या असतात. त्या सर्व नळ्यांचीं तोंडें एकत्र करून त्यांवर एक लाकडी पेटी अथवा चाडें बसविलेलें असतें. तींत बीं टाकलें म्हणजे तें नेमकें दात्यांनीं पडलेल्या चरांत जाऊन पडतें.

आपल्याकडील शेतीच्या कामीं हल्लीं उपयोगांत येणारीं हीं सर्व औतें अगदीं जुन्या पद्धतीचीं असून त्यांच्यांत पुष्कळ सुधारणा होणें जरूर आहे. तसेंच कांहीं नवीन म्हणजे पिकावरील कीड धुवून काढण्याचे पंप, कापणीचीं हातयंत्रें वगैरे औतें प्रचारांत येणें जरूर आहे. वाफेनें चालणारे अगर मोटारनांगर व नांगराखेरीज इतर लोखंडी औतें यांचा उपयोग मोठमोठ्या जमीनींवरच होण्यासारखा असल्यामुळें जेथें जमीनीचे लहान लहान तुकडे गरीब शेतकऱ्यांच्या ताब्यांत असतात तेथें त्यांचा मुळींच उपयोग न होतां त्यांतील सुधारणांचा खरा फायदा लोकांस मिळत नाहीं. या बाबतींत लोखंडी नांगरानें मात्र चांगलीच लोकप्रियता मिळविली आहे. यासाठीं त्याचा थोडा पूर्वेतिहास लिहिल्यास उपयुक्त होईल.

लोखंडी औतें किंवा नांगर हीं प्रथम महाराष्ट्रांत केव्हां आलीं याचा शोध करूं जातां असें आढळतें कीं, अगदीं मागें म्हणजे सुमारें सन १८४० सालच्या प्रसिद्ध झालेल्या ॲग्रिहॉर्टिकल्चरल सोसायटीच्या रिपोर्टांत लोखंडी नांगर किंवा औतें इकडे उपयोगांत आणावीं असा उल्लेख आहे. व तेव्हांपासूनच कोणत्यांना कोणत्या प्रकारचीं लोखंडी औतें इकडे आणण्यास सुरुवात झाली. सन १८८० सालीं सायन्स कॉलेजमध्यें असलेल्या शेतकी क्लासांत दुचाकी फिरत्या फाळाचे नांगर चालवून दाखविले जात होते असें त्या वेळचे विद्यार्थी व हल्लींचे शेतकी खात्यांतील पेन्शनर सांगतात; व याच वेळेपासून शेतकी खात्यानें निरनिराळ्या जातींचे नांगर व औतें आणून चालवून पाहण्याचा प्रयत्न जोरानें सुरू केला. त्यावेळीं शेतकी खातें नुकतेंच निघालें असल्यामुळें हैद्राबाद ( सिंध ), भडगांव ( खानदेश ) व पूना डेअरी अशा तीन ठिकाणीं सरकारी शेतें होतीं व त्याच ठिकाणीं सर्व प्रयोग होत असत. सन १८८५ ते १८९० सालापर्यंत स्टॅमेंड मॅसे आणि कंपनी, रॅन्सम व सिम्स ॲंड हेड या तीन मेकरचे नांगर चालवून पाहण्याचे प्रयोग चालू होते. या नांगरांबरोबरच गवत कापण्याचें यंत्र, बी पेरण्याचें यंत्र, वाफेनें चालणारीं मळणीचीं यंत्रें, जीन्स वगैरे चालवून पाहिलीं जात होतीं. गवत कापण्याच्या यंत्रानें रोज ५० माणसांचें काम होतें व सीड-ड्रीलमधून एकदम सोळा ओळी उत्तम तऱ्हेनें पेरतां येतात असा उल्लेख आहे. सन १८९० सालीं मॉलिसन साहेब " सुपरिंटेंडंट ऑफ फॉर्म्स " म्हणून आले त्यांच्या वेळीं बरेच लोखंडी नांगर असून शिवाय तीन चार जातींचे जर्मन नांगर चालवून पाहण्याकरितां आणले होते. परंतु ते चांगले ठरले नाहींत. या साहेबांनींच " प्लॅनेट ज्युनिअर हो" नांवाचीं बैलांनीं चालणारीं कोळपीं सुरू केलीं, व त्यांचा कापसाच्या पिकांत उपयोग केला जात असे. रॅन्सम सिम्स ॲंड हेड याच कंपनीचे नांगर चांगले म्हणून शेतकी खात्यानें ठरविलें होतें; व त्यासंबंधीं प्रथम सरकारी फार्मावर खात्री करून घेऊन बाहेर प्रात्यक्षिकें भरविलीं जात होतीं. इतकेंच नव्हे तर नांगर ठिकठिकाणीं चालवून दाखविण्याचें कामीं स्वतंत्र आफिसर म्हणून रा. जी. के. केळकर यांची नेमणूक झाली होती व हें काम ते दोन वर्षेपर्यंत करीत होते. कारण त्या वेळपर्यंत लोखंडी नांगर चांगला किंवा वाईट, त्यांपैकीं कोणत्या जातीचा चांगला हें प्रयोग करून ठरत होतें. १९०० सालापासून रॅन्सम सिम्स ॲंड जेफ्रस कंपनीचेच नांगर चांगले म्हणून त्यांचाच प्रसार करणें शेतकी खात्यानें सुरूं केलें. पुढें १९०४ सालापासून प्रोफेसर नाईट यांची नेमणूक झाली. कारण या वेळपर्यंत शेतकी खात्याची बरीच वाढ होऊन दोन तीन नवीन शेतें निघालीं व कांहीं अधिकारी नेमले गेले. नाईट साहेबांनीं रॅन्सम नांगरांच्या जोडीला अमेरिकेहून ऑलिंगन कंपनीचे नांगर आणवले व कांहीं दिवस दोन्ही नांगरांचा प्रसार सुरू होता. परंतु त्या वेळचे शेतकी खात्याचे डायरेक्टर किटिंग साहेब यांनां ऑलिंगन नांगराचा प्रसार होणें पसंत न पडल्यामुळें रॅन्सम नांगराच्या प्रसारास तेव्हांपासून फार उत्तेजन मिळालें, व त्या कंपनीचे एटी २, बीटी २, सीटी २, डीटी २, अशा हलक्या व भारी नांगरांचा प्रसार फार होऊं लागला.

पुढें रॅन्सम नांगरांच्या धर्तीवर किर्लोस्कर कंपनीनें नांगर काढले व विलायती नांगरांच्या धोरणानें किंमती ठेवल्या. त्या वेळीं शेतकी खात्याच्या प्रदर्शनाचे ठिकाणीं व मुद्दाम प्रात्यक्षिकें भरवून लोखंडी नांगरांच्या उपयुक्ततेबद्दल लोकांची खात्री पटत चालली होती. अर्थातच लोखंडी नांगरांचा खप फार होऊं लागला.

लोखंडी नांगर तयार करण्याचे कारखाने महाराष्ट्रांत हल्लीं बरेच आहेत. किर्लोस्कर कंपनी ( किर्लोस्कर वाडी ) पोतदारांचा काखाना ( इचलकरंजी ), सातारा इंडस्ट्रियल वर्क्स हे कारखाने प्रसिद्ध आहेत. परदेशी नांगरहि बरेच बाजारांत आहेत.

**औदीच्य ब्राह्मण**—उत्तरे ( उदीची )कडून हे गुजराथेंत आले म्हणून यांनां औदीच्य असें नांव पडलें. १९११ च्या खानेसुमारींत मुंबई इलाख्यांत एकंदर ८३१८० औदीच्य आढळले, पैकीं उत्तर भागांत १६८४३ व गुजराथेंतील संस्थानी भागांत ६२१२७ होते. एकंदर औदीच्य ब्राह्मणांतले अजमासे निम्मे तर एकट्या बडोदें संस्थानांत आहेत. यांच्या आगमनासंबंधीं एक अशी कथा सांगतात कीं अनहिलवाडचा राजा मूलराज ( इ. स. ९६१–९६ ) यानें यज्ञसमारंभाकरितां या ब्राह्मणांनां उत्तरेकडून बोलाविलें व समारंभ पार पडल्यावर त्यांनीं आपल्या राज्यांत रहावें म्हणून कांहीं जमिनी इनाम देऊं केल्या. ज्या एक हजार ब्राह्मणांनीं तावडतोब या देणगीचा स्वीकार केला, त्यांनां 'सहस्र औदीच्य' व ज्यांनीं आपली एक टोळी बनवून प्रथम इनामें घेण्याचें नाकारलें त्यांनां ' टोळकिया औदीच्य अशीं नांवें पडलीं. टोळकियांची संख्या बडोदें संस्थानांत चार हजारांपेक्षां जास्त नाहीं सहस्रे हे टोळकियांपेक्षां उच्च दर्जाचे गणले जात असून त्यांच्यांत पुन्हां सिहोरा व सिद्धपुरिया असे भेद आहेत ( सिहोरा भावनगर संस्थानांत व सिद्धपूर बडोदें संस्थानांत एक शहर आहे ).

औदीच्य ब्राम्हण बहुधा भिक्षेवर रहातात; कांहीं थोडे शेतकरी; आचारी किंवा उपाध्ये म्हणून आहेत. हलक्या जातींच्या लोकांची भिक्षुकी केल्यामुळें यांच्यांत अनेक पोटवर्ग निर्माण झाले आहेत. उदा. दर्जीगोर ( शिंप्याकडे काम करणारे ), हजामगोर ( हजामाकडे काम करणारे ), कोळीगोर, मोचीगोर, इत्यादि. हुक्का ओढणारे, विधवांचा पुनर्विवाह लागणारे आणि शेतावर शिजविलेलें अन्न घेऊन जाणारे औदीच्य हलक्या प्रतीचे समजून त्यांच्याशीं इतर ब्राह्मण व्यवहार करीत नाहींत. तथापि या औदीच्यांच्या मुली

काठेवाडांतल्या झालावाडा औदीच्यांच्या घरीं पडल्या तरी चालतात. झालावाडा औदीच्यांच्या मुली धांगध्रा औदीच्यांच्या घरीं, व धांगध्रा औदीच्यांच्या मुली अति उच्च दर्जाचे म्हणून गणले जाणारे जे विरमगांव, अहमदावाद व सिद्धपुरी औदीच्य यांच्या घरीं बिनतक्रार पडतात. सिद्धपुरिया औदीच्याला आपली मुलगी देणें हें मोठें मानाचें लक्षण मानिलें जातें कारण तो सर्वश्रेष्ठ ब्राह्मण होय. तेव्हां सिद्धपुरिया नवऱ्याला फार मागणी असते व त्यामुळें बहुपत्नीकत्वाची चाल त्या जातीमध्यें आली. जातींतील लोकांच्या स्थलांतरामुळें रोधवाल, नापाल, बोरसाद आणि हरसोला अशा ब्राह्मण जाती बनल्या असून, कोलिगोर, राजगोर, कायातिया, क्रियागोर, व्यास आणि तारगाला या जाती औदीच्यांनीं हलकीं कामें पत्करल्यावरून बनल्या आहेत. १९११ च्या खानेसुमारींत औदीच्य ब्राह्मणांपैकीं दर हजारीं १४८ पुरुष व त्यांपैकीं शेंकडा २७ स्त्रिया भिक्षा, तनुविक्रय, गुन्हेगारी वगैरे धंद्यांत असतात असें दिलें आहे. हें धंद्याचें सदर ब्राह्मणांमध्यें फक्त याच वर्गांत दाखल केलें आहे. यांची लग्नरीति पुढें वर्णन केल्याप्रमाणें असते.

लग्नविधि.—यांच्यामध्यें वधूवरांच्या वयाची इयत्ता ठरलेली नाहीं. वाग्दान करण्याकरितां वरपक्षाची मंडळी कन्यापित्याच्या घरीं जाते. तेथें यथाशास्त्र वाग्दानविधि झाल्यावर दोन्ही पक्षाची मंडळी परस्परांस सवाशेर बत्तासे देतात. 'विवाह' म्हणजे वाग्दान हें तोंडी ठरावानें करण्यांत येतें. त्यानंतर गणपतिपूजन होऊन व्याही परस्परांस पांच पांच सुपाऱ्या देतात. कन्यापिता वराच्या हातीं एक रुपया, सुपारी व नारळ देऊन त्याचा उजवा पाय धुवून त्याची पूजा करितो. वाग्दान झाल्यापासून पुढें लग्न होईपर्यंत सणावारांच्या दिवशीं वरपिता वधूला कांहीं वस्त्र, खेळण्याच्या वस्तू, व खाऊ पाठवितो. लग्नदिवशीं दोन्हीकडे ग्रहशांति होऊन वधुवरांस हळद लावितात. वरप्रस्थान आणि 'कलवो' श्रीगौड ब्राह्मणांच्या चालीप्रमाणेंच आहे. 'कलवो' येऊन गेल्यावर वरपक्षाकडून वधूला घालावयाचे अलंकार वगैरे पाठवितात. लग्नमुहूर्त नजीक येतांच नवरामुलगा स्नान करून जानवसघराहून वधूगृहीं जातो तेथें त्याची भावी सासू सामोरी येऊन त्यास घरांत घेऊन जाते नंतर लग्नाचीं यथाशास्त्र सर्व कर्में मंडपांत बहुल्यावरच होतात. (अलोनीकृत लग्नविधि व सोहाळे पहा.)

यांच्यामध्यें शैक्षणिक स्थिति चांगली नाहीं. यांच्या स्त्रियांचें प्रमाण अनेक हलक्या जातींतील स्त्रियांपेक्षां अधिक आहे.

[मुं. गॅ. सेन्सस रिपोर्ट १९११, पु. १६ (बडोदे), व पु. ६ (मुंबई).]

**औद्देहिक.**—यांस औद्देहिक व उद्देहिक अशींहि नामांतरें आहेत. बृहत्संहितेंत उल्लेखिलेले (१४. ३) मध्यदेशांतील एका जातीचे लोक. "बझान बवळचे उद्देहिक" असें अल्बेरुनी म्हणतो. पण "बझान" कोठें आहे असा प्रश्न उत्पन्न होतो. एक बझान कनोजपासून नैर्ऋत्येच्या बाजूस २८ फर्सख (१ फर्सख = ४ मैल) अंतरावर आहे असें अल्बेरुनी म्हणतो. शिवाय तो म्हणतो कीं, बझान गुजराथची राजधानी आहे, व आपले लोक त्याला नारायण म्हणतात." व तो अनहिलवाड बझानच्या नैर्ऋत्येस ६० फर्सख अंतरावर आहे असें म्हणतो.

**औद्योगिक परिषद.**—या परिषदेची स्थापना इ. स. १८९१ सालीं कै. रानडे यांनीं केली. तिचे उद्देश सभा व परिषदा भरवून औद्योगिक विषयांसंबंधीं चर्चा, निबंध, प्रदर्शनें, शास्त्रीय प्रयोग, प्रात्यक्षिकें, कलाकौशल्याचें शिक्षण इत्यादि साधनांनीं व सरकार आणि संस्थानिक यांस सूचना करून देशाचा व्यापार व उद्योगधंदे यांची अभिवृद्धि करणें हा होता. या सभेचें १८९३ सालीं तिसरें अधिवेशन झाल्यानंतर ही सभा बंद पडली. तिचें १२ वर्षांनीं १९०५ सालीं लाला मुनशी माधवलाल व रमेशचंद्रदत्त यांनीं पुनरुज्जीवन करून बनारस येथील राष्ट्रीय सभेच्या मंडपांत पुन्हां अधिवेशन भरविलें व रा. ब. मुधोळकर यांस जनरल सेक्रेटरी नेमण्यांत आलें. पुढें १९१७ सालीं परिषदेचें ऑफिस मुंबईस आल्यावर रा. मनमोहनदास रामजी तिचें काम पाहूं लागले. १९०५ सालापासून १९१८ पर्यंत या परिषदेचीं १४ अधिवेशनें झालीं.

या परिषदेनें अहवालाच्या रूपानें बरीच माहिती प्रसिद्ध केली आहे. याखेरीज एक कारखानदारांची जंत्री, एक यंत्रांची जंत्री व विद्यालयांची जंत्री अशीं तीन पुस्तकें इंग्रजींत प्रसिद्ध केलीं आहेत. व राष्ट्रांत औद्योगिक चळवळ व जागृति उत्पन्न केली आहे. परिषदेच्या अहवालांत सुमारें ३०० निरनिराळ्या विषयांवर निबंध प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतील कांहीं विषय शेतकीची सुधारणा, साखर, कांच, कागद, अत्तरें, रेशीम, रासायनिक पदार्थ इत्यादींचे कारखाने, पतपेढ्या, विमाकंपन्या वगैरे स्थापन करणें; व्यापारी व धंदेशिक्षण देणें; देशांतील खनिज संपत्तीची अथवा औद्योगिक परिस्थितीची पाहणी करणें वगैरे होते. या परिषदेनें पास केलेल्या ठरावांत कलाशिक्षण, शेतकीशिक्षण व व्यापारी शिक्षण देणें, स्वदेशी व्रत पाळणें, औद्योगिक पाहणी करणें, लहान धंद्यांस उत्तेजन देणें, कापडावरील जकात उठविणें, व्यापारी संघ स्थापणें, सर्व हिंदुस्थानांत वजनें व मापें एक करणें इत्यादि विषयांवर होते. या परिषदेस प्रत्यक्ष कांहीं गोष्टी कराव्या म्हणून पुष्कळ सूचना आल्या. परंतु देशांत उद्योगधंदे काढण्यासंबंधानें लोकांस प्रोत्साहन देऊन जागृत करणें हेंच परिषदेचें मुख्य कर्तव्य आहे, व याकरितां स्वदेशी मालाची जंत्री (डायरेक्टरी) छापून काढणें; नवीन धंदा काढणाऱ्यास माहिती व सल्ला देणें तज्ज्ञ व अनुभवी माणसांची यादी तयार करणें, उपयुक्त वाङ्मयाचा संग्रह करून त्याचा लोकांस मोफत उपयोग करून देणें; व्यापारी

व कारखानदार यांचा संबंध जुळवून देणें इत्यादि कामेंच परिषदेनें करावी असें धोरण ठेवावयाचें ठरलें.

औंध—औंध हें गांव, पंतप्रतिनिधींच्या संस्थानाची राजधानी आहे पंतप्रतिनिधी मूळचे किन्हईचे. तेथील कुलकर्णी परशुराम त्र्यंबक हा या घराण्याचा मूळपुरुष. औंधच्या सभोंवतीं ब्रिटिश मुलुखांतील खटाव विभाग आहे. औंध हें सातारा जिल्ह्यांत साताऱ्यापासून आग्नेयेस २६ मैलांवर आहे. ज्या घाटांतून सातारा-तासगांव रस्ता खटाव आणि कारेगांवकडे जातो, त्याच्या माथ्यावर पूर्वेकडे जो फाटा फुटतो तो औंधास जातो. गांवाच्या उत्तरेस व पूर्वेस टेंकड्या असून मध्यंतरीं खोलांत गांव आहे. संस्थानचें क्षेत्रफळ ५०१ चौ. मैल असून लोकसंख्या ( १९२१ ) ६४५६० आहे. आणि एकंदर वसूल ३,५३,००३ रु. १५ आणे १ पै आहे. संस्थानिक हे कोणासहि ( इंग्रजांस सुद्धां ) खंडणी देत नाहींत. संस्थानिकांचें घराणें देशस्थ शुक्ल यजुर्वेदी आहे. हल्लींचें अधिपति श्री. भगवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंडित प्रतिनिधी हे बी. ए. असून उत्तम चित्रकार आहेत. जुनीं चित्रें चितारतांना तत्कालीन पोषाख व हत्यारें आणि चालीरीती कशा होत्या हें सर्व लक्ष्यांत घेऊन त्याप्रमाणें ते चित्रें काढतात. त्यासाठीं त्यांनीं बराच प्रवास केला आहे. श्रीमंत हे विद्वान, प्रजाहितदक्ष पूर्वजाभिमानी आणि पुराणमताभिमानी आहेत. त्यांनीं प्रजेच्या कल्याणासाठीं अनेक उपयुक्त संस्था काढिल्या आहेत. राज्यकारभारांतहि सुधारणा केल्या आहेत. राज्यांतील एकंदर खात्यांचे सात विभाग करून प्रत्येक विभागावर एक एक सेक्रेटरी नेमून या सातहि विभागांवर मुख्य नजर श्रीमंतांची असते. या सात जणांचें एक कौन्सिल व त्याचे अध्यक्ष श्रीमंत अशी ही योजना आहे. कौन्सिलच्या सल्ल्यानें सारा कारभार चालतो. दरसाल रयतसभा भरली जाते, तिच्या पुढें संस्थानचें बजेट मांडण्याची व लोकप्रतिनिधींच्या सूचनांचा विचार करण्याची रीत नुकतीच अंमलांत आली आहे. या लोकप्रतिनिधिसभेची स्थापना श्रीमंतांच्या वाढदिवशीं ( १६-२-२४ रोजीं ) झाली. तींत एकंदर ३५ सभासद असून सरकारी १०, सरकारनियुक्त ७ आणि लोकनियुक्त १८ अशी वर्गवारी आहे. म्हणजे लोकनियुक्तांची संख्या जास्त आहे. यांच्या अनुमतानें यापुढें राज्यकारभार चालणार आहे. संस्थानांत सार्वत्रिक सक्तीचें व मोफत शिक्षण बरेच दिवसापासून सुरू आहे. बालचर चळवळहि सुरू करण्यांत आली आहे. औद्योगिक धंदेशिक्षणहि संस्थानांत मिळतें. संस्थानच्या एकंदर उत्पन्नाचा दोनपंचमांश शिक्षणाकडे खर्च केला जातो. शाळेंत जाण्यायोग्य २४३३ मुलांपैकीं १९२३ सालीं २२९० मुलें शाळेंत जात होतीं. विद्यार्थ्यांची संख्या वाढती आहे. श्रीमंतांनीं आपला खाजगीचा खर्चहि उत्तरोत्तर कमी केला आहे. तो ७७ हजारांवरून ४० हजारांवर आणला आहे. शेतसाऱ्याचा दर हलका आहे. फौज मुळीच नाहीं. पोलीस आहेत; त्यांचें प्रमाण दर १ हजार लोकांत १ शिपाई असें आहे. असें असूनहि गुन्ह्यांची संख्या उत्तरोत्तर कमी होत आहे. राज्यांत ३२ ग्रामपंचायती आहेत. त्यांना दिवाणी, फौजदारी अधिकार असून, शाळा, आरोग्य व पाणीपुरवठा यांच्यावरहि त्यांची देखरेख असते. पंचायतींनीं दिलेल्या निकालांवर १९२३ सालीं एकहि अपील झालें नाहीं. १०० रुपयापर्यंतच्या व्यवहाराच्या फिर्यादी पंचायती तोडतात.

राज्यांतील साऱ्या म्युनिसिपालिट्या लोकनियुक्त आहेत. त्यांचें उत्पन्न कमी पडल्यास संस्थानच्या उत्पन्नांतून त्यांना मदत मिळते. संस्थानची जमीन हलकी असल्यानें व्यापार फार कमी आहे.

हल्लीं किर्लोस्कर बंधूंचा व ओगले कंपनीचा असे दोन कारखाने संस्थानांत आहेत. पैकीं पहिल्यांत शेतीचीं अवजारें व दुसऱ्यांत कांचमाल उत्पन्न होतो. पहिल्यानें १५ टक्के व दुसऱ्यानें ६ टक्के नफा नुकतांच भागीदारांनां वाटला. दोन्ही कारखाने सध्यां भरभराटींत आहेत.

खुद्द औंधास एक रसायन प्रयोगशाळा असून तींत तेलें, आगपेट्या वगैरेंबद्दल शोध चालू आहेत. एक लोखंडी कामाचा कारखानाहि आहे.

अबकारी उत्पन्न सालीना ११॥ हजारांचें असून तें परभारें इंग्रजांकडून मिळतें.

संस्थानची एक बँकहि आहे. शेतकरी, पतपेढ्या, व्यापारी वगैरेंनां या बँकेकडून सढळ मदत मिळते. तिची सांपत्तिक स्थिति उत्तम आहे. गरीब विद्यार्थ्यांनांहि कर्जरूपानें बँक मदत देते.

पाश्चात्य दवाखान्यांप्रमाणें श्रीमंतांनीं आपल्या संस्थानांत देशी आयुर्वेदिक दवाखानेहि काढलेले आहेत.

संस्थानची लोकसंख्या वाढत आहे. संस्थानांत शेतकऱ्यांच्या पतपेढ्याहि आहेत. तसेंच उत्तम जनावरांची पैदासहि सरकारी खात्याकडून होत असते; आणि लोकांनीं केल्यास त्यांनां बक्षिसें देण्यांत येतात.

संस्थानांत वाचनालयेंहि आहेत. श्रीमंत दौऱ्यावर निघाले असतां गांवोगांव रयतसभा भरवून त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकून तीं दूर करीत असतात.

संस्थानचे जे नोकर अल्पवयांत मृत्यु पावतात त्यांच्या कुटुंबांस बालपरवेशी ( पेनशन ) देण्याची चाल अद्यापि सुरू आहे.

परशुराम त्र्यंबक यांनां शाहुमहाराजांनीं प्रतिनिधिपदाची सनद वंशपरंपरेनें दिली, त्यावेळीं राजापुरापासून दाभोळपर्यंत कोंकणपट्टी धरून, सातारा, वाई, मेढें, माण, खटाव, मिरज, कोल्हापुर वगैरे प्रांत प्रतिनिधींच्या जहागिरींत येत होते. पुढें कोल्हापुरचें राज्य निराळें होऊन मराठी साम्राज्याची वाटणी झाल्यानंतर कोल्हापुर, पन्हाळा विशाळगड हे प्रांत प्रतिनिधींच्या इलाख्यांतून जाऊन त्याऐवजीं

हल्लीं असलेल्या विजापूर जिल्ह्यापैकीं बराचसा भाग आणि खानापुर व आठपाडी तालुके हे आले. पुढें रावबाजींच्या कारकीर्दीत प्रतिनिधींची जहागिरी जप्त झाली. नंतर जी सुटली तेंच हल्लींचें संस्थान. याचे ५ प्रांत आहेत. हे भौगोलिक दृष्ट्या एकमेकांपासून फार लांब लांब आहेत. त्यामुळें संस्थानला राज्यकारभाराचा खर्च जास्त येतो. श्रीमंतांच्या मनांत राज्यांत कायमधारापद्धति स्थापण्याचें आहे. न्याय व अंमलबजावणी खातीं वेगळीं करण्याचीहि योजना चालू आहे. संस्थानांत औद्योगिक व शेतकीचीं प्रदर्शनें नेहमीं भरतात.

संस्थानला दत्तकाचा अधिकार आहे. औंधास जुने२तलाव आहेत. श्रीमंतांचा राजवाडा मराठी पद्धतीचा दुमजली व तीन चौकी आहे. दोन एकर जागा त्याच्याखालीं झांकली गेली आहे. वाड्याच्या डावीकडे प्रतिनिधींच्या कुलदेवतेचें (यमाई देवीचें) सुंदर देऊळ आहे. देवळासमोर ६०फूट उंच व १५ फूट व्यासाच्या चौथऱ्याची जुनी दिपमाळ आहे. तिची नकशी सुबक आहे. १७६ दिवे तिच्यावर लावतां येतात. औरंगजेब औंधास मूर्ती फोडण्याकरितां आला असतां त्यानें दिपमाळ शाबूत ठेविली. गांवाजवळ ८०० फूट उंचीच्या टेंकडीवर यमाईचें प्राचीन देऊळ आहे, त्याला मूळपीठ म्हणतात. देवळास तटबंदी आहे. पांच बरूज आहेत. वरपर्यंत पायऱ्या आहेत. मधोमध एक गणपतीचें देऊळ आहे. टेंकडीवर माणसाळलेलीं माकडें फार आहेत. त्यांच्या पोटासाठीं कांहीं जमीन इनाम दिली आहे.

इ ति हा स.—सातारा जिल्ह्यांत वर्धनगडाखालीं किन्हई गांव आहे. तेथें यमाजीपंत कुलकर्णी रहात असे. तो यजुर्वेदी, सावरणिय गोत्री होता. त्याचा धाकटा मुलगा कृष्णाजी, त्याचा धाकटा पुत्र त्र्यंबकपंत व त्याची स्त्री लक्ष्मीबाई. ही नवराबायको औंधच्या यमाबाईचे निस्सीम उपासक. यांच्या पोटीं शके १५८२ मार्ग. वद्य १(सन १६६०)रोजीं परशुरामपंतांचा जन्म झाला. याच्या वेळीं जगदंबेनें त्र्यंबकपंताच्या बहिणीचें रूप घेऊन बाळंतपण केलें अशी दंतकथा आहे. त्र्यंबकपंतांनीं किन्हईस देवीचें देऊळ बांधलें.परशुरामपंत १४ व्या वर्षी कुलकर्ण सोडून विशाळगडीं जाऊन निळो सोनदेव अमात्य यांच्या पदरीं राहिले. निळोपंतांचे चिरंजीव रामचंद्र व परशुराम यांचा स्नेह जमला. परशुरामपंतांच्या पहिल्या मर्दुमकीच्या कृत्यांची माहिती आढळत नाहीं. राजाराम महाराज जेव्हां जिंजीकडे गेले तेव्हां पंतांनां अमात्याच्या पदरीं सरदारी देऊन ठेविलें (१६९० ). जिंजीस असतांना महाराजांनीं पंतांनां "समशेर बहाद्दर जंग" पदवी दिली. औरंगजेबास तोंड देऊन स्वराज्याची विसकटलेली घडी पुन्हां बसविण्याच्या तत्कालीन कामगिरीवर अमात्य सचीव यांच्याबरोबरच पंतांचीहि योजना झालेली होती त्यांनीं पन्हाळा मोठ्या शर्तीनें मोंगलांपासून घेतला (इ.स. १६९२). आणि मिरज ते रांगण्यापर्यंतचा सारा मुलूख सोडविला. पंत जसे शूर होते तसेच भगवद्भक्तहि होते. ते संस्कृत व्युत्पन्न असून कीर्तन करीत व स्वतः काव्यहि करीत. त्यांच्या संस्कृत व मराठी काव्यांचें एक बाड सांपडलें आहे. त्यांचेवर आई आदिपुरुष या सत्पुरुषाची कृपा असून तो त्यांचा गुरु होता. राजाराम महाराज असतांच त्यांनीं पंतास प्रतिनिधीपद तात्पुरतें(इ.स.१६९९)शके१६२१ फाल्गुनमासांत दिलें. त्यावेळीं पदाचीं वस्त्रें दिलीं तीं:— भरगच्ची मंदील, चादर, पटका, किनखापाचें ठाण व महमुदीचें ठाण, शिरपेंच, कंठी, चौकडा, तुरा, जिगा, शिक्केकटार, चौघडा, तीन हत्ती व सोन्याच्या दांडीची चवरी, ढाल, तरवार, जरीपटका, घोडा व सोन्याच्या काठीचा भालदार. प्रतिनिधी म्हणजे 'राजाची प्रतिमा' (व्हॉइसराय) होय. मध्यंतरीं पंतांचें प्रतिनिधीपद काढून तिमाजीपंत हणमंते यांस तें देऊन पंतांनां पेशव्याचें पद दिलें ( शके १६२१ ). औरंगजेबानें परळीस वेढा दिला असतां तेथें पंत होते. त्यांनीं किल्ला शौर्यानें पुष्कळ दिवस टिकविला होता. शाहु महाराजांनीं पंतांस प्रतिनिधीपद "एकनिष्ठपणाची सीमा केली, महत्कार्यें करून राज्यरक्षण केलें म्हणून वंशपरंपरेनें 'वतनी' करून दिलें ( शके १६३२ )." यांच्याशिवाय कोणत्याहि अष्टप्रधानाला त्याचें पद "वतनी" दिलेलें नाहीं, यावरून पंतांची योग्यता समजते. शाहुमहाराज देशीं आले तेव्हां ताराबाईनें दुसऱ्या सरदारांबरोबर पंतासहि पाठविलें होतें. धनाजीराव सेनापति व इतर मंडळी शाहूस मिळाली, परंतु पंत मिळाला नाहीं. शेवटपर्यंत लढला; नंतर साताराचा किल्लाहि त्यांनीं अखेरपर्यंत लढविला; पुढें शेखमिऱ्यानें भेदानें किल्ला शाहूस दिला. हा शेख पंताचा मित्र होता. पंत कैदेंत होते. शाहूनें त्यांनां आपल्याला मिळण्याबद्दल खूप खटपट केली पण पंत ऐकेना. त्याचें वचन ताराबाईस गेलेलें होतें. अखेर कोल्हापूरचें राज्य स्वतंत्र झाल्यानंतर पंत शाहु महाराजांचे नौकर बनले. याच वेळीं त्यांनां प्रतिनिधीपद दिलें. सरंजामास १६ प्रांत व ३५ किल्ले दिले. मध्यंतरीं पंत हे कोल्हापूरकरास सामील असल्याच्या संशयावरून त्यांचें पद काढून त्यांनां महाराजांनीं कैदेंत टाकिलें ( स. १७११ ). यावेळीं पंतांचे चिरंजीव कृष्णाजी यांनीं कोल्हापूरातर्फे शाहूमहाराजांच्या राज्यांत दंगा केल्यानें पंतावर रागाऊन त्यांचे डोळे काढून त्यांनां ठार मारण्याची आज्ञा महाराजांनीं दिली, तेव्हां खंडोबा चिटणिसानें महाराजांची समजूत घालून आज्ञा फिरविली. याचवेळीं कृष्णराव खटावकराचा पराभव बाळाजी विश्वनाथ यांनीं केला; त्या स्वारींत पंतांचे दुसरे चिरंजीव श्रीपादराव यांनीं चांगली तरवार गाजविल्यानें महाराजांनीं पंतांनां कैदेंतून सोडवून वंशपरंपरेनें प्रतिनिधीपद दिलें ( स. १७१४ ) यापुढें पंतावर महाराजांची मर्जी सतत बसली व पंतांनींहि राज्याची सेवा इमानानें केली. त्यामुळें महाराजांनीं त्यांनां वेळोवेळीं इनामें दिलीं. त्यांचा मृत्यु

सातारा येथें शके १६४० ज्येष्ठ शु. ८ रोजीं झाला. त्यांचें वृंदावन संगम माहुलीस आहे. त्यांनां पांच मुलगे व दोन मुली होत्या. कृष्णराव, त्र्यंबकराव, श्रीनिवास ( उर्फ श्रीपत ) राव, सदाशिवराव व जगजीवन ( ऊर्फ दादोबा ) हीं मुलांचीं नांवें होत. कृष्णराव हे कोल्हापूरकरांचे प्रतिनिधी होऊन विशाळगडकरांचे मूळ पुरुष झाले. श्रीनिवासराव यांनां शाहु महाराजांनीं प्रतिनिधी केलें. हेहि शूर व धार्मिक होते. यांनीं १० लक्षांचा मुलुख धर्मादायांत ( इनामें वगैरे ) लावून दिला. कर्नाटकांत व निजामाशीं, हपशांशीं, कोल्हापूरकराशीं लढाया देऊन त्यांनीं मुलुख मिळविला. यांच्या स्त्रीचें नांव राधाबाई. वास्तविक हे परशुरामपंतांनीं आपल्या ( माधवराव नांवाच्या ) बंधूस दत्तक दिले होते. परंतु शाहु महाराजांनीं तें विधान रद्द करविलें. हे ( १७४६ ) वारल्यानंतर यांच्या जगजीवन ( दादोबा ) बंधूस महाराजांनीं पद दिलें. महाराज वारल्यानंतर पेशवे व प्रतिनिधी यांचें न जमल्यानें पेशव्यांनीं दादोबास धरून किन्हईस कैदेंत ठेविलें पुढें दोन वर्षांनीं त्यांनां सोडलें ते लवकरच ( १७५४मध्यें ) वारले. यांच्या नंतर श्रीपतराव हे निपुत्रिक झाल्यामुळें यांचा चुलत नातु ( कृष्णाजी परशुरामाच्या गंगाधर नांवाच्या पुत्राचा मुलगा ) श्रीनिवास ऊर्फ भवानराव यांस पद मिळालें. मध्यंतरीं दादासाहेब पेशवे यांनीं १ वर्ष हें पद नारोशंकर यांस दिलें होतें भवानराव हे पेशव्यांविरुद्ध उठले होते; व निजामासहि जाऊन मिळाले होते. राक्षसभुवनाच्या लढाईनंतर ह्यांची समजूत पडून हे परत फिरले. पुढें पेशव्यांचा आग्रह पडला कीं प्रतिनिधींनीं पुण्यास रहावें. परंतु यांनीं तें ऐकलें नाहीं. तेव्हां भगवंतराव त्र्यंबक यांस वस्त्रें देऊन पुण्यास ठेविलें. नंतर भवानराव या गोष्टीस राजी झाल्यामुळें पुन्हां त्यांनां वस्त्रें दिलीं ( स. १७६८ ) व भगवंतरावास खानापूर वगैरे जहागीर दिली. या दोघांत नेहमीं लढाया होत. त्या भगवंतराव वारल्यानंतर ( १७७५ थांबल्या. त्यांच्या स्त्रिया राजसबाई व सकवारबाई यांनां दहा हजारांची नेमणूक करून विटयास ठेविलें. भवानराव हे बारभाईंत असून नानांच्या मर्जीतले होते. हे स. १७७७ मध्यें वारले. त्यावेळीं त्यांच्या दोन स्त्रिया काशीबाई व यमुनाबाई; यांपैकीं काशीबाई ही त्याच दिवशीं ( ३१ आगस्ट १७७७ ) प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचें नांव परशुरामपंत उर्फ थोटेपंत. यास पदाचीं वस्त्रें मिळून नाना फडणिसांनीं त्यांचा कारभारी म्हणून कृष्णराव जोशी सातारकर यास नेमिलें. हे पंत खर्ड्यांच्या लढाईंत होते. यांचा यांच्या आईशीं व कुटुंबाशीं बेबनाव झाला होता. यांनीं रामोशी चाकरीस ठेवून मुलुखांत दंगाधोपा आरंभिला. मादक पदार्थांचें व्यसन यांनां जडलें. हे माणसांच्या कानांत व नाकांत दारू घालून त्यांचा छळ करीत. तमाशगिरांचा त्यांनां छंद लागला. " रमा(ताई) तेलीण " म्हणून यांनीं एक नाटकशाळा बाळगली होती. ती फार शूर होती. यांच्या आईनें यांनां पुष्कळ उपदेश केला. परंतु तो फुकट गेल्यानंतर व यांच्या बायका लक्ष्मीबाई व रमाबाई या विशाळगडास गेल्यावर आईनें पेशव्यांकडे तक्रार नेली. तेव्हां त्यांनीं बापू गोखले यांनां पंतावर पाठविलें. त्यांची यांची लढाई मसुरेस होऊन पंतांचा हात तुटून ( या मुळेंच यांनां थोटेपंत म्हणत ) त्यांनां धरून बापूंनीं पुण्यास कैदेंत ठेविलें. रमा तेलणीनें थोडासा प्रतिकार यावेळीं केला. तिनें वासोटा किल्ला लढविला ( याच-प्रसंगाची पुढील प्रसिद्ध आर्या प्रचारांत आहे. " श्रीमंत पंतप्रतिनिधी यांचा किल्ला अजिंक्य वासोटा। तेलिण मारी सोटा, बापू गोखल्या संभाळ कासोटा॥ )' परंतु तिलाहि कैद करून बापूंनीं पुण्यास आडिलें; आणि प्रतिनिधींची सारी जहागीर जप्त केली. पैकीं म्हसवड वगैरें बापूंनां दिली. ( स. १८०७ ). पुढें ( स. १८१२ ) प्रतिनिधीस सोडून त्यांनां २ लक्षांची जहागीर दिली. पंत कऱ्हाडास आले, परंतु वृत्ति पालटली नाहीं. पेशवाई गेल्यानंतर पंतांनां सातारकर छत्रपतींच्या निसबतीस नेमून दिलें. तेव्हां मात्र पंतांची वृत्ति स्थिर झाली. अखेर ते १८४८ त वारले. त्यांनां औरस संतति नसल्यानें भाऊबंदांपैकीं एक मुलगा दत्तक घेऊन त्याला गादीवर बसविलें व शेवटचे छत्रपती शहाजीराजे यांनीं त्यांनां पदाचीं वस्त्रें दिलीं. हेच शेवटचे प्रतिनिधी कीं ज्यांनां प्रतिनिधी पद निर्माण करणाऱ्याच्या वंशजानेंच पदाचीं वस्त्रें दिलीं. (यापुढील पंतांनां इंग्रजांकडून वस्त्रें मिळालीं आहेत ). यांचें नांव श्रीनिवासराव. यांच्या अमलांत हुचमली गांव इंग्रजाकडे जाऊन मोबदला गांव करून दिले. यावेळीं कऱ्हाड गेल्यामुळें राजधानी औंधास आली. हे पंत सुशील व सदाचारी होते. हे १९०१ सालीं वारले. नंतर यांचे वडील पुत्र परशुरामराव हे गादीवर आले ते १९०५ सालीं मृत्यु पावल्यानंतर त्यांचे चिरंजीव श्री. गोपाळकृष्णराव उर्फ नानासाहेब हे तख्तनशीन झाले. हे फार करारी होते. दोन वर्षांनीं त्यांच्यावर दिवाणास मारण्याचा प्रयत्न केल्याचा आरोप आला व इंग्रज सरकारनें त्यांनां पदच्युत केलें (स. १९०७) हल्लीं ते धारवाडास असतात. त्यानंतर दोन वर्षांनीं विद्यमान संस्थानिक श्री. भवानराव ऊर्फ बाळासाहेब हे ( ४-११-०९ ) गादीवर बसले. हे सुशिक्षित, विनयसंपन्न, कुशल चित्रकार प्रजाहिततत्पर असून, यांनीं महाभारताची एक शास्त्रशुद्ध प्रत छापून निघण्यासाठीं ( भां. प्रा. सं. सं. ला. ) द्रव्यद्वारें मदत केलेली आहे. यांच्याविषयीं महाराष्ट्रांत सर्वत्र माहिती आहे.

परशुरामपंतांच्या वेळीं संस्थानचें एकंदर उत्पन्न ३० लक्षांचें होतें. पुढें जगजीवनरावांच्या वेळीं पेशव्यांनीं यापैकीं बराच मुलुख जप्त केला. भवानरावांच्या वेळीं पांच लाखांचा सरंजाम मिळाल्याचा उल्लेख आहे. त्यांचे चिरंजीव

१



२



४



३



१ श्री. श्रीनिवास भवानराव पंतप्रतिनिधि.
संस्थान औंध.
२ सौ. रमाबाईसाहेब. राणीसाहेब, औंध.
३ यमाईचें देऊळ, औंध
४ राजवाडा, औंध.

(१) बोधि वृक्षाखालीं निद्रित पतीजवळ एक स्त्री बसलेली आहे, (२) तिला फूस लावून नेण्याचा एक राजपुत्र प्रयत्न करीत आहे, व ती त्याच्या हातून निसटूं पहात आहे, (३) तिच्या नवऱ्याची व या प्रियकराची लढाई



चालली आहे,(४) तिला जिंकून हातावर उचलून नेण्यांत येत आहे,(५) या हत्तीवरून पळून चाललेल्या राजपुत्राचा पाठलाग होत आहे, (६) ही मंडळी घरीं पोंचलीं आहेत,(७) हें जोडपें उभें आहे,शेवटचा देखावा शृंगार-विलासाचा आहे.

गणेशलेण्यांतील देखावे, ओरिसा.



भुवनेश्वर देवस्थान, ओरिसा.



उरिया लिपींत ताडपत्री पानांवर लिहिलेल्या एका सचित्र पुस्तकाचीं तीन पानें.

परशुरामपंताच्या वेळीं १८ लक्षांचें उत्पन्न होतें. प्रतिनिधी-कडे जमा होणाऱ्या वसुलास "जिल्हे बाब" म्हणत. [ संदर्भग्रंथ.—चतु. सं. वृ. ( भा. इ. सं. मं. ); कैफियती यादी; अष्टप्रधानांचा इति. ( भिडे ) परशुराम त्र्यंबक प्र. चें चरित्र ( वा. प. मेहेंदळेकृत ); संस्थानचा वा. रिपोर्ट; १९२२-२३; ज्ञा. प्र. सातारा ग्यासि. ]

**औंधपट्टा**—मुंबई इलाखा. नाशिक जिल्हा. सिन्नर तालुक्याच्या नैर्ऋत्य सरहद्दीवर देवळाली स्टेशनपासून दक्षिणेस १० मैलांवर औंध हें निसर्गतःच बळकट ठिकाण आहे. याच्यावर तटबंदी केल्याचें कोठेंहि दिसत नाहीं. हा अगदीं उभा सुळका असून त्यावर जाणाऱ्या सडकेमध्यें खोदलेल्या पायऱ्या पाडून टाकल्यामुळें आतां शिखरावर जाणें अशक्य झालें आहे. पलीकडच्या टेंकडीवर कांहीं सुंदर षट्पैलू खांब दिसतात. पट्टा हा जरा मोठा असून अहमदनगर तालुक्यांत आहे. याचें शिखर सपाट असून एका ठिकाणीं थोडें उंच आहे. या शिखराच्या खालच्या अंगास एका खडकांत खोदलेलें दालन आहे.

हे किल्ले बाहमनी राज्याची दक्षिणेंत स्थापना झाल्यानंतर चौदाव्या शतकाच्या उत्तरार्धांत बांधलेले असावेत. बहामनी राज्याचे विभाग झाल्यानंतर हे किल्ले अहमदनगरच्या वांटयास आले. इ. स. १६२७ मध्यें ते दिल्लीच्या सत्तेखालीं आले. इ. स. १६७१ मध्यें मोरोपंत पिंगळे यांनें ते शिवाजीच्यातर्फे काबीज केले. पुढच्या वर्षी ते मोहबतखानानें घेतले. परंतु १६७५ मध्यें पुन्हां मोरोपंतानें मोंगलांचा सेनापति देहेरखान यास जिंकून ते परत घेतले. ते १८१८ मध्यें मराठयांचें राज्य ब्रिटिशांच्या हवालीं होईपर्यंत मराठ्यांच्या ताब्यांत होते [ मुं. गॅ.]

**औंधेलिया**—बिलासपूर जिल्ह्यांत ही जात सांपडते. तिची संख्या १००० आहे एक उद्दारिया रजपूत आणि मूरीबंदी नांवाच्या एका दासीपासून यांची उत्पत्ति आहे व त्यामुळें त्यांचें नांव औंधेलिया पडलें आहे असें म्हणतात. यांचे पूर्वज रतनपुरास रहात असत आणि बायका वारस्त्रियांचा धंदा करीत. पुढें पुढें हे आपापसांतच लग्न करूं लागले तेव्हां त्यांची जात बनली अशा तऱ्हेचा जो अस्पष्ट इतिहास देतात तो बरोबर नाहीं. असें वाटतें कीं, या जातीचा कंजर वंजारासारख्या वन्य जातीशीं संबंध असावा आणि यांच्या स्त्रियांमध्यें वेश्यावृत्ति बरीच असावी. यांच्या स्पर्शाचा विटाळ त्या भागांत मानतात. अगदीं नीच जाती सोडून यांच्या जातींत बाहेरच्या लोकांचा समावेश होतो. तरी त्यांच्या पूर्वजांच्या कीर्तीप्रमाणें उच्च नीच भाव उत्पन्न झाला आहे. उद्दारिया औंधेलिया हे पंक्ता औंधेलियाबरोबर रोटीबेटीव्यवहार करण्यास कबूल होत नाहींत. त्यांच्यांत आजकाल ८ गोत्रें आहेत. यांच्या जातीच्या इतिहासाविषयीं एक कथा प्रचलित आहे ती येणेंप्रमाणेः—

सहरमान, बुध आणि मंगल असे तीन भाऊ होते. ते भक्ष्य शोधार्थ निघाले असतां एकास म्हशीचें शिंग, एकास मोराचा पंख व मंगलास बोरें सांपडलीं. मंगलापासून दोघे भाऊ थोडीं बोरें मागूं लागले तेव्हां तो म्हणाला कीं, जर तुम्हां पैकीं एकानें आपली मुलगी मला बायको करण्यास दिली तर मी देईन. सगोत्र विवाह करावा किंवा नाहीं या शंकेचा निवाडा करण्यास त्यानें मंगलाला सांगितलें कीं, तूं बुक्कया मारून लोखंडाचें मांजर तोडशील तर मुलगी तुला देऊं. त्यानें प्रयत्न करून बुक्कयांनीं लोखंडी मांजर तोडलें. तेव्हां आतां गोत्र तोडण्यास हरकत नाहीं अशी दोघां भावांची खात्री झाली. आणि सर्वांत वडील भावानें आपली मुलगी लहान भावास दिली.

मंगलाची संतति कंजर नांवानें प्रसिद्ध आहे. कंजर बायका वारस्त्रियांचा धंदा करतात आणि होतां होईल तो औंधेलिया वेश्येरीक कधीं पहात नाहींत असें म्हणतात. यांत बचावत आणि धनावत अशीं गोत्रेंहि आहेत. पंचभैया हें एक गोत्र आहे. या गोत्राचा अर्थ आरंभीं ५ भावांच्या एका बायकोची संतति होऊन हें गोत्र झालें असावें असा रसेलनें वाष्कळ तर्क केला आहे. मुलींचीं लग्नें ५ व्या किंवा ७ व्या वर्षी होतात, कारण मुलींची संख्या या जातींत फार थोडी आहे. मुलींची अदलाबदल करून लग्नें जुळतात आणि ६० रु. पर्यंत सुद्धां शुल्क द्यावें लागतें. व्यभिचार फार वाईट समजला जातो. विधवाविवाह आणि घटस्फोटाची पूर्ण मुभा आहे. हे दूल्हादेव आणि देवी यांची पूजा करतात. होळी हा त्यांचा मुख्य सण आहे. हे लोक प्रेतें जाळतात व अस्थी तिसऱ्या दिवशीं गोळा करून पिंपळाखालीं पुरतात. आणि त्यांच्यावर अभिषेकास एक मडकें वर बांधतात. १० व्या दिवशीं जातींतील लोक जमा होऊन क्षौर करतात आणि झाडाखालीं अंगाला तेल लावतात. अविवाहित लोक जर महामारीनें मेले तर त्यांस पुरतात. प्रेत जर उघडें ठेवलें तर तो गंगेचा अपमान आहे असें हे लोक समजतात.

**औनियाति**.—हें गांव बंगाल प्रांतांत ब्रह्मपुत्रा नदीच्या कांठीं आहे. येथें आसाम प्रांतांतील वैष्णव पंथी लोकांचें मुख्य सत्र "धार्मिक विद्यापीठ" आहे. तेथील मुख्य गुरूस गोसाई असें म्हणतात. त्यांच्या तैनातीकरितां अहोम राजांच्या कारकीर्दींत मिळालेली २२०० एकर इनामी जमीन अद्याप त्यांच्याकडे चालू आहे. सत्रामध्यें एक मोठें प्रार्थनामंदिर व ब्रह्मचारी शिष्यांनां रहाण्याकरितां ओऱ्या आहेत.

**औरंगझेब अलमगीर**— औरंगझेब हे ( १६१८–१७०७ ) बादशहा शहाजहानचें अर्जुमंदबानु मुम्ताझ महाल या राणीपासून झालेलें सहावें मूल होय. याचें सबंध नांव मुहिउद्दीन मोहंमद औरंगझेब होय. जहांगीर हा अहमदनगरच्या स्वारीहून आग्र्यास परत जात असतां पंचमहाल जिल्ह्यांतील दोहद गांवीं २४ आक्टोबर १६१८ ( जुनी पद्धत )

रोशीं रात्रीं याचा जन्म झाला. जसा त्याचा जन्म स्वारींत झाला तसा त्याचा मृत्यु देखील स्वारींतच झाला.

**जन्मापासून राज्यारोहणापर्यंत हकीकत.**— ( १६१८—१६५८ ) इराणच्या शहा अब्बासनें इ. स. १६१९ मध्यें कंदाहार घेतलें म्हणून शहाजादा खुर्रम शहाजहान) याला काश्मीरहून परत दरबारांत बोलाविलें व त्याची नेमणूक दक्षिणेंत केली; पण पावसाळ्यामुळें तो मध्येंच मांडू येथें थांबला. शहाजहान दक्षिणेंत येण्याचें कारण पुढीलप्रमाणें होतें. आग्र्याच्या दक्षिणेचें धोलपूर हें शहिरियार याला न देतां शहाजहानला दिलें त्यामुळें त्या दोघां भावांत भांडण लागलें. नूरजहाननें शहिरियारचा पक्ष घेतला व शहाजहानला दक्षिणेंत जाण्याचा हुकूम केला. पावसाळा संपला तेव्हां त्यानें नर्मदा ओलांडून अशीरगड घेऊन बऱ्हाणपुरावर चाल केली. त्यामुळें दरबारांत त्यास बंडखोर समजून त्याजवर पर्विझ राजपुत्र व मोहबतखान यांनां सैन्य देऊन पाठविण्यांत आलें. तेव्हां शहाजहान हा ओरिसा मार्गानें बंगाल्यांत गेला व तिकडे रोहतासचा किल्ला त्यानें घेतला. मात्र तेथें त्याचा बादशाही सैन्यानें पराभव केला. नंतर तो दक्षिणेंत पुन्हां परत आला व आपले मुलगे दारा व औरंगझेब यांनां ओलीस म्हणून लाहोर येथें दरबारांत पाठवून त्यानें बादशहाशीं बोलणें सुरू केलें. हीं मुलें नूरजहानच्या दृष्टीखालीं होतीं. इतक्यांत बादशहा १६२७ मध्यें मरण पावला. नंतर शहाजहान १६२८ मध्यें गादीवर बसला. औरंगझेब व दारा हे लाहोराहून आग्र्यास आले. औरंगझेबास महिना पंधरा हजार रुपयांची नेमणूक झाली व त्याच्या शिक्षणास प्रारंभ झाला.

**शिक्षणः**—शहाजहानचा प्रख्यात वजीर सादुल्लाखान हा त्याचा एक पंतोजी होता. तसेंच मीरमहंमद हकीम, मुल्लासालिह हेहि दुसरे शिक्षक होते. औरंगझेबची बुद्धी तीक्ष्ण व शीघ्रग्राही होती. त्याच्या पत्रव्यवहारावरून त्याला कुराण व हदीस बरेंच अवगत होतेसें ठरतें. अरबी व फारशी या भाषा एखाद्या मौलवीप्रमाणें त्याला लिहितां व बोलतां येत. तो खासगी व्यवहार हिंदुस्तानी भाषेंत करी. हिंदीहि त्याला व्यवहारापुरतें येई. बल्क व कंदाहार प्रांतांत तो कामावर असल्यानें चवताई व तुर्की याहि भाषा त्याला समजत होत्या. अरबी लिपींत त्यानें स्वतः दोन कुराणांच्या प्रती आपल्या हातानें लिहून त्या मक्का व मदिना येथें पाठविल्या होत्या. त्याचें अक्षर घोंसदार असे. वरीलप्रमाणेंच त्याची हस्तलिखित एक प्रत दिल्लीच्या निजामुद्दीन अवलियाच्या दर्ग्यांत ठेवलेली आहे. शिवाय विनश्रमाचें अन्न खाऊं नये असा त्याचा निश्चय असल्यामुळें त्यानें बऱ्याच कुराणाच्या प्रती लिहून काढल्या होत्या. त्या व स्वतः हातानें शिवलेल्या टोप्या तो विकी व त्यांच्या उत्पन्नाचा उपयोग स्वतःच्या चरितार्थाकडे करी.

त्याच्या पत्रांतून निरनिराळ्या म्हणी व काव्यांचे उतारे येतात. परंतु खुद्द त्याला काव्याची व गायनाची फारशी आवड नव्हती. इतिहासाचाहि त्याला नाद नव्हता. त्याच्या आवडीचा अभ्यास म्हणजे, कुराण व त्यावरील अनेक टीका, महंमद पैगंबराच्या दंतकथा, मुसुलमानी धर्मशास्त्र, महंमद गझनीचे व इतर धार्मिक ग्रंथ होत. यामुळें दरवेशी व औलिया यांची संगति त्याला फार आवडे. चित्रकला त्याला आवडत नसे. चिनीमातीचें कुसरीचें जिन्नस त्याला आवडत. बापाप्रमाणें इमारतींचा त्याला शोक नव्हता. एकहि नांवाजण्यासारखी कलाकुसरीची इमारत व मशीद त्याच्या कारकीर्दींत बांधली गेली नाहीं. हा चौदा वर्षांचा असतांना साठमारींतील एका हत्तीनें त्याचेवर हल्ला केला असतां त्यानें मोठ्या धैर्यानें त्याला जखमी केलें होतें. या त्याच्या धाडसाबद्दल शहाजहाननें त्याची सुवर्णतुला करून त्याला २ लक्ष किंमतीचें बक्षीस व तो हत्ती नजर करून बहादूर ही पदवी दिली.

**कामगिरीस प्रारंभः**—इ. स. १६३४ मध्यें त्याला लखभवन परगणा जाहगीर मिळाला ( १३ डिसेंबर ), दसहजारी ( स्वारांची ) मनसब मिळाली. शिवाय यांत चार हजार पायदळहि होतें. १६३५ मध्यें बुंदेल्याच्या स्वारीवर त्याला पाठविलें. या बुंदेल्यांनीं जहांगीरपासून मोंगली राज्यास उपद्रव देण्याचें सुरू केलें होतें. औरंगझेब त्यावेळीं १६ वर्षांचा असल्यानें तो नांवाचा सेनापति होता, खानजहान वगैरे तीन मुख्य सेनापती होते. ४ आक्टोबरला बुंदेल्यांचा पराभव होऊन त्यांची राजधानी मोंगलांनीं घेतली. बुंदेला राजा जुझार हा मारला गेला. या जयाचें बक्षीस म्हणून शहाजहाननें औरंगझेबास ( १४ जुलै १६३६ ) दक्षिणचा सुभेदार नेमलें व तो दौलताबादेस रहाण्यास आला. या सुमारास शहाजीराजे भोंसले हे निजामशाही तगविण्याच्या उद्योगांत होते. त्यांच्यावर खानजहान यास मोंगलानें पाठविलें. पुष्कळ झटापटी होऊन अखेर निरुपायांनीं शहाजी राजांनीं मोंगलांशीं तह केला; बाल निजामशहा मोंगलांच्या हवाली केला गेला. हा खानजहान यापुढें औरंगझेबचा मसलतगार झाला. याच सुमारास मोंगलांनीं औसा, उदगीर घेतली व बहुतेक गोंडवण प्रांतहि घेतला. इकडील कामगिरी संपल्यामुळें औरंगजेबानें आपला मोर्चा बागलाणकडे वळविला. येथील राजघराणें कनोजच्या रजपूत शाखेपैकीं होतें. साऱ्या हिंदुस्थानांत अजिंक्य म्हणून नांवाजलेले सालेर व मुल्हेर हे दोन किल्ले याच प्रांतांत होते. औरंगझेबानें बैरामशहा ( बागलाणचा राजा )वर ७ हजार सैन्यासह मालोजी व महंमद ताहीर यांनां पाठविलें. १५ फेब्रुवारीला सालेर व ४ जून १६३८ ला मुल्हेर पडले व सारा बागलाण मोंगलास मिळाला आणि बैरामशहा हा मोंगलाचा तीन हजारी सरदार बनला. शहाजीराजांचा मोड केल्याबद्दल पातशहानें औरंगझेबाची बढती करून

त्याला बाराहजारी केलें ( १४ आगष्ट १६३७ ) आणि बागलाण घेतल्याबद्दल पुन्हां त्याला पंधराहजारी ( १५ हजार घोडदळ व ९ हजार पायदळ ) २३ फेब्रुवारी १६३९ मध्यें दिली. त्यानें १४ जुलै १६३६ ते २८ मे १६४४ पर्यंत दक्षिणची सुभेदारी केली. या आठ वर्षांत चारदां तो बापास भेटण्यास गेला होता. त्यावेळीं बहुधां साहिस्तेखानास तो आपला अधिकार सुपूर्द करून जाई. खेळोजी भोंसले हा विजापूरकरांची नौकरी सुटल्यामुळें वेरूळच्या आसपास लुटालूट करून चरितार्थ चालवीत असतां औरंगझेबानें ( आक्टोबर १६३९ ) त्याजवर सैन्य पाठविलें; त्यांत खेळोजीचा पराभव होऊन त्याचा वध झाला.

बायका व मुलें.—मोंगली बादशहा लग्नाच्या बाबतींत इराणच्या राजघराण्याशीं सोयरीक जमविण्याची खटपट नेहमीं करीत; शहाजहान, परविझ, सुजा यांच्या बायका इराणी सफवी राजघराण्यांतील एका शाखेंतीलच होत्या. अशाच शाखेंतील शहा नवाजखान हा मोंगलांच्या पदरीं एक सरदार होता. त्याची मुलगी दिलरस बानु, हिच्याशीं औरंगझेबचें लग्न ( १४ मे १६३७ ) झालें. इचा मुलगा अझमशहा होय. लग्नानंतर तीन महिने आग्र्यास राहून औरंगझेब पुन्हां आपल्या दक्षिणच्या सुभेदारीवर ( ४ सप्टेंबर ) येण्यास निघाला. औरंगझेबास या दिलरसबानू शिवाय पुढीलहि बायका होत्या. (१) रहमत-उन्-निसा ( नबाबबाई ); ही मूळची काश्मिरांतील राजुरी संस्थानांतील रजपूत कुमारी होय. (२) औरंगाबादीमहाल, ही औरंगाबादेस औरंगझेबाला मिळाली. (३) उदेपुरीमहाल (पहा) ही वेश्या व नर्तकी होती, हिचा मुलगा कामबक्ष. ही जॉर्जीयन जातीची असून मूळची दाराच्या जनानखान्यांतील परंतु तो मेल्यावर औरंगजेबाकडे आली. हिच्यावर त्याची अतिशय प्रीती होती. (४) हिराबाई उर्फ झैनाबादी बेगम, हिच्या सौंदर्य, अभिनयादि गुणांमुळें औरंगझेब हिच्यावर इतका भाळला होता कीं, तिनें त्याची परीक्षा घेण्याकरितां त्याला दारू पिण्यास सांगितलें असतां तो तयार झाला होता. औरंगझेबास संततीहि बरीच झाली. दिलरसबानूपासून पांच मुलें ( झेब-उन्-निसा, झिनात-उन् निसा, झुबदतउननिसा-मोहंमद अझम व मोहंमद अकबर ), नबाबबाईपासून तीन मुलें ( मोहंमद सुलतान, मोहंमदमुअझम उर्फ शहा अलम उर्फ बहादुरशहा १ ला व बदर-उन्-निसा ), औरंगाबादीमहाल पासून एकटी मिहर-उन्-निसा , आणि उदेपुरीमहालपासून एक मोहंमद कामबक्ष , मिळून एकंदर दहा मुलें त्याला झालीं. त्याची बहीण जहानआरा भाजल्यामुळें, तिला पाहण्यासाठीं, औरंगझेब हा आग्र्यास ( २ मे १६४४ ) गेला. यानंतर तीन आठवड्यांनीं, बादशहानें त्याला नोकरीवरून बडतर्फ केलें. त्याची सुभेदारी काढून घेऊन, त्याची तनख्याची नेमणूकहि बंद केली. त्याचें कारण म्हणून खाफीखान व लाहोरी "त्याचेकडून कांहीं दुष्कृत्य घडलें" एवढेंच सांगतात. पण कोणतें दुष्कृत्य त्याचा निर्देश करीत नाहींत.मात्र खुद्द औरंगझेबाच्या पुढील एका पत्रावरून बादशहानें दाराच्या सांगण्यावरून त्याचा अपमान केल्यामुळें त्यानें आपण होऊन राजिनामा दिला असें दिसतें. पुढें जहान आराकडून पातशहाची समजूत निघाल्यानंतर, सात महिन्यांनीं औरंगझेबाची नेमणूक गुजराथच्या सुभेदारीवर झाली ( १६ फेब्रुवारी १६४५ ). तेथें तो १६४७च्या जानेवारीपर्यंत होता. तेवढ्या वेळांत त्यानें तेथील अनेक लुटारू व बंडखोरांचा बंदोबस्त करून, प्रांताची एकंदर व्यवस्था उत्तम लाविली. त्यानंतर त्याची नेमणूक बल्क व बदकशान या प्रांतांच्या सुभेदारीवर झाली. यावेळीं पातशहानें त्याची सालिना साठ लक्ष रुपयांवर नेमणूक केली होती.

बल्कवर स्वारीः—बदकशान व बल्क हे प्रांत काबूल व ऑक्सस या नद्यांच्या मध्य भागीं ईशान्येच्या बाजूस आहेत. बदकशान प्रांतांत एके काळीं माणीक व पुष्पराज यांच्या खाणी होत्या; पण त्या यावेळीं बंद पडल्या होत्या व बहुतेक प्रांत उजाड झाला असून रानटी डोंगरी लोक त्यांत रहात असत. बल्क हा बदकशानपेक्षां जास्त सुपीक देश होता. कालव्यांच्यामुळें तेथें शेती उत्तम पिके. तथापि या प्रांतांतील हजारा व ऐमक हे लोक लुटालूट करण्यांत व प्रवाशांचे जीव घेण्यांत तरबेज असत. अशा लोकांनां सैन्याच्या जरबेखालींच व्यवस्थित ठेवतां येई. नैर्ऋत्येकडील भागांतील लोक मात्र सुधारलेले होते. इ. स. १६४२ च्या सुमारास येथील राजा नजरमहंमद होता. त्यानें रयतेस फार छळल्यामुळें येथें बंडें उद्भवून, लोकांनीं त्याला पदच्युत करून त्याच्या अबदुल अझीझ नांवाच्या मुलास गादिवर बसविलें. पण या संधीचा फायदा घेऊन शहाजहाननें. "बल्क व बदकशान हे प्रांत मूळचे बाबरचे" असें कारण दाखवून त्यांवर स्वारी केली. शहाजादा मुरादनें बल्क घेतलें ( २ जुलै १६४६ ) परंतु मुराद लवकरच परत आल्यामुळें, तिकडे पुन्हां बंडाळी उत्पन्न झाली. तेवढ्यासाठीं पातशहानें सुजा व औरंगझेब यांनां तिकडे पाठविण्याचें ठरविलें. औरंगझेब हा लाहोरहून ( १० फेब्रुवारी १६४७ ) निघाला त्यावेळीं त्याला दरबारनें लक्ष रुपये नजर केले. पेशावर येथें उन्हाळा येईपर्यंत त्याला थांबावें लागलें. नंतर ( ३ एप्रील ) काबुल वरून तो बरोबर अलिमर्दान यास घेऊन २५००० सैन्यासह बल्कवर गेला ( २५ मे ) व हल्ला चढवून त्यानें बल्क काबीज केलें. परंतु, पुढें बदकशानकडे जात असतां, त्याच्या सैन्याचा पराभव होऊं लागला, म्हणून तो बल्ककडे परत वळला. वाटेंत, उझबेक पठाणांनीं त्याच्यावर हल्ले करून त्याचे फार हाल केले. शेवटीं तह होऊन, बल्क शहर व किल्ला नजरमहंमदच्या नातवास देऊन (१ आक्टोबर १६४७) औरंगझेब काबूलकडे परतला. या वेळींहि वाटेंत, उझबेकांनीं त्याचें फार नुकसान केलें, हिंदुकूशच्या घाटांत, वादळामुळेंहि त्याचें बरेंचसें सैन्य गारद झालें ( जवळ जवळ

दहा हजार ). या स्वारींत मोंगलांस एका कवडीचाहि फायदा न होतां उलट चार कोट रुपयांचा चुराडा उडाला.

यानंतर औरंगझेब यास मुलतानचा सुभेदार नेमलें ( मार्च १६४८ ). या जागेवर तो १४ जुलै १६५२ पर्यंत होता. या वेळांत त्यानें दोन वेळां इराणी लोकांवर स्वाऱ्या केल्या. पण त्यांचा तादृश कांहीं उपयोग झाला नाहीं. कारण या मोहिमांत मोगलांपेक्षां इराण्यांचा तोफखाना जास्त उत्कृष्ट ठरला. यापुढें औरंगजेबानें सिंध प्रांतांतील बंडाळी मोडली. त्यानंतर त्याची दुसऱ्यांदा दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक झाली. वाटेंत लाहोरास बापाला भेटून व गेलेली पंधरा हजारींची मनसब पुनरपि मिळवून तो दक्षिणेकडे वळला. यावेळीं पातशहा त्याच्यावर फार रागावला. कारण कंदाहारच्या वरील दोन स्वाऱ्यांत १२ कोटी रुपयांचा चुराडा होऊन व असंख्य सैन्य गारद होऊनहि कंदाहार कांहीं त्याला मिळवितां आलें नव्हतें. म्हणून या प्रसंगाबद्दल बापलेकांत अनेक उत्तरेंप्रत्युत्तरें झालीं. खरें म्हटलें तर या अपयशाचा मालक औरंगजेब नव्हता. कारण सैन्याची सर्व हालचाल काबूलहून खुद्द पातशहाच ठरवीत असे.

**दक्षिणची दुसरी सुभेदारी.**—दक्षिणच्या सुभेदारीवर ( १७ जुलै १६५२ ) नेमणूक झाल्यानंतर तो प्रथम बऱ्हाणपुरास आला; परंतु त्यावेळीं तेथील राजवाडा तयार झाला नसल्यानें गांवाबाहेर कांहीं दिवस राहून नंतर तो राजवाड्यांत दाखल झाला. येथेंच त्यानें हिराबाई( झैनाबादी महाल ) ला आपल्या जनानखान्यांत ओढलें. दक्षिणेंत जाण्याबद्दल पातशहाचे हुकूम वरचेवर येत असतांहि, येथें त्यानें नऊ महिने काढले. शेवटीं, बऱ्हाणपुराहून निघून दौलताबादेस तो आला ( २५ नोव्हेंबर ). येथें त्यानें चार वर्षें काढलीं. त्यांत विजापूर व गोवळकोंडे यांच्यांवर स्वाऱ्या केल्या. येथें त्याचा मुलगा अकबर हा जन्मला ( ११ सप्टेंबर १६५७ ). येथें त्यानें आपल्या आवडत्या दिलरसबानू बेगमेस मूठमाती दिली ( ८ आक्टोबर १६५७ ) आणि येथेंच त्याची आवडती राख झैनाबादीहि मेली. येथेंच असतांना जवळील सातारे गांवचें खंडोबाचें देऊळ व मूर्ती त्यानें फोडून मुरळ्या वाहण्याची चाल बंद केली, खडकी उर्फ औरंगाबाद हें शहर बसविलें; शिकारी; ख्यालिखुशाली, वेरूळचीं लेणी पाहाणें वगैरे कामांत त्यानें बरेच दिवस घालविले. एका छबीलराम नांवाच्या बीडच्या कानगोनें पैगंबराबद्दल कांहीं अप्रयोजक शब्द काढल्यामुळें औरंगजेबानें न्यायाचा फार्स करून त्याचा शिरच्छेद केला व त्याच्या नातलगांनीं पातशहाकडे याबद्दल अर्ज ( अपील ) केला असतां, त्यानें स्वतःच्या त्यावेळच्या वजीरा( सादुल्ला )स गुप्त पत्र लिहून, सदर ( अपील ) दाद पातशहाकडे न जाऊं देतां मधल्यामध्येंच दाबून ठेवण्याबद्दल कळविलें. याप्रमाणें हिंदूंवरील जुलुमास सुरुवात झाली.

औरंगाबादेस दिलरसबानूचें जें थडगें आहे, त्याची इमारत म्हणजे ताजमहालचा एक छोटा नमुना होय.

येथें आपल्या स्वतःसाठीं त्यानें एक राजवाडा बांधला व अद्यापिहि तो पडक्या स्थितींत अलमगिरी महाल म्हणून दाखविला जातो. औरंगजेब जेव्हां पुन्हां तिसऱ्यानें ( १६८२ ) दक्षिणेंत आला तेव्हां त्यानें या शहराभोंवतीं दोन कोस लांबीचा तट मराठ्यांच्या भीतीनें बांधविला. त्याला तीन लाख रुपये खर्च लागला. हा दुसऱ्यानें सुभेदार म्हणून इकडे आला त्यापूर्वीच्या गेल्या आठ वर्षांत दक्षिणेंत या मोंगली सुभेदाराच्या कारकीर्दींत सुबत्ता नांदली नाहीं, शांतता होती, लढायांची गडबड नव्हती, मात्र रयतेची शेती व सांपत्तिक स्थिति सुधारण्याऐवजीं उलट ती खराब झाली. याचें कारण सुभेदारांच्या लवकर होणाऱ्या बदल्या हें होय. या आठ वर्षांत सहा सुभेदार झाले. त्यांत कांहीं तर क्रूर, रयतेला पिळणारे, दुष्काळांत सरकारी माल विकून गबर होणारे व शेतीकडे दुर्लक्ष करणारे असे होते. मोंगली दक्षिण ( चार प्रांत ) चा महसूल जो तीन कोटी बासष्ट लक्ष रुपये पाहिल्यानें येत होता तो सन १६५२ च्या वेळीं एक कोटीवर येऊन बसला. यांपैकीं साडेसदतीस लाखांची जहागीर एकट्या औरंगजेबास होती. शिवाय त्याची पगारी नेमणुकीची रक्कम तिजोरींतून स्वतंत्र मिळत असे ती निराळीच ! यामुळें दक्षिणचा खर्च वसुलापेक्षां जास्त होई व ही तूट भरून काढण्यास माळवा अगर गुजराथच्या उत्पन्नापैकीं कांहीं रक्कम पाठवावी लागे. यामुळें औरंगजेब जेव्हां सन १६५३ त इकडे आला तेव्हां त्याला पातशहानें शेतकऱ्यांची स्थिति सुधारून व इतर उपायांनीं दक्षिणचा महसूल वाढविण्यास कळविलें. यानें त्यावर बादशहास सुचविलें कीं, हल्लीं जी २०३ लाखांची तूट येते ती भरून काढावयाची असल्यास इकडे जे सरंजामदार आहेत त्यांच्यापैकीं जे कुचकामाचे असतील त्यांच्या जहागिरींतून थोडीशी जहागीर सरकारजमा करावी अगर मला स्वतःला द्यावी आणि नोकरांचा पगार वगैरे खास खर्चाची रक्कम माळवा किंवा गुजराथच्या उत्पन्नांतून पाठवावी. पैकीं पहिली सूचना पातशहानें कबूल करून दुसरी नाकारली. त्यामुळें बापलेकांत बरेच वेळां खटके उडाले शेवटीं मुर्शिदकुलीखान यास जमीनमहसुलीच्या कामावर नेमण्यांत आलें. त्यानें जवळ जवळ तोडरमल्ली पद्धतच अमलांत आणली. प्रत्यक्ष पिकाची मोजणी, आणेवारी व बाजारभाव पाहून या साऱ्याची रक्कम ठरविली जाई. त्यामुळें जमीनमहसूल वाढला व शेतकऱ्यांनां उत्तेजन मिळालें.

यानंतर औरंगजेबानें जुने अधिकारी बदलून आपल्या निवडीचे तरतरीत नवे अधिकारी नेमले. प्रत्येक स्वाराचा पगार दरमहा रु. २० ठरविला. प्रत्येक किल्ल्यांतील शिबंदी व तोफखान्याची पाहणी करून रद्दी लोक व हत्यारें नाहींशीं करून ( त्यामुळें वार्षिक ५० हजार रुपयांची

वचत करून ) एकंदर सैन्याचा दर्जा वाढविला. त्यानें इतक्या सुधारणा केल्या असतांहि शहाजहानचें मन त्याच्याविषयीं शुद्ध नव्हतें. दारा अगर इतर मंडळी त्याला त्याच्या विरुद्ध कानगोष्टी सांगत व तो त्या खऱ्या मानी. या पांच वर्षांच्या सुभेदारींत औरंगझेबाला एकदांहि त्यानें राजधानीस बोलाविलें नाहीं अगर आपल्या वाढदिवशीं ज्याप्रमाणें इतर शहाजाद्यांनां तो बक्षिसें देई त्याप्रमाणें औरंगझेबाला एकदांहि त्यानें बक्षीस दिलें नाहीं. त्यानें केलेल्या शिफारसीहि बादशहा ऐकत नसे. " विजापूर, गोवळकोंडे या दरबाराशीं होणारें राजकारण आपल्या दक्षिणच्या सुभेदारामार्फत व्हावें " अशी त्याची इच्छाहि बादशहा मानीना; एवढेंच नव्हे तर त्यानें गोवळकोंड्याच्या शहाकडून गुपचूप रीतीनें नजराणे घेतले व दक्षिणचें उत्पन्न त्याला वाढवितां आलें नाहीं असा त्याच्यावर आरोप ठेऊन बादशहानें त्याची नेमणूक रद्द करून सुजाला तेथें नेमण्याचेंहि ठरविलें होतें ( यापैकीं गुपचूप नजराण्याचा आरोप खरा होता. ). या प्रकारास त्रासून त्यानें आपली बहीण जहान आरा हिला लिहिलें कीं, " मी आज वीस वर्षें बादशहाची सेवा एकनिष्ठेनें बजावली असतांहि त्याचा जो विश्वास सुलेमान शुकोह ( औरंगझेबाचा पुतण्या) याच्यावर आहे तितकाहि माझ्यावर नाहीं. " शहाजहानच्या हुकुमावरून औरंगझेबानें गोंडवणपैकीं देवगडच्या राज्यावर चढाई करून तें खालसा करून ( जानेवारी इ. स. १६५६ ) तेथील राजास मांडलिक बनविलें. पुढें १७६७ च्या सुमारास या देवगडच्या राजानें मुसुलमानी धर्म स्वीकारला व औरंगझेबास मराठ्यांच्या विरुद्ध मदत केली. औरंगझेबानें त्याबद्दल त्याला बुलंदबख्त ( नशीबवान ) अशी पदवी दिली ( १६८६ ). जव्हारचा राजा बादशहाला खंडणी देईना म्हणून औरंगझेबानें त्याच्यावर राव करण यास पाठवून त्याचा पराभव करून [ ५ जानेवारी १६५६ ] त्याला मांडलिक बनविलें.

गोंवळ कोंड्याची मोहीम ( इ. स. १६५६ ).—खंडणी थकली, कर्नाटकवरील स्वारींत मोंगलांची परवानगी घेतली नाहीं वगैरे कारणें काढून औरंगझेबानें कुतुबशहावर आपल्या मुलास पाठविलें, आणि 'विश्वासघातानें कुतुबशहास ठार मार' असा त्याला सल्ला दिला; पण कुतुबशहा हैद्राबादेहून पळून गोंवळकोंड्यास गेला. त्याला पुढें औरंगझेबानें वेढा दिला. दोन महिने लढाई होऊन अखेर कुतुबशहाच्या विनंतीवरून तह झाला ( कुतुबशाही पहा ).

इतक्यांत कर्नाटक खालसा करावा असा औरंगझेबानें बादशहास सल्ला दिला व वजीर मीर यानें त्याला भर दिली. कारण तो प्रांत फार श्रीमंत होता. शहाजहानास तें पटून त्यानें कर्नाटकहि जुम्ल्याची जहागीर आहे या सबबीवर कुतुबशहास तो देण्याचा हुकूम केला; परंतु अनेक कारणें दाखवून व शहाजहानाच्या आजारीपणाचा फायदा घेऊन कुतुबनें तो दिला नाहीं. याच वेळीं कर्नाटकाचा शेवटचा राजा श्रीरंगराय याच्यावर कुतुबशहास व आदिलशहा या दोघांनीं स्वाऱ्या केल्या, तेव्हां त्यानें औरंगझेबाची मदत मागितली असतां त्यानें वाह्यात्कारी ती कबूल केली; परंतु दोन्ही बादशहांकडून भरपूर लांच घेऊन अखेर त्यानें त्याला मदत पाठविली नाहीं.

विजापूरची मोहीम ( इ. स. १६५७ )—औरंगझेबास व बादशहासहि साम्राज्यविस्ताराची हांव सुटल्यामुळें त्यांनीं आदिलशहाशीं भांडण उकरून काढलें, अली आदिलशहा हा खरा वारस नाहीं असें खोटें कारण दाखवून औरंगझेबानें स्वारी केली. प्रथम बेदरचा किल्ला त्यानें घेतला. नंतर भालकी व कल्याणी येथें आदिलशहाचा त्यानें मोड केला (एप्रिल) नंतर बादशहानें हुकूम केल्यावरून त्यानें आदिलशहाशीं तह केला ( सप्टेंबर ). परंतु या वेळीं बादशहा आजारी पडल्यानें औरंगझेब तिकडे निघाला आणि त्यामुळें तहाची अंमलबजावणी झाली नाहीं ( विजापूर पहा ).

शिवाजी महाराजांची स्वारी ( १६५७ )—याच वेळीं आदिलशहाची बाजू घेऊन महाराजांनीं जुन्नर ते थेट औरंगाबादपर्यंत सारा मुलूख व खुद्द अहमदनगरहि लुटलें. औरंगझेबानें त्यांच्यावर नौसिरखानास पाठविलें; पण त्याचा त्यांनीं पराभव केला ( मे ). नंतर विजापूरकरांनीं तह केल्यामुळें महाराजांनींहि रघुनाथपंताला पाठवून तह केला. या वेळींच औरंगझेबानें प्रथम महाराजांनां पुरतें ओळखून ठेवलें व तो दिल्लीकडे निघून गेला ( शिवाजीमहाराज पहा ).

वारसाची लढाई:—मुखलिसपुराहून परत आल्यानंतर ( ६ सप्टेंबर १६५७ ) शहाजहान एकाएकी मलावरोधानें अजारी पडला. राजवैद्यांनीं औषधोपचार केला तरी दुखणें उलट वाढतच गेलें. रोजचा दरबार बंद झाला. इतक्यांत तो मेल्याची खोटी बातमीहि सर्वत्र पसरली. मध्यंतरीं बादशहास थोडेसें बरें वाटून पुन्हां दुखणें उलटलें. तेव्हां त्यानें सर्व सरदारांदेखत दारास गादीचा वारस नेमलें. नंतर दिल्लीहून तो आग्र्यास आला. येथून दिल्लीस ( बरा झाल्यानंतर ) त्याचा जाण्याचा बेत होता; परंतु तसें न घडतां त्याची अखेर तेथेंच झाली. साऱ्या दुखण्यांत दारानें त्याची अत्यंत काळजीनें शुश्रुषा केली. संधी आली असतांहि तो गादीवर बसला नाहीं. मात्र त्यानें या आठ महिन्यांत आपली तयारी चालविली होती. त्यानें औरंगझेबाच्या बाजूचे अधिकारी कमी केले. आपल्यातर्फेच्या लोकांनां बढती व बक्षिसें दिलीं. नोव्हेंबरमध्यें बादशहा बरा झाला, तेव्हां सुजानें स्वतःस बादशहा पदवी घेऊन तो बंगालवरून दिल्लीस चालून येत असल्याचें दारानें शहाजहानास सांगून त्यावर सैन्य पाठविण्याचें कबूल करविलें. त्याप्रमाणें दाराचा मुलगा सुलेमान शुकोह याला राजा जयसिंहासह पाठविलें; त्यांची गांठ बनारस येथें पडली ( १४ फेब्रुवारी १६५८ ). इकडे मुरादनेंहि आपण बादशहा बनल्याचें जाहीर करून,

तख्तावर बसून ( ५ डिसेंबर ) सुरत लुटली. तेव्हां शहाजहाननें त्याची बदली गुजराथवरून वऱ्हाडच्या सुभेदारीवर केली. यांत त्याचा डाव होता; कारण, वऱ्हाड हा सुभा औरंगझेबाच्या अंमलाखालील होता. परंतु मुरादनें हुकूम पाळला नाहीं. अद्यापपर्यंत औरंगझेबानें कांहींच उचल केली नाहीं तरी दारा त्यालाच जास्त भिई. औरंगझेब मुरादास मिळाल्याचें त्याला समजल्यावरून त्यानें एक माळव्यावर ( औरंगझेबास अडविण्यास ) व एक गुजराथेवर ( मुरादास तोंड देण्यास ) अशीं दोन सैन्यें पाठविलीं. यांचे सेनापती होण्यास कोणीच कबूल होईना. अखेर राणा यशवंतसिंह राजी झाला व त्याला माळव्याचा सुभा करून औरंगझेबावर पाठविलें. व कासीमखानास गुजराथची सुभेदारी देऊन त्याला मुरादवर पाठविलें. इकडे ( १६५८ जानेवारी ) औरंगझेबानें मीरजुम्ल्यास, तो दिल्लीस बादशहाचे हुकुमावरून जात असता वाटेंतच कैद केलें व शहाजहानास कळविलें कीं तो विजापूरकराशीं खलबतें करीत होता म्हणून त्याला पकडलें. परंतु खरें कारण निराळेंच होतें. यामुळें त्याच्या साऱ्या संपत्तीचा, सैन्याचा व तोफखान्याचा आयता लाभ औरंगझेबास मिळाला. ही गोष्ट जुम्ल्याच्या सल्ल्यानें झाली. औरंगझेबाची बिनी औरंगाबादेहून ( २५ जानेवारी ) निघाली. दारानें बादशहा आजारी असता त्याबद्दलची बातमी बाहेर जाऊं नये म्हणून बंगाल, गुजराथ व दक्षिणेकडे जाणाऱ्या सर्व पत्रव्यवहारास बंदी केली. आपल्या तिन्ही भावांच्या दरबारी वकिलावर नजर ठेविली. बादशहाची भेट दोन तीन सरदारांशिवाय इतरांस होईना; त्यामुळें शहाजहान खराच मेला व ती बातमी दारा चोरून ठेवतो असें वर्तमान देशभर पसरलें. रोशनआरानें जनानखान्यांतून औरंगझेबाच्या बाजूनें खटपट सुरू केली. देशांत या संशयित स्थितीमुळें गोंधळ व बेबंदशाही माजली. “ खरी स्थिति काय आहे तें पहाण्याकरितां व बादशहा जिवंत असल्यास त्याची भेट घेण्याकरितां मी येत आहे,” असें औरंगझेबानें दारास लिहिलें. औरंगझेब मीर जुम्ल्याच्या सल्ल्यानें वागत असे. सर्वांपेक्षां त्याचा विश्वास मीरवर जास्त होता. विजापूरकरांकडून खंडणी अगर किल्ले कांहीं मिळत नाहीं असें पाहून त्याला त्याची सारी खंडणी माफ करून व किल्ले परत करून औरंगझेबानें आदिलशहाचा स्नेह संपादन केला आणि कुतुबशहालाहि थकलेली खंडणी माफ करून त्याचीहि मर्जी राखली. इंडियाला मलिक हुसेन यास पाठवून त्यानें नर्मदेवरील साऱ्या नावा ताब्यांत घेऊन दाराकडून दक्षिणेंत बादशाही सरदारांनां येणारें टपाल बंद केलें. गोंडवणच्या गोंड राजांनां मैत्रीचीं पत्रें लिहून आपल्याकडे मिळवून घेतलें. कारण त्यांच्या प्रांतांतून आग्र्याचा रस्ता जात होता. खुद्द औरंगझेबाचें सैन्य लढाईच्या दगदगीनें त्रासलें होतें त्याची त्यानें समजूत काढली. दिल्लीस दरबारांतील कांहीं अधिकारीहि त्यानें आपल्या बाजूस वळविले. बाहेरच्या प्रांतांतील फौजबंद कांहीं सरदारहि त्यानें फोडले. नवीन सैन्यभरती सुरू केली; शिपायास एक महिन्याचा पगार आगाऊ मिळूं लागला. बऱ्हाणपुरास लष्करी दारूगोळ्याची तयारी होऊं लागली. तीस हजारांपर्यंत एकंदर लष्कर जमलें. शिवाय जुम्ल्याचा तोफखाना निराळाच होता. त्यांत इंग्लिश व फ्रेंच गोलंदाज पुष्कळ होते. त्याचे सारे अधिकारीहि विश्वासू व जीवास जीव देणारे होते. औरंगाबादेस मुअज्जमला सुभेदार नेमून व त्याच्या दिमतीस दोन विश्वासु सरदार बऱ्याचशा सैन्यानिशीं ठेवून ( नाहींतर चुवा शिवाजी या संधीचा फायदा घेऊन सर्व प्रांत उध्वस्त करील ), नुकतेंच जन्मलेलें मूल महमंद अकबर यास जनान्यासुद्धां दौलताबादेस किल्ल्यांत ठेवून बरोबर दुसरीं मुलें, महंमद सुलतान व महमंद अझम यांनां घेऊन, औरंगाबादेहून औरंगझेब अखेरीस निघाला होता ( ५ फेब्रुवारी १६५८ ). बऱ्हाणपुरास ( १८ फेब्रुवारी ) आल्यानंतर तेथें सर्व लष्कराची तपासणी करण्याकरितां एक महिना त्यानें मुक्काम केला. येथें दरबारांतील त्याचा वकील ईसाबेग दिल्लीहून येऊन त्याला मिळाला; त्यानें तेथील सारी हकीकत सांगितली. तेव्हां आतां जास्त दिवस घालविल्यास यशवंतसिंहाची तयारी कडेकोट होईल म्हणून लगेच त्यानें बुऱ्हाणपुर सोडलें ( २० मार्च ). आपला सासरा शहा नवाझखान आपल्या बंडांत मिसळत नाहीं असें पाहून औरंगझेबानें आपल्या वडील मुलाकडून त्याला कैद करविलें ( २६ मार्च ). तो ७ महिने बऱ्हाणपुरच्या किल्ल्यांत कैदेंत होता. बऱ्हाणपुरहून मांडवा व तेथून अकबरपुरास येऊन तेथें त्यानें नर्मदा ओलांडली. ( ३ एप्रील ) व उज्जनकडे रोख फिरविला आणि देपाळपुरास ( १३ एप्रील ) येऊन, जवळ असणाऱ्या मुरादास निरोप पाठविला. दुसऱ्या दिवशीं ( १४ एप्रिल ) उभयतां भावांची भेट होऊन, सायंकाळीं त्यांनीं धरमत येथें मुक्काम केला व दुसऱ्या दिवशीं यशवंतसिंगाशीं लढाई देण्याचें ठरविलें.

धरमतची लढाई:—( १५ । ४ । १६५८ ). यशवंतसिंह उज्जनीस फेब्रुवारीच्या शेवटीं आला, परंतु त्याला औरंगझेबानें नर्मदेवरील नावा आपल्या ताब्यांत घेतल्यामुळें त्याच्याकडील ( व एकंदर दक्षिणेकडील ) कांहींच बातमी समजेना. मुराद गुजराथेहून आपल्यावर येत आहेसें पाहून त्यानें त्याच्या तोंडावर सैन्य पाठविलें; परंतु मुरादनें आपली बाजू कमकुवत पाहून मागें पाय काढला. इतक्यांत औरंगझेबानें नर्मदा ओलांडल्याची बातमी धारच्या पळून आलेल्या किल्लेदारानें त्याला सांगितली. त्यामुळें गोंधळून यशवंतसिंह पुन्हां उज्जनीस परतला. येथें औरंगझेबानें त्याला निरोप पाठविला कीं, मी फक्त बादशहास भेटण्यास जात आहे. लढाई वगैरेचा माझा हेतु नाहीं, तरी तुम्ही जोधपुरास परत जावें परंतु “ मी बादशहाच्या हुकुमाचा ताबेदार आहे

असें सांगून यशवंतसिंहानें जाण्याचें नाकारलें, व उज्जनी-हून ७ कोसांवरील धरमत गांवीं तळ दिला व औरंगझेबाचा रस्ता अडविला. यांत त्याची चूक झाली कारण, त्यामुळें मुरादला औरंगझेबास जाऊन मिळण्यास संधी सांपडली. तेव्हां यशवंतसिंहानें औरंगझेबास मी तुम्हास येऊन मिळतों म्हणून उगीचच एक निरोप धाडला, परंतु औरंगझेबानें त्याला टाळाटाळीचेंच उत्तर पाठविलें. तेव्हां निरुपायानें त्यानें लढाईची तयारी केली शहाजहानानें दोघा मुलांनां धाकदपटशहा दाखवून अखेरीस निरुपायानें लढाई देऊन त्यांनां परत लावून द्यावें असा यशवंतसिंगास हुकूम केला होता. त्यामुळें यशवंतसिंगास लढाई देतांना फार सावधगिरी ठेवावी लागली. औरंगझेबाचें तसें नव्हतें. तो विनसुर्वत होता यशवंतसिंगाची फौजहि बेदिल होती. तिच्यांतील मुसुलमान सरदारांनां हा हिंदु सेनापति मान्य नव्हता. त्यांच्यापैकीं पुष्कळांनीं गुप्त रीतीनें औरंगझेबाशीं संधान बांधलें होतें. याचें एक ढळढळीत उदाहरण म्हणजे या धरमतच्या लढाईंत एकंदर २४ रजपूत सरदार मेले; तर उलट मुसुलमान सरदार असा एकच पडला. "खुद्द कासीमखान बादशाही सैन्यासह पळून गेला" असें तत्कालीन सरकारी पत्रकच म्हणतें. एवढेंच नव्हे तर लढाईच्या दुसऱ्या दिवशीं सरॆच्या सारें मुसुलमानी सैन्य औरंगझेबास येऊन मिळालें व त्यानें त्याला बक्षिसें वाटलीं.

साऱ्या २४ वंश्यांतील हा प्रकार काय सांगतो ? शिवाय, खुद्द यशवंत हा नामांकित सेनानी नव्हता. त्यानें निवडलेली जागा अडचणीची होती, इतकी कीं, त्याच्याच घोडदळास एकमुखी हल्ला करण्यास ती अपुरी पडली. संकटाच्या वेळीं मदतीची तुकडी त्याच्याकडून वेळेवर गेली नाहीं. घनचक्कर लढाईंत त्याची साऱ्या सैन्यावरील हुकमत नाहीशी झाली; व तो जणूं काय एखाद्याच सैन्यविभागाच्या सेनापतीसारखा वागूं लागला. औरंगझेबानें आपला सारा तोफखाना अघाडीस घातला होता; त्यावर रात्रीचा हल्ला करून तो उध्वस्त करूं म्हणून यशवंताच्या मुख्य अधिकाऱ्यानें सुचविलें असतां त्यानें ऐकिलें नाहीं. त्याचा बेत तोफखान्यास बगल देऊन औरंगझेबाच्या सैन्यावर तुटण्याचा होता परंतु तें सारें फसलें. प्रथम तोफखान्यानें यशवंताचे बहुतेक रजपूत (आघाडीसच असल्यानें) गारद झाले. कांहींनीं तो मारा सहन करून बगल देऊन औरंगझेबाच्या मुख्य सैन्याची गांठ घेतली;परंतु औरंगझेबाच्या इंग्रज व फ्रेंच गोलंदाजांनीं तोफांचीं तोंडें तिरकीं फिरवून त्याहि रजपुतांचा समाचार घेतला. त्यांत यशवंताची जागा अरुंद, खाच खळग्याची, दलदलीची असल्यानें त्याचा फार नाश झाला.

औरंगझेब याप्रमाणें विजयी झाल्यावर मुरादासह उज्जनीस आला. तीन दिवस त्याचा तेथें मुक्काम होता. बादशाही सैन्यापैकीं बरेचसे विश्वासघातकी लोक येथें येऊन त्यास मिळाले. नंतर तेथून निघून ग्वालेरीस तो १महिन्यानें आला(२१ मे). येथें त्याला बादशाही सरदार नासीरीखान (याचा पराभव शिवाजी महाराजांनीं केला होता) फुटून येऊन मिळाला. त्याला त्यानें पंचहजारी केलें व खानडौरान पदवी दिली. येथें त्याला समजलें कीं. दारा हा धोलपुर येथें चंबळ अडवून मोठ्या सैन्यासह येऊन बसला आहे.चंबळेचे सर्व उतार अडविले गेल्यानें, बाक्षिपाच्या आज्ञेनें एका जमीनदारानें दाखविलेल्या धोलपूरच्या पूर्वेस २० कोसांवर असलेल्या भटाउर गांवीं एका उतारानें औरंगझेब नदी उतरला (२३मे) त्यामुळें दाराचा सारा प्रयत्न फसला. औरंगझेब एकदम आग्र्याकडे वळला. तेव्हां त्याला अडविण्यास दारानें आपला जड तोफखाना चंबळवरच टाकून तो स्वतः समुगडास गेला. यामुळें पुढील लढायांत दाराचा तोफखाना लुला झाला. दोन्ही भावांची गांठ आग्र्यापासून ५ कोसांवरील यमुनेकांठच्या (येथें जहांगिरचा शिकारखाना होता त्या समुगड गांवीं) पडली.

स मु ग ड ची ल ढा ई—(२९ मे १६५८). शहाजहान १६५७ च्या नोव्हेंबरांत आग्र्यास होता. तेथून उन्हाळ्यामध्यें तो दिल्लीस येण्यास निघाला असतां बलुचपूर येथें त्याला धरमतच्या लढाईची हकीकत समजली (२५ एप्रिल १६५८). तेव्हां बादशहा पुन्हां आग्र्यास परत फिरला (२ मे);व दारास त्यानें सैन्य जमविण्यास सांगितलें. सर्व जहागीरदार सरदारांनां बादशाही हुकूम गेले. नवीन रंगरूटाची भरती होऊं लागली. थोडक्याच वेळांत ६० हजार फौज जमली. पण ती कसलेल्या शिपायांची नसून अर्धकच्च्या शिलेदारांची व बाजारबुणग्यांची होती. त्यांतील पुष्कळशा सेनाधिकाऱ्यांनां युद्धाची प्रत्यक्ष ओळख नसून दरबारी चैनीची मात्र माहिती होती. सैन्यांतील मोंगल लोक औरंगझेबाकडे फितलेले होते; फक्त सय्यद व रजपूत दाराच्या बाजूचे होते. त्याचे सारे विश्वासू सरदार सुलेमान शुकोहच्या हाताखालीं तो आधींच पाठवून चुकला होता. तसेंच बादशहानेंहि त्याला लढाई बंद ठेवण्याबद्दल सांगितलें. म्हाताऱ्याला आशा होती कीं, चारी मुलांमध्यें पुन्हां आपण सलोखा करूं. पण दारानें गर्विष्ठपणानें बापाचा सल्ला ऐकला नाहीं. त्यानें आपली बिनी (९ मे) धोलपुरास चंबळेवर पाठविली व आपण शेवटीं (१८ मे) सर्व सैन्यानिशीं निघाला. त्या वेळचें शहाजहान व दाराच्या भेटीचें वर्णन अत्यंत हृदयद्रावक व करुणरसपूर्ण असें आढळतें. (मूळांतून वाचावें कंबू, १२ अ. मनुची, १,२६ ७ पहा). बापलेकांची ही शेवटची भेट होय. दारा धोलपुरास येऊन (२२ मे)त्यानें चंबळचे सर्व उतार ताब्यांत घेतले व स्वतः मोर्चे लावून बसला. त्याचा उद्देश औरंगझेबाची खोटी करावयाची व तेवढ्या वेळांत सुलेमान शुकोहला परत बोलावून घ्यावयाचें. परंतु मागें सांगितल्याप्रमाणें त्याचा बेत फसला. औरंगजेबनें चंबळ ओलांडून

समुगडास मुक्काम केला ( २८ मे ). लगेच दारानें समुगडास तळ हलविला; आणि शत्रूपुढें सारा दिवस उन्हांत साऱ्या सैन्यासह तो उभा राहिला ! त्याची इच्छा कीं, औरंगझेबानें प्रथम उठाव करावा; पण युद्धशास्त्रदृष्टया ही त्याची मोठी चूक झाली. कारण औरंगझेबाचें सैन्य अत्यंत दमलेलें होतें. व याचें सैन्य ताजेतवानें असून, शिवाय याची संख्या जास्त होती. सारांश यानेंच लढाई केली असती तर खात्रीनें याचा जय झाला असता. परंतु, तसें न करतां त्यानें अंगावर चिलखत असल्यामुळें उन्हांत भाजत असलेलें सैन्य सारखें उभें केलें ! त्या उन्हानें पुष्कळ लोक हत्ती, घोडे, वगैरे जायबंदी झाले व उलट औरंगझेबास चांगलीच विश्रांति मिळाली. रात्रीं औरंगझेबानें आपल्या सैन्यास उत्तेजनपर आश्वासनें दिलीं.

दुसऱ्या दिवशीं(२९।५।५८)लढाईस सुरुवात झाली.दाराची जागा वाईट शिवाय तोफखाना अगदींच कमकुवत,पुष्कळ सैन्य फितुर झालेलें, शिलकी सैन्य न ठेवलेलें वगैरे अनेक कारणांनें, जरी दारा व त्याचे रजपूत मोठ्या शौर्यानें लढले, तरी अखेर त्यांचा पराभव झाला. एकदां तर औरंगझेब व मुराद यांच्या हत्तींवर रजपुतांनीं थेट चाल करून त्यांनां कापून काढण्याची संधी साधली होती. पण त्यांनां आयत्या वेळीं दाराकडून मदतच आली नाहीं. औरंगझेबाच्या तोफखान्यानें त्याच्या सैन्याची फळी पार फोडली व त्याच्या बसावयाच्या हत्तीवरहि तोफांचे गोळे येऊं लागले.शेवटीं निराशेनें दारा हा हत्तीवरून उतरून घोड्यावर स्वार झाला. येथेंच त्याचा शेवट झाला. तो दिसेनासा झाल्यावर त्याच्या सैन्यानें पळ काढला. शेवटीं दारा व त्याचा मुलगा सिपिहर शुकोह व थोडेसे विश्वासू लोक इतकेच कायते गोटावर राहिले; या नोकरांनीं वेळ पाहून दोघांचे घोडे धरून आग्र्याकडे चालविले. दोन तीन कोस दौड करून थोडी विश्रांति घेऊन तो रात्रीं ९ वाजतां आग्र्यास आला. औरंगझेबानें पाठलाग केला नाहीं. कारण त्याचा पुरेपुर जय झाला होता. वाटर्लुच्या वेलिंग्टनच्या वागण्याप्रमाणें या वेळीं औरंगझेबानें आपलें बचावाचें धोरण ठेवून व दारा दमल्यावर एकदम हल्ले चढवून जय मिळविला होता. ( समुगड पहा ).

आग्रा काबीज व मुरादची कैदः— ( जून १६५८ ) लढाई चालू असतां आग्र्यांत सर्वत्र लोक काळजींत होते. कोणाचा जय होतो व त्याचा काय परिणाम होतो याकडे त्यांचें लक्ष्य लागलें होतें. शेवटीं त्या दिवशीं ( २९ मे ) रात्रीं ९ वाजतां दारा पळून आग्र्यांत आलेला पाहून लोक व बादशहाहि दुःखांत चूर होऊन गेले. जहानआरा व सर्व जनाना शोकांत बुडाला. बादशहानें दारास आपल्याला एकदां भेटून, नंतर दुसरीकडे जाण्यास निरोप पाठविला. परंतु पराजयानें लज्जित झालेल्या दारानें भेट न घेतां करुणाजनक असें उत्तर मात्र पाठविलें व पहाटे ३वाजतां आपल्या बायकामुलांसह दारा दिल्लीस जाण्यास निघाला. बादशहानें दिल्लीच्या किल्लेदारास त्याला सर्व प्रकारें मदत करण्यास हुकूम पाठविला. इकडे औरंगझेबानें जय झाल्यावर मुरादचें अभिनंदन करून आजपासून तुझें राज्य सुरू झालें असा त्याचा गौरवहि केला. नंतर २ दिवसांनीं तो आग्र्यास येऊन दाराच्या नूरमंझील बागेंत उतरला. तेथें त्याच्या १० दिवसांच्या मुक्कामांत बहुतेक सर्व बादशाही सरदार त्याला येऊन मिळाले. त्यांनां त्यानें बक्षिसें दिलीं. व याप्रमाणें आपलें सैन्य वाढविलें.तेव्हां शहाजहाननें आपल्या हातचें पत्र पाठवून औरंगझेबास भेटीस बोलाविलें व तीन वेळ निरोप पाठविले. परंतु "बादशहा मला कैद करील" या सबबीवर त्यानें भेटीस जाण्याचें नाकारून उलट किल्ल्यास उघडपणें वेढा घातला. त्यापूर्वी ( ३ जून ) त्यानें आग्रा शहर ताब्यांत घेऊन तेथील कोतवालाला फांशीं दिलें. जुम्मा मशीदीवरून व दाराच्या राजवाड्यावरून मोर्चे बांधून किल्ल्यावर मारागिरी सुरू झाली. परंतु किल्ल्यांतील तोफखाना जबर असल्यानें औरंगझेबाचें कांहीं चालेना; तेव्हां किल्ल्यांतील पाण्याचा मार्गच बंद करण्याच्या उद्देशानें त्यानें नदीच्या बाजूची किल्ल्याची खिजिरी वेस एकदम हल्ला करून ताब्यांत घेतली. तेव्हां किल्ल्यांत हाहाःकार झाला. तहानेनें व्याकूळ होऊन बादशहानें मुलास फारच हृदयद्रावक पत्र लिहिलें. परंतु मुलाचें मन कळवळलें नाहीं. तेव्हां त्याच्याकडे बादशहानें पुन्हां भेटीस येण्याबद्दलचा निरोप पाठविला त्याला त्यानें उत्तर पाठविलें कीं किल्ला माझ्या ताब्यांत दिल्याशिवाय मी भेटीस येत नाहीं. तेव्हां निरुपायानें (८ जून ) बादशहानें किल्ल्याचे दरवाजे उघडले व एका क्षणांत एकहि जीव न घालवितां औरंगझेबास जगांतील अफाट संपत्ति एके ठिकाणीं मिळाली. नंतर त्यानें बादशहाला नजरकैदेंत ठेवलें. जहानआरानें औरंगझेबाचें मन वळविण्याची खटपट केली; परंतु "दारावरील बादशहाचें प्रेम नाहींसें न झाल्यानें तो मला दखल करील" असें सांगून त्यानें तिचें कांहीं ऐकलें नाहीं. उलट बादशहाची कैद कडक होऊन त्याच्यावर पहारे बसले. शेवटीं औरंगझेबानें दरबार भरवून ( १० जून ) सर्व बादशाही सत्ता आपल्या ताब्यांत उघडपणें घेतली. दोन दिवसांत सर्वत्र आपले लोक नेमून ( १३जून ) तो दिल्लीस दाराच्या पाठलागास निघाला. तत्पूर्वी त्यानें मुरादास कपटानें पकडून कैदेंत टाकलें ( मुराद पहा ).

औरंगझेबास दारा पळाल्याचें समजलें, तेव्हां त्यानें प्रथम अलाहाबाद घेऊन, आग्र्याची उजवी बाजू बळकट करून व मुरादाची वाट लावून तो दिल्लीकडे वळला. थोडे दिवस विश्रांति घेण्याचें ठरवून त्यानें सुलेमान शुकोहवर शाहिस्तेखानास पाठवून बहादुरखानास दारावर पाठविलें. व राज्यांत सर्वत्र आपले अधिकारी नेमून आपली बळकटी केली आणि शेवटीं आपल्या फारा दिवसांच्या इच्छेला पूर्ण करण्याकरितां २१ जुलै रोजीं दिल्लीबाहेरील शालीमार

बागेंत स्वतः तख्तारूढ झाला फारसा समारंभ करण्यास त्यावेळीं सवड नसल्यानें फक्त अलमगीर गाझी ही पदवी स्वतःस घेऊन व जरूरीपुरते संस्कार करून (२७ जुलैला) तो ससैन्य दारावर गेला. दारा आग्र्याहून दिल्लीस गेला व तेथून लाहोरकडे पळाला; तेव्हां औरंगझेबहि लाहोरकडे गेला. दारानें लाहोरहून पळ काढला त्यावेळीं त्याचें पुष्कळ सैन्य औरंगझेबास मिळालें. दारा लाहोरहून मुलतान, सक्कर, भक्कर शिविस्थानमधून पळत पळत अखेर गुजराथेंत गेला (दारा पहा) इकडे शुजा दिल्लीवर चालून आल्याचें समजल्यावरून औरंगझेब व त्याचें सैन्य परत फिरलें व दाराचा पाठलाग तूर्त राहिला.

खजव्याची लढाई.—(५।१।१६५९) शुजानें. शहाजहान मेल्याची बातमी ऐकून आपल्याला बादशहा म्हणवून तो आग्र्याकडे निघाला. त्याच्यावर दारानें आपला मुलगा सुलेमान याला धाडलें. लढाई काशीजवळ होऊन तींत शुजाच्या हलगर्जीपणामुळें त्याचा पराभव झाला व तो पाटण्याकडे (१६५८-च्या जाने )पळाला. इतक्यांत धरमतची लढाई होऊन तींत दाराचा पराभव होऊन तो पळाला व त्यानें सुलेमानाला मदतीस बोलाविलें. सुलेमान तिकडे गेला. इकडे औरंगझेबानें शुजास आपल्या पक्षास राहिल्यास बहार वगैरे प्रांत देण्याचें कबूल केलें;व तो दारावर गेला परंतु ही संधि पाहून व दारानें चिथाविल्यावरून शुजा दिल्लीकडे चालून आला. त्यावर औरंगझेबानें आपला मुलगा सुलतान महंमद यास धाडलें खजवा येथें त्यांची गांठ पडली. खासा औरंगझेबहि दाराला सोडून शुजावर आला. शुजानें कांहीं दिवस रिकामे घालविले. त्यामुळें औरंगझेबाची आयती तयारी झाली. इतक्यांत मीरजुम्लाहि त्याला येऊन मिळाला. त्यामुळें त्याचें सैन्य दुप्पट झालें. शुजाच्या सैन्यांतील तीन लढाऊ हत्तींनीं प्रथम औरंगझेबाच्या सैन्याची फार नासाडी उडविली; परंतु अखेर औरंगझेबानें त्याचा पराभव केला. आयत्या वेळीं शुजा हत्तीवरून खालीं उतरल्यामुळें दारासारखीच चूक त्याच्या हातून झाली; त्याचे कांहीं सरदारहि औरंगझेबास फितूर झालेले होते. दुप्पट सैन्य असल्यानें औरंगझेबाचा जय झाला यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं (शुजा पहा).

देवराईची लढाई.—(१२ ते १४ मार्च १६५९) दारा गुजराथेंत आल्यानंतर त्यानें अहमदाबाद घेतलें. तेथील सुभा शहानवाझ हा त्याला मिळाला; तेव्हां बादशाही खजिन्याच्या आधारानें त्यानें सैन्य जमविलें. इतक्यांत औरंगझेबाला सोडून आलेल्या यशवंतसिंहानेंहि त्याला अजमिरास आल्यास मदत करण्याचें कबूल केलें. तेव्हां दारा अजमीरकडे निघाला. तेवढ्यांत औरंगझेबानें यशवंतसिंहास फितविलें. त्यामुळें त्यानें दारास मदत केली नाहीं. तो एकटा राहिला. त्यानें अजमीरजवळील देवराईच्या घाटांत औरंगझेबाशीं लढाई दिली. तो मोठ्या शौर्यानें लढला. परंतु त्याचे बरेच सरदार व गोलंदाज औरंगझेबानें फितविले असल्यानें अखेर त्याचा पराभव झाला व तो तेथून पळाला (दारा पहा).

दाराचा शेवटः— दारा पळाला तो मेरट, अहमदाबाद, कच्छ यावरून सिंधकडे गेला. दुष्काळ असल्यानें वाटेंत त्याचे फार हाल झाले. त्याच्या पाठीवर बहादुरखान व जयसिंह होते. सिंधमध्यें असतांना त्याची आवडती बेगम नदिराबानु मेली. तेव्हां तिचें प्रेत लाहोरास पुरण्यास पाठविलें; त्यावेळीं त्यानें आपलें उरलेलें सारें सैन्य प्रेताबरोबर पाठविलें आणि आपण सर्वजण नाहीं नाहीं म्हणत असतां दादरच्या मलीकजीवन या बलुच्याच्या घरीं राहण्यास गेला. त्यानें विश्वासघात करून दारास पकडून बहादुरखानाच्या हवालीं केलें. त्यानें त्याला दिल्लीस नेऊन औरंगझेबाच्या ताब्यांत दिलें. औरंगझेबानें त्याची धिंड काढून व तो नास्तिक आहे म्हणून त्याचा वध करावा अशी त्याला शिक्षा दिली. अखेर (३० जून १६५९) दुसऱ्या दिवशीं रात्रीं अत्यंत क्रूरपणें औरंगझेबानें दाराचा वध करविला (दारा पहा.).

सुलेमान शुकोहचा शेवट.—शुजाशीं तोंड देत असतां दारानें सुलेमान शुकोह यास आपल्या मदतीस तांतडीनें परत बोलाविलें( मे १६५८ ). शुजाशीं तह करून सुलेमान निघून कोऱ्हा येथें आला असतां, त्याला समुगडच्या दाराच्या पराभवाची बातमी समजली. ती समजतांच जयसिंह व दिलेरखान या दोघां वजनदार सरदारांनीं व पुष्कळशा सैन्यानें शुकोहचा पक्ष सोडून ते औरंगझेबाकडे निघाले. सुलेमान निराश झाला; त्याच्याजवळ फक्त सहा हजार सैन्य राहिलें. त्याचा एक निश्चय होईना; त्यामुळें येत करण्यांत त्याचे बरेच दिवस फुकट गेले अखेर अलाहाबादेहून निघून पंजाबांत बापास जाऊन मिळण्याचें त्यानें ठरविलें त्या प्रमाणें गंगा उतरून लखनौ, मुरादाबादेवरून हरिद्वाराजवळ तो गेला. वाटेंत त्याचें सैन्य कमी कमीच होत चाललें. तेथें येऊन पाहतो तों शत्रू (औरंगझेबा)नें तेथील मार्ग रोंखलेला होता. दक्षिण व पश्चिमेचे सर्व गंगेचे उतार शत्रूच्या ताब्यांत होते. यामुळें दाराची व सुलेमानाची भेट न होतां बापलेकांची ताटातूट झाली. त्यावेळीं सारें २ हजार सैन्य सुलेमानाजवळ होतें. त्यानें त्यावेळीं श्रीनगरच्या राजाचा आश्रय मागितला व राजानेंहि तो दिला. परंतु सुलेमानाला त्याचा विश्वास न आल्यानें तो परत फिरला; तेव्हां त्याच्या सैन्यानें त्याला सोडलें. राहतां राहतां सारे १७ लोक शिल्लक राहिले. त्याच्या स्वतःच्या २०० बायका होत्या, त्या त्यानें सैनिकांनां वांटून दिल्या. शेवटीं पुन्हां मुख्य बेगम व १७ सेवक यांसह तो श्रीनगरास आला. पुन्हां तेथील राजानें त्याला आश्रय दिला. इकडे शत्रू पाठीस लागलाच होता. तरी पण एक वर्ष सुलेमान तेथें होता. औरंगझेबानें (सर्व शत्रूंचा निकाल लावल्यानंतर) तेथील राजाला निरोप पाठवून धाक दाखवून,

सैन्य पाठवून शुकोहला आपल्या ताब्यांत देण्यास सांगितलें; परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. अखेरीस प्रधानाकडून राजावर विष प्रयोगाचा प्रयत्नहि करून पाहिला. परंतु तो कट उघडकीस आला. शेवटीं, औरंगझेबानें, हिंदु राजांचा विश्वासघात करण्याच्या कामांत नेहमीं योजण्यांत येणाऱ्या जयसिंहाची योजना यावेळीं केली. त्यानें राजाच्या मुलाला फितूर करून सुलेमानला आपल्या ताब्यांत घेतलें. त्यावेळीं सुलेमानानें शौर्यानें आपला बचाव केला; परंतु तो जखमी होऊन शत्रूच्या हातीं लागला; नंतर त्याला बंदोबस्तानें दिल्लीस आणलें (ता. २ जानेवारी १६६१). औरंगझेबानें प्रथम त्याचा प्राण न घेण्याचें त्याला वचन दिलें व त्याला ग्वालेरीस कैदेंत पाठविलें. पण एकच वर्षानें औरंगझेबानें आपलें वचन मोडून सुलेमानाला विष पाजून ठार मारलें. (मे १६६२). काका (मुरादबक्ष) व पुतण्या (सुलेमान) यांचीं थडगीं जवळ जवळ बांधलीं गेलीं.

शुजाचा पाठलागः—खजव्याच्या लढाईनंतर शुजा, प्रयाग, बहादरपुर, पाटणावरून गंगेंतून आपल्या नावांच्या काफिल्यासह मोंगिरास आला. त्याच्या पाठीवर औरंगझेबानें मीरजुम्ला यास पाठविलें होतें. त्यानें फितुरीनें मोंगीर घेतलें; त्याचें सैन्य शुजाच्या दुपटीच्यावर होतें. शुजा मोंगीरहून साहेबगंज, राजमहालवरून टंडा येथें आला. राजमहाल राजधानी फितुरीनेंच जुम्ल्यानें मिळविली (१३ एप्रिल). त्यामुळें गंगेच्या पश्चिमेकडील राजमहाल ते हुगळीपर्यंतचा सारा प्रदेश शुजाच्या हातून गेला. तरी पण त्यानें आपल्या आरमारामुळें पुष्कळ दिवस जुम्ल्याला दाद दिली नाहीं. अनेक खटपटी करून व हल्ले चढवून त्यानें टंडाजवळील एक बेट मात्र काबीज केलें. इतक्यांत औरंगझेबाचा मुलगा सुलतान महंमद जो जुम्ल्याबरोबर होता, तो शुजाच्या मुलीच्या लोभानें शुजास जाऊन मिळाला. शुजानें त्याला आपली मुलगी दिली (८ जून). तरी जुम्ल्यानें सैन्यांत शिस्त ठेविली. नंतर पावसाळ्यामुळें लढाया बंद राहिल्या. त्याचा फायदा घेऊन शुजानें राजमहाल काबीज केलें (२२ आगस्ट). हें ऐकून औरंगझेब स्वतः प्रयागास आला व बरेंचसें सैन्य जुम्ल्याच्या मदतीस त्यानें पाठविलें. घेरियाच्या लढाईंत जुम्ल्याचा पराभव झाला परंतु पुढें (११ जानेवारी १६६०.) जुम्ल्यानें राजमहाल पुन्हां ताब्यांत घेतलें. तेव्हां शुजा टंडा येथें गेला. (शुजा पहा).

शुजाचा शेवटः—या वेळीं जुम्ल्याचें सैन्य शुजाच्या सैन्याच्या पांचपट जास्त होतें. त्यानें त्या वेळीं त्याला पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा तिन्ही बाजूंनीं वेढलें. त्याच वेळीं शुजाकडून त्याचा जांवई पळून पुन्हां जुम्ल्याकडे आला. टंडा येथें जुम्ल्यानें लढाई देऊन शुजाचा पराभव केला (५ एप्रिल). तेव्हां शुजा ढाक्याकडे पळाला. या वेळीं त्याच्या पुष्कळ विश्वासू लोकांनीं व सैन्यानें त्याला सोडिलें त्याचा खजिना लुटला. तेव्हां निरुपायानें अगदीं थोडक्या अनुचरांसह तो आराकानमध्यें पळून गेला. विश्वासघातकी भावाच्या हातीं लागून खून होण्यापेक्षां आराकानी रानटी लोकांत जाऊन राहण्याचें त्यानें पत्करिलें व हिंदुस्थानास शेवटचा सलाम करून तो तिकडे गेला (१२ मे). तिकडे त्याचा शेवट काय झाला याची नक्की बातमी पुढें केव्हांहि कोणास कळली नाहीं (शुजा पहा).

औरंगजेबाचा राज्यारोहण समारंभ.—सर्व मोंगली शहांपेक्षां, औरंगझेबाचा राज्यरोहणसमारंभ जास्त थाटाचा झाला. शहाजहान गादीवर आला तेव्हां जरी त्याचा समारंभ मोठा झाला, तरी त्यावेळीं मयूरसिंहासन तयार झालें नव्हतें व कोहिनूर हिराहि मिळाला नव्हता! ही सारीं साधनें औरंगझेबाच्या वेळीं तयार होतीं! या वेळीं मुराद ग्वालेरीस तळघरांत कैदी होता, शुजाचा खजवा येथें व दाराचा अजमेर येथें पूर्ण पराभव होऊन ते सारखे पळत होते! सारांश, सर्व बाजूंनीं औरंगझेब आतां निर्धास्त झाला होता. मागें (२१ जुलै १६५८) तो तक्तारूढ झाला होता परंतु त्या वेळीं मात्र समारंभ. तसाच व्हावयाचा राहिला होता, म्हणून तो आतां उरकून घेण्याचें ठरलें. तारीख ५ जून १६५९ रवीवार हा दिवस नक्की ठरला. त्या दिवशीं प्रथम साऱ्या दिल्लींतून स्वतःची मिरवणूक काढून औरंगझेब दिवाण-ई-आममध्यें आला आणि ठरलेल्या वेळीं तक्तारूढ झाला; आमच्या मधोमध मयूरसिंहासन मांडलेलें होतें. तक्तावर बसल्यानंतर, त्याच्या नांवाचा खुत्बा पढण्यांत आला व नाणें पाडण्यांत आलें. त्यानें आपलें नांव पुढीलप्रमाणें जाहीर केलें, "अबूल मुझफ्फर मुहिउद्दीन मुहम्मद औरंगझिब बहादुर अलमगीर पादशाह घाझी" या वेळीं,त्याचें वय ४० च्या वर होतें. बहिण रोशनआरा व स्वतःच्या चार मुली वमुलें व बेगमा आवडते दरकदार यांनां त्यानें २५ लाखांपर्यंत देणग्या व बक्षिसें दिलीं. त्यानें हिजरी वर्ष सुरू केलें, फारशी नवरोझ बंद केला, दारू बंद केली व कांहीं कर कमी केले. दोन अडीच महिने हा समारंभ चालू होता. जुलूस (तक्तारूढ झाल्याचें सरकारी वर्ष) २३ मे १६५८ पासून धरण्यांत आला.

राज्यारोहणानंतरचा पहिला काळ (१६५८—१६८२):—औरंगझेब राज्यावर बसल्यानंतर मरेपर्यंतच्या कालाचे साधारण २५।२५ वर्षांचे दोन भाग पडतात. पैकीं पहिला काळ उत्तरेकडे गेला व दुसरा काल दक्षिणेंत गेला. दक्षिणेंत गेल्यानंतर औरंगझेबानें पुन्हां दिल्लीचें तोंड पाहिलें नाहीं. त्यावेळीं त्याच्या रजपुतांनींहि तक्रार केली कीं आमचा वंश बुडत चालला, कारण २५ वर्षें आम्ही कुटुंबापासून दूर आहों. पुष्कळांनीं प्रयत्न केले; परंतु "मराठ्यांचीं पाळें मुळें खणून काढल्याशिवाय उत्तरेस जाणार नाहीं"

अशी त्याची प्रतिज्ञा होती! मात्र ती केव्हांहि सफल झाली नाहीं!! उलट मराठ्यांच्या युद्धाकरितां पैसा पाहिजे असल्यामुळें तो उकळण्यासाठीं लोकांवर जो जुलूम केला जाई त्यामुळें व बादशहाच्या गैरहजरीमुळें उत्तरेकडे सर्वत्र बेबंदशाही माजली. पहिल्या काळांत औरंगझेबानें काबूल पासून आसामपर्यंत व तिबेटपासून आदिलशाहीपर्यंत प्रदेश जिंकण्याचा धडाका सुरू केला होता; पण याच वेळीं सह्याद्रींत एक लहानशी वायूची झुळूक सुटूं लागली होती आणि याच झुळुकीचें पुढें वादळांत व शेवटीं झंझावातांत रूपांतर होऊन तिनें मोंगली साम्राज्यरूपी वडाचा जुनाट प्रचंड वृक्ष धाडदिशीं उपटून फेंकून दिला. १६५९ त औरंगझेब तक्तावर बसल्यानंतर १६६० त सुलेमान शुकोहला पकडलें. १६६१ त मुरादचा व सुलेमानचा खून केला. नंतर १६६२-६४ दोन वर्षें औरंगझेब काश्मिरांत राहिला. १६६६ त शहाजहान मेला. तेव्हां तो आग्र्यास आला. आग्र्याहून निघून १६६६—१६७४ पर्यंतचीं ७॥ वर्षें तो दिल्लीसच होता. सरहद्दीवरील आफ्रिडी लोकांनीं १६६७ पासून बंड केल्यामुळें व महंमद अमीन ( मुख्य बक्षी ) आणि महाराणा यशवंतसिंह यांनां पाठवूनहि कांहीं उपयोग होईना ( तेवढ्यापुरतीं बंडें थांबत पुन्हां सुरू होत ) म्हणून त्यांच्यावर तो खुद्द( १६७४ त ) गेला व आफ्रिडींचा तात्पुरता बंदोबस्त करून तो १६७६ त परत आला. १६७८-त यशवंतसिंह काबुलकडे मेल्यामुळें त्याचें राज्य घशांत घालण्यासाठीं तो अजमीरवर निघाला. याच वेळीं यशवंतच्या लोकांनीं त्याचा पुत्र अजितसिंह यास गादीवर बसवून औरंगझेबाविरुद्ध उघड बंड केलें. तें मोडण्याकरितां त्यानें ( ३ सप्टेंबर १६७९ रोजीं ) दिल्ली सोडली. ती अखेरचीच सोडली. पुन्हां त्याचें पाऊल कांहीं दिल्लीस पडलें नाहीं. दोन वर्षें राजपुतान्यांत शहाजादा अकबरसह त्यानें घालविलीं. तत्रापि त्यावेळीं सारा राजपुताना एक झाल्यामुळें ( उदेपूरकर महाराण्यानें अजितचा पक्ष धरल्यामुळें ) रजपुतांचा पराभव त्याच्यानें झाला नाहीं. त्यांत अकबरानेंहि बंड केलें. तो रजपुतांनां उघड मिळाला; ( १ जाने. १६८१ ) व स्वतःला बादशहा पुकारून बापावर अजमिरास चालून गेला. यावेळीं त्याचें वय २३ होतें. पूर्वी उदेपूरकरानें अकबराचा सारखा पराभव केल्यामुळें बादशहानें त्याचा अपमान केला होता म्हणून तो त्याच्याविरुद्ध उठला. यावेळीं औरंगझेबापाशीं फारच थोडें सैन्य होतें. अकबरानें यावेळींच त्याच्याशीं लढाई दिली असती तर त्याचा खात्रीनें जय झाला असता. पण त्यानें चैनींत दिवस घालविले. तेवढ्यांत शहानें तयारी केली व एक खोटें पत्र तयार करून अकबराच्या बरोबरच्या रजपुताच्या मनांत त्याच्याबद्दल संशय उत्पन्न करवून त्यांनां परत राजपुतान्यांत लावून दिलें. तेव्हां अकबर एकटा राहिला. तशांत त्याचें मुसुलमानी सैन्यहि बादशहास मिळालें. तेव्हां तो राजपुतान्यांत पळाला व मग तेथून दक्षिणेंत संभाजीमहाराजांकडे आला. एवढ्या वेळांत रजपुतांनींहि तयारी करून बादशहास फार त्रास दिला. तेव्हां त्यानें अखेर नाइलाजानें ( सप्टेंबर १६८१ ) अजमीर सोडून औरंगाबादचा रस्ता धरला. पुढें १७०९ पर्यंत मारवाडावर मोंगल स्वाऱ्या करीत असत, परंतु त्या स्वाऱ्या फसल्या व अजीत हा मारवाडचा राजा झाला.

मध्यंतरीं १६६२ च्या दोन महिन्यांत शहा फारच आजारी झाला होता. इतका कीं, त्याची आशा लोकांनीं सोडली. त्यावेळीं त्याच्या मुलांनीं राज्य मिळविण्याविषयीं खटपटी सुरू केल्या. रोशनआरानें त्या वेळांत सर्व सूत्रें आपल्या हातीं घेतलीं. लोकांत गडबड सुरू झाली, पण थोड्याच दिवसांत तो बरा झाला व हवा पालटण्यास काश्मीरास गेला. तो तिकडून दोन वर्षांनीं परत आला. याच वेळीं पालमौ त्यानें काबीज केलें; नंतर आसाम घेतलें, कुचबिहारवर स्वारी केली; तींत त्याचें अतिशय नुकसान झालें; परंतु राजानें अखेरीस खंडणी देऊन तह केला ( १६६३ ). याच स्वारींत मीरजुम्ला, ( ज्याच्यामुळें शहाला राज्य मिळालें तो ) मेला ( ३०मार्च १६६३ ). त्यामुळें आसामी लोकांनीं पुन्हां गौहत्ती वगैरे काबीज केलें. त्यांच्यावर रामसिंगास शहानें पाठविलें; ही मोहीम ७ वर्षें ( इ. स १६६९-१६७६ ) चालली होती. परंतु तींत विशेष फायदा झाला नाहीं. शाहिस्तेखानानें छतगांव ( इ. स. १६६६ ) काबीज करून आराकान प्रांत घेतला. या सुमारास बारीक सारीक बंडाळीहि बरीच झाली; परंतु ती शहानें दाबून टाकली. हिंदूंनां त्याचा जाच झाल्यानें रजपूत, भिल्ल, शीख यांनींहि बंडें उभारलीं. त्यांत भुपालसिंग गोंडानें त्याला इतका त्रास दिला कीं, त्याच्यावर शहानें चार मोठे सेनापती पाठविले होते ( १६६९ ). इंदरच्या राजानें तर मोंगलाला सतत त्रास दिला. याच गडबडींत तोतयांचीहि भर पडली. दाराचा तोतया गुजराथेंत (१६६३); सुजाचा कुचबिहारांत (१६६९) व युसुफझाईंत ( १६७४ ) आणि काश्मीरांत ( १७०४ ); सुजाचा मुलगा बुलंद अखतर याचा अलाहाबादेकडे ( १६९९ ) आणि शहाजादा अकबराचा उत्तरेकडे ( १६९९ ) याप्रमाणें या तोतयांनीं धुमाकूळ घातला होता. बिकानेरचा राव कर्ण हा शहाला मानीना म्हणून त्यानें त्याच्यावर सैन्य धाडून त्याचा पराभव केला ( १६६० ) ज्यानें चंबळचा उतार औरंगझेबास दाखविला होता, तो चंपतराय बुंदेला खजव्याच्या लढाईपर्यंत त्याच्या बाजूस होता. त्यानंतर त्यानें औरंगझेबास सोडून स्वतंत्र राहून शहास फार उपसर्ग दिला. तीन वर्षें त्यानें शहाच्या सैन्यास दाद दिली नाहीं; परंतु अखेर एका मित्राच्या विश्वासघातानें तो धरला जात असतां त्यानें आत्महत्या केली. परंतु मुसुलमानांच्या हातीं तो लागला नाहीं. चंपत गेला तर त्याचा पुत्र छत्रसाल राहिला.

त्यानें प्रथम औरंगझेबास थोडासा त्रास दिला. पुढें जयसिंहानें त्याला युक्तीनें शहाच्या नौकरींत घेतलें. तो दक्षिणेंत शिवाजीमहाराजांवर जयसिंहाबरोबर आला असतां महाराजांनीं त्याची गुप्त भेट घेऊन औरंगझेबाविरुद्ध लढण्याचा त्याला सल्ला दिला. तेव्हांपासून पुढें पुष्कळ वर्षें छत्रसाल हा मोंगलांच्या डोळ्यांत कांट्यासारखा खुपत राहिला. गयेजवळ पालमौच्या प्रतापरायानें उचल केल्यामुळें शाहिस्तेखानानें त्याचा मोड केला (१६४१–४२), तरी त्यानें त्रास देणें सुरूच ठेविलें होतें. तेव्हां त्याच्यावर दाऊदखानास शहानें पाठविलें ( इ स. १६६१ ). त्यानें चार पांच महिने हल्ले करून अखेर प्रतापरायाचा पराभव केला; शहानें तो मुसुलमान झाल्यास त्याच्याकडे राज्य ठेवण्याबद्दल कळविलें होतें; परंतु त्यानें तें न ऐकल्यानें पालमौचें राज्य खालसा केलें; प्रतापराय जंगलांत निघून गेला छत्रसाल ( नवानगरचा औरंगझेबचा मांडलिक राजा छत्रसाल) यास त्याच्या रायसिंग नांवाच्या चुलत्यानें कैद करून मुसुलमान अधिकाऱ्यांनां हांकलून आपण गादीवर बसला. तेव्हां छत्रसालच्या मदतीस शहानें सैन्य पाठविलें. तीन महिने लढाई चालली, रायसिंगनें मुसुलमानांस दाद दिली नाहीं. अखेरीस सैन्य जास्त असल्यानें मोंगलांचा जय झाला व रायसिंगानें जोहार केला ( १६६३ फेब्रुवारी ). पुढें पुष्कळ वर्षें काठेवाडांत मोंगलांचा चांगलासा जम बसला नाहीं. शहानें मोरंग संस्थान ( १६६४ ) काबीज केलें.

शहाजहानचा शेवट—शहाजहानला कैदेंत ठेवल्यापासून, त्याच्यावर औरंगझेबाची कडक नजर असे. त्याच्या परवानगीशिवाय कोणालाहि शहाजहानची भेट घेतां येत नसे. शहाजहाननें, मुरादला व औरंगझेबाचा मुलगा सुलतान महंमद याला वश करून स्वतःच्या सुटकेचा प्रयत्न केला होता. दारा व सुजा यांच्याशींहि त्याचा पत्रव्यवहार सतत होता. परंतु हें उघडकीस येऊन, मुलानें बापाची कैद जास्त कडक केली. आग्रा किल्ल्यांत सर्वत्र वर व खालीं शिबंदी ठेविली ! शहाजहान बाहेरच्या लोकांनां पत्रें लिही व त्यामुळें राज्यांत नसते बखेडे उत्पन्न होत, म्हणून औरंगझेबानें त्याला पत्रें लिहिण्याचीहि बंदी केली; त्याच्या जवळ असलेल्या बहुमोल जवाहिराचा लोभ औरंगझेबास सुटून नाना युक्तींनीं त्यानें तें हस्तगत करून घेतलें; औरंगझेब अत्यंत लोभी होता. त्यानें बापाला तर या बाबतींत नागविलेंच; परंतु दाराच्या मालकीचें २७ लक्षांचें जवाहीर जें बापाजवळ ठेव म्हणून ठेविलें होतें, तेंहि त्यानें लांबविलें; एवढेंच नव्हे तर, दाराच्या कंचनीहि त्यानें बळजबरीनें आपल्या जनान्यांत खेंचल्या. औरंगझेबानें शहाजहानवर खोजांचा पहारा ठेवला होता. त्याच्या दरोग्यानें तर शहाजहानचा फार छळ केला. एकदां त्यानें जोडा मागितला असतां ज्याची किंमत २रुपयेहि नाहीं अशा सपाता त्या दरोग्यानें त्याला पाठविल्या. या त्रासाबद्दल बाप लेकांत पुष्कळ पत्रव्यवहार होई; त्यांत मुलानें 'आपल्याला असें वर्तन बापाच्याच आगळिकीमुळें करावें लागलें' असा खुलासा केलेला आहे. "जिकडे तिकडे अधर्म माजल्यामुळें नाइलाजानें मला स्वधर्मीच्या उद्धारासाठीं राज्यारूढ व्हावें लागलें." असा लेकानें आपला बचाव केला आहे. शहाजहाननें त्याला स्वतःच्या भावांचा खून केल्याबद्दल लिहिलें असतां त्यानें उलट त्यालाच त्याच्या खुश्रु व पर्वीझ या भावांचा आठवण दिली. याप्रमाणें बापाला पाठविलेल्या या पत्रांचाच आहेर औरंगझेबास त्याच्या मुलानें ( अकबरानें ) पुढें ( १६८१ ) केला. शेवटीं शहाजहाननें आपला सारा वेळ धार्मिक कृत्यांत घालविण्याचें ठरविलें. सात वर्षें त्यानें ही कैद भोगली. तींत त्याची शुश्रुषा जहानआरा हिनें केली. शेवटीं ( जानेवारी १६६६ ) त्याला विषमाचें दुखणें आलें. यावेळीं त्याला ७४ वें वर्ष होतें. ता. २२ जानेवारी रोजीं सायंकाळीं सर्वांची निरवानिरव करून व समाधान करून कुराणाचा पाठ चालू असतां अखेरपर्यंत सावध राहून ताजमहालकडे पहात पहात त्यानें प्राण सोडला. त्याची प्रेतयात्रा थोड्याशा खोजांनीं व नौकरांनीं संपविली. औरंगझेब मुळींच आला नाहीं, अथवा त्यानें पुढील व्यवस्थाहि केली नाहीं. जहानआरानें बापाचें प्रेत ताजमहालांत पुरविलें. शहाजहान प्रजेचा आवडता असल्यानें त्याच्या मरणानें सर्व प्रजेला फार दुःख झालें. बापाविरुद्ध बंड करण्याचा जणुं काय मोंगल राजघराण्यास शापच होता. जहांगिरानें अकबराविरुद्ध, तर शहाजहाननें जहांगिराविरुद्ध बंडें उभारलीं. परंतु प्रत्यक्ष बादशहा पुढें आला तर या मुलांनीं त्यावेळीं माघार घेतली होती. मात्र औरंगझेबाची या सर्वांवर कडी होती. बापाची त्यानें पर्वाच बाळगली नाहीं. त्यानें कुटुंबाचे समाजाचे सारे नियम धाब्यावर बसविले. त्याला लाजलज्या, दयामाया, भीति वगैरे कांहीं वाटत नसून तो एक निष्ठुर असा अत्यंत वाईट माणूस आहे असा त्यावेळींहि लोकांत समज होता. आपले सारे अपराध लपविण्याकरितां त्यानें मुसुलमानी धार्मिकपणाचें निव्वळ ढोंग माजविलें होतें।

दक्षिणेंतील कामगिरी.—शहाजादा औरंगझेब १६५८ च्या जानेवारींत औरंगाबाद सोडून गेला, तो दिल्लीहून बादशहा बनून १६८२ च्या मार्चांत पुन्हां आला. या २४ वर्षांत मोंगलांचा दरारा दक्षिणेंत म्हणण्यासारखा मुळींच बसला नाहीं. याचीं कारणें अनेक आहेत. पहिलें, शिवाजीमहाराजांनीं औरंगाबादच्या सुभ्यास बहुतेक आपल्या मुठींत ठेविलें होतें. एकमेकांच्या लढाया होत, परंतु त्या निकराच्या नसत. महाराजांनीं मात्र आपला फायदा बराच करून घेतला होता. दुसरें, पहिला सुभा शहाअलम याच्यावर बापाचा विश्वास नसल्यामुळें त्यानें त्याच्यावर दिलीरखानास गुप्त हेर म्हणून ठेविलें होतें. त्या दोघांत नेहमीं खटके होत. तिसरें, सारी बादशाही फौज महाराजांनां भ्यायली

होती. खडकाळ महाराष्ट्रांत लढण्याचें तिच्या जिवावर येई. चवथें, तिच्यांतल्या हिंदु सरदारांनां या गोब्राह्मण-प्रतिपालकांचा मनांतून आदर वाटे. पांचवें, मुसुलमान सरदारहि त्यांनां फितुर झाले होते. त्यांच्या सैन्यांत चैन व आळस शिरला होता शिवाय भरपूर सैन्य व पैसा औरंगझेब इकडे पाठवीतहि नसे. सहावें, मराठ्यांत राष्ट्रीयत्वाचें वारें जोरानें खेळावयास लागलें होतें. सातवें, विजापुरकर व गोवळकोंडेकरांनींहि मोंगलांस थोडासा विरोध केला. सारांश, इतक्या कारणांनीं या २४ वर्षांची खटपट फुकट गेली.

औरंगझेब व शिवाजी महाराजः--प्रथम महाराजांचा व औरंगझेबाचा संबंध विजापूरवरील मोंगलाच्या स्वारींत (१६५७) आला. महाराजांनीं औरंगझेबाच्या लुसल्या थापेबाजीस न भुलतां विजापुरकरांचा पक्ष घेऊन चांभारगोंद्यावरून थेट अहमदनगर गांठून तें लुटलें (१६५७ मार्च) व इकडे जुन्नरहि लुटलें. परंतु विजापुरकरांनीं तह केल्यामुळें महाराजांनींहि औरंगझेबास सलूख्याचें पत्र लिहिलें. यावेळीं औरंगझेब दिल्लीस जाण्याच्या घाईत होता. त्यानेंहि वरकरणी महाराजांस गौरवाचें पत्र लिहिलें (१६५८); परंतु महाराजांनां गडबड करतां येऊं नये म्हणून बराच बंदोबस्त मागें करून ठेवला. त्यानें शाहिस्तेखानास सुभा करून औरंगाबादेस पाठविलें व महाराजांचा नाश करण्यास त्याला सांगितलें या कामीं विजापुरकरांनींहि त्याला मदत केली. शिद्दी जोहरनें महाराज पन्हाळ्यास असतां त्यांनां वेढा दिला (आगस्ट १६६०) व इकडे शाहिस्तेखानानें औरंगाबादेहून निघून (फेब्रुवारी १६६०) सुपें, बारामती, शिरवळ, शिवापुर, सासवड हीं (१ मे पर्यंत) घेतलीं. पुणें ९ मे रोजीं घेऊन त्यानें उत्तर कोंकणांतील कांहीं ठाणींहि घेतलीं; व पुण्यास सारा पावसाळा काढण्याचें ठरविलें. परंतु मराठ्यांनीं तिकडील सारीं पिकें व धान्यें सफा केल्यामुळें, तो पुणें सोडून चाकणास गेला. कारण तेथून अहमदनगर जवळ येतें. ५६ दिवस वेढा घालून अखेर चाकण घेतलें (आगष्ट). किल्लेदार फार शौर्यानें लढला.खान पुन्हां पुण्यास आला व थोड्या दिवसांनीं त्यानें कल्याणभिवंडी घेतली (१६६१). दोन वर्षें बहुधा तो पुण्यासच असावा. त्यानंतर त्यानें नेताजीशीं एकदां चकमक दिली (मार्च १६६३); पुढें प्रख्यात लालमहालवरील रात्रीचा हल्ला होऊन महाराजांनीं त्याचीं बोटें कापून त्याला औरंगाबादेस पिटाळून लाविलें (५ एप्रिल १६६३) औरंगझेबानें लाजेनें शाहिस्तेखानास बंगालच्या सुभ्यावर नेमून (डिसेंबर) शहाजादा मुअझ्झमला औरंगाबादेवर पाठविलें (जाने. १६६४) ही बदलाबदली चालू असतां, महाराजांनीं सुरत शहर लुटलें (६-१० जाने.) व एक कोटीची लूट मिळविली. यामुळें औरंगझेबानें १ वर्षपर्यंत तेथील सार्‍या व्यापार्‍यांनां जकात माफ केली. मुअझ्झमनें आपली सुभेदारी ख्यालीखुशालींत घालविली. त्याचा दुय्यम अधिकारी जसवंतसिंग पुण्यास कांहीं दिवस होता. या सालीं (१६६४) पावसाळ्यांतहि दौड करून महाराजांनीं अहमदनगर लुटलें तेव्हां औरंगझेबानें १४ हजार सैन्यासह जयसिंहास महाराजांवर पाठविलें. तो पुण्यास (३ मार्च १६६५) आला व जसवंत दिल्लीस परत गेला. त्यानें महाराजांनां अडवण्याचे शक्य तितके सारे उपाय योजले. त्यांच्या सार्‍या शत्रूंनां मदत देऊन, त्यांची एकदम उठावणी केली. औरंगाबाद, जुन्नर, लोहोगड. पुण्यावरून तो सासवडास आला. पुरंदरास वेढा घालून (मोंगल सैन्य दसपट जास्त असल्यानें) त्यानें प्रथम वज्रगड घेतला; पण मराठ्यांनीं इतक्या शौर्यानें बचाव व चढाई चालविली होती कीं, जयसिंगानें मागितल्यावरून औरंगझेबानें नवीन तोफखाना व सैन्य मदतीस पाठविलें। २॥ महिने लढून (मुरारबाजी पडला असतांहि) किल्ला मोंगलास मिळाला नाहीं; प्रतिकूल वेळ जाणून महाराज जयसिंहास भेटावयास आले (११ जून) व सल्ला होऊन तहाच्या अटी ठरल्या. औरंगझेबानें त्या मान्य केल्या. महाराजांनींहि वचनाप्रमाणें जयसिंहास विजापूरच्या मोहिमेंत मदत दिली. फारसें मनांत नसतां कांहीं उद्देशानें व जयसिंहाच्या आग्रहानें महाराज आग्र्यास गेले (९ मे). औरंगझेबाची भेट झाली (१२ मे) व त्यांना बंदिवास घडला. जयसिंहाच्या सूचनेवरून रामसिंगानें त्यांची बरदास्त चांगली ठेविली. पुढें महाराज पेटार्‍यांतून निसटले [१९ आगस्ट]. ते सुखरूप रायगडास आले (डिसेंबर). या प्रसंगाबद्दल औरंगझेबानें आपल्या मृत्युपत्रांत लिहून ठेवलें आहे कीं "एका क्षणाचें दुर्लक्ष केल्यास मोठें जन्माचें नुकसान होतें. शिवाजी माझ्या एका क्षणाच्या निष्काळजीनें निसटला पण त्यामुळें मला माझ्या या मृत्युकालापर्यंत सतत अडचणींत आयुष्य घालवावें लागलें." महाराज परत आले तेव्हां जयसिंहावरील औरंगझेबाची मर्जी उडाली होती.तो परत जात असतां बर्‍हाणपुरास मेला [२ जुलै १६६७]. कोणी म्हणतात त्याला औरंगझेबानें विषप्रयोग केला. पुढें औरंगझेबानें दिलीरखानास मुअझ्झमकडे मदतीस पाठविलें [आक्टो.]. परंतु त्या दोघांत सुत नव्हतें. शहाजादा आळशी व विलासी होता. जसवंतसिंगहि इकडे आला होता. तो महाराजांच्या बाजूचा होता. दिलीरच्या सैन्यांत रजपूत राजांत मत्सर होता. शहाजाद्यानें दिलीर यास बेदरवर पाठविलें. या वेळीं आफ्रिदी लोकांवर मोंगली सैन्य गेलें होतें, त्यामुळें व वरील सार्‍या कारणानें औरंगझेबानें महाराजावर स्वारी केली नाहीं व महाराजांनींहि आपली सारी राज्यव्यवस्था लावावयाची असल्यानें त्यांनींहि २ वर्षेंपर्यंत चळवळ केली नाहीं. यावेळीं औरंगझेबानें त्यांच्याशीं तह केला होता.

या नवीन तहाप्रमाणें महाराजांनीं संभाजीला औरंगाबादेस पाठविलें (१६६८). त्याला पंचहजारी मिळाली होती व वर्‍हाडांत जहागीरहि मिळाली होती. दोहों बाजूंनीं

हा तह बरबरचा होता. पुढें प्रथम औरंगझेबानें तो (१६६९) मोडला; त्यानें महाराजांच्या संभाजी आदिकरून सर्व मंडळींस कैद करण्याचा हुकूम सोडला! परंतु ती आधींच निसटली. तह मोडल्यामुळें अर्थातच युद्धास सुरवात झाली. मराठे सर्वत्र धुमाकूळ घालूं लागले. त्यांनीं बहुतेक किल्ले परत घेतले (पुरंधरच्या तहांत गेलेले); त्यांत मुख्य सिंहगड होता. चांदोर लुटलें. महाराजांशीं लढण्यास फक्त दाउदखानाशिवाय एकहि मुसलमान तयार होईना! त्यानें मराठ्यांचा पाठलाग केला, परंतु कांहीं उपयोग होईना. मुअझ्झम व दिलीर यांत भांडणें लागलीं एकदां तर मुअझ्झमनें दिलीरवर हल्ला करण्याचेंहि ठरविलें होतें. दोघांनीं परस्परांबद्दल,दोघेहि शिवाजीस आंतून फूस देतात,असें औरंगझेबास कळविलें. त्यालाहि मुलाबद्दल संशय होताच. इकडे शहाजाद्याच्या भीतीनें दिलीर उज्जनीस पळाला त्याचा पाठलाग शहाजाद्यानें केला, त्यांत त्याला मराठ्यांनीं मदत केली! परंतु ही आपसांतील यादवी औरंगझेबानें थांबविली. याच संधीचा फायदा घेऊन महाराजांनीं दुसऱ्यांदा सुरत लुटली (आक्टो. १६७०) व ६६ लाख लूट मिळविली. त्यावेळीं त्यांच्यावर दाऊदखान चालून आला. या सुमारास मुल्हेर येथें महाराज होते. दोघांची गांठ वणी दिंडोरीस पडली. तेथें दाऊदचा पार धुव्वा उडाला! त्याचे मोठमोठे सरदार मेले. निशाणें हिसकावून घेतलीं व अखेर सारा गोट मराठ्यांनीं लुटला (आक्टो.) यानंतर (डिसें.) प्रतापराव गुजरानें पूर्व खानदेश व वऱ्हाड सारें लुटलें नुसत्या कारंजा गांवींच १ कोटीची लूट मिळाली. त्यानें सर्वत्र चौथ वसूल केली. मोंगलाला प्रतिकाराला वेळच सांपडला नाहीं. इकडे मोरोपंत पेशव्यांनीं खानदेश व बागलाण लुटला. सालेर मुल्हेर हे किल्लेहि काबीज केले. त्यावेळीं दाऊदखान चालून आला पण त्याला मराठ्यांनां हटवितां येईना (जानेवारी १६७१). या सुमारास धोडप वगैरे ४।५ किल्लेहि मराठ्यांनीं घेतले.इतकें झालें तेव्हां औरंगझेब घाबरला व त्यानें मोबतखानास बरोबर बहादुरखान व दिलीरखान व बरेच रजपूत सरदार आणि अफाट सैन्य देऊन महाराजांवर धाडलें. यांची व महाराजांची गांठ चांदोरच्या टेंकड्यांत पडली, परंतु खानाकडून महाराजांचें कांहींच वांकडें झालें नाहीं. तेव्हां त्याला औरंगझेबानें परत बोलाविलें आणि दिलीर व बहादुर यांनां मुख्य नेमलें. त्यांनीं सालेरीस वेढा घालून ते सुपें, पुण्याकडे आले. वाटेंत त्यांनीं लोकांची कत्तल केली (डिसें १६७१). तिकडे महाराजांनीं सालेरीस मोंगलांचा सफा नाश केला! तेव्हां बहादुर व दिलीर हे पुण्याहून तिकडे गेले (जाने. १६७२). याप्रमाणें मोंगलांचा सर्वत्र पराभव झाला! इकडे पावसाळ्यांत जाऊन मोरोपंतांनीं जव्हार काबीज केलें १७ लाखांची लूट मिळाली (जून). रामनगर(कोळ्यांचें राज्य)हि घेतलें (जुलै). सुरत येथून ३० कोस राहिली होती, तेव्हां तेथील लोक घाबरले! इतक्यांत पंतांनीं ४ लाख चौथेचा हुकूम तथील फौजदारास पाठविला. नंतर पंतांनीं नाशिक जिल्हा लुटला (जुलै) व काबीज केला. पुढें तेलंगण व वऱ्हाड यांत मराठे घुसले. बहादुरखान त्यांच्या मागें लागला पण त्याची कुतरओढ झाली. इकडे महाराजांनीं देशावर व कानडा आणि कोल्हापूरकडे बराच प्रांत मिळविला (१६७३). कोंकणांत दिलीरचा सडकून पराभव झाला (जाने. १६७४). यावेळीं आफ्रिडी लोकांनीं बंड केलें होतें. म्हणून औरंगझेब स्वतः सरहद्दीवर गेला व दख्खमधीलहि बरेचसें सैन्य तिकडे गेलें. त्यामुळें मराठे स्वस्थ झाले. महाराजांनीं यावेळीं राज्याभिषेक करून घेतला (जून). लागलीच (जुलै) बहादुरखानावर जाऊन महाराजांनीं त्याला लुटलें. १ कोटी लूट मिळाली. रामनगर, औरंगाबाद, खानदेश, बागलाण, कोल्हापूर, जुन्नर हे प्रांत (व दुसऱ्यानदां बहादुरखान) मराठ्यांनीं लुटले (१६७५). खोट्या तहाच्या अमिषानें महाराजांनीं बहादुरला झुलविलें व विजापुरकरांस मिळवून घेऊन आणि आपली तयारी करून मोंगलावर ते पुन्हां उलटले (१६७६); विजापुरकरांनीं महाराजांनां खंडणी देण्याचें कबूल केलें होतें परंतु ते पुढें तसें वागेनात म्हणून महाराज कर्नाटकच्या स्वारीस गेले, यावेळीं मोंगलांनीं त्यांच्याशीं सल्ला केला होता. गोवळकोंडेकर तर त्यांच्याच बाजूचा मांडलिक होता. त्यानें आपलें सैन्य मदतीस दिलें. महाराजांनीं सर्व कर्नाटक काबीज केलें. त्याचें उत्पन्न २० लाख होतें. यावेळीं विजापूर व आदिलशहा महाराजांच्या हातांत येत होता; पण तें कार्य नासलें (१६७८). मोरोपंतानें हुबळी, नाशीक, लुटलें. इतक्यांत महाराज पन्हाळ्यास आले. यावेळीं त्यांचा भुपाळगड मोंगलांनीं घेतला[१६७९]. नंतर दिलीरनें विजापुरावर स्वारी केली, तेव्हां आदिलशहाच्या विनंतीवरून महाराजांनीं त्याला मदत केली. पुढें राजापुर लुटून महाराज मलकापुर, धरणगांव, चोपडें, बालाघाट या मार्गें मुलुखगिरी करीत जालन्यावर गेले व तिकडे लूट मिळविली, ती घेऊन ते परत येत असतां मोंगलानें सर्व रस्ते अडविले. परंतु बहिर्जीनें दाखविलेल्या मार्गानें ते सुखरूप रायगडास आले आणि थोड्याच दिवसांत वारले [शिवाजी महाराज पहा].

दुसरी विजापूर मोहीम.–(१६६५–६६) आदिलशहानें १६५७ च्या तहाच्या अटी पाळल्या नाहींत म्हणून औरंगझेबानें जयसिंहास त्याच्यावर पाठविलें; परंतु मराठ्यांच्या साहाय्यानें आदिलशहानें त्याचा पराभव केला. या स्वारींत कवडीचीहि प्राप्ति न होतां औरंगझेबास उलट १ कोटी रुपये कर्ज झालें (विजापूर पहा).

तिसरी विजापूर मोहीम.–(१६६७–८४) यावेळीं आदिलशाहींत सर्वत्र यादवी माजली. बादशहा पोर होता त्यामुळें सत्ताधारी वजीरच झाले. या संधीचा फायदा घेऊन

दिलीर यास औरंगझेबानें पाठविलें. परंतु त्याचा पराभव झाला (विजापुर पहा.)

शे व ट ची वि जा पू र मो ही म.–१६८५–८६ आदिल शाहीची स्थिति न सुधारतां दिवसेंदिवस बिघडत चालली. शेवटीं खासा औरंगझेबानें जाऊन विजापुरास ७० दिवस वेढा देऊन तें काबीज केलें. शिंकदर बादशहानें नाइलाजानें आपलें राज्य त्याच्या हवालीं केलें. याप्रमाणें आदिलशाहीचा शेवट झाला ( विजापुर पहा)..

गो व ळ कों ड्या चा ना श ( १६२६—७२ ).–अबदुल कुत्बशहाच्या नंतर त्याचा जांवई अबुल हसन गादीवर आला. तो चैनी, मूर्ख असल्यानें त्याचा सारा कारभार त्याचा वजीर पहात असे. या राज्यांतील अफाट संपत्तीचा लोभ औरंगझेबास सुटून त्यानें तें जबरदस्तीनें खालसा करण्याचा बेत केला. या वेळीं कुत्बशहाचा शहाणा व मुत्सद्दी वजीर मादण्णापंत याचा शहानें खून केला होता. या संधीचा फायदा घेऊन व वरकरणी इ. स. १६५६ चा तह पाळला नाहीं हें कारण दाखवून औरंगझेबानें गोवळकोंड्यावर सैन्य धाडलें. त्यानें हैद्राबाद घेऊन (१६८६) व गोवळकोंड्यास वेढा घालून[१६८७] लढाईनें किल्ला पडत नाहीं असें पाहून फितुरी करून किल्ला काबीज केला व अबुल हसनला कैद करून गोवळकोंड्याच्या कुत्बशाहीचा शेवट केला ( २१ सप्टें. १६८७) मोंगलास एकंदर लूट ७ कोटींची मिळाली [ कुत्बशाही पहा]

औ रं ग जे ब व सं भा जी–संभाजी गादीवर आला तेव्हां औरंगझेब राजपुतान्यांत होता. त्यानें मराठ्यांवर खानजहानास पाठविलें परंतु त्याच्यानें मराठ्यांचा पराभव झाला नाहीं; इतक्यांत शहाजादा अकबर हा त्यांना फितुर झाला. तेव्हां औरंगझेब स्वतः मराठ्यांवर आला. त्यानें सर्वत्र मराठ्यांच्या मुलुखांत सैन्य पेरलें, परंतु संभाजीनें त्याचा सगळीकडे पराभव केला. शहाजादा शहाअलम याचें तर इतकें जबरजस्त नुकसान झालें कीं, त्याला उपासमार करीत परत औरंगाबादेस जावें लागलें. (१६८३). औरंगझेबानें सागरच्या पीड नायकाचा पराभव केल्यानंतर ( १६८६ ) व विजापुरचें कर्नाटक हस्तगत केल्यावर अकबरावर सैन्य धाडलें; तेव्हां त्यानें पळ काढला व अखेर कांहीं चालत नाहींसे पाहून राजापुरहून इराणास निघून गेला [ १६८६ अकबर पहा ]. संभाजीनें १६८५–८७ पर्यंत मोंगलांशीं टक्कर दिली. त्यांत त्याचे कांहीं किल्ले मोंगलांनीं घेतले. त्यानें पन्हाळ्यास वेढा दिला असतां संभाजी हा संगमेश्वरी होता; त्याच्यावर स्वारी करून शेख निजामानें त्याला धरलें व अखेर तुळापुरीं त्याचा वध झाला [१६८९ संभाजी पहा] नंतर फितुरीनें रायगड घेऊन शाहूस कैद केलें.

औ रं ग झे ब व रा जा रा म.—यावेळीं राजारामानें इकडील सारा कारभार पंत अमात्यावर सोंपवून जिंजीचा रस्ता धरला. त्यावर झुल्फिखरखान गेला. परंतु त्याच्यानें राजारामाचा पाडाव झाला नाहीं. इकडे मराठ्यांनीं सर्वत्र रणधुमाळी माजवून दिली. तिच्यापुढें औरंगझेबानें हात टेंकले. मराठ्यांनीं चौथ व सरदेशमुख्या वसूल केल्या. राजारामहि जिंजीहून निघून पन्हाळ्यास आला. मोंगल मराठ्यांचे किल्ले एकीकडे घेई तर ते मराठे लागलींच परत घेत. राजाराम वारला तरी मराठे थकले नाहींत. धनाजी, संताजी यांनीं मोंगलांस त्रासवून सोडलें [ राजाराम व ताराबाई पहा ].

औ रं ग झे बा चा मृ त्युः—( २१।२। १७०७ ) मराठ्यांनीं इतकें सतावून सोडल्यानंतर त्यानें शाहूकडून मराठ्यांना पत्रें लिहून भेदाचा प्रयत्न केला, परंतु त्याचाहि उपयोग झाला नाहीं तेव्हां औरंगझेब दक्षिणेंतून अहमदनगरास परत येण्यास निघाला. त्यावेळीं मराठ्यांनीं वाटेंतच त्याच्यावर हल्ला करून त्याला लुटलें. या अपजयामुळें त्याचें दुखणें मध्यंतरी थांबलें होतें तें उलटलें व अखेर तो नगर येथें मृत्यु पावला. त्यानें मृत्युपत्र करून आपलें राज्य तिघा मुलांत वाटून दिलें होतें. त्याचा शेवट अत्यंत निराशेंत झाला.

जहानआरानें दाराचा पक्ष घेतला होता. परंतु, औरंगझेब गादीवर आल्यानंतर, तिनें त्याचे मागील अपराध विसरून शहाजहानकडून त्याला क्षमा करविली. ती एखाद्या संतीणीप्रमाणें वागे. पुढें औरंगझेबानें तिची नेमणूक वाढवून तिचा मानमरातब फार चांगला ठेवला होता.

औरंगझेबानें आपल्या मुलांमुलींचीं लग्नें घरांतल्याघरांत केलीं; म्हणजे आपल्या भावांच्या मुलीमुलांशीं लाविलीं. त्यामुळें त्याची सारी तिसरी पिढी ही त्याच्या व त्याच्या खून केलेल्या भावांच्या रक्तांच्या मिश्रणाची बनली.

औरंगझेबाचा राज्यकारभार जरी मुख्य त्याच्याच तंत्रानें चाले तरी पुढील अधिकारी त्यांत प्रमुख असत. वजीर, बक्षी व खानसामान ( मंत्री = वाकनीस ) याप्रमाणेंच धार्मिक बाबतींत काझी–उल्–कझत ( मुख्य धर्माध्यक्ष ), मुहतसीब [ नीतिज्ञ ], सदर–उस्–सदर [ मुख्य न्यायाधीश ]. औरंगझेबानें कोण्याहि हिंदूला वझीर केलें नाहीं. वझिराच्या हाताखालीं दिवाण–ई–तनखा आणि दिवाण–ई–खालसा अशा दोन जागा ( इनामी जहागीर व सरकारी जमीन ) मुलकी खात्याच्या असत.

औरंगझेबाचें वर्तन.—औरंझेबाचें धर्माचरण मोठें कडकडीत होतें. त्यानें संसारसुखाची फारशी पर्वा केली नाहीं. त्याचीं सर्व कृत्यें धर्मप्रेरित होतीं. गाणें बजावणें नाच तमाशे, अत्तरगुलाब वगैरे सर्व विलासांना त्यानें रजा दिली होती. मद्यमांस यांनां त्यानें स्पर्शहि केला नाहीं. प्रत्येकानें स्वतः काम करून आपलें पोषण करावें ही इस्लामची आज्ञा पाळण्याकरितां तो स्वतः डोक्याच्या पातळ टोप्या करून विकी. त्याला सर्व कुराण पाठ येत असे.

धर्माच्या केवळ मानसिक समाधानाकरितां सर्वस्वाचाहि त्याग करण्यास औरंगझेब तयार झाला ही गोष्ट विशेष आहे. त्याचा निश्चय कधीं ढळला नाहीं; त्याच्यासारखे शूर व धीट पुरुष थोडेच सांपडतील. राज्यप्राप्तीच्या वेळेस केलेलीं क्रूर कृत्यें वगळलीं; तर न्यायाच्या कामांत त्यास इस्लामी कायद्याप्रमाणें फारसा दोष देतां येत नाहीं.

त्याच्या स्वभावांत अविश्वास मात्र पूर्ण भरला होता त्यानें आपली सर्व शक्ति हिंदूंचा पाडाव करून मुसुमानी धर्माची अभिवृद्धि करण्यांत खर्च केली होती. जुलमानें व दुराग्रहानें त्यानें आपलें राज्य मोडकळीस आणिलें रजपुत राजांस विनाकारण दुखविणें, हिंदूंची सर्वत्र मानहानी करणें हिंदूंचीं देवळें पाडून त्यांच्यावर जिझिया बसवून त्यांचा अत्यंत छळ करणें ( त्यामुळें शीख, सत्नामी, रजपुत, मराठे वगैरे सारे हिंदु त्याच्या विरुद्ध उठणें ) विजापूर व गोंवळकोंडा येथील निरपराधी राज्यें बुडविणें, मराठ्यांचा निःपात करण्याकरितां आपल्या सर्व शक्तीचा व्यय करणें या त्याच्या अक्षम्य चुका होत. तो हट्टी, दुराग्रही व संशयी होता; तथापि शिक्षक, सेनापति, वझीर, धर्मशास्त्रज्ञ असल्या एखाद्या कामास तो फार योग्य होता; त्याचें खासगी वर्तन साधें व पवित्र होतें. त्यास उद्योगाची आवड असून चैन व ऐषआराम नको असे. तो प्रत्येक गोष्ट स्वतः करी, त्यामुळें त्याचे कामगार केवळ यंत्रासारखे होऊन, त्यांची हुशारी बाहेर येण्यास अवकाश मिळाला नाहीं.

इराणी, पठाण, रजपूत वगैरे निरनिराळे लोक नोकरीस ठेवून त्यांच्या आपसांतील वैमनस्याच्या जोरावर एकमेकांस एकमेकांची दहशत बसावी अशी त्यानें योजना केली. फौजेंतील नेमणुका वंशपरंपरागत नसत. त्याच्या फौजेंत लहानसा तोफखाना होता. दिवाणी व लष्करी अधिकार एकाच इसमाच्या हातांत असत. बादशहा आपल्या कामगारांच्या वारंवार बदल्या करी; यामुळें शक्य तितका पैसा उकळण्याकडे त्यांची प्रवृत्ति असे.

औरंगझेबाच्या कारकीर्दीची हकीकत म्हणजे हिंदुस्थानचा साठ वर्षांचा इतिहास आहे असें म्हटलें तरी चालेल. शिवाय १६५८–१७०७ हा कालहि आपल्या देशाच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा आहे. औरंगझेबाच्या कारकीर्दीत मोंगल साम्राज्याची मर्यादा काश्मीरपासून कर्नाटकपर्यंत, आणि गिझनीपासून चितगांवपर्यंत पसरलेली होती. औरंगझेब आपल्या सर्व साम्राज्याचा कारभार स्वतः नेमलेल्या नोकरांमार्फत चालवीत असे, त्याच्या कारकीर्दीत त्याचा हुकूम मोडण्याचें किंवा करवसुलीचा भरणा न करण्याचें किंवा एखाद्या प्रांतांत स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचें कोणत्याहि प्रांताच्या सुभेदाराच्या हांतून धाडस झालें नाहीं. तात्पर्य, येवढ्या मोठ्या साम्राज्याची सर्व सत्ता एका व्यक्तीच्या हातांत एकवटलेली आहे असें अवरंगझेबावांचून दुसरें उदाहरण हिंदुस्थानच्या प्राचीन व अर्वाचीन कोणत्याहि इतिहासांत नाहीं.

अवरंगझेब बादशहा येवढा बलाढ्य होता; परंतु त्याच्याच कारकीर्दीत मोंगल साम्राज्यास उतरती कळा लागून तें मोडण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. इराणचा नादीरशहा, अफगाणिस्तानचा अहमदशहा यांच्या स्वाऱ्यांचे आघात दिल्लीवर होण्यापूर्वीच मराठी साम्राज्याचा दरारा व अम्मल मोंगल बादशहांना जाणवूं लागण्यापूर्वी, फार काय प्रत्यक्ष अवरंगझेब बादशहाचे डोळे मिटण्यापूर्वीच साम्राज्याच्या खजीन्याचें व त्याच्या इभ्रतीचें दिवाळें वाजलें. राज्यकारभार विस्कळीत झाला व खुद्द अवरंगझेबानें साम्राज्यांत शांतता व व्यवस्था राखण्याच्या कामीं अपयश आल्याचें कबूल केलें.

तात्पर्य १७ व्या शतकाच्या अखेरीलाच मोंगल साम्राज्य सर्वस्वीं बिघडून गेलें होतें. मराठ्यांवरोबरच्या सामन्यांत बादशाही खजिना रिता झाला व मोंगल सैन्याला अनेकवार हार खावी लागली. बादशहाचे अधिकारी अप्रामाणिकपणें व बेपर्वाईनें वागूं लागले. खुद्द प्रधान, मंत्री व शहाजादे वगैरे मंडळींत चांगला मुत्सद्दी व हुषार कोणी निघाला नाहीं. याप्रमाणें मोंगल जातीची व घराण्याची अन्तर्बाह्य अवनती झाल्याचें दिसूं लागलें. आणि या सर्वांचें कारण काय ! खुद्द औरंगझेब बादशहाबद्दल म्हणाल तर तो स्वतः व्यसनी नव्हता, मूर्ख नव्हता, किंवा आळशीहि नव्हता. त्याची हुषारी नांवाजण्यासारखी होती. बादशहा असून सुखोपभोगाऐवजीं तो सदा सरकारी कामकाजांत दंग असे. शिस्त व व्यवस्था यांची त्याला फार आवड; स्वभावानें अत्यंत शांत व धिम्मा, दूरदूरच्या स्वाऱ्यांत स्वतः पडेल ती दगदग सोसण्यास तयार, कोणत्याहि संकटाला न डरणारा किंवा कोणत्याहि हृदयद्रावक प्रसंगांत मन द्रवूं न देणारा होता. प्राचीन विद्वानांचे उपदेशपर ग्रंथहि त्याला चांगले अवगत होते. आणि प्रत्यक्ष युद्धाचा व राजकारणाचा तर बापाच्या कारकीर्दीपासून त्याला अनुभव भरपूर मिळालेला होता. सारांश अशा बहुगुणसंपन्न बादशहाच्या कारकीर्दीच्या पन्नास वर्षांच्या अखेरीस मोंगल साम्राज्यांत गोंधळ माजून तें डबघाईस यावें, हें राजनीतिशास्त्रांतलें एक मोठें कोडेंच आहे. म्हणून औरंगझेबाच्या कारकीर्दीचें ऐतिहासिकदृष्ट्या, तसेंच राजनीतिशास्त्रदृष्ट्याहि मोठें महत्त्व आहे. जदुनाथ सरकारकृत चरित्रांत याविषयावरलि वाङ्मय आढळेल. ]

**औरंगाबाद विभाग.**—हैद्राबाद संस्थानचा वायव्येकडील विभाग. यांतील महत्त्वाचीं गांवें:—औरंगाबाद, जालना, कादिराबाद, नांदेड, अंबा, परळी. औरंगजेब मलिकंबर व कुतुबशाहींतला शेवटचा अबूल हसन यांचीं थडगीं येथें [ रौझा ] आहेत. क्षे. फ. ६१७२ चौ. मै. या प्रांताची लो. सं.(१९११)२९७६५४१ आहे.

**मर्यादा व साधारण वर्णन.**—उत्तरेस बालघाट किंवा उंचवट्याचे प्रदेश " व दक्षिणेस पायघाट " किंवा सखल

प्रदेश " असे या जिल्ह्याचे दोन भाग आहेत. उत्तर भागांतील डोंगर हे वऱ्हाडांतील बालाघाटाचेच भाग आहेत. महादेवाचे डोंगर, सर्पनाथाचे डोंगर, गोवाताला किंवा अजिंठ्याचे डोंगर आणि सात माळ्याचे डोंगर ह्याहि दुसऱ्या रांगा आहेत. अजिंठा व वेरूळ येथील प्रसिद्ध लेणीं बासाल्ट नांवाचे खडक खोदून केलेली आहेत. ह्या जिल्ह्यांतील मुख्य नदी गोदावरी ही सरहद्दीवरून १२७ मैलपर्यंत वहाते. या जिल्ह्यातील हवा साधारणपणें निरोगी आहे. परंतु पावसाळ्यात व हिंवाळ्यांत मलेरियाचा आजार सुरू असतो. वेरूळच्या आग्नेय दिशेला हें सर्वांत रमणीय ठिकाण आहे.

जिल्हा:—या जिल्ह्यांतील पावसाचें सरासरी वार्षिक मान २५ इंच आहे. दक्षिणेच्या इतिहासांत हा जिल्हा बराच महत्त्वाचा आहे. ख्रिस्ती शकापूर्वी या जिल्ह्यांतील पैठण हें ठिकाण फार महत्त्वाचें होतें. दुसरा पुळुमायी ह्या आंध्र राजाची तेथें राजधानी होती असें टॉलेमी यानें लिहिलें आहे. तिसऱ्या शतकांत आंध्रसत्ता मोडकळीस आली. व त्यानंतर तीन शतकांनीं हा प्रदेश चालुक्यांच्या अंमलाखालीं गेला सातव्या शतकांत दुसरा पुलकेशि हा राजा राज्य करीत असतां ह्युएनत्संग हा अजिंठ्याचीं लेणीं पहाण्याकरितां गेला होता. इ. स. ७६० च्या सुमारास राष्ट्रकूटांनीं चालुक्यांनां जिंकून आपलें राज्य स्थापिलें. त्यांच्यापैकीं पहिला कृष्णराजा यानें वेरूळ येथें खडक खोदून कैलास हें देवालय तयार केलें. नंतर ९७३ त चालुक्यांनीं आपलें राज्य परत मिळविलें. यादव किंवा सेऊण हे त्यांचे मांडलिक होते. यानंतर मध्यंतरीं बरेच राजे होऊन गेले; परंतु ११८७ त भिल्लम यानें देवगिरी येथें प्रथम स्वतंत्र राज्य स्थापिलें. नंतर त्याचा नातु सिंघण यानें आपलें राज्य उत्तरेस खानदेश व दक्षिणेस म्हैसूरपर्यंत वाढविलें. त्यानें गुजराथवरहि स्वारी केली होती. १२९४ त अल्लाउद्दीनानें दक्षिणेवर स्वारी केली व यादव कुळांतील शेवटचा राजा रामचंद्र याचा पराभव करून त्यापासुन पुष्कळशी लूट आणि खंडणीचें अभिवचन मिळविलें. पुढें रामचंद्रानें खंडणीचें अभिवचन न पाळिल्यामुळें अल्लाउद्दीनानें मलिक काफूर यास १३०७ मध्यें दक्षिणेवर पाठविलें. रामचंद्रानें त्यास शरण जाऊन खंडणी देण्याचें कबूल केलें; परंतु त्याच्या मागून येणाऱ्या राजांनीं हा करार न पाळल्यामुळें दक्षिणेवर मुसुलमानांच्या वारंवार स्वाऱ्या होऊं लागल्या. शेवटीं १३१८ त हरपाळ मारला जाऊन यादवांच्या सत्तेचा शेवट झाला. १३४७ पासुन १४९९ पर्यंत या जिल्ह्याचा समावेश ब्राह्मणी राज्यांत व पुढें अहमदनगरच्या राज्यांत झाला. १६०० त चांदबिबीचा खून होऊन मोंगलांनीं अहमदनगर घेतलें अहमदनगरचा वजीर मलिक अंबर यानें मोगलांशीं पुष्कळ लढाया केल्या व व अखेर १६१० त खडकी येथें आपली राजधानी स्थापन केली. त्याच्या मरणानंतर औरंगाबाद व अहमदनगर हे जिल्हे मोगलांनीं आपल्या राज्यास जोडले. औरंगझेबानें खडकी नांव बदलून औरंगाबाद नांव ठेविलें. अठराव्या शतकाच्या आरंभीं हैद्राबाद संस्थानची स्थापना झाल्यावर औरंगाबादचा समावेश त्यांत झाला.

वेरूळ, औरंगाबाद व अजिंठा येथील बुद्ध, जैन व ब्राह्मण पद्धतीच्या कारागिरीचीं लेणीं प्रसिद्ध आहेत. १९११ त या जिल्ह्याची लो. सं. ८६९७८७ होती. शें. ८५ लोक हिंदु व शें. १२ मुसुलमान आहेत. शे. ७९ लोक मराटी भाषा बोलतात.

शेतकी:—येथील जमिनीचे तीन प्रकार आहेत:—( १ ) रिंगर, किंवा काळी कापसाची जमीन; ( २ ) मसबू किंवा तांबूस जमीन व ( ३ ) मिळवा, किंवा पहिल्या दोहोंच्या मिश्रणानें झालेली जमीन. ज्वारी, बाजरी व गहूं हीं मुख्य पिकें होत. कडधान्यें, तांदूळ, कापूस, गळिताचीं धान्यें वगैरे जिन्नसहि होतात.

गोदावरी खोऱ्यांतील ( गंगथडी ) घोड्यांची काटकपणाबद्दल पूर्वी प्रसिद्धि होती.

या जिल्ह्यांत रयतवारी पद्धत सुरू आहे.येथील जमाबंदीची मुदत ३० वर्षें आहे. " जिराईत जमिनीवर सरासरी सारा एकरीं एक रु. चौदा आणे व बागाईतीवर ५ रु. असतो.

व्यापार:—चांदीचीं भांडीं, कशिद्याचें काम, किनखाप, मश्रु व हिम्रू वगैरे जरतारी कामाबद्दल औरंगाबाद प्रसिद्ध आहे. पैठण व जालना येथें रेशमी व सुती लुगडीं, पैठण्या, पितांबर होतात. कागदीपुरा येथें पुष्कळ प्रकारचे कागद होतात. कापूस, धान्य, रेशमी व सुती कापड, कातडीं, तंबाखू, गूळ, तांबें व पितळेचीं भांडीं वगैरे जिन्नस या जिल्ह्यांतून बाहेर जातात; व तांदूळ, मीठ, विलायती कापड, साखर, केरोसीन तेल, कच्चें रेशीम वगैरे जिन्नस बाहेरून येतात. व्यापाराचीं मुख्य ठाणीं औरंगाबाद, जालना व पैठण हीं होत. हैद्राबाद गोदावरी व्हॅली रेल्वेचा फांटा या जिल्ह्यांतून पूर्वपश्चिम गेलेला आहे.

राज्यव्यवस्था:—या जिल्ह्याचे ३ पोटविभाग आहेत. पहिल्या पोटविभागांत जालना, सिलोद, अंबर व भोकर्दन हे तालुके; दुसऱ्यांत गंगापूर, वैजापूर, पैठण, आणि कणाद तालुके; व तिसऱ्यांत औरंगाबाद आणि खुल्दाबाद हे तालुके आहेत. प्रत्येक भागावर एक एक तालुकदार असतो. प्रत्येक तालुक्यावर तहशीलदार नेमलेले आहेत. पैकीं एक तालुकदार हा पहिल्या वर्गाचा म्याजिस्ट्रेट असतो. जिल्हान्यायाधिशाला नाझीम–ई–दिवाणी असें म्हणतात. पहिल्या वर्गाच्या तालुकदाराच्या गैरहजेरींत तो फौजदारी कामहि पहातो. औरंगाबाद येथें जिल्हाबोर्ड व इतर तालुक्यांत तालुकाबोर्ड आणि म्युनिसिपालिट्या आहेत.

शहर.—हैद्राबाद संस्थानांत औरंगाबाद हें त्या विभागाचें, जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. ( १९११ ) ३४९०१. १६१० त मलिकंबर यानें खडकी

जवळ एक गांव बसवून त्याचें नांव फत्तेनगर असें ठेविलें. तो १६२६ मध्यें निवर्तल्यावर, अहमदनगरच्या राजांची सत्ता कमी होऊन १६३७ त त्यांचें राज्य मोंगलांच्या दक्षिणच्या सुभ्यामध्यें सामील झालें. इ. स. १६३५ व १६५३ या वर्षी औरंगझेब त्या प्रांताचा सुभेदार असतां तो खडकी येथें रहात असे व तेव्हांपासून त्यानें या गांवास औरंगाबाद असें नांव दिलें. औरंगझेबाच्या मरणानंतर पहिला निजाम असफजाह हा औरंगाबादेस येऊन स्वतंत्र झाला व पुढें त्यानें हैद्राबाद ही आपली राजधानी केली.

या शहराच्या उत्तरेस व दक्षिणेस सिचेल आणि सातारा या डोंगरांच्या रांगा आहेत. औरंगझेबाच्या वेळीं या शहराची लो. सं. २,००,००० होती असें म्हणतात. जुन्या शहराच्या पूर्वेस हल्लींचें शहर वसलेलें आहे व पश्चिमेस कोमनदीपलीकडे लष्करी छावणी आहे.

१८५३ त येथें अरब लोक व हैद्राबादची एक लष्करी तुकडी यांच्यामध्यें चांगली चकचक होऊन अरबांचा पराभव झाला. १८५७ त येथील सैन्यांत थोडीशी अस्वस्थता उत्पन्न होऊन छावणीवर हल्ला होण्याचा बेत दिसत होता. परंतु पुण्याहून इंग्रज सैन्याची मदत आल्यावर तेथील सैन्याला विनहत्यारी कवाइतीकरितां बोलावून त्यांतील पुढाऱ्यांना पकडण्यांत आलें व पुढें त्यांची चवकशी लष्करी कोर्टापुढें होऊन २१ शिपायांना बंदुकीनें व दोघांना तोफेच्या तोंडीं देऊन ठार मारण्यांत आलें.

सुभेदार, नाझीम–ई–सुभा,( पहिल्या वर्गाचा तालुकदार) वगैरे सरकारी कामगार येथें रहातात. हें व्यापाराचें मुख्य ठिकाण असून येथें रेशमी व जरीचें काम होतें. शहरांतील पाणी पुरवण्याच्या सोयी मलिकंबर व औरंगझेब यांच्या वेळीं तयार केलेल्या आहेत. व जरी त्या आतां थोड्या बहुत मोडकळीस आल्या आहेत तरी लोकांचें काम अद्याप त्यांवर भागतें. या शहरामध्यें व त्याच्या आसपास पुष्कळ पाहाण्यालायक स्थळें आहेत. त्यामध्यें मकबरा म्हणजे औरंगझेबाच्या बायकोचें ( दिलरसबानूचें थडगें, ) मलिकंबरनें बांधलेली जुमा मशीद, बोरमालजवळचा निजामाचा जुना राजवाडा व किल्ला आर्क म्हणजे औरंगझेबाचा राजवाडा हीं मुख्य आहेत. उत्तरेस २ मैलांवर औरंगाबादचीं लेणीं आहेत. शहरामध्यें १ औद्योगिक शाळा, १ कलाशिक्षणालय व ३ हायस्कुलें आहेत. पुष्कळसे सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने व कापडाच्या दोन गिरण्या आहेत. औरंगाबादसंबंधीं ऐति. उ. सांपडतात तेः–रा. खंड १ ले. ४८; खं. ६, ले. १; खं. ७ खंड १० ले. ५८९; खं. १८ ले. ५ येथें पाहावयास मिळतील.

**औरंगाबाद सय्यद शहर**—हें गांव संयुक्त प्रांतांत बुलंदशहर जिल्ह्यांत आहे. लो. सं. ( १९०१ ) ५९१६. हें गांव १७०४ मध्यें सय्यद अब्दुल अझीझ यानें स्थापिलें. अद्यापहि तें त्याच्याच वंशजांच्या ताब्यांत आहे.

**और्व**—वारुणी भृगूंच्या सात पुत्रांतील पहिला जो च्यवन त्याचा पुत्र. त्याला कोणी ऊर्व ऋषीचा पुत्र असेंहि म्हणतात. हा मातेच्या ऊरूचा ( मांडीचा ) भेद करून निघाला म्हणून यास और्व हें नांव पडलें.हा मोठा झाल्यावर यास असें कळलें कीं, हैहय कुलोत्पन्न राजांनीं आपल्या कुलांतील स्त्रियांस व पुरुषांस द्रव्यानिमित्त बहुत पीडा दिली होती. यास्तव त्यांचा नाश करण्यास यानें मोठें उग्र तप आरंभिलें. त्यापासून परम भयंकर अग्नि उत्पन्न होऊन तो त्या क्षत्रियांस जाळूं लागला. तेव्हां क्षत्रिय याच्या पितरांस शरण आले असावेत, म्हणून पितरांनीं येऊन याचा कोपानल याकडून समुद्रांत टाकविला.(भार.आ.१७९–१८१)

**औशनस**–(१) उशना ऋषींचे पुत्र ( शंडामर्क श० )पहा.

(२) भारतवर्षीय तीर्थ. येथें उशना ऋषीनें तप करून नीतिविषयक अनेक सूत्रेंहि रचिलीं म्हणून यास हें नांव पडलें. या तीर्थास कपालमोचन असेंहि नांव आढळतें ( भार० शल्य० अ० ३९ ).

(३) गौतमांगिरसवंशमालिकेंतील एक ऋषि व त्याचें कुल. (अंगिरा शब्द पहा.).

**औसले सर विल्यम**—( १७६९–१८४२ ) हा आयरिश प्राच्यविद्याकोविद मनमाउथशायर येथें जन्मला. याचें प्राथमिक शिक्षण घरींच झालें. त्यानंतर १७८७ मध्यें पॅरिस येथें फ्रेंच भाषा शिकण्याकरितां त्याला धाडण्यांत आलें. या ठिकाणीं असतांना त्याला पर्शियन भाषेची गोडी लागली. १७८८ मध्यें घोडेस्वारांच्या आठव्या तुकडीचा तो अंमलदार झाला. पण त्याची इच्छा पर्शियन शिकण्याची असल्याकारणानें आपल्या नोकरीला रामराम ठोकून तो लीडन येथें १७९४ सालीं पर्शियन भाषेचा अभ्यास करण्याकरितां गेला.१७९५ मध्यें त्यानें 'पर्शियन मिस्लेनीज' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. १७९७–९९ याच्या दरम्यान 'ओरिएंटल कलेक्शन्स्' हा ग्रंथ त्यानें प्रकाशित केला. १७९९ मध्यें 'एपिटोम ऑफ दि एन्शन्ट हिस्टरी ऑफ पर्शिया; १८०० सालीं 'दि ओरिएंटल जीऑग्रफी ऑफ इब्न हौकेल; १८०१ मध्यें 'बख्तयारनामा' चें भाषांतर व ऑब्झर्व्हेशन्स ऑन सम मेडल्स अँड जेम्स' असे ग्रंथ त्यानें प्रसिद्ध केले. १७९७ सालीं त्याला डब्लिन विश्वविद्यालयानें एलएल. डी. ची पदवी अर्पण केली. १८०० मध्यें त्याला नाइटहूडचा किताब मिळाला. १८१० मध्यें त्याच्या भावाला पर्शिया येथें वकील या नात्यानें इंग्लंडनें पाठविल्यामुळें त्याचा खासगी चिटणीस या नात्यानें वुइल्यम हा पर्शिया येथें गेला. १८१३ मध्यें तो इंग्लंडला परत गेला १८१९–१८२३ या अवधींत त्यानें 'ट्रॅव्हल्स इन व्हेरियस कंट्रीज ऑफ दि ईस्ट, एस्पेशली पर्शिया इन १८१०–१८११, १८१२' हा ग्रंथ तीन भागांत प्रसिद्ध केला. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मासिकांत त्यानें पुष्कळदां लेख लिहिले. तो १८४२मध्यें बोलोन येथें वारला.

# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

## अं



अं—अशोकाच्या गिरनार शिलालेखांत 'अ' च्या डोक्यावर टिंब देऊन अं वर्ण तयार केला नसून, टिंब 'अ' च्या पुढें दिलेलें आढळतें. इ. स. ४ थ्या शतकाच्या सुमारास लिहिलेल्या एका लेखांत मात्र 'अ' च्या डोक्यावर लहान रेघ काढून अं बनविला आहे.

अंक—अंकाची उत्पत्ति, निरनिराळ्या देशांत त्यांची स्थिति, परस्पर संबंध, भारतीय अंकांनां असणारें पितृस्थान वगैरे गोष्टींचा विचार ५ व्या विभागांत ३ ऱ्या प्रकरणांत "संख्यालेखन" या लेखांत विस्तारानें केलेला आहे.

२ एकांकी नाटकाला अंक अशी संज्ञा आहे. यालाच उत्सृष्टिकांक असेंहि नांव आहे ( भरत १८. १३९, दशरूपक ३. ६४ साहित्यदर्पण ६. २५० इत्यादि ). या अंकांतील कथाभाग पौराणिक अगर कविनिर्मित स्वतंत्र असा असतो. वृत्तींपैकीं सात्वती, आरभटी आणि कैशिकी या वृत्ती यांत नसतात ( भरत १८ ८ इत्यादि ). संधीपैकीं मुख आणि निर्वहण ( भरत. १९. ४९ ) तेवढेच आढळून येतात. करुणरस प्रामुख्यानें आढळून येतो. यांतील नायक हा देव नसतो तर कोणत्याहि जातीचा असूं शकतो. कांहीं अर्वाचीन शास्त्रज्ञांच्या मतें नायक प्राकृतजन असला तरी चालेल. स्त्रीशोक अगर अशाच इतर गोष्टीहि यांत येत असत. युद्ध, कलह इत्यादिकांचें वर्णन येतें. पण हे प्रकार रंगभूमीवर दाखविण्यांत येत नाहींत.

३ नाटकामध्येंच उपनाटक जें असतें त्यालाहि अंक हें नांव आहे. 'बालरामायणाच्या' तिसऱ्या अंकांत याला 'प्रेक्षणक' हें अभिधान योजलेलें आहे. तसेंच भास्करकवीच्या 'उन्मत्तराघव' नाटकामध्यें अशाच प्रकारचें एक प्रेक्षणक आढळतें. पण याला अंक म्हणण्यास हरकत नाहीं. या भास्करकवीसंबंधानें फारशी माहिती मिळत नाहीं याचें नाटक विद्यारण्यांच्या सन्मानार्थ जमलेल्या मंडळीपुढें करण्यांत आलें होतें. विद्यारण्य म्हणजे सायण घेतल्यास भास्कर कवीचा काल निश्चित ठरेल. त्याचें नाटक विक्रमोर्वशीयाच्या चवथ्या अंकाचें अनुकरण आहे. राम व लक्ष्मण एका सुंदर सुवर्ण मृगाच्या पाठीमागें लागले असतां दुर्वासाच्या शापानें सीता कशी सुवर्णमृग झाली व रामाला सीता न मिळाल्यामुळें तो कसा वेडा झाला व प्रत्येकापाशीं सीतेसंबंधींचा शोध करूं लागला. आणि सरतेशेवटीं अगस्त्याच्या मदतीमुळें राम सीतेचें मधुर मीलन कसें झालें हें या नाटकांत दाखविलें आहे.

लोकनाथभट्टाचें 'कृष्णाभ्युदय' हेंहि प्रेक्षणक या नांवानें संबोधिलें गेलें आहे. हें कांचीं येथील श्रीहस्तिग्वीनाथाच्या वार्षिक यात्रेनिमित्त रचण्यांत आलें होतें तेव्हां याला अंक हेंहि नांव देण्यास हरकत नाहीं.

साहित्यदर्पणामधील ( ६. २५२ ) 'शर्मिष्ठा ययाती' च्या उल्लेखप्रसंगीं त्याला अंक म्हणण्यांत आलें आहे. भागवत कृष्णकवीकृत 'शर्मिष्ठाययाति' आणि हें एकच असावें.

त्याचप्रमाणें हरिमोहन प्रामाणिकाच्या 'कमलाकरुणा विलासा' संबंधानें हेंच म्हणतां येईल. तसेंच कांहीं अर्वाचीन नाटकांनां देखील अंक हें नांव देतां येईल. महेशपंडित विरचित [ १७०० ] 'सुवर्णमुक्ताविवाद' त्रावणकोर येथील संस्कृत पाठशाळाप्रारंभानिमित्त राजराजवर्मन् बालकवि यानें रचिलेलें 'गैर्वाणीविजय' आणि, वरदराजपुत्र सुंदरराजकृत 'स्नुषाविजय' हीं नाटकेंहि अंक या नांवानें संबोधितां येतील.

**अंकगणित**—भरतखंडांत गणितशास्त्राचा अभ्यास हा वेदाच्या षडंगांपैकीं ज्योतिष ह्या पांचव्या अंगाचा एक भाग म्हणून व कांहीं अंशीं यज्ञांत एकाच क्षेत्रफळाचे पण निरनिराळ्या आकृतींची रचना करितां यावी ह्या हेतूनें प्रथम सुरू झाला. त्याचप्रमाणें ह्या विषयाच्या अभ्यासानें मनाची एकाग्रता होते व तीमुळें परमेश्वरप्राप्तीचें एक सुलभ साधन प्राप्त होतें ह्या विचारानेंहि आपले आर्यपूर्वज ह्याचा अभ्यास करीत. ह्या गणितस्कंधाच्या अनेक शाखा व उपशाखा आहेत. त्यांतील अंकगणित ही एका अर्थानें सर्वांत कमी महत्त्वाची पण कदाचित् सर्वांत जुनी व रोजच्या व्यवहाराशीं निकट संबंध असलेली शाखा होय. ह्या अंकगणितांत अंक अथवा व्यक्त संख्या ह्यांचा विचार केलेला आहे. बीजगणितांत अव्यक्त संख्यांचा विचार केलेला आहे.

व्यावहारिक, बौद्धिक विकासाच्या व शास्त्रीय अशा दृष्टीनें ह्या विषयाचें विवेचन करतां येईल. परंतु ह्यापैकीं पहिल्या दृष्टीनें विचार प्रत्येक अंकगणिताच्या पुस्तकांत येतो, दुसऱ्याचा शिक्षणपद्धतींत येतो. तिसऱ्या दृष्टीनें विचार ह्या लेखांत अंशतः करण्याचें योजिलें आहे. अंशतः असें म्हणण्याचें कारण ज्या लोकांच्या पुढें हा ग्रंथ जाणार आहे त्यांच्या मनोभूमिकेला अनुरूप अशीच विचारसरणी पाहिजे. युरोपिअन लोकांत शास्त्राभ्यासाची गोडी फार असते. म्हणून त्यांनां निव्वळ शास्त्रीय विवेचन शुष्क वाटत नाहीं. आमच्या इकडील सामान्य वाचकांचें ज्ञान

कमी व शास्त्रीय विषयांची गोडी कमी म्हणून हा विषय ह्या लेखांत व्यवहारांतले दाखले देऊन सुबोध केलेला आहे व अंकचमत्कृति हें प्रकरण नवेंच घालून व इतरहि मनोरंजक माहिती देऊन चटकदार करण्याचा प्रयत्न केलेला आहे. शिवाय बरेचसे वाचक इंग्रजीला पारखे किंवा इंग्रजीयत असून गणितशास्त्राची प्रगति आजमितीला किती आहे याची माहिती नसणारे असे असतात व त्यांना त्यांच्या आटोक्यांत असेल इतकी तरी माहिती देऊन त्यांची जिज्ञासा थोडीशी तृप्त करण्याचा येथें प्रयत्न केला आहे इतकी प्रस्तावना करून आतां मुख्य विषयाकडे वळूं.

गणितशास्त्राच्या ज्या भूमिति इत्यादि अनेक शाखा आहेत त्यांमध्यें सर्वांत आरंभींची अंकगणित ही शाखा होय. किंबहुना गणितशास्त्राच्या अभ्यासाला आरंभ स्वाभाविकपणें याच शाखेपासून होतो. कारण शिकण्यास सर्वांत सुलभ, नेहमींच्या साध्या व्यवहारांत अत्यंत उपयुक्त अशी गणितशास्त्राची शाखा अंकगणिताइतकी कोणतीहि नाहीं. ह्याला भास्कराचार्यांनीं 'पाटी गणित' असें नांव दिलें आहे. कारण त्यावेळीं हल्लीं प्रमाणेंच हिशेब पाटीवर (मात्र ही पाटी म्हणजे लांकडाची फळी असून तीवर धूळ टाकून गणित हा शब्द गण् म्हणजे गणना करणें ह्यावरून लिहीत असावेत). करीत किंवा पाटीवर प्रथम शिकत. ह्या शास्त्राचें मूळ व विकास आपल्या देशांत झाला आहे हें पुढें दिलेल्या शून्य चिन्हाची व इतर अंकांची उत्पत्ति, तसेंच दशांक पद्धतीच्या उत्पत्तीवरून दिसून येईल.

उत्पत्ति—ह्या शास्त्राची उभारणी संख्येच्या कल्पनेवर असल्यामुळें या शास्त्राची उत्पत्ति व्यापाराचें मूळ स्वरूप जें विनिमय त्यापासून फार प्राचीनकाळीं झाली असावी. व्यापार, साधा विनिमय व कांहीं प्रकारचीं नाणीं हीं वेदकाळीं प्रचारांत होतीं असें प्राचीन काळच्या ग्रंथांवरून दिसतें (कै. रोमेश चंद्र दत्त यांच्या एन्शंट व इंडिया ज्ञानकोश विज्ञानेतिहास पृ. ८५ पहा.). आर्य ह्या शब्दाची व्युत्पत्ति 'अर्' म्हणजे नांगरणें ह्यापासून आहे. अर्थात् टोळ्या करून भटकण्याच्या (उ. अरब, तुर्क, तार्तर हे लोक ह्या प्रकारचे होत) पुढची व सुधाणेच्या सुंदर मंदिराचा पायाच अशी जी शेती ती करून व एका ठिकाणीं कायम वस्ती (घरें) करून राहणें ह्यांतच आपल्या प्राचीन आर्य पूर्वजांमध्यें व इतर तत्कालीन लोकांमध्यें मुख्य फरक होता. ह्याच्या पुढची पायरी म्हणजे उत्पन्न केलेलीं धान्यें वगैरे आपल्या निर्वाहास पुरून उरणारे पदार्थ दुसऱ्यास देऊन त्यापासून आपल्यास जरूर लागणारे इतर पदार्थ घेणें अर्थात विनिमय ही होय. ह्यांतच दोन पदार्थांची निरनिराळ्या म्हणजे वजन, माप, किंमत—मूल्य—ह्या बाबतींत तुलना करावी लागते; व मग पुढें संख्येची कल्पना येते. ह्यानंतर एकाच तऱ्हेच्या ठराविक मापाची (मूलमानाची—युनीटची) जरूरी भासूं लागते. त्याचप्रमाणें नाण्यांची आवश्यकता भासूं लागून निरनिराळ्या परिमेयांची (परिमेय ह्याला सामान्यतः परिमाण असें म्हणण्याचा परिपाठ आहे. परंतु व्युत्पत्तीवरून परिमाण मापें म्ह युनिट ठरविणें भाग येतें) अशा तऱ्हेनें ह्या विनिमयाचा विकास होऊन देशांतर्गत व पुढें परदेशच्या व्यापारांत रूपांतर होतें. ह्या विनिमयाला अंकगणिताची अत्यंत जरूरी असते. व अशा रीतीनें ह्या शास्त्राची उत्पत्ति होते.

आतां ह्या शास्त्राच्या उत्पत्तीचा मान कोणत्या राष्ट्राकडे जातो हा प्रश्न दुसरा. प्राचीन काळचें परदेशाशीं किंवा राष्ट्राराष्ट्रांशीं व्यापाराबद्दल प्रसिद्ध असलेलें राष्ट्र फिनिशियन लोकांचें. ह्यांनांच वेदांत 'पणी' ह्या संज्ञेनें उल्लेखिलें आहे असें विद्वानांचें मत आहे. हे लोक व्यापाराकरितां हिशेब ठिशेब कसे करीत ह्याची माहिती उपलब्ध नाहीं. तेव्हां विशेषतः आंकड्यांची, संज्ञांची (संख्यांची) उत्पत्ति, अंकपद्धति ह्यासंबंधीं त्यांना कांहीं माहिती होती अशाबद्दल पुरावा सांपडत नाहीं. ज्या अर्थी संख्या, संज्ञा, दशांक पद्धति, शून्यचिन्ह इत्यादींची आपल्या देशांतच उत्पत्ति झाली असून इतर अंगांनींहि त्या शास्त्राचा विकास बराच झालेला आहे, त्या अर्थी हें शास्त्र आपल्याच देशांत जन्मास आलें व परिणत झालें असावें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. शिवाय प्राचीन काळीं आमच्या देशाचा इतर देशांशीं खुष्कीनेंच केवळ नव्हे तर जलमार्गानें (फाह्यान ह्या चिनी व इतर देशच्या प्रवाशांनीं केलेल्या वर्णनावरून) मोठ्या प्रमाणावर व्यापार चालत होता असें दिसतें. व्यापार म्हटला कीं हिशेब व गणित त्याबरोबर आलेंच. ह्या गोष्टीवरूनहि हें शास्त्र आपल्या देशांतच जन्मास आलें असावें ह्या म्हणण्यास बळकटी येते (विविध ज्ञा. वि. ५ पा. ८९ पहा).

परिमेयें व परिमाणें—वर सांगितलेंच आहे कीं विनिमय किंवा 'देवघेव' हा व्यापार परस्पर जिनसांचें सापेक्ष मूल्य किंवा किंमत कळल्याशिवाय होणें शक्य नाहीं. 'अ'जवळ कांहीं तांदूळ आहेत व 'ब'जवळ कांहीं गहूं आहेत. 'अ' 'ब' ह्यांमध्यें देवघेव होतांना किती तांदळाचें मूल्य किती गव्हांबरोबर आहे हा प्रश्न उभा राहतो. तेव्हां मूल्य हें एक परिमेय झालें (जें मापतां किंवा मोजतां येईल तें परिमेय). तसेंच 'अ' व 'ब' हे दोघेजण जर एकमेकांपासून बऱ्याच अंतरावर असले तर एकाजवळ किती तांदूळ व दुसऱ्याजवळ किती गहूं आहेत हें परस्परांस कळविणें झाल्यास त्या दोघांनांहि समजेल अशा तऱ्हेचें एक माप पाहिजे. वजन कळविणें झाल्यास त्या परस्परांस माहीत असलेलीं अशीं एक किंवा अनेक ठराविक वजनें पाहिजेत. हीं ठराविक वजनें व मापें कीं ज्यांच्या योगानें इतर पदार्थांचीं वजनें व मापें परस्परांस नक्की सांगतां येतील तींच

परिमाणें होत. त्याचप्रमाणें दोन पदार्थांची लांबी मोजाव-याची असल्यास लांबी हें परिमेय व ज्या ठराविक लांबीनें (इंच, फूट, हात, तसू इत्यादि) ही लांबी आपण मोजतों त्यास आपण परिमाण म्हणूं; तसेंच क्षेत्रफळ हें परिमेय व चौरस इंच, चौरस फूट, चौरस हात इत्यादि त्याचीं परिमाणें होत. ज्या जातीचें परिमेय असेल त्या जातीचें परिमाण असलें पाहिजे हें उघड आहे. कारण कापड मोजण्याच्या 'वारा'नें पदार्थाचें वजन करतां येणार नाहीं हें उघड आहे. परिमेयें हीं मुख्यतः ६ प्रकारचीं आहेत. लांबी, क्षेत्रफळ (पृष्ठफळ), अवकाशफळ अगर घनफळ (गर्भफळ,) वजन, मूल्य व काल हीं तीं होत. याशिवाय घनता, शक्ति वगैरे इतर अनेक परिमेयें गणिताच्या उपशाखांतून दृष्टीस पडतात. परंतु सामान्य जनांना व व्यवहारांत मूलभूत अशीं वरील सहाच होत. त्यांना अनुसरून ६ जातींचीं परिमाणेंहि आहेत. जसें लांबीचीं परिमाणें फूट, इंच, हात, दंड, कोस, मैल इत्यादि, त्या परिमाणांमध्यें लांबीच्या परिमाणावरून क्षेत्रफळाचीं व घनफळाचीं परिमाणें बसविलीं आहेत. लांबी मोजतांना जसें आपल्याला कांहीं तरी गज (टेप किंवा फूटपट्टी) माप लागेल तसेंच क्षेत्रफळ मापण्यास कांहीं तरी क्षेत्रफळात्मक माप पाहिजे, म्हणजे कांहीं तरी क्षेत्र अथवा क्षेत्रफळ असलेली आकृति पाहिजे. ती उपपत्तीच्या दृष्टीनें त्रिकोण, चौकोन, वर्तुळ किंवा दुसरी एखादी असूं शकेल. परंतु सामान्यतः काटकोनात्मक (चौकोन किंवा चौरस) क्षेत्रें (दीर्घ चतुरस्र) मापण्याचा प्रसंग व्यवहारांत फार म्हणून सोयीकरितां हें परिमाण चौकोनाकृति असावें हें बरें. व त्यांतल्यात्यांत समचतुरस्र (स्क्वेअर) हा बरा. म्हणून क्षेत्रफळ हें समचतुरस्रांनीं मोजण्याची वहिवाट आहे. ह्या समचतुरस्ररूपी क्षेत्रफळाच्या मापाची बाजू कांहींहि घेतली असतां चालेल. परंतु येथेंहि पुन्हां सौकर्यासाठीं १ इंच किंवा १ फूट अथवा लांबीच्या परिमाणाइतकीच त्याची बाजू घेतली जाते. प्रत्यक्ष कोणतेंहि क्षेत्र मापावयाचें म्हणजे (उदाहरणार्थ खोलीची भिंत मापावयाची असल्यास) एक चौरस फूट म्हणून ज्याला म्हणतात तसले चौरस पुष्कळसे घेऊन ते एकमेकांनां लावून त्यांची १ ओळ करावयाची, तशीच दुसरी, तशीच तिसरी असें कीं त्यानें सर्व क्षेत्र (भिंत किंवा काय असेल तें) व्यापिलें जातें.

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | |
| २ | | | | | | |
| ३ | | | | | | |
| ४ | | | | | | |
| ५ | | | | | | |
| ६ | | | | | | |

उदाहरणार्थ हे चौकोनी तुकडे कागदाचे, पत्र्याचे अथवा कोणत्याहि पातळ पदार्थाच्या चकत्या आपण लांबीच्या बाजूनें (रुंदीच्या बाजूनेंहि ठेवितां येतील हें उघड आहे) एकमेकांस लावून ठेविले तर आपल्या आकृतींत ६ तुकड्यांची १ ओळ बनेल (भिंतीची लांबी ६ फूट आहे, व प्रत्येक तुकड्याची बाजू एक फूट आहे, अशी कल्पना करून ह्या आकृतीप्रमाणें ओळींची संख्या ६ झाली. तेव्हां एकंदर तुकड्यांची संख्या ६×३६ = ३६ झाली. प्रत्येक तुकडा म्हणजे आपलें क्षेत्रफळ काढण्याचें माप आपण एक चौरस फूट कल्पिलें आहे. अर्थात भिंतीच्या क्षेत्रफळाचें माप (: अर्थात क्षेत्रफळ) ३६ चौरस फूट झालें. लांबीमध्यें जितके फूट (किंवा सामान्यतः लांबीचीं परिमाणें) आहेत, तितके चौरस एका ओळींत भरतात, व रुंदीमध्यें जितके फूट असतील तितक्या ओळी येतात म्हणून:—

क्षेत्रफळ (अर्थात् एकंदर चौरसांची संख्या) = लांबी (अर्थात् लांबींतील फुटांची संख्या) × रुंदी असा नियम झाला.

ह्याप्रमाणें १ फूट उंची, एक फूट लांबी, १ फूट रुंदी असा १ ठोकळा कल्पिला तर त्यानें व्यापिलेली जागा ही १ घन फूट झाली. एखाद्या पोकळीचें घनफळ काढावयाचें ह्याचा अर्थ त्या पोकळींत असे ठोकळे किती मावतील हें काढणें होय. एका खोलीची लांबी २० फूट, रुंदी १५ फूट, उंची १२ फूट असून त्या खोलीचें घनफळ काढणें तर हें घनफळ प्रत्यक्ष मापणें झाल्यास येणेंप्रमाणें मापतां येईल. लांबीला अनुसरून एका ओळीनें २० ठोकळे ठेवून १ रांग बनविली. खोलीच्या तक्तपोशीवर आणखी एक रांग बसविली, नंतर तिसरी रांग, चौथी रांग, अशा १५ रांगा होतील असा १५×२० ठोकळ्यांचा १ थर झाला. मग त्यावर दुसरा थर, मग तिसरा थर ह्याप्रमाणें १२ थर होतील. अर्थात त्या खोलींत एकंदर ३००×१२ इतके ठोकळे मावतील. अर्थात् ३६०० घनफूट हें खोलीचें घनफळ झालें ह्यावरून सामान्यतः

घनफळ=लांबी×रुंदी × उंची. असा नियम झाला.

परिमाणांचे विभागः—एक स्वाभाविक(जसें १ मनुष्य व १ आंबा) व दुसरें कृत्रिम जसें इंच, फूट इ. निरनिराळ्या महत्त्वाचीं परिमेयें मोजण्याकरितां एकाच जातीचीं अनेक भिन्न परिमाणें कल्पिलेलीं आहेत, उदाहरणार्थ एखादें मेज किंवा पेटी वितीनें किंवा हातानें मोजतां येईल. पण दोन गांवामधील अंतर कोसांनीं मोजावयाचें असतें. अमुक एक लांबीच कां धरावी व तिला इंच कां म्हणावें ह्याला कारण कांहीं नाहीं. ज्यांना इंच ही लांबी माहीत नसेल त्यांना ती लांबी किती आहे हें नांवावरून समजणार नाहीं. पण १ आंबा म्हणजे किती हें कोणालाहि सहज समजतें. संख्या (म्ह. परिमाण व परिमेय ह्यांतील संबंध) ही मूर्त व अमूर्त प्रकारची आहे. पांच गाई, सहा आंबे येथें पांच व सहा ह्या मूर्त जातिविशिष्ट पदार्थांच्या दर्शक असल्यानें त्यांस मूर्त म्हणतात; व निव्वळ ५।६ हे शब्द व ह्या संज्ञा शुद्ध संख्यावाचक असल्यानें त्यांस अमूर्त किंवा जातिरहित म्हणतां येईल.

आपली परिमाणपद्धति व 'मीटर' नांवाची परिमाणपद्धति.–आपल्या परिमाणपद्धतींत हात, अंगुली, वेत हीं निरनिराळीं लांबीचीं परिमाणें होत. ह्यांतील उदाहरणार्थ हात हा घेऊं. ही लांबी निश्चित अशी कांहींच नाहीं. कारण ठोकळ मानानें हें माप अमुक मर्यादेच्या आंत व अमुक मर्यादेच्या बाहेर ( १फुटाच्या वर व २ फुटां-पेक्षां लहान ) आहे असें म्हणतां येईल. तेव्हां एका विशिष्ट व्यक्तीचा हात घेतला पाहिजे. परंतु तरी सुद्धां अडचण आहेच. लहानपणीं त्याच व्यक्तीचा हात लहान असतो व थोरपणीं मोठा होतो. तेव्हां त्या व्यक्तीच्या एका विशिष्ट वयाची किंवा विशिष्ट क्षणाची हाताची लांबी घेतली पाहिजे. अंगुली व वीत यांनां हेंच म्हणणें लागू पडेल. हें आमच्या हिंदुस्थानी परिमाणपद्धतीसंबंधानें झालें.

इंग्रजी पद्धतींत तरी फूट ह्याचा मूळचा अर्थ 'पाऊल'. तें तरी एका विशिष्ट व्यक्तीचें व एका विशिष्ट क्षणीचें घेतलें पाहिजे. हा घोंटाळा टाळण्याकरितां लंडनमधील ब्रिटिश म्यूझियम् ( म्हणजे इंग्लंडमधील अजबखाना ) ह्या नांवाच्या संस्थेंत एक धातूचें 'यार्ड' ( अथवा ज्याला आपण मराठींत 'वार' म्हणतों तें ) नांवाचें एक लांबीचें माप करून ठेविलें आहे. आतां सूक्ष्मदृष्टीनें विचार केल्यास हिवाळ्यांत ह्याची लांबी ( थंडीमुळें संकोच पाव-ल्यानें ) कमी होणार व उन्हाळ्यांत जास्ती होणार. म्हणून हें लांबीचें माप अनेक निरनिराळे प्रसरणधर्म असलेल्या अशा धातू घेऊन त्यांच्या कांबीचें बनविलें आहे. त्यामुळें तिची लांबी निरनिराळ्या ऋतूंत सारखीच रहावी. इतकें केलें तरीहि तिच्या लांबींत सूक्ष्म तरी फरक पडत असला पाहिजे हें उघड आहे. हा फरक अत्यंत सूक्ष्म असल्यानें व्यवहारांत त्यामुळें कांहीं अडचण येणार नाहीं. परंतु हल्लीं शास्त्रीय प्रयोगांत फारच सूक्ष्म मापें लागतात. तेव्हां त्रिकालाबाधित असें परिमाण असावें. ह्याशिवाय १२ इंच म्हणजे फूट तर ३ फूट म्हणजे यार्ड असें कां ? १२ फुटांचेंच पुढील परिमाण असतें तर जास्त सोइस्कर झालें असतें. ह्या परिमाणा-मधील गुणोत्तरदर्शकसंख्यांनां कांहीं ताळ ना मेळ! अर्थात् सर्वत्र एकच (उदाहरणार्थ १२ हेंच) गुणोत्तर असतें तर बरें झालें असतें. तसेंच हिशोबाच्या सोईच्या दृष्टीनें हें गुणोत्तर १० असेल तर फारच उत्तम.

वर सांगितलेल्या अडचणी दूर केलेल्या असून बहुतेक सर्व गुण ज्यांत साधलेले आहेत अशी एक परिमाणपद्धति आहे. हिला 'मेट्रिक सिस्टिम' अथवा 'दशमानपद्धति' म्हणतात. दशमानपद्धति म्हणण्याचें कारण ह्या पद्धतींतील परिमाणें दसपटीनें चढत किंवा दहाव्या हिश्यानें उतरत जातात हें होय. वरील विवेचन वाचून उत्तम परिमाणपद्ध-तीचीं लक्षणें खालीं दिल्याप्रमाणें असलीं पाहिजेत हें दिसून येईल.

१ लें:—यांतील मुख्य परिमाण त्रिकालाबाधित असावें. म्हणजे निरनिराळ्या काळीं त्याचें मान बदलूं नये.

२ रें:—यांतील निरनिराळ्या मापांचा परस्परांशीं अस-लेल्या संबंधांत—मुख्यत्वें गुणोत्तरांत—कांहींतरी नियम असावा. अर्थात तीं एकसारखीं असावीं. एकदां एक तर दुसऱ्यांदा कांहीं भलतेंच असें असूं नये.

३ रें:—तीं गुणोत्तरें व्यवहारांस—अर्थात हिशोब करा-वयास—फार सुलभ असावीं.

४ थें:—भिन्न जातींच्या परिमाणांमध्यें ( उदाहरणार्थ घनफळ व वजन यांत) कांहींतरी संबंध असावा.

या दशमानपद्धतींत सर्वच गुणोत्तरें एकसारखीं असून तीं १० च्या पटीनें किंवा हिश्यानें चढत उतरत गेल्यामुळें वरीलपैकीं दोन लक्षणें त्यांत पूर्णपणें आहेत. परंतु हिच्यांतील परिमाण जें 'मीटर' ह्या नांवाचें लांबीचें परिमाण तें पृथ्वीच्या परिधीच्या $\frac{१}{४००००००० }$ (परिधी म्हणजे दोनही ध्रुवांतून जाणारें वृत्त घेतलेलें आहे ) इतकें आहे. हा परिधी ( पृथ्वीची स्थिति प्राण्याच्या वस्तीला जोपर्यंत अनुकूल असेल तोपर्यंत हें विधान लागू पडेल. ती जलमय किंवा प्रज्वलित बाष्पस्वरूप अशी असतां तिचा परिधी हल्लींच्याहून भिन्न असा असणार हें उघड आहे.) कधींहि फारसा बदलत नाहीं. किंवा त्याच्या मानांत फरक पडलाच तर तो इतका सूक्ष्म आहे व त्याच्या चार कोट्यंश हा इतका लहान भाग होईल कीं तो विचारांत घेण्यासारखा नाहीं. तेव्हां एकाअर्थी ह्यांतील मुख्य परिमाण कायम स्वरूपाचें आहे. आतां पृथ्वीचा व्यास ८००० मैल धरून हें मुख्य परिमाण जें 'मीटर' त्याचें अजमासें मान काय येतें तें ( १ मैल = ५२८० फूट हें लक्षांत ठेवून ) पाहूं-

$$( \text{परिधी} = \frac{२२}{७} \times \text{व्यास} )$$

$$१ \text{ मीटर} = \frac{\text{पृथ्वीचा परिधी}}{४००००००० } = \frac{\frac{२२}{७} \times ८००० \times ५२८०}{४००००००० }$$

$$= \frac{२९०४}{८७५} = ३ \text{ फूट } ३\frac{७२३}{८७५} \text{ इं.} = ३९$$

[ इंचाहून थोडें अधिक ]

एक मीटर हा १.१ यार्ड किंवा १.१ वार ह्याहून जरा जास्त असतो.

पृथ्वीचा व्यास ह्याहून सूक्ष्म घेतला व व्यासाच्या परिधीस ( फ्रेंच शास्त्रज्ञांनीं हें माप प्रथम ठरविलें त्यावेळीं त्यांनीं घेतलेला पृथ्वीचा परिधी हल्लींच्या सूक्ष्ममानाइतका नव्हता. तरीहि आमच्या विधानास फारसा बाध येणार नाहीं. ) प्रमाण $\frac{२२}{७}$ ह्याहून सूक्ष्मतर घेतलें तर मीटर = ३९.३७ इंच अजमासें येतें. ह्या लांबीच्या परिमाणावरून क्षेत्रफळाचें परिमाण चौरस मीटर व घनफळाचें परिमाण घनमीटर हीं

काढण्यांत येतात. १ चौ. मीटर म्हणजे जवळ जवळ ११ चौ. फूट व घनमीटर म्हणजे अजमासें ३३ घनफूट. इतर परिमाण पद्धतींत घनफळ किंवा अवकाश व वजन ह्यांच्या परिमाणांत कांहींहि संबंध नाहीं. परंतु ह्या पद्धतींत पाणी हा पदार्थ मानप्रतिष्ठा (ज्या पदार्थाच्या वजनाची तुलना करून इतर पदार्थांचे वजन सांगावयाचें त्या मूलभूत पदार्थास 'मान प्रतिष्ठा' असें म्हणूं) कल्पून त्याचें उष्णमान ४ अंश (ह्या वेळीं त्याची घनता पराकाष्ठेची जास्त असते) व दाब ७४ असतांना $\frac{१}{१००००००}$ घनमीटर पाण्याचें जें वजन तें वजनाचें परिमाण घेतलेलें आहे. त्याला 'ग्राम' असें म्हणतात. अशा रीतीनें ह्यांत ४ थें लक्षणहि परिपूर्ण झालेलें आहे. तसेंच एका परिमाणाचीं जीं उच्चनीच भेदाचीं परिमाणें असतात. त्यांचीं नांवें इतर पद्धतींत भिन्न भिन्न असतात. उदाहरणार्थ इंग्रजी पद्धतींत लांबीचीं उच्चनीच परिमाणें मैल, यार्ड, फूट, इंच इ. होत. परंतु ह्या दशमानपद्धतींत तसें नसून त्यांचीं नांवें मुख्यपरिमाणदर्शक शब्दापासून कांहीं प्राक्प्रत्यय अथवा पूर्वगामीप्रत्यय जोडून बनविलेलीं असतात. हे प्राक्प्रत्यय म्हणजे कांहीं लॅटिन व ग्रीक (व्युत्पत्तिदृष्ट्या संस्कृत शब्दांशीं त्यांचें साम्य आहे) संख्यावाचक शब्दांचीं रूपें आहेत. ते प्रत्यय येणेंप्रमाणें:—

| मूलरूप | | संक्षेप |
|---|---|---|
| डेक्या | = दशक (दसपट) | डी |
| हेक्टो | = शतक (शतपट) | ह |
| किलो | = सहस्रक (हजारपट) | क |
| मिरिया | = अयुतक (दहाहजारपट) | म |
| डेसी | = दशांश | डी |
| सेंटी | = शतांश | स |
| मिली | = सहस्रांश | म |

ह्या प्राक्प्रत्ययाच्या उपयोगानें मूळ परिमाणावरून निरनिराळीं उच्च नीच अशा विविध परिमाणांचीं नांवें तयार होतात.

लांबीचें मुख्य परिमाण मीटर अथवा मात्रा = ३९·३७ इं.

क्षेत्रफळाचें परिमाण—एअर = $\frac{१}{४०}$ एकर (अजमासें) मात्रादशक अथवा दहा मात्रा इतकी ज्याची प्रत्येक बाजू आहे असा चौरस.

अवकाशमापनाचें परिमाण (गर्भफळ)—१ लीटर (ज्याची प्रत्येक बाजू मात्रादशांशाइतकी आहे अशा एका चौकोनी ठोकळ्यानें व्यापलेली जागा) = $१\frac{३}{४}$ ग्यालन द्रव पदार्थांकरितां. घन पदार्थांकरितां—स्टेअर (एक घन मात्रा)

वजन—ग्राम = $\frac{११}{५०००}$ पौंड (वजनी (आतां ह्यांतील लीटर ह्याच्यापासून विविध उच्चनीच परिमाणें व त्यांचे संक्षेप पुढीलप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| मिरियालिटर | (मि. लि.) | म्हणजे | १०००० ली. |
| किलोलिटर | (कि. लि.) | ,, | १००० ली. |
| हेक्टोलिटर | (हे. लि.) | ,, | १०० ली. |
| डेकॅलिटर | (डेक लि.) | ,, | १० ली. |
| डेसीलिटर | (डेसी. लि.) | ,, | १ ली. |
| सेंटीलिटर | (सें. लि.) | ,, | ·०१ ली. |
| मिलिलिटर | (मि. लि.) | ,, | ·००१ ली. |

ह्याच प्रमाणें इतरांचें समजावें.

ही परिमाणपद्धति यूरोपमध्यें इंग्लंडशिवाय बहुतेक सर्व देशांत चालू असून इंग्लंड अमेरिकेसुद्धां सर्व देशांतील शास्त्रज्ञ हिचाच उपयोग करितात. शास्त्रीय प्रयोगांतील सर्व आंकडे ह्याच पद्धतीप्रमाणें दिलेले असतात. हिंदुस्थान सरकारनें आपलें शेर हें माप एक घनमात्राइतकें आहे असें कायद्यानें ठरविलें आहे. ही परिमाणपद्धति फार सोयीची आहे; व हिंदुस्थानांत सर्वत्र ही चालू नसली तरी हिच्याच धर्तीवर एखादी दशमानपद्धति काढून ती एकच पद्धत सर्व देशभर प्रचारांत आणल्यास त्यापासून व्यवहारांत मोठी सोय होईल. कारण ह्यांत विविध परिमाणांचा हिशोब मुळींच भानगडीचा नसतो. चढत्या उतरत्या भांजणीचा मुळींच प्रश्न उरत नाहीं. देशांतील नाण्यांच्या व्यवहारालाहि दशकपद्धति लागू करण्याचा प्रयत्न चालू आहे. रुपया, आणे, पै ह्यांऐवजीं रुपाया, दशांश रुपाया, शतांश रुपया अशीं नाणीं ह्यापद्धतिप्रमाणें होतील.

वरील विवेचनावरून परिमेय व परिमाण ह्यांची कल्पना आलीच असेल. एकाच जातीचें परिमेय व परिमाण घेतलीं असतां त्यांचा जो महत्त्वदर्शक परस्परसंबंध तो 'संख्या' ह्या शब्दानें दर्शविला जातो. 'संख्या' ह्या शब्दाचा मूळचा अर्थ निश्चित रीतीनें सांगणें असा आहे. पुष्कळ माणसें आलीं होतीं असें म्हणण्यापेक्षां २०० माणसें आलीं होतीं हें जास्ती निश्चित स्वरूपाचें विधान होतें. ही संख्येची निव्वळ अव्यक्त अशी कल्पना झाली. तिला व्यक्त किंवा निश्चित स्वरूप यावयासाठीं तिचें दर्शक चिन्ह किंवा चिन्हें पाहिजेत. हीं चिन्हें दोन तऱ्हेचीं; एक शाब्दिक व दुसरें लेखात्मक. दोहोंनांहि आपण 'अंक' किंवा 'आंकडे' म्हणतों. 'अंक' ह्याचा मूळचा अर्थहि 'चिन्ह' किंवा 'खुण' असाच आहे. पांच पदार्थ पाहिले असतां पांच ही कल्पना मनांत येते. 'पांच' हें शब्दचिन्ह झालें व '५' हें अंकचिन्ह झालें. संख्या अनंत आहेत तेव्हां त्यांची दर्शकचिन्हेंहि अनंत असलीं पाहिजेत असें सकृद्दर्शनीं वाटेल. परंतु संख्यावाचक शब्द घेतले असतां बहुतेक सर्व भाषांत एकपासून दहापर्यंत निरनिराळे शब्द आहेत. नंतर १००, १०००, १०,००० वगैरे ह्यांनां वेगळे वेगळे शब्द आहेत व इतर संख्यावाचक शब्द निरनिराळे संख्यावाचक शब्द जोडून बनविले आहेत. जसें:—

सं. ११ म्ह एकादश, अकरा (हा एकादश ह्याचा अपभ्रंश होय). मल्याळी भाषेत पदनन्न (पत्त म्ह. १० आणि वन म्ह. १). कानडींत हत्वन्दु (हत्त म्ह. १० व वन्दु म्ह.१)

१२ = द्वादश, बारा ( अपभ्रंश ) कानडी हन्यरडु (हत्+यरडु म्ह० १० + २ = १२ )

१३ = सं. त्रयोदश, तेरा ( अपभ्रंश );मल्याळी पदमून (मून म्ह. ३) कानडी हन्मुरु ( हत् +मुरु = १०+ ३ = ) एलेव्हन् ट्वेल्व्ह थर्टीन ह्या इंग्रजी शब्दांचे मूळचे अर्थ असेच आहेत.

५० = पंचाशत्, पन्नास. तसेच आंकड्यांचा विचार केला असतां एकंदर दहा चिन्हांनीं आपण सर्व संख्या मांडून दाखवूं शकतों. दहा चिन्हें म्हणजे १ ते ९ अंक व शून्य हीं होत. संख्यावाचक शब्दचिन्हांपेक्षां गणिताची 'आंकड्यां'वरच भिस्त फार आहे. हीं अंकचिन्हें मूळ कधीं निघालीं ह्याचा इतिहास मोठा मनोरम आहे.'वैशाली' ह्या नांवाच्या गांवीं अंकगणित या विषयावर एक संस्कृत जुनें पुस्तक सांपडलें आहे. ( हा ग्रंथ खिस्ताच्या पहिल्या शतकाच्या सुमारास लिहिलेला आहे ( त्यावरून असें दिसतें कीं, संख्यांच्या नांवांचीं आद्याक्षरें हींच पूर्वकालीं संख्याचिन्हें होतीं, हें कॅजोरी नांवाच्या ग्रंथकाराचें मत होय. [ जास्त माहितीकरितां ज्ञा. को. वि. ५ प्र. ३. पहा ]

| मूळशब्द | शब्दचिन्हें | अपभ्रष्ट स्वरूप |
|---|---|---|
| एक | ए | १ |
| द्वौ | द ( ट ) | २ |
| त्रि | त्र | ३ |
| पंच | प | ५ |
| नव | न | ९ |
| शून्य | श | ० |

ह्याप्रमाणें ह्या संख्या पूर्वी तद्वाचक शब्दांच्या आद्याक्षरांनीं दर्शविल्या जात असत. व त्या आद्याक्षरांचीं अपभ्रष्ट रूपें म्हणजे सांप्रतचे आंकडे होत. इंग्रजींतील व सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत प्रचलित असलेले आंकडे हे आपल्याच (कॅजोरीज हिस्टरी ऑफ मॅथेमॅटिक्स पहा) आंकड्यांचीं रूपांतरें होत. यूरोपमध्यें ह्यांतील पहिले नऊ आंकडे अरब लोकांच्या द्वारें इसवी सन ६०० च्या सुमारास गेले असावेत. आपले पूर्वज हीं नऊ चिन्हें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत वापरीत असत असें दिसतें. शून्याला चिन्ह त्यावेळीं किंवा त्या सुमारासच कोणी तरी शोधून काढिलें असावें असें कॅजोरी हा गणितशास्त्राच्या इतिहासांत म्हणतो. आर्यभटाच्या ग्रंथांत हल्लींची अंकपद्धति जशीच्या तशीच दृष्टीस पडते. आपली अंकपद्धति सर्वांस माहीत आहेच. ह्या पद्धतींत आंकड्यांना ते ज्या विशिष्ट स्थानीं असतील त्या स्थानावरून कांहीं विशिष्ट किंमत येते. उदाहरणार्थ १०६२५ ह्याचा अर्थ १००००+६००+२०+५. शून्य हें चिन्ह नसतें तर ही संख्या मांडणें किंवा १०, १००, १०००० ह्या व अशासारख्या संख्या मांडणें कठिण झालें असतें. शिवाय बेरीज वजाबाकी, गुणाकार व भागाकार हे व्यवहार अत्यंत कठिण झाले असते यूरोपमध्यें हें चिन्ह माहीत नसल्यानें बराच कालपर्यंत ह्या शास्त्रांत व्हावी तशी प्रगति झाली नाहीं अरब लोकांच्या द्वारें यूरोपमध्यें पहिलीं नऊ चिन्हें इ. स. सहाशेंच्या सुमारास गेलीं हें वर सांगितलेंच आहे. तत्पूर्वी यूरोपांत रोमनपद्धति प्रचारांत होती. ह्या पद्धतींत त्या त्या संख्यावाचक शब्दांच्या आद्याक्षरांवरून बनविलेलीं कांहीं चिन्हें आहेत. हे रोमन आंकडे १ ते १२पर्यंत घड्याळाच्या तबकडीवर आढळतात [ I, II, III, IV, V, C, M, इ. ]

ह्यांत एक ( एक उभी रेघ ) पांच, दहा, पन्नास, शंभर वगैरे संख्यांस वेगवेगळीं चिन्हें आहेत. ( 'सी' म्हणजे शतम 'एम्' म्हणजे दहा लाख इत्यादि ) हीं चिन्हें विशिष्ट तऱ्हेनें एकमेकांशेजारीं लिहून निरनिराळ्या संख्या बनवितां येतात. कमी किंमतीचा अंक डाव्या बाजूला असल्यास तो वजा करावयाचा व उजव्या बाजूला असल्यास तो मिळवावयाचा. उदाहरणार्थ. V ह्याचा अर्थ ४ ( म्ह. पांच ह्याच्या डावीकडे एक लिहिला असल्यानें ५–१ अर्थात ४ ) आपल्या पद्धतीप्रमाणें ४५६ ह्या संख्येंत ४ हा आंकडा शतस्थानीं असल्यामुळें त्याची किंमत ४०० म्हणजे ४ ह्याच्या शतपट झाली ५ हा आंकडा दशमस्थानीं असल्यामुळें त्याची किंमत त्याच्या दसपट म्हणजे पन्नास झाली. आंकड्यांची किंमत स्थानाप्रमाणें दसपट, शतपट, सहस्रपट, लक्षपट वगैरे होत असल्यानें आपल्या पद्धतीप्रमाणें मोठमोठ्या संख्या अति सुलभ रीतीनें मांडतां येतात. रोमन पद्धतींत तितकें सुलभ जात नाहीं, शिवाय चिन्हेंहि फार लागतात. तसेंच हें स्थानिक किंमतीचें तत्त्व रोमन पद्धतींत नसल्यानें बेरीज.वजाबाकीचे व्यवहार आपल्या पद्धतींतल्या प्रमाणें सुलभ रीतीनें करतां येत नाहींत.

आपल्याला हें सर्व सुलभ रीतीनें करितां येतें त्याला कारण 'शून्य हें चिन्ह' व अंकाचें स्थानमहत्त्व ह्या दोन गोष्टी होत. शून्याला खरोखरी कांहीं किंमत नाहीं. परंतु तें दुसऱ्या संख्या लिहिण्याच्या कामीं फार उपयोगी पडतें. शेक्सपीयर ह्या प्रसिद्ध आंग्लकवीनें ( ह्याचा काळ १७ वें शतक ) शून्याच्या ह्या गुणधर्मावर 'हेनरी धी फिफ्थ' नांवाच्या नाटकाच्या मंगलाचरणांत मोठें मनोरंजक रूपक केलें आहे; त्याच्यामुळेंच गुणाकार भागाकारादि व्यवहार फार सोपे होतात. आज शून्यचिन्ह जर जगांतून काढून टाकिलें तर हिशेबाच्या अभावीं जगांतील किती तरी व्यवहारांत घोंटाळा व अनिश्चितपणा माजून राहील, एखाद्या महान् साधुपुरुषाप्रमाणें शून्याला स्वतःचा संसार (किंमत) कांहीं नसून हें चिन्ह निव्वळ लोकोपयोगार्थ अवतरलें आहे. परंतु इतकें असूनहि हें चिन्ह भरतखंडांत कोणत्या महापुरुषानें शोधून काढिलें त्याचा थांग किंवा पत्ता लागत नाहीं. मग ह्याला कारण आमच्या लोकांतील इतिहासलेखन

पराङ्मुखता असो अथवा मुसुलमानी व इतर परकी लोकांनीं केलेला प्राचीन ग्रंथसंपत्तीचा नाश असो

निरनिराळ्या अंक पद्धतीः—ही दशांकपद्धति (म्ह०दहा अंकचिन्हांनीं संख्या लिहिण्याची रीत) सुधारलेल्या जगांत व आपल्या लोकांत इतकी रूढ झालेली आहे कीं, हिच्याहून अगदीं भिन्न अशी अंकपद्धति असू शकेल ही कल्पनाहि आपणास करवत नाहीं. परंतु अशा पद्धती प्राचीन काळीं अस्तित्वांत होत्या. आपल्यांतील आणेवारी किंवा सोळुलें माप ही षोडशांकपद्धतीची साक्ष देतात. इंग्रज लोकांचीं बरीचशीं परिमाणें ( उदाहरणार्थ १२ पेन्स म्हणजे शिलिंग, १२ इंच म्हणजे फूट इत्यादि कोष्टकें व १२ किंवा डझन ह्या मापानें किंमत सांगण्याचा प्रघात )व आपल्यांतील १२ अंगुलें म्हणजे वीत व बारुलें माप हीं सर्व द्वादशांकपद्धतीचीं दर्शक होत. तसेंच इंग्रजीमधील स्कोअर किंवा २० यांचीं मानें किंवा दर सांगण्याची रीत व आपल्यांतील कुणबी माळी लोकांतील २ इसा, ३ इसा असा विसांनीं संख्या मोजण्याचा प्रकार हे विंशतिपद्धतीचे अवशेष होत. शिवाय २ फाडी, ४ फाडी ( फाडी हें पंचक ह्याचें अपभ्रष्ट रूप असावें ) अशा रीतीनें मोजण्याची पद्धत ही पंचकीपद्धतीचीं अवशेष होय. तथापि एकंदरींत दशांक पद्धतीच सर्व आर्य राष्ट्रांत प्राचीन काळापासून प्रचारांत होती हें उघड आहे. अरबस्तानांत सप्तांकपद्धत प्रचारांत होती व बाबिलोनियन लोकांत दशांकपद्धतीबरोबरच षष्ठ्यंक पद्धति रूढ होती. ह्या निरनिराळ्या पद्धतीप्रमाणें संख्या कशा मांडितां येतात हें पाहणें फार मजेचें होईल म्हणून थोडींशीं उदाहरणें खालीं देतोंः—

द्वादशांक पद्धतीप्रमाणें पहिल्या ११ संख्यांनां ११ अंक किंवा एकेरी चिन्हें पाहिजेत. समजा कीं, ११ ला 'अ' व दहाला 'द' हीं चिन्हें मुकर केलीं तर ह्या पद्धतीप्रमाणें कांहीं संख्या खालीं दिल्याप्रमाणें लिहितां येतील. या पद्धती संबंधीं जास्त माहिती ( स्केल्स ऑफ नोटेशन ह्या सदराखालीं ) इंग्रजी बीजगणिताच्या पुस्तकांत दिलेली असते.

| द्वादशांकपद्धतीप्रमाणें | | दशांकपद्धतीप्रमाणें |
|---|---|---|
| १० = | १ × १२ + ० | १२ |
| २५ = | २ × १२ + ५ | २९ |
| ३३ = | ३ × १२ + ३ | ३९ |
| १०० = | १२ × १२ | १४४ |

१६४ = १२×१२+६×१२+४ = २२० (१४४+७२+४ )

स्पष्टीकरणः—आपल्या नेहमींच्या दशांकपद्धतीमध्यें १० ह्याचा अर्थ दहाची एक पट घ्यावयाची. त्याचप्रमाणें द्वादशांकपद्धतीमध्यें मूलांक जो १२ त्याची १ पट घ्यावयाची. तसेंच १०० हा आपल्या पद्धतींत १०×१० किंवा दहाचा वर्ग होय. पण इतर पद्धतींत त्या त्या मूलांकाच्या वर्गाचा तो वाचक होईल. द्वादशांकपद्धतींत १०० म्ह० १४४ होतील. २५ ह्यांतील २ ह्याचा अर्थ मूलांकाच्या दुप्पट घ्यावयाची व त्यांत ५ मिळवावयाचे. अर्थात द्वादशांकपद्धतींत ह्याचा अर्थ. २×१२+५ = २९ असा होईल. विंशांकपद्धतींत, २×२०+५ = ४५ असा; सप्तांक पद्धतींत,२×७+५ = १९; असा; षष्ठ्यंक पद्धतींत, २×६०+५ = १२५; असे निरनिराळे अर्थ होतील.

ह्या पद्धतीची माहिती ज्ञा. को. वि. ५ प्र. ३ ह्यांत सविस्तर दिलेली आहे ती पहा.

ह्या सर्व पद्धतींनां मागें टाकून हल्लींची दशांकपद्धतीच अनेक कारणांमुळें सर्व लोकांत पसंत पडली आहे; व म्हणून सर्वत्र तीच प्रचारांत आहे. चीन, जपान,यूरोपखंड, अमेरिका इत्यादि पृथ्वीच्या सर्व भागांवर सर्व राष्ट्रांत हीच पद्धति अमलांत आहे. अशी अंकपद्धति मूळ आपल्या भरतखंडांत जन्मास आली ह्याबद्दल आपणांस अभिमान वाटल्यास तो सार्थ नाहीं असें कोण म्हणेल?

ही दशांकपद्धति प्रथम ह्या देशांत जन्मास आली व इ. स. ७७३ च्या सुमारास एका हिंदूनें बगदाद येथें नेली. तेथून मुसुलमान लोकांनीं ती आपल्याबरोबर यूरोपांत नेली. तसेंच इटलींतील पिस्सा ह्या शहरच्या लियोनार्डो ह्यानें ही पद्धति ( व हिंदु बीजगणित ) आरब लोकांपासून शिकून इ. स. १२०२ मध्यें युरोपांत प्रथम प्रसिद्ध केली. ( गोखले यांचें इंग्रजी अंकगणित पा. ७).

संख्या,कल्पना व चिन्हें (संख्येचा तात्त्विक विचार):—कांहीं तरी एक समानधर्म असलेल्या वस्तूंचा गट आहे अशी कल्पना केल्यास त्या गटांतील वस्तूंचा ( किंवा निरनिराळ्या नगांचा ) व्यक्तिशः व संघशः जो गटाशीं संबंध तीच संख्येची कल्पना होय. ह्यांत सर्व नग अविभाज्य किंवा बिंदुमात्र आहेत, अशी कल्पना बुडाशीं आहे. दुसऱ्या शब्दानें सांगावयाचें म्हणजे आपण येथें ती वस्तु एक व्यक्ति (व्यष्टि म्हटल्यास जास्त समर्पक होईल)आहे या पलीकडे दुसऱ्या कशाचाहि विचार करीत नाहीं. तिच्या रासायनिक किंवा पदार्थविज्ञानशास्त्रांतर्गत गुणधर्मांचा व आकारमानाचा वगैरे विचार सोडून द्यावयाचा व मग ह्या एका व्यक्तीचा त्याच जातीच्या इतर व्यक्ती किंवा व्यक्तिसंघ ह्यांच्याशीं विचार करतां करतां संख्येच्या कल्पनेचा प्रादुर्भाव होतो. एक वस्तु व एकाहून भिन्न असें इतर जग अशी कल्पना आहे तेथपर्यंत ही कल्पना अस्पष्ट असते. संख्येचा व गणिताचा विचार नसतो. पण ही एक वस्तु व एतद्भिन्न राहिलेलें वस्तुजात, ह्या दुसऱ्यांतून त्या वस्तूशीं सजातीय एक किंवा अनेक व्यक्ती ह्यांचा विचार करूं लागले म्हणजे संख्या ही कल्पना मनांत येते. उदाहणार्थ २ बायका पाहिल्या म्ह. ह्या दोन बायका ( इतर वस्तूंहून ) भिन्न अशी कल्पना झाली. आतां २ बायका व १ पुरुष पाहिल्यास त्या३व्यक्तींत स्त्रीत्व किंवा पुरुषत्व समान नाहीं पण मनुष्यत्व हा तिघांचाहि समानधर्म झाला म्हणून त्यांनां आपण ३ माणसे म्हणूं.

आतां २ बायका १पुरुष व१ गाय अशा ४ व्यक्ती घेतल्या तर त्यांमध्यें प्राणित्व समान आहे म्हणून आपण हे ४ प्राणी झाले असें म्हणूं. वस्तूंचे गट व नग यांच्यासंबंधाचा विचार करितां संख्येची कल्पना आली. आतां हे गट अनेक नगांचे ( किंवा वस्तूंचें ) असूं शकतील. त्यांनां नांवें त्या गटांत १, २, ३, अशा जितक्या वस्तू असतील तेंच मिळालें. पांच वस्तूंचा गट म्हणजे ५ असें झालें. परंतु आपण वस्तू मोजतांना पहिलीला एक, दुसरीकडे बोट करून दोन, तिसऱ्या वस्तूला स्पर्श करून तीन असें मोजीत जातों. तेव्हां २ हें नांव दोन वस्तूंच्या गटाला देत नसून त्यांतील दुसऱ्या म्हणून मानलेल्या वस्तूला देतों. म्हणजे १, २, ३ व ४ हा एक क्रम आपण ठरवितों; व यांचा मूळच अर्थ पहिली, दुसरी, तिसरी असा क्रमवाचक असतो. व मागाहून तीच संख्या तितक्या वस्तूंचा गट दर्शविते. उदा. एका गटांत तीन वस्तू असल्या तर आपण पहिली घेऊन एक मोजतों, दुसरी घेऊन ' दोन ' म्हणतों व तिसरी घेऊन ' तीन ' ( तिसरी असा आपल्या म्हणण्याचा अभिप्राय असतो ) म्हणतों व मग त्या गटालाच ' तीन ' ही संज्ञा मिळते. ज्याप्रमाणें भूमितींत अ———ब या रेषेला बिंदूच्या नांवावरून ' अब ' ही संज्ञा मिळते, तसेंच अंकगणितांत एखाद्या गटांतील शेवटच्या वस्तूच्या ( ५ वी अशा तऱ्हेच्या) नांवावरून त्या गटाला५ असें नांव मिळालें. यांत दुसरी एक कल्पना गर्भित असते ती ही कीं, या तीन वस्तू सजातीय बिंदुरूप अर्थात् सर्व बाबतींत समान मानल्या गेल्यानें वाटेल त्या क्रमानें घेतां येतात. जसें:—

पहिला क्रमः— पहिली दुसरी तिसरी
० ० ०
दुसरा क्रमः— तिसरी पहिली दुसरी

यावरून एखाद्या गटांतील वस्तु किंवा नग ( कोणताहि नग न सोडतां व कोणताहि नग एकदांच घेऊन ) कोणत्याहि क्रमानें घेऊन त्याला ठरलेली क्रमिक १, २, ३, ४ इत्यादि नांवें दिलीं असतां शेवटच्या वस्तूचें जें नांव येतें तितक्या वस्तु त्या गटांत असतात. ही मूर्त संख्यांची कल्पना प्रथम आल्यावर मग अमूर्त किंवा शुद्ध संख्यांची कल्पना येते. त्यांत सजातीयत्वाचा प्रश्नच येत नाहीं. कारण अमूर्तत्व हा त्यांच्यांत समानधर्म असतो. एका विशिष्ट बाबतींत समान असलेल्या वस्तूंचीच बेरीज किंवा वजाबाकी करतां येते.एका अर्थी संख्येच्या कल्पनेंत बेरीज,वजाबाकीची कल्पना अंतर्भूत झालेली आहे. कारण एका गटांत ५० वस्तू असल्या तर ५० ही संख्या न मोजतां कळणार नाहीं हें उघड आहे. ह्याप्रमाणें बेरजेची कल्पना जरी संख्याकल्पनेंतच आहे, तरी भानगडीच्या संख्या सुलभ रीतीनें एकत्रित करण्याची जी रीत तिला आपण ' बेरीज ' म्हणतों. तसेंच ५+७ याचा अर्थ १ ते ५ अंक मोजले व ५ या आंकड्यावरून पुनः १ कडे उडी मारून आपण जातों व१ ते ७ अंक मोजतों तर ५ मोजल्यानंतर १ कडे परत न जातां जर तसेंच पुढें ७ मोजीत गेलें तर १ पासून कोठपर्यंत मोजल्यासारखें होईल ? उ.१२ मोजल्यासारखें होईल.

| | |
|---|---|
| पहिली रक्कम | १, २, ३, ४, ५. |
| दुसरी „ | १, २, ३, ४, ५, ६, ७. |
| पांचापुढील अंक | ६, ७, ८, ९, १०, ११, १२. |

वर सांगितलेल्या गटाच्या कल्पनेचा दृश्य स्वरूपांत विस्तार केलेला वर दिसून येतो. बऱ्याचशा वस्तू न्यावयाच्या असतांना त्या सुट्या असेतोंपर्यंत न्यावयास कठिण पडतात पण त्यांची गठडी बांधल्यास त्या वस्तू सहज नेतां येतात. ती गठडी उचलली असतां प्रत्येक वस्तू निरनिराळी वर उचलल्याचें श्रेय येतें. तसेंच अनेक संख्यांवर करावयाचें कार्य त्या संख्या कंसांत घातल्यास एकदम व सुलभ रीतीनें करतां येतें. जसें:— २ ( ३+४−५ ) = ४ या संख्येंत २ नें ३ व ४ यांच्या बेरजेस गुणून त्यांतून ५ची दुप्पट वजा करण्याचें काम सुलभ रीतीनें झालें आहे.

कंस अनेक असतां ते आंतून बाहेर सोडवीत येण्याची वहिवाट आहे. पण बाहेरून आंतहि सोडवीत जाता येईल.

३ [ २−३ ( ३− ४ ( ५+६ ) + ५ )−७ ]
= ६−९ ( ३−४ ( ५ + $\frac{१३}{२}$ ) + ५ )−२१
= − १५−२७+३६ ( ५+$\frac{१३}{२}$ )−४५
= − ८७ + १८० + २३४ = ३२७

वर सांगितलेंच आहे कीं गटांतील नगांची संख्या काढतांना नग वाटेल त्या क्रमानें घेतले तरी चालतात. त्याचप्रमाणें बेरजेंतल्या रकमा किंवा ( संख्येच्या कल्पनेंत गुणाकाराचाहि थोडासा अंतर्भाव होतो. उदाहरणार्थ ५ म्ह. १ ची पांचपट. ) गुणाकारांतल्या रकमा कोणत्याहि क्रमानें घेतल्या तरी बेरीज व गुणाकार एकच येतात.

उदा० २×३×५ = ३० = २×५×३ = ३×५× २

ह्यालाच ' क्रमराहित्य नियम ' (कॉम्युटेटिव्ह लॉ) म्हणतात. कंस सोडवितांना ज्या नियमाचा आपण उपयोग करतों त्यास ' विभाजन नियम ' ( डिस्ट्रिब्यूटिव्ह लॉ ) म्हणतात. एका गटांतील नगांचे वाटेल तसे पोटगट केले तरी त्यांची संख्या बदलत नाहीं. किंवा एखाद्या पदावलींत वाटेल तेथें कंस घालितां येतात.

उदा. ( अ + ब )−क = अ + ( ब−क )

ह्याला साहचर्य नियम म्हणतात व अ$^{५}$ × अ$^{३}$ = अ$^{८}$ म्हणजे 'अ'च्या पांचव्या घातास त्याच्याच तिसऱ्या घातानें गुणिल्यास ' अ ' चा ८ वा घात येतो. ह्याला ' घातनियम ' ( इंडेक्स लॉ ) म्हणतात. ह्या चार नियमांवर सर्व गणितशास्त्राची उभारणी झाली आहे.

**संख्यावाचक शब्दः**—एकपासून दहापर्यंतचीं संख्यांचीं नांवें स्वतंत्र रीतीनें आलेलीं दिसतात. ' पंच ' ह्या शब्दाचा मूळचा अर्थ ' पसरलेला ' असा आहे. कदाचित् पसरलेला

हात ( पंजा हा शब्द पंच ह्याचें अपभ्रष्ट रूप असावें) अर्थात् ५ बोटें ह्यावरून पूर्वी ५ ह्या संख्येचा बोध होत असे असें दिसतें. दहाच्या पुढच्या संख्यांचीं नांवें दशकपद्धतीप्रमाणें दोन किंवा अधिक स्थानवाचक आंकड्यांच्या नांवावरून बनविलीं आहेत उदा. 'ए' चा 'अ' 'दश' ह्याचा 'रः' कि 'रा' 'व' चा 'ब' अशीं रूपांतरें झालीं आहेत. इंग्रजींत ( थर्टिन् यांत 'टेनचें' टिन् झालें आहे. ) अकरा हा 'एकादश' ह्याचा अपभ्रंश. बारा हा 'द्वादश' ह्याचा अपभ्रंश होय. असेंच तेरा वगैरेंनां समजावें.

'शंभर' हा शब्द शतं ह्या शब्दाचा अपभ्रंश खास नव्हे. कदाचित् 'शं' म्हणजे कल्याण ( बिभर्ति म्ह. धारण करतो ) व 'भर' म्ह. देणारा अर्थात् कल्याणप्रद असा अर्थ असेल. 'शतक्रतु' इत्यादि शब्दांत ध्वनित होणारें विशेष महत्त्व 'शंभर' ह्या संख्येस होतें. त्या काळचा हा एक अवशेष असावा. परंतु हा शब्द मूळ संस्कृतांत कोठेंहि आढळत नाहीं हें कोडें उकलण्यास फार कठिण आहे. हजार हा शब्द 'सहस्र' शब्दांतील ऊष्मवर्ण 'स' ह्याचें विसर्गींत रूपांतर होऊन 'ह'वर जोर दिल्यानें त्या विसर्गसदृश 'स'चा मुळींच लोप झाला व 'हस्र' हें जें शेष त्याची 'हज्र', 'हज्जर', 'हजार', अशीं रूपांतरें झालीं असावींत. हीं रूपांतरें इराणी किंवा पर्शियन भाषेंत होऊन नंतर 'हजार' हा शब्द आपल्याकडे आला असें दिसतें. 'लक्ष'पासुन 'परार्ध' पर्यंत शब्द आपलेच ( संस्कृतांतुन घेतलेले ) आहेत. परार्ध म्ह. दुसरें अर्ध हा शब्द ब्रह्मदेवाच्या आयुष्यांतील निम्म्या भागांतील दिवसांची संख्या ह्या अर्थी मूळ योजिला जात असावा व मागाहून तो संख्यावाचक बनला असें वाटतें. महाभारतांत व इतर कांहीं ग्रंथांतुन संख्यास्थानें एकं, दहं, ते परार्धपर्यंत केवळ १८ च नसून बरीच अधिक म्ह. कांहीं ठिकाणीं २०० पर्यंत स्थानांचीं नांवें दिलेलीं आहेत.

दहापुढील संख्यांचीं नांवें आधीं एकं स्थानचा अंक, मग दहंस्थानचा अंक अशा क्रमानें शब्द घेऊन त्या संख्यांचीं नांवें बनविलीं आहेत. उदा. त्रेपन्न ह्यांतील तीन वाचक शब्द 'त्रे' हा आधीं व मग पन्नासचा वाचक 'पन्न'. शंभरपासुन पुढें मात्र ह्याच्या उलट क्रम आढळतो. जसें 'दोनशें त्रेसष्ट' ह्यांत आधीं दोनशें ही शतवाचक संख्या व मग त्रेसष्ट आले आहेत. येवढ्यावरून १०० च्या पुढच्या संख्यांत दिसून येणारी संख्यावाचनाची ही पद्धत परक्यांकडून आपण घेतली असें म्हणतां येणार नाहीं. 'अंकानां वामतो गतिः' हें सूत्र सामान्यतः खरें असलें तरी तें शंभराच्या पुढच्या संख्यांचीं नांवें बनवितांना बरेंच गैरसोयीचें आहे. 'पंचशतं' ह्याचा अर्थ ५०० किंवा १०५ असाहि होऊं शकेल. ही अडचण दूर करण्याकरितां 'अधिक' व 'उत्तर' हे शब्द योजूं लागले. 'पंचाधिकं शतं' म्ह. पांचांनीं अधिक इतके शंभर = 'पंचोत्तरं शतं' हे शब्दप्रयोग किती बोजड व गैरसोयीचे आहेत हें संस्कृत गणितग्रंथ वाचणारास सांगणें नकोच. ह्यापेक्षां हल्लींची पद्धत फारच चांगली आहे. पण ही केव्हांपासून भरतखंडांत रूढ झाली हें नक्की सांगतां येत नाहीं. इतकें म्हणतां येईल कीं, आपल्या पूर्वजांपैकीं कांहींनां हिची उपयुक्तता पटली होती. ह्यांपैकीं दुसरा आर्यभट (९ वें शतक) ह्यानें ह्याच पद्धतीचा [भास्कराचार्यांच्या(११ वें शतक ) लीलावतींत गणितपाश 'प्रकरणांतील ३ रें उदाहरण सोडवितांना २४ निखर्व, ६३ पद्म, ९९ कोटी. ९९ लक्ष,७५ हजार ३ शें ६० अशी संख्या शब्दांत ह्याच क्रमानें दिली आहे] आपल्या पुस्तकांत सर्रास उपयोग केलेला आहे. त्यानें आपलें नांव गुप्त ठेऊन पहिल्या आर्यभटाच्या नांवावर आपला ग्रंथ विकण्याचा जो प्रयत्न केलेला दिसतो त्याचें एक कारण ही नवीन पद्धत ( म्ह संख्या डावीकडून उजवीकडे वाचीत जाणें ) आर्यभटाच्या नांवाखालीं सुरू करण्याची त्याची इच्छा असावी. 'पाढे' म्हणतांना संस्कृतमधील संख्यावाचक साधे व सामासिक शब्द अपभ्रष्ट रूपानें कसे येतात त्याचें थोडेसें दिग्दर्शन करूं. जसें.–एके दुकें ( दोन ) = द्विरेकं किंवा द्विकं म्ह. 'दोन वेळां एक' किंवा 'जोडी'. ह्यांत द्विरेकं ह्यांतील 'व'चा 'उ' होऊन दुकें असें रूप झालें आहे. तिरके = त्रिकं, चौके = चतुष्कं. बे(दुणें चार) = द्वे,यांत 'व' चा 'ब' झाला व 'द'चा लोप झाला आहे. 'दुणें' ह्याचा अर्थ 'द्विकं' सारखाच आहे व 'दोन' ह्या शब्दाशीं त्याचें साम्य दिसतें. अकरंदाहीं दाहोदरशें = दशोत्तरंशत. 'श' चा 'ह' झाला आहे व शेवटच्या 'शतं' चें 'शें' असें रूप नेहमींच होतें. ह्याचप्रमाणें 'चवरोदरशें' 'सतरोदरशें' इत्यादींचें समजावें.

बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकारः—ह्या चार प्रक्रियांचा थोडा सूक्ष्म विचार करूं. अब :( २ इंच ) व बक ( ३ इंच ) ह्या दोन रेषांची लांबी काढावयाची झाल्यास त्या रेषा एकरेषिक होतील अशा एकमेकां पुढें जोडून ठेवाव्या लागतात

—> —>
अ २इं. ब ३इं. क

व बक मधून अक वजा करावयाचा असल्यास क पासून अ पर्यंत उलटी करून अक ही रेषा ठेवावी लागते.

—>
ब अ <— क

पहिल्या आकृतींत अ क ही दोहोंची बेरीज दाखविलेली आहे. दुसरींत ब अ ही वजाबाकी दाखविली आहे. बेरीज व वजाबाकी ह्यांतील रकमा सजातीय परिमेयें दाखवितात व हें सजातीयत्व म्हणजेच एकरेषिकत्व होय. गुणाकारांत दोन्हीं परिमेयें ( म्ह. गुण्य व गुणक ) हीं भिन्नजातीचीं असतात. उदा० एका पैशाला ५ केळीं तर ४ पैशाचीं केळीं किती ? येथें ५ केळीं × ४ पैसे = २० केळीं. येथें दर पैशाला ५ केळीं तर ४ पैशांनां किती ? म्हणजे 'दरा'चा संबंध येतो व ४ ही निव्वळ पट आहे. क्षेत्रफळ काढितांना आपण इंचांनीं इंचांनां गुणतों असें प्रथमदर्शनीं वाटतें. पण १५ इंच हे खरे इंच होत ( किंमत ५

ड  १५ इं.  प
५ इं.
ब  क

इंच हें मूळ धरिल्यास १५ ही ओळींची संख्या झाली (व ५ ही उभ्या ओळींची संख्या. तेव्हां गुणाकार म्हणजे डबकप ह्याचें क्षेत्रफळ होय. व बक, बड ह्या दोन परिमेयदर्शक ( गुण्य व गुणक ) रेषा एकमेकीवर लंब असल्या म्हणजे त्यांचा गुणाकार होतो. परंतु गुण्य व गुणक हे अगदीं विसदृश किंवा विजातीय परिमेयें असतात. अर्थात् विजातीय परिमेयें दोन लंब रेषांनीं दाखविणें सोयीचें आहे. भागाकारामधील दोन्हीं परिमेयें विसदृश असतील किंवा नसतील. $\frac{\text{२४ आंबे}}{\text{६ आंबे}}$ ह्याचा अर्थ २४ आंबे, ही ६ आंब्यांची कितवी पट होईल ? तसेंच $\frac{\text{२४ आंबे}}{\text{६}}$ ह्याचा अर्थ २४ आंबे ह्याचे ६ समान भाग केल्यास प्रत्येक भागांत किती आंबे येतील. ह्यावरून $\frac{\text{२४ रु.}}{\text{३ रु.}} = \text{८}$ ही निव्वळ संख्या आहे. तसेंच $\frac{\text{३ रु.}}{\text{२ आणे}} = \frac{\text{३ रु.}}{(\text{१}\div\text{८})\text{रु.}} = \frac{\text{३}}{\text{१}} \times \frac{\text{८}}{\text{१}}$ =२४हीहि निव्वळ संख्या आली. अर्थात् ३ रु. हे २ आणे ह्याच्या २४ पट आहेत

बे रीज व जा बा की चा न वी न दृ ष्टी नें वि चा र.— दोन रेषांची बेरीज किंवा वजाबाकी होण्यास दोन्ही रेषा एकमेकाशीं जुळून ठेवाव्या लागतात हें वर आलेंच आहे. परंतु त्या भिन्नदिशेनें जात असल्यास त्यांची बेरीज कशी करावयाची ? या दोन्ही एकरेषिक असल्या तर ' अ ' पासून बपर्यंत जाऊन पुढें ' ब 'पासून ' क 'पर्यंत गेल्यास एकंदर ' अ ' पासून ' क 'पर्यंत गेल्यासारखें होईल. अर्थात् अ क ही बेरीज झाली. तसेंच येथेंहि केल्यास अ ब अंतर जाऊन मग ब क अंतर चालून गेल्यास एक मनुष्य ' अ 'पासून निघून ' ब 'पाशीं मुक्काम करून ' क ' ह्या स्थानापर्यंत गेला असें होईल. अर्थात् ' ब ' येथें मुक्काम न करतां जर तो मनुष्य तडक ' अ ' पासून ' क 'पर्यंत सरळ गेला तरी परिणाम तोच. म्हणून अब व बक ह्यांस विशिष्ट ( ह्यांत अब, बक ह्या रेषांच्या लांबींचाच विचार केला नसून त्यांच्या दिशांचाहि विचार केला आहे. म्हणून त्यांस दिक्परिमेय असें म्हटलें आहे. ) दिग्वाचक परिमेयें म्हटल्यास त्यांची बेरीज अक हें दिग्वाचक परिमेय झालें. त्याचप्रमाणें अक ह्या दिक्परिमेयातून अब हे दि. प. वजा केलें तर बक हें दि. प. शिल्लक राहतें. हेंच चतुष्टयोपपत्ति म्हणून जें प्रकरण पुढें येणार आहे त्यांतील एक तत्त्व होय. बेरीज हें एका अर्थी संवर्धन किंवा महत्करण ( संचयन म्हणजे एकाच तऱ्हेच्या परिमेयाची वाढ करणें ) होय. बेरजेनें परिमेयाच्या स्वरूपांत कांहीं फरक होत नाहीं. गुणाकारानें मात्र परिमेयाच्या स्वरूपांत फरक होतो ( त्यावर कांहीं तरी परिणाम घडतो ).

दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे ' य ' हें कांहीं एक कार्य ' अ, ब, क, ...इ० ' कारणांनीं घडून येत असेल व तेंच कार्य ' क्ष ' ह्या एकाच कारणानें घडून येत असल्यास ' क्ष ' ही ' अ, ब, क ' इ० ची बेरीज म्हणतां येईल तसेंच ' क्ष ' कारणापासून ' य ' हें कार्य घडून आलें. आतां ' य ' हेंच ' क्ष ' सारखें एक कारण समजलें तर जें ' र ' हें कार्य घडून येईल तें क्ष व य ह्यांच्या गुणकारासारखें झालें.

उदाः—१ पासून ५ मोजले व पुन्हा १ पासून ६ मोजले तर जे श्रम ( किंवा जो वेळ ) लागतात, तेच १ पासून ११ पर्यंत मोजावयास लागतात. म्हणून ५ + ६ = ११.

उदाः— १ ची ५ पट घेतली म्हणजे ५ ही संख्या आली. तीच पुनः एकं कल्पिली व तसे ६ एकं मोजले तर १ पासून ३० अंक त्यांत येतील. येथें मूळकारण १ ही संख्या तिच्यावर ( पांच ) पट घेण्याचें कार्य केलें तर कार्य ५ ही संख्या झाली. आतां ५ ही संख्या एकं धरली म्हणजे ती ' कारण ' म्हणून कल्पून तिच्यावर ( सहा ) पट घेण्याचें कार्य केलें. म्हणून ५ × ६ = ३०.

बेरीज, गुणाकार, घातवृद्धि (इनव्होल्यूशन)ह्या मूळ किंवा अनुलोमक्रिया होत. वजाबाकी, भागाकार, वर्गमूळ, घनमूळ, वगैरे विलोम अतएव जास्त भानगडीच्या प्रक्रिया आहेत.

का र्य क्षे त्र.—मागें सांगितलेंच आहे कीं अंकगणित याला पूर्वी पाटीगणित असें नांव असे. पाटीवर अर्थात लांकडाच्या फळीवर अंकगणिताचे हिशेब करीत असत. यावरून हें नांव त्यास मिळालें असावें. गणितशास्त्राचा आरंभ सर्वांत सोप्या अशा अंकगणितानें अशा तऱ्हेच्या पाटीवर करीत असावेत. या पाटीगणितामध्यें खालीलप्रमाणें विभाग आहेत. ते भास्करार्यांच्या पद्धतीप्रमाणें देत आहोंत.

( १ ) परिभाषा अथवा कोष्टकें ( विविध परिमाणें );

( २ )परिकर्माष्टक अथवा आठ तऱ्हेचीं बेरीज, वजाबाकी; गुणाकार, भागाकार, वर्ग, घन, वर्गमूळ, घनमूळ इत्यादि कर्में व याच्या पोटांत पूर्णांकपरिकर्माष्टक, भिन्न किंवा अपूर्णांक परिकर्माष्टक व शून्य परिकर्माष्टक असे तीन पोटविभाग येतात.

( ३ ) व्यस्तविधि, इष्टकर्म, विषमकर्म, वर्गकर्म, गुणकर्म त्रैराशिक–सम व व्यस्त व बहुराशिक इत्यादि ज्यांत आहेत असें एक संकीर्ण प्रकरण.

( ४ ) मिश्रकव्यवहार म्ह. व्याज, हौद नळया, क्रयविक्रय, रत्नमिश्र, वर्णज्ञान (सोन्याचा कस) छंदश्चिति, शिल्प इ.

( ५ ) श्रेढीव्यवहार, यांत गणितश्रेढी व भूमितिश्रेढी हीं येतात.

( ६ ) क्षेत्रव्यवहार, यांत महत्त्वमापन ( क्षेत्रफळ ) खातव्यवहार( खळगे खणण्यासंबंधीं-अर्थात घनफळ), चितिव्यवहार ( विटा रचणें ), क्रकचव्यवहार ( करवतकाम ), राशिव्यवहार ( धान्याच्या राशीच्या आकारावरून धान्याचें माप काढणें ), छायाव्यवहार ( दिव्याची उंची व छाया यांचा संबंध काढणें ) हीं येतात.

(७) कुट्टक म्ह. अतिशय व्यापक स्वरूपाचा दृढभाजक.

( ८ ) गणितपाश म्हणजे यावच्छक्यभेद संख्या सांगणें (परम्युटेशन अँड कॉंबिनेशन ).

अंकगणितांत हल्लीं ज्या ज्या प्रकरणांचा समावेश होतो तीं सर्व बहुतेक यांत आलीं आहेत. दशांश, कटमिती, विनिमय, ठेव वगैरे भाग वर दिलेल्या प्रकरणांत आलेले नाहींत. तसेंच श्रेढी ( प्रोग्रेशन ), कुट्टक ( इंडिटर्मिनेट इक्वेशन्स ) व गणितपाश हे भाग हल्लीं बीजगणितांत देतात; अंकगणितांत देत नाहींत. पूर्वी आचार्यांनीं यांची उपपत्ति बीजगणितांत देऊन त्यावरून येणारीं सूत्रें ( किंवा नियम ) गृहीत धरून संख्यागणना कशी करावी हेंच पाटीगणितांत सांगितलें आहे.

का र्य प्र का श क चिन्हें:–( ह्यासंबंधीं ज्ञा. को. प्र. खं. वि. ५ प्र. १३ पहा ) हल्लींची अधिक, उणें वगैरेंचीं चिन्हें भरतखंडामध्यें पूर्वकालीं प्रचारांत नव्हतीं. संख्या निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या क्रमानें मांडणें यापलीकडे कांहीं योजना नव्हती. कांहीं वर्णात्मक चिन्हें विशिष्ट ग्रंथकारांनीं व्यक्तिशः योजलेलीं आढळतात. परंतु तीं सर्वत्र प्रचारांत नव्हतीं. उदाहरणार्थ इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या सुमारास लिहिलेलें एक संस्कृत पुस्तक उपलब्ध झालें आहे. त्यांत युति म्हणजे बेरीज या शब्दांतील आद्याक्षर 'यु' हें + चिन्हाच्या ऐवजीं योजलें आहे तसेंच + हें चिन्ह वजाबाकीचें चिन्ह म्हणूनहि योजलें आहे. व फल म्हणजे उत्तर यांतील आद्याक्षर 'फ' हें समत्वचिन्ह ( हल्लीं हें चिन्ह = असें लिहितात ) म्हणून योजलें आहे. व्यवहारी अपूर्णांक हल्लीं प्रमाणेंच लिहीत. परंतु इतर ग्रंथकारांनीं यांचा उपयोग केलेला आढळत नाहीं. हल्लीं प्रचारांत असलेलीं चिन्हें मूळ यूरोपांत निघालेलीं आहेत. +,—हीं चिन्हें कांहीं शब्दांच्या आद्याक्षरांचीं भ्रष्ट रूपें होत असें कांहींचें म्हणणें आहे. इतर चिन्हें लाक्षणिक अर्थानें योजलेलीं आहेत. +—हीं चिन्हें नरेंबर्ग (जर्मनी) येथील मायकेल स्टायफेल ह्यानें १५४४ त प्रचारांत आणलीं. × हें चिन्ह विल्यम औटरेड ह्यानें १६८१ मध्यें शोधून काढिलें. ÷ हें चिन्ह जॉन पेल्ल ह्या इंग्रजानें १७ व्या शतकांत प्रथम योजिलें. = हें रॉबर्ट रेकॉर्डस( १५५७ ) यानें व कंस ( ) चिन्ह एका डच गृहस्थानें शोधून काढलें.

प रि क र्मा ष्ट क.—यांत आठ कृत्यांचा समावेश होतो. तीं आठ कृत्यें म्हणजे बेरीज वगैरे वर सांगितलींच आहेत. बेरीज, वजाबाकी यांऐवजीं पूर्वकालीं ' संकलन ' व व्यवकलन ' हे शब्द योजीत. यांतील पहिलीं तीन ( त्याबरोबरच वर्ग व घन हीं दोन) यूरोपियन लोकांनां प्राचीन काळापासून माहीत होतीं. परंतु भागाकार ह्या इसवी सन ११ व्या शतकापर्यंतहि गणितज्ञानाचें माहेरघर जो इंग्लंड देश तेथेंहि कोणास येत नव्हता. एका पाद्रीसाहेबानें इ. स. १००३ मध्यें अबकसच्या साहाय्यानें भागाकार केला होता. यानें ४०८७ याला ६ नीं भागून दाखविलें आहे.

हल्लीं तें उदाहरण एखादा मराठी चौथींतला मुलगा सुद्धां तोंडानें करूं शकेल. पण त्या साहेबाचा हा भागाकार त्याच्या पुस्तकाच्या एक पानभर झाला आहे. हे साहेब प्रत्येक खेपेस ६ च्या ऐवजीं १० नें भागतात व जास्त संख्येनें भागल्याबद्दल पुढें दोन तीन ओळींत वजा करतात. कॅजोरी यानें आपल्या गणिताच्या इतिहासांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, " डायोफँटस व इतर प्राचीन गणिती वगैरे ( अर्थात् यूरोपियन ) गणितशास्त्रावर लेख लिहिणाऱ्यांनां भागाकाराची मुळींच कल्पना नव्हती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अर्थात जर भागाकारच येत नव्हता तर वर्गमूळ, घनमूळें यांसारखीं अवघड विलोमकृत्यें करण्याची रीती त्यांनां माहीत असण्याची गोष्टच बोलावयास नको व बेरीज, वजाबाकी व गुणाकार हीं तीन तरी आपल्या पूर्वजांनां जशीं येत होतीं तशा सफाईनें व सुटसुटीत रीतीनें त्यांना करितां येत होती कीं नाहीं याची शंकाच आहे.

हा त चे कां ध र ता त.—या प्रश्नाचें उत्तर देणें फार कठिण नाही. सामान्यतः असें म्हणतां येईल कीं प्रत्येक कृत्यांत येणारा आंकडा ज्या स्थानचा असेल त्याच स्थानच्या आकड्यांत मिळविला किंवा वजा केला जावा हा हातचे धरण्याचा उद्देश आहे. उदाहरणार्थः— १७५६ + ९८७ ही बेरीज पुढें लिहिल्याप्रमाणें करता येईल.

```
 १७५६
  ९८७
 ─────
   १३ =    ६   +७
  १३० =   ८०   +५०
 १६०० =  ९००  +७००
 १००० = १०००
 ─────
 २७४३
```

हा क्रम नीचस्थाना-( म्ह. एकं ) पासून उच्च ( म्ह. सहस्र ) स्थानापर्यंत असा आहे. परंतु उलट क्रमानेंहि आंकडे घेऊन बेरीज करतां येईल.

वजाबाकीचें उदाहरण, १७५६–९८७ = ७६९. वजाबाकींत थोडी भानगड असते. वरील वजाबाकींत ६ तून ७ वजा जात नाहींत. म्हणून आपण ६ च्या ऐवजीं १६ कल्पून मग त्यांतून ७ वजा करतों; अर्थात् आपण १७५६ मध्यें १० मिळविल्यासारखें झालें. म्हणून या दोन संख्येंतील फरक कायम ठेवण्याकरितां दुसऱ्याहि संख्येंत १० मिळविले पाहिजेत हें उघड आहे. ह्मणून आपण ९८७ मध्यें १० मिळवितों. याचप्रमाणें पुढेंहि समजावें.

```
 १७५० + १६      १७०० + १५०
 -९९० -  ७     - १००० -  ९०
 ---------     -----------
 ७६० + ९        ७०० + ६०
```

गुणाकारालाहि हेंच स्पष्टीकरण लागू आहे व गुणनक्रियेला उजवीकडून आरंभ न करतां वाटेल त्या आंकड्यापासून व वाटेल त्या बाजूनें गुणाकार करतां येईल. उदा०:—

| | |
|---|---|
| ३८७ | या उदाहरणांत प्रथम ५ नें, मग ६ नें व |
| × ३५६ | मग ३ नें गुणलें आहे. ५ हे दहस्थानचे |
| ——— | असल्यामुळें त्यानें गुणणें म्हणजे ५० नीं |
| १९३५० | गुणणें होय. हेंच स्पष्टीकरण सर्वत्र |
| २३२२ | लागू पडेल. ३८७ × ६ = २३२२ ह्यांत |
| ११६१०० | ६ नीं प्रथम ७ ला मग ८ ला व मग |
| ——— | ३ ला असें क्रमानें सामान्यतः आपण |
| १३७७७२ | गुणितों. पण हा क्रम उलटहि करतां येईल. |

किंवा आरंभ गुण्यांतील वाटेल त्या आंकड्यापासून करतां येईल.

```
उदाहरणः-३८७ × ६ = १८००   अथवा   ४८०
                   ४८०          १८००
                    ४२            ४२
                  ————          ————
                  २३२२          २३२२
```

वेरीज, वजाबाकी गुणाकार हीं तिन्ही एकदम करतां येतात त्याचें एक उदाहरण घेऊं.

६१२३ −[ ३५७ × ५ + ४६२ ] = ३८७६.

स्पष्टीकरणः—गुणाकार, बेरीज व वजाबाकी या क्रमानें चाललें असतां निरनिराळे क्रियाविभागाचे खालीलप्रमाणें स्पष्टीकरण होईल.

क्रियाविभाग पहिलाः— ३५७ मधील ७ ला ५ नीं गुणून त्यांत ४६२ यांतील २ मिळविले म्हणजे ३७ येतात. हे ६१२३ यांतील ३ यांतून उणे जात नाहीत, म्हणून ३ च्या ऐवजीं ४३ कल्पून ४३ तून ३७ उणें केले म्हणजे ६ उरतील; व हातचे ४ धरावे लागतील; कारण आपण ३ च्या ऐवजीं ४३ कल्पिले आहेत.

क्रियाविभाग २ रा.—३५७ तील ५ ला ५ नीं गुणले असतां २५ येतात. त्यांत ४६२ तील ६ मिळवून ३१ येतात व हातचे ४ धरून ३५ येतात. हे ६१२३ पैकीं २ यांतून वजा जात नाहींत म्हणून २ च्या ऐवजीं ४२ कल्पना करून व हातचे ४ धरूनः—

(क्रियाविभाग ३) ५×३ = १५+४ = १९+४ = २३.

६१−२३ = ३८.

हीच क्रिया वरील तिसऱ्या विभागापासून आरंभ करून पहिल्यापर्यंत उलट क्रमानेंहि करतां येईल परंतु यापेक्षां तें थोडें भानगडीचें होईल.

$$\frac{६१२३-(३५७×५+४६२)}{७} = ५५३\frac{५}{७}$$

रीत पहिलीः—३×५ = १५+४ = १९

६१−१९ = ४२; ४२÷७−६

परंतु हे सहाचे ६ च घेतले तर पुढें वजाबाकी करतांना अडचण येईल म्हणून यांतील ५ च घेऊन पुढील ६१२३ यांतील २ च्या ऐवजीं ७२ कल्पणें.

रीत दुसरीः—५×५ = २५+६ = ३१; ७२−३१ = ४१, $\frac{४१}{७}$ = ५ व बाकी ६. पुढील ३ वर घेतलें असतां ६३ झाले.

रीत तिसरीः— ५×७ = ३५+२ = ३७

६३−३७ = २६; $\frac{२६}{७} = ३\frac{५}{७}$

एकदम गुणण्याची रीतः—

५३६×४५२ = २४२२७२

रीतः—२×६ = १२ मांडून १ हातचा धरणें.

| | | |
|---|---|---|
| ३×२ = ६<br>६×५ = ३० | } ३६+१ = ३७ | ७ मांडून ३ हातचे धरणें. |
| ५×२ = १०<br>३×५ = १५<br>६×४ = २४ | } ४९+३ = ५२ | २ मांडून ५ हातचे. |
| ५×५ = २५<br>३×४ = १२ | } ३७+५ = ४२ | २ मांडून हातचे ४. |

५×४ = २०×४ = २४

आणखी एक गुणाकाराची रीतः—

३९७×१८ = ३९७ (२०−२) = ७९४०−७९४ = ७१४६.

तसेंच ७५३×९७ = ७५३००−७५३×३ = ७३०४१.

७५३×२७१८९ = ७५३×९+७५३×१८०+७५३×२७०००

= ६७७७+१३५५४०+२०३३१००० = २०४७३३१७.

शेवटच्या गुणाकारांत ७५३ ला ९ नीं गुणावें व मग त्या गुणाकाराला २० नीं गुणिलें आहे व शेवटीं त्याच गुणाकारास (६७७७ यास) ३००० नीं गुणिलें आहे.

भागाकारः—$\frac{६७८२३}{८४}$ यांत ८४ चे अवयव ३,७,४ हे होत. तेव्हां ३ नीं भागून नंतर ७ नीं व मग ४ नीं भागावें म्हणजे उत्तर येईल.

```
३ )६७८२३
७ )२२६०७ बाकी २
४ )३२२९ बाकी ४
   ८०७ बाकी १.
```

खरी बाकीः—पहिली २ ही बाकी मूळ संख्येंतीलच उरलेली आहे; परंतु दुसरी ४ ही बाकी २२६०७ यांतील आहे. म्हणजे मूळ संख्येच्या $\frac{१}{३}$ तील होय. तेव्हां ही ४ बाकी मूळची १२ असली पाहिजे. तिसरी १ ही बाकी ३२२९ पैकीं आहे. म्हणजे मूळसंख्येच्या $\frac{१}{२१}$ तील. म्हणून ही मूळ २१

बाकी असली पाहिजे. म्हणजे एकंदरः—

खरी बाकी२१+१२+२ = ३५

भागाकार ८०७ व बाकी ३५

भागाकार म्हणजे तरी आसन्नक्रिये (म्हणजे अंदाजा-अंदाजानें उत्तर काढण्याचा प्रकार) चाच एक प्रकार आहे. उदाहरणार्थः—

```
८४)६७८२३(८००+७
   ६७२००
   -----
     ६२३
     ५८८
     ---
      ३५
```

यामध्यें प्रथमतः दिलेली संख्या ६७८२३ ही ८४ च्या ८०० पट आहे हें पहिलें आसन्नफल म्ह. अंदाज होय. नंतर बाकीवरून हा अंदाज ७ नीं वाढविला पाहिजे हें दिसून आलें. यूरोपांत भागाकार ११ व्या शतकापर्यंत माहीत नव्हता. तेथपर्यंत भागाकार वजाबाकीनें करीत असत. वरील आसन्नक्रियेचें तत्त्व ६७८२३ याला ९९ नीं भागावयाचें असल्यास लागू करतां येईल. ९९ हे जवळ जवळ १०० आहेत म्हणून पहिलें अंदाजी उत्तर ६७० परंतु १०० ची ६७० पट ही ९९ च्या ६७० पटीपेक्षां ६७० नीं अधिक आहे म्हणून ९९ च्या ऐवजीं १०० नीं भागलें तर आपण वजा करावयास पाहिजेत त्यापेक्षां ६७० जास्त वजा केले म्हणून ते मिळविले पाहिजेत. असेंच पुढच्या आंकड्या संबंधीं करीत गेल्यास भागाकार व बाकी बरोबर येईल व हीच रीत कोणत्याहि ९ ह्या आंकड्यानें बनलेल्या संख्येनें भागावयाचें असल्यास उपयोगी पडते. उदा० १५७५७९३ ह्यास९९९ ह्यांनीं भागूः—

| ९९९ | १५७५७९३ | | |
|---|---|---|---|
| | १५७६ | २६० | रीतः—भाजकांत जितके ९ असतील |
| | १ | ११ | (येथें ३) तितके |
| | १५७७ | ३७० | भाज्यांतील आंकडे |

(डाव्या हाताकडील) घेऊन (येथें १५७) ते त्याच्याच पुढील आंकड्यांच्या खालीं लिहावेत. (येथें डाव्याबाजूकडून) पहिले तीन अंक घेऊन ते ओळीनें त्यांच्या पुढच्या म्ह. ५, ७, ९, ह्यांच्या खालीं अनुक्रमें १, ५, ७, असे लिहिले आहेत. मग ह्या खालच्या व वरच्या आंकड्यांची बेरीज अनुक्रमें ५+१ = ६, ७+५ = १२, ९+७ = १६, हे १,५,७ ह्यांच्यापुढें उजव्या बाजूस लिहिले आहेत. मात्र १२ तील २ हे १५७६ ह्याच्यापुढें लिहून १ हा दशकाचा आंकडा ६ च्या खालीं लिहिला आहे. १६ ही ह्याच पद्धतीनें लिहिले आहेत व मग बेरीज करतां भाज्याच्या उजवीकडे जी उभी रेघ काढली आहे तिच्या डाव्या बाजूस भागाकार १५७७ हा येतो. आणि उजव्या बाजूस बाकी ३७० ही आली आहे. ही रीत गोखले यांच्या अंकगणितांत दिली आहे ती पाहावी. तींतच ५, १५, २५, ७५ ह्यांनीं झटदिशीं कसें गुणावें हें सांगितलें आहे.

वरील रीतीची उपपत्तिः—भाज्य = भाजक × भागाकार+बाकी ह्या समीकरणानें देतां येते. येथें ९९९ हा भाजक आहे म्हणूनः—

भा० = ९९९ × भागा० + बाकी = १००० भागा−भागा + बाकी.

$$\text{भा.} + \text{भागा.} = १००० \text{ भागा.} + \text{बा.}$$

$$\frac{\text{भा.} + \text{भागा.}}{१०००} = \text{भागा} + \frac{\text{बा.}}{१०००}$$

हजारानें भागून येणारा भागा. १५७ हा तेव्हांच लिहितां येतो. पुढें तो भाज्यांतलि आकड्यांत स्थानानुक्रमानें मिळवून पुढचे आंकडे काढितां येतात. ३३३ नीं भागावयाचें तर आधीं दिलेल्या संख्येस ३ नीं गुणावें व मग ९९९ नीं भागावें. ह्याचप्रमाणें १११ ह्यांनींहि भागतां येईल. ह्या रीतीचा खरा फायदा ९९९९९ अशा मोठ्या संख्येनें भागतांना फारच दिसून येतो. वरील उपपत्तीवरून १००१ ह्यांनीं भागण्याचीही रीत बसवितां येईल. मात्र बेरजेऐवजीं वजाबाकी करावी लागेल. १००१ ह्यांतील १००० ह्याला तीन शून्यें आहेत. म्हणून १, ५, ७ हे भाज्याचे तीन आंकडे अनुक्रमें ५, ७, ९ ह्यांच्या खालीं लिहिले.

| १००१ | १५७५७९३ | | |
|---|---|---|---|
| | १५७४ | २२९ | उत्तर |
| | | −१० | |
| | १५७४ | २१९ | |
| | भागाकार | बाकी | |

मग ५−१ = ४ ह्या उत्तरांतील ४ था आंकडा
७−५ = २ „ „ ५ वा „
९−७ = २ „ „ ६ „ „
(१) ३−४ = ९ „ ७ „ „
−१०९ मिळवून १० वजा केले आहेत.

तसेंच ९९८ ह्यानें व अशाच रीतीनें ९९७, ९९९६ वगैरे संख्यांनीं भागाकार करितां येईल. उदाः—पहिले ३ आंकडे वरील प्रमाणें लिहिल्यावर.

| ९९९ | १५७५७९३ | | |
|---|---|---|---|
| | १५७७ | ७३९ | |
| | १ | २१ | |
| भागाकार | १५७८ | ९४९ | बाकी |

यानंतर४ था आंकडा = ५ + १ × २ = ७
५ वा „ = ७ + ५ × २ = १७
६ वा „ = ९ + ७ × २ = २३

ह्याचप्रमाणें पुढेंहि करावें. येथें १,५,७ वगैरे अंकांची दुप्पट घ्यावी.

४९नीं भागावयाचें झाल्यास भाज्यास २नीं गुणावें व ९८ नीं भागावें. ७५ नीं भागणें म्हणजे ४ नी गुणून ३०० नीं भागणें होय.

| | | |
|---|---|---|
| ७५ | १५७५७ | ९३ |
| | ५२५२६४ | $६४\frac{१}{३}$ |
| भागा. | २१०१० | $५७\frac{१}{३}$ |

बाकी = ४३

१०० ह्यानीं १५७५७९३ ह्याला भागावयाचें म्हणजे उजवी कडे ३ ऱ्या आकड्यापाशीं एक रेघ ओढल्यास डावीकडे भागाकार व उजवीकडे बाकी असे वर दाखविल्याप्रमाणें भाग पडतात.

अर्थात १०० नीं भागून भागाकारांत त्याचाच $\frac{१}{४}$ मिळ वावा. ह्यांत $५७\frac{१}{३}$ ही खऱ्या बाकीच्या $\frac{३}{४}$ पट आहे. तेव्हां खरी बाकी ह्याच्या $\frac{३}{४}$ पट म्हणजे $\frac{१७२ \times ३}{३ \quad ४} = ४३$ येईल. अशा अनेक युक्त्या योजून भागाकाराचे श्रम कमी करतां येतील.

आपल्या पूर्वीच्या गणितांत(पूर्ण) परिकर्माष्टक (पूर्णांकांवर करावच्या बेरीज, वजाबाकी इ० क्रिया ), भिन्नपरिकर्माष्ट ( व्यावहारी अपूर्णांक ह्यास भिन्न म्हणतात ) व शून्यपरिकर्माष्टक असे भाग असतात हें वर आलेंच आहे. त्यांत शून्य हें कोणत्याहि संख्येंतून वजा केलें तर त्या संख्या बदलत नाहींत. शून्यानें एखाद्या संख्येस गुणिल्यास गुणाकार शून्य येतो हें प्रसिद्धच आहे व वर्ग व उच्चघातसमीकरणें सोडविण्याची रीत ह्या तत्वावरच बसविलेली आहे. $( ० )^२ = ०$ आणि $\sqrt{०} = ०$. परंतु शून्याला शून्यानें भागिलें तर भागाकार १ न येतां $\frac{०}{०}$ याचें उत्तर अनिश्चित असतें. शून्याखेरीज कोणत्याहि संख्येनें शून्याला भागिल्यास भागाकार शून्य येतो. जसें:- $\frac{०}{७} = ०$. यावरून शून्याला कोणत्याहि संख्येनें भाग जातो असें वाटतें. परंतु एका संख्येस दुसरीनें भाग जातो ह्याचा अर्थ भागाकार पूर्णांकीं पाहिजे. परंतु $\frac{०}{९}$, $\frac{०}{७}$, इ० हे अपूर्णांक आहेत कारण. ही सर्वांत लहान संख्या आहे. शून्याखेरीज कोणत्याहि संख्येस शून्यानें भागिलें असतां 'अंनंत' उत्तर येतें. हा राशि $\infty$ अशा चिन्हानें दर्शवितात. म्हणून $\frac{\text{( कोणतीहि संख्या )}}{०} = \infty$ ह्या राशीला भास्कराचार्य 'खहर' ( शून्य ज्याचा भाजक आहे असा ) असेंहि नांव देतात.

शून्य व अनंत ह्या दोन राशींसंबंधानें कांहीं माहिती खालीं देतों.

शून्य हें एका अर्थी पूर्णांकाच्या जातीचें आहे. शून्य हें १ ह्या विषम संख्येच्या पूर्वीची संख्या असल्यानें समसंख्या आहे. म्ह. २, ४, ६, ह्या समसंख्येच्या मालिकेंत त्याचा समावेश होतो. शून्य हें धन व ऋणसंख्या ह्यांच्या सीमेवर असल्यानें त्याला धनऋणत्व नाहीं. तें धन घन संख्याहि म्हणतां येत नाहीं व ऋणसंख्याहि म्हणतां येत नाहीं. कोणत्याहि संख्येचा शून्यावर घात एक असतो. उदा० $५^० = १$.

अनंतामध्यें कोणतीही संख्या मिळविली किंवा त्यातून कोणतीहि संख्या वजा केली तरी तें बदलत नाहीं. जसें:—

$\infty \times ५ = \infty$; $\infty - २१ = \infty$.

तसेंच एकाच प्रतीच्या दोन अनंतराशी घेतल्यास

$\frac{\infty - ३२}{\infty \times २५} = १$. $२७ \times \infty = \infty$;

म्ह. कोणत्याहि संख्येस ( सांत राशीस ) अनंतानें गुणल्यास गुणाकार अनंत येतो.

कोणत्याहि संख्येस अनंतानें भागल्यास भागाकार शून्य येतो.

$\frac{३७}{\infty} = ०$ तसेंच $\frac{\infty}{\text{कोणतीही संख्या}} = \infty$;

क्ष सं. $= \infty$; $\infty^२ = \infty$ आणि $\sqrt{\infty} = \infty$.

गणितस्कंधाच्या उच्चशाखांतून शून्य व अनंत ह्यांच्या ह्या गुणधर्मांचा विचार व उपयोग पदोपदीं केला जातो. ५ ह्याला ० नें गुणणें म्हणजे ५ ची कांहींहि पट न घेण्यासारखें आहे. अर्थात् गुणाकार 'कांहीं नाहीं' अर्थात् शून्य झाला. $\frac{५}{०}$ ह्याचा अर्थ "५ हा ० च्या किती पट आहे" असा प्रश्नरूप झाला; व उत्तर 'अनंत' पट आहे असें आलें हें ठीकच झालें. पण $\frac{५}{०} = \infty$ ह्या समीकरणावरून ( $५ = ० \times \infty$ ); $० \times \infty = ५$ असें एक समीकरण येतें. अर्थात् शून्य व अनंत ह्यांचा गुणाकार ५ येतो असें दिसतें, पण $\frac{७}{०} = \infty$, ह्यावरून $० \times \infty = ७$ होतात. अर्थात् $० \times \infty$ हा $\frac{०}{०}$ ह्याप्रमाणेंच अनिश्चित स्वरूपाचा आहे. तसेंच $\frac{\infty}{\infty}$ हाही अनिश्चित स्वरूपाचा आहे. ह्याशिवाय $( १ + \frac{१}{प} )^प$ ह्यांत प जर 'अनंत' किंमतीचा असला तर $( १ + \frac{१}{प} )^प = २.७१८२८$ अशी किंमत येते. सकृद्दर्शनी ह्याची किंमत 'एक' येईल असें वाटतें.

हल्लीं सूक्ष्म राशींच्या व अनंतराशीच्या प्रती लेखिलेल्या आहेत. म्हणजे ब हा जर एक सूक्ष्मराशी असला तर $ब^२$, $ब^३$, $ब^४$ हे एकाहून एक उच्चतर प्रतीचे सूक्ष्म राशी होत. दुसऱ्या प्रतीच्या सूक्ष्म राशीस($ब^२$,) यास पहिल्या प्रतीच्या सूक्ष्म राशीनें ( बनें ) भागिल्यास उत्तर शून्य येतें. असेंच अनंत राशीसंबंधानें समजावें. अशा ठिकाणीं सूक्ष्म राशी व महत्तमराशी ह्या चलराशी समजल्या जातात. व शून्य व अनंत ह्या त्यांच्या परमावधी ( लिमिट ) होत.

वर्गकरण्याची सोपी रीतः—ही भास्कराचार्यांनीं आपल्या लीलावतींत दिली आहे.

$अ^2 - ब^2$ = ( अ + ब ) ( अ – ब ). येथें अ आणि ब या दोन संख्या आहेत. यावरून दोन संख्यांच्या वर्गांचें अंतर हें त्या संख्यांची बेरीज व वजाबाकी यांच्या गुणाकाराबरोबर असतें. हेंच जर दुसऱ्या तऱ्हेनें मांडलें तरः— $अ^2$ + ( अ + ब ) ( अ – ब ) + $ब^2$. पूर्वीप्रमाणेंच अ, ब या कोणत्याहि दोन संख्या आहेत. समजा कीं ३९६ याचा वर्ग करणें आहे तर $३९६^2$ = (३९६+ब) (३९६–ब)+$ब^2$. आतां ' ब ' ला आपल्याला वाटेल ती सोयीची किंमत देतां येईल; तर आपण ' ब ' ची किंमत ४ घेऊं;

$३९६^2$ = ( ३९६ + ४ ) ( ३९६–४ ) + $४^2$
= ४०० × ३९२+१६
= १५६८१६.

ब = ४ घेण्यांत फायदा येवढाच कीं त्यानें ३९६ + ४ = ४०० हे गुणावयास सोईस्कर आहेत. थोड्या संवयीनें या रीतीनें वर्ग फार लवकर करतां येईल.

सर्वच आंकड्यांचा या रीतीनें वर्ग करणें सोपें जाणार नाहीं हें खरें. तरी पण बऱ्याच ठिकाणीं हा नियम फार उपयोगी पडेल. दुसरी एक रीत ( अ+ ब $)^2$ = $अ^2$+ २ अ + $ब^2$ या सारणीवर बसविलेली आहे. उदाहरणार्थ ६७ चा. वर्ग करूं.

$६७^2$ =( ६० + ७ $)^2$ = ३६००+८४०+४९ = ४४८९

आतां $५१३७^2$ = २६३८८७६९ हें सोडवूं.

| | | | |
|---|---|---|---|
| $७^2$ हातचे | = ४९; | ९ व हातचे | ४ |
| ७×३×२ + ४ | = ४६; | ६ ,, | ४ |
| ७×१×२ + $३^2$ + ४ | = २७; | ७ ,, | २ |
| ७×५×२ + ३×१×२+२ | = ७८; | ८ ,, | ७ |
| ३×५×२ + $१^2$ + ७ | = ३८; | ८ ,, | ३ |
| १×५×२ + ३ | = १३; | ३ ,, | १ |
| $५^2$ + १ | = २६; | | |

अशाच संक्षिप्त रीतीनें $६७^2$ हें काढितां येईल. याप्रमाणें केवढीहि संख्या असली तरी तिचा वर्ग लिहितां येईल.

वरील सूत्रानें:—

४३×३७ = ( ४० + ३ ) ( ४०–३ ) = १६००–९
= १५९१.

अशा तऱ्हेचे गुणाकार करतां येतील.

११७×१२३ = ( १२०–३ ) (१२०+३) = १४४००–९ = १४३९१.

**का ट को न त्रि को णः**— याचा अत्यंत महत्त्वाचा गुणधर्म हा कीं कर्णाचा वर्ग हा इतर दोन भुजांच्या वर्गांच्या बेरजेबरोबर असतो. हा गुणधर्म पायथॅगोरास ह्या ग्रीक तत्त्ववेत्त्यानें शोधून काढला असा यूरोपियन लोकांत समज आहे. पण ह्या तत्त्ववेत्त्याच्या जन्माच्या पूर्वी २किंवा३ शतकें झालेल्या शुल्बसूत्र नामक सूत्रांत ह्याचा उल्लेख आहे व पायथॅगोरास व इराटॉस्थेनीझ इत्यादि ग्रीक तत्त्ववेत्ते व बॅकस ही ग्रीक कामदेवता ह्यांनीं गणित, तत्त्वज्ञान वगैरे विषयांचें ज्ञान पूर्वेकडून व विशेषतः हिंदुस्थानांतून आणिलें अशी ग्रीक लोकांतच दंतकथा आहे. ईजिप्शियन सुधारणाहि अशीच अबिसीनिया येथील प्राचीन काळच्या हिंदी वसाहतीपासून जन्मली असें तेथील शब्दसादृश्यावरून व नाइल नदीच्या उगमाची हकीकत पुराणांत सांपडते तीवरून सिद्ध होतें. ह्या व इतर अनेक पुराव्यांवरून ईजिप्शियन सुधारणेचा उगमहि आपल्या भरतखंडांतील प्राचीन सुधारणेमध्येंच सांपडतो. ह्यावरून ह्या सिद्धांताचा उगम भरतखंडांत झाला असून नंतर येथूनच तो ग्रीस देशांत गेला असण्याचा बराच संभव आहे.

वर सांगितलेल्या शुल्बसूत्रांत ( ज्ञा. को. प्रस्तावनाखंड, भाग ५ प्रकरण १३ पहा ) वरील सिद्धांतावरून सुचलेलीं खालील प्रकारचीं संख्यात्रिकूटें दिलेलीं आहेत.

$३^2$ + $४^2$ = ९+१६ = २५ = $५^2$ ∴ $३^2$+$४^2$ = $५^2$

अर्थात ३, ४ ह्या काटकोनत्रिकोणाच्या दोन बाजू असतील तर ५ हा त्या त्रिकोणाचा कर्ण झाला. ह्यावरून असा प्रश्न सुचतो कीं, दोन संख्यांच्या (अर्थात पूर्णांक संख्या घ्यावयाच्या) वर्गांची बेरीज तिसऱ्या एका संख्येच्या वर्गाच्या बेरजेइतकी होईल असें संख्यात्रिकूट कसें काढावयाचें? अशीं बरीचशीं संख्यात्रिकूटें शुल्बसूत्रांत दिलेलीं आहेत. उदाहरणार्थ ५, १२, १३; ८, १५, १७; ७, २४, २५ इत्यादि.

प्रत्येक त्रिकूटापासून त्यांतील संख्यांनां इष्ट संख्येनें गुणून वाटेल तितकीं त्रिकूटें काढितां येतात. उ. (३,४, ५) ह्यांपासून ( ६, ८, १० ), ( १५, २०, २५ ) वगैरे. प्रत्येक स्वतंत्र किंवा परस्पर अविभाज्य संख्यांचें त्रिकूट ( ३, ४, ५; ५, १२, १३; ८, १५, १७; वगैरे ) ह्यांतील तिन्ही संख्यांच्या गुणाकारास ६० नीं भाग जातो. उदाः—८ × १५ × १७ = २०४० ह्याला ६० नीं भागिलें असतां ३४ भागाकार येतो. आणखीहि मजेदार गुणधर्म इंडियन मॅथेमॅटिकल जर्नल ह्यांत दिलेले आहेत. परंतु विस्तारभयास्तव येथें दिले नाहींत.

उपपत्तिः—अशीं संख्यात्रिकूटें ज्या सूत्रावरून काढितां येतात तें सूत्र असें:—( $अ^2$+$ब^2$ $)^2$=($अ^2$ – $ब^2$ $)^2$+(२ अब $)^2$. हें युक्लीडनें दिलेलें आहे असें म्हणतात. त्यांत अ व ब ह्या कोणत्याहि दोन ( पूर्णांक ) संख्या घेतल्या असतां त्यांच्यापासून एक त्रिकूट निघतें. उदा. अ = ४ व ब = १ ह्या किंमती घेतल्या तर $अ^2$ + $ब^2$ = १७, $अ^2$ – $ब^2$ = १५आणि २ अब = ८ म्हणून १७, १५, ८ हें त्रिकूट निघालें.

**अ पू र्णां कः**—आतांपर्यंत पूर्णांकी संख्यांवर करावयाच्या प्रक्रिया सांगितल्या. परंतु जगांत पूर्ण वस्तूंचाच केवळ विचार व.रावयाचा नसून वस्तूंच्या (भिद = फोडणें, भेद करणें, ह्या

वरून ' भिन्न ' ( फोडलेला ) भाग असा अर्थ झाला म्हणून संस्कृतांत हा शब्द अपूर्णांकार्थी योजलेला आहे )भागांचाहि विचार करावयाचा असतो. एका वस्तूचे ३ भाग करून त्यांतील एक घेतला तर तो $\frac{१}{३}$ असा लिहितात. ह्या व्यवहारी अपूर्णांकांतील छेद (अर्थात रेषेखालचा अंक ३) हा त्या वस्तूचे किती ( समान ) भाग केले आहेत ते दाखवितो. विभाजक व आडव्या रेषेच्या वरचा आंकडा १ त्याला अंश म्हणतात. व हा अंक ( छेदानें दर्शविलेल्या समान भागांपैकीं ) किती भाग घेतले आहेत तें दाखवितो. उदा. $\frac{५}{१७}$ ह्याचा अर्थ एका वस्तूचे १७ समान भाग करून त्यांतील ५ भाग घेतले आहेत असा होतो.

व्यवहारी अपूर्णांकावर करावयाच्या सर्व प्रक्रिया आपल्या पूर्वजांस पूर्ण अवगत होत्या. ख्रि. श. पूर्वी सुमारें ३००० वर्षें अह्मस ह्या मिसरी गणितज्ञास कोणताहि अपूर्णांक कांहीं एकांशी ( ज्यांचा अंश १ आहे असे ) अपूर्णांकांच्या बेरजेबरोबर कसा असतो हें माहीत होतें.

उदा० $\frac{१९}{३६}=\frac{१}{४}+\frac{१}{९}+\frac{१}{१२}+\frac{१}{१८}+\frac{१}{३६}$.

व्यवहारी अपूर्णांकासंबंधानें सामान्य माहिती कोणत्याहि अंकगणितांत दिलेली असते. म्हणून ती येथें दिली नाहीं.

$\frac{१}{३}$ व $\frac{१}{७}$ ह्यांचा विचार केला असतां पहिला अपूर्णांक हा एकाचा तिसरा हिस्सा व दुसरा हा सातवा हिस्सा आहे. $\frac{२}{३}$ ह्यांत दोन तिसरे हिस्से आहेत. $\frac{३}{७}$ ह्यांत तीन सातवे हिस्से आहेत. म्हणजे $\frac{१}{३}$ व $\frac{२}{३}$ ह्यांत तिसरा हिस्सा हें माप आहे व $\frac{२}{७}, \frac{३}{७}, \frac{५}{७}$ ह्यांत सातवा हिस्सा हें माप झालें. हीं मापें वेगवेगळीं झाल्यानें $\frac{२}{३}$ आणि $\frac{५}{७}$ ह्यांची बेरजि, वजाबाकी करतां येत नाहीं. ती करतां येण्यास दोन्ही अपूर्णांक एका मापानें म्ह. $\frac{१}{२१}$ ह्या मापानें मापिले पाहिजेत. $\frac{१}{३}$ ह्यांत $\frac{१}{२१}$ ची ७ पट आहे; $\frac{२}{३}$ ह्यांत १४ पट आहे; तसेंच $\frac{५}{७}$ ही $\frac{१}{२१}$ ची १५ वी पट आहे. म्हणून $\frac{२}{३}+\frac{५}{७}=\frac{१४+१५}{२१}=\frac{२९}{२१}$. ह्यावरून $\frac{२}{३}, \frac{५}{७}$ अशीं रूपें असण्यापेक्षां हेच अपूर्णांक $\frac{१४}{२१}, \frac{१५}{२१}$ अशा समच्छेद ( दोहोंचाहि च्छेद २१ हा एकच आहे. म्हणून ह्यास समच्छेद रूप म्हणतात ) रूपानें दिलेले, बेरीज वजाबाकीच्या दृष्टीनें जास्त सोईस्कर होत. अशा रीतीनें सर्व अपूर्णांकांचा एकच ठराविक छेद असणें बरें हें सिद्ध झालें.

रोमन लोकांत १२ हा सर्व अपूर्णांकाचा छेद असे. बाबिलोनियन लोकांत ६० हा छेद असे पण तो अध्याहृत ठेवीत, प्रत्यक्ष लिहीत नसत. असा एकच छेद असणें इष्ट आहे हें ठरल्यावर तो छेद १० असणें हें गणितदृष्ट्या फार सोईचें आहे [ आपल्या देशांतील शतानंद नांवाच्या ( अकराव्या-शतकांतील ) ज्योतिषानें प्रत्येक अपूर्णांक१०० हा छेद ठरवून सांगितलेला आहे ] व परार्ध, मध्य, अंत्य ... ...कोटि, लक्ष अशा उलट क्रमानें स्थानें घेतलीं असतां ' एकं ' येथें थांबावें लागत होतें तें आतां थांबण्याचें कारण नाहीं. कोटीच्या मागचें स्थान दशलक्ष हें कोटीला १० नीं भागून येतें. तसेंच एकंच्या मागचें स्थान एकला १० नीं भागून आलें पाहिजे. अर्थात $\frac{१}{१०}$ अथवा दशांश स्थान हें एकंच्या मागचें स्थान झालें. ह्याचप्रमाणें शतांश, सहस्रांश अशीं अनेक स्थानें उत्पन्न झालीं. तेव्हां ' एकं ' स्थानच्या पुढचीं ( डाव्या बाजूचीं ) दहं, शतं इत्यादि स्थानें जशीं तयार झालेलीं आहेत तशींच एकं स्थानच्या उजव्या बाजूला ( मागचीं ) दशांश, शतांश, सहस्रांश इ. अपूर्णांकदर्शक स्थानें झालीं.

ह्या दोन्ही स्थानमालिकांच्या मध्यें दशांशचिन्ह म्हणून टिंब खुणेकरितां लिहितात हें सर्वांस माहीत आहेच. तेव्हां

४३२.५३०८९

$= ४००+३०+२+\frac{५}{१०}+\frac{३}{१००}+\frac{८}{१००००}+\frac{९}{१०००००}$ ह्यांतील पहिल्या तीन आंकड्यांची, स्थानिक महत्त्व लक्षांत घेतां, किंमत काय हें मागें सांगितलेंच आहे. त्याच अनुरोधानें दशांशचिन्हाच्या उजव्या बाजूच्या ५ ह्या आंकड्यांची खरी किंमत ( तो दशांश स्थलीं असल्यामुळें ) $\frac{५}{१०}$ होय. असेंच पुढच्या आंकड्यांसंबंधीं समजावें.

हे दशांश अपूर्णांक आपल्या भरतखंडस्थ प्राचीन गणितज्ञांस ख्रि. शकाच्या ६ व्या शतकाच्या सुमारास माहीत होते.

अपूर्णांक म्ह. भागाकार पूर्णपणें मांडण्याचाच एक प्रकार होय. ३० ह्या संख्येस ५ ह्यानें भागिलें असतां भाग बरोबर तुटतो व भागाकार ६ असें आपण उत्तर लिहितों. पण ३२ ह्या संख्येस ५ नीं भागिलें असतां भाग बरोबर जात नाहीं; व उत्तर ' भागाकार ६ येतो व बाकी २ उरते ' असें द्यावें लागतें. पूर्ण भागाकार काय येतो ह्याचें उत्तर पुढीलप्रमाणें विचार केल्यावर देतां येईल. ३० ला ५नीं भागणें ('भागणें' ह्याचा मूळचा अर्थ ' भाग करणें ' ) म्हणजे ३० चे बरोबर ५ भाग करावयाचे असा घेतला तर ३२ ला ५ नीं भागणें म्ह० ३२ चे ५ भाग करणें व ह्याचें उत्तर $\frac{३२}{५}$ अशा रीतीनें लिहितां येईल. अर्थात् अशा प्रत्येक भागांत जितके एकं येतील तो भागाकार. म्हणून $\frac{३०}{५}=६$ परंतु; $\frac{३२}{५}$ ह्यामध्यें ६ पूर्ण एकं झाल्यावर. वर २ राहतात. त्याचेहि५ भाग केल्यास प्रत्येक भाग $\frac{२}{५}$ इतक्या एकंच्या भागाबरोबर होईल. अर्थात् $\frac{३२}{५}$ ह्याचा अर्थ ६ $\frac{२}{५}$ म्हणजे ३२ ला ५ नीं भागिल्यास पूर्ण उत्तर ६ $\frac{२}{५}$ असें झालें. त्याचप्रमाणें ३ ला ५ नीं भागून जो भागाकार येईल तो पूर्ण नसला तरी ह्या पद्धतीनें $\frac{३}{५}$ असा लिहितां येईल. असेंच इतरत्र समजावें.

आ स न्न वि धि.—हल्लीं शास्त्रज्ञ लोकांची जिकडेतिकडे चिकित्सक बुद्धीनें प्रत्येक परिमेयाचें सूक्ष्म मान काढण्याकडे प्रवृत्ति फार आहे. व या कार्याकरितां साधनेंहि शोधून काढण्यांत आलीं आहेत. उदा. दुर्बिण, सूक्ष्मदर्शक यंत्र वगैरे. हिशेब करण्याच्या रीतीहि चांगल्या आहेत. या

सर्वांच्या साहाय्यानें निरनिराळ्या परिमेयांचीं सूक्ष्म मापें निश्चित केलीं आहेत. कालमापनांत १ सेकंदाची किंवा त्याच्या सहस्रांशाचीहि चूक शास्त्रज्ञांना खपत नाहीं. अंतरें मापतांना अति सूक्ष्मकीटकांची व अणूंची लांबी सांगण्याचा प्रसंग येतो. त्यावेळीं इंचाचा लक्षांश, कोट्यंश, किंवा त्याहूनहि सूक्ष्म अंशानें ती लांबी सांगण्याचा प्रसंग येतो. अशीं मानें सांगतांना असें आढळून येतें कीं, जगांत बरींच परिमेयें लांबलचक अपूर्णांक रूपानें सांगावीं लागतात. पूर्णांक अशीं फार थोडीं. उदा. १ वर्ष = ३६५.२५६३७४४ इतके दिवस. प्राणवायू(ऑक्सिजन)च्या परमाणूचें वजन = १५.९६ हैड्रोजन पर. व. वगैरे. अर्थात् हीं मानें घेऊन हिशेब करणें फार त्रासाचें होतें. व बरेच वेळां ७८ दशांश स्थळांपर्यंत उत्तर नको असतें. २।३ स्थळांपर्यंत किंवा पूर्णांकापर्यंतच अंदाजी उत्तर बरोबर असलें म्हणजे पुरें होतें. याकरितां अशीं सूक्ष्म मानें दिलीं असतां त्यांच्या संबंधीं हिशेब करतांना इष्ट स्थळांपर्यंत अंदाजी उत्तर कसें काढतां येईल हें ज्यांत सांगितलें आहे त्यास आसन्नविधि ( अप्रॉक्झिमेशन ) म्हणतात. शिवाय त्याच्या योगानें एखादा हिशेब बरोबर आहे कीं नाहीं याचा थोडक्यांत पडताळा पाहतां येतो. या आसन्नविधीप्रमाणें बेरीज बजाबाकी करणें अगदीं सोपें असतें. गुणाकार, भागाकार यांच्या संक्षिप्त रीती ( तसेंच वर्गमूळ, घनमूळ, वर्ग, घन, यांच्या संक्षिप्त रीती कोणत्याहि बीजगणितांत उदा. हॉल अँन्ड नाइट या पुस्तकांत दिलेल्या आहेत. ) गोखल्यांच्या अंगणितांत दिलेल्या आहेत. पुष्कळ समीकरणें, सोडविणें कठिण जातें. पण या आसन्नविधीच्या असकृतविधि ( सक्सेसिव्ह अप्रॉक्झिमेशन ) नांवाच्या रीतीनें कोणत्याहि समीकरणाचें आसन्नमूळ काढतां येतें. उदा. क्ष$^{3}$+१०० क्ष−१ = ०. प्रथम क्ष फार अल्पमूल्य अपूर्णांक असल्यानें क्ष$^{3}$ हा त्या मानानें फारच लहान राशि झाला म्हणून तो सोडून देतात.

१०० क्ष−१ = ० असें समीकरण झालें.

$\therefore$ क्ष = $\frac{१}{१००}$ = .०१.

आतां मूळचें समीकरण १०० क्ष = १—क्ष$^{3}$ यांत ही किंमत उजव्या बाजूस घातली तरः—

१०० क्ष = १—(.०१)$^{3}$

$\therefore$ क्ष = $\frac{१}{१००} - \frac{(.०१)^{3}}{१००}$

= .०१—.०००००००१

क्ष = .००९९९९९९

अशी 'क्ष' ची अंदाजी. किंमत झाली. (जास्त माहितीकरितां बुरसाइड अँन्ड पँटन्स थिअरी ऑफ इक्वेशन्स पहा.)

या पद्धतीप्रमाणें ९ म्हणजे अजमासें १० समजतात.

तत्त्व—१७ हे १० व २० या दोहोंच्यामध्यें आहेत. पण २०च्या जास्त जवळ आहेत. म्हणून २० ही अंदाजी किंमत झाली.

| | | |
|---|---|---|
| १७ | म्हणजे अज. | २० |
| ३७$\frac{३}{४}$ | ,, ,, ,, | ३८ |
| ३३$\frac{२}{५}$ | ,, ,, ,, | ३३ |
| ९७८ | ,, ,, | १००० |
| | किंवा | ९८० |

ज्या प्रतीची आसन्नता इष्ट असेल त्याप्रमाणें अंदाजी उत्तरें निरनिराळीं येतील.

९२७५६३ हे ९३००००, ९२८०००, ९२७६०० इ. तऱ्हेनें आपल्याला दशसहस्र, सहस्र, शतें किंवा ज्या स्थानीं थांबावयाचें असेल त्याप्रमाणें लिहितां येतील.

अंकगणिताचा मुख्य उद्देश म्हणजे आंकडेमोडीचें गणित, अर्थात् व्यक्तराश्यात्मक गणित फार थोड्या आयासानें आपणास करतां यावें हा आहे. म्हणून महत्त्वमापनांत आपण करतों त्याप्रमाणें इतर शास्त्रांतील तत्त्वें घेऊन त्यांवर संख्यात्मक उदाहरणें अंकगणिताचा भाग म्हणून द्यावींत असें आमचें मत आहे. म्हणून दिलेल्या समीकरणाचें आसन्नमूल्य काढण्याची रीत अखंड अपूर्णांक, आसन्नमूल्यखंडें [ कान्व्हेर्जट्स ] काढण्याची रीत वगैरे क्रिया अंकगणिताचा भाग समजला जावा. तसेंच बीजगणितांतील 'थिअरी ऑफ नंबर्स' यांत दिलेल्या कांहीं ठळक सिद्धांतांचीं संख्यात्मक उदाहरणें अंकगणितांत देणें इष्ट आहे. उदाहरणार्थः—

( १ ) कोणत्याहि दोन विषम संख्यांच्या वर्गांच्या अंतरास ८नीं भाग जातो. ( २ ) कोणत्याहि इष्ट अनुक्रमांकाच्या गुणाकारास १ पासून तितकेच अनुक्रमांक घेऊन त्याचा गुणाकार केल्यास त्या गुणाकारानें भाग जातो.

$$\frac{.७\times८\times९\times१०}{१\times२\times३\times४} = २१०.$$

( ३ ) कोणताहि वर्ग हा पांचाची पट असतो किंवा त्या पटीहून १ नें अधिक किंवा कमी असतो. उ. २५ = ५×५; ३६ = ५×७+१; ४९ = ५×१०−१. ( ४ ) ७ च्या कोणत्याहि घातांत २ मिळविल्यास बेरजेस ३ नें भाग जातो. ७+२ = ३×३; ४९+२ = ५१ = १७×३; ( ५ ) कोणत्याहि लागोपाठच्या ४ आंकड्यांच्या गुणाकारांत १ मिळविला असतां बेरीज पूर्ण वर्ग असते. जसें:—

२×३×४×५+१ = १२०+१ = १२१ = ( ११ )$^{2}$

अशीं आणखीहि उदाहरणें देतां येतील. येथें अल्पसें दिग्दर्शन केलें आहे एवढेंच.

**वर्गमूळाची उपपत्तिः**—भागाकाराच्या वेळीं म्हटलेंच आहे कीं भागाकार व वर्गमूळ हीं दोन आसन्नक्रिया म्हणून जो गणिताचा भाग आहे त्याचीं विशिष्ट रूपें आहेत. प्रथम अत्यंत उच्च स्थानचा अंक निश्चित करावयाचा मग

ह्याच्या साह्यानें त्याच्या पुढचा अंक ठरवावयाचा व असे करीत उत्तर काढावयाचें स्पष्टीकरण (अ+ब+क+ड+फ)$^{2}$

= अ$^{2}$+ब$^{2}$ +क$^{2}$ +ड$^{2}$ + फ$^{2}$
+२अ ब +२अ क+२ अड +२अफ
+२बक +२ बड +२बफ
+२कड +२कफ
+२डफ

या योजनेंत रकमा अशा मांडल्या आहेत कीं अ च्या खालीं त्याचा वर्ग सांपडेल व अ, व या दोहोंच्या खालीं ( अ+ब ) ह्यांच्या वर्गांतील तीन्ही रकमा अगर पदें सांपडतील. अ, ब, क यांच्याखालीं ( अ+ब+क )या पदत्रयीच्या वर्गांतील ६ पदें सांपडतील. यावरून असें दिसतें कीं, अचा वर्ग अ$^{2}$ आहे, पण 'अ'मध्यें जर ब मिळविला तर अ$^{2}$ मध्यें वर्ग येण्याकारिता ब$^{2}$+२ अब मिळवावे लागतात. याच्या उलट वर्गमूळ काढतांना समजा कीं अ + ब+ क इतका भाग काढून झाला आहे, तर पुढचा ड हा काढतांना वर्गमूळ काढून राहिलेल्या बाकींतून ड$^{2}$ व पूर्वीच्या पदांच्या ( म्ह. अ, ब,क,)दुपटींचा व 'ड' चा गुणाकार इतकीं पदें ( म्ह. २ अड + २ बड + २ कड ) वजा केलीं पाहिजेत. आतां वर्गमूळांतील नवीन पद काढावयाचें तें आधीं अज्ञात असतें. परंतु आपल्यास हें माहित आहे कीं, त्या बाकींतून २(अ+ब+क)+ड ही रक्कम वजा गेली पाहिजे.अर्थात् ती बाकी जवळजवळ या रकमेइतकी आहे असें म्हणतां येईल म्हणून त्या बाकीला २ ( अ+ब+क ) यांनीं भागिलें असतां उत्तर ड हें येते. या उपपत्तिविरून वर्गमूळाची रीत बसविली आहे.

| | |
|---|---|
| ५ | २६३८८७६९(५१३७ |
| ५ | २५ |
| १०१ | १३८ |
| १ | १०१ |
| १०२३ | ३७८७ |
| ३ | ३०६९ |
| १०२६७ | ७१८६९ |
| | ७१८६९ |

या उदाहरणांत पहिला भाग पांचाचा आहे. तेव्हां दुसरा १ चा भाग लावण्यापूर्वी ५ ची दुप्पट केली आहे, व मग १ वर घेतला आहे.

ह्यांत प्रथम उपन्यासांत [ स्टेप ] २५०००००० इतके वजा केले जातात; व असेंच इतर उपन्यासांत समजावें.

वर्गमूळ काढतांना एकं स्थानापासून एक आंकडा सोडून खूण कां करावयाची ?

वरच्या उदाहरणांत आपलें उत्तर खरोखरी ५००० + १०० + ३०+७ आहे. अर्थात एकं स्थानचा आंकडा ( ९ ) ह्याशिवाय करून बाकी तीन आंकड्यांवर [ उ. ७, ८,६] चिन्ह आहे. १ ते १० आंकड्यांचा वर्ग १ ते १०० आहे. म्हणजे, दोन अंकी संख्या. आणि १० ते १०० आंकड्याचा वर्ग १०० ते १००००म्हणजे. चालू अंकी संख्या आहे इत्यादि संख्येंत एक आंकडा असला कीं त्याच्या वर्गांत दोन असतात म्हणून एक सोडून एक अशा आंकड्यावर खूण करावयाची.

घनमूळाची उपपत्तीहि ह्याप्रमाणेंच समजावी. ( अ+इ )$^{3}$ =अ$^{3}$ + ३ अ$^{2}$ इ + ३ अइ$^{2}$ + इ$^{3}$ = अ$^{3}$ + इ ( ३अ$^{2}$+ ३ अइ +इ$^{2}$ ) ह्या सूत्रावरून 'अ' हा घनमूळाचा भाग काढून झाला असल्यास ३ अ$^{2}$ आणि ३अ ह्या रकमा तयार करून ठेवावयाच्या व जर दिलेल्या संख्येंतून ज्याचा घन वजा जाईल अशी सर्वांत मोठी संख्या 'अ' असेल तर घनमूळाचा उरलेला भाग 'इ' हा 'अ' च्या मानानें फार लहान असला पाहिजे. म्हणून ३ अ$^{2}$ +३अइ+इ$^{2}$ = ३अ$^{2}$ + ३ अ ( ह्रस्वरूपान्तरानें) अर्थात बाकी इ. [ ३अ$^{2}$+३अइ + इ$^{2}$ ह्याला ३ अ$^{2}$ +३अ ह्यानें भागिलें असतां 'इ' हा अजमासें भागाकार येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| ३० | ३०० | ५७३२१९८ | १७८ |
| ७ | २५९ | १ | = १०० +७०+८ |
| ३७ | ५५९ | ४७३२ | |
| १४ | ४९ | ३९१३ | |
| ५१८ | ८६७०० | ८१९१९८ | |
| | ४१४४ | ७२६७६२ | |
| | ९०८४४ | ९२४३६ | |

ह्या रीतींत प्रथम १ जो वजा केला आहे तो खरोखरी १०० चा घन १०००००० हा वजा केला आहे. २०० चा घन ८००००००० हा दिलेल्या संख्येहून मोठा असल्यामुळें १ शतंचा घन हाच ( त्या संख्येंतून वजा जाणारा ) सर्वांत मोठा आहे. आतां येथें 'अ' म्हणजे १०० झाला. त्या मानानें 'इ' म्ह० ७० हा लहान आहे. ३०० म्हणजे ३अ$^{2}$ ( संक्षिप्त रीत व्हावी म्हणून ३०००० ह्याच्या ऐवजीं ३०० च लिहिण्याचा परिपाठ आहे. ) ३० हे ३ अच्या ऐवजीं आहेत. ह्याप्रमाणें सर्व उपपत्ति संगतवार लिहितां येईल. विस्तारभयास्तव येथें दिग्दर्शन मात्र केलें आहे. पंचमूळ कसें काढावें हें गोखल्यांच्या अंकगणितांत दाखविलें आहे. सप्तममूळ किंवा कोणतेंहि मूळ काढण्याची रीती बीज गणितांतील द्विपदविस्तार ह्याच्या साह्याय्यानें बसवितां येईल. परंतु मोठी अडचण ही आहे कीं उच्च प्रतीचें मूळ काढितांना पुढें कशाचा भाग लागतो हें ठरविणें अत्यंत कठिण होतें. घनमूळ काढतांनाच ही अडचण भासूं लागते. उदा० वरच्या उदाहरणांत ४७३२ ह्याला ३०० हा जो [ अंदाजी ] भाजक यानें भागिलें असतां भाग १५ चा लागतो असें वाटतें पण खरोखरी भाग ७ चा लागतो. याचें कारण अंदाजी भाजक ३०० हा पक्का भाजक जो ५५९ याच्या सुमारें निम्मा आहे. लागर्थमचा उपयोग करून कांहीं स्थानापर्यंत कोणतेंहि मूळ बरोबर काढितां

येतें. उच्चघात काढणें हेंहि मूळ काढण्याच्या खालोखाल कठिण आहे. १७ च्या ५० व्या घातांत किती आंकडे असतील व त्यांची अंदाजी किंमत काय हें सामान्य माणसास चटदिशीं काढणें फार मुष्किलीचें आहे; पण लागथॅमच्या उपयोगानें हें फार झटदिशीं काढितां येतें. परंतु अजमासें घात खालील रीतीनें काढितां येतीलः—

$$२^{३०} = (२^{१०})^{३} = (३२^{२})^{३} = (१०२४)^{३}$$
$$= (१००० + २४)^{३} = (१०)^{९} + ३.२४\,(१०००)^{२}$$
$$+ ३.२४^{२}\,(१०००) + २४^{३}$$
$$= (१०)^{९} + ७२\,(१००)^{६}$$
$$+ १७३८००० + १२८२४$$
$$= १०७२७४१८२४$$
$$७^{१२} = [७^{४}]^{३} = [२४०१]^{३} = [२४००]^{३}$$
$$= १३८२४००००००० \text{ अजमासें.}$$

आसन्नविधीच्या साहाय्यानें वर्गमूळ व घनमूळ काढण्याच्या रीती प्रथम आपल्याच पुर्वजांनीं शोधून काढिल्या असें दिसतें भागाकाराची रीत त्यांच्याच परिश्रमाचें फल होय. ब्रह्मगुप्तानें $क्ष^{२}$+२ क्षय ह्याचें ( य हा फार लहान राशि असल्यास ) आसन्नमूळ क्ष+य होतें असें सांगितलें आहे. ह्यावरून आपल्याच पूर्वजांनीं वर्गमूळ व घनमूळ ह्यांच्या रीती शोधून काढल्या असें वाटतें. यूरोपांत शून्य (०) ही संज्ञा आरब लोकांनीं प्रथम नेली. १५ व्या शतकांत खुद्द इंग्लंडमध्यें भागाकाराची रीत माहीत नव्हती हें वर आलेंच आहे मग वर्गमूळ घनमूळ यांचें नांवच घ्यावयास नको.

बाकीचा नियमः—भागाकारांत 'बाकी' ही भाजकांपेक्षां कमी असते. वर्गमूळांत जेवढें वर्गमूळ काढून झालें असेल त्याच्या २पटीपेक्षां बाकी जास्त नसली पाहिजे. घनमूळांत 'क्ष' हें घनमूळ काढून झालें असल्यास बाकी ३ $क्ष^{२}$ + ३ क्ष ह्याहून जास्त असत नाहीं.

वर्गमूळ हा एक तऱ्हेचा भागाकारच होय. साध्या भागाकारांत भाजक कायम असतो. वर्गमूळांत भाजक हा प्रक्रियेच्या प्रत्येक विभागांत वेगळा असतो. उदा. समासांतील वर्गमूळाच्या उदाहरणांत प्रथमउपन्यासांत भाजक ३ व भागा-

| | |
|---|---|
| प्र.थ.उ.प. ३ | ९̇ ३४̇ ५६̇ (३५ |
| ३ | ९ |
| द्वि.उ.प ६५ | ३४ |
| ५ | ३० |
| तृ.उ.प. ७० | ४५६ |

कारहि ३ च आहे. द्वितीय उपन्यासांत भाजक ६५ असून भागाकाराच्या ह्या उपांगांतील आंकडा ५ आहे. शिवाय दुसरा फरक म्हणजे साध्या भागाकारांत भाजक व भागाकारांश ( अर्थात प्रत्येक उपांगापुरता येणारा भागाकार ) ह्यांच्यांत कांहींहि संबंध नसतो. पण वर्गमूळांत असा संबंध असतो. उदाहरणार्थ द्वितीय उपन्यासांतील पूर्ण भाजक ६५ आहे. परंतु ५ हा भाग लागवयाच्या पूर्वी ३+३ = ६ हा आंकडा आपल्याला तयार करावा लागला व त्याच्या सहाय्यानें पुढचा भाग ५ चा लागतो हें कळलें, व हा ५ चा आंकडा ६ वर लिहिल्यावर ह्या उपन्यासांतील पूर्ण भाजक ६५ हा तयार झाला. पण हा ६ चा आंकडा आपण पहिला भागाकारांक जो ३ त्याची दुप्पट करून काढिला. तसेंच तृतीय उपन्यासांतील भाजकांश ( भाजकाचें उपांग ) जो ७० [ ६५ त ५ मिळवून आला आहे ] तो भागाकारांश ३५ ह्याची बरोबर दुप्पट आहे म्हणून वर्गमूळांतील प्रत्येक उपन्यासांतील भाजकाचे पहिले आंकडे त्या उपन्यासापर्यंत आलेल्या उत्तराच्या दुप्पट असतात.

इतर प्रतींचीं मूळें हीं अशाच विचारसरणीनें पाहूं गेलें तर तीं चलभाजक विशिष्ट भागाकार होत असें दिसून येईल. ह्याच तत्त्वाचा विकास होऊन हल्लींच्या समीकरणमीमांसाग्रंथांत [थिअरी ऑफ इक्वेशन्स] कोणत्याहि समीकरणाचें मूळ ( मूळ म्ह. अज्ञात वर्णाची किंमत ) एका जातीच्या भागाकारपद्धतीनें काढून दाखविलेलें आहे. वर्गमूळ व घनमूळ काढणें हे त्या सामान्य पद्धतीचे विशिष्ट पण सुलभ प्रकार होत.

हीं उच्च प्रतींचीं मूळें म्हणजे चतुर्थमूळ, पंचमूळ, षष्ठमूळ वगैरे होत. चतुर्थ, पंचम, षष्ठ म्हणजे चवथी, पांचवी, सहावी ह्या त्या मूळांच्या प्रती होत. द्विपद विस्ताराच्या सहाय्यानें हीं मूळें अजमासें काढितां येतील. जसें:- $\frac{२}{३}$ ह्याचें १५ वें मूळ म्ह. $\frac{१}{१५}$ वा घातः—

$$\left(१-\frac{१}{३}\right)^{\frac{१}{१५}} = १-\frac{१}{१५}\times\frac{१}{३}$$
$$+\frac{\frac{१}{१५}\times\left(-१+\frac{१}{१५}\right)}{१\times२}\times\frac{१}{३^{२}}$$
$$-\frac{\frac{१}{१५}\times\left(\frac{१}{१५}-१\right)\left(\frac{१}{१५}-२\right)}{१\times२\times३}\times\frac{१}{३^{३}}+इ०$$

**दृढभाजक** ( महत्तम साधारण अपवर्तक ):—प्रत्येक परिमेयाला (मॅग्निटयुड) त्याला अनुरूप असें (एक किंवा अनेक) परिमाण असतेंच. सजातीय दोन परिमेयांना ज्या एकाच परिमाणानें निःशेष ( दृढ ) मापतां येईल अशीं परिमाणें बरींच असूं शकतील. उदा. ४ फूट व ६ फूट लांबी ही १ फूट, २ फूट, ४ इंच इत्यादीपैकीं कोणतेंहि माप (परिमाण) घेऊन त्यानें निःशेष मापितां येतील. अशा परिमाणापैकीं सर्वांत मोठें तें दिलेल्या परिमेयांचा दृढभाजक होय. आतां अ व ब ह्या दोन संख्यांचा दृढभाजक ( अर्थांत त्यांच्या साधारण अवयवांतील सर्वांत मोठा अवयव तो ) काढावयाचा असल्यास, 'फ' हा दृढभाजक कल्पूं. अर्थात् 'फ' नें 'अ' ला व 'ब' ला भाग जाईल. भागाकार अनुक्रमें 'म' व 'न' आहेत असें समजलें ( फ×म = अ, फन = ब ) तर 'अ' च्या कोणत्याहि 'ल' ह्या पटींतुन

'ब' ची कोणतीहि 'क' ही पट वजा केली असतां किंवा पहिलींत दुसरी पट मिळविली असतां ह्या बेरजेमध्यें अथवा वजाबाकींत 'फ' हा अवयव असतो जसें:—

( ल×अ+क×ब = ल×फ×म+क×फ×न = फ (ल×म+क×न )

ह्या तत्त्वावर दृढभाजकाची रीत बसविलेली आहे आतां निराळ्या पण सोप्या भाषेंत असें म्हणतां येईल कीं

२७ ) ९० ( ३ बाकी ९ हिनें भाजक २७ ह्यास भाग
 ८१ जात असल्यास ह्याच बाकीनें भाज्य
 ९ ९० ह्यालाहि भाग जातो. बाकी व

भाजक ह्यांचा सामान्य अवयव ( किंवा दृ. भा. ) हा भाज्याचाहि अवयव असतो. हेंच तत्त्व खालच्या उदाहरणांत खालून वर लागू करीत जावें म्ह. सर्व उपपत्ति लागते. आतां उदाहरणार्थ. ३२४ व २०७ ह्यांचा दृढभाजक: काढूं.

```
२०७ ) ३२४ ( १
      २०७
      ११७ ) २०७ ( १
            ११७
             ९० ) ११७ ( १
                   ९०
                   २७ ) ९० ( ३
                        ८१
                         ९ ) २७ ( ३
                             २७
                             ००
```

३२४ व २०७ ह्यांचा जो दृ. भा. तोच ११७ [म्ह. ३२४-२०७ ] व २०७ ह्यांचाहि दृ. भा. होय. तोच ११७ व ९० ह्यांचा ९०, २७ व ९, २७ ह्यांचाहि दृ. भा. होय. परंतु ९, २७ ह्यांचा ['दृढ' ह्याचा अर्थ निःशेष अर्थात 'दृढभाजक' ह्याचा अर्थ जिनें भागिलें असतां बाकी शून्य राहील अशी संख्या] दृढभाजक ९ होय. म्हणून ३२४ व २०७ ह्याच्या मध्यें हाच दृ. भा. होय.

दुसरी रीतः—दिलेल्या संख्यांचे अविभाज्य गुणक काढावेत. व आपआपल्या नीचतम घातांनीं युक्त अशा सामान्य [ दोहोंनां साधारण ] गुणकांचा गुणकार तोच दृ. भा. होय. जसें:—

$५०४ = २^{३} × ३^{२} × ७; ५२९२ = २^{२} × ३^{३} × ७^{२}$

यांत साधारण गुणक २, ३, ७ ह्यांचे नीचतम घात $२^{२}$, $३^{२}$, ७ ह्यांचा गुणाकार $२^{२} × ३^{२} × ७ = २५२$ हा त्यांचा दृ. भा. झाला.

२०७ व ३२४ ह्यांचा दृढभाजक ९ आहे हें वर दाखविलेंच आहे. अर्थात ९ नीं २०७ व ३२४ ह्यांस निःशेष भाग जातो. परंतु वरील दोन संख्यांस निःशेष भागणाऱ्या इतर संख्या ३, १, $\frac{१}{२}$, $\frac{१}{३}$, $\frac{१}{७}$ इत्यादि आहेतच. अशा संख्या अनेक आहेत. परंतु त्या ९ ह्यापेक्षां कमी आहेत. अर्थात अशा संख्यांना उत्तरपरिच्छेद किंवा वरची मर्यादा ९ ही आहे पण अधम परिच्छेद नाहीं. म्हणून ९ ह्याला महत्तम अपवर्तक असें साधें नांव देण्यांत येतें. आतां २०७ व ३२४ ह्यांचा लघुत्तम सा. भाज्य ७४५२ हा होय. ह्याचा अर्थ २०७ व ३२४ ह्या संख्यांनीं ७४५२ हिला भाग जातो व तसाच तो ७४५२ च्या कोणत्याहि पटीला गेला पाहिजे, अर्थात पूर्वोक्त २ संख्यांनीं भाग जाणाऱ्या सर्व संख्यांत ७४५२ ही सर्वांत लहान संख्या आहे. म्हणूनच हिला लघुतम सा. भा. असें म्हणतात. दोन किंवा अधिक संख्यांच्या साधारण भाज्यांनां अधमपरिच्छेद ( अपरलिमिट ) असतो व साधारण भाजकांना उत्तमपरिच्छेद ( लोअरलिमिट ) मात्र असतो.

ल घु त म सा धा र ण भा ज्य.—यांत ( दृ. भा. च्या उलट ) दोन किंवा अधिक परिमाणें दिलीं असतांना त्यांनीं मापलें जाणारें जें एकच परिमेय असतें तें काढणें हा प्रश्न आहे. या परिमेयाच्या कोणत्याहि पटीला दिलेल्या निरनिराळ्या परिमाणांनीं मापतां येईलच. अर्थात सर्वांत लहान परिमेय कळलें म्हणजे त्याच्या पटी करून त्यांवरून इतर परिमेयें काढतां येतील. थोडक्यांत अनेक संख्यांनीं ज्या एका संख्येस भाग जातो अशी एक सर्वांत लहान संख्या काढावयाची व तिलाच ल. सा. भा. म्हणतात.

रीतः—प्रत्येक संख्येचे अवयव पाडून त्यांमधील सामान्य अवयवांचे उच्चतम घात घेऊन त्यांचा व बाकी राहिलेल्या सर्व अवयवांचा गुणाकार हा ल. सा. भा. होय.

उदाहरण पहिलें:—ज्या संख्येला १३, १७, १९ यांनीं भागिलें असतां अनुक्रमें ९, १३, १५ अशा बाक्या उरतात अशी सर्वांत लहान संख्या काढा. अर्थात बाकी–४ आहे; ह्मणून १३ × १७ × १९–४ (म्ह. ४१९५ )ही संख्या झाली.

उ. दुसः— एका संख्येला १५ व १७ नीं भागिल्यास अनुक्रमें ८ व ११ अशा बाक्या रहातात. अशी सर्वांत लहान संख्या काढा. उत्तरांत जी संख्या येईल तिच्यांतून ८ वजा केले तर ती १५ ची पट होईल; पण तिलाच १७ नीं भागून बाकी ३ पाहिजे आहे. आतां १५×२ = ३० असे दुप्पट घेण्याचें कारण १७ पेक्षां मोठी असणारी जवळची १५ ची पट हीच आहे. ३० ला १७ नीं भागिलें तर बाकी १३ येते. बाकी ३ पाहिजे म्हणजे ही १० नीं कमी केली पाहिजे. १५ नीं भाग जाण्याकरतां म्हणून ३० त १५ ची पट मिळवीत जाऊं. परंतु दर खेपेस बाकी २ नीं कमी होईल; कारण १५ हे १७ पेक्षां २ नीं कमी आहेत. अर्थात १३ पैकीं १० कमी करावयाचे असल्यास, १० ही २ ची ५ पट आहे म्हणून ३० मध्यें १५ ची पांचपट मिळविली पाहिजे. म्हणजे ३०+७५ = १०५+८ = ११३. अर्थांत १५×१७ ची कोणतीहि पट यांत मिळविल्यास त्यांहि रकमा अशाच येतील. उदा. ११३+२५५ = ३६८, ११३+५१० = ६२३. इत्यादि.

अविभाज्य संख्याः—दोन संख्यांचा दृढभाजक जेव्हां एक येतो तेव्हां अर्थात एकाशिवाय या दोहोंत सामान्य अवयव नसतो, अशा संख्यांनां परस्पराविभाज्य संख्या म्हणतात. उदाहरणार्थ २११३२ परंतु २१ व ३२ यांना त्यांचे विशेष अवयव आहेत. पण सामान्य मुळींच नाहींत. आतां कांहीं संख्या अशा आहेत कीं त्यांनां अवयय मुळींच नाहींत. उदा:—३१,३७,२९,४७ वगैरे. कोणत्याहि संख्येस एकानें व स्वतः ह्या संख्येनें भाग गेलाच पाहिजे. म्हणून हे दोन अवयव आपण लक्षांत न घेतल्यास यांनां आपण निरवयव, गुणरहित, किंवा अविभाज्य म्हणूं.

कोणत्याहि संख्येचे गुण पाडण्यास अथवा ती अविभाज्य आहे हें ठरविण्यास प्रयोग करीत बसण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. परंतु हे प्रयोग जितके कमी करतां येतील तेवढे पहावयाचे. उदा. ३३७ ही संख्या घेऊं. यास ३, ७, ११, १३ २९ वगैरेनीं भागून पहातां कोणत्याहि संख्येनें भाग जात नाहीं. व पुढेंहि असेंच आणखी कांहीं संख्येनीं भागून पाहिलें पाहिजे. परंतु एवढ्यानें ती निरवयव किंवा अविभाज्य आहे असें म्हणतां येणार नाहीं, असें सकृत्दर्शनी वाटेल. परंतु ह्या सर्व आकड्यांनीं भागून पहाण्याची जरूरी नाहीं, १६ पर्यंतच भागून पाहिलें म्हणजे झालें. कारण ३३७ वर्ग नसल्यानें त्याचे अवयव शक्य असल्यास ते असमान असले पाहिजेत म्हणून त्यांतील एक अवयव ३३७च्या वर्गमूळापेक्षां म्हणजे १८ पेक्षां केव्हांहि कमी असलाच पाहिजे. अवयव केव्हांहि पूर्णांकच असतात. म्हणून १७ च्या पुढें पहाण्याची जरूरी नाहीं.

अपरिच्छेद्य ( इन् कॉमेन्सुरेबल ) संख्याः—कोणत्याहि संख्येस दुसऱ्या संख्येनें भागिलें असतां भागाकार पूर्णांक, अपूर्णांक किंवा ह्या दोहोंची सरमिसळ ज्यांत झाली आहे अशा तऱ्हेचा असतो. अपूर्णांक दशांश जातीचा असल्यास साधा किंवा आवर्त असूं शकेल. परंतु दोन ह्या संख्येचें वर्ग-मूळ असें आहे कीं त्यांतील दशांश अपूर्णांकांत आवर्त येत नाहींत व तो संपतहि नाहीं. तसेंच $\sqrt{\ }$ $\sqrt[3]{5}$ इत्यादि संख्यांचें समजावें. अशा संख्यांस 'अपरिच्छेद्य' संख्या म्हणतात. निरनिराळ्या प्रतींचीं मूळें काढतानांच ह्या संख्या आढळतात असें नाहीं तर इतरहि बऱ्याच ह्या जातीच्या संख्या आढळून आल्या आहेत. उदा. वर्तुळाच्या व्यासाचें परिधीशीं प्रमाण हें ह्याच जातीचें आहे. त्याची किंमत = ३.१४१५९ अशी आहे. एक ह्या संख्येनें सर्व संख्यांनां भाग जातो पण १ व अपरिच्छेद्य संख्या ह्यांनां एकाच मापानें मापितां येईल असें माप ( अर्थात् १ व अपरिच्छेद्य संख्या ह्यांचा दृढभाजक ) काढतां येत नाहीं.

पडताळेः—तीन या संख्येनें भाग जातो कीं नाहीं हें पाहण्यासंबंधीं उपपत्तिः—१० ला तीननीं भागिलें असतां बाकी एक रहाते. तसेंच दहाच्या कोणत्याहि घातास तीननीं भागलें असतां बाकी एकच रहाते. आतां २० ला तीननें भागिलें असतां बाकी १ × २ = २ राहील. २००, २००० इत्यादि संख्यांनां भागल्यास बाकी २ राहील. 'अ' नें 'ब' ला भागल्यास बाकी जर 'क' राहील तर अनें 'ब' च्या कोणत्याहि पूर्ण पटीला भागल्यास बाकीहि पूर्वीच्या बाकीच्या तितकीच पट राहील.

याप्रमाणेंच ४,४०,४०० या संख्यांनां तीननीं भागिलें तर बाकी ४ × १ = ४ म्हणजे ४ किंवा एक राहील. म्हणून ४२५ ला जर 'तीन' नीं भागिलें तर ४०० = ४ × १००: बाकी ४. २० = २×१० म्हणून बाकी२. तेव्हां एकंदर बाकी ४ + २ + ५ म्हणजे ११ याला भागिलें असतां जितकी बाकी राहील तितकीच. म्हणून संख्येतील अंकाच्या बेरजेस 'तीहींनीं' नीं भागून जितकी बाकी उरेल तितकीच बाकी सर्व संख्येस ३ नीं भागून उरेल हें उघड आहे. हीं सर्व तत्त्वें ९ लाहि लागू होतात.

९ नीं पडताळा पाहण्याची रीतः—ही ९ च्या ह्याच गुण-धर्मांवर बसविलेली आहे. उदाः—१७ × ११ = १८७; येथें १७ ला व ११ ला ९ नीं भागिल्यास बाक्या ८ व २ उरतात. ह्यांचा गुणाकार १६; ह्यांस ९ नें भागिल्यास बाकी ७ येते. इतकीच बाकी गु. १८७ ह्याच्या आंकड्यांच्या बेर-जेस ९ नीं भागिल्यास येते. तीननेंहि असाच पडताळा पाहतां येईल.

४ चा आडाखाः—४ या संख्येनें १०० ला भाग जातो. तेव्हां कोणत्याहि संख्येंतील १००पेक्षां कमी भागास[म्हणजे उजवीकडील शेवटच्या दोन आंकड्यांनीं बनलेल्या संख्येस] ४ नीं जर भाग गेला तर सर्व संख्येस जाईल. उ.दा.—३२८ याला ४नें भाग जाईल. कारण २८ ला चारांनीं भाग जातो. पण१५२६यास जाणार नाहीं.११ या संख्येनें भाग जातो कीं नाहीं याची उपपत्ति अशी. —१,१०,१००,१००० यांनां जर ११नीं भागलें तर बाक्या अनुक्रमें१, १०, १, १०अशा येत जातात. म्हणजे या बाक्या १,–१, १,–१, अशा येतात. कारण ११ नीं भागून १० बाकी उरणें म्हणजे [ १०–११ =–१]–१ बाकी उरण्यासारखेंच आहे. यावरून समस्था-नच्या अंकांचीं बेरीज विषमस्थानच्या [ अर्थात पहिल्या, तिसऱ्या इ. ] आंकड्यांची बेरीज करून त्यांचें अंतर शून्य किंवा११ ची पट असल्यास त्या संख्येला११नें भाग जाईल.

७,११, १३ या संख्यांनीं भाग जातो कीं नाहीं तें पाहणें व त्याची उपपत्तिः—तीन आंकड्यांपेक्षां जास्त आंकडे असलेल्या संख्येंतून शेवटच्या म्हणजे उजवीकडच्या तीन आंकड्यांनीं बनलेली संख्या वजा टाकल्यावर जर बाकीला ७, ११, १३ या संख्यांनीं भाग गेला तर त्या सर्व संख्येला ७,११, १३ यांनीं भाग जातो. उदाहरणार्थ—३२७८९, येथें ७८९–३२ = ७५७ याला जर ७,११ अगर १३ यांनीं भागलें तर बाक्या १, ९, ३ उरतात. म्हणून मूळ संख्येला भागलें असतां याच बाक्या उरतील.कारण १००० या

संख्येला ७, ११, १३ या संख्यांनीं भागलें असतां बाकी −१ उरते. म्हणून जितके हजार असतील तितके उणे करणें. दुसऱ्या तऱ्हेनें उपपत्ति अशीः—

१० ला जर ७ नीं भागल्यास बाकी ३ येतें.

| | | | |
|---|---|---|---|
| १०० | ,, | ,, | ३० म्हणजे २ |
| १००० | ,, | ,, | २० म्ह६अगर-१ |
| १०००० | ,, | ,, | −१० अगर − ३ |
| १००००० | ,, | ,, | −३० अगर−२ |

म्हणून एकंस्थानचा आंकडा+३×,दशंस्थान आंकडा+२×, शतंस्थानचा आंकडा-,सहस्रस्थानचा आंकडा-,३× दशसहस्र स्थानचा आंकडा −२ ×,लक्ष स्थानचा आंकडा हे जर' क्ष ' असले तर याला ७ नीं भागून जी बाकी राहते तीच मूळ संख्येला ७ नीं भागून राहील.

१७, १९. इत्यादि संख्येचेहि आडाखे बसवितां येतील. परंतु त्यापेक्षां प्रत्यक्ष भागणें जास्त सोपें होईल.

दोन निरवयव सारण्यांचा दृढभाजक काढण्याचा प्रयत्न केला असता त्यांपासून अपूर्णांकशृंखला व अनिर्णित मूल्य समीकरण वगैरे देखील तयार करतां येतें जसें:—

$$\frac{१३८}{७५} = १+\cfrac{१}{१+\cfrac{१}{५+\cfrac{१}{४}}}$$ ही अपूर्णांकशृंखला किंवा अखंड अपूर्णांक होय.

हा सर्व विषय बीजगणितांतच रूढ असल्यामुळें तेथें तो येईल म्हणून येथें लिहिण्याची जरूरी नाहीं. यांतील

$$१+\frac{१}{१} = २;\ १+\cfrac{१}{१+\cfrac{१}{५}} = \frac{११}{६}$$

यांनां प्रथम द्वितीय इत्यादि आसन्नमूल्यें(अर्थात $\frac{१३८}{७५}$ यांच्या अंदाजी किंमती म्हणतात.

कुट्टक—अशी रक्कम कोणती कीं, जिनें २२१ ला गुणून त्या गुणाकारांत ६५ मिळवून जी बेरीज येईल तिला १९५ नीं पूर्ण भाग जातो. हें उदाहरण ज्या रीतीनें खालीं सोडविलें आहे त्या रीतीला पूर्वाचार्य कुट्टक असें म्हणत. २२१ याला भाज्य म्हणतात; १९५ हा भाजक किंवा हार झाला; व ६५ याला क्षेप म्हणतात ( या तऱ्हेचें उदाहरण वर सोडविलेंच आहे. त्याच रीतीनें हेंहि सोडवितां येईल ). या भाज्य, हर, क्षेप, यांमध्यें १३हा साधारण अवयव आहे. तेव्हां संक्षेप देतां भाज्य १७, हार १५, क्षेप ५ असें झालें. नंतर दृढभाजकांतल्या प्रमाणें १७ ला १५ नीं १ बाकी उरेपर्यंत भागीत जावें व भागाकार एकाखालीं एक एक क्रमानें मांडून त्या सर्वांखालीं क्षेप व शून्य हें मांडावे. म्हणजे खालीलप्रमाणें १ वल्ली तयार होते.

| प्र. वल्ली | द्वि. वल्ली | तृ. वल्ली |
|---|---|---|
| १ | १ | ४० |
| ७ | ३५ | ३५ |
| ५ | ५ | |
| ० | | |

प्रथम वल्लींतील उपांतिम अंक जो ५ यानें वरच्या ७ स गुणून नंतर ५ खालचा अंक ० हा त्यांत मिळवावा व तो ७ चे ठिकाणीं मांडून दुसरी वल्ली तयार करावी. तशीच दुसरी पासून तिसरी. शेवटीं २ आंकडे येईपर्यंत असें करीत जावें. मग लब्धीची ( भागाकार म्हणजेच.लब्धि ) संख्या सम असल्यास ( या उदाहरणांत १, ७ अशा २ लब्धी आहेत म्हणजे त्यांची संख्या सम आहे ) या दोन आंकड्यांतील खालचा आंकडा हा भाज्याचा गुणक होतो व वरचा आंकडा हें भागून आलेलें उत्तर होय. या उदाहरणांत १७×३५+५ = ५९५+५ = ६०० व याला १५ नीं भागलें म्हणजे ४० हें उत्तर आलें. या दोन आंकड्यास भाज्य व हार यांच्या कोणत्याहि समान पटी वजा करून किंवा मिळवून आणखी गुणलब्धी काढतां येतात. सर्वांत लहान गुणलब्धी ६ व ५ होत. ४०−१७×२ = ६व ३५−१५×२ = ५. यांच्याविषयीं विशेष माहिती ' बीजगणित ' या प्रकरणांत येईलच.

वरील उदाहरण हें अनिर्णीत एकघात समीकरणाचें(इनडिटरमिनेट इक्वेशन्स ऑफ दि फर्स्ट डिग्रीज) आहे. (१९५य−२२१ क्ष = ६५ किंवा १५ य—१७ क्ष = ५ असें हें समीकरण झालें. त्यांत क्ष व य ह्यांच्या किमती पूर्णांकच यावयाच्या अशी शर्त असते. क्ष व य ह्यांच्या प्रत्येकीं एकच निश्चित किंमत न येतां असंख्य किंमती येतात; म्हणून अशा समीकरणांस 'अनिर्णीत' म्हणतात. हीं समीकरणें सोडविण्याची हल्लींची रीत म्हणजे एक अपूर्णांकशृंखला तयार करावयाची व त्या शृंखलेच्या आसन्नमूल्यांवरून य व क्ष ह्यांच्या किमती निघतात. ती रीत वरील कुट्टकाची रीत ह्या दोन्हींहीं सारख्याच आहेत. ह्याच कुट्टकाच्या रीतीनें अनिर्णीत वर्गसमीकरणेंहीं सोडवितां येतात. त्यासंबंधांत भास्कराचार्यांची बीजलीलावती पहा.

कुट्टक म्हणून जी एक प्रक्रिया सांगितली आहे तिचा अविभाज्य संख्यां( प्राइम नंबर्स ) शीं फार जवळचा संबंध आहे. ह्या अविभाज्य संख्या म्हणजे ३, ५, ७, १३, १९ वगैरे. व ( ती संख्या खेरीज करून ) ज्यांना कोणत्याही संख्येनें भाग जात नाहीं अशा संख्या होत. हें वर सांगितलेंच आहे. ह्या संख्यासंबंधीं लागलेले कांहीं मुख्य शोध खालीं दिले आहेत.

अविभाज्य संख्या या अनंत आहेत, ( ज्याप्रमाणें न हा कोणताहि पूर्णांक समजलें तर २ न म्हणजे कोणतीहि समसंख्या होते व २ न + १ किंवा २ न−१ ही कोणतीहि विषमसंख्या होते त्याप्रमाणें ) ह्या संख्या कोण-

त्याहि रीतीनें बीजगणितांतर्गत अज्ञात राशींच्या सहाय्यानें सामान्य स्वरूपांत दर्शवितां येत नाहींत. 'प' ही अविभाज्य संख्या असल्यास, व अ, ब हे कोणतेहि दोन पूर्णांक असतील तर $(अ + ब)^{प} - अ^{प} - ब^{प}$ ह्याला 'प' नें भाग जातो. उदा. ( २ + ५ ) चाघन – २ चाघन – ५ चाघन = ३४३८. – १२५ = २१० ह्या संख्येस ३ नीं भाग जातो.

फरमॅट याचा सिद्धांतः— 'प' ही एक अविभाज्य संख्या व 'न' ही 'प' संबंधानें अविभाज्य असल्यास $न^{प-१} - १$ ह्याला 'प' नें भाग जातो. उदा. प = ५ आणि न = ६ घेतल्यास $न^{प-१} - १ = ६^{४} - १ = १२९६ - १ = १२९५$, ह्या संख्येस ५ नीं भाग जातो.

विल्सन याचा सिद्धान्तः—'प' ही कोणतीहि अविभाज्य संख्या असल्यास १ + |प–१ ह्यास 'प' नें भाग जातो. |३ = ३×२×१ = ६; |५ = ५×४×३×२×१ = १२०. तसेंच |६ = ७२०.

तेव्हां ह्यावरून | हें चिन्ह गुणकमालादर्शक आहे. आतां वरील सूत्राचें उदाहरणः—प = ७ घेतल्यास १+|प–१ = १ + |७–१ = १+ |६ = १+७२० = ७२१ = ७×१०३.

अर्थात् ७ ह्या संख्येनें १+|७—१ ह्यास भाग जातो.

संख्यांचे प्रकारः—




वर सांगितलेल्या संख्यांच्या प्रकाराशिवाय बीजगणिताच्या दृष्टीनें आणखी चार प्रकार दृष्टीस पडतात. ते धन, ऋण, काल्पनिक आणि संयुक्त ( खऱ्या व काल्पनिक ह्यांचें मिश्रण). त्यांतील काल्पनिक संख्या म्हणजे ज्यांत $\sqrt{-१}$ हा एक अवयव ( फॅक्टर ) असतो त्या होत. धन किंवा ऋण संख्यांचा वर्ग नेहमी धन (+ चिन्ह ज्याला आहे असा ) असतो; वर्ग हा ऋण कधींच नसतो. अर्थात् –१ ह्या ऋण संख्येला वास्तविक वर्गमूळच नाहीं. परंतु तिला एक तऱ्हेचें काल्पनिक वर्गमूळ आहे असें समजल्यानें पुष्कळशीं बीजगत (अलजिब्राइक) उदाहरणें सोडविण्यास मदत होते म्हणून $\sqrt{-१}$ हिला अस्तित्व आहे असें कल्पिलें आहे. ही एक काल्पनिक संख्या म्हणून मानतात. अशा तऱ्हेच्या काल्पनिक संख्या अनेक आहेत. उदाहरणासाठीः—

$\sqrt{१} = १$; –१ म्हणजे १ ह्याचीं ( किंवा कोणत्याहि संख्येची ) वर्गमूळें २ आहेत तशी घनमूळें ३ आहेत; चतुर्थमूळें ४, पंचममूळें ५, साधारणतः 'प' प्रतीचीं मूळें 'प' असतात. ह्यांतील एक मूळ १ हें नेहमीचें असतें व बाकीची काल्पनिक असतात. ह्यांचें सविस्तर विवेचन बीजगणितांत येईल. येथें थोडेसें दिग्दर्शन मात्र केलें आहे.

उदा. $\sqrt[३]{१} = १, -१+\sqrt{-३}$ ; $\sqrt[४]{१} = \pm १, \pm\sqrt{-१}$

हीं सर्व मुळें $क्ष^{३} = १$, $(क्ष-१)(क्ष^{२} + क्ष + १) = ०$ अर्थात पहिल्या अवयवावरून क्ष = १ ही किंमत आली व दुसरा अवयव म्हणजे वर्गसमीकरण आहे. त्यावरून $क्ष = \frac{-१+\sqrt{१-४}}{२} = \frac{-१+\sqrt{-३}}{२}$ अशा किंमती झाल्या.

तसेंच $क्ष^{४} = १$ ह्यापासून क्षच्या चार किंमती येतात. $क्ष^{५} = १$ ह्यापासून ५ किंमती येतील. असेंच इतरत्र समजावें.

श्रेढीव्यवहारः—हा हल्लीं बीजगणितांत देतात. भरतखंडांतील प्राचीन गणित्यांनीं गणितश्रेढी व भूमितिश्रेढी ह्या दोन प्रकारच्या श्रेढींचें गणित केलेलें आहे व ते व्यक्तसंख्यापुरतें अंकगणितांत व सूत्ररूपानें बीजगणितांतहि येतें.

गणितश्रेढीचें उदाहरणः—

$$५ + ७ + ९ + ११ + \ldots + २७ = ६ (१० + ११ \times २) = १९२$$

५ + ७ +... + २७ ही गणितश्रेढी झाली. श्रेढी म्हणजे ( अंकांची ) मालिका अर्थात विशिष्ट नियमानें बनविलेली. ह्या उदाहरणांत हा विशिष्ट नियम म्हणजे ह्या मालिकेंतील कोणतीहि संख्या ( उदा. ११ ) ही मागच्या ( ९ ह्या ) संख्येहून २ नीं अधिक आहे. ह्या मालिकेंत एकंदर १२ रकमा आहेत. त्यांची बेरीज काढणें, शेवटची रक्कम काढणें इत्यादीकरितां सूत्रें ( विशिष्ट नियम ) आहेत. पहिली रक्कम हिला आदि, वदन, मुख असें म्हणतात. अंतर जें २ त्याला चय म्हणतात. शेवटच्या रकमेस अंत्यराशि किंवा अंत्यधन म्हणतात. एकंदर पदांची ( रकमांची ) संख्या

हिला. गच्छ किंवा पद (पदसंख्या) म्हणतात. आणि सर्व पदांच्या बेरजेस सर्वधन, श्रेढीफळ, संकलितं इ. नांवें आहेत.

भूमिति श्रेढी गुण श्रेढीः— ह्या श्रेढींत कोणतीहि रक्कम मागच्या पदाच्या कांहीं ठराविक पटीइतकी असते.

उदा. ५ + १५ + ४५ + १३५ + ४०५ + १२१५... ... + ३६४५

ह्या श्रेढींत प्रत्येक रक्कम मागच्या पदाच्या तिप्पट आहे. येथें चय ३ हा गुणचय आहे असें म्हणतात.

$$१ + २ + ३ + \ldots + न = न\frac{(न+१)}{२}$$

$$१ + ३ + ६ + \ldots + \frac{न(न+१)}{२} = \frac{न(न+१)(न+२)}{२\times३}$$

$$१^{२} + २^{२} + ३^{२} + \ldots + न^{२} = \frac{न(न+१)(२न+१)}{६}$$

$$१^{३} + २^{३} + ३^{३} + \ldots + न^{३} = \left\{\frac{न(न+१)}{२}\right\}^{२}$$

इत्यादि सूत्रें आपल्या पूर्वजांस माहित होतीं. पण गान किंवा व्युत्क्रम श्रेढी (हर्मानिक प्रोग्रेशन) म्हणजे $१ + \frac{१}{२} + \frac{१}{३} + \ldots + \frac{१}{न}$ हिचा विचार त्यांनीं केलेला नाहीं. तसेंच

$$१^{र} + २^{र} + ३^{र} + \ldots \quad \ldots \quad \ldots + न^{र}$$

ह्या सामान्य श्रेढीचा त्यांनीं विचार केलेला नाहीं. ह्या शेवटच्या श्रेढीची बेरीज बर्नूली ह्या यूरोपस्थ गृहस्थानें शोधून काढिली ती अशीः—

$$१^{र} + २^{र} + ३^{र} + \ldots\ldots + न^{र}$$

$$= \frac{न^{र+१}}{र+१} + \frac{न^{र}}{२} + \frac{१}{६}\cdot\frac{र}{\lfloor २} न^{र-१}$$

$$- \frac{१}{३०}\,\frac{र(र-१)(र-२)}{\lfloor ४} न^{र-३} + इ.$$

ह्यांतील 'न' च्या निरनिराळ्या घातांच्या गुणकांतील $\frac{१}{६}, \frac{१}{३०}, \frac{१}{४२}$ वगैरे अपूर्णांक इतर अनेक श्रेढींतून आढळून येतात म्हणून ते फार महत्त्वाचे आहेत. ते बर्नूलीनें शोधिलें म्हणून ते त्याच्या नांवांतील आद्याक्षरानें दर्शविले जातात. $\frac{१}{६} = ब_{१}; \frac{१}{३०} = ब_{३}; \frac{१}{४२} = ब_{५}; \frac{१}{३०} = ब_{७}; ब_{९} = \frac{५}{६६}$.

उदा. $१^{५} + २^{५} + ३^{५} + \ldots + न^{५}$

$$= \frac{न^{६}}{६} + \frac{न^{५}}{२} + \frac{१}{६}\cdot\frac{५}{\lfloor २} न^{४} - \frac{१}{३०}\cdot\frac{५.४.३}{\lfloor ४} न^{२}$$

$$= \frac{न^{६}}{६} + \frac{न^{५}}{२} + \frac{५}{१२} न^{४} - \quad \times न^{२}.$$

भद्रगणित.—( मांत्रिक चौरस अथवा कोष्टकें अथवा समयुति कोष्टकें. ) एका चौरसाच्या चौकटीपासून लांबी व रुंदीकाढून सारखे भाग पाडावयाचे; व त्यांत एकापासून ( किंवा वाटेल त्या इष्ट संख्येपासून ) आरंभ करून क्रमानें असे विभागावयाचे कीं, कोणत्याहि आडव्या व उभ्या ओळींतील अंकांची बेरीज सारखीच यावी. कोणत्याहि अंकाची पुनरुक्ती होऊं द्यावयाची नाहीं.

सार्वी तत्त्वेंः— ज्या वेळेस स्पष्ट सांगितलें नसेल त्या वेळेस एकापासून संख्या घ्यावयाच्या. समासांतील कोष्टकांत एका ओळींत घरें ५ आहेत. त्यामुळें एकंदर घरें २५ असून १ पासून २५ अंकांपर्यंतची बेरीज $\frac{२५(१+२५)}{२} = ३२५$ हीं सर्व चौकटींतील अंकांची बेरीज झाली. व ती पांच ओळींत (आडव्या किंवा उभ्या ओळींचाच विचार केल्यास) विभागलेली आहे. म्हणून प्रत्येक ओळींतील आंकड्यांची बेरीज ६५ असली पाहिजे. एकापासून आंकडे न भरतां ३ पासून भरले तर प्रत्येक आंकडा दोहोंनीं वाढलेला असेल. अशी वाढ ओळींतील पांचहि घरांत होईल म्हणून अशा वेळीं प्रत्येक ओळींतील अंकांची बेरीज ७५ होईल हें उघड आहे. वरीलप्रमाणेंच कोष्टकांतील ओळींत कितीहि घरें असलीं तरी एका ओळींतील अंकांची बेरीज काढितां येईल श्रेढीगणित हा अंकगणिताचा एक भाग पुर्वीपासून समजला जात असून आतांच तो त्यांतून कां वगळला आहे हें समजत नाहीं. श्रेढी गणिताशीं ह्या विषयाचा बराच संबंध आहे हें उघड आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १९ | २५ | १ | ७ | १३ |
| २४ | ५ | ६ | १२ | १८ |
| ४ | १० | ११ | १७ | २३ |
| ९ | १५ | १६ | २२ | ३ |
| १४ | २० | २१ | २ | ८ |

कोष्टकें भरण्याची रीतः—मूळचा आंकडा एक किंवा काय असेल तो कोठेंहि भरला तरी चालेल. नंतर त्या घरापासून कर्णरेषेनें म्हणजे बुद्धिबळांतील उंटाच्या गती-प्रमाणें उजव्या हाताकडे घरें सारखीं भरींत जावीं. ओळ संपली कीं दुसरा आंकडा दुसऱ्या ओळींतील कडेच्या घरांत भरावयाचा हें दिलेल्या कोष्टकावरून स्पष्ट होईलच.

विषमसंख्याकोष्टकें अशा रीतीनें भरतां येतात. पण समसंख्याकोष्टकें येत नाहींत; खालीं कोष्टकें दिली आहेत त्यांवरून सर्व दिसून येईलच.

अंकगणिताच्या ह्या भागावर अद्याप बरेच परिश्रम करण्या-सारखे आहेत.

| | | |
|---|---|---|
| क | ख | ग |
| त | १ | थ |
| प | फ | ब |

उपपत्ति—कोणत्याहि एका घरांत एक हा आंकडा पाहिजेच. बाकीच्या घरांत क, ख हे अज्ञातवर्ण समजूं. तर क+ख+ग = १५=त+थ+१=प+फ+ब = क+त+प = ख+फ +१ = ग+थ+ब अशीं सहा समीकरणें झालीं. परंतु अज्ञात-वर्ण आठ आहेत. म्हणून आठ समीकरणें पाहिजेत. तीं दोन

जास्त अटी घातल्या म्हणजे मिळतील. ती अट म्हणजे कर्ण-रेषेंतल्या घरांची बेरीज ही १५ च आली पाहिजे. अशा तऱ्हेनें हीं समीकरणें सोडविलीं पाहिजेत. पण एका ओळींत चार घरें असलीं तर सर्व घरें १६ येणारच. म्हणजे अज्ञात वर्ण १६−१ = १५ राहणार. परंतु समीकरणें ४+४+२ = १०च येणार. म्हणून आणखी पांच अटी पाहिजेत. आपल्यास हव्या तशा या अटी घेतां येतील. उदाहरणार्थ खालीं समयुति चौरस दिला आहे.

| १२ | १९ | २ | ७ |
|---|---|---|---|
| ६ | ३ | १६ | १५ |
| १८ | १३ | ८ | १ |
| ४ | ५ | १४ | १७ |

यांतील प्रत्येक ओळींतील अंकांची बेरीज ४० येते. उभ्या रकान्यांतील कर्णरेषेंतील व कोणत्याहि जवळच्या चार घरांतील चौरसांतील अंकांची बेरीजहि ४० होते.

एका यूरोपियनानें ह्या विषयावर १ ग्रंथ लिहिला आहे. आपल्या पूर्वजांचेंहि इकडे लक्ष वेधलें होतें. नवग्रह कोष्टकासंबंधीं खालील श्लोक ऐकिवांत आहेत व पुढील दोन श्लोकांत चार घरांचीं इष्ट युति देणारीं कोष्टकें कशीं करावीं हें सांगितलें आहे.

| ८ | १ | ६ |
|---|---|---|
| ३ | ५ | ७ |
| ४ | ९ | २ |

अष्टैकषट्च, त्रिपंचसप्तच।
चतुर्नवद्वी, युतिस्तु पंचदश ॥१॥

अष्टैकशून्यं दशरुद्रशून्यं।
चत्वारिपंचद्व्यसप्तरन्ध्रै:।
शून्यं च शून्यं रविषट्कवह्निः॥२॥
वांछाकृतार्थे कृतमेकहीनं द्विकेग्रहे षोड
शसप्तनागे। तिथौदिशायां प्रथमे द्विसप्त-
शष्ठ त्रयाष्टौ च कु वेद बाणाः ॥३॥

| १५ | १० | ३ | ६ |
|---|---|---|---|
| ४ | ५ | १६ | ९ |
| १४ | ११ | २ | ७ |
| १ | ८ | १३ | १२ |

हा समयुति चौरस ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर खोदलेला आहे. ह्यांत आडव्या उभ्या ओळी २ कर्ण रेषा, कोणतीहि जवळचीं चार घरें घेऊन झालेले पोट चौरस ह्यांतील अंकांचीं बेरीज सारखी आहे येवढेंच नव्हे तर ६+ ४+ ११ + १३, ३ × ९ × ८ १४;अशा विशिष्ट क्रमानें घेतलेल्या अंकांची युतीहि ३४भरते.

बुद्धिबळांतील घोड्याच्या गतीनें आंकडे भरून कांहीं समयुतिकोष्टकें तयार करतां येतात.

ह्या विषयासंबंधीं भरपूर माहिती एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका ह्यांत मॅजिक स्क्वेअर्स ह्या प्रकरणांत दिली आहे.

आ वं र्त दं शां श च म त्का र

$$\frac{१}{७} = .\dot{१}४२८५\dot{७}$$
$$\frac{२}{७} = \dot{२}८५७१\dot{४}$$
$$\frac{३}{७} = .\dot{४}२८५७\dot{१}$$
$$\frac{४}{७} = .\dot{५}७१४२\dot{८}$$
$$\frac{५}{७} = .\dot{७}१४२८\dot{५} \text{ इ.}$$

वरील संख्येत आंकडे तेच तेच पुन्हां आले आहेत व त्यांचा अनुक्रमहि तोच आहे. परंतु संख्येच्या आरंभींचा आंकडा मात्र बदलला आहे.

$$\frac{१}{२७} = .०३\dot{७};\ \frac{१}{३७} = .\dot{०}२\dot{७} \text{ इ.}$$

$\frac{१}{७}$ वैगेर अपूर्णांकांचीं जीं आवर्तदशांशांत रूपें येतात त्यांतील आंकड्यांत खालीं दिल्याप्रमाणें चमत्कार दृष्टीस पडतो. [ $\frac{१}{७}$ ह्याच्या किंमतींत ] पहिला अंक १+चवथा ८ = ५+४ = २+७ = ९ व तेच तेच आंकडे पुनः पुनः येतात.

घातप्रकरण.—$(११)^२ = १२१,\ ११^३ = १३३१,\ ११^४ = १४६४१,\ १११^२ = १२३२१,\ (१११११११११)^२ = १२३४५६७८९८७६५४३२१$ तसेंच

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १, | ४, | ९, | १६, | २५, | ३६, | ४९, | ६४, | ८१, | १०० |
| | ० | १ | ४ | ९ | १६ | २५ | ३६ | ४९ | ६४ | ८१ |
| प्र. अंतरें | १, | ३, | ५, | ७, | ९, | ११, | १३, | १५, | १७, | १९ |
| द्वि. अंतरें | ० | १ | ३ | ५ | ७ | ९ | ११ … | … | … | … |
| तृ. अंतरें | १ | २, | २, | २, | २, | २, | २ … | … | … | … … |

असेंच एक आदी अंकांचे घन घेऊन अंतरें काढलीं तर चतुर्थ अंतरें ६ = २×३ = |३. तसेंच चतुर्घात घेऊन त्यांचीं अंतरें काढल्यास पंचम अंतरें |४. म्हणजे ४×३×२×१ = २४ अशीं येतात.

एकादी अंकांच्या वर्गांच्या शेवटीं१,४,९, ६, ५,६,९,४,१, हे आंकडे क्रमानें येतात. घनांच्या शेवटीं १, ८, ७, ४, ५, ६, ३, २, ९या क्रमानें येतात. आतां पहिल्या अंकमालेंत ( प+ति = दु+च. ) १+९ = ४+६ = ५×(२) = १०. तसेंच दुसऱ्या अंकमालिकेंत पहिला १+शेवटचा ९ = १० = दुस. ८+९. वा २ = ति ७+७ वा ३ = इ.

चतुर्थघाताच्या शेवटीं ५, ६ किंवा १ हे अंक येतात. $१^४ = १;\ २^४ = १६;\ ३^४ = ८१;\ ४^४ = २५६.$

कोणत्याहि संख्येच्या पंचघाताचा शेवटचा अंक त्या संख्येच्या शेवटच्या अंकाइतकाच असतो. उदाहरण.— $२^५ = ३२,\ ३^५ = २४३,\ ४^५ = १०२४,\ ५^५ = ३१२५$ वगैरे.

५ व ६ यांचा कोणताहि घात केला तरी त्याच्या शेवटीं अनुक्रमें ५ व ६ हे अंक असतात.

द्विपदविस्ताराचे गुणक घेऊन कांहीं चमत्कार करून पाहूं.

$$३^३ - ३.२^३ + ३.१^३ = २७ - २४ + ३ = ६$$
$$४^४ - ४.३^४ + ६.२^४ - ४.१^४ = २५६ - ३२४ + ९६ - ४ = ३५२ - ३२८ = २४ = |४.$$
$$४^३ - ३.३^३ + ३.२^३ - १^३ = ६४ - ८१ + २४ - १ = ६ = |३$$
$$४^३ - ४.३^३ + ६.२^३ - ४.१^३ = ६४ - १०८ + ४८ - ४ = ० = ३^२ - ३.२^३ + ३.१^२$$

अंकचमत्कारः—

( १ ) ३७×३ = १११; ३७×६ = २२२ इत्यादि.

( २ ) ७३×१ = ७३; ७३×२ = १४६.

यांत गुणाकारांतील आंकड्यांची बेरिज ही गुणक अधिक ९ बरोबर असते जसें. ७ + ३ = १ + ९; १+४ + ६ = २ + ९. गुणाकारांत ४ आंकडे आले तर हा नियम लागू पडत नाहीं.

(३)१२३४५६७८९×९ = १११११११०१

१२३४५६७८९×१८ = २२२२२२२२०२ इत्यादि.

(४)९८७६५४३२१×२७ = २६६६६६६६६६७

९८७६५४३२१×७२ = ७१११११११११२

९८७६५४३२१×४५ = ४४४४४४४४४४५ इत्यादि.

यांत खुबी ही कीं गुणाकारांतील व गुणकांतील पहिला व शेवटचा आंकडा हे सारखेच असून गुणाकारांतले मधले ९ आंकडे तेच तेच असून ते असे आहेत कीं पहिल्या आंकड्याची व त्यांच्यापैकीं एकाची बेरीज ८ येते.

(५)१४२८५७×२ = २८५७१४

१४२८५७×३ = ४२८५७१ इत्यादि.

यांत तेच आंकडे त्याच क्रमानें येतात.

( ६ ) ७६९२३×३ = २३०७६९
७६९२३×४ = ३०७६९२इ. } तेच आंकडे त्याच क्रमानें येतात.

पण १२ पटीपासून नियम बदलतो.

( ७ ) २७१×४१ = ११११११ इत्यादि.

( ८ ) ५४२×४१ = २२२२२ इत्यादि.

( ९ ) $\frac{३५}{७०} + \frac{१४८}{२९६} =$ १ यांतील खुबी म्हणजे या दोन अपूर्णांकांत १ पासून ९ पर्यंत सर्व आंकडे कोठें ना कोठें तरी आले आहेत.

( १० ) खालच्या उदाहरणांत १ पासून ९ पर्यंत आंकडे घेऊन १०० बेरीज केली आहे.

९×८+७+६+५+४+३+२+१ = १००

१५+३६+४७+२ = १००

$१\frac{३}{६} + ९८\frac{२७}{५४} = १००$

$७० + २४\frac{९}{१८} + ५\frac{३}{६} = १००$

( ११ ) दोन आंकड्यांच्या दोन संख्या असून जर त्यांच्या शेवटच्या आकड्यांची बेरीज १० असेल व पहिले आंकडे तेंच असतील तर गुणाकार चटकन येतो.

उदाहणार्थ ७२×७८ = ५६१६

येथें मांडण्याची तऱ्हा म्हणजे ८×२ = १६ व

७× ( ७+१ ) = ५६

९२×९८ = ९०१६ इत्यादि

( १२ ) ३६ या अंकाचा चमत्कारः—

३ व ६ या अंकांमध्यें ५ हा आंकडा व या दोन आंकड्यांच्या मागें ४ हा आंकडा सारखे वेळ लिहिला तर बनणारी संख्या वर्ग असते. जितके वेळ ५ आंकडा घेतला असेल त्याच्यापेक्षां एक वेळ अधिक ६ आंकडा पुनः पुनः घेऊन बनलेल्या संख्येचा तो वर्ग असतो.

उदाहरणार्थ—$४३५६ = ६६^{२}$; $४४३५५६ = ६६६^{२}$.

( १३ ) ६३ यातील ६४३ या आंकड्यांमध्यें जितके वेळ २ तितकेच वेळ मागें ७ लिहिले तर बनणारी संख्या जितके २ घेतले असतील त्याच्यापेक्षां एक वेळ अधिक ७ व ९ हे आंकडे घेऊन बनणाऱ्या निरनिराळ्या संख्यांचा गुणाकार असतो.

७६२३ = ७७ × ९९

७७६२२३ = ७७७ × ९९९

( १४ ) कोणत्याही समानांक पंक्तीचा वर्गः— पुनरुक्त अंकाचा वर्ग घेऊन त्याची एकपट, दुप्पट ...... जितके अंक असतील तितक्या पटीपर्यंत घेऊन याच पटी उलट क्रमानें घेऊन लिहाव्या व बेरीज करावी उदाहरणार्थ $४४४^{२} = १९७१३६$ कारण $४^{२} = १६$

```
16
 32
  48
   32
    16
---------
197136
```

४४४ ह्या संख्येंत ३ आंकडे असल्यानें १६, ३२, ४८ अशा ३ पटी घेतल्या आहेत.

१२३४५६७९ × ९ = १११११११११

तसेंच१२३४५६७९ह्याला ९ च्या पटीनें गुणल्यास गुणाकारांत सर्व आंकडे सारखे येतात. याच प्रकारें अनेक शोध करीत गेल्यास अनंत चमत्कार दृष्टीस पडतील. पहावयास वेळ व समजावयास बुद्धि मात्र पाहिजे.

आतांपर्यंत अंकांचे गुणधर्म व त्यांच्यावर करतां येण्यासारख्या निरनिराळ्या क्रिया यांची माहिती सांगितली. व्यवहारांतलीं निरनिराळीं उदाहरणें घेऊन त्यांनां हीं तत्वें लागू केलीं असतां, सरळ व्याज, चक्रवाढव्याज, कसर, ठेव वगैरे विषयांवरचे प्रश्न सोडवितां येतात. ह्यासंबंधीं माहिती गणितपुस्तकांत सांपडेल म्हणून येथें ती देत नाहीं.

उदाहरणें सोडविण्याच्या रीतीः—(१, इष्टकर्मः जेथें दोन किंवा अधिक वस्तुंच्या मधील गुणोत्तर प्रमाण दिलें असेल तेथें त्या वस्तुंचीं मानें वाटेल तीं घेतां येतात. व मग सर्व क्रिया करून शेवटीं दृष्ट राशीवरून अनुपातानें [ त्रैराशिक, . बहुराशिकानें ] त्या वस्तुंचीं मानें काढितां येतात.

सोपेसें उदाः—दोन संख्या २:३ ह्या प्रमाणांत आहेत. व ७ हें दोहोंमधील अंतर आहे तर त्या संख्या कोणत्या.

यांत एक संख्या ४ धरली तर दुसरी ६ झाली. अंतर २ झालें. हें कल्पितमानावरून पण दृष्ट म्ह. दिलेले अंतर ७ आहे. अर्थात संख्यां १४, २१ ह्या झाल्या.

(२) विलोमविधि—दृष्ट [ किंवा दिलेली संख्या ] संख्येपासून उलट सर्व क्रिया उदाहरणांत सांगिल्याप्रमाणें करीत येणें. उदा:—एका मनुष्यानें आपल्या खिशांतील अर्धे पैसे व २ अधीक इतके एका भिकाऱ्यास दिले. उरलेल्या पैशांचा $\frac{२}{३}$ व ३ पैसे दुसऱ्यास देऊन बाकी पैशांचा तिसरा हिस्सा व ३ इतके तिसऱ्यास दिल्यावर त्याजजवळ ३ पैसे राहिले तर त्याजजवळ मूळ पैसे किती ?

येथें शेवटकडून क्रिया उलटी करित जावें. म्हणजे उत्तर येतें जसें:— $३ + ३ = ६$

$$\frac{१}{१} - \frac{१}{३} = \frac{२}{३} ; \quad \frac{२}{३} : १ :: ६ = ९$$

$$९ + ३ = १२; \quad \frac{३}{४} : १ :: १२ = १६$$

$$१६ + २ = १८; \; १८ \times २ = ३६ \text{ उत्तर}$$

(३) मिश्रव्यवहार:—एक बैलास ६ रु. व एक घोड्यास ८रु. अशीं १०० जनावरें ७८० रुपयांस घेतलीं. तर किती बैल खरेदी केले? ह्यांत प्रमाण दिलें नसल्यानें इष्ट विधि उपयोगी पडत नाहीं. पण इष्ट प्रमाण वाटेल तें घ्यावें व मागाहून किंमतींत फरक पडेल त्यावरून तें प्रमाण कमीजास्त करावें. उदाहरणार्थ ३० बैल व ७० घोडे खरेदी केले अशी कल्पना केल्यास किंमत $३० \times ६ + ७० \times ८ = १८० + ५६० = ७४०$ हें दृष्ट ७८० रु. यांपेक्षां ४० नीं कमी आहेत. अर्थात कांहीं बैल कमी करून तितकेच घोडे घेतले पाहिजेत. एका बैलाऐवजीं एक घोडा घेतला तर एकंदर रक्कम २ नीं वाढते म्ह. २० बैल कमी करून तितकेच घोडे खरेदी केले असतां १० बैल व ९० घोडे हें उत्तर आलें.

अवघड उदाहरणें ह्याच जातींचीं विशेषतः असतात. हीं उदा. सोडविणें म्ह. द्विवर्ण समीकरण युगल सोडविणें होय. वर्ग, घनसमीकरणें ( अथवा ह्याहि पेक्षां उच्च घातांचीं ) ज्या उदाहरणांवरून येतात अशीं उदाहरणें अंकगणितानें सोडवितां येत नाहींत. भूमितीमध्यें वर्गसमीकरण एकपृष्ठभूमितींत ( प्लेन ) व घनसमीकरण त्रिपृष्ठ किंवा घन (सॉलिड) भूमितीनें सोडवितां येतात. बीजगणितांतील समीकरण मीमांसा प्रकरणांत पंचघात समीकरणापर्यंत समीकरण सोपपत्तीक रीतीनें सोडविलीं आहेत. ह्याप्रमाणें बीजगणित हें जरी अंकगणित व भूमिति ह्यांपेक्षां श्रेष्ठ दर्जाचें ठरतें. तरी समीकरण हें यंत्रासारखें असल्यानें तें सोडविण्यांत बुद्धीला चालन मिळत नाहीं. तें अंकगणितांत व भूमितींत मिळतें व केव्हां केव्हां अंकगणित व भूमिति ह्यांच्या रीती संक्षिप्त व आल्हादकारक असतात. अंकगणितांतील उदाहरणें ( बुद्धीला चालन मिळण्याच्या दृष्टीनें ) अंकगणिताच्या रीतीनेंच सोडविणें जास्त इष्ट आहे.

ह्याप्रमाणें अंकगणित विषयाची माहिती संक्षेपतः अनेक बाजूंनीं विचार करून दिलेली आहे. विस्तारभयास्तव यापेक्षां सविस्तर देतां येत नाहीं. परंतु हल्लीं कोणत्या दिशेनें ह्या विषयांत प्रगति चालू आहे व भद्रगणित, अखंडपूर्णांक, अविभाज्य संख्या व सामान्यतः संख्यांचे गुणधर्म, वर्गघनादि उच्च प्रतीचीं समीकरणविषयक उदाहरणें अंकगणिताच्याच रीतीनें सोडविणें इ. शाखांवर अद्याप बरेच शोध लावितां येण्यासारखे आहेत(ले.—एस. के. आठल्ये, एम्. ए.).

**अंकचक्र**—कालगणनेंतील 'अंकचक्र' मद्रास इलाख्यांतील गंजम जिल्ह्यांत ओंको किंवा अंक नांवाच्या चांद्र संवत्सरचक्रानुसार वर्ष मानितात. वर्षारंभ भाद्रपद शुद्ध १२ ला होतो. हें चक्र ५९ वर्षांचें असतें. पण वर्षगणनेंत एक वैशिष्ट्य असें आहे कीं, ६ हें वर्ष आणि ६ किंवा ० ज्याच्या शेवटीं आहे असें कोणतेंहि वर्ष गणनेंत धरीत नाहींत. उदाहरणार्थ, ५ या वर्षामागून ७ असें वर्ष मोजतात; असें करण्याचें कारण, कांहीं विशिष्ट संख्यांबद्दलची बरीवाईट कल्पना कदाचित् असूं शकेल. या अंकचक्र–कालगणनेचा उगम अद्याप आढळला नाहीं; तथापि १२ व्या शतकांत व पुढें या देशांत व ओरिसा येथें राज्य करणारे जे गंग राजे त्यांच्यासंबंधींच्या इतिहासांतून हिच्या उपयोगाबद्दलची माहिती मिळण्याचा संभव आहे. शिवाय ओरिसामध्यें वहिवाटींत असलेल्या विलायती आणि अमली शकांत सुद्धां वर्षारंभ भाद्रपद शुक्ल १२ पासून धरितात. यांवरून ७ व्या शतकांतील पहिला गंग राजा जो राजसिंह–इंद्रवर्मन् याच्या राज्याभिषेकाचा हा दिवस असला पाहिजे असें दिसतें; व त्या दिवसाच्या स्मरणार्थ हे शक चालू केले असले पाहिजेत

**अंकलगी.**—मुंबई इलाखा. बेळगांव जिल्हा. मार्कंडेय नदीकाठीं गोकाकच्या नैर्ऋत्येस सुमारें १५ मैलांवर हें २००० लोकवस्तीचें गांव आहे. येथें लक्ष्मीचें देवालय असून लिंगाइतांचा एक मठ आहे. इ. स. १८३८ सालीं बेळगांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें. त्यापूर्वी जिल्ह्याचें मुख्य ठिकाण गोकाक, माणोली, मुरगोड अंकलगी व बेळगांव यांपैकी एक असावें अशा सुचना आल्या होत्या.

**अंकलेश्वर तालुका.**—मुंबई इलाखा.भडोच जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. उ. अ.२१° २५' ते २१° ४३' पू.रे. ७२° ३५'ते७३° ८'. क्षेत्रफळ २९४ चौरसमैल. लोकसंख्या( १९११ ) ६८९३१. या तालुक्यांत १ मोठें गांव व १०४ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४ मध्यें एकंदर उत्पन्न ५.९ लाख रुपये होतें या तालुक्यांत पाणीपुरवठा चांगला आहे.

**गांव.**—मुंबई इलाखा. भडोच जिल्ह्यांतील त्याच तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. २१° ३८' व पू. रे. ७२° ५९'. भडोचच्या दक्षिणेस सहा मैलांवर बी. बी. सी. आय. रेलवेचें हें एक स्टेशन आहे. लोकसंख्या १९२१ सालीं ११२६२ इतकी होती. व्यापाराचा मुख्य जिन्नस कापूस असून रुई काढण्याचे कांहीं कारखाने आहेत. या ठिकाणीं पूर्वी कागद तयार करीत

असत परंतु हल्लीं तो धंदा बसला आहे. इ. स. १८७६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न २३, ६०० रुपये होतें. [इं. गॅ.५. ३८६.]

अंकलेश्वरासंबंधीं ऐतिहासिक उल्लेख पुढीलप्रमाणें आढळतातः—गुर्जरराजा दुसरा दद्द ( इ. स ६२९–६४२ ) यानें ब्राह्मणांनां गांवें इनाम दिल्याबद्दलचे जे ताम्रपट सांपडले आहेत त्यांत अक्रूरेश्वर किंवा अंकुलेश्वर म्हणून जें गांवाचें नांव येतें तें अंकलेश्वराचेंच प्राचीन नांव असावें असें डॉ. बुल्हर म्हणतात ( इं. अँ.५. ११३; १३' १९३; मुं. गॅ. पु.१. भा. २ पा. ३१४.) अंकलेश्वराचा महाल इंग्रजास दिला नाहीं फक्त त्याबद्दल पाऊणलाख रुपये करार केले आहेत. परंतु सरकारचा कमाविसदार न वसूं देतां इंग्रज आपला कमाविसदार ठेवतात हें करारावरुद्ध आहे. निदान महालाचा वसूल पावणेदोन लक्ष असल्यामुळें राहिलेले एक लक्ष सरकारांत दरसाल भरण्याविषयीं जनरलास बोलतें वगैरेबद्दलचीं, शके १६९७ अश्विनपासून १६९८ च्या वैशाखपर्यंतचीं लक्ष्मण आपाजी यांस पाठविलेलीं ७।८ तक्रारवजा पत्रें रा. खं. १२ ले ९९ ते १५४ पर्यंत मधून मधून आहेत.

श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक नाना यांना लिहिण्यांत आलेल्या शके १७०१ मार्गशीर्षमधील पत्रांत जलचर नर्मदा उतरून अंकलेश्वरीं पोहोंचले वगैरे माहिती देऊन मदत मागविली आहे, असा उल्लेख रा. खं १० ते २४९ मध्यें आहे.

अंकलेश्वरास पूर्वी बंदर होतें तें मोंगलांनीं मोडलें, तेव्हां नवीन बंदर करण्याचा विचार आहे; पण भडोचकर रागावतील वगैरे वाटाघाट रा. खं. १० ले ३३४ मध्यें शके १७११ पौष वद्य १० च्या पत्रांत आहे.

**अंकाई टंकाई**—मुंबई. नाशिक जिल्हा.अंकाई हा नाशिक जिल्ह्यांतील सर्वांत मजबूत डोंगरी किल्ला येवल्याच्या उत्तरेस सहा मैलांवर मनमाड—अहमदनगर सडकेवर पायथ्यासून ९०० फूट उंच असलेल्या एका टेंकडीवर आहे. याचा माथा समुद्रसपाटीपासून ३२०० फूट उंचावर असून येथून खानदेश व गोदावरी कांठच्या सर्व प्रदेशाचा देखावा दिसतो. डोंगरावर चारी बाजूंनीं १५० पासून २०० फूट उभे तुटलेले कडे असलेला खडक आहे. याची चढण अतिशय बिकट असून उभी व खडकाळ आहे. यांत प्रवेश होण्यास सात तटांतून जावें लागतें. सर्वांत खालची वेस भक्कम बांधलेली असून फारच मजबूत आहे. पहिल्या वेशींतून गेल्यावर एका बिकट नागमोडी वाटेनें व खडकांत खोदलेल्या पायऱ्या चढून गेलें म्हणजे पुन्हां एक दरवाजा व तटबंदी लागते. यांतून पुढें गेलें म्हणजे एक अरुंद नागमोडी पायऱ्यांचा रस्ता खडकाच्या कड्याकडे जातो. येथेंहि एक दरवाजा व तटबंदी असून याच्यावर २५ माणसें बसून केवळ दगडांच्या साहाय्यानें वाटेल तितक्या लोकांस वर येण्यास प्रतिबंध करतील. वर जाण्यास हाच काय तो एकच मार्ग आहे. वर लिहिलेल्या पायऱ्यांच्या मार्गानें एका वेळीं एकच मनुष्य येऊं शकतो व दरवाज्यावर प्रसंग पडल्यास आग लावण्याकरितां लांकडांची रास केलेली असे. शेवटच्या दरवाज्याच्या आंतल्या बाजूस एक घुमट असलेलें चमत्कारिक घर असून तेथें खजिना होता असें सांगतात. माथ्यावर पुष्कळ खोल कोठारें असून त्यांतच पाण्याचीं टाकीं आहेत. त्याप्रमाणेंच दोन उघडीं टाकीं असून एका वाड्याचे अवशेषहि आहेत. याच टेंकडीच्या ईशान्येस एक मैलावर टंकाई नांवाची एक टेंकडी असून तिलाहि तटबंदी केलेली आहे.

पूर्वेस एका पक्क्या बांधलेल्या चौकीचे अवशेष असून या बाजूची चढण जरा सुलभ असल्यामुळें या चौकींतून तिच्यावर पहारा ठेवण्यांत येत असे. या वाटेनें अंकाई किल्ल्यांत अन्नसामुग्री वगैरे आणण्यांत येत असे. टंकाईचा उपयोग अंकाई येथील शिबंदीस अन्नसामुग्रीच्या कोठाराप्रमाणें होत असे.

इ. स. १६३५ मध्यें अंकाइ–टंकाई व आलका–पालका हे किल्ले शहाजहानाचा सेनापति खान खानान यानें घेतले. इ. स. १६६५ मध्यें थिवेनॉट यानें सुरत व औरंगाबाद यांच्यामधलि एक टप्पा म्हणून अंकाईचा उल्लेख केला आहे. शेवटच्या मराठ्यांच्या युद्धांत ले. कर्नल मॅकडोवेल याची तुकडी येथें ५ एप्रिल १८१८ रोजीं आली. तेव्हां किल्लेदारानें एकहि तोफ न डागतां हा मजबूत किल्ला लढाईची सर्व जय्यत तयारी असतां इंग्रजांच्या हवाली केला; व शिबंदीचे लोक ऐकेनात. तेव्हां त्यांना मोठमोठीं इनामें देऊन मोठ्या मुष्किलीनें त्यांची समजूत केली. हा किल्ला जर टिकाव धरता तर बाकीचे आजूबाजूचे किल्लेहि लवकर हस्तगत न होते.

अंकाई येथें दौंड–मनमाड रेल्वेचें एक स्टेशन आहे. अंकाई येथें ३ ब्राह्मणी लेणीं आहेत. पैकीं पहिलें लेणें किल्ल्याच्या चढणीवर दुसऱ्या दरवाजाच्या आंतील बाजूस असून त्यांत महादेवाचें लिंग आहे. याशिवाय कांहीं आकृती कोरलेल्या आहेत. हें दहाव्या किंवा अकराव्या शतकांतलें असावें. दुसरीं दोन माथ्यावर असलेल्या एका उंचवट्याच्या पायथ्याशीं आहेत. यांच्यामध्यें विशेषसें कोरींव काम नाहीं.

टंकाई टेंकडीच्या दक्षिणेकडील उतारावर अंकाई गांवाच्या बाजूस तोंड असलेलीं ७ जैन लेणीं आहेत. हीं लहान आहेत तथापि यांत पुष्कळ शिल्पकाम केलेलें आहे. परंतु त्यांतील बऱ्याच आकृती छिन्नभिन्न केल्या गेल्या आहेत. पहिलें लेणें दुमजली असून तळमजल्यांत वरेंचसें खोदकाम असून वरचा मजला साधा आहे. दुसरेंहि पहिल्याप्रमाणेंच दुमजली असून पुढचा भाग पहिल्याप्रमाणें मोकळा नसून बंद आहे व मध्यें एक एक दरवाजा आहे. तिसऱ्या लेण्यामध्यें पुढच्या बाजूस जाळी असून आंत इंद्र व अंबा यांच्या

कोरलेल्या मूर्ती आहेत. बाजूला जैन नग्नमूर्ति व तीर्थंकरांच्या मूर्ती आहेत. चौथ्या लेण्यामध्यें पुढें एक मोकळें दालन असून आंत दुसरें दालन आहे. यांत एक ११ व्या किंवा १२ शतकांतील लिपींत लिहिलेला अस्पष्ट शिलालेख आहे. बाकीचीं पूर्वेच्या बाजूस बरींच मोडकळीस आलेलीं व लहान असून आंत माती सांचली आहे.

**अंकिसा**—तहशिल शिरोंचा. जिल्हा चांदा. गोदावरीच्या डाव्या तीरावर शिरोंचाच्या दक्षिणेस १७ मैलांवर हें एक मोठें व सुपीक खेडें आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार आहे. जमीन उत्कृष्ट असून ज्वारी व मिरच्या यांचें पीक चांगलें येतें. या ठिकाणीं दोन तळीं असून एकाचे पाण्यावर सुमारें २० एकर भाताची लागवड होत असून दुसरें पिण्याच्या पाण्याकरितां राखून ठेवलें आहे. दर गुरुवारीं येथें बाजार भरतो. येथें प्राथमिक शिक्षणाची शाळा आहे.

**अंकेवालिया**— मुंबई, काठेवाडांतील एक छोटें संस्थान. हें लिमडीच्या उत्तरेस अजमासें चार मैलांवर भोईकाच्या ईशान्येस दहा मैलांवर व वढवाणच्या आग्नेयीस नऊ मैलांवर वसलेलें आहे. या तालुक्यांत अंकेवालिया, भरिभाड आणि धोली अशीं तीन गांवें आहेत. वढवाण भोगाव नदीच्या दक्षिणेस सुमारें तीन मैलांवर व लिमडी भोगांव नदीच्या उत्तरेस चार मैलांवर अंकेवालिया गांव वसलें आहे. हें संस्थान भोइका ठाण्याच्या हद्दींत असून स्वतंत्र खंडणी देणाऱ्यांपैकीं आहे. येथील तालुकदार रजपुत व लिमडी घराण्याच्या धाकट्या पातीचे आहेत. इ. स. १६९४ च्या सुमारास लिमडीच्या गादीवर असलेल्या भोजराजाचा दुसरा मुलगा जो सांगोजी तो यांचा आद्यपुरुष होय.

**अँकोना**—इटली हें याच नांवाच्या प्रांताच्या राजधानीचें शहर असून धर्माध्यक्षाचें राहण्याचें ठिकाण आहे. हें बंदर बोलोनाहून ब्रिंडिसीला जाणाऱ्या रेल्वे सडकेवर आहे. या शहराची लोकसंख्या १९०१ सालीं ५६८३५ होती. कोळसा, इमारतीचें लांकूड, धातु आणि ताग इतका माल परदेशाहून या बंदरांत येतो. या बंदराहून परगांवास जाणारा महत्त्वाचा माल म्हटला म्हणजे डांबर आणि कालशिअम कार्बाइड हा होय. साखर शुद्ध करण्याचें आणि जहाज तयार करण्याचें काम या बंदरीं लहान प्रमाणावर चालू आहे. येथें पूर्वी एक मोठें व्हीनसचें मंदीर होतें. तेथें हल्लीं एक ख्रिस्त मंदिर आहे. नकशीचें व कोरीव काम केलेल्या पुष्कळ इमारती आहेत. शहराच्या पूर्वेस मोठें बंदर आहे. येथें ग्रीक व्यापाऱ्यांनीं एक जांभळया रंगाचा कारखाना घातला होता. येथील लोक ग्रीक भाषा बोलत असत. रोमचें राष्ट्र अस्तित्वांत होतें तेव्हां सुद्धां येथील लोक स्वतःचें नाणें वापरीत असत.

ख्रिस्ती शकाच्या१७८ वर्षांपूर्वी इलिरियन युद्धामध्यें आरमाराचें ठिकाण म्हणून हें बंदर प्रसिद्ध होतें, पुढें सीझरनें तें आपल्या ताब्यांत घेतलें. येथें रोमन वसाहत केव्हां झाली तें कळत नाहीं. रोमन साम्राज्याचा ऱ्हास झाल्यानंतर गॉथ्स, लॉंबर्ड्स आणि सॅरसेन्स या लोकांनीं या बंदरावर हल्ला करून तें काबीज केलें; परंतु तें पुन्हां स्वतंत्र झालें. पुढें हें बंदर पोपच्या आधिपत्याखालीं अर्धवट प्रजासत्ताक होतें. परंतु इ. स. १५३२ मध्यें गॉन्झेगोनें तें सातव्या क्लेमन्टकरितां आपल्या ताब्यांत घेतलें. इ. स. १७९७ पासून पुढें तें फ्रेंचांच्या ताब्यांत गेलें. यापुढें एक महत्त्वाचा किल्ला म्हणून अँकोनाचें नांव इतिहासांत येतें.

**अँकोबार**.—अबिसीनिया देशांतील शोआ प्रांतांतील शहर. हे एके वेळीं शोआ प्रांताचें राजधानीचें शहर होतें. हें आडिस आबाबाच्या ईशान्येस ९० मैलांवर असून उत्तर अक्षांश, ९°, ३४' व पूर्व रेखांश ३९°, ५४' यांच्या दरम्यान आहे. १८९० सालीं दुसऱ्या मेनेलेकनें राजकीय कैदी या ठिकाणीं ठेवण्याची चाल पाडली. येथील लोकसंख्या सुमारें २,००० आहे.

**अंकोर**.—कांबोजमधील प्राचीन ख्मेर संस्कृतीचा अवशेष म्हणून असलेल्या पडक्या झडक्या इमारतींच्या समूहाला हें नांव आहे. टॉन्ले-सप या महासरोवराच्या उत्तरेस असणाऱ्या जंगलांत हे अवशेष असून त्यांपैकीं प्रमुख म्हणजे अंकोरथोम हें गांव आणि अंकोर-वात नांवाचें देवालय हीं दोन्हीं टॉन्ले-सपला मिळणाऱ्या सियेमरीप नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर आहेत. इतर याच तऱ्हेचे अवशेष नदीच्या दोन्ही किनाऱ्यांवर जवळच इकडे तिकडे पडले आहेत.

अंकोरथोम हें नदीपासून अजमासें पाव मैलावर आहे. आयमोनियरच्या मतें तिसऱ्या जयवर्मनच्या कारकीर्दीत (इ. स. ८६० त) या शहराच्या वसाहतीला सुरुवात होऊन ९०० च्या सुमाराला याचें काम पुरें झालें. हें गांव चौकोनी आकाराचें असून याचें क्षेत्रफळ सुमारें चार चौरस मैल आहे. याच्या भोंवतीं २० ते ३० फूट उंचीचा एक तट आहे. तटाला पांच मोठे दरवाजे असून त्याच्या आंत वर जंगल वाढलेले असे देवालयांचे व वाड्यांचे अवशेष आहेत. त्यांपैकीं मुख्य म्हणजेः—

(१) भोंवतालीं तट असलेल्या राजवाड्याचे अंश. या तटावर फिमीनकस म्हणून निमूळतें देवळासारखें बांधकाम आहे. याच्या पूर्वेस उत्तम नक्षीकाम असलेली एक गच्ची आहे.

(२) बेयोनचें देवालय. खांबाच्या गॅलरी असलेला एक चौरस प्राकार असून त्यांच्या आंत दुसरे चौकोनी सज्जे आहेत. त्यांमध्यें क्रूससारख्या आकाराची एक इमारत व त्या इमारतीच्या मधोमध घुडाशीं वर्तुळाकार असणारें एक मोठें शिखर आहे. सज्जावर मधून मधून बांधलेलीं अशीं पन्नास शिखरें असून त्यांवर ब्रह्मयाचीं चार तोंडें काढून त्यांनां बरीच शोभा आणिली आहे. एकंदरींत हें देवालय

ख्मेर अवशेषांतील विशेष लक्ष वेधण्यासारखें आहे असें म्हणतां येईल.

ख्मेर कलाकौशल्याचें अति उत्तम राखून ठेविलेलें उदाहरण म्हणजे अंकोर–वात होय. अंकोर-थोमच्या दक्षिणेस एका मैलाच्या आंत एका चौकोनी प्रकारांत हें आहे. प्राकाराभोंवतीं खंदक असून त्याची बाह्य सीमा ६,६६० यार्ड आहे. पश्चिम बाजूस खंदकावरून जाणारा एक पाव मैलाचा फरसबंदी रस्ता मुख्य इमारतीच्या मोठ्या दरवाज्याशीं नेऊन सोडला आहे. मूळचें हें देवालय ब्रह्मयाचें होतें; पण पुढें त्यांत बुद्धोपासना सुरू झाली. खि. श. १२ व्या शतकाच्या पूर्वार्धांत हें बांधिलें असा आयमोनियरचा तर्क आहे. याला तीन मजले असून त्यांचा एकमेकांशीं बाहेरच्या जिन्यांनीं संबंध ठेवला आहे. हे जिने अनेक आहेत; मजले वरच्या बाजूस आकारानें कमी होत गेले आहेत. अगदीं टोंकाला एक निमुळतें शिखर आहे. वरच्या दोन मजल्यांच्या गच्च्यांवर कोंपऱ्याशीं शिखरें बांधिलीं आहेत. दुसरा मजला आणि पश्चिमेकडील तीन द्वारें यांनां जोडणाऱ्या तीन गॅलरी आहेत; त्यांवर खांबावर उभारलेलें कमानदार छप्पर आहे. एक आडवी गॅलरी काढून या गॅलरी जोडल्या आहेत. ख्मेर–शिल्प गच भरलेलें पण एकजात असून त्यांत मुख्यतः माणसें, जनावरें व देव यांच्या प्रतिमा आढळतात. पुराणांतील प्रसंग, युद्धें, हे बहुधा या चित्रांचे विषय असतात. वेलपत्ती कांठांकरितां राखून ठेविलेली असते; खांबांच्या डोक्यांवर किंवा लांकडावर, भांड्यांवरहि वेलपत्ती काढतात. निरनिराळ्या रंगांचे वाळूचे दगड इमारतीच्या कामीं बहुधा वापरण्यांत येत. एक प्रकारचा जांभळा दगडहि वापरीत. या दगडाचे मोठमोठे ठोकळे करून सिमेंटशिवाय ते अगदीं बरोबर एकमेकांनां जोडण्यांत येत.

[ लंडन येथील "डेलीमेल" वर्तमानपत्राच्या २३ डिसेंबर १९२१ च्या "अंकांत सिटी दॅट वॉज ए जंगल" नांवाचा अंकोरविषयीं एक लेख आला आहे. त्यांतील कांहीं माहिती पुढें दिली आहे].

**आजचें अंकोर**:—गेल्या पंधरा वर्षांतच फ्रेंच इंडोचीनमधील अंकोर या प्राचीन शहरांतील मजा चांगल्या उघडकीस आल्या आहेत. स्फिंक्स एवढे मोठाले बुद्धाचे (ब्रह्मयाचे पाहिजे असें वाटतें) दगडी तोंडावळे ज्यांत आहेत असे पुष्कळ अवशेष परवांपर्यंत अफाट जंगलांतील गर्द झाडींत लोपून गेल्यानें जगाच्या निदर्शनास आले नव्हते. १९०७ सालीं बटम बँग आणि सियेमरीप हे प्रांत फ्रान्सच्या ताब्यांत गेल्यावर फ्रेंच इंजिनियर लोकांचें पहिलें काम या अवशेषांवरील जंगलाचें अफाट आवरण काढण्याचें होऊन बसलें. हें काम हलकें सलकें नसून अजमासें एक हजार वर्षांचीं सृष्टीची वाढ त्यांना उपटून टाकावयाची होती.

यांतील लोक अकेडेमीच्या देखरेखीखालीं येथें काम करीत होते. या घोर जंगलांतून मार्ग काढीत असतां त्यांनां वाघ, सर्प व इतर विचित्र क्रूर पशू भेटले; पण शेवटीं त्यांनीं पुतळे, देवळें व पुष्कळ जुन्या काळांतील गोष्टी संशोधिल्या. त्या सर्वांवर हिरवळ वाढली होती.

पण आजचें अंकोर शहर कसें आहे? जंगलांतील पायवाटांऐवजीं मोटार रस्ते दिसतात. वाघ, सर्प वगैरे प्राणी दिसत नाहींत. या शहराचें सौंदर्य जगाला स्पष्ट दिसत आहे. व प्राचीन अवशेषांशेजारीच एक अर्वाचीन बंगला झाला आहे. दरवर्षी या शहराला येणाऱ्यांची संख्या वाढती आहे. जगांतील अपूर्व देखाव्यांपैकीं हा एक आहे यांत शंका नाहीं.

**अंकोला तालुका**.—मुंबई इलाखा उत्तर कानडा जिल्ह्यांतील पश्चिमेकडील तालुका. उ. अ. १४° ३४' ते १४° ५३' व पू. रे. ७४° १५' ते ७४° ४०'. क्षेत्रफळ ३७५ चौरस मैल. या तालुक्यांत ९० खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें चाळीस हजार. इसवी सन १९०३–४ सालीं जमीन महसूल ८९००० रु. इतर कर ६००० रु. अंकोला हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. हा भाग कुमटा तालुक्यांत पूर्वी मोडत असे; परंतु इ. स. १८८० पासून हा स्वतंत्र तालुका करण्यांत आला. पावसाची सरासरी येथें १३२ इंच आहे.

अंकोला नदी नावा चालविण्याइतकी मोठी असून अंकोला गांवापर्यंत नावा येतात. अंकोलाच्या बेलिकेरि, अंकोला, गंगावली आणि ताद्री या चार बंदरांतला व्यापार १८८१–८२ सालीं २८२६९ पौंडांचा असून, १५०७३ पौंडांची आयात व १३१९६ पौंडांची निर्गत होती. बांबू तांदूळ, शिंगे, मासे, मीठ, सागवान हे निर्गतीचे जिन्नस व तांदूळ, गहूं, सूत, मासे हे आयातीचे जिन्नस होत.

**गांव**.—हें अंकोला तालुक्याचें मुख्य ठिकाण कारवारच्या आग्नेयीस सुमारें १५ मैलांवर आहे. या ठिकाणीं एक पडका किल्ला आहे. समुद्रकिनाऱ्यापासून गांव दोन मैल आंत आहे. येथें दर्यावेपार चांगला चालतो. शेणवी, कोंकणी, वैश्य, नाडोर, हाल आणि करेवक्कल, कलावंत, ख्रिस्ती, मुसुलमान वगैरे लोक येथें आहेत.

अंकोला किल्ला फार जुना आहे असें सांगतात. किल्ल्याभोंवतीं खोल खंदक आहे व वर तट आहेत. किल्ल्यांत कोटेश्वराचें देवस्थान आहे.

१५१० सालापासून अंकोलाचा इतिहासांत उल्लेख आढळतो. अंकोला येथें पोर्तुगीजांचा व्यापार असे. १६७६ च्या फेब्रुवारी महिन्यांत शिवाजीनें याचा अर्धवट नाश केला असें फ्रायर लिहितो. पुढें हें गांव ओसाड पडलें. १७२० मध्यें मोंगलांनीं मराठ्यांनां जें स्वराज्य दिलें त्यांतील सोळा जिल्ह्यांपैकीं अंकोला हा एक होता. १७३० त अंकोल्यापासून रत्नागिरींतील सालसीपर्यंतचा कोंकणचा भाग कोल्हापूरच्या राज्यांत घेतला गेला. १७६३ त हैदरनें येथील किल्ला पाडला. पुढें टिपूनें १७९९ मध्यें यावर आपलें सैन्य

ठेविलें. १८७२ सालीं अंकोल्यास २८३५ वस्ती ( पैकीं २६०४ हिंदु, २०१ मुसलमान आणि ३० ख्रिश्चन ) होती; १८७९ मध्यें सुमारें २००० लोक, पैकीं ब्राह्मण व मुसलमान प्रामुख्यानें दिसत होते. गांवापासून मैलांवर असलेल्या खाडींत होड्या चालत असल्यानें येथें थोडासा व्यापार चालतो.

अंग ( देश )—बंगालमधील हें एक प्राचीन राज्य असून याला कामाश्रम असेंहि नांव होतें. याच ठिकाणीं शंकरानें मदनाला जाळून अनंग केलें. ( वा. रामायण बालकांड स. २३ ). हा प्रदेश मगधाच्या पूर्वेस असून त्यांत मोंघीर, भागलपूर आणि पूर्णिआ या सध्यांच्या जिल्ह्यांचा समावेश होत असे. अंगदेशाचा उल्लेख अथर्ववेदांत एकदां आला असून त्या ठिकाणीं, ' आम्ही हा "तक्मा" (ज्वर) गंधारी, मूजवन, अंग आणि मगध या लोकांच्या स्वाधीन करतों ' असें म्हटलें आहे ( अथ. ५. २२, १४ ). यावरून आथर्वणकाळीं अंग लोक हे ब्राह्मणशत्रु किंवा परके समजले जात असें दिसून येतें. गोपथब्राह्मणांत 'अंगमगधाः' असा जनपदवाचक संयुक्त शब्द आढळतो ( गो. ब्रा. २.९ ). पुढील काळीं अंग हें शोण आणि गंगा यांच्या तीरीं वस्तीस राहिल्यावर त्या प्रदेशाला सुद्धां अंगदेश म्हणूं लागले.

पार्गिटरच्या मतें हे लोक अनार्यांपैकीं असून बाहेरून पूर्वहिंदुस्थानांत उतरले असावेत ( जर्नल, रॉ. ए. सो. १९०८ ). पण या विधानाला वैदिक वाङ्मयांत कांहीं पुरावा आढळत नाहीं.

महाभारतांत अंग लोकांविषयीं बरेच उल्लेख सांपडतात. एकदां ते युधिष्ठिराकडे करभार घेऊन येतात ( २. ५२ ); अंगदेशीय वीर आपल्या गजसंघानें अर्जुनास चोहोंकडून अडवितात ( ७.९३ ); कर्ण जरासंधाला जिंकून अंगदेशाचा राजा बनतो ( १२.५ ); अंगदेशाच्या वसुहुम राजाची गोष्ट भीष्म युधिष्ठिराला सांगतात. ( १२.१२२ ); इ. कर्ण हा अंगदेशाचा राजा होता म्हणून त्यास पुष्कळदां अंगराज म्हणून संबोधिलें आहे. बृहत्संहितेंत ( १४.८ ), मत्स्यादिपुराणांत देशनामांत अंगदेशाचा उल्लेख सांपडतो.

बुद्धधर्माचा उदय होण्याच्या वेळीं हिंदुस्थानचे जे मुख्य १६ राजकीय विभाग कल्पिले आहेत त्यांत अंगदेश येतो. याची राजधानी चंपा होती. हल्लींच्या भागलपुर शहरानजीक चंपाशहर असावें. मगधराजा बिंबिसार यानें राज्याभिषेकानंतर ( इ. स. पू. ५३० ) थोड्याच दिवसांनीं अंगदेश हस्तगत केला. पुढें अंगदेश केव्हां ( बहुधां ७ व्या शतकांत असावा. ) स्वतंत्र झाला हें कळत नाहीं, पण एका काळीं तो स्वतंत्र होता हें खरें. बुद्धकालचा अंगराजा म्हणजे केवळ एक श्रीमंत सरदार असून त्यानें कोणा एका ब्राह्मणाला त्याच्या पूर्वायुष्यांतल्या सेवेबद्दल एक नेमणूक करून दिली एवढीच आपणाला माहिती मिळते.

सातव्या शतकांतील चिनी प्रवासी इत्सिंग लिनी ( चंपा ) देशाचें वर्णन करितो. ह्युएनत्संग आपल्या प्रवासवर्णनांत त्याच्या काळचीं बंगालमधील जीं राज्यें म्हणून देतो त्यांत चंपाचें एक राज्य आहे. नवव्या शतकांत अंगदेशांत पाल घराणें उदयास आलें व त्यानें आपली सत्ता सबंध उत्तरबंगाल व बिहार प्रांतावर बसविली. यानंतर अंगदेशाचें नांव फारसें निघत नाहीं. ११ व्या व १२ व्या शतकांतील वज्रकोशांत " अंगाश्चंपोपक्षणाः । " म्हणून चंपा राजधानीच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या अंगदेशाचा उल्लेख सांपडतो. चंपानगरीला जीं अनेक नांवें पडलीं आहेत त्यांत अंगपुरी हें एक आहे. मुसुलमानी अमदानीच्या पूर्वयुगांत गौडच्या एका मुसुलमानी राजघराण्याकडे हा प्रदेश होता; पुढें अकबरानें दिल्लीच्या साम्राज्यांत तो समाविष्ट केला. १७६५ त शहाअलम बादशहानें बंगाल, बिहार व ओरिसा यांची सनद ईस्ट इंडिया कंपनीच्या नांवानें जेव्हां करून दिली तेव्हांपासून अंगदेश ब्रिटिश मुलूख बनून राहिला आहे.

[ संदर्भग्रंथ.—मॅक्डोनेल आणि कीथ—वेदिक इंडेक्स अथर्ववेद, गोपथब्राह्मण, रामायण, महाभारत, पुराणें. पार्गिटर—जर्नल रा. ए. सो. १९०८. व्हीस डेव्हिड्स—बुद्धिस्टिक इंडिया. स्मिथ—अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया. इंपीरियल गॅझेटियर. वज्रकोश. ज्ञानकोश—विभाग ४ था. वैद्य-मध्ययुगीन भारत. ए. ब्रि. ( भागलपूर ). बृहत्संहिता. दीक्षित—भारतवर्षीय ( प्राचीन ) भूवर्णन. वि. विस्तार, आगष्ट १९१२ ].

**अंगठी.**—कोणत्याहि पदार्थाचें निरनिराळ्या उपयोगांकरितां व निरनिराळ्या आकाराचें केलेलें वेटोळें असा याचा कलाव्यवहारांत अर्थ आहे. विशेषतः चांदी, सोनें किंवा इतर मौल्यवान पदार्थ यांच्या अलंकारार्थ अंगठ्या बनवितात. अंगठी हा शब्द वाटोळ्या आकाराच्या पुष्कळ वस्तूंना लागत असला तरी त्याचा एक विशिष्ट अर्थ बोटांत घालण्याचें वळें असा जो आहे त्याविषयीं पुढील विवेचन समजावें.

अंगठींत दोन भाग असतात. एक कोंदणाचा किंवा ज्यावर कांहीं चिन्ह काढतात तो वरचा भाग; व दुसरा बोटाभोंवती येणारा कडीसारखा भाग. अंगठी घालून आपल्या बोटांनां शोभा आणण्याची आवड स्वाभाविक सर्व काळीं सर्व ठिकाणीं दिसून येते. ज्या काळीं लेखनकला फार थोड्यांनांच अवगत होती त्या काळीं आत्मविशिष्ट चिन्हें अंगठ्यांवर खोदून महत्त्वाच्या कागदपत्रांवर त्यांचा शिक्का मारीत व असे शिक्के लेखांचा खरेपणा सिद्ध करण्यास उपयोगी पडत. जेव्हां एखादा राजपुरुष आपला अधिकार कोणाला अर्पण करी तेव्हां तो आपल्या शिक्क्याची अंगठी त्याच्या हवालीं करीत असे. सुमात्रांतील बत्ता लोक अद्याप विशिष्ट प्रकारच्या अंगठ्या परवान्याप्रमाणें वापरतात. पर-

वान्यादाखल अंगठीचा केलेला उपयोग आपण पुष्कळ कथानकांतून वाचतों.

अं ग ठी चा उ प यो ग.–हा भरतखंडांत ऋग्वेदकालापासून आढळतो. ऋग्वेदांत खादि असा शब्द अंगठो या अर्थी आलेला आढळतो. सायणाचार्यांनीं या शब्दाचा अर्थ कटक म्हणजे कडें असा केला आहे. पण एका ठिकाणीं [ द्यावो न स्तृभिश्चितयन्त खादिनः ऋ. २, ३४, २ ] खादियुक्त मरुत् हे आकाश ज्याप्रमाणें नक्षत्रांनीं प्रकाशित दिसतें त्याप्रमाणें प्रकाशतात असें मरुतांचें वर्णन आलें आहे. येथें सायणांनीं खादिनः याचा अर्थ शत्रूंनां खाणारे किंवा कटकयुक्त असा केला आहे. त्यापेक्षां नक्षत्रांशीं जुळेल असा रत्नयुक्त अंगठ्या घातलेले असा अर्थ घेणें जास्त चांगलें. खादि म्हणजे हस्तभूषण हा अर्थ सायणासहि मान्य आहे. तथापि त्यांनीं कांहीं ठिकाणीं हस्तत्राणकटक, खाणारा असे निरनिराळे अर्थ केले आहेत मरुतांनां 'हिरण्यखादयः' असें शांखायन श्रौतसूत्रांतहि ( ३. ५, १३, ८. २३, ६ ) म्हटलें आहे. सेंटपीटर्सबर्ग कोशांत व आपटे यांच्या संस्कृत कोशांत खादि याचा अर्थ अंगठा असाच दिला आहे.

धार्मिक विधीच्या वेळीं दर्भाचें पवित्रक हातांत घालण्याची पद्धति सूत्रांत आढळत नाहीं. ती स्मार्त असून सूत्रकालानंतरची आहे. पवित्रकास मारावयाची गांठ इंग्रजी आठ या आंकड्याप्रमाणें असते.

अंगठीला प्रचलित संस्कृत प्रतिशब्द अंगुली( री )यक, ऊर्मिका, मुद्रा इ. होत. अतिप्राचीन काळींहि अंगठ्यावर नांवें खोदून त्यांचा प्रसंग पडल्यास खुणेकरितां उपयोग करीत. रामायणांत रामानें मारुतीजवळ तो सीताशुद्धीला निघण्याच्या वेळीं आपल्या नांवाची अंगठी तिच्या खुणेकरितां म्हणून दिली असें वर्णन आहे ( ददौ तस्य ततः प्रीतः स्वनामाङ्कोपशोभितम् । अंगुलीयमभिज्ञानं राजा पुत्र्याः परंतपः ॥ किष्किंधाकांड सर्ग ४४ श्लो. १२ ) कालिदासाचें "अभिज्ञान शकुंतलम्" नाटक या खुणेच्या अंगठीवरच रचिलें आहे ( अभिज्ञानेन स्मृता शकुंतला अभिज्ञान शकुंतला; तामधिकृत्य नाटकं । ) राजा दुष्यंताला शकुंतलेचा आपल्याशीं झालेल्या विवाहाची अंगठीच्या अभिज्ञानानें आठवण होते. तेव्हां नांवाच्या अंगठ्या प्राचीन आहेत यांत शंका नाहीं. तसेंच शिक्का मारण्याच्या अंगठ्या—मुद्रा याहि हिंदुस्थानांत नवीन नाहींत. राजाच्या अधिकारचिन्हांत राजमुद्रा महत्त्वाची असे; प्रत्येक राजशासनावर ही मुद्रा उठवावी लागे; त्याशिवाय शासनाला किंमत येत नसे. ही मुद्रा फार जपावी लागे. नंदअमात्य जो राक्षस त्याची मुद्रिका दुसऱ्याच्या हातीं पडल्याबरोबर त्याचे सर्व बेत फसले. या मुद्रांचा परवान्यासारखाहि उपयोग होत असे. 'अगृहीतमुद्रः कटकान्निष्क्रमसि' । मु. राक्षस. ५ ).

अंगठ्यांत, विशेषतः विशिष्ट प्रकारांनीं केलेल्या अंगठ्यांत जादू असते अशी सर्वसाधारण समजूत असल्यानें शरीरविभूषण हाच केवळ हेतु अंगठो घालण्यांत नसतो. उदाहरणार्थ नवग्रहांच्या अंगठ्या. यांत प्रत्येक ग्रहाला प्रिय असा एक रंग असतो, तेव्हां त्या रंगाचा खडा अंगठींत बसवून ती नेहमीं धारण केल्यानें वापरणाऱ्याला त्या ग्रहाची पीडा होत नाहीं असा समज फार रूढ आहे. हिरा, पाच, मोती, माणिक, नील,पुष्पराग,गोमेद, पोंवळें व मार्जारनेत्री(लसण्या) हीं नवग्रहरत्नें होत. दंतकथांतून आपण नेहमीं भारलेल्या अंगठ्यांविषयीं वाचतों. श्राद्धकर्माच्या वेळीं दर्भाच्या अंगठ्या ( पवित्रकें ) ज्या घालाव्या लागतात त्याचा हेतु दुरितनिवारण हाच असावा. सोन्याचीं पवित्रकें–विशिष्ट आकाराचींहि–घालण्याची जुन्या लोकांत चाल आहे. सोन्याचें पवित्रक असलें म्हणजे दर्भाचें घालावें लागत नाहीं.

मोहोरेची अंगठी घालण्याची चाल फार जुनी दिसते. गरीब बायकांच्या हातांत सुद्धां ही अंगठी साधारणपणें असते. सुनमुखाच्या वेळच्या दागिन्यांत मोहोरेची अंगठी नसली तर जुन्या बायकांनां बरें वाटत नाहीं. ही अंगठी विधवा बायकासुद्धां मोठ्या हौसेनें वापरतात. ज्याप्रमाणें मोहोरांच्या अंगठ्या श्रीमंत लोक घालतात त्याप्रमाणें गरीब लोक चवल्या बसविलेल्या अंगठ्या घालतांना आढळतात. अलीकडे पुतळ्यांच्या माळाप्रमाणेंच मोहोरच्या अंगठ्या मागें पडून रोल्डगोल्डच्या नवीन नवीन आकृतीच्या अंगठ्या घालण्याकडे प्रवृत्ति वाढत आहे. कांहीं कलावंतिणी आरशांच्या अंगठ्या बोटांत घालातात. यासारख्याच मोठ्या आकाराच्या अंगठ्या सिलोनमधील बडे लोक वापरतात. उत्तरहिंदुस्थानांत मिन्याच्या अंगठ्या फार सुंदर असतात. जयपुरी अंगठ्या फार प्रसिद्ध आहेत. सुवासिक अंगठ्या, देवदर्शनी अंगठ्या, इष्ट कामना पुरविणाऱ्या अंगठ्या वगैरे ज्या बाजारांत दिसतात त्यांचा विशेष खप नाहीं तरी अंगठी हें माध्यम करण्याची सुंदर कल्पना यांत व्यक्त होते. पश्चिमेकडेहि अंगठीचा उपयोग फार प्राचीन कालापासून आढळतो.

इ जि प्शि य न अं ग ठ्या—प्राचीन इजिप्तमधील थडग्यांतून सांपडलेल्या अंगठ्या साहाजिकच सर्वांत जुन्या असणार. १८ व्या ते २० व्या घराण्याच्या काळच्या अंगठ्या अत्युत्कृष्ट आहेत; त्या शुद्ध सोन्याच्या व साध्या धारणीच्या असून फार जड व बोजड दिसतात. त्यांच्या लांबोळ्या मुखपृष्ठावर बहुधा मालकाचें नांव व पदव्या खोल खोदलेल्या असतात. इजिप्तमधील गरीब लोक कमी मौल्यवान अंगठ्या वापरीत; त्या चांदी, ब्राँझ (पंचलोह) कांच, किंवा गारगोटीची चकाकी आणलेली व निरनिराळ्या ताम्रजन्य रंगांनीं भडक, हिरवी किंवा निळी केलेली माती यांपासून बनविलेल्या असत. कांहीं आंगठ्यांवर, माती ओली असतांना उठविलेले चित्रलिपींतील लेख आढळतात. संशोधिलेल्या अंगठ्यांपैकीं कांहीं हस्तीदंत, अंबर व गोमेदासारखे कठीण दगड यांच्या केलेल्या आहेत.

१२ व्या व पुढील घराण्यांच्या काळीं इजिप्तमध्यें जी एक निराळ्याच आकाराची अंगठी करीत तिला वरच्या बाजूस शेणकिड्याची आकृति ( स्कॅरब हा किडा इजिप्शियन लोक फार पवित्र मानीत व तो ख्रिस्त्यांच्या क्रॉसप्रमाणें सर्वत्र काढीत). बसवून त्यांतून एक फिरती कडी बोटांत घालण्यासाठीं ओंविलेली असे.

न ळ कं ड्डी.—प्राचीन बाबिलोन व असुर्या देशांत बोटांतल्या अंगठ्या उपयोगांत नसाव्यातसें दिसतें. तेथे शिक्के वेगळ्याच प्रकारचे म्हणजे स्फटिक किंवा कठीण दगड वर्तुळस्तंभाकृति कापून व आरपार भोंक पाडून करीत. व या नळकंड्यांतून दोरा ओवून तीं हातांत पोंचींसारखीं बांधीत.

क्री ट न आ णि मा य सी नी अ न.— या काळीं एक अंगठीची विशिष्ट पद्धत म्हणजे वरचा भाग सपाट व रुंद असून त्यावर सोन्यांत केलेली कोरीव नक्षी असे. वरच्या या भागाचा खालच्या वळ्याशीं अर्थाअर्थी संबंध नसे. खडे बसविलेल्या अंगठ्या फार क्वचितच असत.

फि नि शि य न.— या तऱ्हेची अंगठी मूळ शेणकिडा ( स्कॅरब ) बरोबर बागविण्यासाठीं केलेली असे. हा किडा बहुधा एखाद्या करंडकांत ठेवलेला असून हा करंडक आंत बाहेर फिरता केलेला असे. अशाकरितां कीं शिक्का मारण्याचें कारण संपलें कीं एरवीं त्याचें तोंड आंतल्या बाजूस वळवावें. शिक्का मारण्याला जोर यावा म्हणून खालचें वळें भक्कम करीत.

ग्री क.—प्राचीन काळांतील ग्रीक अंगठींत वरील भाग सोन्याची खोदीव नक्षी काढण्याकरितां विशिष्ट प्रकारें चपटा केलेला असे. ख्रि. पू. ४ थ्या, ५ व्या शतकांत हें खोदकाम फार स्वैर व सुंदर असल्याचें आढळतें. दुसऱ्या कांहीं ज्या अंगठ्या दिसतात त्या फिनिशियन तऱ्हेच्या फिरत्या स्कॅरब अंगठ्या होत.

ग्रीक लोकांत शिक्क्याच्या अंगठ्या वापरण्याचा बराच प्रचार होता. स्पार्टामध्यें पूर्वी एका काळीं कोणीहि लोखंडाहून जास्त मौल्यवान् अशा कोणत्याहि पदार्थाची शिक्क्याची अंगठी करूं नये असा एक कायदा होता; पण हेलेनिक जगांत दुसरीकडे कोठेंहि असा धरबंध घातलेला ऐकिवांत नाहीं. ख्रिमेरियन बॉसफोरसमधील एट्रूरिया व कर्च येथल्या कांहीं थडग्यांतून उत्कृष्ट ग्रीक कलाकौशल्याच्या सुरेख सोन्याच्या आंगठ्या सांपडलेल्या आहेत.

ए ट्रु स्क न.—एट्रुस्कन लोक स्कॅरब बसविलेल्या फिरत्या सोन्याच्या अंगठ्या फार करून वापरीत. ही चाल त्यांनीं इजिप्शियनांपासून घेतलेली दिसते कारण एट्रुस्कन थडग्यांतून काढलेल्या कांहीं आंगठ्यांवर सुवाच्य चित्रलिपी व खरे इजिप्शिअन स्कॅरब आहेत. एट्रुस्कन अंगठ्या शिक्क्याच्या असून त्यांवरील गोमेदासारख्या दगडावर स्कॅरब कोरलेले असत. त्यांवरील हें खोदकाम ग्रीककला व इजिप्शियन कला यांमधील दुवा म्हणतां येईल. आणखी एट्रुस्कन अंगठीचा नमुना म्हणजे अंगठीचा वरचा भाग नक्षीदार सोन्याचा किंवा कोंदणांत बसविलेल्या भरगच्चीं दगडाचा असे. या प्रकारांत वरील भाग आंत बाहेर फिरता नसे. एकंदरींत एट्रुस्कन अंगठ्या आकारानें फार मोठ्या व अतिशय परिश्रमानें घडविलेल्या दिसतात.

रो म न.—रोमन लोक या बाबतींत फार साधे वाटतात. त्यांच्या प्रजासत्ताक राज्यांत बहुतेक नागरिक लोखंडी अंगठ्या घालीत; गुलामांनां तर यासुद्धां वापरूं देत नसत. परप्रांतीय वकिलांनां प्रथम सोन्याच्या अंगठ्या वापरण्याचा अधिकार मिळाला; नंतर सेनेटर, कॉन्सल व इतर संस्थानांतील बडे अधिकारी यांनां हा मान मिळाला. आगस्टन युगांत जुनाट अंगठ्यांचा मोठा संग्रह करण्यांत आला. अशा अंगठ्या रोमच्या देवस्थानांनां नजर म्हणून त्या काळीं देण्यांत येत.

साम्राज्यकाळीं अंगठ्या वापरण्यासंबंधांत निरनिराळे कायदे अस्तित्वांत होते. टायबेरियसनें जे स्वतंत्र कुळांत जन्मलेले नसत त्यांनां सोन्याच्या अंगठ्या वापरण्यासाठीं मोठ्या संपत्तीची अट घातली; सेव्हेरसनें हा अधिकार सर्व रोमन शिपायांनां देऊन टाकला; व पुढें हा अधिकार सर्व स्वतंत्र नागरिकांनां मिळाला; मात्र स्वतंत्र झालेल्या गुलामांनां चांदीच्या व सामान्य गुलामांनां लोखंडी अंगठ्या वापराव्या लागत. जस्टीनियनच्या कारकीर्दींत हेंहि नियंत्रण काढून टाकण्यांत आलें.

रोमन काळांतील अंगठ्यांतून नक्षी केवळ वरील भागापुरतीच न राहातां खालील वळ्याच्या भागावरहि होऊं लागली. वळें ( अंगठीचा खालचा भाग ) वाटोळें न राहतां कधीं कधीं कोनदार किंवा बहुकोणी दिसूं लागलें. ३ ऱ्या व ४ थ्या ख्रिस्ती शतकांतल्या रोमन अंगठ्या ख्रिस्तचिन्हांकित आढळतात.

के ल्टि क.—यूरोपखंडांत अनेक ठिकाणीं पुरातन केल्टिक वंशजांच्या थडग्यांत पुष्कळशा सोन्याच्या अंगठ्या सांपडतात. त्या बहुधा शुद्ध सोन्याच्या असून कमीजास्त आंवळ बसण्याकरितां वळ्यामध्यें एक फट पाडलेली असे. एका प्रकारच्या रस्सीसारखी केलेली सोन्याची तार किंवा सुशोभित दिसेल अशा तऱ्हेनें वळविलेली सोन्याची कांब यांच्याच बहुतेक अंगठ्या करण्यांत येत. कांहीं अगदीं साध्या फट पाडलेल्या अंगठ्यांचा नाण्यांऐवजीं उपयोग करीत. सबंध यूरोपिय मध्ययुगांत शिक्क्याच्या अंगठ्या धर्म, व्यापार, कायदा, खासगी व्यवहार इत्यादि बाबतींत फार महत्त्वाच्या होऊन राहिल्या होत्या.

बि श पी.—नवीन बिशपला धर्मदंडाबरोबर पूर्वी एक अंगठीहि देत असत. ही अंगठी इतर शिक्क्याच्या अंगठ्यांहून वेगळी दिसत नाहीं. १२ व्या शतकापासून पुढें या बिशपी अंगठीचा लग्नाच्या अंगठीशीं गूढ संबंध लावण्यांत आला. बिशपबरोबर त्याची अंगठीहि पुरण्याची

चाल असल्यानें त्या वेळच्या पुष्कळ उत्कृष्ट अंगठ्या उपलब्ध आहेत. अशा कित्येक अंगठ्यांतून जुनीं कोंदणांत बसविलेलीं रत्नें आहेत व त्यांवरील सोन्याच्या नक्षीला तींतील पाखंडी आकृति ख्रिस्ती बनविण्यासाठीं कांहीं अक्षरांची जोड देत; तर कांहीं रत्नें शोभिवंत दिसण्यासाठीं निरर्थक चिन्हींत केलेलीं दिसतात. साधारणपणें बिशपी अंगठी लाल, नीलमणि यांसारख्या दगडानें खचली असून खड्याला पैलू पाडीत नसल्यानें ती फार सुरेख दिसे; ती उजव्या हाताच्या तर्जनींत हातमोज्यावरून घालीत. तिच्या वळ्याचा आकार मोठा असे. १५ व्या व १६ शतकांतील बिशप उजव्या हातांत तीन चार अंगठ्या व शिवाय प्रत्येक हातमोज्याच्या पाठीवर एक मोठें रत्न धारण करीत.

पोप धारण करतो ती " कोळ्याची अंगठी " ( रिंग ऑफ दि फिशरमन् ) चित्रित असते. तीवर होडींत बसलेला सेंट पिटर पाण्याबाहेर जाळें काढीत आहे अशा अर्थाचें चित्र असतें. १५ व्या शतकापासून पोपच्या आज्ञापत्रावर शिक्का मारण्यासाठीं या अंगठीचा उपयोग करण्यांत येत आहे. पोप वारल्यानंतर ही अंगठी फोडून टाकण्यांत येतें. नव्या निवडलेल्या पोपला नांवाची जागा रिकामी सोडलेली एक नवी अंगठी देण्यांत येते व त्याचें नवें धारण केलेलें नांव जाहीर झाल्यानंतर मग तीवर तें खोंदण्यांत येतें.

१५ व्या ते १७ व्या शतकांतल्या कार्डिनलांच्या अंगठ्या ज्या संशोधिल्या गेल्या आहेत त्या आंगठ्यांत घालण्याच्या मोठ्या अंगठ्या दिसतात. या मुलामा दिलेल्या ब्राँझच्या बनविलेल्या अंगठ्यांतून स्फटिकाचा किंवा कांचेचा पातळ तुकडा बसवून तयार केलेल्या असतात. वर्तुळभागावर तत्कालिन पोपचें नांव व अधिकारचिन्ह असतें; मुखपृष्ठावर मात्र कांहींच काढलेलें नसतें. हिची किंमत कमी असली तरी दिसण्यांत ही चांगली भव्य दिसते.

वा ङ्नि श्च या च्या व ल ग्ना च्या अं ग ठ्या.—वाङ्निश्चयदर्शक अंगठी देण्याची चाल जुनी रोमनी आहे. लग्नाचा करार पाळला जाईल याबद्दल केवळ एक हडप म्हणून ही अंगठी असावी. प्लिनीच्या वेळेपर्यंत ही अंगठी साधी लोखंडाची असे; पण २ ऱ्या शतकापासून सोन्याची अंगठी देण्याची चाल पडलेली दिसते. याप्रमाणें ही चाल प्रथम व्यावहारिक होती व नंतर ती धार्मिक विधींत अंतर्भूत होऊन, ११ व्या शतकापासून पुढें अंगठीसंबंधीं आशीर्वचन लग्नविधींत रूढ झालें.

दुहेरी ( जेमेल ) अंगठ्यांत एकमेकांनां जोडलेलीं दोन वळीं असून तीं एकत्र किंवा एकएकटीं वापरलीं जात. १६ व्या व १७ व्या शतकांत अशा अंगठ्या रूढ असून वाङ्निश्चयाच्या अंगठ्या म्हणून त्यांचा बराच खप असे.

सू च क वा क्यें धा र ण क र णा ऱ्या अं ग ठ्या.—( पोझिरिंग्स ) वरील शतकांतच अशा काव्यमय अंगठ्या फार प्रचारांत होत्या. " माझ्यावर प्रेम करा व मला सोडूं नका " ( लव्ह मी अँड लीव्ह मी नॉट ) हीं अक्षरें कोरलेली अंगठी शेक्सपियरच्या " मर्चंट ऑफ व्हेनिस " नाटकांत ( अं. ४ प्र. १ ) आपण पहातों. मंगलदायक शब्द किंवा वचनें खोदलेल्या अंगठ्या फार प्राचीन काळापासून व्यवहारांत असाव्यातसें दिसतें. ग्रीक रोमनी अंगठ्यांवर अशी खोदणी आढळते. मध्ययुगांतील अंगठ्यांवर गूढविद्येंतील सामर्थ्यवान् मंत्र खोदले जात. १७ व्या शतकांत या " पोझी " अंगठ्या लग्नाच्या अंगठ्या म्हणून सरसहा उपयोगांत असलेल्या दिसतात; व त्यावर " प्रेम कर व आज्ञांकित रहा " ; " ईश्वराला स्मर व माझ्यावर प्रेम कर " ; " ज्या प्रेमानें मी ऋणी आहे त्याचें दर्शक कोणतेंहि दान नाहीं " " स्वर्गांतून देव आपलें प्रेम वृद्धिंगत करो " इत्यादि अर्थाचीं वचनें लिहिलेलीं असत.

याच शतकांत मृताचें नांव व मृत्युदिन लिहिलेल्या अंगठ्या आठवणीकरितां वापरत असत. मध्ययुगांत झटके बंद करणाऱ्या अंगठ्यांचें खूळ पसरलें होतें. या अंगठ्या राजानें भारावयाच्या असत; व त्याकरितां एक विधि केला जाई. " दशक " अंगठ्या विशेषतः १५ व्या शतकांत जास्त रूढ झाल्या होत्या. दशक हें नांव अंगठीच्या वर्तुळावर दहा गेंद बसविल्यावरून पडलें; हे गेंद माळेंतील मण्यांप्रमाणें ईश्वरस्मरणाकरितां योजीत.

व्या पा री अं ग ठ्या.—१५ व्या व १६ व्या शतकांतील व्यापारी व इतर लोक शिक्क्याच्या अंगठ्यांवर आपली व्यापारी खूण खोदून घेत. या अंगठ्या शिक्का मारण्याकरितांच वापरीत असें नव्हे तर तगाद्याच्या वेळीं मागणीची सत्यता पटण्याकरितां विश्वासू मनुष्याबरोबर पुष्कळदा या पाठविण्यांत येत. याच काळीं खासगी गृहस्थ आपल्या नांवांतील आद्याक्षरें अंगठीवर कोरून घेत व या अक्षरांभोंवतीं फुलांची सुंदर सांखळी काढवीत. तसेंच कांहीं सोन्याच्या अंगठ्यांवर कुलचिन्हें शोभिवंत नक्षीमध्यें काढलेलीं असत.

वि षा री अं ग ठ्या.—" क्लासिकल " या अभिजातयुगांत वरील भाग पोकळ असलेल्या ( कोंदणाच्या ) विषारी अंगठ्यांचा उपयोग करीत. अशाच एका अंगठीनें हानिबॉलनें स्वतःला मारून घेतलें. डेमॉस्थेनीझजवळ अशीच एक अंगठी होती. क्रॅससनें ज्यूपिटरच्या सिंहासनाखालची सुवर्णसंपत्ति चोरल्यानंतर भावी हालअपेष्टांनां भिऊन, अंगठीवरील हिरकणी चावली व तात्काळ मेला असें प्लिनी लिहितो. मध्ययुगांत एखाद्याचा खून करण्याची जी एक सोपी युक्ति योजीत ती अशी: अंगठीवरील रत्नखचित कोंदणांत एक पोकळ कांटा लपविलेला असे व हा कांटा आंतील विषसंचयाशीं जोडलेला असे. शत्रूशीं हस्तांदोलन करतांना या कांट्यानें एक ओरखडा काढिला कीं कांट्याच्या द्वारें विष शत्रूच्या अंगांत शिरून तो मृत्युपंथाला लागे. विषारी सर्पदंशावरून ही कल्पना सुचली असावी.

हिब्रू अंगठ्या.—ज्यू लोकांच्या लग्नांत वापरल्या जाणाऱ्या अंगठ्या मोठ्या व विशेष परिश्रमपूर्वक केलेल्या असत. यांचे १६ व्या व १७ व्या शतकांतील सुंदर नमुने आपणांस पाहावयास मिळतात. त्यांत मुखपृष्ठाच्या जागीं यरुशलेमच्या देवळाची आकृति, उंच चांदई छप्पर व कधीं कधीं वाऱ्याची दिशा दाखविणारेंयंत्र असलेली सोन्यांत किंवा इतर हिणकस धातूंत मोठ्या काळजीपूर्वक रेखाटलेली दृष्टीस पडते.

आंगठ्याच्या अंगठ्या.—या आंगठ्यांत घालावयाच्या अंगठ्या १४ व्या व १७ व्या शतकापर्यंत पुष्कळ वापरल्या जात "माझ्या तरुणपणीं कोणत्याहि अल्डरमनच्या आंगठ्याच्या अंगठीतून निसटून जाण्याइतका मी बारीक होतो," अशी फालस्टाफ प्रौढी मारतो ( शेक्सपियर-हेन्री ४ था. भा. १. अं. २ प्र. ४ ).

[संदर्भ ग्रंथ—ऋग्वेद, शांखायन श्रौतसूत्र व इतर सूत्रग्रंथ, स्मृति. कुमारस्वामी-आर्ट्स अँड क्रॅफ्टस इन इंडिया. किंग-अँटिक जेम्स अँड रिंग्स, १८७२. मार्शल-कॅटलॉग ऑफ फायनर रिंग्स इन् दि ब्रिटिश म्यूझियम १९०७. अर्किऑलॉजिकल जर्नल—वाटरटनचे लेख; एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका—रिंग; स्करॅब, पोप इ. लेख एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स—रेगॅरिला, चार्म्स अँड ॲम्युलेट इ. लेख ].

अंगडशाहा—शीखांचा एक गुरु हा इ. स १५०४साली जन्मला. तो नानकाप्रमाणेंच खत्री जातीचा असून नानकामागून १५३९ सालीं तो शीखांचा गुरु झाला. नानकानेंच आपल्या स्वतःच्या मुलांनां वगळून अंगडाला आपला वारस केलें होतें. याविषयीं अशी एक कथा आहे कीं, आपल्या अनुयायांसह गुरु नानक प्रवास करीत असतां, त्यानें रस्त्याच्या कडेला पडलेलें एका माणसाचें प्रेत पाहिलें. तेव्हां नानक म्हणाला कीं, ज्याअर्थी तुमचा माझ्यावर विश्वास आहे त्याअर्थी तुम्हीं हें अन्न(प्रेत)खावें. अंगडाशिवाय सर्वजण याला कचरले. पण अंगडानें खालीं बसून त्या प्रेताला खाण्याकरितां विवस्त्र करण्यास सुरुवात केली. तोंच तें प्रेत अंतर्धान पावून त्या जागीं त्याला पवित्र अन्नाचें ताट आढळून आलें. लागलीच गुरु नानकानें अंगडला आलिंगन देऊन म्हटलें कीं, तूं माझीच प्रतिमा असून माझें तेज तुझ्या ठिकाणीं राहील. त्या वेळेपासून शीख लोक गुरु नानकाचा अंश त्याच्या मागून गादीवर आलेल्या प्रत्येक गुरूंत असतो असें मानीत आले आहेत.

गुरु अंगडाच्या कार्याची फारशी माहिती मिळत नाहीं. त्यानें गुरुमुखी लिपि शोधून काढिली व 'ग्रंथसाहेब' विस्तृत केला असें म्हणतात. त्याची रहाणी अतिशय साधी असे. दोर विणून तो उदरनिर्वाह करी. इ. स. १५५२ मध्यें हा दिवंगत झाला. अमरदासाला आपल्यामागें यानें गुरु निवडलें होतें.

अंगडि—म्हैसूर संस्थान. कडूर जिल्ह्याच्या मुलगेरं तालुक्यांतील ५३५ ( इ. स. १९०१ ) लोकवस्तीचें एक खेडें. होयसल राजांचें मूळचें ठिकाण सोसेव्हूर, शशिपूर, अथवा शशिकपूर नांवाचें जें होतें तें हेंच होय. येथें पुष्कळ जुनाट देवळें आहेत. त्यांपैकीं वसंतम्माचें देऊळ या बाजूस जास्त प्रसिद्ध आहे. होयसल राजांची कुलस्वामिनी वासंतिका देवी होती तिचेंच हें देऊळ असावें.

अंगडिपुरम्—मद्रास इलाखा. मलबार जिल्ह्यांतील वलवनड तालुक्याचें हें मुख्य ठिकाण आहे. उ. अ. १०° ५०' व पू. रे. ७६° १५'. लोकसंख्या (१९०१) सुमारें पांच हजार. येथें बाजार मोठा भरतो व येथील देऊळ फार पवित्र मानलें जातें.

अंगद(१)—वालीपासून, त्याची स्त्री तारा हिच्या ठायीं झालेला पुत्र. हा रामचंद्राच्या साह्यार्थ बृहस्पतीच्या अंशानें जन्मला होता म्हणून भाषण करण्यांत हा परम चतुर असे. वाली मरण पावला, त्याकालीं हा वयानें विशेष मोठा नव्हता, म्हणून त्यानें रामास याच्या संरक्षणाविषयीं अतिशय अगत्यानें सांगितलें होतें; त्यावरून रामानें, किष्किंधेच्या राज्यासनावर सुग्रीवास स्थापिलें असतां, यास: युवराजाचा अधिकार देवविला होता.

पुढें अल्प काळानें रामचंद्रानें सुग्रीवाकडून चारी दिशांस सीताशुद्धीसाठीं वानर पाठविले, त्यांत मारुती इत्यादि वानरांत यास प्रमुख करून दक्षिण दिशेस पाठविलें होतें. तिकडे हा गेला असतां, एक मास अतिक्रांत झाला तरी यास सीतेचा शोध लागेना, म्हणून त्यानें प्राणत्यागाचा निश्चय केला, इतक्यांत संपाति नामक पक्षिराजाची भेट होऊन सीता लंकेत असल्याचा यास शोध लागला; त्यावरून यानें मरणापासून निवृत्त होऊन मारुतीस लंकेस पाठवलें, व तो सीताशुद्धि करून आल्यावर हा रामाकडे किष्किंधेस परत आला. नंतर सकल वानरांसहित रामचंद्र लंकेस गेल्यावर युद्ध आरंभण्यापूर्वी हा रामाकडून रावणाकडे शिष्टाई करण्यासाठीं गेला होता. परंतु याच्या हितोपदेशाचा रावणानें अनादर केल्यामुळें हा परत येतांच, उभयपक्षीं युद्धाची सिद्धता होऊन त्यास आरंभ झाला; त्या प्रसंगीं यानें विकट, कंपन, प्रजंघ इत्यादि अनेक महान् महान् राक्षसांस मारून, रामाला उत्तम साहाय्य केलें होतें. रावणाचा वध करून रामचंद्र अयोध्येस गेल्यावर अकरा सहस्र वर्षें त्यानें राज्य करून निजधामास जाण्याचें मनांत आणिलें असतां, त्या समागमें सुग्रीव गेला तेव्हां हाच किष्किंधेचा राजा झाला होता.

(२) सूर्यवंशी दशरथपुत्र जो लक्ष्मण, त्यापासून उर्मिलेस झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. यानें स्थापिलेल्या नगरीचें नांव अंगादिया असें होतें, व तेथेंच हा राज्य करीत असे.

(३) भारती युद्धांतील दुर्योधनपक्षीय राजा. हा त्याच युद्धांत मरण पावला होता [ भारत, द्रोणपर्व अध्याय २५.]

**अंगदशिष्टाई**— " रामानें रावणास आपल्यातर्फे बोलणें करण्यासाठीं वालिपुत्र जो अंगद त्यास पाठविलें होतें. " शिष्टाई " म्हणजे तटस्थपणें केलेलें भाषण, किंवा मध्यस्थी. "अंगदशिष्टाई" म्हणजे अंगदानें केलेली शिष्टाई. ह्या मूळच्या अर्थाचा विपर्यास होऊन " (अंगद) शिष्टाई " ह्याचा हल्लींचा अर्थ लुडबुडेपणा असा झाला आहे. [ भिडेकृत-मराठी वाक्प्रचार व म्हणी ]

**अंगदिया**—लक्ष्मण पुत्र अंगद याची नगरी. ही कारुपथ देशाची राजधानी असून हिला अश्वनगर असेंहि नामांतर होतें. [वाल्मिकी रामायण उत्तरकांड सर्ग १०२;]

**अंगरखा**—अंगरखा किंवा अंगराखा हा संयुक्त शब्द अंग आणि राखणें या दोन शब्दापासून बनला असून अंग राखणारा ( कपडा ) याअर्थी मराठींत योजतात. सर्व सामान्य कपड्यांना हा लावीत नसून फक्त एका विशिष्ट तऱ्हेच्या पुरुषांच्या अंगांत घालण्याच्या कपड्याला हें नांव रूढ आहे. गुंडीदार, कंठीदार, निमकंठीदार व प्यालेदार असे चार प्रकारचे निरनिराळ्या धाटणीचे अंगरखे होते पण हल्ली ते वापरण्यांत प्रचारांत नाहींत. याला अंगा असेंहि एक नांव आहे; पण सामान्यतः लहान मुलांच्या अंगरख्यालाच अंगा म्हणण्याची चाल पडली आहे. पेशवाईंत अंगरखे चिटाचे करीत असें दिसतें; कारण अंगरख्याकरितां चिटांची मागणी कागदोपत्रीं आढळते.

भारतेतिहाससंशोधक मंडळामध्यें नानाफडणिसांचा एक जुना अंगरखा संग्रहित केलेला आहे. हा अंगरखा पांढऱ्या तलम मलमलीचा असून, त्याचा कमरेखालील घोळ फार मोठा म्हणजे सुमारें १३॥ वार ( २७ हात ) आहे. त्यास उभे नऊ जोड जोडले असून हा एवढा मोठा घेर कमरेजवळ एका वारांत मिळवून घेतला आहे. अंगरख्यास आठ बंद व गळ्याखालीं बारीक गुंडी आहे- या अंगरख्यावरून हा घालणाऱ्याच्या शरीराचा आकार अजमावतां येतो.

**अंगापूरकर ( हरि )**—हा महाराष्ट्रकवि शालिवाहन शके १७१४ च्या सुमारास होऊन गेला. हा रामजोशी, मोरोपंत व सोहिरोबानाथ आंबिये यांचा समकालीन होता असें दिसतें. अंगापुरगांवीं गोपाळराव देशमूख नांवाचे एक वासिष्ठगोत्री ब्राह्मण असत. त्यांची पत्नी यमुनाबाई. या दांपत्याच्या पोटीं हरि अंगापूरकरांचा इ. स. १७९२ च्या सुमारास जन्म झाला. आपल्या " केदारविजय " ग्रंथांत कवीनें आपली माहिती दिली आहे. यांच्या गुरूचें नांव हरिनारायण असें होतें. या गुरूचा महिमा कवीनें वर्णन केला आहे. त्यावरून त्यांची योग्यता कळते. या कवीनें लिहिलेला असा उपलब्ध ग्रंथ फक्त " केदारविजय " होय. या ग्रंथाचे ३५ अध्याय व ६११० ओव्या आहेत. या ग्रंथांत आरंभीं कवीच्या कालापूर्वी होऊन गेलेल्या अनेक साधुसंतांची व कवींचीं नांवें दिलीं आहेत; त्यांत कालिदासाचेंहि नांव आढळतें. जुन्या मराठी कवींपैकीं ज्यानें आपल्या ग्रंथांत कालिदासाचा उल्लेख केला आहे असा हा एकच कवि दिसतो. [ महाराष्ट्रकविचरित्र ].

**अंगारा**—अंगारा हा शब्द अंगार म्हणजे विस्तव, निखारा या शब्दापासून उत्पन्न झाला असावा. भस्म अथवा चूल अगर एखाद्या पवित्र ठिकाणच्या राखेचा हल्लीं अंगाऱ्यासाठीं उपयोग करतात. एखाद्या मनुष्यास कांहीं भूतबाधा वगैरे झाली असल्यास देवर्षिपणाचा धंदा करणारे लोक बाधा झालेल्यास कांहीं मंत्र पठण करून त्यानें मंत्रित केलेली राख लावितात त्याला अंगारा असें म्हणतात. ही अंगारा लावण्याची चाल पुराणग्रंथांतहि आढळून येते. मात्र तेथें अंगारा असा उल्लेख नसून त्याला भस्म असें म्हटलें आहे. हें भस्म म्हणजे तीन अग्नींची उपासना करणाऱ्या अग्निहोत्र्याच्या अग्निकुंडांतील भस्म होय. पद्मपुराण अध्याय १०६ यांत एका मृत ब्राह्मणास अरुंधतीनें अग्निहोत्र्याच्या अग्निकुंडांतील भस्म मृत्युंजय मंत्रानें मंत्रित करून लाविलें असतां तो ब्राह्मण जिवंत झाल्याची कथा आली आहे. व त्यापुढील १०७ या अध्यायांत एका राक्षसानें गिळिलेल्यांना वीरभद्रानें अशाच प्रकारचें भस्म लावून जीवंत केल्याचा उल्लेख आहे. गुरुचरित्रांत अशीं उदाहरणें बरींच आहेत. भस्म धारण केलें असतां एक प्रकारची अद्‌भुत शक्ती अंगीं येत असल्याची कल्पना शिवकवचांत आढळते. रामरक्षा, शिवकवच वगैरे स्तोत्रें नित्य सायंकाळीं पठण करून मंत्रित केलेला अंगारा लहान मुलांनां लावण्याची चाल महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं आढळते. एखाद्या सुंदर बालकास एकाएकीं ज्वर वगैरे आल्यास त्याला दृष्ट झाली असेल म्हणून दृष्टीचा अंगारा लावणाऱ्या कांहीं आजीबाई आढळतात. अंगारा हा राखेचाच केला जात नसून क्वचित प्रसंगीं दुसऱ्याहि पदार्थांचा केला जातो. कोकणस्थ ब्राह्मणांत बोडण भरणें हा एक कुलाचार आहे. त्या प्रसंगीं बोडण म्हणून कालविलेल्या अन्नाचा अंगारा लावण्याची चाल आहे. बाळंतिणीच्या पांचव्या व सहाव्या दिवशीं हिंग दुधांत कालवून त्याचा अंगारा करतात. बैरागी, गोसावी वगैरे लोक भिक्षा मागण्यासाठीं घरीं आले असतां घरांतील लहान मुलांनां अंगारा लावून त्याच्या योगानें त्यांनां भरून आपल्या मागें घेऊन जातात, अशी समजूत कांहीं जुन्या भावड्या लोकांत आढळून येते.

**अंगुत्तर निकाय**—तीन पिटकांपैकीं दुसरें सुत्तपिटक. यांतील पांच निकायांतील हें चौथें आहे. याच्यांत ९५५७ सुत्तें ( सूत्रें ) आहेत असें बौद्ध ग्रंथांत सांगितलें आहे. पण सुत्तें मोजण्याची अर्वाचीन रीत वेगळी आहे. तीप्रमाणें दोन पासून तीन हजारपर्यंत तीं भरतील. सुत्तांचा विस्तार एका ओळीपासून तीनचार पानांपर्यंत वेगवेगळा आढळतो. त्यांतून बौद्ध संप्रदायांतील नीतिशास्त्र, मानसशास्त्र आणि स्वाध्यायपद्धति विवेचली आहे. थोडक्यांत साररूपानें सिद्धांत मांडण्याची पद्धत ज्या वेळीं फारसे ग्रंथ अस्तित्वांत

नव्हते. त्या वेळीं स्मरणांत राहण्याला सोपें जावें म्हणून अंगि-कारलेली असे. अंगुत्तर निकायांत प्रथम एकसंख्यांक त्या-नंतर द्विसंख्याक मग त्रयी अशा क्रमानें निर्वाणाला पोंचण्यास आवश्यक अशा अकरा गुणांपर्यंत मांडणी केलेली आढळते. फक्त त्यांची यादी देऊन काम भागविलें आहे. हीं सूत्रें अध्यापकानें स्पष्ट करून सांगावयाचीं असतात. अशा सूत्र भाष्यांचा नमुना इ. स. पांचव्या शतकांत बुद्ध–घोषानें पालींत लिहिलेल्या " मनोरथपूरणी " मध्यें पहावयास सांपडतो. बुद्धाच्या निर्वाणानंतर थोड्याच दिवसांनीं उत्तर हिंदुस्थानांत हा संग्रह तयार झाला असावा. तथापि त्याचा नक्की काळ सांगणें कठीण जाईल. [ प्रस्तावनाखंड विभाग ४ पहा. ].

**अंगुर शेफ**—याला लॅटिनमध्यें ॲट्रोपा बेलाडोना, इंग्रजींत डेडली नाइट शेड किंवा बेलाडोना; हिंदी भाषेंत अंगुर–शेफ, सूचीं, गिरबुटी, उस्संग, येन्राज, लुकमुना हीं नांवें आहेत.

हें गुळगुळित रानटी झुडूप असून तें हिमालयाच्या पश्चिमेस सिमल्यापासून काश्मीर प्रांतभर सांपडतें. यूरो-पमध्यें व इराणांत हीं झुडपें आढळतात.

या झुडपाचीं पानें व मुळें हीं शामक व स्नायुसंकोचन-प्रतिबंधक आहेत. हीं औषधी म्हणून विकलीं जातात या झुडपांच्या लागवडीसंबंधीं विशेष चौकशी झालेली नाहीं.

**अंगुळ जिल्हा.**—बिहार ओरिसाप्रांत. ओरिसा भागाच्या नैर्ऋत्येकडे असलेल्या मांडलिक संस्थानांत वसलेला असून याचे अंगुळ व खोंडमाळ असे दोन भाग करतां येतात. उ. अ. २०° १३' ते २१° १०' व पू. रे. ८३° ५०' ते ८५° ४३'. क्षेत्रफळ १६८१ चौरस मैल. अंगुळ भागाच्या उत्तरेस रायराखोल आणि बामरा संस्थानें; पूर्वेस तालचेर, धेनकानाल आणि हिंदोल; दक्षिणेस दसपल्ला आणि नरसिंग-पुर; पश्चिमेस अथमल्लिक संस्थान. खोंडमाळ अथवा कंध-माळ भाग डोंगराळ असून अंगूळच्या नैर्ऋत्येस आहे व त्यांत खोंड अथवा कंध जातींची वस्ती आहे. उत्तरेस, पूर्वेस, आणि पश्चिमेस बौद संस्थान असून दक्षिणेस मद्रास इला-ख्यांतील गंजम जिल्ह्याची सरहद्द आहे.

अंगुळ विभागाचा दक्षिणेकडील भाग डोंगराळ असून त्यांतून पुष्कळ नद्या पावसाळ्यांत वहात असतात. परंतु सर्व नद्यांनां उन्हाळ्यांत पाणी नसतें. डोंगरांची ओळ नैर्ऋत्ये-कडून ईशान्येकडे पसरली असून तिच्या दक्षिणेकडे महा-नदी वहात असून उत्तरेकडे ब्राह्मणी नदी वहात आहे. डोंग-रांतील वनश्री प्रेक्षणीय आहे. खोंडमाळ हें एक १७०० फूट उंचीचें पठार असून मधून मधून डोंगरहि त्यांत आहेत. या भागांत अद्यापि दाट जंगल आहे.

डोंगरांत व खोऱ्यांत दाट जंगल आहे; या जंगलांत सर्व प्रकारचे वन्य प्राणी सांपडतात. उदाहरणार्थ हत्ती, गवे, वाघ, चित्ते, हरिण, डुक्कर, रानटी कुत्रीं, अस्वलें इत्यादि. या भागांत रानटी प्राणी फार असल्यामुळें त्यांपासून होणारी वार्षिक मनुष्यहानि व पिकांचें नुकसान हीं फार जबर आहेत.

हवा रोगट असून हिंवतापाची सांथ नेहमीं असते. पावसाळा अनिश्चित असतो. जिल्ह्याची वार्षिक सरासरी ५३ इंच असून पाऊसकाळ जून ते आक्टोबरपर्यंत असतो.

**इतिहास.**—ओरिसांतील इतर डोंगराळ प्रदेशांत व अंगुळ येथेंहि प्राचीन काळीं खोंड या वन्य जातीची वस्ती होती. या प्रदेशावर हिंदु लोकांच्या वारंवार स्वाऱ्या होऊन त्यांनीं या वन्य लोकांस डोंगरामध्यें हांकलून देऊन आपण त्या प्रदेशाचे मालक झाले. लवकरच रजपु-तांच्या हातांत ओरिसांतील हा डोंगराळ प्रदेश गेला व त्या भागांत छोटीं छोटीं संस्थानें उत्पन्न झालीं. हीं संस्थानें आपसांत कांहीं तरी कारण काढून नेहमीं भांडत असत. या वेळचा संगतवार इतिहास उपलब्ध नाहीं. अंगुळ संस्थान देखील आपल्या शेजाऱ्यांशीं याचप्रमाणें भांडत असे. त्यांतल्या त्यांत हे सर्व संस्थानिक पुरीच्या राजाचे मांडलिक म्हणून वागत असत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ज्या वेळीं कंपनी सरकारनें ओरिसा जिंकला त्या-वेळीं या सर्व संस्थानिकांस सनदा देण्यांत आल्या. त्याप्र-माणें अंगुळच्या संस्थानिकास सनद मिळाली. ब्रिटिश सर-कारास खंडणी रु. १६०० ठरली होती. इ. स. १८४६ सालीं सोमनाथ नांवाचा संस्थानिक आपल्या राज्यांतील लोकांवर फार जुलूम करूं लागला व इ. स. १८४६–१८४७ मध्यें खोंडमाळमध्यें उद्भवलेल्या खोंड लोकांच्या बंडास त्यानें उत्तेजन दिलें. पुढल्या वर्षी अंगुळच्या लोकांनीं महा-नदीपार होऊन दसपल्ला संस्थानांतील दोन खेड्यांचा नाश केला. याबद्दल ब्रिटिश सरकारनें राजास कटक येथें खुलासा करण्यास पाचारण केलें. परंतु राजानें जाण्याचें नाकारलें. त्यावरून ब्रिटिश सरकारनें अंगुळ खालसा केल्याबद्दलचा जाहीरनामा काढला व संस्थान काबीज करण्याकरितां सैन्य पाठविलें. गोळीबार करण्याची जरूर पडली नाहीं. संस्थानि-कास हजारीबाग येथें जन्मभर कैदेंत टाकलें. इ. स. १८९१ पर्यंत अंगुळचा कारभार ओरिसामधील मांडलिक संस्था-नांचा ( ओरिसा फ्यूडेटरी स्टेट्स ) सुपरिंटेंडंट याच्या हाताखालीं तहशिलदार पहात असे. पण त्या सालीं त्यास खोंडमाळ जोडून त्याचा निराळा जिल्हा बनविण्यांत आला.

खोंडमाळ हा भाग पूर्वी बौद संस्थानांत मोडत असे; परंतु खोंड लोक अगदीं स्वतंत्र असल्याप्रमाणें वागत असून बौद संस्थानिकास त्यांस ताब्यांत ठेवणें अशक्य झालें होतें. खोंडांमध्यें नरबली देण्याची जी चाल होती ती मोडण्याचा ब्रिटिश सरकारनें निश्चय केला. इ. स. १८३५ सालीं बौद संस्थानिकानें हा भाग ब्रिटिशांनीं आपल्या ताब्यांत घ्यावा म्हणून परवानगी दिली. त्यावेळीं हा भाग मद्रास सर-

कारनें ताब्यांत घेतला. कारण त्या सरकारनें गंजम जिल्ह्याच्या सरहद्दीवरील खोंड लोकांतील नरबलीची चाल मोडण्याकरितां विशेष उपाय योजले होते. या भागांतील ही चाल समूळ नाहींशी करण्यास ब्रिटिश सरकारास फार त्रास पडले; व इ. स. १८४७ सालीं तर मोठें बंड झालें. त्याची स्थिर स्थावर झाल्यावर इ. स. १८५५सालीं कटक जिल्ह्यास हा भाग जोडण्यांत आला. पुढें इ. स. १८९१ सालीं अंगुळ जिल्ह्याचा हा एक विभाग करण्यांत आला. लोकसंख्या ( १९२१ ) १८२५७४.

यांत ४८००० लोक खोंड जातीचे आहेत. यांची वस्ती खोंडमाळांत असून त्यांचा इतिहास, त्यांचा धर्म, त्यांची भाषा, त्यांचा कायदा, त्यांचा जमीन जुमला व त्यांचें राष्ट्रीयत्व हीं सर्व अगदीं भिन्न आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं त्याच्यांत जी नरबलीची चाल होती त्यामुळें यांस महत्त्व आलें होतें. ते चांगलें पीक येण्याकरितां नरबली भूदेवीस अर्पण करीत व त्या बलीचें मांस शेतांत पुरीत. हे बली पान नांवाच्या अर्धवट वन्य जातींतून विकत घेण्याची त्यांची वहिवाट असे. हे पान लोक प्रत्येक खोंड खेड्यांत असत. ही चाल समूळ नाहींशी करण्यास ब्रिटिश सरकारास बराच त्रास पडला हें वर आलें आहे.

अंगुळ विभाग बराच सपाट असून पाण्याची देखील सोय बरी आहे. परंतु खोंडमाळ उंच पाठारावर असून सपाट जमीन फार कमी आहे. पुष्कळ खोंड लोक उचली शेती करतात. या भागांतील मुख्य पीक भाताचें आहे. खोंड लोक हळदीची लागवड बरीच करतात. गुरचरण पुष्कळ आहे. तथापि गुरांची अवलाद कमी प्रतीची आहे. इ स. १९०३—४ मध्यें जंगल खात्याचें उत्पन्न ५०००रुपये असून खर्च १७००० रुपये होता.

दगडी कोळशाचे खडक कुठें कुठें पृष्ठभागावर आलेले दिसतात परंतु त्यांतून कोणी अद्यापि दगडी कोळसा बाहेर काढलेला नाहीं. लोखंडाचे दगड पुष्कळ खेड्यांत सांपडतात.

उद्योग धंदे.—हातमागावरील सुती कापड, टोपल्या व चटया करणें, लोखंडाचें काम, पितळ व पंचरशी धातूचें काम करणें. या भागांतील व्यापार मुख्यत्वेंकरून कटकशीं होत असून कांहीं पुरी व गंजम संस्थानाशीं देखील होतो. अंगुळ शेखपूर आणि बागडिया हीं या जिल्ह्यांतील मुख्य व्यापाराचीं ठिकाणें आहेत.

इ. स.१८८९सालीं अनावृष्टीमुळें या भागांत दुष्काळ पडला होता. जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असतो. अंगुळ विभागाची प्रथम पाहणी इ. स. १८५५ सालीं झाली. जमीन महसूल ( १९–३–४ ) ८७ हजार, एकंदर उत्पन्न १२५ हजार होतें.

वि भा ग.–अंगुळ जिल्ह्याचा विभाग. उ. अ. २०° ३२′व २१°१०′ पू. रे. ग्र. ८४°१८′ आणि. ८५° ४३′ क्षेत्रफळ ८८१ चौ. मै. लोक संख्या ( १९११ ) १२५२३३ या विभागांत ४६८ खेडीं आहेत. अंगुळ हें मुख्य ठिकाण होय.

गां व.—अंगाल अंगुळ जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश. २०° ४८′ व पूर्व रेखांश. ८४° ५९′ लोकसंख्या (१९०१)६९३. येथें अवश्य सरकारी कचेऱ्या असून तुरुंगांत ११० कैद्यांची सोय आहे.

अंगोरा शहर—प्राचीन अंकिरा (आधुनिक अंगोरा)हें आशियामायनरमधील गॅलेशियांतील इराणी राजमार्गावर वसलेलें एक मोठें व भरभराटीचें प्राचीन शहर होतें. त्यामुळें इ. स. २३२ व्या वर्षी गॅलेशियांत कायम वस्ती केलेल्या तीन गॉल जातींपैकीं टेक्टोसेजस या जातीनें आपलें मुख्य ठिकाण केलें. इ. स. पूर्वी १८९ व्या वर्षी मॅनलिअस व्हल्सो यानें आपलें सैन्याचें मुख्य ठाणें केलें. इ. स. पूर्वी ६३ वर्षी पांपेनें येथें एक अंमलदार नेमला. इ. स. पूर्वी २५ त हें शहर गॅलेशिया या रोमन प्रांताची राजधानी झाली. येथें ख्रिस्ती धर्माचा प्रसार बहुतकरून १ ल्या शतकांत झाला असावा. कॉन्स्टन्टिनोपल जेव्हांपासून रोमन साम्राज्याचें मुख्य शहर झालें तेव्हांपासून अंगोरा शहराची खरी भरभराट सुरू झाली.

अ र्वा ची न—हल्लीं अंगोरा हें आशियांतील तुर्कस्तानच्या अंगोरा विलायतचें मुख्य ठिकाण आहे. हें एका टेंकडीवर वसलें असून त्याची रचना चांगली दिसत नाहीं. रस्ते फार अरुंद व घरें कच्च्या विटांचीं आहेत.

आधुनिक अंकिरा शहरांत रोमन व बायझंटाईन अंमलांतील कांहीं अवशेष आहेत. ऑगस्टम नांवाचें 'रोम व ऑगस्टस' यांच्या नांवानें उभारलेलें एक देऊळ फार महत्त्वाचें आहे. हें देऊळ बादशहा आगस्टस जिवंत असतांना गॅलेशियन लोकांच्या मंडळानें उभारलें असून याच्या भिंतीवर ग्रीक व लॅटिन भाषेंत एक लेख कोरलेला आहे. या लेखांत बादशहाचें चरित्र व त्यानें केलेलीं मुख्य कामें यांचें वर्णन आहे.

ग्रीको–रोमन व बायझंटाईन शिल्पकामांचे कांहीं अवशेष अजुन सांपडतात. सर्वांत सुंदर असें रोम आणि आगस्टस यांचें देवालय आहे. बायझंटाईन कालामध्यें हें एक महत्त्वाचें ठिकाण होतें. नंतर तें इराणी व अरब लोकांच्या ताब्यांत गेलें. सेल्जुक तुर्कांनीं तें सर केलें. व १८ वर्षेंपर्यंत धर्मयुद्धांत भाग घेणाऱ्या लॅटिन संघाच्या तें ताब्यांत होतें.१३६० सालीं ओटोमन तुर्कांनीं अंगोरा शहर घेतलें. इ स. १४०२ मध्यें तैमूरनें तुर्की सुलतान बयाझीद याचा पराभव करून अंगोराजवळ त्याला कैद केलें. पहिल्या महंमदानें १४१५ सालीं पुन्हां तार्तर लोकांपासून अंगोरा परत घेतलें. तेव्हांपासून ओटोमन साम्राज्याचा हें शहर भाग होऊन राहिलें आहे. १८३२ सालीं इब्राहिमपाशाच्या अधिपत्याखालीं इजिप्शियन लोकांनीं हें शहर घेतलें होतें. अंगोरा कान्स्टान्टिनोपलशीं रेल्वेनें जोडलें आहे.

अंगोरा मध व फळें यावद्दल प्रसिद्ध आहे. सध्यां येथें ब्रिटिश वकील असतो. येथील लोकसंख्या सुमारें २८००० आहे. अंगोरा विलायतचें क्षेत्रफळ२७,३७०चौरस मैल असून लोकसंख्या ९,३२,८०० आहे. अंगोराबकरीं लोंकरीकरितां प्रसिद्ध आहेत. या विलायतेंत मोहेर लोंकरीखेरीज सतरंज्या व गालिच्यांचा मोठा व्यापार चालतो.

**अँगोला**—भूमध्य रेषेच्या दक्षिणेस असणाऱ्या आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील पोर्तुगीज मुलुखाचें हें सर्वसाधारण नांव आहे. याच्या पश्चिमेस अटलांटिक महासागर असून कांगो नदीच्या दक्षिण तीरापासून क्युनेने नदीच्या मुखापर्यंत किनाऱ्याकिनाऱ्यानें हा मुलूख पसरला आहे. हा दक्षिणेस ८० मैल पावेतों कांगो नदीनें मर्यादित झाला आहे. या मुलुखाची पूर्व सरहद्द अतिशय नागमोडी आहे. याच्या दक्षिणेस पूर्वीची जर्मन साउथ-वेस्ट आफ्रिका असून या सबंध प्रांताचें क्षेत्रफळ सुमारें ४,८०,००० चौरस मैल आहे. लोकसंख्या ४१,१९,००० आहे. अँगोलाचे राजकीय दृष्ट्या पांच विभाग केलेले आहेत. त्यांपैकीं चार किनाऱ्यावर असून पांचवा विभाग म्हणजे लुंडा प्रांत हा सर्वस्वीं आंत आहे.

येथील हवा यूरोपियनांच्या प्रकृतीला फारशी मानवत नाहीं. डोंगराळ भागाची हवा आरोग्यकारक व उत्तेजक आहे. जूनपासून सप्टेंबरपावेतों थंडी असते. आक्टोबरपासून मेपर्यंत पावसाळा असतो.

प्रांताच्या उत्तर भागांत घनदाट अरण्य आहे. कापूस, कॉफी, तंबाखू वगैरेचीं झाडें पुष्कळ आहेत. येथील जंगलांत इमारतीचें लांकूड पुष्कळ होतें. सिंह, चित्ते, हत्ती, गेंडे वगैरे हिंस्र प्राणी जंगलांत बरेच सांपडतात.

येथील बहुतेक रहिवाशी बंटू-नीग्रो जातीचे आहेत. या वंशाच्या मुख्य जाती म्हटल्या म्हणजे बा-कांगो व अबुंदा या होत. अबुंदा जातींत पोर्तुगीज रक्ताची भेसळ आहे. क्युनेने नदीच्या जवळील डोंगराळ भागांत बोअर लोक राहतात. सबंध प्रांतांत नैसर्गिक किंवा कृत्रिम जड वस्तूंत अद्भुत शक्तीचें अधिष्ठान आहे, असें समजून त्या वस्तूंची पूजा करण्याचा प्रघात आढळून येतो.

शेतकीविषयक व खानिज साधनांचा अँगोला येथें भरपूर पुरवठा आहे. कॉफी, रबर, मेण, ताडाचें तेल, कातडीं व गुरें या वस्तू बाहेर देशीं रवाना होतात. खाण्याचे पदार्थ, कापसाच्या व लोंकरीच्या वस्तू, व लोखंडी सामान, इत्यादि माल बाहेरील देशांतून याठिकाणीं येतो.

पोर्तुगाल, इंग्लंड, जर्मनी, इत्यादि देशांशीं अँगोलाचें, आगबोटीनें दळणवळण सुरू आहे. लोआंडा ते आंबाका व मालांजीपर्यंत आगगाडी गेली आहे. लोबिटो उपसागरापासून कांगो-ऱ्होडेशिआपर्यंत दुसरी एक आगगाडी गेली आहे. बैलगाडीचे व उंटावरून प्रवास करण्याचे रस्तेहि बरेच आहेत.

अँगोलाचा राज्यकारभार लोआंडा येथें राहणारा गव्हर्नर जनरल हा पाहतो. हा लिसबन येथील वसाहतप्रधानमंडळाला जबाबदार आहे. प्रत्येक जिल्ह्यावर स्थानिक अधिकारी असतो.

१५ व्या शतकाच्या अखेरीस पोर्तुगीज लोकांनीं आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर आपलें ठाणें दिलें. डायओगो-क्याम या पोर्तुगीज शोधकानें कांगो नदी शोधून काढून त्या नदीच्या मुखाजवळ एक दगडी खांब उभारला. १४९० त पोर्तुगालनें आपले धर्मोपदेशक येथें पाठवून कांगो प्रदेशाच्या राजाला ख्रिस्तोपासक बनविलें व येथपासून त्या राजाच्या राज्यांत ख्रिस्ती धर्म,हा राष्ट्रीय धर्म मानण्यांत येऊं लागला. पण या भागांत मनुष्यभक्षकांच्या ज्या स्वाऱ्या झाल्या त्यामुळें पोर्तुगीजांचें येथील वजन कमी झालें. १८ व्या शतकांत तें फिरून प्रस्थापित करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; व १७५८ त इंकोजे येथें आपलें ठाणें बांधलें.१७९१ त क्किोलो येथें त्यांनीं किल्ला बांधला.१८५५ त त्यांनीं आंब्रिझचा उत्तर किनारा काबीज केला. १८८८त त्यांनीं बोंझा कांगो येथें म्हणजे कांगो प्रदेशाच्या राजाच्या दरबारीं आपला रेसिडेंट नेमला व राजाला पेन्शन देण्यांत आलें.

अँगोला येथील पहिला पोर्तुगीज गव्हर्नर पालोडिआझ होय. लोआंडा शहर १५७६ त व बेंग्वेला १६१७ त स्थापलें गेलें. १८८४ त इंग्लंड व पोर्तुगालमध्यें तह होऊन खालील कांगोच्या दोन्ही तीरावरील पोर्तुगीजांची सत्ता इंग्लंडनें मान्य केली. १९ व्या शतकाच्या अखेरअखेरपर्यंत पोर्तुगालचा या प्रांताच्या अंतर्भागांत चांगलासा जम बसला नाहीं व १९०४, १९०५ व १९०७ या सालांत पोर्तुगीज सरकारला येथील रानटी जातीपासून फार त्रास झाला.

इ स वी स न.—१९१४ मध्यें येथील लोकसंख्या २१,२४,००० होती व १९२० मध्यें जवळजवळ ४०,००,००० झाली. त्यांपैकीं ३०,००० गोरे लोक बहुतेक पोर्तुगीज होते. गोरे लोकांच्या वसाहतीस योग्य असा मुलूख येथें पुष्कळ आहे. पण १९२१ पर्यंत इकडे यूरोपीय लोक फारसे आले नाहींत; व त्यामुळें या प्रांताची सुधारणा फार मंदपणें चालू आहे. कोको व काफी यांची लागवड बरीच होते. जंगलांत रबर सांपडतो. १९११ नंतर ऊंस व बटाटे यांच्या लागवडीस उत्तेजन देण्यांत आलें. मासे धरण्याचा धंदा बराच किफायतशीर आहे. खाणी व जंगल यांकडे अद्याप लक्ष दिलें गेलें नाहीं. दळणवळणाचीं साधनें फार अल्प असल्यामुळें येथें सुधारणा होत नाहीं. १९१४ पर्यंत फक्त ३२३ मैल रेल्वेरस्ता होता. त्यानंतर लोआंडा ( राजधानी ) ते मालांजेपर्यंत ( ३७५ मैल ) रेल्वे तयार होऊन ती १९१८ मध्यें पोर्तुगीज सरकारनें विकत घेतली. आणखी एक १११ मैल रेल्वेचा फाटा मोसामीडीस ते चाला पर्वतापर्यंत तयार झाला आहे. येथल्या राज्यकारभारांत सरकारला उत्पन्नापेक्षां

खर्च दरसाल अधिक होत असतो. येथील देश्य लोकांवर घरपट्टी ( हट टॅक्स ) शिवाय दुसरा कोणताहि प्रत्यक्ष कर नाहीं. आयात व निर्गत मालावरील जकात हेंच उत्पन्नाचें मुख्य साधन आहे.

१९०९-१० मध्यें दक्षिण अँगोला ज्यू लोकांनां वसाहतीकरितां घेण्याचा विचार होता; पण तो रहित झाला. पुढें १९१० ते १९१४ पर्यंत या भागावर प्रथम आर्थिक व नंतर राजकीय सत्ता बसविण्याचा जर्मनीचा प्रयत्न होता. पण जागतिक युद्ध सुरू झाल्यानंतर १९१५ मध्यें साऊथ वेस्ट आफ्रिकेंतील जर्मन लोक जनरल बोथाच्या ताब्यांत गेले व त्यामुळें अँगोला जर्मनांऐवजीं ब्रिटिशांच्या कक्षेखालीं जाण्याचा संभव उत्पन्न झाला. १९१४ मध्यें पोर्तुगीज सरकारनें अंगोलाला कांहीं स्वराज्याचे हक्क ( ऑटॉनमी ) दिले. त्यामुळें देश्य लोकांची स्थिति थोडी सुधारली. १९२० मध्यें पुन्हां आणखी अधिक स्वराज्याचे हक्क देऊन सेनहोर नॉर्टन डी मॅटॉस यास हाय कमिशनर नेमण्यांत आलें.

**अँग्विला.**—अँग्विला अथवा स्नेक ( सर्प ) हें ब्रिटिश इंडिजपैकीं एक बेट आहे. हें लीवर्ड बेटांच्या समूहापैकीं असून सेंट किट्स-नेव्हिसच्या इलाख्यांत आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार असून बहुतेक नीग्रो आहेत. हें १८° १२' उत्तर अक्षांश व ६३° ५' पश्चिम रेखांशांत असून १६ मैल लांब आहे. क्षेत्रफळ सुमारें ३५ चौ. मैल आहे. येथील वृक्षांचा नाश केल्यामुळें जंगल अगदींच कमी झालें आहे. सर्व जमीन शेतकऱ्यांच्या मालकीची असून ते रताळी, वाटाणे कडधान्यें, धान्य वगैरे पिकवितात व मेंढ्या व बकऱ्या पाळितात. गुरेंढोरें, चुन्याचा फास्फेट, मीठ वगैरे जिनसा शेजारच्या सेंट टॉमस बेटांत जातात.

**अंघड.**–मुंबई इलाखा. रेवाकांठांतील छोटें संस्थान. मेहवासमधील अगदीं दक्षिणेकडे मही नदीच्या कांठीं हें गांव आहे. याचें क्षेत्रफळ ३॥ मैल असून एका कुटुंबांतल्या सहा कोळ्यांच्या तें मालकीचें आहे; पैकीं तिघांनां कोतवाल व तिघांनां पागी असें संबोधितात. अंघड कोळी प्रख्यात चोर आहेत. ५७ सालच्या बंडांत त्यांनीं इतका त्रास दिला कीं, त्यांचें गांव अधिक मोकळ्या जागेवर आणावें लागलें.

**अंचलगच्छ.**–अंचलगच्छाची पट्टावली प्रतिक्रमणसूत्रांत आढळते. या अंचलगच्छपट्टावलींत महावीरानंतर १४६४ वर्षें हा उद्योतनाचा काल ( विक्रम संवत ९९४ ) दिलेला आहे. उद्योतनामागून त्याच्या ८४ शिष्यांपैकीं एक जो सर्वदेव त्याची ३६ वा सूरि म्हणून स्थापना झाली. यामागील सूरींची यादी खरतरगच्छ व तपागच्छ यांत दिलेली आहे. या दोन पट्टावलींत फरक इतकाच कीं खरतरगच्छांत महावीर १ ला सूरि व सुधर्मा २ रा धरला आहे, तर तपागच्छांत सुधर्मा १ ला सूरि म्हटलें आहे. सर्वदेवापूर्वीचे ३५ सूरी येणेंप्रमाणें:—

१ सुधर्मा, २ जंबु, ३ प्रभव, ४ सज्यंभव, ५ यशोभद्र, ६ संभूतविजय, ७ स्थूलभद्र, ८ आर्य महागिरी व आर्यसुहस्तिन, ९ आर्यसुस्थित व आर्यसुप्रतिबद्ध, १० इंद्रदिन्न, ११ दिन्न, १२ सिंहगिरि, १३ वज्र, १४ वज्रसेन, १५ चंद्र, १६ सामंतभद्र, १७ वृद्धदेव, १८ प्रद्योतन, १९ मानदेव, २० मानतुंग, २१ वीर, २२ जयदेव, २३ देवानंद, २४ विक्रम, २५ नारसिंह, २६ समुद्र, २७ मानदेव, २८ विबुधप्रभ, २९ जयानंद, ३० रविप्रभ, ३१ यशोदेव, ३२ प्रद्युम्न, ३३ मानदेव, ३४ विमलचंद्र, ३५ उद्योतन, ३६ सर्वदेव. ( इं. अॅ. ११ ).

सर्वदेवसूरीनंतर उद्योतनाचा दुसरा एक पद्मदेव नांवाचा शिष्य ३७ वा सूरि झाला. सांख्य-दर्शन्यांनां दीक्षा दिल्यामुळें याला सांख्यसूरि असें नांव पडलें; व नवीन गच्छाला शंखेश्वरगच्छ हें नांव मिळालें. राधनपुराजवळ शंखेश्वर म्हणून एक गांव आहे त्यावरून हें गच्छनाम तयार झालें ( वॅनेस-इंडेक्स बिओग्रॅफिकस इंडिकस ). हें स्थल पार्श्वनाथाला अर्पण केलेलें दिसतें. पुढील सूरीः ३८ उदयप्रभसूरि ३९ प्रभागच्छसूरि–याच्या अमदानींत नानकगच्छ हें नांव पडलें ( वेबर कॅटलाग २, पा. ९२६. ) ४० धर्मचंद्रसूरि, ४१ सुविनयचंद्रसूरि, ४२ गुणसमुद्रसूरि, ४३ विजयप्रभसूरि, ४४ नरचंद्रसूरि, ४५ वीरचंद्रसूरि. ४६ जयसिंहसूरि, ४७ आर्यरक्षितसूरि–याच्या काळीं अंचलगच्छाची स्थापना झाली ( सं. ११५९ ).( भांडारकरांच्या १८८३-८४ च्या रिपोर्टांत व मेरुतुंगाच्या प्रबंधचिंतामणीच्या प्रस्तावनेंत दिलेली उद्योतन आर्यरक्षित यांमधील सूरींची यादी वरील यादीशीं जुळत नाहीं. ).

४७ आ र्य र क्षि त सू रि—हा सं. ११३६ मध्यें दंत्राण (दंतनि) गांवीं प्राग्वाट ज्ञातीचा व्यवहारिन् द्रोण याच्या पोटीं जन्मला. सं. ११४६ ( ११४२ पीटरसॅन रिपोर्ट ४ बॉं. रा. ए. सो. १८९४ ) मध्यें दीक्षा घेतली. सं. १२०२ मध्यें आर्यरक्षित नांवानें सूरिपद पावला. याच्याच कारकीर्दींत ( सं. ११६९ ) या गच्छाला विधिपक्षगच्छ असें नांव मिळालें. यानें ३५१७ लोकांनां दीक्षा दिल्याची माहिती मिळते. याचें मूळ नांव गोडु असें असून विजयचंद्रोपाध्याय हें त्याचें गुरुदत्त नांव होतें.

४८ ज य सिं ह सू रि—कोटिद्रव्यधनिन दाहडशेट व नेढी यांचा हा सुपुत्र कुंकण देशांतील सोपारापुर पट्टण येथें सं. ११७९ त जन्मला. धर्मदीक्षा सं. ११९३ मध्यें घेऊन हा १२०२ त सूरि झाला. सं. १२५८ मध्यें याचा अंत झाला. हा सिद्धराजाचा समकालीन असून या दोघांचा एकत्र उल्लेख जयशेखरसूरीच्या उपदेशचिंतामणी ग्रंथांतील प्रशस्तींत आढळतो ( रिपोर्ट ऑन दि सर्च फॉर संस्कृत मॅनस्क्रिप्ट्स १८८३-८४ पान. ४४२ ).

४९ ध र्म घो ष सू रि—याचा जन्म माहवपुरनगरांत सं. १२०८ त झाला. याचा पिता चंद्रव्यवहारिन् व माता राजलदे

म्हणून होती. यानें सं. १२१६ त दीक्षा घेतली व १२३४ त आचार्यपद पावला. सं. १२६३ मध्यें यानें "शतपदी" "षट्पदिका" ( पीटर्सनचा रिपोर्ट ४ बॉ. रा. ए. सो. १८९४ ) रचिली. धर्मघोष सं. १२६८ त कालवश झाला. यानेंच शाकंभरी येथें "प्रथमराज" याला जैन दीक्षा दिली असें मेरुतुंग लिहितो.

५० महेंद्रसिंहसूरि.—सर नगरांतील श्रेष्ठी देवप्रसाद व त्याची पत्नी स्थिरदेवी यांचा हा पुत्र सं. १२२८ त जन्मला. याला १२३७ त दीक्षा, १२६३ त आचार्यपद व १२६९ त गच्छनायकत्व मिळालें. हा १३०९ संवतांत ८२ वर्षांचा होऊन वारला. यानें आपल्या गुरूच्या शतपदीवर एक टीका लिहिली ( १२९४ ) व तसेंच १११ प्राकृत पद्यांचें तीर्थमालास्तवन रचिलें.

५१ सिंहप्रभसूरि.—विजापुरांतील श्रेष्ठी अरिसिंह व मती प्रीति यांचा पुत्र. जन्म १२८३, दीक्षा १२९१, आचार्यपद व गच्छनायकत्व १३०९ ( मेरुतुंगाच्या मतें १३०८ ) व मृत्यु सं. १३१३ मध्यें झाला.

५२ अजितसिंहसूरि.—दोद [ कोक ] ग्रामांतील जिनदेव व जिनदेवी यांचा हा पुत्र सं. १२८३ त जन्मला. दीक्षा १२९१ त, आचार्यपद अनहिलपुरांत १३१४ त व गच्छनायकत्व जालोर येथें १३१६ त मिळालें. सुवर्णनगरीच्या समरसिंह राजाला यानें जैनधर्मदीक्षा दिली व तसेंच १५ शिष्यांनां आचार्य केलें. मृत्यु सं. १३३९.

५३ देवेंद्रसिंहसूरि.— पालनपुरांतील श्रीमालिज्ञातींत याचा सं. १२९९ मध्यें जन्म झाला. पिता सांतूशेट व माता संतोषश्री थिराद्रग्रामीं. १३०६त दीक्षा मिळाली; तिमिरपुरांत सं. १३२३ त आचार्यपद पावला, १३३९ त गच्छनायक झाला व अनहिलपुरांत १३७१ त कालमुखीं पडला.

५४ धर्मप्रभसूरि.—भिनमाल ( श्रीमाल ) येथील लिंबाशेट व विजयलदे यांचा पुत्र. जन्म सं. १३३१; जालोर येथें १३४१ त दीक्षाग्रहण; १३५९ त आचार्यपद व १३७१ मध्यें अनहिलपुरांत गच्छनायकत्व. याच्या वेळीं भुवनतुंगसूरि शाखा उत्पन्न झाली. जुनागडच्या रावळ खेंगाराशीं त्याचा संबंध होता. प्रज्ञातिकलसूरि हें त्याला दुसरें नांव मिळालें. आसोटी गांवीं त्याला सं. १३९३ मध्यें मृत्यु आला. कालिकाचार्यकथा यानेंच रचिली [ १३८९ ].

५५ सिंहतिलकसूरि.—मेरुदेशांतील ऐकपुरांत अशाधरशेट व चांपलदे यांच्या पोटीं सं. १३४५त जन्मला. १३५२ त दीक्षा ग्रहण केली, १३७१ त आनंदपुरांत आचार्यपद पावला, १३९३ मध्यें पाटणांत गच्छनायक झाला, व १३९५ त स्तंभतीर्थ [ खंबायत ] येथें मृत्यु पावला.

५६ महेंद्रप्रभसूरि.—नटग्रामांतील आशाशेट व जीवनदे यांचा पुत्र. जन्म सं. १३६३; दीक्षा १३७५ त विजापूर येथें; अनहिलपट्टणांत आचार्यपदप्राप्ति १३९३; व खंबायत बंदरांत १३९८ मध्यें गच्छनायकत्व मिळालें. याच्या नेतृत्वाखालीं सं. १४३२ मध्यें शाखाचार्य अभयसिंहसूरीनें पार्श्वनाथाची एक मूर्ती स्थापन केली ( भांडारकर रिपोर्ट १८८३–८४ पान. ३२३ ).

५७ मेरुतुंगसूरि.—नाणी ग्रामांतील व्होरा [वोरा] वैरसिंह व नाहूणदे यांचा पुत्र. जन्म सं. १४०३; दीक्षा १४१८; शाल येथेंच आचार्य १४२६; तेथें गच्छाचें आधिपत्य मिळालें १४४६; सं. १४७१ त एका नागाचें रक्षण करण्यासाठीं त्यानें लोलाडगांवीं जीरिकापल्लीपार्श्वनाथस्तवन रचिलें. कालिदास व माघ यांचें अनुकरण नाभिवंशसंभव काव्य, यदुवंशसंभवकाव्य व नेमिदूत काव्य हीं रचिलीं शिवाय सूरिमंत्रकल्प, मेघदूतकाव्य, शतपदी समुद्धार, श्रीकण्कालयरसाध्याय यावर टीका, नवीन व्याकरण इत्यादि ग्रंथरचना केली. प्रबंधचिंतामणि, उपदेशशतक व कातंत्रव्याख्यान हीं लिहिणारा मेरुतुंग वेगळा; तो नागेंद्रगच्छाचा सूरि होय.

मेरुतुंगाच्या काळीं जयशेखरसूरि शाखाचार्य होऊन गेला. त्यानें उपदेशचिंतामणि, प्रबोधचिंतामणि संबोधसत्तरी, आत्मावबोधकुलक व इतर लहान मोठे ग्रंथ रचिले. मेरुतुंगसूरीचा शिष्य शाखाचार्य माणिक्यसुंदरसूरि यानें गुणवर्मचरित्र, सत्तरभेदीपूजाकथा, पृथ्वीचंद्रचरित्र, चतुःपर्वीकथा, शुकराजकथा, मलयसुंदरीकथा, संविभागव्रत कथा इत्यादि ग्रंथरचना केली.

५८ जयकीर्तिसूरि.—तिमिरपुरांत राहणाऱ्या भूपालशेट व भ्रमरादे यांचा हा पुत्र सं. १४३३ त जन्मला. १४४४ मध्यें दीक्षा घेतली. १४६७ त सूरिपदाची खंबायत येथें प्राप्ति झाली. पाटण येथें १४७३ त गच्छनायक झाला; व १५०० मध्यें मृत्यु पावला. याचा एक शिष्य शीलरत्न सूरि यानें सं. १४९१ त मेरुतुंगाच्या मेघदूतावर टीका लिहिली [ पीटरसन्स रिपोर्ट ३ पा. २४९ ].

५९ जयकेसरसूरि.—पांचाल देशांत श्रीथामनगरांत राहणाऱ्या देवसिंहाला लाखणदेच्या पोटीं हा झाला. जन्म सं. १४६१. याचें मूळ नांव धनराज असें होतें. सं. १४७५ त याला दीक्षा मिळाली. १४९४ त आचार्य व १५०१ मध्यें चांपानेर येथें गच्छनायक झाला. व याच्या ८१ व्या वर्षी [ सं. १५४२ ] हा वारला.

६० सिद्धांतसागरसूरि.—पाटण येथील सोनीज्ञातींतील जावड व पूरलदे यांचा पुत्र. मूळ नांव सोनपाल. जन्म सं. १५०६; दीक्षा १५१२; आचार्य १५४१, गच्छनायक १५४२ व मृत्यु १५६०.

६१ भावसागरसूरि.—मारवाड देशांतील नरसाणी गांवीं वीरासांगा व सिंगारदे यांच्या पोटीं सं. १५१० त जन्मला, याचें मूळनांव भावड असें होतें. जयकेसरसूरीकडून

खंबायत येथें याला दीक्षा मिळाली १५२०. सं. १५६० त आचार्य व त्याच सालीं मंडलग्रामीं गच्छेश झाला. मृत्यु सं. १५८३

याच्या हाताखालील विनयहंसानें सं. १५७२ त दशवैकालिकावर एक वृत्ति रचिली.

६२ गु ण नि धा न सू रि.--पाटण येथील श्रीमालिज्ञातिमुकुटमणि नागराजशेट व लीलादे यांचा पुत्र. मूळनांव सोनपाल, जन्म सं. १५४८; सं. १५५२ मध्यें सिद्धांतसागरसूरीकडून दीक्षा; १५८४ त स्तंभतीर्थांत [ खंबायत ] सूरिपदप्राप्ति; मृत्यु १६०२.

६३ ध र्म मू र्ति सू रि.--त्रांबवतींतील हंसराज वाणी व हांसलदे यांनां हा पुत्र सं. १५८५ त झाला. याला धर्मदास असें मूळ म्हणत. दीक्षा १५९९ अमदावादेस; आचार्य व गच्छनायक १६०२ मध्यें झाला. त्याचें त्यागी असें आणखी एक नांव आहे. याचा काळ सं. १६७० त पाटणा येथें झाला. यानें वृद्ध चैत्यवंदन व प्रद्युम्नचरित लिहिलें आहे. याच्या देखरेखीखालीं उत्तराध्ययनदीपिकेची व व्यवहारसूत्राची हस्तलिखित प्रत लिहिली गेली.

६४ क ल्या ण सा ग र सू रिः—लोलाड ग्रामांतील कोठारी नानिग व नामिलदे यांचा पुत्र. मूळचें नांव कोडण. याचा जन्म सं. १६३३ त झाला. धवलपुरांत १६४२ मध्यें दीक्षा घेतली. १६४९ त अहमदावाद येथें आचार्यपद पावला व पाटण येथें १६७० त गच्छेश झाला. कच्छाच्या रावाला यानेंच दीक्षा दिली. याच्या नजरेखालीं सं. १६७३ त जातकपद्धतिवृत्ति व १६८६ त अभिधानचिंतामणीवर टीका रचिली गेली. सं. १७१८ मध्यें भुजनगरांत याला मृत्यु आला.

६५ अ म र सा र सू रिः—उदयपूरच्या श्रीमालिज्ञातींतील शोधरीयोधा व सोना यांचा पुत्र. मूळनांव अमरचंद्र. हा संवत् १६९४ त जन्मला. दीक्षा १७०५. खंबायत येथें आचार्यपद १७१५ मध्यें व भुज येथें १७१८ त गच्छेशपद मिळालें. हा धोलका येथें सं. १७६२ त वारला. याच्या अंमलांत उपदेशचिंतामणीची एक हस्तलिखित प्रत सं. १७३९ त लिहिली गेली. ( भांडारकर रिपोर्ट १८८३-८४ पा. ४४३ ).

६६ वि द्या सा ग र सू रिः—कच्छदेशांतल्या खीरसरा बंदरांतील कर्मसिंह व कमलादे यांच्या या मुलाचें मूळनांव विद्याधर असें होतें. जन्म सं. १७४७, त दिक्षा १७५६, त आचार्यपद १७६२ ( धोलका ) व भट्टारकपद १७६२ त ( मातरग्राम ); मृत्यु १७९७. विद्यासागरसूरिस्तवन नित्यलाभानें रचिलेलें " विधिपक्ष ...... प्रतिक्रमणसूत्रांत" प्रसिद्ध झालेलें आहे. याचा शिष्य ज्ञानसागरगणि यानें गुणधर्मचरित्र व " चोत्रीस अतिशयनोच्छंद " हे ग्रंथ रचिले.

६७ उ द य सा ग र सू रि--नवागरांतील कल्याणजी व जयवंतीबाई यांचा पुत्र. मूळनांव उदयचंद. जन्म सं. १७६३; दीक्षा १७७७; आचार्य व गच्छेश १७९७; व मृत्यु सुरतेस सं. १८२६ मध्यें झाला. यानें " स्नातृपंचाशिका " रचिली आहे.

६८ की र्ति सा ग र सू रि— कच्छ देशांतील देसलपुरांत राहाणारा ओसवंशीय मालसिंह व पत्नी आसबाई यांचा हा पुत्र कुंवरजी संवत् १७९६ त जन्मला. १८०४ मध्यें. उदयसागरसूरीचा शिष्य झाला; १८०९ मध्यें यानें मांडवी बंदरांत धर्मदीक्षा घेतली व १८२३ त सुरतेस आचार्यपदीं विराजमान झाला. या प्रसंगीं खुशालचंद व भूखणदास यांनीं ६००० रुपये खर्च करून महोत्सव साजरा केला. किर्तिसागर अंजार येथें १८२६ त गच्छेश झाला व पुढें १८४३ मध्यें सुरत बंदरीं मरण पावला.

६९पु ण्य सा ग र सू रि—गुजराथेंत श्री वडोदरा [वडोदे] ग्रामीं पोरवाड ज्ञातींत रामसी व मीठीबाई यांच्या पोटीं सं. १८१७ त जन्मला. याचें मूळनांव पानाचंद. हा १८२४ त किर्तिसागरसूरीचा शिष्य झाला. भुजपुरांत १८३३ सालीं यानें दीक्षा घेतली व व १८४३ मध्यें सुरत येथें हा आचार्य व गच्छेशपद पावला. या महोत्सवाची तयारी लालचंद यानें केली होती. हा सूरि पाटण येथें सं. १८७० मध्यें मृत्यु पावला.

७० रा जें द्र सा ग र सू रि —हा सुरतेस जन्मला व संवत् १८९२ मध्यें मांडवी येथें मृत्यु पावला.

७१. मु क्ति सा ग र सू रि —उज्जनींतील ओसवाल ज्ञातीय खीमचंद व उमेदबाई यांचा पुत्र. मूळनांव मोतीचंद. जन्म सं. १८५७; दीक्षा सं. १८६७; आचार्य व गच्छेश पद सं. १८९२. पाटण येथें महोत्सवाच्या वेळीं शेट नथु गोकुलजी यानें सर्व व्यवस्था ठेविली होती. नलिनपुरांत लघुज्ञातीय व नागडागोत्रीय नरसिंहनाथानें स्थापिलेल्या जिनचैत्यांत मुक्तिसागरानें सं. १८९७ मध्यें चंद्रप्रभूची प्रतिष्ठा केली. सं. १९०५ त जीवराज रत्नसिंहानें स्थापिलेल्या महावीरचैत्याला यानें मंत्राभिषिक्त केलें. हा सूरि सं. १९१४ त वारला.

७२. र त्न सा ग र सूरी— कच्छदेशांतील मोथारा गांवच्या लाडणपचाण व झूमाबाई यांचा पुत्र. जन्म सं.१८९२, दीक्षा सं. १९०५, आचार्य व गच्छेश सं. १९१४. याच्या अधिकारांत लघुओसवंशीय शेट नरसिंहनाथ अंचलगच्छश्रावक बनला. सं. १९२८ त सुथरी गांवीं ३६ व्या वर्षींच हा मरण पावला.

७३. वि वे क सा ग र सू रि--सं. १९४० मधील सूरि [ संदर्भग्रंथः — "श्रीमद्-विधिपक्ष-गच्छीय श्रावकनाम दैवसादिक यांचें प्रतिक्रमणसूत्र" निर्णयसागर प्रेस मुंबई सं. १९४५, १८८९. ट्रँन्झॅक्शनस् ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, ऑफ ग्रेट ब्रिटन अँड आयर्लंड व्हॉ. ३

( लंडन १८३५ ), भांडारकर—रिपोर्ट ऑन दि सर्च फॉर संस्कृत मॅनस्क्रिप्ट्स् इन् बॉंबे प्रेसिडेन्सी१८८३-८४.मेरुतुंग प्रबंधचिंतामणि ( मुंबई प्रत १८८० ). इं अं. ११,१६,१९, २३. मेरुतुंग-शतपदीसमुद्धार पीटर्सन्स रिपोर्ट्स १-४ जे. ए. एस्. बी ५५. आर्किआलॅजिकल सर्व्हे ऑफ वेस्टर्न इंडिया २. जयसोमाचें विचाररत्नसंग्रह. समयसुंदराचें समाचारिशतक. वेबरचा कॅटलॉग; किलहार्न्स रिपोर्ट (१८८०-८१).बेंडाल-जर्नी इन् नेपाल अँड नार्दर्न इंडिया( १८८४-८५).मित्र—कॅटलॉग ऑफ संस्कृत मॅनस्क्रिप्टस, नोटिसेस ऑफ संस्कृत मॅनस्क्रिप्ट्स्. श्रावकप्रतिक्रमणादिसूत्र, मुंबई(१८८६)कुंटे—रिपोर्ट(१८८१).जाकोबीचा हस्तलिखित संग्रह ए. इं. २. जैनकाव्यप्रकाश मुंबई १८८३. खाखर रिपोर्ट. जे बी. आर. ए. एस १८९४ बॅनेस इंडेक्स जिऑग्रॅफिकस इंडिकस. एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स— जैनिझम. ग्वेरिनो—एसे ऑफ दि बिब्लिओग्रॅफी जैन, पॅरिस १९०६;रिपोर्ट ऑफ दि एपिग्रॅफी जैन, पॅरिस १९०८]

अंज.—( अँटिमनी ) अं, १२०.२ प.भा. फार प्राचीन कालापासून डोळ्यांत अंजनें घालण्याची वहिवाट हिंदुस्थानांत आहे. अंजनाचे बरेच प्रकार असून त्यांत सौविरांजन म्हणून जें अंजन सांगितलेलें आहे तें अंज धातूचें गंधाकिद [ सल्फाइड ] समजत असत. याचें जें सत्व काढीत त्यास "वरनाग" म्हणजे उच्च प्रतीचें शिसें असें म्हणत. अंजनाच्या [ अँटिमनी ] मुख्य घटकास अंज हें नांव दिलें आहे. अंजनाचा उपयोग सुरम्याकडे करतात, यावरून यास सुरम्याची धातु असेंहि नांव आहे.

लाहौलमधील शिग्री, पंजाबामधील झेलम जिल्हा व ब्रह्मदेशांतील टेनासेरिमप्रांत यांमध्यें सुरम्याची धातु सांपडते. ब्रह्मदेशांतील ॲमहर्स्ट जिल्ह्यांतील खाणींतहि ही धातु पुष्कळ असून तिजबरोबर सोनें मिश्रित असतें. या धातूचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे छापखान्यांतील खिळ्यांची धातु (टाइप मेटल) तयार करणें हा होय. हिंदुस्थानांतील लोक या धातूचा उपयोग इतर धातूंच्या मिश्रणांत करीत नाहींत. या धातूचा बायका काजळासारखा उपयोग करितात.

अं ज(सं ज्ञा अं व परमाणुभारांक १२०.२) हें रासायनिक मूलद्रव्य आहे. मूलद्रव्यांचें जें वर्गीकरण केलेलें आहे, त्यापैकीं नत्र [ नायट्रोजन ] , स्फुर [ फास्फोरस ], ताल [ आर्सेनिक ] आणि बिस्मत [ बिस्मथ ] हीं मूलद्रव्यें ज्या वर्गांत येतात त्याच वर्गांतील अंज हें मूलद्रव्य आहे. हें मूलद्रव्य फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत गंधकिदाच्या [ सल्फाइडच्या ] रूपानें माहीत आहे. तसेंच पाश्चात्यांसहि हें माहित आहे.

अंज हें मूलद्रव्य सृष्टिमध्यें असंयुक्त व संयुक्त या दोन्ही रूपांत सांपडतें. गंधकिदा [ सल्फाइड ]च्या रूपांत हें अतिशय सांपडतें. या रूपास इंग्रजी नांव स्टिब्नाइट असें आहे याशिवाय प्राणिदा [ ऑक्साइड ] च्या रूपानें हें व्हेलेन्टिनाइट, सेनारमोनाइट आणि सेर्व्हेंटाइट नांवाच्या खनिज द्रव्यांत सांपडतें. तसेंच रजताबरोबर डिस्क्राइट खनिजांत व रजत आणि गंधक यांशीं पायरारजिराइट आणि मिआरजिराइट या खनिज द्रव्यांत सांपडतें.

कृ तिः—अंज धातूचा गंधकिद अं२ग३ खनिजरूपांत सांपडतो. त्यापासून अंज हें मूलद्रव्य काढतात. हें खनिजद्रव्य भाजून मुशींत लोहचूर्णाशीं मिश्र करून भरतात, नंतर मुशीवर झांकण ठेऊन तापविली म्हणजे अंज धातु निराळी होते. यांत रासायनिक क्रिया-विक्रिया होतात त्या खालील समीकरणांत दाखविल्या आहेतः—



$$\text{अंजगंधकिद } अं_2 ग_3 + \text{लोह } ३ लो = \text{लोहसगंधकिद } ३ लोग + \text{अंज } {}^2अं.$$

प्रमाणाधिक्यांत झालेलें लोह काढण्यासाठीं त्यांत कोळसा व सिंधुकर्बित, सिंधुगंधकित वगैरे गालक [ फ्लक्स ] मिसळून त्यांत आणखी अंजगंधकिद घालतात. या रीतीनें तयार केलेल्या अंज धातूमध्यें ताल [ आर्सेनिक ], लोह, गंधक व व सीस किंवा ताम्र यांच्या अंशाची अशुद्धता असते. म्हणून दाहक पालाशाशीं [ कॉस्टिक पोट्याश ] मिश्र करून व वितळवून शुद्ध करतात. शीत झाल्यावर या धातूचे स्फटिक होतात ते नेचाच्या [ फर्न ] आकारासारखे दिसतात. हा आकार "ताऱ्या" [ स्टार ] सारखा असल्यानें या धातूस कधीं कधीं "ताराधातू" ( स्टारमेटल ) असेंहि म्हणतात.

ध र्म—शुद्ध अंज धातु चकचकीत व नीळसर पांढऱ्या वर्णाची असते. ही ठिसूळ असून इचें वि. गु. ६.७१५ असतें. या धातूचे स्फटिक ताल व रक्तस्फुर [ रेड-फॉस्फोरस ] यांच्या स्फटिकाच्या आकाराशीं समान असतात. या धातूचा रसबिंदु ४३२०° श व क्वथनबिंदु १३००° वर असून शुभ्रोष्ण मानावर तिचें उर्ध्वपातन होतें. हवेमध्यें ही धातु क्वचित् गंजते. परंतु रक्तोष्ण मानावर ती जळूं लागते व अंजत्रिप्राणिद [ अँटिमनी ट्राय ऑक्साइड ] तयार होतो. तो पांढऱ्या धूम्ररूपानें अतिशय निघतो. ही धातु मंद उष्णतावाहक व विद्युद्वाहक असते. या धातूवर हरचें [ क्लोरिन ] तीव्र कार्य होतें व अंजत्रिहरिद अंह३ व अंज पंचहरिद अंह५ हीं तयार होतात.

या धातूची बाष्पघनता [ व्हेपर डेन्सिटि ] १५७२° श उष्णमानावर १०.७४ व १६४०° श वर ९.७८ आहे. यावरून ताल व स्फुर धातूंच्या अणूंपेक्षां हे कमी बिकट [ कॉंप्लेक्स ] आहेत. अंज धातु ठिसूळ असल्यानें असंयुक्त स्थितींत तिचा उपयोग फक्त उष्णता विद्युत्राशी [ थर्मोइलेक्ट्रिक पाइल्स ] तयार करण्याकडे करतात. परंतु अंजचें दुसऱ्या धातूंशीं मिश्रण केलें म्हणजे फार उपयुक्त मिश्र धातू तयार होतात. उदाहरणार्थ, कांसें [ प्युटर ], ब्रिटानिया धातु, छापण्याचे खिळे [ टाइप ] पाडण्याची धातु

वगैरे. शिशामध्यें अंजचा थोडा अंश असला म्हणजे त्या मिश्र धातूवर गंधकाम्लाची कांहीं क्रिया होत नाहीं. टाइपाच्या धातूंत ८३ भाग शिसें व १७ भाग अंज धातु असते.

ठसे [ स्टिरिओटाईप प्लेटस ] करण्याकरितां ९ भाग शिसें, दोन भाग अंज आणि २ भाग बिस्मत धातु एकत्र करून मिश्र धातु केलेली असते.

ह्यी प्रमाणें देशपरिस्थिति, ठशाचा आकार, योजना वगैरे प्रमाणें पुष्कळ कमी जास्त वापरण्यांत येऊन शिवाय कथील वगैरे इतर धातूंचीहि त्यांत भेसळ करण्यांत येते. परंतु साधारण धोरण शिशाचें प्रमाण शेंकडा ६० व अंजचें प्रमाण कथलापेक्षां जास्त असावें.

रक्तोष्णमानावर अंज धातूच्या योगानें पाण्याच्या वाफेचें पृथक्करण होतें. उद्–हराम्लाच्या सौम्यद्रवाचें यावर कार्य घडत नाहीं; परंतु तीव्र उद्–हराम्लांत उष्ण केल्यावर अंज त्रिहरिद क्षार होतो. अंज धातु उष्ण तीव्रगंधकाम्लांत विरघळते व अंज गंधकिद $अं_2$[ गप्र ३ ] क्षार होतात. नत्राम्लाच्या योगानें अंजचें त्रिप्राणिद किंवा पंचप्राणिदांत रूपांतर होतें. अंज धातूचा गंधक आणि स्फुर यांशीं तात्काळ संयोग होतो. अंज धातु, धातूंच्या प्राणिदांबरोबर उदाहरणार्थ, सीस एकप्राणिद [ लिथार्ज ], पारद प्राणिद, मंगळ द्विप्राणिद यांबरोबर उष्ण केली असतां तिचें प्राणिदांमध्यें रूपांतर होतें.

संयुक्त पदार्थ.—अंजाइन–अंज आणि उज्ज यांचा संयोग होऊन अंजाइन ( स्टिबाइन ) $अं.उ_3$ नांवाचा संयुक्त पदार्थ बनतो. याची घटना नत्र, स्फुर आणि ताल यांचा उज्जशीं संयोग होऊन जे संयुक्त पदार्थ होतात त्यांच्या घटनेशीं समान आहे. अंज व जशद यांच्या मिश्र धातूंवर उत्हराम्लाची क्रिया केली किंवा अंजजन्य संयुक्त पदार्थांच्या द्रवावर नवजात ( नॅसंट ) उज्जची क्रिया केली म्हणजे अंजाइन तयार होतो. अशा रीतीनें तयार केलेल्या अंजाइनमध्यें उज्जवायु अतिशय मिश्र झालेला असतो. तो त्यापासून निराळा करणें असेल तर द्रवरूप द्रवेंत ( लिक्विड एअर ) शीत करावा. म्हणजे अंजाइनचा पांढरा घन पदार्थ होतो.

धर्म.—अंजाइन हा वर्णहीन विषारी वायु असून त्यास फार वाइट वास येतो. याची ज्वाला निळसर पांढुरकी असते. त्याचे धर्म तालाइन [ अर्साइन ] च्या धर्माशीं सदृश आहेत. उष्णतेनें त्याचें पृथक्करण होऊन त्याचे घटक असंयुक्त होतात. उष्णतेनें झालेला अंजचा अवपात [ डिपॉझिट ] व तालचा [ आर्सेनिक ] अवपात यांत भेद ओळखतां येतो. तालच्या अवपातापेक्षां अंजचा अवपात कमी बाष्पभावी ( व्हालटाइल ), असून अधिक काळसर व धूसर [ स्मोकी अॅपिअरन्स ] असतो. अंजचा अवपात अधिहरसाम्लाइताच्या द्रवांत [ हाइपोक्लोराइट्स ] अविद्राव्य असून अमोनिगंधकिदाच्या द्रवांत [ अॅमोनियम सल्फाइड ] विद्राव्य आहे. रजतनत्रिताच्या द्रवांत अंजाइन वायु घातला म्हणजे कृष्णवर्ण निपात रजत अंजिद [ सिल्व्हर अँटिमोनाइड ] $अं र^3$ येतो. अंजाइनचें पृथक्करण हरसंघांतील मूलद्रव्याच्या योगानें व उज्जगंधकिदा ( हायड्रोजन सल्फाइड ) नें होतें. अंजाइन $अंउ_3$ चे मधील उज्जचे ३तिन्ही परमाणू हे सेंद्रिय मूलकांनीं ( ऑरगॅनिक रॅडिकल् ) निविष्ट करतां येतात.

अंज प्राणिदें.—( ऑक्साइड्स ऑफ अँटिमनी. ) अंज धातूचे तीन प्राणिद आहेत तेः—अंज त्रिप्राणिद [ अँटिमनी ट्रायऑक्साइड ] $अं_2प्र_3$, अंज चतुःप्राणिद [अँटिमनी टेट्राक्साइड ] $अं_2प्र_4$, अंज पंचप्राणिद [ अँटिमनीपेन्टाक्साइड ] $अं_2प्र_5$.

अंजत्रिप्राणिदः–$अं_2प्र_3$ [अँटिमनी ट्रायऑक्साइड]. अंजत्रिप्राणिद $अ_2प्र_3$ हा सृष्टिमध्यें अंजच्या अशुद्ध खनिजरूपांत सांपडतो. हा पांढरा असतो. या अशुद्ध खनिज अंजत्रिप्राणिदास " व्हॅलेन्टिनाइट " व " सेनारमोन्टाइट " अशीं इंग्रजी नांवें आहेत. अंज हवेमध्यें जाळला किंवा त्यावर नत्राम्लानें प्राणिदिक्रिया केली, म्हणजे अंजत्रिप्राणिद तयार होतो. अंज हवेमध्यें जाळून तयार केलेल्या त्रिप्राणिदांत चतुःप्राणिदाचें मिश्रण असतें. त्रिप्राणिद हा उच्च उष्णमानावर पुष्कळ वेळ उष्ण केल्यास त्याचें चतुःप्राणिदामध्यें रूपांतर होतें. सिंधु उत्प्राणिदासारखीं जीं तीव्र अनाम्लें [ बेसेस ] आहेत त्यांचें कार्य अंज त्रिप्राणिदावर केलें असतां त्याचें अम्लप्राणिदाप्रमाणें कार्य घडतें. परंतु याशिवाय जीं दुसरीं अनाम्लें आहेत त्यांचें कार्य केलें असतां अंजत्रिप्राणिदाचे अंगीं अम्ल धर्म नसतो. अति तीव्र अम्लाचें कार्य केलें तर अंजत्रिप्राणिदावरं अनाम्लाप्रमाणें कार्य होतें.

अंजचतुःप्राणिद ( अँटिमनी टेट्राक्साइड ) $अं_2 प्र_4$. अंजत्रिप्राणिद $अं_2प्र_3$ हा हवेंत उच्च उष्णमानावर खूपवेळ उष्ण केला म्हणजे त्याचें रूपांतर अंजचतुःप्राणिदामध्यें होतें. यापेक्षां सुलभ रीतीनें तयार करण्याकरितां अंजाम्ल ( अँटिमोनिक अॅसिड ) $उ_3अंप्र_4$ जाळून त्यांतून पाणी व प्राण घालविला म्हणजे अंजचतुःप्राणिद तयार होतो. साधारण उष्णमानावर अंजचतुःप्राणिद पांढरा शुभ्र असतो परंतु उष्ण केला असतां पिंवळा होतो. तीव्र अनाम्लावर याचें कार्य अनाम्लाप्रमाणें घडतें. परंतु तीव्र अम्लावर याचें कार्य सौम्य अनाम्ला प्रमाणें घडते.

अंजचतुःप्राणिद बाष्पभावी [व्हालटाइल] नाहीं. याचें वि. गु. ६.६९५२ असतें. हा पाण्यांत अविद्राव्य असतो. बहुतेक अम्लांत हा प्राणिद विद्राव्य नाहीं. तीव्र उत्–हराम्लांत याचा अल्पांश विद्रुत होतो. उष्ण पालाशद्विद्राक्षिताच्या [पोटॅशिअम् बायटार्टेट] योगानें याचें पृथक्करण होतें.

अंजपंचप्राणिद $अं_2 प्र_5$ ( अँटिमनी पेन्टाक्साईड ):—अंजपंचप्राणिद तयार करण्याच्या रीति अशाः—( १ ) अंजनत्राम्ल यांचें वरचेवर बाष्पीभवन ( इव्हॅपोरेशन )

करून तयार होणारें अंजाम्ल २७५° श उष्ण मानापेक्षां जास्त उष्णमानावर उष्ण केलें नाहीं तर अंजपंचप्राणिद तयार होतो. (२) अंज धातु व रक्त पारदप्राणिद यांचें मिश्रण पीतवर्ण होईपर्यंत उष्ण केलें म्हणजे अंजपंच प्राणिद तयार होतो. (३) अंजत्रिहरिद नत्राम्लाबरोबर बाष्पीभवनानें शुष्क केला म्हणजे पंचप्राणिद तयार होतो.

अंजपंचप्राणिद फिकट पीतवर्ण भुकणीच्या रूपांत असतो. त्याचें वि. गु. ६·५ असतें. अंजपंचप्राणिद तीव्र उष्णतेवर उष्ण केला तर त्यांतून प्राणवायु असंयुक्त होऊन बाहेर पडतो. व त्याचें अंजचतुःप्राणिदांत रूपांतर होतें. हा पाण्यांत अविद्राव्य असून उत्-हराम्लामध्यें सावकाश विरघळतो. याच्या अंगीं थोडासा अम्लधर्म आहे. हा अल्ककर्बितांशीं मिश्र करून उष्ण केला म्हणजे मित अंजिनें तयार होतात.

**अंजाम्लें (ॲसिड्स ऑफ ॲंटिमनी).**—अंज धातूचीं तीन अम्लें आहेत. तीं:- (१) अंजाम्ल किंवा आसन्नअंजाम्ल $उ_3 अंप्र_4$ (ॲंटिमॉनिक ॲसिड किंवा आर्थो ॲंटिमोनिक ॲसिड; (२) मित अंजाम्ल $उअंप्र_3$ (मेटा ॲंटिमॉनिक ॲसिड); (३) तिग्म अंजाम्ल $उ_4 अं_2 प्र$ (पायरो ॲंटिमॉनिक ॲसिड).

**अंजाम्ल $उ_3अंप्र_4$ (ॲंटिमॉनिक ॲसिड)**—हें अंजाम्ल खालील रीतीनें तयार होतें.—(१) अंज धातूवर अम्लराज (ॲक्वारेजिआ) याची क्रिया करून प्राणिदीकरणाचा (ऑक्सीडेशन) शेवटल्या पायरीचा पदार्थ. (२) अंज धातूच्या पालाशक्षारावर नत्राम्लाची क्रिया करून त्याचें पृथक्करण केलेला पदार्थ. (३) अंजपंचहरिदांत (पेन्टाक्लोराइड) पाणी मिळवून जो निपात (प्रेसिपिटेट) येतो तो गंधकाम्लावर वाळविला म्हणजे जो पदार्थ तयार होतो तो. (४) अंजच्या कोणत्याहि क्षारावर गंधकाम्लाची क्रिया केली म्हणजे तयार होणारा पदार्थ

**धर्मः**—अंजाम्लाची पांढरी भुकटी असून ती पाण्यांत व नत्राम्लांत बहुतेक अविद्राव्य असते. यास उष्णता लाविली म्हणजे प्रथम मित अंजाम्ल $उअंप्र_3$ व नंतर पंचप्राणिद $अं_2 प्र_5$ यांत अनुक्रमें रूपांतर होतें. अंजाम्ल हें स्फुराम्लाशीं (फास्फेरिक ॲसिड) व तालाम्लाशीं (आर्सेनिक ॲसिड) समान धर्मीय आहे. व त्यांच्याप्रमाणें यापासून मित अंजाम्ल उअंप्र व तिग्म अंजाम्ल $उ_4 अं_2 प्र_7$ हीं होतात.

**मित अंजाम्ल $उअंप्र_3$ (मेटा ॲंटिमॉनिक ॲसिड):**—अंजाम्ल $उ_3अंप्र_4$ हें १७५°श उष्णमानावर उष्ण केलें किंवा अंजधातु व अंजगंधगिद (ॲंटिमनी सल्फाइड) आणि सोरमीठ (पालाश नत्रित) यांचें मिश्रण हें बराच वेळ रसस्थितींत ठेवावें. नंतर हा वितळलेला गोळा पाण्यांत विरवावा. जो द्रव होईल त्यांत नत्राम्ल घालावें व जो निपात (प्रेसिपिटेट) येईल तो पाण्यानें धुवावा. म्हणजे मितअंजाम्ल $उअंप्र_3$ होतें. मितअंजाम्लाची पांढरी भुकटी असून ती पाण्यांत बहुतेक अविद्राव्य असते. पाण्याच्या संसर्गांत हें अम्ल कांहीं वेळ राहूं दिलें म्हणजे सावकाश याचें रूपांतर अंजाम्लामध्यें होतें.

**तिग्म अंजाम्लः**—$उ_4 अं_2 प्र_7$ [पायरो ॲंटिमॉनिक ॲसिड] अंजपंचहरिदाचें उष्ण पाण्यानें पृथक्करण केलें म्हणजे जो निपात (प्रेसिपिटेट) येतो तो १००° श उष्णमानावर वाळविला म्हणजे तिग्मअंजाम्ल $उ_4अं_2प्र_7$ [पायरो ॲंटिमॉनिक ॲसिड] तयार होतें. तिग्मअंजाम्लाची पांढरी भुकटी असून ती अंजाम्लापेक्षां पाण्यांत व अम्लांत अधिक विद्राव्य असते. या अम्लापासून दोन तऱ्हेचे क्षार होतात. एका प्रकारचे जे क्षार असतात त्यांची घटनासारणी $धा_2उ_2 अं_2 प्र_7$ [धा = धातु] व दुसऱ्या प्रकारचे जे क्षार असतात त्यांची घटनासारणी $धा_4अं_2प्र_7$ [धा = धातु] अशी असते.

**अंजधातूचीं इतर अम्लें.**—अंज धातूचें एक अम्ल $उ_4अं_2प्र_6$ या घटनेचें असंयुक्त स्थितींत असल्याचें माहीत आहे. $धुअंप्र_2$ या घटनासारणीचा एक क्षारहि आहे. हा क्षार अर्थात $उअंप्र_2$ या अम्लापासून निघालेला असला पाहिजे. परंतु हें अम्ल असंयुक्त स्थितींत प्राप्त झालेलें नाहीं.

**अंज आणि हरयांचे संयुक्तपदार्थ, अंज त्रिहरिद $अंह_3$ (ॲंटिमनी ट्रायक्लोराइड).**—अंजत्रिहरिद खालीं दिलेल्या रीतीनें तयार होतो:—

(१) अंज धातुचें ज्वलन हर (क्लोरिन) मध्यें केलें असतां, (२) अंज धातूशीं पारदहरिद (मर्क्युरिक क्लोराइड) मिश्र करून त्या मिश्रणाचें पातन (डिस्टिलेशन) केलें असतां, (३) अंजचतुःप्राणिद किंवा अंजात्रिगंधकिद (ॲंटिमनी ट्राय सल्फाइड) हे उद्हराम्लामध्यें विरवून त्यांचें आंशिक पातन (फ्रॅकशनल डिस्टिलेशन) केलें असतां व (४) अंज धातु उद्हराम्लांत विद्रुत करून त्यांत नत्राम्ल घालून त्याचें पातन केलें असतां होतें.

**धर्मः**—अंजत्रिहरिद वर्णहीन, आर्द्रताशोषक व स्फटिकरूप पदार्थ आहे. हा लोण्याप्रमाणें मऊ असतो म्हणून यास अंजनवनीत (बटर ऑफ ॲंटिमनी) असेंहि नांव आहे. याचें विशिष्ट गुरुत्व ३.०६ आहे. याचा द्रवबिंदु (मेल्टिंग पॉइंट) ७३.२°श असून याचा द्रव वर्णहीन तैलरूप असतो. याचा उत्क्वथनांक (बायलिंग पाइंट) २२३° श असतो. हा क्षार अल्कहल (आल्कोहल) व कर्बद्विगंधकिद (कार्बन बाय सल्फाइड) यांत विद्राव्य असून पाणी अगदीं थोड्या प्रमाणांत असल्यास त्यांत विद्राव्य आहे. परंतु पाण्याचा अतिरेक झाल्यास बहुविध प्राणहरिदा (ऑक्सिक्लोराइड्स) चा निपात येतो. हा निपात भुकणीसारखा असतो. यास इंग्रजी नांव अलगरॉथ असें आहे. हे निपात केलेले प्राणहरिद पाण्यांत

सारखे उकळत ठेवले तर त्यांतील हर सर्वस्वीं नाहींसा होतो व शेवटीं अंजत्रिप्राणिदाचा अवशेष राहतो. हा क्षार अल्कहरिदाशीं संयुक्त होऊन त्यापासून द्वित्त क्षार होतात. त्याचप्रमाणें भार, खट, प्रांत व मग्न यांच्या हरिदाशीं संयुक्त होतो.

अंजपंचहरिद अंह५ (अँटिमनी पेन्टा क्लोराइड).– अंजत्रिहरिद हा हरवायूच्या प्रवाहांत उष्ण केला म्हणजे अंजपंचहरिद तयार होतो. हा बहुतेक वर्णहीन व बाष्प जनक ( फ्यूमिंग ) असून त्यास असह्य वास असतो. शीततेनें याचे घन स्फटिक होतात. हे ६° श उष्णमानावर वितळतात. यास उष्णता लाविली म्हणजे यांचें पृथक्करण होऊन त्याचें त्रिहरिद व हर असें रूपांतर होतें. हा क्षार पाण्याशीं संयुक्त होऊन अंह५. उ२ प्र आणि अंह५उ४ प्र२ या घटनेचे उज्जित ( हायड्रेट्स ) होतात. हा पंचहरिद, स्फुरच्या पंचहरिदाशीं समानधर्मी आहे; परंतु याच्यांतून हर अधिक लवकर असंयुक्त होतो. ही क्रिया खालील समीकरणांत दाखविली आहे.



अंजपंचहरिद = अंजत्रिहरिद + हर
अंह५ = अंह३ + ह२

याचें, अंजपंचप्राणिदाशीं पृथक्करण होण्यांत साम्य आहे. याचें त्रिप्राणिद व प्राण असें पृथक्करण होतें. पंच हरिदावर पाण्याची क्रिया केली म्हणजे प्रथम त्यापासून प्राण हरिद तयार होतो. परंतु याच्यापुढें कार्य होऊं दिलें म्हणजे अंजाम्ल उ३अंप्र४ होतें.

अंजत्रिगंधकिद.—अं२ग३ (अँटिमनी ट्रायसल्फाइड) अंजत्रिगंधकिद अं२ग३ हा सृष्टिमध्यें खनिजरूपांत 'स्टिब्नाइट ' किंवा' अँटिमोनाइट' नांवाच्या खनिज द्रव्यांत असतो. अंजत्रिहरिद किंवा (टारटर एमेटिक) याचा अम्लामध्यें द्रव करून त्यांत उज्जगंधकिद वायूचा प्रवाह सोडला म्हणजे नारिंगी रंगाचा लालसर निपात [प्रेसिपिटेट] येतो; हा उज्जित असतो.हा गंधकिद २००°श उष्णमानावर उष्ण केला म्हणजे काळा होतो. सृष्टीमध्यें जो अंजत्रिगंधकिद असतो तो काळा किंवा करड्या रंगाचा असतो.

अंजत्रिगंधकिद उज्जवायूच्या प्रवाहांत उष्ण केला म्हणजे त्याचें सोज्जित रूप (रिड्युस्ड )होऊन धातुरूप होतो. हा हवेंत जळतो व चतुःप्राणिदांत त्याचें रूपांतर होतें. अंजत्रिगंधकिद तीव्र उद्हराम्लांत, दाहक अल्कच्या द्रवांत व अल्कीय गंधकिदाच्या द्रवांत विद्राव्य आहे. धातुगंधकिदांच्या द्रवांत अंजत्रिगंधकिद विद्रावित होऊन गंधिक अंजसाम्लाच्या [सल्फ अँटिमोनिअस अॅसिड ]क्षाररूपानें त्यांत असतो.

अंजत्रिगंधकिद व अनाम्ल [बेसिक] गंधकिद, यांच्या संयोगानें लिव्हर्स ऑफ अँटिमनी नांवाचा पदार्थ तयार होतो. हे पदार्थ तयार करण्याकरितां तज्जन्य संयुक्त पदार्थांचें मिश्रण एकत्र रस करून तयार करतात. हे काळ्या रंगाचें भुकटीरूप असतात. त्यांत ज्या मानानें अंजधातूचें प्रमाण जास्त असेल त्या मानानें ते पाण्यांत जास्त अविद्राव्य असतात. या गांधिक अंजसायिता [थियो अँटिमोनाइट्स ] चा उपयोग रबराच्या गंधकीकरणांत [व्हल्कनायझेशन ] व आगपेट्या करण्यांत येतात.

सुरक्षित आगपेट्यां [ सेफ्टी मॅचेस ] तील काड्या फक्त पेटीच्या बाजूवरच पेटतात. या काड्यांचीं टोकें वर सांगितलेला अंजगंधकिद, पालाशहरित ( पोट्याशिअम क्लोरेट ) व कांचेची, पूड यांच्या मिश्रणांत बुडविलेलीं असतात. यांत स्फुर ( फॉस्फारस ) मुळींच नसल्यामुळें नुसत्या घर्षणानें त्या पेटत नाहींत. पेटीच्या बाजूवर सरसाच्या पाण्यांत रक्तस्फुर व कांचेची पूड विद्रुत करून तें मिश्रण लाविलेले असतें म्हणून काडी बाजूवर ओढतांच पेटते.

अंजपंचगंधकिद अं२ग५ ( अँटिमनी पेन्टासल्फाइड ):– अंजाम्लाच्या द्रवांत किंवा अजपंचहरीदाच्या द्रवांत उज्जगंधकिद वायूचा प्रवाह सोडला म्हणजे अंजपंचगंधकिद तयार होतो. गांधिक अंजसायिताच्या द्रवांचें तीव्र अम्लानें पृथक्करण केलें म्हणजे हा पदार्थ तयार होतो. निर्जल स्थितींत हा क्षार स्वर्ण वर्णाचा पीतवर्णी असून भुकटीच्या रूपांत असतो. ही भुकणी पाण्यांत अविद्राव्य असते. परंतु दाहक अल्क व अल्ककर्वित यांच्या जल द्रवांत ती विद्रुत होते. त्याचप्रमाणें धातूचे जे गंधकिद आहेत त्यांच्या द्रवांत ही भुकणी विद्रुत होते, व गांधिक अंजसायिताच्या रूपांत विद्रुत राहते. वातावरणांतील हवेचा संसर्ग न होऊं देतां हा अंजपंचगंधकिद उष्ण केला तर त्याचें अंजत्रिगंधकिद व गंधक असें पृथक्करण होतें.

अंजद्राक्षित ( टार्ट्रेट ऑफ अँटिमनी ):—अंजद्राक्षित हा क्षार पांच भाग अंजप्राणिद, सहा भाग अम्लपालाश द्राक्षित ( अॅसिड पोट्याशियम टार्ट्रेट ) आणि दोन पिंट बाष्पजल ( डिस्टिल्डवाटर ) मिश्र करून तयार होतो. $\frac{1}{16}$ ते $\frac{1}{8}$ ग्रेन प्रमाणांत स्वेदोत्पादक ( डायफोरेटिक ) म्हणून हा क्षार औषधांत देतात. एकपासून दोन ग्रेनपर्यंत वांतिकारक म्हणून देतात.

मोठ्या प्रमाणांत अंजद्राक्षित वांतिकारक आहे म्हणून यास वांतिकारक द्राक्षित ( टार्टर एमेटिक ) असें म्हणतात. लहान प्रमाणांत हें उत्तेजक, स्वेदोत्पादक व कफोद्धारक आहे. मोठ्या प्रमाणांत वांतिकारक आहे.

हींव, श्लेष्मलत्वचेला सूज येऊन झालेले अभिष्यंद इ० विकार, यांवर हें फार उपयुक्त आहे. कारण त्वचा व अंतःत्वचा यांच्या मार्गानें वाहणाऱ्या रसाची आंतरोत्सर्ग होण्याची क्रिया यानें उत्तेजित होते.

अंज द्राक्षित ( टार्ट्रेट ऑफ अँटिमनी ):— अंज धातूचे अनेक द्राक्षित होतात. यांत फार महत्त्वाचा असा वांतिकारक द्राक्षित ( टार्टरएमेटिक ) आहे. हा अंज व

पालाश धातूंचा द्राक्षित ( टार्ट्रेट ) होय. तीन भाग अंजप्राणिद, ४ भाग अम्लपालाश, द्राक्षितांत ( क्रीमा ऑफ टार्टर ) मिसळून त्या मिश्रणास थोड्या पाण्याबरोबर खलून त्याचा चिकट गोळा करितात, व त्यास कांहीं तास तसेंच ठेऊन नंतर ६ किंवा ८ भाग पाण्यांत घालून कढवितात. नंतर जो द्रव बनतो, तो कढत असतांनाच गाळून थंड होण्याकरितां ठेवितात. द्रव थंड होत जातो त्याप्रमाणें वांतिकारक द्राक्षिताचे चतुरस्र स्फटिक वेगळे होतात. हा क्षार १५ पट थंड पाण्यांत व ३ पट कढत्या पाण्यांत विद्रुत होतो. त्या द्रवास तीव्र, कडू व गदमळणारी [ उमदळणारी ] रुचि असते. यानें लिटमसचा निळा कागद किंचित लाल होतो. याचे स्फटिक हवेंत राहिले असतां त्यावर फुलारा फुटतो. याच्या द्रवानें फार वमन होतें, व रेचहि होऊन विषकारक परिणाम घडतो. याच्या द्रवांत उज्जगंधकिदाचा प्रवाह घातला असतां गंधकिद ( सल्फाइड ) तळीं बसतो, आणि अल्क किंवा अल्कीय-कर्बित यांच्या द्रवानें अंजप्राणिदाचा निपात ( प्रेसिपिटेट ) तळीं बसतो.

अं ज चा औ ष धा क रि तां उ प यो ग.—बेसिल व्हॅलेंटाइन व परासेल्सस यांच्या वेळेपासून अंज ( अँटिमनी )च्या निरनिराळ्या संयुक्त पदार्थांचा औषधाकरितां उपयोग केला जात असे; पण त्याचा दुरुपयोग होऊं लागल्यामुळें पारिसच्या पार्लमेंटनें १५६६ त त्याच्या उपयोगाला बंदी केली. अँटिमनीचा उपयोग दारूकरितां पेले तयार करण्याकडे होत असे. दारूंत वांतिकारक धर्म येण्याकरितां ती कांहीं वेळ या पेल्यांत ठेवीत. अँटिमनीच्या गोळ्या नुसत्या संसर्गानें गुण देत असा समज असून त्यांचें काम झाल्यानंतर पुन्हां उपयोगांत आणण्याकरितां त्या परत घेण्यांत येत असत. अँटिमनी टार्टरित( टार्टर एमिटिक) पोटांत घेतल्यास त्याचा पोटाच्या आंतल्या बाजूवर [ वॉल ऑफ दि स्टमक ] तत्काल प्रत्यक्ष परिणाम होऊन वांती होते, व शोषण झाल्यानंतर अस्थिमज्जेवर परिमाण होऊन हीच क्रिया चालू रहाते. अँटिमनी टार्टरित ( टार्टर एमिटिक ) याच्या अंगीं नाडी मंद व सावकाशपणें चालवयास लावण्याची चांगली शक्ति आहे ). त्याच्या योगानें श्वासोच्छ्वास हळू हळू कमी चालतो, व ज्यास्त प्रमाणांत घेतल्यास शरिराची उष्णता कमी होते. तें मज्जातंतुसंघाताची (नर्व्हस सिस्टीम)व विशेषतः कण्याची(स्पायनलकॉर्ड) तरतरी कमी करतें. तें आंतरोत्सर्गाबरोबर व बाह्योत्सर्गाबरोबर बाहेर जातें; व धाकट्या श्वासनलीच्या श्लेष्मलत्वचेंतून जातांनां बाह्योत्सर्गाचें प्रमाण वाढवितें. यास्तव त्याला कफकारक म्हणण्यास हरकत नाहीं. एकंदरींत, त्याचे परिणाम क्षोभकारक, व हृदयाची आणि मज्जातंतुसंघाताची तरतरी कमी करणारे आहेत. ह्यामुळें तें स्त्रिया व मुलें यांनां देऊं नये व पुरुषांनांहि क्वचितच प्रसंगी द्यावें.

वि ष वि ज्ञा न.—[ टॉक्झीकॉलॉजी ] अंज ( अँटिमनी ) ही धातु विषारी असून सर्व सजीव वस्तूंचें प्राणहरण करते. हें विष पोटांत गेल्यानंतर होणारीं सर्व चिन्हें आर्सेनिक प्रमाणेंच असतात; परंतु पोटांतील आंतड्यांचा क्षोभ कमी होतो व फुप्फुसें सामान्यपणें जास्त सुजतात. रोग्याला जर वांती होऊं लागली नसेल तर पोटाच्या पंपाचा उपयोग करावा किंवा जशदगंधकित [ सल्फेट ऑफ झिंक १०–३० ] व चमचाभर ग्रेन ट्यानिन अम्ल, पाण्यांत मिसळून वारंवार देत जावें व त्याबरोबरच चहा किंवा कॉफी अगर एखादें श्लेष्मोत्पादक पेय द्यावें. रोग्याला बिछान्यावर निजवून त्याच्या अंगावर गरम कपडे घालावे व उन पाण्याच्या बाटल्यांनीं अंग शेकावें.

**अंजनगांव**—मुंबई इलखा. पूर्वखानदेश. एदलाबादच्या पूर्वेस ६ मैलावर हें गांव असून येथें अमरसिंगभव याचें देऊळ आहे.

**अंजनगांव बारी**—उमरावती तालुका. घरें ७८१, लोकसंख्या २९७९. हें बडनेरापासून सुमारें चार मैलांवर असून रेल्वे स्टेशन आहे. येथील बहुतेक लोक बारी जातीचे असून गांव बागाईत आहे. विड्याचीं पानें व केळीं येथें फार होतात. बडनेराप्रमाणें हें गांव पेशव्यांच्या जहागिरींत होतें, व येथें आसपास लढाया होत असाव्यात याची साक्ष येथील अगदीं मोडकळीस आलेला मातीचा किल्ला देतो. येथें एक रामगीरबाबा नांवाच्या साधूची समाधि असून त्याठिकाणीं दरवर्षी डिसेंबर महिन्यांत लहानशी जत्रा भरते. अंजनगांवाहून तीन मैलांवर असलेल्या चांदूर उमरावती डोंगरावर एक तळें इ स. १८९८—९९ सालीं पडलेल्या दुष्काळांत बांधण्यांत आलें.

**अंजनगांव सुर्जी**—वऱ्हाड. उमरावती जिल्हा. दर्यापूर तालुक्याच्या उत्तरेस अंजनगांव आणि सुर्जी हे दोन खेडेगांव मिळून झालेला एक गांव. मूर्तिजापूर एलिचपूर रेल्वेचा फाटा या गांवावरून गेला हा आहे. उ. अ. २१° १०' व पू. रे. ७७° २०' यावर आहे.

अंजनगांवची लोकसंख्या ( १९११ ) ८६२८ व सुर्जीची लोकसंख्या सुमारें तीन हजार. सरकारी वसुलीकरतां अंजनगांव व सुर्जी अशीं निरनिराळीं गांवें समजलीं जातात. सुर्जी हा सुरंगीचा अपभ्रंश आहे असें म्हणतात. पूर्वी सुरंगीचीं झाडें येथें फार होत असत. येथें एक पडका किल्ला असून त्याच्या उंच चवथऱ्यावर उर्दू आणि इंग्रजी शाळा आहेत गांवांत निरनिराळ्या मुलामुलींच्या मराठी, इंग्रजी व ऊर्दु शाळा आहेत. येथें आठवड्याचा बाजार सोमवारी भरतो. कोष्टी लोकांचां येथें बरीच वस्ती असून साड्या, चोळखण, धोतरें, खादी, पागोटीं, वगैरे चांगलीं होतात. तीन सरकी काढण्याचे कारखाने व एक कापूस दाबण्याचा कारखाना या गांवीं आहे. गांवाच्या दक्षिण बाजूस एक महादेवाचें देऊळ आहे. त्यानिमित्त संबंध श्रावण महिना

तेथें यात्रा भरते व 'काठीची' मिरवणूक निघते. येथें पोष्ट व तारऑफिसहि आहे. येथें बेंच म्याजिस्ट्रेटची कचेरी आहे, येथें फार मोठी व्यापारी पेठ व प्रसिद्ध सावकार आहेत. ह्या ठिकाणीं जैन धर्मीय लाड आणि सईतवाड ह्यांची संख्या बरीच आहे. त्यांचीं देवळें (वसया) सुद्धां आहेत. पडित किल्ल्याच्या अवशिष्ट दरवाज्याच्या बुरुजाजवळ आश्विन शुद्ध नवमीच्या दिवशीं वैदर्भीय वहिवाटीप्रमाणें सरकारी मान म्हणून प्रथम महिषाच्या मस्तकावर "वार" करण्यांत येतो. हिंदु वस्ती बरीच सुशिक्षित आहे. हें शहर विशेषतः केळीचीं पानें आणि विड्याचीं पानें ह्या करितां प्रसिद्ध आहे व तीं बरींच बाहेर गांवीं पाठविलीं जातात.

अंजनगांव हें अलीकडील इतिहासांत महत्त्वाचें आहे. कारण येथेंच दुसऱ्या इंग्रजमराठ्यांच्या लढाईचा शेवट झाला. नागपूरच्या राजाबरोबर झालेल्या तहावर २३ डिसेंबर सन १८०३ रोजीं येथेंच सह्या झाल्या. याच दिवशीं शिंद्याशीं बोलणें सुरू झालें. त्यांत सर. ए. वेलस्ली, सर जे. मालकम, आणि माउंट स्टुअर्ट एलफिन्स्टन ही मंडळी होती. आणि मराठ्यांकडून विठ्ठलपंत होता. ३० डिसेंबर रोजीं हा तह पुरा झाला. इ. स. १८५० सालीं एलिचपूरचा नबाब गुलाम हसनखान यानें अकोटचा मुन्सिफ सय्यद सिराजुद्दीन हसन याजबरोबर उघड उघड युद्ध सुरू केलें. दोघांच्या सैन्यांची अंजनगांव येथें गांठ पडली व नबाबाचा जवळ जवळ मोड झाला होता; परंतु त्याच्या प्रतिपक्षानें लुटीस प्रारंभ केला. इतक्यांत नबाबानें उलट घेऊन मुन्सीफचा पराजय केला. वऱ्हाड ब्रिटिश राज्यांत सामील होण्यापूर्वी तीन वर्षें वऱ्हाडची ही स्थिति होती.

प्रसिद्ध मराठी कवि शिवनाथ रंगोपंत हा अंजनगांवीं जन्मला. देवनाथ महाराजांची जन्मभूमि हीच होय. त्यांचा व त्यांच्या संप्रदायाचा काव्यसंग्रह येथें आहे रामदासाचा चरित्रकार उद्धवसुत याचा मठ येथेंच आहे. [उमरावती गॅ.]

**अंजनवेल**—हें रत्नागिरी जिल्ह्यांतील एक प्रसिद्ध गांव. उ. अ. १७° ३१' व पू. रे. ७०° १५' वर आहे. हें गांव वाशिष्ठी उर्फ दाभोळ नदीवर असून तेथें एक जुना किल्ला आहे. मराठी अमदानींत हें जिल्ह्याचें ठिकाण होतें. पण १८१९ मध्यें गुहागर हें पेटयाचें ठाणें झाल्यामुळें अंजनवेलचें महत्त्व कमी झालें. ह्याच्या नजीक ३०० फूट उंच टेंकडीवर तालकेश्वराचें प्राचीन देवालय आहे. या बंदरांत दीपगृह, कस्टम कचेरी व धर्मशाळा आहे. येथें विणकामाचा धंदा चालतो. अंजनवेलच्या किल्ल्यालाच गोपाळगड म्हणतात. तो अंजनवेल बंदरापासून अर्ध्या मैलावर असून तीन बाजूंनीं समुद्रवेष्टित आहे व चवथ्या बाजूस खंदक आहे. भोंवतालचा तट जाड दगड व चुन्याचा असून २० फूट उंच, ८ फूट रुंद व चांगला भक्कम आहे. खंदक १८ फूट रुंद व बराच खोल आहे. किल्ल्याला दोन दरवाजे ( एक पूर्वेस व एक पश्चिमेस ) आहेत. किल्ल्यांत पूर्वी बरीच घरें होतीं; हल्लीं कांहीं घरें असून तीन विहिरी पाण्यानें भरपूर भरलेल्या आहेत. १८६२ पर्यंत तेथें रक्षणार्थ २०० शिपाई व दोन अधिकारी होते. अलीकडे तेथें मुळींच शिपाई नाहींत. फक्त जुन्या रद्दी तोफा पडलेल्या आहेत.

इतिहास.—१५ व्या शतकापूर्वी अंजनवेल येथें किल्ला नव्हता, पण मोजे गुढे तर्फ वलंबे येथें पवार उपनामक कोणी मराठा पुरुष गढी बांधून या भागावर अंमल चालवित होता असें इ. स. १८२४ च्या सुमारास नकलल्या गेलेल्या अंजनवेलची माहिती देणाऱ्या एका चोपड्यावरून दिसतें. इ. स. १५०२ च्या ( शके १७२४ ) सुमारास विजापूरच्या मुस्तफाखान नामक सरदारानें सदरहू पवाराच्या गढ्या उध्वस्त करून दाभेम ( दाभोळ ) येथें सुभा स्थापन केला. दाभोळ जिल्हा विजापूरकराकडे सुमारें १४९ वर्षें होता व इ. स. १६५१ ( शके १५७४ ) च्या सुमारास शिवाजीनें दाभोळ सुभा काबीज केला तेव्हां त्याबरोबरच अंजनवेल हा तालुका शिवाजीकडे आला. शिवाजीच्या ताब्यांत अंजनवेल गांव आला तेव्हां तेथें किल्ला अगोदरच बांधलेला होता. पण शिवाजीनें तो पुन्हां बांधून काढून त्याची मजबुती केली व त्या ठिकाणीं आपली एक गोदीहि स्थापन केली. शके १६२० ( १६२२? ) मध्यें म्हणजे इ. स. १६९८ च्या सुमारास अंबरनाथ हबशी यानें मराठ्यांपासून अंजनवेल किल्ला काबीज केला व तो पुढें ४६ वर्षें म्हणजे इ. स. १७४४ ( शके १६६५ ) पर्यंत त्याच्याकडेसच होता. शके १६६६ मध्यें ( माघ शु. ४ बुधवार रोजीं ) तो तुळाजी आंग्र्यानें शिद्द्यापासून काबीज केला व पुढें ११ वर्षांनंतर म्हणजे इ. स. १७५६ त ( शके १६७७ पौष शु. १४ रोजीं) तो पेशव्यांनीं रामाजी महादेव बिवलकर यास पाठवून आंग्र्यांपासून जिंकून घेतला. यानंतर मात्र हा किल्ला ५३ वर्षें म्हणजे पेशवाईच्या अखेरपर्यंत पेशव्यांकडेच होता. [ संदर्भ ग्रंथ—भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त शके १८३५; इतिहाससंग्रह, पु ४, अं, ७, ८, ९; बॉंबे गॅझेटियर व्हॉ. १, भा. २ ]

**अंजना**.—कुंजर नामक वानराची कन्या, व केसरी वानराची स्त्री. ही मारुतीची माता. ती पूर्वीची पुंजिकस्थली नामक अप्सरा असून, शापानें या जन्मास पृथ्वीवर आली होती [ वा. रा. कि. कांड सर्ग ६६ ].

**अंजनेरी**—मुंबई. नाशीक जिल्हा. त्रिंबकेश्वराच्या डोंगरापासून अलग अशी दाक्षिणोत्तर टेंकड्यांची रांग आहे. ही नाशिक तालुक्यामध्यें त्रिंबकेश्वर गांवापासून ४ मैल व नाशिक शहरापासून १४ मैलांवर आहे. टेंकडीच्या पायथ्याशीं अंजनेरी याच नांवाचें खेडें आहे. अंजनेरी टेंकडीच्या तिन्ही बाजूस कडे असून दक्षिणेकडील बाजूस थोडासा उतार असून त्या बाजूनें गुरें व क्वचित घोडेहि वर चढू शकतात.

या टेंकड्यांवर एकहि पक्षी आढळत नसे. पण अलीकडे कांहीं पक्षी तेथील रहिवाश्यांनीं मुद्दाम आणून वाढविलेले आहेत. येथें मधून मधून वाघ आढळतो.

या टेंकडीस किल्ला असें म्हणतात. माथ्यावर एक देवीचें देऊळ आहे. टेंकडीवर जाण्यास अंजनेरी गांवाजवळून रस्ता आहे. अर्धा मैल चढून गेल्यावर एका तुटलेल्या कड्यांतून बिकट रस्ता आहे त्यास दरवाजा असें म्हणतात. याच्या पुढें अर्ध्या रस्त्यावर डाव्या हातास एका गुहेंत देऊळ ( खडकांत खोदलेलें ) असून एक विहीर आहे. यास वानरगुहा ( मंकी केव्ह ) म्हणतात. माथ्यावर ईशान्य बाजूस तीन बंगले आहेत. येथें एक जांभळीच्या झाडांनीं तीन बाजूंनीं वेष्टित असें टांकें आहे व चवथ्या उघड्या बाजूवरून खालील देखावा अत्यंत रमणीय दिसतो. टांक्याचें पाणी रोगट असल्यामुळें एक विहीर खोदली आहे. याखेरीज या टेंकडीवर दोन टांकीं असून कांहीं झरेहि आहेत.

हा भाग समुद्रसपाटीपासून ३७०० फूट उंच असून सर्वांत जास्त उंची ४३०० फूट आहे. येथें उन्हाळ्यांत राहण्याकरितां नाशिकचे पुष्कळ लोक येतात.

जरी या टेकडीस किल्ला असें म्हणतात तरी येथें केव्हांहि तटबंदी केल्याचें आढळत नाहीं. राघोबादादा आनंदवल्ली येथें रहात असतां उन्हाळ्यांत येथें राहण्यास येत असे. त्यावेळचे अवशेष म्हणजे फैलखाना व हत्तीतलाव आणि ब्राह्मणतळें हीं दोन टांक्यांस मिळालेलीं नांवें होत. राजवाड्याचे अवशेष कांहीं दरवाज्याच्या पायऱ्यांत गेले व भिंती एका बंगल्यांत गेल्या. मुख्य टांक्याजवळ एक ध्यानमंदिर आहे. येथें राघोबादादा ध्यान करीत असे. या मंदिराच्या पश्चिमेकडे भिंतींत असलेल्या एका खिडकींतून समोर त्र्यंबकेश्वर किल्ल्याच्या कड्यास एक मुद्दाम पाडलेली फट दिसते. ही राघोबादादानें सूर्यास्त पहाण्याकरितां मुद्दाम पाडविलेली होती असें सांगतात. सर्वांत मोठ्या बंगल्याच्या पाठीमागच्या कड्यामध्यें एक खोदलेलें देऊळ आहे. यांत मूर्ति नाहीं. याच्या थोडेसें खालीं खडकामध्यें अर्धवर्तुळाकृति पायऱ्या खोदलेल्या आहेत, व समोर जांभळीच्या झाडाखालीं एक खुंट पुरलेला आहे. येथें मिशनरी प्रार्थना करितात.

अंजनेरीच्या पायथ्याशीं मोठ्या सुंदर देवळांचे अवशेष आहेत. हीं देवळें गवळी राजे, देवगिरीचे यादव ( ११५०–१३०८ ) यांच्या वेळचीं आहे असें म्हणतात. प्रत्येक देवळाच्या दरवाजाच्या वरच्या बाजूवर एक तीर्थंकराची मूर्ति आहे. एका देवळांत आसन घातलेल्या तीर्थंकराची मूर्ति आहे. पुष्कळ मूर्ति खालीं पडल्या आहेत व फुटल्या आहेत. येथें एक गणपतीची मूर्ति व एक लिंगहि आढळतें. एका जैन देवालयांत शके १०६३ ( इ.स. ११४० ) सालांतील एक संस्कृत शिलालेख आहे. त्यांत सेउणदेव(तिसरा)या यादव राजाच्या एका वाणी प्रधानानें कांहीं दुकानांचें उत्पन्न या देवालयास दिल्याचा उल्लेख आहे.

**अंजार**—मुंबई इलाखा कच्छच्या संस्थानांतील एक गांव. हें उत्तर अक्षांश २३° ६' व पूर्व रेखांश ७०° १०' वर आहे. लो. सं. (१९२१) १३५१०. इ. स. १९०३–४ सालीं म्युनसिपालिटीचें उत्पन्न ४१४९ रुपये होतें.

गांवाबाहेर अजमीरचा चव्हाण वंशाच्या संस्थानिकाचा भाऊ अजयपाल याचें घोड्यावर बसलेल्या मूर्तीचें एक देऊळ आहे. या अजयपालास नवव्या शतकांत अजमीरच्या हद्दीबाहेर हांकून दिलें होतें म्हणून त्यानें आपलें राहण्याचें हें ठिकाण केलें होतें. या देवळास कांहीं जमीन इनाम असून येथें पुष्कळ साधू येऊन राहिले आहेत. यांच्यांतील मुख्यास पीर अशी संज्ञा आहे. इ. स. १८१६ सालीं कच्छच्या रावानें अंजार गांव व जिल्हा कंपनी सरकारास दिला होता. परंतु इ. स १८२२ सालीं नवीन तह होऊन त्या अन्वयें हा भाग पुन्हां कच्छच्या रावाच्या ताब्यांत आला. १८१९ मध्यें येथें एक धरणीकंपाचा धक्का बसून बरेंच नुकसान झालें. येथें बरींच देवळें आहेत.

आक्टोबर १९२२ मध्यें येथें ' कच्छकेळवणीफंड ' म्हणून ३ लाख रुपयांचा शिक्षणाकरितां एक फंड जमा करण्यांत आला. यांतून शाळा, तालीमखाना वगैरे इमारती बांधून शेतकी, बागाईत, फळझाडांची लागवड करणें वगैरे गोष्टी शिकवावयाच्या आहेत.

**अंजिदिव**—पश्चिम हिंदुस्थानांतील पोर्तुगीज वसाहतीपैकीं एक बेट. उत्तर अक्षांश १४° ४५' व पूर्व रेखांश ७४° १०'. उत्तर कानडा जिल्ह्यांतील कारवारच्या नैर्ऋत्येस पांच मैलावर हें बेट असून क्षेत्रफळ अर्धा चौ. मैल आहे. लोकसंख्या १८७२ सालीं ५२७ होती. हवा रोगट असल्यामुळें बेट जवळ जवळ ओसाडच पडलें आहे.

इ. स. १५० च्या सुमारास आइजीदिओई म्हणून टॉलमीनें ज्याचा उल्लेख केला आहे तें हेंच बेट असावें असें दिसतें. इ स. १३४२ सालीं इब्नबतूता हा या बेटावर उतरला होता. पंधराव्या शतकांत अरब व्यापाऱ्यांनीं विजयानगरच्या राजापासून हें बेट बळकावलें होतें असें दिसतें. १४९८ पासून पोर्तुगीज लोकांचा या बेटाशीं संबंध आहे. त्या सालीं वास्को दिगामा या बेटावर आला होता. इ. स. १५०६ सालीं पोर्तुगीज लोकांनीं कांहीं वेळ या बेटाचा ताबा सोडला होता. पण पुन्हां तो त्यांनीं लवकरच घेतला व त्या वेळेपासून आजतागायत तें बेट त्यांजकडेच आहे.

इ. स. १६८२ सालीं येथील किल्ला बांधण्यांत आला. मराठ्यांच्या स्वाऱ्या यावर झाल्या असतां पोर्तुगीजांनीं हा किल्ला लढविला होता. हल्लीं या बेटाचा उपयोग गोव्याचें ' काळें पाणी ' म्हणून करण्यांत येत असतो.

अंजी— ( १ ) मध्यप्रांत. जिल्हा व तहशील वर्धा. हें वर्ध्याच्या नैर्ऋत्येस ९मैलांवर धाम नदीच्या कांठावर २७०० ( सन १९०१ ) लोकवस्तीचें खेडेगांव आहे. भोंसल्यांच्या अमलापूर्वी हें अगदीं लहान खेडें होतें परंतु त्यांचा अंमल सुरू झाल्यावर तें परगण्याचें मुख्य ठिकाण झालें, व त्यामुळें या गांवाची भरभराट झाली. पुढें आर्वी हें परगण्याचें मुख्य ठिकाण झाल्यामुळें व पेंढाऱ्यांनीं हा गांव लुटल्यामुळें या गांवाचें महत्त्व नाहींसें झालें आहे. हातविणकाम, रंगविणें व नवार तयार करणें, हे धंदे येथें चालतात. बाजार दर गुरुवारीं भरतो. टपाल कचेरी व शाळा येथें आहे.

( २ ) वऱ्हाड. जिल्हा यवतमाळ. तालुका केळापूर. घांटंजीच्या पश्चिमेस दोन मैलांवर हें एक लहान खेडें आहे. लोकसंख्या ७९७. याठिकाणीं एक श्री नरसिंहाचें हेमाडपंती देवालय आहे. हिरण्यकशिपूचें पोट आपल्या नखांनीं फाडीत आहे अशी मूर्ति आहे. देवळाच्या भिंतींत एक लहानसें भोंक अशा रीतीनें ठेविलें आहे कीं उगवत्या सूर्याचे किरण मूर्तीच्या पायाजवळ पडावेत. देवळासमोरच एक मोठी विहीर असून तीस कुंडीं असें म्हणतात. वैशाख महिन्यांत पुष्कळ यात्रेकरू येथें दर्शनास येतात.

अंजीर—अंजीर दोन जातीचे आहेत पांढरा व जांभळा. पैकीं जांभळ्या जातीचीं फळें जास्त स्वादिष्ट असतात. दक्षिण अरबस्तान हें अंजिराचें मूलस्थान होय. त्या देशांत अद्याप क्याप्रिफिग अथवा नर अंजिराचीं झाडें जंगलांत सांपडतात. तेथूनच अंजीर दुसऱ्या देशांत गेला असावा. ग्रीस व रोम या राज्यांच्या पूर्वी हजारों वर्षें अंजिराची लागवड होत असे, असें पुराणवस्तुसंशोधकांच्या शोधानें सिद्ध झालें आहे. इसवी सनापूर्वी सातशें वर्षांच्या ग्रंथांत अंजिराच्या अस्तित्वाचा खात्रीलायक पुरावा सांपडतो. अरबस्तानांतूनच ग्रीस, रोम, आशियामायनर, इटली, पोर्तुगाल, फ्रान्स, खोरासान, हिरात, अफगाणिस्तान, चीन वगैरे देशांत अंजिराचा प्रसार झाला. हिंदुस्थानांत रानटी अंजीर पुष्कळ आहेत; तरी खाण्याचा अंजीर १४ व्या शतकापर्यंत माहीत नव्हता. चीन, अमेरिका वगैरे देशांत अंजिराची लागवड बऱ्याच प्रमाणांत होते. वाळलेले अंजीर आशियामायनरमधील स्मरना बंदरांतून आपल्या देशांत येतात. त्या प्रांतांत अंजिराला 'इंगीर' असें नांव आहे. त्याचाच अपभ्रंश अंजीर हा असावा.

स्म र ना ये थी ल ला ग व ड.—स्मरना येथील अंजीर जगप्रसिद्ध आहेत, तरी खुद्द स्मरना येथें अंजीर मुळींच पिकत नाहींत. स्मरनापासून पूर्वेकडे शंदीडशें मैलांच्या टापूंत मिआंडर नदीच्या खोऱ्यांत अंजीर पिकतात. स्मरना बंदरांतून मनुका व आलिव्ह यांचीच निर्गत फार होते. त्या मानानें वाळलेल्या अंजिराची निर्गत फारच कमी होते. मिआंडर नदीच्या खोऱ्यांतील जमीन अतिशय सुपीक व खोल असून तिच्यांत अभ्रक व सेन्द्रिय पदार्थ फार आहेत. जमीनीच्या अंगीं पुष्कळ दिवसपर्यंत ओलावा धरून ठेवण्याची शक्ति असल्यामुळें अंजिराच्या बागेला पाणी मुळींच द्यावें लागत नाहीं. तेथील हवा उष्ण व कोरडी आहे. उन्हाळ्यांत उष्णमान $90^{\circ}$ व हिंवाळयांत $20^{\circ}$ फारेनहीटपर्यंत असतें. थंडीच्या दिवसांतच पाऊस पडतो, व त्याचें मान २५ इंचपर्यंत असतो. कधीं कधीं थंडीचा कडकाहि पडतो, त्यावेळीं नुकसान फार होतें.

म शा ग त.—जमीन बरेच वेळां नांगरून उंटाच्या लिदीचें तीस खत देतात. लागण मार्च महिन्यांत होते. झाडें ६ फुटांवर लावतात. प्रत्येक खाड्यांत दोन दोन झाडें ( फांटे ) एकमेकांस तिरपीं अशीं लावितात. फांटे जमीनीच्या वर दोन इंच ठेवून बाकीचा भाग जमीनींत पुरून टाकतात व वरच्या भागावरहि माती लोटतात. त्यामुळें ऊन व वारा यांपासून फांट्यांचा बचाव होतो. प्रथम कांहीं दिवसपर्यंत फांट्यांना हातपाणी देतात; परंतु पुढें कधींच पाणी द्यावें लागत नाहीं, अशा रीतीनें फांटे लावल्यानें झाडांनां खालपासून फांद्या फुटतात व त्यामुळें तीं वाऱ्यानें मोडत नाहींत. स्त्रीझाडाच्या फांद्या बाहेरच्या बाजूला असतात त्यांनां फळें चांगलीं येतात; परंतु आंतील फळें पानांनीं झांकलीं गेल्यामुळें चांगलीं पिकत नाहींत. परंतु नर, अंजिराची मात्र तशी स्थिति नाहीं. पानांच्या दाट छायेंत वाढलेले नर-अंजीर हे फलधारणेच्या कामीं फार चांगले समजले जातात, तसे बाहेरचे अंजीर समजले जात नाहींत. त्या देशांत छाटणी वगैरे कधींच करीत नाहींत. ज्या फांद्या एकमेकींत गुंतून जातील तेवढ्याच फक्त कापून काढतात. लहान झाडांपासून वाळलेले अंजीर ५०पौंड होतात, मध्यम झाडांपासून १५० व मोठ्या झाडांपासून ३०० पौंड वाळलेले अंजीर मिळतात. अंजीर पिकण्यासाठीं पांच सहा नर-अंजिरांच्या माळा करून त्या मादी झाडांवर टांगून ठेवितात. नरअंजिराचें पीक जर कांहीं कारणानें बुडालें तर ग्रीसनजिकच्या बेटांतून मोठ्या खर्चानें अंजीर आणून ते झाडांवर टांगून ठेवितात; असें न केलें तर अंजीर मुळींच पिकणार नाहींत हें तिकडील लोकांनां पक्कें माहीत आहे. यावरून नर अंजिराचें महत्त्व तिकडे किती आहे हें दिसून येईल. अंजीर पिकावयास लागले म्हणजे झाडाखालील सर्व जमीन खणूनखुरपून व ढेकळें फोडून मऊ भुसभुशीत करितात. त्याच्या योगानें पिकलेले अंजीर खालीं पडले म्हणजे त्यांस इजा होत नाहीं. बीं पेरण्यासाठीं इकडे जसे वाफे करितात तसेच नऊ इंच उंच, आठ फूट रुंद व ५० ते १०० फूट लांब असे उघड्यावर वाफे करून त्यांवर देवनळाच्या ( वांबूच्या ) कामट्या टाकून त्यावर अंजीर वाळवितात. झाडावरून तोडलेला अंजीर वाळविण्यासाठीं केव्हांहि उपयोगीं पडत नाहीं. तो पूर्णपणें पिकून झाडाखालीं गळून पडला म्हणजेच वाळविण्यालायक झाला असें समजावें.

अंजीर जुलैअखेर पिकावयास लागतात. ते वाळून फार कडक होतां कामा नये, त्यांची बाहेरची साल मात्र वाळावी व आंतील भाग मऊ असावा. अंजीर तीन चार दिवसांत वाळून तयार होतात.

महाराष्ट्रांत अंजिराची लागवड—हीं पुणें जिल्ह्यांपैकीं पुरंधर तालुक्यांत बरीच होते. तेथील बागा उंच पठारावर असून सर्व बाजूनें उघड्या असतात व जमीन साधारणपणें हलक्यापैकीं असून दोन फूट खोलीवर शाडू असतो. जमीन सर्व शाडवट असली तरी हरकत नाहीं, परंतु तिच्यां-तून निचरा चांगला होत असला पाहिजे. सासवड येथें पावसाचें मान सरासरी वीस इंच असतें.

अंजिराची लागवड फांटे लावून करितात. जुन्या झाडांचे शेंड्याकडचे फांटे ५.६ इंच लांबीचे घेतात. जून फांद्याचे किंवा नवीन झाडांचें फांटे लावण्यासाठीं घेत नाहींत. फांटे पावसा-ळ्याच्या आरंभीं वाफ्यांत लावून एक वर्षानंतर दोन अडीच फूट वाढल्यावर कायम जागीं ज्येष्ठ महिन्यांत लावतात. खड्डे १५–१५ फुटांवर घेतात. अंजिराच्या झाडाला खाल-पासूनच फांद्या फुटतात व केव्हां केव्हां जमीनींतूनहि नवीन कोंब येतात व ते सर्व तसेच वाढूं देतात. झाडें लहान आहेत तोंपर्यंत त्यांत घेवडा, वाटाणा वगैरे पिकें काढतात. परंतु बाजरी–ज्वारीसारखीं पिकें घेत नाहींत. झाडें तीन वर्षांचीं झालीं म्हणजे त्यांनां तुरळक पीक येऊं लागतें. चवथ्या वर्षी श्रावण ( आगष्ट ) महिन्यांत सर्व बागेची खणणी करतात व त्याच वेळीं खोडाजवळच्या जाखा काढून टाकतात, व मालकाच्या ऐपतीप्रमाणें ४ ते ६ टोपल्या कुजलेलें गांवखत देतात. पाणी हस्तनक्षत्राच्या सुमारास देतात. तीन दिवसांनीं आंबवणी देतात व चार दिवसांनीं चिंबवणी देतात. फळ शेंड्याकडे कोंवळ्या फांदीवर अगर खालीं जून फांदीवर कोठेंहि येतें. प्रत्येक कांड्यावर फळ एकदां केव्हांना केव्हां तरी येतेंच. एकाच कांड्यावर फळ दोनदां येत नाहीं. फळ मोठें होऊं लागलें म्हणजे पाण्याची हयगय होतां कामा नये. कोठें कोठें जानेवारी महिन्यांतच फळ पिकण्यास सुरुवात होते; परंतु खरा मोसम एप्रिल व मे महिन्यांत असतो; कांहीं फळें जुलै महिन्यांत देखील तयार होत असतात; पण शक्य असेल तर सर्व बहार पाऊस पडण्यापूर्वीच उतरून घेणें बरें; कारण पाऊस पडल्यावर फळ अगदीं बेचव लागतें व त्यामुळें त्यास भावहि येत नाहीं. फळ होऊं लागतेवेळीं झाडांनां वरचेवर चाळणी देणें जरूर असतें. दर झाडाला पंधरा शेर ( ३० पौंड ) अंजीर येतात. या बहाराला मिठाबहार असें म्हणतात. या बहाराशिवाय पावसाळ्यांतहि झाडांनां एक बहार येतो, पण तो चांगला नसतो, म्हणून त्यास खाटा बहार म्हणतात. या बहाराचीं फळें फक्त भाजीच्याच उपयोगीं पडतात. अंजिराचीं झाडें १५ वर्षेपर्यंत टिकतात.

अंजिराचा मुख्य शत्रू म्हटला म्हणजे पक्षी होत. यांपासून पिकाचें फार नुकसान होतें; यासाठीं फळ पिकण्याच्या सुमारास चिंधी बांधून तें झांकून ठेवतात व उंच माच करून त्यावर पांखरें हांकण्यासाठीं माणसें ठेवतात. अंजिराच्या पानांवर एक प्रकारचा तांबेरा नांवाचा रोग पडतो, पण ह्यापासून झाडाचें म्हणण्यासारखें नुकसान होत नाहीं.

दुष्काळाच्या वर्षी विहिरींचें पाणी आटल्यावर पीक हातास लागणें फार कठिण असतें. जेवढें पाणी मिळेल तेवढ्यावर शक्य असेल तेवढें पीक वांचवावें. पीक अजि-बात बुडालें तरी झाडें मरत नाहींत.

परदेशांतून अंजिराच्या कांहीं जाती इकडे आणल्या आहेत, परंतु त्यांचीं फळें योग्य कीटकांच्या अभावीं धरत नाहींत, म्हणून परदेशांतल्या जातींचा अद्यापपावेतों इकडे कांहींच उपयोग झाला नाहीं.

येथील अंजीरहि सुकवून त्यांवर गंधकक्रिया करून टिकाऊ करतां येतात. याबद्दल शेतकी खात्यानें प्रयोग करून असे सुकविलेले अंजीर पुणें येथील १९२४ सालीं भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनांत ठेवले होते.

**अंजू**—हा फ्रेंचांच्या ताब्यांतील एक जुना परगणा होय. या परगण्याची हद्द उत्तरेस मेनपरगण्यापर्यंत, पूर्वेस टूरेन परगण्यापर्यंत, दक्षिणेस पॉइटीयर्सच्या व पश्चिमेस नँटिसच्या परगण्यापर्यंत पसरलेली होती हल्लीं या परगण्याचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें होऊन ' मेन एट लॉयर ' या फ्रान्सच्या विभागांत त्याचा समावेश केला गेला आहे.

नवव्या शतकाच्या उत्तरार्धांत, ब्रिटनी व नॉरमंडी या देशांच्या ड्यूकांनीं अंजू परगण्याच्या सरहद्दींचे लचके तोडण्याचा प्रयत्न चालविला होता. त्यांचा बंदोबस्त करण्या-साठीं चार्लस दि बाल्ड या राजानें रॉबर्ट स्ट्रांग याच्या हवालीं तो परगणा करून त्याचें रक्षण करण्यास सांगितलें. ८६६ मध्यें बिसार्थे येथें नार्मन लोकांशीं लढत असतां तो धारा-तीर्थी पतन पावला, त्यामुळें त्याच्या पश्चात ह्यू दि ॲबट हा त्या परगण्याचा मुख्य झाला. त्याच्या मरणानंतर रॉब-र्टचा मुलगा ओडो व ओडोच्या मागून फुल्क दि रेड हा त्या परगण्याचा मालक झाला. या परगण्याचें आधिपत्य फुल्क दि रेडच्या वंशजाकडे सतत तीन शतकें होतें. ९८७ मध्यें फुल्कचा नातु पहिला जीऑफ्रे हा या परगण्याचा स्वामी झाला. त्यानें अंजूचा जो प्रदेश इतरांनीं बळकावला होता तो मिळविण्याचा निश्चय केला. त्यानें नँटिसच्या काउंटचा पराभव करून त्याला आपला मांडलिक बनविलें, व त्याच्या ताब्यांतील अंजूचा मुलूख हिसकावून घेतला. नार्मन लोकांच्या विरुद्ध लोथेर राजानें ज्या स्वाऱ्या केल्या त्यांत त्यानें प्रामुख्यानें भाग घेऊन नार्मन लोकांनां सळो कीं पळो करून टाकिलें. जीऑफ्रेच्या मरणानंतर, त्याचा मुलगा तिसरा फुल्क हा अंजूचा काउंट झाला. त्यानें आपल्या ताब्यांत अधिकार घेतला नाहीं, तोंच त्याला ब्लॉइसचा

काऊंट पहिला ओडो व रेन्नेचा काउंट पहिला कोनन यांनां तोंड द्यावें लागलें. कोनन यानें अंजूच्या ताब्यांतील नँटिसचा परगणा बळकाविला होता. त्याच्या विरुद्ध फुल्कनें स्वारी करून त्याचा कॉंक्वरुल या ठिकाणीं पुरा पराभव केला व नँटीसचा प्रांत पुन्हां मिळविला. नंतर त्यानें ओडोचाहि पराभव करून लांग्वाचा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला.

फुल्कच्या मागून त्याचा मुलगा जीऑफ्रे मार्टेल हा १०४० मध्यें अंजूचा काउंट झाला. यानें आपल्या बापाचेंच धोरण चालू ठेवून, टौरेन, मेन इत्यादि परगणे आपल्या ताब्यांत आणले. त्याला संतति नसल्याकारणानें आपल्या मागें, अंजूचें स्वामित्व आपला पुतण्या तिसरा जीऑफ्रे यास द्यावयाचें त्यानें ठरविलें होतें. पण त्याच्या मरणानंतर तिसरा जीऑफ्रे व त्याचा भाऊ रेचिन यांच्यामध्यें तंटे उपस्थित होऊन रेचिन यानें जीऑफ्रेला तुरुंगांत टाकलें. पण लवकरच त्याची सुटका करणें रेचिन याला भाग पडलें. जीऑफ्रे हा नालायक असल्यामुळें रेचिननें पुष्कळ संधानें बांधून, आपल्याला अंजूचें स्वामित्व प्राप्त करून घेतलें. एलियास याला साहाय्य करून त्याला मेन परगण्याचें स्वामित्व त्यानें मिळवून दिलें व त्याची मुलगी आपला मुलगा फुल्क यास करून घेतली.

रेचिन उर्फ चौथा फुल्क वारल्यानंतर त्याचा मुलगा पांचवा फुल्क हा अंजूचा अधिपति झाला. मेन परगण्याचा अधीप एलियास हा निपुत्रिक मरण पावल्यामुळें मेनचें स्वामित्वहि फुल्कलाच मिळालें. अशा रीतीनें अंजू प्रदेशाचा विस्तार झालेला पाहून इंग्लंडचा राजा पहिला हेन्री याच्या डोळ्यांत ही गोष्ट सलूं लागली. पुढें थोडक्याच दिवसांत हेन्री व फुल्क यांजमध्यें युद्ध उपस्थित होऊन फुल्क याचा हेन्रीनें पराभव केला व मेन परगणा आपल्या ताब्यांत आणला. पण संधी साधून, १११३ मध्यें फुल्कनें अलेनशान येथें हेन्रीच्या सैन्याचा धुव्वा उडवून हेन्रीला तह करण्यास भाग पाडलें. हा तह चिरस्थायी करण्याच्या उद्देशानें त्यानें आपली मुलगी मॅटिल्डा ही हेन्रीचा वडील मुलगा विल्यम एथलिंग यास देऊं केली. या तहान्वयें मेन परगणा फुल्कच्या ताब्यांत आला. पुढें ११२३ मध्यें फुल्कनें आपली दुसरी मुलगी सिबील हिचा विवाह नार्मंडीच्या राज्याचा भावी वारस विल्यम क्लिटो याच्याशीं करून मेनप्रांत त्याला लग्नाप्रीत्यर्थ आंदण दिला. ११२९ मध्यें हेन्रीनें आपली मुलगी मॅटिल्डा ही फुल्कचा मुलगा जीऑफ्रे दि हँन्डसम याला दिली.

फुल्कच्या मरणानंतर जीऑफ्रे ( ११२९-११५१ ) हा अंजूचा काउंट झाला. हेन्रीच्या मरणानंतर त्यानें नार्मंडीवर अनेक स्वाऱ्या करून तो प्रांत आपल्या ताब्यांत आणला. पण अंजूमध्यें त्याच्या गैरहजेरींत त्याच्या सरदारांनीं बंड केल्यामुळें त्याला परत येणें भाग पडलें. ११३७ मध्यें त्यानें पुन्हां आपल्या मोहिमेस सुरुवात केली. ११३८ मध्यें बायें, केन इत्यादि शहरें त्यानें जिंकून घेतलीं. ११४१ मध्यें त्यानें पुन्हां नॉर्मंडीमध्यें जाऊन तो सर्व प्रांत चार पांच वर्षांत पूर्णपणें आपल्या ताब्यांत आणिला. ११४९ सालीं त्यानें नार्मंडीचा प्रांत आपला मुलगा हेन्री याच्या ताब्यांत दिला.

अशा रीतीनें आपल्या जहागिरीचा विस्तार करण्यांत जीऑफ्रे गुंतला होता, तरी पण त्यानें आपल्या जहागिरीची व्यवस्थाहि चांगल्या प्रकारें राखण्याची खबरदारी घेतली होती. आपल्या जहागिरींत जी अंतस्थ बंडाळी माजली होती तिचा पूर्ण नायनाट करून त्यानें आपल्या जहागिरींत शांतता प्रस्थापित केली. अशा रीतीनें आपल्या कारकीर्दींत जीऑफ्रे यानें आपल्या राज्याचा खूप विस्तार केला व राज्याला चिरस्थायित्व प्राप्त करून दिलें.

जीऑफ्रे याच्या निधनानंतर त्याचा मुलगा हेन्री हा अंजूच्या राज्यावर बसला. इंग्लंडचा राजा स्टीफन हा ११५४ मध्यें वारल्यानंतर त्याच्या मागून हेन्री हाच इंग्लंडच्या राज्याचा वारस ठरला. त्याप्रमाणें हेन्री हा दुसरा हेन्री या नांवानें इंग्लंडच्या राज्यावर बसला. अर्थातच अंजूचें राज्य त्याचा धाकटा भाऊ जीऑफ्रे याला मिळणें स्वाभाविक होतें. पण हेन्रीला हें आवडलें नाहीं. जीऑफ्रे हा अंजूचें राज्य बळकावील या भीतीनें त्यानें जीऑफ्रे याच्यावर स्वारी करून त्याला पराभूत केलें व त्याच्या ताब्यांतील सर्व मुलूख जिंकून घेतला. हेन्रीनें अंजूचें राज्य आपला मुलगा हेन्री याला दिलें. पुढें हेन्री वारल्यानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र पहिला रिचर्ड हा इंग्लडच्या गादीवर बसला. रिचर्डच्या मरणानंतर हेन्रीचा चवथा मुलगा जीऑफ्रे यालाच राज्य मिळावयाचें; पण जीऑफ्रे याचा मुलगा आर्थर यानें आपल्या बापाविरुद्ध बंड करून इंग्लंडचें राज्य आपल्याला मिळविण्याचा घाट घातला. पण तो साधला नाहीं. पण ऑर्थरनें अंजूचें राज्य बळकावून फ्रान्सच्या राजाचें मांडलिकत्व पत्करलें. जीऑफ्रे उर्फ जॉन यानें तें राज्य फ्रान्सच्या ताब्यांतून मिळविण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं.

अशा रीतीनें फ्रान्सच्या ताब्यांत हें राज्य आलें. फ्रान्सचा राजा नववा लुई यानें आपला मुलगा चार्लस याला अंजूची जहागिरी देऊन टाकली; हा चार्लस नेपल्सच्या गादीवर बसला त्यावेळीं अंजू हें नेपल्सच्या सत्तेखालीं गेलें. चार्लसचा मुलगा दुसरा चार्लस हा राज्यावर येतांच त्यानें आपला जामात व्हेलायचा चार्लस याला तें आंदण म्हणून देऊन टाकलें. या चार्लसच्या मरणानंतर त्याचा मुलगा फिलिप याला अंजूची जहागिरी मिळाली. पुढें याच फिलिपला फ्रान्सचें राज्य मिळालें. त्यामुळें हा अंजूचा प्रांत आपोआप पुन्हां फान्सच्या राज्यांत समाविष्ट झाला.

फिलिप राजानें १३३२ त आपला मुलगा जॉन यास तो प्रांत जहागीर म्हणून दिला. पुढें जॉन हा राजा झाल्यानंतर त्याचा मुलगा पहिला लुई याच्या ताब्यांत तो प्रांत आला. लुई हा नेपल्सचाहि राजा झाला. त्याच्या मरणानंतर दुसऱ्या लुईच्या ताब्यांत हा प्रांत गेला. त्यानें तो प्रांत आपल्या बायकोच्या देखरेखीखालीं सोंपविला. पुढें लुईच्या मागून तो प्रांत त्याचा दुसरा मुलगा रेने याला मिळाला. रेनेनें तो प्रांत १४४३ पासून आपल्या ताब्यांत घेतल्यानंतर आपलें निवासस्थान त्यानें तेथेंच केलें. पण १४७० मध्यें त्याचा मुलगा जॉन हा वारल्यामुळें त्याला अतिशय दुःख होऊन त्यानें अंजू येथील आपलें निवासस्थान बदललें, त्याच्या मरणानंतर त्याचा नातू दुसरा रेने याच्या ताब्यांत तो प्रांत आला. रेनेच्या मरणानंतर तो प्रांत फ्रान्सचा राजा अकरावा लुई याच्या ताब्यांत गेला.

१५१५ सालीं फ्रान्सचा राजा फ्रान्सिस यानें आपल्या आईला तो प्रांत बक्षीस देऊन टाकिला. पुढें १५५२ सालीं फ्रान्सच्या दुसऱ्या हेन्रीनें तो आपल्या मुलाला दिला. पुढें तिसरा हेन्री राज्यावर आल्यानंतर त्यानें आपला भाऊ फ्रान्सिस याला तो देऊन टाकिला पण तो थोड्याच काळांत वारल्यामुळें पुन्हां हा प्रांत फ्रान्सच्या राज्यांतच अंतर्भूत झाला. फ्रान्समधील राज्यक्रांतीच्या वेळीं अंजूच्या प्रांतांत अँबर्स, व्यूजे, सौमूर चाटयू इत्यादि जिल्हे मोडत असत. पुढें १७९० सालीं अंजू हा प्रांत मेनएट लॉयर या विभागांत सामील केला गेला.

**अंजेंगो.**—त्रावणकोर संस्थानाच्या सरहद्दींतील अरबी समुद्रावर असलेलें ब्रिटिश राज्यांतील हा एक गांव असून केप कामोरीनच्या उत्तरेस सुमारें ७२ मैल आहे. उत्तर अक्षांश. ८° ४०' व पूर्वरेखांश ७६° ४५'. इ. स. १९०६ पर्यंत हा भाग मद्रास इलाख्यांतील मलबार जिल्ह्याच्या कोचीन तालुक्यांत मोडत होता. पण त्या वेळेपासून या अंजेंगोचा स्वतंत्र जिल्हा करून त्यांत तंगस्सेरीचा समावेश केला आणि त्रावणकोर आणि कोचीन या संस्थानच्या रेसिडेंटच्या हाताखालीं हा जिल्हा दिला. इंग्लिशांनीं प्रथम ज्या ठिकाणीं हिंदुस्थानांत वसाहती केल्या त्यांपैकीं हें ठिकाण असून एका काळीं यास बरेंच महत्त्व होतें. अत्तिंगलच्या राणीपासून इ स. १६८४ सालीं येथील जागेवर वसाहत करण्याची परवानगी मिळाली, व इ. स. १६९५ सालीं फॅक्टरी व किल्ला बांधण्यांत आला. इ. स. १९२१ सालीं येथील लोकवस्ती ४१४५ होती.

**अँजेलिको फ्रा.**—( १३८७–१४५५ ). हा प्रसिद्ध साधू व चित्रकार टस्कनी संस्थानांतील मग्गेलो प्रांतांत असलेल्या व्हिचियो नामक गांवीं जन्म पावला. याच्या आईबापांची व घराण्याची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. तथापि अँजेलिको फ्रा याची घरची स्थिति समाधानकारक असावी असें दिसतें. अँजेलिको याचें बाप्तिस्मा देण्याच्या वेळचें नांव ग्विडो असें होतें, पण पुढें त्याला गिओवन्नी असें नांव पडलें. त्याला फ्रा गिओवन्नी अगर फ्रायर जॉन या नांवानें तत्कालीन लोक ओळखीत असत. अँजेलिको हें नांव तो वारल्यानंतर त्याच्या गुणवर्णनपर म्हणून पदवीवजा देण्यांत आलें. त्याचें पूर्ण नांव बीएटो फ्रा गिओवन्नी अँजेलिको फीसोले असें होतें.

इ. स. १४०७ सालीं फीसोले येथील डोमेनिकोच्या मठांत तो साधक या नात्यानें राहिला. १४०८ मध्यें, त्यानें त्या मठामधील विधींना अनुसरून डोमेनिको पंथाची दीक्षा घेतली. दीक्षा घेऊन या पंथांत सामील होण्यापूर्वी त्यानें चित्रकलेचा अभ्यास केला असावा असें दिसतें. लोरेंझो मोनॅको नांवाच्या एका चित्रशास्त्रज्ञानें त्याला ही कला शिकवली असावी. कोर्टोना येथें साधक या नात्यानें राहिला असतां त्यानें काढलेलीं चित्रें अद्यापि पहावयास मिळतात. येथें असतांना त्यानें घेरार्डो स्टॅर्निना याच्या हाताखालीं भिंतीच्या गिलाव्यांत चित्रें काढण्याची कला अभ्यासिली असावी असें दिसतें १४१८–३६ या अवधींत तो फीसोले येथें रहात असे. पुढें फ्लॉरेन्समधील डोमेनिको पंथाच्या मार्कोच्या मठांत त्याची रवानगी झाली. येथें असतांना त्यानें ब्रॅंकाकी येथील मठांत असलेल्या भितीवरील गिलाव्यांतील चित्रांचा सूक्ष्म अभ्यास केला; व त्या धर्तीवर मार्कोच्या मठांतील वेदीवर चित्रें काढलीं. १४४७ मध्यें, पोपच्या आमंत्रणावरून तो रोम येथें आला, व व्हॅटिकन येथील कॅपेला डेल सॅक्रॅमेंटोमध्यें बरींच चित्रें काढली. पांच सहा महिने रोम येथें काढल्यानंतर तो ओर्व्हिएटो येथें आला व तेथील उपासनामंदिरांत त्यानें पुष्कळ चित्रें काढलीं. नंतर तो पुन्हां रोममध्यें परत आला; व पांचव्या निकोलसच्या उपासनामंदिरांतहि त्यानें चित्रें काढलीं. तो १४५५ मध्यें रोम येथें मरण पावला. त्याचें शव मिनर्व्हा येथील प्रार्थनामंदिरांत पुरण्यांत आलें.

अँजेलिको यानें निरनिराळ्या मठांमध्यें बरींच चित्रें काढलीं. त्यांपैकीं ख्रिस्ताला सुळीं चढवण्याच्या वेळीं डोमेनिको साधू पायां पडत आहे असा प्रसंग; ख्रिस्त सुळावर चढला जात असतांना, कुमारी मेरी इला मूर्छा आली आहे. हा प्रसंग; डोमेनिकन दोन साधू ख्रिस्ताचें आदरातिथ्य करीत आहेत हा देखावा 'कॉरोनेशन ऑफ दि व्हर्जिन' हा प्रसंग इत्यादि प्रसंगाचीं चित्रें फारच बहारीचीं वठलीं आहेत. अँजेलिकोचीं चित्रें नेहमीं धार्मिक भावनांना उद्दीपित करणारीं असतात. शृंगारिक अगर प्रणयोद्दीपक चित्रांचा मागमूस देखील त्याच्या चित्रकलेंत सांपडावयाचा नाहीं. त्याच्या चित्रांकडे पाहिलें असतां, भूतदया, परोपकार, ईश्वरभक्ति या भावना जागृत होतात. त्याच्या चित्रांचें क्षेत्र अशा रीतीनें मर्यादित आहे. मनुष्याचे सहज विकार, व्यवहारांत पहावयास मिळणारे निरनिराळे प्रसंग, इत्यादि प्रसंगाचीं चित्रें रेखाटण्याची आवड याच्यामध्यें आढळून

येत नाहीं तरी पण त्याच्या क्षेत्रांत तो सहसा कोणाला हार जात नाहीं.

अँजेलिकोचा स्वभाव फार संयमी, व निरलस होता. गरीबांनां तो नेहमीं सढळ हातानें मदत करीत असे. तो फार कोंवळ्या मनाचा होता. ख्रिस्ताला क्रूसावर चढविण्याच्या प्रसंगाचें चित्र काढीत असतां त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळत असत. राग हा त्याला कधीं शिवला सुद्धां नाहीं. धार्मिक चित्रांशिवाय त्यानें इतर चित्रें काढण्याचा प्रयत्न सुद्धां केला नाहीं. एखाद्या पवित्र वस्तूचें चित्र काढलें कीं तें पुसून पुन्हां दुसरें काढणें हें त्याला पाप वाटत असे. त्याची वर्तणूक निर्दोष व निष्पाप असे. त्याला मरणोत्तर 'मुक्त' ही पदवी मिळून त्याची ख्रिस्ती संतमालिकेंत गणना होऊं लागली.

[ संदर्भग्रंथः—बीसेल-लाइफ ऑफ फ्रा अँजेलिको १८९५; क्रॉफर्ड-लाइफ ऑफ फ्रा अँजेलिको १९००, डग्लस-लाइफ ऑफ फ्रा अँजेलिको १९०० ].

**अँटनान-रिव्हो**—हें मादागास्करच्या राजधानीचें शहर आहे. टमाटेव्ह बंदराच्या नैर्ऋत्येस १३५ मैलांवर हें शहर आहे. या शहरापासून टमाटेव्हपर्यंत कांहीं अंतर रेल्वेनें व कांहीं अंतर जलमार्गानें जावें लागतें. एका लांबच लांब पण अरुंद अशा टेंकडीवर हें वसलें असल्याकारणानें, आसपासचा बऱ्याच अंतरावरचा मुलूख येथून न्याहाळतां येतो. अशा रीतीनें हें नाकेबंदीचें ठिकाण बनलेलें आहे. पुष्कळ काळपर्यंत हें होवा जातीच्या लोकांच्या वस्तीचें ठिकाण असून त्याची विशेष प्रसिद्धि नव्हती. पण या जातीच्या मुख्यांनीं ज्यावेळीं मादागास्करचा बराचसा मुलूख जिंकून ताब्यांत आणला त्यावेळीं या शहराला विशेष महत्त्व प्राप्त झालें व पुष्कळ लोक या ठिकाणीं येऊन आपली कायमची वस्ती करूं लागले. १८६९ च्या सुमारास या शहराची लोकसंख्या जवळजवळ ८०,००० होती. १८६९ पर्यंत या शहरांतील घरें साध्या लांकडांचीं अगर गवताचीं असत पण त्यानंतर विटांचीं व दगडी घरें बांधण्यास सुरवात झाली; व त्यामुळें लवकरच शहरामध्यें मोठमोठे राजवाडे, प्रधानांचे वाडे, प्रार्थनामंदिरें, शाळा, दवाखाने इत्यादि मोठमोठ्या इमारती झळकूं लागल्या. १८९५ मध्यें फ्रेंचांनीं हें शहर जिंकून घेतलें. त्यानंतर फ्रेंचांच्या अमदानींत या शहरांत मोठमोठे रस्ते बांधण्यांत आले. निरनिराळीं उपवनें व बागा अस्तित्वांत आल्या व शहराला रमणीय स्वरूप प्राप्त झालें. टेंकडीच्या पायथ्याशीं जे पाण्याचे झरे आहेत त्यांपासून या शहराला पाण्याचा पुरवठा होतो. इकोपा नदीपासून पाणी आणण्याची योजना लवकरच अमलांत यावयाची आहे. १९०७ च्या खानेसुमारींत, या शहरची लोकसंख्या ६९,००० होती, या शहराच्या पूर्वेस व आग्नेयेस दोन किल्ले असून त्यामुळें या शहराचें रक्षण चांगल्या प्रकारें होतें. या शहरांत एकंदर पांच ख्रिस्ती उपासनामंदिरें असून एक मुसुलमानांची मशीद आहे.

**अँटवर्प**:—बेल्जममधील अगदीं उत्तरेकडील प्रांत. ह्या प्रांताचा व्यापार फार मोठा आहे. लोकसंख्या (१९१०) ९,६८,६७७. अँटवर्प प्रांताची राजधानी अँटवर्प ह्या नांवाचेंच शहर आहे. हें व्यापाराचें मुख्य ठिकाण असून या शहराची तटबंदी फार मजबूत आहे. नवीन अँटवर्प शहर फार प्रेक्षणीय आहे. १६ व्या शतकांत अँटवर्प फार सधन शहर होतें, त्याची साक्ष अजून शहरांतील मोठमोठे प्रासाद आणि उंचउंच वाडे देतात. येथील १५१८ या वर्षी बांधलेलें ( कॅथेड्रल ) मंदिर अत्यंत प्रेक्षणीय आहे. हें फार दुरून दिसतें. यांत रुबेन्स या नामांकित चित्रकाराचीं ३ फार प्रसिद्ध चित्रें टांगलीं आहेत. दुसरें उत्तम मंदिर सेंट जेम्सचें आहे. रुबेन्सनें आपलें आयुष्य हें सजविण्यांत वेंचल्यामुळें त्याची कबर या मंदिरांत बांधली आहे. बूर्स किंवा मंडई ( व्यापारपेठ ) ही नवीन बांधलेली इमारत असून फारच सुबक आहे. नवीन चित्रमहालां( पिक्चर गॅलरी )तील रुबेन्स, डिक, टिटिअनसारख्या जुन्या प्रसिद्ध चित्रकारांचीं नामांकित चित्रें अत्यंत चित्ताकर्षक आहेत. व्यापाराच्या दृष्टीनें जसें अँटवर्प शहर फार महत्त्वाचें आहे तसेंच चित्रकलेच्या इतिहासांतसुद्धां या शहरानें अजरामर कीर्ति मिळवून ठेविली आहे. येथील रुबेन्स, डिक, जॉर्डन्स, टेनियर्स हे फार नामांकित चित्रकार होऊन गेले. या शहराची निर्गत १९०५ सालीं ८०,०३२,३५५ पौंड होती; व आयात ९१,१९४,५१७ पौंड होती.

**इतिहासः**—पुराणकालीं कोणी एक चोरांचा राजा आपल्या कैद्यांचे हात कापून शेल्ड नदींत टाकीत असे, ( हॅंडवर्पेन = हात फेंकणे ) म्हणून अँटवर्प हें नांव या शहरास पडलें.

चौथ्या शतकांत अँटवर्प हें दुसऱ्या जर्मनींत( सेकंड ) मोडत असे. १५ व्या शतकाच्या शेवटीं कांहीं परकी व्यापारी जाती अँटवर्प येथें आल्या. १५६० मध्यें अँटवर्पफार भरभराटीस पोंचलें, अँटवर्पच्या बंदरांतून पांचशें जहाजें रोज माल नेत असत. व २००० गाड्या सामानांनीं भरलेल्या या शहरांत येत असत व व्हेनीससारख्या शहरांत जी देवघेव एका वर्षांत होई तितकी देवघेव अवघ्या १५ दिवसांत अँटवर्पमध्यें होत असे, १५७६ या वर्षी स्पेनच्या सैन्यानें हें शहर लुटलें आणि ६००० लोकांची कत्तल उडविली व ८०० घरें अग्निनारायणास समर्पण केलीं. १५८५ या वर्षी पार्मानें अँटवर्प जिंकलें व येथील प्रॉटेस्टंट लोकांनां हांकून लावलें. यामुळें येथील व्यापार बसला. मन्स्टरच्या तहानें संयुक्त प्रांतास स्वातंत्र्य देण्यांत आलें व त्या तहानेंच शेल्डवरील व्यापार बंद करण्यांत आला. याप्रमाणें अँटवर्पच्या व्यापारावर ही एक कुऱ्हाडच कोसळली, ही बंदी १८६३ पर्यंत होती. १८०० या वर्षी अँटवर्पची

फारच दैना झाली. १८३० व १८३२ च्या हल्ल्यांनीं या शहराची फार नासधूस झाली.

इ.स.१९१४मध्यें लोकसंख्या ३९८२१६होती. अँटवर्पच्या भोंवतीं १५ किल्ले बांधून हें एक अत्यंत मजबूत तटबंदीचें ठिकाण करण्याचें १८७८ सालींच ठरलें होतें. त्याप्रमाणें तें काम जागतिक युद्ध सुरू होण्यापूर्वी नुकतेंच पुरें झालें होतें. १७ आगष्ट १९१४ रोजीं बेल्जम सरकारनें ब्रुसेल्स सोडून आपलें ठाणें अँटवर्पला नेलें. सप्टेंबर २८ रोजीं अँटवर्पवर जर्मन तोफांचा भडिमार सुरू झाला, तो आक्टोबर ९ पर्यंत चालून त्या दिवशीं तें शहर शत्रूच्या ताब्यांत गेलें. पुढें चार वर्षें जर्मनांच्या ताब्यांत असतांना तें शहर मृतवत् स्थितींत होतें. १९१८ नवंबर १९ रोजीं बेल्जमचा राजा व राणी यांनीं राजकीय थाटानें या शहरांत प्रवेश केला. १९२० आगष्ट सप्टेंबरमध्यें येथें ऑलिंपिक खेळांचे सामने करण्यांत आले.

अँटवर्प येथें १,००० तोफा ठेवलेल्या असल्यामुळें सर्व जगांत हें तटबंदीचें ठिकाण अत्यंत बलवान असें मानलें जात असे. तरी तें जर्मनांनीं दहाबारा दिवसांत हस्तगत केलें. जर्मनांच्या या सामर्थ्यामुळें जग फार आश्चर्यचकित झालें. ह्या अँटवर्पचा हल्ला १९०४ सालच्या पोर्ट आर्थरच्या हल्ल्याशीं आणि १९१६ मधील व्हर्डुनच्या हल्ल्यांशीं तुलना करण्यासारखा आहे. बंदरामध्यें धक्के वगैरे बांधण्याचें काम लढाईमुळें बंद पडलें होतें तें आतां सुरू झालें आहे. हें सर्व पूर्ण झाल्यावर व्यापाराच्या बाबतींत हें बंदर रॉटरडॅम व हँबर्ग यांनांहि मागें टाकील.

**अँटिओक** (१)—अँटिओक या नांवाचीं सोळा शहरें हेलेनिस्टिक राजांनीं स्थापिलीं. या सर्वांत प्रसिद्ध शहर आरोंटेस नदीच्या पश्चिम तीरावर आहे. इ. स. पूर्वी ३०० सेल्युकस निकेटरनें हें शहर स्थापिलें. अलेक्झांडरनें येथें तळ दिला होता. सेल्युकसनें हें शहर आलेक्झांड्रियाच्या पद्धतीवर बांधलें होतें. ह्याचे चार भाग वेगवेगळ्या राजांनीं बांधिले. ह्याची लोकसंख्या ४ थ्या शतकांत २,००,००० असावी असें क्रिसोस्टोमच्या म्हणण्यावरून कळतें. अँटिओकच्या पश्चिमेला ४ मैलांवर डॅफनीचें नंदनवन आहे. यांत पहिल्या सेल्युकसनें पीथियन अॅपोलोच्या नांवानें बांधलेलें एक मोठें देवालय आहे.

अँटीओक हें पश्चिम सेल्युसिड साम्राज्याच्या राजधानीचें शहर पहिल्या अंटायोकसच्या वेळेस झालें. अंकिराचे लढाईपासून ( इ. स. पूर्वी २४० ) याचें महत्त्व फार वाढलें. पुढें येथील लोकांनीं सेल्युसिड घराण्याविरुद्ध बंड केलें व बराच त्रास दिला. येथील लोकांनीं अर्ज केल्यावरून इ. स. पूर्वी ६४ त रोमन प्रजासत्ताक राज्यांत यांचा समावेश झाला. रोमन सम्राटांची या शहरावर फार बहाल मर्जी असे. सीझर इ. स. पूर्वी ४७ त अँटिओक येथें आला व त्या शहराचें स्वातंत्र्य कायम केलें. रोमच्या पद्धतीवर येथें एक चौक करण्यांत आला. रोमन अमलाखालीं असतांना या शहराला भूकंपाचे फार धक्के बसले. इ. स. १९ त अँटिओक येथें जर्मेनिकस मरण पावला व त्याच्या प्रेताचें दहन चौकांत ( फोरम ) झालें. कोमोडसनें येथें आलिंपिक खेळ सुरू केले होते. ५२६ त भूकंपानें बरेंच नुकसान झालें व त्याला पुरवणी म्हणून इराणी खुश्रूनें बारा वर्षांनीं राहिलेल्या इमारतींचा नाश केला.

पिटर व विशेषतः बार्नाबस व साल यांनीं येथें शुभवर्तमान सांगितलें व येथील धर्मांतर केलेल्या लोकांनां ख्रिस्ती ही संज्ञा प्रथम प्राप्त झाली. धर्मपुस्तकाचें शब्दशः भाषांतर करणाऱ्यांनां व ख्रिस्ताला मानवी नियमच लागू आहेत असें म्हणणाऱ्या ख्रिस्तानुयायांनां अॅन्टिओक असें म्हणतात.

इ. स. ६३५ त हेरॅक्लिअसच्या कारकीर्दींत अॅन्टिओक सारासन लोकांच्या हातीं गेलें. ९६९ त मायकेल बुर्झा व पीटर दि यूनक यांनीं याचा बायझॅन्शियम राज्यांत समावेश केला. १०८४ त हें सेल्जुक तुर्कांनीं घेतलें व चवदा वर्षांनंतर टारेन्टमचा राजा बोहेमंद यानें तें धर्मयुद्धांत सर केलें. नंतर दोन शतकें हें लॅटिन संस्थान राहिलें, शेवटीं १२६८ त हें ईजिप्शिअन लोकांच्या हातांत गेलें. त्यावेळेस येथें बरीच कत्तल व नाश झाला. ह्यानंतर अॅन्टिओक पुन्हां ऊर्जित दशेस आलें नाहीं.

अॅन्टाकिया आधुनिक शहर हें अजून महत्त्वाचें आहे. लोकसंख्या सुमारें २५,००० आहे. अलेप्पोनें जरी आघाडी मारली तरी अँटाकिया हें जिल्ह्याचें व्यापारी केन्द्र आहे. येथें तंबाखू, मका, कापुस हे जिन्नस उत्पन्न होतात भूकंपानें याचें बरेंच नुकसान झालें. या ठिकाणीं ब्रिटिश दुय्यम प्रतिनिधि ( व्हाइस कॉन्सल ) राहतो.

( २ ) ( पिसिडियांतील शहर ) हें एक प्राचिन शहर आहे. या शहराचे विशेषतः देवळांचे, नाटकगृहाचे वगैरे अवशेष आधुनिक यलोव्हाक शहरानजीक अॅरंडेल यास १८३३ त सांपडले. हें आशियामायनरमधील कोनिया जिल्ह्यांतल्या सुलतान दाघ पर्वताच्या दक्षिण उतारावर होतें. इ. स. पूर्वी २८० त सेल्यूकस निकेटरनें हें शहर एका फ्रिजियन देवस्थानाच्या जागेवर वसविलें असावें. रोमन लोकांनीं इ. स. पूर्वी १८९ त याला स्वतंत्र शहर केलें असावें. हें ग्रीक शहरचबनलें होतें. इ. स. पूर्वी ६ त आगस्टसनें सीझारिया या नांवानें येथें एक वसाहत केली, आणि मुलकी व लष्करी कारभाराचें हें केन्द्र झालें. १०९७ त धर्मयोध्यांनां या शहरांत आश्रय मिळाला होता. येथील अवशेष मजेदार असून ग्रीक व रोमन शिबंदीची मजबुती यावरून कळते.

**अँटिग्वा**—अँटिग्वा हें ब्रिटिश वेस्ट इंडीजपैकीं एक बेट असून बरबुडा व रेडोंडा यांसह हें लीवर्ड बेटांच्या वसाहतींतील पांच इलाख्यांपैकीं एक इलाखा आहे. हें १७° ६'

उत्तर अक्षांश व ६१°४५' पश्चिम रेखांशांत आहे. याचा परीघ ५४ मैल व क्षे. फ. १०८ चौ. मैल आहे. नदी व झरे यांच्या अभावामुळें व जंगल कमी झाल्यामुळें ह्या बेटांत अवर्षण पडण्याचा जास्त संभव असतो. पाऊस सरासरी ४५.६ इंच पडतो. अंतर्भागांतील जमीन सुपीक आहे. साखर, अननस वगैरे मालाची निर्गत होते. रताळीं, कोनफळ, मका, व गिनीधान्य पिकतें. लीवर्ड बेटांचा गव्हर्नर अँटिग्वा येथें राहतो. याशिवाय सर्वसाधारण कायदेकौन्सिल व सरकारी व निमसरकारी अशा १६ सभासदांचें स्थानिक कायदेकौन्सिल यांच्या बैठकी येथें होतात. १८९८ पर्यंत ही बादशाही वसाहत होती व कायदेकौन्सिलांत निवडलेले व नेमलेले सभासद असत. प्राथमिक शिक्षण सक्तीचें असून शेतकी शिक्षण सरकारच्या ताब्यांत आहे. ग्रेटब्रिटन, संयुक्त संस्थानें व कॅनडा यांच्यांशीं आगबोटीनें अँन्टिग्वाचें दळण वळण आहे. सेंट जॉन, फालमाऊथ व परहॅम हीं तीन शहरें मुख्य आहेत. राजधानी सेंट जॉन (लोकसंख्या १०००) हें फार प्रेक्षणीय शहर आहे. बहुतेक व्यापार संयुक्त संस्थानांशीं चालतो. साखर, गूळ, चिंच, समुद्रकांसव व अननस हे जिन्नस परदेशांत जातात. अँटिग्वाची लोकसंख्या (१९०१) ३४,१७८ व इलाख्याची ३५,०७३ होती.

अँटिग्वा हें बेट कोलंबसानें १४९३ त शोधून काढिलें; व त्याला सेव्हील येथील एका चर्चचें नांव दिलें. १६३२ पासून येथें लोकवस्ती होऊं लागली.

**अँटियम**— या नांवाचें व्हॉल्सियन लोकांचें प्राचीन शहर, इटालीमध्यें लॅटिअमच्या किनाऱ्यावर रोमच्या दक्षिणेस सुमारें ३३ मैलांवर आहे. ख्रिस्ती शकाच्या पूर्वी ४ थ्या शतकांत अँटियम आणि रोम यांमध्यें वरींच युद्धें झालीं. ख्रिस्तपूर्व ३४८ सालीं कार्थेजशीं झालेल्या तहाप्रमाणें हें रोमच्या ताब्यांत होतें. ख्रि. पू. ३४१ सालीं रोमच्या विरुद्ध केलेल्या बंडांत या शहरचें स्वातंत्र्य गेलें. प्रजासत्ताक काळाच्या शेवटीं रोमचे श्रीमंत लोक येथें येऊन राहिले. कॅलिगुला आणि नेरो नांवाच्या बादशहांचा येथेंच जन्म झाला. नेरोनें येथें वसाहत करून नवीन बंदर बांधलें. मध्ययुगांत येथील वस्ती नेटयूनो येथें गेली. रोमन वाड्यांचे अवशेष येथें आहेत. येथें असलेल्या लक्ष्मीच्या प्रसिद्ध देवळाचे अवशेष मात्र कांहीं शिलक नाहींत. पण बरेच कलाकौशल्याचे अवशेष सांपडतात. संरक्षणाकरितां या शहराच्या भोंवतीं एक खंदक खोदलेला होता व तटहि होता, त्यांचे अवशेष दिसतात. हल्लीं हें उन्हाळ्यांत हवा खाण्याचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. याचें हल्लींचें नांव अँझिओ असें आहे.

**अँटिलीस**—अँटिलिस हें नांव कांहीं यूरोपीय लेखक वेस्टइंडीज बेटांनां योजितात कॅनरी व ईस्टइंडिया बेटें यांमधील द्वीपसमूहास अथवा अज्ञात प्रदेशास अँटिलिआ असें मध्ययुगीन नकाशांत नांव दिलेलें आढळतें. पुढें कोलंबसानें शोधून काढलेल्या प्रदेशास हें नांव मिळालें. हा प्रदेश म्हणजे एक मोठा द्वीपसमूह असल्यामुळें त्यासच अँटिलीस नांव मिळालें.

त्यांतहि मोठा व छोटा अँटिलीस असा भेद करण्यांत येतो. पहिल्यांत क्यूबा, जमेका, हे व पोर्टोरिको हीं बेटें येतात. दुसऱ्यांत बाकीच्या बेटांचा समावेश होतो.

**अँन्टिव्हरी**—अँटिव्हरी हें मांटेनिग्रोमध्यें बंदर आहे. हें सन १८७८ पर्यंत तुर्कांच्या ताब्यांत होतें. येथील लोकसंख्या १९०० मध्यें सुमारें २५०० होती. आड्रियाटिक समुद्र व सुटोरमन पर्वताची ओळ यांच्यामध्यें ह्या शहराचा जुना भाग वसलेला आहे. ऑलिव्ह राईमुळें हें शहर कांहीं यार्डांवरूनच दिसेनासें होतें. याच्या जवळच स्पिझा नांवाचें आस्ट्रियाचें लष्करी ठाणें आहे. मान्टेनिग्रोच्या व्यापाराचें द्वार म्हणून हें बंदर कॅटारो नांवाच्या आस्ट्रियाच्या बंदराशीं चढाओढ करूं शकत नाहीं; कारण वादळाच्या दिवसांत हें बंदर थोडेंसें दुर्गम आहे.

**अन्टीगोनस गोनाटस**—( ख्रि. पू. ३१९-ख्रि. पू. २३९ ). हा मॅसेडोनियाचा राजा, अन्टीगोनस सायक्लॉप्सचा नातू व डेमेट्रियसचा मुलगा होता. थेसलीमधील गोन्नी येथें त्याचा जन्म झाल्यामुळें त्याला गोनाटस असें आडनांव प्राप्त झालें असें कांहींचें मत आहे. ख्रि. पू. २८३ मध्यें डेमेट्रियस मरण पावल्यानंतर अन्टीगोनसनें 'मॅसेडोनियाचा राजा' ही पदवी घेतली. पण मॅसेडोनियाचें राज्य अद्यापि दुसऱ्यांच्याच ताब्यांत होतें. पुढें सात वर्षांनंतर म्हणजे, ख्रि. पू. २७६ सालीं तें राज्य त्याच्या ताब्यांत आलें. राज्यारूढ होतांच त्यानें गॉल लोकांची स्वारी परतविली व एकदोन वर्षें मॅसेडोनियावर अंमल गाजविला. पण पिऱ्हस हा इटलींतून परत येतांच त्यानें अन्टीगोनसच्या ताब्यांतील बहुतेक सर्व मुलूख बळकावून घेतला. पुढें पिऱ्हस हा पिलापोनेसस प्रांतांत स्वारी करण्यासाठीं गेला असतां, ती संधि साधून अन्टीगोनसनें पुन्हां मॅसेडोनियाचें राज्य बळकावलें. पण पिऱ्हसचा मुलगा अलेक्झांडर यानें अन्टीगोनसपासून पुन्हां तें राज्य हिरावून घेतलें. अन्टीगोनसनें धीर न सोडतां पुन्हां एकदां निर्वाणीचा प्रयत्न करून, अलेक्झांडरपासून मॅसेडोनियाचें राज्य पुन्हां परत मिळवलें. त्यानंतर मात्र त्याची कारकीर्द शांततेंत गेली. अन्टिगोनस हा सज्जन व विद्यासंपन्न असल्यामुळें, तो फार लोकप्रिय राजा झाला. त्याच्या दरबारीं नामांकित इतिहासकार, उत्कृष्ट कवि व प्रसिद्ध तत्त्वज्ञ होते, व त्यांनां त्यानें शक्य तें उत्तेजन दिलें. तो आपल्या वयाच्या ८०व्या वर्षी मरण पावला. [ थर्लवाल—हिस्टरी ऑफ ग्रीस. ]

**अँन्टीगोनस सायक्लॉप्स**-(ख्रि.पू.३८२ते ख्रि.पू.३०१) हा मॅसिडोनियाचा राजा फिलिप याचा मुलगा व अलेक्झांडर बादशहाचा भाऊ होता. अलेक्झांडरच्या स्वारींत याला एका तुकडीचें आधिपत्य दिलें गेलें होतें. ख्रि. पू. ३३३

मध्यें अलेक्झांडरनें त्याला फ्रीजियाचा गव्हर्नर नेमलें. त्याच्या मरणानंतर त्याच्याकडे पँफीलिया व लीशिया या प्रांतांचें स्वामित्व आलें. यूमेनिसच्या वांट्याला जे प्रांत आले होते ते त्याच्या ताब्यांत आणण्याकरितां त्याला मदत करण्याची पर्डिकासनें ॲन्टीगोनस याला विनंति केली. पण ती विनंति ॲन्टीगोनस यानें अमान्य केल्यामुळें त्याच्यामध्यें व पर्डिकासमध्यें बेबनाव उत्पन्न झाला. पर्डिकासच्या भयानें ॲन्टीगोनस हा आपल्या मुलासह पळून जाऊन, मॅसिडोनिया येथें ॲन्टीपेटरच्या आश्रयासाठीं आला. पुढें पर्डिकास मरण पावल्यानंतर, ॲन्टीपेटरनें यूमेनीसवर स्वारी करण्याकरितां ॲन्टीगोनस याला पाठविलें. ॲन्टीगोनस यानें यूमेनीसचा पराभव करून त्याला कॅपॅडोशिया येथें हांकलून लावलें. ॲन्टीपेटरच्या मृत्यूनंतर ॲन्टीपेटरच्या मुलाला राज्य न मिळतां पॉलिपरचान हा राज्यावर बसला. तेव्हां ॲन्टीपेटरचा मुलगा कॅसँडर याच्या मदतीनें आशियाचें स्वामित्व मिळविण्याची ॲन्टीगोनसनें महत्त्वाकांक्षा धरिली; व पॉलिपरचान याचें मांडलिकत्व त्यानें झुगारून दिलें. पॉलिपरचान यानें यूमेनीसशीं सख्य केलें व त्यास ॲन्टीगोनस याचा मोड करण्यास पाठविलें. पण यूमेनीस हा विश्वासघातानें ॲन्टीगोनस याच्या हातांत पडून मारला गेला. त्यामुळें ॲन्टीगोनसला अधिक उत्साह येऊन त्यानें सुसा येथील खजिना लुटला व बाबिलोनमध्यें प्रवेश केला. बाबिलोनियाचा गव्हर्नर सेल्यूकस हा त्याच्या भयानें टॉलेमीच्या राज्यांत पळून गेला. नंतर सेल्यूकस, टॉलेमी, कॅसॅन्डर या सर्वांनीं मिळून, ॲन्टीगोनसचा पाडाव करण्यासाठीं कंबर बांधली. ख्रि: पू. ३१५–३११ याच्या दरम्यान पुष्कळ ठिकाणीं उभयपक्षांत झटापटी होऊन शेवटीं तात्पुरता समेट झाला. या समेटान्वयें आशियामायनर व सीरिया हे प्रांत ॲन्टीगोनसच्या ताब्यांत राहिले. पुढें थोड्याच दिवसांत या समेटाची इतिश्री होऊन टॉलेमी, कॅसॅन्डर प्रभृतींनीं ॲन्टीगोनसविरुद्ध युद्धाचें निशाण उभारलें. ॲन्टीगोनसचा मुलगा डेमेट्रियस यानें कॅसॅन्डरचा पराभव करून ग्रीसचा कांहीं मुलूख जिंकून घेतला टॉलेमी हा आशियामायनरवर चाल करून गेला. त्याची व डेमेट्रियसची सॅलॅमीसनजीक गांठ पडून टॉलेमीचा डेमेट्रियसनें पराभव केला. अशा रीतीनें युद्धांत विजयी झाल्यामुळें ॲन्टीगोनसनें आपल्यास राजा ही पदवी लावून घेतली. इकडे सेल्यूकस, लिसिमॅकस, कॅसॅन्डर यांनीं संगनमत करून ॲन्टीगोनसचा नक्षा उतरविण्यासाठीं पुनः तयारी चालविली. इप्सस येथें उभय सैन्याची गांठ पडून मोठी लढाई झाली. तींत ॲन्टीगोनस हा मारला गेला. मरणसमयीं त्याचें वय ८१ वर्षांचें होतें.

**ॲन्टीपेटर**— [ ख्रि. पू. ३९८—३१९ निश्चित नाहीं ] हा मॅसेडोनियन लोकांचा प्रसिद्ध सेनापति होता. याच्या बालपणची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. मॅसिडोनियाचा राजा फिलिप यानें ख्रि पू. ३४६ मध्यें त्याला अथेन्स येथें आपल्यातर्फे वकील म्हणून नेमिलें होतें. केरोनाच्या लढाईनंतर ( ख्रि पू. ३३८) अथेन्स व मॅसिडोनिया यांच्यामध्यें जो तह झाला त्यांत ॲंटीपेटरनें महत्त्वाचा भाग घेतला होता. जगज्जेता अलेक्झांडर हा ज्यावेळीं पूर्वेकडे आपल्या सैन्यानिशीं निघाला त्यावेळीं मॅसिडोनियाचा राज्यकारभार त्यानें अन्टीपेटरकडे सोंपविला. ख्रि. पू. ३३२ मध्यें थ्रेसनें मॅसिडोनियाविरुद्ध बंड उभारलें तेव्हां त्याच्याविरुद्ध ॲन्टिपेटरनें स्वारी केली. पण थ्रेसचा पुरा मोड व्हावयाच्या पूर्वींच स्पार्टानें मॅसेडोनियाविरुद्ध बंड केल्यामुळें त्याला परत फिरावें लागलें. मेगॅपोलिस येथें त्यानें स्पार्टन लोकांचा पूर्णपणें पराभव केला.अलेक्झांडरची आई आलिंपियास ही फार उतावळी व हट्टी स्त्री होती. ती ॲन्टीपेटरच्या कारभारांत सारखी ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न करीत असे. हें ॲन्टिपेटरला मुळींच खपेनासें होऊन त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला व अलेक्झांडरनें त्याच्या जागीं क्रेटरस याची नेमणूक केली. ख्रि. पू. ३२३ मध्यें अलेक्झांडर हा मरण पावला. त्याच्या पश्चात त्यानें कमावलेल्या साम्राज्याची विभागणी होऊन, ॲन्टिपेटर हा मॅसेडोनियाचा गव्हर्नर झाला. अलेक्झांडर वारल्यामुळें ग्रीक लोकांनीं स्वातंत्र्य मिळविण्याचा पुन्हां एकवार प्रयत्न केला, पण क्रेनन येथील लढाईंत ॲन्टीपेटर यानें ग्रीकांचा पराभव करून तो प्रयत्न फसविला. नंतर ॲन्टीपेटरनें क्रेटरसच्या साहाय्यानें आशियांत आपलें सैन्य उतरविलें. सीरियामध्यें असतांना त्याला अशी बातमी लागली कीं, पर्डिकास याला त्याच्याच सैनिकांनीं ठार मारिलें. त्यानंतर त्यानें यूमेनीसवर स्वारी करून त्याचा पराभव केला. या लढाईंत क्रेटरस हा मारला गेला. अर्थात ॲंन्टीपेटरला आतां कोणीच प्रबल शत्रु उरला नाहीं. त्यामुळें अलेक्झांडरच्या सर्व साम्राज्याचीं सूत्रें त्यानें आपल्या ताब्यांत घेतलीं. पर्डिकासचे जे पक्षपातीं होते, त्यांचा मोड करण्याकरतां त्यानें ॲंन्टीगोनस यास नेमलें व तो मॅसिडोनिया येथें परत आला. येथें आल्यावर थोड्याच दिवसांत त्याला आजारानें पछाडलें. आपल्या पश्चात राज्याची व्यवस्था पहाण्याकरितां त्यानें आपल्या मुलाला न नेमतां, पॉलीपरचान यास नेमलें. त्यामुळें त्याच्याविरुद्ध बरेंच काहूर माजलें. तो ख्रि. पू. ३१९ मध्यें मरण पावला.

**ॲन्टीलिया**—हें अटलांटिक महासागरांतील एक कल्पित बेट आहे. याला कधीं कधीं ‘ सप्तनगरद्वीप ’ ( आयलंड ऑफ दि सेव्हन सिटीज ) असेंहि म्हणतात. ॲन्टीलिया या शब्दाची व्युत्पत्ति नीटशी लागत नाहीं. ‘ प्लेटॉनिक ॲटलांटिस ’ या शब्दावरून ॲन्टीलिया हें नांव बनलें असावें असें कांहींचें मत आहे. कांहींच्या मतें ‘ ॲन्टीरियर ’ या शब्दापासून ॲन्टीलिया हें नांव बनलें असावें. अरबी भुगोलज्ञांनीं ज्याला ‘ जेझीरत अल टेन्निन ’

उर्फ राक्षसांचें बेट म्हणून नांव दिलें, तेंच हें ॲन्टीलिया बेट होय असें कित्येक समजतात. वीमर येथील ग्रँडड्यूकच्या ग्रंथसंग्रहालयांत १४२४ च्या काळचा एक नकाशा आहे. त्यांत ॲन्टीलिया हें नांव पहावयास मिळतें. याशिवाय आणखी दोन तीन तत्कालीन नकाशांमध्येंहि ॲन्टीलियाचें नांव आढळतें. या सर्व नकाशांमध्यें ॲंटीलिया हें रोहिलो, टॅनमर इत्यादि इतर काल्पनिक बेटांबरोबरच आलेलें आढळतें. लिस्बन व जपान यांमधील अंतर मोजावयास, ॲन्टीलिया बेटाचा उपयोग होईल, असें पॉलटोस्कॅनेली यानें कोलंबसाला व पोर्तुगालच्या दरबारला लिहिलेल्या पत्रांतून आढळून येतें. ॲन्टीलिया बेटाचें वर्णन नरेंबर्गच्या मार्टिन बेहैम नांवाच्या एका लेखकानें दिलें आहे. त्यांत तो असें म्हणतो कीं, ७१४ मध्यें मूरलोकांनीं स्पेन व पोर्तुगाल हे देश ज्यावेळीं जिंकून घेतले त्यावेळीं त्या देशांतील पुष्कळ ख्रिस्त्यांनीं या बेटांत वसाहत केली पोर्तुगालमध्यें अशी एक दंतकथा प्रचलित आहे कीं, या ॲन्टीलिया बेटाचे सात माणसांसाठीं सात भाग केले व प्रत्येक भागावर एकेकानें आपली सत्ता प्रस्थापित केली. त्यामुळें तेथील लोक फार सुखी होऊन ॲन्टीलिया हें जणूं काय भूवरील स्वर्गाप्रमाणेंच वाटूं लागलें. अशाच आणखीहि कांहीं दंतकथा प्रचलित आहेत, पण त्यायोगानें ॲन्टीलियावर कांहींच प्रकाश पडत नाहीं.

**अँटोनिनस पायस.**-(८६--१६१). हा रोमचा बादशहा रोमचा कॉन्सल (एक मॅजिस्ट्रेट) ऑरेलियस फुल्वसचा मुलगा असून तो लॅनुव्हियमनजीक एका शहरांत जन्मास आला. बापाच्या मरणानंतर त्याचा आजा ॲरियस अँटोनिनस यानें त्याचें संगोपन केलें. ॲरियस हा अत्यंत सचोटीचा व बहुश्रुत असल्याकारणानें अँटोनिनस याला चांगलें शिक्षण मिळालें. पुढें मोठा झाल्यावर त्याला क्वेस्टॅर (एक अधिकाराची जागा) करण्यांत आलें. कांहीं काळानंतर तो प्रीटरच्या हुद्यापर्यंत चढला. या दोन्ही जागांवर असतांना त्यानें आपलें काम चोख बजावल्यामुळें त्याला १२० सालीं कॉन्सलची जागा देण्यांत आली. या अधिकारावर असतांनाहि त्यानें आपली कामगिरी उत्कृष्ट रीतीनें पार पाडल्यामुळें त्याला आशियाचा गव्हर्नर (प्रोकॉन्सल) नेमण्यांत आलें. हॅड्रियन बादशहाची त्याच्यावर बहाल मर्जी असे. त्यामुळें आपल्या एकुलत्या एका मुलाच्या मरणानंतर त्यानें १३८ मध्यें अँटोनिनस याला आपल्या मांडीवर घेऊन आपल्या पश्चात् त्याला राज्यपद देण्याचें ठरविलें. अँटोनिनसनें त्याच्या पश्चात् आपल्या मेहुण्याचा मुलगा व आपला नातु यांनां दत्तक घ्यावें अशी हॅड्रियननें अट मात्र घातली होती. हॅड्रियनच्या मरणानंतर ठरल्याप्रमाणें अँटोनिनस हा गादीवर आला. तो उदार, मनमिळाऊ, अनुभवी, बुद्धिमान व साध्या रहाणीचा असल्यामुळें लोकांनीं त्याचें अभिनंदन केलें. अँटोनिनसनें रोमचा राज्यकारभार फार चांगल्या तऱ्हेनें चालविला. आपल्या खासगी खर्चांत शक्य तितकी काटकसर करून गरीब गांजलेल्या लोकांनां तो सढळ हातानें मदत करीत असे. त्याच्या कारकीर्दीत त्याच्या विरुद्ध बारीकसारीक कट झाले. पण त्या कटांच्या पुढाऱ्यांनां जबर शिक्षा न करतां त्यांच्यावर दया करून त्यानें त्यांनां सोडून दिलें. ख्रिश्चन लोकांचा छळ न करतां उलट त्यानें त्यांचें संरक्षणच केलें. त्याच्या कारकीर्दीत मोठमोठ्या कायदेपंडितांनां राजाश्रय मिळाल्यामुळें कायदेशास्त्रावर चांगलीं चांगलीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. तसेंच त्यानें स्वतः चांगले कायदे पास करून पुष्कळ सुधारणा घडवून आणल्या. त्यानें मोठमोठीं देवळें, नाटकगृहें, थडगीं बांधवून कलाकौशल्याला चांगलें उत्तेजन दिलें. साहित्यशास्त्रांत व तत्त्वज्ञानशास्त्रांत पारंगत असलेल्या विद्वानांनां त्यानें देणग्या व पदव्या दिल्या. आपल्या बापाला-हॅड्रियनला--देवत्वाचा मान देण्याबद्दल त्यानें 'सीनेट' (राजसभा) मधील लोकांचीं मनें वळविलीं व आपल्या बापाला देवत्वाचा मान देऊं केला. या त्याच्या पितृभक्तीबद्दल त्याला 'पायस' ही बहुमानाची पदवी प्राप्त झाली. त्याच्या कारकीर्दीत मूर, ज्यू, ब्रिगँटीस इत्यादि लोकांनीं बंडें केलीं पण त्यांचा त्यानें सहज मोड केला.

कौटुम्बिक बाबतींत मात्र तो विशेष सुखी नव्हता. त्याची बायको फॉस्टीन ही जहांबाज बायको होती व ती त्याला फार त्रास देत असे. पण त्याची मात्र तिच्यावर खरोखर प्रीती होती. तिच्या मरणोत्तर तिच्या स्मरणार्थ त्यानें 'अनाथबालिका' गृह स्थापिलें. त्याला फॉस्टिनापासून एकंदर चार अपत्यें झालीं; पण एका मुलीखेरीज सर्व लहानपणींच मृत्युमुखीं पडलीं. तो १६१ मध्यें लोरियम येथें मरण पावला.

[संदर्भ ग्रंथ---ब्रायंट-दि रेन ऑफ अँटोनिने (केंब्रिज हिस्टॉरिकल ऐसेज १८९५). वॅटसन---मार्कस ऑरेलियस अँटोनिनिस प्रकरण २ रें (लंडन १८८४)].

**अँटोनियस (मार्कस)**-मार्क अँटनी-(ख्रि. पू. ८३-ख्रि. पू. ३०) मार्कस अँटोनियस उर्फ मार्क अँटनी हा प्रसिद्ध वक्ता अँटोनियस याचा नातू असून अँटोनियस क्रेटीकस याचा मुलगा होय. याचें ज्यूलियस सीझरशीं आईच्या बाजूनें जवळचें नातें होतें. त्याचा सावत्र बाप कॉर्नेलियस लेंटयूलस सूरा याची त्याच्यावर बरीच छाप असल्यानें त्याच्या सहवासांत अँटनीनें आपला तारुण्याचा काळ ख्यालीखुशालींत घालविला. त्यामुळें थोडक्याच दिवसांत तो कर्जबाजारी बनला व सावकाराच्या तडाख्यांतून जीव बचावण्यासाठीं त्यानें ग्रीसला पलायन केलें. अथेन्स येथें असतांना त्यानें तेथील नामांकित तत्त्ववेत्त्यांचीं व्याख्यानें ऐकिलीं, पण थोड्याच दिवसांत त्याला सीरियाचा सुभेदार औलस गॅबीनियस यानें पॅलेस्टाइनमध्यें ॲरिस्टोब्यूलस याच्यावरील स्वारींत भाग घेण्यास बोलावल्यावरून तो

तिकडे गेला. ख्रि. पू. ५४ मध्यें तो सीझरबरोबर गॉलच्या स्वारींत हजर होता. सीझरची त्याच्यावर मर्जी बसल्यामुळें त्याला क्वेस्टार, ऑगर, ट्रायब्यून इत्यादि अधिकाराच्या जागा मिळाल्या, या जागांवर काम करीत असतांना त्यानें सीझरची इमानेइतबारें सेवा केली. स्पेनवर स्वारी करण्याकरितां सीझर गेला असतां त्याच्या गैरहजरांत अँटनी हा इटलीचा नायब सुभेदार [ डेप्यूटी गव्हर्नर ] झाला. फॅरसॅलसच्या लढाईंत दुय्यम सेनाध्यक्षाची जागा त्याला देण्यांत आली. पुढें सीझर हा आफ्रिकेमधील मोहिमेवर असतांना पुन्हां अॅन्टनी हा इटलीचा नायब सुभेदार [डेप्युटी गव्हर्नर] नेमला गेला. अर्थात सीझरच्या खालोखाल इटलीवर त्याचीच सत्ता होती व त्या सत्तेच्या जोरावर त्यानें अनन्वित कृत्यें केलीं. ख्रि. पू. ४४ मध्यें लुपरकॅलियाच्या उत्सवाच्या दिवशीं सीझरच्या डोक्यावर त्यानें स्वतःच्या हातानें राजमुकुट ठेवला. पुढें सीझरच्या वधानंतर त्यानें सीझरचा खून करणाऱ्या लोकांविरुद्ध वक्तृत्वपूर्ण भाषण केलें. त्यामुळें लोक याच्या पक्षाचे झाल्यामुळें बंडखोरांनां पळ काढावा लागला. पुढें सीझरच्या शरीररक्षकांच्या साहाय्यानें त्यानें सीनेटमध्यें जाऊन गॉल प्रांत आपल्या ताब्यांत देण्याविषयीं सीनेटच्या सभासदांनां धमक्या दिल्या; पण त्या प्रांताचा सुभेदार डेसीमस ब्रूटस यानें तो प्रांत ताब्यांत देण्याचें नाकारलें. त्यामुळें चिडून जाऊन तो ब्रूटसवर स्वारी करण्याकरितां निघाला. इतक्यांत सीझरनें मुलगा म्हणून मानलेला ऑक्टेव्हियन हा रोममध्यें आला व त्यानें सीझरच्या पश्चात् त्याच्या जागीं आपला हक्क प्रस्थापित केला. सीनेटनें व सिसरो यानें त्याचा हक्क कबूल केल्यामुळें त्याच्या पक्षाला पुष्कळच लोक मिळाले. इकडे ब्रूटसच्या सैन्याला अँटनीनें वेढा दिला होता. त्या जागीं ऑक्टेव्हियन हा अँटनीवर चाल करून गेला. म्युटिना येथें त्यानें अँटनीचा पूर्णपणें पराभव केला. पुढें ऑक्टेव्हियनविषयीं सीनेटच्या मनांत संशय उत्पन्न झाल्यामुळें ऑक्टेव्हियनला राग येऊन तो आपल्या सैन्यानिशीं रोममध्यें गेला व त्यानें आपल्याला कॉन्सल नेमण्याविषयीं सीनेटला धमकी दिली. सीनेटनें त्याला कॉन्सल नेमलें. इकडे अँटनी हा गॉलमध्यें पळून गेला होता. तेथें त्यानें लेपीडसच्या साहाय्यानें मोठें सैन्य जमविलें व तो रोमवरच चाल करून निघाला. ही बातमी ऑक्टेव्हियनला समजतांच सीनेटच्या इच्छेविरुद्ध त्यानें अँटनी व लेपीडस यांजबरोबर सामोपचाराचें बोलणें सुरू केलें. त्या तिघांमध्यें वाटाघाट होऊन तिघांनीं मिळून इटलीचा राज्यकारभार करावयाचा असें ठरविलें. त्याप्रमाणें गॉलची व्यवस्था पहाण्याचें काम अँटनीकडे आलें. स्पेन लेपीडसच्या ताब्यांत गेलें व आफ्रिका, सार्डिनीया, सिसिली हे प्रांत ऑक्टेव्हियनकडे राहिले. या त्रिकूटाच्या अमदानींत जुलमजबरदस्ती यांनां ऊत येऊन सुलतानशाही नांदूं लागली. प्रसिद्ध माणसांचा छळ होऊं लागला. सिसरोसारखा कसलेला मुत्सद्दी व सुप्रसिद्ध वक्ता अँटनीच्या रोषाला बळी पडला. ख्रि. पू. ४२ च्या वर्षी अँटनी व ऑक्टेव्हियन यांनीं बंडवाल्यांवर स्वारी केली व फिलिपी येथील दोन लढायांत ब्रूटस व कॅशस यांचा पराभव केला. नंतर अँटनी हा आशियामायनरकडे पूर्वेकडील प्रांत जिंकण्यासाठीं निघाला. सायलेशिया येथें त्याचा मुक्काम असतां, क्लिओपाट्रा नांवाच्या एका सुंदर तरुणीनें त्याचें मन आकर्षण करून घेतलें. त्यामुळें तिच्या सहवासांत त्यानें चार पांच महिने व्यर्थ घालविले. इतक्यांत पार्थियन लोकांनीं सीरियावर स्वारी केल्यामुळें त्याला हालचाल करणें भाग पडलें. पण याच सुमारास ऑक्टेव्हियन व त्याची बायको फुल्विया यांच्यामध्यें खटका उडून लढाईपर्यंत पाळी आल्याचें वर्तमान त्याला समजलें. त्यामुळें त्याला घाईघाईनें इटलीला परत यावें लागलें.तेथें येतो तोंच ऑक्टेव्हियन हा विजयी झाल्याचें वर्तमान त्याला समजलें. पुढें थोड्याच दिवसांत फुल्विया मरण पावली. त्यामुळें वादाचें कारण नाहींसें होऊन ऑक्टेव्हियन व अँटनी यांच्यामध्यें पुन्हां समेट झाला. व ऑक्टेव्हियननें आपली बहीण ऑक्टेव्हिया अँटनीला देऊन तोसमेट पक्का केला.

रोमन साम्राज्याची पुन्हां वांटणी होऊन अँटनीकडे पूर्वेकडील मुलुखाच्या व्यवस्थेचें काम आलें. त्याप्रमाणें अँटनी हा आशियामायनरमध्यें आला. पार्थियन लोकांचा पराभव करण्याचा त्यानें पुष्कळदां प्रयत्न केला; पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. ख्रि. पू. ३९ मध्यें तो अथेन्स येथें आला. तेथें असतांना त्यानें 'आपण देव आहों' असें लोकांनां भासविण्यास सुरवात केली. सीरियामध्यें असतांना त्यानें क्लिओपाट्राशीं आपला पूर्वीप्रमाणेंच संबंध चालू ठेवला. अँटनीचें हें वर्तन पसंत न पडून सीनेटनें त्याला पदभ्रष्ट केलें, व त्याच्या व क्लिओपाट्राविरुद्ध युद्ध पुकारलें. ॲक्टियममध्यें जी लढाई झाली त्यांत अँटनीचा पराभव झाला.त्याच्या अगोदरच क्लिओपाट्रा ही ईजिप्तमध्यें पळून गेली होती. तिच्याकडेच जाण्याकरतां अँटनी हा निघाला. त्याच्यामागून शत्रुसैन्य पाठलाग करीतच होतें. आपल्याप्रमाणेंच क्लिओपाट्राच्या पाठीस सैन्य लागलें असेल व क्लिओपाट्रानें जीव दिला असेल अशा समजुतीनें त्यानेंहि वाटेंत आत्महत्या करून घेतली. अँटनीला तीन चार बायका असून त्यांच्यापासून त्याला पुष्कळ मुलें झालीं होतीं

[ प्लुटार्क–लाइव्हज ऑफ अँटनी, ब्रूटस, सिसरो, सीझर; सिसरो–लेटर्स; फिलीपिक्स; डिक्वन्सी–एसे ऑन सीझर्स. ].

**अंडवृद्धि**—अंतर्गळ पहा.

**अण्डाशयछेदनक्रिया**—(ओव्हरिओटोमी) ही शस्त्रक्रिया स्त्रियांच्या एक किंवा दोन्ही अंडाशयांस रोग झाला असतां करणें जरूर पडतें. हे अवयव कटिरांतील पोकळीमध्यें असतात. म्हणून उदर चिरून तेथें होणाऱ्या मोठाल्या गांठी अगर अंडाशय कापून काढणें हें आधुनिक शस्त्रक्रियेच्या प्रगतीमुळें बरेंच सर्वसाधारण व शक्य झालें आहे.

या प्रगतीचा पूर्वेतिहास मनोरंजक वाटल्यावरून तो येथें देत आहों. इ. स. १७०१ सालीं हौस्टन या शस्त्रवैद्यानें ही शस्त्रक्रिया अर्धासुधीं इंद्रियाचा भाग काढण्यापुरती यशस्वी रीतीनें केली. पुढें १७८० मध्यें हंटर्स यानें याची प्रगति होण्याची खटपट केली. नंतर १८०९ सालीं एडिंबरो येथील जॉनवेल याच्या उत्तेजनामुळें त्याचा शिष्य यानें कांहीं असल्या शस्त्रक्रिया केल्या; व त्यांतील बऱ्याच यशस्वी झाल्या. नंतर ही शस्त्रक्रिया अमेरिकेंत संयुक्तसंस्थानांतील डॉक्टर करूं लागले. पुढें एडिंबरो येथील लिझार्स नामक शस्त्रवैद्याच्या हातून यशस्वी रीतीनें कांहीं शस्त्रक्रिया पार न पडल्यामुळें लोकमत त्याविरुद्ध फार जोराचें झालें. क्ले, स्पेन्सर, बेकर, कौन व कीथ या चौघां गृहस्थांनीं या शस्त्रक्रियेची कृति पायाशुद्ध व शक्य कोटींत होईल व शस्त्रक्रियेवर कोणाकडून टपका न येईल अशा तऱ्हेची नियमबद्ध व नवीन शोध व सुधारणांनीं युक्त अशी केली. त्यामुळें पुष्कळ शस्त्रवैद्यांमध्यें या शस्त्रक्रिया करण्यामध्यें पुष्कळ अहमहमिका सुरू होऊन त्याचे सुपरिणाम लोकांनां दिसूं लागले. व फार थोडे रोगी दगावतात असें नजरेस येऊं लागलें. पुढें जंतुघ्न औषधांचा शोध लागल्यामुळें ही शस्त्रक्रिया मोठ्या शस्त्रक्रियांपैकीं व धोक्याची असूनहि यांतील मृत्युप्रमाण फार अल्प होऊं लागलें. पास्टयूरच्या चरित्राचें इंग्रजी भाषांतर आहे, त्यांतील पुढील उतारा मुद्दाम दिला आहे. त्यावरून एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस या शस्त्रक्रियेमुळें किती बाया दगावत याचें चित्र डोळ्यापुढें उभें रहातें:—"या शस्त्रक्रियेंत बहुधा रोगी दगावतात याचें कारण रुग्णालयांतील बिघडलेली हवा असावी असा बळकट संशय आल्यामुळें वरील अधिकाऱ्यांनीं पारिसनजीक उत्तम हवाशीर जागीं एक स्वच्छ घर एकीकडे निर्मळ जागीं असलेलें भाड्यानें घेऊन १८६३ सालीं एकी मागाहून दुसरी अशा दहा बायका तेथें रोग बरा व्हावा म्हणून शस्त्रक्रियेसाठीं पाठविल्या. शेजाऱ्या पाजाऱ्यांनीं त्यांनां आपल्या पायांनीं त्या घरांत जातांना पाहिलें सुद्धां; पण थोड्याच दिवसांनीं त्या सर्वांचीं प्रेतें शवपेटिकांत घातलेलीं त्या घरांतून पुरण्यासाठीं स्मशानाकडे नेलेलीं त्यांच्या नजरेस पडलीं; पण पुढें प्रत्येक शस्त्रवैद्याच्या हातून दगावल्याशिवाय पुष्कळ रोगी बरे होऊं लागले व त्यांच्या याविषयींच्या आंकड्यांत उत्तरोत्तर सुधारणा दिसूं लागली. ती इतकी कीं हल्लीं शेंकडा ५, ७, किंवा ९ यांपेक्षां अधिक रोगी दगावत नाहींत. स्पेन्सर वेल्स यानें या कामीं फार मेहनतीनें व शोधक बुद्धीनें या क्रियेस उपयोगी अशीं कांहीं हत्यारें व शस्त्रें शोधून काढलीं, व त्या त्या शस्त्रास त्याचेंच नांव दिलें आहे.

**शस्त्रक्रिया करण्याचे प्रसंग**:—(१ स्त्रियांचे अंडाशयांत मोठी पोकळी होऊन पोट गरोदर स्त्रीप्रमाणें किंवा उदर झाल्याप्रमाणें मोठें होतें; किंवा त्यांत अन्य रोगांची वृद्धि होते. (२) गर्भाशयांत तंतुमय रचनेची रोगग्रंथि वृद्धिंगत होते; अशा वेळींहि शस्त्रक्रिया केल्यानें स्त्रीचे पुढील आयुष्यांत प्रतिमासीं रजस्वला होणें बंद होतें. परंतु ती रोगग्रंथि लहान होते व पीडा करीत नाहीं. (३) वेदनायुक्त विटाळशूळांत रोग्यास जीव नकोसा करून सोडीत असेल व इतर सर्व उपाय थकल्यावर. (४) दुसऱ्या भागांतील कांहीं विवक्षित रोग हे अंडाशय काढून टाकल्यानें बरे होतात. हा शोध रॉबर्ट ब्याटी यानें लाविला. याचे अन्य परिणाम पुढें त्या स्त्रीमध्यें विषयासंबंधीं विरक्ति कदाचित होणें व तिच्या अंगांतील स्त्रीजातिविशिष्ट मार्दव कमी होणें हे असतात म्हणून रोग्यास व तिच्या आप्तास या आपत्तीची संभवनीयता अगोदर कळवून ठेवून त्यांचीं संमति मिळविलेली चांगली. यानें रोगमुक्तता होते, परंतु कदाचित वरील प्रकार घडण्याचा संभव असतो. (५) स्तनांमध्यें असाध्य अशा कॅन्सर रोगाच्या ग्रंथि वाढतात. या रोगाची प्रगति थांबविण्याच्या आशेनें ही शस्त्रक्रिया कोणी करतात. पण ती अशाच वेळीं करतात कीं स्तनांतील कॅन्सर ग्रंथि शस्त्रक्रियेनें कापून काढण्याचे स्थितींत नसते.

**शस्त्रक्रियेचें संक्षिप्त वर्णन**.— ही करण्याच्या अगोदर रोग्याचा कोठा साफ ठेवून लघवी शक्य तितक्या सुस्थितींत आणली पाहिजे. शस्त्रक्रियेच्या वेळीं स्त्रीरोग्याच्या पायांत गरम मोजे चढवावे. लघवी शलाकेनें काढून अत्यंत स्वच्छ केलेल्या उदरावर मधोमध दीर्घ वर्तुळाकृति मोठें भोंक कातरलेलें मेणकापड बांधतात. नंतर जंतुघ्न औषधांनीं छेद करावयाची जागा पुनः शुद्ध करतात व तीन इंच लांबीचा छेद मधोमध करतात. आंतील रचना जी छेदावयाची तिचें सूक्ष्म वर्णन न करतां एवढेंच सांगतां येईल कीं तो मोठा विकृत अंडाशय भोंवतालच्या भागांत रुतून बसलेला असतो. तो मोठ्या चिकाटीनें, मेहनतीनें व शांत चित्तानें सोडवून त्याचा विकृत जलानें फुगलेला आकार त्यांतील जल स्पेन्सर्स वेल्स याच्या यंत्रानें बाहेर काढून टाकून लहान करण्यांत येतो व ती रोगाची गांठ जखमेंत ओढून धरतात. एका मोठ्या दाभणांत रेशमी बळकट दोरा ओंवून त्यानें त्या गांठीचें मूळ मधोमध विद्ध करून बळकट बांधून दाभण काढून घेतात व तें रोगाच्या मुळांतील अथवा देठांत ओंवलेल्या दोऱ्याच्या योगानें तें रोगाचें मूळ बद्ध होईल असें बांधून टाकतात; व नंतर या दाभणानें बांधलेल्या रोगाच्या गांठीचा गट्टा कापून काढतात; पण त्यांतील विकृत पू, रक्त, पाणी उदरांत न पडेल अशी दक्षता बाळगतात. या छेदनानंतर रक्तस्राव कोठें होत असेल तो शोधून बंद करतात. व नंतर त्या अंडाशयाचें छिन्न मूळ उदरांत पुनः जागच्या जागीं ठेवतांना दुसरें अंडाशय निरोगी आहे किंवा नाहीं हें पहातात. व रोगट असल्यास तेंहि काढून टाकतात. गांठ रुतलेली सोडवतांना आंतड्यांनां इजा बिलकुल होऊं देतां उपयोगी नाहीं.

हें आटोपल्यावर जखम व तींतील खोल भाग धुवून शुद्ध करणें तें जपून तींतून लाल पाणी येत नाहीं असें होईपर्यंत करावें लागतें. तें टिपून घेण्याकरितां लिंटचे बोळे मोजून उदराच्या पोकळींत बसवितात. मांसाचे भाग व कातडी शिवण्यास नंतर आरंभ होऊन तें संपण्याच्या अगोदर बोळे काढून घेऊन त्यांची व सर्व हत्यारांची-त्यांपैकीं एखादें पोटांत चुकून राहूं नये म्हणून-गणती करतात. नंतर चामडी नीट जुळून दिसेल असे टांके मारणें झाल्यावर त्या जखमेवर जंतुघ्न पट्टया व कापसाचे थरावर थर बांधतात. पण जर विकृत घाण उदरांत सांडली असा संशय येऊन उदरांत विकृत जल सांचेल अशी शंका आल्यास त्याचें उत्सर्जन होण्यासाठीं रबराच्या तुकड्यास मधोमध भोंक पाडून त्यांत कांचेचीं छिद्रें असलेली नळी जखमेंत बसवितात. ही नळी खोल भागापर्यंत पोंचते. हींतून निघणारी घाण शोषून घेण्यासाठीं तिच्यावर शोषक पट्टया ठेवतात व जखम वेळोवेळीं पहातांना बारीक नळीच्या योगें आंतील जमलेलें घाण जल काढून टाकतात व नव्या पट्टया बसवतात. हें पाणी कमी सांचू लागलें म्हणजे मग नळी काढून घेतात. हें होत असतांना रोग्यास निजवून झोंपेसाठीं औषध, वेळोवेळीं शलाकेनें लघवी काढणें, वांति झाल्यास ती शमविणें, सबंध एक दिवस अन्न व दूध न देणें, पोटफुगी न होऊं देणें,दुसऱ्या दिवसापासून गुदमार्गें पातळ अन्न; नंतर तीन दिवसांनीं दूध वगैरे पातळ पदार्थ देणें व तीन ते सात दिवसांत टांके तोडणें असें कडक पथ्य व जपणूक करावी लागते.

**अँडीज**—हा दक्षिणअमेरिकेंतील मोठा पर्वत असून या पर्वताची रांग दक्षिणअमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्याच्या बाजूनें उत्तर टोंकापासून दक्षिण टोंकापर्यंत पसरली आहे. स्थूलमानानें या पर्वताची लांबी ४४०० मैल असून कांहीं ठिकाणीं याची रुंदी १०० मैल आहे. व उंची सर्वसाधारण १३००० फूट आहे. एवढी लांब रांग जगांत दुसरी नाहीं. यां रांगेचे मुख्य दोन भाग पडतात ( १ ) पूर्वेकडील व(२) पश्चिमेकडील. पूर्वेकडील रांगेला लॉस अँडीज हें नांव असून पश्चिमेकडील रांगेचें नांव लाकोर्डीलेरा असें आहे. या रांगांनां लागूनच आणखी एक रांग असून तिचें नांव कॉर्डीलेरा डेल कॉस्टा असें आहे. पूर्वेकडील रांग अर्जेंटिनाच्या मध्यभागांत संपते. पश्चिमेकडील मात्र अगदीं नैर्ऋत्य टोंकापर्यंत जाऊन भिडलेली आहे. २० अक्षांशापासून दक्षिणेकडील रांगेला कॉर्डीलेरा डी लास अँडीज असें नांव आहे. ही रांग चिली-अर्जेंटिना या प्रांतामधून गेलेली आहे. या रांगेंत ३०-५२° या अक्षांशांत मेराग्विला, सारमीयेंटो, अर्जेंटिनो, विडाया, सानमार्टिन, नानसेन, फोंटान, ला प्लाटा, मॅस्कार्डी फेटलाके इत्यादि अनेक सरोवरें आहेत. तसेंच या पर्वताच्या रांगेमध्यें बरींच मोठमोठालीं शिखरें आहेत. या शिखरांची उंची सर्वांत कमी म्हणजे ६५०० फूट आहे. माउंट गीकी व माउंट स्टोक्स यांची उंची अनुक्रमें ७५०० व ७१०० फूट आहे. माउंट मेयोची उंची ७६०० फूट असून अगसीज शिखराची १०६०० फूट आहे. फिट्झरॉय, सॅन लोरेंझो यांची ११००० वर उंची असून सर्वांत उंच शिखर सॅन व्हॅलेंटिन हें आहे ( उंची १२७०० फूट ). या पर्वताचा अगदीं दक्षिण भाग, बर्फाच्छादित असून त्या भागांत बरींच सरोवरें आहेत. या रांगेंतील शिखरें विशेषतः उंच शिखरें ज्वालामुखी आहेत.

३८° अक्षांशापासून उत्तरेकडील भागांत देखील पुष्कळच शिखरें असून उंचीच्या मानानें देखील तीं दक्षिणभागांतील शिखरांपेक्षां मोठीं आहेत हीं शिखरें म्हणजे माउंट कोचिको ( ८२५५ फूट ); कंपॅरिनेयो ( १३१४० फूट ); पेटरोआ ( १३२९७ फूट ); टिंग्वीरिरिका कॅस्टीलो ( १६५३५ ); मायपू ( १७५७६ ) अलव्हरडो ( १४६०० ); ॲमॅरिलो ( १५३२१); सॅन जोस ( १९८४९ ); पिक्नेनीज ( १७८१५ ). व ट्रॅवर्ड ( १९६१९ ) हीं होत. या शिखरांमध्यें बरेच महत्त्वाचे घांट असून शिवाय पुष्कळ खोरींहि आहेत. या भागांतील सर्वांत उंच शिखरें म्हणजे माउंट ड्युगॅटो ॲकोंकाग्युआ ( २३,९३ ) व मरसीडेरियो हीं होत. मायपू सॅन जोस, ट्रॅवर्ड हीं शिखरें ज्वालामुखी आहेत. २८° अक्षांशाच्या आसपासच्या भागांत देखील पुष्कळच ज्वालामुखी शिखरें आहेत.

२८° अक्षांशापासून उत्तरेकडे जी कॉर्डीलेराची रांग आहे ती पेरू ईक्काडोर या प्रांतांतून गेली आहे. या भागांत ज्वालामुखी शिखरांची सारखी ओळ लागलेली आहे. सँगे हा जगांतील एक मोठा ज्वालामुखी पर्वत आहे. तसेंच पिचिंचा व कोटोकॅची हेहि बरेच मोठे ज्वालामुखी आहेत.

अँडीज पर्वतामध्यें खनिज संपत्ति विपुल आहे. ३३°-३६° यांमधील रांगेंत, ज्यूरासीक दगडाचे व खडूचे थर सांपडतात अर्जेंटिनाच्या उत्तरेकडील पर्वताच्या रांगेंत स्फटिकाचे दगड असून, त्यावरोबर रेताड दगड व वनस्पत्यवशेषांपासून झालेले दगड यांचीहि समृद्धि आहे. अंडीज पर्वताच्या मध्यभागांत ज्या ठिकाणीं टिटिकाकाचें सरोवर आहे त्याच्या आसपास आर्केयन व पॅलीओझोइक पाषाणांचे थर आढळतात. तसेंच या सरोवराच्या पश्चिम भागांत, तृतीययुगांतील ज्वालामुखी दगडाचें व मेसोझोइक पाषाणांच्या थराचें मिश्रण आढळून येतें. ईक्काडोर प्रांतांत कांहीं ठिकाणी जेवूर दगड आढळतात तर कांहीं ठिकाणीं मेसोझोइक पाषाणाचे थर आढळून येतात.

**अंडें**—अंडें म्हणजे पक्षी व इतर कित्येक प्रकारच्या प्राण्यांच्या स्त्रीजातीपासून उत्पन्न होणारा प्रजोत्पादक गोलक. यांत असलेल्या गर्भाची वाढ होऊन अखेर त्यापासूनच पिल्लें तयार होतात. पक्ष्यांचीं अंडीं सर्वांत मोठीं असतांत. कारण त्यांत गर्भ असून शिवाय त्याच्या पोषणाकरितां लागणारें अन्न-द्रव्य अंड्यांतील पांढरा व पिवळा बलक-

असतें; व त्याभोंवतालीं कठिण कवचाच आवरण असतें. अंड्यांचा लहान मोठेपणा आंत असलेल्या अन्नद्रव्याच्या प्रमाणावर अवलंबून असतो. आणि अंड्याचा आकार भोंवतालच्या परिस्थितीवर अवलंबून असतो. हा अन्नांश जेव्हां अगदींच थोडा असतो तेव्हां अंडें बाहेर येतांच लवकर फुटतें व त्यांतील पिल्लूं जन्मास येतें. अंड्यांची संख्या निरनिराळ्या प्राण्यांत निरनिराळी असते; कांहीं पक्षी वर्षांतून एक वेळ एकच अंडें घालतात, तर कांहीं दर वेळीं वीसवीस अंडीं घालतात, आणि कांहीं जातीचे मासे लाखों अंडीं घालतात. पुष्कळ जातींच्या पक्ष्यांचीं अंडीं माणसें खातात. त्यांत कोंबडीं, बदकें इत्यादि पक्षी मुख्य होत. याशिवाय कित्येक जलचर प्राण्यांचीं अंडींहि खातात. कांसवाचीं अंडीं तर फारच आवडीचीं असतात, आणि गोड्या पाण्यांतील कांसवाच्या अंड्यांचें तेल फार उपयुक्त असतें. साधारणपणें कोंबडीचें अंडें ८७५ ग्रेन वजनाचें असून त्याच्या कवचीचें वजन ९३.७ ग्रेन, आंतल्या पांढऱ्या बलकाचें वजन ५२९.८ ग्रेन आणि पिवळ्या बलकाचें २५१.८ ग्रेन असतें. त्याच्यांत प्राणीज पदार्थ शें. २ असतात, शें. १ खटस्फुरित (कॅल्शियम फॉस्फेट) व मग्नस्फुरित (मॅग्नेशियम फॉस्फेट); बाकीचा भाग खटकर्बिता(कॅल्शियम कार्बोनेट)चा असून मग्नकर्बिता (मॅग्नेशियम कार्बोनेट)चा थोडासा अंश असतो.

प क्ष्यां चीं अं डीं.—पक्ष्यांचीं अंडीं पाहिलीं असतां बाह्य परिस्थितीमुळें अंड्यांत किती फेरबदल होतो तें उत्तम प्रकारें कळतें. पक्षी आपलीं अंडीं आपल्या शरीरांतील उष्णता लावून उबवितात व तसें करतांना आंतील पिल्लास धक्का लागूं नये म्हणून अंड्यावरचें कवच बरेंच कठिण असतें; आणि या कवचाचा रंग अंडीं खाणाऱ्या प्राण्याच्या नजरेस तें पडणार नाहीं अशा प्रकारचा असतो. अंड्याचें बाह्य कवच खटकर्बिताचें (लाईम कार्बोनेटचें) मुख्यतः बनलेलें असतें. पण शिवाय त्यांत खटस्फुरित (लाइम फॉस्फेट) व मग्नगंधकित (मॅग्नेशिया) हि असतो. हें कवच तीन स्फटिकमय पापुद्र्यांचें बनलेलें असतें, व त्यांतून उभ्या सूक्ष्म नलिका असतात. त्यांच्या योगानें कवच छिद्रमय बनून त्यांतून आंतल्या प्राण्याच्या पोषणार्थ हवा जाऊं शकते. अगदीं बाहेरचा पापुद्रा चिनीमातीच्या भांड्याप्रमाणें चकचकीत असतो. कांहीं पक्ष्यांच्या अंड्यांचीं कवचें अगदीं पातळ व पारदर्शक असतात, तर उलटपक्षीं कांहींचीं फारच जाड असतात. सर्वांत जाड कवच हल्लीं नामशेष झालेल्या एपीऑर्निसचें असतें.

बहुतेक प्राण्यांच्या अंड्यांचा आकार साधारणपणें कोंबडीच्या अंड्यासारखाच असतो. पण फ्लोव्हर जातीच्या पक्ष्यांचीं अंडीं फळ्यानिवडुंगाच्या आकाराचीं, सँड-ग्रौझचीं नळकंड्यांसारखीं, घुबड व टिटमाइसचीं वाटोळ्या आकाराचीं आणि ग्रीबजचीं द्विशंकाकृति (बायकॉनिकल) असतात. रंगाच्या बाबतींत पक्ष्यांच्या अंड्यांत फारच विविधता असते. बऱ्याच जातींच्या अंड्यांनां सर्वत्र एक प्रकारचा रंग असतो, पण पुष्कळांवर रंगाच्या रेघा किंवा टिपके किंवा दोन्ही एकत्र असतात. कित्येक पक्ष्यांच्या अंड्यांचा रंग प्रथम कांहीं दिवस अधिकाधिक भडक होत जातो व पुढें पुन्हां फिका पडत जातो. एकाहून अधिक अंडीं घालणाऱ्या पक्ष्याच्या पहिल्या किंवा शेवटच्या अंड्यालाच फक्त रंग असतो व बाकीचीं साधीं असतात. आस्ट्रेलियांतील दलदलींत राहाणारी लावी पक्षीण (स्वाम्प केरु) जातीच्या पक्ष्यांच्या अंड्यांनां शुभ्र पांढरा व हिरवा यांच्या दरम्यानचे सर्व प्रकारचे रंग असतात. चितूर (पार्ट्रिज) नांवाच्या पक्ष्याच्या (एक जातीचा कवडा किंवा तित्तिर) अनेक पोटजाती असून त्यांच्या अंड्यांचा रंग भौगोलिक निवासस्थानानुसार निरनिराळा असतो. म्हणजे ग्रीसमधील पोटजातीच्या अंड्यांचा रंग स्वच्छ शाईसारखा असतो. ग्रीशियन बेटांमधील ठिपक्यांनीं युक्त असतो आणि पूर्वेकडील प्रदेशांत शाईसारखे काळे डाग फारच मोठ्या प्रमाणांत असतात. ग्विलिमॉट (समुद्रपक्षी) पक्ष्यांचीं अंडीं रंगाच्या बाबतींत सर्वांत अधिक विचित्र असतात. त्यांचा रंग व त्यांवरील डाग यांसंबंधीं इतकी विविधता असते कीं, त्याविषयीं कारणमीमांसा कांहींच सांगतां येत नाहीं.

रं गा द रू न हो णा रा बो ध.—अंड्याच्या रंगाचा पक्ष्याच्या रंगाशीं कांहीं एक संबंध नसतो; पण त्याचा भोंवतालच्या परिस्थितीशीं मात्र बराच प्रत्यक्ष संबंध असतो. पांढऱ्या रंगाचीं अंडीं प्राथमिक अवस्था दर्शवितात. सर्पाचीं अंडीं पांढरीं असतात बिळांत किंवा अंधाऱ्या जागेंतील अंड्यांचा रंग पांढरा असणेंच जरूर असतें, कारण शुभ्रेतर रंगाचीं अंडीं अशा अंधाऱ्या जागेंत दृष्टीस पडणें कठीण जाऊन पक्ष्यांच्या जाण्यायेण्यांत लाथाडून फुटून जावयाचीं उलटपक्षीं पांढऱ्या रंगाचीं अंडीं थोड्याशा उजेडानेंहि दृष्टिगोचर होऊं शकतात. आतां अगदीं उघड्या जागेवर जीं अंडीं घातलेलीं असतात त्यांनां संरक्षणाच्या सोयीसाठीं विशेष प्रकारचा कांहीं तरी रंग असतो. म्हणजे भोंवतालच्या जमीनीच्या सारखाच रंग अंड्यांनां असतो. यासंबंधानें फ्लोव्हर पक्ष्याच्या अंड्यांचें उदाहरण विशेष पाहण्यासारखें आहे. तथापि बऱ्याचशा जातींचे पक्षी आपलीं अंडीं मुद्दाम तयार केलेल्या घरट्यांत घालतात व अशा अंड्यांवर निरनिराळ्या रंगांच्या छटा असतात. पण त्या योगानें तीं अंडीं चोरणाऱ्या प्राण्यांच्या सहज नजरेस येऊं शकतात.

अंड्याचा आकार अंड्यांच्या संख्येवर कांहीं अंशीं व कांहीं अंशीं जन्मास येणाऱ्या पिल्लांच्या प्रथमावस्थेवर अवलंबून असतो. म्हणजे ज्या पक्ष्यांचीं पिल्लें जन्मकाळीं आंधळीं केशहीन, पंगू असतात त्यांचीं अंडीं आकारानें लहान असतात. उलट मोठ्या आकाराच्या अंड्यांपासून जन्माला

येणारीं पिल्लें जन्मतः केसांनीं पूर्ण आच्छादित व चलनवलनादि व्यापारक्षम असतात. शिवाय अंडीं पंखाखालीं घेऊन उववावयाचीं असतात यामुळें जितकीं अंडीं आच्छादलीं जातील त्यापेक्षां त्यांची संख्या अधिक असूं शकत नाहीं. तसेंच उष्ण प्रदेशांतील पक्षी त्याच जातीच्या थंड प्रदेशांतील पक्षांपेक्षां कमी अंडीं घालतात; आणि अप्रौढ पक्षी पूर्ण वयांत आलेल्या पक्षांपेक्षां संख्येनें अधिक पण आकारानें बारीक अंडीं घालतात.

बहुतेक पक्ष्यांचीं अंडीं आकार, रंगरूप व घटनेनें सारखींच असल्यामुळें तीं कोणा पक्षीविशेषाचीं आहेत हें ओळखणें फार कठीण असतें. मेगॅपोडसखेरीज सर्व पक्षी आपलीं अंडीं उबवितात. हा काळ कमींत कमी १३ दिवसांचा–पॅसेराइन पक्ष्यांचा–असतो. ऱ्हीआ व स्ट्रुथिओ पक्ष्यांचा ५। ६ आठवडे असतो; आणि कॅसोवेरी वगैरे पक्ष्यांचा ८ आठवडे असतो.

स स्त न प्रा ण्यां चीं अं डीं.—सस्तन प्राण्यांमध्यें एचिडना व प्लेटिपस या प्राण्यांच्या अंड्यांत पिवळा बलक (योल्क) बराच असतो. एचिडनाचीं अंडीं प्रत्येक वेळीं दोन असतात. व तीं चिमणीच्या अंड्याएवढीं मोठीं असतात. त्यांच्या कवचीचा रंग पांढरा असतो. प्लेटिपस पक्षी दोन ते चार अंडीं दर वेळीं घालतो व तीं अंडीं एचिडनाच्या अंड्यांसारखींच असतात. मार्सुपियल पक्ष्यांचीं अंडीं वरील दोन्ही पक्षांपेक्षां लहान असतात; पण त्यांत पिंवळ्या बलकाचें प्रमाण अधिक असतें.

स र प ट णा ऱ्या प्रा ण्यां चीं अं डीं.—सर्व प्रकारच्या सरपटणाऱ्या प्राण्यांच्या अंड्यांत पिंवळा बलक बराच पुष्कळ असतो, व त्याचें कवच चांगलें कठिण असतें. कांसव व मगर यांच्या अंड्यांचें घटकद्रव्य चुनखडीसारखें असतें. सर्व सरपटणाऱ्या प्राण्यांचीं अंडीं पांढरीं किंवा पिंवळट रंगाचीं असतात, व त्यांची संख्या पक्षांच्यापेक्षां नेहमीं जास्त असते. या प्राण्यांत अंडीं घालण्याच्या मध्यंतरीचा काल पक्षांच्या मानानें बराच मोठा असतो, व हे प्राणी आपलीं अंडीं उबवीत बसत नाहींत. मगरी दर वेळीं २० ते ३०पर्यंत अंडीं घालते. समुद्रांतील कांहीं जातीच्या कांसवीणी दर वेळेस दोनशेंपर्यंत अंडीं घालतात.

चोपई, सरडा, पाल इत्यादि जातींच्या प्राण्यांचीं अंडीं पांढरीं किंवा पिंवळट असतात, व त्यांपैकीं कांहींचीं कवचें मऊ असतात इतकेंच नव्हे तर आंतील प्राणी वाढत जातो त्याप्रमाणें तीं अंडींहि कांहीं अंशीं मोठीं होतात. या प्राण्यांच्या अंड्यांची संख्या बारापासून तीसपर्यंत असते. या प्राण्यांचा आणखी विशेष हा आहे कीं, कांहींचीं अंडीं बाहेर न येतां आंतच वाढतात व कधीं कधीं आंतच फुटून एकदम पिलें बाहेर येतात.

बहुतेक जातींचे सर्प अंडीं घालतात पण कांहीं स्थलचर सर्प एकदम पिलेंच प्रसवतात. यांच्या अंड्यांची संख्या बहुधा वीस ते तीस असते, पण कांहीं जाती शंभरपर्यंतहि अंडीं घालतात. सरपटणाऱ्या जातींपैकीं बऱ्याचशा जातींचे प्राणी आपलीं अंडीं पुरून ठेवतात.

उ भ य च र प्रा ण्यां चीं अं डीं.—उभयचर प्राण्यांच्या अंड्यांत आकार, संख्या वगैरे बावतींत वरीच विविधता आढळते. यांपैकीं कांहीं प्राण्यांचीं अंडीं एक प्रकारच्या धाग्यांनीं एकमेकांशीं बद्ध झालेलीं असतात. अवयवहीन व पुच्छहीन अशा कांहीं जातींचे उभयचरप्राणी अंड्यांऐवजीं एकदम पिलेंच प्रसवतात. अशा पिलांची संख्या बहुधा थोडी असते. तथापि कांहींची संख्या पंधरापर्यंत असते व कांहींची पन्नासपर्यंतहि असते. संख्या जितकी जास्त त्या मानानें पिल्लें लहान व अशक्त असतात. बहुतेक उभयचर प्राण्यांचीं पिल्लें जन्मकाळीं बेडकीच्या पोरासारखीं (टॅडपोलसारखीं) असतात. तथापि बऱ्याच जातीचे प्राणी अशीं अंडीं घालतात कीं त्यांत अन्नद्रव्य बरेंच असतें. व तें पिलांना आद्यावस्था उलटून जाईपर्यंत पुरतें व परिणत स्वरूप पावूनच पिलें अंड्यांतून बाहेर पडतात.

पुच्छहीन उभयचर प्राण्यांच्या (बारीक व मोठ्या जातीच्या बेडकांच्या) अंड्यांची संख्या व त्यांची पुढील व्यवस्था या बाबतींत फारच आश्चर्यकारक विविधता असते. मोठ्या जातींचे स्त्रीबेडूक दर वेळीं सात हजारपर्यंत अंडीं घालतात व हीं अंडीं दोन लांब माळांच्या स्वरूपांत बाहेर पडतात. उलटपक्षीं कांहीं जातींचे बेडूक फारच थोडीं घालतात व त्यांत अन्नमय द्रव्य इतकें असतें कीं, पिलांची आद्यवस्था अंड्यांतच पुरी होऊन नंतर तीं बाहेर पडतात. पुष्कळ बेडूक अंडीं पाण्याबाहेर व मोठ्या चमत्कारिक ठिकाणीं घालतात.

मा शां चीं अं डीं—माशांच्या अंड्यांत संख्या व आकार या दोन्ही बाबतींत फारच मोठी विविधता असते. मऊ व कठिण दोन्ही प्रकारच्या हाडांच्या माशांत अंड्यांऐवजी प्रत्यक्ष पिलें प्रसवणाऱ्या कांहीं जाती आहेत.

माशांच्या अंडीं घालण्याच्या संख्येंत फार कमजास्तपणा असतो. कांहीं जाती फारच थोडीं व कांहीं पुष्कळ अंडीं घालतात. पण सर्व जातींत असा साधारण नियम दिसतो कीं, माशाचें वजन व वय जितकें अधिक तितकी अंड्यांची संख्या अधिक असते. उदाहरणार्थ सालमन जातीचा एक पौंड वजनाचा मासा १००० अंडीं घालतो आणि पंधरा पौंड वजनाचा सालमन मासा १५००० अंडीं घालतो. स्टर्जेऑन मासा सुमारें ७०,००,००० अंडीं घालतो. हेरिंग मासा ५०००० घालतो, टर्बोट मासा १,४३,११,००० सीलमासा १,३४,००० आणि पर्चमासा २,८०,००० अंडीं घालतो. आणि थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अंडीं नाश पावण्याचें प्रमाण जितकें अधिक तितकी अंड्यांची संख्या

अधिक असते. माशांच्या निकृष्ट जातींपैकीं लॅम्प्रे नांवाच्या माशांचीं अंडीं फारच लहान असतात आणि हॅग-फिश जातीचीं अंडीं बरींच मोठीं व नळकंड्याच्या आकाराचीं ( सिलिंड्रिकल ) व एकमेकाला बारीक हुकानीं जोडलेलीं असतात.

मृ दु का य गो ग ल गा य व गै रे प्रा ण्यां चीं अं डीं— मृदुशरीरी प्राणी, कवचधारी ( खेंकडे यासारखे ) प्राणी, व किडे यांच्यामध्यें पुष्कळ निरनिराळ्या प्रकारचीं अंडीं असतात. त्यांत विशेष विविधता मृदुशरीरी प्राण्यांच्या अंड्यांत असते. मौलिपाद ( सेफालोपोडा ) प्राण्यांचीं अंडीं विशेष पाहण्यासारखीं असतात. स्किड जातीच्या प्राण्यांचीं अंडीं नळीच्या आकाराच्या वेष्टनांत बसलेलीं असून अशीं वेष्टनें कित्येक शेंकडे असतात. एका वेष्टनांत २५० अंडीं असून अशीं अनेक वेष्टनें मिळून एक झुबका बनलेला असतो. व त्यांत एकंदर सर्व मिळून अंडीं ४०००० पर्यंत असतात. याच्याविरुद्ध प्रकार कटलफिश नांवाच्या प्राण्याचा. म्हणजे या प्राण्याचीं अंडीं प्रत्येक स्वतंत्र असून प्रत्येकाचें वेष्टन निरालेंच असतें. व तीं सर्व मिळून त्यांचा द्राक्षांच्या घडा- प्रमाणें एका दांड्याला जोडून घड बनलेला असतो. अष्टपाद ( ऑक्टोपस ) प्राण्यांचीं अंडीं फारच लहान असून तीं सर्व एका देंठाला चिकटून त्यांचा एक गोळा बनलेला असतो.

एकशकलमय (यूनिव्हाल्व्ह) मृदुकाय प्राण्यांचीं अंडींहि वरच्याप्रमाणें विविध प्रकारचीं असतात. कवचाच्या गोगल- गाईचीं अंडीं मोठीं असून त्यांचें बाह्य कवच इतकें लवचिक असतें कीं, अंडें दगडावर आपटल्यास त्याला कित्येक इंच उंच उलट उशी येते. दुसऱ्या एका जातीच्या गोगलगाईचीं ( बुलिमस ) अंडीं खबुतराच्या अंड्यांहून मोठीं असतात. शंखें वगैरे ( व्हेल्क ); प्राण्यांचीं अंडीं वेष्टनांत बसलेलीं असून अशीं अनेक शेंकडों अंडीं एकत्र मिळून त्यांचा वाटोळा गोळा बनलेला असतो. जेव्हां हीं अंडीं फुटून पिलें बाहेर पडतात त्या वेळीं त्यांचा आपसांत जीवनार्थ कलह सुरू होतो. आणि त्यांपैकीं जीं पिलें सर्वांत अधिक शक्ति- मान् असतील तेवढींच इतरांनां खाऊन टाकून स्वतः जिवंत राहतात.

मृदुकाय प्राण्यांतहि इतर प्राणीवर्गांतील सामान्य नियम आढळतो; तो हा कीं, ज्या प्राण्याचीं अंडीं नष्ट होण्याचें भय अधिक तितका तो प्राणी अंडीं अधिक घालतो. उदाहरणार्थ ऑइस्टर नांवाचा प्राणी दरसाल सुमारें ६,००,००,००० अंडीं घालतो. उलट ज्या प्राण्याचीं अंडीं नाश पावण्याचा संभव कमी त्याचीं अंडीं मोठालीं व संख्येनें कमी असतात. उदाहरणार्थ बुलिमस प्राणी होय.

क व च धा री प्रा णी ( क्रस्टासिआ )—या जातीच्या प्राण्यांचीं अंडीं स्त्रीशरीराच्या खालच्या बाजूला असलेल्या पोकळ भागांत राहतात. व मादी तीं सदोदित आपल्याबरोबर वागवते. स्किलास वगैरे जातीचे प्राणी आपलीं अंडीं कचऱ्याच्या ढिगांत घालतात. त्यांत पुष्कळ जातींच्या प्राण्यांचीं अंडीं लहान असतात व त्यांतून निघणारी पिलें, दिसण्यांत प्रथम आपल्या आईबापापाहून फार भिन्न स्वरूपाचीं असतात. खोल समुद्रांत किंवा गोड्या पाण्यांत राहणाऱ्या या जातीच्या प्राण्यांचीं अंडीं मोठीं असतात आणि त्यांतून निघणारीं पिलें प्रथमपासूनच बहुतेक आईबापासारखींच असतात.

की ट क ( इन्सेक्ट्स )—कीटकांचीं अंडीं अगदीं बारीक असतात खरीं, तरी त्यांत विविधता पुष्कळ असते. असल्या अंड्यांचे पुंजके जमीनीवर किंवा झाडाच्या पानांवर किंवा पाण्यांत घातलेले पहावयास मिळतात. क्यूलेक्स या वर्गांत मोडणारे चिलट, डांस वगैरे प्राणी पाण्यावर अंडीं घालतात. त्यांचा आकार नळकंड्यासारखा असुन त्यांचे पुंजके पाण्या- वर तरंगत असतात.

अपृष्ठवंशी प्राण्यांपैकीं इतर बहुतेक प्राणी आपलीं अंडीं पाण्यावर किंवा पाणथळ जागेंत घालतात

अपृष्ठवंशी प्राण्यांपैकीं कांहीं जातींतील व्यक्ती दोन प्रका- रचीं अंडीं घालतात. डॅफनिया नांवाचा एक कवचधारी प्राणी उन्हाळ्यांत एक प्रकारचीं व पुढें हिंवाळ्यांत निराळ्या प्रका- रचीं अंडीं घालतो. त्यांत उन्हाळ्यांतल्यापेक्षां हिंवाळ्यांतील अंडीं आकारानें मोठीं, रंगानें अधिक काळीं, अधिक जाड कवचांचीं असतात. हीं अंडीं दहा वर्षेंपर्यंतहि टिक- तात.

खा ण्या चीं अं डीं—मांसाचे फायदे आपल्या पाळीव प्राण्यांच्या अंड्यांमध्यें जितके पूर्णपणें एकत्र झालेले अस- तात, तितके दुसऱ्या कोणत्याच पदार्थांत झालेले नसतात. अंड्यांतील गर्भस्थ पिवळा व त्यासभोंवतालचा पांढरा भाग यांच्यामध्यें मुख्यत्वें अल्ब्युमेन गर्भस्थ पदार्थच असतात. पिवळ्यामध्यें केसीन व अल्ब्युमेन यांचें मिश्रण असतें. पांढऱ्यामध्यें गंधकयुक्त द्रवरूप अल्ब्युमेन असतो व अल्ब्यु- मेन गर्भस्थ पदार्थ असून त्यांतहि पुष्कळ गंधक असतो. पिवळ्या भागपेक्षां पांढऱ्यामध्यें जलांश अधिक असतो आणि पांढऱ्यापेक्षां पिवळ्यामध्यें चरबी व अल्ब्यू- मेन गर्भस्थ पदार्थ पुष्कळ असतात. तसेंच पिवळ्या भागाच्या तेलांत ओलीन पुष्कळ असतो. अंडें कच्चें खाल्लें असतां त्यांतील अल्ब्युमेनचा द्रव होण्यापूर्वी तो अंशतः घट्ट होतो. यासाठीं अंडें थोडें उकळलेलें असलें म्हणजे तें तावडतोब पचनास योग्य होतें. कच्च्या अंड्यांतील सारक गुण अंडें उकळल्यानें पालटतो. यासाठीं बद्धकोष्ठाच्या माणसानें उकळलेलें अंडें न खातां कच्चेंच खाणें चांगलें.

अंड्यावरील कवचीला अनेक सूक्ष्म छिद्रें असतात. त्यांतून हवा व ओलसरपणा आंत शिरून अंडीं नासतात. तसेंच लांबच्या प्रवासांत आदळआपट झाल्यामुळें किंवा जोरानें हिसकल्यामुळें अंड्यांतील पांढरा भाग व बिल यांचीं सूक्ष्म

तंतूंचीं बंधनें तुटून ते पदार्थ एकमेकांत मिसळतात; व अंडें नासूं लागतें. यासाठीं अंडीं चांगलीं टिकविण्याकरितां त्यांना वरून तेल किंवा चरबी माखून ठेवतात अगर सुक्या कोंड्यांत किंवा लांकडाच्या भुशांत ठेवतात. बारीक टोंक खालीं करून अंडीं ठेवलीं म्हणजे बिल अल्ब्युमेनमध्यें लोंबकळत राहतो व त्यानें लपेटला जातो. इतर रीतीनें ठेविल्यास बिल कवचीला चिकटून पृथक्करण सुरू होतें व अंडें नासतें. अंडीं राखून ठेवण्याची अगदीं साधी रीत म्हणजे तीं एक मिनिटभर उकळावीं. म्हणजे कवचीला लागलेला अल्ब्युमेन घन होऊन आंतील भागाचें रक्षण होतें.

**अंडोरा.**—फ्रान्स आणि स्पेन यांच्या सरहद्दीवर आणि पूर्व पीरिनीज पर्वताच्या द्वीपकल्पाकडील भागांत हें एक लहानसें, तटस्थ, स्वयंशासित आणि अर्धस्वतंत्र ( सेमी इंडिपेन्डन्ट )असें राज्य आहे. याचें क्षेत्रफळ १७५ चौरस मैल असून लोकसंख्या सरासरी ( १९०० ) ५५०० आहे. याच्या सभोंवार डोंगर आहेत व मध्यें एक खोरें आहे. एकदां येथें दाट अरण्य होतें व मूर लोक दाट अरण्याला ‘ अलडरी असें म्हणतात. त्यामुळेंच त्याचें नांव अंडोरा हें पडलें.

सामान्यतः येथील हवा थंड आहे; पण थंडीच्या दिवसांत ती अतिशय कडक असते. बहुतेक जमीन कुरणांनीं व्यापलेली आहे. कांहीं भागांत धान्य, बटाटे, फळें आणि तंबाखू यांची लागवड होते. दूध, लोणी, कच्ची चामडीं, डुकराचें मांस आणि लोंकर यांची मुख्यत्वेंकरून फ्रान्स देशांत निर्गत होते. स्थानिक धंदे फार जुन्या पद्धतीचे आहेत. डोंगरांत लोखंडाच्या आणि शिशाच्या खाणी आहेत. पण द्रव्य, कोळसा आणि नेआण करण्यास चांगले रस्ते नसल्यामुळें लोक खाणी खणण्याच्या भरीस पडत नाहींत १९०४ सालीं फ्रान्स आणि स्पेन यांनीं एक्सपासून रिपोलपर्यंत आगगाडी बांधण्याचें ठरविलें.

येथील लोक सशक्त आणि बांधेसूद असून स्वतंत्र बाण्याचे, साधे आणि वागणुकींत फार कडक असे आहेत. हे सर्व रोमन कॅथोलिक पंथाचे आहेत. बहुतेक लोक स्पॅनिश भाषेची कॅटालन पोटभाषा बोलतात. येथील चालीरीति व संस्था अद्यापि जुन्याच ( मध्ययुगीन ) आहेत. सर्व कारभार चालविणारी २४ सभासदांची एक कौन्सिल जनरल नांवाची सभा आहे. तींतील सभासदांची निवडणूक सर्व कुटुंबांतील मुख्य पुरुष करतात. फ्रान्सनें नेमलेला एक आणि उरगेल येथील बिशपनें नेमलेला एक असे दोन अर्धवट लष्करी अधिकारी ( व्हिगिएर नांवाचे ) सरंजामी फौजेची व्यवस्था पाहतात. यांच्याकडेच फौजदारी न्यायाचें काम असतें दिवाणी खटले चालविण्याचें काम यांनीं नेमलेल्या लवादांकडे ( आल्डरमेन ) असतें. इतर अधिकारी निवडलेले असतात.

१२७८ त येथील मुख्य सत्ता उरगेलचे बिशप आणि फॉइक्स येथील कौंट यांच्यामध्यें सारखी वाटून देण्यांत आली होती. हल्लीं ती फ्रेंच सरकार आणि उरगलेचा बिशप या दोघांच्याकडे गेली आहे. यांच्यामधील चुरशीमुळें या संस्थानाची स्वतंत्रता अद्याप टिकली आहे. या संस्थानास फ्रान्स व स्पेन या दोन्ही देशांसहि वर्षास ४० पौंड खंडणी द्यावी लागते.

**अंडोल.**—हैद्राबाद संस्थान. मेदक जिल्ह्याच्या पश्चिमेकडील तालुका. क्षेत्रफळ ४५०चौरस मैल. लोकसंख्या(१९११) ११३३२०.या तालुक्यांत१७२ खेडीं आहेत. पैकीं३४जहागीरं आहेत. या तालुक्यांत इ. स. १९०५सालीं टेकमाळ तालुक्याचा अंतर्भाव करण्यांत आला. वरील आंकड्यांत त्या तालुक्याचाहि समावेश केला आहे. त्या तालुक्याचें क्षेत्रफळ१६२ चौरस मैल व ३४४२५ लोकसंख्या होती. इ. स. १९०१ सालीं जमीनमहसूल ३.५ लाख रुपये होता.

**अंडोला.**—हैद्राबाद संस्थान. गुलबर्गा जिल्ह्याचा दाक्षिणेकडील तालुका. क्षेत्रफळ ७०९ चौरस मैल. लोकसंख्या ( १९११ ) ८८५३५. या तालुक्यांत १४९ खेडीं असून पैकीं ३० जहागिरी आहेत. इसवी सन १९०१ सालीं जमीनमहसूल २.१ लाख रुपये होता. फेरोजाबादचा पैगा तालुका याच्या उत्तरेस असून ३५०३५ लोकवस्ती आहे. यांत २९ खेडीं व एक मोठें गांव असून क्षेत्रफळ ९६ चौरस मैल आहे.

**अँड्रासी ज्युलियस**—( १८२३—१८९० ). हा हंगेरियन मुत्सद्दी कॅलोरी अँड्रासी याचा मुलगा होय. हा १८२३ सालीं मार्चच्या ८ व्या तारखेस कस्सा येथें जन्मला. आपल्या बापाप्रमाणेंच हाहि उदारमतवादी होता. ऐन तारुण्यांतच तो राजकारणाच्या चळवळींत भाग घेऊं लागला. थीसीस नदीला पाटबंधारा घालण्याच्या प्रश्नासंबंधीं जी कमिटी स्थापन झाली होती, त्या कमिटीचा हा अध्यक्ष होता. या वेळीं त्यानें आपली योग्यता निदर्शनास आणल्यामुळें काउंट इस्तवान झेचेनी याचें त्याच्याकडे लक्ष वेधलें. कोसूथनें काढलेल्या पत्रामध्यें तत्कालीन सत्ताधीश पक्षाच्याविरुद्ध त्यानें कडक लेख लिहिण्यास सुरुवात केली. व त्यामुळें त्याचें नांव लोकांपुढें येऊन १८४८ च्या निवडणुकींत तो जहालपक्षातर्फे डायेट उर्फ राष्ट्रसभेंत निवडून आला. त्या ठिकाणींहि त्यानें लोकपक्षाची बाजू चांगल्या तऱ्हेनें राष्ट्रसभेपुढें मांडली. त्यामुळें त्याची देशभक्त पुढाऱ्यांमध्यें गणना होऊं लागली. क्रोट्स लोकांनीं ज्यावेळीं हंगेरीवर स्वारी केली त्यावेळीं त्यानें आपलें नांव हंगेरियन सैन्यांत दाखल करून, १८४८ सालीं पाकोझ श्वेखाट येथें झालेल्या लढाईंत चांगला पराक्रम गाजविला. या युद्धाचा विकाल लागण्यापूर्वी थोडे दिवस हंगेरियन सरकारनें त्याला, वकील या नात्यानें तुर्कस्तान येथें पाठविलें. १८५१ मध्यें हंगेरीमध्यें जें बंड झालें त्यांत हा सामील असल्याच्या आरोप

येऊन ऑस्ट्रियन सरकारनें त्याला हद्दपारीची शिक्षा ठोठाविली. तो जवळ जवळ दहा वर्षे फ्रान्समध्यें राहिला. या अवधींत त्यानें फ्रान्समधील शासनपद्धतीचा व तत्कालीन यूरोपियन राजकारणाचा खोल अभ्यास केला. त्याला निरनिराळीं आमिषें दाखवून ऑस्ट्रियन सरकारनें व हंगेरीतील पुराणमतवादीपक्षानें, आपल्या बाजूला ओढण्याचा प्रयत्न केला होता व त्याची हद्दपारीची शिक्षा रद्द करण्याचें कबूल केलें होतें. पण अँड्रासी यानें तीं सर्व आमिषें झुगारून दिलीं व माफी मागण्याचें नाकारलें. अशा स्थितींत हंगेरींत पुन्हां परत येणें म्हणजे जरा धाडसाचेंच होतें. पण तेवढेंहि साहस करून तो इ. स. १८५८ मध्यें हंगेरींत परत आला. तेथें येतांच डीकच्या नेतृत्वाखालीं जो लोकपक्ष स्थापन झाला होता त्याला जाऊन तो मिळाला. पुढें १८६५ मध्यें ज्या निवडणुकी झाल्या त्यांत त्याची निवडणूक होऊन त्याचा डायेटमध्यें प्रवेश झाला. एवढेंच नव्हे तर डायेटचा उपाध्यक्ष म्हणूनहि त्याची निवडणूक झाली. आस्ट्रिया व हंगेरी यांच्यामधील भानगडींच्या प्रश्नांची विल्हेवाट लावण्याकरितां जी संमिश्र कमिटि नेमली होती तिचा त्याला अध्यक्ष करण्यांत आलें. हंगेरी सरकारची वकिलांत आस्ट्रियन दरबारीं असावी ही कल्पना त्यानेंच प्रथम लोकांपुढें मांडली. आस्ट्रियन बादशहानें त्याला मुलाखतीहि दिली. त्या मुलाखतींत हंगेरींत जबाबदार प्रतिनिधी नेमण्यांत यावेत असें त्यानें बादशहाला सांगितलें.

१८६७ मध्यें हंगेरीच्या राजानें त्याला हंगेरीचा प्रधान नेमलें. आपल्या करारी पण गोड स्वभावानें व वक्तृत्वानें त्यानें पार्लमेंटमध्यें आपली छाप सर्वांवर पाडली. तरी पण लोकपक्षाचा पुढारी जो डीक त्याचें वजन अलौकिक असल्यानें त्याच्यापुढें याची विशेष मात्रा चालत नसे. अँड्रासीनें आपल्याकडे परराष्ट्रीय व लष्करीखातीं ठेविलीं होतीं. हंगेरीच्या सरहद्दीवरील मुलुखाची व्यवस्था त्यानें चोख रीतीनें ठेविली होती.

१८७० मध्यें फ्रँकोजर्मन युद्ध उपस्थित झालें. या युद्धांत आस्ट्रियानें पूर्णपणें तटस्थवृत्ति स्वीकारावी असें अँड्रासीचें मत होतें व तसें त्यानें राष्ट्रसभेंत बोलूनहि दाखविलें. १८७१मध्यें त्याला चॅन्सेलरची जागा मिळाली. या जागेवर असतांना त्यानें फारच उत्कृष्ट प्रकारची कामगिरी बजावली. परराष्ट्रीय राजकारणांत आस्ट्रियाला विशेष वाव नव्हता, पण अँड्रासीनें यूरोपीय राजकारणांत आस्ट्रियाला महत्त्वाचें स्थान प्राप्त करून दिलें. १८७५ सालीं बोस्नियामध्यें जे दंगे धोपे झाले त्यावेळीं बर्लिन, सेंटपीटर्सबर्ग व व्हिएन्ना दरबारनीं खल करून आपलें पूर्वेकडील प्रदेशासंबंधींचें धोरण कोणतें राखावयाचें याची चर्चा केली, व त्यांत अँड्रासीनें प्रामुख्यानें भाग घेतला होता. वरील तिन्ही राष्ट्रांतर्फे एक खलिता तयार करून तो तुर्कस्तानमधील आस्ट्रियन वकीलाकडे पाठविला. पुढें रशिया व तुर्कस्तान या राष्ट्रांमध्यें ज्यावेळीं युद्ध सुरू झालें त्यावेळीं रशियाशीं त्यानें असा करार केला कीं रशियाचा जर या युद्धांत विजय होईल तर तुर्कस्तानसंबंधींची व्यवस्था करतांना आस्ट्रियाच्या हितसंबंधांनां कोणत्याहि रीतीनें बाध येईल अशी व्यवस्था रशियानें अंमलांत आणूं नये. १८७८मध्यें बर्लीन येथें यूरोपियन राष्ट्रांची जी परिषद भरली, तींत, आस्ट्रियातर्फे अँड्रासी हा त्या परिषदेला हजर होता. तेथें त्यानें पूर्वेकडील प्रदेशांत द्विसत्ताक राज्यपद्धति असावी अशी सूचना आणली व ती मंजूरहि करून घेतली. लगेच त्यानें बोस्निया व हर्झेगोव्हिना प्रांत आपल्या ताब्यांत आल्याचें जाहीर करून टाकलें. पण खुद्द हंगेरींतील लोक या गोष्टीला विरुद्ध होते. त्यामुळें त्याला आपल्या जागेचा राजीनामा देणें भाग पडलें. तत्पूर्वी म्हणजे ७ आक्टोबर १८७९ रोजीं त्यानें जर्मनीशीं तह करून, आस्ट्रियाच्या परराष्ट्रीय हितसंबंधांनां एक प्रकारें बळकटी आणिली.

प्रधानकीच्या जागेचा राजीनामा दिल्यानंतर, सार्वजनिक कार्यांत व खुद्द राष्ट्रसभेंतहि तो पुष्कळ भाग घेत असे. मध्यंतरीं त्याच्या लोकप्रियतेला थोडी फार ओहोटी लागली होती. पण त्यानें लोकप्रियता पुन्हां संपादन केली. तो १८९० सालीं मरण पावला. त्याचें मरण म्हणजे राष्ट्रीय आपत्ति होय असें सर्वांना वाटलें. युरोपीयन राजकारणांत त्यानें आपलें नांव अजरामर करून ठेवलें. तो उदार मताचा व चतुर मुत्सद्दी होता. त्याची वर्तणूक फारच मनमिळाऊ असे. हंगेरियनराष्ट्र निर्माण करण्यांत डीकच्या खालोखाल याचाच नंबर लागतो. 'परमेश्वरी कृपाप्रसादानें आपल्याला अँड्रासी सारखा मुत्सद्दी लाभला आहे' असें डीक हा नेहमीं म्हणत असे, व त्याचे शब्द अक्षरशः खरे होते. अँड्रासीला दोन मुलगे व एक मुलगी अशीं तीन अपत्यें होतीं. हंगेरियन राजकारणांत या दोन्ही मुलांनीं महत्त्वाची कामगिरी बजाविली.

[ संदर्भग्रंथ—मॅनो कॉनी—रिकलेक्शन्स ऑफ कौंट अँड्रासी ( बुडापेस्ट १८९१ ); बेंजामिन काले—मेमॉयर बुडापेस्ट १८९१ ].

**अँड्रिया डेल सार्टो**—(१४८७–१५३१.) हा प्रसिद्ध चित्रकार फ्लॉरेन्समधील ग्वालफोंडा या गांवीं जन्मास आला. त्याचा बाप शिंप्याचा धंदा करीत असे म्हणून त्याला सार्टो हें आडनांव पडलें. आपल्या वयाच्या सातव्या वर्षीच तो सोनारकाम शिकूं लागला. पण त्याला त्यांत विशेष गोडी लागली नाहीं. त्याला चित्रकलेचा अतिशय नाद असल्यानें सोनारकीचा धंदा सोडून त्यानें गियन बॅरीले या एका साधारण चित्रकाराच्या हाताखालीं नोकरी धरली. बॅरीले याला अँड्रियाचे अंगीं विशेष गुण निदर्शनास आल्यामुळें त्यानें पीरो द कोसिमो याच्याजवळ त्याची शिफारस करून त्याच्या हाताखालीं अँड्रियाला नोकरी लावून दिली.

पीरोपाशीं असतांना लीओनार्डो द व्हिन्सी व मिचेलअँजेलो यांच्या नक्षीकामांची व चित्रांची त्याला पूर्ण माहिती मिळाली. नंतर आपला व्यवसायबंधु फ्रान्सिया बिजियो याच्या सहाय्यानें त्यानें स्वतंत्र धंदा सुरू केला. कांहीं काळपर्यंत त्यांनीं अशा रीतीनें धंदा सुरू केल्यावर पुढें त्यांचें एकमेकांशीं पटेनासें होऊन अँड्रिया हा त्याच्यापासून वेगळा झाला. पुढें 'सर्व्हाइंटिस ब्रदरहुड' नांवाच्या एका संस्थेनें फिलिप्पो बेनिझी नांवाच्या एका सर्व्हाईट साधूच्या चरित्रांतील महत्त्वाच्या गोष्टींचीं निदर्शक अशीं तीन गिलाव्यांतील चित्रें काढण्यासाठीं अँड्रियाला सांगितलें. अँड्रियानें हीं तीन्ही चित्रें सात आठ महिन्यांत काढून टाकलीं. फिलिप्पो साधू एका रक्तपीति झालेल्या माणसाला आश्रय देतो आहे असें चित्र, द्यूत खेळणाऱ्यांनां तो धिःकारतो आहे असें एक चित्र व भुतानें पछाडलेल्या एका मुलीला तो भुतापासून सोडवितो आहे हें चित्र अशीं तीं तीन चित्रें होतीं. त्यांपैकीं शेवटचीं दोन्हीं चित्रें फारच चांगलीं साधलीं आहेत. याशिवाय या साधूच्या चरित्रांतील गोष्टींचीं निदर्शक अशीं आणखी दोन चित्रें त्यानें काढलीं. यामुळें त्याची प्रसिद्धि झाली. रफायलच्या खालोखाल त्याच्या इतका दुसरा चित्रकार नाहीं अशी त्याची मध्यइटलीमध्यें ख्याति झाली. यावेळीं त्याचें वय अवघें तेवीस वर्षांचें होतें. एकदां रंगिवलेल्या चित्रावर पुन्हां हात मारून त्यांत फरक करणें त्याला आवडत नसे व तसा प्रसंग येऊं नये म्हणून तो फार खबरदारी घेत असे. त्याचीं चित्रें अगदीं साधीं पण सुरेख असत. यामुळें सर्व्हाईट संस्थेनें त्याच्याकडे आणखी दोन चित्रांचें काम सोंपविलें. हीं दोन चित्रें 'नेटिव्हिटी ऑफ व्हर्जिन' व 'प्रोसेशन ऑफ मगी' हीं होत. या चित्रांची जितकी वाहवा झाली तितकी त्याच्या इतर कोणत्याहि चित्रांची झाली नाहीं. याशिवाय सुळावर चढलेल्या ख्रिस्ताचें डोकें, बॅप्टिस्ट हा अरण्यामध्यें उपदेश करतो आहे असा प्रसंग इत्यादि चित्रेंहि त्यानें याच सुमारास काढलीं. १५१६ मध्यें 'पायेटा' व 'मॅडोना' हीं दोन चित्रें त्यानें फ्रेंचांच्या दरबारीं पाठवून दिलीं व तेथें त्यांची फारच प्रशंसा झाली. फ्रान्सचा राजा फ्रान्सिस हा कलेचा शोकी असल्याकारणानें त्यानें अँड्रियाला फ्रान्सला बोलावलें, व त्याला चांगलें वेतन देण्याचें कबूल केलें. पॅरिसमध्यें तो कांहीं काळ होता पण त्याच्या बायकोची त्याला इटलीस येण्याबद्दल निकड लागल्यानें त्याला पॅरिसहून परत यावें लागलें. राजानें त्याला पुन्हां थोड्या दिवसांत परत पॅरिसला येण्याच्या अटीवर जाऊं दिलें व जातांना इटलींतील सुंदर चित्रें खरेदी करण्यासाठीं त्याच्यापाशीं पुष्कळ पैसे दिले. पण पैसे हातांत पडल्यावर तो पॅरिसला परत न येतां त्यानें त्या पैशांवर आपलें स्वतःचें घर फ्लॉरेन्समध्यें बांधविलें. हे कळतांच फ्रान्सिसला फार राग आला, पण त्याला शासन करण्याच्या भानगडींत तो पडला नाहीं.

अँड्रिया हा एक चैनी माणूस होता. फ्लॉरेन्समध्यें असतांना त्यानें रस्टिसीप्रभृति आपल्या व्यवसायबंधूंची चांगली ओळख करून घेतली व त्यांनीं स्थापन केलेल्या 'कंपनी ऑफ दि केटल' व ट्रोवेल या क्लबांत आपलें नांव दाखल केलें. ल्युक्रेझिया नांवाच्या एका तरुणीवर त्याचें प्रेम बसलें होतें व त्याप्रमाणें तिच्याशीं १५१२ मध्यें त्यानें लग्न केलें. ही तरुणी फारच सुंदर होती. तिच्या चेहेऱ्यावरून त्यानें मॅडोना वगैरेंचीं चित्रें काढलीं. तिच्यावर त्याचें फार प्रेम असे, पण ती फार द्वाष्ट होती असें विसारी व अँड्रियाचे इतर चरित्रलेखक म्हणतात.

१५२० मध्यें त्यानें फ्लॉरेन्स येथें आपला धंदा पुन्हां सुरू केला. स्कॅल्सोच्या मठांत त्यानें 'फेथ' (श्रद्धा) व 'चॅरिटी' (परोपकार) हीं दोन चित्रें काढलीं. त्यानंतर, हेरोडियसच्या मुलीचा नाच, बॅप्टिस्टचा शिरच्छेद, इत्यादि चित्रें त्यानें तयार केलीं. १५२५ मध्यें सर्व्हाईटिसांच्या मठांत त्यानें 'मॅडोना डेल सॅको' हें उत्कृष्ट चित्र काढलें. त्याच्या सर्व चित्रांत हें चित्र फारच नांवाजण्यांत येतें. १५२६ मध्यें स्कल्सोच्या मठांत 'बॅप्टिस्टचा जन्म' हें चित्र त्यानें तयार केलें. त्यानंतर १५२७ मध्यें त्यानें सॅल्व्ही येथें 'अंत्यप्रभुभोजन' हें चित्र काढलें. हेंहि चित्र फार सुरेख साधलेलें आहे. हेंच त्याचें शेवटचें चित्र होय. १५३१ मध्यें फ्लॉरेन्समध्यें सांसर्गिक रोगाची साथ आली. त्यांत अँड्रिया सांपडल्यामुळें त्याचा अंत झाला. त्याचें वय अवघें ४३ वर्षांचें होतें. त्याला सर्व्हाइटिसच्या उपासनामंदिरांत पुरण्यांत आलें.

अँड्रियानें वर उल्लेख केलेल्या चित्रांशिवाय पुष्कळच चित्रें काढलीं. व तीं चित्रें निरनिराळ्या देशांतील अजबखान्यांत ठेवण्यांत आलीं आहेत. अँड्रियाच्या अंगीं कल्पकतेचा गुण नव्हता, पण एखादें चित्र तूं अशा प्रकारें काढ असें सांगितलें असतां, मग मात्र तें चित्र तो अत्यंत कुशलतेनें व हुबेहूब काढीत असे. चित्रांतील सर्व भाग प्रमाणबद्ध व सुशोभित रीतीनें वठविण्यांत त्याचा हातखंडा असे. त्याच्या चित्रांत उच्च विचारांनां अगर धार्मिक मनोवृत्तींनां पोषक असे फारसे गुण आढळून येत नाहींत, पण त्याची काम करण्याची हातोटी मात्र विलक्षण होती. मिचेल अँजेलो हा रफायल नांवाच्या प्रसिद्ध चित्रकाराला नेहमीं विनोदानें म्हणत असे कीं, जर अँड्रिया हा मनांत आणील तर तुला तो केव्हांच हटवील. मिचेलअँजेलो याचें अँड्रियाच्या चित्रकलेसंबंधांत फार चांगलें मत होतें, एवढीच गोष्ट अँड्रियाच्या चित्रनैपुण्याची निदर्शक आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. अँड्रियाचे शिष्य पुष्कळ होते. त्यांपैकीं पॉंटार्मो व डोमेनिको पुलिगो हे प्रमुख होत.

[ वियाडी, समॅंट, बॉमन इत्यादि लेखकांनीं अँड्रिया डेल सार्टोचीं चरित्रें लिहिलीं आहेत.].

**अँड्रोमेडा**— ग्रीक पुराणांमध्यें हिची आख्यायिका खालीलप्रमाणें आहे. ' अँड्रोमेडा ही एथियोपियन लोकांचा राजा सेफीयस व त्याची बायको कॅसिओपे यांची मुलगी होती. अँड्रोमेडा हिला आपण पोसीडॉनची बायको नेरीड्स इच्याइतकें सुंदर आहों असा गर्व झाला. त्यामुळें पोसीडॉन याला राग येऊन त्यानें तिचा सूड घेण्याचें ठरविलें; व माणसें व पशू यांचा संहार करणारा समुद्र–राक्षस पृथ्वीवर पाठवून दिला. त्यामुळें सर्व पृथ्वी जलमय होते कीं काय असें वाटू लागलें. पृथ्वीवरील लोक भयभीत झाले. त्यांनीं अॅमॉन येथील देवतेला कौल लावला. त्यावरून त्यांनां असें समजलें कीं जोंपर्यंत सेफीयस राजा आपल्या मुलीला त्या समुद्र-राक्षसाच्या ताब्यांत देणार नाहीं तोंपर्यंत हें अरिष्ट टळणार नाहीं. हें वर्तमान कळतांच, राजानें त्याप्रमाणें कबूल केलें व अँड्रोमेडा हिला समुद्रकिनाऱ्यावरील एका खडकाला घट्ट बांधण्यांत आलें. अशा असहाय्य स्थितींत ती गॉर्गनला मारून परत येणाऱ्या पर्सीयसला आढळली. तेव्हां त्यानें समुद्रराक्षसाचा वध करून, तिची मुक्तता केली व तिच्याशीं लग्न केलें. अँड्रोमेडा हिचें फीनेअस याच्याशीं लग्न होण्याचें पूर्वीपासून ठरलें होतें. फीनेअसला ही बातमी लागतांच त्याला फार क्रोध आला. लग्नसमारंभाच्या वेळीं पर्सीयस व फीनेअस या दोघांमध्यें भांडण होऊन पर्सीयसनें आपल्या हातांतील गॉर्गनच्या कवटीच्या प्रभावानें फीनेअसला दगड बनविलें. अँड्रोमेडाला घेऊन पर्सीयस हा अर्गासमधील टीरिन्स नामक आपल्या गांवीं गेला. अँड्रोमेडाच्या मरणानंतर अथेना देवीनें तिची पर्सीयस व कॅसिओपिया यांच्या नक्षत्राशेजारीं स्थापना केली.' ही दंतकथा आधारभूत धरून त्यावर सोफोक्लीज व युरिपीडीज यांनीं व इतर ग्रंथकारांनीं शोकपर्यवसायी कथानकें रचिलीं आहेत.

अँड्रोमेडा या तारकापुंजावर ग्रीक लोकांनीं ही दंतकथा रचिली आहे असें दिसतें. या अँड्रोमेडा नक्षत्राला, लॅटिनमध्यें ' पर्सीया '( शृंखलाबद्ध स्त्री ) असें नांव आहे. विल्हेल्म शीकर्ड ( १५९२–१६३५ ) यानें या नक्षत्राला ' अबिगेल ' हें नांव दिलें आहे. ज्यूलियस शिलरनें हें नक्षत्र कबरेच्या आकृतीचें आहे असें कल्पून त्याला ' पवित्र कबर ' असें नांव दिलें.

अँड्रोमेडाच्या तारकापुंजामध्यें टॉलेमी व टायकोब्राहे यांच्या मतें २३ तारका आहेत तर हेवेलियसच्या मतें ४७ आहेत. त्यांतल्या त्यांत 'आल्फा अँड्रोमेडा' व 'बीटअँड्रोमेडा' या तारका मोठ्या व तेजःपुंज आहेत. शास्त्रीयदृष्ट्या या तारकपुंजासंबंधीं पुढील गोष्टी महत्त्वाच्या आहेत, या तारकापुंजामधील तेजोमेघ फारच सुंदर आहे. ' गॅमा अँड्रोमेडा' हा तारा, चकाकणारा तारा व नीलवर्ण तारा या दोहोंच्या संयोगामुळें बनलेलें तारकायुग्म ( बायनरीस्टार ) आहे. 'गॅमा अँड्रोमेडा' हा नियमानें परिवर्तन करणारा तारा आहे. हार्टविग यानें आणखी एक नवीन तारा या तारकापुंजामध्यें शोधून काढून त्याला ' नोव्हा अँड्रोमेडा ' असें नांव दिलें आहे. अँड्रोमेडीड्स नांवाच्या उल्कासमूहाचा उल्कासंपातबिंदु ( रेडिअंट ) या तारकापुंजांत आहे.

**अँड्र्यूज थॉमस** ( १८१३–१८८५ )—हा आयरिश रसायनशास्त्री व पदार्थवैज्ञानिक बेलफास्ट येथें १८१३ त जन्मला, व तेथेंच त्याचें प्राथमिक शिक्षणहि झालें. नंतर तो ग्लासगो येथें शिकण्यास गेला व पुढें त्यानें एडिंबरो येथें एम. डी. ची पदवी घेतली, येणेंप्रमाणें शिक्षण संपविल्यावर तो बेलफास्ट येथें वैद्यकीचा धंदा करूं लागला. यानंतर दहा वर्षांनीं तो क्वीन्स कॉलेजचा उपाध्यक्ष होऊन तेथें तो रसायनशास्त्राच्या अध्यापकाचें काम करूं लागला, कर्बद्वि प्राणिदाच्या उष्णमान, दाब व आकारमान यांनां जोडणाऱ्या नियमांची त्यानें नीट तपासणी केली व विशेषतः वायूंची स्थित्यंरदर्शक ( क्रिटिकल ) उष्णमानें व स्थित्यंतरदर्शक दाब यांची यानें कल्पना काढली.

**अंतगड**, त ह शी ल—बस्तर संस्थानांतील वायव्येकडील तालुका. १९° ११' व २०° १४' उ. अक्षांश आणि ८०°२६' व ८१° ३०'पू. रेखांश यांमध्यें. क्षेत्रफळ २८५० चौ. मैल. लोकसंख्या ३९१८११. ६१६ गांवांपैकीं ४६१ गांवें कौलानें दिलीं आहेत. येथील प्रदेश घाटमाथ्याचा असून नारायणपूरचें मैदान जरा दाट वस्तीचें आहे. रहिवाशी मुरिया, मारिया, हल्बा, धाकर आणि मेहरा जातीचे आहेत. जमीन मुख्यतः ' माल ' वर्गाची आहे. तींत तांदूळ, हरभरे, गहूं, उडीद, मूग, पिकतात. या तालुक्यांत एक पोलिस चौकी व अबकारी खात्याची भट्टी आहे.

गां व.—अंतगड तालुक्याचें मुख्य ठाणें. हें बंगाल नागपूर रेल्वेचें राजनांदगांव स्टेशनपासून ८३ मैल आहे. लोकसंख्या ११२४. येथें आठवड्याचा बाजार, प्राथमिक शाळा, पोलिस चौकी, डांकघर व जंगलखात्याची कचेरी आहे.

**अंतधुरा**—संयुक्त प्रांत. आलमोरा जिल्ह्याच्या तिबेट सरहद्दीवरील एक खिंड. उत्तर अ. ३०° ३५' व पूर्व रे. ८०°११' पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या टंकपूरपासून ग्यानिमा येथें जाण्यास व तेथून तिबेटांतील गारटोक येथें पोहोंचण्यास या खिंडीतून रस्ता असल्यामुळें हा रस्ता महत्त्वाचा आहे. तथापि प्रवास करण्यास हा मार्ग अति कठिण आहे. सुमारें १७३०० फूट उंचीवर ही खिंड असल्यामुळें ११ महिने येथें बर्फ असतें.

**अंतर इब्नशद्दाद**.—हा अरबी कवि व शूर पुरुष सहाव्या शतकांत होऊन गेला. याच्या बापाचें नांव शद्दाद असें होतें. झबुबा नांवाच्या एका नीग्रो दासीपासून शद्दादला हा पुत्र झाला. अर्थातच हा दासीपुत्र असल्यामुळें याचें प्रथमारंभाचें आयुष्य गुलामगिरीतच गेलें. पण लढाईमध्यें त्यानें चांगलें शौर्य गाजविल्यामुळें व त्याचप्रमाणें आपल्या अंगचे अनेक गुण त्यानें लोकांच्या निदर्शनास आणून दिल्यामुळें, गुलामगिरीतून त्याची सुटका झाली व त्याच्या बापानें

त्याला आपला औरस मुलगा असें मानलें. अब्स व धुबियान या दोन जातींमध्यें जी मोठी लढाई झाली तीमध्यें त्यानें प्रामुख्यानें भाग घेतला. त्याचें सर्व आयुष्यच अचाट साहसें करण्यांत गेलें. टाई नांवाच्या एका जातीशीं झालेल्या लढाईंत तो मारला गेला. त्याचीं काव्यें वीररसप्रधान व शृंगाररसात्मक आहेत. त्याची अबला नांवाच्या एका बाईवर प्रीति जडली होती. व तिला उद्देशून त्यानें बरींच प्रणयगीतें लिहिलीं आहेत. 'मो अल्लकात' या नांवाचें त्याचें काव्य फार प्रसिद्ध आहे.

**अंतराल**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक जात. जातिभेदाप्रमाणें जे ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यापेक्षां कमी दर्जाचे आहेत व शूद्रांपेक्षां उच्च दर्जाचे आहेत अशा ( अंतराळीं असणाऱ्या ) लोकांनां अंतराळ म्हणतात व त्यांच्यांत नामपिदि, अंबलवासि व शामन्धर असे पोटभेद आहेत.

ना म पि दि.—हे लोक मूळचे ब्राम्हण होते. परंतु ब्राम्हणांच्या सांगण्यावरून केरळच्या राजप्रतिनिधींचा यांच्या पूर्वजानें खून केला म्हणून त्यांची गणना अंतराल जातींत होते. नंबुद्री लोक त्याचें पौरोहित्य करतात. हे लोक मरुमक्कथयम हा वारसाचा कायदा पाळतात.

अं ब ल वा सि–'अंबलवासि ' पहा. अंतराळांची तिसरी पोटजात शामन्धर होय. यांत ६ पोटभेद आहेत ते असेः—

एराडि, नेंडुन्गाडि, वेलोडि, उन्निथिरि आतियोति व नांबियार हे ते ६ पोटभेद आहेत. ह्या जातीचे लोक आपण क्षत्रिय बीजाचें आहों असें म्हणतात. यांचे रीतिरिवाज नायर लोकांप्रमाणें आहेत. परंतु समाजांत त्यांचा दर्जा नायर लोकांपेक्षां उच्च आहे. त्यांच्यांत यज्ञोपवीत धारण करण्याची चाल नाहीं व त्यांचे सर्व विधी मंत्राशिवाय होतात. शामन्धर व अंबलवासि या दोन जातींत रोटीव्यवहार होत नाहीं.

अंतरालांचा मोठा वर्ग जो अंबलवासि हाच काय तो सर्वश्रुत आहे. त्यामुळें ही मूळची जात अंबलवासींत मोडली जात असून फारशी ऐकिवांत नाहीं. हिंदुस्थानच्या खानेसुमारींतहि यांची स्वतंत्र गणना केलेली दिसत नाहीं.

**अंतर्गळ**-(अंत्रवृद्धि ) अंत्रनिःसरण(हर्निया)हें नांव ज्या रोगांत आंतड्याचा कांहीं भाग उदरांतून क्षीण झालेल्या स्नायूंतील मार्गावाटें बाहेर पडून अंडाशयांत उतरतो व ज्यामुळें अंडाशय मोठा दिसतो त्यां रोगास लावितात; व म्हणून याच्या अनेक नांवांपैकीं अंत्रनिःसरण हें नांव अन्वर्थक आहे कारण निःसरण म्हणजे एखादें इंद्रिय एखाद्या पोकळींतून रोगामुळें अगर इजेमुळें बाहेर येणें हा प्रकार मस्तिष्कनिःसरण, फुःफ्फुस निःसरण अशा व्याधींच्या उदाहणावरून उघड होतो. तथापि प्रायः हें निःसरण उदरांतील पोकळीपासून अनेक प्रकारें संभवत असल्यामुळें अंत्रनिःसरणाचे अनेक प्रकार आहेत. यासच कोणी भेगला उतरणें हेंहि नांव लौकिकी भाषेंत देतात. हा रोग प्रगट होण्याचीं स्थानें: ( १ ) ऊरुसंधि म्हणजे जांघाड, ( २ ) मांडीचा वरील भाग, ( ३ ) बेंबी हीं होत; व त्या स्थानांवरून( १)ऊरुसंध्यंत्र निःसरण ( २ ) ऊरोर्ध्वांगनिःसरण ( ३ ) नाभ्यंत्रनिःसरण इत्यादि प्रकारचे निःसरण अथवा अंतर्गळ रोग पहाण्यांत येतात. त्यांतले त्यांत धाकट्या आंतड्यासारखी सहज हलणारीं जीं इंद्रियें असतात, त्यांचें निःसरणहि सहज होऊं शकते आंतड्यावरील अन्त्रमेदावरण नामक आच्छादन हें दुसरें उदाहरण आहे. व यामुळें रोग प्रगट होऊन जी रोगग्रंथी तयार होते तीमध्यें एक तर केवळ आंतड्यांचा भाग अगर केवळ अंत्रमेदवरणाचा कांहीं भाग अगर कांहीं रोगग्रंथींत अंशतः दोन्ही प्रकारचे भाग आढळतात.

का र णें.—ही रोगप्रवृत्ति होण्यास कारणें:—धाकटें अगर मोठें आंतडें ज्या त्वचेनें उदरांतील पाठीच्या कण्यास बद्ध झालेलें असतें त्या त्वचेची लांबी कांहीं ठिकाणीं फार असल्यामुळें तें आंतडें त्या जागीं उदरांत बरींच सुटीं असल्यामुळें व अंत्रमेदावरण हाहि अशाच प्रकारचा चलनशील पडदा असल्यामुळें उदरांतील स्नायूंमध्यें एखादी निर्बल जागा उत्पन्न होतांच तेथें बिळाप्रमाणें मार्ग करून त्या वाटें तें आंतडें अगर पडद्याचा भाग उदराबाहेर पडतो. ( १ ) बराच आढळण्यांत येणारा जो उरुसंध्यत्रनिःसरण प्रकार असतो त्यांत पुरुषाचे व स्त्रीचे अंडाशयरज्जू ज्या मार्गें उदराबाहेर जातात त्या मार्गानेंहि हें आतडें अगर पडदा बाहेर पडून वृषणाच्या ठिकाणीं अगर जांघाडांत मोठी रोगग्रंथी बनते.( २ ) त्याचप्रमाणें उदरांतील निर्बल स्नायूंत नवीन मार्गानें मांडींतील मोठ्या रक्तवाहिन्यांच्या आंतील बाजूस रोगग्रंथि बनण्याचा एक प्रकार पाहण्यांत येतो; (३)बेंबीजवळील उदराच्या स्नायुशैथिल्यामुळें अगर उदरांत कांहीं शस्त्रक्रिया पूर्वी केली असल्यास त्यामुळें आलेल्या स्नायु–दुर्बलतेमुळें उदराच्या मधोमध अंत्रानिःसरण होऊं शकतें. हा रोग प्रगट होण्यास जड ओझें उचलणें, उंचावरून उडी मारणें, शौचाचा वेळीं फार कुंथणें, अगर जुनाट खोकल्याचे श्रम होणें यासारखीं उदराच्या स्नायूंवर ताण पाडणारीं निमित्तें कारण होतात. वरील कारणांमुळें मध्यपटल नामक उदरांतील मांसल पडदा व उदराचे स्नायू या दोहोंच्या दाबांत आंतडीं अगर अन्य इंद्रियें सांपडल्यामुळें दाब अधिक झाल्यामुळें आंतील इंद्रिय दुर्बल जागीं कृत्रिम मार्ग काढून बाहेर त्वचेखालीं ग्रंथिरूपानें प्रगट होतो. हा रोग उपजत अगर मागाहून कारणपरत्वें होतो. गर्भावस्थेंत स्नायूची व्हावी तशी रचना न बनल्यानें ती एखादे ठिकाणीं कमकुवत राहून एखादें मूल उपजतांच त्यास वरीलपैकीं एखाद्या प्रकारचा अंतर्गळ असतो. मोठ्या माणसांनां वरील प्रकारच्या व्याधीमुळें अगर दुखापतीमुळें मोठेपणीं अंतर्गळ होतो. स्त्रियांपेक्षां पुरुषांनां शारीरिक श्रम अधिक करावे लागतात व त्यामुळें त्यांस दुखापत होण्याचा संभव अधिक असतो; म्हणून स्त्रियामध्यें या रोगाचें प्रमाण कमी असतें.

अण्डरज्जूची नाडी अंगनाण्डरज्जूच्या नाडीपेक्षां अधिक असल्यामुळें ज्या मार्गावाटें ही रज्जू अण्डाशयांत उतरते तो मार्ग अधिक पोकळ व मोठा असल्यामुळें त्या मार्गानें अंतर्गळ सहज उतरतो हें उघडच आहे.

रो ग व र्ण न.—रोगाच्या आरंभीं रोगग्रंथि लहानच म्हणजे मुलें गोट्या खेळतात तेवढ्या गोटीएवढी असते. पण पुढें तिचा आकार वाढत जाऊन हळू हळू तो लहान मुलाच्या डोक्याएवढाहि होतो. ग्रंथीचे तीन भाग असतात ते असेः— तिची आवरणें, तिची कोथळी अगर कोष व तिचा अंतर्भाग. ज्या भागाच्या दुर्बलतेमुळें अंतर्गळ बाहेर पडतो तेथील त्वचा स्नायु इत्यादींचें आवरण बनतें.उदाहरणार्थ मांडीतील अंतर्गळा मध्यें आंतील गांठीच्या दाबामुळें ताणल्या गेलेल्या त्वचा स्नायु वगैरेंचें आवरण बनलेलें असतें व या ग्रंथींत वारंवार सूज दाहक्रियादि घडत असल्यामुळें हें आवरण उत्तरोत्तर बरेंच जाड होत जातें. रोगग्रंथीची कोथळी हें नांव ज्यास दिलें आहे तें या आवरणाच्या आंत असून उदराच्या पोकळीचें अंतराच्छादन करणारासहि अंत्रावरण नामक जी त्वचा असते तिची ही कोथळी बनलेली असते; तथापि स्थानपरत्वें कांहीं रोगग्रंथींमध्यें ही कोथळी नसतेहि कोषग्रीवा म्हणजे कोथळीच्या वरील जो तिचा अरुंद भाग असून ज्याचा उदरांतील अंत्रावरणाच्या मोठ्या पोकळीशीं संबंध असतो तो होय. सुजेमुळें व दाहक्रियेमुळें ही ग्रीवा जाड व कठिण बनते व भोंवतालच्या भागांत रुतून बसलेली असते. शस्त्र-क्रियेच्या वेळीं ती सोडविण्यास अडचण पडते. सर्वांच्या आंत ग्रंथीचा अंतर्भाग आंतडें, अंत्रावरणांतील वसा व लेंकरांतील रोगामध्यें क्वचित अंगनाण्ड यांच्या योगानें बनलेला असतो.

रोगांतील ग्रंथि उदरांत परत ढकलतां येत असेल अगर नसेल त्यावरून निरवरोधित व आवरोधित असे दोन प्रकारचे अंतर्गळ पहाण्यांत येतात. कांहीं रोगग्रंथी आल्यामार्गानें पुनः उदरांत सहज परत ढकलतां येतात तर कांहींनां याप्रमाणें परतवण्यास फार त्रास पडतो. नेहमीं सहज परतवतां येण्यासारखा अंतर्गळ केव्हांहि एकाएकी अवरोधित प्रकारचा बनतो; म्हणजे तो आंत नेहमींप्रमाणें जाईनासा होतो. याचीं कारणें बहुधा अशीं आहेत कीं त्यांतील वसामय अंतर्भाग भोंवतालच्या स्नायू वगैरे रचनेंत दाह-व सुजेमुळें चिकटून बसतो व दुसरें कारण त्यांतील आंतडें नेहमींपेक्षां फुगीर व मोठें होतें. या रोगप्रकाराला अवरोधित म्हणण्याचें कारण त्यांतील रक्तप्रवाह अरुंद कोषग्रीवेवरील दाबामुळें कुंठित होण्यास प्रारंभ होतो. व येणेंप्रमाणें ही कुंठित झालेली गति प्रथम बेताचीच असते खरी; परंतु लवकरच तिचे दुष्परिणाम घडूं लागतात. आपण आपलें बोट कांहीं वेळ दोरीनें गच्च आवळून बांधलें तर त्यांतील रक्त कोंडलें गेल्यामुळें तें फुगीर दिसतें. तसेंच या रोगाच्या कोथळींचें होऊन त्यांतील आंतडें फुगतें. दाव बेताचाच व थोडा वेळ असेपर्यंत फक्त आंतड्यांत फक्त रक्ताधिक्य होतें पण तोच दाब तसाच चालू राहिल्यास दाहास व सुजेस आरंभ होतो; व नंतर त्यांत जंतुप्रवेश होऊन पूयोत्पत्तीहि होते. ज्या मानानें कोषग्रीवेवर दाब पडेल व ज्या मानानें रोगजंतु कमी अगर अधिक विकारी असतील त्या मानानें रक्ताधिक्यापासून तों पूयोत्पत्ति होणारें स्थित्यंतर अंमळ सावकाश अगर अतिजलद होतें. अंतर्गळाची रोगग्रंथि जर शीघ्रतेनें प्रगट झाली असली तर आंतडें किंवा आंत्रमेदावरण यांची स्थिति शीघ्रतेनेंच बिघडून रोगाचीं भयंकर लक्षणें दिसूं लागतात. कोषग्रीवा सुजून व फुगून त्या दाबामुळें आंतड्यांत होणारें रक्ताभिसरण नीट चालत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. अशा प्रकारची अवस्था बहुधा जांघाडांतील अंतर्गळाची होते. याशिवाय ज्या मार्गावाटें अंतर्गळ उदराबाहेर पडतो त्याच्या मार्गाच्या बाजूकडे असणारें स्नायू वगैरे रचनेचा दाब पडून आंतड्यांतील रक्ताभिसरणास अवरोध होऊन आंतडें कुजण्याची भीति प्राप्त होते. निरवरोधित म्हणजे परत उदरामध्यें ढकलता येण्यासारखा अंतर्गळ या प्रकारची रोगग्रंथि मऊ व सहज दाबातां येणारी असते. तींत आंतडें असलें तर ती पोकळ लागते व दाब कमी केला असता पुनः रबरी चेंडूप्रमाणें ती पूर्ववत होते; पण तींत आत्रमेदावरण असलें तर कणकीच्या गोळ्याप्रमाणें मऊ परंतु भरीव अशी हातास लागते. रोग्यास उभा केला तर गाठ मोठी होते व त्यास निजविला तर गांठ लहान होते, व रात्रीं तिच्यामुळें रोग्यास कधीं त्रास होत नाहीं. ती चिमटींत धरून रोग्यास खोकण्यास सांगितलें तर बोटास गाठ फुगलेली कळते. आणि ती उदरांत परत लोटली असतां आंतड्यांतील ' गुरगुर ' आवाज करणारी खळबळ बोटांनां समजते. या प्रकारचें अंतर्गळ उदरामध्यें वरील कोणत्याही जागीं होऊं शकतात. जांघाडांतील कटिरास्थिपासून जननेंद्रियापर्यंत असणारें जाड ( पूपार्टचें ) स्नायुबंधन आहे त्याच्या अंमळ वर ही गांठ असते. अगर ती बेंबीमध्यें किंवा बेंबीशेजारींहि उगम पावतें. ही जांघाडांतील गांठ मोठी झाली म्हणजे अण्डाशयांत उतरते व मांडीतील अंतर्गळ असल्यास ती मोठी ती मोठी झाल्यावर वरतीं उदराकडे सरते. या प्रकारच्या अंतर्गळास तात्पुरता उपाय करण्यासाठीं ही रोगग्रंथी परत उदरामध्यें लोटावी; आणि ती पुनः खालीं येऊं नये म्हणून प्रतिबंधक पट्टा नेहमी वापरावा अगर रबरीबंधनाच्या योगें त्याच्या मार्गावर दाब ठेवावा. रोग्याचें वय जितकें लहान असेल त्या मानानें केवळ पट्टा वापरून रोगमुक्त होण्याचा संभव अधिक असतो. रात्रीं निजतेवेळीं पट्टा काढून ठेवण्यास हरकत नाहीं; पण सकाळीं अंथरुणावरून उठण्याच्या अगोदर तो पुनः घालावा. अशा

तन्हेनें त्यास एकदां आंत लोटल्यावर खालीं येऊं न दिलें तर हळू हळू तो मार्ग बुजून रोगी कायमचा रोगमुक्त होण्याचा अधिक संभव असतो. परंतु वस्तुस्थिति अशी पाहण्यांत येते कीं कित्येक अठवडेपर्यंत अंतर्गळ पट्टा वापरून खालीं न आल्यानें मार्ग थोडाबहुत बुजतो न बुजतो इतक्यांत रात्रीं खोकल्यामुळें किंवा एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळताना अगर अन्य कारणामुळें ग्रंथि पुनः बाहेर आल्यामुळें तो मार्ग पुनः उघडला जाऊन कित्येक महिन्यांत झालेली मार्ग बुजण्याची क्रिया फुकट जाते. हें असें होणें साहजिक व अपरिहार्य आहे व म्हणून कायमचें रोगमुक्त होण्यासाठीं शस्त्रक्रिया करणें जरूर असतें. या शस्त्रक्रियेस बरेंच कौशल्य लागतें व ते पुढील तत्त्वावर करण्यांत येते. प्रथम रोगकोष रिक्त करून मग तो संबंध काढून टाकतात व बळकट टांके घेऊन रोगमार्ग शिवून बंद करतात. शस्त्रक्रियेनें या रोगाच्या उपायांत मोठीच क्रांति घडवून आणली आहे. पट्ट्याचा उपाय फार दिवस लागणारा व त्यामुळें रोग्यास कंटाळा आणणारा आहे. यासाठीं ज्या दुर्बल रोगमार्गानें उदरांतून अंतर्गळ बाहेर पडला आहे, तो मार्ग शस्त्रवैद्य शस्त्रानें उघडून रोगाची कोथळी रज्जूनें बांधून नंतर ती कापून काढितो व अंतर्गळ उतरण्याचा मार्ग स्नायूंत जाड व बळकट टांके मारून बंद करून टाकतो. या शस्त्रक्रियेंत जीवास बहुधा आपाय नसतो; रोगी त्रास व काळजीपासून मुक्त होऊन इतर निरोगी माणसाप्रमाणें इच्छेस वाटेल तो कामधंदा करण्यास उपयोगी होतो. शस्त्रक्रिया ज्यावर करतां येणार नाहीं असे अंतर्गळ फार थोडे असतात. ज्या मुलांना अंतर्गळ असेल त्यानीं विनाकारण जन्मभर पट्टा वापरून व शारिरिक सामर्थ्य वाढविणारे खेळ, व्यायाम यापासून दूर राहून आपल्या आरोग्याचें नुकसान करून न घेतां शस्त्रक्रिया करून घ्यावी हें चांगलें.

अ व रो धि त म्ह ण जे उ द रां त प र त जा त न स ले ला अं त र्ग ळ.—वर सांगितलेल्या जागांपैकीं एखाद्या जागीं मोठी व बरेच दिवसांची जुनी रोगग्रंथि असून ती उदरामध्यें सगळी अथवा अर्धीमुर्धी देखील परत जात नाहीं तिला हें नांव आहे. ही गांठ परत न जाण्याचीं कारणें तिचा मोठेपणा हें एक व दुसरें ती चिकटून व सुजून तींत आलेलें काठिण्य हीं आहेत.व असा अंतर्गळ म्हणजे एक जिवावरचें निरंतरचें संकट आहे असें समजावें. कारण गांठ मोठी असल्यामुळें व ती शरीराच्या अग्रभागीं असल्यामुळें तीस दुखापत, आघात वगैरे होण्याचा संभव असतो; तिचा आकार वाढत्या प्रमाणावर असतो. तिच्या मार्गाच्या दाबामुळें अगर तींतील आंतडीं वगैरे भाग सुजून त्या दाबामुळें आंतड्यांतील रक्ताभिसरणास प्रतिबंध होऊन आंतडें निर्जीव होत गेल्यानें मरणाचें भय ओढवतें.त्यापासुन रोग्यास नेहमीं पोटांत कोणी ओढल्यासारखा भास होतो. शूळ, अजीर्ण, व बद्धकोष्ठ या व्याधी असून त्यामुळें अंतर्गळांत आंतडें जेवढें अडकलें असेल त्यांतून मळ पुढें जाणें अशक्य होऊन मळावरोध म्हणजे मलशुद्धि अगदींच बंद होणें हा भयंकर रोग होतो. जेव्हां असल्या प्रकारचा अंतर्गळ आपोआप अगर थोड्या दाबानें दुखूं लागतो तेव्हां त्या जागीं तरी निदान अंत्रावरणदाहास प्रारंभ आहे असें समजावें. व अशी स्थिति रोग्यास प्राप्त झाली तर त्यास मोठी भीति असल्यामुळें त्यावर लक्ष ठेवणें फार जरूर असतें. खरें म्हटलें तर शस्त्रक्रिया करणें अशा वेळीं उत्तम होय. या प्रकारच्या अंतर्गळावर तात्पुरते इलाज करावयाचे असतील तर ती रोगाची गांठ मावेल अशा प्रकारचा प्रतिबंधक पट्टा गांठ मोठी न व्हावी म्हणून वापरावा. खाण्यापिण्यांत अनियमितपणा व आचरटपणा अगदीं वर्ज करावा व मलशुद्धि नियमानें होण्याची तजवीज ठेवावी. अशा माणसांचें जीवित सदा धोक्यांत असल्यामुळें कायमच्या रोगमुक्तीसाठीं शस्त्रक्रिया करून घेण्यास रोगी कबूल झाला तर उत्तम गोष्ट आहे. अशा वेळीं शस्त्रवैद्य उदर चिरून रोगग्रंथि उघडी करतो; नंतर शस्त्रानें कोथळी उघडून आंत्रमेदावरणाचा कांहीं भाग चिकटला असल्यास तो त्याचीं बंधनें कापून काढतो; जें आंत्रमेदावरण अति कठिण झालें असेल तें गच्च बांधून कापून काढतो. नंतर उदरांत आंतडें परत लोटून कायम रोगमुक्तीसाठीं रोगमार्ग जाड व बळकट टांक्यांनीं बंद करून टाकतो.

निरोधित ग्रीवांतर्गळ म्हणजे वरीलपैकीं कोणत्याहि प्रकारचा अंतर्गळांतील आंतड्यावर अगर आंत्रमेदावरणावर रोगकोषग्रीवेचा दाब पडून रक्ताचा पुरवठा बंद झाल्यामुळें जेव्हां हे भाग निर्जीव होऊन तुटून पडण्याच्या बेतांत येतात त्या स्थितींतील अंतर्गळ. मळमळ, पित्ताची वांती, नंतर मळासारखी दुर्गंधिमय वांति, बेंबीजवळ पिळल्याप्रमाणें आग होणें, मलोत्सर्जन व अपानवायु हे अजीबात बंद होणें, सुतासारखी बारीक अशक्तनाडी, व गांठीवर अंमळ दाबल्यानें फार वेदना, पोटास मोठी फुगवटी येऊन चेहरा ओढल्यासारखा व अति चिंतातुर दिसणें, पोटाचे स्नायू ताठणें, वैद्यानें ग्रंथि बोटांच्या चिमटींत धरून रोगी खोकल्यानें वैद्याच्या बोटास त्या खोकण्याच्या आघाताचें ज्ञान न होणें हीं या रोगाचीं लक्षणें होत. शेवटच्या लक्षणाचें कारण असें आहे कीं गांठींत असणाऱ्या आंतड्याचा उदरांतील आंतड्यांशीं रुधिराभिसरण बंद झाल्यानें संबंध तुटल्याप्रमाणें होऊन खोकण्याच्या क्रियेच्या आघाताचें ज्ञान बोटास पोचूं शकत नाहीं. कधीं कधीं वेदना व दुःख हीं गांठींत नसतातहि; आणि बहुधा रोगी वृद्ध असल्यास वरील सर्व लक्षणें इतकीं तीव्र नसतात. यासाठीं कोथळीच्या ग्रीवेवरील दाब सोडविणें झालें नाहीं तर आठ दहा तासापासून ते आठ दिवसांच्या आंत गांठींमध्यें काळेपणा उत्पन्न होऊन, आंत दुर्गंधित वायु व पू होतो व आंतड्यांतील ही

घाण उदरांत जाऊन ती फुटण्यास आरंभ होतो. रोग्यास उचकी लागते. शक्तिपात पराकाष्ठेचा होतो; व घाणीमुळें दूषितजंतुजन्य सन्निपातज्वर येऊन रोगी बेशुद्धि, झांपड, ग्लानि यांमुळें मरण पावतो. अशा या निरोधितग्रीवांतर्गळावर शस्त्रक्रियेनें उपाय करण्यांत लवकर आलाच पाहिजे; व्यर्थ कालापव्यय करण्यांत हांशील नसतें. ग्रंथीवर अगोदर बर्फ ठेऊन कांहीं वेळानें ती परत लोटतां आल्यास पहावी; नाहींतर क्लोरोफार्मनें गुंगी आणवून त्या गुंगींत रोगी असतांनाच पुनः तसा प्रयत्न करावा व तो न साधल्यास शस्त्रवैद्यानें उदर चिरून रोगाच्या कोथळीच्या ग्रीवेवर जो दाब पडून आंतड्यांतील रुधिराभिसरण बंद होतें तो दाब सोडवावा अगर कापून काढावा; नंतर आंतडें उदरांत लोटून त्याचा निःसरणमार्ग टांक्यांनीं बंद करावा. याखेरीज अन्य इलाज नाहीं. अगोदर बर्फ ठेवण्याचा अगर नुसत्या बोटांनीं तो उदरांत ढकलण्याचा प्रयत्न तरी फक्त त्या गुंगींत असतांना थोडावेळ शस्त्रवैद्यानें करावा. बोटांच्या कमीजास्ती धक्क्यानें रोगग्रंथींतील अंतर्भागास इजा होते, म्हणून शस्त्रवैद्यलोकांत अशी म्हणच पडली आहे कीं "फार हाताळला न गेलेला अंतर्गळ शस्त्रवैद्यास यश देतो." म्हणजे ज्यांत असे प्रयत्न करण्यांत वेळ दवडला आहे असे रोगी कदाचित् दगावतात. हातानें अंतर्गळ उदरांत पद्धतशीर तऱ्हेनें लोटण्याचा प्रयत्न केला तर तो कधीं कधीं साधतो. ज्या दिशेनें तें इंद्रिय ( आंतडें ) खालीं उतरलें आहे ती दिशा प्रथम ध्यानांत आणून त्याच्या उलट दिशेकडे अंतर्गळ दाबीत न्यावा. जांघाडांतील अंतर्गळ दाबतांना तो वर, जरा बाहेरच्या अंगाला व मागें लोटावा. मांडींतील अंतर्गळ प्रथम खालीं दाबीत आणून नंतर तो मागें दाबून मग पुनः वर परंतु जरा बाहेरच्या अंगास लोटावा. अंतर्गळ मोठा असला तर असा प्रयत्न त्या रोगग्रंथीस सहन होऊन तो उदरांत जाण्याचा संभव असतो; व जितका अंतर्गळ लहान असेल तितकी त्याची परत लोटतांना स्पर्श सहन करण्याची पात्रता कमी असते व या क्रियेस वेळ लागल्यामुळें त्यास इजा होते. लोटण्याची अगर दाबण्याची जी कांहीं क्रिया करणें असेल ती अत्यंत कोमलतेनें व सौम्यपणें केली पाहिजे व ती गांठ हस्तक्रियेनें परत जात नाहीं असें शस्त्रवैद्यास वाटतांच त्या गांठीवर येणारी सर्व त्वचा स्नायु वगैरे रचना कापून, नंतर मोठ्या सावधगिरीनें गांठीचीं आवरणें कापावीं; म्हणजे त्यास रोगकोष सांपडेल. नंतर हा कोष कापून उघडा करावा आणि ज्या स्नायू वगैरे रचनेचा दाब त्या कोषाच्या ग्रीवेवर म्हणजे अरुंद भागावर पडत असेल ती रचना शस्त्रानें कापल्याबरोबर तेथच्या आंतड्यांतील बंद झालेलें रुधिराभिसरण पूर्ववत होईल व आंतडें कुजण्याची भीति मोडेल पण हें करतांना आंतड्यास इजा न होण्याविषयीं त्यानें जपावें. आतां यापुढें हें खालीं सरलेलें आंतडें परत उदरांत लोटावयाचें असतें. परंतु तसें करण्यापूर्वी त्यानें तें नीट तपासून पहावें. त्याचें तेज कमी झालेलें दिसलें, वर्ण काळसर असला व त्यास घाण येत असली तर त्यांत कुजण्याच्या क्रियेस आरंभ झाला असावा अथवा तें कुजून त्यांत पू झाला असावा असें अनुमान करण्यास हरकत नसते. असलें आंतडें उदरांत लोटल्यानें तें गळवाप्रमाणेंच फुटून उदरामध्यें अंत्रावरणदाहरोग उत्पन्न करून त्यामुळें रोगी मरण पावेल. यासाठीं कुजलेला भाग कापून निरोगी आंतड्यांचीं शेवटें बारीक टांक्यांनीं शिवून जोडावींत; व रोगट आंत्रमेदावरणाचे तुकडे अगोदर बांधून कापून काढावेत. विकारी जंतूंच्या बाधेमुळें यानंतर आंत्रावरणदाहज्वर झाल्यास कढत पाण्यांत एप्समसाल्ट हा क्षार विरघळवून तो वरचेवर देऊन मलशुद्धि करीत जावी.

निरवरोधित अंतर्गळ ज्यांना आहे त्यांनीं ज्यानें अंतर्गळ न उतरेल व जो अंगास न खुपेल असा प्रतिबंधक पट्टा पैदा करून वर वर्णन केल्याप्रमाणें निजण्याची वेळ खेरीज करून तो सदा वापरावा. अंतर्गळ निरोधित झाल्याचीं लक्षणें माहीत करून घेऊन तीं झाल्यास तावडतोब शस्त्रवैद्यास बोलवावें व त्या शस्त्रवैद्यानेंहि शस्त्रक्रिया करण्याच्या तयारीनेंच यावें. कारण कोणीहि उशीर केल्यास रोग्यास प्राणास मुकावें लागतें हें ध्यानांत ठेवावें. अगर आतुरालयांत जाऊन तेथें शस्त्रक्रिया करावी.

आ यु र्वे दी य वि वे च न.—गति बंद झाल्यामुळें कुपित झालेला वायु सूज व शूळ उत्पन्न करून शरीरभर संचार करीत करीत शेवटीं जांघाड्यांतून वृषणांत जाऊन वृषणांत वहात येणाऱ्या शिरांस आतिशय पीडा करून वृषणाची वृद्धि करतो. वातवृद्धि, पित्तवृद्धि, कफवृद्धि, रक्तवृद्धि, मेदोवृद्धि, मूत्रवृद्धि, अंत्रवृद्धि असा हा वृद्धिरोग सात प्रकारचा आहे.

मूत्रवृद्धि व अंत्रवृद्धि हे रोग वस्तुतः वायूपासूनच होतात. परंतु त्यांच्या जवळच्या कारणांवरून हे निराळे भेद केले आहेत. याचप्रमाणें मेदोवृद्धि व रक्तवृद्धि हे तरी कफ व पित्त यांपासूनच होतात. परंतु त्यांत मेद व रक्त हीं जवळचीं कारणें असल्यामुळें हीं निराळीं नांवें त्यांस दिलीं. वातजवृषणवृद्धींत वृषण वारा भरलेल्या पखालीप्रमाणें हातास लागतो. तो रुक्ष असतो आणि कारणावांचून त्यांत ठणका होतो.

पित्तवृद्धींत वृषण पिकल्या उंबरासारखा असतो. त्यांत दाह होतो, तो हातास कढत लागतो व पिकतो. कफवृद्धींत वृषण हातास कठिण, थंड, स्निग्ध लागतो, व जड असतो, खाज सुटते, आणि ठणका फार नसतो. रक्तवृद्धींत पित्ताचीं लक्षणें असतात आणि शिवाय वृषणावर काळे फोड येतात. मेदोवृद्धींत कफवृद्धीचीं लक्षणें असून वृषण मात्र ताडगोळ्याप्रमाणें मृदु असतो. ज्यास नेहमीं लघवी कोंडण्याची संवय असते अशा मनुष्यास मूत्रवृद्धि होते. यांत वृषण पाण्यानें भरलेल्या पखालीसारखा होतो. आणि चालतांना डुचमळतो, व किंचित ठणका लागतो. तो मृदु असतो.

याशिवाय वृषण फार वाढल्यामुळें शिस्नासभोंवतीं त्याचें एक प्रकारचें कडें होऊन शिस्न आंत दबतें आणि त्यामुळें मूत्रकृच्छ होतें.

वातप्रकोपक हा आहारानें, थंड पाण्यांत डुंबल्यानें, उपस्थित वेग थांबविल्यानें व अनुपस्थित वेग बळेंच प्रवृत्त केल्यानें, ओझें वाहिल्यानें, मार्ग चालल्यानें, वेडीं वांकडीं अंगें केल्यानें व पूर्वी सांगितलेल्या, प्रकोपक कारणांनीं वायु कुपित होऊन लहान आंतड्याचा कांहीं भाग दडपून त्याच्या जागेवरून खालीं घेऊन जातो. आणि जांघाडयाच्या संधींत गांठीसारखी सूज उत्पन्न करतो. त्या सुजेची हयगय केली असतां तो वायु तें आंतडें अंडांत घेऊन जाऊन अंडाची वृद्धि करितो. यांत पोट फुगतें, कळा लागतात, मळाचा अवष्टंभ होतो, वृषण दावला असतां वायु शब्द करीत आंत येतो. आणि सोडल्यावर पुन्हां अंडांत येऊन त्यास फुगवितो. हा अंत्रवृद्धि किंवा प्राकृत अंतर्गल नांवाचा रोग असाध्य आहे. यांत वातवृद्धीचींच लक्षणें असतात.

चि कि त्सा—अंडवृद्धीच्या सर्व प्रकारांत सारक औषधें देणें, शेकणें, पिकविणें, व पिकल्यावर जखम भरून येणारीं व पू: काढून टाकणारीं औषधें लावणें हे सामान्य उपचार आहेत.

मेदाच्या अंडवृद्धीवर मेद घालविणारीं तेलें व्रण भरून येईपर्यंत लावावीं.

मूत्रजन्य अंडवृद्धीस स्निग्धस्वेद करून फडक्याच्या पट्टयानें गुंडाळून शिवणीच्या खालीं उदराप्रमाणें वेध करून पाणी काढून टाकावें आणि व्रणावर स्थगिकाबंध बांधून तो भरून आणावा.

अंत्रवृद्धीवर आंतडें अंडांत उतरलें नसल्यास चिकित्सा करावी. यावर सुकुमारक धृत हें औषध ( अष्टांग हृदयांत सांगितलेलें ) चांगलें आहे.

स्नेहपान, रेचकें, अनुवासन व बस्ती यांनीं अंत्रवृद्धि बरी न झाल्यास प्रथम बस्ती देऊन नंतर वायूचा मार्ग बंद करण्याकरितां जांघाड्यांतील गांठीवर प्रथम डाग द्यावा. ज्या बाजूस रोग असेल त्या बाजूच्या आंगठ्याच्यावर मागच्या अंगास जो दोरासारखा पिंवळा स्नायु आहे तो अर्धचंद्राकार वांकलेल्या सुईनें वर उचलून तिर्कस चिरून त्यावर डाग द्यावा. कित्येकांच्या मतें करंगळीच्या शेजारच्या बोटावरचा स्नायु डागावा [ चरक, वाग्भट, योगरत्नाकर ].

**अंतर्वेदी**—एक प्रदेश. हें नांव कोणत्याहि दुआबाला लागू पडेल. परंतु हें नांव साधारणपणें गंगा व यमुना यांच्या मधला दुआब दर्शवितें. याला गंगा-यमुना अंतराळ असें म्हणतात. बृहत्संहितेंत याचा उल्लेख आला आहे (५-६५).या अर्थानें याचा उपयोग इंदूर येथील स्कंदगुप्ताच्या देणगींत केला आहे (गुप्तलेख पृ. ६९ ). मराठयांच्या मोहिमांसंबंधीं पत्रांत अंतर्वेदीचा अनेक वेळां उल्लेख आढळतो.

**अंतर्ज्ञान**—प्रत्यक्ष किंवा चटकन् होणारा जो बोध किंवा ज्ञान त्याला ही संज्ञा तत्त्ववेत्त्यांकडून दिली जाते. भूमितींत एखाद्या सिद्धांताची सत्यता अनेक पुरावे देऊन प्रस्थापित करावी लागते; पण अंतर्ज्ञानवाद्यांच्या मतें सार्वत्रिक तत्त्वांचा बोध करून देण्यास अशा खटपटीची जरूरीच नसते; कारण तीं जातीचींच सत्यें असतात. सर्व प्रकारचें ज्ञान, बौद्धिक क्रियांवर किंवा वैचारिक निर्णयांवर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अवलंबून असतें हें म्हणणें अंतर्ज्ञान मानणारांनां कबूल नाहीं. यां अंतर्ज्ञानवाद्यांचे धार्मिक किंवा नैतिक सत्याचा मूळ उगम ते कोठून मानतात त्यावरून पांच सहा वर्ग पाडले आहेत. १५ व्या, १६ व्या शतकापासून जेव्हां भौतिक शास्त्रांचा उगम होऊन ईश्वराची मध्यस्थी एखाद्या गोष्टीची उपपत्ति लावण्याच्या कामीं न मानण्याचा प्रघात पडला तेव्हां अर्थातच अंतर्ज्ञानसिद्धांतावर पुष्कळांचा विश्वास बसेनासा झाला. पण मुळींच अंतर्ज्ञान नाहीं असें मात्र कोणीहि तत्त्वज्ञानी म्हणत नाहीं. ज्ञानाचे उगम अनेक असतात, त्यांपैकीं हा एक होय. आयुष्याला चांगली ठाकठिकी आणण्याला अंतर्ज्ञान हें नेहमीं कमीअधिक प्रमाणांत उपयोगी पडतें. अंतर्ज्ञानाचें आस्तित्व आपणाला पुष्कळ गोष्टींवरून सिद्ध करतां येतें. गर्भशास्त्र, तौलनिक-शारीर विच्छेदन आणि जन्मविषयक मनोविज्ञान यांवरून पाहतां असें स्पष्ट होतें कीं बौद्धिक क्रियांनां जीवविकासांत आद्य स्थान नाहीं तर तो ' मागाहूनचा विचार ' असून मुख्य जी हालचाल ती एका विशिष्ट पद्धतीनें करविण्याकरितां या क्रिया असतात. सर्वमान्य अशा जेम्स—लँजच्या मनोविकारांच्या सिद्धांताप्रमाणें ज्ञानात्मक प्रतिक्रियांपूर्वी बहुधां नेहमीं सेंद्रिय प्रतिसंवेदना होत असतात. शिवाय सहजक्रियेमध्यें शहाणपणा दिसून येत असतो. प्राण्यांची हालचाल बारकाईनें पहातां त्यांचें शहाणपण बुद्धीपेक्षां अंतर्ज्ञानाधिष्ठच असावें असें वाटतें. नवीन नवीन शोध कसे लागतात याचें नीट विवरण करीत गेल्यास अंतर्ज्ञानाकडे यशाचा बराचसा वांटा येईल. आपण नेहेमीं व्यवहारांत आपल्या अक्कलहुषारीनें चोख निकाल देत असतों ते बुद्धीला पटणाऱ्या पुराव्यांपेक्षां मनाला पटणाऱ्या पुराव्यांवरून बनविलेले असतात यांत शंका नाहीं. तेव्हां ज्ञानाचा एक उगम अंतर्ज्ञानांत आहे हें वरील उदाहरणावरून दिसून येणार आहे. अंतर्ज्ञानवाद्यांचे प्रतिपक्षी असें म्हणतात कीं ज्यांनां आपण तात्काल व सहजोत्पन्न निर्णय असें समजतों ते तसे नसून सदसद्विवेकबुद्धीच्या स्मृतींतुन गेलेल्या क्रियांवरून निघालेले असतात, म्हणजे अनुभवजन्य असतात. तसेंच कांहीं रानटी जातींत बरेंवाईट ओळखण्याचें अंतर्ज्ञान आढळून येत नाहीं. शिवाय अंतर्ज्ञानाचें अस्तित्व असतें तर निरनिराळ्या देशांत व निरनिराळ्या काळांत नैतिक पद्धतींमध्यें जे मोठमोठे भेद दृष्टीस पडतात ते पडले नसते.

हे विरोधी पुरावे मननीय आहेत हें कोणासहि कबूल करावें लागेल.

[ संदर्भग्रंथ.—कांट-दि क्रिटिक ऑफ प्युअर रीझन. हॉबहाऊस–मॉरल इन् एव्होल्यूशन. मार्शल–इन्स्टिंक्ट अँड रीझन. सदर्लँड–दि ऑरिजिन अँड ग्रोथ ऑफ दि मॉरल इन्स्टिंक्ट. मेयर–इन्स्टिंक्ट अँड इंटेलिजन्स ( ब्रिटिश जर्नल ऑफ सायकॉलॉजी. पु. ४ ). बर्गसन–क्रिएटिव्ह एव्होल्यूशन. जे. मॅक्कॉश–दि इन्ट्युइशन्स ऑफ दि माईंड. रायीस—सोर्सेस ऑफ रिलिजिअस् इन्साईट. ]

**अंताजी ( उर्फ बाबुराव ) मल्हारराव बर्वे**–याची आत्या ही बाळाजी विश्वनाथ पेशवे याची बायको( राधाबाई) होती. कोळुरची रहाणार. याची बायको पिंगळे ( पेशवे ) घराण्यांतील होती. देशस्थ कोंकणस्थ विवाह यावेळीं सुरू झाले. हा निजामाकडे व दिल्लीस मोंगलाकडे पेशव्यांचा वकील होता. हा मुत्सद्दी म्हणून नांवाजला होता. नादिरशहाच्या स्वारीच्या वेळीं हा दिल्लीसच होता. त्यावेळचें साग्र वर्णन याच्या पत्रांत आढळतें. याला पेशव्यांनीं रांजणगांव इनाम दिलें होतें. नादिरशहाच्या स्वारीच्या वेळीं हिंगणे व दीक्षीत यांच्या मदतीनें यानें उत्तरहिंदुस्थानांत जाट, बुंदेले वगैरे सर्व लहान मोठे हिंदुसंस्थानिक एकत्र करून मुसुलमानांविरुद्ध एक जंगी कारस्थान उभारलें होतें, परंतु तें शेवटास गेलें नाहीं. सदाशिवरावभाऊसाहेबांचें व याचें पुढें न पटल्यानें दिल्लीहून हा परत साताऱ्यास आला. हा कोळुर येथें १७४९ त मेला ( म. रि. म. वि. ).

**अंताजी माणकेश्वर**—उत्तर हिंदुस्थानांतील पेशव्यांचा एक सरदार. ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. आडनांव गंधे. नगरजिल्ह्यांतील कामरगांवचा जोशीकुळकर्णी. जावळी प्रकर्णांतील राघोबल्लाळ अत्रे याचा नातु त्रिंबकपंत अत्रे हा अंताजीपंताचा मावसभाऊ असल्यानें त्याच्या आश्रयास अंताजी कर्‍हेपठारप्रांतीं आला. त्रिंबकपंत वारल्यावर त्याच्या मुलांचा प्रतिपाल व वतनगांवचा कारभार अंताजी व त्याचा वडील भाऊ हरि हे करूं लागले. अंताजी हा शाहूच्या पदरीं प्रथम उदयास आला. नंतर तिकडून पेशव्यांकडे बदलला. यानंतर १७५३ पर्यंतची त्याची हकीकत समजत नाहीं. त्यावेळीं त्यानें दिल्लीस बादशहास मदत केली. तिच्या बद्दल त्याला इटावा व फुफुंद हे दोन परगणे जहागीर मिळाले.

अंताजी पेशव्यांच्या तर्फे दिल्लींत फौज घेऊन होता, त्याचें व वकील हिंगणे यांचें पटत नव्हतें. त्याचें बीज असें कीं, अंताजी थोडासा स्वतःची प्रौढी मिरविणारा असून तो परभारें वजिराशीं वगैरे उलाढाली करूं लागला. हा प्रकार हिंगण्यास सहन झाला नाहीं. इ. स. १७५२–५३ त शिंदे होळकर दक्षिणेंत असल्यामुळें एकटा अंताजी पेशव्यांची पांच हजार फौज घेऊन पातशहाच्या संरक्षणासाठीं दिल्लीस होता. अंताजीनें फौज वाढविली तिला अगाऊ परवानगी घेतलेली नव्हती आणि तिच्या खर्चास पैसा नसून तारांबळ उडाली होती. पेशव्यानें अंताजीचा बंदोबस्त २०। १०। १७५३ रोजीं करून दिला. [ना. रो. १. ६९ ] अंताजी माणकेश्वराच्या कामगिरीचे उल्लेख (रा. खं ६, १४९. १८९. २०१) वगैरे ध्यानांत ठेवण्याजोगे आहे.

हिंगण्याबरोबरील तंट्यास मूळ कारण अंताजी माणकेश्वर असून, पैशावरून अंताजीशीं हिंगण्यांचा तंटा इ. स. १७५० पासूनच वाढत गेला ( ६. ४७९ ). कुंभेरीहून दिल्लीवर चाल करण्याच्या प्रसंगीं हा तंटा कळसास पोंचला होता. दामोधर महादेव पेशव्यास लिहितो, ‘ पातशाही तोफखाना ( कुंभेरीवर ) आणावयाची आज्ञा श्रीमंतीं केली. त्यास येथून तेथें ’ लिहावें, अर्ज करावा, तो वकील पदरचा करितात ऐसें अंताजीना सांगावें तेणेंकरून काम होणेस दिरंगाई पडावी. अंताजीपंताचे सांगितल्यावरी हा मजकूर व्हावासा नाहीं. परंतु अंताजीपंत सखारामपंत व्याही; सखारामपंत श्रीमंतांचें दिवाण, श्रीमंत वज्यास्वामीच ! असा प्रकार तेथें दर्शवून अंताजीपंत बोलतील तें आमचें बोलणें समजावें ऐसें सखारामपंतीं त्यांचें निदर्शनास आणून दिल्हें. याजकरितां आतां आम्हांस आज्ञा न करावी.” सखारामबापू व अंताजीपंत व्याही आणि रघुनाथराव भोळा व सखारामबापूच्या मुठींत, हा प्रकार पुष्कळांस जाचक झाला.

इ. स. १७५५ च्या एप्रिलांत रघुनाथराव हिंदुस्थानांत असतां पेशवा व अंताजी माणकेश्वर यांची भेट नाशिक येथें झाली. त्यावेळीं अंताजीस पेशव्यानें हिंदुस्थानांत रवाना केलें आणि रघुनाथराव सांगेल ती कामगिरी करण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें अंताजी तिकडे जात असतां फौज न ठेवतां खोटी गणती दाखवून अंताजी पैसे उपटतो असा संशय येऊन रस्त्यांत पेशव्याचे हुकमानें दोन वेळां फौजेची झडती मुद्दाम खात्रीच्या माणसांकडून करण्यांत आली. ती कमी न भरतां बरोबर सात हजार भरली असें अंताजी लिहितो. रघुनाथराव परत येत असतां माळव्यांत अंताजीची व त्याची भेट झाली. रघुनाथरावानें अंताजीस अंतर्वेदींत गोपाळराव गणेशाच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला. शिंदे वर्षभर मारवाडांत पेंचांत सांपडले असतां, त्याच्या मदतीस अंताजीस न पाठवितां, आपल्या मेव्हण्याकडे जाण्याचा हुकूम केला. यावरून शिंद्यांचें व रघुनाथरावाचें बरेंच बिनसलें होतें असें दिसतें. जुलै आगस्टांत अंताजीचा मुक्काम काल्पीजवळ यमुनातीरीं होता. त्यापूर्वीच जून महिन्यांत जयाप्पाचा खून झाला होता. सप्टेंबरांत दत्ताजी व जनकोजी यांस पेशव्यांचीं पत्रें पोंचल्यावर; त्यांनीं अंताजीस पत्र पाठवून मारवाडांत आपल्या मदतीस बोलाविलें. पेशव्यासहि तसें कळविल्याबद्दल त्यांनीं अंताजीस लिहिलें. या पत्रांत मारवाड स्वारीचा साद्यन्त वृत्तान्त शिंद्यांनीं अंताजीस कळविला. तेव्हां रघुनाथरावाचा हुकूम मानावा कीं,

शिंद्याचें ऐकावें, असें द्विधाचित्त अंताजीचें झालें. इतक्यांत मारवाडांत जाण्याविषयीं पेशव्याचा निकडीचा हुकूम अंताजीस आला. 'मातबर सरंजामानिशीं मारवाडांत जाऊन, साम, दाम, दंड, भेद युक्तीस पडेल तसें करून, शिंदे यास काढून घेऊन येणें ' तेव्हां गोविंदपंत बुंदेल्याकडून वीस लाख कर्ज घेऊन विजयादशमीच्या मुहूर्तानें(१४-१०-१७५५) अंताजी फौजेची जमवाजमव करीत मारवाडांत गेला. रस्त्यांत करवली व बुंदीकोटा येथील फौजा राठोडांच्या मदतीस येत होत्या. त्यांस पैका भरून अंताजीनें मागें वळविलें. जयनगरचा माधोसिंग, बिजेसिंगाचें साह्य हरप्रकारें करीत होता. सबब अंताजीनें जयपूरचा मुलुख लुटून त्यास तंबी पोंचविली. जयपूरचा अनिरुद्धसिंग याची व शिंद्याच्या फौजेची लढाई होत होती त्यांत ऐन वेळीं अंताजीची मदत आल्यामुळें शिंद्याच्या फौजेस मोठा धीर आला. मोठ्या शिकस्तीनें लढाई करून, अनिरुद्धसिंगास मराठ्यांनीं अडविलें; तेव्हां माधोसिंगानें घाबरून त्यास परत बोलाविलें. आणि अनिरुद्धसिंग अंताजीच्या छावणींत तहासाठीं गेला. नंतर जयपूरची फौज परत पाठवून अंताजी व अनिरुद्धसिंग शिंद्याच्या भेटीस आले. भेटी झाल्यावर सर्व फौजांनीं नागोरावर मारा सुरू करतांच बिजेसिंग मोठ्या हिंमतीनें पुनः चालून गेला. त्यांत त्याचा पूर्ण पराभव होऊन त्यानें तहाची बोली लाविली परंतु बिजेसिंगास काढून रामसिंगास संपूर्ण राज्य दिल्याशिवाय दत्ताजी तह करीना. त्यावरोबर, जरब बसून बिजेसिंग मराठे सांगतील त्याप्रमाणें तह करण्यास कबूल झाला. अंताजीपंताच्या मार्फत तह ठरला. फार ओढून धरूं नये असें अंताजीनें दत्ताजीस सुचाविलें.

हिंगण्याचा बंदोबस्त राघोबानें केला, तसा अंताजी माणकेश्वराचा इ.स.१७५८ त केला. पुढें अंताजीस पकडून दाक्षिणेंत पाठविलें कीं काय तें समजत नाहीं. इ. स. १७५९ च्या अखेरीस तो पुण्यांत असून सदाशिवराव त्याचे हिशेब तपासीत होता ( ३. २३३ ). मेरट वगैरे महाल अंताजीकडे होते. ते दूर करून सात लक्ष रुपये सरकारांत देण्याच्या करारावर डिसेंबर १७५८ त ते बापूजी महादेवाकडे देण्यांत आले ( ६. ४७१ ). एकंदरींत अव्यवस्थेची कमाल झाली होती, ती सर्व सदाशिवरावानें तोडिली. त्यानें हिंगणे व अंताजी माणकेश्वर यांच्या प्रकरणांचा तपास करून निकाल लावून दिला ( ३. २३३ ) आणि लगेच पुढें स. १७६०च्या आरंभीं अंताजीपंत आपल्या कामावर रुजू झाला. सदाशिवराव दिल्लीस असतां हे सर्व सरदार रेशमासारखे मऊ येऊन त्याच्या केवळ भजनीं होते.

पानपतच्या लढाईनंतर अंताजी माणकेश्वर, बाजी हरि, नाना पुरंदरे व मल्हारराव होळकर असे रात्रीं दिल्लीचे सुमारें चालले असतां दांडग्यांच्या हुल्लडींत फरुखाबादच्या जमीनदाराच्या हातून अंताजी माणकेश्वर व बाजी हरि ठार झाले

अंताजीच्या मुलाचें नांव वहिरोपंत. अंताजीपंताचे वंशज हल्लीं उत्तरहिंदुस्थानांत भेलशें येथें रहात आहेत. त्यांनीं आपलें आडनांव ' मांडके ' असें लाविलें आहे( भा. इ. सं. मं त्रैमासिक वर्ष ३ अंक २-३-४ )

**अंताजी रघुनाथ**—आडनांव कावळे, मालाड ( ठाणें जिल्हा)चा सरदेसाई व इनामदार. हा मोठा शूर व हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता. साष्टी प्रांतांत हिंदूंनीं आपलीं धर्मकृत्यें प्रसिद्धपणें करूं नयेत असा फिरंग्यांनीं हुकूम काढला होता. अंताजीपंतांनीं आपल्या प्रांतांत हा हुकूम अंमलांत आणला नाहीं आणि इतरांनांहि तो तोडण्यास उत्तेजन दिलें व पेशव्यांकडे याबद्दल फिर्याद केली. तेव्हां फिरंग्यांनीं पंतांचें इनाम जप्त केलें व त्यांनां पकडण्याचा प्रयत्न केला. परंतु पंत पळून पुण्यास गेले. त्यांच्या सांगण्यावरून पेशव्यांनीं साष्टीवर हल्ला केला ( १७३१ ); व त्यांच्या सांगण्यावरूनच अर्नाळा किल्ला घेतला आणि ठाणें किल्ला व बहुतेक साष्टी प्रांतहि ( १७३७पर्यंत ) काबीज केला. याला मराठ्यांच्या पदरीं पुढें तैनात मिळाली. ( म. रि. म. वि. )

**अंतालिआ**—भावनगर संस्थानांतील ( काठेवाड ) एक ठिकाण. लोकसंख्या ६१३ ( १८८१ ). येथें अंताळेश्वर महादेवाचें स्वयंभू देऊळ आहे. लेवाकुणब्यांनां या देवस्थाविषयीं फार आदर असून जातीमधील भांडणें मिटविण्यासाठीं ते याठिकाणीं येतात. खुमान लोकांचे येथें बरेच स्मारकदगड आहेत. अठराव्या शतकाच्या अखेरीस भावनगरच्या ठाकोर वखतसिंगजीनें हें गांव जिंकून घेतलें.

**अंतुर्ली**—मुंबई. पूर्व खानदेश. भुसावळ तालुक्यांत एदलाबादच्या उत्तरेस १२ मैलांवर हें गांव असून येथें एक २०० वर्षांपूर्वीची विटांनीं बांधलेली विहिर आहे.

**अंतूर**—हैद्राबाद संस्थान. औरंगाबाद जिल्ह्याच्या कन्नड तालुक्यांतील एक प्राचीन किल्ला. उ. अ. २०° २७' व पू. रे. ७५° १५'. हा किल्ला पंधराव्या शतकांत एका मराठा संस्थानिकानें बांधला. पुढें तो अहमदनगरच्या पातशहानें जिंकला व नंतर औरंगजेबानें तो आपल्या राज्यास जोडला. किल्ल्यावर एक चतुष्कोनी स्तंभ असून त्यावर इ. स.१५८८ सालचा एक फारसी लिपींत शिलालेख आहे.

**अंतोबा गोसावी**—समर्थ रामदास स्वामींचा शिष्य. सातार प्रांतांत मेथवड म्हणून जो गांव आहे तेथील हा रहाणारा असे. समर्थांनीं यास पंढरी येथें आषाढी कार्तिकीस जात जावें म्हणून आज्ञा करून त्यास तेथें एक मठ बांधून देवविला होता. असें सांगतात कीं समर्थच या दोन्ही वाऱ्यांस कित्येक वर्षें जात असत. परंतु पुढें आपणास न बनल्यास यानें जात जावें असें सांगितल्यावरून हा जाऊं लागला. ( कवि चरित्र. )

**अंत्रपुच्छदाह** ( अपेंडिसाइटीज )— अंत्रपुच्छ ( अपेंडिक्स ) ही एक बरीच लांबट आणि अरुंद अशी अंताकृति नळी मोठ्या आंतड्यापासून निघालेली असते.

हिचा आकार सुमारें ३ इंच लांब व जाडी अगदी बारीक बोरूएवढी असते व त्यामुळें तिचा आकार मोठाल्या जंता-प्रमाणें दिसतो. ती आंतून पोकळ असून त्या पोकळीचें मोकळें तोंड मोठ्या आंतड्यांतील पोकळीशीं जोडलेलें असतें व त्याच्या मुखावर अपुरा असा पडदा असतो. गर्भावस्थेंत जो आंतड्याचा भाग गर्भाच्या पोटांत प्रथम असतो त्याचा हा अवशेष आहे, व ही नळी मूल उपजल्यावर इतर प्राण्यांत जशी नाहींशी होते तशी मानवी प्राण्यांत नाहींशी होत नाहीं व पुढें हीमध्यें दाह, अथवा पू उत्पन्न होऊन ती भयंकर रोगास कारणीभूत होते. या नळीचें दुसरें टोंक बंद असून कशासहि चिकटलेलें नसून सुटें असतें. यामुळें तिचें गांडूळ किंवा किड्याशीं बरेंच साम्य दिसतें. या नळीच्या पोकळींत दाह, सूज अगर पू होतो त्यासच वरील नांव दिलेलें आहे. पूर्वी हा रोग माहीत नव्हता असें नाहीं तरी पण हल्लींच तो रोग होणारे रोगी जास्त प्रमाण्यांत येतात हें खरें आहे. यूरोप व अमेरिकेमध्यें त्याची विशेष दहशत बाळगीत असल्याकारणानें आगाऊ सावधगिरी म्हणून पुष्कळ लोक हा रोग झाला नसतांना देखील ही उपद्रवदायक नळी शस्त्रवैद्याकडून काढून टाकवितात. व तिचा शरीरांत कांहीं उपयोग नसल्यामुळें त्यापासून कांहीं तोटा न होतां हा रोग होण्याची धास्ती रहात नाहीं.

हा दाह तरी कां व्हावा हें गूढच आहे व अमुक जंतूच्या योगानें त्यास आरंभ होतो असें शास्त्रज्ञ लोकांस अद्याप सिद्ध करतां आलें नाहीं. कांहीं विद्वानांची अशी दृढ समजूत आहे की इनूफ्लुएंझा रोगानंतर अथवा जस्ताच्या मोहोरबंद डब्यांतून विकलीं जाणारीं अपरिमित खाद्यें खाण्यानें हा रोग होतो. अथवा लेंकरें नानातऱ्हेचे जिन्नस, टांचणी बिया, खडे, मुइमुगाचे दाणे, वाटाणे वगैरे गिळतात, अगर खातात व त्याचा अपक्व भाग आंतड्यास टोंचून दाहाची क्रिया सुरू होते व रोग होतो. कित्येकवेळा आंतड्यांतील विष्ठेचे घट्ट खडे बनतात व व असे खडे या भागांत अडकले असतां दिसण्यांत ते खारकेच्या बिया असतात त्याप्रमाणें दिसतात, व ते आंतील नाजुक त्वचेस इजा करून दाह वगैरे उत्पन्न करतात व त्यामुळें नळीस छिद्रहि पडतें व या छिद्रांतून पू व विषारी जंतूमिश्रित स्राव बाहेर पडतो. उदर व नितंब यांतील पोकळ जागेंत जीं नाना प्रकारचीं इंद्रियें आहेत ( आमाशय, मोठें आंतडें, यकृत, मूत्रपिंड इ. ) ती सांवरून धरणारा एक अंत्रावरण ( पेरिटोनियम ) म्हणून पडदा अथवा आवरण आहे त्यांत ही घाण पसरते व त्या पड्याचाहि दाह सुरू होतो. हा दाह थोड्या जागेंतच राहिला, वरील दूरच्या इंद्रियांत पसरला नाहीं तर सुचिन्हच म्हणावयाचें. परंतु तो फैलावण्याची धास्तीहि फार असते व त्यांत रोगी दगावतो. भलतेसलते अजाणपणानें गिळलेले पदार्थ आंतड्यांत जाऊन नंतर तेथील बारीक नळींत अडकून बसतात हें वर सांगतलेंच आहे. शिवाय अजीर्ण होऊन न पचलेल्या अन्नाचे कण, भाजी पाल्यांतील न पचणारा असा तंतुमय भाग, ज्यांचें चर्वण नीट होत नाहीं असे खाण्याचे पदार्थ ( उसळी वगैरे ) हींहि हा रोग उत्पन्न होण्यास कारणें होतात. कित्येक वेळां असें घडतें कीं अंत्रपुच्छाच्या पोकळींत वर लिहिल्याप्रमाणें कांहींहि पदार्थ न अडकतां ती नळीच दुमडली, अथवा दबली जाते अथवा तिला पीळ पडतो आणि मग आंतील पोकळ जागा आंत्ररसानें फुगून ताठ दिसूं लागते व तो आंत कोंडलेला दूषित आंत्ररस बाहेर पडण्यास अवसर नसतो. केव्हां असेंहि घडतें की क्षय अथवा व्रण ( कॅन्सर ) या रोगास बळी पडलेल्या शरीरांत या नळींत त्या रोगांत आढळून येत असलेल्या प्रकारची दाहक्रिया सुरू होते, व पाठोपाठ त्या स्रावामुळें नळीचें तोंड बंद होतें. या रोगास भयंकर समजण्याचें कारण हा स्राव ती नळी फुटून वर सांगितलेल्या अंत्रावरणपडद्याच्या द्वारें पसरून अंत्रावरणदाह ( पेरिटोनिटिस ) उत्पन्न करितो. औषधोपचार अथवा शस्त्रक्रिया करावयाची ती या धोरणानेंच ठरवावयाची असते.

**रोगाचीं लक्षणें.**—रोगास आरंभ कित्येक वेळां अगदी सौम्य तऱ्हेनें होतो म्हणजे थोडेंसें अजीर्ण झाल्यासारखें वाटणें, जरा पोटांत दुखणें व वांति, होणें इ. हीं सर्व लक्षणें कांहीं दिवसांनीं नाहींशीं होतात. क्वचितप्रसंगी आरंभच इतका झपाट्यानें होतो कीं वरील सर्व लक्षणें अगदींच असह्य अशीं होऊन एका दिवसांत अगर थोड्याशा तासांतहि रोगी दगावतो. ढोबळ लक्षणें अशीं आहेत कीं पोट दुखणें हें बेंबीच्या खालीं उजव्या बाजूस अथवा बेंबीच्या थोडे उजवीकडे व डावीकडे सुरू होतें कित्येकदां अमुकच विवक्षित जागीं दुःख नसून सर्वच पोट दुखतें व कधींतर पोट दुखणें हें मुख्य लक्षण नसतेंच. थोडासा ताप( १०१°–१०२° पर्यंत) असतो व पुष्कळ मळमळणें व त्याबरोबर वांतीहि सुरू होते. पोट दाबून पाहिलें असतां दाबणें रोग्यास सहन होत नाहीं, व वर पोट दुखण्याचीं स्थानें सांगितलीं आहेत त्याठिकाणीं किंचितहि हातलावणें अथवा दाबणें सहन करवत नाहीं त्या जागीं हातास थोडी फार फुगवटी पण लागते. हें दुखणें दोन, तीन अगर चारहि दिवसांनीं हळू हळू कमी होतें व थांबतें. कित्येक रोग्यांमध्यें हीं लक्षणें इतकीं स्पष्ट मुळींच नसतात. पण रोग लपुनछपून अंत्रपुच्छाच्या नळींत वर लिहिल्याप्रमाणें भयंकर धोक्याचें बीज पसरीत असतो व बाह्यलक्षणें तर किंचित पोटदुखीशिवाय विशेषशीं नसतात पण एकदम रोगाचें भयंकर स्वरूप प्रगट होतें. कांहीं रोगी असे असतात कीं हें दुखणें त्यांच्या ठिकाणी वरचेवर उत्पन्न होतें व बरेंहि होतें व हा क्रम कित्येक महिने अथवा वर्षें चालतो. अंत्रपुच्छाच्या नळींत फक्त दाहच सुरू आहे कीं व्रण होणें

सुरू आहे किंवा पू होत आहे हें अगोदर समजणें व सांगणें मुष्किलीचें आहे व तें कळण्यापासून त्या रोगाचें निदान करण्यास सोपें जाइल असाहि प्रकार नसतो. रोग्याच्या लक्षणांवरून या भेदाचें अनुमान करण्यांत येतें आणि वर सांगितलेंच आहे कीं या रोगांतील लक्षणें इतकीं सूक्ष्म असतात कीं दुसराच रोग झाला असावा असेंहि निदान होण्याचा संभव असतो. शस्त्रवैद्यांच्या दृष्टीनें रोग्याच्या एकंदर स्थितीचा विचार त्यांच्या नाडीच्या १०० ठोक्यांचें प्रमाण व उष्णमानमापक यंत्रानें मोजलेली शरीराची उष्णता यांवर मुख्यतः अवलंबून असतो. यास अपवादात्मक असेहि कांहीं रोगी आढळण्यांत येतात. वरील दोन्हीं तिन्ही लक्षणें त्यांत सौम्य असलेलींच नजरेस येतात परंतु अनुभविक शस्त्रवैद्यास आंतील होत असणाऱ्या भयंकर रोगाचें लक्षण चटकन ध्यानांत येऊन त्याची दिशाभूल होत नाहीं. इकडे रोगी म्हणतो माझें पोट दुखत नाहीं, नाडीचा वेग नेहमीप्रमाणें असतो, तापहि नसतो पण शस्त्रवैद्यानें पोट चिरून आंत पहातां ही अंत्रपुच्छनलिका सुजून छिद्रें पडलेली व वाळून घाण वास मारीत असलेलें एक गळूंच बनलेली दिसते आणि दाहाची क्रिया भोंवतालच्या आंतड्यापर्यंत पसरलेली नजरेस येते. या स्थितीचा अचुक अजमास पोट उघडून बघण्याच्या अगोदर करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें रोगाचा शेवट कशा तऱ्हेनें होणार हें भविष्यहि नीट व बिनचूक सांगणें शस्त्रवैद्याच्या हातीं नसतें.

एका साधारण शिकल्या सवरलेल्या गृहस्थास हा रोग लक्षणांवरून कसा ओळखावा अशी कल्पना करून देणें असल्यास येणेंप्रमाणें रोग्याची हकीकत व लक्षणें कळलीं असतां हाच रोग असावा असें त्यासहि अनुमान करतां येईल. समजा एका मुलाला वारंवार अपचन होण्याची खोड आहे आणि एखादें ढाळक औषध घेऊन तें बरें झाल्यासारखें वाटतें. मुलगा नंतर खेळावयास जाऊन घामाघूम होईपर्यंत खप खेळून थंडगार अशा जमिनीवर बसला; अथवा खूप चालून येऊन अगर सायकल अथवा घोड्यावर बसून दमेपावेतों सहल करून आला व येतांना पावसानें चिंब भिजला तर अशा वेळीं त्याचीं रोगास प्रतिकार करण्याची अंगांतील निसर्गदत्त शक्ति एकदम कमी होते आणि मग त्याच्या आंतड्यांतील विषारी जंतूंचा जो बुजबुजाट असतो त्यांचा हल्ला अंत्रपुच्छनलिकेवर चढविला जातो. त्याला नंतर कसेंसेंच वाटूं लागतें व आळेंबळें तो जेवलाच तर मागून त्याला तें अन्न ओकून पडूं लागतें. याचें कारण पचनेंद्रियांतील सर्व मज्जातंतु आंतड्यांतील दाहामुळें क्षुब्ध झालेले असतात. अन्न ओकून पडल्यावर अमल बरें वाटतें न वाटतें तों पोटांत आणि मस्तकांत दुखूं लागतें आणि बहुशः त्यास थंडी वाजून येते. या सुमारास त्याच्या उजव्या जांघाड्याचा जो मध्यबिंदु आहे त्याच्या अंमळ वर पोटामध्यें असह्य शूळ उत्पन्न होतो, तेथें स्पर्शहि सहन होत नाहीं. व बोटानें जरा चेपल्यास टणकपणा लागतो. या दुःखाच्या जागेवरचा दाब कमी व्हावा व पोट सैल पडावें म्हणून रोगी बहुधा आपली उजवी मांडी जराशी उभारतो. त्याचा चेहरा कधीं फिकट तर कधीं लाल;व व्याकुळ दिसतो व जबर दुखणें आलें आहे असें चेहऱ्यावरून दिसतें. उष्णमानमापक यंत्रानें पहातां ९९°–१००° पासून तों १०१°–२° पर्यंत ताप आढळून येतो व नाडीचे ठोके दर मिनिटास ९०–१०० असतात अगर अधिक प्रमाणहि असतें. दुःखाच्या भोंवतालची त्वचा काळवंडलेली अगर लालसर दिसूं लागते.

इतकीं लक्षणें असल्यावर मग शंकेचें कारणच नाहीं. पण हा सर्व प्रकार अवघ्या १०।११ दिवसांतच घडला असेल तर रोगाचें पर्यवसान रोगमुक्ततेंत होईलच असें सांगणें हुषार शस्त्रवैद्यासहि जड जाईल.याचे दोन प्रकार शक्य आहेत ते असेः मुलगा एकसारखा बिछान्यावर पडून राहिल्यास तो भाग शेकून व कडकडीत उपवास करून हीं सर्व लक्षणें थांबतील व दाह शांत होईल. उलटपक्षीं इतकी चोख व्यवस्था ठेवून मुलाचें जास्तीच होऊं लागेल असेंहि संभवनीय आहे. आणि शस्त्रक्रिया या वेळेच्या आणखीहि पुढें ढकलल्यास वर वर्णन केल्याप्रमाणें अंत्रावरण या पडद्याद्वारें दाह पसरून मृत्यु खास येईल.

पण असें मानण्यास हरकत नाहीं कीं, यावेळपावेतों रोग फक्त अंत्रपुच्छनळींतच आहे व ती फुटून अंत्रावरण पडद्यापर्यंत पोंचला नाहीं. मग आतां कोणता मार्ग स्वीकारणें श्रेयस्कर आहे हें ठरविलें वरें. कांहीं वैद्य असा सल्ला देण्याचा संभव आहे कीं या रोगावर वरीलप्रमाणें उपचार चालू ठेवून तीन चार दिवसांत शमन करावें व सर्व लक्षणें शमल्यानंतर रोग निद्रितावस्थेंत असतो व तेव्हां शस्त्रक्रिया केली असतां परिणामीं कार्यसिद्धि होऊन रोग्यास उतार चांगला पडतो असा अनुभव आहे. पण प्रश्न येवढाच कीं जर अजमासाप्रमाणें तीन चार दिवसांत लक्षणें शमलीं नाहींत व उलट बळावत गेलीं तर काय करावयाचें ? ज्या थोड्या रोग्यांमध्यें अंत्रावरणपडद्यापर्यंत दाह पसरतो त्यांतीलच हा रोगी कदाचित असूं शकेल. लक्षणें कमी होतील असें खात्रीनें कोणासहि सांगतां येणें शक्य नाहीं. कधीं असेंहि घडतें कीं पोटदुखीचा विकार वर वर्णिल्याप्रमाणें मृत्यु येऊन आयुष्यांतील अखेरचाच ठरावयाचा. पुनः पुन्हां शूल उद्भवणारे या रोगांतील रोगी साध्य असतात. व अकल्पित दाह होणारे असाध्य असतात. आतां हा रोगी या दोन प्रकारांपैकीं कोणत्या प्रकारांतला आहे हें सांगणें शक्य नसल्यामुळें कालक्षेप न करतां शस्त्रक्रिया करणें हाच शहाणपणाचा मार्ग होय. अंत्रपुच्छनालिका काढून टाकणें व अंत्रपुच्छापासून अंत्रावरण रोग पसरूं न देणें या दोन गोष्टींकडे शस्त्रक्रिया करणाऱ्यानें अवश्य लक्ष्य पुरविलें पाहिजे.

ज्या रोगाची कष्टसाध्य अवस्था असते त्याची याप्रमाणें स्थिति होते, सर्वच लक्षणें एकदम वाढतात. चेहरा अतिःत्रस्त व व्याकुळ होतो, आंतडीं शक्तिहीन झाल्यामुळें आंत वायु सांठतो. सर्व पोटास मोठी फुगवटी येते व पोटास ताण बसल्यानें रोगी दोन्ही मांड्या उभ्या करून पडलेला असतो. नाडीचें प्रमाण दर मिनिटास १२०ते१४० ठोक्यापर्यंत वाढतें, व ताप १०४° पर्यंत अगर जास्त चढतो. पोटांतील दुःख व सुजलेली जागा ही दोन्ही वाढत जातात व त्याच्या उजव्या बाजूस गळू बनतें. हें बाहेर क्वचितच फुटतें, पण बहुधा आंत फुटून अंत्रावरणपडदा बिघडवून टाकितें. मग रोग्यास अतीशय घाम सुटतो सगळें त्याचें रक्त जंतुमय पू रक्तांत मिसळल्यामुळें दूषित झालेलें असतें व शरीरास अति ग्लानि येऊन एकदोन दिवसांत मृत्यु येण्याचा संभव बराच असतो.

हा रोग म्हाताऱ्या कोताऱ्यापेक्षां तरुण माणसांतच जास्त पाहाण्यांत येतो. व त्यांतल्या त्यांत मुलींपेक्षां मुलांस या रोगानें पछाडल्याची उदाहरणें अधिक सांपडतात. एखाद्या कुटुंबांतील सर्व अगर पुष्कळ मंडळींतच अंत्रपुच्छाच्या कांहीं विकृत रचनेमुळें हा रोग आढळतो. दुखण्यास निमित्त थंडी बाधणें, श्रम पडणें, ओझें उचलल्यामुळें लचक भरणें अगर पोटावर मार बसणें हीं होत. यामुळें विकारी जंतूंची टोळधाड आंतड्यांतील मऊ त्वचेवर हल्ला करून अंत्रपुच्छाचा दाह सुरू होतो. हिंदुस्थानचे माजी बादशहा सातवे एडवर्ड यांस त्यांच्या राज्याभिषेकाचा उत्सव चालू असतांच एकाएकीं हा रोग होऊन एकदम त्यांस शस्त्रक्रिया करावी लागली. हा भयंकर रोग दोन प्रकारचा आहे. १सौम्य रोग—एखाद्या माणसास अन्नाचे मोठाले घांस करून ते नीट न चावतां जेवण भराभर उरकण्याची संवय असते अगर कोणाचे दांत नीट नसल्यामुळें अन्नाचें चर्वण नीट होत नाहीं. अशा लोकांस हा रोग होतो. त्यांनीं प्रथम दांत अधू असल्यास ते नीट करवून अगर नवे बसवून घ्यावे अशा लोकांचीं लक्षणें म्हणजे, कोठें अपचन, मळमळणें व पोटांत अस्वस्थता वाटणें, पोटांत अंत्रपुच्छाचे जागीं किंचित दुखणें यासारखीं सौम्य असतात. कधीं कधीं अगोदर कांहीं दिवस बद्धकोष्ट झालेला असतो. या वेळीं पूर्ण विश्रांति, शेक, लंघन सौम्य जुलाब अगर बस्ति यांच्या योगानें प्रकृति पुनः ताळ्यावर आणावी. पण रोगाचें हें सौम्य स्वरूप पालटून वर वर्णिलेल्या भयंकर स्थितींत त्याचें रूपांतर केव्हां होईल याचा नेम नसतो. म्हणून असा विकार असलेल्या लोकांनीं येवढें लक्षांत ठेवावें कीं एक दोनदां अशा प्रकारचें दुखणें आलें असतां पुढें रोग निद्रितावस्थेंत असतांनां कुशल शस्त्रवैद्याकडून अंत्रपुच्छ काढवून टाकावें. अनुभव असें शिकवितो कीं, या अशा स्थितींत केलेल्या शस्त्रक्रियेपासून कांहींहि धोका नसून पुढील आयुष्यांतील जिवास असलेला धोका मात्र पूर्णपणें नाहींसा होतो. (२) दुसरा प्रकार म्हणजे कित्येक रोग्यांस वरीलप्रमाणें सौम्य सर्व लक्षणें असतातच. पण त्यांची प्रकृती अगदीं निरोगी अशीहि कधींच नसते; अगर त्यामुळें त्यांस अगदीं अंथरूणच धरावें लागतें अशांतलाहि प्रकार नसतो. जराशी मळमळ, पोटदुखी व पोटांत कलकलल्यासारखें वाटणें येवढींच लक्षणें असल्यामुळें, अजीर्ण असेल एवढ्यावर मनुष्य विशेष उपचाराच्या भानगडींत पडत नाहीं पण या निद्रित असलेल्या पोटांतील अंत्रपुच्छ ज्वालामुखीचा प्राणघातक स्फोट केव्हां होईल याचा भरंवसा नसल्यामुळें शस्त्रवैद्यानें अशा रोग्यास एकदम अंत्रपुच्छ काढून टाकण्याविषयीं आग्रहाचा उपदेश करावा. कारण असें न केलें तर प्रसंग असा येतो कीं, याचें भयंकर स्वरुपांत प्रगट होणें आणि रोगी अशा ठिकाणीं असणें कीं जेथें कुशल शस्त्रवैद्य, व इतर सोयी साधनें मिळणें केवळ अशक्य असणें, या दोन्ही गोष्टी एकदम जुळून येतात. पोटामध्यें असलें विकृत अंत्रपुच्छ ठेवून त्याकडे डोळेझांक करून वर लिहिल्याप्रमाणें जीव धोक्यांत घालण्यापेक्षां आपणाला जशी कालाची, जागेची व द्रव्याची सवड असेल त्याप्रमाणें आपल्या मनाचा ठाम निश्चय करून अनुकूल प्रसंगींच शस्त्रक्रिया करवावी व महिन्या दीड महिन्यांत बरें व्हावें हें फार उत्तम.

उपचार.—सौम्य रोगांत रोग्यानें कसें वागावें व त्यामुळें रोग बरा कसा होतो हें वर आलेंच आहे. पुष्कळ विद्वानांचें असें मत आहे कीं, शस्त्रक्रियेची जरूर न पडतां जन्मभर मनुष्य सुखानें राहतो. सौम्य स्थितींतील रोगी पुष्कळ असतात. पण शस्त्रवैद्याचें म्हणणें असें पडतें कीं, रोगाच्या तीव्र स्थितींत म्हणजे पहिल्या एक दोन दिवसांत शस्त्रक्रिया केली असतां बहुधा चांगला उपयोग होतो. पण जर अंत्रावरण पड्यापर्यंत अंत्रपुच्छ फुटून अगोदर पोंचून त्या पड्याची दाहक्रिया सुरु झाली असेल तर शस्त्रक्रियेनंतरहि यश येईलच असा भरंवसा नसतो. पण अशामध्यें शस्त्रक्रिया केली नसली तरी हाच परिणाम होऊन रोगी दगावला असता. तेव्हां शस्त्रक्रिया केल्यामुळें अंत्रावरण पड्याची दाहक्रिया उत्पन्न झाली असें नव्हे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. निसर्गानें रोग बरा करण्याची थोडीफार तजवीज करून ठेविलेली असतेच; तिचा या रोगांतील अनुभव येणेंप्रमाणें येतोः—भोंवतालचीं आंतड्याचीं जीं वेटोळीं असतात त्यांमधून अशा वेळीं चिकट लस उत्पन्न होऊन त्यायोगें तीं आंतडीं चिकटून बसतात व त्यांवर जे शरीराचे स्नायु, इंद्रियें, त्वचा इत्यादि भाग असतात तेहि अंत्रपुच्छाचे गळवाभोंवतीं वर सांगितलेल्या लशीच्या योगानें चिकटून बसून तें गळू चोहोंबाजूनीं कोंडलें जातें व गळवांतील पू व विषारी जंतू अंत्रावरणमार्गें उदरांतील इतर भागांत पसरविण्याचें भय टाळलें जातें. पण असें होईलच याचा नेम नाहीं. ही आपले हातची गोष्ट नाहीं, व शस्त्रक्रियेस उशीर करवा तर पोट चिरून पहातांच त्यास कळून येतें कीं रोगानें विष फैलावण्यांत अगोदरच पुष्कळ मजल गांठली आहे व शस्त्रक्रियेचा

उपयोग होणें कठिणच आहे. हें मोठें तारतम्याचें काम आहे. व शस्त्रवैद्यहि खालीं लिहिल्याप्रमाणें सल्ला देईलः–विश्रांति, उपवास, शेक या योगानें रोग शमला आहे अगर हा रोग सौम्य स्वरूपांत त्याच रोग्याचें ठिकाणीं एक दोन वेळां प्रगट झाला आहे असा पूर्ववृत्तांत असेल तर तो शस्त्रक्रिया केव्हां करावयाची हें तारतम्यानें आपलें आपण ठरवील. व त्यास तसें करून रोगावर सक्त नजर ठेऊं देणें इंच योग्य आहे. कधीं कधींतर असें घडतें कीं रोगाचा फारच भयंकर स्वरूपांत आरंभ होतो पण विश्रांति, शेक वगैरेमुळें तावडतोब शमन होतें. अशा वेळीं रोगाच्या निद्रितावस्थेंतच अंत्रपुच्छ काढून टाकावें असेंच शस्त्रवैद्याचें मत पडेल. मूळ रोग उत्पन्न झाल्यादिवसापासून सुमारें पंधरा दिवसांनीं रोगाच्या निद्रितावस्थेंत शस्त्रक्रिया केलेली चांगली. म्हणजे त्यायोगें त्या सडलेल्या अंत्रपुच्छामुळें पुढें पोटदुखीचे झटके येऊन प्राणावर बेतण्याचे प्रसंग टळतील. जर शस्त्रवैद्याच्या नजरेस असें आढळलें कीं वरील सौम्य उपचार करूंन उलटीं रोगाचीं लक्षणें सर्व बळावतच आहेत, तर एकदम शस्त्रक्रिया करण्यास तो तयार होईल. उत्तम पक्ष म्हणजे जेथें जेथें शंका वाटेल तेथें शस्त्रक्रिया न करण्यापेक्षां ती करणें हा होय. रोग्याची अगोदरची माहिती जेथें मिळण्यासारखी असते तेथें रोगाची तीव्र अवस्था पार पडल्यानंतर निद्रितावस्थेंत अंत्रपुच्छ काढून टाकावें. पण अशी माहिती न मिळेल तेथें शस्त्रक्रियाच उत्तम.

शस्त्रक्रिया न केली असतां रोग कसा वाढतो त्याचें वर्णन.— जेथें ही अंत्रपुच्छाची नळी पोटांत असते त्यावरील अंत्रावरणाचे पोकळींत पू होऊन गळूं बनतें व वर वर्णिल्याप्रमाणें त्याच्या भोंवतालचीं आंतडीं एकमेकांस लशीमुळें चिकटलीं असल्यास त्या हद्दींतच पू कोंडून रहातो आणि जसजसें गळू मोठें होतें तसतसा त्यावर ताण पडून पू बाहेर वाहून जाण्याची अवश्यकता जास्त भासूं लागते. निसर्गाच्या नियमाप्रमाणें जिकडे प्रतिकार कमी असतो त्या बाजूकडेच पू पसरतो व हीं ठिकाणें म्हणजे आंतडीं अगर मूत्राशय हीं होत. हीं इंद्रियें दूषित करून मग पू अंत्रावरणाच्या पोकळींत शिरून तेथें दाहाक्रिया नांवाचा एक रोगच उपस्थित करतो. अगर हा पू यकृताकडे वळून फुफ्फुसाचे खालीं एक मोठें गळूं बनतें. पुवाचा मोर्चा दुसरीकडे वळल्यामुळें अंत्रपुच्छामधील ताण कमी होऊन रोगी मला बरें वाटत आहे असें म्हणतो. दुःख व ताप कमी होतो, मात्र नाडीच्या ठोक्यांचें प्रमाण फार वाढतें. आंतड्यांत वायूचा गुबारा धरतो व त्यामुळें फुफ्फुसावर खालच्या बाजूनें दाब बसून श्वासोच्छ्वास अडचण पडूं लागते; उचकी लागते, अतिशय घाम सुटतो आणि मग शस्त्रक्रिया करा अगर न करा रोग्यावर मृत्यूचा पगडा जास्त बसल्याचीं चिन्हें दिसूं लागतात. हा पू जिकडे मऊ जागा सांपडेल तिकडे न वळतां अंत्रपुच्छावरील मांस व त्वचेमध्यें प्रवेश करून साध्या गळवाप्रमाणें पोटाच्या त्वचेंतून आपोआप बाहेर पडेल तर रोगी बरा होण्याच्या दृष्टीनें ती फार उत्तम गोष्ट आहे व असें क्वचित घडतेंहि. पण ही गोष्ट घडवून आणणें आपल्या हातचें नाहीं. असें झालें असतां पोटांत जी गांठ (अंत्रपुच्छाच्या गळवाची) लागते तीवरील त्वचा तांबूस होऊन तेथें रोगी हात लाऊं देत नाहीं. थोडी सूज तेथें दिसते व हातास बिलबिलीतपणा थोडा भासतो. हा पू त्वचा फुटून बाहेर पडतो व तो अत्यंत दुर्गंधिमय असतो. मात्र त्यामुळें रोग्यास फारच आराम वाटूं लागतो. पण हें आपोआप घडून आल्यावर रोगी वांचत नाहीं. कारण मध्यें अवधी बराच लोटतो. यासाठीं शस्त्रक्रियेनें हीच गोष्ट लवकर घडवून आणावयाची असते. म्हणजे अंत्रावरणाचा दाहरोग न होता रोगी बचावतो.

शस्त्रक्रिया करण्याचा उद्देश व वर्णन.—अशा वेळीं शस्त्रवैद्य चाकूनें त्वचा कापून त्या गळवांतील सर्व पू बाहेर पडेल अशी तजवीज करतो. त्याच्या हातास ही सडलेली अंत्रपुच्छनळी सहज लागली तर तीहि तो काढून टाकतो. पण ढवळाढवळ करून तो ती मुद्दाम शोधींत बसत नाहीं. कारण असें करण्यानें आंतडीं भोंवतालीं मोहोरबंद केल्याप्रमाणें चिकटून विषारी पू अंत्रावरणाच्या पोकळींतच शिरण्याची जी निसर्गसिद्ध व्यवस्था असते ती मोडली जाते व त्यांत पू शिरतो. हें गळूं तो साध्या गळवाप्रमाणें धूतहि बसत नाहीं. कारण त्या क्रियेपासूनहि वरच्याप्रमाणेंच धोका असतो. येणेंप्रमाणें बरेच रोगी फक्त त्वचेस तोंड पाडणें व सर्व पू बाहेर पडण्याची उत्तम व्यवस्था राखणें या उपायामुळें बचावतात. बाहेर पडणाऱ्या पुवामध्येंच ती नासलेली अंत्रपुच्छनलिका मागून पडून जाते व पुढें मग काळजीचें कांहीं कारण उरत नाहीं. पण कधीं कधीं ही नळी पडून जात नाहीं व जखम भरून आली तरी मग रोग्यास पुनः पोटशूळ, ठणकपणा वगैरें लक्षणें होतात; व ही नळी काढून कायम रोगमुक्त होण्यासाठीं पुनः शस्त्रक्रिया करून घेणें हितावह असतें. कधीं असें घडतें कीं बाहेरील जखम पूर्ण बरी न होतां तींत छिद्र राहून त्यांतून दुर्गंधियुक्त पुवाचा स्राव होतो. या छिद्रांत शस्त्र वैद्यानें आपली सळई घातली असतां बहुधा ती आंतड्यांत जाते. भोक आपोआप बंद न झाल्यास तें मिटविण्याकरितां शस्त्रक्रिया करावी लागते. कांहीं रोग्यांमध्यें हें गळू कापल्याची जी जखम असते त्या ठिकाणचे स्नायू अधू झाल्यामुळें त्यांतून आंतडीं जोर करून बाहेर येऊन त्वचेखालीं एक अवाळू प्रमाणें टेंगूळ दिसतें व त्यास उदरांतर्गळ म्हणतात. यास उपाय म्हणजे इतर अंतर्गळ रोगामध्यें जसा चामड्याचा पट्टा (ट्रस) वापरतात तसा योग्य आकाराचा पट्टा वापरणें. अथवा त्यानें आराम न वाटल्यास शस्त्रक्रिया करून घेणें हा होय.

श स्त्र क्रि या हो ई प र्यं त रो ग्या ची शु श्रु षा.—रोग्यास बिछान्यावर निजवून त्याच्या गुडघ्याखालीं एक दोन उशा ठेवाव्या. पोटांत दुःख होत असल्यास त्या जागेवर एक भलें मोठें पोटीस अगर कढत पाण्यांत कापड भिजवून तें पिळून तयार केलेली घडी ठेवून ती लवकर न निवण्यासाठीं तीवर तेलकट रेशमी कपडा ( हा मुद्दाम तयार केलेला विकत मिळतो ) बांधावा खाण्यास कांहींच देऊं नये. फक्त कढत पाण्याचा मधून मधून घोंट देत असावें. इजा होईल म्हणून रेचक देऊं नये. मात्र तीव्र रोग नसून लक्षणें सौम्य असतील तर टरपेन्टाईन तेल साबणाच्या पाण्यांत मिसळून त्याचा बस्ति द्यावा अगर पोटांत एरंडेल द्यावें. अफू देऊं नये. या रोगाशीं किंचित साम्य असून निदानासंबंधीं संशय पडतो असे खालील रोग असतातः—( १ ) आंतड्यांत अडथळा होऊन शौच्यास होणें ( २ )आंतड्याचा व्रण रोग, ( ३ ) अण्डाशयदाह, (४ ) विषम ज्वर, ( ५ ) मूत्रपिंडांतील मुतखडे अगर पित्ताचे खडे यामुळें होणारा पोटशूळ. यांपैकीं पहिल्याचीं लक्षणें अंत्रपुच्छाच्या दाहाच्या लक्षणांशीं बरींच जुळतात त्याचें खास निदान शस्त्रवैद्यासहि पोट चिरल्यावर स्थिति डोळ्यानें पाहूनच होतें, व अंत्रपुच्छ काढून टाकण्याच्या ऐवजीं ज्या विकृतावस्थेमुळें शौच्याचा मार्ग बंद झालेला असतो तो अडथळा नाहींसा करण्याची व्यवस्था तो करतो व त्यापासूनहि रोग्यास आराम पडतो. या तापांत शरीराची उष्णता कांहीं विशिष्ट तऱ्हेनें चढत उतरत असते. त्यावरून व वात होऊन रोगी बडबडतो. यावरून हा रोग ओळखतां येतो. पांचव्यांत सांगितलेल्या शूळरोगांत पोटदुखी एकदम असह्य सुरू होऊन तशीच एकदमच थांबते व असें अनेक वेळां घडतें. व हा शूळ पित्ताशय अगर मूत्रपिंड शरीराच्या ज्या भागांत असतात तेथें असतो, म्हणून तो ओळखण्यास अडचण पडत नाहीं.

**अंत्रावरणदाह ( पेरिटोनिटिस )**—उदराच्या व कटिराच्या पोकळींत अंत्रावरण नांवाच्या ज्या पडद्यानें निरनिराळीं इंद्रियें अच्छादित असतात व ज्याचें अस्तराप्रमाणें वेष्टण या पोकळींत असतें त्यामध्यें तीव्र अगर दीर्घकाल टिकणारा दाहक्रिया या नांवाचा रोग उत्पन्न होतो. हा दाह अथवा रोग एखाद्या विवक्षित व मर्यादित स्थानांत होतो; अगर कधीं सबंध अंत्रावरणांत दाहक्रिया सुरू होते.

ती व्र रो गा चीं का रणें.—इतर ठिकाणच्या दाहाप्रमाणें शीत व ओल हीं कारणें असतातच किंवा शरीर क्षीण व अशक्त झाल्यानंतर उदरांतील एखाद्या इंद्रियास धक्का, इजा, अगर रोग झाला असतां मलमार्गसंकोचनरोगामध्यें अगर अंतर्गळ रोगामध्यें दोष उत्पन्न होण्याच्या वेळीं हा रोग उत्पन्न होतो. तसेंच उदरांत खोल जखम झाली असतां अथवा जठरादि इंद्रियास व्रण होऊन तें चिरल्यामुळें त्या इंद्रियास छिद्र पडतें तेव्हां, अगर विषमज्वरामध्यें आंतड्यास असें छिद्र पडतें तेव्हां, किंवा एखादें गळूं किंवा रिक्तग्रंथि उदरांत फुटते तेव्हां, अथवा अंत्रपुच्छ, गर्भाशय, अगर मूत्राशयाचा दाह पसरून या रोगास आरंभ होतो. रोग प्रथम थोड्या ठिकाणीं मर्यादित असला तरी त्याच्या सर्व भागांत दाह उत्पन्न होण्याचा संभव असतो. यारोगामुळें त्या पडद्यास प्रथम लाली येऊन नंतर लशीची उत्पत्ति होते व तिचा रंग प्रथम करडा असून नंतर तो पिंवळा होतो व लस चिकट होते व त्यामुळें आंतडीं एकत्र चिकटतात. व त्यानंतर कधीं स्वच्छ तर कधीं गढूळ व कधीं आरक्त तर कधीं पिंवळा द्रवपदार्थ जमूं लागतो. आंतड्याच्या हालचालीमुळें त्यावरील चिकट लशीचे पिंजलेल्या पदार्थाप्रमाणें थर जमून त्याचे कोठें पट्टे तर कोठें वेटाळीं बनतात, व त्यांतील एखाद्यांत आंतडें अडकून बसल्यामुळें रोग्याचा प्राणघात होतो.

ती व्र रो गा चीं ल क्ष णें:—प्रथम पुष्कळ थंडी वाजून येऊन त्याबरोबर वांतीस सुरवात होते व पोटांत वेदना इतक्या होऊं लागतात कीं पांघरुणांचाहि स्पर्श सहन होत नाहीं. अंथरुणांत पाय पोटाशीं घेऊन वेदना कमी होण्यासाठीं रोगी पडून रहातो. दम लागतो व श्वासोच्छ्वास करतांना नेहमींप्रमाणें छाती व उदर या दोहोंचे स्नायू न हालतां फक्त छातीच्याच स्नायूंमुळें ती क्रिया होते. आंतड्यांत वायु धरल्यामुळें पोटास फुगवटी दिसते व त्यामुळें रोग्यास अस्वस्थता वाटते. शौचास बहुतेक होत नाहीं. घाम येत असून अंग तापलेलें असतें. नाडी बारीक परंतु दाबली असतां टणक लागते. लघवी थोडी व लाल असून ती होतांना आग होते. चेहरा चिंताक्रांत व ओढलेला दिसतो. एक दोन दिवसांनीं हीं लक्षणें कदाचित कमी होतात पण तशीं तीं जर झालीं नाहींत तर रोगाचें मान वाढत जाऊन पुढील लक्षणें होतात. पोटास फारच मोठी फुगवटी येते. उचकी सुरू होते व पिंगट अगर लालसर रंगाची वांती होते. ताप कमी होतो परंतु चेहरा ग्लानीच्या घामामुळें थंडगार व हातास चिकट लागतो. नाडीच्या ठोक्याचें प्रमाण व तिची दुर्बलता वाढत जाते. मरेपर्यंत शुद्धि चांगली असते. उदरास किंवा आंतड्यास छिद्र पडून जेव्हां रोगास आरंभ होतो, किंवा एखाद्या आंतड्याच्या वेटोळ्यावर दाब पडून तें फुगून त्यास छिद्र पडतें तेव्हां बारापासून चोवीस तासांतहि वरील लक्षणें होऊन रोग्याचा शेवट होतो. सूतिकाज्वरांत ह्या रोगाचा शेवट तर याहून जलद होतो. म्हणजे मूल झाल्यावर एक दोन दिवसांच्या आंत होतो. मृत्यूचें कारण अंत्रावरणांतील पोकळींत सुजेमुळें जीं विषारीं द्रव्यें जमतात व अगोदर असलेले द्रवपदार्थ आंबून कुजतात, त्यांचें विषशोषण हें होय. कारण आंतील मळ पुढें ढकलण्याची त्या आंतड्याची शक्ति नष्ट होते. या दाहाचें साधारण कारण कोलाय नांवाचा जंतु त्या व्रणित, पुवळलेल्या व कुजलेल्या

अंत्रपुच्छांतून निघून चोहोंकडे विषोत्सर्जन करितो हें होय. हल्लीं पूर्वीपेक्षां रोगनिदान अधिक बिनचूक होतें. चाळीस पन्नास वर्षांपूर्वी अशीं लक्षणें झालीं म्हणजे त्यास अंत्रावरण-दाह रोग हें साधारण नांव देऊन मोकळे होत. हल्लीं रोगाच्या प्रथमावस्थेंत चार पांच दिवस अंत्रपुच्छदाह रोग झाला आहे असें निदान पुष्कळांनां करतां येतें व मरणाच्या अगोदरच एक दोन दिवस रोग्यास अंत्रावरणदाह झाला होता असें निदान वैद्य, डाक्तर लोक करूं शकतात.

दी र्घ का ली न भे द.— वरील रोग क्वचित प्रसंगीं लांबल्यास अगर क्षयजंतुवृद्धीमुळें हा रोगभेद उत्पन्न होतो. तीव्र भेदांतील भयंकर लक्षणांचें शमन होऊन फक्त थोडा पोटशूळ रहातो व उदरास मात्र बरीच फुगवटी दिसते. कारण तेथील अंत्रावरण जाड होऊन त्यावर पातळ लस जमलेली असते. तीव्र रोग झाल्याशिवाय रोगाचा हा भेद हळू हळू आपोआपहि प्रगट होतो. अशा वेळीं शक्ति कमी होत जाऊन कृशता येते, रोग फार दिवस लांबतो व त्यांत बहुधा रोगी दगावत नाहीं.

क्ष य जं तु ज न्य भे द.—हा स्वतंत्रपणें आपोआप सुरू होतो. अगर रोग्यास प्रथम कफक्षय अगर क्षय-जंतुजन्य संधिवात अशांपैकीं रोग असून त्याचीं मुख्य लक्षणें पुढें दिल्याप्रमाणें असतातः—पोटांत अनिश्चित प्रकारचीं अस्वस्थता असणें; पोटांत शूल उत्पन्न होणें; नळाश्रित वायूमुळें उदरास फुगवटी येणें. इ. कांहीं रोग्यांनां बद्धकोष्ठ असतो व कांहींनां अतिसार होतो; व कांहीं रोग्यांनां थोडे दिवस बद्धकोष्ठता व नंतर अतिसार असा क्रम चालतो. या लक्षणाबरोबर क्षयजंतुवृद्धीचीं ज्वर, अति व जलद येणारी कृशता व शक्तिक्षीणता हीं नेहमींचीं लक्षणें असतातच. परंतु असल्या कांहीं रोग्यांचीं लक्षणें इतकीं थोडीं व सूक्ष्म असतात कीं त्यामुळें रोगनिदानास मदत न होतां उलट तीं लक्षणें रोगपरीक्षकाची दिशाभूल करतात. या रोग्यांला उदरामध्यें फुगवटी, शूळ वगैरे कांहीं एक नसते. त्याच्यानें पाय पोटाशीं घेतल्याशिवाय बिछान्यांत निजवतें. यावरून त्यास वेदना नसते व ज्वरहि नसतो. ओकारी, बद्धकोष्ठता अगर अतिसार यांपैकीं कांहीं लक्षण नसतें. कांहीं रोग्यांमध्यें आंतड्यांचीं वेटोळीं एकमेकांनां चिकटून बसून उदरामध्यें एक गोळा बनतो व त्यामध्यें पाण्यासारखी पातळ लस पापुद्र्यांत कोंडली जाऊन त्याची वाटोळी ग्रंथि अगर गुल्म बनतो. तो दाबल्यानें अगर आपोआप दुखत नाहीं व त्यावर बोटांनीं ठोकून पाहिलें तर बद्द आवाज येतो. असला रोगी स्त्री असली तर रोग निदान अण्डाशयास झालेली ग्रंथि अगर गुल्म असें एखाद्या वैद्यानें केल्यास तशी समज होणें साहजिक आहे.

उ प चा र.—तीव्र रोग झाला असतां बहुधा शस्त्रवैद्याच्या हातीं रोग्यास देणें जरूर असतें. त्यानें प्रथम हा रोग होण्याच्या कारणांचा तपास करून तें कारणच शस्त्रानें काढून टाकतां येण्यासारखें असल्यास प्रथम तें नाहींसें करावें. अंत्रपुच्छ अगर फ्यालोपियननलिका अगर मुद्दाम अगर आपोआप गर्भपात केला अगर झाला आहे अशा स्थितींतील गर्भाशय, जठर किंवा आंतडें या ठिकाणच्या व्रणास छिद्र पडतें व नंतर या निरनिराळ्या इंद्रियांत दुष्ट जंतुवृद्धिमुळें विषशोषण होऊन हा रोग होणें सहाजिक असतें. तथापि सर्व शहरीं सर्व रोग्यांनां शस्त्रक्रिया करण्याइतके शस्त्रवैद्य मिळण्यासारखी या देशांत स्थिति अद्याप नाहीं. पुष्कळ वैद्य-डाक्तरांनां शस्त्रक्रिया उत्तम हें कळत असूनहि औषधोपचारावरच भागवून घ्यावें लागतें; व तसें करणें असल्यास अनेकांचें मत घेऊन पूर्ण विचारांतीं करावें.

औ ष धें व इ त र उ प चा र.—पोट शेकणें हा उपचार त्यांतल्यात्यांत उत्तम आहे व शिवाय $\frac{1}{8}$ ते $\frac{1}{4}$ ग्रेन प्रमाणांत मार्फिया हें औषध टोंचून त्यापासून वेदनाशमन गुंगी इत्यादि परिणाम घडेपर्यंत तें दर तासास टोंचीत असावें. क्यालोमेल किंवा एपसमक्षार कोणी देतात पण त्याच्या उपयुक्ततेविषयीं शंकाच आहे. अन्न वगैरे कांहींहि देऊं नये. फक्त ऊन पाण्याचा घोट मधून मधून घेऊं द्यावा. पांघरुणाचा भार पोटास सहन होत नाहीं. यासाठीं रोग्यावर चार पायांची चौकट ठेवून त्यावरून पांघरुण घालावें. तथापि जेथें शक्य असेल तेथें उदर चिरून कारण शोधून तें काढून टाकण्यासाठीं शस्त्रक्रिया करणें हा उत्तम मार्ग होय. परंतु तो सर्व रोग्यांस उपलब्ध होण्यासारखा नसतो.

**अँथनी सुसान ब्रॅनेलः**—(१८२० १९०६) या सुधारकाग्रणी अमेरिकन बाईचा जन्म, मॅसॅचूसेट्स संस्थानांतील ॲडॅम्स शहरीं १८२० च्या फेब्रुवारी महिन्याच्या १५ व्या तारखेस झाला. जन्मानंतर कांहीं दिवसांनीं अँथनीच्या बापानें न्यूयॉर्क हें आपलें वसतिस्थान केलें. अँथनीच्या बापाची एक खासगी शाळा होती. त्या शाळेंतच तिचें बालपणचें शिक्षण झालें. १७ वें वर्ष लागल्यानंतर तिला पुढील शिक्षणाकरितां दुसऱ्या शाळेंत घालण्यांत आलें. १८५२ सालीं मद्यपानप्रतिबंधक चळवळींत मन घालून त्यासाठीं तिनें बायकांची एक मद्यपानप्रतिबंधक संस्था काढली. त्याचप्रमाणें गुलामगिरीच्या विरुद्ध चळवळ करण्याकरितां तिनें अमेरिकन अँटीस्लेव्हरी सोसायटीच्या न्यूयॉर्क येथील शाखेचें धुरीणत्व पत्करिलें. १८५४ नंतर तिनें स्त्रियांच्या हक्कासाठीं चळवळ करण्यास सुरुवात केली. या चळवळींत उत्तम व्याख्यात्री, व लेखीका या नात्यानें तिची प्रसिद्धि झाली. १८६८ ते १८७० या अवधींत, 'रेव्होल्यूशन' नांवाच्या एका साप्ताहिकाचें संपादकत्व तिनें पत्करलें, व मोठ्या मेहनतीनें तें काम तिनें यशस्वी रीतीनें पार पाडलें. १८६९ मध्यें 'नॅशनल वुइमेन्स सफ्रेज ॲसोसिएशन' नांवाच्या एका संस्थेची ती उपाध्यक्ष झाली

व पुढें १८९२ मध्यें तिला याच संस्थेचें अध्यक्ष करण्यांत आलें. स्त्रियांनां त्यावेळीं मतदानाचा हक्क नसे. पण या अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां मतांच्या पेटींत आपल्या नांवाची एक मतपत्रिका तिनें टाकिली. या सबबीवर तिला पकडण्यांत येऊन शंभर डॉलर्स दंड झाला. पण तो तिनें दिला नाहीं. १८८४–१८८७ या दरम्यान तिनें एलिझाबेथ केडी स्टॅन्टन, इडा हस्टेड हार्पर इत्यादि विद्वान् बायांच्या सहाय्यानें, 'दि हिस्टरी ऑफ वूमन सफ्रेज' हा मोठा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचे चार खंड होते. यानंतर तिनें विशेष अशी कोणती कामगिरी बजाविली नाहीं. ती रॉचेस्टर येथें १९०६ सालीं मार्चच्या १३ व्या तारखेस मरण पावली. मरणसमयीं तिचें वय ८६ वर्षांचें होतें.

[संदर्भ ग्रंथ —मिस इडा हस्टेड हार्पर–लाइफ अँड वर्क ऑफ सुसान बी अँथनी ( ३ भाग इंडियनपोलीस १८९८–१९०८.)]

**अंदमान आणि निकोबार बेटें**—बंगालच्या उपसागरांतील एक द्वीपसमूह. भूगोलदृष्ट्या ब्रह्मदेश सरकारच्या अमलाखालील प्रिपेरिस आणि कोको बेटें याच द्वीपसमूहांत येतात. ब्रह्मदेशांतील आराकान योमा पर्वतापासून सरळ रेषा बंगालच्या उपसागरांत काढली म्हणजे हा द्वीपसमूह त्या रेषेंत येतो. म्हणून आराकान योमा पर्वताच्या पाण्याखालीं दडलेल्या पर्वताचीं हीं शिखरें आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. अंदमानाचें अगदीं उत्तरेकडील टोंक १३° ३४' ३" उत्तर अक्षांशांत असून निकोबार बेटांचें अगदीं दक्षिणेकडील टोंक ६° ४५' उत्तर अक्षांशांत आहे. ही पाण्याखालील पर्वताची ओळ ७०० मैल लांब आहे. यांच्या पूर्वेस अंदमानचा समुद्र व पलीकडे ब्रह्मदेशाचा किनारा, मलाया द्वीपकल्प आणि सुमात्रा बेट हीं आहेत.

अंदमानचा समुद्र हा बंगालच्या उपसागरास सात रुंद सामुद्रधुन्यांनीं जोडलेला आहे. यांपैकीं सर्वांत रुंद सामुद्रधुनी ९१.मैल लांबीची असून दोन सामुद्रधुन्या ५६६पुरुष व७९८ (पुरुष) फॅदमखोल आहेत. बाकीच्या १०० पुरुष खोलीच्या आंतच आहेत. पश्चिमेस ३० मैल बंगालच्या उपसागरांत गेलें किंवा पूर्वेस अंदमान समुद्रांत शंभर मैल शिरलें म्हणजे समुद्राची खोली २००० पुरुषपर्यंत आहे. कांहीं ठिकाणीं सामुद्रधुन्या फार उथळ असल्यामुळें त्या बाजूस प्रवास करणें अत्यंत धोक्याचें आहे हें प्राचीन काळापासून दर्यावर्दी लोकांस माहीत आहे.

नरकोंदम आणि "ओसाड बेटें" (बॅरन आयलंड्स) हीं वास्तविक सुंदा समूहांतील ज्वालामुखी आहेत व तीं बेटें व निकोबार बेटें हीं भूपृष्ठभागावरील जो कांहीं कमजोर भाग आहे त्या भागापैकीं एका भागावर वसलीं आहेत. अंदमान बेटें हीं थोडी वरच्या बाजूस सरकलीं असल्यामुळें यांच्याप्रमाणें त्या ( अंदमान ) बेटांवर धरणीकंपाचे धक्के बसत नाहींत. पुष्कळ अंशीं हीं बेटें जपानच्या बेटांप्रमाणेंच आहेत. एखाद्या भूमध्यसमुद्राच्या एका किनाऱ्यावर पुष्कळ लांबलचक व उंच पर्वतांची ओळ असून व ती ओळ समुद्रांत बुडून जाऊन त्याचीं कांहीं शिखरें लहान लहान बेटांप्रमाणें दिसत आहेत असें या बेटांसंबंधीं वाटतें.

राज्यकारभाराचें मुख्य ठिकाण पोर्ट ब्लेअर असून तें कलकत्त्यापासून ७८० मैल, मद्रासहून ७४० मैल व रंगूनहून ३६० मैल आहे.

बेटांचें फक्त जमीनीचें क्षेत्रफळ ३१४३ चौरस मैल आहे. पैकीं अंदमान बेटांचें क्षेत्रफळ २५०८ चौरस मैल व निकोबार बेटांचें क्षेत्रफळ ६३५ चौरस मैल आहे. लोकसंख्या (१९११)२६४५९. पैकीं अंदमानी लोक १३१७ निकोबारी ८८१८ व काळ्यापाण्यावरील वसाहत (पोर्टब्लेअर)१६३२४.

अंदमानी लोकांची संख्या उत्तरोत्तर एकसारखी कमी होत आहे. एका पिढीच्या पूर्वी ती कमींत कमी ५००० असावी असा अनमास आहे. यापैकीं मुलांची संख्या फक्त शेंकडा २५ आहे. ही लोकवस्ती कमी होण्याचें मुख्य कारण म्हणजे सुधारलेल्या लोकांशीं वारंवार संबंध येऊं लागल्यामुळें त्यांच्यांत असलेले संसर्गजन्य व इतर रोग या लोकांमध्येंहि पसरत चालले असून त्याचा परिणाम लोकसंख्येवर होत आहे.

निकोबारी लोकसंख्येंत फारसा बदल झालेला दिसत नाहीं. इ. स. १८८३ सालीं त्यांची लोकसंख्या ५९४२असून इ. स. १९०१ सालीं ५९६२ होती.

मानववंशशास्त्रज्ञांनां अंदमानी लोक म्हणजे एक कोडेंच होऊन बसलें आहे. अंदमानी लोकांच्या निरनिराळ्या जाती म्हणजे निग्रिटो मानववंश होय.

ते एका मूळ भाषेच्या पोटभाषा बोलतात. आज जवळ जवळ अनादि काळापासून कोणत्याहि प्रकारची सरभेसळ न होतां अत्यंत पवित्र राहिलेला हा फार प्राचीन अशा एका मानववंशाचा नमुना आहे. हल्लीं ज्या ठिकाणीं अंदमानी लोक रहात आहेत त्याच ठिकाणीं ते प्राचीन काळापासून रहात आहेत असें म्हणण्यास त्यांचें स्वयंपाकघराबाहेरील खड्डे ( जागा ) हा एकच आधार आहे. हे खड्डे सुमारें १२-१५ फूट असून कांहींच्या तळाशीं शिंपांचे प्रस्तरावशेष ( फॉसिल ) बनलेले सांपडतात. अंदमानी लोक शिंपांतील प्राणी खातात. त्यावरून ही शिंपांतील प्राणी खाण्याची चाल अगदीं पुरातन असावी व ते त्याच जागीं रहात असावे हें स्पष्ट आहे.

निकोबारी लोकांची हकीकत इतकी आधारभूत व साकल्यानें देणें शक्य नाहीं. यांच्यांत जी गुंतागुंतीची सुधारणा झाली आहे तिचा अद्यापि पुरतेपणीं अभ्यास झाला नाहीं. तथापि यांच्यांतील स्थानिक दिसणारी भिन्नता बाजूला ठेवली असतां ते सर्व एक लोक असून त्यांचा संबंध हिंदुस्थानांतील लोकांशीं न येतां अगदीं पूर्वेकडील लोकांकडे आहे असें म्हणतां येईल. तेनासरीम किनाऱ्याकडून आपण आलों असा त्या लोकांचा समज आहे. यांचा उगम इंडो

चिनी लोकांपासून असावा असें आजपर्यंत झालेल्या शोधांवरून वाटतें.

रा ज्य का र भा र.—बेटांतलि रानटी लोकांपासून कर वसूल करण्याची तेथील सरकारची वहिवाट नाहीं. कर वसूल करणें इत्यादि गोष्टी काळ्या पाण्याच्या वसाहतीस फक्त लागू आहेत. तेथें देखील कैद्यांची व्यवस्था व शिस्त यांकडेच उत्पन्नापेक्षां अधिक लक्ष दिलें जातें.

इ. स. १९०४–०५ सालीं उत्पन्न ९·८ लाख व खर्च १८·३ लाख होता. कैद्यांनीं केलेल्या कामाचें उत्पन्न हीच उत्पन्नाची मुख्य बाब होय.

अंदमान आणि निकोबार बेटांवर एक चीफ कमिशनर नेमलेला असतो. हा व इतर अधिकारी काळ्यापाण्यावरील वसाहतींत राहतात.

अंदमान व इतर बेटें यांची संपूर्ण पाहणी इ. स. १८८३–८६ सालीं झाली आहे. या बेटांतील लोकांसंबंधीं कांहीं माहिती हिंदुस्थान आणि जग या विभागांत (पृ. २६५) दिली आहे. याशिवाय अधिक माहितीसाठीं अंदमान, निकोबार व पोर्टब्लेअर हे तीन लेख पहा.

**अंदमान बेटें**—हीं बेटें बंगालच्या उपसागरांत असून त्यांवर अंदमान आणि निकोबार बेटें यांवर नेमलेल्या चीफ कमिशनरचा ताबा चालतो. या द्वीपसमूहांत पांच मुख्य बेटें असून तीं एकमेकांच्या जवळ जवळ असून त्या सर्वांमिळून एकच बेट असावें अशी बरेच दिवस कल्पना होती व म्हणूनच या पांच मोठ्या बेटांस 'मोठें अंदमान ' असें नांव मिळालें आहे. या पांच बेटांचीं नांवें येणेंप्रमाणें ( उत्तरेकडून दक्षिणेकडे ) उत्तरअंदमान, मध्यअंदमान, दक्षिणअंदमान, बरतंग, रटलंड बेट. या पांच बेटांमध्यें चार सामुद्रधुन्या असून त्यांचीं नांवें येणें प्रमाणें आहेतः— ऑस्टेन सामुद्रधुनी, हॉम्फ्रे सामुद्रधुनी, मध्य अथवा अंदमान सामुद्रधुनी, मॅक्फर्सन सामुद्रधुनी. या मुख्य बेटांव्यतिरिक्त परंतु या द्वीपसमूहांत मोडणारीं इतर बेटें म्हणजे–उत्तरेकडे लँडफॉल बेटें, पश्चिमेस इंटरव्ह्यू बेट; नैऋत्येस लेबिरिंथ बेटें व पूर्वेस रिची अथवा अंदमान आर्चिपेलगो हीं होत. यास छोटें अंदमान अशी संज्ञा आहे. या व्यतिरिक्त मोठ्या अंदमानाच्या किनाऱ्यावर लहान लहान २०४ बेटें आहेत असें म्हणतात. या द्वीपसमूहाची सर्वांत जास्त लांबी २१९ मैल असून सर्वांत जास्त रुंदी ३२ मैल आहे व एकंदर जमिनीचें क्षेत्रफळ २५०८ चौरस मैल आहे.

या द्वीपसमूहाचें नांव फार प्राचीन काळापासून अंदमान किंवा याच नांवासारखें एखादें नांव आहे. हनुमान याचा मलाया देशांतील उच्चार हंदुमान असा असून हंदुमान या शब्दापासून अंदमान झालें असावें असें वाटतें. व पुराणांतरीं वर्णिलेल्या माकडांचें म्हणजे आर्यांच्या वसाहतींस त्रास देणारे वन्य जातींचें वसतीस्थान असावें असा या बेटांच्या नांवावरून बोध होतो. असा एक तर्क आहे.

मोठें अंदमान डोंगराळ असून सर्व भागांत दाट जंगल आहे. पूर्वकिनाऱ्यावर मुख्यत्वेंकरून डोंगर जास्त उंच आहेत. सर्वांत उंच डोंगर २४०० फूट उंच आहे. छोट्या अंदमानांत थोडा उत्तरेकडचा प्रदेश वगळला तर बहुतेक प्रदेश सपाट आहे. या बेटांत नद्या मुळींच नसून बाराहि महिने पाणी असणारे कांहीं ओढे आहेत.

अंदमानाच्या किनाऱ्याजवळील समुद्र पुष्कळ ठिकाणीं खोल असून पुष्कळ ठिकाणें बंदरायोग्य आहेत. पोर्ट ब्लेअर हें दक्षिण अंदमानांतील मुख्य बंदर आहे. याच्या उत्तरेकडे कांहीं बंदरें पुष्कळ विस्तृत असून तीं बहुतेक पूर्वकिनाऱ्यावर आहेत. त्यांपैकीं पोर्ट मेडोज, कोलब्रुक पॅसेज, एल्फिन्स्टन हार्बर, स्टेवर्ट साउंड, पोर्ट कॉर्नवालिस हीं बंदरें पूर्वकिनाऱ्यावर असून पश्चिमकिनाऱ्यावर टॅपल साउंड, इंटरव्ह्यू पॅसेज, पोर्ट ॲन्सन, पोर्ट कॅंबेल, पोर्ट मौंअट आणि मॅकफर्सन स्ट्रेट हीं बंदरें आहेत या बेटांवरील वनश्रीचा देखावा रमणीय असून पुष्कळ ठिकाणीं असलेल्या पोंवळ्यांचे ताटवे फार रम्य दिसतात.

भूस्तरशास्त्रदृष्ट्या हीं बेटें म्हणजे ब्रह्मदेशांतील आराकान योमा नांवाच्या डोंगरांच्या ओळीपैकीं आहेत. त्या डोंगरांत आणि येथील भागांत पुष्कळ साम्य आढळतें.

अंदमान बेटांतील वनस्पती उष्णकटिबंधांत ज्या सांपडतात त्याच आहेत. या ठिकाणीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे येथें नारळाचीं झाडें नाहींत. जंगलांत इमारतीच्या उपयोगी झाडें विपुल आहेत व तीं या बेटांत एक उत्पन्नाची बाब आहे ( पोर्ट ब्लेअर लेख पहा ).

या बेटांत कांहीं झाडें बाहेरून आणून लावण्याचा प्रयत्न केला आहे त्यांचीं नांवें:—चहा, लायबेरियन, कॉफी, कोको, मॅनिला हेंप, सागवान आणि नारळ.

येथें मुख्यत्वेंकरून भात, कडदणाचीं धान्यें, मका, ऊंस, आणि हळद हीं पिकें काढतात.

येथें वन्य व रानटी प्राणी मुळींच नाहींत. विषारी सर्पांच्या येथें पुष्कळ जाती सांपडतात.

पोंवळ्याच्या बनलेल्या दगडापासून उत्तम चुनखडी तयार होते. कांहीं पक्ष्यांचीं घरटीं व समुद्रकांकड्या चिनी बाजारांत पुष्कळ खपतात; मेण, मध व चित्रविचित्र शिंपा व रंगीबेरंगी पक्षी येथें पुष्कळ असून आसपासच्या देशांत यांचा पुष्कळ खप आहे.

सर्वसाधारणपणें येथील हवा उष्णकटिबंधांतील हवेप्रमाणें असते. बहुतेक नेहमीं गरमच असते परंतु उन्हाळ्यांत विशेष उन्हाळा भासतो. मलेरिया व अमांशाचा विकार येथें जास्त दिसतो. कारण बॅ. सावरकर यांचें वजन या रोगामुळें एका वर्षांत चार पांच पौंड कमी झाल्याचें त्यांनीं आपल्या भावाला लिहिलेल्या पत्रावरून दिसतें ( ॲन एको फ्रॉम अंदमान्स, पा. ७८ ). पावसाळ्याचें प्रमाण नियमित नाहीं. नैऋत्येकडील पाऊसच वरबहुतेक या भागा

पडतो; परंतु ईशान्येकडील पाऊस मुळींच पडत नाहीं असें नाहीं. येथें पाऊस व वारा जरी पुष्कळ असतो तरी वादळें क्वचितच होतात. वादळांचें स्वरूप वेग व दिशा यांविषयींची जी माहिती उपलब्ध होते ती माहिती हिंदुस्थानच्या पूर्व व उत्तर किनाऱ्यावर फार उपयोगी असते. पावसाची सरासरी ११६ इंच ( पोर्ट ब्लेअर येथील ) आहे.

पोर्ट ब्लेअर कमी पावसाच्या भागांत वसलें आहे. इतर ठिकाणांच्या पावसाचें प्रमाण पाहतां पाऊस दर वर्षी सरासरी १४० इंच पडतो. वादळें इ. स. १७९२ च्या डिसेंबर महिन्यांत पोर्ट कॉर्नवालिस येथें, व इ. स. १८६४ व १८९१ सालीं पोर्ट ब्लेअर येथें झालीं होतीं असें आढळतें.

धरणीकंपरेषेलगत जरी हीं बेटें स्वभावतः वसलेलीं आहेत तरी मोठे धरणीकंप या भागांत मुळींच झालेले नाहींत. इ. स. १८६८, १८८०, १८८१, १८८२, १८८३, १८८६, १८९४, १८९९ सालीं लहान लहान धरणीकंपाचे धक्के बसले होते.

इ ति हा स.—व्यापारी जलमार्गावर हीं बेटें असल्यामुळें त्यांचें अस्तित्व फार प्राचीन काळापासून लोकांस माहीत आहे. सातव्या शतकापासून पुढें तर या बेटांचा उल्लेख पुष्कळ प्रवाशांनीं केलेला आहे. या बेटांत राहणाऱ्या वन्य जातींपासून संकटांत सांपडलेले खलाशी वगैरे लोकांस अत्यंत त्रास होत असल्यामुळें इ. स. १७८८ सालीं आर्चिबाल्ड ब्लेअर यास कंपनीसरकारनें या बेटांची पहाणी करून वसाहत करण्याकरितां पाठविलें. नंतर कैदी लोकांची त्या बेटांत काम करण्याकरतां मजूर म्हणून रवानगी करण्यांत येऊं लागली. इ. स. १७८९ सालीं आर्चिबाल्ड ब्लेअर यानें पोर्टब्लेअर येथें आपलें वसाहतीचें ठिकाण केलें. परंतु इ. स. १७९२ मध्यें लष्करीदृष्ट्या विचार करून पोर्ट कॉर्नवालिस हें मुख्य ठिकाण करण्यांत आलें. परंतु या ठिकाणीं हवा रोगट असल्यामुळें व हवेचा अनुभव असल्यामुळें वसाहतवाल्यांचे अत्यंत हाल झाले. यावेळीं कर्नल किड नांवाचा मनुष्य अधिकारी होता. ब्लेअर आणि किड यांनीं केलेले रिपोर्ट इंडियन अँटिकरी पुस्तक २८ व पुढील पुस्तकांत प्रसिद्ध झाले आहेत. पुढें चांचेगिरी व खून पुन्हां वारंवार होऊं लागल्यामुळें इ. स. १८५६ सालीं पुन्हां या बेटांचा ताबा घेण्यांत आला. इ. स. १८५७ च्या बंडानंतर ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत पुष्कळ बंडवाले व इतर कैदी सांपडले होते व त्यांची हिंदुस्थानांत व्यवस्था ठेवणें जरा जड जाऊं लागलें. म्हणून त्याच सालच्या नवंबर महिन्यांत या सर्वांची रवानगी या बेटांत करण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें व इ. स. १८५८ पासून या प्रयोगास सुरवात करण्यांत आली. इ. स. १८७२ सालीं अंदमान आणि निकोबार या बेटांवर एक चीफ कमिशनर नेमण्यांत आला. याच सालीं हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल लॉर्ड मेयो हे या वसाहतीची पाहणी करण्यास आले असतांना एका कैद्यानें त्यांचा खून केला. काळ्या पाण्यवरील वसाहतींची इतर माहिती ' पोर्टब्लेअर ' यावरील लेखांत पहावी.

इ. स. १९०१ सालीं अंदमानी लोकांची संख्या १८८२ होती. यापूर्वी त्या लोकांची खानेसुमारी कोणी केलेली नाहीं. तथापि त्यांची संख्या फार झपाट्यानें कमी होत आहे असें दिसतें. याचें कारण या लोकांत नवीन नवीन रोग शिरूं लागले आहेत.

यांचे तीन जातिसमूह असून त्यांत बारा जाती आहेत. पैकीं येरवा जातिसमूहांत कारि, कोरा, टबो, येरे, केडे, या पांच व बोजिगिंजी जातिसमूहांत बी, बलवा, बोजिग्याब, जुवई, कोल, या पांच असून ओंजेजरवा जातिसमूहांत ओंजे, व जरवा, या दोन आहेत. यांपैकीं बहुतेक थोरल्या अंदमानांत आहेत. प्रत्येक जातींत कांहींना कांहीं वैशिष्ट्य आढळतें. त्यांची राहण्याची झोंपडी, तीरकमठा, डागडागिने, स्त्रियांचे पोषाख, केसांची बांधणी, भांडी, भाषा वगैरे गोष्टी साधारणपणें जरी सारख्याच असतात तरी बारकाईनें निरीक्षण करणारास कांहीं वैशिष्ट्य आढळतें. याप्रमाणें कांहीं जाती समुद्रकिनाऱ्यावर वस्ती करून असतात व कांहीं आंत जंगलांत असतात. त्याचप्रमाणें एकच जाति किनाऱ्यावर व जंगलांत देखील आढळते.

ब्रिटिश लोक येथें येण्यापूर्वी या जातींच्या अगदीं शेजारीं असल्याशिवाय आपआपसांत दळणवळण होत नसावें असें म्हणतात. इतर बेटांत ज्या ठिकाणीं अशा वन्य जातींची वस्ती आहे त्या जातींत साधारणपणें दर वीस मैलांस भाषा बदलते. त्याचप्रमाणें याहि बेटांत असावें असा समज आहे.

जातींत परस्पर मित्रभाव असतो; इतर अंदमानी लोकांची माहिती असल्यास त्या जातीचें त्यांच्याशीं वर्तन सभ्यपणाचें असतें. परंतु ज्यांस कधीं पाहिलें नाहीं, मग तो अंदमानी असो किंवा बाहेरील असो, त्यांच्याशीं त्यांचें वर्तन शत्रुत्वाचें असतें. एका जातींत एकाचीं मुलें दुसऱ्यानें पाळावीं असें या जातींत फार होत असल्याकारणानें जातींतील निरनिराळ्या कुटुंबांनां एकत्र राहण्यास मोठीच मदत झाली आहे. साधारणपणें सहा सात वर्षांपर्यंतच मुलें आपल्या आईबापापाशीं असतात.

अंदमानी लोक लढाई खेळण्यास लायक नाहींत, व स्वतःचा जय होईल अशी खात्री असल्याशिवाय हल्ला करीत नाहींत. लढाई करीत असतांना स्वतःच्या रक्षणाची त्यांनां मुळींच फिकीर नसते. जरवा आणि ओंजे लोक त्यांच्याव्यतिरिक्त कोणीहि मनुष्य आला कीं त्यास ठार मारण्यास उद्युक्त होतात. या जाती वगळल्या तर इतर जाती बऱ्याच माणसाळलेल्या असून संकटांत सांपडलेल्या खलाशास प्रसंगीं मदत देखील करतात.

या लोकांच्या भाषेत कोणत्याहि इतर भाषेची भेसळ न झाल्यामुळें शास्त्रीय दृष्ट्या मोठ्या महत्त्वाच्या आहेत.

यांचा धर्म वन्य असून जंगल, समुद्र, रोग व पूर्वज यांच्या भुतांस ते भितात. पुलुगा या दैवतानें हें सर्व जग केलें आहे अशी त्यांची कल्पना आहे. पुलुगा दैवत नेहमीं आकाशांत वास करितें. पूर्वी तें या बेटांतील सर्वांत उंच डोंगर सॅडलपीकवर रहात असे अशी यांची समजूत आहे. मृत्यूनंतर आत्मा एका वायुरूपी पुलाच्या सहायानें जमीनींत जातो अशी यांची भावना आहे. परंतु पापपुण्याची कल्पना किंवा स्वर्ग व नरक एतद्विषयक कल्पना या लोकांत नाहींत. यांचा स्वप्नावर फार विश्वास असून प्रसंगीं त्यांचें पुढील अचरण स्वप्नाप्रमाणें बदलतें. शपथा, दिव्य करणें, किंवा अशाच प्रकारें एखाद्या दिव्य शक्तीजवळ दाद मागणें वगैरे कल्पना या लोकांत नाहींत.

पुलुगा या शब्दाचें 'ईश्वर' या शब्दानें भाषांतर केलें तर वावगें होणार नाहीं. यास एक पत्नी, एक पुत्र व पुष्कळ मुली आहेत. हा आपल्या पुत्राकडून आपल्या मुलीस आपल्या आज्ञा कळवितो. भुतांवर याचा अधिकार चालत नाहीं. फक्त आपल्याविरुद्ध अगळीक करणारास दाखवून देण्यांतच हा समाधान मानतो. जंगलांतील एरमचौग व समुद्रांतील जुरुविन नांवाचीं भुतें हीं फार त्रासदायक होत अशी समजूत आहे. सूर्य चंद्राची पत्नी असून तारा त्यांचीं मुलें आहेत, व हे सर्व पुलुगाजवळ राहतात. तथापि सूर्यपूजेची कल्पना यांच्यांत यत्किंचितहि नाहीं. चंद्रग्रहणांत ते चंद्राकडे बाण मारून आपली करमणूक करतात. परंतु सूर्यग्रहणांत भीतीमुळें ते स्वस्थ असतात.

अंदमानी लोकांची आत्म्याविषयींची कल्पना स्वतःची सावली पाहून उत्पन्न झाली नसून पाण्यांतील प्रतिबिंब पाहून उत्पन्न झाली आहे. स्वतःचें प्रतिबिंब हेंच स्वतःचें भूत व मृत्यूनंतर हें निराळ्या जगांत वास करण्यास जातें व एका जगड्व्याळ नारळाच्या वृक्षानें ते जग तोलून धरलें आहे अशी त्यांची कल्पना आहे. पुनर्जन्माची कल्पना या लोकांत आहे.

एरमचौग जंगलांतील भूत अग्नीस भिते असा यांचा समज असल्यामुळें हे अग्नी नेहमीं बरोबर बाळगितात. निजून उठल्यावर चंद्रसूर्यांचा अपमान होऊं नये म्हणून ते स्तब्ध बसतात. वादळांत पुलुगा आपलें स्वरूप प्रकट करतो व धरणीकंप हे आपल्या पूर्वजांचे खेळ आहेत. शकुन, अपशकुन, मंत्र, वगैरे यांच्यांत थोडेफार आहेत. पक्षी व प्राणी यांनां माणसाप्रमाणेंच समजण्यांत येतें. जरवानी ठार मारलेल्या लोकांच्या प्रेतावर दगडांचा ढीग रचलेला असतो व ज्या रस्त्यावरून हे लोक गेले त्या रस्त्यावर दगड ठेवलेले असतात. अमुक ठिकाणीं या लोकांनीं खून केला ही बातमी पक्ष्यांनीं इंग्लिशांस देऊं नये म्हणून अशी व्यवस्था केली असते असें प्रत्येक अंदमान्यास ठाऊक असतें.

यांच्या कथा वगैरे सर्व पुलुगासंबंधानेंच आहेत. अंदमान्यांस माहीत असलेले प्राणी हे सर्व आपले पूर्वज या रूपांत वावरत आहेत असें त्यांस वाटतें. यांमध्यें सण समारंभ फार थोडे असून धार्मिक विधी कांहींच नाहींत. पुरुष व स्त्री यांच्या संबंधाविषयीं कांहीं निर्बंध आहेत. माती, तेल अंगाला निरनिराळ्या व विवक्षित तऱ्हेनें फांसून हे लोक आजारीपणा, दुःख, आनंद व अविवाहित स्थिति दाखवितात.

कोणी मरण पावलें असतां त्याची आप्तमंडळी मुक्तकंठानें रोदन करतात. लहान मुलें मरण पावल्यास त्यांस त्यांच्या आईबापांच्या झोंपडींत पुरण्यांत येतें. कुणी मोठे मरण पावल्यास त्यांस पुरण्यांत येतें किंवा त्याची मोट बांधून त्यास एखाद्या झाडाच्या खांदींत व्यवस्थेशीर ठेवण्यांत येतें व असें ठेवणें मानाचें समजतात. ज्या ठिकाणीं असें प्रेत ठेवलें असेल त्या जागेसभोंवतीं वेताच्या पानांच्या माळा लावून त्या जागेकडे सुमारें तीन महिने कुणी जात नाहीं. स्मशानाची जागा निराळीच ठरलेली असते. सुतकांत भुरी माती डोक्यास फांसतात व त्या दिवसांत ते नाचांत भाग घेत नाहींत. कांहीं महिन्यांनंतर त्या मेलेल्या माणसाचीं हाडें धुवून त्याचे तुकडे करण्यांत येतात व त्याचे निरनिराळे दागिने करून त्या मृताचें स्मरण म्हणून अंगावर वापरण्यांत येतात; तसेंच रोग झालेल्या भागावर या हाडांचा स्पर्श केल्यास त्या जागचें दुःख थांबतें व रोग बरा होतो अशी देखील एक समजूत आहे. कवटीची माळ करून ती मानेवरून पाठीकडे टाकलेली असते. ही कवटी विधवा अगर विधुर अगर अत्यंत जवळच्या आप्तानेंच वापरावयाची असते. ती भुरी माती काढल्यानंतर व एक औपचारिक नाच झाल्यावर सुतकाची मुदत संपते. मृतांची व्यवस्था लावणें हें कांहीं विशिष्ट पद्धतीनेंच होत असतें.

पुरुषांचीं लग्नें सुमारें २६ वर्षांच्या सुमारास व स्त्रियांचीं लग्नें १८ वर्षांच्या सुमारास होतात. गर्भधारणा साधारणपणें १६ ते ३५ वर्षांपर्यंत असते. हे लोक अगदीं नागवे असतात. फक्त स्त्रिया गुह्येंद्रियासमोर एकदोन पानें व मागील बाजूस कांहीं पानें येतील अशी एक माळ करून कमरेभोंवती गुंडाळतात. हवेंतील उष्णतेची यांना फिकीर वाटत नाहीं. परंतु थंडी त्यांस आवडत नाहीं. तहानभूक, जाग्रण, श्रम इत्यादि शारीरिक बाबतींत ते अत्यंत सोशिक असतात. त्यांच्या अंगाची कातडी गुळगुळीत, तेलकट व काळी कुळकुळीत असते. केंस काळे असून कुरळे असतात; तोंड मोठें असून डोळे काळे व पाणीदार असतात. दांत पांढरे स्वच्छ असून निरोगी असतात.

हे लोक दिसण्यांत धट्टे कट्टे दिसतात. परंतु रोगास फार लवकर बळी पडतात. त्याचप्रमाणें एखादा रोगी बरा झाल्यास पूर्ववत धट्टा कट्टा होण्यास अवधि फार थोडा

लागतो. शरीराचा कोणताहि भाग गोंदून घेण्याची यांच्यांत रीति नाहीं. अलीकडे हिंवतापाच्या साथीनें या लोकांतील प्राणहानि फार होत आहे.

बालपणीं अंदमानी मनुष्य बुद्धिवान दिसतो. परंतु लवकरच ही स्थिति कळसास पोंचते व अंदमानी वयांत आलेल्या मनुष्याची ग्रहणशक्ति सुधारलेल्या राष्ट्रांतील दहा बारा वर्षांच्या मुलाच्या इतकीच असते असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांनीं शेतकी कधीं केली नाहीं, कोणतेंहि प्राणी यांनीं कधीं पाळले नाहींत व मासे मारण्याचेंहि काम यांनीं कधीं केलें नाहीं. आंकड्यांचें ज्ञान यांस नसतें. एखादा नकाशा काढून त्यांस कांहीं समजून देण्याचा प्रयत्न केल्यास त्यांस ती गोष्ट समजते. एखाद्या बालकाप्रमाणें यांची स्मरणशक्ति चांगली असते व फारच थोडावेळ ती असते. हा मनुष्य परकी लोकांविषयीं संशयी परंतु त्यांचा पाहुणचार करतो. हा बहुधा अनुदार असतो; सदा आनंदी व त्यांच्यांत मानलेल्या शकुनापशकुनांविषयीं निष्काळजी; स्वतःवर संकट येईल व त्या संकटाचा परिणाम वाईट होईल ही कल्पनाच त्यास नसल्यामुळें तो स्वतःविषयीं बेपर्वा असतो. आपमतलबी हा असतोच तथापि थोडा फार उदारपणाहि याच्यांत दिसतो व मानापमानाचीहि कल्पना यास असते. अंदमानी लोक आपसांत फार प्रेमभावानें वागतात; त्याचप्रमाणें वयोवृद्ध, अशक्त व निराश्रित यांची ते काळजी वाहतात. आपल्या मुलांविषयीं त्यांस फार अभिमान वाटत असतो. परंतु राग आला असतां ते अत्यंत निष्ठुर, संशयी, अविश्वास व सूड घेण्यास तत्पर असे असतात. हे लोक स्वभावतः स्वतंत्र वृत्तीचे आहेत. विश्वास ठेवण्याच्या लायकीचे हे लोक नाहींत; व कितीहि शिक्षण दिलें तरी यांच्यात सुधारणा होणें अशक्य आहे.

यांचें खाणें मासे, पोर्क, टर्टल, रानमांजर, शेलफिश, कांहीं किडे, नानाप्रकारचीं फळें, कंदमुळें, मध वगैरे असून त्यांचा कधीं त्यांनां तोटा पडत नाहीं. अन्न नेहमीं शिजवून व बहुशः ऊन असतांनाच खातात.

लहान अंदमान व जरवा लोक वगळले तर बाकीचे लोक एकाच ठिकाणीं फार दिवस रहात नाहींत. तरी आपला प्रदेश सोडून फार लांबवर ते राहण्यास जात नाहींत.

हे नाचाचे फार शोकी आहेत. दर दिवशीं संध्याकाळीं नाचापुरती मंडळी एकत्र जमली असली तर त्यांचा नाच व्हावयाचाच. कधीं कधीं तर नाच सर्व रात्रभर चालू असतो.

संसारांत स्त्रीपुरुषांचीं कामें बहुतेक वांटलेलीं असतात, व स्त्रियांचा सामाजिक दर्जा पुरुषांपेक्षां कमी प्रतीचा मानला जातो. तथापि स्त्रियांचें समाजावर वजन नसतें असें मात्र नाहीं. म्हातारपणांत तर स्त्रियांनां मानानें वागविण्यांत येतें.

या लोकांत लग्नानंतर घटस्फोट क्वचितच होतो व मूल झाल्यानंतर तर कधींच होत नाहीं. त्याचप्रमाणें बहुपतीत्व व बहुभार्यात्व या चाली यांच्यांत नाहींत. लग्नानंतर वाईट चालीचे कोणी निघाल्यास दोघांहि दोषी माणसांचा शक्य असल्यास खून करण्यांत येतोच असा प्रकार नाहीं. लग्नविधि जरी धार्मिक नसला तरी त्यावेळीं विशेष समारंभ होतो. जोडप्यापैकीं कोणी मरण पावल्यास पुनर्विवाह बहुतेक होतो. लग्नें जमविणें हें आईबापांचें कर्तव्य मानलें जातें व केवळ आईबापांनीं लग्न ठरविलें कीं लग्न झालें असें मानण्यांत येतें. जात्यभिमान या लोकांत फारसा नाहीं व दुसऱ्या सोयी जमल्या तर या लोकांचा निराळ्या जातींतहि लग्नव्यवहार होतो.

रोजच्या व्यवहारांतहि कांहीं निर्बंध पाळले जातात. नवराबायकोच फक्त एकत्र भोजन करूं शकतात. विधवा, विधुर, अविवाहित तरुण व कुमारिका यांचें भोजन त्यांच्या त्यांच्यांत होतें. कोणीहि पुरुष आपल्यापेक्षां तरुण व विवाहित स्त्रीशीं सहसा भाषण करीत नाहीं. त्याचप्रमाणें आपल्या बायकोच्या बहिणीस किंवा आपल्यापेक्षां लहान असलेल्या नातेवाइकाच्या बायकोस तो स्पर्श करीत नाहीं.

शब्दांचा भरणा त्यांच्या भाषेंत कमी असल्यामुळें निरनिराळे विकार त्यांनां भाषेनें सांगतां येत नाहींत. उदाहरणार्थ परस्परांची भेट झाली असतांना ते फक्त एकमेकांकडे टवकारून बराच वेळ पहात असतात. नंतर त्यांच्या गोष्टी सुरू होतात.

प्रत्येक मुलाचें नांव आई ठेवते. मुलांचीं नांवें निराळीं व मुलींचीं निराळीं असा प्रकार यांच्यांत नसल्यामुळें गर्भारपणाचीं चिन्हें दिसूं लागताच नांव ठेवण्यांत येतें. नंतर प्रसंगानुसार त्या मुलास टोपणनांवहि मिळतें. त्यांच्यांत ठरलेल्या वीस नांवांपैकीं कोणतें तरी एक नांव आई ठेवते. त्याचप्रमाणें मुली वयांत आल्या कीं त्यांस ठरलेल्या सोळा फुलांपैकीं एक नांव प्राप्त होतें. ती ज्या वेळीं वयांत आली असेल त्यावेळीं फुलत असलेल्या फुलाचें नांव तिजला मिळतें.

यांचा आयुष्यक्रम म्हटला म्हणजे भक्ष्याकरितां शिकार करणें व रात्रीं नाचणें हेंच होय. आपलीं शस्त्रें, तिरकमठा, भाले वगैरे ते स्वतःच तयार करतात.

राजाची कल्पना यांच्यांत नाहीं. तथापि प्रत्येक जातींत कुणीतरी मुख्य माणूस असतोच. यास थोडा फार मान देखील असतो. या मुख्य माणसाची बायको ही बायकांत प्रमुख असते; व तो मुख्य मनुष्य मरण पावला व त्याची बायको तरुण नसून मातृपदास पोचलेली असली तर तीस त्याच्या मागून पूर्ववत मान मिळतो. खून, चोरी, खोडी किंवा बाहेरख्यालीपणा वगैरेंबद्दल ज्याचें नुकसान झालें असेल तोच पुढील परिणामाची दिक्कत न बाळगतां आगळीक करणारावर सूड उगवितो. कधीं खूनहि होतात. खून झाल्यास मृताच्या आप्तांनीं आपणांवर सूड उगवूं नये म्हणून खुनी कांहीं दिवस नाहींसा होतो. या लोकांची स्मरणशक्ति कमी

असल्यामुळें यांनां कोणत्याहि गोष्टीचा लवकरच विसर पडतो व कांहीं दिवसांनीं तो खुनी मनुष्य पुन्हां परत आल्यावर त्यास बिनधोक राहतां येतें. कारण त्यानें केलेल्या कृत्याची कोणास आठवणच रहात नाहीं.

मालमत्ता सर्व जातीची आहे असें मानण्यांत येतें. अंदमानी मनुष्य आपले दागिने कोणी मागेल त्यास खुषीनें देईल. अतिशय जरूरीच्या वस्तू कोणी नेल्याखेरीज कोणी कांहीं चोरी करतो असें या लोकांस वाटत नाहीं.

इ. स. १८५८ सालीं पोर्ट ब्लेअर येथें काळ्या पाण्याची वसाहत वसविल्यापासून या लोकांकरितां एक वसतिगृह बांधण्यांत आलें आहे. कोणाहि अंदमान्यानें वाटेल तितके दिवस येथें रहावें व वाटेल तेव्हां निघून जावें. त्यास कोणी मनाई करीत नाहीं. जोंपर्यंत तो तेथें असतो तोंपर्यंत त्याची योग्य रीतीनें अन्न पाणी वगैरेंची काळजी घेण्यांत येते. या वसतिगृहांतून त्यानें कांहीं अवश्यक गोष्टी जातांना बरोबर नेल्या तरी त्यास कोणी हरकत करीत नाहीं. याच्या मोबदला पळून गेलेले कैदी शोधून काढण्यांत व जंगलांतील कांहीं उपयुक्त वस्तू गोळा करण्याकडे यांचा उपयोग करून घेण्यांत येतो. यांनां पैशाची कल्पनाच नाहीं. यांस पैसे न देण्याविषयीं सक्त नियम आहेत. कारण यांस पैसे दिले कीं दारू पिण्यांत ते पैसे खर्च करून टाकतात.

ब्लेअर व किड ( १७८०–९६ ) यांच्या काळांत या जाती परकी लोकांशीं वैरभावानें वागत असत. परंतु ती स्थिति आतां पालटली आहे.

अन्दमान येथें आतां राजकीय कैदी मुळींच नाहींत. ज्यांच्या शिक्षेची मुदत संपली नव्हती त्यांनां १९२१ सालच्या जुलै महिन्यांत इकडे आणण्यांत आलें आहे. पुढें १९२१ च्या फेब्रुवारी महिन्यांत सरकारनें राजकीय कैद्यांनां यापुढें अंदमानावर पाठवूं नये असें ठरविलें आहे.

१९२३ मध्यें अंदमान बेटांत आंग्लोइंडियन लोकांची वसाहत करण्याचें ठरलें व तेथील हवा एकंदरींत रोगट नाहीं असें मत पुढें करण्यांत आलें. नोव्हेंबर १९२३ मध्यें लष्करी नोकरींतून सुटलेल्या १३ शिपायांनां निवड–मंडळानें अंदमान बेटांत प्रथम वसाहत करण्यास पाठवावें असें ठरविलें.

**अंदाळ (अंडाळ)**—अळवारी (तामिळ वैष्णव संत )पैकीं एक. ही स्त्री असून विष्णुचित्त नांवाच्या पुरुषाला लहानपणीं बागेंत सांपडली. हिला लहानपणापासूनच कविता करण्याचा नाद असे. ही मुलगी देवाची आवडती आहे असें तिच्या लक्षणांवरून सर्वांनां कळून आलें होतें. ही मैत्रिणी जमवून कृष्णासारख्या क्रीडा करी व कृष्णभक्तीपर पदें रची. पुढें रंगनाथ देवाबरोबर हिचें लग्न करण्यांत आलें. पण देवळांत नेल्यावर ही अदृश्य झाली असें सांगतात. या वैष्णवसंतिणीची मूर्ति दक्षिणेंत कांहीं देवळांतून दिसून येते.

**अंदोरी**—हें गांव वर्धा नदीवर असून वर्धा शहरापासून १५ मैल दक्षिणेस आहे. मराठ्यांच्या अमलांत अंदोरी नांवाचा एक परगणा होता. परंतु कमाविसदार यांची कचेरी वायगांवीं असे. हें शेतीचें गांव असून येथील लोकसंख्या इ. स. १८७० च्या सुमारास सरासरी १२०० होती.

**अंध किंवा आंध**—ही वऱ्हाडांत शेतकी करणारी एक हलकी जात आहे. ही यवतमाळ जिल्ह्यांत सांपडते. १९११ सालीं यांची संख्या५२०००होती. ही आंध्रांची एक पोटजात असावी. परंतु आंध नांव त्यांनां वऱ्हाडांत वसाहत केल्यानंतर मिळालें असावें. यांचे वरतांती व खालतांती असे दोन भेद आहेत. पहिल्या वर्गांत लग्न झालेल्या स्त्रियांच्या औरस संततीचा समावेश होतो व दुसऱ्यांत अनौरस संततीची प्रजा असावी. यांचीं अनेक गोत्रें आहेत. त्यांपैकीं पुष्कळांचीं मराठी आडनांवें आहेत. कांहींचें नांव 'मांजऱ्या' व कांहींचें ' रिंगणी' असेंहि आहे. डुकरे, ढिटवे, वाघमारे व दुमरे अशीं नांवेंहि आढळतात. भोयर आणि वंजारी अशीं नांवें इतर जातींवरूनहि पडलेलीं आहेत. या लोकांमध्यें आतेभाऊ मामेबहिणीबरोबर लग्न करूं शकतो. पण इतर प्रकारच्या बहिणींबरोबर त्यांनां लग्न करतां येत नाहीं. सगोत्र विवाह निषिद्ध आहे. लग्नविधि कुणब्यांसारखाच असतो. आक्टोबर व डिसेंबर महिन्यांत लग्नें ठरतात. आणि जानेवारीपासून एप्रिलपर्यंत लग्नें होतात. वधू प्रौढ असली तर ती लग्न झाल्याबरोबरच नवऱ्याच्या घरीं जाते. यांस एकापेक्षां जास्त बायका करण्याची मोकळीक आहे. एकापेक्षां जास्त बायका करणें संपत्तिवानांचेंच काम असल्यामुळें ज्यांनां जास्त बायका आहेत त्यांचा मान मोठा असतो. घटस्फोटाची व पुनर्विवाहाची मोकळीक आहे. लग्नापूर्वी मुलगी गरोदर असली आणि तो गर्भ उच्च जातीच्या पुरुषाचा असला तर तिला दंड करतात आणि मग पुनर्विवाहाप्रमाणें तिचें लग्न करतात. कुमारी मुलीप्रमाणें तिचे पाय धूत नाहींत किंवा पायाला कुंकवाचा अथवा अळित्याचा रंग लावीत नाहींत. कांहीं ठिकाणीं महार व मांगाबरोबर व्यभिचार केलेल्या स्त्रियांस पावन करून जातींत घेतल्याचीं उदाहरणें आहेत. व्यभिचारिणीस तिच्या शक्तीप्रमाणें दंड करून त्यांतून जातीस भोजन देण्यांत येतें.

हे लोक मृतांस पुरतात आणि पुरतांना त्याचें डोकें दक्षिणेकडे करतात. मांस, कोंबड्या, मांजरें, उंदीर व सर्प सुद्धां यांपैकीं मागसलेले लोक खातात. सुधारलेल्या लोकांनीं हें खाणें वर्ज्य केलें आहे. डुकराचें मांस मात्र यांस फार आवडतें आणि हे लोक दारूहि बरीच पितात.

यांच्या जातींत पंचायत असते. त्यांतील मुख्यास मोहवारिया म्हणतात. त्याचे मदतगार दोन अधिकारी असतात. त्यांपैकींच एकास फोपाटिया व एकास डुकरिया म्हणतात. जातीसंबंधीं अपराध घडला म्हणजे डुकरिया अपराध्यास बोलावतो. आणि त्याच्याकडून स्वतःकरितां जातीभोजनांत

मातीची भांडीं आणवितो आणि त्यांत जेवतो. फोपाटियास एक नवा कपडा दंडादाखल मिळतो. मोहतारिया गांवोगांवीं जातींतल्या कज्यांचे निवाडे करीत हिंडतो. दंडापैकीं कांहीं हिश्श्यावर त्याचा हक्क असतो. हे लोक पारधहि करतात. जाळी लावून, हरीण, ससे, रानडुकरें, नीलगाई यांस धरतात. आणि काठ्यांनीं मारतात. नदीनाल्यांत बांध घालून मासे धरतात. पक्षी मात्र धरीत नाहींत. हे येथील प्राचीन रहिवाशी असावे. आतां तर हे इतके हिंदु बनले आहेत कीं त्यांनां कुणब्यांपासून निराळे करणें कठिण पडतें.

अंधक(१)—एक असुर. कश्यप व दितीच्या या पुत्राला हजार हात व डोकीं, दोन हजार डोळे व पाय होते. दृष्टि असूनहि हा अंधळ्याप्रमाणें चाले, म्हणून याला अंधक नाव पडलें. स्वर्गांतून पारिजातक वृक्ष नेण्याचा प्रयत्न करीत असतां शिवानें याला मारिलें. या कृत्यावरून शिवाला अंधकरिपु असें संबोधितात. हा एकदा महादेव व पार्वती याच्यासहित क्रीडा करीत असता तिचें हरण करण्यास उद्युक्त झाला. त्यावरून महादेवाचें व याचें अवंती देशांतील महाकाल नामक वनांत मोठें घोर युद्ध झालें. त्यात याच्या रक्तापासून अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले. असें पाहून महादेवानें याचें रक्त वरल्यावरच नाहींसें करण्यासाठीं मातृगण उत्पन्न केला तथापि तें निःशेष होईना, म्हणून विष्णूनें शुष्करेवती नामक देवता उत्पन्न करून तिजकडून तें अगदीं निःशेष करविलें. तेणेंकरून इतर अंधक नाश पावून एकच मूळचा अवशेष राहिला. नंतर त्यास मारावें इतक्यांत त्यानें महादेवाचें अतिशय करुणस्वरानें स्तवन केलें. त्यावरून महादेव प्रसन्न होऊन त्यांनीं यास आपलें गणत्व दिलें ( मत्स्य० अ० १७९ ). याचा पुत्र आडी असुर.

(२) महिषासुराच्या सेनेंतील एक प्रमुख असुर.

(३)(सो. वं. )नहुषपुत्र ययाति राजा, त्याच्या क्रोष्टा ना० यदुपुत्राच्या वंशांत जन्मलेला सात्वत राजा. त्याच्या सात पुत्रांतील साहवा. यास कुकुर, भजमान, शुचि आणि कंबलबर्हिष असे चार पुत्र होते. या अंधकाचें कुल यदुवंशांत मोठें प्रसिद्ध होतें.

( ४ ) लोक. यांचा उल्लेख महाभारतांत अनेक ठिकाणीं आलेला आहे. कुकुर व वृष्णि लोकांप्रमाणें अंधकांनींहि जरासंधाशीं न लढण्याचें ठरविलें होतें ( म. भा. २. १९ ). महारण्यांत अंधक पांडवांनां भेटले ( ३. १२). वृष्णींबरोबर या लोकांचा पुष्कळ वेळां उल्लेख आलेला आहे. यांच्या ( यदुकुलाच्या ) नाशाची कथा भागवत व विष्णुपुराण यांतून सांपडते.

एकदां यादव मैरेयक नांवाचें मद्य पिऊन धुंद झाले व एकमेकांत कलह करूं लागले. त्याचा परिणाम घनघोर युद्धांत झाला. दाशार्ह, वृष्णि, अंधक, भोज, सात्वत, मधु, विसर्जन कुक्कुर व कुंती या यादववंशांतील वीर अर्बुद, माथुर, शूरसेन इत्यादि देशांतील वीरांशीं लढूं लागले. आसेष्ट कोण याचीहि शुद्ध राहिली नाहीं. शेवटीं कृष्ण व बलराम यांखेरीज सर्वांचा नाश झाला.

(५) ( सो. वं. ) वरील अंधकाच्या कुलांत जन्मलेल्या अनुराजाचा पुत्र दुंदुभी नामक पुत्र होता.

अंधत्व—( सामान्य विवेचन ). व्याख्या.—अंधत्व याचा अर्थ पहाण्याचा अगर चक्षुरिंद्रियाचा अभाव. अंधत्व हें निरनिराळ्या प्रकारचें असतें. जेव्हां एखाद्या मनुष्याला स्थूल वस्तु दिसत असून देखील छापील अगर हस्तलिखित शब्द ओळखतां येत नाहीं तेव्हां त्या स्थितीला शब्दगत अंधत्व म्हणतात. जेव्हां एखाद्या मनुष्याला स्थूल वस्तू दिसत असून देखील त्या वस्तू ओळखतां येत नाहींत तेव्हां तशा प्रकारच्या स्थितीलां मानसिक अंधत्व असें म्हणतात. ज्या वेळीं दोन्ही डोळ्यांच्या अगर एका डोळ्याच्या अर्ध्या भागाला दिसत नाहीं त्याला अर्धगत अंधत्व अशी संज्ञा आहे.

अंधत्वाचीं कारणें.—नेत्रामधील दुखापतीमुळें अगर दृङ्मज्जामंडलापासून तों मेंदूपर्यंत जाणाऱ्या मार्गाला झालेल्या जखमेमुळें अगर मेंदूतील क्षतामुळें अंधत्व प्राप्त होतें.

( १ ) नेत्रक्षत—बाह्यगोलाच्या तारकाविधानांतील स्पष्टपणाच्या अभावामुळें कांचेच्या रसाच्या अस्वच्छतेमुळें, पूय अगर रक्तप्रवाहामुळें, बाहुलीच्या मार्गशोषणामुळें, डोक्यांतील वाढत्या ताणाच्या योगानें होणाऱ्या फरकामुळें आणि अशाच प्रकारच्या इतर कारणांमुळें मनुष्याला अंधत्व प्राप्त होतें. एका डोळ्याला दृष्टिबंधकदाह होत असला तर बहुतेक अंशीं संवेदनासादृश्यामुळें दुसऱ्या डोळ्यास दाह उत्पन्न होतोच. जन्माच्या वेळेलाच जो सांसर्गिक दाह होतो तें लहान मुलांच्या अंधत्वाच्या करणांपैकीं एक प्रमुख कारण आहे.

( २ ) दृङ्मज्जामंडळापासून मेंदूकडे जाणाऱ्या मार्गांतील क्षत —तेजोवह दृङ्मज्जातंतुदाह हें अंधत्वाचें एक प्रमुख कारण आहे. या दाहामुळें दृग्बिंबांचा श्वेतवर्णी अपोषणक्षय होतो अगर डोळ्यामध्यें तंतु उत्पन्न होऊं लागतो. पिंगट वर्णाचा अपोषणक्षय दाहामुळें होत नसून मुळांतच उत्पादक शक्तीच्या प्रभावामुळें होतो.

( ३ ) मेंदूक्षतः—तेजोवहतंतु हे मेंदूच्या शीर्षपृष्ठभागामधील कानाच्या पाळींत गेलेले असतात. आणि कोणत्याहि पाठीच्यामधील दृष्टीमध्यें एकदां नाश पावला कीं, पूर्ण आंधळेपण प्राप्त होतें. डाव्या पाळीमधील जखम झाली असतां शब्दांधत्व अथवा चित्तांधत्व प्राप्त होतें. अशा रीतीचा फरक पडण्याचें कारण हें कीं वाणीच्या सर्व कार्यांचा उगम फक्त मेंदूच्या डाव्या भागांतूनच होतो. शिवाय दृष्टीचे जे खास मध्य असतात त्यांमध्यें जखम न होतां मेंदूच्या कोणत्याहि भागांतूनच एखादी जखम झाली असतां दृङ्मज्जातंतुदाह उत्पन्न होऊन अंधत्व प्राप्त होतें.

अंधत्वाचें प्रमाण पावसाशीं व्यस्त प्रमाणांत आढळून येतें. पंजाब, बलुचिस्तान आणि संयुक्तप्रांत यांसारख्या कोरड्या हवेमध्यें अंधत्वाचें प्रमाण फार आहे; आणि आसाम, बंगाल आणि मद्रास-सारख्या पाऊस अतिशय पडणाऱ्या प्रदेशांमध्यें हें प्रमाण कमी आहे. पण ज्या ठिकाणीं हें प्रमाण फार असतें त्या ठिकाणीं दुसरींहि पुष्कळ कारणें असतात. हिंवाळा अतिशय असतो, घरें विटांचीं बांधलेलीं असतात व हवा चांगली खेळत नसते व त्यातच स्वयंपाकाच्या वेळचा चुलीचा धूर लागल्यामुळें डोळ्याला फार इजा होते. याचें उदाहरण म्हणजे असाम व ब्रह्मदेश यांमधील कांहीं डोंगराळ प्रदेशाचें व विशेषतः काश्मीरचें होय. कांश्मीरमध्यें हिंवाळ्यांत लोक महिनेच्या महिने लहान, ठेंगण्या व धुरकट झोंपडीमध्यें रहतात. अव्यास्थितपणा व धूळ यांमुळे अंधत्वाचें प्रमाण वाढतें असें ल्लेंडचें म्हणणें आहे. समशीतोष्ण प्रदेशापेक्षां उष्ण प्रदेशांतील अंधत्वाचें प्रमाण मोठें आहे. समशीतोष्ण प्रदेशांतील अंधत्वाचें प्रमाण सरासरी १००० स १ या प्रमाणांत आहे. हिंदुस्थानामध्यें अंधळ्यांचें प्रमाण दहा हजारांस १४ आहे व यूरोपीय देशांमध्यें ८१९ आहे. पूर्वे यूरोपमध्यें म्हणजे रशियामध्यें १०००० स १९ प्रमाण आहे. अलीकडे सुधारलेल्या देशांत अंधत्वाचें प्रमाण कमी होत चाललेलें दिसतें. उदाहरणार्थ युनायटेड किंग्डममध्यें सन १८५१ मध्यें ९७९:१ असें अंधत्वाचें प्रमाण होतें, पण आतां तें १२८५:१ असें पडतें. साधारणतः वरच्या जातींत अंधत्वाचें प्रमाण कमी आढळतें व कनिष्ठ जातींत फार आढळतें. हिंदुस्थानामध्यें पुरुषांपेक्षा पुष्कळ ठिकाणीं बायकांत अंधत्वाचें प्रमाण अधिक आढळून येतें. याचें कारण पुष्कळ अंशीं धुरांत वगैरे वावरावें लागतें; वैद्यकोपचार चांगले होत नाहींत हें होय. उद्योगधंद्याच्या श्रमामुळें बायकांपेक्षां पुरुषांमध्यें अंधत्वाचें प्रमाण अधिक आहे असें पाश्चिमात्य देशांमध्यें आढळतें. १९०१ सालीं झालेल्या इंग्लंड व वेल्समधील खानेसुमारीमध्यें खालील प्रकारें कोष्टक आढळून येतें:—

| माणसें | संख्या | पुरुष | बायका |
|---|---|---|---|
| अंध | २५३१७ | १३१३६ | १२१८१ |
| जन्मान्ध | ४६२१ | २४६८ | २१५३ |
| अंधळे, बहिरे, मुके | ५८ | ३६ | २२ |
| अंधळे मुके | २३ | १४ | ९ |
| अंधळे, बहिरे | ३८९ | १४५ | २५४ |
| एकंदर | ३२५०७८४३. | १५,७८,६१३. | १६७७९२३० |

१८९० सालीं युनायटेड स्टेट्समध्यें अंधत्वाचें प्रमाण खालीलप्रमाणें होतें. गोरे लोक व इतर मिळून अंधत्वाची संख्या ५०५६८; त्यांपैकी गोरे ४३३५१; नीग्रो ७०६०; इतर १५७; पुरुष २८०८०, बायका २२, ४८८; गोरे रहिवाशी ३४,२०५; परदेशी ९१४६. एका डोळ्यानें आंधळे असलेल्यांची संख्या ९३,९८८.

प्रो. मेयो स्मिथ यांनीं आपल्या ' आंकडेशास्त्र आणि समाजशास्त्र' या ग्रंथांतील २१३ व्या पानामध्यें १०००००० स निरनिराळ्या प्रदेशांतील अंधत्वाचें प्रमाण काय आहे हें दिलेलें आहे तें खालीलप्रमाणें.—

ऑस्ट्रिया ८०६; इंग्लंड आणि वेल्स ८०९; हंगेरी १०५१ आयर्लंड ११३५; नॉर्वे १२८९; स्कॉटलंड ६९५; स्वीडन ८२५; यूनायटेड स्टेट्स ८०५; नॉर्थ ॲटलांटिक डिव्हिजन ७७७; सॉउथ ॲटलांटिक डिव्हिजन ८८८; नॉर्थ सेंट्रल डिव्हिजन ७८३; साउथ सेंट्रल डिव्हिजन ६९५; वेस्टर्न डिव्हिजन ५६१; हिंदुस्थान १४००. इ. स. १९११ च्या सेन्सस रिपोर्टप्रमाणें हिंदुस्थानांतील आंधळ्यांची संख्या ४,४३,६५३ असून त्यांपैकीं पुरुष २२१९१६ व बायका २१,७३७ होती.

**आंधळ्या लोकांच्या मनाची स्थिति.—** एकंदर आंधळ्यांच्या संख्येमध्यें मोठेपणीं आंधळे झालेल्यांची संख्या अधिक भरते; व अशा स्थितींत त्यांच्या मनोवृत्तीमध्यें कांहीं विशिष्ट तऱ्हेचा फरक आढळून येतो असें नाहीं. पण लहानपणीं अंधत्व प्राप्त झालेल्यांच्या बाबतींत मात्र गोष्ट निराळी आहे. सर्व आयुष्यभर या मुलांनां दृष्टीवांचून ज्ञानवृद्धि, अभिरुचि, नाना संवयी प्राप्त करून घ्यावयाच्या असल्याकारणानें या अंधत्वाचा त्यांच्या मनावर कांहीं तरी खास परिणाम झाला असला पाहिजे हें उघड आहे. आणि तो काय होतो हें पहाणेंहि महत्वाचें व मनोरंजक आहे.

या अंध बालकांमध्यें पहिला विशेष दिसून येतो तो हा कीं त्यांच्यामध्यें शारीरिक श्रमाच्या अभावाची इच्छा उत्पन्न होते. एखादें डोळस मूल एक घटकाभर देखील एके ठिकाणीं रहावयाचें नाहीं. पण या आंधळ्या बाळकाची प्रवृत्ति एके ठिकाणीं पुष्कळ तास बसण्याकडे दिसून येते. आंधळ्या बालकाच्या खेळामध्यें तरतरी दिसून येत नाहीं. अर्थातच या विधानाला बरेच वैयक्तिक अपवाद सांपडतील. पण सामान्यतः अशा प्रकारची प्रवृत्ति दिसून येते. आणि विशेषतः दोन्ही डोळ्यांनीं आंधळया असणाऱ्या व प्रकाशानभिज्ञ असलेल्या मुलांच्या बाबतींत तर ही प्रवृत्ति ठळक रीतीनें नजरेस आल्याविना रहात नाहीं. कर्मप्रवृत्त करणारा प्रकाश त्यांनां दिसत नसल्यामुळें हें आलस्य अंगीं येतें असें पुष्कळांचें म्हणणें आहे. मज्जातंतुरचनेला चलन देणारा प्रकाश आहे यांत शंका नाहीं. कारण अर्धवट प्रकाशाच्या खोलींत पुष्कळ वेळ घालविणाऱ्या बालकांनां अशक्तता व दुर्बलता येते. हें आलस्य अंगीं बाणण्याचें दुसरें एक कारण म्हणजे प्रत्यक्ष आईबापच त्यांच्या हातून कांहीं काम करून घेण्याऐवजीं त्यांच्या सर्व गरजा भागविण्यासाठीं झटतात हें होय.

या शरीराच्या श्रमाभावाच्या मनःप्रवृत्तीमुळें मानसिक स्थितीवरहि फार परिणाम घडतो. एका अन्धत्वावरील लेखकानें असें म्हटलेलें आहे कीं, ' आंधळ्याच्या बाबतींत

मनोव्यापारांची उत्कटता, सातत्य व विवेचनाची तीव्रता क्वचितच दिसून येतें, त्यांच्या बुद्धीमध्यें तडफ दिसून येत नसून शांतपणा, सावधगिरी व आलस्य वगैरें दिसून येतें. तेजस्वितेपेक्षां प्रगल्भता त्यांच्या ठायीं अधिक दिसून येतें. इतर लोकांच्या बाबतींत अनेक कारणांमुळें परस्परांमध्यें जें आकर्षण अगर ज्या आसक्ती उत्पन्न होतात तशा प्रकारच्या स्थिती यांच्यामध्यें दिसत नसून शांत चित्तानें विचार करून त्यांचे स्नेहसंबध जुळतात, तसेंच प्रेमाच्या तीव्र भावनाहि यांच्यामध्यें उचंबळत नाहींत व व्यापक मनाचा व रंगेलपणाचाहि यांच्या मनामध्यें अभाव दिसून येतो ' ( नेटिव्ह रिव्ह्यू १८६० ).

बाह्य जगाचें ज्ञान मिळविण्यासाठीं आंधळ्या लोकांना स्पर्शशक्तीचा इतका अवलंब करावा लागतो कीं ही शक्ति पुढें अत्यंत तीव्र होते. आंधळ्या मनुष्यांच्या स्पर्शज्ञानाच्या बाबतींत अनेक आश्चर्यकारक गोष्टी प्रसिद्ध आहेत. प्रत्यक्ष डोळस लोकांच्या नजरेस ज्या पत्यावरील खुणा दृष्टीस पडल्या नाहींत त्या ओळखून त्यांच्या साहाय्यानें पत्ते खेळलेल्या आंधळ्यांचीं उदाहरणें आहेत. सवईमुळें बोटांची स्पर्शज्ञानशक्ति फार जलद तीव्र होते आणि अशा प्रकारें ती नेहमीं तीव्र राखण्याकरितां बोटांच्या टोंकावरील कातडें अगदीं मऊ व गुळगुळीत ठेवण्याची आंधळे लोक वारंवार खबरदारी घेतात. ज्या ठिकाणीं या बोटांचा कांहीं उपयोग होत नाहीं अशा वेळीं बोटांहून अतिशय तीक्ष्ण अशा ओष्ठांचा व जिव्हाग्राचा ते उपयोग करतात. जड वस्तूंच्या सांन्निध्यांत असतांनां त्यांच्या मुखाची कातडी फार संवेदनाशील होते आणि अस्पष्ट अशा वायुलहरी देखील जाणण्याचें सामर्थ्य त्यांच्या कानावरील पडद्याच्या ठायीं वास करतें. मिस्टर डब्ल्यु हँक्स लेव्ही नांवाच्या एका आंधळ्या ग्रंथकारानें जवळच्या वस्तू ओळखण्याची शक्ति स्वतःला कशी प्राप्त झाली याची मजेशीर हकीकत दिलेली आहे. तो म्हणतो कीं " घरामध्यें काय किंवा खुल्या जागेंत काय मी जरी पूर्ण आंधळा असलों तरी मी एखाद्या वस्तूच्या समोर उभा राहिलों आहे किंवा नाहीं हें मला ओळखतां येतें. आणि तसेंच ती वस्तु उंच अगर लहान, जड अगर हलकी आहे हेंहि मला ओळखतां येते. त्याप्रमाणेंच समोर असलेली वस्तु एकच आहे किंवा अनेक आहेत, जाळीदार आहे किंवा बिनजाळीदार आहे लांकडाची आहे अगर विटांची आहे वगैरे सर्व मला जाणतां येतें. माझ्या खांद्याच्या पेक्षां कमी उंच असणारी वस्तु मात्र मला साधारणतः ओळखतां येत नाहीं. पण क्वचित तीहि प्रयासानें ओळखतां येते. ही शक्ति फक्त माझ्या चेहऱ्यामध्येंच आहे व ती प्रयोगानें पैदा केलेली आहे. ही स्पर्शज्ञानशक्ति माझे कान बंद केल्यानें कमी होत नाहीं पण तोंडावर एखादा बुरखा घेतल्यानें मात्र नाहींशी होते " ( अंधत्व लंडन १८८२).

आंधळ्यासंबंधी लिहिणारे कांहीं ग्रंथकार आंधळ्यानां अवकाशाची कांहीं कल्पना नसते व आपल्या हाताच्या पंज्याच्या आंत जेवढी जागा असते तेवढाच अवकाश त्यांनां माहीत असतो, अशीं विधानें करतात; पण वरील लेव्हीचें म्हणणें वाचल्यानंतर या विधानाच्या असत्यतेबद्दल शंका रहात नाहीं. निरनिराळे प्रदेश व त्या ठिकाणीं असणारे सृष्टीचे देखावे पाहण्याला आंधळे लोक उत्सुक असतात हें लक्षांत घेतलें म्हणजे वरील विधानांत अर्थ नाहीं असें खात्रीनें वाटूं लागतें. डोंगर चढण्यांत देखील आंधळ्यांनां आनंद वाटतो व नुकतेच माउंट ब्लँकच्या शिखरावर गेलेल्या एका आंधळ्या मनुष्यानें आपल्या प्रवासाविषयीं वर्तमानपत्रांत लिहितांना असें म्हटलें आहे कीं ' येथील देखावा मला जितका मजेनें अनुभवतां आला तितका इतर डोळस लोकांनाहि अनुभवतां आला नसेल. तात्पर्य डोळस मनुष्याच्या पृथ्वीच्या कल्पनेमध्यें व आंधळ्याच्या कल्पनेमध्यें जरी पुष्कळ फरक असला तरी त्याला देखील पृथ्वीची कांहीं कल्पना असते हें खास.

तसेंच आंधळ्या मनुष्याला आपल्या पलीकडचें जाणण्यासाठीं अवाजाची देखील मदत होते, व एखादी वस्तु दूर गेली म्हणजे आपल्याला ज्याप्रमाणें ती कमी कमी दिसूं लागते त्याप्रमाणें आंधळ्या मनुष्याला वस्तु दूर किंवा नजीक आहे हें आवाजावरून कळून येतें. आंधळा मनुष्य फिरायला बाहेर पडला असतांना आपणांस ज्याप्रमाणें देखावा पाहून आनंद होतो त्याप्रमाणें त्याला परिचित आवाज ऐकून मनाला आल्हाद वाटतो. आपल्यापासून वस्तु किती अंतरावर आहे हेंहि त्याला चटकन आणि अगदीं बिनचूक सांगतां येतें व एका आंधळ्या मनुष्याची अशी गोष्ट सांगतात कीं, अगदीं बिनचूक रीतीनें तो लक्ष्यवेध करीत असे फक्त तें लक्ष्य कोठें आहे तें त्या लक्ष्याच्या बरोबर मागें घंटा वाजवून त्याला सांगावें लागे.

संभाषण हें तर स्वाभाविकपणेंच आंधळ्यांनां करमणुकीचें व प्रिय वाटतें. आपल्यापेक्षां देखील त्यांनां तें अधिक प्रिय वाटतें; कारण आपल्याला हावभावावरून जें बोलणाऱ्याचें हृद्गत कळतें तें त्याच्या बाबतींत फक्त शब्दांच्या आवाजावरूनच कळतें. वस्तूंच्या दृश्य स्वरूपाच्या वर्णनामध्यें आंधळ्यांनां फार आनंद होतो हा एक त्यांच्या स्वभावांतील चमत्कारिक विशेष आहे. आपल्या भाषणामध्यें दृश्य वस्तूंच्या कल्पनेंतच ते बोलत असतात व अमकी वस्तु पाहिली पाहिजे, अमकें स्थळ पाहिलें पाहिजे असें सांगत असतात. याचें कारण ज्या वस्तू पहावयाला मिळत नाहींत त्या वस्तूंचाच हव्यास मनुष्याला असतो हें होय. अंधळ्यांनां शिकविणाऱ्या एका शिक्षकानें म्हटलें आहे कीं आंधळे लोक दृक्शास्त्राविषयीं जितकें काळजीपूर्वक लक्ष्य देतात तेवढें इतर शास्त्राविषयीं देत नाहींत.

आंधळ्याच्या मनाची प्रवृत्ति संघटनक्षम ( सिंथेटिकल ) असते असें कांहीं म्हणतात. तर दुसरे कांहीं पृथक्करणक्षम (ॲनालिटिकल) असते असें म्हणतात. डब्ल्यू. जेम्स 'मानस शास्त्राचीं तत्त्वें' या ग्रंथांत म्हणतोः—

"डोळस मनुष्याच्या व आंधळ्या मनुष्याच्या कल्पनेमध्यें जो फरक असतो तो हा कीं, आंधळ्या मनुष्याचें मन संघटनाक्षम असतें. डोळस मूल प्रथमतः सर्व खोलीकडे पाहील व नंतर निरनिराळ्या भागाकडे पाहील. पण आंधळें मूल खोलीच्या प्रत्येक भागाचें ज्ञान मिळवून नंतर त्या प्रत्येक भागाच्या ज्ञानानें सर्व खोलीची कल्पना करील."

याच्या उलट एम डूफॉ असें लिहितो. "आंधळा मनुष्य व डोळस मनुष्य हे एखाद्या वस्तूचें (उदा. लतेचें ) ज्ञान कसें संपादन करतात याकडे पाहिलें तर आपल्याला असें आढळून येईल कीं डोळस मनुष्य त्या लतेकडे एकदम पाहून त्या लतेचें ज्ञान करून व तशाच प्रकारची लता दृष्टीस पडली की तो अमकी लता आहे असें ओळखील. पण आंधळा मनुष्य त्या लतेचा प्रत्येक अवयव ( फांद्या, फुलें, पानें वगैरे) चांचपून पाहील. कारण त्याशिवाय त्याला दुसरी त्याच प्रकारची लता आहे असें सांगतां येणार नाहीं. अशा रीतीनें पृथक्करण करून पहाण्याची संवय त्याला स्वाभाविकच होईल" ( डूफॉ डे ॲव्ग्युग्ले १८५० ).

वरील दोघां विद्वानांचीं मतें आपल्याला सत्कृद्दर्शनीं परस्पर विरोधी वाटतात पण तीं तशीं नाहींत. व कांहीं अंशीं तीं दोन्हीं खरीं आहेत. आपल्याभोंवतालच्या जगाचें स्वरूप समजून घेण्याला आंधळ्या मनुष्याला पृथक्करण करावें लागेल व पृथक्करणानंतर संघटना करावी लागेल. या दोन्ही क्रिया त्याला अधिक व्यवस्थित रीतीनें व काळजीपूर्वक कराव्या लागतील. या पृथक्करण संघटनाक्षम मनोवृत्तीमुळेंच त्यांनां सूक्ष्म रीतीनें निरीक्षण करतां येतें व याचमुळें एखाद्या शिकलेल्या आंधळ्याला काल्पनिक काव्यापेक्षां शास्त्रीय निरीक्षण करणें अधिक आवडतें.

वृद्धपणीं दृष्टी परत आल्याचीं उदाहरणें अर्थातच फार नाहींत. पण जीं आहेत तीं मजेशीर होतील यांत शंका नाहीं. मोलीन्क्सच्या सिद्धांताकडे याचमुळें लोकांचें लक्ष्य लागलेलें आहे. हा सिद्धांत पुढीलप्रमाणें आहेः—

"समजा कीं एखादा मनुष्य जन्मांध असून बराच मोठा झाला आहे. स्पर्शज्ञानानें त्याला घनवस्तु आणि वर्तुळाकार वस्तु कोणती आहे हें शिकविलें. नंतर त्या वस्तू नजवळच्या मेजावर ठेवल्या व त्याला विचारलें कीं स्पर्श न करतां वर्तुळाकार वस्तु कोठें आहे व घन वस्तु कोठें आहे हें सांग, तर त्याला तें सांगतां येईल किंवा नाहीं ?"

या प्रश्नाचें मोलीन्क्सनें नकारार्थी उत्तर दिलें. लॉकनें हेंच मत व्यक्त केलें पण याच्या उलट डॉ. फ्रँझ आणि हॅमिल्टन यांनीं आपला अभिप्राय दिला. या अभिप्रायानंतर डॉ. फ्रँझ याला लवकर आपलीं मतें पडताळून पहाण्याचा योग आला. एक रोगी डोळ्याचें ऑपरेशन करून घण्याकरितां आला. त्यावेळीं त्याचें वय १७ वर्षांचें असून तो भूमिति शिकलेला होता. शस्त्रक्रिया झाल्यानंतर त्याला एक उभी व आडवी रेघ दाखविण्यांत आली व त्यानें कोणती उभी व कोणती आडवी आहे हें बिनचूक सांगितलें. पण त्याला जेव्हां ती दाखीव म्हणून सांगितलें त्यावेळीं त्यानें प्रथमतः बरोबर दाखविली नाहीं; पण कांहीं वेळानंतर विचार करून त्यानें बरोबर दाखविली. प्रथमतः चूक होण्याचें कारण अर्थातच असें होतें कीं दृष्टींद्रियामध्यें व स्पर्शेंद्रियांमध्यें जितकी संगति जुळायला पाहिजे तितकी झाली नव्हती. नंतर त्याला ६ इंचाच्या 'बाजू' ची एक चौकोनाकृति दाखविली. या चौकोनामध्यें एक वर्तुळ असून त्या वर्तुळामध्यें एक त्रिकोण होता. त्याला या कोणत्या आकृती आहेत तें सांगण्यास सांगितलें असतां त्यानें बराच वेळ विचार केल्यावर बिनचूक रीतीनें सांगितलें.

अशाच प्रकारची एक गोष्ट ग्लॅसगोचे डॉ. ए. मेटलंड रॅमसे यांनीं सांगितलेली आहे. त्यांच्याकडे एक तीस वर्षांचा जन्मांध रोगी होता. त्याला रात्र व दिवस मात्र ओळखतां येत असे. बाह्यगोल भिंग काढण्याची शस्त्रक्रिया झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं त्याला अगदीं दिपल्यासारखें होऊन त्याला आपण पहातों आहे किंवा नाहीं हेंहि समजेनासें झालें. त्याच्या खोलीमध्यें त्याला सर्वच मोठें दिसावयास लागल्यामुळें त्याला बिनचूक रीतीनें वस्तु ओळखतां येईना. त्याला चेंडू कोणता व वीट कोणती हें ओळखावयास सांगितलें असतां त्यानें बराच वेळपर्यंत त्यांच्याकडे टक लावून पाहून नंतर बरोबर सांगितलें. अनेक वस्तू हातांत घेऊन ओळखण्याची संवय झाल्यामुळें वस्तूंच्या आकाराबद्दल डोक्यामध्यें प्रकाश चटकन पडतो असें त्यानें सांगितलें.

**आंधळ्यांचें शिक्षण व शुश्रुषा.**—आंधळ्याच्यासंबंधीं चांगल्या रीतीनें त्यांनां वागविण्यासंबंधानें बायबलमध्यें उद्गार आलेले आहेत. पण समाजानें आंधळ्यांच्या रक्षणाकरितां जबाबदारी पत्करण्याची कल्पना पुष्कळ अलीकडची आहे. १२६५ सालीं एकच आंधळ्यांची शाळा असून त्यांत नवव्या सेंट लुईनें धर्मयुद्धामध्यें डोळे गेलेल्या ३०० सरदारांची सोय केलेली होती. स्पर्शज्ञानाच्या द्वारें आंधळ्यांनां शिक्षण देण्याची कल्पना प्रथमतः १७८३ मध्यें बिकोंर्डी येथें रहाणारा हायुई याच्या डोक्यांत आली. उठावदार अक्षरांच्या योगानें आंधळ्यांनां शिक्षण देतां येतें हें सिद्ध झाल्यावर लोकांमध्यें त्याविषयीं जागृति उत्पन्न होऊन हायुईला १७८५ मध्यें पहिली 'आंधळ्या तरुणांची शाळा' काढतां आली. त्यानंतर अशाच प्रकारची संस्था तपासण्याची विनंति राशियन सरकारकडून केली गेल्यामुळें हायुई हा सेन्टपीटर्सबर्गला गेला. १७९१ मध्यें लिव्हरपूल येथें आंधळ्यांकरतां एक शाळा निघाली; व थोडक्याच

दिवसांनीं म्हणजे दोन वर्षांनीं 'एडिंबरो अंधाश्रम' नांवाची एक जगप्रसिद्ध संस्था स्थापण्यांत आली. या शाळा सुव्यस्थित रीतीनें चालल्यानंतर त्याच धर्तीवर जिकडे तिकडे पुष्कळ संस्था निघाल्या. आंधळयांनां उठावदार अक्षरांच्या साहाय्यानें या शाळांमधून शिक्षण मिळतें व इतर शाळांसारखेच त्यांनां विषय शिकविण्यांत येतात. तसेंच त्यांनां आपलें स्वतःचें पोट भरतां यावें हें ध्यानांत ठेवून त्यांनां निरनिराळ्या धंद्यांचें शिक्षण देण्यात येतें. कांहीं थोड्या शाळांतून म्हणजे उदाहरणार्थ नॉर्मल कॉलेज अगर ॲकॅडमी फॉर म्यूझिक मध्यें, एखाद्या खास धंद्याचें पूर्ण शिक्षणहि देण्यांत येतें.

आंधळयांनां वाचण्यास शिकविण्याच्या पद्धतीचाहि इतिहास मोठा मनोरंजक आहे. प्रथमतः हायुईनें रोमन लिपीचाच उपयोग केला. यानंतर उठावदार अक्षरांचे निरनिराळे प्रकार अस्तित्वांत आले. यांपैकीं पहिली पद्धत १८२७ मध्यें एडिंबरो येथील जेम्स गॉलनें शोधून काढली. यानें रोमन अक्षरांचाच उपयोग केला. फक्त अक्षरांची ओळख लवकर व्हावी यासाठीं त्यानें अक्षरांचें वक्र वळण काढून टाकून त्या जागीं अक्षरें कोनाकार केलीं. या अक्षरपद्धतीमध्यें १८३४ सालीं सेंट जॉनचें धर्मपुस्तक छापण्यांत आलें. आंधळ्यासाठीं उठावदार अक्षरांत धर्मग्रंथ छापण्यांत आलेला हा प्रथमचाच होय. या रोमन अक्षरांमध्यें थोडा फेरफार करून होवे, ॲल्स्टन आणि ल्याय यांनीं आपल्या पद्धती अंमलांत आणल्या. लघुलिपि व शीघ्रलिपींच्या पद्धतीहि पुष्कळ निर्माण झाल्या. पण त्या विशेष फायद्याच्या ठरल्या नाहींत. एक ओळ वाचून दुसऱ्या ओळीकडे विनचूक जातां येण्यासंबंधींची अडचण लक्षांत आणून फ्रेरेनें आपली एक पद्धत काढली. त्या पद्धतीप्रमाणें आंधळा वाचक एका ओळीच्या शेवटीं आपल्या बोटाच्या साहाय्यानें वाचीत गेल्यावर ओळीच्या शेवटीं जो एक वक्र दुसऱ्या ओळीला मिळविला असतो त्या वक्राच्या साहाय्यानें दुसऱ्या ओळीच्याकडे जाऊन उलट्या रीतीनें पुनः वाचीत यावयाचें व पुनः तसाच एक वक्र घेऊन त्याच्या साहाय्यानें पुनः तिसरी ओळ वाचावयाची अशा रीतीनें उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे अशी ही पद्धत आहे.

मूनची लोकप्रिय झालेली पद्धत ही रोमन अक्षरांमध्यें थोडा फेरफार करून केलेली आहे पण कांहीं स्वतंत्र खुणा देखील अंमलांत आणलेल्या आहेत. फ्रेरेची 'परत ओळी'ची पद्धत यानें कायम ठेवली होती तरी पण त्याची उलट्या तऱ्हेनें वाचण्याची पद्धत मात्र काढून टाकलेली होती. अद्यापि देखील मूनची पद्धत बरीच उपयोगांत आणली जाते; आणि आंधळे लोक रस्त्यांतून जे धर्मग्रंथ वाचत जातात ते याच पद्धतीनें छापलेले असतात. तरी पण या पद्धतींत दोन मोठे तोटे आहेत. एक तर या तऱ्हेनें छापलेलीं पुस्तकें फार महाग असतात व शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे तीं फार जड असतात. एकच धर्मपुस्तक म्हणजे एक जड ओझें असतें.

या अशा निरनिराळ्या पद्धती अंमलांत आल्यानें अर्थातच पुष्कळ गैरसोई होऊं लागल्या. एखाद्या आंधळयास एका पद्धतीनें एखादें पुस्तक वाचतां आलें म्हणजे दुसऱ्या पद्धतीनें छापलेलीं पुस्तकें कांहीं वाचतां येत नसत व त्या तऱ्हेनें शिकलेल्या माणसामध्येंच त्या तऱ्हेचीं छापलेलीं पुस्तकें खपत असत. अशी अडचण ध्यानांत आणून 'ब्रिटिश अँड फॉरिन ब्लाइंड ॲसोसिएशन' नांवाची एक संस्था स्थापन झाली; व त्या संस्थेनें आपलें ध्येय अत्यंत सुंदर अशी एकच पद्धत चोहोंकडे अंमलांत आणण्याचें ठरविलें. आतांपर्यंतच्या ज्या पद्धती अंमलांत होत्या त्यांमध्यें सर्व प्रकारच्या सोईची अशी एकहि पद्धत नव्हती. अशा प्रकारचें संशोधन करतां करतां १८६८ सालीं इंग्लंडमध्यें एक नवीन पद्धत अस्तित्वांत आली. ही पद्धत ४० वर्षांमागें एका फ्रेंच आंधळ्या मनुष्यानें काढलेली होती व त्याच्याच नांवानें ही पद्धत प्रसिद्ध झाली. ही पद्धत म्हणजे ब्रेले पद्धत होय. या पद्धतीचे फायदे असे आहेत कीं यांतील अक्षरें झटकन ओळखतां येतात. या पद्धतीचीं अक्षरें खुद्द आंधळयांनां देखील स्वतःला व दुसऱ्यांनां समजण्याइतकीं स्पष्ट लिहितां येतात व हीमध्यें छापून निघालेलीं पुस्तकें पुष्कळ हलकीं व स्वस्त असतात.

ल हा न अं ध बा ल कां ब द्द ल क र्त व्य.—मूल लहानपणींच आंधळें झालें असतां शाळेंत पाठविण्याच्या पूर्वी मुलाला आईबापांनीं पुष्कळ शिकवण्यासारखें आहे. आंधळ्या मुलांच्या शिक्षकांची अशी कुरकुर नेहमीं असते कीं या लहान मुलांनां आपल्या हाताचा उपयोग कसा करावा हें कळत नसतें. त्यांच्यामध्यें आत्मविश्वासाचा अभाव असतो. त्यांचे स्नायू बळकट नसतात, व त्या बालकांनां शिक्षण देण्यापूर्वी त्यांच्याकडून कांहीं महिने व्यायाम करून घ्यावा लागतो. त्यांच्या आईबापांनीं याविषयीं कांहींच काळजी घेतलेली नसते हें याचें मुख्य कारण होय. तीं त्या मुलाला कांहीं काम करूं देत नाहींत. तो आंधळा आहे म्हणून त्याला खेळूं देत नाहींत. अशा प्रकारच्या नसत्या भीतीनें त्या मुलाला त्यांचे आईबाप निरुपयोगी करून ठेवतात. पण वास्तविक पहातां त्याच्या आईबापांनीं त्याला अगदीं याच्या उलट वागविलें पाहिजे. एका वाक्यांत सांगावयाचें असल्यास डोळस मुलाप्रमाणेंच या आंधळ्या मुलालाहि वागविलें पाहिजे. त्याला खेळूं दिलें पाहिजे, फिरूं दिलें पाहिजे, खोलींतील सामान धुंडाळूं दिलें पाहिजे; जिने उतरूं चढूं दिले पाहिजेत. स्वाभाविकपणेंच आंधळयाच्या आईबापाला त्याला कांहीं तरी जखम होईल यामुळें भीति वाटेल हें उघडच आहे. पण त्या मुलाच्या अंगात आत्मविश्वास उत्पन्न होण्यासाठीं त्यानें स्वतःला थोडी फार दुखापत करून घेतली तरी ती सहन केली पाहिजे.

मुलगा मोठा झाल्यावरोवर त्याचे त्याला कपडे घालण्यास, कपड्यांची घडी घालण्यास व खेळ खेळण्यास शिकविलें पाहिजे. ब्रेलपद्धत शिकण्याला मणि वगैरे हातांत घेऊन मोजणें वगैरे पद्धत माहीत असणेंहि अवश्य आहे.

ज्यावेळीं मोठेपणीं कांहीं कारणांमुळें अगर रोगांमुळें दृष्टी हळू हळू मंद होऊं लागून अंधत्व येणार असें पक्कें वाटूं लागतें त्यावेळीं अशा माणसांनीं आपलें इतर कोणतें तरी इंद्रिय, विशेषतः स्पर्शेंद्रिय तीक्ष्ण संवेदनाशील करण्यास लागलें पाहिजे. किंचित दिसत असतांना मेले अक्षर-पद्धति शिकून घ्यावी. ब्रेलअक्षरलेखनपद्धतीचाहि अभ्यास करावा. दररोजचीं कपडे घालणें इत्यादि कामें डोळे मिटून करण्याची संवय ठेवावी, व खरोखरच कोठें अडचण भासली तर डोळे क्षणभर उघडावे. पण अशीं डोळे मिटून सर्व कामें करण्याची अगाऊ तयारी ठेवली असतां अंधत्व आल्यावर फारसा त्रास पडत नाहीं.

आंधळ्यांकरितां हिंदुस्थानांत निघालेल्या संस्था.—मुंबईस ताडदेव भागांत व्हिक्टोरिया मेमोरियल स्कूल; अमेरिकन मिशन स्कूल, दादर; कलकत्त्यास औद्योगिक भुवनाला जोडून आंधळ्यांची शाळा आहे; अलाहाबाद व अहमदाबाद या ठिकाणीं अंधगृहें आहेत; लाहोरला एक सरकारी व एक रेल्वेची शाळा आहे. राजपुतान्यांत अंध ख्रिस्ती मुलांकरितां 'दि नॉर्थ इंडियन होम' नांवाचें गृह आहे. म्हैसूर संस्थानांत आंधळे व बहिरे यांकरितां एक संस्था आहे. यांखेरीज रांची, पलमकोट्टा ( तिनेवेल्ली ), बैतलपूर ( द्रुग मध्यप्रांत ) इत्यादि ठिकाणीं आन्धळ्यांकरितां शाळा आहेत.

जगांतील कांहीं इतिहासप्रसिद्ध आंधळीं माणसें खालीं दिलीं आहेत.

शहाअलम बादशहा—हा मोंगल बादशहा आंधळा होता.

डिडिमस ऑफ अॅलेक्झांड्रिया —( ३०४—३९५ )हा गणिती, अनेकभाषाकोविद व धर्मशास्त्रपारंगत होता.

निकेस ऑफ मॅलिनेस— ( मृत्यू १४९२ ); हा कोलोन विश्वविद्यालयांत कायद्याचा प्रोफेसर होता.

जॉन मिल्टन —( १६०८—१६७४ ) हा इंग्लंडमधील नामांकित कवि होता.

एडवर्ड रशटन—( जन्म १७५६ )—याचें बाळपणींचें शिक्षण लिव्हरपुल येथें झालें. नंतर तो व्यापार करण्याकरितां पश्चिम हिंदुस्थानांत येण्यास निघाला. वाटेंत त्याचें जहाज फुटल्यामुळें, त्याला जलसमाधि मिळावयाची. पण एका नीग्रोनें त्याला आपला जीव धोक्यांत घालून वांचविलें; यामुळें नीग्रोबद्दल त्याच्या मनांत कायमचा आदरभाव राहून नीग्रोच्या उद्धाराकरितां त्यानें पुष्कळ खटपट केली. डोमीनीकाला जात असतांना मार्गांत जहाजावर रोगाची साथ पसरून त्यांत त्याची दृष्टि नाहींशी झाली. याच्यानंतर त्यानें आपला व्यवसाय, वाङ्मयविषयक लेख लिहिण्यांत व काव्यें रचण्यांत घालविला.

डॉ. टी. आर आर्मिटेज—हा वैद्यकीचा अभ्यास करण्याकरितां किंग्ज कॉलेज व तसेंच पॅरीस व व्हिएन्ना या ठिकाणीं राहिला होता. वयाच्या ३६ व्या वर्षी तो आंधळा झाल्यामुळें त्यानें वैद्यकीचा धंदा सोडून आंधळ्यांच्या कल्याणासाठीं आपलें आयुष्य वेंचण्याचा निश्चय केला. त्यानें आंधळ्यांसाठीं, ' दि इंडिजंड ब्लाइंड व्हिझिटिंग सोसायटी; ब्रिटिश अँड फॉरिन ब्लाइंड असोसिएशन; व रॉयल नॉर्मल कॉलेज इत्यादि संस्था स्थापन केल्या.

एलिझाबेथ गिलबर्ट.—ही चिचेस्टरच्या धर्मगुरूची मुलगी होती. वयाच्या तिसऱ्या वर्षी हिला अंधत्व प्राप्त झालें. तिचे शिक्षण घरगुती तऱ्हेनें झालें. २७ व्या वर्षापासून इंग्लंडमधील अनाथ अंधळ्यांची स्थिति सुधारण्याकडे तिचें लक्ष वेधलें. १८५६ मध्यें तिनें आंधळ्यांच्या कल्याणासाठीं एक संस्था स्थापन केली.

हेन्री फॉसेट—हा केंब्रीज येथें अर्थशास्त्राचा प्रोफेसर असून पोस्टमास्तर जनरलचीहि जागा त्याला मिळाली होती.

[ संदर्भ ग्रंथ—लेव्ही—ब्लाइंडनेस अॅन्ड दि ब्लाइंड ( १८७२ ); जे वुइल्सन—बॉयॉग्राफी ऑफ दि ब्लाइंड. (१८३८); ब्लेयर—एज्युकेशन ऑफ दि ब्लाइंड (१८६८); अॅनॅग्नास—एज्युकेशन ऑफ दि ब्लाइंड ( १८८२ );एच. जे वुइल्सन—इन्स्टिट्यूशन्स, सोसायटीज अॅन्ड क्लासेस फॉर दि ब्लाइंड इन इंग्लंड अॅन्ड वेल्स ( १९०७ ); डॉ. रोथ—प्रिव्हेंशन्शन ऑफ ब्लाइंडनेस ( १८८५ ); गॅब्रिन डगलस-रिमार्केबल ब्लाइंड पर्सन्स ( १८२९ ); इलिंगवर्थ—मेथड्स ऑफ एज्युकेटिंग दि ब्लाइंड; ड्रूमंड—एज्युकेशन ऑफ दि ब्लाइंड(१८९९), हेलन केलर—दि स्टोरी ऑफ माय लाईफ ( १९०३ ); डॉ. एमिली जॅव्हल—दि ब्लाइंड मॅन्स वर्ल्ड (१९०४) ].

वैद्यकीय उपपत्ति व इलाज.—सर्व सुधारलेल्या देशांतील आंधळ्यांच्या संख्येचें कित्येक वर्षें परिश्रमपूर्वक मनन करून आंकडेशास्त्रज्ञांनीं असें अनुमान काढलें आहे कीं या देशांत आंधळ्यांची संख्या कमी होत आहे याचीं कारणें, वैद्यक शास्त्रांतील सुधारणा, आरोग्याच्या नियमानुसार राहणी, डोळ्यांत जंतुघ्न औषधें घालणें, सांथीच्या रोगांचें शमन करण्याची शक्ति व गिरण्या बाजार येथील आरोग्यसंबंधीं सुव्यवस्था हीं होत. उष्ण देश व समुद्रकिनाऱ्यापासून दूर असलेल्या देशांतून हीं संख्या अधिक असलेली आढळून आली. याचा प्रतिबंध होण्यासारखीं कारणें पुढें दिल्याप्रमाणें:—

पूयविशिष्ट बालनेत्रदाहः—पुष्कळ आंधळे असे आढळून येतात कीं त्यांना थोडेसे योग्य इलाज वेळेवर केले असते तर त्यांच्या जन्माचें अंधत्व टळलें असतें.

म्हणून साधारण जनसमूहांत या प्रतिबंधक सोप्या उपायांची माहिती जितकी होईल तितकी करून देणें फार जरूरीचें आहे. शेंकडा ४० अधळ्यांनां अंधत्व या सोप्या प्रतिबंधक इलाजाच्या आज्ञानामुळें व उत्तम नेत्रवैद्याचा सल्ला न मिळाल्यामुळें आलेलें असतें. दुसऱ्या एका विद्वानाच्या मतें शेकडा ३६ रोग्यांचे डोळे खात्रीनें बरे करतां आले असते व तोच म्हणतो कीं शेकडा ३८ माणसांची दृष्टी बहुतकरून बचावतां आली असती. ज्यावर कांहींहि इलाज चालला नसता असे आंधळे शेंकडा २४ फार तर असतील असा एका विद्वानानें अजमास केला आहे. या सर्वांचें म्हणणें विचारांत घेऊन असा निष्कर्ष निघतो कीं सुमारें १००० आंधळ्यांपैकीं ४०० आंधळ्यांची दृष्टी प्रतिबंधक उपायांच्या ज्ञानानें किंवा योग्य माणसांकडून इलाज होऊन खास बचावली असती. या आंकड्यावरून या विषयाचें महत्त्व ध्यानांत येईल. अंधत्वाचें मुख्य कारण म्हणजे पूययुक्त बालनेत्रदाहानें डोळे येणें. मूल उपजण्याच्या वेळीं त्याच्या डोळ्यांत योनींतील स्राव वगैरे शिरतात. नंतर ते डोळे औषध घालून स्वच्छ करण्यांत येत नाहींत व त्यामुळें डोळा लाल होऊन गळूं लागतो व पुवाची वृद्धि होऊन डोळ्यांवरून सारा फूल इत्यादि दुसरे विकार होऊन आंधळेपण येतें ह्या रोगाचा एक विशिष्ट जंतु असतो व मूल जन्मल्यावर त्याच्या डोळ्यांत काडीखाराचें एक औंस पावसाच्या पाण्यांत ४ ग्रेन या प्रमाणांत तयार केलेलें औषध घातलें असतां मुलाच्या दृष्टीस धोका रहात नाहीं. जर्मनींत असा कायदाच आहे कीं, मुलांच्या डोळ्याचा लहानसहान रोग जरी असला तरी त्यास सुइणीनें औषध देऊं नये. व डोळे बिघडलेलीं मुलें नजरेस येतांच त्यांच्या आईबापांस सांगून योग्य डाक्तरांकडून इलाज करविण्याविषयीं त्यांस सुचविलें पाहिजे व तें दुर्लक्ष करतील तर त्या गांवच्या अधिकाऱ्यांकडे तिनें स्वतःच वर्दी पोंचवावी असाहि कायदा आहे. म्हणजे मग सरकारी डाक्तर येऊन औषध देतो. यांत कोणी हलगर्जीपणा केल्यास शिक्षा करतात. अमेरिकन संयुक्त संस्थानांपैकीं बहुतेकांत असा कायदा आहे कीं,सुईणीच्या नजरेस डोळ्यांची लाली, सुज,गळ इत्यादि प्रकार दिसून येतांच सहा तासांच्या आंत तिनें नेमलेल्या अगर इतर डाक्तरास वर्दी दिलीच पाहिजे. आणि असें न केल्यास कैदेची किंवा दंडाची शिक्षा करतात. अमेरिकन मेडिकल सभेपुढें एका नेत्ररोगचिकित्सकानें याविषयीं निबंध वाचला. त्यांतील थोडे निवडक वेचे येथें देण्यासारखे आहेतः—" एखादें सुधारलेलें आणि आपणांस ज्ञानी समजणारें राष्ट्र आपल्या लोकसंख्येपैकीं कित्येक हजारो लोकांनां आंधळे होऊं देतें यास काय म्हणावें ? यांपैकीं एकचतुर्थांश लहान बालकें असतात व त्यांपैकीं दोनपंचमांश लोक थोड्याशा इलाजानें साफ बरे होण्यासारखे खास असतात. ही कल्पना डोक्यांत आली म्हणजे मन थक्क होतें. इतके हजारों लोक माणसांतून उठल्यासारखें होऊन निरुपयोगी व्हांवे हा देशाचा मोठा तोटा होय. यांत हलगर्जीपणा लोकांकडे, डाक्तर व सुईण वर्गाकडे व सरकारकडेहि आहे. दुसरें असें कीं, या लोकांस पुढें आंधळ्यांच्या शाळा काढून शिक्षण द्यावेंच लागतें. व या कामीं एकट्या न्यू यार्क शहरींच एक लक्ष डॉलरपेक्षां जास्त पैसा प्रतिवर्षी सरकारास खर्चावा लागतो. या दृष्टीनें देखील राष्ट्राचें केवढें नुकसान होतें हें लक्षांत येईल. ही प्रतिबंधक डोळ्यांचीं औषधें डॉक्टरांस व सुईणींस फुकट वाटण्यांत यावीं. हा क्षुल्लक दिसणारा नेत्ररोग फैलावूं दिल्यापासून होणारे अनर्थ ज्यांत वर्णिले आहेत अशीं हस्तपत्रकें जनसमूहांत नेहमीं वाटावीं.

खु प ऱ्याः—हा रोग तर या देशांत सर्वांच्या पूर्ण परिचयाचा आहे व यामुळेंहि पुष्कळ रोग्यांनां शेवटीं अंधत्व येतें. पापण्या उलटून पाहिलें असतां त्यांवर बारीक लाल दाणेदार दिसणाऱ्या खुपऱ्या आपल्या माहितीच्या असल्यामुळें त्यांचें विशेष वर्णन नको. यापासून डोळ्यांच्या पापणींत खडा रुतल्यासारखी खुप, आग, लाली, दीप इत्यादि लक्षणें बरींच वर्षे प्रथम चालतात पण अंधत्व नसतें. यापासून गळणारा स्राव संसर्गकारी असल्यामुळें दुसऱ्या अनेकांच्या डोळ्यांत अंधत्वाचें बीज पेरलें जातें. रोग चिकट दीर्घकालीन असल्यामुळें या स्रावाची किळस वाटेनाशी होऊन डोळे टिपण्यानें सर्व कपडे दूषित होऊन रोग पसरवितात. गलिच्छ राहणी व कोंदट घरें असलीं म्हणजे रोग जास्तच फैलावतो. मिसर देशांत सर्व लोकसंख्येपैकीं शेंकडा १० लोक या रोगानें त्रस्त असतात. हीच स्थिति इतर उष्णप्रदेशांत आहे. नेपोलियननें मिसर देशावर ३२००० सैन्यानिशीं स्वारी केली खरी. पण बहुतेक सर्व जणांनां म्हटलें तरी चालेल हा नेत्ररोग चांगलाच भोंवला. व पुढील वीस वर्षांत यूरोपांतील इतर देशांच्या सैन्यांतहि बळावत गेला. बेलजियन शिपायांत दर पांच जणांत एक याप्रमाणें हा रोग इ. स. १८३२ त पसरला व ४००० शिपाई दोन्ही डोळ्यांनीं, व १०००० शिपाई एका डोळ्यानें आंधळे झाले. बराकी, गरिबांच्या चाळी व वस्ती, अनाथाश्रम, वसतिगृह असलेल्या शाळा हीं याचीं प्रियवास्तव्यस्थानें होत. मागें वर्णन केलेला पूयनेत्रदाह बरा होण्यास सुलभ तरी असतो. पण हा रोग बरा होण्यास फारच चिकट व हट्टी असून शेवटीं अंधत्व येतें. एवढ्याकरितां त्याच्या प्रसारास प्रतिबंध करणें म्हणजे लोकांवर महदुपकार करणें होय. अशीं नेत्ररोगाचीं माणसें चांगल्या माणसांपासून अगदीं वेगळ्या जागेंत अगर खोलींत ठेवल्यापासून मोठा उपयोग होतो.

सं वे द न ने त्र दा हः—एका डोळ्यास मार, धक्का वगैरे प्रकारची इजा होऊन जे रोगी आंधळे होतात त्यांतील निमे या रोगानें दोन्ही डोळ्यांनींही आंधळे होतात असा अनुभव आहे. एखादा जबर अपघात एका डोळ्यास होऊन तो जातो. परंतु तो निरुपयोगी डोळा तसाच ठेवावासा

वाटतो. पण असें केल्यानें दुसरा डोळाहि दाह होऊन कांहीं दिवसांनीं जाण्याची धास्ती बहुतकरून असतेच हें त्या रोग्यास कळत नाहीं.

कां च विं दुः—या रोगाचा शेवट आंधळेपणांत व्हावयाचा हें बहुतेक निश्चितच असतें. पण रोगी योग्यवेळीं डोळ्याच्या डॉक्टरकडे जाऊन लवकर एक लहानशी शस्त्रक्रिया करून घेईल तर बहुधा अंधत्व टळतें.

दृ ष्टि न्ह स्व ता.—म्हणजे लांबचें न दिसणें. हा रोग मुलांनां सात पासून नवव्या वर्षापर्यंत बहुधा होतो. कधीं-कधीं आईबापांत तो असल्यामुळें त्यांस उपजतच असतो. एक दोन वर्षे हयगय होऊन इलाज न केल्यानें डोळ्याची फारच खराबी होते. एकाग्रतेनें, जवळच्या पदार्थावरच नेहमीं टक लावून पहाण्यानें अगर वाचनानें हें व्यंग चांगल्या दृष्टीच्या मनुष्यांसहि नवीन होऊं शकतें. यास प्रतिबंधक उपायः—मुलांना लहानपणापासून लांबचे पदार्थ ओळखून ते वर्णन करण्याची संवय लावावी. नेहमीं कामधंदा, लेखन वाचन घरांत बसून न करतां उघड्या मोकळ्या जागेंत करावें. निदान ज्या मुलाची दृष्टि अधु असण्याकडे कल आहे त्या मुलांचें शिक्षण तरी अशा प्रकारें व्हावें.

इ. स. १९०६ मध्यें एडिंबरो शहरीं सुमारें ५२,५०० मुलांच्या दृष्टीची नेत्रवैद्यांकडून परीक्षा करण्यांत आली. त्यांत शेंकडा ३५ मुलें उत्तम दृष्टीची जी मर्यादा आहे त्यापेक्षां कमी दृष्टि असलेलीं आढळलीं. नंतर १८५०० मुलांनां अंधाऱ्या खोलींत नेऊन त्यांच्या नेत्रांची अंतःपरीक्षा केली.तींत असें समजलें कीं त्या मुलांपैकीं शेंकडा २१ मुलांच्या डोळ्यांच्या आंतील रचनेस विकृती झालेल्या होत्या. त्यांत हेंहि स्पष्ट दिसून आलें कीं गरिबांचीं दाट वस्तींत रहाणारीं मुलें अगर जुन्या कोंदट इमारतींत भरत असलेल्या शाळांतून अधु दृष्टीचीं मुलें अधिक होतीं व उलट पक्षीं हवा व उजेड भरपूर असलेल्या व विरल वस्ती असलेल्या शहराच्या हद्दीच्या आसपास असलेल्या शाळांतील मुलांची दृष्टि अधिक चांगली होती. डोळ्यांच्या इतर विकृती असलेलीं मुलें वगळलीं असतां अशी एक गोष्ट ध्यानांत येते कीं, पुढें दिलेल्या कारणांनीं मुलांची दृष्टि बिघडतेः-(१) दूरचे पदार्थ पहाण्याचा सराव व संवयीचा अभाव. (२) कमी उजेडांत वाचल्यानें व काम केल्यानें येणारा नेत्रांचा थकवा. (३) स्वच्छ हवापाणी व पुरेशा पौष्टिक अन्नाची कमतरता.

उ प यु क्त सू च ना.–अगदीं लहान मुलाच्या अभ्यासक्रमांतून शिवणकाम काढून टाकण्यांत यावें. कारण त्यापासून कोंवळ्या दृष्टीस खास अपाय होतो. (२) इतर खेळांच्या शर्यती जशा लावतात तशा २० फुटांपेक्षां अधिक अंतरावर असणारे बारीक पदार्थ ओळखण्याच्या शर्यती लावाव्या. (३) प्रतिवर्षी शिक्षकवर्गानें याप्रमाणें मुलांमध्यें दृष्टिरक्षणाची ईर्षा उत्पन्न करून त्यांच्या नेत्रांची व दृष्टीची तज्ज्ञ डॉक्टराकडून परीक्षा करीत जावी. निदान जीं मुलें अधु दृष्टीचीं आहेत असें वरील प्रकारच्या शर्यतींत कळून आलें असेल त्यांची तरी काळजी घेऊन त्यांची दृष्टि संभाळावी. असा कायमचा क्रम ठेविल्यानें वेळींच इलाज होऊन मुलांचें हित होतें व प्रतिवर्षी नवीन नवीन मुलें येतात त्यांतील अधु दृष्टीचीं मुलें चटकन ओळखून काढण्याची संधि मिळते. या अधु दृष्टीच्या मुलांमध्यें न जाणों अति बुद्धिमान् व शोधक पुरुष अगर स्त्री निर्माण कशावरून होणार नाहीं ? याकरितां राष्ट्रहिताची दृष्टि आपण बाळगून शाळांच्या चालकांनीं हीं सर्व आपलींच मुलें आहेत अशी भावना ठेवून दृष्टिरक्षणाचें पवित्र कार्य समजून करावें व तें केलें म्हणजे कान, नाक, त्वचा, दांत इत्यादि इंद्रियें निर्मळ राखण्याची आवश्यकता व आवड मुलांमध्यें व त्यांच्या पालकांमध्यें सहजीं वाढून सुखोत्पत्ति व उत्कर्ष अधिक होतो.

**अंधरगांव**—मध्यप्रांत. जिल्हा व तहशिल भंडारा. भंडाऱ्याच्या उत्तरेस १६ मैलांवर हें३००० लोकवस्तीचें गांव आहे. या ठिकाणीं रेशीमकांठीं साड्या करण्याचे कारखाने आहेत. दर बुधवारीं येथें बाजार भरत असून त्यावेळीं गुरें विक्रीकरितां येतात. आरोग्यरक्षणाकरितां एक लहानसा कर असून प्राथमिक शाळा, पोलीसठाणें, टपालघर वगैरे आहेत.

**अंधळगांव**—हें भंडारा जिल्ह्यांत असून भंडाऱ्यापासून १६ मैल ईशान्य दिशेस आहे. हें गांव सुती कापडाकरितां प्रख्यात आहे. [ म. प्रां. ग्या. ].

**अंधारी नदी**— ही नदी तीन लहान नद्या मिळून झाली आहे. एकीस बोकरडोह हें नांव असून तिचा उगम फेरसागड डोंगरांच्या पूर्वेकडील उतारांत आहे. दुसरी मिसीजवळ उगम पावत असून पुढें तिलाच पाताळगंगा, चिमूर, नेरी अशीं नांवें असून पुढें तीसच गोंडना असें नांव मिळतें. तिसरी चिमूर डोंगरांत उगम पावत असून तीस पुराण अंधारी हें नांव आहे. पहिल्या दोघींचा संगम कुरमगांव येथें होत असून तिसरी जांबजवळ मिळते व पुढें या नदीस अंधारीनदी हें नांव मिळतें. पुढें ही नदी घाटकुलच्या दक्षिणेस वाइनगंगेस मिळते. [चांदा जि. ग्या.].

**अंब**—वायव्येकडील सरहद्दीचा प्रांत. तनावल नांवाच्या स्वतंत्र संस्थानांतील सिंधुनदाच्या पश्चिमतीरावरील एक खेडें. हें उत्तर अंक्षांश ३४°१८' व पूर्व रेखांश ७२° ५५' यांवर आहे. येथील संस्थानिक आपणास अंबचा नबाब असें म्हणवितो. हिंवाळ्यांत तो येथें राहतो.

**अंबत्तन**—दक्षिण त्रावणकोरमधील नापितांच्या जातीला अंबत्तन असें म्हणतात व मध्य व उत्तर त्रावणकोरमध्यें त्यांनां क्षौरकन असें म्हणतात. या जातीचे आणखी तीन विभाग आहेत तेः— (१) जे मल्याळम् भाषा बोलतात व ज्यांनां मक्कथयम वारस कायदा संमत आहे असे. (२) मल्याळम् भाषाच बोलणारे पण त्यांनां

मरुमक्कथयम वारस कायदा संमत आहे असे. ( ३ ) तामिळ भाषा बोलणारे. यांचे सण, पोषाख, दागिने वगैरे मल्याळ शूद्रांप्रमाणें असतात.

यांनां हजामतीखेरीज वैद्यकी अवगत असते. यांच्या बायका सुईणीचीं कामें करितात. मनुस्मृतींतील अंबष्ठांशीं आपला संबंध जोडून हे आपल्या जातीची श्रेष्ठता दर्शवितात. यांच्या लग्नांतून ब्राह्मण भिक्षुकी करितात. सालेम जिल्ह्यांतील कोंग वेल्लाळांमध्यें अंबत्तन हे लग्नें चालवितात. यांच्यांत विधवाविवाह मुळींच होत नाहींत. मृतांनां जाळण्यांत येतें; फक्त लहान मृत मुलांनां पुरतात. और्ध्वदैहिक संस्कार ब्राह्मणच करितात.

यांच्यांत शैव व वैष्णव दोन्ही आहेत. वैष्णव मद्यमांस सेवीत नाहींत. एकमेकांत लग्नें होतात. हे कोमट्यांच्या पंक्तीला बसत नाहींत, त्यांच्या हजामती मात्र करितात.

हल्लीं अंबत्तन मद्रास इलाख्यांतील सबंध तामिळ प्रदेशांतून दिसतात. दर गांवीं एक पेरियमक्कारन म्हणून मुख्य असतो. तो तंटे वगैरे तोडतो. लग्नांवर कर बसवून त्या पैशांतून छत्रें चालवितात. दर गांवीं अंबत्तनानां इनामी जमीनी असतात.

**अंबर(धातु)**—उत्तरब्रह्मदेशांतील जुन्या खाणींत अद्यापहि अंबर सांपडतो; परंतु बाल्टिक अंबरची आयातहि हिंदुस्थानांत व ब्रह्मदेशांत बरीच आहे. देशी औषधांत याचा उपयोग करितात. यूरोपांत अंबर जवसाच्या किंवा शिरसाच्या तेलांत उकळून तो पारदर्शक व नरम झाल्यावर त्याचे मणी, स्त्रियांच्या केशकलापांत घालावयाच्या सळया वगैरे जिन्नस करतात. ब्रह्मदेशांत श्रीमंतांच्या बायका अंबरचे दागिने कानांत घालतात. ब्रह्मी अंबर इतर अंबरपेक्षां कठिण व चिवट असल्यामुळें कातकाम व खोदकाम करण्याला तो अधिक चांगला असतो.

**अंबर( १ )**—हैद्राबाद संस्थान. औरंगाबाद जिल्ह्याच्या आग्नेयीकडील तालुका. क्षेत्रफळ ९७० चौरस मैल. यांत एकंदर २१४ गांवें असून पैकीं २४ जहागीर आहेत. लोकसंख्या ( १९११ ) १२०४७५. इ. स. १८९७ व १८९९–१९०० सालच्या दुष्काळांमुळें लोकसंख्येच्या आंकड्यावर बराच परिणाम झाला आहे. इ. स.१९०१ सालीं जमीन महसूल ४.२ लाख रुपये होता. मुख्य गांव—अंबर. लोकसंख्या ३५६३. तालुक्याच्या दक्षिण भागांतून गोदावरी नदी वहात असून जमीन रीगर अथवा काळी कापसायोग्य आहे. इ. स. १९०५ सालीं या तालुक्यांतील आठ खेडीं परभणी जिल्ह्यांतील पाथरी तालुक्यांत घालण्यांत येऊन त्यांच्या बदली पाथरी तालुक्यांतील ६ खेडीं या तालुक्यांत घालण्यांत आलीं.

( २ ) या अंबरचें मूळचें नांव फिरोजशापुर अथवा पेरिसापोर होतें. हें शहर इ. स. ३५० त इराणचा ससनवंशी राजा, दुसरा शापुर यानें स्थापिलें. हें युफ्रेटीस नदीच्या पूर्व तीरावर असून नहरइसा अथवा सखळापै काळव्याच्या दक्षिणेस थोड्याशा अंतरावर होतें. जुलियन बादशहानें या शहराचा नाश इ. स. ३६३ त केला. परंतु लगेच हें वसलें गेलें; आसपासच्या यहुदी व ख्रिस्ती वसाहतींचें आश्रयस्थान हें शहर होतें. अलीनें इ. स. ६५७ त हें शहर घेतलें तेव्हां यांत ९०,००० यहुदी होते. अरबांनीं याला अम्बर ( धान्याचें कोठार ) नांव दिलें. अब्बासीद ( खलीप ) वंशाचा स्थापक अबुल अबास अस–सफा यानें अम्बर हें राजधानीचें शहर केलें. बगदादची स्थापना होईपर्यंत ( इ. स. ७६२ ) हेंच शहर राजधानी राहिलें. सध्यां येथें मुळींच वस्ती नाहीं.

**अंबर उदी**—स्पर्मव्हेल नांवाच्या माशाच्या आंतड्यांत बनणारा हा पदार्थ आहे. हिंदुस्थान, आफ्रिका व ब्राझिल येथील समुद्रकिनाऱ्याला अंबर कधीं कधीं ( जलपृष्ठावर ) तरंगतांना आढळतो; व हिंदुस्थानच्या बाजारांत अंबर–ई–अंबर, अनबर अथवा अरब या नांवानें विकला जातो.

गु ण ध र्म व गै रे.—हा पदार्थ वजनानें अगदीं हलका व अतिशय ज्वालाग्राही असून त्याला एक प्रकारचा सुगंध असतो व उष्णता लावल्यास ( तापविल्यास ) तो बहुतेक उडून जातो. याचा औषधाकरितां उपयोग करितात. व्यापारीदृष्ट्या हल्लीं याला फारशी किंमत नाहीं; परंतु एके काळीं तो फार महत्त्वाचा समजला जात असे. ग्रीक व रोमन लोकांनां याची मुळींच माहिती नव्हती; यूरोपला या पदार्थाविषयीं माहिती अरब लोकांकडून झाली. मालदीव बेटांत समुद्रकिनाऱ्याला सांपडणाऱ्या उदी अंबरावर राजाची सत्ता असे, असें फ्रान्सिस पिरार्ड यानें १६०१ सालीं लिहिलें आहे. आपलें सिंहासन सुगंधित करण्याकरितां या पदार्थाचा कसा उपयोग करीत, याचें वर्णन जहांगीर बादशहानें आपल्या आत्मचरित्रांत दिलें आहे. कांहीं काळापूर्वी यूरोपांत अन्नाला एक प्रकारचा स्वाद आणण्याकरितां या पदार्थाचा उपयोग करीत.

**अंबरखाना**—मराठी राज्यांत अठरा कारखाने असत; त्यांपैकीं, अंबरखाना हा असे. अंबर म्हणजे धान्य; तेव्हां, अंबरखाना म्हणजे धान्यागार, किंवा धान्याची कोठी. राजधानींत तर अंबरखाना असेच; परंतु प्रत्येक किल्ल्यावरहि असे. त्यांत दोन दोन तीन तीन वर्षांचें धान्य सांठवून ठेवीत. किल्ल्यास वेढा पडला म्हणजे मग या धान्याचा उपयोग करीत. हे वेढे ३।४ वर्षेंहि सतत पडत. उ०, जिंजी, विजापूर व गोवळकोंडा वगैरे.

पुणें येथें शनिवारवाड्याच्या गणेशदरवाज्यासमोर, हल्लीं जेथें बाग आहे, तेथें पेशवे सरकारचा अंबरखाना होता. पुणें ग्याझिटियरकारानें, अंबर याचा अर्थ अंबारी असा करून, 'अंबाऱ्या ठेवण्याची जागा तो अंबरखाना' असा अंबरखान्याचा हास्यास्पद अर्थ केला आहे; पन्हाळा किल्ल्यांत फार मोठा अंबरखाना अद्यापिहि शाबूत आहे.

**अंबरनाथ अथवा अमरनाथ**.—मुंबई इलाखा. ठाणें जिल्हा. कल्याण तालुक्यांतील जी. आय. पी. रेलवेच्या अंबरनाथ स्टेशनच्या पश्चिमेस सुमारें एक मैलावर असलेलें खेडें. उ.अ.१९° १२' व पू. रे. ७३° १०.' लो. सं. (१९०१) ४८५. मुंबई वाढविण्याच्या योजनेंत अंबरनाथाचा समावेश होत असून त्या भागांत नवीन औद्योगिक शहर वसविण्याची खटपट चालू आहे. अनेक कारखाने काढण्याकरितां स्टेशनाजवळच्या जी. आय. पी. रेलवेच्या आग्नेय शाखेलगतची १८ लाख चौरस यार्ड जागा अडकाविण्यांत येणार आहे. उल्हासनदीचा पाणीपुरवठ्याच्या कामीं उपयोग करण्यांत येईल.

अ म र ना थ दे वा ल य—या गांवाच्या पूर्वेस सुमारें १ मैलावर व कल्याणच्या आग्नेयीस साडेचार मैलांवर वालधान ( वढवाण ) नांवाच्या लहान नदीकांठीं एका सुंदर दरींत आहे. येथील देखावा फारच नयनमनोहर आहे.

हें देवालय बरेंच मोडकळीस आलेलें आहे. येथें त्रिमूर्तीची ( शंकराची ) स्थापना केली आहे. हें देवालय पश्चिमाभिमुख असून सभामंडपास एक दक्षिणेस व एक उत्तरेस असे दोन दरवाजेहि आहेत. तीनहि दरवाजांसमोर कमानी आहेत; व त्या कमानींनां प्रत्येकीं चार चार सुबक खांब आहेत.

पश्चिमद्वारीं एक भग्न नदी आहे. यावरून तें शिवाचेंच देवालय आहे हें सिद्ध होतें. या देवालयाचें खोदींव नक्षीकाम इतकें अप्रतिम व सुबक आहे कीं त्याचें वर्णन करणेंच अशक्य आहे. भिंती, छत व स्तंभ वगैरे ठिकाणीं कालीदेवी, त्रिमूर्ती गणेश वगैरे देवादिकांचीं चित्रें व इतर चित्रविचित्र आकृती खोदून काढल्या आहेत. त्या खरोखरच प्रशंसनीय आहेत. सर्व काम दगडी आहे.

८६० सालीं बांधलेल्या देवालयाचीच सामुग्री घेऊन हें देवालय पुढें केव्हां तरी पुन्हां बांधलें असावें. सभामंडपाच्या उत्तरद्वारावर पुढील लेख खोदलेला आहे. तो बंदिस्त जागा असतांहि बराच जीर्ण झाला आहे. यावरून या देवालयास पूर्वी एकदां जीर्णावस्था प्राप्त झाली होती हें उघड दिसतें.

'शक संवत् ७८२ ज्येष्ठ शुद्ध ९ रोज शुक्रवार ते दिवशीं हें देवालय महामंडलेश्वर श्री महावनिराज यानें बांधलें.' [ इं. ॲं. इं. अॅ. ३ पा. ३१६-२० ].

**अंबरनाथ**.—कऱ्हाडजवळ कुंभारगांव म्हणून आहे. तेथील कायस्थ. पूर्वी वाळेवाडी मामलत करीत असत. अमणापुरीं मठ केला. यांनीं जिवंत समाधि घेतली. हे चैतन्यसंप्रदायी होते. नाथानंतर. ग्रंथ.—अर्जुनगर्वपरिहार. ( सं. क. का. सू. ).

**अंबरपेठ**—हैद्राबाद संस्थान. अत्राफ-इ-बाल्दा जिल्ह्यांतील पूर्वीचें तालुक्याचें ठिकाण. या तालुक्यांत १८० खेडीं आहेत पैकीं ५६ जहागीर आहेत. अंबरपेठ लो. सं. (१९०१) २६४८. हें तालुक्याचें ठिकाण आहे. हल्लीं यास शर्की तालुका म्हणतात.

**अंबराम्ल** ( सक्सिनिक ॲसिड ).—अंबराम्लाचीं दोन समरूपें आहेत त्यांची घटना अशीः—

इथिलिन अंबराम्ल ( एथिलीन सक्सिनिक ॲसिड ) कप्र$_{२}$क.कउ$_{२}$कउकप्र$_{२}$.उ इथिलिडिन अंबराम्ल (एथिलिडीन-सक्सिनिक ॲसिड) कउ$_{३}$ कउ कप्र प्रउ$_{२}$

इथिलिन अंबराम्ल अंबराम्लाचें शुष्क पातन केलें म्हणजे तयार होतें, हें पातन लोखंडी वक्र पात्रांत अथवा ऊर्ध्व पातनयंत्रांत ( रिटॉर्ट )करून ग्राहकांत जो पात येईल तो थिजल्यावर जें द्रव्य जमेल तें आटवावें आणि जो तांबूस रंगाचा स्फटिकरूप गोळा मागें राहील तो जलमिश्रित नत्राम्लांत विद्रुत करून स्फटिकरूप करावा.

अंबराशिवाय राळेंत, कच्च्या द्राक्षांच्या रसांत आणि कित्येक प्राणिज रसांत हें अम्ल असतें. तसेंच द्राक्षाम्लाची विपाकक्रिया केली म्हणजेहि हें अम्ल तयार होतें. याकरितां द्राक्षाम्ल अम्ननें ( अमोनियानें ) निर्गुण करून त्यांत थोडें पालाशस्फुरित ( पोट्याशिअम फास्फेट ), मग्नगंधकित ( मॅग्नेशियम सल्फेट )आणि खटहरिद ( क्यालशिअम क्लोराइड ) क्षार घालावेत व त्यांची विपाकक्रिया होऊं द्यावी म्हणजे त्यांत अमोनिअंबरित ( अमोनियम सॅक्सिनेट )व अमोनिकर्बित ( अमोनियम कार्बोनेट ) तयार होतात. हा द्रव कळी चुन्याचें पाणी घालून खूप उकळावा. तो गाळून त्यांत गंधकाम्लाचा द्रव घातला म्हणजे अंबराम्ल सुटें पडतें. त्याचे स्फटिक करावेत.

अंबराम्लाचे चतुरस्र स्फटिक असतात त्यांस आंबट व अप्रिय वास असतो. हे स्फटिक १८५° श वर वितळतात व २२५° श वर उकळतात. उकळत असतांना त्यांतून निघणारी वाफ श्वासोच्छ्वासाबरोबर गेल्यास मोठा ठसका लागून फार खोकला येतो व त्यावरून हें अम्ल एकदम ओळखतां येतें. साधारण उष्णमानावर सुमारें वीसपट पाण्यांत हें अम्ल विद्रुत होतें. अल्कहलांत हें अम्ल किंचित विद्राव्य असुन इथ्रांत बहुतेक अविद्राव्य असतें.

अं ब रा म्ला चे क्षा रः—अल्क धातूचे अंबरित व अम्नचे आणि मग्नचे अंबरित क्षार पाण्यांत विद्राव्य असतात. खटअंबरित हा महत्त्वाचा क्षार आहे. उष्ण द्रव असतांना खटाअंबरिताचे (क$_{२}$उ$_{४}$ [कप्र$_{२}$]$_{२}$ख)स्फटिक केले तर त्याच्या एका अणूमध्यें पाण्याचे अणू स्फटिकरूपांत असतात. द्रव शीत असतांना स्फटिक केले तर त्यांत पाण्याचा एक अणू असतो. खटअंबरित पाण्यांत कमी विद्राव्य असतें. तुतें नांवाच्या फळांत हा क्षार असतो.

अमोनिअंबरित हा क्षार लोहहरिदाच्या ( फेरिकक्लोराइड ) द्रवांत घातला म्हणजे सर्व लोहाचा निपात लो$_{२}$ (क$_{४}$उ$_{४}$प्र$_{२}$ ) (प्रउ)$_{४}$ अनाम्लक लोह अंबरिताच्या रूपानें होतो. याकरितां लोह दुसऱ्या धातूशीं मिश्र असल्यास तें निराळें

करण्याकरितां या क्षाराचा उपयोग परिमाण परीक्षेत(क्वान्टिटेटिव्ह अनालिसिस ) अतिशय करितात.

**अंबरीष**—( १ ) एक ब्रम्हर्षि ( ३ अंगिरा शब्द पहा. )

(२)( सू. वं. ) वैवस्वत मनूचा नववा पुत्र नभग. त्याचा पौत्र व नाभाग राजाचा पुत्र हा, परमदानशूर व भगवद्भक्त असून, पराक्रमीहि इतका होता कीं, यानें भूमीचा जय सातां दिवसांत करून तिचें आधिपत्य संपादिलें होतें ( भार० शांति. अ० १२४ ). यास विरूप, केतुमान, आणि शंभु असे तीन पुत्र होते व याला, क्वचित नाभाग असेंहि म्हटलेलें आहे ( भार० द्रोण० अ० ६४ ).

एकदां यास कार्तिक मासांतील, देवत्रयांचें त्रिदिनात्मक (एकादशी ) व्रत असतां द्वादशीच्या दिवशीं याच्या घरीं दुर्वासऋषि अतिथि प्राप्त झाला. त्याची यानें पूजा करून त्यास भोजनार्थ राहवून घेतलें. दुर्वासाहि तथास्तु म्हणून उर्वरित आन्हिक करण्यास नदीतीरीं गेला; त्या दिवशीं द्वादशी थोडी होती हें दुर्वासास विदित नसून यानेंहि त्यास सुचवावें तेंहि सुचाविलें नाहीं त्यामुळें दुर्वास आपलें आन्हिक सावकाशपणें आटोपून येत आहे तो द्वादशी आतिक्रांत होत आहे असें जाणून यानें देवास नैवेद्य समर्पण केला व व्रतभंग होऊं नये अशा उद्देशानें भोजन न करतां द्वादशींत देवाचें तीर्थ प्राशन करून पारणें केलें. हें दुर्वासानें जाणून आपल्या जटेंतील केंसापासून एक कृत्या निर्माण करून यावर सोडिली, इतक्यांत विष्णूच्या सुदर्शन चक्रानें येऊन त्या कृत्येचा नाश केला; व सुदर्शन दुर्वासावर धांवलें. परंतु त्याच्या तपःप्रभावानें त्याच्या अंगास स्पर्श करण्यास तें समर्थ झालें नाहीं. नंतर दुर्वास तेथून निघाला असतां चक्रहि त्यामागें निघालें. तें पाहून तो विष्णूकडे गेला. तेव्हां विष्णूनें सांगितलें कीं तूं अंबरीषाकडेसच जा. तो तुजकरतां निराहारी राहिला आहे, त्याचें समाधान कर म्हणजे हें चक्र तुला सोडील यावरून दुर्वास अंबरीषाकडे परत आला. या गोष्टीस एक संवत्सर झाला असतांहि अंबरीषानें भोजन केलें नव्हतें. दुर्वासास पाहतांच त्यास परम हर्ष होऊन त्यानें सुदर्शनाची बहुत प्रकारें स्तुति केली. तेणेंकरून तें संतुष्ट होऊन स्वस्थळीं जातांच यानें दुर्वासास उत्तम प्रकारचें यथेच्छ भोजन देऊन आपणहि भोजन केल्यावर दुर्वासास मार्गस्थ करून स्वस्थ राहिला. ( भाग०नवम. अ.४–६ ).

(३) ( सू. वं ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न मांधाता राजास बिंदुमती भार्येच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील दुसरा. यास धर्मसेन असें नामांतर असून पुत्र यौवनाश्व नांवाचा होता.

(४) (सू. वं.) इक्ष्वाकुकुलोत्पन्न त्रिशंकु राजा, त्याच्या दोन पुत्रांतील दुसरा. यास श्रीमती नामक कन्या होती.ती नारद आणि पर्वतऋषी यांच्या वादांत विष्णूस प्राप्त झाली. हा विष्णु द्वादशादित्यांतील असणें योग्य दिसतें. ( वा. रा. अद्भुतोत्तर. स. अ. ३–४ ).

(५) ( सू. वं ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न भगीरथ राजाचा पौत्र, व नाभ अ० नाभाग राजाचा पुत्र, याच्या पुत्राचें नांव सिंधुद्वीप असें होतें.

**अंबलक्कारन्**—ग्रामरक्षकाचा किंवा शेतकीचा धंदा करणारी एक तामिळ जात. हे लोक मुख्यत्वेंकरून त्रिचनापल्लींत आढळतात. पणांत आल्याखेरीज यांच्यांत मुलींचीं लग्नें करीत नाहींत. विधवाविवाहाला आडकाठी नाहीं. पण वाटेल तेव्हां घटस्फोट करतां येत नाहीं. मद्यमांसाशनाला हरकत नसते. ही जात कल्लनांत धरितात. पण तें यांस मान्य नाहीं. केवळ आपल्याच पोटजातींत विवाह करणारे यांच्यांत कांहीं वर्ग आहेत. कांहीं ब्राह्मणांना पुरोहित नेमतात, व और्ध्वदैहिक आणि श्राद्धप्रसंगीं जानवें घालतात. यांचा नेहमींचा धंदा शेतकीचा आहे. पण कांहीं लहानसहान व्यापारांत पडतात. यांच्यांत गांवपंचायती आहेत.

**अंबलपुलई**–मद्रास इलाखा.त्रावणकोर संस्थानांतील याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण. आलेप्पीच्या दक्षिणेस दहा मैलांवर आहे. अलेप्पे व हा गांव एका कालव्यानें जोडलेला आहे. उत्तर अक्षांश. ९ ° २३' व पूर्वरेखांश ७६ ° २२' लोकसंख्या (१९०१)१७९१.

येथें कृष्णस्वामीचें देऊळ असून तत्प्रीत्यर्थ पुष्कळ यात्रेकरू येतात. अठराव्या शतकाच्या अर्धापर्यंत हा गांव त्याच नांवाच्या राजाच्या राजधानीचें ठिकाण होतें. त्यावर चेंपकस्सरी हे नंबुद्री ब्राह्मण राजे राज्य करीत असत. ते राज्यकर्ते असल्यामुळें त्यांस देवनारायण असें विशेष नांव असे. त्यांच्यापैकीं एका राजानें त्रावणकोर राजाच्या विरुद्ध उठलेल्या कायनकुलम् येथील संस्थानिकास मदत केली. त्यामुळें त्रावणकोरच्या राजाचा प्रधान रामअय्यन दलवाइ त्यावर इ. स. १७४८ खालीं सैन्य पाठविलें त्यावेळीं राजास कैदी करण्यांत येऊन संस्थान त्रावणकोरच्या राज्यास जोडण्यांत आलें.

**अंबलवासि** ( अंतरळ ):— यांची वस्ती मद्रास इलाखा, कोचीन व त्रावणकोर संस्थान यांतून आहे. लोकसंख्या ( १९११ ) ३३४०६. या लोकांना देवळांत नोकरी करण्याचा जन्मसिद्ध हक्क असतो. यांच्यांत १२ भेद आहेत. या बारा जातींपैकीं बहुतेक विदुर आहेत. त्यांच्यांत यज्ञोपवीत धारण करणारे व यज्ञोपवीत धारण न करणारे असा भेद आहे. पहिल्या भेदांत अदिकल ( अतिकल ) चाक्यियार, नांबियार, नंबिस्सन अथवा पुष्पकन, पुप्पाळि, नत्तुपत्तन अथवा पत्तरुन्नि, ,थियत्तुन्नि व पित्तन्मार या जाती येतात. चाक्यियार नांबियार, पिषरोति, वारियन, पुदुवाल व मारार या जाती दुसऱ्या भेदांत येतात.

अदिकल जातीचे लोक मूळचें ब्राह्मण होते. परंतु भद्रकाली देवालयांत पुजाऱ्याचें काम केल्यामुळें समाजांत त्यांचा

मान कमी झाला. यांच्यांत उपनयन होतें; व हे गायत्री पाठ करतात. त्यांच्यांत मातृकन्यापरंपरेचा वारसाचा कायदा चालू आहे.

अंबलवासि जातीचा दुसरा पोटभेद चाक्कियार हा आहे. व्यभिचारावद्दल जातीबाहेर टाकलेल्या नम्बुद्रि लोकांच्या पुत्रपौत्राच्या जातीला हें नांव आहे. एखादी नंबुद्रि जातींची स्त्री व्यभिचारी आहे असें जातिसभेनें ठरविलें तर तिच्या उपनयन झालेल्या मुलांनां चाक्कियार जातींत टाकतात. व उपनयन न झालेल्यांनां नांबियार जातींत टाकतात. चाक्कियार लोक पुराण व इतिहास यांचा अभ्यास करतात, व त्यांवर व्याख्यानें देतात. हे लोक यज्ञोपवीत धारण करतात व गायत्री पठण करतात. रामायण, महाभारत व भागवतपुराण यांतील कथा सांगण्याचा यांचा धंदा आहे.

नाम्बिया, नाम्बिस्सन अथवा पुष्पकन हा अम्बलवासि जातीचा पोटभेद आहे. एका ब्राह्मणाला आपली स्त्री व्यभिचारी आहे असा संशय तिच्या गरोदरपणांत आल्यामुळें त्यानें तिला टाकलें. तिला झालेल्या मुलीपासून जी संतति झाली तिच्यापासून या जातीची उत्पत्ति आहे असें म्हणतात. या जातींतील बहुतेक लोक उपनयन करतात. हे लोक यज्ञोपवीत धारण करून गायत्री पठण करतात. त्यांचा धंदा देवळांत नोकरी करण्याचा आहे.

धियत्तु अथवा धियत्तुन्नि हाहि अंबलवासी जातीचा पोटभद आहे. व हे लोक धर्मभ्रष्ट ब्राह्मण आहेत असें सांगतात. भद्रकालीची पूजा हें त्यांच्या धर्मभ्रष्टत्वाचें कारण आहे. त्यांच्यांत उपनयनाची चाल आहे ब्राह्मण लोक या जातीच्या कुमारिकेशीं लग्न करूं शकतात.

नत्तुपत्तन अथवा पत्तस्सि हा अंबलवासि जातीचा पोटभेद आहे. याच जातींतील लोक या जातिचें उपाध्यायाचें काम करतात. हे यज्ञोपवीत धारण करतात व गायत्री पठण करतात. कालीच्या देवळांत पूजा करणें हा यांचा धंदा आहे.

पितरन्मार हा अंबलवासि जातीचा पोटभेद आहे. व हे लोक हलक्या दर्जाचे अदिकल जातीचे आहेत.

कुरुक्कल हे त्रावणकोरचे अंबलवासि आहेत. हे लोक अंबलवासी जातीच्या इतर पोटभेदांपेक्षां आपण श्रेष्ठ आहों असें म्हणतात. यांच्यांत उपनयन व गायत्री पाठ करण्याची चाल आहे.

यज्ञोपवीत धारण न करणाऱ्या अंबलवासि जातीचा वारियर नांवाचा पोटभेद आहे. या जातींतील लोक शूद्र स्त्रीशीं विवाह केलेल्या ब्राह्मणांचे वंशज आहेत असें सांगतात. यांच्या चालीरीती नायर लोकांप्रमाणें आहेत.

यज्ञोपवीत धारण न करणाऱ्या अंबलवासि जातीचा नांबियार नांवाचा एक पोटभेद आहे. या लोकांची उत्पत्ति जातीबाहेर टाकलेल्या नंबुद्रि स्त्रीच्या उपनयन न झालेल्या मुलापासून आहे. यांचा धंदा चाक्कियार जातीला त्यांत मदत करणें हा आहे.

यज्ञोपवीत धारण न करणाऱ्या अंबलवासि जातीचा पुटुवाल नांवाचा पोटभेद आहे. त्यांचा धंदा देवळांवर पहारा करण्याचा व कारभाऱ्याचें काम करण्याचा असतो.

मारार हा यज्ञोपवीत धारण करणाऱ्या अंबलवासि जातीचा पोटभेद आहे. देवळांत गायनवादनाचा व कोठीवाल्याचा धंदा हे करतात. हे मूळचे शूद्र होते. परंतु कांहीं अवश्यक कारणामुळें त्यांनां देवळांत घ्यावें लागलें.

अंबलवासि जातीमध्यें घटस्फोटाची चाल असून नंबुद्री ब्राह्मणास द्वितीय पति म्हणून वरण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नसते. यांची अंतर्व्यवस्था नंबुद्री ब्राह्मणांप्रमाणेंच असते. सर्वसाधारण विधींसाठीं ते आपल्यांतूनच भटजी निवडतात. कांहीं विधि ब्राह्मणांकडून करवितात. सुतक किंवा वृद्धि हीं १० दिवस पाळतात. सार्वजनिक जेवणावळींत हे निवळ शाकाहार घेतात. त्यांच्या बायका स्वजातीयांशीं किंवा ब्राह्मणक्षत्रियांशीं संबंध करितात. ब्राह्मण, क्षत्रिय किंवा नंबिडी हे यांच्या हातचें पाणी घेत नाहींत.

[ संदर्भ ग्रंथ—इं. अँ. पु. ३७ (सुब्बाराय अय्यर यांचा 'दि अंतरालाज ऑफ मलबार' हा लेख ). थर्स्टन—कास्ट्स अँड ट्राईब्स इन सदर्न इंडिया. सेन्सस रिपोर्ट १९११. त्रावणकोर व कोचीन. ].

**अंबष्ठ.**—( आंबष्ठ ) एक राष्ट्र. एरियनचे अंबष्टी हेच असावेत असें कर्नल विल्फोर्डचें म्हणणें आहे ( एशियाटिक रिसर्चेस, पु- ८ पा. ३४४ व ३४६ ). पंजाबच्या मध्यभागीं हें राष्ट्र असून येथील लोक लढवय्ये असत असें दिसतें. ऐतरेय ब्राह्मणांतील आंबाष्ठ्य राजा यांच्यापैकींच असावा असें गोल्डस्टकर ( संस्कृत डिक्शनरी पा. ४०१ ) म्हणतो. बृहत्संहितेंत अंबष्ठ लोकांचा उल्लेख आहे ( १४,७; १४ १७. १६·२२ इत्यादि ). हे पूर्व व नैर्ऋत्य या भागांतील लोक असावेत असें या उल्लेखांवरून दिसतें. महाभारतांत पांडवदिग्विजयांत आलेल्या अनेक देशांत अंबष्ठ हा पश्चिमेकडील देश गणलेला आहे. मरुद्वृद्ध हें अंबष्ठ देशाचें मुख्य शहर असून तें उ. अ. ३० व पू. रे. ७१ यांवर वसलेलें आहे. असें अर्वाचीन कोशकार समजतात. ब्राह्मण पुरुष व वैश्य स्त्री यांच्या संबंधापासून झालेल्या संततीस अंबष्ठ म्हणतात. तेव्हां हे अंबष्ठलोक अशा संकरापासून झालेले असावेत असा कांहींचा समज आहे.

**अंबहटा.**—संयुक्त प्रांत. सहारणपुर जिल्ह्याच्या नकूर तहशिलींतील एक गांव. उत्तर अक्षांश २९° ५२' व पूर्व रेखांश ७७°२०'. लोकसंख्या ( १९११ ) ४५२४. हें गांव फेरोजशहा तघलखानें वसविलें असून त्यास फेरोजाबाद असें म्हणत मोंगलाईंत तें लष्करी ठाणें होतें. हल्लींचा गांव नवीन आहे. तथपि येथें एक इ. स. १५१६ सालची व एक हुमायून बादशहाच्या वेळची अशा दोन मशिदी आहेत.

**अंबा.**—काशीराजाची वडील मुलगी. हिच्या बहिणी अंबिका व अंबालिका यांच्या समवेत हिचें स्वयंवर चालू असतां भीष्मानें विचित्रवीर्याकरितां या तीघींनांहि हरण केलें. हिचें मन शाल्वराजावर बसलें असल्याकारणानें हिला सोडून देऊन अंबिका–अंबालिका यांचा विवाह विचित्रवीर्याशीं लावून दिला. शाल्वानें अंबेला पत्करिली नाहीं म्हणून ती पुन्हां भीष्माकडे येऊन स्वतःशीं लग्न करण्याचा आग्रह धरून बसली. भीष्म ऐकेना तेव्हां परशुरामाला मध्यस्थी घातलें. या बाबतींत भीष्म परशुरामाचें युद्धहि झालें. शेवटीं अंबेनें रुद्राची घोर तपश्चर्या करून भीष्माचा सूड घेण्यासाठीं द्रुपदाच्या पोटीं शिखंडीचा अवतार घेतला व भीष्माला मारिलें [ महाभारत, उद्योगपर्व अ. १७३—१८७ पर्यं. ].

**अंबा,** (ता लु का.)—हैद्राबाद संस्थान. भीर जिल्ह्याचा आग्नेयीकडील तालुका. क्षेत्रफळ १३४२ चौरस मैल. लोकसंख्या (१९०१) १३९३९९ यांत दोन गांवें व २६९ खेडीं असून ५१ बहागीर आहेत. जमीनमहसूल, ३८ लाख रुपये. हा तालुका उत्तरेकडे डोंगराळ आहे. हल्लीं येथें तालुक्याचें ठिकाण आहे.

अं बा गां व अ थ वा मो मि ना बा द:—हैद्राबाद संस्थान. भीर जिल्ह्यांतील अंबा तालुक्याचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १८°४१′ व पूर्व रेखांश ७६°२४′. लोकसंख्या ( १९११ ) ११०७३. या गांवाचे जीवंती नदीनें दोन भाग केले आहेत. नदीच्या नैर्ऋत्येकडील भागास मोमिनाबाद हें नांव असून इ. स. १९०३ पर्यंत हें लष्करी ठाणें होतें. अंबा येथील पंचम जैन हे चालुक्याच्या मांडलिकाचे वंशज आहेत असें म्हणतात. येथें देवगिरीचा यादव राजा सिंघन याच्या कारकीर्दींत बांधलेलें एक देऊळ असून त्यांत इ. स. १२४० सालचा एक शिलालेख आहे. जवळच पुष्कळ जैनांचीं व ब्राह्मणांचीं लेणीं आहेत. त्यांपैकीं जोगाईचें देऊळ विशेष महत्त्वाचें आहे. त्यावरून यास जोगाईचे आंबे म्हणतात.

**अंबागड.**—मध्यप्रांत. जिल्हा व तहशिल भंडारा. भंडाऱ्याच्या उत्तरेस १८ मैलांवर हें एक ५०० लोकवस्तीचें खेडें आहे. गांवाजवळील टेंकडीवर अंबागड नांवाचा किल्ला आहे. हा किल्ला बखतबुलंद नांवाच्या गोंड राजाच्या कारकीर्दींत सेवणीच्या पठाण सुभेदारानें इ. स. १७०० च्या सुमारास बांधला असें म्हणतात. भोंसल्यांच्या वेळीं या किल्ल्याचा उपयोग कैदखाना म्हणून करीत असत. जे कैदी म्हणून या किल्ल्यावर पाठवीत असत त्यांनां किल्ल्यांतील एका विहिरीचें विषारी कृष्णजल पिण्यास देऊन ठार मारण्याचा प्रयत्न होत असे असा समज आहे. मोहाडीचा कडू पाटील हा याच कारणामुळें येथें त्यावेळीं मरण पावला असें म्हणतात. या पाटलास कांहीं चेटूक केल्याबद्दल कैदेंत टाकण्यांत आलें होतें. हल्लीं त्या पाटलास लोक देवाप्रमाणें मानीत असून त्यास नवस करीत असतात. अंबागिरिया देव म्हणून तो या भागांत प्रसिद्ध आहे. व आपले रोग वगैरे बरे व्हावे म्हणून भाविक लोक यास कोंबडीं, बकरीं यांचा बळी देतात. किल्ल्याचा पूर्वाभिमुख दरवाजा अद्यापि शाबूत आहे. परंतु बाकीचें काम सर्व पडलें आहे. वर एक लहानसें तळें आहे. याच तळ्याचें पाणी खालीं असलेल्या गायमुखांत येत आहे असा समज आहे. गांवाचा वहिवाटदार मुसुलमान आहे.

**अंबागडचौकी.**—ही जमीनदारी चांद्याच्या ईशान्य दिशेस आहे. ही बरीचशी मोठी आहे. रायपूरच्या भागाकडे लागवड बरीच होते. इचा पुष्कळसा भाग पाहाडी असून जंगली आहे. या जमीनदारींत उत्तम लोखंड सांपडतें. येथील राहणारे मुख्यत्वें गोंडलोक असून क्वचित् स्थळीं गौळीहि सांपडतात. या ठिकाणीं गोंडी व छत्तिसगडी भाषा बोलतात. जमीनदार हा चौकीगांवीं राहतो. हें गांव वैरागडच्या ईशान्यदिशेस असून त्यापासून २२ मैल अंतरावर आहे. या ठिकाणीं जकातखात्यांतील नायब फिरस्ती राहत असे (म. प्रां. ग्या. ).

**अंबाजी इंगळे**—शिंद्यांचा एक सरदार. याच्या बापाचें नांव त्रिंबकजी. इ. स. १७८४ सालीं महादजी पातशाहीचा बंदोबस्त करण्यासाठीं दिल्लीकडे आला तेव्हां हा उत्तर हिंदुस्थानांत त्याजबरोबर होता. या प्रसंगीं त्याच्या हातून कित्येक जबाबदारीचीं कामें घडलीं. उदाहरणार्थ याच सालच्या जुलै आगस्ट महिन्यांत अंबाजी इंगळे व शीख सरदार यांचा तह झाला; व पुढें ता. २ नोव्हेंबर रोजीं अफरासियाबखानाचा खून झाला तेव्हां यास फौजेसुद्धां मुसुलमानी लष्करांत ठेवलें होतें. पण अंबाजीकडे केवळ लष्कराचा कारभारच सोंपविण्यांत येत होता असें नाहीं. १७८७ च्या आक्टोबर नोव्हेंबर ( आश्विन ) महिन्यांत महादजीनें खोडी पाटोडीहून गुलाम कादराच्या पारिपत्यास येऊं काय म्हणून पातशहास विचारण्यासाठीं अंबाजीची वकील म्हणून नेमणूक केली होती.

थोड्याच वर्षांनीं अंबाजीस याहून जास्त स्वतंत्रतेनें कारभार करण्याची संधि मिळाली. इ. स. १७९१च्या सुमारास महादजीनें अंबाजीस उदेपूरच्या राण्याच्या विनंतीवरून त्याच्या राज्यांतील चोंडावत सरदारांचें बंड मोडण्यासाठीं कांहीं पलटणी देऊन पाठविलें. तेव्हां अंबाजीनें चोंडावतांचा मुख्य जो साळुंब्रा त्यास राण्याची माफी मागावयास लावून त्याजकडून राण्यास वीस लक्ष रुपये दंड देवविला; व राण्याची सत्ता प्रस्थापित करून बंडखोर सरदारांकडून त्यांच्या जमिनी सोडविल्या. शिवाय त्यानें तोतया राण्यास कमलमीरांतून हांकून लावण्याचीहि राण्याची दुसरी एक कामगिरी बजाविली. एवढ्या गोष्टी करावयास अंबाजीस दोन वर्षें लागलीं. याशिवाय मेवाडच्या राण्यास अंबाजीकडून आणखीहि कांहीं कामगिऱ्या करून घ्यावयाच्या होत्या. शिवाय मेवाडच्या राण्यास चोंडावत सरदारांचेंहि भय वाटत होतेंच. म्हणून त्यानें अंबाजीच्या सैन्याच्या

खर्चाकरितां सालीना आठ लाख रुपये उत्पन्नाचा मुलूख तोडून देऊन त्यास मेवाडांत ठेवून घेतलें. अशा रीतीनें मेवाडच्या कारभाराचीं सर्व सूत्रें अंबाजीच्या हातीं येऊन तो आपणास मेवाडचा सुभेदार म्हणवूं लागला.

इ. स. १७९५ सालच्या सुमारास अंबाजीची शिंद्यांचा प्रतिनिधि म्हणून उत्तरहिंदुस्थानांत नेमणूक झाली. तेव्हां अंबाजी गणेशपंत नामक आपल्या एका अधिकाऱ्याकडे मेवाडचें काम सोंपवून उत्तरहिंदुस्थानांत गेला. अंबाजीचा धनी दौलतराव हा यावेळीं वयांत आलेला नसल्यामुळें प्रथम प्रथम अंबाजीच्या हातीं उत्तरहिंदुस्थानांत 'कर्तुमकर्तुं' सत्ता आली. पण लवकरच त्यास लखवादादा हा प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. अंबाजीचा अधिकारी गणेशपंत हा मेवाडांत आपल्या वर्तनानें लोकांस अगोदरच अप्रिय झाला होता. ही संधि साधून लखवादादानें राण्यास अंबाजीचें वर्चस्व झुगारून देण्याविषयीं गुप्तपणें उत्तेजन दिलें व स्वतः त्यास गणेशपंताविरुद्ध मदत करण्यासाठीं पुढें आला. अंबाजीच्या पक्षाच्या व राण्याच्या पक्षाच्या लोकांत कित्येक चकमकी होऊन त्यांपैकीं बहुतेकांत अंबाजीच्या पक्षाच्या लोकांचा पराजय होत गेला. अशा स्थितींत इ. स. १८०० च्या सुमारास हिंदुस्थानचा कारभार अंबाजीकडून काढून तो लखवाकडे सोंपविल्याचा शिंद्याचा हुकूम आला व त्यामुळें गणेशपंतास मेवाडमध्यें लखवाच्या ताब्यांत जे काय किल्ले व शहरें होतीं ती लखवाच्या स्वाधीन करून निघून यावें लागलें [ भीमसिंह, उदेपूरचा राणा पहा. ].

इ. स. १८०३ च्या सप्टेंबर महिन्याच्या सुमारास अंबाजीनें आपल्या कारस्थानांनीं पेरॅन यास हुसकून लावून त्याची जहागीर व शिंद्याच्या सैन्याचें आधिपत्य मिळविलें. याच सुमारास शिंद्याची लखवादादावर खप्पा मर्जी होऊन लखवादादाच्या ऐवजीं अंबाजीचा भाऊ बाळाराव हा मेवाडांत गेला. तेथें बाळारावानें मेवाडच्या चोंडावत सरदारांकडून पैसा वसूल करण्याच्या कामीं इतका बेसुमार जुलूम केला कीं चोंडावतांनीं उलटून बाळारावास कैद केलें. तेव्हां बाळारावास कोट्याच्या जालीमसिंहाची दोस्ती कामीं पडली. अंबाजीच्या बापानें जालिमसिंह हा पूर्वी एकदां उज्जनीच्या लढाईंत जखमी होऊन मराठ्यांच्या हातीं लागला असतां त्याचा जीव वांचवून त्याची मुक्तता केली होती. हे उपकार आठवून या प्रसंगीं तो उदेपुरावर चाल करून आला व राण्याच्या सैन्याचा पराभव करून त्यानें बाळारावास बंधमुक्त केलें.

इ. स. १८०३ मध्येंच शिंद्यांचें इंग्रजांशीं युद्ध झालें. यावेळीं अंबाजी इंगळे हा गोहद प्रांताचा मामलतदार होता. त्या युद्धांत इंग्रज उत्तर हिंदुस्थानांतील शिंद्यांचा मुलूख भराभर काबीज करीत चालले आहेत असें पाहून अंबाजी इंगळे हा शिंद्याविरुद्ध बंड केल्याचें मीष करून इंग्रजांस जाऊन मिळाला. व त्याच्यांशीं तह करून त्यानें गोदहच्या राण्याच्या मुलुखांतलि कांहीं मुलूख स्वतःकरितां मिळविला. पण शिंदे व इंग्रज यांच्या दरम्यान तह होतांच अंबाजी पुन्हां शिंद्याकडे गेला; व आपण आपल्या धन्याचा कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें कांहीं मुलूख वचावण्याकरितांच केवळ इंग्रजांनां जाऊन मिळालों होतों असें सांगून त्यानें शिंद्याकडून आपल्या समयोचित वर्तणुकीबद्दल शाबासकी मिळविली. महादजीनें सन १७८४ सालीं गोहदच्या राण्यापासून त्याचा मुलूख जिंकून घेतला असल्यामुळें त्याला ग्वालेरचा किल्ला इंग्रजांस देण्याचा कांहींच हक्क नाहीं, हा मुद्दा स्वतः अंबाजीनेंच उकरून काढला होता असें ग्रांटडफ, अंबाजीच्या जांवयानें त्याला तोंडीं सांगितलेल्या माहितीवरून लिहितो. पुढील सालीं होळकर व इंग्रज यांच्यामध्यें युद्ध उपस्थित झालें. तेव्हां अंबाजीनें होळकराला मिळण्याविषयीं शिंद्यास सल्ला दिला होता असें म्हणतात.

यानंतर शिंद्याची अंबाजीवर पुन्हां इतराजी झाली; व शिंद्याच्या अर्धवट संमतीनें यशवंतराव होळकरानें अंबाजीस (इ. स. १८०५सालीं) कैद केलें. पण मागून होळकरानें आपल्या फौजेस देण्याकरितां अंबाजीपासून बराच पैसा घेऊन त्यास बंधमुक्त केलें. व सर्जेराव घाटग्यास काढून शिंद्याकडून त्यास दिवाणगिरी देवविली. अंबाजी हुषार असल्यामुळें आपल्या कार्यांत त्याजपासून कांहीं मदत होईल अशी होळकरास आशा वाटत होती परंतु अंबाजी हा होळकर व इंग्रज या दोघांसहि खुष ठेवूं इच्छित असल्यामुळें त्याचें वर्तन एकंदरींत धरसोडीचें राहिलें. अंबाजी हा इ. स. १८०९ च्या सुमारास मरण पावला. असें दिसतें [ ग्रँड व ग्रांटडफ ].

**अंबाजी दुर्ग—**म्हैसूर. कोलार जिल्ह्याच्या चिंतामणी तालुक्यांतील एक टेकडी. उत्तर अक्षांश १३° २५' व पूर्व रेखांश ७८° ३'. टिपू सुलतानानें हींस तटबंदी केली असून ब्रिटिशांनीं इ. स. १७९२ सालीं ही सर केली.

**अंबाजी पुरंधरे.—**हा मूळचा सासवडचा कुळकर्णी व देशपांडा होता. बाळाजी विश्वनाथ पेशवा अंजिऱ्याच्या सिद्दीच्या त्रासानें कोंकणांतून देशावर आला तेव्हां सातारला जाण्यापूर्वी सासवडास या पुरंधऱ्याकडे राहिला होता असें बखरकार सांगतात ( शाहू महाराज बखर, पा. ४८ ). बाळाजी विश्वनाथाबरोबर अंबाजीहि धनाजी जाधवाच्या पदरीं राहिला. पुढें दोघेहि शाहूच्या तैनातींत आले. बाळाजी पेशवा झाला तेव्हां त्यानें अंबाजीस आपली मुतालकी दिली. इ. स. १७१४ त दमाजी थोरातानें या दोघांस कपटानें बंदींत घातलें व त्यांच्या सुटकेसाठीं मोठी खंडणी मागूं लागला. त्यावेळीं अंबाजीनें बाळाजीच्या जिवास जीव देऊन त्याची सुटका केली. अंबाजी साताऱ्यास शाहूजवळ राहून पेशव्यांचें अगत्य ठेवीत असे. बाजीराव पेशवेपद पावल्यानंतर अंबाजी त्यांच्या बरोबर स्वारींत असे. इ. स. १७३३ त श्रीनिवास प्रतिनिधीनें कोंकणवर जी मोहीम केली त्या मोहिमेंत अंबाजी असून युद्धाचें वर्तमान बाजीराव

गास तो कळवी ( त्याचें एक पत्र म. रि. मध्य विभाग १ पा. २७७ मध्यें छापिलें आहे ). इ. स. १७३५ त अंबाजी काशीयात्रेस गेला तेव्हां त्यानें आपला मोठा पुतण्या मल्हार तुकदेव यास शाहूकडून मुतालिकी देवविली. काशीयात्रा आटोपून बाजीरावाच्या हिंदुस्थानच्या स्वारींत तो दाखल झाला. तिकडून परत आल्यावर लवकरच वारला (१७३५). पुरंधरे व पेशवे यांचा संबंध फार जुना व जिव्हाळ्याचा असे. नानासाहेब पेशवा लहानपणीं अंबाजीच्या हाताखालीं कामकाजास होता. अंबाजीचा मुलगा महादोबा व पुतण्या नाना हेहि त्याला सर्व बाहेरच्या गोष्टी समजावून देत. शाहूजवळहि अंबाजीचें चांगलें वजन असे. बाजीराव किंवा चिमणाजी यांचा वरचढपणा जेव्हां शाहूच्या दृष्टोत्पत्तीस येई तेव्हां पुरंधऱ्यांकडून त्यांची तो कानउघाडणी करी. [ मराठी रियासत, मध्यविभाग. कैफीयती, इत्यादि ].

**अंबाडी.**—हिला अंबाडी, पुळु, मेस्तपाट, दरे कुद्रम, पातसन, शेरिआ, पुण्डि, वगैरे नांवें आहेत. हें झाड मूळचें आफ्रिकेंतील असून आतां हिंदुस्थानांत वाखाकरितां याची लागवड बऱ्याच मोठ्या प्रमाणांत होते.

मुंबई इलाखा, मद्रास इलाखा व मध्यप्रांत यांत याची लागवड मोठ्या प्रमाणांत होते व इतर ठिकाणीं ती थोड्या-प्रमाणावर होते. संयुक्त प्रांत व पंजाब या प्रांतांत अंबाडीची लागवड तुरळक तुरळक होते. इ स. १९०५–६ सालीं मुंबई इलाख्यांत सरासरी ८३१०९ एकर जमीन अंबाडीच्या लागवडींत होती. खडकाळ कुरुंदाची जमीन अंबाडीच्या लागवडीला चालते. उत्तर गुजराथेंतील मळीच्या जमीनीवर अंबाडी उत्तम होते. परंतु मध्यम प्रतीच्या काळ्या जमीनीवरहि अंबाडीचें पीक चांगलें येतें. सामान्यतः बाजरी व ज्वारी यांच्या पिकांतच बहुधा अंबाडी तुरळक तुरळक पेरतात. आक्टोबर नोव्हेंबरमध्यें अंबाडीचीं झाडें उपटतात. या झाडांची वाढ पूर्ण होऊन तीं झाडें कापल्यावर त्यांचा वाख बळकट होतो. हीं वाळलेलीं झाडें दहा दिवस पाण्यांत भिजवून मग त्यांच्या सालीच्या बट्या काढतात. त्या काठीनें झोडून पाण्यांत धुतात व अशा रीतीनें स्वच्छ वाख काढतात.

मुख्यतः अंबाडीच्या तागाचा उपयोग दोर करण्याकरितां व हलक्या प्रतीचीं तरटें करण्याकडे करतात. अंबाडीच्या ८ पौंडास म्हणजे ४ शेरांस १ रुपया पडतो. महाराष्ट्रांतील अंबाडीला लंडनच्या बाजारांत "बिमलिपट्टण ताग" असें म्हणतात. दिवसेंदिवस या तागाची मागणी वाढत आहे. बंगालच्या तागापेक्षां अंबाडी हलक्या प्रतीची असते.

अंबाडीच्या बियांपासून शुद्ध व स्वच्छ तेल निघतें; म्हणून अंबाडीचें बीं गळीताच्या धान्याप्रमाणें इंग्लंडला पाठविलें जातें. पुणें प्रांतांत अंबाडी गुरांनां खावयास घालतात. व पाल्याची भाजी करतात. गुरास दूध जास्त सुटण्यास अंबाडीचें बीं भरडून व शिजवून त्यांत तेल, गूळ घालून देतात.

**अंबाडा.**—या नांवाचा वृक्ष कोंकण व कर्नाटक प्रांतीं सांपडतो. याची पानें रामफळीच्या पानासारखीं असून फळ आंबट व कच्चा सुपारीच्या आकाराचें असतें. याचें लाकूड इमारतीस उपयोगी पडत नाहीं.

**भाजीची अंबाडी**—शहराशेजारीं भाजीकरितांच केवळ पाणभरी अंबाडी स्वतंत्र करतात. कोरडवाहू शेतांत अंबाडी पेरतात ती वाखाकरितां. अंबाडी कोवळी असतांना तिचीं पानें व बोंडें तोडून त्यांची भाजी करतात. केवळ भाजीकरितां अंबाडी करण्यास वाफ्यांत बीं फेंकून पाणी देतात व सुमारें एक वितीपासून एक फुटापर्यंत वाढतांच सबंध उपटून विकण्यास नेतात.

**लाल अंबाडी**—हिचीं नांवें लाल अंबाडी, मेस्तपत्व, केम्पु वगैरे. हिंदुस्थानांतील व सिलोनमधील उष्णप्रदेशांत सर्वत्र लाल अंबाडीची लागवड करतात. हिंदुस्थानांतील सर्द हवेच्या सखल प्रदेशांत लाल अंबाडीचें पीक चांगलें येतें असें दिसतें. टेकड्यांवर तर याची लागवड मुळींच होत नाहीं.

लाल अंबाडीची पेरणी मे महिन्यांत होऊन नोव्हेंबर डिसेंबरमध्यें पीक काढतात कोठें कोठें यापूर्वींहि पीक निघतें. लाल अंबाडीच्या झाडापासून सडवून वाख काढतात, त्याला बाजारांत रोझेलें ताग म्हणतात. बियामध्यें औषधी गुण असून शक्तिवर्धक व मूत्ररेचक म्हणून त्यांचा उपयोग करतात. लाल अंबाडीचीं फळें रक्तपित्तव्याधिनाशक असून त्यांची चटणी, फळसमिश्रित पाक वगैरे तयार करण्याकडेहि उपयोग होतो. [ वाट. पदे. मुलिसनकृत शेतकीचें तिसरें पुस्तक ].

**अंबा भवानी**—महिकांठ्यांतील (मुं.इ.)सरस्वती नदीच्या उगमाजवळील यात्रेचें ठिकाण. येथें देवीचें प्रसिद्ध देऊळ आहे. हें देऊळ फार प्राचीन काळीं म्हणजे ७४६ च्या सुमारास सुद्धां आतांप्रमाणेंच प्रसिद्ध होतें. येथें बहुतेक यात्रेकरू नाहीं असें कधींच होत नाहीं. तरी पण खरी मोठी जत्रा सप्टेंबरमध्यें भरते. देऊळ संगमरवरी दगडाचें असून खांबावर १६ व्या शतकांतील खासगी देणग्यांबद्दल कांहीं अंकित लेख आहेत.येथून जवळच ४ मैलांवर कोटेश्वर महादेवाचें देऊळ आहे. यात्रेला आलेला प्रत्येक मनुष्य परत जाण्यापूर्वी कोटेश्वराच्या दर्शनाला जातोच.

**अंबाला( जिल्हा)**—पंजाब. दिल्ली भागाचा उत्तरेकडील जिल्हा. उत्तर अक्षांश३०° २' ते ३१° १३' व पूर्व रेखांश ७६° १९' ते ७७° ३६'. क्षेत्रफळ १८५१ चौरस मैल.

उत्तरेस सतलजनदी व पलीकडे होशियारपूर जिल्हा. आग्नेयीस यमुनानदी व पलीकडे संयुक्तप्रांतांतील सहारणपूर जिल्हा; ईशान्येस नालागड, पतिआळा, सिरमूर आणि कलसिया हीं संस्थानें; दक्षिणेस कर्नाल जिल्हा;

पश्चिमेस पतिआळा संस्थान व लुधिआना जिल्हा. या जिल्ह्याचे दोन निरनिराळे भाग करतां येतील. घगर आणि यमुना या दोन नद्यांमधील प्रदेश हा पहिला. हा प्रदेश सपाट असून सुपीक आहे. यांत अंबाला, नारायणगड आणि जगाध्री या तहशिली येतात. घगर आणि सतलज यांमधील सपाट प्रदेश हा या जिल्ह्याचा दुसरा भाग असून यांत रूपर आणि खरर या दोन तहशिली आहेत. हा प्रदेश अत्यंत सुपीक आहे; घगर नदीचें पाणी लागवडीस मिळण्याची सोय आहे. तरी ही जागा पाणथळ असल्यामुळें येथील हवा रोगदायक आहे, त्यामुळें या भागांत फार कमी वस्ती आहे.

येथील वनस्पती सिमला व सिवालिक डोंगरावरील वनस्पतींप्रमाणेंच आहेत. वन्य प्राणी—वाघ, अस्वल, सांबर, चितळ, काकर, काळवीट वगैरे.

हवा साधारण बरी आहे. तरी डोंगराच्या सान्निध्यामुळें उन्हाळ्यांत उन्हाळा व हिंवाळ्यांत थंडी फार पडते. पावसाची सरासरी सपाट प्रदेशावर २८ इंच असून कसौली येथें ( डोंगरावर ) ६१ इंच आहे. पाऊस साधारण सर्व जिल्ह्यांत बरा असतो पण कधीं कमी व कधीं जास्त पडतो. उदाहरणार्थ इ. स. १८८४–८५ सालीं जगाध्री येथें ८७ इंच पाऊस पडला व इ. स. १८८९–९० सालीं दादूपूर येथें केवळ ·३३ इंच पाऊस पडला.

इतिहास.—इ.स.सातव्या शतकांतील चिनी प्रवाशी ह्युएनत्संग यानें, हा प्रदेश सुधारलेला असून फार भरभराटींत होता व त्याची राजधानी सुघ्न होती असें वर्णन केलें आहे. जनरल कनिंगहॅम हा जगाध्रीजवळील सुघ नांवाचें खेडें हीच सुघ्न राजधानी असावी असें म्हणतो. उत्तर हिंदुस्थानावर ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांचा परिणाम या जिल्ह्यास पुष्कळ भोगावा लागला.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत सतलजनदीच्या दक्षिणेस लहान लहान शीख संस्थानें उदयास येऊं लागलीं. एकीकडून अफगाणांच्या स्वाऱ्या व दुसरीकडून मराठ्यांच्या स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें दिल्लीचें तक्त बरेंच डळमळीत झाल्यामुळें शीख लोकांस सतलज व यमुना या दोन नद्यांमधील प्रदेशांत यथेच्छ धुमाकूळ घालतां येऊं लागला. पुढें इ स. १८०३ सालीं ज्यावेळीं मराठी सत्ता ब्रिटिश सत्तेपुढें हरली त्यावेळीं या भागांत पुष्कळ लहान मोठीं संस्थानें स्थापन झालीं. इ. स. १८०८ सालीं रणजितसिंग सतलज नदीपार होऊन तिकडील संस्थानिकांपाशीं तो खंडणी मागूं लागला. या गोष्टीमुळें घाबरून जाऊन पुष्कळ छोटे छोटे संस्थानिक एकत्र होऊन त्यांनीं ब्रिटिशांची मदत मागितली. ब्रिटिशांनीं त्यांस मदत दिली व इ. स. १८०९ सालच्या ब्रिटिश आणि रणजितसिंग यांच्या तहामध्यें त्या संस्थानांस रणजितसिंगानें कोणत्याहि प्रकारें त्रास देऊं नये असें ठरलें व आपसांत कोणीहि लढाई करूं नये असा जाहीरनामा इ. स. १८११ सालीं निघाला. संस्थानांनीं खंडणी वगैरे ब्रिटिश सरकारास देऊं नये व राज्यांतील सर्व अधिकार संस्थानिकांकडेच ठेवण्यांत आले असून फक्त सर्व लहानमोठ्या संस्थानांवर सर्वसाधारण अधिकार अंबाला येथील गव्हर्नर जनरलचा एजंट याचा असावा असें ठरलें होतें. प्रसंगीं जरूर पडल्यास त्यांनीं ब्रिटिश सरकारास मदत करावी असेंहि एक कलम होतें. इ. स. १८४५ सालीं झालेल्या पहिल्या शीख लढाईंत त्या संस्थानिकांपैकीं कोणी मदत केली नाहीं उलट पुष्कळांनीं उघड बंड केलें त्यामुळें अंबाला येथें कमिशनर नेमण्यांत आला व या संस्थानिकांचे पुष्कळ अधिकार कमी करण्यांत आले. इ. स. १८४९ सालीं दुसरी शीख लढाई झाल्यावर सर्व पंजाब ब्रिटिशांकडे आला. त्यावेळीं पुष्कळ संस्थानिकांचें राज्य करण्याचे अधिकार काढून घेण्यांत आले.

इ. स. १८५७ सालच्या बंडांत या जिल्ह्यांत फारशी गडबड झाली नाहीं. पुराणवस्तुसंशोधनासंबंधानें या जिल्ह्याविषयींची माहिती सुघ व साधौरा या लेखांत मिळेल.

या जिल्ह्यांत ७ मोठीं गांवें व १७१८ खेडीं आहेत. लोकसंख्या ( १९२१ ) ६८१४७७ कॉलरा, ताप व देवी या रोगामुळें येथील लोकसंख्या कमी होत आहे.

या जिल्ह्यांत पांच तहशिली आहेत. त्यांचीं नांवें—अंबाला, खरर, जगाध्री, नारायणगड आणि रूपर.

जाट लोक बहुतेक जमीनींचे मालक आहेत. पातदारी आणि भय्याचारी या दोन पद्धतींवर या जिल्ह्याची जमीन वांटली गेली आहे.

मुख्य पिकें—गहूं, हरभरा, मका, भात, इत्यादि. इसवी सन. १९०३–४ सालीं एकंदर ११९५ चौ. मैल जमीन लागवडीखालीं असून पैकीं ७१ चौ. मै. बागाइती होती. येथील गुरांची अवलाद प्रयत्न केल्यास सुधारेल असें दिसतें.

अंबाला येथें सुती सतरंज्या उत्तम प्रकारच्या होतात. अंबाला येथें धान्याचा व्यापार मोठा चालतो. अंबाला शहर हें नॉर्थ वेस्टर्न रेल्वे व दिल्ली–अंबाला–काल्का रेल्वे यांचें जंक्शन आहे व येथूनच काल्कासिमला लाईन गेली आहे.

येथें इ. स. १८६०–६१ सालीं फक्त एकदांच दुष्काळ पडला होता. त्यावेळीं गहूं रुपयास आठ शेर झाला होता.

प्रत्येक तहशिलींत एक तहशीलदार व एक नायब तहशीलदार असतो. जिल्ह्यावर डेप्युटी कमिशनर असतो.

इ.स.१९०३–०४ सालीं या जिल्ह्याचें एकंदर करासहित उत्पन्न १३.८ लाख रुपये होतें. या जिल्ह्यांत पांच म्युनिसिपालिट्या आहेत. त्या अंबाला, रूपर, जगाध्री, साधौरा आणि बरिया.

तहशील.—पंजाब. ही अंबाला जिल्ह्याची वायव्येकडील तहशील उत्तर अक्षांश३०° ७' ते ३०° २७' व पूर्व रेखांश७६° ३३' ते ७७° १२'. क्षेत्रफळ ३६९ चौरस मैल. लोकसंख्या (१९११) १९५३८६. तहशीलींचें मुख्य ठिकाण अंबाला शहर. एकंदर उत्पन्न (इ. स. १९०३—०४ सालीं) २.८ लाख रुपये. तहशील सपाट प्रदेशांत असून जमीन मळईची आहे.

शहर.—पंजाब अंबाला जिल्हा व तहशिलीचें मुख्य ठिकाण उत्तर अक्षांश. ३०° २३' व पूर्वरेखांश. ७६°४६' नॉर्थ वेस्टर्न रेलवे आणि दिल्ली-अंबाला-काल्का रेल्वेवर हें शहर मुंबईहून ११०५ मैल, व कलकत्याहून १०७७मैल अंतरावर आहे. इ. स. १९२१ सालीं येथील लोकसंख्या ७६३२६ होती. हिंदुस्थानांत जीं मोठमोठीं लष्करी ठाणीं आहेत त्यांपैकीं अंबाला हें एक आहे. लष्करी ठाण्याच्या वायव्येस चार मैलांवर अंबाला शहर असून शहराकरितां नॉर्थ वेस्टर्न रेल्वेचें निराळें स्टेशन आहे. अंब या पौराणिक व्यक्तीपासून अंबाला हें नांव पडलें असावें. तथापि 'आंबवाला' (आंब्याचें खेडें) याचा अपभ्रंश अंबाला असावें हें जास्त सयुक्तिक दिसतें. इ. स. १८२३ सालीं सिस-सतलज संस्थानांच्या पोलिटिकल एजंटचें ठाणें झाल्यापासून या शहरास महत्त्व येत चाललें. इ. स. १८४३ सालीं हें लष्करी ठाणें होऊन इ. स. १८४९ सालीं जिल्ह्याचें मुख्य ठाणें झालें. शहराजवळ सिव्हिल लाईन्स असून तेथेंच सर्व कचेऱ्या आहेत. येथें कापूस व धान्य यांचा मोठा व्यापार चालतो. त्याचप्रमाणें जंगली जिनसा यांचाहि येथें बराच मोठा व्यापार आहे.

इ. स. १८६७ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. इ. स. १९०३-४ सालीं ७०७०० रुपये उत्पन्न व खर्च ७१९०० रुपये होता.

**अंबालिका.**—काशीराजाच्या तीन कन्यांतील कनिष्ठ. ही अंबेची भागिनी असून विचित्रवीर्य (भीष्माचा सापत्न भ्राता), याची कनिष्ठ स्त्री होती. ही अनपत्य असतांच हिचा पति मरण पावला. तेव्हां सत्यवतीनें (भीष्माच्या सापत्न मातेनें), हिच्या ठायीं संतति उत्पन्न करण्यास त्यास सांगितलें. परंतु त्यानें तें आपल्या प्रतिज्ञेस्तव मान्य केलें नाहीं. त्यावरून तिनें आपणांस कौमारदशेंत झालेल्या कृष्णद्वैपायन पुत्राचें स्मरण केलें. त्या कालीं तो तेथें तत्काळ प्रगट झाला. त्यास पाहून तीनें विचित्रवीर्याच्या मरणाचा व तो अनपत्य असल्याचा वृत्तांत सांगितला आणि हिच्या ठायीं पुत्र निर्माण करण्याची आज्ञा केली. तीवरून त्यानें हिच्या ठायीं गर्भ स्थापन केला. कालेंकरून पांडवांचा पिता जो पंडु राजा त्याप्रत ही प्रसवली. (भार० आदि० अ० १०५-१०६.).

**अंबाली.**—(मुं. इ.) बडोद्याच्या सिनोर पोटभागांतील एक खेडें. येथें अनसूयादेवीचें मंदिर आहे. रक्तपितीच्या रोग्यांनीं येथील तीर्थ आंगाला लाविल्यास त्यांची व्यथा बरीच कमी होते असा समज आहे.

**अंबासमुद्रम्, तालुका**—मद्रास इलाखा. तिनवेल्ली जिल्ह्यांतील एक तालुका. उत्तरअक्षांश८°२९'ते८°५७'उव ७७°१२'ते ७७°४०'पू. रे. सह्याद्रीच्या पायथ्याशीं हा वसलेला असून त्याचें क्षेत्रफळ४९८ चौरसमैल व लोकसंख्या (१९२१) १९५२८९. आहे. सन १९०३—४सालीं एकंदर उत्पन्न ४७४००० रुपये होतें. या तालुक्यांत ताम्रपर्णी नदीच्या आसपासचा प्रदेश असून त्यांत भातशेतीची अति सुपीक जमीन आहे. या नदीस फार प्राचीन कालीं घातलेले बांध अद्यापि सुस्थितींत असून त्यांपैकीं पाणी भातशेतीस मिळत असतें. हा प्रदेश सोडल्यास तालुक्यांतील इतर जमीन खडकाळ व कमी प्रतीची आहे. या तालुक्यांत सिंगमपट्टी व उरकड या दोन जमीनदाऱ्या आहेत. या तालुक्यांत अंबासमुद्रम् वीरवनल्लूर, कल्लिदैकुरिची व सर्मादेवी हीं मोठीं गांवें असून पापनाशम् नावाचें यात्रेचें ठिकाण याच तालुक्यांत आहे.

गांव—मद्रास इलाखा. तिनवेल्ली जिल्ह्यांतील अंबासमुद्रम् तालुक्याचें मुख्य ठिकाण. ८° ४२' उत्तर अक्षांश व ७७° २७' पूर्व रेखांश हा गांव ताम्रपर्णी नदीच्या वामतीरावर तिनवेल्ली गांवापासून २० मैल आहे. लो. सं. (१९२१) १४११८. येथें एक सहकारी पंचायत असून तिच्या मार्फत स्थानिक कामें चालतात.

**अंबिका.**—काशी राजाच्या तीन कन्यांतील मध्यम. ही अंबेची कनिष्ठ आणि अंबालिकेची जेष्ठ भगिनी असून विचित्रवीर्याची ज्येष्ठ स्त्री होती. हीहि कनिष्ठ भगिनीप्रमाणेंच अनपत्य होती. म्हणून हिच्या ठायीं कृष्णद्वैपायनानें गर्भ स्थापन केला असतां, दुर्योधनादिकांचा पिता जो धृतराष्ट्र, त्याप्रत ही प्रसवली (भार. आदि. अ. १०५—१०६; प्रा. को).

**अंबिका दत्त व्यास**—यानें 'सामवत' नांवाचे सहा अंकी नाटक लिहिलें.

**अंबिकापूर.**—मध्य प्रांत सुरगुजा संस्थानची राजधानी. येथील राजवाडा सुंदर असून त्यांत विजेच्या दिव्यांची योजना केली आहे. हें गांव आधुनिक पद्धतीवर वसविलें असून सडका व घरांच्या रांगा नीटनेटक्या आहेत. येथें व्यापारी पेठ व बाजार आहे; आणि शाळा, कचेरी, रहदारी बंगला, न्याय कोर्ट यासारख्या संस्था आहेत.

**अंबुशी.**—बारीक पानांची भुईसरपट आपोआप येणारी ही एक वनस्पति असून ती बागांतून आपोआप उगवते. ह्या वनस्पतीच्या अंगीं जे आंबट धर्म आहेत ते तिच्यांत ॲसिड ऑग्झलेट ऑफ पोटॅशियम असल्यामुळेंच आहेत. त्यामुळेंच तिच्या अंगीं कापडावरील शाईचे डाग व लोहाचे डाग काढून टाकण्याचे धर्म आहेत. पानांच्या अंगीं शीतल व रक्त शुद्ध करण्याचे धर्म आहेत. घट्टे,

चामखीळ इत्यादिकांवर अंबुशी चोळल्यानें ते वरे होतात. दाहाच्या जागीं पानें वांटून पोटिसाप्रमाणें लाविल्यानें त्या जागेचा ठणका व इतर लक्षणें दूर होतात. अंबुशीचें सार, चटणी वगैरे खाल्ल्यानें क्षुधा वाढून पचनक्रियाहि सुधारते. याकरितां अग्निमांद्याच्या रोग्यास ती प्रशस्त आहे. धोत त्यापासून आलेला अंमल अंबुशीचा ताजा रस दिला असतां दूर होतो व तो डोळयांत घातल्यास सारा जातो असें म्हणतात. ज्वर, अशांश, हिरड्यांतून रक्त जाणें ह्यांवर अंबुशी इतर औषधांशीं मिश्र करून देतात. [ भि. वि. पु. १८ पृ. १२८ ].

**अंबूर**—मद्रास. उत्तर अर्काट जिल्ह्याच्या वेलोर तालुक्यांतील एक गांव. उ. अ. १२° ४८′ व पू. रे ७८° ४३′. लोकसंख्या सन १९२१ सालीं १९२२० होती. मद्रास रेल्वेचें हें स्टेशन आहे येथें तेल, तूप, नीळ यांचा मोठा व्यापार चालतो. गांवाजवळ असलेला अंबूरदुर्ग हा अति अवघड ठिकाणीं वसलेला आहे. इ. स. १७४९ सालीं याच ठिकाणीं मुझफरजंगानें अर्काटचा नवाव अन्वरुद्दीन याचा पराभव केला.

**अंबेर**--राजपुताना. जयपूर संस्थानची प्राचीन राजधानी. उ. अ. २६° ५९′ व पू. रे. ७५° ५१′. जयपूरच्या ईशान्येस सुमारें ७ मैलांवर हें मोडकळीस आलेलें गांव आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ३६८९. कोणी अंबिकेश्वरापासून या गांवास हें नांव पडलें आहे असें म्हणतात. कोणी अयोध्येचा राजा मांधाता, त्याचा पुत्र अंबरीष याच्या नांवावरून हें नांव निघालें असावें असें म्हणतात. या गांवाचें पूर्ण नांव अंबरी खनेर असें असून त्याचें अंबिनेर-अंबेर असें रूप अखेर झालें असावें. येथें इ. स ९५४ सालचा एक शिलालेख आहे. बाराव्या शतकांत कच्छवाह रजपुतांनीं सुस्वत मीनाच्या राजापासून हें शहर जिंकिलें. पुढें तें सहा शतकेंपर्यंत याची राजधानी होतें.

येथील जुना राजवाडा ग्वाल्हेरच्या राजवाड्याच्या खालोखाल आहे. इ.स १६००त मानसिंगानें हा बांधण्यास आरंभ केला. त्यांत वारंवार पुष्कळ भर पडली. अठराव्या शतकाच्या प्रारंभीं दुसरा सवाई जयसिंग यानें राजवाड्याचे दरवाजे तयार केले. यानेंच इ. स. १७२८ सालीं जयपूर शहर आपलें राजधानीचें ठिकाण केलें. जयगडचा किल्ला जवळच टेंकडीवर आहे.

येथें श्री जगत् सरोमानजी आणि अंबिकेश्वर यांचीं देवळें असून तेथील खोदकाम प्रेक्षणीय आहे. त्याचप्रमाणें शीलादेवी नांवाचें एक देऊळ असून येथें रोज एक बकरा मारला जातो. पूर्वी रोज एका मनुष्याचा वध होत असे त्याचा हा अवशेष शिल्लक राहिला आहे असें म्हणतात.

**अंबेला**—वायव्येकडील सरहद्दीचा प्रांत. पेशावर जिल्ह्याच्या ईशान्य सरहद्दीच्या थोडी पलीकडे बुनेरमधीलएक खिंड. उत्तर अक्षांश ३४° २४′ व पूर्व रेखांश ७२°३८′ इ. स. १८६३ सालीं ब्रिटिशांनीं जी मोहीम केली तीस अंबेला मोहीम असें नांव असून तें याच खिंडीच्या नांवावरून पडलें आहे. इ. स. १८२४ सालीं प्रसिद्ध पेंढारी अमीरखान याचा सोवती सय्यद अहमदशहा हा आपल्या चाळीस अनुयायांसमवेत पेशावर सरहद्दीवरील युसफझाई जातींत जाऊन राहिला. याच्या अगोदर कांहीं दिवस रणजितसिंगास नौशहर येथें पठाणांवर जय मिळाला होता. इ. स. १८२७ सालीं शीख लोकांनीं सय्यद अहमदशहास पेशावरच्या बाहेर हांकून लाविल्यामुळें तो स्वात येथें जाऊन राहिला. परंतु इ. स. १८२९ सालीं त्यानें पेशावर जिंकिलें. यावेळीं त्याच्या नवीन नवीन सुधारणांनां त्याचे पठाण अनुयायी कंटाळले व त्यांनीं त्यास सिंधुनदापार हांकलून दिलें. यावेळीं तो हजारामधील बालकोट येथें गेला. परंतु याच वेळीं शेरसिंगानें त्याच्यावर हल्ला करून त्याचा पराभव केला. व याच हल्ल्यांत तो मारला गेला. पुढें त्याच्या शिष्यवर्गापैकीं उरलेल्या लोकांनीं उस्मानझइ (उत्मानक्षइ) मधील सित्तान नामक खेड्याचा आश्रय केला. येथें स्वात लोकांचा धर्मगुरु सय्यद अकबरशहा याच्या अमलाखालीं एक वसाहत वसविली. या ठिकाणीं ब्रिटिश हिंदुस्थानच्या हद्दींतील गुन्हेगार लोकांस आश्रय मिळूं लागला. पुढे पंजाब खालसा केल्यावर या वसाहतींची ब्रिटिश सरकारास फार काळजी वाटूं लागली. ( १८५३ ). आंबच्या खानावर इंग्लिशांनीं स्वारी केली होती, त्यावेळीं या लोकांनीं थोडा त्रास दिला. पुढें इ. स. १८५७ व १८५८ सालीं यांनीं थोडें डोकें वर काढलें होतें. यावेळीं इंग्लिशांनीं त्यांवर स्वारी केली.

त्यावेळीं सित्तान येथें रहाणाऱ्या पूर्वीच्या लोकांनीं या वसाहतीस पुन्हां थारा देणार नाहीं असें कबूल केल्यामुळें ही वसाहत माल्का येथें रहावयास गेली. माल्का हें महावन पर्वताच्या उत्तरेच्या बाजूस आहे. येथूनहि ते ब्रिटिश मुलखास त्रास देऊं लागले. त्यांजवर इंग्लिशांनीं इ. स. १८६३ सालीं स्वारी केली. यावेळीं इंग्लिशांनीं अंबेला खिंड आपल्या ताब्यांत घेतली. परंतु बुनेर व स्वात येथील जाती इंग्लिशांविरुद्ध उठल्या व त्यामुळें थोडें फार नुकसान झालें. परंतु मोहिमेचा उद्देश सिद्धीस गेला. स्वात येथील जातींनीं याउपर ब्रिटिश मुलखास त्रास होऊं नये म्हणून माल्का जमीनदोस्त केलें व त्यावेळेपासून आजपर्यंत त्या बाजूस कांहीं गडबड नाहीं.

**अंबेहळद**—या झाडास आम्रनिशा,अंबाहळद, कस्तुरी, मंजल इत्यादि नांवें आहेत. हीं झाडें रानांत सांपडतात. तीं हळदीसारखीं दिसतात. फांदीच्या बुडखाशीं गांठी असून त्यांस दर्प फार असतो. ही हळद बागायती साध्या हळदीप्रमाणें मसाल्याच्या उपयोगी पडत नाहीं. परंतु इचें लोणचें घालतात हिचे गुणधर्म साध्या हळदीपेक्षां जास्त महत्वाचे आहेत. ही रक्तविकारनाशक व रक्तप्रसारक आहे.

उगाळून अंगास लावण्यानें कंडू वगैरे असल्यास ती शमन करणें व रक्त शुद्ध करणें हे मुख्य गुण या हळदीचे आहेत.

कंडू व खरूज यांवर अंबेहळद व कडू जिरें यांचें बारीक चूर्ण करून तुपांत खलून खरजेस लावावें. ठेंच लागून किंवा कोणताहि अपघात होऊन रक्त सांखळल्यास अंबेहळद व रक्तबोळ हीं पाण्यांत उगाळून ऊन करून दुखऱ्या भागास त्याचा लेप द्यावा म्हणजे त्वरित गुण येतो.

अंतावर अंबेहळद व सैंधव एकत्र वाटून मुलाच्या वयाच्या मानानें व शक्तीप्रमाणें द्यावें. अथवा सागरगोट्याच्या पाल्याच्या रसांत अंबेहळद उगाळून पोटांत द्यावी.

**अंबोयना**—हें डच ईस्ट इंडीजमधील एका रेसीडेन्सीच्या मुख्य शहराचें व आणि ज्या बेटावर हें शहर आहे त्या बेटाचें नांव आहे.

अंबोयना व टरनेटच्या रेसिडेन्सीकडे मोलक्काची राज्यव्यवस्था आहे. अंबोयना रेसिडेन्सीचे ९ जिल्हे पाडले आहेत. या रेसिडेन्सीचें एकंदर क्षेत्रफळ सुमारें १९८६१ चौरस मैल असून लोकसंख्या२९६००० आहे. यांत २४०० यूरोपियन लोक आहेत.

जिल्हे—( १ ) अंबोयना या नांवाचें बेट, ( २ ) सापारूआ; यांत ओमा व नुसालाउत आहेत, ( ३ ) कनेली, (पूर्व बुरू ). ( ४ ) मासारेटी ( पश्चिम बुरू ). ( ५ ) कैरातू ( पश्चिम सेराम ). ( ६ ) वाहाइ ( मध्य सेरामचा उत्तर भाग ). ( ७ ) आमाहाइ ( मध्य सेरामचा दक्षिण भाग ), ( ८ ) बांदा बेट व पूर्व सेराम, सेराम लाउत, व गोरोम. (९) आरू, केई, तिमोर लाउत किंवा टेनिम्बर व नैर्ऋत्येकडील बेटें.

अंबोयना बेट सेरामच्या नैर्ऋत्येस बांदा समुद्राच्या उत्तरेकडे आहे. हें बेट ३२ मैल लांब असून याचें क्षेत्रफळ सुमारें ३८६ चौरस मैल आहे. या बेटांतील वावानी व सालहुतू या पर्वतावर उष्ण पाण्याचे झरे आहेत. येथील जमीन सुपीक असून येथें कोको होतो. येथील हवामान आल्हादकारक व आरोग्यदायी आहे. उष्णतामान ८०° असून क्वचित काळीं ७२° च्या खालीं उतरतें. पूर्वेकडील मनसून नंतर येथें अतिशय जलवृष्टि होते व कधीं कधीं भयंकर वादळ होतें ( आक्टोबरपासून एप्रिलपर्यंत ) पश्चिम मनसूनच्या वेळीं येथें उन्हाळा असतो. कांसवाची पाठ बाहेरगांवीं फार पाठवितात. येथें साबूदाणा, नारळ, ऊंस मका, कॉफी, मिरीं व कापूस, शिवाय उष्णकटिबंधांतील फळें व भाजीपाला फार होतो. परंतु लवंगाचें मुख्य उत्पन्न आहे. अंबोयना लांकूड कोरीव कामाकरितां फार चांगलें असतें. या बेटांतील लोक आपलीं अर्भकें पाळण्यांत असतांच त्यांचीं लग्नें जुळवून टाकतात. वरपक्षाकडून कन्येच्या पित्याला द्रव्य देऊन कन्या विकत घेण्यांत येते. घटस्फोट आणि व्यभिचार या दोन्ही गोष्टींचा सुकाळ आहे. [ लग्नविधि व सोहाळे ].

या मुख्य शहरांत रेसिडेन्ट व मोलक्काचा सेनाधिपति यांचें राहण्याचें ठिकाण असून शहराच्या रक्षणार्थ व्हिक्टोरिया नांवाचा किल्ला बांधला आहे. येथें शेतकी, मासे धरणें व आयात व निर्गत व्यापार यांवर लोक अवलंबून असतात. येथील लोकसंख्या सुमारें ८००० आहे.

येथें पोर्तुगीज लोक प्रथम आले होते ( १५११ ). यांनीं १५२१ मध्यें एक वखार घातली. परंतु १५८० पावेतों हें शहर त्यांनां पूर्णपणें मिळालें नव्हतें. इ. स. १६०९ मध्यें हें शहर त्यांच्या हातून गेलें. इ. स. १६१५ च्या सुमारास इंग्रज लोकांनीं येथें वसाहत केली. परंतु डच लोकांनीं त्यांची कत्तल केली. त्यास पुढें याबद्दल ३,००,००० पौंड दण्ड भरावा लागला. १६७३ मध्यें ड्रायडन कवी यानें 'आम्बोयना,'किंवा 'द क्रुएलटीज ऑफ दि डच टू दि इंग्लिश मरचन्ट्स' या नांवाचें शोकपर्यवसायी नाटक रचलें. १७९६ मध्यें इंग्लिश लोकांनीं अम्बोयना शहर घेतलें. परंतु ( १८०२ ) एमीन्सच्या तहान्वयें डच लोकांस तें परत केलें. १८१० मध्यें त्यांनीं पुनः एकदां हें शहर घेतलें होतें. परंतु १८१४ त डच लोकांस पुनः परत केलें.

**अंबोली**—मुंबई इलाखा. सांवतवाडी संस्थानांतील हवा खाण्याचें ठिकाण. समुद्रसपाटीपासून याची उंची २३०० फूट आहे. उत्तर अक्षांश१५° ५८' व पूर्व रेखांश७४° ४'. येथील हवा सुंदर असून उन्हाळा कधींहि भासत नाहीं. लो.सं. ( १९०१ ) १३७१. येथें संस्थानिक व पोलिटिकल एजंट यांचे बंगले आहेत. अंबोली या नांवाचा एक घांट आहे.

**अंभोरा**—भंडारा जिल्ह्याच्या सरहद्दीवर नागपूरच्या आग्नेयीस उमरेड तहशिलींत वाइनगंगानदीतीरीं हें २२४ लोकवस्तीचें लहानसें खेडेंगांव आहे. येथें चैतन्येश्वराचें प्रसिद्ध देवालय असून हरहर स्वामी यांची समाधि आहे. येथें तीन जत्रा भरत असून त्यांस नागपूर व भंडारा जिल्ह्यांतील लोक येतात. येथील शेतकरी यात्रेकरूंनां आपण उत्पन्न केलेले जिन्नस विकतात. देवळाची व्यवस्था पहाण्यास एक महाराष्ट्र ब्राह्मण आहे. त्याच्याकडे पूर्वापार चालत आलेल्या कांहीं मासे पकडण्याच्या जागा आहेत.

**अंशुमान**—इक्ष्वाकु कुलांतील सगर राजाचा पौत्र व असमंजाचा पुत्र. यानें सगराचा अश्वमेधीय अश्व परत आणिला व त्याचे ( सगराचे ) साठ हजार पुत्र कपिलशापानें भस्म झाले होते त्यांचा उद्धार करण्यासाठीं गंगा पृथ्वीवर आणण्याची खटपट केली [ 'सगर' पहा ]. परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. त्याचा पुत्र दिलीप रघुवंशीय प्रख्यात राजा होऊन गेला. दिलीपपुत्र भगिरथ यानें गंगा पृथ्वीवर आणून अंशुमानाची इच्छा पूर्ण केली [महा भा. वनपर्व अ १०७; वा. रामायण, बालकांड सर्ग ४१-४२ ].